भारतवर्षीय

# अर्वाचीन चरित्रकोश

(इ. स. १८१८–१९४५ अखेर)

विद्यानिधि

सिद्धेश्वरशास्त्री चित्राव

शके १८६८] [इ. स. १९४६

किंमत वीस रुपये

# प्रस्तावना

**प्रास्ताविक**—आज ह्या अर्वाचीन चरित्रकोश वाचकांच्या हाती देतांना आम्हांला अतिशय आनंद होत आहे. चरित्रकोशाच्या योजनेंतील हा तिसरा म्हणजे अखेरचा खंड होय. हा अर्वाचीन चरित्र-कोश लोकांना अर्पण केल्यानें दीड तप उराशीं बाळगलेली योजना पूर्ण झाल्याचें समाधान आम्हांस लाभत आहे. एक प्रचंड स्वरूपाचें काम दीर्घ कालानंतर अनेक संकटांना तोंड देत पण यशस्वीपणें पैल तीराला पोंचविल्यामुळें ऋणविमोचन व कृतकृत्यता अशा मधुर भावनांनीं मन व्याप्त झाल्यास आश्चर्य कसलें ?

प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन अशा त्रिखंडात्मक चरित्र-कोशामुळें सृष्टीच्या आरंभापासून नेहरूंचें स्वतंत्र राष्ट्रीय सरकार स्थापन होईपर्यंतच्या अवाढव्य काळाचा धावता इतिहास चित्रपटाप्रमाणें पाहण्याची सोय झाली आहे. साधारणतः दोन अडीच हजार वर्षांपूर्वीचा इतिहास कोठल्याहि इतिहासग्रंथांत क्वचितच दिलेला असतो. पण त्याबाबत आपण हिंदुस्थानांतले लोक विशेष भाग्यशाली आहोंत. आपणांकडे त्यापूर्वीच्या कालांतील अडीच हजार वर्षांचे वेदादि ग्रंथ अविकृत स्वरूपांत उपलब्ध आहेत. मोहेंजोदडो वगैरे ठिकाणीं झालेल्या उत्खननांतून तर त्याहि पूर्वीचा इतिहास उपलब्ध झाला आहे. आणि पुराणांनीं तर त्याहि पूर्वीच्या अनेक मन्वन्तरांचा इतिहास नांवनिर्शावार देण्याचा प्रयत्न केला आहे. मनुष्य प्राणी निर्माण होण्यापूर्वीची सृष्टीची क्रमानें झालेली वाढहि ते इतिहासांत नमूद करतात. यावरून त्यांच्या इतिहासाच्या कल्पनेची व्यापकता मनावर चांगलाच परिणाम करिते. अशा कालापासून मौर्य चंद्रगुप्तापर्यंत प्राचीन चरित्र-कोश, मौर्य चंद्रगुप्तापासून शेवटल्या बाजीराव पेशव्यापर्यंत मध्ययुगीन चरित्र-कोश आणि त्यापुढील आजपर्यंतची माहिती अर्वाचीन चरित्रकोशांत देण्यांत आली आहे. अशा या त्रिखंडात्मक कोशानें जगाची व विशेषतः भारतवर्षाची सर्वांगीण कल्पना येते.

**अर्वाचीन काल निर्णय**—आम्हीं १८१८ ते १९४५ पर्यंत अर्वाचीन काल धरला आहे. मराठ्यांकडून इंग्रजांनीं दिल्ली घेतली, १८१८ सालीं बाजीराव रघुनाथ पेशवे पुणें सोडून पळाला आणि येथें इंग्रजांचें राज्य स्थिर झालें. या मधल्या काळांत हिंदुस्थानच्या बाहेर जग आहे आणि त्यांपासूनहि आपणांस कांहीं शिकतां येईल, ही कल्पना येथील लोकांना नव्हती. इंग्रजांचें राज्य येथें स्थिर झाल्यावर जगाशीं आमचा संबंध आला, आमची दृष्टि जागतिक झाली आणि जगाशीं संबंध ठेवल्याशिवाय तरणोपाय नाहीं अशी खात्री पटत चालली. जुनी विचारसरणी व आत्मतृप्तता यांना जबरदस्त धक्का बसला, आम्ही जगाचा एक भाग म्हणून विचार करूं लागलों व प्रत्येक अघाडीच्या अग्रभागीं चमकण्याची व नवे विचार आत्मसात् करण्याची आमच्यांत धडपड सुरू झाली. सबब हा आमचा अर्वाचीन काळ होय. हा अर्वाचीन काल प्रत्येक देशाचा निराळा असतो.

युरोपच्या इतिहासांतमुद्धां कॉन्स्टांटिनोपलचा मुसलमानांनीं पाडाव केल्यानंतर ग्रीक व रोमन संस्कृतीचा सर्वत्र अभ्यास सुरू झाला. नवे विचार सुरू होऊन कूपमंडूक वृत्ति नष्ट झाली व अनेक शास्त्रीय विषयांच्या अभ्यासास सुरुवात झाली. तेव्हां दृष्टीला व्यापकपणा येऊन अनेक जुन्या कल्पनांना धक्का बसला आणि जागतिक दृष्टि प्राप्त होऊन अर्वाचीन काल सुरू झाला, असें मानतात.

याच धोरणानें हिंदुस्थानच्या भूतकालाकडे पाहिलें असतां, प्राचीन कालांत हिंदुस्थानांत जागतिक दृष्टि व व्यापक विचारसरणी होती, असें स्पष्ट दिसतें. मध्ययुगांत जागतिक दृष्टि नष्ट होत गेली आणि इंग्रजी राज्याबरोबर तिचा पुन्हा उदय झाला, नव्या विचारांनीं दिशा भरून गेल्या आणि आपण जगाचा एक घटक असल्याचा विचार पुनश्च प्रसृत झाला. म्हणूनच स. १८१८ नंतर हिंदुस्थानचा अर्वाचीन काळ सुरू झाला असें मानावें लागतें.

**भारतवर्षीय स्वरूप**—या कोशाला भारतवर्षीय स्वरूप कितपत प्राप्त झालें आहे हें पाहण्यासारखें आहे. ब्रिटिशसरकारच्या राज्यव्यवस्थेंत हिंदुस्थानच्या पडलेल्या

अकरा* प्रान्तांपैकीं सर्व प्रान्तांतील व्यक्तींचा समावेश या कोशांत झाला आहे. संस्थानांपैकीं प्रमुख संस्थानांतील व्यक्तींचा समावेश आहे. भाषावार विचार करितां सुमारें दोनशें बोली व कितीतरी भाषा हिंदुस्थानांत चालू आहेत. बोली या लिपिबद्ध नसल्यानें त्या कोणत्यातरी लिपिबद्ध भाषेच्या अंगभूत समजल्या जातात. अशा भाषांपैकीं भाषावार प्रान्तरचनेच्या दृष्टीनें व कार्याच्या सुलभतेच्या दृष्टीनें राष्ट्रसभेनें एकवीस प्रान्त कल्पिले आहेत.

राष्ट्रसभेचे भाषावार प्रान्त—

१ अजमीर मारवाड (१ हिन्दी), २ आंध्र (तेलगू), ३ आसाम (आसामी), ४ उत्कल (उरिया), ५ कर्नाटक (कानडी), ६ केरळ (मल्याळी), ७ गुजराथ (गुजराथी), ८ तामीळनाड (तामीळ), ९ दिल्ली (२ हिन्दी), १० पंजाब (उर्दू), ११ बंगाल (बंगाली), १२ बिहार (बिहारी), १३ ब्रह्मदेश (ब्रह्मी), १४ मध्यप्रान्त (मराठी), १५ महाकोशल (३ हिन्दी), १६ महाराष्ट्र (२ मराठी), १७ मुंबई (३ मराठी), १८ विदर्भ (४ मराठी), १९ सरहद्द (पुश्तु), २० संयुक्त (४ हिन्दी), २१ सिंध (सिंधी). यांत चार हिन्दीचे व चार मराठीचे प्रान्त एकत्र धरल्यास भाषावार प्रान्त फक्त पंधरा होतात व त्यांत तामीळ, तेलगू, कानडी आणि मल्याळी या द्राविड भाषांचा एक वर्ग व संस्कृतोद्भव भाषांचा दुसरा वर्ग असे विभाग पडतात. भाषावार दृष्टीनें या सर्व प्रान्तांतील लोकांचा समावेश या ग्रंथांत झाला आहे. या प्रत्येक भाषेंत अभिजात वाङ्मय पुरातन कालापासून होत आलेलें आहे व आजहि होत आहे. त्यांत त्या प्रान्तांतील लोकांच्या भावना व अन्तःकरण खुलेपणानें व्यक्त झालेलें असतें. मात्र मराठी, हिन्दी, गुजराथी, उर्दू, बंगाली व कानडीखेरीज इतर भाषांतील वाङ्मयसेवकांचा परिचय या ग्रंथांत फारच थोड्या प्रमाणांत घेतां आला. वास्तविक त्या त्या भाषेंतील राष्ट्रीय महाकवी सर्वांना परिचित असणें इष्ट आहे. पण आन्तरप्रान्तीय माध्यमाच्या अभावीं परक्या इंग्रजीच्या द्वारां आम्हाला परस्परांचा जेवढा परिचय होईल तेवढाच. सध्यां तरी त्याला उपाय नाहीं.

*१ मुंबई, २ मद्रास, ३ बंगाल, ४ बिहार, ५ ओरिसा, ६ मध्य, ७ संयुक्त, ८ पंजाब, ९ सिंध, १० सरहद्द, ११ आसाम, १२ संस्थानें.

**अर्वाचीन इतिहासाचीं साधनें**—वेदकालापासून आजतागायत पर्यंतचा प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन अशा क्रमानें होणारा प्रवास हा गडद अंधारांतून हलुहळू उजेडांत येण्यासारखा आहे. प्राचीन चरित्र-कोशाच्या कक्षेंतील माहिती अंधारांत चाचपून हातीं लागेल तें जमा करण्यासारखी होती. इतिहासाचे उपलब्ध होणारे सर्व पुसट, तुटक दुवे व अनेक विकल्प तेथें आधारांसह संशोधकांच्या पुढें ठेवण्याचें काम करावें लागलें. कांहींहि सोडावयाचें नाहीं अशी त्यासंबंधीं भूमिका असल्यानें आणि मूळ आधारभूत ग्रंथ प्रायः संस्कृतांत असल्यानें आधार विश्वासानें स्वतः पाहून नमूद करितां येत असत. त्यासंबंधीं इंग्रजींतून व कांहीं ठिकाणीं इतर युरोपीय भाषांतील मतप्रदर्शनहि नमूद करणें अवघड वाटलें नाहीं. त्याकरितां कांहीं युरोपीय ग्रंथांचीं भाषान्तरें करून घेणें आवश्यक झालें. पण मध्ययुगीन कोशापासून आधार, त्यांच्या भाषा व त्यांची विविधता यांमुळें मार्ग काढणें मुष्कील होत चाललें. अक्षरशः अडचणींतून मार्ग काढावा लागला, निवड करावी लागली, निवडींत हातीं येणाऱ्या साधनांवर भर द्यावा लागला आणि अनेक गोष्टी अनिर्णित व अपुऱ्या स्थितींत नमूद कराव्या लागल्या. कित्येक विधानें तर नव्या–जुन्या साधनांच्या अभ्यासानें बदलण्याचा संभव उत्पन्न झाला.

अर्वाचीन चरित्र-कोश या सर्व दृष्टीनें अगदीं निराळा व अस्सल साधनांच्या भरपूरपणामुळें निराळ्याच अडचणी उत्पन्न करणारा ठरला आहे. अतिरिक्त प्रसिद्धीचीं साधनें, विद्वत्तादर्शक पदव्यांचा सुकाळ आणि मोठेपणाच्या तात्कालिक भडक कल्पना यांमुळें कोणाचीं चरित्रें नमूद करावींत व कोणाचीं टाळावींत, याबद्दल व्यामोह उत्पन्न होण्याचा पदोपदीं संभव उत्पन्न झाला. जगाच्या ज्ञानांत भर टाकणारे कोण आणि पुस्तकी पंडित कोण यांचा उलगडा होईना. राष्ट्राच्या जीवनांत क्रान्ति करणारे कोण आणि क्रान्तीच्या गप्पा मारणारे कोण हें समजेना. राजाश्रयानें काम करणारांच्या तेजानें डोळे दिपूं लागले आणि निःस्वार्थ सेवा करणारांचीं नांवेंगांवें शोधून काढावीं लागलीं. लोकसेवा करितांकरितां स्वतःचें नांवहि मागें राहावें अशी ज्यांनी काळजी घेतली नाहीं व आपल्या कार्याचें सर्व श्रेय लोकांना घेऊं दिलें त्या थोर महात्म्यांचा उल्लेख करणेंहि मुष्कीलीचें झालें. निवड करतांना भाषा, प्रान्त व विषय हेहि लक्षांत घ्यावे लागले. ग्रंथाचें भारतवर्षीय

स्वरूप, प्रत्येक क्षेत्रांत उत्पन्न झालेली विविधता आणि सूक्ष्मता, तसेंच व्यापकतेपेक्षां ज्ञानाच्या विशेषीकरणाकडे वाढती प्रवृत्ति वगैरे गोष्टी लक्ष्यांत घेऊन निवड करावी लागली. अशी निवड करतांना त्या त्या व्यक्तींच्या कर्तृत्वांतील विशेष दाखवितांना अनेक विषयांतील सूक्ष्मता प्रगट करणें ओघानेंच प्राप्त होई. ज्ञानाच्या किंवा कार्याच्या केन्द्रीकरणामुळें त्या विषयाशीं अपरिचित असलेल्या बाहेरच्या लोकांना विषय समजावून देणें कठीण पडतें; पण त्याशिवाय त्या त्या व्यक्तीचें चरित्रच पुरें होत नाहीं. एवढेंच नव्हे तर त्या त्या व्यक्तीचें चरित्र म्हणजे प्रामुख्यानें त्याच्या कार्याचा तोच भाग होय. सबब चरित्रपूर्णतेकरितां तो भाग स्पष्ट करण्याचें काम करावेंच लागलें व तसें करितांना त्या त्या विषयांतील तज्ज्ञांचें साहाय्य आवश्यक झाले.

**चरित्रें कोणाचीं?**—या कोशांत कोणत्याहि क्षेत्रांत विशेषपणानें चमकलेल्या माणसांचीं चरित्रें द्यावयाचीं असा पहिल्यापासून संकल्प होता, आणि त्याप्रमाणें अट्टल चोर मंगळदास गांधीपासून ते रामकृष्ण परमहंसांसारख्या थोर पुरुषापर्यंत समाजांतील सर्व थरांतील विशेषत्वानें चमकणाऱ्या व्यक्तींचीं निवडक चरित्रें दिलीं आहेत. त्यांत जात, धर्म, प्रान्त, देश, धंदा किंवा भाषा यांचा भेद बाळगला नाहीं. हिंदुस्थानासंबंधीं ज्यांनीं महत्त्वाची कामगिरी केली, ज्यांनीं ज्ञानाचें किंवा कलेचें एखादें दालन सुशोभित केलें, त्याला नवा उजळा दिला किंवा नवी दृष्टि उत्पन्न केली त्या सर्वांचा संग्रह करण्याची दृष्टि ठेविली आहे. ज्यांची माहिती लोकांना असणें जरूर आहे, ज्यांचें नांव नेहमीं कानावर येतें, पण ज्यांच्या कर्तृत्वाचा उमग होत नाहीं आणि ज्यांच्या कर्तृत्वाची व ज्ञानाची परंपरा पुढें चालविणें अवश्य आहे अशांची कटाक्षानें निवड करण्यांत आली आहे. वृत्तपत्रकार, राजकारणी, मैदानी वक्ते, संस्थांचे अधिकारी व प्रचलित व्यवहार हातीं असणारे लोक यांच्याहि चरित्रांचा संग्रह केला आहे.

**विभूति कोण**—पूर्वोक्त क्षेत्रांतील कांहींना कार्यापेक्षां अधिक प्रसिद्धि मिळते आणि त्यांना स्वतःची प्रसिद्धि करण्याची जरूरीहि असते. पण यापेक्षां अत्यंत संथपणें महत्त्वाची व कायम स्वरूपाची कामगिरी कर्तव्यबुद्धीनें करणारा पण प्रसिद्धिपराङ्मुख असा एक वर्ग राष्ट्रांत असतो. शरीरांतील आरोग्याप्रमाणें तोच राष्ट्राची खरी संपत्ति होय. तो वर्ग प्रसिद्धिपराङ्मुख असतो आणि फाजील प्रसिद्धीमुळें त्याच्या कार्यांत व्यत्ययहि येतो. पण त्याचमुळें त्यांचें कार्य फारच थोड्या लोकांना ठाऊक असतें.

कालाच्या बदलत्या प्रवाहांत लोकांच्या आवडीनिवडींत टिकून राहणारें मोठेपण मिळविणें अतिशय कठीण आहे. समाजांत एक दिवस ज्याला आदर्श पुरुषाचें स्थान प्राप्त झालेलें असतें त्याला पाहतां पाहतां नामशेष होण्याचा प्रसंग येतो. शास्त्र किंवा वाङ्मय क्षेत्रांतील ही स्थिति. मग राजकारण, कला, उद्योग यांसारख्या केवळ जनमताच्या तालावर चालणाऱ्या बाबांत तर यापेक्षां अधिक अस्थिरता असणारच.

परंतु यामुळें त्या त्या काळीं प्रामाणिकपणें अविरत व प्रचंड कार्य करणाऱ्या व्यक्तींच्या मोठेपणास बाध येऊं शकत नाहीं. आपआपल्या क्षेत्रांत आपल्या बुद्धीप्रमाणें ध्येयवादानें सतत काम करीत राहणारा मनुष्य हा समाजातील खरा श्रेष्ठ पुरुष होय. त्याच्याच कर्तृत्वावर समाजाच्या इतिहासाची उभारणी होत असते. सत्यनाश करणारे राजे किंवा उत्पाती समाजकंटक यांच्या घडामोडीला इतिहासांत तितकें महत्त्व देतां येणार नाहीं. क्षणभर चमकून दिसेनाशा होणाऱ्या व्यक्तीपेक्षां कर्तव्यबुद्धीनें कार्य करणाऱ्या लोकांची निवड करण्याचेंच कार्य महत्त्वाचें होय.

हिंदुस्थानाच्या अति खालावलेल्या स्थितींत जन्माला येऊन ज्यांनीं निरलसपणें कार्य केलें, जन्मभर यातना व अवहेलना होत असतां जे आपल्या कर्तव्यापासून च्युत झाले नाहींत. पुष्कळ वेळां त्यांचें प्रतिपादन व सिद्धान्त बरोबर असूनहि देशांतील राजकीय व सामाजिक परिस्थितीमुळें त्या व्यक्ती प्रभावहीन व अपेशी दिसल्या तरी तींच माणसें आमच्या राष्ट्राची खरी संपत्ति होत. अशा व्यक्तींच्या कर्तृत्वानेच हिन्दी राष्ट्राचें नांव जगांत उज्ज्वल झालें आहे आणि त्यांच्यामुळेंच हिंदुस्थानचा कायाकल्प होऊन तो आजच्या स्थितीला येऊन पोंचला आहे. अशा व्यक्तींच्या चरित्रांचा संग्रह करण्याचें काम आम्ही या कोशांत यथामति केलें आहे.

त्यांतहि अंगीकृत कार्यांत परकीयांपेक्षां स्वकीयांचाच विरोध ज्यांना सहन करावा लागला अशा व्यक्ती विशेष महत्त्वाच्या होत. राजा राममोहन राय, स्वामी दयानंद सरस्वती, ज्योतिबा फुले, माधव गोविंद रानडे वगैरेंचीं नांवें या दृष्टीनें महत्त्वाचीं होत. या लोकांना

समकालीन लोकांनीं तर हेटाळलेंच, पण अगदीं अलीकडच्या काळापर्यंतसुद्धां त्यांच्यासंबंधीं अनादराचे उद्गार निघत असत. परंतु ती स्थिति अलीकडे पालटून नव्या सांस्कृतिक आक्रमणाला तोंड देणारे आणि हिन्दी संस्कृतीचें व्यापक स्वरूप प्रकाशांत आणणारे सत्पुरुष म्हणून त्यांचा आतां गौरव करण्यांत येत आहे. भविष्य कालीं तर 'स्वतंत्र भारताचे द्रष्टे' म्हणून त्यांचा गौरव अधिकच होत जाईल असेंहि दिसतें.

पण याप्रमाणें भविष्यकालाचे अग्रदूत म्हणून काम करणाऱ्या वरील थोर पुरुषांप्रमाणें प्रत्येक क्षेत्रांत कालानुरूप कार्य करणाऱ्या आणि समाजाला गतिशाली व आकलनशील ठेवून जगाच्या शर्यतींत मागें पडूं न देणाऱ्या व्यक्तिहि तशाच श्रेष्ठ दर्जाच्या होत, असें मानल्याशिवाय गत्यन्तर नाहीं.

अशाहि व्यक्तींचीं चरित्रें मात्र आम्हीं मुद्दाम मिळवून प्रसिद्ध केलीं आहेत आणि तीं प्रसिद्ध करतांना ढोबळ माहिती न देतां तपशीलवार माहिती देण्याचा प्रयत्न केला आहे. विषयांची विविधता साधण्याचा प्रयत्न कितपत यशस्वी झाला आहे हें शेवटची विषयसूचि चाळली असतां सहज ध्यानांत येईल.

पण हें निवडीचें कार्य अत्यंत कठीण वाटलें ही गोष्ट प्राञ्जलपणें कबूल केली पाहिजे.

**परदेशी पंडित व स्वदेशी पंडित**—जन्मानें परक्या पण कर्मानें येथील बनलेल्या परदेशी व्यक्तींचीं चरित्रें या ग्रंथांत कांहीं आलीं आहेत. त्यांत बहुतेक देशांतील लोक असून त्यांची गणना प्रायः पुरातत्त्व किंवा प्राच्यविद्यासंशोधकांत करावी लागेल. असें काम करणारांत प्रायः सरकारी नोकरांचा भरणा फार मोठा आहे. काम करण्याच्या तळमळीबरोबर त्यांचें राजकर्त्यांशीं असणारें नातें, हुद्दा, त्यांच्याभोंवतीं उभा असलेला हुकमी शिक्षित परिवार आणि प्रसिद्धीचीं साधनें यांमुळें त्यांचें काम उरक, योग्यता, मानमान्यता व परिणाम या दृष्टीनें अत्यंत यशस्वी झालेलें दिसतें. त्यांच्यापासून प्रेरणा घेऊन काम करावयास निघालेल्या देशी लोकांचें काम तितकें उठावदार झालेलें दिसत नाहीं.

३८

पोटाचा उद्योग करावयाचा व फावल्या वेळीं संशोधन करावयाचें, तें प्रकाशित करण्याच्या खटाटोपापासून तें बाजारांत विकणें आणि संशोधकापुढें मान्यतेकरितां ठेवणें हीं सर्वच कामें एकट्यानें करण्याचें खडतर दैव देशी संशोधकाच्या मार्गांत सतत अडचणी उत्पन्न करीत आलें आहे. सर्वच दृष्टीनें अनुकूलता असणाऱ्या श्रीमंताच्या मुलानें व नगरपालिकेच्या कंदिलाखालीं अभ्यास करणाऱ्या गरीब विद्यार्थ्यानें केलेल्या अभ्यासाइतकी प्रचंड तफावत या दोन कार्यकर्त्यांत पडते. पण या परिस्थितीच्या भयानकतेंतून मार्ग काढून आन्तरराष्ट्रीय कीर्ति मिळविणाऱ्या हिंदी संशोधकांचें कोणासहि कौतुक वाटल्यावाचून राहणार नाहीं. उदाहरणार्थ, ज्यांचें शिलालेखांतील संख्येचें व अक्षरांचें वाचन व संशोधन इतक्या दीर्घ कालानंतर बरोबर ठरत आहे व इंग्रजी येत नसतांनाहि परदेशांत ज्यांच्या योग्यतेचा व ज्ञानाचा गौरव झाला, पण स्वतःच्या देशांत मात्र अज्ञानदशेंत शेवटले दिवस गेले त्या डॉ. भगवानलाल इंद्रजींचें चरित्र या दृष्टीनें महत्त्वाचें आहे. 'माझें हें संशोधन पाहा व जर तें तुम्हांला योग्य वाटलें तर मला पुढें संशोधन चालविण्यासाठीं वेळेवर पोटभर अन्न मिळण्याची व्यवस्था करा' हे जगविख्यात गणिती श्रीनिवासन् रामानुजन् यांचे उद्गार, किंवा 'पत्राचें उत्तर लिहिण्यापुरताहि माझेजवळ पैसा किंवा साधनें नाहींत' असें लिहिणारे इतिहासाचार्य राजवाडे यांच्या उद्गारांवरून आमच्या सर्वच संशोधकांच्या कष्टावर व स्थितीवर प्रकाश पडेल.

**व्यक्तीच्या श्रेष्ठत्वाचें गमक**—सध्यां जगांतील निरनिराळ्या भागांचा अलगपणा कमी होत असून त्याला झपाट्यानें एकता प्राप्त होत आहे. दळणवळणाच्या वेगवान् साधनानें चोवीस तासांत पृथ्वीप्रदक्षिणा करण्याची शक्यता निर्माण झाली आहे, दूरपणा लोपला आणि जगांतील कोठल्याहि आंदोलनापासून कोणत्याहि राष्ट्राला अलग राहणें अशक्य झालें आहे. लहान राष्ट्रांना मोठ्या राष्ट्रांत सामील झालेंच पाहिजे अशी स्थिति आली आहे. मग लहान जाती, थोड्या लोकसंख्येच्या भाषा वगैरेंना मोठ्या जाती, मोठ्या संख्येच्या भाषा वगैरेंच्याशीं एकरूप झाल्याशिवाय जगतां येणें अशक्य झालें असल्यास नवल नाहीं. जगाच्या बरोबर राहण्याकरितां नवे शोध, नवें ज्ञान आणि नवी व्यवस्था तत्परतेनें पत्करावी लागत आहे. त्याकरितां आन्तरराष्ट्रीय भाषा व तज्ज्ञ यांच्यामध्यें स्वतःकरितां स्थान निर्माण करण्याची व तें कायम टिकविण्याची दक्षता घ्यावी लागत आहे. या जागतिकसंबंधाच्या अत्यावश्यकतेमुळें आहार, पोषाख, शिक्षण

गैरेंतील वैचित्र्य नष्ट होऊन विलक्षण समानता निर्माण होत आहे. पूर्वी व्यापक ज्ञान व बहुश्रुतता यांना महत्त्व होतेंच, पण आतां त्या गुणांच्या मर्यादा जात, प्रान्त, देश आणि जग अशा क्रमानें वाढल्या आहेत आणि ज्ञानाचें वर्गीकरण, विशेषीकरण व केन्द्रीकरण यांच्या पद्धतीहि अधिक सूक्ष्म बनल्या आहेत. हें अचूक हेरून ज्यांनीं कार्य केलें आणि जगाच्या शर्यतींत सामील होण्याची हिंदुस्थानला योग्यता प्राप्त करून दिली ते हिंदुस्थानच्या दृष्टीनें काळाच्या पाऊलांची चाहुल ओळखणारे महात्मे होत.

**चरित्रें कशीं लिहिलीं ?**—चरित्र लिहिण्याच्या अनेक तऱ्हा आहेत. जन्मापासून मृत्यूपर्यंतच्या घटना कालक्रमानें नमूद करावयाच्या हा त्यांतील एक प्रकार व हाच कोशाला उपयुक्त अशी पुष्कळांची समजूत. पण ही पद्धत आम्हीं केव्हांच स्वीकारलेली नाहीं. आयुष्यांतील प्रकट घटनांप्रमाणेंच त्यांच्या अन्तर्गत प्रेरणांनाहि महत्त्व असतें. अन्तर्गत प्रेरणांचा उलगडा झाल्याशिवाय पुष्कळ वेळां प्रकट घटनांचाहि नीट उलगडा होत नाहीं. तसेंच प्रासंगिक प्रेरणांवरूनहि मनुष्याच्या चरित्रावर प्रकाश पडतो. कोणत्याहि स्थितींतील मनुष्य प्रसंगीं कसा वागतो यावरून त्याच्या अन्तःकरणाची परीक्षा होते. तें वर्तन त्याचें खरेखुरें चरित्र होय. पण त्याची नोंद घटनात्मक चरित्रांत क्वचितच सांपडते.

या दृष्टीनें ऐतिहासिक ग्रंथ व रामायणभारत या ग्रंथांची तुलना करतां येण्यासारखी आहे. कालक्रमानें घटनांची नोंद अशा समजुतीनें इतिहास लिहिल्यानें तो निर्जीव ठोकळ्यासारखा होतो. पण त्यांत अन्तःकरणाच्या प्रेरणेची आणि प्रसंगीं विशिष्ट व्यक्ति कशी वागली याची नोंद केल्याबरोबर रामायणमहाभारतांना अजरामर काव्याचें स्वरूप आलें. काल्पनिक नाटक-कादंबऱ्यांपेक्षां वास्तव वाङ्मयं अन्तःकरणाची पकड घेतें, याचें कारणहि त्यांत आपणांस आपलें व आपल्या भोंवतालच्या समाजाचें हुबेहुब प्रतिबिंब दिसतें हें होय. चरित्रलेखन करितांना सुद्धां तन्मय होऊनच चरित्रनायकाच्या अन्तःप्रवृत्तीशीं एकरूप होऊन त्याचें कार्य आपणांस वर्णन करितां आलें, तर तें चरित्र निःसंशय सरस, प्रेरक आणि यथार्थ चित्रण करणारें होईल याबद्दल संशय वाटत नाहीं. तसा प्रयत्न आम्हीं केला आहे. तो कितपत यशस्वी झाला आहे हें वाचकांनीं ठरवावयाचें आहे.

वरीलप्रमाणें प्रत्येक चरित्र लिहितांना केवळ बाह्य घटना नमूद न करितां तुलना, चिकित्सा, परिणाम, योग्यता वगैरे दृष्टीनें आम्हीं थोडें तरी विवेचन केलें आहे. त्याशिवाय चरित्रलेखन अपुरें होतें, अशी आमची समजूत आहे. त्यामुळें जन्ममृत्यु व ठोकळ घटना अशा स्वरूपाचीं हजारों चरित्रें देण्यापेक्षां आम्ही सुमारें हजार चरित्रेंच देऊं शकलों. सर्वत्र निवेदनपद्धतीच स्वीकारली आहे.

**अर्वाचीन काळाचें समालोचन**—पूर्वीच्या काळाप्रमाणेंच अर्वाचीन काळांतील आपल्या धार्मिक, सामाजिक, राजकीय व वाङ्मयीन इतिहासाचें सिंहावलोकन करणें अत्यंत मनोरंजक व उद्बोधक आहे. या प्रत्येक क्षेत्रांत उत्पन्न झालेल्या अनेक तात्त्विक प्रश्नांचा निर्णय कालानें तात्पुरता आपल्यासारखा लावून घेतला आणि पुढील मार्ग आक्रमण केला. सर्व ठिकाणीं तात्त्विकतेपेक्षां व्यवहार व उपयुक्तता यांचाच विजय झालेला असून हटातटानें वादविवाद करणाऱ्या दोन्ही पक्षांना कालाच्या उदरांत गडप व्हावें लागलें. पुढें पुढें तर त्या त्या पक्षाच्या त्या कालच्या तात्त्विक भूमिकासुद्धां लोकांना हास्यास्पद वाटूं लागल्या.

धार्मिक क्षेत्र हें आजवर नेहमींच अत्यंत महत्त्वाचें व जिव्हाळ्याचें मानण्यांत आलें आहे. तेथें राजसत्तेलाहि मोठ्या सावधगिरीनें हस्तक्षेप करावा लागतो. त्या क्षेत्रांतहि धर्माची आवश्यकता, प्रामाण्य, अपौरुषेयवाद, एकेश्वरवाद, मूर्तिपूजा, मंदिरप्रवेश, सती, पुनर्विवाह, मिश्रविवाह, विवाहवयोमर्यादा, नोंदणीविवाह, जातिभेद, शुद्धि, सहभोजन, अस्पृश्यता, समुद्रगमन वगैरे वाद अत्यंत हिरीरीनें लढविण्यांत आले, आणि ते वाद कालानें सुधारणानुकूल कौल देऊन निकालांत काढले. जरूर तेथें त्यावर कायद्याचेंहि शिक्कामोर्तब करून घेण्यांत आलें. यापैकीं कांहीं वाद तर आज उभयपक्षांनाहि हास्यास्पद कोटींतले वाटतील.

आज सतीच्या चालीचा पुनरुद्धार करावा, आठ वर्षांच्या मुलीचें लग्न करावें, मूर्तिपूजा सर्वश्रेष्ठ आहे, शुद्धीला शास्त्रांत आधार नाहीं, समुद्रगमनाला प्रायश्चित्त नाहीं, सार्वजनिक ठिकाणीं जातिभेद व धर्मभेद पाळावा, असे विचार कोणीहि प्रदर्शित करणार नाहीं. सहभोजन व अस्पृश्यतानिवारण वगैरे बाबतींतील विरुद्ध असणारा शास्त्रार्थ अव्यवहार्य असल्याचा निर्णय लोकांनीं सहज स्फूर्तीनें घेतला. व्रतवैकल्यें संपुष्टांत आलीं, नित्यनैमि- व संस्कार यांना संक्षेप देतांना तीं नाममात्र तरी [illegible] शिल्लक राहतील याची चिन्ता उत्पन्न झाली. शेंडी-जानवें

पळालें. सगोत्र व मिश्र विवाहांना कायद्याचेंहि साहाय्य मिळविण्यांत आलें. आज जातीय संस्थांना सामाजिक प्रश्नांबाबत मौन पाळण्याचें धोरण स्वीकारून जीवित कंठावें लागतें आणि आपली संघटना यशस्वी होत असल्याचा देखावा करावा लागत आहे. धार्मिक व सामाजिक बाबतींत कांहीं क्रान्तिकारक निर्णय लोकांनी कसे घेतले आणि ते केव्हां अमलांत आले, हें कळणेंहि मुष्किलीचें होऊन बसण्याइतके ते जलद व न कळत अमलांत येत आहेत.

राजकीय क्षेत्रांतहि अशीच आमूलाग्र क्रान्ति झाली. स्वतःचें राज्य गेल्याचा खेद लोकांत नव्हता, असें म्हणतां येणार नाहीं. पण इंग्रजी राज्याच्या आधुनिक तंत्रानें लोक गोंधळले आणि तें ईश्वरी प्रसाद मानण्यापासून सुरवात झाली. काठीला सोनें बांधून काशी-रामेश्वराच्या यात्रा करण्याइतकी सुरक्षितता एकदम निर्माण झाल्यानें लोकांना आश्चर्याचा धक्का बसला. आगगाडी-तारायंत्रानें लोक चकित झाले. इंग्लंडांतून नोकरांमार्फत राज्यकारभार चालविण्याच्या पद्धतीचें आकलन होण्यांत कांहीं दिवस गेले. परंतु दत्तक नाकारणें, संस्थानें खालसा करणें वगैरे प्रकारांना सत्तावन सालच्या बंडानें उत्तार मिळाला आणि कर्झनशाहीपर्यंत अर्जविनंत्यांच्या नेमस्त राजकारणाला भरती आली. पण राजकीय आश्वासनांना केराची टोपली दाखविली जाऊन "इंग्रजांची योग्यता देशी माणसाला केव्हांच येणार नाहीं" असें उघडपणें बोललें जातांच एकदम मध्ययुगीन दहशतवादानें डोकें वर काढलें. पहिल्या महायुद्धाच्या आरंभीं इतर वसाहतींचें अनुकरण करून साम्राज्यान्तर्गत स्वराज्य मागणारी होमरूलची चळवळ सुरू झाली. तेव्हांपासून लोकमताच्या पाठिंब्यावर चालणारें आधुनिक राजकारण सुरू झालें. त्याला महात्मा गांधींनीं अत्यंत प्रभावी स्वरूप दिलें.

स्वराज्य व स्वातंत्र्य या कोणीं देण्याघेण्याच्या गोष्टी नसून प्रत्येकाला त्या उपभोगण्याचा जन्मसिद्ध हक्कच आहे असा लो. टिळकांचा सिद्धान्त आतां सर्वमान्य झाला आहे. साम्राज्यान्तर्गत स्वराज्याची कल्पना चुकीची ठरली असून साम्राज्यांतून फुटून निघण्याची भाषा योग्य ठरली आहे. त्यांतूनहि सत्ताधारी हे भांडवलवाले असावेत कीं श्रमजीवी असावेत असा प्रश्न उत्पन्न होऊन दुसऱ्या महायुद्धानंतर मानवी हक्क निश्चित करण्यांत आले आणि ते पुरविण्याची हमी देणाऱ्या समाजसत्तावादी व विश्वकुटुंबवादी राजकारणाकडे ध्येय म्हणून जगाबरोबर हिंदुस्थानचाहि वाढता कल आहे. भांडवलवाले व्यक्तिशः नष्ट होत असून संघ केल्याशिवाय कोणाला कोणताच व्यवहार करितां येणें अशक्य झालें आहे. जुनी भांडवलशाही व नवा विश्वकुटुंबवाद यांचा संघर्ष चालू असून कोण विजयी होतो हें अद्याप ठरावयाचें आहे. मात्र जुनी भांडवलशाही व्यक्तिस्वरूपांतून संघस्वरूपांत गेली आहे. मध्यमवर्गाकडून तज्ज्ञांकडे आणि श्रम करणारांकडे सत्तासंक्रमणाचें काम वेगानें चालू आहे. आणि विश्वकुटुंबवाद कोठें एखाद्याच देशांत कधींच अवतरत नाहीं, म्हणून त्याच्या अवतरणाची फक्त पूर्वयोजना चालू आहे. पण समतेचें सत्ययुग सर्व जगांत एकदम सुरू होण्याचा मुहूर्त मात्र अजून सांपडलेला नाहीं.

सर्वच जग उपयुक्ततावादी व व्यवहारवादी बनत चालल्यानें वाङ्मयाच्या मांडणींतहि आमूलाग्र बदल झाला आहे. ज्यांत स्वतःचें प्रतिबिंब लोकांना दिसत नाहीं, ज्यांत प्रचलित प्रश्न सोडविण्याची दृष्टि नाहीं, ज्यांत नावीन्य, सुटसुटीतपणा आणि आकर्षकपणा नाहीं, असला कोणताहि वाङ्मयाचा प्रकार लोकप्रिय होण्याची शक्यता कमी होत चालली आहे. अद्भुताचें सत्ययुग नष्ट झालें असून, कल्पनारम्य आमोदप्रमोदांना जीवनांत क्षणिकपणा आला आहे, आणि वास्तवतेला बहर आला असून जीवनाशीं संलग्न असणाऱ्या गोष्टींकडे आस्थेनें पाहण्याची वृत्ति वाढत आहे.

महाकाव्यें करण्याची प्रथा मागें पडली असून छंदांनाहि स्वच्छंदानें वागविण्याकडे प्रवृत्ति वाढली आहे. काव्याचा छोटेपणासुद्धां नकोसा झाला असून गद्यालाच काव्याचें माधुर्य आणण्याची प्रवृत्ति वाढली आहे. कादंबऱ्यांचा विस्तार खपेनासा झाला असून एकसंधि लघुकथांचें युग चालू झालें आहे. त्यांतून लघुतम कथा निर्माण होत आहेत. अनेक घटनांचें संमिश्रण करण्यापेक्षां एकच घटना आकर्षकपणें आरंभ, मिरगांठ व उकल अशा पद्धतीनें मांडून रसोत्कर्ष साधण्याकडे प्रवृत्ति वाढत आहे. संगीत व गद्य नाटकांच्या मांडणींत फरक पडला असून सहज अभिनय, वास्तव घटना व प्रसंगानुरूप भावगीतें यांकडे विशेष लक्ष देण्यांत येत आहे; आणि तेथें कालमर्यादा कमी करण्यांत येऊन एक-प्रसंगात्मकतेकडे लक्ष देण्यांत येत आहे. शास्त्रीय वाङ्मय लोकप्रिय व आकर्षक पद्धतींत मांडण्याची कला वाढली आहे आणि टीकेला चिकित्सेचें स्वरूप येत आहे. सर्वच वाङ्मयावर जागतिक आंदोलनाची छाप पडर

असून साधारण माणसांना प्रतिभेच्या जोरावर त्यांत विहार करणें अशक्य झालें आहे. थोड-क्यांत पण स्पष्ट व रुचकर पद्धतीनें आपले विषय मांडण्याची औपनिषदिक पद्धतीची स्पष्ट छाप कलेवर दिसत आहे.

**अर्वाचीन कालांत हिंदुस्थान व महाराष्ट्र यांचें स्थान**—या कालांत हिंदुस्थाननें केलेली प्रगति निःसंशय वाखणण्यासारखी आहे. अभिमान बाळगण्या-सारखा इतिहास मागें असलेल्या लोकांनाच उज्ज्वल भविष्य काळ निर्माण करितां येतो. अफ्रिकेंतील निग्रो किंवा अमे-रिकेंतील रेड इंडियन अजून जेथल्या तेथेंच रानटी अवस्थेंत आहेत. पण आशिया खंडांतील बहुतेक राष्ट्रांत कमालीची हालचाल झाली असून दोन्ही महायुद्धांतून ता राष्ट्रें व त्यांतहि विशेषतः हिंदुस्थान हा सोन्याप्रमाणें शंभरनंबरी ठरला आहे. जगांतील प्रत्येक स्पर्धाक्षेत्रांत सामील होण्याची महत्त्वाकांक्षा त्याच्यांत जागृत झाली असून ज्ञानाच्या प्रत्येक शाखेंत भर घालण्याचें कामहि तो करीत आहे. आपली सर्व दृष्टीनें योग्यता वाढावी म्हणून समाजांत अन्तर्गत क्रान्ति करून, प्रत्येक व्यक्तीस संधि मिळण्याच्या कामांत कृत्रिम सामाजिक बंधनें झुगारून देण्याची आणि फार तर कांहीं आदर्श नैतिक बंधनें आपणांवर लादून घेण्याची वृत्ति वाढत आहे. त्या दृष्टीनें हा कोश सहज चाळला असतां आपल्या देशाची व्यक्तिसंपदा केवढी भव्य आणि आशादायक आहे हें सहज दिसून येईल.

या कोशाचें स्वरूप भारतवर्षीय असलें तरी त्यांत महाराष्ट्रीय व्यक्तींचीं चरित्रें इतर कोणत्याहि प्रान्ता-पेक्षां अधिक येणें अपरिहार्य आहे. जवळची वस्तु मोठी व लांबची लहान दिसणाऱ्या आपल्या दृष्टीचा तो परिणाम आहे.

तथापि अगदीं कांटेकोर दृष्टीनें पाहिलें तर महाराष्ट्रीय व्यक्तिसंपदेचा दर्जा कमी होत चाललेला दिसतो. इतर प्रान्तांच्या मानानें तो अगदींच निकृष्ट नसला, तरी तो पहिल्या दर्जाचा खास नाहीं. अखिल भारतीय कीर्तीच्या मर्यादा ओलांडून आन्तरराष्ट्रीय प्रांगणांत प्रवेश केलेल्या कांहीं मोजक्या व्यक्ति सोडल्या तर बाकीच्या बहुतेक लोकांना स्वप्रान्तापलीकडे स्थान नाहीं.

मात्र याचें मूळ महाराष्ट्राच्या कुवतीमध्यें नसून त्यांना मिळालेल्या विकृत मार्गदर्शनांत आहे. लेखनसंशोधनादि सर्व व्यवहार मराठींतच करून मराठीचें वैभव वाढवा, असे ग्रंथ मराठींत लिहा कीं, त्यासाठीं मराठी भाषेचें अध्ययन इतरांना करावें लागलें पाहिजे, अशा प्रकारच्या चालू काळाशीं विसंगत व अभिनिवेशी विचारांनीं महाराष्ट्र व्यापला गेला. इतर प्रान्त जागतिक माध्यम झालेल्या इंग्रजीसारख्या भाषेंत लिहून आपल्या ज्ञानाला जागतिक मान्यतेचें शिक्कामोर्तब मिळवीत असतां, महा-राष्ट्रांत मात्र मोठ्या हिरीरीनें मराठींतच लेखनादि चालू राहिलें. त्या त्या विषयांतील तज्ज्ञांशीं संबंध टाळण्याच्या या मध्ययुगीन मार्गानें स्वतःचें लेखन-संशोधन काय योग्यतेचें आहे हें कळेनासें होऊन जिकडे तिकडे उत्कर्षाला प्रतिकूल असणारी आत्मतृप्तीची भावना उत्पन्न झाली.

व्यापाराबद्दल महाराष्ट्र कधींच प्रसिद्ध नव्हता. तरी ज्ञानवृद्धीच्या बाबत तो इतर प्रान्तांच्या मागें राह-ण्याचें कांहींच कारण नव्हतें. पण जागतिक माध्यम असणाऱ्या इंग्रजीसारख्या भाषेच्या अवहेलनेनें शास्त्रीय जगापासून तो अलिप्त राहिला. थोडें ललित लेखन आणि अगदीं अलीकडच्या काळांतील इतिहासाच्या साधनांचें संकलन यांपरता महत्त्वाचा उद्योग त्याच्या हातून घडला नाहीं. अर्थोत्पादन, भारतीय मान्यता किंवा जगन्मान्य शास्त्रज्ञांच्या पंक्तीला बसण्याचें साधन या तीनहि दृष्टींनीं महाराष्ट्राची दिशाभूल झाली आहे, असें मोठ्या खेदानें म्हणावें लागते. बंगाल किंवा मद्रास प्रान्तांनीं याबाबत आघाडी मारली असून गुजराथ, सिंध, पंजाब वगैरे प्रान्तांनीं त्याला व्यापाराची जोड देऊन आपलें वैशिष्ट्य उत्पन्न केलें आहे. जगांत असा एकहि देश नाहीं कीं, जेथें वरील प्रान्तांतील व्यापारी नाहींत. महाराष्ट्र हा ज्ञान व व्यापार या दोन्ही क्षेत्रांत कमालीचा मागसलेला असून, त्याच्या सर्वांगीण मागसले-पणाचें मूळ गेल्या पिढीतील कांहीं समाजधुरीणांच्या एकारलेल्या विचारसरणींत आहे.

**कोशाचें राष्ट्रीय महत्त्व**—जगाच्या बरोबरीनें राहण्याकरितां आणि प्रसंगीं संधि साधून वैशिष्ट्यानें चमकण्याकरितां कोशासारख्या वाङ्मयाचें अत्यंत महत्त्व आहे, ही गोष्ट अद्यापि लोकांच्या लक्षांत येत नाहीं, असें मोठ्या खेदानें नमूद करावें लागतें. अभ्यासू लोकांचे ज्ञानांत भर टाकण्याचें आणि ज्ञानाचे वेगळाले पैलू स्पष्ट करण्याचें काम जगांत अव्याहत चालू आहे. तें संकलित करून लोकांना सुलभ रीतीनें हस्तगत करण्याची आणि

चलनी नाण्याप्रमाणें तें व्यवहारांत आणण्याची व्यवस्था कोशासारख्या ग्रंथांनीं होत असते. ताळेबंद पाहिला असतां आर्थिक स्थितीची स्पष्ट कल्पना येते त्याप्रमाणें कोश-वाङ्मयामुळें ज्ञानाच्या प्रगतीची यथार्थ कल्पना येते. जागतिक दृष्टीनें प्रत्येक विषयांतील कार्यपद्धति, प्रगति, शोध, ग्रंथ व त्यांतील नावीन्य प्रसिद्ध करण्याची व्यवस्था आहे. केवळ हिंदुस्थानच्या दृष्टीनें सुद्धां झालेल्या अशा कामाचा आढावा घेण्याचा प्रयत्न झाला आहे.* त्या त्या शाखेंतील तज्ज्ञांकडून लेख लिहवून घेण्याचा प्रयत्न त्या ग्रंथांत केला आहे. वेगळाल्या विषयांत झालेली प्रगति नमूद करून ती देशीभाषांच्या द्वारां लोकांना सुलभ करण्याची अत्यंत जरूरी आहे. मराठींत रसायनशास्त्रा-संबंधी असें लेखन करून अद्ययावत् माहिती लोकांपुढें ठेवण्याचें काम डॉ. वा. वि. भागवत यांनीं सह्याद्रि मासिकांत लेख लिहून केलें (१९३८). असे प्रयत्न जर प्रत्येक विषयांत होतील तर अशा कोशांचें कार्य अधिक पूर्ण होऊन लोकांच्या ज्ञानाची पातळी वाढेल आणि सर्वच दृष्टीनें त्याचा परिणाम झाल्याशिवाय राहणार नाहीं.

**आशादायक व्यक्तिसंपदा**—या दृष्टीनें राजकारणांत टिळक, गांधी; तत्त्वज्ञानांत अरविंद, विवेकानंद, राधाकृष्णन; वास्तवशास्त्रांत रामन, मेघनाद साह; वनस्पतिशास्त्रांत जगदीशचंद्र बोस व डॉ. सहानी; व्यापारांत टाटा, बिर्ला; पार्लमेंटरी राजकारणांत पटेल; आन्तर्राष्ट्रीय राजकारणांत नेहरू; धाडसी क्रान्तिकारकांत सुभाषचंद्र बोस, सावरकर; कवींत रवीन्द्रनाथ टागोर, शरच्चन्द्र, इकबाल; अल्पसंख्याकांचे राजकारणांत जिना, आंबेडकर; गणितांत रामानुजम्, नारळीकर, शाहमुलेमान; रसायनांत प्रफुल्लचंद्र रे; नृत्यकलेंत उदयशंकर-मेनका; इंग्रजी वक्तृत्वांत सुरेंद्रनाथ बानर्जी, श्रीनिवासशास्त्री, ना. गोखले, सरोजिनी नायडू; संपन्नतेंत निजाम; घटनाशास्त्रांत सप्रू, जयकर; चित्रकलेंत नन्दलाल बोस, कनु देसाई, रविवर्मा; चित्रपटसृष्टींत शांताराम, सरकार; एंजिनियरिंगमध्यें विश्वेश्वरअय्या; दिवाणांत सर टी. माधवराव, मिर्झा इस्माइल; क्रीडाक्षेत्रांत ध्यानचंद, रणजी; वर्तमानपत्रकारांत चिंतामणि, मोतिलाल घोष; विचारप्रधान लेखनांत रामानंद चतर्जी-नटराजन्; सनातन धर्माच्या समर्थकांत पंडित राजेश्वरशास्त्री द्रविड; कुशल राज्यकर्त्यांत सयाजीराव गायकवाड, ही व्यक्तिसंपदा भारतवर्षाला अभिमानास्पद आहे, यांत संशय नाहीं.

याशिवाय आपल्या प्रान्तांत व भाषेंत महत्त्वाचें कार्य सतत चालू ठेवणारे कितीतरी लोक निघाले आहेत.

**लेखकादिकांचे आभार**—डॉ. अ. प. करमरकर (आल्वर, व्यं.), प्रो. मो. ल. चंद्रात्रेय (नारळीकर व महाजनि), वा. ल. चिपळुणकर (अय्यर, एस्. सुब्रह्मण्य ॲरंडेल-पतिपत्नी, आल्काट, कझिन्स-पतिपत्नी), रा. ब. का. ना. दीक्षित (कनिंगहम व कीलहॉर्न), डॉ. मो. गं. दीक्षित (मार्शल, सर जॉन), आयुर्वेदाचार्य पां. ह. देशपांडे, (आचार्य, या. त्रि., ऐनापुरे वा., ओझा, सु., किशोरीदत्त, गोपाळाचार्लू, गंगाधर कविराज, जीवराम कालीदास), पी. एस्. दोंदे (भिसे, डॉ. शं. आ.), सु. त. पप्पु, (मास्ति, वे.), म. म. द. वा. पोतदार, (ॲबट, आयंगार कृष्णस्वामी, पिले स्वामीकन्नु), शंकरदेव विद्यालंकार, गुरुकुल कांगडी (गुरुदत्त विद्यार्थी, चमूपति, जयचंद्र विद्यालंकार, जयदेव शर्मा).

यांपैकीं चिपळुणकर, देशपांडे, शंकरदेव व पी. एस्. दोंदे यांनीं अनुक्रमें थिआसाफिस्ट, हिंदुस्थानांतील वैद्य, आर्यसमाजी व प्रभुज्ञातींतील गृहस्थ यांची कितीतरी चरित्रें पुरविलीं. पण आम्ही त्यांपैकीं वर नांवापुढें कंसांत नमूद केलेलीं थोडाफार फरक करून घेऊं शकलों. शिवाय वरीलपैकीं कांहीं गृहस्थांनीं व प्रा. कृ. खं. डोळे, (रसायन), प्रो. द. श्री. जोग, (विज्ञान) यांनीं आपल्या विषयांतील मजकूर जरूर तेथें वाचून दिला. भांडारकर ओ. रि. इन्स्टिटयूटचे असि. क्युरेटर श्री. य. र. गुप्तरकर यांनीं आम्हास कांहीं जन्ममृत्यूंचे सन पुरविले. यांपैकीं आमच्या कामाकडे आपुलकीनें लक्ष देणारे रा. ब. का. ना. दीक्षित हे या कोशाचें मुद्रण चालू असतांच कांहीं महिन्यांच्या आजारानें दिवंगत झाले हें नमूद करण्यास दुःख वाटतें. श्री. श्री. ग. भालेराव, डॉ. गं. रं. धडफळे व विनायक चित्राव हे तिघे तर कोणतेंहि साहाय्य करण्यास सतत तयार असत.

मंडळ स्थापन झाल्यापासून आयव्यय निरीक्षकाचें काम आमचे मित्र श्री. वि. के. खासनीस करीत आहेत. वेळोवेळीं हें काम पार पाडण्यास त्यांनीं आम्हांला उत्तेजन दिलें. तसेंच श्री. के. पां. जोशी वकील यांनीं आम्हांस वेळोवेळीं कायदेशीर सल्ला दिला.

*Progress of Science in India during the past twenty-five years.—Indian Science Congress Association Silver Jubilee 1938, Editor Dr. B. Prasad, 1938.

समर्थ भारत छापखान्याचे व्यवस्थापक श्री. सदाशिव रामचंद्र सरदेसाई यांनीं आपल्या कुशल सहकार्याचा आम्हाला फायदा दिला म्हणून आम्ही अनेक अडचणींतून हें कार्य पार पाडूं शकलों. शिवाय या कोशाच्या सुबक व व्यवस्थित मुद्रणांत त्यांचा फार मोठा वांटा आहे.

वरील सर्व व्यक्तींचे आम्ही अत्यंत आभारी आहोंत.

**चरित्रकोशमंडळाचें कार्य व विसर्जन—** चरित्रकोशाच्या कामाची सुरवात १ जून १९२९ ला झाली. प्राचीन १९३२, मध्ययुगीन १९३७ व अर्वाचीन चरित्रकोश १९४६ सालीं प्रसिद्ध होऊन संकल्पित योजना पूर्ण होत आहे. तीनहि भाग मिळून बावीसशें पृष्ठें व (१२ + ६ + १ =) एकोणीस हजार चरित्रें देण्यांत येत आहेत. पहिला संकल्प दोन हजार पृष्ठांचा होता.

लढाईमुळें तिसऱ्या भागाचें काम सारखें लांबणीवर पडत चाललें. मध्यें तर तिसरा भाग प्रसिद्ध होत नाहीं, असें जाहीर करून आगाऊ घेतलेले पैसे परत करण्याची कल्पनाहि बळावली होती. पण आज हिंदुस्थान सरकारच्या विशेष परवानगीनें काम पूर्ण होत आहे, याबद्दल आमच्याप्रमाणें या कामाकडे लक्ष असलेल्या सर्वांना आनंद झाल्याशिवाय राहणार नाहीं.

चरित्रकोशमंडळाचें संकल्पित कार्य पुरें झालें असल्यानें आतां आम्ही त्याचें विसर्जन करण्याचें ठरविलें आहे. वर्गणीदारांना ग्रंथ देऊन आम्ही त्यांच्या ऋणांतून मुक्त होत आहोंत. विसर्जन करतांना सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, लक्ष्मय्या परशुरामय्या जाजी, व डॉ. ग. रं. धडफळे हे मंडळाचे भागीदार आहेत. यांपैकीं श्री. लक्ष्मय्या परशुरामय्या जाजी, अध्यक्ष वैश्यसमाज, गुलबर्गा यांनीं आपल्या भागाचे पांचशें रुपये मंडळाला देणगी म्हणून दिले असल्याचें कृपेनें कळविलें आहे. तसेंच आमच्या अगदीं आरंभींच्या भागीदारांपैकीं हैदराबादचे श्रीमन्त वामन रामचन्द्र नाईक हे दिवंगत आहेत. त्यांच्या भागाचे पांचशें रुपये त्यांचे चिरंजीव बॅ. श्रीधरपंत नाईक यांनीं मंडळाला देणगी म्हणून दिले असल्याचें प्रसिद्ध करण्यास आम्हाला कृपेनें परवानगी दिली आहे. याबद्दल आम्ही वरील दोघांचे अत्यंत आभारी आहोंत.

चरित्रकोशाच्या या कार्यामुळें जगांतील अद्वितीय अशा हजारों व्यक्तींच्या मानसिक सहवासाचा लाभ आम्हाला घडला आणि एक विशेष प्रकारच्या आनंदांत आमचा हा काल गेला. हें कार्य आज संपूर्ण होत असल्याच्या समाधानाबरोबरच अशा थोर पुरुषांच्या सहवासाला आपण आतां मुकणार ही जाणीवहि मनाला अस्वस्थ करीत आहे. अशा द्विधा मनःस्थितींत वाचकांना हा ग्रंथ आम्ही अर्पण करीत आहोंत.

विजयादशमी १८६८<br>५।१०।१९४६

**सिद्धेश्वरशास्त्री चित्राव**

# कोश कसा पहावा ?

१. या कोशांत व्यक्तींचा निर्देश अकारादि क्रमानें केला आहे. अनुस्वार बाराखडींतील प्रत्येक वर्णाच्या शेवटीं घेतला आहे. म्हणजे अचा अनुस्वार अच्या शेवटीं, आचा अनुस्वार आच्या शेवटीं याप्रमाणें दिला आहे. तसेंच क्ष व ज्ञ हीं संयुक्त व्यंजनें क व ज मध्यें न देतां मराठीप्रमाणें सर्वत्र शेवटीं स्वतंत्र घेतलीं आहेत. तात्पर्य, अनुस्वार हा सोयीकरितां आम्ही स्वतंत्र दिला आहे आणि क्ष व ज्ञ हे मराठीप्रमाणें स्वतंत्र जोडले आहेत. मात्र एकाच वंशांतील व्यक्तींचीं चरित्रें वंशक्रमानें घेतलीं आहेत.

२. प्रारंभीं प्रत्येक व्यक्तीचें उपनांव घेऊन नंतर त्या व्यक्तीचें मुख्य नांव व त्यानंतर पित्याचें नांव घातलें आहे. पण पुष्कळ प्रान्तांत नांवें लिहिण्याची पद्धत वेगळाली आहे. तिला अनुसरून नांव प्रसिद्ध असेल त्या पद्धतीनें आम्ही तें स्वीकारून चरित्र दिलें आहे व नांवां-संबंधीं अधिक स्पष्टीकरण चरित्राच्या प्रारंभीं केलें आहे.

३. कांहीं व्यक्ती टोपण नांवानेंच विशेष प्रसिद्ध असून त्यांचें खासगी नांव अगदींच अप्रसिद्ध असतें. अशा वेळीं टोपण नांवाखालीं आम्ही तशा व्यक्तींचीं चरित्रें दिलीं आहेत. उदाहरणार्थ, अनंततनय, गुंगा.

४. पुष्कळ वेळां गौरवदर्शक पदव्यांनीं व्यक्ति विशेष प्रसिद्ध असतात तेथें पदवी प्रथम देऊन नंतर समग्र नांव दिलें आहे. अशा ठिकाणीं पदवीच्या वर्णक्रमाखालीं तें चरित्र आढळेल. उ. छत्रपति.

५. हैदराबाद, कोल्हापूर, ग्वाल्हेर, बडोदें व भोर येथील राजांचीं चरित्रें निजाम, छत्रपति, शिंदे, गायक-वाड व पंतसचिव या नांवांवर दिलीं असून इतर राजांचीं चरित्रें त्यांच्या संस्थानांच्या नांवांवर दिलीं आहेत. उ. औंध, पतियाळा, बिकानेर, म्हैसूर.

६. व्यक्तीचें नांव जाड ठशांत दिल्यानंतर कंसांत जन्ममृत्यूचा इसवी सन दिला आहे. उपलब्ध झाली तेथें तारीखहि नमूद केली आहे. सन अंदाजी असल्यास पुढें सुमारें असा शब्द घातला आहे. माहितीच्या अभावीं अंदाजहि करितां आला नाहीं तेथें नुसतेंच प्रश्नचिन्ह घातलें आहे.

७. चरित्राला सुरवात करण्यापूर्वी चरित्रांतील मुख्य गोष्टींकडे लक्ष वेधेल अशा प्रकारची थोडक्यांत शब्द-योजना केली आहे. त्यामुळें व्यक्तीच्या चरित्राकडे पाह-ण्याचा दृष्टिकोन उत्पन्न होतो.

८. नंतर जन्मस्थान, शिक्षण, धंदा, विशेष कार्य, संस्था, ग्रंथ, योग्यता वगैरेंची क्रमानें मांडणी केली आहे. महत्त्वाच्या भागाला स्वतंत्र परिच्छेद दिले आहेत. विवाह, संतति व जात यांचा निर्देश जरूर तेथें केला आहे.

९. सध्यांच्या काळांत इंग्रजी भाषेच्या माध्यमामुळें देशी शब्दांचे इंग्रजी पद्धतीचे उच्चार प्रचलित आहेत. ते टाळणें शक्य झालेलें नाहीं. सहज बोध होण्याकरितां पुष्कळ वेळां तशाच उच्चारांचा उपयोग करावा लागला. उ.ठाकूर-टागोर,बंद्योपाध्याय-बानर्जी,चट्टोपाध्याय-चतर्जी.

१०. जिवंत व्यक्तीचाहि कोशांत समावेश केला आहे. त्यामुळें तेथें वर्तमानकाळ वापरावा लागला आहे. त्या व्यक्तींपैकीं कांहीं कोशाचें मुद्रण चालू असतां दिवंगत झाल्या. त्यांचे मृत्युसन शेवटीं दिले आहेत. मृत्यूनंतर त्यांच्या चरित्रांतील वर्तमानस्थितीविषयींचे उल्लेख व वर्तमानकाळ विसंगत वाटतो. तसेंच वर्तमान स्थितीविषयीं केलेलें विधान कालानें विसंगत ठरतें. तें टाळण्याचा प्रयत्न करूनहि कांहीं ठिकाणीं राहून गेलें आहे.

११. जात, धर्म, पक्ष, मत, प्रान्त किंवा कोणत्याहि उच्चनीचतेच्या भावनेचा स्पर्श होऊं न देतां गुणग्राहक पद्धतीनें चरित्र लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. क्वचित् मतभेद किंवा दोषदिग्दर्शन तात्त्विक भूमिकेवरून केलें आहे.

१२. आधार ग्रंथांची यादी सोबत जोडली आहे. त्याशिवाय कांहीं आधार-ग्रंथांचा निर्देश जरूर तेथें स्पष्ट केला आहे. याशिवाय नियतकालिकांतून घेतलेल्या व व्यक्तिशः मिळविलेल्या माहितीच्या आधारांचा निर्देश करणें अशक्य आहे.

१३. क्वचित् माहिती अपुरी, विवेचन न पटणारें, मतप्रदर्शन बोचक किंवा नामोल्लेख रूढ पद्धतीला सोडून झालेला असल्यास त्याबद्दल ग्रंथकर्त्यांवर कोणत्याहि हेतूचा आरोप न करितां वाचक क्षमा करतील अशी आशा आहे.

१४. या ग्रंथांत हिंदुस्थानांतील अनेक नव्या-जुन्या भाषांचा संबंध आला. याशिवाय हिंदुस्थानच्या बाहेरील आशिया व युरोप खंडांतील अनेक भाषा, त्यांतील शब्द व व्यक्तींचीं नांवें यांचा निर्देश करण्याचा प्रसंग आला. इंग्रजी भाषेंतील शब्दांचा उपयोग केल्याशिवाय तर लिहिणेंच अशक्य झालें. त्याबाबत पूर्ण एकरूपता व शुद्धता राखणें मुष्कीलीचें झालें.

# अनुक्रमणिका


| | | | | |
|---|---|---|---|---|
| प्रस्तावना ... | ... | ... | ... | १–९ |
| कोश कसा पहावा ? | ... | ... | ... | १० |
| अनुक्रमणिका | ... | ... | ... | ११ |
| शुद्धिपत्र ... | ... | ... | ... | ११ |
| अधिक माहिती | ... | ... | ... | ११ |
| संस्कृत श्लोक | ... | ... | ... | १२ |
| अर्वाचीन चरित्रकोश | ... | ... | ... | १–५७८ |
| व्यक्ति-सूचि | ... | ... | ... | ५७९–५८९ |
| विषय-सूचि ... | ... | ... | ... | ५९०–५९८ |
| आधार ग्रंथ ... | ... | ... | ... | ५९९–६०० |


# शुद्धिपत्र

| पान | स्तंभ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|---|
| ५८ | १ | ५ | मुंबईच्या एल्फिन्स्टन | सातारा हायस्कूल |
| | | १५ | १९१३–१६ | १९१३–१९ |
| | | ३२ | कोल्हापूरच्या+++आश्रयानें | हा मजकूर नको |
| २२५ | १ | १८ | अध्ययन | जन्म |
| | | २० | कृष्णशास्त्री | सितारामशास्त्री |
| | | २४ | भोसले सरकारनें | खंडोपंत माणकेश्वरानें |
| | | ३० | पुत्र | पुतणे |
| २८३ | २ | | १९४० | १९३० |
| २८८ | २ | परिच्छेद | एक्झिक्युटिव | हा शब्द नको |
| ४०० | २ | | विवाह १९४० | १९११ |

# अधिक माहिती

अभ्यंकर, भास्करशास्त्री–( मृत्यु स. १८७० ); वासुदेवशास्त्री–(जन्म स. १८६३–मृत्यु स. १९४२); शिष्यपरंपरेंत बालसरस्वती रानडे यांचे शिष्य गंगाधरशास्त्री तेलंग.

अय्यर, जी. सुब्रह्मण्य–( मृत्यु स. १९१६ ) ‘ हिंदु ’ पत्राचे संपादक १८७८-१८९८.

ॲरंडेल, डॉ. जॉर्ज सिडने–( मृत्यु स. १०४५ ).

अलादियाखाँ–( जन्म स. १८५७–मृत्यु स. १९४६ मार्च १६ ).

काळे, प्रो. वा. गो.–( मृत्यु स. १९४६ जाने. २७ ).

केडगांवकर, श्रीनारायणमहाराज–( मृत्यु स. १९४५ श्रावण ).

देशपांडे, अबाजी श्रीपत–( मृत्यु स. १९४६ सप्टें. ).

बार्डोलाय, गोपीनाथ–( जन्म स. १८८९ ).

मेहेता, सर मनुभाई–( मृत्यु स. १९४६ आक्टो. १४ ).

अथैकदा महाराष्ट्रे कालेऽर्वाचीनसंज्ञिते ।
कोशकारम् उपागम्य कश्चित् जिज्ञासुरुक्तवान् ॥
प्राचीनमध्ययुगीनौ कोशौ हि पठितौ मया ।
अर्वाचीनचरित्राणां कोशं ज्ञातुं समुत्सहे ॥
को न्वस्मिन् भारते वर्षे गुणवान् कश्च वीर्यवान् ।
धर्माचारव्रतज्ञो हि को जागतिकदृष्टिकः ॥
नवराष्ट्रस्य निर्माणे संस्कृतिप्रसरे तथा ।
कः प्रभुः कः समर्थश्च को राष्ट्रमुद्धरिष्यति ॥
चारित्र्येण च को युक्तः सर्वभूतहिते रतः ।
एतदिच्छाम्यहं श्रोतुं परं कौतूहलं हि मे ॥
श्रुत्वा चैतत् चरित्रज्ञः कोशकारो विचक्षणः ।
श्रूयतामिति चामन्त्र्य प्रहृष्टो वाक्यमब्रवीत् ॥
एकत्र दुर्लभा मन्ये विना रामम् इमे गुणाः ।
तथापि च प्रवक्ष्यामि पार्थक्येन गुणान्वितान् ॥

भारतवर्षीय

# अर्वाचीन चरित्रकोश

## अ



**अक्कलकोटचे स्वामीमहाराज**— ( समाधि स. १८७८, एप्रिल ३० ). सुप्रसिद्ध साधुपुरुष.

ह्यांच्या जन्माचा व जन्मस्थानाचा पत्ता लागत नाहीं. यांना लोक गाणगापुरच्या नरसिंहसरस्वतींचे अवतार मानीत. तसेंच हे वयानें पांचसहाशें वर्षांचे होते असें समजणारेहि पुष्कळ लोक होते. शेवटचे बाजीराव पेशवे गादी सोडण्यापूर्वी गुर्लहोसूर येथें गेले होते. तेथें चिदंबरदीक्षित यांनीं यज्ञ केला. त्या यज्ञांत हे तूप वाढीत असल्याचा निर्देश यांच्या बोलण्यांत पुष्कळ वेळां येई. पुढें हे मंगळवेढ्यास गोविंदबुवा या नावानें कांहीं दिवस होते. तसेंच हे चंचलभारती या नांवानेंहि कांहीं काळ वावरत असावेत. पुढें अक्कलकोटास येऊन हे स्थायिक झाले ( स. १८५७ ). तेथें हे दिगंबरबाबा म्हणून ओळखले जात. प्रथम हे वेडे समजले जात.

पण पुढें साक्षात्कारी सिद्ध पुरुष म्हणून यांचा लौकिक सर्वत्र पसरला. थोरथोर लोक यांच्या दर्शनास येऊं लागले. यांच्या भक्तांत सर्व जातींचे व सर्व धर्मांचे लोक असत. यांची राहणी चमत्कारिक होती तरी ती पूर्ण विरक्तपणाची असे. हे कोणाशींहि धड बोलत नसत. परंतु हे जें बोलत तें भाविकांच्या मूकप्रश्नांशीं तंतोतंत जमे. यांची बरदास्त राजाला शोभेशी होती. तरी त्या विलासांत हे कधींहि गुरफटलेले नसत.

हे अनेक चमत्कार करीत. त्यांपैकीं एक म्हणजे तेथील कडुनिंबाचीं पानें यांनीं गोड करून दाखविलीं. तीं अद्यापिहि तशींच लागतात ( पट्टणकर यांच्या ज्ञानप्रकाश-मधील चरित्रावरून ).

‘ आम्ही यजुर्वेदी ब्राह्मण, नांव नृसिंहभान, काश्यप गोत्र, मीन रास ’ अशी माहिती यांनीं एकदां सहज दिल्याचें कै. ल. रा. पांगारकर हे संतचरित्रमालेंत लिहितात.

**अखंडानंदभिक्षु**— ( जन्म स. १८७४-मृत्यु स. १९४२ ) गुजराथनें निर्माण केलेले थोर सत्पुरुष नि सस्तुसाहित्यमुद्रणालयाचे संचालक.

यांनीं ऋषिमुनींची वाणी आणि साधुसन्तांच्या विचारांचा प्रचार करून जनतेला जीवन दिलें आहे.' यांनीं निवडक तीनशें पुस्तकांचें शुद्धीकरण करून त्यांच्या मोठ्या अक्षरांच्या लाखों प्रती छापविल्या व गरीबांतील गरीबहि विकत घेऊं शकेल इतक्या थोड्या किंमतींत ते ग्रंथ देण्याची व्यवस्था केली. अशा तऱ्हेनें गुजराथेंत घरोघर उत्कृष्ट ग्रंथ पोचतील अशी व्यवस्था केली.

हें कार्य चालविण्याकरितां ‘ सस्तुसाहित्यमुद्रणालय ’ व ‘ सस्तुसाहित्यवर्धककार्यालय ’ अहमदाबाद, या दोन संस्था यांनीं सुरू करून चालविल्या आहेत.

मात्र हिंदुस्थानांतील उत्कृष्ट वाङ्मय प्रसिद्ध करण्याचें माध्यम यांनीं गुजराथी भाषाच ठरविलें आहे.

यांनीं प्रसिद्ध केलेल्या कांहीं कांहीं ग्रंथांच्या वीसवीस आवृत्त्या निघाल्या आहेत व एकूण प्रती कोटींच्या वर झाल्या आहेत.

भागवत, रामायण, गीता, महाभारत, आर्यभिषक् हे ग्रंथ तर यांनीं इतके स्वस्त दिले आहेत कीं त्यांच्या कोऱ्या कागदाची किंमतसुद्धां अधिक होईल.

या ध्येयाची कल्पना यांना संन्यास घेतल्यानंतर आली. अनेक ग्रंथांचें यांनीं स्वतः संशोधन केलें आहे. जितका ग्रंथ मूळ व शुद्ध घेतां येईल तितका घेण्याचा यांनीं प्रयत्न केला आहे. अनेक प्रती मिळाल्या असतां त्यांची तुलनात्मक प्रत यांनीं घेतली आहे. कोणतेंहि पुस्तक दिखाऊ स्वस्ताईनें द्यावयाचें नाहीं, कागद वगैरे भिकार वापरा-

वयाचा नाहीं, व इतर प्रकाशकांच्या ⅓ किंमत ठेवावयाची हें यांचें ध्येय आहे.

यांनीं संस्कृत, मराठी, गुजराथी, बंगाली, हिन्दी या सर्व भाषांतील ग्रंथ एक विशिष्ट ध्येय ठेवून अनुवादरूपानें गुजराथी जनतेस सादर केले आहेत.

**अच्युतानन्दस्वामी**—( जन्म स. १८३९; समाधि स. १८९९ ) मल्लविद्याप्रचारक. यांचे वडील रामकृष्णभट मोघे, आईचें नांव जानकी. हे ग्वाल्हेर येथें राहत. यांचें पूर्वाश्रमींचें नांव दामोदर रामकृष्ण मोघे.

हे काशींतील कै. बाळंभटदादा देवधरांच्या आखाड्यांतील प्रमुख कोंडभटनाना गोडबोले यांचे शिष्य. कुस्तींत यांनीं अनेक नामांकित मल्लांना चीत केलें व लौकिक मिळविला. हे अविवाहित होते. हे रोज ३३०० जोर व ३३०० बैठका मारीत. बैठका न मारल्या तर मल्लखांबाच्या उड्या व कुस्त्या करण्याचा यांचा प्रघात असे. हे आजारी असले तरी कमींतकमी अकरा जोर काढण्याचा यांचा प्रघात असे. यांनीं व्यायामशाळा स्थापन केल्या व वेताचा मल्लखांब प्रचारांत आणला. साताऱ्चे विठोबा अण्णा वझे, पुण्याचे कै. गणेश सखाराम वझे, सितारामगुरु भट ही यांची शिष्यमंडळी होत. प्रथम यांचा आखाडा पुणें येथें खासगीवाल्यांच्या वाड्यांत सुरू झाला. नंतर तो भट गुरूंकडे होता. वझे मास्तरांच्या नेतृत्त्वाखालीं यांच्या नांवाची अच्युतानंदव्यायामशाळा पुणें येथें चालू आहे. वेतांचा मल्लखांब ही यांची खूणच समजली जाते.

ग्वाल्हेरचे रामचंद्रराव हरनाथ पेंटर हे यांचे एक कर्तबगार शिष्य होत. यांनीं व्यायामाचा खूपच प्रचार केला.

हे मोठे मंत्रशास्त्रज्ञ असून यांना अनेक सिद्धीहि प्राप्त झाल्या होत्या. त्यांची माहिती श्रीअच्युतानंदस्वामी चरित्र ले.-उमानाथ, प्रकाशक-वा. ना. मोहोळकर वकील, सोलापूर, या पुस्तकांत मिळेल.

**अजमदअलीशाह**—( कारकीर्द स. १८४२-१८४७ ) अयोध्येचा नबाब. मुहम्मदअलीशाहनंतर हा गादीवर आला. याचें वर्तन पाहून दिवाण शरफउद्दौलानें राजीनामा दिला. यानें आपल्या मर्जींतल्या इमादहुसेन यास दिवाण केलें. चारपांच महिन्यांतच त्याला कमी करण्याचा प्रसंग आला. शेवटीं जुना दिवाण मनोवरउद्दौला यास पुनः दिवाण केलें, पण त्यानेंहि राजीनामा दिला. यांच्याबद्दल वर पुष्कळ वाईट रिपोर्ट होऊनहि उपयोग झाला नाहीं. पंजाबांतील धामधूम, मध्यहिंदुस्थानांतील अस्वस्थता यांमुळें गव्हर्नर जनरलला लक्ष घालतां आलें नाहीं. पुढें लक्ष घालणार तों हा मृत्यु पावला. यानें गोमतीवरील लोखंडी पूल बांधला ( श्री. पारसनीसकृत 'अयोध्येचे नबाब'वरून ).

**अझाद मौलाना अबुलकलम**—( जन्म स. १८८८ ) सुप्रसिद्ध राजकारणी व थोर विद्वान्. यांचा जन्म मुसलमानांचें पवित्र क्षेत्र मक्का येथें झाला. यांचें घराणें मूळ हिंदुस्थानांतीलच. अकबर बादशहाच्या दरबारांत जमालुद्दीन नांवाचे थोर पंडित होते त्यांचे हे वंशज. यांचे वडील मौ. खैरुद्दीन हे स. १८५७ च्या बंडाच्या वेळीं देशान्तर करून यात्रेकरितां गेले व मक्केसच राहिले. त्यांची शिष्यपरंपरा सर्व देशांत विखुरली असून त्यांचे ग्रंथहि सर्व देशांतून धर्मग्रंथ म्हणून वाचले जातात. थोर धर्मपरंपरा व उच्च कोटीचें धर्मशिक्षण यांना वडिलांकडून लाभलें आहे. यांचें बालपण अरबस्तानांत गेलेलें आहे.

यांचें शिक्षण इजिप्तमधील कैरो येथील 'अलअजहार' या विश्वविद्यालयांत झालें. वयाच्या चवदा-पंधराव्या वर्षी यांनीं आरबी व फारसी भाषांवर प्रभुत्व मिळविलें. वयाच्या विसाव्या वर्षापूर्वीच यांनीं इजिप्त, तुर्कस्थान, सयाम, इराण वगैरे देशांत प्रवास करून अनुभव मिळविला होता. प्रथम यांना इंग्रजी शिक्षणास विरोध झाला. पण पुढें यांनीं त्या भाषेचें ज्ञान संपादन केलें. अशा व्यापक व पायाशुद्ध ज्ञानामुळें यांचें कुरानेशरीफचें भाषान्तर प्रमाण मानण्यांत येतें.

यांचें मूळ नांव मोहियुद्दीन अहमद ऊर्फ पिरोज बख्त आहे. पण 'अबुल-कलम' हें वाचस्पति अशा अर्थाचें नांव यांना यांच्या अलौकिक बुद्धिमत्तेमुळें आणि लेखनकौशल्यामुळें प्राप्त झालेलें आहे.

यांना लिहिण्याचा नादहि वयाच्या सोळाव्या वर्षापासून लागला. त्यापूर्वी यांनीं एक मासिक पत्र चालविलें होतें. लखनौच्या 'आलंदा' व अमृतसरच्या 'वकील' या वृत्तपत्रांत हे प्रभावी लेखक म्हणून चमकूं लागले होते.

हिंदुस्थानांत ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या धोरणामुळें हिंदी मुसलमानांचा झगडा ब्रिटिशांशीं नसून हिंदूंशीं आहे व सत्ता हिंदूंपासूनच मिळवावयाची आहे, ही विचारसरणी सर सय्यद अहमद व त्यांनीं निर्माण केलेली अलीगडपरंपरा आणि मुस्लीम लीग यांचे प्रयत्नामुळें मूळ धरूं लागली होती. ही हिंदुविरोधी वृत्ति हिंदु-

स्थानच्याच नव्हे तर हिंदी मुसलमानांच्या संपूर्ण नाशास कारणीभूत होणारी आहे हें ठासून सांगण्याचें धैर्य ज्या थोड्या मुसलमान देशभक्तांनीं दाखविलें त्यांपैकीं हे एक होत. त्याकरितां यांनीं स्वतःचें 'अल्हिलाल' हें ऊर्दू साप्ताहिक काढलें (१९१२). त्यानें इतकें प्रभावी कार्य केलें कीं, पहिला जामीन जप्त करून नवा दहा हजारांचा जामीन मागितल्यामुळें तें बंद पडलें. क्रांतिकारकांशींहि यांचा संबंध जोडण्यांत आला. त्यामुळें दुसरें पत्र काढलें तेंहि टिकूं शकलें नाहीं. बॅ. जिना हेहि त्या वेळीं लीग-विरोधी होते. सरहद्दगांधी अबदुलगफारखान यांनाहि 'अल्हिलाल'मुळें राष्ट्रीय दृष्टि प्राप्त झाली.

स्वदेशबांधवांना राष्ट्रीय दृष्टि देण्याकरितां यांना कांहीं धर्मबांधवांशीं झगडावें लागलें. त्याप्रमाणें ब्रिटिश सरकारशींहि झगडण्यांत यांनीं कधीं माघार घेतली नाहीं. बाल्कन युद्धामुळें व पहिल्या महायुद्धामुळें तुर्कस्तानाकडे हिंदी मुसलमानांचें लक्ष वेधलें. तेव्हांहि यांनीं ब्रिटिश साम्राज्यवाद्यांच्या राजकीय डावपेचांचा मुसलमानांना परिचय करून दिला. खिलाफतीच्या चळवळींतील प्रभावी कार्यानें हे इंग्रजांचे कायमचे शत्रु बनले. स. १९१६ मध्यें डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्टनें यांना बंगालमधून हद्दपार केलें व हे रांची येथें राहिले. तेथेंच यांना मध्यप्रान्ताच्या सरकारनें चार महिन्यांनंतर स्थानबद्ध केलें. स. १९२० सालीं यांची बंदी संपतांच यांनीं देशबंधु दासांबरोबर जोरानें कार्यास सुरवात केली. त्यांत दासांना सहा महिन्यांची व यांना एक वर्षाची शिक्षा झाली.

स. १९२३ च्या दिल्ली येथील कॉंग्रेसच्या जादा अधिवेशनांत अध्यक्ष असतां यांनीं 'पराजित व गुलाम राष्ट्रांच्या बाबतींत असहकार हें सार्वभौम सत्य आहे' हें ठासून सांगून गांधींच्या तत्त्वज्ञानाचें सुंदर विवेचन केलें.

फेरनाफेर वादाच्या वेळीं यांची भूमिका मध्यस्थाची म्हणूनच त्या विषयाचा निर्णय करण्याकरितां दिल्लीच्या जादा अधिवेशनाचें यांना अध्यक्ष निवडण्यांत आलें होतें. हे गांधीजींचे परमभक्त असले तरी नव्या उत्पन्न होणाऱ्या राजकीय प्रणालीकडे विशेष सहानुभूतीनें पाहण्याची यांची दृष्टि आहे. त्यामुळें यांचे व पं. जवाहिरलाल यांचे मतांमध्यें विशेष साम्य असल्याचें दृष्टीस पडतें.

स. १९०७-८ सालापासून लीगच्या प्रचारकांवर यांनीं चौफेर हल्ले केले. स. १९१४ सालीं मौ. मुहंमदअली यांनीं 'कॉम्रेड' पत्रांतून लीगचा पाठपुरावा सुरू केला, तेव्हांहि यांनीं त्यांस जेरीस आणलें. कलकत्त्याच्या ईदची प्रार्थना पुष्कळ वर्षांपासून हेच चालवितात.

महात्मा गांधींच्या अत्यंत विश्वासांतील हे गृहस्थ होत. कांहीं राजकीय प्रश्नांबाबत डॉ. अन्सारी व नंतर हे यांच्या सल्ल्याशिवाय महात्माजी कधींहि वागत नाहींत. हे स. १९४० मध्यें रामगड येथें भरलेल्या कॉंग्रेसचे अध्यक्ष होते. यांना व्हाइसरॉयनें चर्चेकरितां बोलावलें असतां यांनीं जाण्याचें नाकारलें. ८ ऑगष्ट १९४२ नंतर हे तुरुंगांत आहेत.

यांच्या 'तस्किरा' या नांवानें प्रसिद्ध असणाऱ्या ग्रंथास आत्मचरित्र म्हणणें धाडसाचें होईल. कारण त्यांत आपल्या पूर्वजांचीच माहिती यांनीं आपल्या भावनाप्रधान व काव्यमय भाषेंत दिली आहे. स्वतःचें चरित्र फक्त कठोर आक्रोश, उष्ण सुस्कारे अशा मोघम व थोडक्या शब्दांत दिलें आहे.

**अणे, माधव श्रीहरि**—(जन्म स. १८८० ऑगष्ट २९) चतुरस्त्र पुढारी.

यांचें घराणें मूळ तेलंगणांतील असून अज्ञात कालीं वऱ्हाडांत वणी येथें येऊन स्थायिक झालें. वडील नामांकित वैदिक असल्यानें प्रथम ऋग्वेदसंहिता व याज्ञिक यांचें शिक्षण यांना वडिलांकडूनच मिळालें. हे मूळ कृष्णयजुर्वेदापैकीं तैत्तिरीयशाखेचे आपस्तंब ब्राह्मण. पण दहाबारा पिढ्या यांच्या घरांत ऋग्वेदाचेंच अध्ययन चालू आहे. हे नेहमीं सांगतात कीं, 'आमच्या घरांत पोथीसुद्धां कृष्णयजुर्वेदाची निघणार नाहीं.' यांचें आजोळहि 'वेलंकीवार' हे तेलंगी ब्राह्मणच आहेत. यांचें जन्मस्थळ वणी (वऱ्हाड). यांची पत्नी बाळाघाटच्या शिवरामभट बुचरकुंडे यांची कन्या यमुनाबाई होय.

यांच्यास हायस्कूलशिक्षण व नागपूर येथें मॅट्रिक होण्यापासून बी. ए. पर्यंत शिक्षण घेतलें (१९०२), व पुढें एल्‌एल्‌. बी. होऊन वकिलीचा धंदा यवतमाळ येथें सुरू केला (१९०७). धंद्याबरोबरच सार्वजनिक कामांत लक्ष घालण्यास व तेथील 'हरिकिशोर' या साप्ताहिकांत लिहिण्यासहि यांनीं सुरुवात केली. राष्ट्रीय-शिक्षण वगैरे सार्वजनिक कार्यांत यांचा मोठा भाग असे. तेव्हांची यांची 'नवीन पंथ-निःशस्त्र ऊर्फ संरक्षक प्रतिकार' ही लेखमाला पूर्ण स्वातंत्र्याचें ध्येय प्रतिपादणारी आहे. 'बिगार-निवारक मंडळ' स्थापन करून यांनीं तेंहि कार्य चालविलें होतें. होमरूल लीगच्या

चळवळीत यांनीं अत्यंत तडफेनें भाग घेतला आणि सर्व जिल्ह्यापेक्षां अधिक सभासद मिळविले ( १९१६ ). टिळक–केळकर हे शिष्टमंडळ घेऊन इंग्लंडला गेले, तेव्हां केसरी व होमरूल लीगची जबाबदारी स्वीकारण्याविषयीं यांना विनंति करण्यांत आली होती. यावरून यांनीं लो. टिळकांचा केवढा विश्वास संपादन केला होता हें दिसून येतें.

'हरिकिशोर' बंद पडला तेव्हां यांनीं 'मुद्रणमंडळ' नांवाची संस्था स्थापून व स्वतः आर्थिक झीज सोसून यवतमाळ येथें 'लोकमत' नांवाचें साप्ताहिक पत्र सुरू केलें.

लो. टिळकांनीं स्थापलेल्या काँग्रेस डेमोक्रॅटिक-पार्टीनें मॉंटफर्ड सुधारणा राबवाव्यात असें ठरविलें व त्याची पूर्वतयारी म्हणून देशांत कामगार व मतदार यांचे संघ निर्माण करण्याचें आणि खेड्यांची संघटना करण्याचें ठरलें. परदेशांत सहानुभूति निर्माण करण्याची व्यवस्था करण्यांत आली. पण लो. टिळक दिवंगत झाले ( १ ऑगष्ट १९२० ) आणि कलकत्ता काँग्रेसच्या खास अधिवेशनांत टिळकपक्षाच्या विरोधास न जुमानतां असहकारितेचा ठराव बहुमतानें मान्य झाला. मुंबईस काँग्रेस डे. पार्टीनेंहि त्याला मान्यता दिली. हे असहकाराच्या विरुद्ध होते.

यांनीं असहकाराला विरोध प्रदर्शित केला तरी स्वतःला पटणाऱ्या खादीप्रचार, मद्यपानबंदी वगैरे विधायक कार्यक्रमांबद्दल अनुकूलता प्रदर्शित करून मित्र-मंडळीच्या साहाय्यानें त्यांच्या प्रसाराकरितां जोराची चळवळ केली. वकिली एक वर्ष सोडली.

काँग्रेसचे कौंसिल बहिष्काराच्या धोरणाविरुद्ध देशबंधु दास यांनीं उमरावती येथें घोषणा केली ( ६ नवं. १९२३ ) व काँग्रेसमध्यें राहून बंडाचें निशाण उभारलें. स्वराज्यपक्षाच्या नांवाखालीं यांनीं वऱ्हाडांत हें कार्य केलें आणि या पक्षातर्फे हे असेंब्लींत निवडून आले.

पुढें प्रतिसहकारपक्ष अकोला येथें बॅ. जयकरांच्या अध्यक्षतेखालीं स्थापन करण्यांत आला ( १५ फेब्रु. १९२६ ). हे वऱ्हाडांतील अध्यक्ष होते. हे असेंब्लींत अविरोध निवडून आले.

मध्यप्रान्तांत स्वराज्यपक्षाचा दिवाणगिरी स्थापण्यास विरोध असतांहि प्र. स. पक्ष व इंडिपेंडंट काँग्रेसपक्ष यांचें सहकार्य घडवून आणून ना. राव व रामराव देशमुख यांना दिवाणपद देण्यांत यांनीं खटपट केली.

स. १९२६ सालच्या निवडणुकीनंतर लाला लजपतराय व पं. मालवीय यांनीं असेंब्लींत राष्ट्रीयपक्ष स्थापन केला. त्याचे यांना चिटणीस निवडण्यांत आलें. स्वराज्य-पक्षातर्फे असेंब्लींत असतां हे त्या पक्षाचे प्रतोद होते. रेल्वे फिनॅन्स कमिटीवर यांनीं बरेच दिवस काम केलें.

सायमन कमिशन हिंदुस्थानच्या राज्यघटनेचा फेरविचार करण्याकरितां नेमलें होतें ( १९२८ ). त्यावर देशानें बहिष्कार घातला होता. तें कार्य वऱ्हाडतर्फे यांनीं परिणामकारक रीतीनें केलें. पण सर्वमान्य राज्यघटना तयार करण्याकरितां पं. मोतीलाल नेहरूंच्या नेतृत्वाखालीं कमेटी नेमली. तेव्हां नेहरू रिपोर्ट लिहिण्यांत यांनीं प्रमुख भाग घेतला होता. त्यामुळें घटनाशास्त्रज्ञ म्हणून यांचा सर्वत्र लौकिक झाला.

नवीन घटनेप्रमाणें वऱ्हाड प्रान्तास प्रा. कॉं. कमेटी मिळाल्यानंतर स. १९३० पर्यंत हे कमेटीचे अध्यक्ष होते. ऑल इंडिया काँग्रेस कमेटीचे पुष्कळ वर्षें सभासद होते.

काँग्रेसनें पूर्ण स्वातंत्र्याचें ध्येय मान्य केल्यावर ( १९२९ ) पं. जवाहिरलाल नेहरू यांनीं काँग्रेसच्या अधिकाऱ्यांस कळविलें कीं त्यांनीं अधिकाराचा किंवा कायदेमंडळाचा राजीनामा द्यावा. तेव्हां यांनीं विदर्भ प्रां. कॉं. कमेटीच्या अध्यक्षपदाचा व ऑल इंडिया कॉं. क.च्या सभासदत्वाचा राजीनामा दिला. म. गांधींनीं दांडीयात्रा आरंभिली तेव्हां यांनीं असेंब्लीच्या सभासद-पदाचा राजीनामा देऊन हे युद्धमंडळांत सामील झाले.

वऱ्हाडमध्यप्रान्ताला समुद्र जवळ नसल्यानें मीठ-सत्याग्रह करतां येईना, व जप्त वाङ्मय वाचूनहि सरकार बिथरेना म्हणून यांनीं जंगलसत्याग्रहाची कल्पना काढली, आणि तिचा सर्वत्र प्रचार करण्यांत आला. जंगलकमिटी नेमून जंगलविषयक तक्रारी मांडण्यांत आल्या आणि पुसद गांवापासून आठ मैलांवर सरकारी जंगलांत, नजर केलेल्या चांदीच्या विळ्यानें गवत कापून यांनीं कायदेभंग केला ( १० जुलै १९३० ). तेव्हां चोरीच्या गुन्ह्याखालीं यांना सहा महिन्यांची शिक्षा देण्यांत आली. या नवीन तऱ्हेच्या कायदेभंगाबद्दल काँग्रेस वर्किंग कमिटी-कडून यांचें अभिनंदन करण्यांत आलें. तुरुंगांतून सुटून येतांच यांनीं आपल्या वृद्ध मातोश्रींचें दर्शन घेतलें. या सत्याग्रहाच्या कार्यपद्धतीमुळें हिंदुस्थानभर यांची वाहवा झाली व यांना काँग्रेस वर्किंग कमिटींत घेण्यांत आलें. बंगालमधील काँग्रेस निवडणुकीचा निर्णय देण्याकरितां उभयपक्षांनीं पंच म्हणून यांना मान्यता दिली. गांधी-अर्विन-कराराच्या वेळीं सल्लामसलतीकरितां यांना दिल्लीस

बोलावण्यांत आलें, व यांना कॉंग्रेसचे हंगामी अध्यक्ष निवडण्यांत आलें ( १९३३ ).

असहकारितेच्या काळांत कॉंग्रेसबरोबर विरोध करतांनाहि वैयक्तिक दृष्ट्या कॉंग्रेसच्या सर्व आज्ञांचें यांनीं चांगल्या रीतीनें पालन केलें. प्रथम आज्ञापालन व नंतर तक्रार अशी यांची नेहमीं भूमिका असे. जातिनिर्णयाबाबत मात्र यांनीं कॉंग्रेसच्या धोरणाला आरंभापासून विरोध केला आणि जातिनिर्णयाला व कॉंग्रेसच्या जातिनिर्णयविषयक धोरणाला विरोध करण्याकरितां यांना कॉंग्रेस नॅशनलिस्टपक्ष काढावा लागला. त्याबाबत पं. मदनमोहन मालवीय हे यांचे सहकारी होते. त्याकरितां कॉंग्रेसला प्रतिस्पर्धी उमेदवारहि यांनीं निवडणुकींत उभे केले. पुढें पं. जवाहिरलाल सुटून आल्यावर त्यांनीं निःसंदिग्ध शब्दांत जातिनिर्णयाचा निषेध केल्यावर हें प्रकरण संपलें.

मराठी साहित्यसंमेलन, ग्वाल्हेर ( १९२८ ), बृहन्महाराष्ट्र-परिषद्, इंदूर ( १९३५ ), आर्य-परिषद्, सोलापूर ( १९३९ ), हिंदुलीग, लखनौ ( १९४० ), वऱ्हाड निजामाला मिळूं नये म्हणून स्थापन झालेली संस्था व सर्वपक्षीय परिषद् यांचे हे अध्यक्ष झाले होते.

पुढें 'परराष्ट्रीय हिंदी लोकांचें संरक्षण' या खात्याचें यांना व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळांतील स्थान देण्यांत आलें (१९४१). पण तें स्थान यांनीं सरकार म. गांधींनी पेंचप्रसंग सोडविण्याकरितां आगाखान पॅलेसमध्यें केलेल्या वीस दिवसांच्या उपवासाचे वेळीं त्यांना बिनशर्त सोडीना, म्हणून त्यागपत्र देऊन सोडलें ( १९४३ ).

पण पुनः यांना सिलोनचे एजंट नेमलें असतां तें स्थान यांनीं स्वीकारिलें ( १९४३ ).

लोकमान्य टिळक दिवंगत झाल्यानंतर महाराष्ट्राचें नांव हिंदुस्थानच्या राष्ट्रीय राजकारणांत अव्याहत वीस वर्षें फडकत ठेवणारा अद्वितीय पुढारी या नात्यानें लोकनायक अणे यांचेंच नांव कोणासहि घ्यावें लागेल.

यांनीं म. गांधींशीं सहकार्य केलें, पण त्यांच्याशीं हे सहमत केव्हांच नव्हते. म. गांधींशीं असणारा आपला विरोध यांनीं कधीं गुप्त ठेवला नाहीं, तसेंच तो अप्रासंगिक आणि असभ्यपणें प्रगट करून त्याला कधीं द्वेषाचें रूप येऊं दिलें नाहीं. त्यामुळें म. गांधींनाहि यांच्याबद्दल आदरच बाळगावा लागला. राष्ट्रीय कार्यांत व्यक्तिनिष्ठा आड न येऊं देतां तत्त्वनिष्ठा व विधायकता इकडेच यांनीं सर्वस्वीं नजर पुरविली. त्यामुळेंच कॉंग्रेसमध्यें राहूनहि जातिनिर्णयाबाबत स्पष्टपणें हे विरुद्ध मत नमूद करूं शकले; व कॉंग्रेसविरोधी नॅशनलिस्ट पक्ष काढून चालवूं शकले. यांचा विश्वास भाविकपणापेक्षां तर्ककर्कश विचारसरणीवर आहे. त्यामुळेंच प्रतिस्पर्ध्यांनासुद्धां यांचा युक्तिवाद ऐकावा लागतो.

यांचें वक्तृत्वहि पांडित्यपूर्ण असतें आणि त्यांत जुन्या संस्कृत भाषेंतील ग्रंथांतील समर्पक उतारे, दृष्टान्त आणि विचारसरणी यांची छाप पडलेली स्पष्ट दिसते. तथापि यांची स्वतंत्र विचार करणारी जागृत बुद्धि आपलें वर्चस्व वक्तृत्वांत स्पष्ट केल्याशिवाय राहत नाहीं. अभिनिवेश दिसला तरी त्यांत आग्रहीपणा नसतो. मतभेद दिसला तरी त्याला प्रतिपक्षाबद्दल अनादर किंवा द्वेषाचें स्वरूप नसतें.

अभ्यास व स्वतंत्र बुद्धि यांमुळें यांचीं असेंब्लींतील व बाहेरीलहि भाषणें लोकांचें लक्ष आपल्याकडे ओढून घेतात.

कॉंग्रेसचें राजकारण अगतिकतेच्या भोंवऱ्यांत गिरक्या खात आहे आणि दुसरें प्रभावी राजकारण लोकांपुढें नाहीं असें पाहून यांनीं सरकारी नोकरीचा खोडा मुद्दाम पत्करला असावा असें स्पष्ट दिसतें. प्रभावी राजकारण यांना हांक मारूं लागतांच यांच्या बिनीच्या जागेवर हे पुनः चमकल्याशिवाय राहणार नाहींत तोंपर्यंत अशक्य व अगम्य गोष्टींच्या नादीं लागून अलौकिक चमत्कारांवर विश्वास ठेवण्यासारखी यांच्या बुद्धीची ठेवण नाहीं.

**अभ्यं, प्रल्हाद केशव**—( जन्म स. १८९८ ) शिक्षणशास्त्रज्ञ, पटकथालेखक, दिग्दर्शक, लघुकथालेखक, नाटककार, टीकाकार आणि कवि.

हे बी.ए., बी. टी., टी.डी. (लंडन) आहेत. बी. टी.च्या परीक्षेंत यांचा पहिला नंबर आला व टी. डी. होण्याकरितां हे इंग्लंडला रवाना झाले. तेथेंहि दुय्यम शाळांत पाठ घेण्याची इतरांना दुष्प्राप्य असणारी संधि यांना मिळाली होती. फळ्यावर चटकन् चित्रें काढून दाखविण्याची कलाहि यांचेजवळ असल्यानें यांचें अध्यापन आकर्षक होतें.

पुणें येथील कॅंप एज्युकेशन सोसायटीच्या हायस्कूलचे हे प्रिन्सिपल होते. तें हायस्कूल यांनीं चांगल्या स्थितीला आणून पोंचविलें. नंतर केवळ स्त्रियांच्याकरितां 'आगरकर हायस्कूल' यांनीं पुणें येथें रास्ता पेठेंत स्थापन केलें.

यांना कविता करण्याचा नाद विद्यार्थिदशेपासून आहे. यांच्या प्रारंभीच्या कविता 'केशवकुमार' या टोपण नांवानें प्रसिद्ध होत. यांच्यांत विनोदबुद्धि उपजत आहे. त्यामुळें थोर कवींच्या काव्याचा उपहास करणारीं विडंबनकाव्यें यांनीं बरींच लिहिलीं. त्यांतील सहजपणामुळें यांच्याकडे लोकांचें लक्ष वेधूं लागलें. यांचा उपरोध खेळकर, भाषा सफाईदार व साधी आणि विनोदविषय मार्मिक असल्यामुळें मनाचा ताबा घेणारा असतो.

शिवाय कोणताहि विषय हे अगदीं नव्या पण अत्यंत आकर्षक पद्धतीनें मांडतात.

यांनीं रंगभूमीच्या पडत्या काळांत नाटकें लिहिण्यास सुरुवात केली, आणि आपल्या विनोदी व चटकदार लेखनशैलीनें मराठी रंगभूमीचें आयुष्य एक तपानें वाढविलें.

नंतर आत्मविश्वास वाढून यांनीं पटकथा लिहिण्यास सुरुवात केली आणि त्यांतहि लोकांवर छाप पाडून नवें युग सुरू केलें. पटकथालेखक म्हणून यांचें नांव हिंदुस्थानांतील अग्रगण्य लोकांत गणलें जातें.

प्रथम हंस, नंतर नवयुग आणि आतां स्वतःच्या नांवानें हे आपल्या पटकथा लोकांपुढें आणीत असतात. लेखक, दिग्दर्शक व मालक अशा सर्वच भूमिका हे आतां स्वतःकडेच घेऊं लागले आहेत.

याशिवाय 'नवयुग' नांवाचें साप्ताहिक हे चालवीत असतात. 'समीक्षक' नांवाचें मासिकहि यांचें आहे. आतां तर 'अत्रे प्रिंटिंग प्रेस' यांनीं सुरू केला आहे.

यांचें वाङ्मय–(१) कवितासंग्रह–१ गीतगंगा, २ झेंडूचीं फुलें. (२) नाटकें–१ गुरुदक्षिणा, २ साष्टांग नमस्कार, ३ घराबाहेर, ४ उद्यांचा संसार, ५ पराचा कावळा, ६ मी उभा आहें, ७ भ्रमाचा भोपळा, ८ वंदे भारतम्, ९ लग्नाची बेडी, १० वीरवचन. (३) गोष्टी–१ ब्रँडीची बाटली व इतर गोष्टी, २ साखरपुडा. (४) पटकथा–१ धर्मवीर, २ प्रेमवीर, ३ ब्रह्मचारी, ४ ब्रँडीची बाटली, ५ अर्धांगी, ६ लपंडाव, ७ पायाची दासी, ८ राजाराणी, ९ वसंतसेना, १० तस्वीर (हिन्दी), ११ बाईल वेडा, १२ दिल की बात (हिन्दी). (५) इतर–१ अत्रे उवाच, २ ललितवाङ्मय, इत्यादि.

**अधिकारी, गंगाधर मोरेश्वर**—(जन्म स.१८९८ डिसें. ८) सुप्रसिद्ध समाजसत्तावादी. जन्म आजोळीं पनवेल येथें झाला. कांहीं वर्षें आपल्या हर्णै (जि. रत्नागिरी) येथें काढून हे मुंबईस आले. हुषार विद्यार्थी असल्यानें शिष्यवृत्त्या मिळवीत. हे बी.एस्सी. झाले (१९२०). सायन्स-इन्स्टिटयूट बंगलोर येथें हे शिष्यवृत्ति घेऊन गेले. तेथें गंधक अलग करण्याचें संशोधन यांना करावयाचें होतें. त्या विषयाचीं बहुतेक पुस्तकें जर्मन भाषेंत होतीं. जर्मन भाषा शिकून यांनीं जर्मनींतील पुस्तकांचा चांगला उपयोग केला. संशोधनाचें तेथील काम पूर्ण होतांच यांच्या ध्यानांत आलें कीं अधिक ज्ञानाकरितां जर्मनींत जाणें आवश्यक आहे.

डॉ. भाजेकर व देवासचे दिवाण श्री. समर्थ (यांचे मामा) यांच्या साहाय्यानें यांनीं रु. ४५०० जमा केले. आणि हे कोलम्बोहून जर्मनीस रवाना झाले (१९२२). कोलम्बोहून पाठविलेल्या निबंधावरून मुंबई विश्वविद्यालयानें यांना एम्.एस्सी. ही पदवी दिली. बर्लिनला पोंचतांच डॉ. फोलमेर यांच्या हाताखालीं यांनीं भौतिक, फोटो व धरातलरसायनसंबंधीं संशोधनास सुरुवात केली.

जर्मनींत असतां यांना अनेक राजकारणी लोक भेटले. पण रजनी पामदत्त यांनीं लिहिलेलें 'मॉडर्न इंडिया' हें पुस्तक यांच्या मनावर विशेष परिणाम करणारें झालें. मार्क्सवादाशींहि यांचा परिचय होऊन हे राजकारणाकडे आकर्षित झाले.

जर्मनींत असतां यांना द्रव्याची टंचाई भासूं लागली, तेव्हां यांचे गुरु प्रो. फोलमेर यांनीं यांना संशोधनाचें काम मिळवून देऊन यांची आर्थिक अडचण दूर केली. यांच्या हुषारीमुळें मिळणारी रक्कम वाढतच गेली व हे पीएच्. डी. झाले (१९२५).

यांच्या बुद्धीच्या सूक्ष्मतेची व ज्ञानाची एवढी छाप पडली होती कीं यांना तेथील एका रेडिओच्या कारखान्यांत मुख्य संशोधक म्हणून नेमण्यांत आलें आणि अनेक जर्मन व युरोपीय संशोधक यांच्या हाताखालीं काम करूं लागले. पण संशोधन कार्यापेक्षांहि स्वदेशाच्या कल्याणाकडे यांचें विशेष लक्ष होतें. म्हणून हे नोकरी सोडून हिंदुस्थानांत परत आले (१९२८ डिसें.).

मुंबईस येतांच यांची पोलिसांनीं झडती घेतली. तेव्हांपासून यांच्यामागें पोलीस लागले. मराठी 'क्रान्ति' पत्रांत हे लिहीत, तसेंच इंग्रजी 'स्पार्क' पत्रांतहि हे लिहीत. त्याच वेळीं कलकत्त्यास होणाऱ्या कॉंग्रेसबरोबर भरणाऱ्या मजूर व शेतकरी यांच्या सभेला हे गेले. शिवाय भाषणेंहि क्वचित् करीत. नंतर हे मिरतकेसमध्यें गोवले गेले. तेथें मात्र यांच्या ज्ञानाचा व विषय मांडण्याच्या पद्धतीचा चांगला उपयोग झाला. यांना पांच वर्षांची शिक्षा देण्यांत आली. पण हायकोर्टानें भोगलेली शिक्षा पुरेशी समजून यांना सोडून दिलें (ऑगष्ट १९३३).

मुंबईस येऊन मजुरांच्या संपांत भाग घेतला म्हणून यांना पुनः दोन महिन्यांची शिक्षा झाली. ती शिक्षा भोगून सुटल्यावर विजापुरास यांच्या जगन्नाथ नांवाच्या बंधूसह यांना नजर कैदेंत ठेवण्यांत आलें. तेथें यांनीं वार्निशच्या कारखान्यांत ३५ रु.ची नोकरी पत्करून कारखान्याला लाभदायक अनेक योजना तयार करून दिल्या. स. १९३७ च्या फेब्रुवारींत हे विजापूराहून गुप्तपणें कलकत्त्याला निघून गेले. तेथें यांना 'आनन्द-बझार-पत्रिका' पत्रांतून जगन्नाथाच्या मृत्यूची बातमी समजली. हरिपुरा काँग्रेसला हे गुप्तपणें गेले होते (१९३९). पुढें काँग्रेसप्रधानांनीं यांचेवरील वारंट रद्द केलें. तेव्हां पुनः उघडपणें काम करूं लागले. पण युद्ध सुरू होतांच यांना पुनः गुप्त व्हावें लागलें. पोलिसांना यांचा पत्ता लागला नाहीं. पण १९४२ सालीं हे पुनः प्रगट होऊन काम करूं लागले. यांचे युद्धविषयक लेख वाचले असतां यांच्या सूक्ष्म अवलोकनाची चांगली कल्पना येते. खरोखर हे एक मोठे अभ्यासक शास्त्रज्ञ आणि राजकारणी आहेत (नये भारतके नये नेता पा. ३२७).

**अनंततनय**—(जन्म स. १८७९, मृत्यु स. १९२९) कवि. यांचें पूर्ण नांव दत्तात्रय अनंत आपटे. जन्म बुलढाणे जिल्ह्यांत वडनेर भोलजी या गांवीं. प्राथमिक शिक्षण वऱ्हाडांत व इंग्रजी स्कूल फायनलपर्यंतचें शिक्षण पुणें भावे स्कूलांत.

यांची स्फुट कविता पुष्कळ असून ती दोन खंडांत 'हृदयतरंग' (१९१६) या नांवानें प्रसिद्ध झाली आहे. यांनीं पुढील काव्यें लिहिलीं आहेत.—१ महाराष्ट्रगीत, २ बालगीत, ३ झोपाळ्यावरची गीता, ४ श्रीशारदादूतिका १९१४, ५ अन्तर्विद्धकलिका, ६ श्रीस्वामीचंडीरामचरित्र, ७ श्रीभक्तिकल्पलता, ८ महाराष्ट्रशृंगारतिलक, ९ पुण्याची पर्वती, १० बंधविमोचन, ११ वरविडंबन, १२ स्वर्गाचे द्वारांत, १३ श्रीमन्माधवकाव्य, १४ तिलकविजय.

यांखेरीज यांनीं सार्थ व सटीप ऋतुसंहार, भामिनीविलासाचें गद्य भाषान्तर, कविचरित्र, सनातन धर्माचें स्वरूप वगैरे गद्यहि लिहिलें आहे. अन्य भाषेंतील भाषान्तरें किंवा रूपान्तरें करण्याची कला यांना चांगली साधली होती. यांच्या कवितेवर जुन्या वळणाच्या कवींची छाप अधिक दिसते (अ. म. वा. से.).

**अन्सारी, डॉ. मुख्तार अहमद्**—(जन्म १५ डिसें. १८८०, मृत्यु स. १९३६ मे) राष्ट्रीय वृत्तीचे मुसलमान पुढारी. यांचा जन्म संयुक्त प्रान्तांत गाझीपूर जिल्ह्यांत झाला. यांचे वडील हाजी अबदुल रहमान हे जमीनदार होते. प्रथम हे काशींत शिकत, नंतर अलाहाबाद येथें राहून हे मद्रास येथें बी. ए. झाले. द. हैद्राबाद संस्थाननें यांना स्कॉलरशिप देऊन इंग्लंडला धाडलें (स. १९००). तेथें यांनीं एम्. डी. व एल्. आर्. सी. पी. या पदव्या संपादन केल्या. व शिवाय लंडनमधील हॉस्पिटलमध्यें हाउससर्जनच्या कामाचा अनुभवहि संपादन केला. हा मान यापूर्वी कोणत्याहि हिन्दी माणसाला मिळाला नव्हता.

स. १९११ सालीं दिल्ली येथें राहून यांनीं प्रॅक्टिसला सुरुवात केली. आणि बघतां बघतां दिल्लींतील सर्वांत मोठे डॉक्टर बनले. कांहीं दिवसांनीं यांनीं तुर्कस्थानांत व बाल्कन राष्ट्रांत युद्ध सुरू झालें असतां 'ऑल इंडिया मेडिकल मिशन' वर काम केलें (१९१२-१३).

टिळकांनीं सुरू केलेल्या होमरूलच्या चळवळींत यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला होता. स. १९२० सालीं हे ऑल इंडिया मुस्लीम लीगचे अध्यक्ष झाले. यांनीं अनेक वर्षें काँग्रेसचे सहचिटणीस व चिटणीस म्हणून काम केलें. दिल्लीच्या खास काँग्रेसचे हे स्वागताध्यक्ष होते (१९२२). मद्रासच्या काँग्रेसचे (१९२७) व सर्वपक्षीय परिषदेचे (१९२८) हे अध्यक्ष होते.

**ॲबट, रे. जस्टिन् एडवर्ड (Rev. Justin E. Abbot)**—(जन्म स. १८५३, मृत्यु स. १९ जून स. १९३२) अमेरिकन मराठी मिशनचे ख्रिस्ती मिशनरी, मराठी संतवाङ्मयाचे अभ्यासक व प्रचारक.

मृत्यूपूर्वी यांनीं जें दानपत्र केलें त्यावरून हे व यांच्या पत्नी उभयतां श्रीमंत कुलांतील असावेत असें स्पष्ट दिसतें. असें असून यांनीं आपलें सर्व आयुष्य ख्रिस्ती मिशनच्या सेवेला वाहिलें. हे अमेरिकन असून यांचा जन्म अमेरिकेंतील हॅम्पशायर परगण्यांतील पोर्टस्मथ या गांवीं झाला. व हे जेव्हां आपल्या मातापित्याबरोबर हिंदुस्थानांत राहुरी या गांवीं आले तेव्हां यांचें वय ४ वर्षांचें होतें. यांनीं (अमेरिकन मराठी मिशनच्या द्वारा) महाराष्ट्रांतच चाळीस वर्षें ख्रिस्ती धर्माच्या सेवेंत घालविलीं. त्यांपैकीं २५ वर्षें हे 'ज्ञानोदय' या ख्रिस्तधर्मप्रसारक इंग्रजी-मराठी साप्ताहिक पत्राच्या इंग्रजी विभागाचे संपादक होते. स. १९१० सालीं हे मिशनच्या सेवेंतून मुक्त झाले आणि अमेरिकेस परत गेले. तेथें न्यू जेरेसी, समिट येथें सुखवास करून मराठी संतवाङ्मयानंदांत कालक्रमणा करीत होते.

स. १९२० सालीं आपल्या पत्नीसह पुनः हे हिंदुस्थानांत आले. महाराष्ट्रसंतांचीं पवित्र स्थळें पाहण्याची आपल्या पत्नीची इच्छा तृप्त करणें हा इकडे येण्यांत यांचा एक हेतु होता. भा. इ. सं. मंडळांत येऊन सुमारें महिनाभर तेथील मराठी संतांचीं हस्तलिखितें हे तपाशीत होते. मग कांहीं काळ जालना, दौलताबादेकडे एकनाथ व जनार्दनस्वामी प्रभृति संतांचीं पूर्वपरिचित स्थळें पत्नीस दाखविण्यासाठीं हे गेले. दुर्दैवानें यांच्या पत्नी या प्रवासांत अजारी पडून मिरजेस ख्रिस्तवासी झाल्या ( २६ जून १९२१ ). आणि हे तावडतोब अमेरिकेस परत गेले. येथें असतांना ' अमेरिकन ओरिएन्टल सोसायटी 'साठीं हे थोडाबहुत प्रचार करीत असत. नंतर पत्नीवियोगानें किंचित् उदास स्थितींत यांनीं एकदोन वेळां यूरोपयात्रा केल्या.

रक्तपित्यांची सेवा हा एक यांचा जिव्हाळ्याचा विषय होता. शिवाय मराठी संतांच्या ज्या मधुर आणि हृदयोन्नतिकारक वाङ्मयाची नवी प्रीति यांचे ठिकाणीं अंकुरली होती त्या वाङ्मयाचाहि तपास युरोपांतील अनेक विद्यापीठांच्या व इतर संग्रहांतून यांनीं केला. डच भाषेंतील ' डाग् रजिस्टर ' नामक डच ईस्ट इंडिया कंपनीच्या प्रचंड पत्रव्यवहार संग्रहांत शिवाजीविषयीं पुष्कळ माहिती असल्याचें यांनीं भा. इ. सं. मंडळाकडे कळविलें. यांचा शिवाजीच्या नाण्याविषयींचा एक निबंध एशियाटिक सोसायटीनें प्रसिद्ध केला होता. अशी महाराष्ट्र, महाराष्ट्र संत वाङ्मय आणि महाराष्ट्र इतिहास यांविषयीं यांना अखंड आस्था होती.

स. १९२० मध्यें हिंदुस्थानांत आल्या वेळीं यांनीं 'ज्ञानोदयां'त मराठी वाङ्मयावर एक लेखमाला लिहिली. मिसेस् ॲबट यांनाहि मराठी संतांविषयीं प्रेम वाटत होतें. तेव्हांच यांनीं मराठी संतांचें वाङ्मय व त्यांतील उच्च भक्ति प्रेमाचे व नीतीचे बोल मराठी न समजणाऱ्यांसाठीं इंग्रजी भाषेंतून प्रसिद्ध करण्याचें निश्चित केलें. आणि 'पोएट सेन्ट्स् ऑफ महाराष्ट्र' या नांवाची ग्रंथमाला सुरू केली. प्रथम २।३ ग्रंथ होईपावेतों डॉ. मॅकनिकल यांनीं मुद्रितें तपासणें वगैरे साहाय्य केलें. पुढें साहाय्यक म्हणून कै. नरहर रघुनाथ गोडबोले यांची नेमणूक यांनीं केली. आणि तेच शेवटीं शेवटीं यांचे सहकारी संपादक झाले. या मालेचा सर्व खर्च ॲबट यांनीं केला.

या ग्रंथमालेच्या कामीं पुणें येथील युनायटेड थिऑलाजिकल कॉलेजचे प्रमुख रे. एड्वर्ड्स यांनीं प्रथमपासूनच लक्ष घातलें होतें. किंबहुना मि. ॲबट यांना वाटणारा संकोच मिसेस् ॲबट यांच्याकरवीं मोडून काढून ग्रंथमालेची योजना त्यांनीच ॲबट यांच्याकडून करवून घेतली. ॲबट व गोडबोले यांचे पश्चात् मालेची जबाबदारी रे. एड्वर्ड्स यांचेकडेच आली आहे.

या मालेंतून पुढील पुस्तकें आजपर्यंत प्रसिद्ध झालीं आहेत.

१ भानुदास, २ एकनाथ, ३ भिक्षुगीत, ४ दासोपंत दिगंबर, ५ बहिणाबाई, ६ स्तोत्रमाला, ७ तुकाराम, ८ रामदास, ९ भक्तविजय ( खंड १ ला ), १० भक्तविजय ( खंड २ रा ), ११ भक्तलीलामृत, १२ ज्ञानेश्वर.

या ग्रंथांतून स्थूलमानानें मराठी भक्तिवाङ्मयांतील भागांचें शब्दशः इंग्रजी भाषांतर देऊन कोठेंकोठें मूळ मराठी उतारेहि दिले आहेत. शब्दार्थ कोशाची जोड दिली आहे. टिपणें, त्रोटक चरित्रें व प्रस्तावनाहि जोडल्या आहेत.

मराठी संत वाङ्मयाशीं यांचा फार जुना परिचय होता. यांचीं चाळीस वर्षे महाराष्ट्रांतच गेलीं. यांना मराठी भाषा चांगली अवगत होती. तथापि हिंदुस्थानांत असेतोंपर्यंत आपणांस या वाङ्मयाचे खरेंखरें रहस्य आणि थोरवी तितकीशी कळून आली नाहीं, असें यांच्या अनुभवास पुढें आल्यावरूनच या वाङ्मयाचा यांनीं पुनरभ्यास केला. आणि त्यांत मानवी उन्नतीचीं थोर नैतिक बीजें सर्वत्र चमकत आहेत, तीं आपल्या मराठी न जाणणाऱ्या समस्त पाश्चिमात्य बांधवांस सादर करावीं या उदार बुद्धीनें यांनीं खरोखरीच तन, मन आणि धनें करून आपला हेतु तडीस नेला.

यांचे एकंदर लेख व जीवन पाहतां एक गोष्ट अगदीं ठसठशीतपणें दिसते, ती ही कीं त्यांचें मन सकल मानवजातीसाठीं तळमळत होतें. सर्व मानवांची मनोन्नति व्हावी हाच खरा धर्म होय आणि ख्रिस्ती धर्माचेंहि खरें रहस्य हेंच होय असा यांचा दृढ निश्चय बनला होता. आणि तो निर्भीडपणानें आणि स्थितप्रज्ञ वृत्तीनें यांनीं प्रगट केला. ख्रिस्त आणि ख्रिस्ती धर्म यांवरील यांची श्रद्धा कधींच ढळली नव्हती; किंबहुना मराठी संत वाङ्मयाच्या पुनरभ्यासानें ती अधिकच दृढ परंतु विशुद्ध झाली होती.

आजपर्यंत पाश्चिमात्यांना महाराष्ट्रसन्तांच्या भक्तिमार्गाचें खरें मर्म समजलेंच नाहीं असा अभिप्राय यांनीं स्पष्ट शब्दांत नमूद केला आहे. मराठी सन्त हे सर्व वेद, स्मृति, शास्त्रें व पुराणें यांवर अढळ विश्वास ठेवणारे

होते. ते अनेक अवतार मानीत आणि मूर्तिपूजा त्यांना अत्यंत प्रिय होती. परंतु कांहींहि नांव घेतलें, कोणतेंहि रूप वर्णिलें, तरी हीं सर्व नांवें व रूपें त्या एकाच परमेश्वराचीं होत याविषयीं क्षणमात्र संदेह त्यांच्या ठायीं नव्हता. मराठी सन्त प्रेमळ आणि एकनिष्ठ ईश्वर-भक्त होते, त्यांचीं अन्तःकरणें शुद्ध होतीं, तीं सर्व जीवांच्या कल्याणासाठीं तळमळत होतीं, त्यांच्या प्रेरणा नैतिक होत्या, आणि त्यांचीं चरित्रें नीतिप्रवर्तक आणि सन्मार्गदर्शक होतीं याविषयीं यांना काडीचीहि शंका वाटत नव्हती. जर आपलीं स्वतःचीं चरित्रें आणि त्यांचीं चरित्रें आपण तोलून पाहिलीं तर ते कितीतरी श्रेष्ठ प्रतीचे ठरतील असेंहि यांनीं निभ्रान्त म्हटलें आहे. मराठी सन्तांचीं चरित्रें आणि त्यांचें वाङ्मय ही महा-राष्ट्राला आणि तद्वारा अखिल मानवी समाजाला बहुमोल देणगीच होय. हें वाङ्मय केवळ मराठींतच कोंडून न राहतां इतरांसहि उपलब्ध झाल्यानें त्यांचें कल्याणच होईल या उच्च भावनेनें प्रेरित होऊन यांनीं आपला अविरत उद्योग वयाची सत्तरी उलटल्यावरहि केला. मालेंतील एका ग्रंथाचा अखेरचा कांहीं भाग तर यांनीं अंथरुणावर पडल्यापडल्या सांगितला आणि तो यंत्र-साहाय्यानें लिहून घेतला अशी यांची निष्ठा जबर होती.

हिंदुधर्मांत अनेकदेवत्व आहे, पण तें एक देवाच्या अधिष्ठानावरच आहे. एकाचाच आविष्कार अनेकांत झाला आणि अनेकांचा लय एकांत होतो. यांतील रहस्य पुष्कळ युरोपियनांच्या लक्षांत न आल्यामुळें विपरीत व दूषित कल्पना प्रसृत झाल्या होत्या. त्याचें स्पष्ट निराकरण यांनीं केलें आहे. हिंदु एकाच देवाधिदेवाला मानतात, हें रहस्य पूर्वी चाळीस वर्षें महाराष्ट्रांत राहूनहि आपल्या ध्यानांत आलें नाहीं, परंतु ती आपली चूक झाली हें यांनीं प्रांजळपणें प्रसिद्ध केलें आहे.

महाराष्ट्रावर यांचें निस्सीम प्रेम होतें. मृत्युपत्रांत यांनीं आपली तीन लक्ष डॉलर ( डॉलर = ३॥। रुपये ) किंमतीची मालमत्ता दान केली, त्यांत १ लक्ष ४० हजार हिंदुस्थानांतील विशेषतः महाराष्ट्रांतील संस्थांस दिले. ख्रिस्तेतर संस्थांना दिलेल्या देणग्यांत भा. इ. सं. मंडळ पुणें या संस्थेस दिलेली देणगी सर्वांत मोठी होय. ३० हजार डालर्सची देणगी प्राचीन मराठी लेख व ग्रंथ यांच्या संग्रहमंदिरासाठीं यांनीं वरील मंडळास दिली. त्या वेळेपासून बाजार उतरतच गेल्यामुळें एक लक्षाऐवजीं ५० हजार रुपयेच मंडळाच्या वांट्यास आले. एका रकमेनें एवढी मोठी देणगी एका बिनसरकारी आणि देशी भाषेंत संशोधनकार्य करणाऱ्या संस्थेस एका अमेरिकन मिशनऱ्याकडून मिळणें ही गोष्ट अखिल भारत-वर्षांत अद्वितीयच म्हटली पाहिजे. या देणगीमुळें यांचें नांव महाराष्ट्रांत अमर होऊन राहील.

मरणोत्तर आपणास अग्निसंस्कार व्हावा असा आदेश यांनीं दिला होता. आपणाला थडगें, नांव वगैरे कांहीं नको, असेंहि यांनीं लिहून ठेवलें होतें. आपल्या मृत देहाची राख आपल्या प्रिय माळ्याकडून आपल्या बागेंतील झाडांवर यांनी पसरविण्याची योजना केली. जन्मानें आणि मनानें यांनीं आपणास महाराष्ट्रीयच म्हणविलें. आणि महाराष्ट्र संतांच्या वाङ्मयाचा व्यासंग करीत यांनीं देह ठेवला. यांनीं आपल्या पत्नीसह महाराष्ट्रांतील संतांचीं स्थलें भाविक यात्रेकरूप्रमाणें पाहिलीं. पायीं प्रवास करून आणि व्रतस्थ राहून हे प्रत्येक ठिकाणीं गेले. वाङ्मयाप्रमाणें आचारांशींहि हे एकरूप होत.

भा. इ. सं. मंडळास दिलेल्या मोठ्या देणगीशिवाय पुढील संस्थांना यांनीं पुढें नमूद केल्याप्रमाणें देणग्या दिल्या आहेतः

१ सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटी, पुणें ( डॉलर्स एक हजार )
२ अमेरिकन मिशन हॉस्पिटल, वाई ( डॉलर्स पन्नास हजार )
३ अमेरिकन ओरिएंटल सोसायटी ( डॉलर्स पंधरा हजार )
४ लेपर्स सॅनिटोरिअम, फ्रान्स ( डॉलर्स पंधरा हजार )
५ गोखले हॉल लायब्ररी, पुणें ( डॉलर्स पांच हजार ) पूर्वी दिलेले पंधरा हजार रुपये ( १९३० ) शिवाय.
६ सोशल सर्व्हिस लीग, मुंबई ( डॉलर्स एक हजार )
७ अनाथ बालिकाश्रम, हिंगणे ( ,, एक हजार )
८ डिप्रेस्ड क्लासेस मिशन, मंगलोर (डॉ. एक हजार )
९ अमेरिकन लेपर्स मिशन ( डॉलर्स वीस हजार )
१० यंग वुइमेन्स ख्रिश्चन असोसिएशन, समिट ( डॉलर्स दहा हजार )
११ यंग मेन्स ख्रिश्चन असोसिएशन, समिट, अमेरिका ( डॉलर्स दहा हजार )
१२ ओव्हरलुक हॉस्पिटल, समिट ( डॉलर्स पांच हजार )
१३ सेवासदन सोसायटी, पुणें ( डॉलर्स एक हजार )

१४ रे. एडवर्डस् यांस पोएट सेन्टस् मालेसाठीं
( डॉलर्स दहा हजार )
१५ अमेरिकन मराठी मिशन–नागपाडा, मुंबई
( डॉलर्स दहा हजार )
इत्यादि. ( दत्तो वामन पोतदार ).

**अबदुल करीमखां**—( जन्म स. १८८४—मृत्यु स. १९३८ )

महाराष्ट्रांतील एक नामांकित गवई. यांचें घराणें मूळ कुरुक्षेत्राचें. तेथील गायक प्रतिस्पर्ध्याला हार जात नाहींत असा त्यांचा लौकिक आहे. या स्थानमाहात्म्यामुळें त्यांना 'किरण' ही संज्ञा प्राप्त झाली आहे. यांचे वडील कालेखां व चुलते अबदुल्लाखां यांच्यापाशीं हे गाणें शिकले. यांचें घराणें ततकाराचें असल्यानें यांच्या सुरेलपणाविषयीं प्रश्नच नाहीं. हे सहा वर्षांचे असतांनाच गवयाच्या मैफलींत गायले व पंधरा वर्षांचे असतां बडोदें संस्थानांत गवई म्हणून वावरूं लागले. तेथें तीन वर्षे नोकरी केल्यावर प्रथमच हे मुंबईस आले ( १९०२ ). स. १९१७–२० पर्यंत हे प्रकृतीच्या स्वास्थ्याकरितां मुंबईस राहिले होते. त्या वेळीं यांनीं बाळगलेलें एक कुत्रें कांहीं रागांतील स्वर काढण्यांत यांनीं तयार केलें होतें. तें जलशांत तसे स्वर काढून दाखवी.

हिंदुस्थानी संगीतांत प्रचलित असलेल्या चार बानींपैकीं यांच्या घराण्याची गोहरण बानी आहे. ही बानी करुण व शोकरसात्मक आहे. या रसांतील यांचें गाणें चालू असतां श्रोतृसमाज अन्तःकरणाचा ठाव घेतल्याप्रमाणें तटस्थ होत असे. हेहि श्रोत्यांच्या अनुरोधानें रागाची निवड करीत.

हे अस्सल कलावंत असल्यानें जातिभेद पाळीत नसत. सवाईगंधर्व रामभाऊ कुंदगोळकर, अनंतराव गाडगीळ, बेहेरेबुवासारखे ब्राह्मण, सरनाईक, जाधवबुवा, कपिलेश्वरी, सुरेशबाबू, दशरथबुवा मुळे सारखे ब्राह्मणेतर शिकविले, एवढेंच नव्हे तर बाळु कैकाडी या नांवाचे एक सनग्येहि यांनीं शिकवून तयार केले.

पुणें, मुंबई व बेळगांव इत्यादि ठिकाणीं यांनीं संगीतविद्यालयें चालविलीं. शेवटीं मिरज येथें यांचें देहावसान झालें. मि. क्लेमंट यांनीं काढलेल्या फिलहारमॉनिक सोसायटीचे हे मेंबर होते. त्यांनीं नोटेशन देऊन यांच्या कांहीं चिजा प्रसिद्ध केल्या आहेत. हिंदुस्थानी संगीत गुरुमुखांतून ऐकूनच शिकलें तर उत्तम येतें असें यांचें मत होतें. हे बीन, सतार, तबला, पेटी व जलतरंगहि उत्तम वाजवीत.

यांच्यामुळें उच्च संगीताची अभिरुचि व लालसा महाराष्ट्रांत इतर प्रान्तांच्या मानानें अधिक फैलावली. यांची स्वरसाधना सतत चालू असे. यांनीं अनेक तऱ्हेचे स्वर लावण्याचे प्रयत्न करून स्वतःची विशिष्ट पद्धत शोधून काढली होती. यांनीं स्वर लावला कीं तो तंबोराच जणूं बोलतो आहे असें वाटे. श्रोत्यांइतकेंच किंबहुना श्रोत्यांपेक्षांहि जास्त हे स्वतःच्या स्वरमाधुरींत स्वतःच गुंगून जात. यांच्या गायकींत स्वरोत्कर्ष अधिक प्रमाणांत दिसून येई. हे चिजेचे शब्द, त्यांचा उच्चार करून चीज बांधेसूद व लयबद्ध मांडीत. स्वरविस्तारांत रागाची प्रकृति कायम ठेवीत. तब्येत लागेल त्या स्वरावर मुक्काम करून त्याला निरनिराळ्या पद्धतींनीं नटविण्यापलीकडे यांना इतर गोष्टींचें महत्त्व वाटत नसे. कारण हेंच अंग अधिक रंजक असे. यामुळेंच कदाचित् यांच्या गाण्यावर शांत व करुण रसांचें आवरण पडलें असावें. यांनीं कोणताहि राग आळविल्यास तो करुणरसाची छाया उत्पन्न करी.

कसल्याहि कणखर प्रकृतीच्या रागरागिणीला नवनीताहून नरम व मेणापेक्षां मऊ करण्याची असामान्य सिद्धि यांनीं मिळविली होती. मुरक्या, गिटकडी व अनेकविध गमका हे हलुवार घेऊन गाणें फार रंगवीत. गमकेच्या जोरदार ताना हे मधूनमधून घेत तेव्हां असें वैविध्य वाटे कीं, एकाआड एक रचना केलेली ही जणूंकाय फरसबंदी दीपमाळच आहे. हे कर्नाटकी पद्धतीचें नोटेशन बहुरंगी व बहुढंगी करीत तें अति चटकदार लागे. नोटेशन करण्याची पद्धत प्रथम महाराष्ट्रांत यांनींच सुरू केली. मराठी नाटकांतील पदें मुसलमान असूनहि भावार्थ समजावून घेऊन अर्थानुकूल रसोद्भव व्हावा या पद्धतीनें हे म्हणत. ठुंबरी गाणारे म्हणून तर यांची फारच प्रसिद्धी होती. यांच्या 'पिया बीन नहि आवत चैन' या रेकॉर्डनें तर यांना फार मोठी प्रसिद्धि मिळाली. यांच्या मागें यांच्या बारा इंची चोवीस रेकॉर्डस् प्रसिद्ध आहेत.

**अबदुल गफारखान**—( जन्म स. १८९० )
'सरहद्द गांधी' या नांवानें प्रसिद्ध असणारे सुप्रसिद्ध पुढारी व 'खुदा-इ-खिदमतगार' या संघटनेचे जनक.

हे पठाण गृहस्थ मुहम्मदझाई नांवाच्या कुटुंबांत जन्मलेले आहेत. यांच्या वडिलांचें नांव बहेरामखान. ते पेशावर जिल्ह्यांतील चरसाडा तालुक्यांतील उतमानझाई गांवाचे खान आहेत. उतमानझाई गांव स्वात नदीच्या तीरावर आहे. हिंदुस्थानच्या सरहद्दीचा हा

प्रदेश आहे. तेथून पुढें वीस मैलांचा मुहम्मदटोळ्यांचा प्रदेश ओलंडला कीं अफगाणिस्थान सुरू होतें.

यांच्या वेळीं मौलवींच्या धार्मिक शाळा सोडून इंग्रजी शाळांत जाण्यास लोकांचा विरोध होता. तो पत्करूनहि यांना पेशावर येथील मिशनरी शाळेंत घालण्यांत आलें. तेथें हे मॅट्रिकपर्यंत शिकले. तिकडील रिवाजाप्रमाणें हे लष्करांत शिरावयाचे पण तो मार्ग यांना पटला नाहीं. हे अलीगढला गेले आणि तेथें एक वर्ष अभ्यास करून प्रथमच यांनीं उर्दू भाषेशीं परिचय करून घेतला. यांची जन्मभाषा पुश्तु.

मौ. झफरअलीखानांचें 'जमीनदार' आणि मौ. अबुल-कलम अझादचें 'अलहिलाल' या त्या वेळीं अत्यंत लोकप्रिय पत्रांच्या वाचनानें यांचे राजकीय शिक्षणास सुरुवात झाली. राष्ट्रीय शाळा काढण्याच्या कामांतहि यांनीं स. १९११ पासून भाग घेतलेला होता. पण पहिलें महायुद्ध संपल्यानंतर ब्रिटिश सरकारचें धोरण बदललें व रौलट ॲक्टसारखे कायदे होऊं लागले. त्याला सर्वांनीं विरोध दर्शविला. म. गांधींनीं या विरोधाला सत्याग्रहाचें रूप दिलें तेंव्हां देशांत भयंकर खळबळ उत्पन्न होऊन प्रचंड सभा भरूं लागल्या. तेंव्हां उतमान-झाई गांवीं भरलेल्या प्रचंड सभेमुळें यांना तुरुंगांत जावें लागलें (१९१९). पुनः स. १९२१ मध्यें यांना तुरुंगांत जावें लागलें. पुढें पठाणांच्या मुलांना राष्ट्रीय शिक्षण-शाळा काढून दिल्याबद्दल यांना तीन वर्षांची शिक्षा झाली (१९२२).

तुरुंगांत यांचे अत्यंत हाल करण्यांत आले. माफी मागावी असे प्रयत्न झाले, पण हे कशानेंहि नमले नाहींत. कोणतीहि सवलत यांनीं मागितली नाहीं व कोणीं दिलेली स्वीकारली नाहीं. सत्य आणि अंगीकृत कार्य यांपासून यांना कोणीहि ढळवूं शकलें नाहीं. उलट या खडतर तपश्चर्येनें यांचा निग्रह आणि तेज वाढतच गेलें. गीता व ग्रंथसाहेब यांचा आस्वाद यांना सहवासानें घेतां आला. यांचा नमाज कधींहि चुकत नाहीं. हिंदु-मुसलमानांच्या कलहांतहि यांनीं आपली समतोल वृत्ति ढळूं दिली नाहीं. म्हणूनच यांना 'सरहद्द-गांधी' या बहुमानाच्या उपपदाचा लाभ झाला आहे.

स. १९१९ सालापासून आतांपर्यंत हे सुमारें चवदा वर्षे तुरुंगांतच आहेत. ८ ऑगष्ट १९४२ च्या चळवळींत हे तुरुंगांत गेले. यांचे थोरले बंधु डॉ. खान यांच्या नेतृत्वाखालीं सरहद्दप्रांतांत मंत्रिमंडळ स्थापन झालें तेंव्हां त्यांनीं यांना सोडण्याच्या हुकमावरच प्रथम सही केली (मार्च १९४५).

आतां यांच्या 'खुदा-ई-खिदमतगार' या संघटनेसंबंधीं थोडी माहिती देऊं.

यांनीं स. १९२१ मध्यें 'आझाद शाळा' म्हणून राष्ट्रीय शिक्षणाची शाळा काढली. त्यांतील यांच्या सहकाऱ्यांनीं ती शाळा यांच्या तीन वर्षांच्या तुरुंगवासाच्या मुदतींतहि राखली. पण पुढें स. १९३२ च्या चळवळींत ती बंद करणें भाग पडलें. या दहा वर्षांच्या मुदतींत शिक्षक व विद्यार्थी यांचें एक मंडळ यांचेभोंवतीं तयार झालें होतें. त्यालाच 'ईश्वराचे सेवक' अशा अर्थाचें 'खुदा-इ खिदमतगार' असें नांव देण्यांत आलें (१९२९). प्रारंभीं हें मंडळ फक्त समाजसुधारणा करणारें म्हणजे पठाणांना चोरी, दारू, लग्नखर्च वगैरेंपासून निवृत्त करणारें होतें. पण पुढें त्याचें स्वरूप अधिक व्यापक होत गेलें. हे तांबडे डगले अंगांत घालीत म्हणून त्यांना 'लाल डगलेवाले' असेंहि उपरोधानें म्हणत. रशियांतील बोल्शेव्हिक चळवळीशीं यांचा संबंध जोडला जाई. तथापि यांची शपथ अगदीं साधी असून ईश्वरनिष्ठा, अहिंसा, सेवा, निर्भयता व शुद्ध जीवन या पांच गोष्टींना तीमध्यें महत्त्व दिलें आहे. हे लष्करी कवाईती करतात; पण लाठीसुद्धां हातांत घेत नाहींत. पण ही चळवळ सरकारला मात्र अत्यंत अप्रिय आहे हें अनेक वेळां सिद्ध झालें आहे. सरकारनें यांच्यावर अनेक आरोप केलेले आहेत. त्याला उत्तर देण्याची संधि यांना सरकारनें दिली नाहीं. राष्ट्रीयसभेनें नेमलेल्या चौकशी-कमिटीला पंजाबच्या सरहद्दींत जाऊं दिलें नाहीं, कमेटीचा रिपोर्ट व फादर एल्विन यांचें पत्रक सरकारनें जप्त केलें. विलायतेंतून आलेल्या शिष्टमंडळाचा वृत्तांतहि हिंदुस्थानांत प्रसिद्ध होऊं दिला नाहीं. अशी ही यांची संघटना प्रभावी म्हणूनच सरकारला अत्यंत अप्रिय आहे.

म. गांधींवर मात्र यांची अलोट श्रद्धा आहे. राष्ट्रीय-सभेचें व आपलें ध्येय एकच आहे असें हे वारंवार सांगतात. काँग्रेसचे अध्यक्षपदाकरितां यांचें नांव सुचविलें असतां यांनीं शिपायाला सेनापतिपद योग्य नाहीं असें म्हणून तें नाकारलें (खान बंधू-प्रेमा कंटक).

**अबदुल रहिमान**—(ज. स. १८४४-मृ. स. १९०१) अफगाणिस्थानचे अमीर. अफगाणिस्थानचा अमीर जो दोस्त मुहंमद त्याच्या अफजुलखान नांवाच्या मुलाचा हा मुलगा. दोस्तमुहंमद हा अफगाणिस्थानचा अमीर

झाल्यावर अफजुलखान बल्कचा सुभेदार होता. तेथेंच याचें बालपण व शिक्षण झालें. बापाच्या अनुपस्थितींत हा बापाचें काम पाहूं लागला. पुढें याची ताशकरघान या प्रांतावर सुभेदार म्हणून नेमणूक झाली. तेथें यानें बक्षिसें व सूट देण्याचा तडाखा सुरू केला. पण बापानें त्याला मान्यता न देतां त्याची वसुली सुरू केली, तेव्हां हा अपमानानें राजिनामा देऊन परत आला. तेथें हा शिक्षण घेत असतां यास तुरुंगवासहि भोगावा लागला. पण नंतर गैरसमज दूर होऊन याला सेनापतीची जागा मिळाली.

दोस्तमुहंमद मेल्यावर त्याच्या जागीं त्याचा तिसरा मुलगा शेरअली गादीवर आला, व त्यानें आपला बंधु अफजुलखानास कैद केलें. तेव्हां हा आक्सस नदी ओलांडून बुखाऱ्याकडे पळून गेला. मध्यें एकदां काबूल घेऊन तेथें आपला चुलता अजीमखान यास यानें गादीवर बसविलें; पण तो स्थिर न होतां याला पुनः वनवास पत्करावा लागला. पुढें शेरअली रशियनांबद्दल पक्षपात दाखवूं लागला तेव्हां इंग्रजानें त्यावर स्वारी केली. तेव्हां तो पळून जात असतां मृत्यु पावला व त्याचा मुलगा याकूबखान गादीवर आला. पण त्याचें वजन नाहींसें होऊन काबूलच्या इंग्रज रेसिडेंट कावाग्नरी याचा खून झाला. तेव्हां इंग्रजानें स्वारी करून काबूल घेतलें. हें कळतांच रशियन हद्दींतून हे गृहस्थ काबूलला आले व इंग्रजांच्या व लोकांच्या अनुकूलतेनें पुनः गादीवर आले ( स. १८८० जुलै २२ ).

सिंहासनारूढ झाल्यावर यास राज्यांतील पुष्कळ बखेडे मोडावे लागले, गेलेले मुलूख परत घ्यावे लागले, त्यांत याचें शौर्य व चातुर्य प्रगट झालें. तसेंच देशांतील मुल्लामौलवी यांचें प्रस्थ कमी करून त्यांच्या क्रूर वर्तनांनाहि यांनीं आळा घातला.

यांना पुश्तु, फारशी, तुर्की, रशियन, आरबी आणि हिंदुस्थानी इतक्या भाषा येत. यांना अनेक विषयांत गम्य असे. यांचे किती एक ग्रंथ काबूलच्या छापखान्यांत छापून प्रसिद्ध झाले आहेत.

मालिक, खान व मुल्ला यांपैकीं पहिले दोन लोकांनीं निवडलेले व शेवटले कायदा व धर्मशास्त्र यांच्या परीक्षा दिलेले असत. या तीन प्रकारच्या लोकांतल्या बहुमतानें हे आपला सगळा कारभार चालवीत. सैन्य, हत्यारें, हत्यारांचे कारखाने, दारूगोळा या बाबतींत यांनीं चांगली व्यवस्था केली, पण ती सर्व व्यवस्था यांना अपुरी वाटे. जगांतील 'बळी तो कान पिळी' ही स्थिति पाहून देशांत आगगाडी सुरू करूं नये असें यांनीं आपलें म्हणणें स्पष्टपणें मांडलें आहे व तसा पुढील वंशजांनाहि सल्ला दिला आहे.

यांचें सैन्य नेहमीं जय्यत तयार असे. 'संकट सोसण्यास सिद्ध व्हा व मग देवावर भरंवसा ठेवा' ही यांना शिकवण होती. इंग्लंड अफगाणिस्थानशीं केलेले करार कधीं मोडणार नाहीं, कारण त्यांना रशिया व हिंदुस्थान यांच्यामध्यें आपल्यासारखा स्वतंत्र राष्ट्राची जरूरी आहे, असें यांचें मत होतें. स्त्रीधन, विवाह-नोंदणी, हुंडा, सडका, वाटसरूंची सुरक्षितता यांबद्दल यांनीं चांगले नियम करून लोकांची सोय केली आहे. जमिनींत सांपडणाऱ्या विविध द्रव्यांच्या खाणींचे मक्ते परक्यांना न देण्याविषयीं यांचा कडक नियम असे. आगगाडी, मक्ते व व्यापार या द्वारा परक्यांचा देशांत प्रवेश होऊन आपला देश कमकुवत होईल असें यांचें प्रांजळ मत होतें.

ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं धर्मप्रसाराची परवानगी मागितली असतां यांनीं त्यांना स्वच्छ कळविलें कीं 'आम्हास धर्म शिकविण्यास दुसरे लोक नको आहेत. ते मोठे धार्मिक आहेत. आणखी ते ख्रिस्ती धर्मोपदेशक व युरोपियन व्यापारी यांच्या वाऱ्यास देखील उभे राहत नाहींत. कारण हे लोक जेथें जातात तेथें कज्जे उत्पन्न करतात. आपसांत भांडणें उत्पन्न करतात व आपला अंमल सुरू करतात. ज्ञान व व्यापार हें केवळ थोतांड आहे. तुम्ही धर्म व व्यापार यांचें मिष करून आर्मिनीयांत दंगे, क्रीट येथील बंड, इजिप्तचा घोटाळा व सध्यांची चिनांतली लढाई उत्पन्न केलीत. तथापि तुम्हांला आमच्या लोकांची विशेषच कळकळ असेल तर तुम्ही आपले जीव धोक्यांत न घालतां तुमचे फंड आमच्या मौलवींच्या स्वाधीन करा म्हणजे तुमचें कार्य थोडक्यांत उत्तम होईल.'

पुढेंपुढें यांनीं अनेक प्रकारचीं यंत्रें आणून कारखाने आपल्या राज्यांत सुरू केले व परदेशी कारागीर आणून त्यांच्या हाताखालीं अफगाण लोक शिकवून कारखाने स्वावलंबी करण्याचें धोरण स्वीकारलें.

**अभेदानन्द**—( जन्म स. १८६६—मृत्यु स. १९३९ ) वेदान्त व हिन्दू तत्त्वज्ञानविषयक ग्रंथांचे कर्ते आणि कलकत्त्याच्या रामकृष्ण वेदान्त सोसायटीचे उत्पादक व अध्यक्ष. यांचे वडील कलकत्त्याच्या 'ओरिएन्टल सेमिनरी' मध्यें इंग्रजीचे शिक्षक होते. यांनीं प्रथम संस्कृत शाळेंतील

व नंतर शाळेंतील शिक्षण घेतल्यावर ओरिएन्टल सेमिनरी-मध्यें शिक्षण सुरू केलें. ते तेथूनच वयाच्या १६ व्या वर्षी प्रवेशपरीक्षा पास झाले.

लहानपणापासूनच प्रत्येक गोष्टीचें कारण समजावून घेण्यासाठीं हे नेहमीं ती गोष्ट अशी "कां व कशी" झाली ह्याबद्दल प्रश्न विचारीत. यांनीं हिंदुस्थानच्या इतिहासांत जेव्हां प्रथमच शंकराचार्य हे मोठे तत्त्वज्ञानी असल्याबद्दल वाचलें, तेव्हां आपणहि असेच तत्त्वज्ञानी व्हावयाचें असा यांनीं निश्चय केला. ह्या वेळीं हे चित्र-कलेचें शिक्षण घेत होते. परंतु हा विचार मनांत येतांच यांनीं तो अभ्यास सोडून दिला. आपल्या घरगुती अभ्यासांत यांनीं 'मुग्धबोध' ह्या संस्कृत व्याकरणाचा अभ्यास करून संस्कृतभाषेवर इतकें प्रभुत्व मिळविलें कीं हे संस्कृत कविता सहज करूं लागले. ह्याच वेळीं एकदां हे भगवद्गीता वाचीत आहेत असें पाहून 'गीता ही मुलांच्याकरितां नाहीं, ती तुला वेडा बनवील' असें यांच्या वडिलांनीं यांना सांगितलें. परंतु यांच्या मतें हें अयोग्य वाटल्यामुळें यांनीं गीता वाचण्याचा क्रम तसाच चालू ठेवला. हिंदू तत्त्वज्ञानावरील व त्याचप्रमाणें निरनिराळ्या धर्मांच्या अनेकविध स्वरूपावरील भाषणें ऐकण्याची यांना फार आवड असे. यांनीं रेव्हरन्ड डॉ. मॅकडोनाल्ड, रेव्ह. कालीचरण बानर्जी वगैरेंचीं 'ख्रिस्त व ख्रिश्चन धर्म' या विषयावरील बरींचशीं भाषणें ऐकलीं. त्याचप्रमाणें ख्रिस्तीधर्मविरोधीहि पुष्कळशा भाषणांना ते हजर असत. स. १८८३त प्रसिद्ध हिंदू तत्त्ववेत्ता पंडित 'शेषाधर तारकासुरमणि' यांचीं 'हिंदू तत्त्वज्ञानाचे सहा क्रम' या विषयावरील पुष्कळशीं व्याख्यानें यांनीं श्रवण केलीं होतीं. ह्या सर्व व्याख्या-नांचा यांच्यावर असा परिणाम झाला कीं प्राचीन व अर्वाचीन युरोपीय तत्त्वज्ञानाचा अभ्यास करण्याची यांची आवड अधिकच वाढली. पुढें पुढें तर यांनीं पंडित शेषाधरांचीं 'पातंजलयोगविज्ञाना'वरील व्याख्यानें ऐकल्यामुळें हिंदू अध्यात्मशास्त्र (योगशास्त्र) व त्याचप्रमाणें योगशास्त्राची प्रत्यक्ष पद्धती यांबद्दल यांना विशेष आवड उत्पन्न झाली. हा अभ्यास यांनीं पंडितजींच्या पद्धतीनुरूप पुढें प्रसिद्ध तत्त्ववेत्ता कै. कलिबर वेदान्त वगीश यांच्या नेतृत्वाखालीं केला. त्यानंतर यांनीं आत्मनियंत्रण करून निर्विकल्प समाधीप्रत जाण्याचा अभ्यास केला. तदनंतर 'राजयोगा'वरील प्रत्यक्ष पद्धति सांगणारी जी 'शिवसंहिता' तिचा अभ्यास यांनीं दक्षिणेश्वरीं राहणाऱ्या 'रामकृष्ण परमहंस' यांच्या जवळ राहून केला.

स्वामी रामकृष्णाच्या जवळ हा अभ्यास दोन वर्षेपर्यंत चालू होता. तेथें असतांना रामकृष्णांच्या अनेक अनुयायांशी व विशेषतः स्वामी विवेकानंदांशीं त्यांचा निकट संबंध आला. स. १८८६ त रामकृष्णांच्या मृत्यू-नंतर यांनीं स्वामी विवेकानंद व इतर गुरुबंधु यांच्यासह संन्यासआश्रमांत पदार्पण केलें व तेव्हां-पासूनच हे स्वामी अभेदानंद या नांवानें ओळखले जाऊं लागले. त्यानंतर यांनीं ठिकठिकाणीं पायीं प्रवास केला व त्यांत येणाऱ्या सर्व हालअपेष्टा सहन केल्या. गंगा व यमुना यांच्या उगमस्थानच्या हिमालयाच्या १४००० फुटांवरील गुहेंत सतत ३ महिने राहून यांनीं सत्याबद्दल विचार केला. अशाच प्रकारें सर्व हिंदुस्थानांतील तीर्थ-यात्रा करीत व अनेक साधुसंतांच्या गांठी घेत हे त्या वेळचे प्रसिद्ध अद्वैत वेदांतवादी श्री. धनराजगिरी यांच्या जवळ अद्वैत–वेदांत तत्त्वज्ञानाचें शिक्षण घेऊं लागले.

स. १८९६ मध्यें स्वामी विवेकानंद अमेरिका व इंग्लंड येथें 'वेदांत', 'राजयोग', 'ज्ञानयोग' वगैरेंवर व्याख्यानें देऊन तेथें त्यांनीं त्याद्वारें जो हिंदू धर्म मतांचा अत्यंत यशस्वी प्रचार सुरू केला त्यांत विवेकानंदांच्या आमंत्रणावरून यांनीं त्यांना पुष्कळच मदत केली. यासाठीं हे कलकत्त्याहून लंडनला स. १८९६ च्या आगस्ट महिन्यांत रवाना झाले. लंडनच्या ख्रिस्ती थिऑसॉफिकल सोसायटीपुढें यांचें 'अद्वैत फिलॉसाफी' या विषयावर प्रथम व्याख्यान झालें. पुढें स्वामींनीं यांना लंडन येथें 'वेदांत' व 'राजयोग' वगैरेंचे वर्ग चालविण्यास सांगून ते स. १८९७त हिंदुस्थानांत आले. यांनीं हे वर्ग चालवून शिवाय तेथील धार्मिक तत्त्वज्ञान-विषयक संस्थांतून व इतर सार्वजनिक सभांतून वरील विषयांवर व्याख्यानें देऊन एक वर्षपर्यंत प्रचार केला. या अवधींत यांनीं प्रो. मॅक्समुल्लर व प्रो. पॉल वगैरे विद्वानांशीं रामकृष्णांच्या शिकवणी-बद्दल विचारविनिमय केला. यांपैकीं प्रो. पॉल डायसन हे उपनिषदांतील तत्त्वज्ञान मांडणारे ग्रंथकर्ते असून त्यांनीं ५० उपनिषदांचें जर्मनभाषेंत भाषांतर केलें आहे.

स. १८९७ त हे विवेकानंदांच्या विनंतीवरून त्यांच्या न्यूयॉर्कमधील 'वेदांत सोसायटी'चें नेतृत्व पत्करण्या-साठीं तेथें गेले. त्या ठिकाणीं यांनीं सहा महिन्यांत वेदांत व पातंजलयोग विज्ञानावर ९० व्याख्यानें देऊन व भगवद्गीता, कठोपनिषद् व मृत्यु, आत्मज्ञान वगैरेंचा उलगडा करणारीं इतर उपनिषदें यांचे वर्ग काढून

'वेदांत सोसायटी'चा बराच प्रचार केला. पुढें हे सोसायटीचे मंत्री झाले व यांनीं तें काम २० वर्षपर्यंत अव्याहत केलें. यांनीं सबंध संयुक्त संस्थानें, कॅनडा, अलास्का आणि मेक्सिको वगैरे देशांतील मुख्य मुख्य शहरीं जाऊन वेदान्त तत्त्वज्ञानाच्या अनेकविध स्वरूपावर व्याख्यानें दिलीं. त्याचप्रमाणें 'कृष्ण व त्याची शिकवण', 'रामकृष्ण व त्यांची शिकवण', 'झेरोस्तर व त्याची शिकवण' वगैरेवरहि अनेक सार्वजनिक भाषणें यांनीं केलीं. स. १९२१ सालीं होनोलुलू येथील 'पॅन-पॅसिफिक एज्युकेशनल कॉन्फरन्स' करतां हे हिंदुस्थानचे प्रतिनिधी म्हणून गेले होते. त्यानंतर शांघाय, हाँगकाँग, कॅन्टन, सिंगापूर वगैरे शहरीं आपल्या वेदधर्मींच्या विषयांवर व्याख्यानें देऊन त्याबरोबरच यांनीं जपानी संस्कृती, तेथील धर्म व तत्त्वज्ञान वगैरेंचा अभ्यास केला. त्यानंतर यांनीं मलाया संस्थानांतील लोकांच्या आग्रहावरून तेथेहि 'बुद्धिझम' वगैरे विषयांवर हिंदू व चिनी श्रोत्यांचे पुढें व्याख्यानें दिलीं. शेवटीं रंगून येथेंहि 'हिंदूधर्म' आणि 'बुद्धाचा संदेश' वगैरे विषयांवर व्याख्यानें दिल्यानंतर ते कलकत्त्यास आले.

पुन्हां स. १९२२ सालीं हे काश्मीरहून हिमालय पर्वत पायीं ओलांडून तिबेटांत बुद्ध तत्त्वज्ञान, तेथील चालीरीती व लामाइझम यांच्या अभ्यासासाठीं गेले. नंतर स. १९२३ त रामकृष्णांच्या हिंदू अनुययांच्या आग्रहावरून हे हिंदुस्थानांत आले व यांनीं कलकत्त्यास रामकृष्ण परमहंसांचा संदेश अखंड सर्वश्रुत करण्यासाठीं सध्यां प्रसिद्ध असलेली 'रामकृष्ण वेदांत सोसायटी' व मठ यांची स्थापना केली. प्रथम ह्या संस्थेची एका भाड्याच्या घरांतच स्थापना झाली. परंतु यांच्या परिश्रमांनीं सन १९३१-३२ सालांत ह्या संस्थेनें आपल्या मालकीचें एक देऊळ व एक मठ बांधला. व अशा तऱ्हेनें स्वामी विवेकानंदांची राहिलेली ही अंतिम इच्छा यांनीं पुरी केली. पुढें १९३४ त यांनीं ह्याच मठ व संस्थेची एक शाखा दार्जिलिंग येथें सुरू केली.

स्वामी विवेकानंदांच्या शतवार्षिकोत्सवप्रसंगीं कलकत्त्यास स. १९३७ च्या मार्च महिन्यांत धर्म परिषदेच्या झालेल्या दोन्ही बैठकींत यांनीं अध्यक्षीय भाषण केलें. वेदान्त व हिंदू तत्त्वज्ञान यांवर यांनीं पुष्कळशीं पुस्तकेंहि लिहिलेलीं आहेत.

**अभ्यंकर भास्करशास्त्री**—(मृत्यु स. १८६८ सुमार) महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध पंडित. हे सातारचे राहणारे. यांचे गुरु नीळकंठशास्त्री थत्ते. प्रसिद्ध पंडित वासुदेवशास्त्री अभ्यंकर हे यांचे नातू होत. यांचे शिष्य रामशास्त्री गोडबोले यांनीं यांचे नातू वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांना व्याकरणशास्त्रांत तयार करून गुरूचें ऋण फेडलें. भास्करशास्त्री अभ्यंकर व रामशास्त्री गोडबोले यांची शिष्यपरंपरा मोठी आहे. यांचा 'संस्कारपद्धतिः' नांवाचा ग्रंथ आनंदाश्रमसंस्थेनें प्रसिद्ध केला आहे. तो सत्याषाढसूत्राप्रमाणें संस्कारांचे प्रयोग सांगणारा ग्रंथ आहे.

**अभ्यंकर, वासुदेवशास्त्री महादेव**—(जन्म स. १८६२-मृत्यु स. १९४३) सुप्रसिद्ध वैयाकरण व अनेक शास्त्रांतील निष्णात पंडित. यांना हिंदुस्थानसरकारनें 'महामहोपाध्याय' (१९२१) व श्रीशंकराचार्य संकेश्वर यांचेकडून 'विद्वद्रत्न' अशा पदव्या मिळाल्या होत्या.

यांचें शिक्षण सातारचे सुप्रसिद्ध पंडित रामशास्त्री गोडबोले यांचेपाशीं झालें होतें. रामशास्त्री गोडबोले यांचे गुरु भास्करशास्त्री अभ्यंकर हे वासुदेवशास्त्री अभ्यंकरांचे पितामह होत. बाप व आजे लहानपणींच वारल्यानें वासुदेवशास्त्री यांचा सर्व भार रामशास्त्री यांनीं आपल्याकडे घेणें स्वाभाविक आहे.

यांचें सातारा येथें अध्ययन संपल्यावर पुण्याच्या संस्कृतपाठशाळेवर व न्या. म. गो. रानडे यांच्या द्वारां फर्ग्युसन कॉलेजमध्यें शास्त्री म्हणून यांची नेमणूक झाली. व्याकरणाप्रमाणेंच वेदान्त, मीमांसा, साहित्य, न्याय, तर्क, ज्योतिष, धर्म वगैरे शास्त्रांतहि यांनीं प्रावीण्य संपादन केलें होतें. या सर्व विषयांत अध्ययन, अध्यापन, वाचन व लेखन हें यांचें सतत चालू असे. त्यामुळ यांचे ग्रंथहि विपुल आहेत, आणि लेखनशैली मार्मिक, मूलग्राही व सुबोध असल्यानें ग्रंथांचा दर्जाहि उच्च आहे. यांचे ग्रंथ आनंदाश्रम, पुणें किंवा बाँबे ओ. सीरीजमध्यें प्रसिद्ध झालेलें आहेत.

यांचे संस्कृत भाषेंतील टीका ग्रंथः—

१ सर्वदर्शनसंग्रहटीका, २ मीमांसान्यायप्रकाशटीका, ३ सिद्धान्तबिन्दुटीका, ४ श्रीभाष्यचतुःसूत्रीटीका, ५ कुण्डार्कटीका, ६ यतीन्द्रमतदीपिकाटीका. ७ गीताध्यायद्वयटीका.

यांचे स्वतंत्र संस्कृत ग्रंथः—

१ अद्वैतामोदः, २ कायशुद्धिः, ३ धर्मतत्त्वनिर्णयः, ४ धर्मतत्त्वनिर्णयपरिशिष्टम्, ५ सूत्रान्तरपरिग्रहविचारः,

मराठी भाषान्तरें:—

१ ब्रह्मसूत्रशांकरभाष्याचें मराठी भाषान्तर.

२ पातंजलमहाभाष्याचें मराठी भाषान्तर.

याशिवाय पं. वामनाचार्य झळकीकर यांनीं केलेला 'न्यायकोश' हा ग्रंथ वाढवून यांनीं संपादला.

भाषान्तरांपैकीं पहिलें गायकवाड सरकारकडून प्रसिद्ध झालेलें आहे आणि दुसरें डेक्कन एज्युकेशन सोसायटीकडून प्रसिद्ध होत आहे. लेखनाप्रमाणें संशोधनाची कलाहि यांना चांगली अवगत होती.

याशिवाय यांचे अनेक हस्तलिखित ग्रंथ अमुद्रित स्थितींत पडून आहेत. त्यावरून नागोजीभट्टाप्रमाणें यांनीं बहुतेक शास्त्रांत ग्रंथ केले आहेत हें दिसून येईल.

मुंबई विद्यापीठाच्या एम्.ए.चे हे अनेक वेळां परीक्षक होते. तसेंच पुण्याच्या वेदशास्त्रोत्तेजकसभेंतहि हे पुष्कळ वर्षें प्रामुख्यानें लक्ष घालीत.

यांचा विद्यावंश

१ नागोजीभट्ट काळे (स.१७५०सुमार)
|
२ रामचंद्रभट्ट तारे
|
३ वैद्यनाथ पायगुंडे (स.१७७५सुमार)
|
४ नीळकंठशास्त्री थत्ते (स.१८१८सुमार)
|
५ भास्करशास्त्री अभ्यंकर (मृत्यु स.१८६८) | ६ मोरशास्त्री साठे — कृष्णशास्त्री चिपळूणकर | ७ खुपाशास्त्री
|
८ काशीनाथशास्त्री अष्टपुत्रे | ९ रामशास्त्री गोडबोले (मृ.स.१९१२) | १० अनंतशास्त्री पेंढारकर
|
११ राजारामशास्त्री कार्लेकर | १२ वासुदेवशास्त्री अभ्यंकर (मृत्यु स.१९४३) | १३ प्रो.कीलहॉर्न
|
१४ बाळसरस्वती रानडे | १५ गंगाधरशास्त्री तेलंग (मृत्युस.१९१३)

यांच्या शिष्यमंडळींपैकीं कै. रंगाचार्य रड्डी, शंकरशास्त्री मारुलकर, दिगंबरशास्त्री काशीकर, गणेशशास्त्री गोडबोले, भगवानशास्त्री धारूरकर, लक्ष्मणशास्त्री सुरगुडकर, सिद्धेश्वरशास्त्री चित्राव हे प्रमुख होत.

**अमरसिंग लाला**—(जन्म स. १९१०-मृत्यु स. १९३५) सुप्रसिद्ध क्रिकेटपटु व गोलंदाज. पतियाळासंघांत होतकरू गोलंदाज म्हणून यांचें नांव प्रथम लोकांच्या कानीं आलें (१९३०). तेव्हां पतियाळाच्या महाराजांनीं यांना आश्रय दिला. हे गोलंदाज म्हणून प्रसिद्ध झाले तरी लवकरच चांगला टोलेबाज बॅट्समन म्हणूनहि यांनीं नांव कमावलें. तसेंच क्षेत्ररक्षणांतहि यांचें विशेष चापल्य कौतुकास्पद होतें. अशा बहुगुणत्वामुळें पंजाब संघांतून यांचा लवकरच भारतीय संघांत समावेश झाला. विलायतेमध्यें गेलेल्या क्रिकेटसंघांतहि यांचा समावेश सहज झाला (१९३२). तिकडे १०० इंग्रज गडी बाद करण्याचें श्रेय यांनीं घेतलें. तिकडच्या अनेक संस्थांनीं यांचा मोठा गौरव केला. लँकेशायर क्रिकेट टीमनें यांचा समावेश आपल्या टीममध्यें केला.

पुढें नवानगरच्या महाराजांनीं यांना आपल्या संस्थानांत आश्रय दिला, व यांच्या नेतृत्वाखालीं पहिल्याच सामन्यांत नवानगरसंघानें रणजी ट्रॉफी संपादन केली. गोलंदाज म्हणून अग्रमान अवघ्या पंचवीशीच्या आंत यांनीं निर्विवादपणें पटकाविला होता.

महाराष्ट्रांतील श्री. पी. बाळू व श्री. एस्. एम्. जोशी यांची गोलंदाजी हातखंडा म्हणून समजली जाई. पण यांनीं आपल्या गोलंदाजीला तडफदार टोलेबाजीची जोड दिल्यामुळें हे कोणत्याहि हिंदी क्रिकेटसंघाचा विश्वासाई आधार मानला जात.

**अमृतलाल दलपतराम शेठ**—(जन्म स. १८८५) सुप्रसिद्ध गुजराथी वर्तमानपत्रकार. काठेवाडांतील एका लहानशा खेड्यांत यांचा जन्म झाला. यांच्या वडील बंधूंनीं यांचें पालनपोषण केलें. मॅट्रिक पास झाल्यावर नोकरी करून हे हायकोर्ट वकील झाले व १९१५ ते १९१८ पर्यंत यांनीं वकिली केली. १९१८ ते १९२१ पर्यंत हे लिंबडी येथें फर्स्ट क्लास मॅजिस्ट्रेट होते. १९२१ च्या असहकारितेच्या लाटेंत यांनीं आपली नोकरी सोडून देऊन "सौराष्ट्र" हें गुजराथी साप्ताहिक सुरू केलें आणि याच पत्रानें हे सुप्रसिद्ध झाले. याच वेळेपासून यांनीं स्थानिक-स्वराज्य व त्याचबरोबर सार्वजनिक कार्यांत लक्ष घालण्यास सुरुवात केली. १९२३ ते १९३३ अहमदाबाद जिल्हा लोकलबोर्डाचे हे अध्यक्ष होते. त्याचबरोबर हे १९२६ ते १९३० पर्यंत अहमदाबाद जिल्ह्यातर्फे मुंबई कायदेमंडळांत सभासदहि होते. १९२३ ते १९३३पर्यंत सतत हे अ. भा. काँ. क.चे व गुजराथ-प्रांतिक काँग्रेस कमिटीचे सभासद होते. याचबरोबर समाजसेवेचें कार्य करणारी 'काठेवाडसेवासमिति' ही संस्था

यांनीं १९२४–१९३६ पर्यंत चालविली होती व बरेच दिवस हे तिचे अध्यक्षहि होते.

परंतु यांचे नांव विशेष निगडित आहे तें संस्थानी प्रजेच्या स्वराज्याच्या चळवळीशीं. यांच्या अविश्रांत प्रयत्नाचें फळ म्हणजेच १९२७ त स्थापन झालेल्या 'अखिल भारतीय संस्थानी प्रजा परिषदे'चें उत्पादन हे होय. जवाहिरलाल नेहरू, सी. वाय्. चिंतामणी, डॉ. पट्टाभिसीतारामय्या वगैरेंना या परिषदेचे अध्यक्ष करून यांनीं या लोकांची संस्थानचे कार्यास सहानुभूति मिळवण्याचा प्रयत्न केला आहे. श्री. चिंतामणी यांनीं पतियाळा संस्थानांतील अत्याचारांची चौकशी या सभेमार्फत केली, या गोष्टीचें श्रेयसुद्धां आपणांस यांनाच द्यावें लागेल (१९२८). राजपुतान्यांत भरलेल्या दोन संस्थानी परिषदांचे हे अध्यक्ष होते. १९२९ सालीं भरलेल्या गोलमेज परिषदेला हे संस्थानांचे अधिकृत प्रतिनिधी म्हणून गेले नसले तरी यांचे जाण्यानें संस्थानांचे अधिकृत प्रतिनिधी श्री. गणपतराव अभ्यंकर यांना अत्यंत मदत झाली होती. "इंडियन स्टेटस् पीपल" हें डॉ. पट्टाभिसीतारामय्या संपादित पत्र यांना कित्येक दिवस झीज सोसून चालवलें होतें व ते तुरुंगांत जाईपर्यंत हें पत्र चालवण्याची जबाबदारी यांनीं घेतली होती. "कांग्रेस सोशॅलिस्ट" हें कांग्रेस सोशॅलिस्ट पक्षाचे पत्रसुद्धां यांनीं शेवटपर्यंत अशाच चिकाटीनें चालवलें होतें. फ्री प्रेस जर्नलच्या के. श्रीनिवासन् यांना संपादक म्हणून नेमून "दि डेली सन्" या नावाचें इंग्रजी दैनिकहि यांनीं कांहीं दिवस चालवलें होतें. श्री. मिनु मसानी हे त्यांचे साहाय्यकारी संपादक होते.

१९३१ त यांची ईस्ट आफ्रिकन इंडियन नॅशनल कॉंग्रेसचे अध्यक्ष म्हणून निवड झाली. नैरोबी येथें झालेल्या अधिवेशनाला हजर राहून त्याबरोबरच यांनीं केनिया व युगांडा येथें दौरा काढला. १९२९ च्या चळवळींत यांना तुरुंगवास घडला होता. त्याबरोबरच १९३१ च्या देशाच्या चळवळीच्या वेळीं तर आफ्रिकेहून परत येत असतांना बोटीवरच यांना अटक झाली होती. त्यानंतर तुरुंगांतून सुटल्याबरोबर यांनीं 'जन्मभूमि' पत्राची स्थापना केली. १९३६ त त्या पत्राची सर्व व्यवस्था शांतिलाल शहा वगैरे लोकांवर सोपवून जपानी व सयामी गृहस्थांबरोबरच्या भागीनें यांनीं जहाजांचा व्यापार सुरू केला. त्या निमित्तानें हे मलाया, इंडोचायना, जपान, फिलिपाइन्स इत्यादि देशांत हिंडून आले. यांचा मुख्यतः मुक्काम हॉंगकॉंग व शांघाय येथें असे. यांचीं कांहीं जहाजें जपान्यांनीं घेतलीं. तेव्हां त्यांच्या चौकशीला यांना टोकिओ व कोबे येथें जावें लागलें. तेथें असतांनाचे आपले अनुभव त्यांनीं 'ॲग्रिकल्चर इन जपान' या आपल्या ग्रंथांत नमूद करून ठेवलेले आहेत. १९४० त नवीन युद्धामुळें चीनच्या किनाऱ्यावर आगबोट फिरविण्याचे मनोरथ तसेच टाकून यांना परत हिंदुस्थानांत यावें लागलें. १९४० त परत हे जन्मभूमीचे संपादक बनले व १९४२ त यांनीं 'नूतन गुजराथी' हें आपलें नवें गुजराथी दैनिक सुरू केलें. वृत्तपत्रव्यवसाय हाच यांचा धंदा असून इंडियन लँग्वेजेस न्यूजपेपर असोसिएशनचे अध्यक्ष, ऑल इंडिया एडिटर्स कॉन्फरन्स व प्रॉव्हिन्शिअल प्रेस ॲडव्हायसरी कमिटीचे सभासद, या दृष्टीनें वृत्तपत्रव्यवसायांतच यांचे सर्व संबंध निगडित आहेत. 'जन्मभूमि', 'प्रवासी', 'लोकमान्य' हीं पत्रे चालविणाऱ्या 'स्टेटस् पीपल लिमिटेड' या संस्थेचे हे मॅनेजिंग डायरेक्टर आहेत. आतां हे सान्फ्रान्सिस्को येथें भरणाऱ्या जागतिक राजकीय परिषदेला वृत्तपत्रकार म्हणून जात आहेत.

**अय्यर, सर निरुवरूर मुथुस्वामी**—(जन्म स. १८३२–मृत्यु स. १८९५) मद्रास हायकोर्टांतील न्यायमूर्ति.

ह्यांचा जन्म वुचुवाडी (तंजावरजवळ) येथें झाला. अल्पवयांतच वडिलांच्या मृत्यूमुळें हे निरुवरूर येथें तामीळ शिकून गांवच्या हिशेबनिसाजवळ दरमहा १ रु. वर नोकरीस राहिले. पुढें तेथील तहशिलदार नायकेन साहेब यांच्यावर यांच्या हुशारी व मेहनती वृत्तीचा पगडा बसून त्यांनीं यांना मद्रासच्या शाळेंत पाठविलें. तेथें हे प्रतिवर्षी बक्षिसें व शिष्यवृत्त्या मिळवीत असत. स. १८५४ त मद्रास इलाख्यांतील विद्यार्थ्यांच्या सर्वोत्कृष्ट निबंधाबद्दल ठेवलेलें ५०० रु. चें बक्षिस यांना मिळालें. त्यामुळें आय. सी. एस. करिता परदेशीं जाण्याची संधि आली असतांहि ब्राह्मणत्वाच्या आड येणारें परदेशगमन करण्याचें यांनीं नाकारून हे तंजावरच्या दप्तरदार, दुय्यम शाळा तपासणीस वगैरे जागांवर कामें करूं लागले. स. १८५६ मध्यें नुकत्याच सुरू केलेल्या वकिलीच्या परिक्षेस बसून सर टी. माधवरावसारख्या जुन्या इसमास मागें टाकून यांनीं तींत पहिला नंबर पटकाविला. पुढें हळूहळू त्रांकेबारचे मुन्सफ, तंजावर येथें डे. कलेक्टर, कानडाचे सबजज्ज व मद्रासचे पोलीस मॅजिस्ट्रेट वगैरे हुद्यांवर हे गेले. स. १८७८ त यांना हायकोर्टाचे बेंचमध्यें घेण्यांत आलें व नंतर कधीं

कधीं हायकोर्टचे मुख्य न्यायाधीश म्हणूनहि यांनीं बराच लौकिक मिळविला. व्हाइसरॉयांच्या निमंत्रणावरून स. १८७७ त हे दिल्लीस दरबारालाहि गेले होते. स. १८७८ त यांना सी. आय. इ. व स. १८९३त के. सी. आय. इ. ह्या पदव्या मिळाल्या होत्या.

**अय्यर रामस्वामी**—( जन्म स. १८७९ ) सुप्रसिद्ध राजकारणी पुरुष.

यांचा ब्रिटिश सरकार, संस्थानी राजकारण, काँग्रेसची चळवळ इत्यादि गोष्टींशीं वेळोवेळीं संबंध आला असून हे एक नाणावलेले अर्थशास्त्रज्ञ व प्रसिद्ध वकील म्हणून चमकले आहेत. एक मनुष्य अशा निरनिराळ्या क्षेत्रांत ज्याअर्थी प्रसिद्धी मिळवूं शकला याअर्थी यांची बुद्धि असामान्य असली पाहिजे यांत तिळमात्रहि शंका नाहीं. यांचें शिक्षण मद्रास येथें झालें.

१९०३ सालीं यांनीं मद्रास येथें वकिली सुरू केली व लवकरच दिवाणी बाजूंत यांनीं आपला चांगलाच जम बसविला. १९१२ सालीं हे मद्रास युनिव्हर्सिटीचे फेलो झाले. १९११ सालीं मद्रास कॉर्पोरेशनचे हे सभासद झाले व यांनीं पुष्कळशा कमेट्यांवर महत्त्वाचीं कामें बजाविलीं. १९१७–१८ सालीं हे इं. नॅ. काँग्रेसचे चिटणीस होते. दिल्लीच्या युद्धसमितीवर हे मद्रासचे प्रतिनिधी म्हणून हजर होते. पाचयप्पाच्या कॉलेज-ट्रस्टचे ते विश्वस्त होते. हिंदुस्थानच्या सुधारणांबाबत साउथबरो कमिशनसमोर, आर्थिक कारणाकरितां नेमलेल्या मेस्टन कमेटीसमोर व मि. माँटेग्यु व चेम्सफर्ड समोर हिंदुस्थानच्या वतीनें यांनीं साक्षी दिल्या. १९१९ सालीं हिंदुस्थानांत सुधारणा घडवून आणण्याकरितां नेमलेल्या जॉईंट पार्लमेंटरी कमेटीसमोर यांनीं पुरावा सादर केला. १९१९ सालीं हे मद्रास विश्वविद्यालयाच्या कौन्सिलचे सभासद होते. १९२० सालीं सुधारणा कायद्यान्वयें बनविलेल्या लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचे हे सभासद होते. त्याच सालीं मद्रासचे हे ॲडव्होकेट जनरल होते. १९२६ व १९२७ सालीं हे लीग ऑफ् नेशन्सच्या असेंब्लीला हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून जिनेव्हाला गेले होते. १९२३–२९ पर्यंत मद्रास सरकारचे हे लॉ-मेंबर होते व १९२४ सालीं हे व्हाइसरॉयच्या एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलचे व्हाइस-प्रेसिडेंट होते; पण लवकरच यांनीं सरकारी नोकरीचा राजीनामा दिला व पुनः वकिली सुरू केली. बटलर इन्क्वायरी कमिटीवर कोचीन संस्थानचे प्रतिनिधि म्हणून हे हजर होते. ब्रिटिश हिंदुस्तान व संस्थानी हिंदुस्तान यांचें फेडरेशनमध्यें एक स्वरूप होण्याकरतां जी राज्यपद्धति आखावयाची होती त्यांत यांनीं सभासद या नात्यानें भाग घेतला होता. १९३३ सालीं नरेन्द्र मंडळानें 'व्हाइट पेपर'चा विचार करण्याकरतां जी कमेटी नेमली होती त्याचे हे चेअरमन होते. १९३३ वर्ल्ड इकॉनॉमिक् कॉन्फरन्सचे सभासद झाले. १९३४ सालीं यांनीं काश्मीरच्या संस्थानची नवी राज्यघटना तयार करून दिली.

१९३६ सालीं हे त्रावणकोर संस्थानचे दिवाण झाले. महाराजांनीं यांना 'सचिवोत्तम' अशी पदवी बहाल केली. १९३६ सालीं अस्पृश्यांना सर्व संस्थानांतील देवळें खुलीं करण्यांत आलीं त्याच्या बुडाशीं यांचा हात होताच. १९३७ सालीं हे त्रावणकोरच्या बॉयस्काउट असोसिएशनचे चीफ कमिशनर झाले व त्रावणकोर विश्वविद्यालयाचे कुलगुरु झाले. १९३७ सालीं लंडनमधील रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ आर्टसचे फेलो म्हणून हे निवडून आले. यांचे लेखहि मासिक व वर्तमानपत्रांतून येत असतात. यांच्यासारखीं चौफेर बुद्धीचीं माणसें हिंदुस्थानांत फार थोडीं आहेत व यांच्या कर्तबगारीमुळें आज त्रावणकोर संस्थानांत सुधारणा दिसून येत आहेत.

स. १९४२ सालीं व्हाइसरॉयच्या एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलमधील जागा यांनीं राष्ट्रीयसभा व सरकार यांच्यांत तडजोड करण्याच्या दृष्टीनें पत्करली होती; पण म. गांधींना पकडतांच यांनीं त्या जागेचा राजीनामा दिला.

**अय्यर, सर पी. एस्. शिवस्वामी**—( जन्म १८६४ ) सुप्रसिद्ध प्रागतिक. यांनीं आपल्या कारकीर्दींत निरनिराळ्या विश्वविद्यालयांची व सरकारची महत्त्वाची कामगिरी बजावली आहे. यांचें शिक्षण तंजावर, कुंभकोणम्, मद्रास येथील निरनिराळ्या संस्थांतून झालें आहे. १८८५ सालीं हे हायकोर्ट वकील झाले. १८९३ ते १९०७ सालापर्यंत हे 'मद्रास लॉ जर्नल'चे सहसंपादक होते. १९०७ सालीं मद्रास प्रांताचे हे ॲडव्होकेट जनरल होते. १९१२ ते १७ पर्यंत ते मद्रास सरकारच्या कार्यकारी मंडळाचे सभासद होते. १९१६–१८ पर्यंत मद्रास विश्वविद्यालयाचे, व १९१८–१९ मध्यें बनारस विश्वविद्यालयाचे व्हाइस चॅन्सेलर होते. हे १९२० सालीं तंजावर व त्रिचनापल्ली या जिल्ह्यांतर्फे हिंदी विधिमंडळांत निवडून आले. हे राष्ट्रीय प्रागतिक परिषदेच्या कलकत्ता व अकोला येथें भरलेल्या दुसऱ्या व नवव्या अधिवेशनाला अनुक्रमें १९१९ व १९२६ सालीं अध्यक्ष होते. १९२२ सालीं हे राष्ट्रसंघाच्या जिनेव्हा येथील अधिवेशनामध्यें हिंदी शिष्टमंडळाचे सभासद म्हणून

हजर होते. १९२४ सालीं हिंदी विधिमंडळाचे सरकारनें नेमलेले ते सभासद होते. सध्यां हे मद्रास येथें वास्तव्य करून आहेत.

कोणत्याहि प्रश्नाचा खोल विचार करणारे म्हणून यांची प्रसिद्धी आहे.

**अय्यर, सर शेषाद्री**—( जन्म स. १८४५–मृत्यु स. १९०१ ) म्हैसूरराज्याचे दिवाण.

हे मलबारमधील पालघाट गांवचे एक ब्राह्मण असून यांचें शिक्षण कालिकत व मद्रास ह्या ठिकाणीं झालें. स. १८६८ सालीं हे म्हैसूरच्या दिवाणांच्या हाताखालीं होते. स. १८८१ त संस्थान राजाच्या ताब्यांत गेल्यावर हे दिवाणांचे दुय्यम झाले. पुढें स. १८८५ हे खुद्द दिवाण झाले. या जागीं सतत १७ वर्षांच्या स्वतःच्या परिश्रमानें संस्थानची आर्थिक व औद्योगिक प्रगति करून हे महाराज चामराजेन्द्र यांचे कर्ते सहकारी बनले. स. १८९३ सालीं ब्रिटिश सरकारकडून यांना सी. आय. इ. ही पदवी मिळाली. म्हैसूर येथें यांचें स्मारक असून तेथें यांचें नांव अत्यादरानें उच्चारलें जातें.

**अय्यर, जी. सुब्रह्मण्य**—( मृत्यु स. १९०८ ) सुप्रसिद्ध संपादक व कार्यकर्ते.

मद्रास येथें यांनीं 'हिंदू' नांवाचें इंग्रजी पत्र सुरू केलें आणि तें अत्यंत यशस्वीपणें पुष्कळ वर्षे चालविलें. या पत्रांतून हे बाहेर पडल्यानंतर यांनीं हिंदुस्थानच्या अगदीं दक्षिणेकडील भागांत तामीळ भाषेंतील सुप्रसिद्ध दैनिक 'स्वदेशमित्रम्' हें सुद्धां बरेच दिवस चालविलें. संपादक सुब्रह्मण्य अय्यर असें यांचें लोकप्रिय नांव होतें.

सुरेन्द्रनाथ बानर्जी किंवा मोतीलाल घोष यांनीं बंगालकरितां किंवा वाच्छा, टिळक, गोखले यांनीं मुंबई प्रांताकरितां जी कामगिरी केली तीच कामगिरी यांनी 'हिंदु' पत्र, महाजनसभा व काँग्रेस यांच्या द्वारां मद्रास प्रांताकरितां केली. यांच्या लेखाचे अतिशय भोक्ते मि. ह्यूम यांनीं यांना लिहिलें होतें कीं "तुमचीं स्फुटें 'लंडन टाइम्स' मधील लेखांपेक्षांहि वरचढ असतात." त्याचप्रमाणें, इंग्लंडांत पार्लमेंटमध्यें हिंदुस्थानला सहानुभूति दाखविणारांचा एक वर्ग आहे. त्यांच्या माहितीकरितां 'हिंदू'च्या पन्नास प्रती खरेदी करून ते पाठवीत असत. त्या वेळीं हिंदुस्तानच्या सार्वजनिक प्रश्नांची चर्चा करून अधिकारवाणीनें मत प्रदर्शित करणारे हेच एक संपादक होते. आर्थिक बाबींचा विचार करणाऱ्या रॉयल कमिशनपुढें यांची साक्ष झाली. 'सम् एकॉनॉमिक आस्पेक्टस् ऑफ ब्रिटिश रूल इन् इंडिया'–हा यांचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. ( सी वाय. चिंतामणि–इंडियन पॉलिटिक्स सिन्स म्युटिनी–पा. ४९).

हे 'हिंदु' या इंग्रजी दैनिकाचे संपादक असतांना यांच्या तालमींत तयार झालेले श्री. करुणाकर मेनन ( हिंदु व इंडियन पेट्रियट यांचे संपादक ), श्री. के. नटराजन् ( इंडियन सोशल रिफॉर्मर, मुंबईचे सुप्रसिद्ध संपादक ) व श्री. सी. वाय. चिंतामणि ( लीडर, अलाहाबाद ) हे प्रमुख होत. हिंदी गृहस्थांनीं संपादन केलेलें पहिलें इंग्रजी भाषेंतील यशस्वी दैनिक या दृष्टीनें हिंदू पत्राचें महत्त्व केव्हांहि मोठेंच राहील.

पहिल्या काँग्रेसमधील पहिला ठराव मांडणारे हे गृहस्थ होत. हिंदुस्थानच्या राज्यकारभारासंबंधीं जी चौकशी करण्याचें अभिवचन मिळालें आहे, ती चौकशी रॉयल कमिशनद्वारां व्हावी व तींत हिंदी प्रतिनिधींचें योग्य तें प्रमाण असावें असा हा ठराव होता. पुढें स.१८९४ सालीं मद्रास येथे काँग्रेसचे जें अधिवेशन झालें, त्या वेळीं हे पुनः चमकले. तेथें हिंदुस्थानच्या तिजोरीच्या प्रश्नाची पाहणी करावी या ठरावावर हे बोलले. कलकत्त्यास समकालीन परीक्षांचा ठराव ( स. १८९६ ), अमरावती काँग्रेसमध्यें सरकारच्या सरहद्दविषयक धोरणाचा निषेध व मद्रासच्या अधिवेशनांत ( १८९८ ) चलनाचा प्रश्न यांसंबंधीं हे बोलले. 'हिंदुस्थानांत इंग्रजांचें भांडवल वाढत राहणें हिताचें नाहीं, त्यामुळें हिंदुस्थानचें अधिकच द्रव्यशोषण होतें' असें त्या वेळीं हे म्हणाले. 'हिंदुस्थानची परिस्थिति' हा यांचा आवडता विषय होता. हिंदुस्थानांत वारंवार पडणाऱ्या दुष्काळांपासून लोकांचें संरक्षण व्हावें म्हणून 'चौकशी कमिटी' नेमावी असें यांनीं सोळाव्या अधिवेशनांत (लाहोर १९००) बोलून दाखविलें. स. १९०१ सालीं हिंदी रयतांच्या दुःख व दारिद्र्यासंबंधानें बोलतांना 'हिंदी लोक या जगांत जन्माला आले म्हणून जगतात आणि जास्त काल शरीरांत प्राण राहणें शक्य नाहीं म्हणूनच ते मरतात,' असे यांनीं उद्गार काढले. देशांत औद्योगिक शिक्षणसंस्था काढाव्यात, परदेशांत जाणाऱ्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्त्या द्याव्यात व देशीं उद्योगधंद्यांची बारकाईनें पाहणी करावी, अशा यांच्या विधायक सूचना होत्या. यांची दृष्टि विशाल होती तशीच ती खोल होती. स. १९०२ च्या ( अहमदाबाद ) अठराव्या अधिवेशनांत 'ईस्ट इंडिया कंपनीनें इंग्लंडच्या फायद्याकरितां हिंदुस्थानचे उद्योगधंदे कसे बुडविले, इंग्लंडांतील कार-

खाऱ्यांना कच्चा माल पुरविण्याकरितां शेतीला कसें उत्तेजन दिलें' याचें यांनीं वर्णन केलें. 'ब्रिटिश सरकारनें राज्यसूत्रें हातीं घेतल्यामुळें वरील स्थिति आतां पालटली पाहिजे. आज काय चाललें आहे? कोलारमधील सोन्याच्या खाणी युरोपियन भांडवलवाल्यांच्या हातांत आहेत. दरसाल २० कोटि रुपयांचें सोनें या खाणींतून निघतें तें सर्व परदेशांत नेण्यांत येतें. २०–३० वर्षांत हें सर्व सोनें खणून काढून इंग्लंडांत नेल्यावर म्हैसूरच्या वांट्याला दगडांशिवाय काय राहणार? सरकारनें हिंदुस्तानच्या संपत्तीचें रक्षण केलें पाहिजे. ती देशांतून बाहेर जाऊं देतां कामा नये.' ही यांचीच उक्ति होय.

आक्षेपार्ह लेख लिहिल्याबद्दल यांना शेवटीं कारागृहांतहि जावें लागलें. पण यांना झालेल्या शारीरिक रोगामुळें यांची मुक्तता करण्यांत आली. हे अत्यंत निधडे व दूरदृष्टीचे राजकीय पुढारी होते (राष्ट्रीय सभेचा इतिहास, पा. ९४).

**अय्यर, डॉ, सर. एस्. सुब्रम्हण्य**— (जन्म स. १८४२–मृत्यु स. १९२४) दक्षिण हिंदुस्थानांतील विद्वान्, स्वाभिमानी देशभक्त व मद्रास हायकोर्टचे मुख्य न्यायाधीश.

जन्मस्थान मदुरा जिल्हा. हे वकिलीची परीक्षा पास झाल्यावर यांनीं मदुरेच्या डि. जज्जांना सलाम करण्याचें नाकारल्यानें यांना सनद देण्याचें नाकारण्यांत आलें. म्हणून यांनीं बी. एल्. ची परीक्षा देऊन मदुरा येथें वकिलीच्या धंद्यास सुरुवात केली, व या धंद्यामध्यें आपल्या हुशारीमुळें उत्तम यश संपादन करून हे नांवलौकिकास चढले. स. १८७० सालीं मदुरेच्या म्युनिसिपालिटींत हे प्रविष्ट झाले. राष्ट्राचा उत्कर्ष होण्याकरितां लोकसेवेचें व्रत घेऊन त्याच वृत्तीनें प्रत्येक सार्वजनिक कार्यांत हे मन घालूं लागले. स. १८७५ मध्यें त्या वेळचे प्रिन्स ऑफ वेल्स (७ वे एडवर्ड) हिंदुस्थानांत आल्या वेळीं मदुरा शहरातर्फे त्यांचा सत्कार करण्याचा मान यांना मिळाला. स. १८८७ सालीं यांची सरकारी वकील म्हणून नेमणूक झाली. स. १८७७ पासून स. १८९५ पर्यंत यांनीं वकिलीचा धंदा केला. पुढें स. १८९५ सालीं मद्रासचे हायकोर्ट जज्ज म्हणून यांची नेमणूक झाली. याच अधिकारावर हे स. १९०७ सालापर्यंत होते. या अवधींत तीन वेळां चीफ जस्टिस म्हणून यांची नेमणूक झाली. हें न्यायाधीशाचें काम यांनीं अत्यंत विद्वत्तेनें, न्यायबुद्धीनें व स्वतंत्र बुद्धीनें केल्याबद्दल यांची तिकडे फार प्रसिद्धी झाली.

मद्रास युनिव्हर्सिटीचे हे कित्येक वर्षेपर्यंत फेलो असून स. १९०४ पासून स. १९०८ पर्यंत त्या विद्यापीठाचे हे उपकुलगुरु होते. स. १९०७ सालीं हे सेवानिवृत्त झाल्या वेळीं सरकारनें यांना नाइट करून 'सर' ही पदवी दिली. स. १९०८ सालीं मद्रास विद्यापीठानें यांना यांच्या विद्वत्तेबद्दल आदरदर्शक एल्‌एल्. डी. ही पदवी दिली. जनतेनेंहि यांच्या लोकसेवेचें स्मारक म्हणून यांचे नांवानें 'मणि हॉल' या नांवानें सार्वजनिक सभागृह बांधलें.

स. १८८२ सालीं हे थिऑसॉफिकल सोसायटीचे सभासद झाले. स. १८८५ सालापासून स. १९०७ पर्यंत कर्नल आल्कॉट यांचे व स. १९०७ पासून स. १९२४ पर्यंत बेझंटबाईचे हे कायद्याचे सल्लागार होते. स. १९०५–६ सालीं हे सोसायटीचे चिटणीस नेमिले गेले, व या अवधींतच थिऑसॉफिकल सोसायटीचें घटनापत्रक यांनीं तयार केल्यावर कायद्याप्रमाणे सोसायटी नोंदली गेली. सोसायटीचे उपाध्यक्ष मि. सिनेट यांनीं बेझंटबाईच्या धोरणाशीं मतभेद झाल्यामुळें आपल्या सदस्यत्वाचा राजीनामा १९०७ मध्यें दिला. म्हणून त्या उपाध्यक्षाच्या जागीं बाईनीं यांची नेमणूक केली. पुनः स. १९११ सालीं फिरून समजूत पटून मि. सिनेट सोसायटींत परत आले. त्यासरशीं बाईचे विनंतीस मान देऊन यांनीं उपाध्यक्षपदाची जागा खखुषीनें खाली करून मि. सिनेट यांचे स्वाधीन केली. यावरूनच यांच्यामधील बुद्धीची तेजस्विता व स्वतंत्रतेचा बाणेदारपणा जसा दिसून येतो तशीच असामान्य सेवावृत्ति व विनयशीलताहि दिसून येते.

स. १८८४ सालीं मि. ह्यूम यांनीं अखिल हिंदुस्थानांतील पुढाऱ्यांच्या सहकार्यानें जेव्हां राष्ट्रीय सभेची मद्रासला स्थापना केली, त्या वेळीं तेथें जमलेल्या सतरा संस्थापकांपैकीं हे एक होते. स. १९१४ सालीं मद्रासच्या बैठकींत हे स्वागताध्यक्ष होते. स. १९१७ सालीं बेझंटबाईनीं जेव्हां 'होमरूललीग' काढली तेव्हां तिचे हे सन्मान्य अध्यक्ष होते व त्या चळवळींत यांनीं मोठ्या धडाडीनें भाग घेतला. बेझंटबाई, डॉ. अरंडेल व वाडिया हे उटकमंडला स्थानबद्ध केले गेले त्या वेळीं यांनीं निषेधार्थ सरकारनें दिलेल्या सर या पदवीचा त्याग केला. यांनीं हिंदुस्थानांतील प्रसिद्ध-प्रसिद्ध पुढाऱ्यांच्या आपल्यासमवेत सह्या घेऊन प्रे. विल्सन, अमेरिका, यांना त्या वेळच्या युद्धपरिस्थितीचा उल्लेख करून हिंदी स्वातंत्र्याच्या बाबतींत लक्ष घालण्याविषयीं पत्र लिहिलें. त्या वेळचीं सरकारी मनःस्थिति लक्षांत घेऊन तें पत्र खासगी

रीतीनें प्रे. विल्सन यांचेकडे रवाना केलें. प्रे. विल्सन यांनीं तें एक महत्त्वाचा प्रश्न म्हणून सिनेटपुढें ठेवण्यास सांगितलें. तें तिकडील अनेक दैनिकांत प्रसिद्ध झालें, व लाखों लोकांच्या वाचनांत येऊन त्याच्या प्रती जेव्हां इंग्लंडांत पोंचल्या त्या वेळीं तिकडे फार खळबळ उडाली. त्यामुळें ब्रिटिश व हिंदी सरकारला फार घुस्सा आला. पुढें बेझंटबाई व त्यांचे सहकारी यांची लवकरच मुक्तता झाली, व भारतमंत्री मि. मांटेग्यु हे हिंदी प्रश्नाबाबत प्रत्यक्ष चौकशी करण्याकरितां हिंदुस्थानांत आले. त्यांनीं अनेक संस्थांच्या शिष्टमंडळांच्या गांठीं घेतल्या व देशभर प्रवास करून अनेक सरकारी व लोक–पुढारी यांशीं विचारविनिमय केला. अशा प्रसंगानें भारतमंत्री व व्हाइसरॉय लार्ड चेम्सफर्ड हे मद्रासला आले. त्या वेळीं एक प्रमुख नागरिक म्हणून यांना बोलावणें आलें. त्या वेळच्या भेटींत यांना त्या पत्राबद्दल व्हाइसरॉयनीं खुलासा विचारला व अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांचे अध्यक्ष, अशासारख्या परकीय अधिकाऱ्यांना पत्र कां व कसें लिहिलें याचा जबाब विचारून यांना फार दोष दिला व गरम झाले. यांनीं 'अमेरिकेसारख्या आपल्या दोस्त राष्ट्राच्या अधिपतींना पत्र लिहिण्यांत कांहींएक बेकायदा नाहीं; व प्रसंग आल्यास अशीं पत्रें मी फिरूनहि लिहीन' असें धिटाईनें उत्तर दिलें. व्हाइसरॉय लष्करी बाण्याचे असल्यामुळें संतापले, व प्रसंग विकोपास जाण्यापर्यंत पाळी आली, पण भारतमंत्र्यांनीं मध्यें पडून स्थिरस्थावर केलें व भेट संपली. याप्रमाणें हिंदी स्वातंत्र्याच्या प्रश्नाला आंतरराष्ट्रीय स्वरूप प्रथमच आणण्यास हे थोर देशभक्त कारणीभूत झाले.

हे दिवंगत झाल्यावर मद्रास विद्यापीठानें यांच्या बहुमानार्थ स. १९३५ सालीं एक पुतळा उभारला व तसाच बेझंटबाईनींहि अड्यार येथें थिऑसॉफिकल सोसायटीचे एक थोर सभासद, सल्लागार व उपाध्यक्ष म्हणून यांचा स. १९२५ मध्यें पुतळा उभारला.

यांनीं योगाभ्यासांतील ध्यानमार्गाचा अनेक दृष्टींनीं अभ्यास केला होता. यांचा दक्षिण हिंदुस्थानांत 'शुद्ध धर्म-मंडल' या नांवाच्या कांहीं योगी लोकांच्या संप्रदायाशीं निकट संबंध होता. या संप्रदायाच्या मतानें हल्लीं प्रचलित असलेले श्रुति, स्मृति, पुराणें इत्यादि ग्रंथ मूळ स्वरूपांत नाहींत. म्हणून सदरहू संप्रदायाच्या तर्फे कांहीं मूळ शुद्ध ग्रंथ यांचे विद्यमानें प्रकाशित केले गेले. त्यांना यांनीं प्रस्तावना लिहिलेल्या आहेत. त्यांपैकीं कांहीं ग्रंथ येणेंप्रमाणें—

१ भगवद्गीता ( २६ अध्यायांची व ७४५ श्लोकांची ऋषि गार्ग्यायणप्रणीत गोभिलकारिकेसह ).

२ प्रणववाद ( ७ हजार श्लोकांचा, महर्षि गार्ग्यायणप्रणीत स्वार्गा योगानंदकारिकेसहित ).

३ योगदीपिका ( भगवान् नारायणप्रणीत, हंसयोगीभाष्यासह ).

४ सनातनधर्मदीपिका अथवा अनुष्ठानचंद्रिका ( १–३ भाग. भगवान् हंसयोगीकृत ).

५ इसोटेरिक ऑर्ग्यानिझेशन इन इंडिया.

पहिले चारहि ग्रंथ मूळ संस्कृत भाषेंत असून यांनीं इंग्रजी भाषांतरासह प्रसिद्ध केले आहेत. पांचवा ग्रंथ इंग्रजींत स्वतंत्रपणें लिहिलेला आहे (वा. ल. चिपळूणकर).

**ॲरंडेल, डॉ. जॉर्ज सिड्ने**—(जन्म स. १८७८ ).

'बेझंटबाईच्या स्फूर्तीनें भारतभूमीची माझ्या आयुष्यांतील गेल्या चाळीस वर्षें सेवा करण्याची मला जी संधि मिळाली ती माझ्या गतजन्मांतील अपूर्वाईची कमाई आहे असें मी समजतों. माझ्या मनावर सोंपविलें तर हिंदुस्थानांतच फिरून जन्म मिळावा अशी मी परमेश्वराची प्रार्थना करीन.' असे अन्तःकरणापासून उद्गार काढलेले हे सज्जन गृहस्थ आहेत.

यांच्या वडिलांचे नांव रे. जॉन के ( काँग्रिगेशनल पंथाचे उपाध्याय ) होय. यांच्या जन्मकाळींच यांच्या आईस मृत्यु आला. त्यामुळें यांचें बाळपणचें संगोपन, संवर्धन व अखेरपर्यंतचें शिक्षण, हें यांच्या मावशी मिस् फ्रॅन्सिस्का ॲरंडेल यांजकडे आलें व तें त्यांनीं फार प्रेमपूर्वक पार पाडलें. त्यांनींच पुढें यांना आपले दत्तकपुत्र म्हणून मानलें. याप्रमाणें पितृकुलांतील उपनांव 'के' हें जाऊन यांना यांच्या आजोळचें उपनांव 'ॲरंडेल' हें प्राप्त झालें. हे लहान असतांना यांचे आजोळीं, आजीकडे ब्लॅव्हट्स्कीबाईचा पुष्कळ वेळां मुक्काम असे. अशा वेळीं ब्लॅव्हट्स्कीबाईंना संधिवात असल्यानें, त्यांना टकलत्या खुर्चीवर बसवून लंडनमधील प्राणिसंग्रह-उद्यानांत हवा खाण्यास नेत असत. त्या वेळीं लहान वयांत हेहि त्यांच्याबरोबर करमणुकीकरितां असत. त्या वेळीं 'प्राणिमात्रांशीं आपण भूतदयेनें वागावें' असा प्रेमाचा उपदेश यांना त्या देत असत. या उपदेशाचा यांच्या कोवळ्या मनावर कायमचा ठसा उमटून, आज हे जरी विश्वविद्यालयांत उच्च शिक्षण घेतलेले पदवीधर आहेत, तरी अन्तःकरणाची कोमलता

आणि सहृदयवृत्ति यांचे त्यांच्या स्वभावांत प्राधान्य स्पष्टपणें दिसून येतें. यांच्या बाल-शरीराकडे पाहून ब्लॅव्हॅट्स्कीबाई यांना 'माझा छोटा चेला' या नांवानें संबोधीत असत.

यांचें शिक्षण इटली, जर्मनी व इंग्लंड येथें झालें. हे केंब्रिज विश्वविद्यालयाचे नीतिशास्त्र, कायदा व फ्रेंच-राज्यक्रांति या विषयांत विशेष सन्माननीय प्रावीण्य संपादन करून एम. ए. एलएल. बी. झालेले आहेत. केंब्रिज विद्यापीठांतील यांचे त्या वेळचे बरेच सहाध्यायी पुढें हिंदी जनतेत प्रसिद्धीस आले. त्यांपैकीं रॅंग्लर सर रघुनाथराव परांजपे, बॅरिस्टर बॅप्टिस्टा, हिंदुस्थानचे माजी स्टेट सेक्रेटरी माँटेग्यू व मि. जिनराजदास हे प्रमुख होत. ऐतिहासिक संशोधनावरून फेलो ऑफ दि रॉयल हिस्टॉ. सो. हीहि पदवी यांना मिळाली.

यांच्या मावशी मिस ॲरंडेल व त्यांच्या आजी, या आधींच थिऑसाफिकल सोसायटीच्या सभासद होत्या. बेझंटबाईनीं बनारसला सेंट्रल हिंदु कॉलेजच्या (१८९८) स्थापनेबरोबरच हिंदी मुलींच्या शिक्षणाकरितां निराळी शाळा व कॉलेजहि काढलें व त्यांत मिस ॲरंडेल या अध्यापिकेचें काम करीत असत. वरीलप्रमाणें डॉ. ॲरंडेल यांचें शिक्षण पुरें झाल्यावर मावशीचे सल्ल्यावरून हे हिंदुस्थानांत सें. हिं. कॉलेज बनारस येथें इतिहासाचे प्रोफेसर म्हणून काम करण्यास आले (१९०३). याच कामासंबंधानें यांनी स्वतः लिहिलें आहे कीं, "एके प्रसंगीं लंडनमध्यें बेझंटबाईचें Queen's Hall मध्यें एक वक्तृत्व-पूर्ण व्याख्यान ऐकून 'हेंच माझें कार्य' व 'हीच माझी देवता' अशी माझ्या हृदयांत ओळख पटली." "मी हिंदुस्थानांत येण्यास तयार आहें," असें बेझंटबाईना यांनीं सांगितलें, तेव्हां त्या गंभीर चर्येनें यांना म्हणाल्या, "पण हिंदी वरिष्ठ अधिकाऱ्यांचे हाताखालीं काम करण्यास तुम्ही तयार आहांत काय?" त्यालाहि यांनीं एकदम संमति दिली. यांत बेझंट-बाईच्या हिंदुस्थानांतील कार्याच्या धोरणावरहि चांगला प्रकाश पडतो. येथें आल्यावर इतिहासाचे प्रोफेसर, हायस्कूलचे हेडमास्तर व अखेरीस कॉलेजचे प्रिन्सिपल याप्रमाणें उत्तरोत्तर १९०३ पासून १९१३ पर्यंत यांनीं निर्वेतन काम केलें. यानंतर सें. हिं. कॉलेज हें पं. मदन-मोहन मालवीय यांचे हिंदुविश्वविद्यालयांत सामील होण्याकरितां त्यांचे स्वाधीन करण्यांत आलें. अध्यापन-कार्य हें यांच्या मोठ्या आवडीचें कार्य आहे. कॉलेजांतील प्रत्येक विद्यार्थ्यांशीं अध्यापनाच्या वेळीं व क्रीडांगणावर यांचें वर्तन अगदीं खेळीमेळीचें असे. 'माझा भाचा कोठें गेला हें शोधावयाचें असल्यास, जेथें खूप धुमाकूळ व विद्यार्थ्यांचा गलबला असेल तेथें तो मला हटकून सांपडतो' असें यांच्या मावशी नेहमीं म्हणत असत. कॉलेजांतील प्रत्येक विद्यार्थ्याला हे त्याच्या घरच्या नांवानें हांक मारीत असत, व विद्यार्थीहि यांना तशाच प्रेमानें संबोधीत. हे त्या वेळीं अविवाहित असल्यानें, यांच्या बंगल्यांत विद्यार्थ्यांची दिवसभर ये जा चालत असे. विशेष होतकरू, तसेंच अभ्यासांत मागासलेल्या अशा विद्यार्थ्यांची नोंद हे आपल्या रोजनिशींत ठेवीत व त्यांकडे विशेष लक्ष ठेवीत. यामुळे तत्कालीन विद्यार्थ्यांच्या मनावर यांच्या स्वभावाची छाप पडून उत्तर हिंदुस्थानात ते विद्यार्थी आपआपल्या परिसरात 'ॲरंडेलस् मेन्' म्हणजे 'ॲरंडेल-शिष्य' या नांवानें ओळखले जात व हेंच संबोधन यांच्याशीं सहकार्य करीत असलेले इतर प्राध्यापक यांनाहि मिळालें होतें. यांमध्यें हल्लींच्या कौन्सिल ऑफ स्टेटमधील सभासद प्रकाशनारायण सप्रू (सर तेजबहादूर यांचे चिरंजीव), श्रीप्रकाश (डॉ. भगवानदास यांचे चिरंजीव) हे विद्यार्थी व प्रो. पंढरीनाथपंत तेलंग, चिंतामणि त्रिलोकेकर, संजीव-राव हे प्राध्यापक, यांचा उल्लेख करतां येईल. 'माझ्या सहवासानें जर एकाहि हिंदी विद्यार्थ्याचें अंतःकरण मातृभूमीच्या सेवावृत्तीनें भरून जाईल तर मी आपणास धन्य समजेन' असे यांचे तत्कालीन उद्गार आहेत. यांनीं अध्यापन विषयाचा विशेष गाढ अभ्यास, अनेक देशांत वास करून व तत्संबंधी आर्यांचे स्मृतिग्रन्थ वाचून केला आहे. यांनीं शिक्षणशास्त्रावर अनेक ग्रंथ व लेख लिहिले आहेत. या विषयावरील यांचा मुख्य ग्रंथ "गॉड्ज़ इन दि बिकमिंग" हा आहे. यावरून प्रत्येक विद्यार्थी हा देवाचें अपूर्ण स्वरूप आहे ही यांची दृष्टि स्पष्ट होते; व म्हणूनच अध्यापनाचें कार्य इतकें पवित्र आहे असें यास वाटतें. यांना कांहीं दिवस होळकर सरकारनें आपले शिक्षणमंत्री नेमिले होते. श्रीकृष्णमूर्तींना इतिहास शिकविण्याचें कार्य यांचेकडे सोंपविलें होतें. हें कार्य झाल्यावर मद्रासला बेझंटबाईनीं जेव्हां नॅशनल युनिव्हर्सिटी काढली तेव्हां तिचे रजिस्ट्रार व कॉलेज-अध्यापक म्हणून यांनीं काम केलें. या कार्याबद्दल यांना डॉक्टर पदवी मिळाली.

बेझंटबाईनीं होमरूलची चळवळ चालविल्यावर लीगचे सेक्रेटरी म्हणून व न्यू इंडिया दैनिकाचे सहसंपादक म्हणून, यांनीं व्याख्यान व लेखनद्वारा प्रचंड चळवळ उभी केली,

त्यामुळें मद्रास सरकारनें यांना, बेझंटबाई व मि. वाडिया यांच्यासह उटकमंड येथें स्थानबद्ध केलें. त्यानंतर बेझंटबाईनीं स्थापना केलेल्या मद्रास पार्लमेंटमध्यें 'कॉमनवेल्थ ऑफ इंडिया' बिलाबाबत यांनीं त्यांच्याशीं सहकार्य केलें. त्याचप्रमाणें हिंदुस्थान, ऑस्ट्रेलिया, इंग्लंड, अमेरिका या देशांत थिऑसॉफीच्या प्रचाराचें कार्य करून पहिल्या तीन देशांत, तेथील सोसायटीच्या चिटणिसाचें कामहि यांनीं कांहीं वर्षे केलें. याप्रमाणें बेझंटबाईनीं यांना आपल्या पाठीमागें अध्यक्षपदावर चढण्याची योग्यता आणून दिली.

स. १९३३ च्या सप्टें. २० ला बेझंटबाई वारल्या. त्या वेळीं सोसायटीच्या घटनेप्रमाणें त्या वेळचे उपाध्यक्ष, अमेरिकेंतील कार्यकर्ते मि. ए. पी. वॉरिंग्टन् यांनीं अध्यक्षपदाचीं सूत्रें हातीं घेतलीं व कायमचे अध्यक्षाच्या निवडणुकीकरितां मतपत्रिका धाडल्या. जगांतील सर्व सभासदांचीं व्यक्तिगत मतें घेऊन, जागेच्या कायमच्या अध्यक्षपदाकरितां उभे राहिलेल्यांमध्यें यांची मताधिक्यानें निवडणूक झाली, आणि तेव्हांपासून हे अध्यक्षाचें काम करीत आहेत. घटनेप्रमाणें दर सात वर्षांनीं अध्यक्षाची निवडणूक फिरून व्हावी लागते, त्याप्रमाणें स.१९४१ सालीं फिरून निवडणूक होऊन यांच्या अध्यक्षपदाचें दुसरें सप्तक चालू आहे. या अकरा वर्षांचे अवधींत सोसायटीच्या पूर्वपरंपरागत धोरणानुरूप सर्व सभासद व संस्था यांशीं आत्यंतिक स्नेहभाव ठेवून व त्यांचे त्यांचे मतस्वातंत्र्यास धक्का न पोंचेल अशा तऱ्हेनें हे कार्य करीत आहेत. या अवधींत यांनीं दरसाल सोसायटीचे प्रादेशिक शाखांना व सभासदांना मार्गदर्शन होईल अशा तऱ्हेच्या त्या त्या कालाला अनुरूप निरनिराळ्या कार्यांची शिफारसहि केली आहे. त्यांपैकीं कांहीं म्हणजे 'कँपेन् ऑफ स्ट्रेट थिऑसफी', 'सहज सुलभ आत्मविद्येचें जागृतिकार्य', 'कँपेन् ऑफ अंडरस्टँडिंग' 'अंतःकरणाचें जागृतिकार्य'; 'कुरुक्षेत्रयुद्ध' 'कुरुक्षेत्रयुद्धाचें स्मृति–जागृतिकार्य', 'कँपेन् ऑफ ग्रेटनेस्' 'देशादेशांतील विभूतिमत्त्वाचें जागृतिकार्य' अशीं होत. हीं कार्यें चालविण्यास जरूर असें दरमहाचें वाङ्मय म्हणून अनेक लघुपुस्तकें लिहिलीं. याशिवाय यांनीं अध्यात्म, योगशास्त्र, शिक्षण व सामान्य वाचकांकरितां लौकिक भाषेंत थिऑसफी यावर अनेक ग्रंथ लिहिले. निरनिराळ्या देशांतील सभासदांना व संस्थांना जे वार्षिक परिषदांचे प्रसंगानें संदेश धाडले ते तर असंख्य आहेत.

सन १९२० सालीं यांच्या वयाचे बेचाळिसावे वर्षी कु. रुक्मिणीदेवी यांशीं यांचा वैदिकपद्धतीनें विवाह झाला. इंग्रज गृहस्थांबरोबर एका हिंदु कुमारीचा हा विवाह असल्यामुळें या विवाहानें दक्षिण हिंदुस्थानांत हिंदुसमाजांत फार खळबळ उत्पन्न झाली. पण बेझंटबाई व डॉ. ॲरंडेल या उभयतांच्या हातून हिंदुस्थानची झालेली सेवा व त्यांची सुजनता यांमुळें ही खळबळ लवकरच शांत झाली.

'आजचे तरुण उद्यांच्या जगांतील नागरिक होत' याकरितां, अध्यात्माचे बैठकीवर जर देशोदेशांतील तरुणांचीं अंतःकरणें ध्येयनिष्ठा, स्वदेशप्रीति पण त्याबरोबरच एकंदर मानवांबद्दल बंधुप्रेम या सत्प्रवृत्तीनें भरून टाकिलीं तर उद्यांचे जगांत खरी शांति व सुख नांदतील या भावनेनें यांनीं सोसायटींत 'थिऑसफीय युवक-संघ' ही संस्था देशोदेशीं काढली व त्यांची एक आंतरराष्ट्रीय संघसंस्था स्थापन केली. या संस्थेचे हे सन्माननीय अध्यक्ष असून सौ. रुक्मिणीदेवी कार्याध्यक्ष आहेत.

यांनीं १९१२–१३ च्या सुमारास बेझंटबाईनीं जेव्हां निष्कामकर्म मठासारखी 'आर्डर ऑफ ब्रदरहुड' या नांवाची संस्था काढली, तेव्हां संप्रदायनिधींत यांनीं आपलें धनसर्वस्व इतर सभासदांप्रमाणें अर्पण केलें. व त्याच वृत्तीनें अजूनहि हे राहत आहेत. याप्रमाणें यांचें जीवनस्वरूप प्राचीन आर्यांच्या संन्यास-धर्मानुरूप आहे. यांना योगदीक्षा मिळालेली आहे.

### यांचे ग्रंथ

| ग्रंथ | विषय |
|---|---|
| १ निर्वाण (Nirvāṇa)<br>२ कुंडलिनी (Kundalinī)<br>३ लोटस् फायर (Lotus Fire) | योगशास्त्रीय |
| ४ फ्रीडम् अँड फ्रेंडशिप (Freedom & Friendship) ( स्नेह व स्वतंत्रता )<br>५ यू (You) ( तुम्ही व तुमचें जीवन ) | आध्यात्मिक ( लौकिक भाषेंत ) |
| ६ गॉडज़ इन् दि बिकमिंग (Gods in the Becoming) ( घडत असलेले देव )<br>७ बेडरॉक ऑफ एज्युकेशन (Bed-rock of Education) ( शिक्षणाचा कूटस्थ पाया )<br>८ एज्युकेशन फॉर हॅपिनेस (Education for Happiness) (सुखप्रद शिक्षण) | शिक्षण-शास्त्रावर |

९ थिऑसॉफिस्ट (Theosophist) ( मासिक संपादन १९३३ पासून आजतागायत ).

१० कॉन्शन्स (Conscience) ( सदसद्विवेक, साप्ताहिक १९३९ पासून आजतागायत ).

यांशिवाय इतर ४०–४५ लहानमोठे ग्रंथ व पुस्तकें.

**ॲरंडेल, श्री. रुक्मिणीदेवी**—( जन्म स.१९०४ ) 'श्री. नटराज हे शंकराचें आनंदस्वरूप होत; ते महान् योगी, सर्व कलांचे पिता आहेत. त्यांच्या दैवी स्वरूपाशीं जो तन्मय होईल त्यालाच कलेचें हृदय हस्तगत होईल.'—हेंच यांच्या जीवनरहस्याचें ब्रीदवाक्य होय.

यांचे वडील श्री. नीलकंठशास्त्री हे एका दक्षिणेकडील हिंदी संस्थानांत एंजिनिअर होते. हे संस्कृतभाषा व हिंदी तत्त्वज्ञान यांतील त्यांच्या गाढ विद्वत्तेबद्दल त्या बाजूला सुप्रसिद्ध होते. सोसायटीचे हल्लींचे उपाध्यक्ष एन्. श्रीराम हे यांचे बंधु होत. यांच्या वडील भगिनी डॉ. शिवकामू यांनीं एके वेळीं होमरूलच्या चळवळींत विशेष भाग घेतल्यानें त्यांना मुंबईसरकारनें मुंबईच्या मेडिकल कॉलेजांतून काढून दिलें होतें. याप्रमाणें या दक्षिण हिंदुस्थानांतील ब्राह्मण कुटुंबांतील सर्व माणसें विद्वान् व सार्वजनिक कार्यांत पडलेलीं अशीं आहेत. यांचे कुटुंबाशीं डॉ. ॲरंडेल यांचा पूर्वपरिचय चांगला होता. स. १९२० सालीं डॉ ॲरंडेल यांच्याशीं यांचा विवाह झाला. यांचें शिक्षण विवाहाच्या पूर्वी व नंतर मद्रासमध्येंच झालें. यांचा थिऑसाफींतील पुढारी मि. लेटबीटर यांचेशीं वयाचे ७ वे वर्षीच परिचय होऊन, उभयतांच्या दृढ परिचयास सुरुवात झाली. शिक्षणाचीं आद्यतत्त्वें व तरुणांच्या अन्तःकरणाचें ज्ञान हीं यांना त्यांच्यापासून प्राप्त झालीं अशी यांची समजूत आहे. बेझंटबाई यांना, यांनीं जरी अनेक वेळां पाहिलें होतें व त्यांचीं व्याख्यानें ऐकिलीं होतीं, तरी यांची व त्यांची प्रत्यक्ष भेट १९२० सालीं झाली. १९२५ सालीं या डॉ. ॲरंडेल यांचेसह युरोपांत गेल्या व तेथील समाजाची रचना व तेथील लोकांची कलोपासना यांचें सूक्ष्म निरीक्षण यांनीं केलें. यांना लहानपणापासूनच आर्यांची प्राचीन, साधी व उच्च राहणी याबद्दलचें प्रेम व आदर होता; व त्यांच्या ललितकलांचें पुनरुज्जीवन व्हावें अशी यांची महत्त्वाकांक्षा होती. फिरून १९३१-३४ या सालीं या डॉ. ॲरंडेल यांचेबरोबर युरोप व अमेरिका या देशांत प्रवासास गेल्या. त्या वेळीं यांनीं 'आर्यांची प्राचीन राहणी' व 'ललितकलांचें व्यक्तिगत, राष्ट्रीय व जागतिक विकासांतील स्थान' यांबद्दल व्याख्यानें दिलीं व तीं तिकडील लोकांना अतिशय आवडलीं. स. १९२६-२८ सालीं डॉ. ॲरंडेल हे ऑस्ट्रेलिया देशांत तेथील सोसायटीचे जनरल सेक्रेटरीचें काम करीत असतांना, सिडने या शहरीं यांचा व साभिनय नृत्यकलेंतील ( Ballet ) प्रावीण्याबद्दल जगद्विख्यात असलेल्या मॅडम पाव्हलोव्हा यांचा परिचय झाला व त्यांचेकडून यांनीं तद्विषयक शास्त्रीय माहिती संपादन करून अभ्यासहि केला. त्यानंतर १९३५ मध्यें हिंदुस्थानांत आल्यावर यांनीं दक्षिण हिंदुस्थानांत 'भारतनाट्य' या संज्ञेनें प्रसिद्ध असलेल्या नृत्यकलेच्या अभ्यासास सुरुवात केली; व त्याकरितां त्या बाजूचे सुप्रसिद्ध भारत-नाट्य-विद्वान् व कलाविशारद श्री. मीनाक्षीसुंदरम् पिल्ले व ब्रह्मश्री पापनाशम् शिवन् यांचे हाताखालीं सशास्त्र अध्ययन व अभ्यास केला. त्याच सालीं डिसें. १९३५ मध्यें अड्यार येथें थिऑसाफिकल सोसा. च्या हीरक-महोत्सवानिमित्त भरलेल्या राष्ट्रीय परिषदेंत यांनीं नृत्यकलेचा पहिला प्रयोग केला. तो लोकांना, कलाभिज्ञांना व सुशिक्षित मंडळींना फारच आवडला. त्या प्रसंगीं मद्रास शहरांतीलहि बरीच कलाभिज्ञ मंडळी हजर होती. वर्तमानपत्रांतूनहि यासंबंधीं उत्तम अभिप्राय आले. संगीत व नृत्य या कला खरोखर दैवी स्फूर्तीच्या असून, हीनवृत्तीच्या लोकांचे हातांत पडल्यामुळें त्यांचा अपकर्ष झाला आहे, त्यांना अध्यात्माच्या भूमिकेवर उभें करून पूर्वीच्या थोरवीच्या स्थानावर नेणें हें हिंदवासीयाचें आणि विशेषतः कुलीन स्त्रियांचें आद्यकर्तव्य आहे, अशा पवित्र भावनेनें त्यानंतर चिदंबरम् येथील नटराजांचे देवालयांत जाऊन यांनीं तेथें त्या कलेचा प्रयोग केला व आपली कला नटराजांचे चरणीं अर्पण केली. या वेळीं चिदंबरम् गांवांतील लोकांचा खूप समुदाय जमला होता. तेव्हांपासून या आपल्या प्रयोगाचे प्रसंगीं समोर नटराजांची मूर्ति ठेवून प्रयोग करतात. या नृत्यकलेचे प्रयोग यानंतर यांनीं हिंदुस्थानांत मुंबई, हैदराबाद ( द. ), कराची, इंदूर, बिकानेर, दिल्ली व बनारस वगैरे शहरीं अनेक वेळां केले आहेत. या कलेच्या अध्ययन व अध्यापनाकरितां यांनीं मद्रास, अड्यार, येथें 'कलाक्षेत्र' या नांवाची आंतरराष्ट्रीय संस्था काढली आहे; व चारपाच विद्यार्थिनीहि तयार केल्या आहेत. याच संस्थेंत चित्रकला, वीणकाम वगैरेहि कलांच्या अभ्यासाची सोय केली आहे. यांचे मतानें कलेचा अभ्यास हा मनुष्याचे शिक्षणास व शीलसंवर्धनास अत्यंत साहाय्यक आहे. यामुळें हल्लींच्या जगांतील सुप्रसिद्ध शिक्षणशास्त्रज्ञ मॅडम मॉंटसुरी ( ज्यांचा हल्लीं मुक्काम अड्यार मद्रासला आहे, ) या बाईशीं या सहकार्य करीत असतात.

थिऑसाफिकल सोसायटीचे विद्यमानें ब्लॅव्हॅटस्की

बाईनीं १८७५ सालीं अध्यात्माची मांडणी सुरू केली. त्यांनीं प्रथम धर्म, भौतिकशास्त्रें व तत्त्वज्ञान या तिहींचे समन्वयाची दिशा दाखविली. बेझंबाईनीं त्याच अध्यात्माचे भूमिकेवरून अनेक धर्माचा समन्वय दाखवून पुनः व्यवहारांतील राजकारण व समाजरचना यांची पुनर्घटना कशी करतां येईल याची दिशा दाखविली. मि. लेडबीटर यांनीं त्याच भूमिकेवरून भौतिकशास्त्रांचें व विशेषतः मानसशास्त्राचें संशोधन केलें. श्रीकृष्णमूर्ति हे अध्यात्मांतील व विशेषतः मानवजीवनांतील नित्य सत्तत्त्वांच्यावर भर देत आहेत. याप्रमाणें सोसायटीचे इतिहासांत अध्यात्माची चार तऱ्हांनीं मांडणी झाल्यावर यांची ही पांचवी मांडणी आहे. सौंदर्य व ललितकला यांचें दैवी उगमस्थान ओळखून व्यक्तिगत व सामाजिक जीवनांत, आध्यात्मिक दृष्टीनें, यांचें काय स्थान आहे हें दाखविणें हें यांचें जीवनकार्य होय. यांनाहि योगदीक्षा प्राप्त झालेली आहे ( वा. ल. चिपळूणकर ).

**ॲर्नाल्ड, सर एडविन**—( जन्म स. १८३२–मृत्यु स. १९०४ ) सुप्रसिद्ध इंग्रजी लेखक, कवि व पौर्वात्य लोकांचे मित्र असणारे युरोपियन गृहस्थ.

हे एम्. ए. झाल्यानंतर पुण्याच्या डेक्कन कॉलेजचे प्रिन्सिपल म्हणून यांची नेमणूक झाली ( १८५६–६१ ). या वेळीं बाह्य व अंतर्गत अशा दोन्ही दृष्टींनीं हिंदुस्थानचे परिशीलन करण्याची यांना संधि मिळाली.

याच वेळीं यांना बांबे युनिव्हर्सिटीनें आपले फेलो नेमिलें. तेव्हां यांनीं फार्शी–तुर्की वगैरे पौर्वात्य भाषांच्या अध्ययनास सुरुवात केली.

याच वेळीं यांनीं हितोपदेशाचें इंग्रजी भाषान्तर प्रसिद्ध केलें. तसेंच हिंदुस्थानांतील शिक्षणावरील–पूर्वेकडील ज्ञानाला पाश्चिमात्य ज्ञानाचे पैलू पाडण्याची आवश्यकता प्रतिपादणारी–एक पुस्तिका यांनीं प्रसिद्ध केली (१८६०). डलहौसीच्या कारकीर्दीचा एक सुसंबद्ध इतिहास यांनीं याच वेळीं लिहिला.

स. १८६१ मध्यें हे इंग्लंडला परतल्यावर ' डेली टेलिग्राफ'मध्यें लिहूं लागले. व पुढें त्या पत्राचे प्रमुख संपादक झाले ( १८७३ ).

या सर्व काळांत पौर्वात्य लोकांचें आयुष्य व विचारसरणी यांतील रसग्रहण हा आपल्या आयुष्याचा ध्रुवतारा मात्र यांनीं कधींहि दृष्टिआड होऊं दिला नाहीं.

नंतर यांनीं आपलें ' दि लाइट ऑफ एशिया ' हें बुद्धाविषयींचें जगप्रसिद्ध पुस्तक प्रसिद्ध केलें ( १८७९ ). त्याच्या इंग्लंडांत साठ व अमेरिकेंत ऐंशी आवृत्त्या निघाल्या. त्याप्रमाणेंच यांचें ' दि लाइट ऑफ दि वर्ल्ड ' हें ख्रिस्ताबद्दलचें पुस्तकसुद्धां फार प्रसिद्ध आहे (१८९१).

पुढें हे आपल्या मुलीसह पॅसिफिक किनारा व जपान वगैरेच्या प्रवासास निघाले. जपानी जीवनक्रम व कलादृष्टि यांमुळें हे फारच आकृष्ट झाले आणि हे पुनः एकदां जपानची सफर करून आले. जपानी आयुष्यासंबंधीं यांनीं लिहिलेला ग्रंथ सहिष्णु आणि आशावादी आहे. यांची तिसरी बायको जपानी होती.

हे ' डेली टेलिग्राफ ' पत्राचे संपादक असतांना ' न्यूयॉर्क हेरल्ड 'च्या सहकार्यानें यांनीं एच्. एफ्. स्टॅन्ले यांना कांगो प्रदेशाचें संशोधन करण्याकरितां आफ्रिकेंत पाठविलें होतें.

सबंध आफ्रिकेचा प्रवास करण्याकरितां एक अखंड मार्ग शोधून काढण्याच्या कल्पनेचें जनकत्वसुद्धां यांनाच दिलें पाहिजे.

सर्व जगांतील मोठमोठ्या कलात्मक व धार्मिक संस्कृतीच्या आकांक्षांचा समतोल अभ्यास करण्याचें यांचें सामर्थ्य केवळ अतुलनीय आहे. मुहम्मद, बुद्ध व ख्रिस्त या सर्वांच्या तत्त्वज्ञानाचा यांनीं अत्यंत तन्मयतेनें व हृदयाला जाऊन भिडणाऱ्या सहानुभूतीनें विचार केला आहे. त्यामुळें पश्चिम व पूर्व यांचा वैरभाव नष्ट करण्याच्या दृष्टीनें यांचें कार्य महत्त्वाचें आहे. पौर्वात्य लोकांनीं आपले जुने आचारविचार न सोडतां पाश्चिमात्य ज्ञानाचें स्वागत करावें असा यांच्या विचाराचा कटाक्ष असे.

यांचे ग्रंथः—(1) Pearls of the Faith, (2) With Sádi in the Garden, (3) The Secret of Death and other Poems, (4) The Song Celestial or Bhagawad Gita, (5) Poets of Greece, (6) Indian Idyls, (7) Lotus and Jewel, (8) Tenth Muse and other Poems, (9) Adzuma or the Japanese Wife, (10) Potephar's Wife and other Poems, (11) In My Lady's Praise, (12) Indian Poetry, (13) The Voyage of Ithobal, (14) Wandering Words, (15) Japonica, (16) Seas and Lands, (17) East and West, (18) India Revisited, (19) In Tent and Bangalow, (20) The Queen's Justice, etc.

**अलादियाखाँ**—( जन्म स. १८६० सुमार ).

सुप्रसिद्ध गायक. यांचे अडीचशें वर्षांपूर्वींचे पूर्वज शांडिल्यगोत्री ब्राह्मण होते. परंतु अन्नदात्याबरील संकट टाळण्याचे कारवाईंत जबरीनें त्यांचें धर्मान्तर झालें. यांच्या गायकीप्रमाणेंच यांच्या आचारविचारांतसुद्धां मुसलमान गवयांत सहसा दिसून न येणारा असा गंभीर प्रतिष्ठितपणा आहे.

ओतप्रोत विद्या असूनहि वल्गना नाहीं, असामान्य कर्तबगारी असूनहि इतरांच्या अल्प कर्तबगारीला उत्तेजन देण्याची वृत्ति, कोणाची स्तुति नाहीं, निंदा तर नाहींच नाहीं. घराण्याच्या विद्येची यत्किंचित्हि अप्रतिष्ठा होऊं न देण्याचा पराकाष्ठेचा कटाक्ष, पूर्णपणें निर्व्यसनीपणा इत्यादि गुणांमुळें आज अर्धशतकभर गायकसम्राट व चारित्र्यसम्राट् अशी यांनी कीर्ति संपादन केली आहे.

यांच्या गायनाचें बाह्यांगवर्णन करावयाचें म्हणजे गायनाच्या वेळची यांची आसन व मुद्रा सांगावयाची. गातांना यांची मुद्रा कधींहि विकृत होत नाहीं. यांच्या गायकींतील विलक्षण बिकट प्रकार पाहिले म्हणजे यांच्या अढळ व शुद्ध मुद्रेचें नवल वाटतें. तसेंच यांचे हातवारे, तानेची किंवा आलापांची मांडणी व लयीबरोबर होणाऱ्या बोलांच्या लीला श्रोत्यांना अधिक स्पष्टपणें विशद व्हाव्यात याकरितां असतात. बहुतेक गवयांचे हातवारे प्रयासाचे द्योतक असतात, तर यांचे हातवारे कलेची मांडणी दाखविणारे असतात.

यांचा आवाज रुंद व बसकट म्हणजे सर्वसामान्य नादलुब्धांना झुलविण्याची शक्ति नसलेला आहे. इतकें असूनहि मुष्कील रागांत, मुष्कील फिरत करणारा, अत्यंत धीम्या लयींत दोन दोन आवर्तनें फिरून यत्किंचित्हि मुद्रा किंवा आसनभंग न करितां अत्यंत सहजपणें समेचा व चिजेच्या तोंडाचा सुंदर संगम साधणारा गायक महाराष्ट्रांत यांच्याशिवाय दुसरा कोणीहि नाहीं.

यांच्या गायकीचें स्थूल स्वरूप असें दिसतें कीं, बहुत करून हे अप्रसिद्ध व मुष्कील राग गातात. कोणतीहि चीज हे इतक्या संथपणें सुरू करतात कीं कोणत्या सुरावरून हे कोणत्या सुरावर गेले हें तज्ज्ञांच्या सहज लक्षांत येतें. पण एकदां पुढें कामगत सुरू झाली कीं, त्यांतील कौशल्याकडे लक्ष वेधतें आणि पूर्वीचें अवधान सर्व उडून जातें आणि जागरूक श्रोताहि कोरडाच राहतो. एक रागिणी संपून नवी सुरू झाली म्हणजे जुन्या चीजेची रूपरेषा पार पुसून जाते. श्रोत्यांना हे आपल्या गायकीच्या झोतांत ओढून नेतात. विचार किंवा संग्रह याला श्रोता पारखा होतो; आणि हें सर्व फिरत कामांत व्हावयाचें. कोणी बढत व कोणी फिरत करून राग वर्तवणारे असे गवयांत दोन प्रकार असतात, त्यांत बिकट फिरतींत सफाईनें राग वर्तवणें हें यांचें वैशिष्ट्य आहे.

तसेंच यांचें गायन सतत-प्रवाही आहे. स्वर, ताल किंवा अलंकार साधण्याकरितां यांना मुद्दाम मुक्काम करण्याचें किंवा रेंगाळण्याचें कामच पडत नाहीं. कुशल मोडी लेखकाचा टाक एकदां कागदाला लागला म्हणजे हात न उचलतां तो वाक्य संपवितो, तीच गोष्ट यांच्या विस्तारकौशल्याची आहे. कल्पनेंत येईल तें कंठांत उमटविण्याची शक्ति यांच्यांत आहे. यांची कल्पकताहि अचाट असल्यानें यांचें गायन अश्रुतपूर्व होतें.

तसेंच यांचें गायन एकजात भरदार असतें. त्यात कृत्रिमपणा बिलकुल नसतो. तार-सप्तकांतील स्वरसुद्धां तिनवयाच खुल्या आवाजानें लावावयाचे. आक्रोश, किंचाळणें वगैरे प्रकार कोठेंहि आढळत नाहींत. तानेंत आघात दिसतात ते तानेची विशिष्ट आकृति श्रोत्यांना नीट आकलन व्हावी म्हणून असतात. तसेंच रागाचें स्वरूप तयारीच्या बिकट फिरतींतहि अत्यंत कसोशीनें संभाळणारा गायक यांच्याशिवाय जवळजवळ नाहींच. कोणताहि मुष्कील राग हे सहज गातात. त्याची मांडणी स्पष्ट करतात. दीर्घकाल शिक्षणावाचून यांची गायकी हस्तगत होणें अशक्य आहे.

हे मुंबई, पुणें वगैरे ठिकाणी राहून शेवटीं कै. शाहू-महाराजांच्या वेळेपासून कोल्हापूर सरकारचे आश्रित आहेत.

यांच्या शिष्यांत कै. भास्करबुवा बखले, यांचे पुत्र मरहूम मंजीखाँ, मल्लिकार्जुन, मन्सूर, नथ्थनखाँ, श्री. शंकरराव सरनाईक, निवृत्तिबुवा सरनाईक, गोविंदराव टेंबे व बुर्जीखाँ ( पुत्र ) हे असून श्रेष्ठ गायिका केसरबाई केरकर व मोगूबाई कुरडीकर ही मंडळी नांव गाजवीत आहेत. श्री. शंकरराव सरनाईक यांनीं यांचा गंडा दहा हजार रुपये देऊन बांधला. पण निवृत्तिबुवा मात्र यांचें गाणें गातात.

कोल्हापूरच्या महाराणीसाहेबांचे अध्यक्षतेखालीं यांचा सत्कार होऊन कोल्हापुरास यांना मोठ्या समारंभानें एक हजार रुपयांची थैली अर्पण करण्यात आली.

**अलीनगरचा फकीर**—( जन्म स. १८८० सुमार ) वायव्य सरहद्दीवरील रॉबिनहुड म्हणून याची प्रसिद्धि आहे. हा काळा कां गोरा हें अद्यापि ब्रिटिश हेरांना माहित झालें नाहीं. पण गेलीं तीस वर्षे याचा उपद्रव ब्रिटिशांना होत आहे. हा सहा फुटांहून अधिक उंच असून याचा वेष म्हणजे उंटाच्या केसाचा एक सॅश, टोगा व बकऱ्याच्या कातड्याचें जीन हा असतो. याच्या सैनिकांचा हाच गणवेष आहे.

खैबर खिंडींतील एका उंटहाक्याचा हा पोरगा आहे. हा पेशावरच्या बाजारांत प्रथम हमालाचें काम करीत असे. नंतर पर्वतावर जाऊन धनगर बनण्याचें यानें ठरविलें व सुलेमान पर्वतावर जाऊन तेथें एका गुहेंत हा राहूं लागला. आणि यानें बुवाबाजीस आरंभ केला. केवळ याच्या हस्तस्पर्शानें रोग बरे होतात अशी याची ख्याति झाली. धर्मभोळे टोळीवाले याचे परमभक्त बनले. मेढ्याचा कातडी पांघरावींत व ब्लँकेटाऐवजीं गवताचा उपयोग करावा असा तेथील खाक्या होता.

शिष्यशाखा भरपूर व लांबपर्यंत वाढली. प्रवचनांचें धार्मिक स्वरूप राजकारणांत रूपांतरित झालें आणि महत्त्वाकांक्षाहि जागृत झाली.

शिष्यांना बंदूक चालविण्यास शिकवून डोंगराळ प्रदेशांतील युद्धतंत्रांत यांनीं तरबेज केलें. यांनी आपल्या अनुयायांस बंदुका पुरविल्या. त्यांपैकीं कांहीं रशियन होत्या व कांहीं काबूलच्या कारखान्यांत तयार झालेल्या होत्या.

पेशावरला असतां ब्रिटिश लष्कराशीं संबंध आला असतां जेवढें लष्करी शिक्षण यांना मिळालें तेवढेंच. पण तेवढ्या जोरावर यांनी इतर टोळीवाल्यांतहि प्रमुखत्व मिळविलें. एवढेंच नव्हे, तर ब्रिटिश लष्कराशीं कटकटी करून त्यांनाहि हैराण केलें. जाळपोळ, रक्तपात याला तर सीमा राहिली नाहीं.

हा ब्रिटिशांच्या मुलुखांत कहर करीत असला तरी व्यक्तिशः मोठा दयाळु आहे. दारू नाहीं, धूम्रपान व जुव्वा खेळणारेहि याला सहन होत नाहींत ( केसरी १३ फेब्रु. ४० ).

**अली हाजी**—( जन्म स. १८९७ सुमार ) एक साधु म्हणून मानला जाणारा बंडखोर पठाण. हाच 'इप्पीचा फकीर' या नांवानें प्रसिद्ध आहे. याच्या पित्याचें नांव मुल्ला अर्सलाखान. हा मूळचा बन्नू जिल्ह्यांतील खजूरी गांवचा होय. हा आपल्या शेर झमान नामक भावाबरोबर इप्पी ( मिराली तहशील, उत्तर वझिरीस्तान ) या गांवीं मुल्ला अलमखान याकडे धार्मिक शिक्षण घेण्याकरितां गेला ( १९२० ). तेथें शिक्षण घेतल्यावर याची धार्मिक म्हणून प्रसिद्धि झाली. आणि तेथील 'दवार' व 'तोरी खेल' जमातींकडून याला विशेष आदर दाखविला जाऊं लागला. 'शुकराना' नांवाची यानें एक मोठी धार्मिक देणगी नाकारली, तेव्हांपासून तर याची मान्यता फारच वाढत चालली. विरक्तपणा, सेवा आणि लढाऊ बाणा यांमुळें याची योग्यता वाढत जाऊन 'लढवय्या साधु' व 'इप्पीचा फकीर' अशा नांवानें आज याला लोक ओळखतात.

स. १९३६ पर्यंत हा कोणत्याहि राजकारणांत पडला नव्हता. पण 'इस्लाम बिबी' नांवानें प्रसिद्ध असलेल्या बन्नू येथील खटल्यामुळें याचें पित्त भडकलें. हिंदूची पळवून नेलेली व निका लावलेली स्त्री परत हिंदु होते किंवा नाहीं, आणि आपल्या घरीं जाऊन राहूं शकते किंवा नाहीं, असा या खटल्यांत मुद्दा होता. मुसलमान धर्माप्रमाणे ती परत जाऊं शकत नाहीं, असें या लोकांचें म्हणणें होतें. यामुळें तिकडच्या सर्व जिल्ह्यांत तीव्र जातीय असंतोष माजला. यानें त्या चळवळींत पुढाकार घेतला आणि शेवटीं ब्रिटिशांचें शत्रुत्व पत्करण्याचेंहि यानें ठरविलें. आणि सैन्य घेऊन हा जवळच्या दरींत येऊन राहिला.

तेथील अधिकाऱ्यानें या खटल्याबाबत समजुतीचें बोलणें केलें व कांहीं मुल्लांना खटल्याचे वेळीं कोर्टांत हजर राहण्याची सवलत दिली. पण यानें लाहोरची शहीदगंज मशीद मुसलमानांना परत देणें, वरील खटल्याचा निकाल मुसलमानांच्या वतीनें देणें आणि धार्मिक प्रश्नांत सरकारनें हात न घालणें अशा तीन अटी घातल्या व या अटी पुऱ्या होत नाहींत तोंपर्यंत सैन्य मागें घेतलें जाणार नाहीं असें यानें ठरविलें.

तेव्हां सरकारनेहि सूचना देऊन याचें व याच्या दोन सहकाऱ्यांचीं घरें उध्वस्त केलीं. आणि सैन्याची हालचाल सुरू केली. तेव्हां याचें सैन्य निघून गेलें. पण 'इस्लाम बिबी' खटल्यांतील मुलगी तिच्या पालकाच्या ताब्यांत देण्याच्या वेळीं यानें पुनः उठाव केला. तेव्हां लष्कर व विमानें यांच्या जोरावर याच्या तुकडीला शरण आणावें लागलें. पुनः स. १९३७

सालींहि यानें ब्रि. सरकारला हात दाखविण्याचें ठरवून सर्व टोळ्यांना उठावणी दिली आणि दंगल सुरू केली. हल्ले, तारा तोडणें वगैरे प्रकार सुरू झाले. पण ब्रिटिशांच्या प्रचंड सामर्थ्यापुढें याला व याच्या अनुयायांना डोंगरांत अदृश्य व्हावें लागलें. विमानांनीं केलेल्या बाँब-वर्षावामुळें याची दाणादाण उडाली.

हा खंदा घोडेस्वार व पट्टीचा निशाणबाज आहे. वाऱ्याप्रमाणें याच्या भराऱ्या चालू असतात. रंगलेले लाल केस, फुगीर अंगरखा व पोत्यासारखी पायघोळ विजार अशा वर्णनाचा हा व्यक्ति आहे, असें कांहीं म्हणतात. कांहींच्या मतें हा एक रोगी मनुष्य आहे. ब्रिटिशांच्या हेरखात्याला याचा अद्याप नीट पत्ता नाहीं असें कांहीं म्हणतात. हा अदृश्य होतो, आकाशांत उडतो वगैरे पठाणांच्या याच्याबद्दल कल्पना आहेत ( अमृतबझारपत्रिका १३/६, केसरी १३२/४८ ).

**अल्लाबक्ष**—( जन्म स. १९००-खून स. १९४३ ). राष्ट्रीय सभेच्या अनुयायांपैकीं सिंध प्रांताचे पुढारी व मुख्य प्रधान.

जिनांच्या पाकिस्तानी कल्पनेचा प्रचार व प्रसार जारीनें सुरू झाल्यापासून खुद्द मुसलमानांतच ज्या कांहीं व्यक्ति त्या कल्पनेला विरोध करीत असत त्यांपैकीं सिंध प्रांताचे कांहीं काळाचे मुख्य प्रधान असणारे हे एक होते.

हे सिंधमधील शिकारपूर या गांवाचे एक मोठे जमीनदार असून यांचें आपल्या भागांत अतिशय वजन असे. सिंधु नदीच्या पुरामुळें झालेल्या नुकसानीच्या काळांत पैशाचे व श्रमाचेबद्दल फिकीर न करतां आपल्या देशबांधवांची सेवा यांनीं अनेक वेळां केली होती. त्यामुळें लोकांचा यांचेवर अतोनात विश्वास असे. येवढेंच नव्हे तर साऱ्या सिंध प्रांताच्या आर्थिक परिस्थितीचा यांचा अभ्यास अतिशय सखोल असल्यामुळे सिंध स्वतंत्र झाल्यावर त्या प्रांताच्या राजकारणांत यांना फार महत्त्व प्राप्त झालें होतें. आपल्या प्रांताची आर्थिक परिस्थिति, ती सुधारण्याचे उपाय यांवरील एक अधिकारी व्यक्ति म्हणून यांचा नेहमीं उल्लेख होत असे. कराची शहराच्या पाणी पुरवठ्याबाबत यांनीं केलेली योजना मध्यवर्ती सरकारला इतकी पटली होती कीं, लगेच ती योजना हातीं घेण्यासाठीं सरकारनें बरीच मोठी रक्कम यांचे हवालीं केली होती. यावरून हें सिद्ध होतें कीं केवळ एक मुसलमान धनाढ्य जमीनदार म्हणून हे मुख्य प्रधानपदावर आले नव्हते तर केवळ आपल्या लायकीच्या जोरावर आले होते.

मुख्य प्रधान होतांच यांचेपुढें एक कटु कर्तव्य उभें राहिलें होतें. तें कर्तव्य म्हणजे हूरांच्या बंडाचा निःपात होय. ते पार पाडतांना प्रसंगीं यांनीं जी न्यायनिष्ठुरता दाखवली होती तिच्यामुळें यांना आपल्या अनेक ज्ञातिबांधवांचा कोप आपणावर ओढवून घ्यावा लागला होता.

युद्ध सुरू झाल्यावर सात प्रांतांतील कॉंग्रेस मंत्रिमंडळांनीं राजीनामे दिल्यामुळें त्या त्या प्रांताचा कारभार गव्हर्नरांनीं आपल्या ताब्यांत घेतलाच होता. पण जेथें प्रत्यक्ष लोकनियुक्त मंत्री काम करीत होते त्यांच्या अधिकारावरहि बरीच कात्री लावण्यांत येऊं लागल्याची ते ते मंत्री तक्रार करूं लागले. गव्हर्नरांच्या या वागणुकीमुळें चिडून जाऊन यांनीं आपल्या पदव्या सरकारला परत केल्या व सरकारचा निषेध केला. या यांच्या कृत्यामुळें आपल्या मंत्र्यावर आपला यापुढें विश्वास नाहीं, या सबबीवर सिंधच्या गव्हर्नरांनीं यांना मुख्य प्रधानकीचा राजीनामा देणें भाग पाडलें.

राजीनाम्यानंतर हे शिकारपूर या गांवीं येऊन राहूं लागले. तेथेंच यांचा ता. १४ मे १९४३ रोजीं खून करण्यांत आला.

यांच्या खुनाच्या मुळाशीं खासगी स्पर्धा होती किंवा इतर कांहीं कारण होतें त्याचा अद्यापि निर्णय लागला नाहीं.

**अल्लामा मश्रीकी**—( जन्म स. १८८८ ) मुसलमानांचे पुढारी व खाकसार चळवळीचे जनक. यांचें नांव इनायतुल्ला. पण 'प्राच्य-पंडित' अशा अर्थाच्या 'अल्लामा मश्रीकी' या नांवानें हे प्रसिद्ध आहेत.

हे पंजाबचे एम. ए., केम्ब्रिजचे बी. एससी., रँग्लर, सन्मान्य ट्रॉयपास मिळविलेले व मास्टर ऑफ ओरिएंटल लार्निंग ही केंब्रिजची परीक्षाहि उत्तीर्ण झालेले आहेत. गणिती व भाषाशास्त्री असे दुहेरी पंडित म्हणून यांची ख्याति आहे. म्हणूनच पेशावरच्या इस्लामिया कॉलेजचे प्रिन्सिपल व हिंदुस्थान सरकारच्या शिक्षणखात्याचे दुय्यम सेक्रेटरीच्या जागेपर्यंत हे चढले. पण यांची तळमळ वेगळीच असल्यानें यांना हायस्कूलच्या हेडमास्तरच्या जागेवर लोटण्यांत आलें. तेव्हां यांनीं सरकारी नोकरी सोडून सरहद्द प्रांत सोडला आणि पंजाबांत वास्तव्य केलें आणि १९३१ त आपली खाक-

सार चळवळ सुरू केली. खाकसारांचे हे आद्यसंस्थापक म्हणून यांना ' बानी ' असें म्हणतात.

यांनी ' तज्करा ' या ग्रंथांत कुराणावर टीका लिहिली असून कुराणाचें तत्त्वज्ञान अगदीं नव्या दृष्टिकोनानें यांत परीक्षिलें आहे. इजिप्त, इराक, इराण, तुर्कस्थान व मोरक्को इत्यादि सर्व ठिकाणीं या ग्रंथाची स्तुति झाली आहे. १९२५ मध्यें सर अफ़-ताब मुहम्मद यांनीं हा ग्रंथ ' नोबल प्राइझ ' कमेटीला सादर केला. परंतु उर्दू ही मान्यता पावलेली भाषा नसल्यानें एखाद्या युरोपीय भाषेंत भाषांतर करण्याची यांना विनंती करण्यांत आली. यांनीं ही गोष्ट नाकारल्यानें केंब्रिजचे प्रो. निकोल्सन यांनीं भाषांतराचें काम केलें; परंतु शेवटीं " मला काय म्हणावयाचें तें यांत आलें नाहीं " अशी तक्रार यांनीं केल्यानें याचें हें काम तसेंच राहिलें. या ग्रंथानें यांची विद्वत्ता लोकांचे निदर्शनास आली व धार्मिक मुसलमानांतील यांची प्रतिष्ठा तर फारच वाढली.

' तज्करात ' या ग्रंथाला मिळालेल्या अपूर्व यशानें उत्तेजित होऊन १९३१ त यांनीं ' इष्करात ' हा आपला दुसरा ग्रंथ प्रसिद्ध केला. या ग्रंथांतसुद्धां कुराणाकडे आपल्या एका विशिष्ट दृष्टिकोनांतून यांनी बघितलें आहे. या पुस्तकात हिटलरच्या ' माझ्या लढ्यां 'तील कांहीं भागांचा अनुवाद देण्यांत आलेला आहे. ' माझ्या लढ्यां 'त हिटलरनें प्रसृत केलेल्या कल्पना त्याचे आधीं आपण आपल्या ' तज्करात 'मध्यें मांडल्या होत्या असें यांत यांनी दाखविलें आहे. याच्या मताप्रमाणें 'तज्करात' व ' इष्करात ' या दोन ग्रंथात यांनीं मांडलेल्या कल्पनांत नवीन असें कांहींच नाहीं. यांनीं फक्त कुराणातील कल्पनांना नवीन काळाचा नवीन साज चढविला आहे इतकेंच.

खाकसार चळवळीकरितां यांनीं निवडलेला काळ व सुरवातीला योजलेलें धोरण हें नाझी चळवळीच्या तत्सम धोरणाशीं जुळणारें आहे.

खाकसार चळवळीचे सुरवातीला यांनीं कांग्रेसवर हल्ला सुरु केला. मात्र मुस्लीम लीगप्रमाणें ' हिंदूंचे हित संरक्षण करणारी संस्था ' हा यांचा कांग्रेसवर आरोप नव्हता, तर कांग्रेसनें उपयोजिलेलें तत्त्वज्ञान हें हिंदु तत्त्वज्ञान आहे अशी यांनीं ओरड चालवली आणि अपेक्षेप्रमाणें हजारों मुसलमान तरुण यांचे छत्राखाली जमूं लागले. कारण मुसलमान तरुण धर्माचे बाबतींत फारच भावनाप्रधान असतात, हें यांना अनुभवावरून माहीत होतें.

याचेच पुढें जाऊन आपल्या चळवळींत येणाऱ्या लोकांना यांनीं दर्जा, मिलटरी परेड, देवावरील श्रद्धा, जमावांतील प्रार्थना, या गोष्टी आवश्यक ठरविल्या. त्यामुळें मुसलमान तरुणांच्या तर यांचेवर नुसत्या उड्या पडल्या.

यांतच यांनीं केलेल्या ' सर्वसंगपरित्यागा 'ची भर पडली. एवढा विद्वान् मनुष्य आपली सर्व मिळकत दूर फेंकून एखाद्या फकीराप्रमाणें राहतो ही एकच गोष्ट लोकांचे गळ्यातील हे ताईत होऊन राहण्यास पुरेशी होती.

खाकसार चळवळ ही एकचालकानुवर्तित्व मानणारी संस्था आहे. परंतु हा बंधुभाव, प्रेम व स्वातंत्र्य या भावनांनीं प्रत्येकानें आपणहून आपणावर लादून घेतलेलें आहे.

या चळवळींत ' जनबाझ ' या नांवाचें वाटेल त्या वेळीं आपला प्राण अर्पण करण्यास तयार असणाऱ्या लोकांचें एक स्वतंत्र दल असतें. याची संख्या १३००० असून खाकसार व सरकार याचे लढ्यात यांनीं अत्यंत महत्त्वाचा भाग घेतलेला आहे. हे लोक पाहून आपणांस ' आयर्न गार्डस् 'चीच आठवण व्हावी इतकें यांच्या कार्याचें महत्त्व आहे.

एकंदरीत पाहता खाकसार-चळवळीची मांडणी अशाच पद्धतीनें करण्यांत आली आहे कीं, मुख्य मनुष्याच्या हुकुमाच्या उच्चाराबरोबर तें कार्य व्हावें.

खाकसारांचें स्वतःचें कोर्ट आहे आणि चाबूक हें या कोर्टाचें हत्यार आहे. या कोर्टाच्या हुकुमाप्रमाणें चाबकाची शिक्षा आरोपीला भरचौकांत दिल्याचीं उदाहरणें घडलेलीं आहेत.

शारीरिकदृष्ट्या असजारा कमकुवतपणा नाहींसा करण्याचा ' मिलटरी-परेड ' हाच एक मार्ग यांनीं सुचविला आहे. या कवाइती, लोकांच्या उद्योगधंद्यांत येऊं नयेत म्हणून रात्रीच्या वेळीं घेण्यांत येतात.

' फावडें ' ( बेलचा ) हे खाकसारांचें बोधचिन्ह आहे. कष्ट करणाऱ्या खालच्या वर्गाशीं आपले असणारे संबंध या बोधचिन्हानें दाखवले जातात, असें यांचें म्हणणें आहे. स्वतः पैगंबर मुहम्मदानें या फावड्याचा पुरस्कार केला आहे, असें यांचें म्हणणें आहे. त्याचप्रमाणें सर्व खाकसारांत बंधुभाव राहण्यास या फावड्याची मदत होते, असा यांचा दावा आहे.

मुहंमद पैगंबर व देव यांचे सैनिक होणें हें खाकसारांचें प्रधान ध्येय आहे. लष्करी शक्तीची उभारणी, खोट्या लढाया, या सगळ्या गोष्टी आपल्या भूतकाळाशीं शक्य तितकें जवळ जाण्याच्या आंतरिक इच्छेतून उत्पन्न झालेल्या आहेत. लष्करी शिक्षण हें प्रत्येक खाकसाराचे मनावर बिंबविण्याचा आटोकाट प्रयत्न करण्यांत येतो. यांची प्रत्येक हालचाल व धोरण हीं लढाऊ धोरणांतून उत्पन्न झालेलीं असतात. युद्धाचे नियम, लढाईकरतां लागणारी शक्ति व शिस्तीचे कठोर धडे ह्या गोष्टी प्रत्येक खाकसाराचे रोमारोमांतून भिनलेल्या असाव्यात असा यांचा कटाक्ष आहे. हुकूमशाही करणारा शिपाई हें खाकसाराचें खरें वर्णन नसून प्रसंग आला असतां राज्य चालवू शकणारा मुत्सद्दी शिपाई हे शब्द खाकसाराला अधिक शोभून दिसतात.

लखनौच्या शिया-सुनी पंथीयांत 'मधे साहेबा' व 'तबारा' या प्रार्थनाप्रकारांबाबत खळबळ चालू होती. तेव्हां गोर्डागुलावींत ते आपलें भांडण थांबवीत नाहींत असें दिसतांच हे आपलें सैन्य घेऊन तेथें शिरले. परंतु यू. पी. गव्हर्नमेंटनें यांना अटक केली. तेव्हां 'सोडलें असतां परत लखनौमध्यें मी येणार नाहीं' अशा अटीवर यांना सोडून देण्यांत आलें. परंतु बाहेर आल्यावर 'आपण अशा कोणत्याहि प्रकारच्या मार्गावर सुटलों नसून आपणास सरकारनें बिनशर्त सोडलें आहे' असें हे सांगू लागले. व तसें 'अल इस्लाह' या आपल्या पक्षाच्या मुखपत्रांत यांनीं प्रसिद्ध केलें.

परंतु अशा वागण्यानें यांचे वजन जें कमी झालें तें भरून काढण्याकरतां १९३९ सालीं हे परत सैन्य लखनौला गेले. परंतु परत यांना अटक करण्यांत आली. त्याबरोबर हजारों खाकसार निरनिराळ्या प्रांतांतून येऊं लागले. बऱ्याच खटक्यानंतर यांस अटक करण्यांत आली. अशा खटक्यांत हिंदान नदीवर झालेली चकमक विशेष गंभीर स्वरूपाची होती.

बॅ. जिनांनीं सरकार व हे यांमध्यें तडजोड करण्याचे प्रयत्न केले. परंतु जिनांची केवळ भेट घेण्याचेंहि यांनीं नाकारिलें.

काँग्रेस मंत्रीमंडळानें राजीनामा दिल्यावर नवीन आलेल्या मंत्रीमंडळानें यांना सोडून दिलें. परंतु नवीन आलेल्या सर सिकंदर हयातखानांच्या मंत्रीमंडळाशींहि यांचें विशेषसें सख्य नव्हतें. कारण सरकारची तळी तनमनधनानें उचलून धरणें ही गोष्ट सर सिकंदरांप्रमाणें यांना जमण्यासारखी नव्हती. याच कारणाकरितां पंजाब सरकारनें मिलटरी धर्तीवर चालणाऱ्या चळवळींवर निर्बंध घालतांच यांनीं आपल्या 'अल-इस्लाह' पत्रांतून जोराचा हल्ला केला व पंजाब सरकारशीं तंटा करण्याची आपल्या ३०००० अनुयायांना आज्ञा दिली.

थोड्याच दिवसांत हा प्रसंग येऊन ठेपला. आपल्या मिलटरी वेषांत ३१७ खाकसार पुढारी आपल्या सैन्यासह परेड करूं लागले. ही गोष्ट सरकारी हुकुमाचे विरुद्ध असल्यानें त्यांवर गोळीबार करण्यांत आला. त्यांत ३२ खाकसार ठार व १४ जखमी झाले.

ताबडतोब हे व ह्यांचे अनेक सहकारी यांना अटक करण्यांत आली. यांना वेलोर सेन्ट्रल जेलमध्यें नेण्यांत आलें. १९४४ च्या सुरवातीपर्यंत हे या तुरुंगांतच होते. त्यानंतर मात्र यांना मद्रास प्रांतात स्थानबद्ध करून ठेवण्यांत आलें.

या कृत्यानें सर सिकंदर यांचें मंत्रीमंडळ मात्र डगमगूं लागलें. मुस्लीम लीग व खाकसार यांमध्यें काडीइतकेंहि प्रेम नसतां बॅ. जिनांनीं मोठ्या हुषारीनें यांच्यावर करण्यांत आलेल्या अत्याचाराबाबत दुःख प्रदर्शित करून चौकशी कमेटी नेमण्याची विनंती केली. पण यांचा बाणा स्वतंत्र असल्यानें कोणापुढेंहि हे मान वाकविणारे नाहींत. यांच्या विचाराची दिशा स्वतंत्र असून कोणतीहि गोष्ट आपल्या संघटनेच्या जोरावर घडवून आणण्याची यांना हिंमत आहे. त्यामुळें यांचे बोलणें हुकमी चाललेलें असतें (अल्लामा मश्रीकी-लेखक हिरालाल शेठ).

**अ‍ॅन्ड्रूज, दीनबंधु, चार्लस् फ्रीअर**—(जन्म स. १८७१-मृत्यु स. १९४० एप्रिल ५).

हिंदुस्थानाशीं संबंध असलेले सुप्रसिद्ध ख्रिश्चन मिशनरी व रवीन्द्रनाथ टागोर यांनीं स्थापन केलेल्या विश्वभारती-विद्यालयांतील प्राध्यापक.

यांचें शिक्षण बर्मिंगहॅम व केंब्रिज येथें झालें, व तेथेंच हे फेलो व लेक्चरर होते (स. १८९९). त्यानंतर हे हिंदुस्थानांत येऊन दिल्लीच्या सेंट स्टिफन्स कॉलेजमध्यें प्रोफेसर झाले.

केंब्रिज युनिव्हर्सिटीच्या प्रदरहूडचे सभासद, पंजाब युनिव्हर्सिटींतील फेलो व नंतर युनिव्हर्सिटी सिंडिकेटचे सभासद म्हणून यांनीं केलेली कामगिरी महत्त्वाची आहे (स. १९०४-१३). यानंतर मृत्यूपर्यंत हे विश्वभारतीमध्यें प्राध्यापक होते.

महात्मा गांधींशीं यांचा अत्यंत जिव्हाळ्याचा संबंध होता. आफ्रिका व चंपारण्य येथील चळवळींत (१९१७) यांनीं त्यांना सर्व प्रकारें मदत केली होती. आफ्रिकेंत म. गांधी वगैरे लोक पकडले तेव्हां ना. गोखले यांनीं यांना आफ्रिकेंत पाठविलें. त्यापूर्वी लाहोरच्या सभेंत यांनीं आपलें सर्व द्रव्य आफ्रिकेच्या लढ्यास दिलें होतें ( १९१३ ). पंजाब प्रकरणाच्या वेळीं यांना हद्दपार करण्यांत आलें होतें ( १९१९ ).

यांच्या रंजले-गांजलेल्यांना तत्परतेनें मदत करण्याच्या स्वभावामुळें यांना 'दीनबंधु' अशी पदवी लोकांनीं स्वयंस्फूर्तीनें दिली होती.

यांनीं आपलें आत्मचरित्र लिहिलें आहे. त्याचें नांव 'व्हॉट आय ओ टु ख्राइस्ट'. त्यांत यांना आपणास झालेला साक्षात्कार व आपला व हिंदुस्थानचा आलेला संबंध यांसंबंधी सविस्तर विवेचन केलेलें आहे.

वयाच्या तेहेतिसाव्या वर्षी यांच्या मनात असाध्य रोग, मरणोन्मुखाचे अखेरचे शब्द व मरण यांसंबंधीचे विचार घोळत असत. तेव्हां यांना एकदा साक्षात्कार झाला व लिटल सेंट मेरी चर्चच्या उपाध्यायाच्या आकृतीचें दर्शन घडलें.

येशू ख्रिस्ताची इहलोकची यात्रा तेहेतिसाव्या वर्षीच संपली. तो गेल्यानंतर राहिलेलें पुढील कार्य आपणास करावयाचें आहे अशी यांची भावना केम्ब्रिज येथील डॉ. रायले यांच्या उपदेशानें झाली. ते कार्य आपण हिंदुस्थानांत करावें अशी प्रेरणा यांना झाली. त्याप्रमाणें हे हिंदुस्थानांत आले. हिंदुस्थानात येतांच यांना आपला पुनर्जन्म झाल्याची खात्री पटली.

येशू ख्रिस्त हा देवाचा मुलगा आहे, स्वर्गाचें साम्राज्य त्याच्या हृदयांत असतें. तो जगावर सत्ता चालवितो, मनुष्यप्राणी हा त्याच्यापेक्षां अगदीं वेगळा आहे, आणि तो हीनदीन पापी आहे अशी एकंदर सर्वत्र समजूत असते. ईश्वराचा व मनुष्यप्राण्याचा कांहींहि संबंध नाहीं. ईश्वर म्हणजे एक अद्भुत किमया आहे अशी ईश्वरविषयक अगदीं परकेपणाची पाश्चिमात्य कल्पना यांना माहीत होती.

पण हिंदुस्थानात यांना अगदीं उलट अनुभव आला. येथें प्रत्येकाची ईश्वर बाहेर दुसरीकडे नसून तो माझ्या हृदयांतच आहे अशी खात्री असल्याचा यांना प्रत्यय आला. 'दि किंगडम ऑफ हेवन इज विदिन यू' ईश्वर बाहेर कोठें नसून तो तुझ्या अन्तःकरणांतच आहे, ही ईश्वरविषयक भावना हिंदुस्थानांतील प्रत्येक माणसांत पूर्णपणें बाणलेली आहे. अत्यंत अडाणी व अशिक्षित असणाऱ्या खेडवळापासून तों मोठ्या तत्त्वज्ञापर्यंत या अद्वैत भावनेंत कोठेंहि फरक नाहीं. याच भावनेनें येथील लोक प्रत्येक व्यवहार करीत असतात. हें पाहून यांना अत्यंत चमत्कार वाटला. आपण आजपर्यंत अज्ञात पण ईश्वरमय अशा नव्याच जगांत प्रवेश करतों आहोंत असें यांना वाटलें आणि यांनीं हा आपला पुनर्जन्म झाला असें समजून आपणास द्विज म्हणवून घेतलें, आणि विचाराच्या दृष्टीनें अगदीं नव्या जगांत आल्याबद्दल यांना अत्यंत समाधान वाटलें.

तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें अगदीं नव्या जगांत, हिंदुस्थानांत येऊन यांनीं प्रवेश केला तरी हे पक्के ख्रिस्ताचे भक्त होते. जगांत बुद्ध वगैरे थोर धर्मसंस्थापक झाल्याचें यांना चांगलें माहीत होतें तरी ख्रिस्ताविषयींची मोहिनी यांच्या मनावरून कधींहि कमी झाली नाहीं. त्यानें धार्मिक बाबतींत दाखविलेली व तरुण वयाला शोभणारी धडाडी व निर्भयता यांना अलौकिक वाटे. इतर धर्मसंस्थापक व ख्रिस्त यांच्यांत हा फरक असल्याचें हे मानीत. यांच्या जीवितक्रमावर व धावपळीवर या समजुतीची छाप दिसून येते.

गरीब, अनाथ, रोगी व संकटग्रस्त यांना मदत करण्याचे प्रसंग आले असतां हे एखाद्या देवदूताप्रमाणें तडफेनें आणि निर्भयतेनें तेथें धांवत जात. अशा यांच्या कार्यांत सरकारनें संशयानें यांना प्रतिबंध केला तर हे त्याचा निर्भयपणानें व तडफेनें प्रतिकार करीत. प्रसंगीं कायदा मोडण्यास व हुकूम तोडण्यासहि मागेंपुढे पाहत नसत. फिजी बेटांतील मजुरांची कहाणी ऐकून, सरकारनें प्रतिबंध केला तरी हे तिकडे गेले. चंपारण्य व रौलट कायद्याच्या वेळीं हे म. गांधींच्या साहाय्याला नेमके धांवून आले. म. गांधींच्या नीतिप्रधान चळवळींत किंवा रवीन्द्रनाथ टागोर यांच्या विश्वकुटुंबवादाला प्राधान्य देणाऱ्या कार्यांत हे सामील होत याचें कारण यांच्या ह्या वृत्तींतच आहे.

सरकारविषयीं म. गांधींची भावना क्रान्तिकारक आहे असें यांना सामुदायिक कायदेभंगाच्या चळवळीमुळें वाटलें तेव्हां यांनीं एकदोन वेळां त्यांना विरोधहि केला आहे.

उंची सूटबूट घालून स्वतः मोटार चालवितांना लोकांच्या हे दृष्टीस पडले आहेत. तसेंच हे खादीचा सदरा व पंचा नेसून फिरतांना नंतर यांना लोकांनीं पाहिले आहेत.

इतर सर्व व्यवहार स्वैरपणानें करावयाचे व धर्म मात्र सावधपणें पाळावयाचा या पाश्चिमात्य सूत्राचा हे उपहास करीत. येशू ख्रिस्ताप्रमाणें धर्माचरणमुद्रा मोठ्या हिरीरीनें घडलें पाहिजे हें यांचें मत यांचें वैशिष्ट्य म्हणून सांगतां येईल.

हे बायबलांतील प्रत्येक वाक्य ईश्वरप्रणीत आहे असें मानीत.

प्रत्येक देशांत यांना जिव्हाळ्याचा मित्रसमुदाय लाभला व त्याबद्दल हे स्वतःला भाग्यवान् समजत.

ख्रिश्चन लोक चर्चमध्ये वर्णभेद पाळतात, श्वेतेतरांना आपल्या चर्चमध्ये येऊं देत नाहींत, त्यांना प्रार्थनेच्या वेळीं बाजूला करतात, या गोष्टींचा हे अत्यंत त्वेषानें निषेध करीत असत. चर्चमधून वर्णभेद पाळणें आणि श्वेतेतरांना चर्चबाहेर घालविणें म्हणजे येशू ख्रिस्तालाच चर्चच्या बाहेर घालविणें होय असें यांचे निक्षून सांगणें असे. कारण खुद्द येशू ख्रिस्तच आशिया खंडांतील कृष्ण-वर्णीय होता.

यांचे ग्रंथ:—(1) Christianity and the Labour Problem, (2) North India, (3) The Renaissance in India, (4) Christ and Labour, (5) The Indian Problem, (6) Indians in South Africa, (7) To the Students, (8) The Drink and Drug Evil, (9) What I owe to Christ (Autobiography), (10) Christ in the Silence, (11) Sadhu Sunder Singh, a Memoir, (12) Challenge of North-West frontier, (13) Indian Earth quake, (14) India and Simon Report, (15) India and Pacific. येथील व तेथील हिंदी पुढाऱ्यांच्या विनंतीवरून जपानजवळील फिजी बेटांतील हिंदी लोकांच्या स्थितीचा अभ्यास करण्याकरितां (स. १९१५, १७, ३६ सालीं) काढलेल्या तीन सफरींचा वृत्तांत (१९३७).

संपादित ग्रंथः—(1) Mahatma Gandhi—His own Story, (2) Mahatma Gandhi—At work, (3) Mahatma Gandhi's Ideas (with the specimens from his works), (4) Letters to a Friend (The Letters of Dr. Rabindranath Tagore).

मँचेस्टर गार्डियन वगैरे परदेशांतील पत्रांशीं यांचा बातमीदार म्हणूनहि संबंध होता.

हे परलोकवासी झाल्यानंतर यांच्या स्मारकाकरितां म. गांधी यांनीं मुंबईस सहा लक्ष रुपये जमविले व ते रवींद्रनाथ टागोर यांच्या शांतिनिकेतनाच्या ताब्यांत दिलें (१९४१).

**ॲम्हर्स्ट, लॉर्ड**—(कारकीर्द स. १८२३-१८२८) हिंदुस्थानचे गव्हर्नर जनरल.

ब्रह्मदेशाशीं ब्रिटिशांचें युद्ध ही यांच्या कारकीर्दीतील सर्वांत महत्त्वाची गोष्ट आहे. इंग्रजांनीं बंगाल प्रांत जिंकला त्याच वेळीं 'अलोपारा' या शूर व धाडशी ब्रह्मी माणसानें ब्रह्मदेश जिंकून त्याचें एकीकरण केलें होतें. पुढें ब्रह्मी लोक इंग्रजांच्या मुलखांत आक्रमण करूं लागले. आसाम, काचार, मणीपूर हे प्रांत व सिल्हट व चितगांव हे इंग्रजांचे जिल्हे त्यानीं आपल्या ताब्यांत घेतले. ब्रह्मी लोकांनीं ज्या वेळीं आराकान प्रांत आपल्या ताब्यात घेतला तेव्हा तेथील कांहीं लोक इंग्रजांच्या आश्रयाला आले होते; त्यांस ब्रह्मी लोकांनीं परत मागितलें, परंतु इंग्रजांनीं ती गोष्ट नाकारली. त्याचप्रमाणें शहापूर हें बेट आपलें आहे असें समजून ब्रह्मी लोकांनीं तेथील इंग्रजांस हाकलून लावलें. इंग्रजांनीं फौज पाठवून तें ठिकाण जिंकून घेतलें. या सर्व गोष्टींचा निर्णय सलोख्यानें लावण्याची सूचना यांनीं ब्रह्मी सरकारला केली. परंतु ती गोष्ट ब्रह्मी सरकारनें नाकारल्या-मुळें यांनीं त्याविरुद्ध युद्ध पुकारलें. प्रथमतः इंग्रजांचें जरी फार नुकसान झालें तरी शेवटीं त्याचाच विजय झाला. शेवटीं १८२६ त येंदाबू येथें तह होऊन युद्ध संपलें. त्या तहानें तेनासरीम, आराकान व आसाम हे प्रांत इंग्रजांस मिळाले. त्यामुळें हिंदुस्थानची ईशान्य दिशा बिनधोक होऊन तिकडून परचक्राचें भय राहिलें नाहीं.

याचे कारकीर्दीत भरतपूरच्या गादीसंबंधीं तंटे उपस्थित झाले होते. इंग्रजांनीं जाटांचे गादीवर बसवलेल्या बळवंतसिंह राजास दुर्जनसाल हा राज्य मिळविण्याच्या हेतूनें त्रास देत होता. त्यास १८२६ त यानीं कैदेत टाकलें.

# आ

**आगरकर, गोपाळ गणेश**—( जन्म स. १८५६–मृत्यु स. १८९५ ) महाराष्ट्रांतील थोर समाजसुधारक व बुद्धिवादी पुरुष. सातारा जिल्ह्यांतील कऱ्हाडापाशीं टेंभू गांवीं यांचा जन्म झाला. पुढें इंग्रजी तिसरीपर्यंतचें शिक्षण यांचे मामा, दत्तोपंत भागवत यांचेबरोबर कऱ्हाड येथें झालें. पण पुढील शिक्षणाकरितां मामा पुण्यास गेला व हे शाळा सोडून मुन्सफ कोर्टांत उमेदवार झाले. पण शिक्षण घेण्याकडे यांचा कल असल्यानें नागपूरकर मुन्सफांच्या पाऊणशें रुपयांच्या मदतीनें हे रत्नागिरीस गेले. पण तेथें यांची नीट सोय लागली नाहीं. एक आप्त होते ते वारले व वार वगैरे लावून जमेना, म्हणून हे कऱ्हाडला परत आले व तेथें दवाखान्यांत कंपाउंडरची नोकरी पत्करली. पण ती सोडून आपल्या एका मामा-बरोबर अकोल्यास गेले. तेव्हां हे सोळा वर्षांचे होते. तेथें घरगुती अडचणींस तोंड देत शिक्षक श्री. नि. मो. महाजनि यांच्या कृपेनें हे प्रवेशपरीक्षा उत्तीर्ण झाले ( १८७५ ).

यांना शाळेंत येण्यास एके दिवशीं उशीर झाला; तेव्हां शिक्षक म्हणाले, 'तुम्ही असेंच मागे पडणार. तुमच्या हातून काय होणार आहे ?' तेव्हां यांनीं तडफेनें उत्तर दिलें, 'तुमच्यासारखा एम्. ए. होईन तरच नांवाचा आगरकर.'

यांचे गुरु महाजनि यांनींहि यांचें हायस्कुलांत असतांचें वर्णन केलें आहे त्यांत यांचें भाषण ठसक्यानें व आत्मप्रत्ययानें मुसमुसलेलें असल्याचें लिहिलें आहे.

यांच्या गुरूंनीं आपआपसांत वर्गणी करून साठ रुपये जमविले व कॉलेजांतील पहिल्या तीन महिन्यांला पुरेल एवढी रक्कम यांच्या हवालीं केली. ही गुरुदक्षिणा घेऊन यांनीं डेक्कन कॉलेजांत प्रवेश केला. अकोल्याला 'वऱ्हाड समाचार' नांवाचें वर्तमानपत्र निघत होतें. त्याला लेखनसाहाय्य करण्याबद्दल यांना पांच रुपये मिळत होते. तीन महिन्यांनंतर यांना ज्युनियर स्कॉलरशिप मिळाली. पण ती अपुरी असल्यानें यांना इतर उद्योग करावे लागत. डेक्कन कॉलेजच्या संमेलनानें पन्नास रुपयांचें बक्षीस लावून निबंध मागविले, तें यांच्या 'हिंदु एकत्र कुटुंब-पद्धति' या निबंधाला मिळालें. वक्तृत्व समारंभांतहि पन्नास रुपयांचें बक्षीस यांनीं मिळविलें. तथापि खर्चाची तोंडमिळवणी करणें यांना दुष्कर होई. एका सदऱ्यावर यांना कांहीं दिवस काढावे लागत. एम्. ए.च्या परीक्षेच्या वेळीं फी भरण्याला यांच्याजवळ पैसे नव्हते. म्हणून यांनीं फीकरितां एक नाटक लिहून पैसे मिळविण्याचें ठरविलें. जाग्रणें करून हे नाटक लिहूं लागले, हें केरूनाना छत्रे यांना कळलें. तेव्हां त्यांनीं यांची फी भरल्यामुळें नाटक अपुरेंच राहिलें. पण यांच्या या आपन्न स्थितीमुळें यांना आनुवंशिक दमाहि यांना त्रास देऊं लागला. तत्त्वज्ञान व इतिहास घेऊन हे एम्. ए. झाले. त्या वेळीं मिल्ल व स्पेन्सर यांच्या बुद्धिप्रामाण्यवादी व अज्ञेयवादी तत्त्वज्ञानांचा सर्वत्र बोलबाला होता. त्याचा यांच्यावरहि परिणाम होऊन प्रत्येक गोष्टीस बुद्धिवादाची कसोटी हे लावूं लागले. पण तत्कालीन इतर तरुणांप्रमाणें अनाचार मात्र यांच्या हातून घडला नाहीं.

तसेंच यांनीं आपल्या भावी आयुष्याचीहि रूपरेखा निश्चित करून आपल्याबद्दल विशेष सुखाची आशा बाळगणाऱ्या आईला बी. ए. होतांच पुढील पत्र लिहिलें : "आपल्या मुलाच्या मोठाल्या परीक्षा होत आहेत. आतां त्याला मोठाल्या पगाराची चाकरी लागेल व आपलें पांग फिटतील असे मोठाले मनोरथ, आई, तूं करीत असशील; पण मी आतांच तुला सांगून टाकतों कीं, विशेष संपत्तीची, विशेष सुखाची हांव न धरतां मी फक्त पोटापुरत्या पैशावर संतोष मानून सर्व वेळ परहितार्थ खर्च करणार !"

न्यू इंग्लिश स्कूल सुरू करण्याच्या खटपटींत चिपळुणकरशास्त्र्यांच्याबरोबर टिळक व हे होते. पण पहिल्या वर्षी ( जाने. १८८० ) एम्. ए. नापास झाल्यामुळें परीक्षा पास झाल्यावरच यांनीं शाळेंत दाखल होण्याचें ठरविलें आणि त्याप्रमाणें दुसऱ्या वर्षी हे त्या मंडळींत प्रत्यक्ष दाखल झाले. पुढल्या वर्षी दोन दिवसांच्या अन्तरानें 'मराठा' व 'केसरी' हीं पत्रें सुरू करण्यांत आलीं ( १८८१ ). केसरीच्या दुसऱ्याच वर्षी बर्वे-प्रकरणांत मर्यादातिक्रम झाल्याबद्दल यांना १०१ दिवसांची शिक्षा झाली. मराठ्याचे संपादक म्हणून टिळकहि या शिक्षेंत होते. तुरुंगांतहि 'हळू बोला' म्हणून यांना शिपायांला वारंवार सांगावें लागे. 'डोंगरीच्या तुरुंगांतील आमचे एकशें एक दिवस' हें पुस्तक यांच्या मनोवृत्तीवर चांगला प्रकाश पाडतें.

शाळेची वाढ होत जाऊन कॉलेजहि निघालें (१८८५). यांनीं लोकांत ज्ञानप्रसार व्हावा म्हणून बुद्धिप्रामाण्याची

कास धरून नानाविध विषयांचें विवेचन केलें तरी यांचें अन्तःकरण सामाजिक विषयांतच रमत असे. स. १८८४ सालीं सरकारी कायद्याची मदत घेऊन बालविवाहाला प्रतिबंध करावा असा पूर्वपक्ष मलबारीशेटजींनीं केला. यांना हें मत पूर्ण मान्य असूनहि सर्व सहकारी यांच्या विरुद्ध असल्यानें त्याचा केसरींतून पुरस्कार करण्याची मात्र यांना चोरी झाली. शेवटीं एकदोन रकान्यांत स्वतःच्या नांवावर लेख लिहावेत अशी स्थिति आली. ही स्थिति असह्य होऊन ता. २५ ऑक्टो. १८८७ रोजीं यांनीं आपला केसरीशीं असलेला संबंध सोडला आणि सामान्य गोष्टीस आमरण चिकटून राहण्यापेक्षां विशेष महत्त्वाच्या वाटणाऱ्या गोष्टींकडे यांनीं लक्ष देण्याचें ठरविलें. आणि 'सुधारक' काढून आपल्या कामास सुरुवात केली (१८८८). पहिल्या वर्षी खर्च वजा जातां तीस रुपये फायदा उरला. यांना पगार दरमहा तीन रुपये पडला. प्रतिकूल समाजांत आपले विचार निर्भयपणें मांडीत राहणें हें थोर 'महात्म्याला शोभण्यासारखें कृत्य' आहे यांत शंका नाहीं. ठार मारण्याची धमकी, यांची खोटी प्रेतयात्रा काढणें वगैरे सर्व प्रकार प्रतिपक्षांनीं केले. यांचा दमाहि वाढला. संमति-वयाच्या बिलाचा वाद, चहाचें ग्रामण्य वगैरे विषयांचा व्यवस्थित समाचार घेण्याचें कामहि चालू होतें. याच वेळीं होळकर सरकारनीं देऊं केलेली पांचशें रुपये दरमहाची नोकरी नाकारून यांनीं आपल्या स्वार्थत्यागावर कळस चढविला. आपट्यांच्या मृत्यूनंतर हे फ. कॉलेजचे प्रिन्सिपल झाले (१८९२). शेवटीं दारिद्र्य, दमा आणि देशकार्य यांनीं जीर्ण झालेलें शरीर नेऊनच कालाला समाधान मानावें लागलें. यांची कीर्ति अजरामरच आहे.

'काळी पगडी, बहुतकरून पांढरा अंगरखा, शुभ्र कांठाचें उपरणें आणि ब्राह्मणी चढाऊ जोडा' असा या सुधारकाग्रणीचा पोषाख असे. आईच्या मृत्यूनंतर आईचा व मिशांचा संबंध काय म्हणून यांनीं मिशा काढण्याचें नाकारलें. मृत्यूनंतर यांच्या पेटींत उत्तर कार्याकरितां म्हणून ठेवलेली रुपयांची पुरचुंडी सांपडली.

(१) डोंगरीच्या तुरुंगांतील एकशे एक दिवस. (२) 'विकारविलसित' हें हॅम्लेटचें रूपांतर यांनीं डोंगरीच्या तुरुंगांत पुरें केलें (१८८३). याशिवाय (३) वाक्यमीमांसा नांवाचा व्याकरणविषयक ग्रंथ (१८८८). (४-५) केसरींतील निवडक निबंध (१८८८). (६) विविधविषयसंग्रह (निबंध), (७-८-९) निबंधसंग्रह (सुधारकांतील) असें यांचें वाङ्मय आहे (१८९५).

महाराष्ट्रांतील मध्यम वर्गाचा आयुष्यक्रम आर्थिक कारणानें बदलत चालला असतां नव्या परिस्थितीस अनुसरून यांनीं त्या आयुष्याचें समर्थन केल्यामुळें नवीन पिढीचा वर्ग यांना आपला तत्त्ववेत्ता समजत असे. तोच सुधारकवर्ग आणि त्यांचे हे पुढारी अशी पुढें प्रसिद्धी झाली.

यांनीं आपल्या समाजांतील चालीरीतींची बुद्धिवादानें छाननी करण्यास आणि प्रत्येकांतील गुणदोष स्पष्टपणें मांडण्यास सुरुवात केली. हें करतांना यांनीं आपल्या समाजांतील पोषाख वगैरे बाह्य गोष्टींपासून परलोक, चातुर्वर्ण्य, ग्रंथप्रामाण्य, जातिभेद वगैरे विषयांचा परामर्ष घेतला. राजा, प्रजा, कायदे, स्वराज्य, स्वातंत्र्य, अन्न-वस्त्राचा प्रश्न इत्यादि मूलभूत प्रश्नांची छाननी सडेतोड-पणें यांनीं केलेली आहे. समाजसुधारक म्हणून यांची पुढें अधिक प्रसिद्धि झालेली असली तरी हे राजकीय विचारांतहि सर्वांच्या पुढें होते. 'धर्मशास्त्राच्या आज्ञां-प्रमाणेंच सरकारचे कायदेसुद्धां कांहीं मर्यादेपर्यंतच पाळावयाचे असतात. सत्य बोलतांना लोकांना, जुन्या समजुतींना किंवा खुद्द राजालासुद्धां भितां उपयोगी नाहीं. प्रथम विरोध झाला तरी लोकांना शेवटीं सत्य बोलणारा कोण हें ध्यानांत आल्याशिवाय राहत नाहीं. बाह्य राज्यक्रांतीपेक्षां सामाजिक विषयाची म्हणजे अंतःक्रांति महत्त्वाची आहे. किंबहुना अंतर्गत क्रांती-शिवाय राज्यक्रांतीहि अपेशी होईल,' अशी यांची विचारसरणी होती.

हे तत्त्वनिष्ठ क्रांतिकारक होते आणि लो. टिळक हे व्यवहारी राजकारणी होते. अनवश्यक व सहज पार न पाडतां येणाऱ्या गोष्टी बोलून लोकांचा विरोध कशाला ओढवून घ्या, असें टिळकांचें म्हणणें होतें. तर सत्य दिसेल तें न बोलल्यास किंवा मतलबापुरतेंच बोलल्यास आपणां-वर सत्यापलापाचा दोष येतो असें यांना वाटे, म्हणूनच दोघांत विरोध उत्पन्न झाला.

आज यांच्या म्हणण्याचा विजय झालेला दिसत आहे. राजकीय परिस्थिति सुधारावी अशी इच्छा असेल तर समाजांतील दोष कमी केले पाहिजेत, लोकांच्या अंगांत गुणांची वाढ झाली पाहिजे, ही गोष्ट आतां सर्वांनीच मान्य केलेली आहे. म. गांधींसारखे पुढारी कौन्सिल प्रवेशापेक्षां अहिंसा, दारूबंदी, ग्रामोद्योग, अस्पृश्योद्धार वगैरेंनाच विशेष महत्त्व देतात.

यांच्या निबंधाच्या विषयांचे चार भाग पडतात :- १ व्यक्तींचें नैमित्तिक आचरण, २ सामाजिक इतिहास, ३ नैमित्तिक पक्षभेद, ४ स्त्रियांची उन्नति. या सर्व निबंधांच्या विषयाची निवड समर्पक आणि विवेचनपद्धति मार्मिक आणि चटका लावणारी आहे. व्यक्तीच्या जीवनांतील गोष्टींचें बारीकसारीक ज्ञान, अभ्यास आणि समाजहिताची उत्कट इच्छा यांमुळें यांचे निबंध वाचनीय झाले आहेत.

आपल्या विचारांवर यांचा पूर्ण विश्वास आहे, आणि आपण करीत असलेलें विचारप्रवर्तनाचें कार्य इष्टफलदायी आहे, याबद्दल यांना शंका नाहीं. योजना व भावनेपेक्षां विचारावर यांचा भर आहे. त्यामुळें प्रतिपक्षाच्या म्हणण्यांतील तथ्यांश हे विचारांत घेतल्याशिवाय राहत नाहींत. जुन्यांतील चांगल्याचा पुरस्कार करावयाचा आणि वाईटाचा त्याग करण्यास भाग पाडावयाचें हें यांचें जीवितकार्य होतें. त्याकरितां हे बुद्धिप्रधान चिकित्सा करून मतपरिवर्तनाचा मार्ग पत्करीत.

स्वार्थाकरितां केलेल्या गोष्टींकडेसुद्धां लोकांनीं सहानुभूतीनें बघावें अशी आपली अपेक्षा असते. मग स्वार्थनिरपेक्ष चळवळ करणाऱ्याला लोकांनीं सहानुभूति दाखवावी अशी इच्छा असणें स्वाभाविक आहे. आपल्या ध्येयाकरितां होळकर सरकारकडून आलेली दरमहा पांचशेंची नोकरी यांनीं नाकारली, संस्थानिकांची बाजू घेऊन शिक्षा भोगली आणि आपले विचार मांडण्याकरितां मिळकत नसतांहि वर्तमानपत्र काढलें; असें असतां यांचें म्हणणेंहि लोकांनीं समजून न घेतां यांची जिवंतपणीं प्रेतयात्रा काढावी व अनेकदां यांची अवहेलना करावी हें खरोखरच दुःखपूर्ण आहे.

यांना जिवंतपणीं लोकांची सहानुभूति लाभली नाहीं, पुढेंहि फारशी लाभण्याची आशा नाहीं. तथापि या सदाचारी आणि त्यागी पुरुषानें केलेलें स्वतंत्रपणें विचार करावयास लावण्याचें कार्य नमूद केल्याशिवाय कोणालाहि महाराष्ट्राचा इतिहास लिहितां येणार नाहीं !

**आगाखान, दुसरे**—( मृत्यु स. १८८१ ) मुसलमानांतील इस्मायिली पंथाचे धर्मगुरु, प्रसिद्ध राजकारणी आणि इंग्रज सरकारचे विश्वासू मित्र.

हे आगाखान हसन अलीशाह यांचे पुत्र होत. इराणच्या शहांनीं यांना इस्मायिलांचे इमाम म्हणून गादीवर बसण्याचे वेळीं सन्मानार्थ गौरवचिन्हें धाडलीं.

यांचें नांव नसिरुद्दीन असें आहे. हे दुसरे आगाखान म्हणून प्रसिद्ध आहेत.

पहिल्या आगाखानांचें चरित्र आमच्या मध्ययुगीन चरित्रकोशांत पाहावें.

**आगाखान, तिसरे**—( जन्म स. १८७७ ) मुसलमानांतील इस्मायिली पंथाचे धर्मगुरु, प्रसिद्ध राजकारणी आणि इंग्रज सरकारचे विश्वासू मित्र.

यांना इंग्रज सरकारनें वयाच्या पहिल्या वर्षापासून पेन्शन सुरू केलें व नवव्या वर्षीं हिज हायनेस ही पदवी दिली.

यांना फारशी, अरबी व इंग्रजी शिकविण्यांत आलें. तसेंच धार्मिक व व्यावहारिक शिक्षणाची जोडहि यांच्या भाषाज्ञानाला देण्यांत आली.

यांचें संपूर्ण नांव "हिज हायनेस दि राइट ऑनरेबल सर सुलतान मुहम्मदशाह " असें आहे.

यांच्या अनुयायांची संख्या हिंदुस्थानांत कित्येक दशलक्ष आहेच, पण जगांतील पूर्व आफ्रिका, मध्य आशिया इत्यादि सहा देशांतहि यांचे तितकेच अनुयायी आहेत.

जगांत आज यांची प्रसिद्धि धर्मगुरु म्हणून तर आहेच; पण त्यापेक्षांहि आंतरराष्ट्रीय नागरिक म्हणूनच हे जास्त प्रसिद्ध आहेत.

तसेंच यांची लोकप्रियताहि लक्षांत भरण्यासारखी आहे. त्याचें कारण यांचा पवित्र वंश, त्यामुळें प्राप्त झालेली विशेष प्रकारची मान्यता, राजकारणांत वैशिष्ट्यपूर्ण वागण्याची यांची हातोटी आणि अफाट संपत्ति हें असलें पाहिजे. ' बँक ऑफ लंडन 'मध्यें जेवढी संपत्ति आहे त्यापेक्षांहि अधिक संपत्ति यांचेजवळ असल्याचें सांगतात.

यांचे अनुयायी यांना वडील, माता, पालक, मार्गदर्शक व तत्त्वज्ञानी म्हणून ओळखतात. सच्चा कलेचे भक्त म्हणून यांच्याविषयीं यांच्या अनुयायांत प्रेम आढळून येतें. इतर लोकांतहि यांच्याविषयीं असाच प्रेमादर आढळून येतो. यांच्या कलाप्रेमांत तत्त्वनिष्ठा असते. केवळ कला म्हणून हे कलेचे उपासक नाहींत.

या सर्व गुणांमुळें यांना राज्य नसूनहि हे खऱ्या अर्थानें सम्राट् आहेत.

हिंदी मुसलमानांच्या शिक्षणाकरितां अलिगड युनिव्हर्सिटीच्या स्थापनेंत यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला. अशाच प्रकारची युनिव्हर्सिटी कैरोला ' अल अजहार ' या नांवानें यांच्या पूर्वजांनीं स्थापिली होती. अलिगड युनिव्हर्सिटीला हे दरसाल १०,००० रुपये देत असतात.

व यांनीं सुरतेतील ३० लाख रुपये या कार्यास जमवून दिले आहेत. १९१० सालीं शिया व सुनी या दोन्ही जमातींनीं यांना मानपत्र दिलेलें आहे. यांना 'नोबल प्राइझ' द्यावें असा कौन्सिल ऑफ स्टेटनें ठराव केलेला आहे. मोर्ले-मिंटो सुधारणांपासून ते राउन्ड टेबल कॉन्फरन्सपर्यंत हिंदुस्थानांतील राजकारणाचें हे एक अविभाज्य अंग बनून राहिले आहेत.

यांचें १ लें लग्न १८९८ त झालें. नंतर १० वर्षांनीं एका इटालियन स्त्रीला मुसलमानी धर्माची दीक्षा देऊन यांनीं तिच्याशीं विवाह केला. तिच्यापासून झालेला दुसरा मुलगा हा यांचा आजचा वारस आहे. ही स्त्री १९२६ सालीं वारली. नंतर ३ वर्षांनीं ॲन्ड्री कॅरन या फ्रेंच स्त्रीशीं यांचा ३ रा विवाह झाला.

हे एका विशिष्ट धर्मपंथाचे प्रमुख असले तरी यांची दृष्टि संकुचित नाहीं. यांच्यांत धार्मिक दुराग्रह नाहीं. टर्फ व घोड्यांची पैदास यांतील हे निष्णात आहेत. यांनीं डर्बी तीन वेळ जिंकली आहे. लीग ऑफ नेशन्सच्या कौन्सिलचे हे प्रेसिडेन्ट होते. हिंदुस्थानांतील एक प्रमुख राजकारणी असूनहि हे कोणत्याच विशिष्ट पक्षाचे नाहींत. महाराणी व्हिक्टोरिया, सातवे एडवर्ड व हल्लींचे त्यांचे वारस यांच्यांशीं यांचा स्नेह होता व आहे. १८९७ च्या दुष्काळांत यांनीं कच्छ, काठेवाड, पुणें व मुंबई येथें दुष्काळी कामें काढून दुष्काळाची तीव्रता कमी केली व एखाद्या बादशहाप्रमाणें खर्च केला. त्यानंतर प्लेगांतहि यांनीं हीच वृत्ति ठेवली. गांधींच्या पूर्वी अस्पृश्यता-निवारणाबाबतहि यांनीं सक्रिय प्रयत्न केला आहे. स्त्री-शिक्षण, बालविवाह व पडदा यांबाबत यांचीं मतें आधुनिक आहेत. स्त्रियांच्या वैधव्यावरहि यांनीं सडेतोड मतें मांडून तीन पिढ्यांपूर्वीच हल्ले चढविले आहेत.

पहिल्या महायुद्धामध्यें यांनीं केलेली महत्त्वाची कामगिरी पाहून सरकारनें यांना ११ तोफांच्या सलामीसह आपल्या थोर लोकांतील पहिला दर्जा दिलेला आहे.

जगांत हे खेळाडू म्हणूनहि प्रसिद्ध आहेत. कलकत्त्याचा व्हाइसरॉय कप जिंकण्याची यांची मनीषा आहे.

India In Transition हा यांचा ग्रंथहि सुप्रसिद्ध आहे.

**आगाशे, गणेश कृष्ण**—( मृत्यु स. १९२७ ) गद्य ग्रंथकार, मिरज संस्थानचे कारभारी व रावबहादूर. यांनीं श्री. कृ. कोल्हटकरकृत 'मतिविकार' व कृ. प्र. खाडिलकर यांच्या 'विद्याहरण' नाटकांवर रंगभूमि मासिकांतून टीकात्मक लेख लिहिले होते ( १९१४ ). शिवाय यांची सार्थ ज्ञानेश्वरीहि आहे (अ. म. वा. से.).

**आगाशे, गणेश जनार्दन**—( जन्म स. १८५२–मृत्यु स. १९१९ ) मराठी कवि. यांचा जन्म व इंग्रजी शिक्षण पुण्यास झालें. यांनीं मॅट्रिकच्या परीक्षेंत जगन्नाथ-शंकरशेटसंस्कृतस्कॉलरशिप व बी. ए. च्या परीक्षेंत भगवानदास पुरुषोत्तमदास शिष्यवृत्ति मिळविली होती. यांनीं सरकारी शिक्षण खात्यांत नोकरी पत्करून हायस्कूलच्या मुख्याध्यापकापासून गव्हर्नमेंट सेंट्रल बुक डेपोच्या क्युरेटरपर्यंत कामें केलीं. पेन्शन घेतल्यावर डेक्कन कॉलेजच्या संस्कृत प्राध्यापकाच्या जागीं यांची नेमणूक झाली होती. इंग्लिश, संस्कृत व मराठी या तीन भाषांचा व त्यांतील ग्रंथांचा यांचा अभ्यास चांगला होता. जुन्या परंपरेंतील पंडितकवींत यांची गणना करावी लागेल. यांचें 'बिरुदावली' ( १९०१ ) हें काव्य न्यायमूर्ति म. गो. रानडे यांच्या शोकपर आहे व 'बाष्पांजली' हें काव्य तेव्हां बी. ए.च्या वर्गांत असणाऱ्या राजाराम नांवाच्या मुलाच्या मृत्यूबद्दल आहे. शिवाय तीन हरिभाऊ, एडवर्ड बादशहा, गो. कृ. गोखले, यंदाचा हिंवाळा वगैरे यांच्या कविताहि शोकपर आहेत. याशिवाय यांनीं विविध विषयांवर विद्वत्ताप्रचुर अनेक लेख लिहिले आहेत. यांचें वाङ्मयः—१ राज्यारोहण काव्य, २ सुंदरेची संक्रान्त गोष्ट, ३ सद्गुणमंजरी १८९१, ४ बालशिक्षण, ५ बिरुदावली १९०१, ६ महाराष्ट्र वाङ्मय, ७ शुक्रग्रस्त विचित्र सूर्यग्रहण १८७४, ८ अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें–भाषान्तर १८९१, ९ बाष्पांजली ( अ. म. वा. से. ).

**आगासकर, शां. पु.**—(जन्म स. १८९६ सुमार) सुप्रसिद्ध चित्रकार.

यांची चित्रकलेंतील प्रसिद्धि बहुंशीं उत्कृष्ट 'पोर्ट्रेट पेंटर' म्हणून होती. चित्रांतील माणसाची उत्कृष्ट ओळख यांच्याइतकी दुसऱ्या कोणालाहि साधत नाहीं. खऱ्या कलाकृतींत त्या व्यक्तीला पाहून चित्रकाराच्या मनांत आलेल्या भावना व्यक्त व्हाव्या लागतात. मनांत येणाऱ्या भावना चित्रांत उतरविण्याचें कसब फार थोड्या कलावन्तांत असतें. त्या थोड्या कलावन्तांपैकीं हे एक होत.

यांचीं कांहीं 'पोर्ट्रेट्स' इतकीं उत्तम साधलीं आहेत कीं, त्यांसमोर उभें राहिलें असतां हें चित्र असल्याचें

भान नाहींसें होतें. अगदीं चालताबोलता जीव कपडा फाडून डोकावत असल्याचा भास होतो.

यांच्या चित्रांत रंगाचा किंवा कुंचल्याचा मोहकपणा किंवा सफाई नसते. मात्र पाहिजे असलेला परिणाम आणण्याकरितां हरतऱ्हा केलेल्या असतात. प्रकाशाची बाजू अतिशय जाड असते. कुंचले मारलेले असतात ते मात्र आंतील स्नायूंच्या रोखानें. हे हायलाइटकरितां तर कुंचल्याच्या दांड्यानें रंग उचलून टाकीत. छायेची बाजू मात्र फार गुळगुळीत असते.

**आघारकर, शंकर पुरुषोत्तम**—( जन्म स. १८८४ ) सुप्रसिद्ध वनस्पतिशास्त्रज्ञ.

रत्नागिरी जिल्ह्यांतील मालवण हें गांव यांचें जन्मस्थान. यांचे वडील पुरुषोत्तम जयराम हे एंजिनियरखात्यांत सुपरवायझर होते. यांचे मूळ गांव हुर्णे.

वनस्पति व प्राणिशास्त्र ऐच्छिक विषय घेऊन बी. ए. झाल्यानंतर हे वनस्पति, प्राणी व भूगर्भशास्त्र (सृष्टिशास्त्रें) घेऊन एम्. ए. झाले ( १९०९ ).

कांहीं काळ मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजांत जीवशास्त्राचे प्राध्यापक म्हणून काम केल्यानंतर, कांहीं काल संशोधनांत व्यतीत करावयाचा या इच्छेनें कलकत्त्याच्या 'इंडियन म्युझियम'मध्यें हे दाखल झाले. याच सुमारास कलकत्ता युनिव्हर्सिटीला श्री. राशबिहारी घोष यांनीं दिलेल्या दहा लाख रुपयांच्या देणगीमुळें ज्या चार प्राध्यापकांच्या जागा उत्पन्न झाल्या त्यांपैकीं उपयुक्त वनस्पतिशास्त्राच्या प्राध्यापकाच्या जागेकरितां आशुतोष मुकर्जी यांनीं यांना श्री. रामन् यांच्यामार्फत विनंति केली व ती जागा यांनीं स्वीकारली. या नेमणुकीच्या एका अटीनुसार हे आपल्या विषयाच्या संशोधनाकरितां जर्मनीला रवाना झाले ( १९१४ ). परंतु पुढे लवकरच महायुद्ध सुरू झाल्यानें ब्रिटिश प्रजाजन म्हणून यांना अटक करण्यांत आली, युद्ध संपल्यानंतर यांची सुटका झाली. "हिंदुस्थानांतील रूक्ष भागांत असणाऱ्या वनस्पतींचीं स्वप्रसाराचीं साधनें व त्यांचें मूलस्थान" या विषयावर यांनीं लिहिलेल्या प्रबंधाबद्दल बर्लिन विद्यापीठानें यांना डॉक्टरेट दिली ( १९१९ ).

जर्मनींतील कार्य आटोपल्यानंतर यांनीं नॉर्वे व डेन्मार्क येथील वनस्पतिशास्त्रज्ञांशीं ओळखी करून घेतल्या. नंतर कांहीं काळ हे इंग्लंडमध्यें होते. या काळांत यांनीं लंडननजीकच्या 'क्यू' या विभागांत असणाऱ्या 'रॉयल बोटॅनिकल गार्डन्स'मधील ब्रिटिश वनस्पतींचें अध्ययन केलें. नंतर फ्रान्स, स्पेन, इटली इत्यादि देशांत वनस्पति-अवलोकनार्थ प्रवास केल्यानंतर हे हिंदुस्थानास परत आले ( १९२० ).

आजपर्यंत यांनीं केलेल्या कामगिरीचें स्वरूप विविध आहे. अध्ययन, अध्यापन, संशोधन, संशोधनात्मक संघटन व बृहन्महाराष्ट्रीय कार्य असें तें होय.

यांच्या प्राणिशास्त्रावरील संशोधनाच्या आरंभाची हकीकत किंचित् मनोरंजक आहे ( १९११ ). या वेळीं महाबळेश्वरच्या व आजुबाजूच्या प्रदेशांतील प्राणी गोळा करण्याकरितां हे हिंडत असतां कोयना खोऱ्यांतील तांबी व वेणेच्या कांठच्या मेढें या नदीच्या डोहांत एक प्रकारचा चक्राकार प्राणी (Medusa) यांना सांपडला. हा प्राणी समुद्रांतील असून याच्या गोड्या पाण्यांत राहणाऱ्या चार पांचच जाती आजपर्यंत शास्त्रज्ञांना अवगत होत्या. यांना मिळालेली प्राण्याची ही जात तर अगदीं नवीन व अज्ञात अशी ठरली व कलकत्त्याच्या इंडियन म्यूझियमचे सुपरिंटेंडेंट डॉ. ॲनंडेल यांनीं तिला 'लिम्नोक्लिडा इंडिका' हें नांव दिलें. वरील प्राणी आफ्रिकेंतील व्हिक्टोरिया न्यांझा व टांगानिका या सरोवरांत राहणारा असतांना तो कृष्णेच्या उगमाजवळ कसा येऊन पोंचला हें भूपृष्ठावरील प्राण्यांच्या अभ्यासकांना एक मोठें कोडें पडलें आहे. त्याचप्रमाणें वर्षांतून फक्त तीन चार महिनेच हा प्राणी आढळत असल्यानें बाकीचे दिवसांत त्याचें काय होतें हाहि त्यांचेपुढील एक मोठा प्रश्न आहे. डॉ. ग्रेव्हली, डॉ. सुंदरलाल होरा, डॉ. श्रीनिवासराव इत्यादि लोकांच्या सतत परिश्रमानंतरहि हा प्रश्न अद्याप तसाच अज्ञात राहिला आहे.

पुढें १९१४ त कलकत्त्याला प्राध्यापक म्हणून यांची नेमणूक झाल्यानें यांचें हें संशोधन तसेंच अपुरें राहून वनस्पतिशास्त्राकडे यांचें लक्ष वळलें.

वनस्पतींचें वर्गीकरण व त्यांचा भूपृष्ठावरील प्रसार यांचा अभ्यास करून त्यांच्या उत्पत्तिस्थानासंबंधीं निष्कर्ष काढणें व त्याचप्रमाणें वनस्पतिशास्त्राच्या अभ्यासाचा व्यवहाराशीं मेळ बसवणें हा यांच्या संशोधनांतील सर्वांत महत्त्वाचा भाग आहे. वनस्पतिशास्त्राच्या अभ्यासाचा उपयोग मुख्यतः शेती, फॉरेस्ट्री व औषधी या व्यावहारिक बाबतींत होतो.

शेतीमध्यें एकाच ऋतूंत आपली वाढ पुरी करणाऱ्या वनस्पतींचा उपयोग करावयाचा असतो तर फॉरेस्ट्रींत १००–१०० वर्षें जगणाऱ्या वनस्पतींचा विचार करावयाचा असतो. यांपैकीं शेतकीविषयक संशोधन यांना

विशेष महत्त्वाचें वाटल्यावरून यांनीं या तऱ्हेची सामग्री मिळविणें व निरनिराळ्या पिकांच्या वाढीचा व त्यांवरील रोगांचा अभ्यास करून हल्लीं उपलब्ध असणाऱ्या जातींपेक्षां जास्त चांगल्या जाती शोधून काढण्यास लागणाऱ्या प्रक्रिया शोधून काढल्या आहेत. वनस्पतींच्या अवलोकनार्थ यांनीं हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांत प्रवास करून तेथील वनस्पतींचा संग्रह केला आहे. यांपैकीं १९२१ व १९२३ सालीं यांनीं केलेला नेपाळचा प्रवास विशेष महत्त्वाचा आहे.

हल्लीं यांच्या प्रयोगशाळेंत पुढील संशोधन चालू आहे.

१. आंबा व केळें यांच्या हिंदी जातींचा अभ्यास करून त्या जातींचे अन्योन्य संबंध ठरविणें व त्यांच्या मूळ जातींचा शोध करून त्यावरून नव्या चांगल्या जाती कशा निर्माण करितां येतील हें निश्चित करणें. 'इंपीरियल कौन्सिल ऑफ् ॲग्रिकल्चरल रिसर्च'च्या द्रव्यसाहाय्यानें हें काम चालू आहे.

२. बंगाल मिल ओनर्स असोसिएशनच्या विद्यमानें बंगालमधील लांब धाग्याच्या कापसावरील रोग व त्यांचेवरील उपाय यांचें संशोधन.

३. भातांच्या पिकांवरील रोग व भातास लागणारें खत यांचें संशोधन.

४. भाताचे पीक सध्यांपेक्षां जलद कसें तयार करितां येईल त्यावरील संशोधन.

'संशोधनात्मक संघटन' हें यांच्या कार्याचें आणखी एक महत्त्वाचें दालन आहे. 'इंडियन सायन्स कॉंग्रेस'च्या मंगलोर येथील अधिवेशनाचे हे चिटणीस व वनस्पतिशाखेचे अध्यक्ष होते ( १९२४ ). तेव्हांपासून १९३५ पर्यंत हे तिचे सतत चिटणीस होते. त्या काळांत संस्थेच्या झालेल्या वाढीचे, सांपत्तिक स्थितीचे व स्थैर्याच्या श्रेयांत यांचा वांटा बराच मोठा आहे. १९३८ सालीं झालेल्या रौप्य महोत्सव समारंभाची सर्व योजना यांनींच आंखली होती. 'सायन्स कॉंग्रेस'नें नेमलेल्या ॲकेडमी कमेटीचे हे जोड चिटणीस असून कमेटीच्या शिफारशीप्रमाणें स्थापन झालेल्या 'नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्सेस ऑफ इंडिया' या संस्थेचेहि हे पहिल्यापासून चिटणीस आहेत.

याशिवाय इंडियन बोटॅनिकल सोसायटी, इंडियन सोसायटी ऑफ सॉइल सायन्स वगैरे संस्थांशींहि यांचे अत्यंत निकटचे संबंध आहेत.

आंतरराष्ट्रीय शास्त्रज्ञांची परिषद ( ॲमस्टरडॅम, हॉलंड ), इंटरनॅशनल युनियन ऑफ बायॉलजी, आंतरराष्ट्रीय भूमिशास्त्र परिषद (Soil Science, Oxford) व इंपीरियल बोटॅनिकल कॉन्फरन्स (लंडन) या परिषदांस हे हिंदुस्थानचे प्रतिनिधी म्हणून हजर होते.

या वेळीं १८५१ च्या प्रदर्शनाचे शिलकींतून देण्यांत येणाऱ्या स्कॉलरशिपची योजना हिंदी विद्यार्थ्यांना लागू करण्याचा प्रयत्न यांनीं केला होता. तसेंच क्यू (लंडन) येथील बागेंत हिंदुस्थानच्या खर्चानें चालू असलेल्या मदतनिसाचे जागेवर हिंदी वनस्पतिशास्त्रज्ञाची नेमणूक करण्याकरतां यांनीं केलेल्या खटपटींत यांना यश आलें.

कलकत्त्याच्या एशियॅटिक सोसायटीच्या कार्यकारी मंडळांत जीवशास्त्राचे चिटणीस म्हणून हे काम करीत असून यांनीं सायन्स कॉंग्रेसमध्यें केलेल्या कामगिरीच्या गौरवार्थ यांना या संस्थेनें 'सुवर्णपदक' अर्पण केलें ( १९४४ ).

१९४३ सालच्या दिल्ली येथील बृहन्महाराष्ट्र परिषदेचे हे अध्यक्ष होते.

कलकत्त्याच्या महाराष्ट्र निवासच्या दिवाणखान्यांत यांचा षष्ट्यब्दपूर्ति-समारंभ डॉ. देवदत्त रामकृष्ण भांडारकर यांचे अध्यक्षतेखालीं साजरा करण्यांत आला होता.

**आचरेकर, प्रो. गंगाधर भिकाजी**—( जन्म स. १८८५–मृत्यु ३ जून १९३९ ).

गायन व तंतुवाद्य-प्रवीण. यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांतील आचरें गांवीं झाला. शास्त्रज्ञान व कला यांचा एकत्र संगम झालेल्या व्यक्तींपैकीं हे एक होत. मराठी ६–७ इयत्तांपर्यंत शिक्षण झाल्यावर यांच्या वडिलांनीं यांना गायनाचें शिक्षण देण्याचें ठरवून त्याकरितां सुप्रसिद्ध बापटबुवांना शिक्षक म्हणून ठेविलें. बापटबुवा हे सुप्रसिद्ध बाळकृष्णबुवांचे सहाध्यायी होते. हे प्रथम राजकोट ( काठेवाड ) राजकुमार कॉलेजमध्यें ( १९१० ), नंतर पुणें मेल ट्रेनिंग कॉलेजमध्यें संगीत शिक्षक होते ( १९१०–१९३८ ). हे जसे गवई तसेच बीनकारहि होते. प्रत्येक रागाचे श्रुतिरूपस्वर, रागाची उत्पत्ति, स्वरांचीं श्रुतिस्थानें इत्यादि हे सप्रमाण दाखवून देत. गेल्या २५–२६ वर्षांपासून मि. क्लेमंट, श्री. देवल, प्रो. आचरेकर, प्रो. बर्वे वगैरे विद्वानांनीं श्रुति–विषयाचा ऊहापोह केला तो फारच महत्त्वाचा आहे. कोमल, तीव्र स्वरांचीं स्थानें वीणेवरील लांबीच्या प्रमाणकांनीं व कंपनसंख्यांनीं देण्याचें कार्य वरील पंडितांनीं केलें आहे.

या सर्वांत यांचा यत्न यशस्वी ठरण्याचें कारण यांनीं प्राचीन श्रुतींच्या सिद्धतेवरील चतुःसारणांचा प्रयोग देऊन त्यांत प्रचलित श्रुतिस्वर दर्शविले हें होय. यांत यांनीं श्रुतिनिदर्शनाची स्वपरिभाषाहि निर्माण केली आहे हें एक यांचें वैशिष्ट्य होय.

यांनीं 'शालेय संगीत', 'मत्सरीकृता मूर्च्छना' वगैरे पुस्तकें लिहिलीं आहेत. त्याचप्रमाणें पुण्यांत निघणाऱ्या 'भारतीय संगीत' या त्रैमासिकांतील यांचे लेखहि मननीय असत. यांना प्रसिद्धीची लालसा मुळींच नसे. युनिव्हर्सिटींत हे संगीताच्या अभ्यासक्रमाबाबत नेमलेल्या विषयनियामक कमिटीचे सभासद होते हेंच यांच्या विद्वत्तेचें द्योतक होय. बाजारी हार्मोनियममधील स्वर, टेंपर्ड म्हणजे बेसुरे आहेत, ते प्रमाणबद्ध व सुरेल करून घेण्यासाठीं यानीं एक महत्त्वाची यान्त्रिक सुधारणा केली. कॉलेजमध्यें अध्यापकाचें काम करणारा हा शास्त्रज्ञ कलावंत बीन, सतार, दिलरुबा, हार्मोनियम वगैरे स्वतः बनवीत असे. आपलीं वाजविण्याचीं सर्व वाद्यें यांनीं स्वतः केलेलीं असत. इतकी कल्पकता व कारागिरी असूनहि घड्याळें दुरुस्त करणें; हिरे, माणकें, पाचू, मोतीं यांची परीक्षा करणें; वैद्यकी परीक्षा करणें; ज्योतिषविषयक फलें सांगणें वगैरेंतहि ते प्रवीण होते. अनेक गरिबांना ते स्वखर्चानें औषधें देत.

बापटबुवांच्या जवळ धृपदख्याल इत्यादि सर्व प्रकारच्या चिजा होत्या त्यांचा यांना पूर्ण लाभ मिळाला. त्यामुळें यांच्याजवळ चिजांचा मोठा भरणा असे. इंग्रजी किंवा संस्कृत येत नसतांहि पाश्चात्यांचें ध्वनिशास्त्र व रत्नाकरांतील श्रुतिग्राममूर्च्छना बुद्धिमत्तेनें ग्रहण करून यांनीं चतुःसारणा गणितसिद्ध प्रयोगानें सिद्ध केल्या आहेत. मि. फॉक्स स्ट्रँगवे या पाश्चात्य पंडिताला इकडील प्राचीन ग्रन्थांतील श्रुतिविषय समजावून घेण्यास यांच्याशिवाय दुसरा तज्ज्ञ मिळाला नाहीं. हा विषय समजावून घेतल्यानंतर त्यानें आपल्या 'म्युझिक ऑफ हिंदुस्थान' या ग्रन्थांत यांचा गौरवपूर्ण उल्लेख केला. यांचें शास्त्रीय ज्ञान विद्वान् व तज्ज्ञांना मान्य असे. हेहि शास्त्रज्ञ विद्वानांशीं संगीताबद्दल चर्चा करून त्यांतील सिद्धान्त ग्रहण करीत. यांचा स्वभाव परोपकारी असून हे उदार अंतःकरणाचे असत. संगीताचें शिक्षण देण्याची आवड असल्यामुळें पुष्कळांना निरपेक्षतेनें तें यांनीं दिलें आहे. यांचें सारें आयुष्य संगीत-अध्यापक म्हणूनच गेलें. मरणापूर्वी सुमारें २॥ वर्षापासून यांना हृदयविकार उत्पन्न झाला होता.

सध्याचें हार्मोनियम हें वाद्य पाश्चात्य आहे. शुद्ध स्वराची कल्पना पाश्चात्य संगीतज्ञांना नाहीं. त्यामुळें तंबोऱ्यावर गाणाऱ्या आपल्याकडील गवयांना तें वाद्य बेसूर वाटतें. त्याची सुधारणा करण्याचा प्रयत्न मि. क्लेमंट यांनीं केला. पण त्यांचें वाद्य वादनोपयोगी न होतां त्याला अजस्त्र यंत्राचें स्वरूप प्राप्त झालें. पण ती गोष्ट यांनीं प्रयत्नानें साध्य केली. कारण हे स्वतः गायक, वादक आणि वाद्यकार होते. शिवाय शोधक, चिकित्सक आणि योजक अशी यांची बुद्धि होती.

तेव्हां यांनीं त्या वाद्यांतील स्वरांतरें बदलून अर्ध तारस्वराचे आणखी दोनदोन भाग पाडले. आणि तंतुवीणेवरून षड्जपंचम भावानें प्रत्येक स्वर कायम करून घेतला. त्याकरितां पेटीचे पांढरे काळे सूर बदलावे लागले नाहींत, पण पेटीच्या सुरांची रचना दोन मजली होती ती चार मजले झाली. पण कोणत्याहि स्वरापासून आपल्या संगीतांतील नैसर्गिक स्वरसप्तक सिद्ध करण्याची अजब युक्ति यांनीं आपल्या पेटींत योजली आणि अनैसर्गिक स्वरान्तराचा हार्मोनियमवरील कलंक आपल्या अचाट कल्पनेनें काढून टाकला. यामुळें यांच्या पेटीमध्यें षड्ज, गांधार, पंचम, निषाद हे चारहि स्वर तंबोऱ्याच्या तारेप्रमाणें एकजीव झालेले ऐकूं येत. आणि कोणत्याहि स्वरावरील सुसंवाद साधण्याची युक्ति सोपी होई. अलीकडे आपल्या संगीतांत अत्यंत आवश्यक असणारी मींढ पेटींतून निर्माण करण्याचे प्रयत्नांत हे गुंतले होते. आपल्या या नव्या पेटीचे प्रयोग पुण्यामुंबईस यांनीं करून दाखविले आणि आर्यसंगीताच्या दृष्टीनें तिचें महत्त्वहि समजावून दिलें. परंतु दुर्दैवानें इकडील कोणाहि गवयाला अशी पेटी साथीला ठेवण्याची इच्छा झाली नाहीं. सच्चे सुरांत गायन करूं इच्छिणाऱ्या प्रत्येक गवयानें यांच्या 'श्रुतिमंडळमंजूषा' किंवा 'स्वरसंवादिनी'चा उपयोग करणें आवश्यक आहे. (मा. सं. व्या.) तथापि पूर्ण शुद्ध स्वर पेटींतून तंबोऱ्याप्रमाणें निघणें अशक्य असल्याचें कांहींचें म्हणणें आहेच.

**आचार्य (कालगांवकर), कृष्णाजी विष्णु—** (जन्म स. १८५७–मृत्यु स. १९१९) इतिहाससंशोधक. यांचा जन्म कऱ्हाड तालुक्यांतील कालगांव येथें झाला. हे शाळाखात्यांत मराठीशिक्षक होते. साने, खरे, पारसनीस वगैरेंच्यामुळें यांना इतिहाससंशोधनाची गोडी लागली. जुन्या कागदपत्रांचा संग्रह व तपास करून यांनीं तद्विषयक माहितीपूर्ण अनेक लेख लिहिले. भारत इतिहास

संशोधक-मंडळाचे ग्रंथांत व इतर मासिकांत यांनीं आपले लेख प्रसिद्ध केले. कै. पारसनीस यांच्या भारतवर्ष व इतिहाससंग्रह या दोन्ही मासिकांतून 'जुन्या ऐतिहासिक गोष्टी' या सदराखालीं यांचे बरेच लेख गोष्टी रूपानें प्रसिद्ध झाले आहेत. याशिवाय काव्येतिहाससंग्रह, विविधज्ञानविस्तार व शाळापत्रक यांतहि यांचे लेख आले आहेत (अ. म. वा. से.) व त्यांतहि यांनीं आपलें आत्मचरित्र दिलें आहे (वि. ज्ञा. वि. सप्टें. १९१९).

**आचार्य, चिंतामणि रघुनाथ**—(जन्म १७ मार्च १८२८–मृत्यु स. १८८०).

मद्रासच्या ज्योतिष शाळेंत हे पहिले असिस्टंट असून तेथें १७ वर्षे होते. यांची मातृभाषा व जन्मदेश तामीळ (द्रविड) असावा असें वाटतें. यांना संस्कृत जरी येत नसे तरी इंग्रजींत हे निष्णात होते. हे स्वतः पुष्कळ वर्षे वेध घेत असत. स. १८४७ त यांना मद्रास वेधशाळेंत नोकरीवर घेतलें. तेथें आयुष्याच्या शेवटपर्यंत काम करून हे १८८० सालीं मरण पावले. यांचें सर्व घराणेंच ज्योतिष्यांचें होतें.

**आचार्य, एम्. के.**—(जन्म स. १८७६) सुप्रसिद्ध सनातनी पुढारी.

मद्रासच्या ख्रिश्चन कॉलेजमध्यें यांचें प्रमुख शिक्षण झालें. बी. ए., एल्. टी., इत्यादि पदव्यांनीं विभूषित होऊन यांनीं कॉलेज सोडलें. कांहीं दिवस हेडमास्तरचें काम केल्यानंतर स्वतंत्र राजकारणी गृहस्थ या नात्यानें जनतेच्या समोर येण्यास यांनीं सुरुवात केली. सार्वजनिक कार्यकर्ते, ग्रंथकार व वर्तमानपत्रकार या तीनहि दृष्टींनीं लोकादरास पात्र झालेले हे गृहस्थ आहेत.

ग्रंथ:—(१) पोर्ट्रेट्स् फ्रॉम इंडियन क्लासेस, (२) दि बेसिक ब्लंडर इन् दि रीकन्स्ट्रक्शन ऑफ दि इंडियन क्रॉनॉलजी बाय ओरिएन्टॅलिस्ट्स्, (३) इंडो ब्रिटानिका.

नाटकें:—(१) कुमुद, (२) दशरथ.

चिंगलपट व अर्काटतर्फे लेजिस्लेटिव्ह असेंब्लीमध्यें हे निवडून आले होते. स्वराज्यपक्ष व काँग्रेसतर्फेचे सभासद होण्याचा मानहि यांना मिळाला होता (१९२८).

वर्णाश्रम स्वराज्य-संघाचे प्रेक्षक प्रतिनिधी म्हणून राउंड टेबल कॉन्फरन्सलाहि हे हजर होते (१९३०).

**आचार्य, यादवजी त्रिकमजी**—(जन्म स. १८८२) आयुर्वेदाचे अभ्यासक व आयुर्वेदाचे अप्रसिद्ध ग्रंथ संशोधनपूर्वक प्रसिद्ध करणारे सुप्रसिद्ध वैद्य.

हे काठेवाडांतील पोरबंदर शहरीं पिढीजात वैद्यकी करणाऱ्या घराण्यांत जन्मास आले. यांचे वडील त्रिकमजी गोवर्धनजी आचार्य पोरबंदरच्या राणासाहेबांचे राजवैद्य होते. त्यांचेजवळ व पं. गौरीशंकरजी यांचेजवळ यांनीं वैद्यकीचें यथासांग अध्ययन केलें. यांचें संस्कृताचें प्राथमिक अध्ययन पोरबंदरच्या राजकीय संस्कृतपाठशाळेंत झालें आणि पुढील विशेष अध्ययन मुंबईस झालें. प्रयागचे हकीम रामनारायणजी यांच्याजवळ यांनीं युनानी वैद्यकाचेंहि ज्ञान संपादन केलें. आज मुंबईस यांचा वैद्यकीचा धंदा पहिल्या प्रतीचा चालू आहे. वैद्यकीच्या व्यवसायाबरोबर ग्रंथसंशोधन व प्रकाशनाचें कामहि यांचें सतत चालू असतें.

वयाच्या एकोणिसाव्या वर्षी 'माधवनिदान' या सुप्रसिद्ध ग्रंथाचें 'मधुकोष' टीकेसह संशोधन करून तयार केलेला यांचा ग्रंथ निर्णयसागर छापखान्यानें प्रसिद्ध केला. तेव्हांपासून आजपर्यंत यांचें ग्रंथसंशोधन व प्रकाशन हें कार्य अव्याहत चालू आहे. जुनीं हस्तलिखितें हर ठिकाणांहून जमा करून त्यांना संशोधनपूर्वक प्रसिद्धी देण्यांत यांचा हातखंडा आहे. "सुश्रुतसंहिता" या आर्ष ग्रंथाचें "डल्हणटीके"सहित प्रकाशन करतांना अशीच काळजी घेऊन तो शुद्ध स्वरूपांत यांनीं प्रसिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. 'चक्रपाणिटीके'-सहित 'चरकसंहिता' प्रसिद्ध करतांना तर यांनीं एक प्रत जर्मनींतून आणविली होती. शुद्ध व अधिकृत प्रकाशन लोकांपुढें येण्यासाठीं वेळ, श्रम व पैसा यांच्या खर्चाकडे यांनीं कधींच पाहिलें नाहीं. या वयांतहि पहाटे चार वाजतां उठून आवश्यक कार्ये उरकल्यावर हे आपलें आवडतें संशोधनाचें कार्य सकाळीं आठ वाजेपर्यंत शान्तपणें करीत असतात. स्वतःच्या प्रकाशनाइतकें दुसऱ्यांच्या प्रकाशनांनाहि यांनीं द्रव्यसाहाय्य केलें आहे. कै. डॉ. वामन गणेश देसाई, एम्. बी. यांचें 'भारतीय रसशास्त्र' व 'औषधीसंग्रह' यांनींच छापून प्रसिद्ध केलें. जुनीं हस्तलिखितें संशोधून यांनीं आजवर पुढील ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत—

१ माधवनिदान (मधुकोष व आतंकदर्पण या दोन टीकांसह), २ सुश्रुतसंहिता (डल्हणविरचित निबंधसंग्रह व्याख्येसहित), ३ चरकसंहिता (चक्रपाणिकृत आयुर्वेददीपिका टीकेसह), ४ रसहृदयतंत्र, ५ रसप्रकाशसुधाकर, ६ गदनिग्रह, ७ राजमार्तंड, ८ नाडीपरीक्षा, ९ वैद्यमनोरमा, १० धारापद्धति, ११ आयुर्वेदप्रकाश, १२ रसायनखंड, १३ रसायनपद्धति, १४ लोहसर्वस्व,

१५ रससार, १६ रससंकेतकलिका, १७ रसकामधेनु (तीन पाद) व १८ क्षेमकुतूहल.

यांपैकीं सटीक सुश्रुत व चरक हे वैद्यांच्या अभ्यासांतील सर्वमान्य ग्रंथ असल्यानें त्यांच्या शुद्ध प्रकाशनाचें महत्त्व फार आहे. या ग्रंथाची अनुक्रमें तिसरी व दुसरी आवृत्ति निघाली आहे. या ग्रंथांतून असलेल्या संदिग्ध वचनांवर टीपा, पाठभेद, जरूर तेथें चित्रें, कोष्टकें व परिशिष्टें देऊन हे मुळांतच उपयुक्त असणारे ग्रंथ यांनीं अधिक उपयुक्त केले आहेत.

याशिवाय यांनीं संशोधलेले–१ प्रसिद्ध मन्त्रनिघण्टु व वातघ्नत्वादि निर्णय, २ त्रिशती (मूळ) हे दोन ग्रंथ पं. ज्येष्ठाराम मुकुंदजी यांनीं पंचवीस वर्षांपूर्वी प्रसिद्ध केले होते.

तथापि हीं सर्व जुन्या ग्रंथांचीं संशोधित प्रकाशनें झालीं. यांत यांचे स्वतःचे ग्रंथ फारसे नव्हते. आतां यांनीं स्वतः तयार केलेले ग्रंथहि प्रसिद्ध झाले आहेत. ते पुढीलप्रमाणेंः–१ द्रव्यगुणशास्त्र (या संस्कृत व हिंदी भाषेत लिहिलेल्या ग्रंथाचा पहिला भाग प्रसिद्ध झाला असून दुसरा छापत आहे).

हा ग्रंथ या विषयाचें पाठ्य पुस्तक म्हणून अत्यंत उपयुक्त आहे. या ग्रंथाला बनारस हिंदुविश्वविद्यालयांतील प्रधानाध्यापक डॉ. बा. अ. पाठक, एम्. बी., बी. एस्. यांचा आधुनिक पदार्थविज्ञानाची स्थूल कल्पना आणून देणारा विस्तृत विवेचक उपोद्घात आहे.

कै. वै. पं. हरिप्रपन्नशर्मा यांच्या 'रसयोगसागर' या ग्रंथाला यांचें अमोल साहाय्य झालें. आपलीं स्वतःचीं ३७ हस्तलिखितें देऊन यांनीं त्यांना मोठेंच साहाय्य केलें.

तसेंच डॉ. गणनाथ सेन यांच्या 'प्रत्यक्षशारीर' या संस्कृत ग्रंथाचें डॉ. बाके व पाठक यांचेकडून गुजराथी भाषान्तर करवून तें झंडु फार्मसीच्या मालकाच्या साहाय्यानें यांनीं प्रसिद्ध केलें.

नेपाळचे पं. हेमराज शर्मानीं संशोधिलेली 'काश्यपसंहिता' त्याच्याच विस्तृत व विद्वत्ताप्रचुर संस्कृत उपोद्घातासह यांनीं छापल्यानें वैद्यकीच्या अभ्यासकांवर फार उपकार झाले आहेत.

संशोधनपुरःसर आयुर्वेदीय ग्रंथप्रकाशनाशीं यांचें नांव कायमचें निगडित झालें आहे यांत संशय नाहीं.

यांनीं केलेली ही आयुर्वेदाची अविस्मरणीय सेवा लक्षांत घेऊन यांना मथुरेच्या संमेलनांत 'आयुर्वेद मार्तंड' ही पदवी देऊन गौरविण्यांत आलें. हरिद्वारच्या (१९२५) व ग्वाल्हेरच्या (१९३२) अ. भ. वै. संमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान यांना देण्यांत आला. एकंदर सात संमेलनांत यांचा विशेष गौरव करण्यांत आला. संमेलनाला हे आपले मानाचे, गौरवाचे आणि इभ्रतीचे प्रतीक वाटतात.

संमेलनांतील चालू कार्यकर्त्यांशीं यांचे मतभेद असले तरी यांच्या योग्यतेविषयीं प्रतिपक्षाच्या मनांतसुद्धां मतभेद नाहीं.

पं. मदनमोहन मालवीय यांच्या लक्षांत यांची योग्यता येतांच त्यांनीं बनारसच्या हिंदुविद्यापीठांत रु. ५०० वर यांना आयुर्वेदशाखेचे प्रधानाध्यापक नेमिलें. पण यांची मुंबईतील धंद्याची प्राप्ति व जबाबदारी याच्या चौपटीनें असल्यानें त्या विद्यालयाची व जागेची घडी बसवून हे आपलें नांव राखून परत व्यवसाय करण्यास मुंबईस आले.

मुंबई प्रांतांत घडविलेल्या वैद्यक-नियंत्रण कायद्यानुरूप अस्तित्वांत आलेल्या पहिल्या बोर्डांत हे सभासद म्हणून पांच वर्षें काम करीत होते.

भारतांतील बहुतेक आयुर्वेद-संस्थांशीं संचालक, परीक्षक, सल्लागार, अध्यक्ष, दाते इत्यादि अनेक नात्यांनीं यांचा संबंध आला आहे. खास मुंबईसहि कै. पं. हरि प्रपन्नजींच्या सहकार्यानें यांनीं 'श्री. मुंबई आयुर्वेदीय पाठशाळा' चालविली होती.

आज हे पुष्कळ संस्थांतून निवृत्त होत असले तरी आपलें उर्वरित आयुष्य व धंद्यांतील बहुतेक कमाई ग्रंथप्रकाशनाकरितां खर्च करावी असा यांचा अभिनंदनीय मनोदय आहे. आयुर्वेदाच्या इतिहासांत यांना मोठें मानाचें स्थान आहे (आयुर्वेदाचार्य पां. ह. देशपांडे).

**आजगांवकर, जगन्नाथ रघुनाथ**— (जन्म स. १८७९) मराठी भाषेंतील सुप्रसिद्ध लेखक आणि संतकाव्यांचे अभ्यासक. यांचें गांव सावंतवाडी संस्थानांतील आजगांव. इंग्रजी ४ थीनंतर यांना शिक्षण घेतां आलें नाहीं (१८९६).

यांचें पहिलें लेखन मुंबईच्या 'गुराखी' नांवाच्या दैनिक पत्रांत झालें. नंतर यांनीं अनेक ठिकाणीं लिहिलें असलें तरी यांची विशेष प्रसिद्धि केसरींतील लेखामुळें झाली. कै. शि. ए. भारदे यांनीं 'भारद्वाज' या नांवानें 'सुधारक' साप्ताहिकांत 'आळंदीचा ज्ञानदेव ज्ञाने-

श्वरीचा कर्ता नव्हे ' या मथळ्याखालीं एक लेखमाला लिहिली. त्या लेखांत 'ज्ञानेश्वरी लिहिणारे ज्ञानदेव निराळे व आळंदीचे ज्ञानदेव निराळे' असें सिद्ध करण्याचा यत्न केला होता. त्या वेळीं यांनीं त्याविरुद्ध मत केसरीद्वारा प्रसिद्ध केलें. तेव्हां दुसरी बाजू लोकांच्या निदर्शनास आली. नंतर विस्तृतपणें खंडन करणारे लेख कै. श्रीपतबुवा भिंगारकर यांनीं लिहिले आणि ते पुढें पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाले.

तसेंच कै. राजारामशास्त्री भागवत यांच्या ' मराठ्यांनीं ख्रिश्चन व्हावें ' या लेखावर यांनीं केलेली टीका, कै. बा. अ. भिडे यांच्याशीं पांच वामनांबद्दल व केळकर यांच्याशीं केलेला 'मतिविकार' नाटकावरील टीकेबद्दल वाद हे यांच्या सडेतोड टीकापद्धति व मार्मिक लेखनशैली यांबद्दलच्या प्रसिद्धीस कारण झाले.

यांनीं कविताहि शेंकडों लिहिल्या आहेत. 'कवनकुतूहल ' हें यांच्या कवितासंग्रहाचें पुस्तक प्रसिद्ध आहे. वाटेल त्या वृत्तांत किंवा चालीवर सफाईदार कविता करण्यांत यांचा हातखंडा असे. हे कविताहि फार थोड्या वेळांत करतात. एकदां केसरींतील पद्यरचनेच्या चढाओढींतील पहिलें बक्षीस यांना मिळालें होतें. तथापि हे आपणांस कवि म्हणवून घेत नाहींत.

आजपर्यंत यांनीं अनेक पुस्तकें लिहिलीं असलीं तरी ' महाराष्ट्र कविचरित्रा 'मुळें यांना विशेष प्रसिद्धि लाभलेली आहे. ३१०० पृष्ठें व अकरा भाग या ग्रंथानें व्यापिले आहेत. या चरित्रग्रंथांत माहितीच्या शास्त्रशुद्धतेपेक्षां भाविकपणाच अधिक आहे, आणि त्यामुळेंच हीं चरित्रें अत्यंत रसाळ झालेलीं आहेत. शास्त्रशुद्ध चरित्र लिहिण्यापेक्षां वाङ्मयाचें रसग्रहण करण्यांत हे मोठे कुशल आहेत. त्यामुळें संतचरित्राची चिकित्सा करणाऱ्या बुद्धिवाद्यांचें समाधान साधण्यापेक्षां सर्वसामान्य वाचकांचे हे अत्यंत आवडते लेखक बनले आहेत.

यांच्या लेखणीप्रमाणें यांची वाणीहि मोठी प्रवाही आणि परिणामकारक आहे. वेंचक शब्दप्रयोग, स्पष्ट व जोरदार उच्चार, तळमळ, उपरोध आणि उतारे हे यांच्या वक्तृत्वांतील विशेष होत. पुणें वसंतव्याख्यानमाला ( १९१० ), व मराठी साहित्यसंमेलन ( १९०९ ) येथील यांचीं मराठी कवींवरील व्याख्यानें अत्यंत गाजलेलीं आहेत. मुंबई विश्वविद्यालयांत ५ वर्षे मॅट्रिकचे आणि नागपूर विश्वविद्यालयांत एम्. ए. व बी. ए.चे हे परीक्षक होते.

यांना ' महाराष्ट्रभाषाभूषण ' ही पदवी आदरानें लावण्यांत येते.

यांचे ग्रंथः—१ महाराष्ट्र कविचरित्र १–११ खंड, २ नेपाळ-वर्णन, ३ कवनकुतूहल ( यांचा कवितासंग्रह ), ४ सं. प्रणयानंद नाटक, ५ चक्रवर्ति हम्मीर, ६ विद्वान् सोबती कीं कुशल गृहिणी, ७ सन्त गोपाळबुवा माळगांवकर चरित्र ( १९२७ ), ८ भारतीयांचे वेद, इत्यादि.

**आजरेकर, श्रीपाद लक्ष्मण**—( जन्म स. १८८३ ) सुप्रसिद्ध वनस्पतिशास्त्रज्ञ.

यांचें शिक्षण आजरें व बेळगांव येथें होऊन हे मॅट्रिक झाले ( १८९९ ). यांचा बी. ए. चा विषय वनस्पतिशास्त्र व प्राणीशास्त्र हा होता. यानंतर यांना तंत्रविषयक ज्ञानसंपादन करण्याकरितां देण्यांत येणारी ' सर मंगळदास नथूभाई शिष्यवृत्ति ' मिळून हे केंब्रिज विश्वविद्यालयांत दाखल झाले ( १९०५ ). ' शास्त्रीय शेती ' या विषयाबद्दल यांना तेथें प्रशस्तिपत्र मिळालें ( १९०७ ) व पुढें बी. ए. ही पदवी मिळाली ( १९०८ ). या परीक्षेकरितां यांचे वनस्पति, भूगर्भ व रसायन हे विषय होते. शिवाय यांना तेथें मुंबई सरकारनें वनस्पतीमुळें उत्पन्न होणाऱ्या विशेष रोगांचा अभ्यास करण्याकरितां शिष्यवृत्ति दिली होती.

हिंदुस्थानांत परत आल्यावर यांना पुणें ॲग्रिकल्चरल कॉलेजमध्यें वनस्पतिरोगकारक हरिद्द्रव्यहीन ' वनस्पति शास्त्राचे ' प्राध्यापक नेमण्यांत आलें. या स्थानावर हे आठ वर्षें होते. तेथें यांनीं मुंबई शेतकी खात्यांतील वनस्पतिरोगसंशोधनाचा पाया घालण्याचें महत्त्वाचें कार्य केलें. स. १९१७–१९ च्या दरम्यान यांना मुंबई सरकारच्या वनस्पतिशास्त्रज्ञाची जागा मिळाली. पुढें यांना वऱ्हाड मध्यप्रांताच्या त्याच जागेवर मध्यवर्ति सरकारनें नेमिलें ( १९२० ). पुढें हे मुंबई प्रांताचे वनस्पतिरोगतज्ञ म्हणून नेमले गेले. त्यानंतर हे पुण्याच्या शेतकी कॉलेजचे प्रिन्सिपल झाले ( १९२२ ). हें स्थान स्वप्रयत्नानें मिळविणारे हे पहिलेच हिंदी गृहस्थ होत. पण यांचा ओढा प्राध्यापनकार्याकडे असल्यानें यांनीं मुंबईच्या ' रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स ' या उच्च शिक्षण देणाऱ्या संस्थेंत वनस्पतिशास्त्राचे प्राध्यापक म्हणून आपली बदली करून घेतली. तेथें पांच वर्षें काम केल्यावर यांची अहमदाबादच्या गुजराथ कॉलेजला बदली झाली व तेथून हे सेवानिवृत्त झाले ( १९३८ ).

यांचें अध्यापन, माहिती, भाषा व आकर्षकपणा यांनीं

युक्त असे. शिवाय यांच्या व्यक्तित्वाची छाप यांच्या समीप येणाऱ्या प्रत्येकावर पडे. यांचें संशोधनकार्यहि महत्त्वाचें आहे. 'वनस्पतींचे रोग' हा यांचा मुख्य विषय असून त्यावर देशी व परदेशी नियतकालिकांत यांनीं अनेक लेख लिहिले आहेत. त्यांपैकीं 'साठवून ठेवलेल्या बटाट्यांच्या रोगा'वरील यांचें संशोधन फारच महत्त्वाचें समजण्यांत येतें. यांनीं शोधून काढलेल्या बऱ्याच हरिद्-द्रव्यहीन वनस्पतींना 'आजरेकर' म्हणूनच शास्त्रीय ग्रंथांत संबोधण्यांत येतें.

यामुळें यांची मानमान्यता विशेष वाढली. यांनीं आपल्या सहकाऱ्यांच्या मदतीनें 'इंडियन बोटॅनिकल सोसायटी' या नांवाची संस्था काढली. शिवाय त्या संस्थेतर्फे निघणाऱ्या मासिकाच्या संपादकमंडळांतील हे प्रमुख आहेत. तसेंच अलाहाबाद येथील 'नॅशनल अॅकॅडमी ऑफ सायन्स' या संस्थेचे हे फेलो होते. शिवाय हिंदुस्थानांत शुद्ध शास्त्रीय संशोधनास वाहिलेल्या दोन संस्थांपैकीं 'धि नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्सेस ऑफ इंडिया' या संस्थेच्या संस्थापकांपैकीं हे एक होत. तसेंच मुंबई व आंध्र विश्वविद्यालयानें यांना आपल्या शास्त्रीय विषयांच्या कमिट्यांवर नेमिलें आहे.

यांचें वाचन व नवेंनवें संशोधन आकलन करण्याचें काम सतत चालू असतें. त्याचप्रमाणें मराठी भाषेंत लेखन करून आपलें ज्ञान लोकांना देण्याचें कामहि हे करीत असतात. महाराष्ट्र ज्ञानकोशांतील वनस्पतींच्या रोगांवरचा निबंध यांनींच लिहिलेला आहे.

तसेंच नागपूरच्या नवभारत ग्रंथमालेंत 'वनस्पति-जीवन' हें यांचें पुस्तक प्रसिद्ध झालें आहे. तसेंच केवळ शास्त्रीय ज्ञान लोकांना देण्याकरितांच मराठी भाषेंत निघणारें 'सृष्टिज्ञान' हें मासिक चालविण्यांत यांचा हात आहे. त्यांत यांचे बरेच लेख प्रसिद्ध झाले आहेत. हें सर्वच लेखन उच्च दर्जाचें आहे.

हिंदवी लोक कोणत्याहि संशोधनाच्या व जबाब-दारीच्या कामावर काम करण्यास सर्वतोपरि लायक आहेत असें यांचें आग्रहाचें प्रतिपादन असून सरकारनें युरोपियनांच्या तोडीनें हिंदवी गृहस्थांना लायकीप्रमाणें या जागा द्याव्यात याबद्दल हे वरिष्ठांशीं नेहमीं झगडत असत. त्याबाबत आपल्यावर वरिष्ठांचा राग होऊन आपलें नुकसान होईल किंवा काय याची पर्वा यांनीं कधींच केली नाहीं. या दृष्टीनें, १९१८ सालीं लार्ड इस्लिंग्टन यांचे अध्यक्षतेखालीं जें 'पब्लिक सर्व्हिस कमिशन' सरकारनें नेमिलें त्या कमिशनपुढें यांची झालेली साक्ष फारच मुद्देसूद, दणदणीत व महत्त्वाची आहे.

सेवानिवृत्त होऊन हे पुण्यास राहूं लागल्यानंतर यांच्या ज्ञानाचा, अभ्यासाचा आणि अभ्यासू वृत्तीचा अनेक संस्थांना फायदा मिळत असतो.

**आठल्ये, कृष्णाजी नारायण**—(जन्म स. १८५२–मृत्यु स. १९२७) कवि, टीकाकार व निबंधकार. टेंभू (जि. सातारा) येथें जन्म. वडील दशग्रंथी वैदिक असल्यानें यांनाहि घरीं तेंच शिक्षण मिळालें. कऱ्हाड येथें मराठी शिक्षण पुरें करून हे इंग्रजी शाळेंत गेले. पण द्रव्याच्या अडचणीमुळें तें सोडून यांनीं पुण्यास येऊन ट्रेनिंगचें शिक्षण घेतलें. सातारा जिल्ह्यांत पांच वर्षें शिक्षकाची नोकरी पत्करली. पण पुढें चित्रकलेचें अधिक शिक्षण घेण्याकरितां हे मुंबईच्या जे. जे. आर्ट स्कूलमध्ये सुमार तीन वर्षें राहिले व यांनीं तैल-चित्रकलेचें ज्ञान संपादिलें. मध्यंतरी साताऱ्याच्या आबासाहेब महाराजांनीं यांच्याकडून आपली एक मोठी तसबीर करून घेतली. तो अभ्यास पुरा झाल्यावर हे बडोद्यास गेले व तेथें हायस्कुलांत रंगकलेवर यांचें एक व्याख्यान झालें. तें व्याख्यान दिवाण सर टी. माधवराव यांना इतकें आवडलें कीं त्यांनीं यांस दरमहा शंभर रुपये पगारावर आपणांकडे ठेवून घेतलें. आणि आपल्या बैठकीच्या शेजा-रील खोली यांना काम करावयास दिली. त्या ठिकाणीं यांनीं श्री. जमनाबाईसाहेब गायकवाड, ताराबाबा सावंत-वाडीकर, रघुनाथराव भोसले सावंतवाडीकर, डॉ. भाल-चंद्र, रावबहाद्दूर कीर्तने यांच्या तसबिरा चितारल्या. पुढें राजे सर टी. माधवराव दिवाणगिरीचें काम सोडून मद्रासेस गेले, त्यांच्याबरोबर हेहि तिकडे गेले. तेथून यांचे एक बंधू मलबारांत कोचीनास आजारी असल्यामुळें हे कोचीनास गेले. तेथें हे वीस वर्षें राहिले. तेथें व्हालकार्ट नांवाच्या कंपनीचे मॅनेजर क्लैन यांचे हे हिंदुस्थानी भाषा शिकविणारे पंडित होते.

तेथें स्थिर झाल्यावर गीतेवर नाना वृत्तांत 'गीता-पद्यमुक्ताहार' नांवाचें पुस्तक यांनीं लिहिलें. हेंच यांचें पहिलें पुस्तक होय. या पुस्तकाबद्दल निर्णयसागर छापखा-न्याच्या मालकांनीं यांच्या हातांत बारा तोळ्यांचें सोन्याचें कडें घालून यांचा सन्मान केला. याच वेळीं शृंगेरीपीठाच्या शंकराचार्यांकडून यांस 'महाराष्ट्रभाषाचित्रमयूर' ही पदवी अर्पण करण्यांत आली. त्यानंतर यांनीं 'केरळ-कोकीळ' मासिक सुरू केलें. प्रथम पांच वर्षें हें कोचीनास निघे व नंतर मुंबईस गुर्जर कंपनीकडून निघूं लागलें. हें

मासिक त्या वेळीं आबालवृद्धांना अत्यंत प्रिय असे. त्या वेळीं याचे तीन हजारांवर वर्गणीदार असत. कविता, पुस्तकपरीक्षण, लोकोत्तर चमत्कार या सदरांवर लोकांच्या फार उड्या पडत. तें पंचवीस वर्षे चालवून यांनीं मराठी वाचकांत वाङ्मयाची अभिरुचि उत्पन्न केली. 'कलम-बहादूरांना शेलापागोटे' हें यांचें सदर निःस्पृह पण विघातक असे. यांची भाषा हृद्य व आकर्षक असे. वादकुशल टीकाकार म्हणून यांची ख्याति होती. यांचें वाङ्मयः– १ ब्रह्मचर्याश्रम, २ सुलभवेदान्त, ३ कर्मयोग, ४ गीता-(आर्याबद्ध), ५ सार्थ दासबोध, ६ राजयोग, ७ ज्ञानेश्वरी-सार्थ, ८ प्रहृदयेचा फटका, ९ मथुरा-गणेशसौभाग्य, १० माहेरचें मूळ-काव्य, ११ मुलीचा समाचार-काव्य, १२ शृंगारतिलकादर्श-काव्य, १३ सासरची पाठवणी-काव्य, १४ सुश्लोकलाघव-काव्य, १५ पंचतंत्रामृत–कादंबरी, १६ विवेकानंदजीवन, १७ मुलें थोर कशीं करावीं ? १८ ज्ञानेश्वराचें गौडबंगाल, १९ माझें कलसूत्री घर अथवा नरदेहाची रचना, २० नजरबंदशिक्षक, २१ माझें गुरुस्थान, २२ वसंतपूजा, २३ समर्थांचें सामर्थ्य, २४ फाकडे तलवारबहादूर, २५ गीता पद्य-मुक्ताहार ( अ. म. वा. से. ).

**आनंदाचार्लू, पी., रावबहादूर**—( मृत्यु स. १९०८ ).

काँग्रेसच्या मूळ संस्थापकांपैकीं एक. हे नागपूरच्या ( १८९१ ) काँग्रेसचे अध्यक्ष होते. हे उत्तम वक्ते होते. स्वयंसैनिकदलांत हिंदी लोकांना घेत नव्हते याबद्दल लोकांचीं अन्तःकरणें थरारून सोडणाऱ्या भाषणानें यांनीं निषेध व्यक्त केला. 'आर्मीनियन, निग्रो, पश्चिम आफ्रिकेंतील मोलाटो वगैरे मानवी समाजांत कोठेंहि मानाचें स्थान नसलेल्या व कलकत्त्यासारख्या गल्ल्याकुच्यांतून भटकत फिरणाऱ्या लोकांना हिंदी स्वयंसेवकदलांत प्रवेश मिळतो, आणि ते आमच्या घरादारांचे संरक्षक' बनतात. पण हिंदी लोकांचा मात्र स्वयंसेवकदलांत प्रवेश होत नाहीं. सरकारनें हे असे चीड अणणारे वर्णभेद निर्माण केले आहेत,' असे जळजळीत उद्गार यांनीं काढले. वीस वर्षांपेक्षां अधिक काल यांनीं देशाची सेवा केली ( राष्ट्रीय सभेचा इतिहास पा. ८९ ).

**आपटे, गोविंद विनायक**—( मृत्यु स. १९२५ ) इतिहाससंशोधक. यांनीं (१) आपटे घराण्याचा इतिहास, (२) पटवर्धन घराण्याचा इतिहास, (३) बरवे घराण्याचा इतिहास, (४) निर्मळक्षेत्रवर्णन, (५) श्रीक्षेत्र वाईवर्णन, (६) न्यायाचा मासला–हीं पुस्तकें लिहिलीं आहेत ( अ. म. वा. से. ).

**आपटे, गोविंद सदाशिव**—( जन्म स. १८७०–मृत्यु स. १९३७ ) सुप्रसिद्ध ज्योतिषशास्त्रज्ञ.

यांचा ज्योतिषशास्त्राचा व पंचांगाचा व्यासंग जबर होता. हे मुळचे साताऱ्याचे राहणारे. यांचें मॅट्रिकपर्यंत शिक्षण पुण्यास झालें व पुढचें शिक्षण उज्जयिनी येथें माधव कॉलेजांत झालें. ग्वाल्हेर व उज्जयिनी येथें सायन्स, गणित व विशेषतः रसायनशास्त्राचे हे प्रोफेसर होते. १० वर्षे हे माधव कॉलेजचे प्रिन्सिपल होते. कॉलेजांत काम करीत असतांना यांना ज्योतिषशास्त्राचा नाद लागला. हे १९०४ सालीं मुंबईस झालेल्या अखिल भारतीय पंचांग सभेस उज्जयिनीचे प्रतिनिधी म्हणून हजर होते. १९२५ सालीं पुणें येथें झालेल्या पंचांगसभेंत शुद्ध पंचांग पक्षातर्फे हे पंच होते. यांनीं 'ज्योतिर्गणितवार्तिक' व 'सर्वानंद करणकम्' इत्यादि संस्कृत व मराठी ग्रंथ लिहून प्रसिद्ध केले आहेत.

'सर्वानन्दकरणम्' हा यांचा करणग्रंथ बनारस हिंदु-विश्वविद्यालयांत व बनारस गव्हर्नमेंट संस्कृत कॉलेज-मध्यें आचार्यपरीक्षेस नेमिला आहे.

हे एम्. ए., बी. एस्सी. असून यांचे ग्रंथ ग्रह-लाघवाच्या धर्तीवर आहेत. त्यांत यांनीं सूक्ष्मता साधण्याकरितां आधुनिक सुधारणा समाविष्ट केल्या आहेत. उज्जयनीच्या वेधशाळेंत स्वतः वेध घेऊन यांनीं हे ग्रंथ लिहून प्रसिद्ध केले असल्यानें त्यांना विशेष महत्त्व आहे. तसेंच प्रथम संस्कृतभाषेंत लिहिल्यानें सर्व प्रान्तांत त्यांचा प्रसार होण्यास मदत झाली आहे. सर्वानन्द-लाघवाचें यांनीं स्वतःच मराठींत भाषान्तर केलें. हिन्दींतहि पं. मुकुंद वल्लभ मिश्र यांनीं भाषान्तर केलें.

तसेंच यांच्या पंचांग जलद तयार करण्यास उपयुक्त असणाऱ्या 'पंचांगचिंतामणि' व 'ग्रहचिंतामणि' या दोन सारण्या 'पुणें ज्योतिषशिक्षण महाविद्यालया'नें प्रसिद्ध केल्या आहेत. शिवाय यांनी "The Initial Point of Our Zodiae" या नांवाचें इंग्रजी पुस्तकहि प्रसिद्ध केलें आहे. यांना सरकारनें रावसाहेब व शके १८३७ च्या ज्योतिषसंमेलनानें 'गणकचूडामणि' ही पदवी दिली होती.

**आपटे, दत्तात्रय विष्णु**—( जन्म स. १८८०–मृत्यु स. १९४३ ) सुप्रसिद्ध इतिहास-संशोधक.

यांचें मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण जमखिंडी येथें झालें व फर्ग्युसन कॉलेजमधून हे बी. ए. झाले ( १९०२ ).

वंगभंगाचे चळवळींत हे यवतमाळ ( वऱ्हाड ) येथें राष्ट्रीय शाळेंत काम करीत व 'हरिकिशोर' या साप्ताहिकांत लिहीत. पण दडपशाहींत तें सर्व बंद पडून हे मुंबईस 'राष्ट्रमत' दैनिकाच्या संपादकवर्गांत आले. पण तेंहि बंद पडल्यावर हे गोव्यांत शिक्षक म्हणून गेले. तेथें हे पोर्तुगीज भाषा शिकले. पण पहिल्या महायुद्धास सुरुवात झाल्यावर तेथें राहणेंहि यांना अशक्य झालें, व हे पुण्यास आले व तेथेंच आमरण राहिले.

पुण्यास आल्यावर हे कांहीं दिवस 'चित्रमयजगत्' व 'शालापत्रक' या मासिकांचें संपादकीय काम पाहत. पण असहकारितेच्या चळवळींत तेथील धोरण यांना जमेनासें झालें. तेव्हां यांना आनंदाश्रमांत प्रेसचे व्यवस्थापक म्हणून काम मिळालें. याच वेळीं मुधोळच्या महाराजांनीं यांच्याकडून 'मुधोळच्या राजघराण्याचा इतिहास' लिहून घेतला.

हे दिखाऊ राष्ट्रभक्त नसून हाडाचे तत्त्वज्ञ राष्ट्रभक्त होते. इतिहास-संशोधक राजवाडे यांचे हे शिष्य असल्यानें यांच्या राष्ट्रभक्तीला ऐतिहासिक तत्त्वज्ञानाचा पाठिंबा होता. शास्त्रशुद्ध व्यासंग ही राष्ट्राची खरी संपत्ति होय, असा यांचा विश्वास असे. या धोरणानें सतत निरपेक्ष व्यासंग करणें आणि व्यासंगी लोकांना व्यासंग करण्यास उत्तेजन देणें ही यांची भूमिका होती. यामुळें यांच्याभोंवतीं व्यासंगी लोकांची एक प्रभावळ उत्पन्न झाली.

यांनीं मराठ्यांच्या इतिहासाचें सखोल अध्ययन केलें होतें, आणि त्यांत एक प्रकारची शिस्त होती.

यांचे ग्रंथ–१ इतिहासमंजिरी, २ श्रीरंगपट्टणची मोहीम, ३ शिवचरित्रप्रदीप, ४ शिवभारताची प्रस्तावना, ५ घोरपडे घराण्याचा इतिहास, ६ शिवचरित्र-निबंधावलि, ७ पत्रसारसंग्रह.

हें यांचें लेखन व संकलन इतिहासाच्या सूक्ष्म अभ्यासाला मार्गदर्शक झालें आहे. यामुळेंच यांना पुण्याच्या भारत-इतिहास-संशोधकमंडळाच्या सन्माननीय आजीव सभासदत्व आणि मंडळाच्या उपाध्यक्षाचा मान देण्यांत आला होता. सतत व्यासंगानें व निष्ठावंत शिष्य तयार करून राजवाडे-सांप्रदायाची परंपरा यांनीं पुढें चालविली होती.

इतिहास विषयाप्रमाणेंच गणित-ज्योतिषाचाहि यांना नाद असे. त्या दिशेनें यांनीं शिवाजीच्या वेळच्या ज्योतिष-संशोधनाच्या प्रयत्नाचा उलगडा केला. खरे जंत्रीचें महत्त्व इतिहाससंशोधकांस पटवून दिलें. तसेंच करणकौस्तुभ, बीजगणित, लीलावती इत्यादि ग्रंथांचें विवरण केलें. अलीकडे भास्कराचार्यांच्या संस्कृत ग्रंथाचें सर्वांना समजेल असें सटीप भाषांतराचें काम यांनीं अंगावर घेतलें होतें. तें जवळजवळ संपवीत आणलें होतें. याशिवाय टिळक-पंचांगाचे दृष्टीनेंहि यांनीं बरेंच लिखाण केलें आहे. अगदीं अलीकडे हे केरोपंती ग्रहसाधनावरून सूर्यग्रहणाचें सूक्ष्म गणित कसें बसवावें या कामगिरींत गुंतले होते. या बाबतींत अनेक अभ्यासकांशीं विचार-विनिमय करून व गणिताच्या सर्व पद्धती तपासून पाहून केरोपंती ग्रहसाधनाला यांनीं मानाचें स्थान दिलें होतें.

**आपटे, नारायण हरि**—( जन्म स. १८८९ ) सुप्रसिद्ध ध्येयवादी कादंबरीकार व लघुकथालेखक.

सातारा जिल्ह्यांतील समडोळी गांवीं यांचा जन्म झाला. तेथें प्राथमिक व सातारा येथें इंग्रजी ४ इयत्तेपर्यंत यांचें शिक्षण झालें. स. १९०४ मध्यें हे घरांतून पळाले व एक वर्षपर्यंत हे हिंदुस्थानांत फिरत होते. स. १९०५–११ पर्यंत यांचें वास्तव्य जयपूर येथें होतें. स. १९०६ मध्यें हरि नारायण आपट्यांच्या करमणूक पत्रांत यांची पहिली गोष्ट प्रसिद्ध झाली. स. १९०९ मध्यें यांची 'अजिंक्य तारा' ही कादंबरी प्रसिद्ध झाली. आणि महाराष्ट्रांत लेखक म्हणून हे पुढें आले. तेव्हांपासून आतांपर्यंत यांनीं सतत लेखन करून विपुल ललित वाङ्मय निर्माण केलें आहे आणि तें अत्यंत लोकादरास पात्र झालें आहे.

हे 'किर्लोस्कर' मासिकाचे कांहीं वर्षे सहसंपादक होते. तसेंच यांनीं 'मधुकर' नांवाचें मासिकहि पुष्कळ वर्षे चालविलें.

यांच्या कादंबऱ्यांत सर्वांत जास्त लोकप्रियता मिळालेलें पुस्तक या नात्यानें "न पटणारी गोष्ट अर्थात् चित्तशुद्धि" यास विशेष महत्त्व आहे. "कुंकू" या सुप्रसिद्ध चित्रपटाचें कथानक यांनीं या कादंबरीवरून तयार केलें व त्यामुळें यांना कीर्तीचा व तो चित्रपट तयार करणाऱ्या प्रभात फिल्म कंपनीस पैशाचा अतोनात लाभ झाला. या चित्रपटाचें दिग्दर्शन व्ही. शांताराम यांनीं केलें असून केशवराव दाते व शांता आपटे या कलाकारांच्या त्यांत भूमिका होत्या. सध्यां चित्रपटसृष्टींत इतर कलाकारांच्या मानानें कथालेखकास तुच्छ लेखण्यांत

येत असलें, तरी "कुंकू "च्या प्रचंड यशांत यांचा वांटा बराच मोठा होता हें निःसंशय.

याशिवाय "पहाटेपूर्वीचा काळोख" व "भाग्यश्री" या कादंबऱ्याहि त्यांतील लालित्य, वास्तवता इत्यादि गुणांमुळें लोकप्रिय झाल्या आहेत.

कथालेखन हा ह्यांच्या लेखनाचा दुसरा एक महत्त्वाचा प्रांत आहे. यांच्या कथाहि यांच्या कादंबऱ्यांप्रमाणें मांडणी व संदेशाच्या दृष्टीनें महत्त्वाच्या असतात. आरामविराम, सुमनगंध इत्यादि यांचे लघुकथासंग्रह सुप्रसिद्ध आहेत.

आजच्या तरुणांच्या गरजा, परिस्थिति व मनाची घडण ध्यानांत घेऊन, त्यांच्याशीं वाटाघाट करून एक वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध गृहस्थ या नात्यानें यांनीं त्यांना केलेल्या सूचनांनीं यांच्या वाङ्मयाचा बराच मोठा भाग व्यापिला आहे. इकडील परिस्थितीचा, आपल्या धर्माचा, संस्कृतीचा व आर्थिक घडामोडीचा विचार करून यांनीं पुस्तकें लिहिलेलीं असल्यानें तीं अतिशय लोकप्रिय झालीं आहेत. 'सुगरिणीचा संसार', 'गृहसौख्य' इत्यादि पुस्तकें या वर्गांत येतात.

यांचें लेखन आकर्षक, ठसठशीत आणि परिणामकारक असतें. कथानकें साधीं आणि स्वाभाविक असतात. त्यांची मांडणी करतांना यांची कुशलता व्यक्त होते. स्वभाव-रेखन पटणारें असतें आणि वर्णनांत मर्यादातिक्रम कोठेंहि नसतो. 'कलेकरितां कला कां जीवनाकरितां कला' अशा वादांत हे कधींच पडत नाहींत. पण आपल्या लेखनानें मात्र 'जीवनाकरितां कला' हा आपला सिद्धान्त हे डोळ्याआड कधींहि होऊं देत नाहींत. त्यामुळें यांचें लेखन हें समाजाला केवळ घटकाभर करमणुकीचें न वाटतां कायमचें लाभदायक वाटतें.

हे सिद्धहस्त लेखक आहेत. यांना कथानकें निवडण्याकरितां भोंवतालच्या परिस्थितीला सोडून अंतराळांत जावें लागत नाहीं. हे रोजच्या घरगुती प्रसंगांतून लोकांच्या मनाला हलवून सोडणाऱ्या सुंदर कथा, कादंबऱ्या निर्माण करतात. यांची लेखनशैली व मांडणी स्वयंभू आहे. यांना संस्कृत किंवा युरोपांतील लेखकांचा आश्रय न घेतां भावनापूर्ण कथा लिहितां येतात.

यांच्या या यशस्वीपणानें कांहीं आत्मविश्वास नसलेल्या लेखकांनीं यांच्यावर भाषांतराचा किंवा चौर्याचा आरोपहि केला; पण हे त्या सर्व प्रसंगांतून सुखरूप बाहेर पडले आहेत, व आरोप करणारेच फजीत झाले आहेत.

जें तंत्र लोकप्रिय असेल तें घेऊन आपलीं कथानकें लोकांपुढें हे मांडूं शकतात. तसेंच इष्ट प्रमेय डोळ्यांपुढें ठेवून तें गणिताप्रमाणें आपल्या कथानकांतून सहज सिद्ध करून दाखवितात. त्यामुळें यांच्या कादंबऱ्या एक ठशाच्या कधींच भासत नाहीत.

वयाच्या दृष्टीनें जुन्या पिढींतील परंतु विचारांच्या दृष्टीनें मात्र नवतरुणांच्या इतकेच पुढारलेले हे लेखक असल्यानें हे नव्या-जुन्यांत सारखेच लोकप्रिय आहेत. यांची भूमिका गंभीर विचारवादाची आहे. केवळ प्रक्षोभक विचार व्यक्त करण्यापेक्षां संयमपूर्वक विचारांच्या सर्व बाजू भावनात्मकतेनें लोकांच्या पुढें मांडण्याचें काम हे करतात. कारण खपेल तें लिहावें अशी यांची वृत्ति नाहीं व कधींच नव्हती.

**आपटे, महादेव चिमणाजी**—(जन्म स. १८४५–मृत्यु स. १८९४) आनंदाश्रमाचे संस्थापक.

प्रथमपासूनच बुद्धिमान् व अभ्यासू वृत्ति असल्यामुळें घरच्या आत्यंतिक गरिबींतहि स. १८६८ सालीं ते बी. ए. झाले, व पुढें १८७१ च्या एलएल्. बी. च्या परीक्षेंतहि पास होऊन हे पहिले आले. पुढें मुंबईच्या नानाशंकरशेटच्या शाळेंत हेडमास्तराचें काम करून उत्कृष्ट शिक्षक म्हणून हे प्रसिद्धीस आले. यांच्या योग्यतेनुरूप सरकारकडून यांना युनिव्हर्सिटीचे फेलो नेमण्यांत आलें. पुढें वकिली करावयास लागल्यानंतरहि मुंबईचे प्रख्यात कायदेपंडित म्हणूनहि हे समजले जाऊं लागले. क्रीडाभुवनाच्या दंगयाच्या खटल्याचें काम यांनीं इतक्या सफाईनें चालविलें कीं, मॅजिस्ट्रेटनें खटल्याचा निकाल यांच्या विचारसरणीप्रमाणेंच दिला.

देशाच्या कलाकौशल्याच्या वृद्धीबद्दल यांना फार कळकळ वाटत असे. ह्या कलाकौशल्याच्या शिक्षणासाठीं यांनीं एका गृहस्थास स्वखर्चानें विलायतेंत व अमेरिकेंत पाठविलें होतें. त्याचप्रमाणें पुण्यांत चाकू-कात्र्यांचा कारखाना काढण्याची यांची खटपट चालली होती. परंतु ह्या दोन्हीं कार्यांत बराच द्रव्यनिधि खर्च होऊनहि फायदा झाला नाहीं. पुणें येथील 'आनंदाश्रम' ही संस्कृत ग्रंथांच्या जीर्णोद्धारार्थ काढलेली संस्था यांनींच प्रस्थापित केलेली आहे. त्याचप्रमाणें या संस्थेंत अभ्यास करणाऱ्या १०–१२ विद्यार्थ्यांची जेवणाची व राहण्याची आणि प्रत्यहीं पांच संन्याशांच्या पुढीची व्यवस्थाहि यांनीं करून ठेवलेली आहे.

यांचें मराठी लेखनहि चांगलें असे. " मौजेच्या चार घटका " हें शाकुंतल नाटकाचें यांनीं केलेलें भाषांतर प्रसिद्ध आहे.

यांच्या इच्छेप्रमाणें आनंदाश्रमांत यांनीं आपल्यासाठीं एक समाधि बांधून ठेविली होती. पुढें संन्यास घेतल्यावर ' आनंदसरस्वती ' हें नांव धारण केल्यावर हे २२ ऑक्टोबर १८९४ रोजीं मुंबईस समाधिस्थ झाले. पुढें यांचें शव पुण्याच्या आश्रमांतील समाधींत स्थित केलें गेलें.

**आपटे, वामन शिवराम**—( जन्म स. १८५८–मृत्यु स. १८९२ ) सुप्रसिद्ध बुद्धिमान्, विद्वान्, त्यागी व शिस्तीचे गृहस्थ. यांचे वडील जामिनकींत बुडाले व त्या धक्क्यानें ते वारले. यांचा वडील भाऊ कॉलऱ्यानें वारल्यानें आईहि धाय मोकलून वारली. तेव्हां हेडमास्तर कुंटे यांच्या आश्रयावर यांनीं आपला अभ्यास पार पाडला.

मॅट्रिकमधील पहिली जगन्नाथ शंकरशेट स्कॉलरशिप यांनीं मिळविली ( १८७३ ). बी. ए.ला आपला आवडता संस्कृत विषय सोडून केवळ शब्द खरा करण्याकरितां यांनीं गणित विषय घेतला व त्यांत पहिल्या वर्गांत उत्तीर्ण झाले. आवश्यक म्हणून असलेल्या संस्कृत विषयांतहि ' भाऊ दाजी ' प्राइज मिळविलें. एम्. ए.च्या परीक्षेंतहि 'भगवानदास ' शिष्यवृत्ति मिळविली.

पुढेंहि सरकारी नोकरीच्या मोहांत न पडतां न्यू इंग्लिश स्कूलच्या चालकांना येऊन हे मिळाले. हे मागाहून येऊन मिळाले तरी सुपरिंटेंडेंटची नवी जागा निर्माण करून यांच्या ताब्यांत शाळेची सर्व व्यवस्था सोंपविण्यांत आली. यांनींहि शाळेचें काम इतक्या उत्कृष्ट शिस्तीनें चालविलें कीं सरकारी हायस्कूलवर त्याचा परिणाम झाल्याशिवाय राहिला नाहीं. यांच्या परिश्रमांमुळें जगन्नाथ शंकरशेट स्कॉलरशिप लागोपाठ पांच वर्षे यांच्या शाळेलाच मिळाली. स. १८८२ सालीं सरकारनें नेमलेल्या शिक्षणसमितीपुढें यांची अत्यंत महत्त्वाची साक्ष झाली. पुढें कॉलेज निघालें तेव्हांहि यांनाच प्रिन्सिपल करण्यांत आलें ( १८८५ ).

केसरी व मराठा यांच्या उद्देश पत्रकावर यांची सही आहे, पण पुढें पत्रांच्या कर्जबाजारीपणामुळें यांनीं आपला त्यांशीं संबंध सोडला.

या कार्याबरोबरच संस्कृतकोश व "The Student's Guide to Sanskrit Composition " हीं यांचीं इंग्रजी पुस्तकें यांची कीर्ति चिरकाल टिकविणारीं आहेत. यांच्या गाइडमधील संस्कृतभाषेंतील वाक्यरचनेची माहिती अगदीं नवीन असून त्यावरून यांची सूक्ष्म बुद्धिमत्ता ध्यानांत येते. त्यामुळें हा ग्रंथ हिंदुस्थानांत व हिंदुस्थानच्या बाहेर अभ्यासक्रमांत दाखल झाला आहे.

**आपटे, वासुदेव गोविंद**—( जन्म स. १८७१–मृत्यु स. १९३० ).

टीकाकार, कोशकार, संपादक व बालवाङ्मयकार. जन्म पूर्व खानदेशांत धरणगांव येथें झाला. मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण धुळें येथें व पुढील उच्च शिक्षण इंदूर व नागपूरचें हिस्लाप कॉलेज येथें झालें. स. १८९३ सालीं कलकत्ता-विश्वविद्यालयाचे हे बी. ए. झाले. या परीक्षेचा अभ्यास करीत असतां यांनीं बंगाली भाषेचा अभ्यास केला. पुणें नूतन मराठी विद्यालयांत चार वर्षें व मुंबईस सेक्रेटरीएटमध्यें रिपोर्टर ऑफ धी नेटिव्ह प्रेस या जागेवर फक्त दहा महिने काम केलें. वरीष्ठ अधिकाऱ्यांशीं न पटल्यानें यांना राजिनामा द्यावा लागला. नंतर हे इंदूरच्या राजकन्येस शिकविण्याकरितां अलाहाबादेस गेले. तेथें मॉडर्न रिव्ह्यूचे संपादक रामानंद चतर्जी यांच्याशीं यांचा परिचय झाला. व त्यांच्या मासिकांत हे अखेरपर्यंत मराठी पुस्तकांचें परीक्षण करीत होते. अलहाबादेस असतां मिसेस हेन्री वुडच्या ' ईस्टलिन ' व ' मिसेस हॅलिबर्टन्स ट्रबल्स ' या कादंबऱ्यांची ' माणिकबाग ' व ' दुःखाअंतीं सुख ' या नांवानें मराठींत रूपान्तरें केलीं.

नंतर ना. गोखल्यांनीं यांना ज्ञानप्रकाशचे संपादक केलें व तो यांनीं दैनिक केला. पण प्रकृतीच्या तक्रारीमुळें एक वर्षानंतर संपादकत्व सोडून पुणें येथील नूतनमराठी विद्यालयांत हे आजन्मसेवक झाले. स. १९१० पर्यंत हे तेथें होते.

वि. को. ओकांच्या ' बालबोध ' मासिकाचे हे चहाते होते. त्यांत यांनीं कांहीं सुधारणा सुचविल्या व स्वतः साहाय्य करूं का म्हणून पृच्छा केली. पण ओकांना तें न पटून दुसऱ्याची ओंळहि नको असल्याचें त्यांनीं सांगितलें. तेव्हां मुलांकरितां यांनीं ' आनंद ' मासिक काढलें ( १९०६ ). टपालापासून ते लेखनापर्यंत सर्व कामें करून व पैशाची झीज सोसून यांनीं ' आनंद ' नांवारूपाला आणलें.

स. १९१० सालीं प्रकृति बिघडली. ती थोडी बरी झाल्यावर 'चंद्रावती महिला विद्यालय, इंदूर' येथें नोकरी पत्करली. पुढें मल्हारीमार्तंडाचें संपादकत्व पांच वर्षे केलें. पुढें राजिनामा देऊन पुण्यास आले. स. १९२२ सालीं यांचा मुलगा वारल्यानें यांच्यावर औदासीन्याची छाया

पसरली. १९२७ सालीं टिळक-महाविद्यालयांतील अध्यापन सोडलें. पत्नी व कन्या यांसह काशीयात्रा केली.

यांनीं स. १९२० सालीं विलायतेंतील मुलांच्या साप्ताहिकाच्या धर्तीवर 'विचारसाधन' नामक एक वर्तमानपत्र काढलें होतें. पण तें फार दिवस चालू शकलें नाहीं. महाराष्ट्र-साहित्यपरिषदेचे हे दहा वर्षें चिटणीस होते.

यांचें वाङ्मयः— १ माणिकबाग, २ दुःखाअंतीं सुख, ३ नवयुग, ४ मूर्तिमंत देशाभिमान, ५ विलक्षण भोळेपणा, ६ पेशवाईची हकीगत, ७ लेखनकला, ८ ज्ञानदीप, ९ मराठ्यांचा दरारा, १० गांधीगीता, ११ महाराष्ट्राचा बाळबोध इतिहास, १२ हिंदुस्थानचा मनोरंजक इतिहास, १३ मुलांकरितां गोड गाणीं, १४ एक दिवसाचे सुल्तान, १५ चित्तरंजन भाग १–२, १६ मनी व मोत्या, १७ रवीचे उज्ज्वल किरण, १८ मौजेच्या गोष्टी, १९ वीरांच्या कथा, २० मराठी भाषेचे संप्रदाय व म्हणी, २१ बालोद्यान पद्धतीचें शिक्षण, २२ अशोक, २३ जैनधर्म, २४ बौद्धपर्व, २५ नाट्यरूप भारतवर्ष, २६ विचार-सौंदर्य, २७ नाट्यभारत, २८ नाट्य रामायण, २९ बाल-भारत, ३० बाल भागवत, ३१ महाभारतांतील सोप्या गोष्टी, ३२ मराठी बंगाली शिक्षक, ३३ रामायणांतील सोप्या गोष्टी, ३४ सौंदर्य आणि ललितकला, ३५ राष्ट्रीय शिक्षणाचें वाचन-पुस्तक, ३६ विविधज्ञानसंग्रह, ३७ टापटिपीचा संसार, ३८ महर्षीचा प्रसाद द्रोण, १-२, ३९ हरनाथ ठाकूर खंड १, ४० मराठी शब्दरत्नाकार (कोश), ४१ वाल्मीकींचा जय, ४२ भारतकन्या, ४३ संपूर्ण बंकीमचंद्र खंड १, २, ३, ४.

यांचें लेखन विपुल, विविध आणि परिश्रमपूर्वक केलेलें आहे. भाषान्तर, रूपान्तर आणि स्वतंत्र असे सर्व प्रकार यांच्या लेखनांत आहेत. कादंबऱ्यांत यांचें अप्रतिम रूपान्तर-कौशल्य व भाषाप्रभुत्व व्यक्त होतें. एखादी गोष्ट सुबोध रीतीनें सांगण्याची हातोटी यांना उत्कृष्ट साधली होती. त्यामुळें यांचें बाल-वाङ्मय अत्यंत लोकप्रिय झालें. बालवाङ्मयामुळेंच यांचें नांव सर्वतोमुखीं झालें. यांचें लेखन शिस्तवार, रेखीव आणि अभ्यास-पूर्वक लिहिलेलें आहे. यांचें लेखनकार्य श्रद्धेनें आणि उपयुक्ततेची दृष्टी ठेवून झालेलें आहे. त्यामुळें तें चिरस्थायी आहे. आनंद कायम चालावा अशी यांनीं व्यवस्था करून ठेविली आहे. श्री. गोपीनाथ तळवलकर तें काम उत्कृष्ट रीतीनें करीत आहेत (अ. म. वा. से.).

**आपटे, विष्णु गोपाळ**—(१८५१–१८९९).

वैद्यकीय ग्रंथाचे लेखक. कोल्हापूर येथील रहिवासी असून दरबारचे असिस्टंट सर्जन होते. निष्णात वैद्य म्हणून यांची कीर्ति होती. यांनीं ग्रामवैद्य, प्रसूति-चिकित्सा व न्यायवैद्यक हीं पुस्तकें लिहून प्रसिद्ध केलीं आहेत (अ. म. वा. से.).

**आपटे, हरि नारायण**—(जन्म स. १८६४–मृत्यु स. १९१९).

मराठी भाषेंतील अत्यंत प्रसिद्ध असणारे कादंबरीकार, लघुकथालेखक, नाटककार व कार्यकर्ते.

वयाच्या १४ व्या वर्षानंतर हे जेव्हां पुण्यास आले त्या वेळीं हे इंग्रजी चवथींत होते. ह्याच वेळीं यांनीं मेडोज टेलरच्या एका कादंबरीचें मराठींत भाषांतर करून वाङ्मयक्षेत्रांत पदार्पण केलें. कोणत्याहि भाषेंत यांची स्वाभाविकतः विशेष प्रगति दिसून येई. फ्रेन्च, जर्मन, बंगाली वगैरे भाषा यांनीं अल्पावकाशांत परिचित करून घेतल्या.

हे न्यू इंग्लिश स्कूलमधील आरंभींच्या विद्यार्थ्यांपैकीं एक होते. ह्याच वेळीं प्रसिद्ध होत असलेल्या निबंध-मालाद्वारां विष्णुशास्त्र्यांनीं मराठी भाषेस जें एक डौलदार स्वरूप देण्याचा प्रयत्न चालविला व त्यामुळें मालेची जी प्रशंसा होऊं लागली तिचा पगडा यांच्या कोंवळ्या मनावर पूर्णपणें बसून यांनींहि वाङ्मयमंदिरास सुशोभित करण्याचा निश्चय केला. विष्णुशास्त्री रेनॉल्डसूच्या कादंबऱ्या वाचीत आहेत हें समजतांच यांनीं त्या वाचण्याचा क्रम चालू ठेविला. ह्या त्यांच्या खडतर तपश्चर्येचें फळ यांना चांगलेंच मिळून यांचे डोळे कायमचे अधू झाले. गोपाळराव आगरकरांच्या 'विकारविलसित'—हॅम्लेटचें भाषांतर—ह्यावर यांनीं विद्यार्थिदशेंत असतांनाच ७२ पानी टीकात्मक लेख लिहिला होता. आपल्या विद्यार्थ्यानें लिहिलेल्या ह्या लेखाबद्दल आगरकरांना फारच कौतुक वाटलें. शेक्सपिअरचीं नाटकें व त्यांवरील विद्वानांचीं परीक्षणें ह्यांचा अभ्यास यांनीं आजन्म चालू ठेविला होता. शेक्सपिअर, कालिदास वगैरे महाकवींच्या ग्रन्थांचें हृद्गत उकलण्याची यांची हातोटी वाखाणण्याजोगी असे. यांचा संस्कृताचा व्यासंगहि चांगला असे. "शेक्सपिअर, कालिदास व भवभूति" ह्या मथळ्याखालीं प्रि. आगरकरांनीं एक लेख लिहून भवभूतीची योग्यता अधिक ठरविली होती. परंतु यांची कालिदासावर विशेष भक्ति असे. यांनीं त्या लेखास प्रत्युत्तर म्हणून 'बिचारा' ह्या सहीनें केसरीशीं एक पत्रव्यवहार करून

भवभूतीपेक्षा कालिदास अधिक श्रेष्ठ कसा ठरतो हें त्याच्या ग्रंथांतील उदाहरणांनीं यांनीं स्पष्ट केलें.

स. १८८३ मध्यें हे प्रवेशपरीक्षा पास झाले. त्यानंतर डेक्कन, फर्ग्युसन व पुनश्च डेक्कन वगैरे कॉलेजांतून हे ४-५ वेळां पी. इ.च्या परीक्षेस बसले. परंतु ह्या वेळीं इंग्लिश व संस्कृत पुस्तकें वाचण्याचा यांना बराच नाद लागला असल्यामुळें आणि गणित विषयाची आवड नसल्यामुळें हे उत्तीर्ण झाले नाहींत. डेक्कन कॉलेजच्या लायब्ररी व रीडिंग रूमची स्थापना झाली त्या वेळीं हे लायब्ररीस घ्यावयाच्या पुस्तकांची निवड करणारां-पैकीं एक होते. तेथील सर्व पुस्तकें यांनीं एक वर्षांत वाचून टाकलीं. पी. इ. परीक्षेंतील अपयशामुळें यांनीं तो नाद सोडून देऊन कादंबऱ्या लिहिण्यास सुरुवात केली. 'मधली स्थिति' (१८८५) ही यांची पहिली कादंबरी होय. ह्यानंतर 'गणपतराव', 'पण लक्षांत कोण घेतो' (१८९०-९३), 'यशवन्तराव खरे' (१८९२-९५), 'मी' (१८९३-९५), 'भयंकर दिव्य', 'मायेचा बाजार', 'जग हें असें आहे' (१८९७-९९), 'आजच' (१९०४-०६), 'कर्मयोग' (१९१३-१७) वगैरे सामाजिक कादंबऱ्या यांनीं क्रमानें लिहिलेल्या आहेत. त्याचप्रमाणें 'म्हैसूरचा वाघ' (१८९०-९१), 'उषःकाल' (१८९५-९७), 'सूर्योदय' (१९०५-०६), 'सूर्यग्रहण' (१९०८-०९), 'केवळ स्वराज्यासाठीं' (१८९८-९९), 'रूपनगरची राज्यकन्या' (१९००-०२), 'चंद्रगुप्त' (१९०२-०४), 'गड आला पण सिंह गेला' (१९०३), 'माध्याह्न' (१९०६-०८), 'कालकूट' (१९०९-११), व 'वज्राघात' (१९१३-१५) वगैरे ऐतिहासिक कादंबऱ्या यांनीं लिहिलेल्या आहेत. यांच्या सर्व कादंबऱ्यांत 'गणपतराव', 'कर्मयोग' व 'आजच' ह्या तीन सामाजिक आणि 'सूर्यग्रहण', 'माध्याह्न' व 'कालकूट' ह्या तीन ऐतिहासिक अशा ६ कादंबऱ्या अपुऱ्या राहिलेल्या आहेत. कथानकाची सुसंगत रचना, प्रसंगानुरूप उठाव, हुबेहूब वर्णन, यथार्थ स्वभाव-दिग्दर्शन वगैरे दृष्टींनीं यांच्या कादंबऱ्या पहिल्या प्रतीच्या ठरतात. कल्पनेनें निर्मित अशा कृत्रिम सृष्टीची स्वाभाविक सृष्टी-प्रमाणें बेमालुम बनावट करणें हा गुण यांना सहजसाध्य होता. यांच्या गुणदोषांचें विवेचन चतर्जी शरच्चंद्रावर पाहावें.

हे पुणें म्युनिसिपालिटीचे २० वर्षे सभासद व ३ वर्षे अध्यक्ष होते. यांच्या शांत व मिळूनमिसळून वागण्याच्या स्वभावामुळें यांनीं तेथें बरींच महत्त्वाचीं कामें केलीं. म्युनिसिपल बाबींत सरकारशींहि हे सामना करीत असत. स्कूल बोर्डाचे चेअरमन असतांना यांचीं शिक्षणविषयक व्याख्यानें शिक्षकांच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचीं होत. लोकल बोर्डाचेहि हे कित्येक वर्षे व्हाइस-प्रेसिडेंट होते. पुण्याच्या मद्यपाननिषेधक मंडळाचे हे सभासद असून अबकारी कमिटीपुढें लोकपक्षाची बाजू यांनीं उत्तम प्रकारें मांडली. नूतन मराठी वि ालयासाठीं निःस्वार्थतेनें प्रयत्न करणारांत हे अग्रणी होत. हे सुधारक व प्रागतिक म्हणून गणले जात. वरील कादंबऱ्यांखेरीज यांनीं बरेंच वाङ्मय निर्माण केलें आहे.

यांचीं नाटकें—१ सन्त सखूबाई (संगीत), २ पिंगला (संगीत), ३ स्फुट गोष्टी-१-४ भाग, ४ कसे दिवस गेले ? (प्लेगच्या कहरांतील गोष्ट), ५ भासकवीच्या नाटककथा.

पत्रें—१ सगुणाबाईचीं आपल्या मुलीस.
२ गोविंदरावचीं आपल्या मुलास.

निबंध—१ विदग्ध वाङ्मय, २ मराठी वाङ्मयाचा अभ्यास : (मराठी साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदावरून केलेलें भाषण १९१२, अकोला).

यांनीं 'करमणूक' हें साप्ताहिक २८ वर्षे चालविलें व सुधारकपत्रहि यांनीं कांहीं दिवस चालविलें. यांच्या कादंबऱ्या व गोष्टी प्रथम करमणुकींत प्रसिद्ध झाल्यानंतर पुस्तकरूपानें काढण्यांत आल्या. यांचे सुधारकांतील लेखांचा संग्रह प्रसिद्ध झालेला नाहीं. यांच्या मृत्यूनंतर यांचे ग्रंथ आर्यभूषण प्रेसनें घेतले आणि कादंबऱ्यांच्या शाळा-कॉलेजकरितां संक्षिप्त आवृत्त्या काढल्या. यांचें चरित्र कु. वेणुबाई पानसे यांनीं लिहिलें आहे. तसेंच बापूजी मार्तंड आंबेकर हे यांचे रोजच्या बैठकींतील मित्र होते. त्यांनींहि यांच्यासंबंधीं लिहिलें आहे. वामन नारायण देशपांडे यांनीं यांच्या वाङ्मयाचें रसग्रहण 'आठवणी व कादंबऱ्या' या पुस्तकांत केलें आहे.

हे महादेव चिमणाजी आपटे यांनीं स्थापन केलेल्या आनंदाश्रम संस्थेचे व्यवस्थापक होते. तोच यांच्या उपजीविकेचा व्यवसाय होता. त्याबद्दल यांना फक्त दरमहा ५० रुपये मिळत. आनंदाश्रम संस्कृत ग्रंथमालेंत 'सर्वदर्शनसंग्रह' हा संस्कृत ग्रंथ यांनीं संपादन केलेला आहे.

**आयर्विन, लॉर्ड**—(जन्म स. १८८१, कारकीर्द स. १९२६-१९३१) हिंदुस्थानचे व्हाइसरॉय.

व्हायकौंट हॅलिफॅक्स यांचे हे चिरंजीव व वारस. स. १९१० सालीं रिपनभागातर्फे पार्लमेंटचे मेंबर झाले. स. १९२२–२५ च्या दरम्यान हे मंत्रिमंडळांत होते. प्रथम शिक्षणखातें व नंतर शेतकीखातें यांचेकडे आलें. स. १९२६ मध्यें हे हिंदुस्थानचे व्हाइसरॉय झाले व यांना 'पीअर' करण्यांत आलें.

लॉर्ड रीडिंगप्रमाणेंच इंग्लडमध्यें यांची अतिशय प्रतिष्ठा असे. 'ख्रिस्ती साधु' या नांवानें यांचे चहाते यांना संबोधीत. रीडिंग यांना लोकांचें प्रेम संपादन करणें कधींच शक्य झालें नव्हतें. तेव्हां त्यांचेपेक्षां अधिक सामोपचाराचा मंत्र देऊन यांना पाठविण्यांत आलें होतें. हे हिंदुस्थानांत आले त्या वेळीं कलकत्त्याला हिंदु-मुसलमान दंग्याच्या ज्वाला उसळत होत्या.

परंतु हिंदुस्थानांत आल्यानंतर थोड्याच दिवसांनीं यांच्या आगगाडीखालीं बॉंब ठेवण्यांत येऊन हिंदुस्थानची परिस्थिति आपणांस वाटते तितकी सुलभ नसल्याची जाणीव यांस झाली.

स्त्रियांना देण्यांत आलेला मतदानाचा हक्क (१९२६), दक्षिण अफ्रिकेशीं केलेली तडजोड (१९२७) या दोन गोष्टी यांच्या कारकीर्दीच्या पूर्वार्धांतील महत्त्वाच्या गोष्टी होत.

यानंतर मॉंटफर्ड-सुधारणांची फेरतपासणी करण्याकरितां सर जॉन सायमन यांच्या अध्यक्षतेखालीं एक 'रॉयल कमिशन' नेमण्यांत आलें. परंतु त्यामध्यें एकहि हिंदी मनुष्य सामील नसल्याच्या सबबीवर हिंदी लोकांकडून या मंडळावर बहिष्कार घालण्यांत आला. हिंदुस्थानचा असंतोष क्रमाक्रमानें वाढण्यास या वेळेपासूनच सुरुवात झाली. १९२९ मध्यें इंग्लंडमध्यें रॅम्से मॅक्डोनॉल्ड यांचें प्रधान-मंडळ आल्याबरोबर हे इंग्लंडला भेट देऊन आले. आल्याबरोबर हिंदुस्थानास 'वसाहतींचें स्वराज्य क्रमाक्रमानें देण्यांत येईल' असें यांनीं जाहीर केलें. त्याला उत्तर म्हणून कीं काय 'वसाहतींचें स्वराज्य लवकर मिळालें नाहीं तर कॉंग्रेस स्वातंत्र्याचें ध्येय पुकारील' अशी म. गांधींनीं घोषणा केली. पुढें १९३० त कॉंग्रेसची कायदे-भंगाची मोहीम पुन्हा सुरू झाली. याच वेळीं सायमन कमिशनचा रिपोर्ट प्रसिद्ध झाला, तोहि असाच निराशा-जनक होता. त्यामुळें कायदेभंगाची चळवळ अधिक जोरांत सुरू झाली. अनेक स्त्रीपुरुषांनीं त्यांत भाग घेतला होता. तेव्हां गांधी व इतर सर्व पुढारी यांना अटकेंत टाकण्यांत आलें.

त्याच वेळीं हिंदुस्थानला कोणत्या नवीन सुधारणा द्याव्यात याचा विचार करण्यासाठीं इंग्लंडमध्यें पहिली गोलमेज परिषद भरली (१९३०). 'वसाहतींचें संपूर्ण स्वराज्य' ह्या ध्येयानें गोलमेज परिषद चालवण्यांत यावी ही गांधींची मागणी धुडकावून लावल्यामुळें तिच्यावर कॉंग्रेसपक्षीयांनीं बहिष्कार टाकला. कॉंग्रेसच्या सहकार्या-शिवाय परिषद यशस्वी होणें शक्य नाहीं, ही गोष्ट लक्षांत आल्यामुळें सरकार व गांधी यांमध्यें तडतोड करण्यांत आली. तीच 'गांधी-आयर्विनकरार' या नांवानें प्रसिद्ध आहे (१९३१).

या करारान्वयें सरकारनें सर्व राजकीय कैद्यांची सुटका केली व गांधींनीं गोलमेज परिषदेस हजर राहण्याचें कबूल केलें.

कायदेभंगाच्या चळवळीच्या सामर्थ्याची कबूली यांनीं पुढील शब्दांनीं दिली आहे. "कायदेभंगाच्या चळवळीचा कितीहि निषेध केला तरी तिच्यामुळें राष्ट्राच्या जीवनांत स्वतंत्र व समर्थ अशा राष्ट्राभिमानाची जी ज्योत प्रज्वलित झाली आहे तिची किंमत कमी करणें चुकीचें होईल. सरकारनें कितीहि दडपशाही केली तरी राष्ट्राची प्रगति कायमची बंद होणें शक्य नाहीं."

इंग्लंडमध्यें गेल्यावर 'लॉर्ड हॅलिफॅक्स' या नांवानें पुढें हे प्रसिद्ध आहेत.

**आयंगार, कस्तुरिरङ्ग**—(मृत्यु स. १९२३)

मद्रासचे हिंदी वृत्तपत्रकार. कांहीं दिवस वकिली केल्यानंतर संपादकाचा पेशा पत्करून यांनीं 'हिंदु' हें पत्र सतत वीस वर्षेपर्यंत अत्यंत व्यवस्थितपणें चालविलें. हें 'हिंदु' पत्र पुढें दक्षिण हिंदुस्थानचें एक प्रमुख पत्र होऊन बसलें. त्याचप्रमाणें स. १९१४ च्या महायुद्धांत युद्धक्षेत्रांच्या निरीक्षणासाठीं हे हिन्दी वर्तमानपत्र–प्रति-निधी म्हणून युरोपांत गेले होते. डॉ. ॲनी बेझन्ट यांच्या स. १९१७ त स्थापन झालेल्या होमरूल-लीगमध्यें यांनीं पुढाकार घेतला होता. कॉंग्रेसच्या कायदेभंग कमिटीचे सभासद म्हणून स. १९२२ मध्यें हे हिंदुस्थानभर साक्षी-पुरावा घेत हिंडले होते. याचा परिणाम यांच्या प्रकृतीवर होऊन हे थकले व परलोकवासी झाले. मरणापूर्वी कांहीं दिवस 'इन्डियन जर्नॅलिस्ट ॲसोसिएशन'चे अध्यक्षस्थानीं यांची निवड झाली होती.

**आयंगार, दिवाणबहाद्दूर, डॉ. कृष्णस्वामी** (जन्म स. १८७१ एप्रिल १५)

वयोवृद्ध, तपोवृद्ध, इतिहासकार–संशोधक व अध्या-पक. यांचा जन्म कुंभकोणनजीक शहाजीकोट या गांवीं

झाला. ह्या गांवीं प्रख्यात शहाजीराजे भोसले यांच्या सन्मानार्थ बांधलेली एक गढी आहे. या गांवाचें पूर्वीचे एक नांव प्रख्यात तंजावरकर नायकराजा रघुनाथ यांच्या नांवावरून रघुनाथपूर असें होतें. यांच्या मनांत मराठ्यांच्या इतिहासाविषयीं जो प्रेमयुक्त आदर दिसून येतो, त्याचा यांच्या जन्मपरंपरेशीं साहजिक संबंध लागतो.

यांच्या बाराव्या वर्षी वडील वारल्यावर वडील बंधूंची यांच्या शिक्षणास मदत झाली व यांचा विद्याभ्यास बंगलूरास झाला. कॉलेजांत पहिल्या प्रतीचे विद्यार्थी म्हणून हे चमकले. गणित व शास्त्रें हे यांचे आवडते विषय होते. आणि कांहीं वर्षे यांनीं त्या विषयांचे अध्यापक म्हणूनहि काम केलें. परंतु गुणावर निवडणूक होऊनहि यांस स्थापत्य (एंजिनिअरिंग) शाळेंत शिष्यवृत्ति न मिळाल्यानें यांनीं आपलें लक्ष गणिताकडून काढून इतिहासाकडे लावलें.

स. १९०० मध्यें यांनीं 'वोडियार राजवटींतील म्हैसूर' या विषयावर प्रबंध लिहून मद्रासविद्यापीठाची एम्. ए. पदवी संपादन केली. लवकरच यांना इतिहासाचे प्राध्यापक नेमण्यांत आलें. श्री. वेंकय्या, प्रो. केलेट, प्रि. कुक, मि. भाभा, डॉ. हुल्श, न्या. इन्नेस इत्यादि विद्वानांवर यांचा चांगला छाप बसली.

चोलराजांसंबंधानें शिलालेखादि साहित्य परीक्षून त्यावर व श्रीरामानुजाचार्यांचा काल इत्यादि विषयांवर यांनीं लिहिलेले निबंध मान्यता पावूं लागले. लवकरच यांना इंग्रजी भाषेचे एक प्राध्यापक म्हणून सेंट्रल कॉलेजांत काम करावें लागलें. या वेळीं फादर टबार्ड व मि. रिचर्ड्स यांच्यांशीं 'मिथिक सोसायटी' नांवाची संस्था स्थापण्याचे कामीं यांनीं सहकार केला. या संस्थेचे पहिले चिटणीस म्हणून यांची नेमणूक झाली, आणि संस्थेच्या द्वारां प्रसिद्ध होणाऱ्या पत्रिकेचे संपादक म्हणूनहि यांचीच नेमणूक झाली. सुमारें पांच वर्षे या संस्थेची जोपासना यांनीं काळजीनें केली व संस्था नांवारूपास आणिली.

स. १९१० मध्यें म्हैसूर सरकारनें यांची नेमणूक असिस्टंट इन्स्पेक्टर जनरल ऑफ एज्युकेशन या हुद्यावर केली आणि कांहीं दिवस मि. बीअर यांच्या जागीं मुख्य इ. ज. ऑफ एज्युकेशन म्हणूनहि यांना काम पाहावें लागलें. या कामांतहि यांनीं उत्कृष्ट लौकिक संपादन केला.

स. १९११ मध्यें यांच्या विविध ऐतिहासिक लेखांचा खंड 'एन्शन्ट इंडिया' या नांवानें प्रसिद्ध झाला.

स. १९१२ मध्यें यांची मद्राससरकारनें मद्रास-विद्यापीठाचे सदस्य म्हणून नेमणूक केली. तेव्हांपासून स. १९२९ पर्यंत सतरा वर्षे यांनीं विद्यापीठाची अनेक प्रकारें सेवा केली.

स. १९१४ मध्यें यांच्या आयुष्यांतील एका क्रान्तिकारक पर्वास आरंभ झाला. हिंदुस्थान सरकारनें मद्रास-विद्यापीठास संशोधनार्थ पासष्ट हजारांची देणगी देऊं केली. भौतिकशास्त्रसंशोधनाला ही रक्कम पुरी पडण्यासारखी नव्हती म्हणून सांस्कृतिक विषयाकडे ती द्यावी असें ठरलें, आणि तयार झालेल्या योजनेंत "भारतीय इतिहास आणि पुराणवस्तुसंशोधन" या विषयासाठीं 'अध्यापक-पीठ' निर्माण करण्यांत आलें. या पीठावर पहिले प्राध्यापक म्हणून यांची योजना करण्याचें ठरलें.

प्रतिपंचवार्षिक नेमणुकींत आणखी दोन वेळां यांचीच निवडणूक या पदावर होत गेली, आणि सतत पंधरा वर्षे यांनीं हें पद भूषविलें (१९१४-२९).

आपल्या या नवीन कामाचे मुख्य तीन भाग यांनीं केले—१ सामान्य व्याख्यानें, २ विशिष्ट व्याख्यानें, ३ प्रौढछात्रशिक्षण.

पहिल्यासाठीं यांनीं विजयनगर हा मुख्य विषय निवडला. दुसऱ्या विभागाकरितां राजेन्द्र चोल, महाबलिपुरम्, पल्लव, वाकाटक इत्यादि निरनिराळे दहा विषय घेऊन आपलीं विद्वत्तापूर्ण व्याख्यानें दिलीं, आणि त्यांपैकीं बहुतेक कमीअधिक करून प्रसिद्धहि केलीं.

यांतील 'मणिमेखलाईचें ऐतिहासिक मंथन' विशेष प्रसिद्धीला आलें, कारण फ्रान्समधील 'इन्स्तित्यूत हिस्तोरिक् इ.' या संस्थेनें त्यांस रौप्यपदक समर्पण केलें! छात्राध्यापनासाठीं वैकुंठवासी रंगस्वामी सरस्वती (सोर्सेस ऑफ विजयनगर हिस्टरी), श्री. सत्यनाथन् (हिस्टरी ऑफ दि नायकाज् ऑफ मदुरा), श्री. गोपालन् (हिस्टरी ऑफ दि पल्लवाज् ऑफ कांची), श्री. दीक्षितार (हिंदु ॲडमिनिस्ट्रेटिव्ह इन्स्टिट्यूशन्स), श्री. नारायणन् (अर्ली हिस्टरी ऑफ शैविझम्), श्री. अप्पादुराई (इकॉनॉमिक कन्डिशन ऑफ साउथ इंडिया फ्रॉम दि ट्वेल्थ टु दि सिक्स्टीन्थ सेंचरी) इत्यादि विद्यार्थी व त्यांनीं घेतलेले संशोधकी विविध उपयुक्त विषय यांच्या अभ्यासाचे कामीं यांनीं

योग्य मार्गदर्शन केलें, आणि वरीलपैकीं बहुतेकांनीं चांगली ख्याति संपादन केली आहे. मद्रास इलाख्यांत ऐतिहासिक संशोधनाची दृढतर पायावर स्थापना करण्याचें काम यांनीं यशस्वीपणें केलें आहे.

या अवधींत कलकत्ता व म्हैसूर विद्यापीठांमार्फत यांना निमंत्रणें येऊन यांचीं व्याख्यानें झालीं.

स. १९२४ मध्यें सरकारनें यांच्या कामगिरीची प्रशंसा करणारा हुकूम प्रसिद्ध केला. म्हैसूर सरकारनें यांना 'राजसेवासक्त' ही पदवी दिली. ब्रिटिश सरकारनें प्रथम रावबहाद्दुर, नंतर दिवाणबहाद्दुर अशा पदव्या देऊन यांचा गौरव केला.

स. १९२१ मध्यें यांस आर्किऑलॉजिकल सव्हें ऑफ इंडियाचे ऑननरी कॉरस्पाँडंट नेमण्यांत आलें.

स. १९३१ मध्यें यांना बंगाल रॉयल ए. सो. चे फेलो निवडण्यांत आलें.

तिरूपति देवस्थानांतील शिलालेखादिकांचे पांच खंड व त्या देवस्थानाचा इतिहास प्रसिद्ध होण्यास यांचे परिश्रम पुष्कळांशीं कारण झाले.

ऑल-इंडिया ओरिएंटल कॉन्फरन्स, इंडियन हिस्टरी काँग्रेस व इंडियन हिस्टॉरिकल रेकार्डस् कमिशन या तिन्ही संस्थांशीं यांचा निकट संबंध आज पुष्कळ वर्षांपासून आहे. स. १९२४ मध्यें ओरिएन्टल कॉन्फरन्स मद्रास येथें भरली तेव्हां हे तिचे चिटणीस होते व स. १९३५ च्या म्हैसूर अधिवेशनाचे हे अध्यक्ष होते. स. १९३१ मध्यें बाँबे हिस्टॉरिकल सोसायटीच्या विद्यमानें एकदांच भरलेल्या बाँबे हिस्टॉरिक काँग्रेसचे हे अध्यक्ष होते. पुण्यास जेव्हां भारत इतिहास-संशोधकमंडळाच्या रौप्यमहोत्सवाला जोडून पहिली ऑल-इंडिया मॉडर्न हिस्टरी काँग्रेस–पुढें हिचेंच नांव इंडियन हिस्टरी काँग्रेस असें ठेवण्यात आलें–भरविली त्या वेळीं ऐतिहासिक प्रदर्शनाचें उद्‌घाटन यांचे हस्तें करण्यांत आलें ( १९३५ ). हिंदुस्थान सरकारच्या इ. हि. रे. कमिशनवर कॉरस्पाँडिंग मेंबर व कांहीं वेळ घटक सभासद म्हणून हे अनेक वर्षे काम करीत आलेले आहेत.

लाहोर येथील इंडियन हिस्टरी काँग्रेसच्या चौथ्या अधिवेशनाचे ( स. १९३९ ) हे मुख्य अध्यक्ष होते व हैदराबाद (द.) येथील पहिल्या डेक्कन हिस्टरी कॉन्फरन्समध्येंहि प्राचीन विभागाचें अध्यक्षस्थान यांनाच देण्यांत आलें होतें ( १९४५ ).

इंडियन हिस्टरी काँग्रेसमार्फत जो हिंदुस्थानचा प्रचंड इतिहास दहा खंडांत व्हावयाचा आहे, त्याची रूपरेषा यांनीं तयार करून दिली असून त्या कामीं यांचें सहाय्य सतत मिळत राहणार आहे.

यांनीं आतांपर्यंत लहानमोठे १२५ प्रबंध लिहिलेले आहेत. यांच्या ६६ व्या वर्षी यांस हिंदुस्थानांतील प्रसिद्ध इतिहासलेखकांनीं एक 'स्मरणग्रंथ' ( पृ. ५०० ) अर्पण केला ( १९३६ ).

मिथिक सोसायटीचें क्वॉर्टर्ली व इंडियन अँटिक्वरी पत्रिकेचे सहसंपादक म्हणून यांनीं काम केलें आणि अलीकडे सुमारें १५–२० वर्षे हे 'जर्नल ऑफ इंडियन हिस्टरी' हें विख्यात त्रैमासिक स्वतः चालवीत आहेत.

अशा प्रकारें वयाची सत्तरी उलटली तरी यांची इतिहाससेवा सतत एकनिष्ठेनें चालू आहे. यांची उमेद व तरतरी अद्यापि यांनीं टिकविली आहे.

यांचा स्वभाव प्रेमळ, यांची राहणी वैष्णव रामानुज संप्रदायी ब्राह्मणाची, बुद्धिमत्ता, चिकित्सा, विवेचनशक्ति उत्कृष्ट दर्जाची, असे हे सर्वमान्य इतिहासाचार्य म्हणून सर्वांच्या आदरास पात्र झाले आहेत. सांप्रत हे मद्रासेस मैलापूरम्‌मध्यें स्वतःच्या घरींच राहतात ( दत्तो वामन पोतदार ).

**आयंगार, एस्. श्रीनिवास**—( जन्म स. १८७४–मृत्यु स. १९४१ )

गोहत्ती काँग्रेसचे अध्यक्ष आणि मद्रासचे माजी ॲडव्होकेट जनरल. 'हिंदु कायदा' या मेनच्या सुप्रसिद्ध ग्रंथाची सुधारून वाढविलेली आवृत्ति तयार करण्याचें काम हिंदुधर्मशास्त्रपारंगत म्हणून यांच्याकडे सोंपविलें होतें. त्याप्रमाणें तो ग्रंथ यांनीं केलेला आहे.

ब्रिटिश राजवटींत पहिले हिंदी ॲडव्होकेट जनरल होण्याचा मान मद्रास हायकोर्टांत सर भाष्यं आयंगार यांना मिळाला, त्यांचे हे जामात होते. यांनाहि पुढें ती जागा मिळाली.

त्या वेळीं राजकारणांत भाग घेणें शक्य नसलें तरी हे सामाजिक सुधारणांच्या चळवळींत भाग घेत व राष्ट्रीय सभेबरोबर भरणाऱ्या सामाजिक परिषदेस हजर राहून तींत प्रत्यक्ष भाग घेत.

होमरूल-लीगच्या चळवळीपासून हे राजकारणांत भाग घेऊं लागले. हे प्रथम नेमस्त पण पुढें जहालगटाशी समरस झाले. बेझंटपक्षाशीं दोन हात केल्यावर पंजाबप्रकरणामुळें हे असहकारितावादी बनले. पण काँग्रेसमधील अहिंसा व खादी यांचा आग्रह धरणाऱ्या गटाशीं हे

केव्हांच समरस झाले नाहींत. हे पुरोगामी गटांत गणले जात. म. गांधींच्या लहरीवर कॉंग्रेसचें राजकारण चालावें ही गोष्ट यांना मान्य नव्हती. तथापि महात्मा गांधींच्या आज्ञेप्रमाणें स. १९२० सालीं यांनीं आपला सी. आय. ई. हा किताब सरकारकडे परत केला. तसेंच यांनी अत्यंत भरभराटीच्या वकिली व्यवसायावर पाणी सोडलें. पुढें विधिमंडळाच्या निवडणुकीला उभे राहिले नाहींत व यांनीं सर्व वेळ कॉंग्रेसला दिला आणि मद्रास प्रान्तांत अशी जागृति केली कीं हे म्हणतील ती पूर्वदिशा अशी स्थिति तेथें झाली. स्थानिक संस्थांपासून मध्यवर्ति मंडळापर्यंतच्या सर्व संस्थांत कॉंग्रेसपक्षाचें बहुमत यांनी स्थापन केलें ( १९२३ ).

त्या वेळीं हे मध्यवर्ति विधिमंडळांत निवडून गेले व पं. मोतीलाल नेहरूंच्या नेतृत्वाखालीं स्थापन झालेल्या स्वराज्यपक्षांत डेप्युटी लीडर म्हणून यांची योजना झाली. स. १९२४-३० पर्यंत हे मध्यवर्ति विधिमंडळाचे सभासद होते. त्या वेळचीं यांचीं भाषणें दीर्घायुषी झालीं आहेत. पण पुढें पं. मोतीलाल नेहरू व हे यांच्यांत मतभेद सुरू झाला. पंडितजी गांधींकडे झुकले व हे पुरोगामी बनले.

कॉंग्रेसनें जातीयत्वाच्या बाबतींत अवलंबिलेलें चमत्कारिक धोरण यांना मान्य नसे. गोहत्तीच्या कॉंग्रेसमध्यें ( १९२६ ) यांनीं संपूर्ण स्वातंत्र्याचा उपन्यास केला, पण लाहोरच्या अधिवेशनांत ( १९२९ ) यांचें उद्दिष्ट पुरें झालें. स. १९३० च्या कायदेभंगाच्या चळवळीनंतर यांनी राष्ट्रीयसभा सोडली. पण अलिकडे तीन वर्षें सुभाषचंद्र बोसांच्या पुरोगामी गटाचा हे पुरस्कार करूं लागले होते.

**आरू, राणू रावजी**— ( जन्म स. १८४८–मृत्यु स. १९२२ )

देवनागरीचे सुप्रसिद्ध पंचीगार. हे प्रारंभीचे प्रसिद्ध मराठी टाइप पाडणारे पंचीगार जुन्नर तालुक्यांतील अळेंगांवचे माळी वैश्य. यांच्या घराण्यांतील पद्धतीप्रमाणें यांचें आठव्या वर्षी उपनयन ( मुंज ) झालें. शिक्षण वगैरे कांहीं झाले नव्हतें. स. १८५५ सुमारास मोलमजुरी करून उपजीविका करण्याकरितां हे आपल्या वडिलांबरोबर मुंबईस गेले व टाइप पाडण्याच्या कामांत यांनीं अत्यंत लौकिक मिळविला.

**आलूर, व्यंकटराव भीमराव**—(जन्म स.१८८०)

आधुनिक कर्नाटकांतील साहित्यिक आणि प्रसिद्ध सार्वजनिक कार्यकर्ते.

यांचा जन्म विजापूर येथें झाला. हे बी.ए., एल्एल्.बी. वकील आहेत. तथापि यांनीं वकिली स. १९०६ सालीं सोडून स्वदेशीच्या चळवळींत भाग घेण्यास सुरुवात केली. त्या वेळच्या राष्ट्रीय आंदोलनांत राष्ट्रीयशाळाहि यांनीं चालविली होती.

धारवाड येथें यांनीं 'कर्नाटक-इतिहासमंडळ' या संस्थेची स्थापना केली ( १९१४ ) आणि कर्नाटकच्या इतिहासाच्या अभ्यासाकडे लोकांचें लक्ष वेधिलें. तें कार्य आतां बरेंच वाढीस लागलें आहे.

हे त्या वेळच्या राजकारणांत लो. टिळकांचे अनुयायी म्हणून प्रसिद्ध होते. यांनीं स. १९२१ पर्यंत राजकीय चळवळींत विशेष प्रकारें भाग घेतला.

त्यापुढें हे संपादक, साहित्यिक आणि सार्वजनिक कार्यकर्ते म्हणून लोकांच्या सतत पुढें आहेत.

हे होमरूल लीगचे राजकीय कार्यवाह, धारवाड कॉंग्रेस-कमिटीचे उपाध्यक्ष, कर्नाटक साहित्यपरिषदेचे एक उत्पादक इत्यादि अनेक नात्यांनीं लोकांची सेवा करीत आले आहेत. कर्नाटकसाहित्यसंमेलनाचें अध्यक्षपद देऊन कर्नाटकानें यांचा म्हैसूर येथें योग्य प्रकारें गौरवहि केलेला आहे ( १९३० ).

कर्नाटकसभेच्या स्थापनेंत यांचा मोठा भाग होता. धारवाड येथील श्रीशंकराचार्य-संस्कृत-पाठशाळेचे हे अध्यक्ष, जय कर्नाटक (मासिक) व कर्मवीर (साप्ताहिक) इत्यादि कानडी भाषेंतील नियतकालिकांचे संपादक म्हणून यांनीं केलेली कामगिरी अत्यंत मोलाची समजण्यांत येते.

यांचे कानडी भाषेंतील ग्रंथः–१ कर्नाटकगतवैभव, २ कर्नाटकवीररत्नगळु, ३ लो. टिळकांच्या गीतारहस्याचें कानडी भाषांतर, ४ गीताप्रकाश, ५ गीतासंदेश, ६ गीता-परिमल, ७ गीताभावप्रदीप, भाग १ व २, ८ शिक्षण-मीमांसे ( स्पेन्सर्स एज्युकेशन या इंग्रजी पुस्तकाचें कानडी भाषांतर ), ९ राष्ट्रीय तत्त्वमीमांसे, १० नन्न जीवनस्मृति-गळु ( माझ्या जीवनांतील स्मृति, भाग १ व २ ), ११ विद्यारण्यचरितें ( याचें रामचंद्र हयग्रीव मणूरकर यांनीं मराठींत भाषांतर केलें आहे ), १२ कन्नडिगर भ्रमनिरसन इत्यादि.

हे कर्नाटक ग्रंथप्रसारकमंडळ, नवजीवन रत्नभांडार व गीताकुसुममंजरी या तीन मालांचे चालक व प्रकाशक होते ( डॉ. अ. प. करमरकर ).

**ऑल्कॉट, कर्नल, हेन्री स्टील**—( जन्म स. १८३२–मृत्यु स. १९०७ ).

अध्यात्मशास्त्राच्या पुनरुज्जीवनामध्येंच आधुनिक पाश्चिमात्य संस्कृतीचा व तद्द्वारा जगाचा उद्धार आहे, असें मानणारे विश्वकुटुंबी वृत्तीचे थोर गृहस्थ.

हे थिऑसाफिकल सोसायटीचे संस्थापक व आजीव अध्यक्ष होते ( १८७५–१९०७ ). यांचा जन्म ऑरेंज ( न्यूजर्सी, संयुक्त संस्थानें, अमेरिका ) येथें झाला.

यांचे पूर्वज इंग्लिश प्यूरिटन होते. सातव्या हेन्रीचे वेळीं एलायचे बिशप असलेले व १४९६ मध्यें जीझस कॉलेज स्थापणारे डॉ. जॉन ऑल्कॉक हे यांचेच घराण्यांतील पूर्वज होत. 'ऑल्कॉक' या नांवाचा अपभ्रंश होऊन ऑल्कॉट नांव आलें.

यांनीं शेतकी विषयाचा शास्त्रीय पद्धतीनें अभ्यास केला होता. न्यूयॉर्क येथील मॉडेल फार्मवर केलेल्या संशोधनकार्यामुळें वयाचे तेविसावे वर्षींच यांची आंतरराष्ट्रीय ख्याति झाली. यांनीं साखरेबाबत केलेल्या संशोधनाबद्दल 'सॉरघम अँड इंफी' ( ज्वारी, बाजरी व ऊंस ) या नांवाचा ग्रंथ लिहिला. त्याच्या उत्कृष्टपणामुळें पाठशाळांतून तो क्रमिक ग्रंथ म्हणून नेमला गेला. या एकंदर कार्यामुळें यांना स्वदेशांतून व परदेशांतून अनेक नेमणुका–सरकारी व बिनसरकारी–सांगून आल्या. पण त्या यांनीं नाकारल्या. यांनीं युरोपमध्यें याच संशोधनाकरितां प्रवास करून जो अहवाल लिहिला त्यास अमेरिकन ज्ञानकोशांत प्रसिद्ध होण्याचा मान मिळाला आहे.

अध्यक्ष अॅब्राहम लिंकन यांच्या कारकीर्दीत संस्थानांतील गुलामगिरी रद्द होण्याबाबत दक्षिण विरुद्ध उत्तर संस्थानांमध्यें १८५९ सालीं जेव्हां युद्ध सुरू झालें तेव्हां त्या युद्धांत हे सामील झाले. त्यांत केलेल्या कामगिरीवरून हे 'कर्नल' या लष्करी पदवीपर्यंत चढले. त्यामुळें जन्मभर कर्नल या पदवीनेंच हे संबोधिले जात असत. युद्ध संपल्यावर लष्करांतील लांचलुचपतीबद्दल चौकशी करण्याकरितां सैन्य व आरमार यांचे स्पेशल कमिशनर म्हणून हे नेमिले गेले व तें काम यांनीं खुनाची दहशत दाखविली गेली असतांसुद्धां मोहाला अगर भयाला बळी न पडतां केलें.

आपल्या जीवनांतील स्वातंत्र्याबद्दलचें पहिलें युद्ध असा या युद्धाबद्दल उल्लेख हे करीत असत. पुढें दहा वर्षें यांनीं वकिलीचा धंदा केला ( १८६८–७८ ).

या अवधींत राष्ट्रीय विमापरिषदेचे डायरेक्टर म्हणून विम्यासंबंधींचा नवीन कायदा, एका स्नेह्याचे साहाय्यानें यांनीं तयार केला होता व संस्थानांत पास होण्याचें भाग्यहि त्यास प्राप्त झालें होतें.

वयाचे १९ वे वर्षापासून यांना परलोकविद्येबद्दल आवड असे. स. १८७४ सालीं चिटेंडन ( संस्थान व्हर्मॉंट ) या गांवीं तत्संबंधीं कांहीं चमत्कार होतात हें ऐकल्यावरून तेथें 'न्यूयॉर्क-सन' व 'न्यूयॉर्क-ग्रॅफिक' या पत्रांचे बातमीदार म्हणून हे गेले व तेथें यांनीं तद्विषयक शास्त्रीय व चिकित्सक पद्धतीनें वरील पत्रांना अहवाल धाडले. त्यामुळें युरोप व अमेरिकेंतील शास्त्रीपंडितांमध्यें व एकंदर जनतेंत फार खळबळ उडाली. हे अहवाल यांनीं पुढें 'पीपल फ्रॉम दि अदर वर्ल्ड' ( परलोकांतील रहिवाशी ) या नांवानें प्रसिद्ध केले. परलोकविद्येवरील पश्चिमेकडील हा पहिला ग्रंथ होय. या ग्रंथामुळें सर अल्फ्रेड रसेल वॉलेस आणि सर वुइल्यम क्रुक्स, अशासारख्या शास्त्रज्ञांशीं यांची ओळख होऊन शास्त्रीय मंडळांत यांची वाहवा झाली. याच ठिकाणीं मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांची भेट होऊन पुढें त्याचें परिचयांत रूपांतर झालें.

दोघेंहि न्यूयॉर्कला परत आल्यावर अध्यात्मज्ञानावर त्यांचीं भाषणें होऊं लागलीं. परलोकविद्येचे चमत्कार खरे आहेत. मृत्यूचे घटनेनें मनुष्याचे देहाचा नाश होतो, पण त्याचें जीवन संपत नाहीं; मन व बुद्धि या दृष्टीनें तो तसाच कायम राहतो; पण जीवनाचा हेतु काय व माणसाचे मनाचा व बुद्धीचा पुढें कसा व कोठपर्यंत विकास होत राहतो, याचा उलगडा पौर्वात्य अध्यात्मशास्त्राशिवाय होणार नाहीं, अशी त्या दोघांची त्या वेळीं भूमिका होती. त्याप्रमाणें हे अनेक नियतकालिकांतून तद्विषयक लेख लिहूं लागले, व आपल्या घरीं निरनिराळ्या पंडितांच्यासह विविध गूढ विषयांच्या चर्चेकरितां सभा करूं लागले. त्यामुळें युरोप व अमेरिकेंतील अनेक पंडितांशीं यांचा पत्रव्यवहार सुरू झाला. ब्लॅव्हॅट्स्कीबाईनीं याच सुमारास आपला पहिला ग्रंथ 'आयसीस अनव्हेल्ड (ब्रह्मविद्येचें रहस्यदर्शन)' हा लिहून काढला. हा लिहिण्यांत यांनीं त्यांना साहाय्य केलें, व त्यामुळेंच यांचा स्वतःचा अध्यात्मशास्त्रांत प्रवेश झाला.

या ग्रंथाचें लेखन चाललें असतां, एका रात्रीं यांना यांच्या गुरुदेवांचें दर्शन झालें ( १८७५ ) व त्या वेळीं त्यांच्याशीं झालेल्या संवादामुळें या जीवनांतील यांचे

कार्याची यांना ओळख झाली, व त्याजवर यांची अढळ श्रद्धा बसली. या वेळीं गुरुदेवांनीं यांना आपला फेटा प्रसाद म्हणून बक्षीस दिला. तो फेटा अद्याप अड्यार (मद्रास) येथील वस्तुसंग्रहांत ठेवलेला पाहावयास मिळतो. हे त्यांचे गुरुदेव मौर्यवंशांतील एक क्षत्रिय सिद्धपुरुष आहेत. यासंबंधाची सविस्तर मनोरंजक हकीगत यांनीं 'ओल्ड डायरी लीव्हज्'च्या प्रथम खंडांत लिहिली आहे.

वर लिहिल्याप्रमाणें सभा चालल्यानंतर एके दिवशीं अध्यात्मज्ञानाचे प्रचाराकरितां एक संघ काढावा, अशी कल्पना येऊन १७ नवं. १८७५ रोजीं या दोघांनीं थिऑसॉफिकल सोसायटीची स्थापना केली. त्या वेळीं आद्य सभासद १७ स्त्री-पुरुष होतीं.

'थिऑसॉफी' हा शब्द यांनीं इजिप्तमधील अलेक्झांड्रिया शहरीं सनाचे दुसऱ्या तिसऱ्या शतकांत नियो-फायथागोरियन किंवा नियो-प्लेटोनिस्ट या नांवानें चाललेल्या आध्यात्मिक सांप्रदायाचे वाङ्मयांतून घेतला. या सांप्रदायांतील कांहीं पुरुष आध्यात्मिक ज्ञानाचे शोधार्थ हिंदुस्थानांत आले होते व त्यांची समाधिस्थितीपर्यंत प्रगति झाली होती. 'थिऑसॉफी' या शब्दाचा अर्थ ईश्वरी (प्रत्यक्ष) ज्ञान. याप्रमाणें 'थिऑसॉफी' शब्दानें अध्यात्मज्ञानाचा संघ असा अर्थ अभिप्रेत व्हावा, असा यांचा हेतु होता.

अमेरिकेंत असतांना 'बॅरन डी पाम' या नांवाचा एक सभासद निवर्तला. हा प्रसंग पाहून, मनुष्याचें प्रेत पुरण्याचे चालीपेक्षां त्याचें दहन करणें ही गोष्ट भौतिक व आध्यात्मिक या दोन्ही दृष्टींनीं जास्त प्रशस्त आहे असें वाटून यांनीं त्याचा दहनविधि सार्वजनिक रीतीनें केला. त्यासंबंधीं त्या वेळचे वर्तमानपत्रांतून आलेले सचित्र लेख अड्यार(मद्रास)चे वस्तुसंग्रहांत पाहावयास मिळतात.

अमेरिकेंत असतानाच कांहीं हिंदी गृहस्थांची व यांची भेट झाली व त्यांचेमार्फत हिंदुस्थानांतील कांहीं आर्यसमाजिस्टांशीं यांनीं पत्रव्यवहारहि सुरू केला. दोन्ही संस्थांचें उद्दिष्ट एकच आहे अशा समजुतीनें व सिद्धपुरुषांच्या संघाचें आद्यपीठ या नात्यानें आपल्या कार्यास जास्त लायक स्थान म्हणून दोघेंहि हिंदुस्थानांत आलीं. स. १८७९ त हे मुंबईस पोंचले. तेथे यांचा मुक्काम तीन वर्षें होता. सन १८८२ सालीं यांनीं अड्यार (मद्रास) येथें सोसायटीचें मुख्य पीठ स्थापन केलें.

यांना मुंबई शहर आगबोटींतून दिसूं लागतांच अतिशय आनंद झाला, व यांनीं खालीं धक्क्यावर उतरतांच लवून जमिनीस स्पर्श केला व आपल्या गुरुदेवांची जन्मभूमि म्हणून तिला आदरपूर्वक अभिवादन केलें. लवकरच कांहीं दिवसांनीं फ्रामजी कॉवसजी हॉलमध्यें यांचें व्याख्यान झालें. त्यांत हे म्हणाले, "हिंदी लोकांनीं जडवादावर उभारलेल्या, पाश्चिमात्य वैज्ञानिक संस्कृतीला भुलून न जातां आपल्या वैदिक, पारशी, बौद्ध, इस्लामी धर्मांचा रहस्याच्या दृष्टीनें व समन्वयबुद्धीनें अभ्यास करावा व आपल्या मातृभूमीचा उद्धार करावा, हेंच सुशिक्षित पदवीधरांचें आद्य कर्तव्य आहे. हिंदभूमीचें भवितव्य श्रेष्ठ आहे. ती मृत झालेली नाहीं, केवळ निद्रित आहे."

ब्लॅव्हॅट्स्कीबाई रशियन व ऑल्कॉट अमेरिकन असल्यामुळें हिंदुस्थानसरकारास यांचा संशय येऊन त्यांचेमागें गुप्त पोलिस ठेवले गेले. हा आपल्या पवित्र कार्याचा अपमान वाटून तीं दोघेंहि अलाहाबादच्या 'पायोनिअर' पत्राचे संपादक मि. सिनेट व त्यांचेमार्फत हिंदुस्थानचे शेतकी खात्याचे सेक्रेटरी मि. ए. ओ. ह्यूम यांजकडे जाऊन त्यांचे साहाय्यानें आपल्या कार्याचे सद्हेतूबद्दल सरकारी अधिकाऱ्यांची यांनीं खात्री करून दिली व मागें असलेल्या गुप्त पोलिसांचा बंदोबस्त करून घेतला. या प्रसंगानें वरील दोन्ही गृहस्थ सोसायटीचे सभासद झाले. मि. सिनेट यांनीं तदनंतर इंग्लंडांत जाऊन ग्रंथ व सभांचे द्वारा प्रचार केला; व मि. ह्यूम यांनीं आपली सरकारी नोकरी सोडून हिंदुस्थानभर प्रवास केला व हिंदी पुढाऱ्यांच्या गांठी घेऊन व विचारविनिमय करून राष्ट्रीय सभेची स्थापना स. १८८४ मध्यें मद्रासला सोसायटीचे वार्षिक परिषदेनंतर केली.

स. १८७९ च्या ऑक्टोबरमध्यें यांनीं 'थिऑसॉफिस्ट' या नांवाचें मासिक सुरू केलें. तेव्हांपासून तें अजून चालू आहे. याच सालीं वार्षिक परिषदेबरोबर यांनीं हिंदी कला-कौशल्याच्या वस्तूंचें प्रदर्शन भरविलें. हें हिंदुस्थानांतील पहिलें 'औद्योगिक प्रदर्शन' होय.

हिंदुस्थानात आल्यावर अनुभवांतीं यांना असें आढळलें कीं, आर्यसमाजाचें उद्दिष्ट केवळ वैदिक धर्माच्या पुनरुज्जीवनापुरतेंच आहे व आपल्या संघाचें उद्दिष्ट सर्वच धर्मांच्या पुनरुज्जीवनाकरितां आहे. म्हणून तेव्हांपासून दोन्ही संघ निराळे राहून अलग कार्य करूं लागले.

दोघेंहि सोसायटीचे प्रचारार्थ सर्व हिंदुस्थानभर हिंडलीं. पंचशील ग्रहण करून दोघेंहि बौद्धधर्मीय बनलीं. कारण त्या वेळीं हिंदु अगर पारशी धर्मांना शुद्धीकरण मान्य नव्हतें.

हे सिंहलद्वीपांत गेले असतां तेथें मिशनरी लोकांचा अस्थानीं ख्रिस्ती धर्मप्रचार पाहून बुद्धधर्मीय लोकांचे शिक्षणाकरितां बौद्धधर्मीयांचेच साहाय्यानें यांनीं त्या सर्व बेटभर शाळा स्थापल्या, व शिक्षणक्रमांत बौद्धधर्माचें शिक्षण अंतर्भूत केलें. त्याकरितां यांनीं स्वतः 'बुद्धिस्ट कॅटेकिझम' (बौद्धधर्मीय प्रश्नोत्तरावलि) या नांवाचें एक लहान पुस्तक लिहून त्यास बुद्धभिक्षूंची संमति मिळविली. याप्रमाणें यांचे हयातींत २०५ शाळा, ३ कॉलेजें कार्य करीत होतीं. हेंच कार्य कांहीं महिन्यांपूर्वी परलोकवासी झालेले सुप्रसिद्ध थि. व हिंदुस्थानचे कचेरींत सिलोनतर्फे असलेले वकील, बॅरन सर जयतिलक यांनीं पुढें चालविलें. यानंतर जपान, ब्रह्मदेश, सयाम, सिंहलद्वीप यांतील बौद्धधर्मीय अनेक पंथांना व हीनयान आणि महायान या पंथांचीं सामान्य चौदा तत्त्वें काढून त्यांचें एकीकरण केलें. सर्वसाधारण सिंहलद्वीपांतील बौद्ध जनतेकरितां भगवान् गौतमबुद्धांच्या सूक्ष्म देहाचे सात रंगांनीं अंकित असलेला असा राष्ट्रीयध्वज यांनीं तयार केला. इंग्लंडांत जाऊन सेक्रेटरी ऑफ स्टेट यांची त्यास संमति मिळवली. यामुळें यांचे प्रेतदहनाचे वेळीं यांच्या शवावर हा ध्वज ठेवून अड्यार येथें यांच्या देहाला अग्नि देण्यांत आला.

पंचम या नांवानें ओळखले जाणारे मद्रासकडील हरिजन यांच्या मुलांमुलींचे साक्षरतेकरितां यांनीं चार मोफत शाळा काढल्या (१८८५) व त्या आजन्म चालविल्या. या शाळा थिऑसाफिकल सोसायटीतर्फे चालविल्या जाऊन पुढें सरकारच्या स्वाधीन करण्यांत आल्या. यांत नेहमीं हजार-बाराशेंपर्यंत विद्यार्थी व विद्यार्थिनी असत.

थिऑसाफीचे प्रचारार्थ प्रवास करीत असतां विकत किंवा देणगी म्हणून अध्यात्म, वेदांत, योग, वैद्यक, साहित्य वगैरे विषयांवरील प्राचीन ताडपत्रावरील ग्रंथ यांनीं संग्रहित केले व स. १८८६ सालीं 'ओरिएन्टल इन्स्टिट्यूट' (प्राच्यविद्या संस्था) या नांवानें ग्रंथालय स्थापिलें. यांत हल्लीं ताडपत्रावरील १०,००० ग्रंथ आहेत. या ग्रंथालयावर योग्य पाश्चिमात्य अगर हिंदी पंडित व शास्त्री यांची नेमणूक होऊन संशोधन व प्रकाशनकार्य चालू असतें. या ग्रंथालयामार्फत नुकताच 'अप्रकाशित उपनिषदः' म्हणून ७८ उपनिषदांचा संग्रह प्रसिद्ध केला गेला आहे. क्यूबा (अमेरिका) येथील 'लोफ्यू एन्टी' या नांवाचे सभासदानें आपली तीन लाखांची जिनगी निम्मेनिम बेझंटबाई व हे यांना मृत्युपत्रान्वयें दिली. यांनीं आपले दीडलाख रुपये वरील ग्रंथालयाला अर्पण केले व बेझंटबाईनीं आपले दीडलाख रुपये सेंट्रल हिंदु कॉलेजला दिले.

थिऑसॉफीचे प्रचारार्थ यांनीं हिंदुस्थानांत व बाहेरदेशीं अनेकदां प्रवास केला. या प्रवासांत अमेरिका, युरोप, ऑस्ट्रेलियापर्यंत प्रवासकार्य झालें. हे निवर्तले तेव्हां साधारणतः १३ देशांत थिऑसॉफीचा प्रवेश झाला होता.

स. १८८३ सालीं आपल्यामध्यें मोहनिद्रा (हिप्नॉटिझम) व मेस्मेरिझम (प्राणशक्तिद्वारा रोगचिकित्सा) यांचे साहाय्यानें रोग बरे करण्याची शक्ति आहे, असें यांच्या प्रत्ययास आलें व त्याप्रमाणें यांनीं दक्षिण हिंदुस्थान व बंगाल येथें प्रवास करीत असतां सुमारें ६ हजार अंध, पंगु, बहिरे, मुके व वेडे अशा माणसांना बरें केलें. त्याबद्दलची हकीकत विश्वसनीय लोकांच्या प्रमाणपत्रांसह यांनीं आपल्या 'ओल्ड डायरी लीव्हज्' द्वितीय खंडाचे २९ व्या खंडांत ४३६–४५३ पानांवर दिली आहे.

**यांचे ग्रंथ—**

1. Sorghum And Imphee & two others.
2. People from the Other World.
3. Buddhist Catechism (४४ आवृत्त्या; २० भाषांतून भाषांतरें).
4. 'Theosophist' मासिकाचें संपादन (१९०७ पर्यंत.)
5. Old Diary Leaves Vols. 1, 2, 3, 4, 5 & 6.
6. अनेक लेख व लघुपुस्तकें (वा. ल. चिपळूणकर).

**आसी—**(जन्म स. १८३२–मृत्यु स. १९१५) उर्दू कवि.

यांचें समग्र नांव–मौलाना शाह अब्दुल अलीम. ठिकाण–शिकन्दरपूर (जिल्हा बलिया). आसी हें यांचें टोपण नांव आहे. हे प्रायः गाजीपुरला राहत. आरबी व फार्सीचे नामांकित पंडित होते. कविता करण्याचें हे 'नासिख' पासून शिकले.

हे सूफीपंथाचे होते. हिंदुमुसलमानांशीं यांचे संबंध अत्यंत प्रेमाचे असत. यांच्या कवितेंत भक्ति, वैराग्य, विरह व प्रेम यांचें सुंदर वर्णन आहे. यांना आपल्या

कविता जमवून छापणें पसंत नव्हतें. पण यांच्या शिष्यांनीं यांचे कवितासंग्रह छापले आहेत ( क. कौ. ४.४८९ ).

**आळतेकर, अनंत सदाशिव**—( जन्म स. १८९८ )

इतिहासाचे सुप्रसिद्ध अभ्यासक, संशोधक व लेखक. हे एम्. ए., डि. लिट्. आहेत. हे सध्यां हिंदु विश्वविद्यालय बनारस, येथें प्राचीन हिंदी इतिहास व संस्कृत यांचे 'मणींद्रचंद्र नंदी' प्राध्यापक आहेत. यांनीं इंग्रजींत बरेच ग्रंथ लिहिले आहेत आणि ते उच्च दर्जाचे समजले जातात. यांनीं 'डॉक्टर ऑफ लिटरेचर' करितां लिहिलेला 'राष्ट्रकूट' हा ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहे.

यांचे मराठी ग्रंथ—१ प्राचीन शिक्षण पद्धति, २ राष्ट्रकूट, ३ शिलाहार.

यांचे प्रसिद्ध झालेले इंग्रजी ग्रंथः—

(1) History of Important Towns and Cities in Gujarat and Kathiawar, (2) A History of the Village Communities in Western India, (3) Education in Ancient India, (4) A New Gupta King, (5) Rashtrakutas and their Times. [यांना हिंदुविश्वविद्यालयाची डी. लिट्. पदवी या प्रबंधामुळें मिळाली. राष्ट्रकूटांच्या सत्तेखालीं असणाऱ्या महाराष्ट्राचा इतिहास, यांत देण्याचा प्रयत्न करण्यांत आला आहे (१९३४)].

**आळतेकर, प्रो. माधव दामोदर**--( जन्म स. १८९० ) मराठी व इंग्रजी भाषेंतील सुप्रसिद्ध लेखक व वक्ते.

यांचा जन्म कसबा कळें (सं. कोल्हापूर) येथें झाला. हे फर्ग्युसन कॉलेजांतून एम्.ए. झाले (१९१७). त्यापूर्वीच हे मुंबईच्या 'इंदुप्रकाश' या दैनिक पत्राचे संपादक होते. ( १९१५—१६ ). त्यानंतर हे 'New Review, Bombay'चे संपादक झाले ( १९१७-२० ). नंतर 'इंडियन टेक्स्टाइल जर्नल,' मुंबईचे हे दुय्यम संपादक झाले ( १९२३-२४ ).

पुढें मुंबईच्या विल्सन कॉलेजांत यांना मराठीचे प्राध्यापक नेमण्यांत आलें ( १९२४ ). तथापि यांचें मराठी व इंग्रजी या दोन्ही भाषांतून लिखाण सतत चालू असतें.

कलकत्त्याच्या 'कॅपिटल' व मुंबईच्या 'टाइम्स ऑफ इंडिया' मधून आर्थिक विषयावर यांनीं अनेक निबंध लिहिलेले आहेत.

शिवाय मराठींत 'नवयुग', 'मनोरंजन' वगैरे अनेक नियतकालिकांतून यांच्या गोष्टी, कविता, निबंध वगैरे विविध प्रकारचें वाङ्मय विपुल प्रसिद्ध झालेलें आहे. यांचे गोपाळ गणेश आगरकर, कालिदासाची सृष्टि, ज्ञानेश्वरी, तुकाराम वगैरेवरील विवेचनात्मक निबंध ग्रंथ, मुक्तबंध ललिता वगैरे अनेक कादंबऱ्या पुस्तकरूपानें प्रसिद्ध झाल्या आहेत.

यांचें वक्तृत्वहि मोठें परिणामकारक असतें. त्यांतला उपरोध, उपहास व हास मोठा उठावदार असतो.

**आळतेकर, सदाशिव खंडो**—( जन्म स. १८७२-मृत्यु स. १९३८ )

प्रसिद्ध सार्वजनिक कार्यकर्ते. यांचा जन्म आळतें ( सं. कोल्हापूर ) येथें झाला. यांचें शिक्षण कोल्हापूर व पुणें येथें झालें. हे बी. ए., एल्एल्. बी. होते ( १९०१ ).

यांनीं कोल्हापूर येथें वकीली करण्यास सुरुवात केली. तेथें असतांना निरनिराळे उत्सव व स्वदेशी चळवळ यांत यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला. स. १९०६ मध्यें यांनीं 'कोल्हापूर प्रतिनिधिसभा' स्थापन करण्यांत पुढाकार घेतला; त्याचा परिणाम होऊन यांची वकीलीची सनद रद्द करण्यांत आली.

पुढें हे कऱ्हाड येथें राहण्यास आले व तेथें यांनीं वकीली करण्यास सुरुवात केली. तेथें कऱ्हाड नगरपालिकेचे कार्याध्यक्ष ( १९१८ ), वाचनालय व अर्बन के. सोसायटीचे अध्यक्ष होते. स. १९२१ सालीं असहकारितेच्या चळवळींत यांनीं वकीली सोडली.

पुढें हे दोन वर्षं ऑल इंडिया कॉंग्रेस कमेटीचे सभासद होते व स. १९३२ जाने.फेब्रु. मध्यें डेटिन्यु प्रिझनर होते. शेवटपर्यंत देवसेवा, धर्मसेवा आणि समाजसेवा करण्यांत यांनीं आपलें आयुष्य घालविलें.

यांचे ग्रंथ—१ सुलभ दासबोध, २ समर्थरत्नसंग्रह, ३ बालबोध समर्थ वाङ्मयमाला ( याचीं तीन पुष्पें मनोबोध वगैरे ) प्रसिद्ध आहेत.

यांचे चिरंजीव सुप्रसिद्ध संशोधक, अनंत सदाशिव आळतेकर हे होत.

**आंबेकर, बापूजी मार्तंड**—( जन्म स. १८७५-मृत्यु स. १९३४ ) सुप्रसिद्ध लेखक व पुण्याच्या 'ज्ञानप्रकाश' या दैनिकाचे संपादक.

सातारा जिल्ह्यांतील वाई हें यांचें जन्मस्थान.

पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्यें माध्यमिक व बडोद्याच्या बडोदा कॉलेजमध्यें उच्च शिक्षणाचा लाभ यांना झाला. बडोद्याचें हवामान मात्र यांच्या प्रकृतीला कधींच मानवूं शकलें नाहीं. त्याचा परिणाम, यांच्या कॉलेजशिक्षणाची मध्यंतरींच इतिश्री होण्यांत झाला.

मात्र एका दृष्टीनें यांचा बडोदें येथील हा वास महत्त्वाचा आहे. तेथें असतांना 'सयाजी विजय' पत्राचे संचालक दामोदर सावळाराम यंदे यांनीं यांना त्या पत्राचे संपादक-वर्गात सामील करून घेतलें. त्यामुळें हे वाईस परतले ते वृत्तपत्रव्यवसायाची कला हस्तगत करूनच.

वाईस परत आल्यावर यांनीं वर्तमानपत्रांत स्फुटें व थोर पुरुषांचीं चरित्रें लिहिण्यास आरंभ केला व थोड्याच दिवसांत आत्मविश्वास वाढून आपल्याला साजेशी नोकरी मिळवण्याच्या हेतूनें हे पुण्यास आले, आणि पहिल्याच भेटींत आपल्या व्यासंगाची व बहुश्रुततेची अशी कांहीं चमत्कारिक छाप यांनीं नटेश अप्पाजी द्रविडांचेवर—त्या वेळच्या ज्ञानप्रकाशचे संपादकांवर—बसविली कीं त्याच क्षणीं ज्ञानप्रकाशचे संपादक वर्गात यांना सामील करून घेण्यांत आलें ( १९०७ ).

यांचें लेखनकौशल्य, तत्कालीन विषयाचा परामर्ष घेण्यास सदैव तयार असणारी यांची बुद्धि व तडकाफडकी काम उरकण्याची असणारी यांची तयारी, यांचा परिणाम यांच्या भोंवतालच्या लोकांच्याबरोबर गो. कृ. गोखल्यांचेवरहि झाल्याशिवाय राहिला नाहीं. त्यांचेच शिफारशीनें युनिव्हर्सिटी पदवीधर नसूनहि यांना 'सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटी'चे सभासद करून घेण्यांत आलें.

हरिभाऊ आपटे व हे यांमध्यें आमरण वसणारा स्नेहभाव सुप्रसिद्धच आहे. हरिभाऊ आपट्यांचें एक छोटेखानी चरित्र लिहून आपल्या लेखकमित्राचें ऋण अंशतः कमी करण्याचा यांनीं प्रयत्न केला आहे.

इतर सर्व वृत्तपत्रव्यवसायिकांप्रमाणेंच यांच्या लेखनगुणांचा बराचसा भाग वर्तमानपत्राचे स्तंभांनीं व्यापला आहे. सुबोध व आकर्षक अशा शैलीनें लिहिलेलें यांचें लेखन तत्कालीन लोकप्रियता संपादन करण्यांत अगदीं पुढें असे.

'हरिभाऊ आपटे यांचें चरित्र' व 'आपट्यांच्या आठवणी' या यांच्या दोन पुस्तकांशिवाय 'पंचतंत्र' व 'हितोपदेश' यांचें यांनीं केलेलें रूपांतर सुप्रसिद्ध आहे.

यांच्या सूक्ष्म व मर्मग्राही लेखनशैलीचा नमुना म्हणून 'टिळक-जीवनरहस्य' या यांच्या पुस्तकाकडे पाहिलें पाहिजे. जुन्या जहाल-मवाळांच्या वादांत यांचें वादकौशल्य चांगलेंच व्यक्त होई.

चौफेर दृष्टि, चतुरस्र बुद्धि, खेळाडु वृत्ति व खोचदार लेखणी या वर्तमानपत्रकाराला लागणाऱ्या भांडवलाचे यांचे अंगांतील वैपुल्यामुळें ज्ञानप्रकाशचे संपादक म्हणून यांचें नांव कधींहि न येतां तेथील सर्व सूत्रें मात्र यांच्या ताब्यांत राहत. ज्ञानप्रकाशला जी लोकप्रियता मध्यें कांहीं दिवस लाभली होती तिचें श्रेय काकासाहेब लिमयांच्या सर्वसंग्राहक धोरणाप्रमाणेंच यांच्या कुशाग्र लेखणीला द्यावयास पाहिजे. यांच्या लिहिण्याबोलण्यांत बहुश्रुतपणाची ऐट व मार्मिकपणाची खोंच इतकी भरलेली असे कीं कोणीहि त्यास सहजच भुलत असे.

नेमस्तांची राजकारणांतून पूर्णपणें उचलबांगडी होण्याच्या ऐन संधीला हे संपादक झाले. या वेळीं द्रविडांचे नेतृत्वाखालीं केसरीशीं सामना देऊन, गोखले पक्षाचा बोज यांनीं बराच राखला. त्या वेळच्या यांच्या लिखणाचा नमुना आज जरी आपणांपुढें नसला तरी त्याच थाटाची, केळकरांच्या टिळक चरित्रांवरील यांनीं लिहिलेली 'टिळक-जीवनरहस्य' या नांवानें प्रसिद्ध झालेली टीका यांच्या विषारी टीकेचा मासला समजण्यास हरकत नाहीं. चरित्र व चरित्रकार यांसंबंधीं यांनीं प्रकट केलेल्या मताबद्दल आपण जरी नापसंती दाखविली तरी, ज्युनियसच्या पत्राप्रमाणें विषारी वाङ्मयाचा नमुना या दृष्टीनें तें एकमेवाद्वितीय आहे.

हाच यांच्या लेखणींतील मार्मिक बिनतोडपणा प्रो. गोगटे यांच्या 'ज्ञानसिंधु व इतर लघुकथा' या पुस्तकाच्या वाङ्मयचौर्याचे आरोपांचे वेळीं, प्रा. माटे यांच्या 'पाश्चात्य पुरुषश्रेष्ठ' या पुस्तकाच्या सदोष भाषेच्या वादाच्या वेळीं, व गोडबोल्यांच्या 'महाराष्ट्र-शाकुंतल' या भाषांतराच्या सदोषतेच्या, निव्वळ वाङ्मयविषयक वादांतहि तडफेनें व्यक्त झाला होता.

**आंबेडकर, भीमराव रामजी**—( जन्म स. १८९३ ).

जगप्रसिद्ध विद्वान् व हरिजनसमाजाचे पुढारी. हे एम्. ए., पीएच्. डी. ( कोलंबिया युनिव्हर्सिटी अमेरिका ), डी. एससी., बार-ॲट-लॉ ( लंडन ) इत्यादि इंग्लंड-अमेरिकेच्या पदव्यांनीं विभूषित आहेत.

यांचें घराणें मूळचें महाडचें. यांचे वडील रामजी

मालोजी हे लष्करांत सुभेदाराच्या हुद्द्यावर होते. तेहि अस्पृश्यसमाजाचे विशेषतः महारसमाजाचे–पुढारी होते. त्यांचें भीमराव हें चवदावें अपत्य होत. म्हणूनच हे आपला उल्लेख विनोदानें चवदावें रत्न असा करितात.

हे मुंबईच्या एल्फिन्स्टन हायस्कूलमध्यें शिकत असतां यांनीं संस्कृत भाषा घेण्याचें ठरविलें. तेव्हां त्या सरकारी हायस्कुलांतील संस्कृत शिक्षकानें हे अतिशूद्र म्हणून यांना संस्कृत शिकविण्याचें नाकारिलें. तेव्हां यांना दुसरी भाषा म्हणून फारशी भाषा घेणें भाग पडलें. पुढें यांनीं संस्कृत भाषेचें ज्ञान चांगलें संपादन केलें, ही गोष्ट निराळी.

हे मुंबईस बी. ए. झाल्यावर महाराज सयाजीराव गायकवाड बडोदा यांच्या शिष्यवृत्तीनें अमेरिकेस गेले. तेथील कोलंबिया विश्वविद्यालयांत मानसशास्त्र व अर्थशास्त्र यांचा अभ्यास करून हे एम्. ए. व पीएच्. डी. झाले ( १९१३–१६ ).

तेथून परत आल्यावर कराराप्रमाणें गायकवाडराज्याच्या सिव्हिल सर्व्हिसमध्यें हे दाखल झाले.

हे इतकें शिक्षण घेऊन इतक्या मोठ्या हुद्द्यावर काम करूं लागले तरी हे अस्पृश्य आहेत, हें लोक विसरेनात. कचेरींत यांच्या हाताखालचे कारकून यांच्याकडे दुरून कागद फेंकीत व यांना आपल्या टेबलाला स्पर्शहि करूं देत नसत. सायंक्लबमध्यें यांचे सहकारी यांच्या अस्पृश्यतेची चेष्टा करून यांचा बुद्धिपुरःसर अपमान करीत. यांना धड राहण्यास जागा मिळेना. एका पारशाच्या हॉटेलमध्यें यांनीं कांहीं दिवस मुक्काम टाकला. पण आपली गिऱ्हायिकी तुटेल या भीतीनें त्यानेंहि यांच्यावर बहिष्कार टाकला.

अशा परिस्थितींत या मानी पुरुषाला अत्यंत मनस्ताप सहन करावा लागला आणि बडोद्याची नोकरी सोडून हे मुंबईस आले.

तेथें कांहीं दिवस सिडनहॅम कॉलेजमध्यें प्राध्यापकाचें काम केल्यावर कोल्हापुरच्या छत्रपति शाहूमहाराजांच्या प्रेरणेनें व आश्रयानें यांना स्वतंत्र धंदा करण्याच्या दृष्टीनें बॅरिस्टर होण्याकरितां इंग्लंडमध्यें जावें लागलें.

तेथें हे इंडिया ऑफिसच्या लायब्ररींत ॲन्थ्रॉपॉलजी व इकॉनमिक्स या विषयाचें वाचन करून संशोधनात्मक अभ्यास करीत आणि बॅरिस्टरीच्या टर्म्सहि भरीत. कांहीं दिवस हे जर्मनींतील बॉन युनिव्हर्सिटींतहि अभ्यासाकरितां राहिले होते. अशा प्रकारें अभ्यास करून हे लंडन युनिव्हर्सिटीचे डी. एस्सी. झाले. लंडन युनिव्हर्सिटीची ही डी. एस्सी. पदवी फार महत्त्वाची म्हणून फारच थोड्यांना लाभलेली आहे. तेथेंच हे बॅरिस्टर झाले.

यांनीं त्या वेळीं डी. एस्सी. पदवीकरितां लिहिलेला निबंध ' दि प्रॉब्लेम ऑफ दि रूपी ' हा आतां प्रसिद्ध झालेला आहे. त्याच्या प्रस्तावनेंत यांचे गुरू प्रो. कॅनन यांनीं ' या माझ्या स्वतंत्र बुद्धीच्या व विशेष तर्कशक्ति असलेल्या शिष्यापासून मलाहि कांहीं शिकतां येण्यासारखें आहे ' असे यांना अत्यंत अभिमान वाटण्याजोगे उद्गार काढले आहेत.

अशा या विद्वानाला मुंबईस आल्यावर सिडनहॅम कॉलेजच्या प्रिन्सिपालची जागा मिळूं शकली नाहीं. तेव्हां दुसरी मोठी जागा सरकारनें देऊं केली असतां ती यांनीं नाकारली आणि बॅरिस्टरी करण्याचें ठरविलें. सनदेकरितां भरावे लागणारे पांचशें रुपये यांचेजवळ नव्हते ते दादा केळूसकर वगैरे यांच्या चहाते मंडळींनीं जमवून दिले आणि ते भरून यांनीं सनद काढली व हे बॅरिस्टरी करूं लागले ( १९२३ ). पुढें हे मुंबईच्या सरकारी लॉ कॉलेजचे प्रिन्सिपल झाले ही गोष्ट निराळी.

आतांपर्यंत आपल्या समाजाचें निरीक्षण करून आणि जागतिक प्रश्नांचा अभ्यास करून येथील शैथिल्य घालविण्याकरितां आपल्या समाजाला, हिंदुसमाजाला आणि सरकारला धक्के बसतील असे ठसठशीत कार्यक्रम आंखण्यास यांनीं सुरुवात केली, आणि ते कार्यक्रम अत्यंत निर्भयपणें यशस्वी करण्याचा धडाडीचा प्रयत्न करून यांनीं अस्पृश्यांच्या प्रश्नाला आंतरराष्ट्रीय स्वरूप प्राप्त करून दिलें आहे.

अस्पृश्यांचा पहिला महत्त्वाचा प्रश्न पाण्याचा होता. अस्पृश्यांना स्पृश्य हिंदु सार्वजनिक पाणोठ्यावर पाणी भरूं देत नाहीत, त्यामुळें अस्पृश्यांचे अत्यंत हाल होतात हें ध्यानांत घेऊन यांनीं महाड येथील चवदार तळ्यावर पाणी भरण्याचा जाहीर सत्याग्रह केला ( १९२७ ). महाडच्या प्रचंड चवदार तळ्यावर कोण कोठें पाणी भरतो याचा पत्ता लागणें शक्य नाहीं. पण तेथेंहि हें प्रकरण हायकोर्टांत गेलें आणि अस्पृश्यांचा त्या सार्वजनिक तळ्यावर पाणी भरण्याचा हक्क शाबीत झाला.

यांची दुसरी महत्त्वाची चळवळ म्हणजे नाशिकच्या पंचवटींतील काळ्या रामाचे मंदिरांत जाऊन देवदर्शन घेणें ही होय. पण तें लोकांच्या विरोधामुळें जमेना; पवित्र रामकुंडांत स्नान करणें तेंहि जमेना, तेव्हां मिरवणुकींतील

रथाचे दोर ओढणें व शेवटीं कांहींच जमेना, तेव्हां ' देवदर्शनानें काय होणार !' असे उद्गार काढणें अशा क्रमानें ही चळवळ झाली.

यांनीं आळंदी, पंढरी इ. महाराष्ट्राच्या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचीं असणारीं क्षेत्रें टाळून नाशिक-सारखें भारतीय क्षेत्र आपल्या कार्याकरितां निवडण्यांतील यांचा हेतु आपल्या चळवळीचें स्वरूप प्रान्तिक न राहतां भारतीय व्हावें हाच असला पाहिजे. पण, रामकुंडांतील स्नानाचा सत्याग्रह यांच्या इच्छेप्रमाणें प्रसिद्धीच्या दृष्टीनें यशस्वी झाला तरी वहिवाटीच्या मुद्यावर अस्पृश्यांचा तेथें स्नानाचा हक्क कोर्टाकडून फेंटाळला गेला ( १९३३ ).

पण यांनीं तेथील सुप्रसिद्ध काळ्या रामाच्या रथाच्या मिरवणुकीच्या वेळीं सत्याग्रह करण्याचा तो प्रश्न तसाच गाजत ठेविला. रामदर्शन तर राहोच, पण रामनवमीच्या वेळीं निघणाऱ्या छबिन्यांतील रथाला ओढण्याकरितां लावलेल्या लांबलचक दोरांना स्पर्श करूं देण्याचेंहि लोकांनीं नाकारलें. या प्रश्नाचें महत्त्व ध्यानांत यावें म्हणून मोठ्या संख्येनें अस्पृश्यसमाज जमा करणें, दंगल माजविणें, प्रसंगीं रक्तपाताची तयारी दाखविणें वगैरे प्रकारांनीं यांनीं हा प्रश्न तेथें धसास लावला. पण यांना लोकांच्या विरोधामुळें व सरकार मध्यें पडत असल्यामुळें हा प्रश्न कांहीं वर्षे चालवून तसाच सोडावा लागला. पण अस्पृश्यांच्या संघटनेस आणि अखिल-भारतीय प्रसिद्धीस यांनीं या प्रसंगांचा चांगला उपयोग करून घेतला ( १९३०–३४ ). हे प्रथम एकदोन वर्षेच नाशिकला चळवळीच्या वेळीं हजर राहिले. स. १९३३ सालापासून यांच्या अनुयायांनीं सत्याग्रह करण्याबद्दल हस्तपत्रकें वाटावीं आणि सरकारनें बंदी करावी असाच प्रकार चालू होता. स. १९३५ सालापासून तर तोहि प्रकार बंद झाला.

प्रथम स्पृश्यास्पृश्यांत विरोध होता, नंतर सरकारविरुद्ध लोक असा तेथें प्रकार सुरू झाला, व स्पृश्य लोक सत्याग्रह करून रथाची मिरवणूक काढण्याचा प्रयत्न करूं लागले. तेव्हां मिरवणुकीला बंदी करण्याचें धोरण बदललें.

यानंतर हे पहिल्या व दुसऱ्या राउंड टेबल परिषदेला अस्पृश्यांचे सरकारनियुक्त प्रतिनिधि म्हणून हजर राहिले. तेथें दुसऱ्या परिषदेंत हिंदुराष्ट्राचे एकमेव प्रतिनिधि म्हणून म. गांधी हजर होते. तेथें गांधी म्हणाले–'तुम्ही सर्व सरकारनियुक्त आहांत, लोकांनीं निवडलेले प्रतिनिधि नव्हेत. अस्पृश्यांचें मनोगत, त्यांचें हित मीच बरोबर जाणतों, अस्पृश्यांचीं मतें घेतलीं तर मीच सर्वांत वरचें स्थान पटकावीन.' हें बोलणें या स्वाभिमानी माणसाला अत्यंत झोंबलें, आणि यांनीं आपल्या बेमुर्वतखोर स्वभावाप्रमाणें त्या विधानांचा खरपूस समाचार घेऊन 'तुम्हीं आजपर्यंत अस्पृश्यांकरितां काय केलें आहे ?' असा रोखठोक प्रश्न विचारला. या वादामुळें हिंदुस्थानांतील भांडणें लोकांना दिसलीं असलीं तरी यांना व अस्पृश्यांच्या प्रश्नाला जागतिक महत्त्व आलें ही गोष्ट खोटी नाहीं ( १९३१ ).

याचा परिणाम म्हणा, किंवा मुसलमानांच्या इतकीच अस्पृश्यांची संख्या असतांना सुद्धां अस्पृश्यांना सामाजिक किंवा राजकीय बाबतींत महत्त्वाचें स्थान मिळत नाहीं म्हणून म्हणा, यांनीं अस्पृश्यांना धर्मान्तराशिवाय गत्यन्तर नाहीं अशी घोषणा केली. हिंदुसमाजाचें अंग म्हणून राहिल्यानें अस्पृश्यांची कुचंबणा होते, प्रगतीला अडथळा येतो, उच्च हिंदूंच्या औदार्याची भीक मागत राहून लाचारीनें अस्पृश्यांचा कधींहि उद्धार होणार नाहीं, असाच या चळवळीच्या मुळाशीं यांचा हेतु होता. पण यांच्या हेतुपूर्वक केलेल्या पल्लेदार नाटकी प्रतिपादनाचा परिणाम खरोखरच कांहीं भाबडे अस्पृश्य मुसलमान होण्यांत होऊं लागला, तेव्हां यांना तें आपलें प्रतिपादन आवरतें घ्यावें लागलें, आणि देवदर्शन किंवा धर्मान्तर यांनीं कोणत्याहि समाजाचा उत्कर्ष होत नसून आर्थिक स्थिति सुधारल्यानेंच होतो असें जाहीर करावें लागलें.

दुसऱ्या राउंड टेबल परिषदेच्या वेळीं हिंदी प्रतिनिधी एकमत करूं न शकल्यानें जातवार प्रतिनिधींच्या व्यवस्थेचा आणि संख्येचा निर्णय अध्यक्षांना देणें भाग पडलें. त्यांत अस्पृश्यांना स्वतंत्र मतदारसंघ देण्यांत आला ही गोष्ट हिंदुसमाजाच्या ऐक्याच्या दृष्टीनें विघातक आहे असें म. गांधींना वाटलें आणि त्यांनीं तो निर्णय बदलून संयुक्त मतदारसंघ स्थापन करण्याकरितां येरवडा-तुरुंगांत प्राणान्तिक उपोषण आरंभिलें. अस्पृश्यांच्या किंवा हिंदुसमाजाच्या प्रश्नापेक्षां म. गांधींच्या जीविताच्या प्रश्नाला तेव्हां अधिक महत्त्व येणें स्वाभाविक होतें. हिंदुस्थानांतील यच्चयावत् पुढारी यांच्यापुढें त्या वेळीं अक्षरशः लोटांगणें घालीत होते. पण यांचा तत्त्वनिष्ठेचा ताठरपणा बिलकुल कमी झाला नाहीं. दोन हट्टी आणि तत्त्वनिष्ठ माणसांचा हा लढा होता. यांनीं

स्वच्छ सांगितलें कीं, 'म. गांधींच्या प्राणापेक्षां मला माझ्या सहा कोट अस्पृश्यांच्या प्राणांचें महत्त्व जास्त वाटतें.' शेवटीं सर तेजबहादूर सप्रू यांच्या मध्यस्थीनें 'अस्पृश्यांनीं चार प्रतिनिधी निवडावेत व त्या चौघांतून एकाची निवड स्पृश्यास्पृश्य हिंदुसमाजानें संयुक्त मतदारामार्फत करावी. ही दुहेरी निवडणूक दोघांच्या संमतीनें केव्हांहि रद्द करावी. मात्र ती दहा वर्षांपुढें टिकूं नये.' असें ठरलें.

अशा तऱ्हेनें यांनीं संयुक्त मतदारसंघाला मान्यता दिली, म. गांधींचे प्राण वांचविले, अस्पृश्यांच्या एकमेव प्रतिनिधित्वाचा मान आपला असल्याची म. गांधींकडून कबुली घेतली आणि कौन्सिलांत अस्पृश्यांना जवळजवळ दुप्पट जागा मिळवून दिल्या ( १९३२ सप्टें. ).

तिसऱ्या राउंड टेबल कॉन्फरन्सकरितां निवडलेल्या कांहीं निवडक लोकांत यांचा समावेश झाला होता.

यानंतर यांनीं स्वतंत्र मजूर पक्षाची स्थापना करून ( १९३६ ) त्यांत जातिविषयक दृष्टीला थारा न देतां आपला कार्यक्रम आर्थिक तत्त्वावर आंखला आणि आपल्या स्वतंत्र, स्वराज्यवादी, संग्राहक आणि संघटक बुद्धीचा सर्वांना प्रत्यक्ष प्रत्यय आणून दिला. हे कॉंग्रेसमध्यें न शिरल्यामुळें कॉंग्रेसच्या मंत्रिमंडळांत यांचा समावेश झाला नाहीं, पण हे बाहेर राहिल्यानें यांचा विरोध कॉंग्रेसला फारच जाणवला. मुंबईच्या कौन्सिलांत यांच्या पक्षातर्फे पळुळेकर, चित्रे, मोळे, विनायकराव गडकरी व हे स्वतः निवडून आले.

लढाई सुरू झाल्यानंतर यांनीं व्हाइसरॉयच्या एक्झिक्युटिव कौन्सिलमधील मजूरमंत्र्याची जागा पत्करली ( १९४२ ) आणि अस्पृश्यांच्या आर्थिक व शैक्षणिक उत्कर्षाकरितां कमालीचे प्रयत्न कायद्याच्या साहाय्यानें करण्याचा प्रयत्न केला. गेल्या पन्नास वर्षांत जें मुसलमानांना करितां आलें नाहीं तें यांनीं एका वर्षाच्या अवधीत अस्पृश्यांकरितां करून दाखविलें. शेंकडा आठ जागा इंपीरियल सर्व्हिसमध्यें अस्पृश्यांकरितां राखून ठेविल्या आणि महाराष्ट्रीयांना वरिष्ठ नोकरींत प्रवेश करून दिला.

तथापि सरकारी चौकटींत राहूनहि यांनीं मद्रास व पुणें येथें भाषण करून गीता व वेद या ग्रंथांची भरपूर निंदा केली ( १९४५ ). तसें करण्यांत यांचा हेतु अस्पृश्यांना हिंदु समाजापासून अलग राहून आपल्या कल्याणाचा विचार करण्यास शिकविणें हा असला पाहिजे. दुसरें असें कीं, हिंदुसमाजाच्या अंतःकरणांत भिनलेली उच्चनीचता ग्रंथमूलक असल्यानें त्यांच्या ग्रंथांवरच हल्ला केल्यानें ती उखडली जाईल अशी यांची समजूत होय.

यांना फक्त दोनच व्यसनें आहेत. एक उत्तम पोषाख आणि दुसरें भरपूर वाचन करणें हीं तीं दोन व्यसनें होत. त्याकरितां हे पैशाकडे कधींहि पाहत नाहींत. मुंबईस दादर येथें 'राजगृह' नांवाची यांची इमारत मुद्दाम लायब्ररीच्या सोयीनें बांधली आहे. लायब्ररीच्या सोयीनें मुद्दाम बांधलेली इमारत मुंबईस क्वचितच असेल. यांच्या स्वभावांत राठपणा व आढ्यता आढळते. तो महाराष्ट्राचा स्वभावविशेष म्हणून दाखवितां येईल. हट्टीपणा, सखोल अभ्यास आणि धार्मिकता या तिहींचें यांच्यांत चमत्कारिक मिश्रण आढळतें. फक्त सनदशीर सफाई यांच्यांत नाहीं.

यांच्या कार्याचें व कार्यपद्धतीचें सहज आकलन होणें कठीण आहे. दोनचार डाव मनांत ठेवून खेळणाऱ्या खेळाडूप्रमाणें यांची स्थिति आहे. धाडस, बुद्धिमत्ता आणि अचूकपणा हा यांच्या कार्यपद्धतीचा विशेष आहे. यांनीं मनुस्मृति जाळली, गीतेला शिव्या दिल्या आणि धर्मांतराची घोषणा केली. तरी यांचे हे प्रयत्नहि अस्पृश्य समाजाला बलिष्ठ व स्वावलंबी करण्याकरितांच आहेत. अस्पृश्य समाजांत आत्मविश्वास उत्पन्न करण्यावर आणि लाचारींतून त्यांना मुक्त करण्यावर यांचा कटाक्ष आहे. वरिष्ठ समजल्या जाणाऱ्या लोकांकडून अस्पृश्यांचा उद्धार करण्याची चळवळ परोपकारबुद्धीनें चालविली जाते. पण यांना या परोपकारबुद्धीची अत्यंत चीड आहे. इतर मानवांप्रमाणें अस्पृश्यांनाहि मनुष्य म्हणून जगण्याचा हक्क आहे. आणि तो हक्क अस्पृश्य समाजांनीं न कचरतां संपादन करावा, इतरांच्या साहाय्याचीहि त्यांनीं अपेक्षा करूं नये, अशी यांची शिकवण आहे. हें यांचें म्हणणें उच्च वर्गांना कठोर वाटत असलें तरी तें खरें आहे आणि त्यामुळेंच अस्पृश्य हे खरे मनुष्य बनतील यांत शंका नाहीं.

यांनीं मराठी व इंग्रजी भाषेंत वेळोवेळीं पुष्कळ महत्त्वाचें लेखन लिहिलें असलें तरी यांचीं प्रसिद्ध झालेलीं पुस्तकें पुढीलप्रमाणें आहेत :

१. दि प्रॉब्लेम ऑफ दि रुपी ( डी. एस्सी. करितां लिहिलेला निबंध ).

२. इव्हॉल्यूशन ऑफ दि प्राव्हिन्शियल फायनन्स इन् ब्रिटिश इंडिया.

३. कास्टस् इन इंडिया.

४. स्मॉल होल्डिंङ्ज् अँड देअर रेमिडीज.

५. पाकिस्थान (पहिली आवृत्ति १९४०–दुसरी वाढविलेली आवृत्ति १९४५).

६. मि. गांधी अँड दि एमॅन्सिपेशन ऑफ दि अन्टचेबल्स् (१९४३).

७. गांधी, जिना, रानडे. इत्यादि.

---

# इ

**इकबाल, डॉ. सर मुहम्मद**—(जन्म स. १८७३–मृत्यु स. १९३८) जगप्रसिद्ध कवि व मुसलमानांचे सुप्रसिद्ध पुढारी.

यांचें जन्मस्थान सियालकोट. पूर्वी काश्मिरी ब्राह्मण असणाऱ्या घराण्यांत यांचा जन्म झाल्यानें विचारांचा सुसंस्कृतपणा यांना जन्मतःच प्राप्त झाला होता. यांच्या वडिलांचे मित्र सय्यद मीर हसन हे सियालकोटच्या 'मूर कॉलेज'मध्यें अरबी व फारशी भाषांचे प्राध्यापक होते. त्यांच्याच सहवासानें या भाषांविषयीं प्रेम व त्यांचें अध्ययन करण्याची उत्कंठा यांचें मनांत उत्पन्न झाली.

कॉलेज शिक्षणाचा लाभ यांना लाहोरच्या 'गव्हर्नमेंट कॉलेज'मध्यें मिळाला. यांना तत्त्वज्ञान विषयाबद्दल लहानपणापासूनच आकर्षण वाटत असे. त्या वेळचे यांचे गुरु सर टॉमस ॲर्नोल्ड व हे यांमध्यें घनिष्ठ संबंध घडून येण्यास यांचें हें आकर्षणच कारणीभूत झालें.

यानंतर लाहोरच्या ओरिएंटल कॉलेजमध्यें रीडरचें व नंतर कांहीं दिवस गव्हर्नमेंट कॉलेजमध्यें लेक्चररचें काम केल्यानंतर हे इंग्लंडला रवाना झाले (१९०५). तत्त्वज्ञानाचें उच्च शिक्षण मिळवावयाचें हा यांच्या परदेशगमनांतील प्रमुख हेतु होता. त्या वेळीं तेथें असणाऱ्या प्रो. ॲर्नोल्ड यांचे सल्ल्यानें फारशी गूढविद्याशास्त्रावर (mysticism) यांनीं प्रबंध लिहिला व त्याचे साहाय्यानें केंब्रिजची पदवी तर यांना मिळालीच, परंतु त्याबरोबरच म्युनिचची पीएच्. डी. ही पदवीहि यांनीं मिळविली. याचबरोबर हे बॅरिस्टरहि झाले (१९०८).

अशा प्रकारें निरनिराळ्या महत्त्वाच्या परदेशी पदव्यांनीं विभूषित होऊन हे हिंदुस्थानांत परत आले व लाहोर येथें आपली वकिली यांनीं सुरू केली. परंतु तत्त्वज्ञान व वाङ्मय यांमध्यें रंगणारें यांचें मन वकिलींत केव्हांहि अत्युच्च यश प्राप्त करूं शकलें नाहीं.

उर्दू कवि या नात्यानें मात्र यांनीं लहानपणापासूनच प्रगति करण्यास सुरुवात केली होती. लाहोर येथें येण्याच्या पूर्वीच कांहीं गझल लिहून यांनीं तीं त्या वेळीं प्रसिद्धि-शिखरावर आरूढ झालेल्या 'दाग' या कवीकडे दुरुस्तीकरितां पाठविलीं. त्या वेळीं यांना, 'यांत दुरुस्त करण्यासारखें कांहींच नाहीं' अशा शब्दांनीं त्या कवीकडून गौरवून घेण्याचा मान मिळाला. याच वेळीं कविसंमेलनांतहि हे वावरत असत. हिमालयाच्या सौंदर्यावर लिहिलेली यांची कविता ज्या वेळीं यांनीं उर्दू लिटररी सोसायटीसमोर म्हणून दाखविली, त्याच वेळेपासून एक होतकरू कवि या नात्यानें हे जनतेसमोर प्रामुख्यानें चमकूं लागले. यांची ही कविता 'मखज़ान' या मासिकांत प्रसिद्ध झालेली आहे.

अशा तऱ्हेनें एक प्रथितयश कवि या नात्यानें हे लोकांच्या डोळ्यांसमोर येऊं लागल्यानंतर दर वर्षी 'अन्जुमान-इ-हिमायत्-इ-इस्लाम' या संस्थेच्या वार्षिक समारंभांत यांचें काव्यगायन हा एक हुकमी कार्यक्रम होऊन बसला. (ही संस्था पंजाबांतील असून मुसलमान समाजांत धार्मिक व शैक्षणिक कार्य करणारी एक कार्यकारिणी या दृष्टीनें हीस विशेष महत्त्व आहे). 'तस्वीर-इ-दर्द' (दुःखाचें चित्र), 'शिकवा' (तक्रार), 'जबाब-इ-शिकवा' (तक्रारीचें उत्तर) या यांच्या या वेळच्या सुप्रसिद्ध कविता होत.

फारशी लिहिण्यास सुरुवात करण्यापूर्वीच्या यांच्या कांहीं कविता 'बांग-इ-दिरा' (कारवानाच्या घंटेचे नाद) या नांवानें यांनीं १९२४ त प्रसिद्ध केल्या. "स्थितप्रज्ञ स्थितींतून जागे होऊन आपला काफिला उन्नतीच्या मार्गाकडे न्या" अशा तऱ्हेच्या स्फूर्तिदायक संदेशाचें उत्थान करणाऱ्या कवितांचे संग्रहाला वरील नांव खरोखरच अतिशय अनुप्रासयुक्त वाटतें. उर्दू कवींमधील यांचें पूर्वी ठरलें गेलेलें स्थान पक्कें करून टाकण्याचें काम या संग्रहानें केलें आहे.

उर्दूपेक्षांहि जास्त भावनासमतेनें आपल्या तत्त्वज्ञानपूर्ण कल्पना आपण फारशीमध्यें प्रकट करूं शकतों या गोष्टीचा शोध यांना हे इंग्लंडमध्यें असतांना लागला. ताबडतोब यांनीं फारशी भाषेंत कविता करण्यास सुरुवात केली. 'असरार-इ-खुदी' (आत्म्याचीं रहस्यें) ही यांची फारशी भाषेंतील पहिली कविता होय (१९१५).

याच नांवानें प्रसिद्ध झालेल्या यांच्या पुस्तकाच्या प्रसिद्धीनें, फारशी बोलल्या जाणाऱ्या जगांतील सर्व भागांत, अक्षरशः खळबळ उडवून दिली. त्यांतच प्रो. आर्. ए. निकोल्सन यांनीं या संग्रहाचें इंग्रजी भाषेंत भाषांतर केल्याची भर पडली आणि या संग्रहांतील कांहीं भागांचा जर्मन व इटली भाषांत अनुवाद केला गेल्यानंतर तर नुसता कहर झाला. जगाच्या पाठीवर असणारा कोणताहि मनुष्य इकबालांच्या कवितेपुढें मान लववूं लागला, व इतके दिवस भारतीय असणाऱ्या यांच्या कीर्तीचा एकदम कायाकल्प होऊन तिला आंतरराष्ट्रीय स्वरूप प्राप्त झालें.

या काव्यसंग्रहाचे यशानें उत्तेजित होऊन, आपल्या जगन्मान्य झालेल्या 'असरार-इ-खुदी'चा उत्तर-भाग यांनीं 'रमूज़-इ-बेखुदी' (आत्मवंचनेचीं रहस्यें) या नांवानें प्रसिद्ध केला. मानवी व्यक्तिमत्त्वावर या कवितेंत यांनीं जोर दिला असून त्याच्या साहाय्यानें गांठावयाच्या उच्च ध्येयाची परमावधि करण्याकरितां काय करावयास पाहिजे याचें यांत अत्यंत काव्यमय भाषेंत वर्णन करण्यांत आलें आहे.

मानवी जीवनांत कोणीहि जनसेवेंतच आपल्या सार्वजनिक आयुष्याची परिणति मानीत असतो. त्याचे अंतरात्म्यांत जागृत असणाऱ्या व्यक्तिमत्वाचा हा बाह्य परिणाम असतो. इतकें महत्त्वाचें काम करणाऱ्या व्यक्तिमत्त्वाचा ताबा घेण्यास शिका, ही या कवितेची मध्यवर्ति कल्पना आहे.

यानंतर थोड्याच दिवसांनीं यांचा 'पयाम-इ-मश्रिक' (पूर्वेचा संदेश) हा काव्यसंग्रह प्रसिद्ध झाला. गटेच्या 'West Ostlicher Diwan' या पुस्तकाच्या धाटणीचें या काव्यसंग्रहांत यांनीं अनुकरण केलेलें आहे. याचेच पाठोपाठ 'ज़बूर-इ-अजम' (पर्शियाचीं गीतें) व 'जवीद नामा' हीं दोन पुस्तकें यांनीं प्रसिद्ध केलीं. यांपैकीं पहिल्या ग्रंथांत, कवीच्या आत्म्यानें आपल्या गुरूच्या आत्म्यासह स्वर्गांत झालेलें भ्रमण, वर्णन केलें आहे.

याच वेळीं कांहीं तरी उर्दू लिहिण्याविषयीं उर्दू चहात्यांचा यांना होणारा आग्रह वाढतच होता. त्या मागणीचा आदर करावा या हेतूनें यांनीं 'बाल-इ-जिब्रिल' (गॅब्रिअलचे पंख) व 'ज़र्ब-इ-कलीम' (The Stroke of the Rod of Moses) हे दोन उर्दू कवितासंग्रह प्रसिद्ध केले. 'असरर-इ-खुदी' व तत्सम फारशी कवितेंतून हाताळलेले विषयच या कवितांतून पुनरुत्थानित केलेले आपणांस दिसून येतात. त्यामुळें काल्पनिक व काव्यमय सौंदर्यानें परिपूर्ण असणाऱ्या यांच्या पहिल्या उर्दू काव्यसंग्रहापेक्षां 'उत्तिष्ठत जाग्रत' असा संदेश देणारे यांचे हे दोन काव्यसंग्रहच विशेष सुंदर वाटतात.

यानंतर यांच्या जिवंतपणींच प्रसिद्ध झालेलें यांचें शेवटचें काव्य लहान पण लांबलचक नांवाचें आहे. 'पस चि बायद कर्द अय अकवाम-इ-शर्क' (पूर्वेकडील देशांनो, आम्ही काय करावें?) हें त्याचें नांव असून पूर्वेकडील लोकांवर, पाश्चिमात्य राष्ट्रें जें वजन आणीत आहेत, त्यावर यांत टीका करण्यांत आली आहे.

यांच्या उरलेल्या स्फुट कवितांचा संग्रह यांच्या मृत्यूनंतर 'अर्मगान-इ-हिजाज' (हेदजाजची देणगी) या नांवानें प्रसिद्ध करण्यांत आला. अरबस्थानमधील तत्त्ववेत्त्यांनीं मानवी वागणुकीसंबंधीं सांगितलेले कांहीं विचार अत्यंत काव्यमय भाषेंत यांत ग्रथित करण्यांत आले आहेत. अरबस्थानसंबंधीं यांचें मनांत असणाऱ्या आदराचें अमूर्त प्रतीक या नात्यानें या काव्यसंग्रहास विशेष महत्त्व असून 'हेदजाजची देणगी' जगाला देऊन तेथें जाण्याची आपली अपुरी इच्छा यांनीं पुरी केली आहे.

मुख्यतः कवि म्हणूनच जरी यांची प्रसिद्धि असली तरी 'Reconstruction of Thought in Islam' या आपल्या उत्कृष्ट ग्रंथानें धार्मिक तत्त्वज्ञानांत यांनीं घातलेली भर केवळ उपेक्षणीय नाहीं. पाश्चिमात्य तत्त्वज्ञानाचेंच बरोबरीनें मुहम्मदी विचारांवरील यांचें प्रभुत्व दाखवणारा हा ग्रंथ असून मद्रास येथें यांनीं दिलेल्या सहा व्याख्यानांचा हा संग्रह आहे. पश्चिमेकडे तर या ग्रंथाची अत्यंत वाहवा झाली व या ग्रंथामुळेंच ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटींत Rhodes Lecturer म्हणून यांची नेमणूक झाली होती. प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें हीं व्याख्यानें देणें यांना अशक्य झालें, हा प्रश्न निराळा.

'उर्दू कवि' या नात्यानें हिंदुस्थानांत यांना मिळालेली लोकप्रियता खरोखरच अत्यंत स्पृहणीय आहे.

बंगालमध्यें रवींद्रनाथ टागोरांच्या काव्याला जी जनप्रीति लाभली तिचीच तुलना फार तर यांच्या या लोकप्रियतेशीं करतां येईल. मात्र सुस्तावलेल्या जगाचे कानांत, न कचरतां व्यक्तिमत्त्व संपादन करण्याचा संदेश, यांच्याइतक्या जोरदारपणानें देणें टागोरांना कधींच जमलें नाहीं.

गूढविद्याशास्त्राची यांना मनापासून आवड असे. तरी देखील पौर्वात्य लोकांचे संकटपरंपरेच्या मुळाशीं त्या शास्त्रावर असणारी त्यांची श्रद्धाच आहे, असें यांचें मत असे. कारण या शास्त्रावर विसंबून राहूनच ईश्वरानें निसर्गाला जिंकण्याकरितां दिलेल्या साधनांचा उपयोग ते करीत नाहींत असें यांना वाटे. " गूढविद्याशास्त्रावरील गूढ हल्ला ' या नांवानें यांची ही विचारसरणी संबोधिली जाते.

आत्म्याच्या जोपासनेसंबंधीं यांनीं प्रकट केलेले विचार निझ्शेच्या तत्सम तत्त्वज्ञानावरून सुचलेले आहेत. मात्र त्यांना मिळालेली घडण मात्र मुहम्मदी तत्त्वज्ञान रोमारोमांत भरलेल्या यांच्या धर्मप्रवण बुद्धींतून उत्पन्न झालेली आहे.

मुस्लिम समाजाचा अभिमान यांच्या शरीराच्या व वक्तव्याचे कणाकणांतून स्पष्टपणें दृग्गोचर होत असला तरी यांचें जीवितविषयक तत्त्वज्ञान पाश्चात्य विचारांनींच अधिक प्रभावित झालें होतें, ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे. आयुष्याच्या पूर्वार्धात हिंदुस्थानच्या भक्तीनें–अभिमानानें भरलेलीं कवनें यांनीं लिहिलीं व उत्तरार्धात आपल्या कवनांतून इस्लामी अधिराज्याचीं मोहक चित्रें चितारलीं. प्रथम प्रथम हिंदी राष्ट्रीय विचारांनीं ओथंबलेल्या उर्दू कविता लिहिणाऱ्या या प्रतिभाशाली कवीनें पुढें फारशी भाषेंत कविता करावयास सुरुवात करावी ही गोष्ट हिंदवासियांना कधींहि योग्य वाटणें शक्य नाहीं. कारण त्यांच्या दृष्टीनें यांच्या या कृतीनें, अखंड हिंदी राष्ट्राच्या भावनांना चालना देण्याऐवजीं, फक्त मुसलमान जातीच्याच भावना प्रतिपादन करण्यांत आनंद मानण्याची यांची वृत्ति स्पष्टपणें दिसून येते. त्यामुळें सुरुवातीला ' नया शिवाला ' ( नवें देऊळ ) किंवा ' हिंदी बालकांचें राष्ट्रीय गीत ' यासारख्या मातृभूमीच्या अभिमानानें भरलेल्या कविता लिहूनहि पुढें हिंदी जनतेच्या हृदयांतील स्थान यांना कधींच मिळवितां आलें नाहीं.

तत्कालीन लेखकांवर यांची पडलेली छाप मात्र केवळ अविस्मरणीय आहे. आत्म्याचें सामर्थ्य, भांडवलशाही व मजूर यांमधील संबंध यांसारख्या गोष्टींसंबंधीं यांनीं प्रकट केलेल्या विचारांचेंच सध्यां अनुकरण होत आहे. भांडवलशाहीच्या विरुद्ध व मजुरांच्या बाजूनें असें धोरण प्रकट करणाऱ्या कविता आज ज्या उर्दू भाषेंत वैपुल्यानें दिसत आहेत त्याचें श्रेय आपणांस यांनाच द्यावें लागेल. भांडवलशाहीबरोबरच साम्राज्यशाहीबद्दल यांनीं प्रकट केलेला दृष्टिकोनहि असाच लोकप्रिय झालेला आहे.

याचेच पुढें जाऊन यांनीं केलेलें लोकसत्ताक राज्यपद्धतींतील दोषांचें आविष्करणहि असेंच मनोरंजक झालें आहे. " डोक्याच्या महत्त्वापेक्षां संख्याच लोकसत्ताक राज्यपद्धतींतील लोकांना अधिक वाटते " हा यांचा या राज्यपद्धतीवर सर्वात मोठा आक्षेप आहे. त्याचप्रमाणें " मृत राष्ट्रांचीं थडगीं विभागण्याकरितां प्रेतवस्त्रें पळविणाऱ्या लोकांची समिति " हें ' लीग ऑफ नेशन्स 'ला यांनीं केलेलं पदवीदानहि असेंच मजेदार आहे.

राजकारण हा यांच्या जीवनाचा एक उपेक्षित व्यवसाय होता. कारण राजकारण हा प्रांतच यांच्या स्वभावधर्माला मानवण्यासारखा नव्हता. परंतु राजकारणांत यांनीं भाग घेतला तो आपल्या चहात्यांच्या आग्रहावरून. मुस्लिम लीगच्या अधिवेशनाचे अध्यक्ष व दुसऱ्या व तिसऱ्या राउंड टेबल कॉन्फरन्सचे प्रतिनिधी या दोन गोष्टींना यांच्या राजकारणी आयुष्यांत विशेष महत्त्व आहे ( १९३१–३२ ).

यांपैकीं यांच्या मुस्लिम-लीगच्या अधिवेशनाला त्यांत यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत प्रकट केलेल्या विचारांच्या दृष्टीनें विशेष महत्त्व आहे. हिंदु-मुसलमान यांचेमध्यें असणाऱ्या तंट्याला हिंदुराष्ट्र व मुस्लिमराष्ट्र असे हिंदुस्थानचे दोन भाग पाडण्याचा यांनीं सुचविलेला तोडगाच, आज जिनांनीं पाकिस्तान या नात्यानें पुढें आणलेल्या योजनेंत स्वीकारलेला आपणांस दिसून येत आहे.

शिक्षणतज्ज्ञ या नात्यानें यांनीं केलेली कामगिरी अशीच महत्त्वाची आहे. पंजाब युनिव्हर्सिटीच्या सिनेटचे व सिंडिकेटचे सभासद या नात्यानें व त्या संस्थेच्या ओरिएन्टल फॅकल्टीचे डीन या नात्यानें यांनीं त्या क्षेत्रांत काम करणाऱ्या लोकांना दिलेला सल्ला महत्त्वाचा असे. अफगाणिस्तानचे अमीर राजे नादिरखान यांनीं आपल्या राज्यांतील ' डिपार्टमेंट ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन 'च्या पुनरुज्जीवनाकरितां जी तिघांची कमिटी नेमली होती, तीमध्यें हे होते. हे तिघे काबूलला जाऊन त्यांनीं तेथें शिक्षणासंबंधीं एक योजनाहि आंखली

होती. पुढें नादिरखान मारले गेल्यामुळें यांची योजना तशीच राहिली.

यापेक्षांहि आपल्या कवितांतून शिक्षणाच्या ध्येया-संबंधीं व त्याकडून अभिप्रेत असणाऱ्या कार्याविषयीं यांनीं जे विचार मांडले आहेत ते अधिक महत्त्वाचे आहेत. लोकांना कांहीं तरी संदेश देण्याकरितां तळमळत असणारी बुद्धि व नवीन कल्पना नवतेजानें मांडण्याची यांची अपूर्व शक्ति, या गोष्टींच्या कोंदणांत यांनीं आपले शिक्षणविषयक विचार मांडलेले असल्यामुळें तर त्यांस एक विशेष तेज आलें आहे. त्याचेच जोडीला कल्पकता, समजूत व उत्साह आहेच.

यांना 'सर' ही पदवी यांच्या काव्यगुणामुळेंच मिळाली आहे. लाहोरच्या 'गव्हर्नमेंट हौस' मध्यें एक युरोपियन प्रवासी उतरण्यास आला. त्यानें गव्हर्नरजवळ यांच्या भेटीची इच्छा व्यक्त केली. गव्हर्नरनें चकित होऊन ह्या माहितीच्या उगमस्थानाविषयीं पृच्छा केली. प्रवाशानें यावर दिलेलें उत्तर खरोखरच आश्चर्यजनक होतें. पर्शिया, रशिया वगैरे देशांत अतिशय आवडीनें वाचल्या जाणाऱ्या कवींमध्यें यांचें नांव प्रामुख्यानें घेतलें जातें, ही माहिती ऐकून गव्हर्नर खरोखरच चकित झाला. यांना तो ओळखत होता; परंतु परदेशांत यांच्या कवितांना इतकी मानमान्यता, इतका सन्मान दिला जात असेल ही गोष्ट स्वप्रांतमुद्धां त्यास खरी वाटणें शक्य नव्हतें. त्या वेळीं गव्हर्नरनें यांना बोलावून आणलें व प्रवासी व हे यांमधील संभाषण अतिशय काळजी-पूर्वक ऐकलें. वर ऐकलेल्या माहितीच्या सत्यतेचाच पुनः प्रत्यय त्यांस मिळाला व या विद्वत्तेचा सन्मान करण्याच्या हेतूनें यांचा कांहीं सन्मान करण्याची वर त्यानें शिफारस केली आणि यांस 'सर' करण्यांत आलें.

मुहम्मदावरील यांचें भावनामय प्रेम व यांचेमध्यें मूळपासूनच असणारी सौंदर्यदृष्टि यांचे सुरेख संगमामुळें यांचे काव्यास साहजिकच नितांत रमणीयत्व प्राप्त झालें आहे. यांच्या काव्यांतील हृदयाला जाऊन भिडण्याच्या शक्तीच्या मुळाशीं मानवी जीवनासंबंधीं यांचे काव्यांत दिसून येणारी आस्थाच आहे.

" मज़हब ( धर्म ) नहीं सिखाता<br>
आपस में बैर रखना;<br>
हिंदी है हम, वतन है<br>
हिंदोस्ताँ हमारा "

अशा स्फूर्तिदायक कवनांचा जनक असणारा हा महाकवि पुढें जरी एका विशेष धर्माचा प्रचार करणाऱ्या कविता करूं लागला तरी यांच्याबद्दल हिंदी माणसाला केव्हांहि अभिमानच वाटेल ( ग्रेट मेन ऑफ इंडिया ).

**इचलकरंजीकर, घोरपडे, केशवराव**—( मृत्यु स. १८५२ )

यांच्या पूर्वींचे इचलकरंजी संस्थानचे अधिपति श्रीमंत व्यंकटराव यांचे हे धाकटे बंधु होत. स. १८३८ त व्यंकटराव निपुत्रिक मरण पावल्यामुळें हे संस्थाना-धिपति झाले. यांच्या कारकीर्दींत इचलकरंजी संस्थान हें करवीरकर छत्रपतींच्या ताब्यांतील आहे, असें इंग्रजांनीं ठरविलें. त्यामुळें यांना करवीरकरांच्या ताबेदारींत राहणें न आवडून यांनीं संस्थानच्या उत्पन्नास रामराम ठोकून काशीस जाण्याचें ठरविलें. परंतु त्या वेळचे पोलिटिकल खात्याच्या सरकारी अधिकाऱ्यांनीं यांना 'कोल्हापूर महाराजांची ताबेदारी केवळ नाममात्र असून तुमचा व कोल्हापूरकरांचा त्यांत कांहींहि संबंध येत नाहीं व तुमचा दर्जाहि त्यामुळें कमी होत नाहीं' असें सांगितल्यामुळें हे पुन्हां संस्थानचा कारभार पाहूं लागले. याच वेळीं संस्थानास कारणपरत्वें दत्तकाची जरूर लागल्यास सरकार त्याचा विचार करील, असेंहि आश्वासन ब्रिटिश सरकारकडून यांना देण्यांत आलें.

**इचलकरंजीकर, घोरपडे नारायणराव गोविंदराव** तथा, **बाबासाहेब**—(जन्म स. १८७०-मृत्यु स. १९४३ ).

कोल्हापूर संस्थानापैकीं इचलकरंजी जहागिरीचे अधि-पति. हे आजरेकर जोशांच्या घराण्यांतून दत्तक आले ( १८७६ ). यांचा विवाह परांजपे वकील, नगर, यांच्या कन्येशीं झाला ( १८८६ ). यांचें शिक्षण राजाराम कॉलेज कोल्हापूर, व एल्फिन्स्टन कॉलेज मुंबई, येथें झालें.

जहागिरीचा अधिकार यांच्याकडे आल्यानंतर ( १८९२ ) यांनीं प्रथम काटकसरीनें कर्ज नाहींसें केलें. उत्पन्नांत वाढ केली. यांच्या राज्यांत प्राथमिक शिक्षण मोफत असून वरिष्ठ शिक्षणास नाममात्र फी घेतली जाते. धंदेशिक्षणाचीहि व्यवस्था आहे. जुन्या परंपरेचें ज्ञान मोफत वेद व शास्त्र शाळा चालवून देण्याची व्यवस्था केलेली आहे. संगीत, चित्रकला, व्यायाम व वाचनालयें यांना हे उत्तेजन देत.

जहागिरीच्या बाहेरील बहुतेक प्रमुख संस्थांना यांनीं मदत दिली असून आपल्या जहागिरींतील लोकांना त्यामुळें सवलती मिळाव्यात अशी व्यवस्था केली आहे. शिवाय आपल्या प्रजाजनांकरितां शिष्यवृत्त्या, परदे-

शांतील शिक्षण घेण्याकरितां लोन स्कॉलरशिपा व ग्रंथ-प्रकाशनास साहाय्य करून यांनीं आपला विद्येविषयींचा पक्षपात व्यक्त केला आहे.

यांना स्वतः लेखनाचा व व्यासंगाचा नाद असे. त्याप्रमाणें आपले विचार प्रसिद्ध करण्याची दक्षता यांनीं घेतली आहे.

यांनीं पतपेढ्या स्थापण्यास उत्तेजन दिलें. व्यापारधंदा वाढावा असेहि यांचे प्रयत्न असत. यांनीं यांत्रिक साहाय्यानें कापड काढून तें बाजारांत यशस्वी केलें. शेतकी व जनावरें यांचीं प्रदर्शनें वगैरेला हे उत्तेजन देत. स्वतः फळबागा करण्याचा यांना नाद होता.

मुंबईच्या जुन्या कायदेमंडळांत बारा वर्षें यांनीं इनामदारवर्गाचा प्रतिनिधि म्हणून काम केलें ( १८९७–१९१० ). इनामदारांच्या अडचणी मांडण्याचें काम तेव्हां यांनीं निर्भीडपणें केलें. कांहीं वर्षें हे मुंबईविद्यापीठाचे फेलो होते. शिवाय अनेक संस्थांत, सभांत व संमेलनांत भाग घेऊन लोकांना आपल्या मोठेपणाचा व सहकार्याचा फायदा यांनीं दिला आहे. यांचें खासगी आचरण अत्यंत शुद्ध व निष्कलंक असे. हे शिस्तीचे आणि वक्तशीर-पणाचे भोक्ते होते. हे वर्णाश्रमधर्माचे अभिमानी असून संध्यापूजादि नित्यकर्म हे निष्ठेनें आचरीत. निरलस-पणा व दीर्घोद्योग हे यांचे विशेष होत.

यांनीं हिंदुस्थान, जावा, ब्रह्मदेश व बहुतेक युरोप यांत अनेक वेळां प्रवास केला.

यांनीं आपल्या प्रजाजनांत अस्पृश्यता दूर केली व नोकरींत व शिक्षणांत सर्वांना मुक्तद्वार ठेविलें.

इचलकरंजीकर घोरपडे यांची वंशावळ आमच्या मध्ययुगीन चरित्रकोशांत दिली आहे. त्या वंशापैकीं दुसरे व तिसरे नारायणराव, पत्नी अनूबाई, पहिले, दुसरे व तिसरे व्यंकटराव व या पुरुषांचीं चरित्रेंहि त्या ग्रंथांत वर्णक्रमानें दिलीं आहेत. स. १८१८ नंतरच्या पैकीं प्रमुख म्हणून केशवराव व हे यांचें चरित्र येथें दिलें आहे. यांच्या मागें दत्तक देऊन वंश व जहागीर चाल-वावी असें ठरलें आहे.

**इचलकरंजीकर, बाळकृष्णबुवा गायनाचार्य**—( जन्म स. १८४९–मृत्यु स. १९२७ ) अखिल भारतीय कीर्तीचे महाराष्ट्रीय गवई व गायनशास्त्रज्ञ. यांचें घराणें कोल्हापूरपासून सोळा मैलांवर असणाऱ्या चंदूरचें राहणारें. तेथील हे जोशी म्हणून यांना चंदूरकर जोशी असेंहि म्हणत. यांचे अजोबांना—खंडभटांना–१ रामभट, २ कृष्णंभट, ३ विष्णुभट, ४ सखारामभट असे चार मुलगे होते. त्यांपैकीं हे रामभटाचे पुत्र होत. राम-भटांनीं सातारच्यास बाळाजीबोवा म्हणून सुप्रसिद्ध गवई होते त्यांच्याकडून गायनाचें शिक्षण घेतलें व रामचंद्रबुवा या नांवानें ते पुढें गवई म्हणून प्रसिद्ध झाले. मुंज झाल्यावर आई व पंधराव्या वर्षी वडील वारल्यानें यांना आपलें शिक्षण स्वतःच्या धाडसावर मोठ्या कष्टानें करावें लागलें. बळवंतराव निढळकर नांवाचे नामांकित गवई हैद्राबाद ( द. ) कडे होते. ते इकडे आले असतां त्यांच्या बहिणीशीं यांचें लग्न झालें.

यांनीं खालील गुरूंपाशीं शिक्षण घेतलें.

१ विष्णुबुवा जोगळेकर हरिदास म्हैसाळ, ( २ वर्षें ), २ अलिदातखां, जत ( १ वर्ष सुमारें ), ३ भाऊबुवा कागवाडकर, ४ अमरचंद, वाडीकर नाटक कंपनी (धारला जाण्याकरितां नोकरी ), ५ वामनबुवा कवठेकर ( धारकरांचे उपाध्ये ), ६ देवजीबुवा (रामकृष्ण परांजपे, धार ), ७ वासुदेवबुवा जोशी, काशी, ८ गुहम्मदखां, ( रहिमतखाचे थोरले बंधु ) ग्वाल्हेर.

यांनीं मुंबईसहि कांहीं दिवस गायनसमाज चालविला होता. त्यांत डॉ. सर रामकृष्ण गो. भांडारकर, महादेव चिमणाजी आपटे, कुंटे, न्यायमूर्ति तेलंग ही मंडळी गायन शिकत. डॉ. भांडारकरांची बरीच प्रगति झाली होती. तेथें प्रसिद्ध सतारवादनकार कै. विश्वनाथ रामचंद्र काळे व यांनीं 'संगीतदर्पण' मासिक वर्ष सव्वा वर्ष चालविलें. त्याच्या अंकांचें स्वतंत्र पुस्तक पुढें यांनीं प्रसिद्ध केलें.

यांच्या शिष्यांपैकीं कांहीं प्रमुखः—

१ गुंडोबुवा भिकुबुवा ( औंधकर ) इंगळे, २ विष्णु दिगंबर पलुस्कर, ३ अनंत मनोहर जोशी, औंध, ४ नीळकंठबुवा जंगम, मिरज, ५ दत्तात्रय विनायक काळे, ६ बाळुबुवा इजारे, ७ बाबुराव गुलगुंजे, ८ अण्णाबुवा, ९ गणेश बळवंत भाटे ( मालक-नाट्यकलाप्रवर्तक सं. मं.), १० यशवंत सदाशिव मिराशी ( नाट्यकलाप्रवर्तक मंडळी ) इत्यादि.

स. १८९८ साली यांचें कुटुंब वारलें. नंतर हे मिरजेहून इचलकरंजीस आले. अण्णाबुवांनीं कोल्हापुरास गायनशाळा काढली म्हणून मधील दोन वर्षेखेरीज शेवटपर्यंत हे इचलकरंजीस राहिले. त्यामुळे यांना लोक चंदूरकर याऐवजीं इचलकरंजीकर या नांवानेंच ओळखीत.

प्रथम गुरूबरोबर हे नेपाळ वगैरे प्रान्तांत फिरले होते. नंतर स्वतःहि शिष्य बरोबर घेऊन हिंदुस्थानच्या अनेक भागांत यांनीं गायनाचे दौरे काढले. नेहमींच यांच्या गाण्यास रंग भरत असे आणि यांचे दौरे पैसा आणि कीर्ति देणारे होत. यांचे गुरु वासुदेवबुवा जोशी यांचा यांना अभावरच असे.

यांचे चिरंजीव अण्णाबुवा अकालीं मृत्यु पावल्यानें व एक मुलगीहि त्याच सुमारास वारल्यानें यांना आतां भ्रम होतो की काय, अशी स्थिति प्राप्त झाली. ही हकीगत कै. श्री. बाबासाहेब इचलकरंजीकर यांना समजतांच त्यांनीं यांचा समाचार घेऊन असतील तेथें दरमहा पासष्ट रुपये पाठविण्याची व्यवस्था केली. शेवटीं हे इचलकरंजीसच आले. अण्णाबुवांच्या मृत्यूनंतर सव्वा वर्षांतच यांनीं देह ठेवला.

यांनीं आपल्या गुरुजींची गाण्याची पद्धत इतकी हुबेहूब उचलली होती कीं लांबून ऐकणारास जोशीबुवाच गात आहेत कीं काय असा भास होई. यांनीं हिंदुस्थान-भर हिंडून आपलें नांव अजरामर केलें. यांचें गाणें रंगलें नाहीं असें कधींच झालें नाहीं. यांचा आवाज पल्लेदार व तयारी भरपूर असल्यानें केवळ तालाची कसरत करून लोकांवर छाप पाडण्याची यांना केव्हांच जरूर भासली नाहीं. ते स्वर जाडा लावीत तरी मुख्य सुरांपासून कधींच सुटत नसत. यांच्या गाण्यांत ठामपणा व क्रम या गोष्टी विशेष होत्या. क्रमाक्रमानें विस्तार करीत करीत रागाची छाया उत्पन्न करून त्या ब्रह्मानंदांत श्रोत्यांस पोहत ठेवणें हें यांच्या गाण्यांतील मुख्य तत्त्व होय. यांची बढत व फिरत ही मुख्य लयीचे अंगानें असून बोलतान स्पष्ट, लयबद्ध व हिशेबानें समेवर येणारी असे. यांनीं विद्येची इतकी कसरत केली होती कीं कोणतीहि तान अगर आलाप कितीहि वेळां आणि केव्हांहि म्हणावयास सांगितल्यास त्यांत थोडेहि अन्तर पडत नसे. आम्ही गाण्याचें झाड बांधतों असें हे नेहमीं म्हणत. ही गाण्याची पद्धत हुबेहूब आपल्या शिष्यांनीं उचलावी म्हणून यांचा नेहमीं कटाक्ष असे. यांचें संगीतकलेंतील प्रावीण्य पाहून मागील पिढींतील लोक यांना तानबहादूर म्हणत. बरोबरीचे व नव्या पिढींतील लोक यांना संगीतांतील भीष्माचार्य म्हणत (केशव गुंडो इंगळे यांनीं लिहिलेल्या चरित्रावरून).

यांच्या सर्व शिष्यांत प्रमुख या नात्यानें यांच्या पट्टशिष्यत्वाचा मान कै. विष्णु दिगंबर पलुस्कर यांस द्यावा लागेल. दक्षिण महाराष्ट्रांत कांहीं काळ असा होता, की कोणीहि गायक किंवा गायिका असो त्यांच्या गुरुपरंपरेचा धागा यांच्यापर्यंत पोंचत असेच. अद्यापि-सुद्धां यांचे वर उल्लेखिलेले पट्टशिष्य कै. विष्णु दिगंबर यांनीं जी विशिष्ट छापाची शिष्यशाखा तयार केली व शाखेच्या विस्ताराला जीं असंख्य पानें फुटत आहेत त्या सर्वांचें मूळ हेच होत. यांची सोज्वळ व गंभीर गायकी यांचे अल्पायुषी चिरंजीव किंवा यांचे असंख्य शिष्य, यांमध्यें अंशतः दिसून येते.

यांच्या आजन्म तपश्चर्येचें फळ यांच्या आयुष्याचे उत्त-रार्धांत यांना निश्चितपणें मिळालें. इतकें वय झालेलें परन्तु दर गायनाचे वेळी सीमोल्लंघनाचे स्वारींतील गजराजाच्या गंभीर गतीची आठवण व्हावी इतकें यांच्या गाण्यांत नावीन्य व गांभीर्य दृष्टीस आल्यावांचून राहावयाचें नाहीं. आपल्या घराण्याच्या संगीताची वजनदार अंबारी आपण वाहून नेत आहोंत या अंतःकरणांत प्रज्वलित असणाऱ्या अभिमानाचाहि कदाचित् हा परिणाम असूं शकेल.

**इमाम, सर अली**—(जन्म स. १८६९–मृत्यु स. १९३२).

हिंदुस्थानांतील राष्ट्रीय मुसलमान पक्षाचे संस्थापक व बिहार प्रान्तांतील सुप्रसिद्ध कायदेपंडित. यांची गणना अखिल भारतीय हिंदी पुढाऱ्यांत प्रामुख्यानें होई.

यांचा जन्म बिहारांतील अन्हा गांवीं झाला. यांच्या पित्याचें नांव शम्सुलउल्म नबाब सय्यद इम्दाद इमाम. कॉलेजकोर्स पुरा करण्यापूर्वींच हे इंग्लंडला बॅरिस्टर होण्याकरितां गेले व तेथें बॅरिस्टर झाले. यांच्याबरोबर अबदुल रहीम आणि जस्टिस शहाउद्दीन हे दोघे बॅरिस्टर झाले. या वेळीं काँग्रेसतर्फे इंग्लंडमध्यें एक शिष्टमंडळ गेलें होतें. त्यांत जॉर्ज यूल, सुरेन्द्रनाथ बानर्जी, मुधोळकर, अर्डले नॉर्टन व सर मोरोपंत जोशी हे होते. या मंडळीबरोबर यांनीं काम केलें. पुढें यांनीं पाटणा येथें प्रॅक्टिस सुरू केलें (१८९०). उलट तपासणी, छाननी आणि मांडणी या बाबतींत यांनीं विशेष कीर्ति संपादन केली.

स. १९०८ साली बिहार प्रॉव्हिन्शियल कॉन्फरन्सचे हे अध्यक्ष होते व त्याच वर्षाच्या शेवटीं अमृतसर येथें भरलेल्या मुस्लीम लीगच्या अधिवेशनाचे हे अध्यक्ष होते. तेव्हांच्या यांच्या भाषणाची देशी व परदेशी पत्रांत अत्यंत वाखाणणी झाली. तेव्हां मद्रास काँग्रेसचे अध्यक्ष डॉ. सर राशबिहारी घोष यांच्या भाषणाबरोबर यांच्या भाषणाचाहि निर्देश सर्वत्र आला.

अलीगढ मुस्लीम विश्वविद्यालयाची कल्पना काढणारे सर सय्यद अहमद यांच्या मताची छाप प्रथम यांच्यावर होती. तथापि धर्म व समाज यांच्या हिताबरोबर राष्ट्राकडे आपलें लक्ष असलें पाहिजे असें यांचें मत होतें.

कायद्याच्या ज्ञानाबरोबरच उलटतपासणीच्या कामांत यांचा हातखंडा असे. त्यामुळें बिहारमध्यें व कलकत्ता येथें प्रत्येक महत्त्वाच्या फौजदारी खटल्यांत हे असावयाचेच. त्या वेळीं बिहारप्रांत बंगालपासून वेगळा काढला नव्हता. त्यामुळें यांची छाप दोन्ही प्रान्तांवर असे. बंगालची फाळणी रद्द होतांच बिहार व ओरिसा प्रान्त मिळून स्वतंत्र प्रान्त बनविण्यांत आला. त्याचें बरेंच श्रेय यांच्याकडे आहे. हे त्या वेळीं व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळाचे सभासद होते ( १९१०-१५ ).

सर सत्येन्द्रप्रसन्न सिंहांनंतर मुसलमान सभासद त्या जागीं येणें अवश्य होतें म्हणून यांच्यासारख्या योग्य गृहस्थाची निवड झाली. पण प्रायः सरकारी धोरणाचें समर्थन करण्यापलीकडे यांच्या पांच वर्षांच्या कारकीर्दीत हिंदु-मुसलमान व काळागोरा या बाबतींत थोड्या उदारपणाच्या धोरणाशिवाय अधिक कांहीं घडलें नाहीं. पुढें कांहीं महिने कलकत्ता हायकोर्टाच्या न्यायाधीशाच्या जागीं हे आरूढ झाले होते ( १९१७ ).

यानंतर कांहीं महिने हे बिहार प्रान्ताच्या कार्यकारी मंडळाचे सभासद ( १९१८-१९ ) व लीग ऑफ नेशनमध्यें हे हिंदुस्थानचे पहिले प्रतिनिधि म्हणून हजर होते ( १९२० ).

यांच्या कर्तृत्वाचा दुसरा भाग म्हणजे निजामांच्या हैद्राबाद संस्थानांतील त्रैवार्षिक दिवाणपदाची कारकीर्द होय ( स. १९१८-२१ ). यांच्यासारखा गाजलेला कायदेपंडित मुख्य प्रधान होतांच यांनीं न्याय व अंमलबजावणी खात्यांची प्रथम विभागणी केली. ब्रिटिश हिंदुस्थानांतहि कॅांग्रेसची फार वर्षांची मागणी असतां ही गोष्ट अद्यापि घडून आलेली नव्हती. अशाच आणखीहि पुष्कळ सुधारणा करण्याचा घाट यांनीं घातला, पण त्यापूर्वीच ब्रिटिश हिंदुस्थानांत मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणा करण्याचा उपक्रम करण्यांत आल्याकारणानें निजामांना वऱ्हाड प्रान्त मिळवून देण्याच्या कामीं ही संधि योग्य आहे असें यांना वाटलें व त्याप्रमाणें यांनीं आपला प्रचंड व्यूह रचला. सध्यांच्या निजामसाहेबांना ही गोष्ट पटण्यासारखीच होती. त्यांनीं याबाबतींत द्रव्यसाहाय्य करण्याचें ठरवितांच यांनीं वऱ्हाडची मागणी अधिकृत रीत्या ब्रिटिश सरकारकडे केली. आपली बाजू बिनतोड मांडली व तेथील लोकांचें समाधान राखण्याकरितां वऱ्हाड ताब्यांत येतांच पूर्ण प्रांतिक स्वराज्य देण्याचें आगाऊच आश्वासन दिलें. १९२२—२३ सालीं याचा पुष्कळ लोकांवर अनुकूल परिणाम होऊन 'पूर्ण प्रांतिक स्वराज्य दिल्यास वऱ्हाड निजामाकडे कां जाऊं नये' असें कित्येक ज्ञाते लोक उघडपणें विचारूं लागले. पण यांच्या प्रयत्नांना असें यश दिसूं लागतांच त्या वेळचे महामुत्सद्दी व्हाइसरॉय लॉर्ड रीडिंग यांनीं आपला प्रसिद्ध खलिता निजामाकडे पाठविला आणि निजामाची वऱ्हाडची मागणी सपशेल फेटाळून लावली. इतकेंच नव्हे, तर निजामाच्या बाबतींतहि 'सार्वभौमत्वाचे अधिकार ब्रिटिश सरकारला अमर्याद स्वरूपाचे आहेत' असा स्पष्ट व जाहीर इशारा दिला, व हें राजकारण हाणून पाडलें. तथापि निजामाच्या दृष्टीनें ही फार महत्त्वाची गोष्ट घडली आहे यांत शंका नाहीं. यानंतर यांनीं हैद्राबाद सोडलें व पाटण्यास आपली बॅरिस्टरी पुनः सुरू केली.

यापुढील सायमन कमिशनला विरोध करण्याची यांची कामगिरी महत्त्वाची होय. त्या कमिशनवर बहिष्कार घालण्यांत यांनीं भाग घेतला. सर्वपक्षीय परिषदेंत प्रामुख्यानें भाग घेऊन नेहरूरिपोर्ट तयार करण्यांत सहकार्य केलें. स. १९२८ सालीं कलकत्ता येथें भरलेल्या सभेत मौ. मुहम्मदअलींस यांनीं विरोध केला. नेहरू-रिपोर्टावर मुख्य सह्या करणारांपैकीं हे एक होते.

यानंतर मुसलमानांनीं संयुक्त मतदारसंघाची मागणी करावी, अशा मताचा पुरस्कारहि यांनीं केला, व त्यासाठींच राष्ट्रीय मुस्लीम पक्षाची स्थापना झाली. स. १९०६ सालीं जरी आपण विभक्त मतदार-संघाच्या बाजूचे होतों तरी आतां आपलें पूर्ण मतान्तर झालें आहे, असें यांनीं जाहीर केलें.

दुसऱ्या राउंड टेबल परिषदेकरितांहि हे गेले होते. पण त्या वेळीं यांच्याकडून विशेष काम झालें नाहीं. कांहीं आंतरराष्ट्रीय परिषदांना हजर राहण्याचा मानहि यांना मिळाला होता. हे हृदयक्रिया बंद पडून रांची येथें मृत्यु पावले.

लखनौ येथें झालेल्या नॅशनॅलिस्ट मुस्लीम कॉन्फरन्सचे हे अध्यक्ष होते ( १९३१ ). मुसलमानांच्या वाढत्या राष्ट्रीयत्वाचा टप्पा म्हणून यांच्या भाषणाचा निर्देश तेव्हां सर्वत्र झाला.

निजाम राज्याची दिवाणगिरी स्वीकारल्याबद्दल यांना पुढें पश्चात्ताप झाला. कारण तेथील अन्तर्व्यवस्था समाधानकारक नव्हती, असें यांना वाटलें ( सम एमिनन्ट बिहार कॉन्टेंपररीज, पा. १०२ ).

**इस्लाम, काझी नझरुल**— ( जन्म स. १८९९ सुमार ) बंगालचे प्रसिद्ध वीरकवि. यांचा जन्म बंगालमधील बरद्वानजवळच्या खेड्यांत झाला. स. १९१४ च्या महायुद्धांत सैनिक म्हणून हे भरती झाले आणि यांची रवानगी इराकमध्यें झाली. तेथें युद्धांतील भयंकर संहारानें यांना कवि बनविलें. हे हिंदुस्थानांत आले तेव्हां हवालदार होते आणि असहकारितेची चळवळ जोरानें चालू होती. बंगाली संस्कृति व साहित्य यांच्याशीं यांचा परिचय चांगला आहे. येथें आल्यानंतर यांची पहिली प्रसिद्ध कविता 'विद्रोही' ही होय. बंगाली भाषेंतील उत्कृष्ट कवितेंत बसण्याचा मान हिला मिळाला आहे. पूर्वीच्या मधुर व स्वप्नमय कवितेच्या परंपरेला या कवितेनें धक्का दिला आहे. या कवितेची रचना खडबडीत असली तरी तिच्यांतील जोम वाखाणण्यासारखा आहे.

हिंदुस्थानांत आल्यानंतर प्रथमपासूनच यांनीं आपल्या कविता ' हविलदार काजी नझरुल इस्लाम ' या नांवानें प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली. यांच्या प्रथम-प्रथमच्या कविता आफजल-उल-हक यांच्या ' मुस्लीम भारत ' या पत्रांत प्रसिद्ध झाल्या आहेत.

यानंतर यांनी आपलें स्वतःचें असें 'धूमकेतु' नांवानें साप्ताहिक सुरू केलें. या पत्राला आशीर्वाद म्हणून रवींद्रनाथ टागोर यांनी पाठविलेल्या खालील पद्यमय ओळी विशेष उल्लेखनीय आहेत :

" आय चले आय रे धूमकेतु
 आँधारे बाँध अग्नि-सेतू,
दुर्दिनेर एइ दुर्गशिरे—
 उडिये दे तोर विजय-केतन !
अ-लक्षणेर तिलक-रेखा
 रातेर भाले होक ना लेखा,
जागिये दे रे डंका मेरे,
 आछे रे जागा अर्धचेतन ! "

( भावार्थः—हे धूमकेतु, तूं ये, या अंधारांत तूं अग्निसेतु बांध. विपत्कालरूपी दुर्गशिखरावर तुझा विजयध्वज फडकावून टाक ! रात्रीच्या कपाळीं कुलक्षणाची तिलकरेखा असेना कां— जे अर्धजागृत आहेत त्यांना डंका वाजवून तूं जागें करून टाक.)

हें साप्ताहिक सुरू केल्यानंतर यामध्येंच यांची 'आगामिनी' ही सुप्रसिद्ध कविता प्रसिद्ध झाली आणि याच कवितेनें सरकारी अवकृपेचा फेरा या पत्रावर वळविला. यांचें हें पत्र लवकरच बंद पडलें व यांना तुरुंगांत धाडण्यांत आलें. याच ठिकाणीं राजबंद्यांचे तक्रारीला तोंड फोडण्यासाठीं यांनीं चाळीस दिवस अन्नसत्याग्रह केला.

यांची वर उल्लेखलेली ' आगामिनी ' कविता प्रसिद्ध झाल्यानंतर वंगीय साहित्यश्रेष्ठींत मोठीच खळबळ उडाली. शैली, विचार व छंद, या सर्वच दृष्टींनीं नावीन्यपूर्ण असणाऱ्या या कवितेचें बंगाली जनतेनें स्वागतच केलें. क्रान्तिकारक भावना प्रगट करण्यास बंगाली शब्द अपुरे पडल्यानें यांनीं त्या कवितेंत फार्शी व उर्दू शब्द वापरले आहेत. यांच्या या धाडसानें शुद्ध वंगभाषेचे पुरस्कर्ते खवळून 'भ्रष्टाकार भ्रष्टाकार' म्हणून ओरडूं लागले. परंतु यांची लोकप्रियता वाढतच गेली. यांच्या कवितेंतील शब्दसौंदर्य अर्थाला भूषवितें. काव्यवस्तु व काव्यरूप एकरूप होतात. यांचें हें सामर्थ्य चित्तरंजन दासांच्या लक्षांत आलें व त्यांनीं यांच्या कविता फॉर्वर्डच्या पहिल्या पानावर छापण्यास सुरुवात केली.

चित्तरंजनदास वारले तेव्हां बंगालमध्यें जातीयता नुसती थैमान घालीत होती ( १९२६ ). बंगाली हिंदूंचा तर, यांनीं एका वैष्णव हिंदु मुलीशीं लग्न केल्याबद्दल यांच्यावर अत्यंत राग होता. यांच्या क्रान्तिकारक कविता प्रसिद्ध होऊं लागतांच सरकारनें यांचें पेन्शन व हवालदाराचा हुद्दा काढून घेतला, व यांचे कवितासंग्रह जप्त केले. अजूनहि यांचे पांच कवितासंग्रह जप्तावस्थेंत आहेत. त्यामध्यें १९३०मध्यें जप्त झालेला यांचा 'प्रलयशिखा ' हा काव्यसंग्रह विशेष प्रसिद्ध आहे. 'नव भारतेर हळदीघाट ', ' जतीन दास ' व ' जागरण ' या कविता सोडून बाकीच्या कविता प्रसिद्ध करण्यास आतां परवानगी मिळाली आहे.

सर्व बाजूंनीं विरोध असतां यांनीं समाजवादाचें अध्ययन केलें आणि हे समाजवादी बनले.

आतां वयाच्या उताराकडे वळले असतां यांनीं प्रणयगीतें लिहिण्यास सुरुवात केली आहे. तथापि तरुणपणीं लिहिलेलीं यांचीं ' क्रान्तिगीतें ' हे पेटते निखारे आहेत.

यांची आर्थिक स्थिति खालावली तेव्हां बंगाल असेंब्लीनें यांना दरमहा दोनशें रुपये द्यावेत, अशी शिफारस केली. ' अग्निवीणा ' हा यांचा पहिला काव्यसंग्रह आहे.

रवींद्रनाथ टागोर व हे यांच्यामध्यें असणाऱ्या स्नेहाचें

प्रतीक म्हणून रवींद्रनाथांनीं आपली 'वसंत' ही नाटिका यांना 'श्रीमान् कवि काजी नजरूल इस्लाम स्नेहभाजनेषु' या मायन्यासह अर्पण केली आहे.

**इस्लामपुरकर, वामनशास्त्री**—(मृत्यु स.१९१३) संस्कृत ग्रंथांचा कुशल संपादक, भाषान्तरकार व मराठी लेखक. हे एक अत्यंत दीर्घोद्योगी व व्यासंगी शास्त्री होते. 'कथासरित्सागर' या संस्कृत कथात्मक ग्रंथावरून 'बृहत्कथासागर' नांवाचा ग्रंथ मराठींत लिहून त्याचे पांच खंड यांनीं प्रसिद्ध केले. पहिला खंड १८८७ मध्यें प्रसिद्ध केला. हा ग्रंथ नऊ खंडांत प्रसिद्ध व्हावयाचा होता. याच वर्षी यांनीं 'मेघदूतकाव्यार्थदीपिका' नांवाची मराठी टीका व 'शूद्रधर्मतत्त्वप्रकाश' असे ग्रंथ प्रसिद्ध केले. या ग्रंथांखेरीज पोतदारांच्या छोट्या ग्रंथमालेंतून 'करुणराघव', 'चारुदत्त आणि वसंतसेना', 'प्रणयीमाधव', 'राजा अग्निमित्र', 'ललित वत्सराज', 'विदग्ध पुरुरवा', 'सुंदरी व वसंतसेना' हीं कादंबरीवजा पुस्तकें; बडोदे दरबारकडून 'कर्पूरमंजरी', 'आदिराजचरित्र' व 'कविताशास्त्र', आर्यभूषणकडून 'अविचाराचा परिणाम अथवा मुंजराजाचा मृत्यु', ही ऐतिहासिक कादंबरी अशीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं. यांची भाषाशैली प्रौढ, सुरस व चित्ताकर्षक होती (अ. म. वा. से.).

यांनीं बाँबे संस्कृति सीरीजमध्यें 'पराशरमाधवः' संपादित केलें आहे.

**इंद्रजी, डॉ. भगवानलाल**—(जन्म स. १८३९–मृत्यु स. १८८८) सुप्रसिद्ध पुराणवस्तुसंशोधक.

हे जातीनें गुजराथी ब्राह्मण. पोटजात प्रश्नोरा नागर. यांचे जन्मस्थान जुनागढ. यांचे भाऊ संस्थाननें काढलेल्या संस्कृत पाठशाळेचे प्रमुख होते. त्यामुळें महत्त्वाच्या संस्कृत ग्रंथांचें अध्ययन करण्याची संधि यांना घरींच मिळाली. परंतु पुढें लवकरच या अध्ययनाचा यांना कंटाळा येऊन इतिहासविषयांत यांचें मन विशेष रमूं लागलें, आणि त्याचेच अनुसंधानानें आपल्या प्रांताच्या ऐतिहासिक परंपरेचा मागोवा घेत घेत यांची बुद्धि गिरनार पर्वतावर कोरलेल्या लेण्यांत स्थिर झाली. परंतु पौर्वात्य लिपि व हस्ताक्षरें यांच्या ज्ञानाच्या अभावीं या लेण्यांमध्यें कोणत्याहि प्रकारचें लक्ष लागण्याची शक्यता नाहीं हीं गोष्ट लक्षांत आल्यामुळें यांनीं त्या अध्ययनास सुरुवात केली व लवकरच "अशोकस्तंभ", "रुद्रदामनचे व स्कंदगुप्ताचे शिलालेख" या गिरनार पर्वतावरील महत्त्वाच्या शिलालेखांचें अर्थज्ञान होण्याइतपत त्या शास्त्रांत यांची प्रगति झाली. त्या शास्त्राबद्दल यांना वाटणारी उत्कंठा लवकरच मि. अलेक्झांडर किन्लोक फोर्बस यांचे लक्षांत आली व त्यांनीं डॉ. भाऊ दाजींशीं यांची गांठ घालून दिली (१८६१) व लवकरच त्यांचे मदतनीस म्हणून यांनीं काम करण्यास सुरुवात केली.

भाऊ दाजी यांचे मदतनीस म्हणून यांनीं केलेली कामगिरी यांच्या प्रगतिपथावरील एक महत्त्वाचें पाऊल या दृष्टीनें महत्त्वाची आहे. शिलालेखांचें पद्धतशीर वाचन करणें हें प्रमुख काम व उताऱ्यांच्या नकला, जुन्या नकलांशीं रुजवात, त्याकरितां पुनः नवीन नकला करणें, त्यांमध्यें जागच्याजागीं नव्यानव्या दुरुस्त्या करणें हीं त्याचे अनुषंगानें येणारीं इतर कामें असा यांचा या वेळच्या कार्याचा ढोबळ आराखडा होता.

या अहोरात्र केलेल्या कामाच्या पुण्याईवर यांना स्वतंत्रपणें हींच कामें मोठ्या प्रमाणावर करण्याची योग्यता आली ही गोष्ट विसरतां येणें शक्य नाहीं. यांची ही तडफेनें काम करण्याची शक्ति डॉ. भाऊ दाजी यांच्याहि चांगली लक्षांत आली. कारण शेवटीं शेवटीं कांहीं दिवस हिंदुस्थानाच्या सर्व प्रांतांतील शिलालेखांचें काम त्यांनीं यांचेवर सोपविलें होतें. सर्व प्रांतांतील शिलालेख नकलणें व त्यांची मुद्रणप्रत तयार करणें या दोन गोष्टींचा अंतर्भाव या कामांत होत असे. या कामानिमित्त यांना हिंदुस्थानांतील कोपरान् कोपरा, गांवन् गांव धुंडाळावें लागलें.

अत्यंत शीघ्र व बिनचूक रीतीनें कोणतीहि प्राचीन लिपि वाचून तिचा सुसंगत अर्थ लावणें या कामांत यांचा हात धरणारा अजून कोणी झाला नाहीं. अशा तऱ्हेनें महत्प्रयासानें नकललेल्या नकलांचें यांनीं नंतर काळजीपूर्वक भाषांतर केलें व नंतर त्याची सूचि तयार केली. इंग्लिश व प्राकृत या दोन भाषांशीं तोंडओळख हा या कार्याचा तादृश फायदा सांगतां येईल.

१२–१३ वर्षांच्या या खडतर तपश्चर्येनंतर थोडासा सुटकेचा निःश्वास टाकण्याची संधि यांना मिळाली. याच वेळीं भाऊ दाजी वारले (१८७४) व कांहीं तरी घरगुती प्रसंगामुळें यांचीं त्यांचेजवळ असलेलीं व यांनीं जमविलेलीं हस्तलिखितें यांच्याच स्वाधीन करण्यांत आलीं.

परंतु इतकी मोठी तपश्चर्या पाठीशीं असून यांना योग्य असें काम मिळवण्याकरितां थोडी वाटच पाहावी

लागली. इंग्रजी भाषेचें अपुरें ज्ञान हीच गोष्ट या आपत्तीच्या मुळाशीं होती.

अशा तऱ्हेनें दोन वर्षें सक्तीची विश्रांति घेतल्यानंतर यांचे हातून लिहिण्याचे दृष्टीनें कांहीं तरी भरीव कामगिरी होण्याचीं चिन्हें पुन्हां दिसूं लागलीं. या गोष्टीला कारण होणारी घटना मात्र खरोखरच क्षुल्लक होती. डॉ. बुल्हेर यांच्यातर्फे "इंडियन अँटिकेरी" मध्यें यांचा आपल्या 'केव्ह न्यूमरल्स'वरील कार्याची माहिति देणारा लेख प्रसिद्ध झाला. त्यामुळें मुंबईच्या 'रॉयल एशियाटिक सोसायटीनें यांना आपले सन्माननीय सभासद करून घेतलें व त्या संस्थेच्या लायब्ररींत यांचा प्रवेश घडून आला व अशा तऱ्हेनें किती तरी दिवसांची यांची इच्छा तृप्त झाली. केव्ह न्यूमरल्स म्हणजे लेण्यांमधील लेखांतील संख्यावाचन होय.

मुंबई गॅझेटियरच्या खंडांत यांनीं लिहिलेले लेख व डॉ. ए. कनिंगहॅम यांनीं प्रसिद्ध केलेल्या 'आर्किऑलॉजिकल व्हॉल्यूम'ला आपल्या लेखांनीं यांनीं लावलेल्या हातभाराखेरीज असणाऱ्या यांच्या लेखांची संख्या अठ्ठावीस आहे. यांच्या लेखांतील संशोधन टिकाऊ स्वरूपाचें असून हिंदी इतिहास व शिलालेख यांचे एक यशस्वी विद्यार्थी या नात्यानें यांचें चिरंतन व जिवंत स्मारक ठेवण्यास ते समर्थ आहेत.

'केव्ह न्यूमरल्स'वरील यांच्या संशोधनाखेरीज पूर्वी कोणीं कधींहि न जाणलेल्या पुष्कळ अक्षरांचें यांनीं संशोधन केलेलें आहे. 'नाशिक शिलालेखा'ची आज जी सुस्पष्ट व हुबेहूब नक्कल आपल्या डोळ्यांसमोर आहे तिचें जनकत्व यांचेकडेच आहे. अशोकाच्या ८ व्या शिलास्तंभाचा तुकडा शोधून काढण्याचें श्रेय आपणांस यांनाच द्यावें लागेल. नाहींतर हा स्तंभ कोंकण कांठावरील सोपारा गांवामध्यें असेल, ही गोष्ट स्वप्नांतसुद्धां कोणीं खरी मानली नसती. मथुरेंतील सिंहशीर्षकहि यांनींच शोधून काढलें. क्षत्रपांचे खरोष्ठींतील अनेक लेख यावरच असल्यानें या संशोधनास विशेष महत्त्व आहे. कामांच्या मशिदीवरील शूरसेनवंशी यादवांचा लेख यांनींच शुद्धतापूर्वक वाचला व प्रसिद्ध केला. इसवी सनाच्या सातव्या शतकांतील हे लेख आहेत.

ओरिसा प्रांतांतील 'खारवेलचा उदयगिरी शिलालेख' नकलून त्याचें भाषांतर करण्याचें कामसुद्धां यांनींच केलें. त्यामध्यें मौर्य शकासंबंधीं असणारा उल्लेख शोधून काढण्याचा पहिला मानहि यांनाच मिळाला आहे. या सुप्रसिद्ध शिलालेखावर गेल्या तीस वर्षांत बरेंच कार्य झालें आहे. परंतु 'इंटरनॅशनल कॉंग्रेस ऑफ ओरिएन्टॅलिस्टस्'ला यांनीं सादर केलेल्या मूलग्राही संशोधनावरच या सर्व संशोधनाचा पाया उभारला गेला आहे ही गोष्ट विसरतां येणें शक्य नाहीं.

त्याचप्रमाणें जुन्नरजवळ 'नानाघाट' येथील गुहेंतील मोठा लेख व 'आंध्र नाणीं' यांवरील यांच्या कार्यामुळेंच आंध्रांचेबद्दल आज उपलब्ध असणारी अतिशय महत्त्वाची माहिती आपणांला उपयोगी पडत आहे. मि. कॅम्बेलच्या अध्यक्षतेखालीं प्रसिद्ध होणाऱ्या बॉंबे गॅझेटियरच्या पहिल्या भागाकरितां गुजराथचा इतिहास यांनींच लिहिला. त्यांत राजपुतान्यावर राज्य करणाऱ्या सोळंकींचा विस्तृत इतिहास आला आहे.

नेपाळच्या राजवंशावरील व राजघराण्यावरील २१ शिलालेख शोधून काढण्याबद्दल डॉ. बुल्हेर यांनीं यांना दिलेली 'नेपाळच्या इतिहासाचे पथनिर्देशक' ही पदवी खरोखरच सार्थ आहे, या गोष्टीची जाणीव आपण एकंदरींत या कार्याचें महत्त्व जाणून घेतलें असतां होते. वेरूळ शिलालेखावरील यांच्या संशोधनानेंहि दक्षिण राष्ट्रकूटांच्या इतिहासांत असेंच एक महत्त्वपूर्ण दालन उघडलें गेलें आहे.

एके काळीं बलाढ्य असणाऱ्या त्रैकूटक राजवंशाचें अस्तित्व व त्यांचा कलचूरि शक व हैहय यांच्याशीं असणारा संबंध याचा पत्ता अहोरात्र काम करणाऱ्या या गृहस्थांनींच लावलेला आहे. आभीर राजा ईश्वरदत्त याच्याशीं कलचूरि शकाचा संबंध लावून तो शक गुजराथेंतला असला पाहिजे हा यांचा सिद्धान्त व गुजराथ व नाशिकचे आभीर व चेदीचे त्रैकूटक व हैहय हे दोन्ही एकच असावेत, हा यांचा दावा इतिहासांतील त्या त्या क्षेत्रांत प्रकाश पाडणारा असून पुढील संशोधनानें यांचे हे सिद्धान्त पक्केच होत आहेत. आपल्या मरणाचे पूर्वी गुजराथच्या इतिहासाचें संशोधन करण्यांत हे गुंतले होते.

इतर दिशेनें यांनीं लिहिलेले लेखसुद्धां कांहीं उपेक्षणीय नाहींत. हिंदुस्थानांतील धार्मिक चळवळीबरोबरच "वेदवाद, ब्राह्मणवाद, बुद्धवाद या गोष्टींची वाढ होत नाहीं" हें यांचें मत त्या काळीं भयंकर समजलें जाण्याजोगें होतें. यांनीं शिलालेखांसंबंधीं लिहिलेले लेखसुद्धां पूर्वीच्या भूगोलाचें ज्ञान दाखविण्यास समर्थ आहेत.

अशा प्रकारच्या या थोर संशोधकाचें अभिनंदन कर-

ण्याचा पहिला मान लंडन युनिव्हर्सिटीनें मिळविला. त्या युनिव्हर्सिटीनें डॉ. कर्न यांच्या सूचनेवरून यांना ऑनररी पीएच्. डी. केलें. त्याचेच पाठोपाठ हॉलंडच्या 'डच ओरिएन्टल सोसायटी'नें व इंग्लंड व आयर्लंडच्या 'रॉयल एशियाटिक सोसायटी'नें यांना आपले ऑनररी सभासद करून घेतलें.

हिंदी व त्याचबरोबर परकीय संशोधकांकडून वाहवा मिळविण्याचा अपूर्व मान यांना अनेक वेळेला मिळाला होता. परदेशांतील यांचे चहाते मंडळींत ई. सेनर्ट व जी. बुल्हेर यांच्यासारखे लोक होते.

भाऊ दाजी व हे यांनीं 'आर्किऑलॉजी'चे क्षेत्रात जवळ जवळ अर्धा शतकभर केलेली कामगिरी निःसंशय अविस्मरणीय आहे. हिंदी लोक ज्या क्षेत्राकडे जरा बावरूनच बघत होते त्या क्षेत्रांत परदेशी तज्ज्ञांचेकडून प्रशंसा मिळविण्याइतकी मोठी कामगिरी करणें ही गोष्ट केव्हांहि यांना भूषणावहच आहे.

डॉ. भाऊ दाजी यांनीं आपल्या केव्ह न्यूमरलस्च्या सुप्रसिद्ध संशोधनांत जरी यांचा उल्लेख केलेला नसला तरी डॉ. बुल्हेर यांच्या मतें या महत्त्वाच्या संशोधनांतील बऱ्याच मोठ्या भागाच्या संशोधनाचें श्रेय यांच्याकडे आहे.

भाऊ दाजी यांच्या अतिशय लाडक्या सहकाऱ्यांत मोडण्याचा मान यांना मिळाला होता. ज्या वेळीं भाऊ दाजी अतिशय आजारी होते त्या वेळीं हे नेपाळला निघाले आहेत अशी बातमी त्यांना मिळाली. ज्या वेळीं नेपाळ सरकारकडून 'तुमच्या विनंतीवरून आम्ही यांची व्यवस्था करीत आहोंत' असा निरोप आला त्या वेळीं भाऊ दाजींनीं समाधानाचा निःश्वास टाकला.

भाऊ दाजींच्या मृत्यूनंतर मात्र यांची आर्थिक स्थिति कधींच समाधानकारक राहूं शकली नाहीं. काठेवाडचे राजेसाहेब यांनीं दिलेल्या देणगीमुळें व डॉ. कॅम्बेल व बर्गेस यांच्या येणाऱ्या खंडित द्रव्यामुळें यांची आर्थिक स्थिति कधींच सुधारूं शकली नाहीं. मात्र यांच्या या दुःस्थितीची कल्पना कोणालाहि येऊं नये याबद्दल यांचा कटाक्ष असे. जवळ जवळ चवदा वर्षे अगदीं निकट मित्र असूनहि डॉ. बुल्हेर यांना मरते वेळेशिवाय आपल्या आर्थिक दैन्याचा सुगावा यांनीं कधींहि लागूं दिला नव्हता ( एमिनन्ट ओरिएन्टालिस्ट ).

यांनीं आपला क्षत्रप व इतर राजांच्या नाण्यांचा बहुमूल्य संग्रह व मथुरेचा सिंहध्वज ब्रिटिश म्यूझियमला भेट म्हणून मरतेसमयीं दिला.

यांची जन्मशताब्दी मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटींत मोठ्या थाटानें साजरी करण्यांत आली, यांचें तैलचित्र तेथें लावण्यांत आलें व एक इंग्रजी लेखसंग्रहहि यांच्या स्मरणार्थ प्रसिद्ध केला. तसेंच गुजराथ फोर्ब्स सोसायटीनें यांच्या शताब्दीनिमित्त एक गुजराथी लेखसंग्रह प्रसिद्ध केला. गुजराथ संशोधनमंडळानेंहि एक इंग्रजी व गुजराथी लेखाचा खंड यांच्या स्मरणार्थ काढला.

# ई

**ईश्वरचंद्र विद्यासागर**—( जन्म स. १८२० –मृत्यु स. १८९१ )

विधवाविवाहाच्या कायद्याचे जनक व सुप्रसिद्ध संस्कृत पंडित. यांचें जन्मस्थान, बंगालमधील हुबळी जिल्ह्यांतील वीरसिंह हें गांव. पिता–ठाकुरदास बंद्योपाध्याय. हे सर्व भावंडांत वडील होते. यांनीं शाळा खात्यांत साध्या शिक्षकापासून प्रिन्सिपलच्या जागेपर्यंत कामें केलीं ( स. १८४०–१८५५ ). पुढें यांनीं एज्यु. इन्स्पेक्टरचें काम कांही काल केलें. तेवढ्या काळांत जुन्या पाठशाळापद्धतींत फरक करून नवीन शिक्षणपद्धति यांनीं अमलांत आणली. स्त्रीशिक्षणासाठीं मुलींच्या शाळा सुरू केल्या; पण लोकाश्रयाच्या अभावामुळें त्या पुढें मोडल्या. पुढें वरिष्ठ अधिकाऱ्यांशीं मतभेद झाल्यानें त्या जागेचा यांनीं राजिनामा दिला. बंगालच्या गव्हर्नरनीं मध्यस्थी केली तरी तो यांनीं परत घेतला नाहीं.

यांनीं 'वेतालपंचविंशी'नामक एक पुस्तक मुलांसाठीं लिहिलें ( १८४६ ). उपक्रमणिका, कौमुदीचे तीन भाग, शाकुन्तलाचें बंगाली भाषान्तर हीं पुस्तकें लिहिलीं. तसेंच वर्णपरिचय, कथामाला, चरितावलि वगैरे पुस्तकें शाळांसाठीं लिहिलीं. या शालेय पुस्तकांमुळें कांहीं काल

यांचें मासिक उत्पन्न पांच हजार रुपये असे. तीन हजार रुपये यांची स्थिर मिळकत होती. यांचीं शालेय पुस्तकें यांच्या मागें पुष्कळ वर्षे शाळांत चालू होतीं. 'मेट्रोपोलिटन इन्स्टिट्यूट' यांनीं स्थापन केलें. बंगाल्यांतील ती एक भरभराटीस आलेली संस्था आहे.

यांनीं विधवाविवाह हा हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें कसा सर्वस्वीं ग्राह्य आहे या विषयावर एक पुस्तक लिहिलें (१८४५). विरोधकांनीं संस्कृतभाषेंत लेख व पुस्तकें लिहून त्याचें खंडन केलें. यांनीं मात्र आपल्या उत्तर-प्रत्युत्तराचें सर्व लेखन बंगाली भाषेंत केलें. त्यामुळें यांचें म्हणणें बहुजनसमाजांत पसरलें आणि यांना लोकमताची अनुकूलता मिळाली. स्त्रिया तर यांना आपला मित्र मानीत. यामुळें पुढें विधवाविवाहाचा कायदा संमत झाला (१८५६).

आई आजारी आहे असें समजतांच वर्षाऋतु किंवा रात्र मनांत न आणतां धोधो वाहणाऱ्या नदीच्या पुरांत उडी टाकून पैलथडी जाऊन यांनीं मातेची रुग्णावस्थेंत भेट घेतली. विधवाविवाहाच्या पवित्र कार्यास यांनीं आपल्या धर्मपरायण वृद्ध मातापित्यांचा आशीर्वाद घेतला होता. यांनीं लिहिलेल्या पुनर्विवाहाच्या पुस्तकाच्या दोन हजार प्रती एका आठवड्यांत खपल्या. या चवदा प्रकरणात्मक पुस्तकाचें अकरा प्रकरणांत यांनीं इंग्रजी भाषान्तर केलें. त्याचें मराठी भाषान्तर विष्णुशास्त्री पंडित यांनीं केलें. यांनी आपल्या कार्याची मोहिनी सुशिक्षित–अशिक्षित समाजावर विलक्षण घातली होती. केशवचंद्रांसारख्या धर्मसुधारकानें 'विधवाविवाह' नाटकात पुढाकार घेतला. खुद्द ईश्वरचंद्रांनीं रंगभूमि आजन्मांत पाहिली नव्हती तरी हें नाटक वारंवार पाहिलें. हें नाटक न पाहिलेला मनुष्यच त्या काळीं सबंध कलकत्त्यांत मिळाला नसता. यांनीं दीर्घ प्रयत्न करून स. १८५६ चा १५ वा कायदा पास करून घेतला. या कायद्यान्वयें हिंदु विधवेस पुनर्विवाह करितां येऊं लागला, तिची संतति कायदेशीर ठरली आणि तिला आपल्या पूर्व घरच्या मुलाचें पालन करण्याचाहि हक्क राहिला.

श्रीशचंद्र विद्यारत्न यांनीं दहा वर्षांच्या एका अज्ञ बालविधवेचें पाणिग्रहण करून तीस वरील कायद्याचा प्रथम लाभ मिळवून दिला. या मुलीचें लग्न तिच्या चौथे वर्षी होऊन तिला सहावे वर्षी वैधव्य आलें होतें. स. १८२८ मध्यें एका कलकत्ता शहरांत ३०९ बालविधवा सती गेल्या होत्या. स. १८३३ मध्यें राजा राममोहनराय यांच्या प्रयत्नास यश येऊन कायद्यानें सती जाण्यास बंदी करण्यांत आली. पुढें तेवीस वर्षांनीं पुनर्विवाहाचा कायदा पास झाला.

मुंबईस स. १८३५ मध्यें रघुनाथ जनार्दन व गतभर्तृका चिमाबाई या गौड सारस्वत ब्राह्मण जातींतील व्यक्तींचा पहिला पुनर्विवाह झाला. स. १८६० मध्यें डॉ. आत्माराम पांडुरंग तर्खड यांचे घरीं गणपतराम दलपतराम व दिनकुंवर या गुर्जर व्यक्तींचा पुनर्विवाह झाला. स. १८६५ मध्यें मुंबईनजीक वांद्रें येथें पुण्याचे वकील नारायण जगन्नाथ भिडे व मोरो रामचंद्र पेंडसे यांची विधवा कन्या यांचा झालेला पुनर्विवाह कोंकणस्थ ब्राह्मण ज्ञातींतील पहिला पुनर्विवाह होय (विष्णु परशुरामशास्त्री पंडित यांचे चरित्रांतून घेतलेली माहिती). बालविवाहाविरुद्धहि यांनीं ठराव केला होता. तसेंच बहुपत्नीकत्वाविरुद्धहि यांचा प्रचार चालू असे.

हे केवळ सुधारणेचीं तत्त्वें प्रतिपादन करीत नसत तर प्रसंगीं तीं आचरणांतहि आणीत असत. आपल्या मुलींचीं लग्नें त्या १४–१५ वर्षांच्या झाल्याशिवाय यांनीं केलीं नाहींत. एका मुलाचें लग्न एका बालविधवेशीं केलें. यांनीं आपल्या खर्चानें आपल्या गांवीं एक इंग्रजी शाळा व दवाखाना सुरू केला.

कलकत्त्यास भरलेल्या दरबारांत राणीकडून बहुमानाची सनद (१८७७) व पुढें सी. आय. ई. ही पदवी यांना देण्यांत आली (१८९०).

कमालीची मातृभक्ति, साधेपणा, निर्भयपणा आणि नीतिमत्ता यांमुळें यांची समाजावर विलक्षण छाप पडे.

# उ

**उजगरे, भास्कर कृष्ण**—( जन्म स. १८८७–मृत्यु स. १९३५) सुप्रसिद्ध ख्रिस्ती मिशनरी व मराठींतील लेखक.

यांचें जन्मस्थान भांबुर्डा. यांचे वडील मिशनरी स्कूलमध्यें शिक्षक होते. प्लेगमध्यें मातापितरांचा मृत्यु झाल्यानें अनाथ होऊन हे अहमदनगर मिशन स्कूलमध्यें शिक्षणाकरितां गेले. याच ठिकाणीं रे. टिळक व भारदे यांच्या सहवासानें वाङ्मयांत यांना गोडी लागूं लागली. भक्तिरसानें ओथंबलेल्या कविता लिहिण्यास यांनीं याच वेळीं सुरुवात केली. यांपैकीं कांहीं कविता मराठी प्रार्थना-पुस्तकांत ग्रथित करण्यांत आलेल्या आहेत.

याच वेळीं यांचे डोळे झपाट्यानें बिघडूं लागले. परन्तु मिरज हॉस्पिटलमध्यें यांचे डोळे परत सुधारण्यांत आले. मानवी प्रयत्नांपेक्षां ईश्वरी कृपेचाच अंश या गोष्टींत अधिक आहे अशी समजूत झाल्यानें हिंदी ख्रिस्ती लोकांच्या सेवेंत आपलें उरलेलें आयुष्य व्यतीत करण्याचा यांनीं निश्चय केला. निरनिराळ्या वृत्तपत्रांतून लिहून ख्रिस्ती लोकांच्या विपन्न दशेची कल्पना जनतेस आणून द्यावयाची ही यांची या बाबतींतील पहिली कल्पना होती. त्याचप्रमाणें हिंदी ख्रिस्ती जनतेंत मराठी भाषा व वाङ्मय यांचा प्रसार करण्याकडेहि यांचा कल असे. नाशिक, मुंबई व निपाणी येथें भरलेल्या ' इंडियन ख्रिश्चन लिटररी कॉन्फरन्स ' मध्यें यांचा बराच मोठा हात होता ( १९२७–३३ ).

रे. टिळक यांच्या कविता तीन खंडांत प्रसिद्ध करण्याची यांची कल्पना होती. त्यांपैकीं दोन खंड यांनीं प्रसिद्ध केले असून तिसऱ्याची सामग्री यांनीं जमविली होती. यांनीं मराठी वाङ्मयाचा एक इतिहासहि लिहिला असून हिंदी ख्रिस्त्यांनीं त्यामध्यें घातलेल्या मौल्यवान् भरीवर त्यांत विशेष जोर देण्यांत आला आहे.

आपल्या आयुष्याचे उत्तरार्धांत सासवड येथें यांनीं एक धार्मिक संस्था काढली होती. सर्व धर्मांनीं मान्य केलेल्या धार्मिक तत्त्वांबद्दल विचारविनिमय करणें हा या संस्थेचा प्रमुख हेतु होता.

ख्रिस्ती धर्माच्या अभिमानाच्या यांच्या आयुष्यावर पडलेल्या छायेंत हटवादीपणापेक्षां जमवून घेण्याची वृत्तिच अधिक आहे. वाङ्मयः– ( १ ) नारायण वामन टिळक ( १९२८ ), (२) तरणोपाय ( १९२८ ), (३) एका कारागृहवासी गृहस्थाचें आत्मवृत्त. (४) मराठी वाङ्मयाचा इतिहास.

**उटगीकर, नारायण बापूजी**—( मृत्यु स. १९३१ ) संस्कृतवाङ्मयाचे संशोधक आणि अभ्यासक.

हे एम्. ए. होते. प्रथम सरकारी हायस्कूलांत हे शिक्षक म्हणून लागले. तेथून पुणें डेक्कन कॉलेजमध्यें लायब्ररीवर काम केलें. प्रथम कांहीं वर्षं पुण्याच्या भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिट्यूटचे ऑननरी सेक्रेटरी होते ( १९१६–१८ ). तेथेंच हस्तलिखितांच्या संग्रहाचे हे क्युरेटर झाले ( १९१८–१९१९ ).

त्यानंतर महाभारताची चिकित्सक प्रत तयार करण्याचें काम तेथेंच सुरू झालें. त्याचे यांना मुख्य संपादक नेमण्यांत आलें ( १९१९–१९२४ ). त्याप्रमाणें यांनीं नमुना म्हणून ' विराटपर्व ' काढला. सर डॉ. रा. गो. भांडारकर यांच्या लेखसंग्रहाचे चार भाग निघाले त्याचें संपादकत्व यांच्याकडेच होतें.

जर्मनींतील पंडित रिचर्ड गार्बे यांच्या भगवद्गीतेच्या प्रस्तावनेचें इंग्रजी भाषान्तर यांनीं केलें. तसेंच 'गौडवहो' या ग्रंथाची शुद्ध प्रत यांनीं तयार केली. यांना स.१९२७ सालीं अर्धांगवायु झाला.

**उत्तम भिक्षु**—( निर्वाण स. १९४० ) राष्ट्रसभेचे व हिंदुसभेचे पुरस्कर्ते सुप्रसिद्ध बौद्ध भिक्षु.

ब्रह्मदेशांतील एका अत्यंत प्रतिष्ठित बौद्ध घराण्यांत यांचा जन्म झाला. वयाच्या तिसाव्या वर्षीं सर्व मायापाश तोडून हे भिक्षु बनले. बुद्ध व त्याचें तत्त्वज्ञान यांचा प्रचार करण्यांत यांनीं दिवसचे दिवस घालविले आणि थोड्याच दिवसांत बौद्ध भिक्षूंचे हे एक मोठे पुढारी बनले. बौद्ध धर्माचे प्रचाराकरितां युरोप, चीन, जपान वगैरे देशांतहि यांनीं प्रवास केला.

परंतु या धार्मिक क्षेत्रापेक्षांहि राजकीय रंगणांत असणारें यांचें वजन विशेष स्पृहणीय होतें. एकदां हे न्यायकोर्टांत चालले असतां रस्त्याचे दोहों बाजूंनीं उभे राहून ब्रह्मी स्त्रियांनीं आपल्या केसांच्या यांच्याकरितां पायघड्या केल्या. आपला पुढारी या दृष्टीनें ब्रह्मी लोकांवर यांचें असणारें वजन लक्षांत येण्यास ही एकच गोष्ट पुरेशी आहे.

हे अनेकभाषा-कोविद होते. चिनी, जपानी, इंग्लिश

पाली, हिंदी व बंगाली इत्यादि अनेक भाषांतून हे उत्कृष्टपणानें बोलूं शकत. राष्ट्रीय सभेंतहि यांना असेंच मानाचें स्थान असे. ब्रह्मदेशांतील कॉंग्रेस चळवळीचे तर हे प्रमुखच होते.

ब्रह्मदेश हिंदुस्थानापासून अलग करूं नये, या ब्रह्मदेशांतील चळवळीचे हे प्रमुख होते. ब्रह्मदेश हा सांस्कृतिक व धार्मिक दृष्ट्या हिंदुस्थानचाच भाग आहे ही यांनीं या चळवळीस लावलेली कारणपरंपरा यथायोग्यच होती.

अखेर या चळवळीबद्दल ब्रह्मी सरकारनें यांना हद्दपार केलें. कलकत्त्यास आपली हद्दपारी कंठीत असतांनाच हे हिंदुसभेच्या राजकारणांत भाग घेऊं लागले. १९३५ त कानपूर येथें भरलेल्या अखिल-भारतीय हिंदुसभेचे हे अध्यक्ष होते. चीनमधून अनेक भिक्षु या अधिवेशनास आले होते. या अध्यक्षस्थानानंतर पंजाब, संयुक्तप्रांत, व बंगालमध्यें यांनीं मोठेमोठे दौरेहि काढले. यांच्या नेतृत्वानें संशोधून प्रसिद्ध झालेला ' भगवान् गौतम बुद्ध ' ( जीवनी व उपदेश ) हा हिन्दी ग्रंथ प्रसिद्ध आहे.

**उदयशंकर**—( जन्म स. १९०० ) जगप्रसिद्ध नर्तक व हिंदी नृत्याचे प्रचारक.

झालवारच्या (राजपुताना) डॉ. श्यामशंकर चौधरींचे हे चिरंजीव. जात ब्राह्मण. यांचे वडील झालवारच्या महाराजांचे खाजगी चिटणीस होते.

हे विद्यार्थी असतांना अतिशय उनाड असत. प्रवास हा त्या वेळीं यांच्या आवडीचा व्यवसाय असे. मात्र पुढें यांना चित्रकलेचा नाद लागला. चित्रकलेचें प्राथमिक शिक्षण यांना गाझीपूर येथें मिळालें व उच्च शिक्षण यांनीं बनारस व मुंबईचें स्कूल ऑफ आर्टस्‌मध्यें संपादन केलें. ( १९१७ ). यानंतर त्यांच्या उच्च शिक्षणाकरितां हे लंडनच्या 'रॉयल कॉलेज ऑफ आर्टस्'ला रवाना झाले. त्या ठिकाणीं सर विल्यम रोथेन्स्टाइन हे यांचे पेन्टिंगमधील गुरु होते. विशेष प्रावीण्य संपादन करून हे ग्रॅज्युएट झाले. या वेळीं स्पेन्सर व जॉर्ज क्लासेन पारितोषिकेंहि यांनीं संपादन केलीं.

पुढें चित्रकार म्हणून हे कधींहि प्रसिद्धीस आले नसले तरी चित्रकलेमधूनच यांच्या नृत्यविषयक आवडीला प्रेरणा मिळाली आहे, ही गोष्ट सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे.

नाट्याच्या अनुभवाची पहिली संधि यांना युरोपमध्यें असतांनाच मिळाली. स. १९१४ सालच्या महायुद्धांत जखमी झालेल्या सैनिकांचे मदतीकरितां यांच्या वडिलांनीं लंडन येथें एक नाट्यप्रयोग आंखला. तोच यांच्या नाट्यप्रवेशांतील पायाचा दगड होय.

याच वेळीं यांनीं काव्यगायन करण्यास सुरुवात केली. वडिलांनीं लिहिलेल्या नाटिकांत काम करण्याचा यांनीं प्रघात पाडला आणि मित्रमंडळींत आपले नृत्याचे कार्यक्रम करण्यासहि यांनीं सुरुवात केली.

अशाच एक नृत्यप्रसंगीं सुप्रसिद्ध रशियन नर्तिका ॲना पॅव्हेलोव्हा ह्यांचें लक्ष यांच्या नृत्याकडे वळलें व लवकरच त्यांच्या नृत्याचे ताफ्यांत यांचा समावेश करून घेण्यांत आला. याच वेळीं ॲना पॅव्हेलोव्हांना हिंदी नृत्यकला शिकविण्याची जबाबदारी यांचेवर टाकण्यांत आली ( १९२३–२७ ).

अशा तऱ्हेनें यांच्या अंगांतील सुप्त गुणांना ॲना पॅव्हेलोव्हामुळें एकदम चालना मिळाली व त्यांनीं 'राधाकृष्ण बॅलट'मध्यें आपले सहकारी म्हणून यांना निवडल्यानें तर एक उत्कृष्ट नर्तक होण्याची संधि यांना मिळाली. या नृत्याचे प्रयोग करण्यांत यांनीं अमेरिकेंत बरींच वर्षें व्यतीत केलीं.

यानंतर यांनीं कांहीं वर्षें युरोपमध्यें घालविलीं. निरनिराळ्या अडचणींना तोंड देत एक उत्कृष्ट धंदेवाईक नर्तक म्हणून हे प्रसिद्ध झाले. या दृष्टीनें यांचा युरोपांतील हा वास महत्त्वाचा आहे.

यानंतर थोड्याच दिवसांनीं हे हिंदुस्थानला परत आले ( १९२९ ). यांच्या 'सोलो'चा पहिला प्रयोग कलकत्ता येथें झाला. यांतील पहिला भाग संपल्यानंतर श्रोत्यांत बसलेल्या डॉ. अवनींद्रनाथ टागोरांनीं स्टेजवर येऊन यांची मनापासून स्तुति केली. सोलो म्हणजे एकच पात्रानें करावयाचा नर्तनप्रयोग होय.

याचे पुढच्याच वर्षी मिस् ॲलन बोनर या हिंदी नृत्यकलेसंबंधीं विशेष प्रेम वाटणाऱ्या स्त्रीस जोडीदार म्हणून घेऊन यांनीं यूरोपमध्यें आणखी एक सफर काढली. हिन्दी नर्तक व गानतज्ज्ञ लोकांचा एक संचहि यांनीं या वेळीं आपल्याबरोबर घेतला होता. या वेळीं यांना मिळालेलें यश पूर्वीच्या यशाच्या मानानें किती तरी पटींनीं अधिक होतें. यानंतर हे अमेरिकेलाहि गेले.

आजपर्यंत अमेरिका व कॅनडा येथें निरनिराळ्या प्रसंगांनीं यांनीं चार सफरी केल्या असून यांच्या कार्यक्रमामुळें यांचेविषयीं आदर वाटणाऱ्या प्रेक्षकांची संख्या एक लाखाचे वर गेलेली आहे.

परंतु स्टेजवरील आपल्या यशांतच गुंग होऊन राहण्याची यांच्या मनाची तयारी नव्हती. या यशावरोबरच हिंदी नृत्यकला व संगीत यांकरितां कांहीं तरी भरीव कार्य करावें असें यांच्या मनांत घोळत होतें. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या संघांतर्फे होणाऱ्या तुरळक धंदेवाईक नृत्यप्रयोगांमुळें खऱ्या कलावंताची उपासमार होते ही गोष्ट बरेच दिवसांपासून यांच्या लक्षांत आली होती. याच्या मुळाशीं शिक्षण व अनुभव यांच्या पार्श्वभूमीचा अभाव आहे असें यांच्या मनानें घेतलें. सर्वसामान्य जनतेची रुचि बिघडविण्याचें कामहि या नृत्यप्रयोगांकडून होत असल्याचें यांचे लक्षांत आलें.या गोष्टीला उपायहि यांचेजवळ तयार होता. गुणी विद्यार्थ्यांला ज्या ठिकाणीं योग्य शिक्षण दिलें जाईल व कांहीं तरी कार्य करण्यास ज्या ठिकाणीं एखाद्या कलावंतास स्फूर्ति मिळेल अशा एखाद्या संस्थेची स्थापना करणें हाच यांच्या दृष्टीनें या गोष्टीस उपाय होता व लवकरच हें आपलें स्वप्न यांनीं सत्य सृष्टींत उतरविलें. यांनीं अल्मोरा येथें ' उदयशंकर आर्टस् स्कूल ' काढलें ( १९४० ).

या संस्थेस आर्थिक साहाय्य मिळविण्याच्या हेतूनें हे १९३९ मध्यें आपल्या मंडळीसह साडेतीन महिन्यांच्या भारतवर्षीय प्रवासाला निघाले. हिंदुस्थानांतील मोठमोठ्या गांवीं जवळ जवळ अठ्ठ्याऐंशी यशस्वी प्रयोग यांनीं केले.

यांचे जोडीदार म्हणून नृत्य करणाऱ्या सिमकीचा उल्लेख केल्याशिवाय यांची माहिती पुरी होणार नाहीं. सिमकीचें खरें नांव ' सायमन बारबेरी '. पॅरिसमध्यें हे नृत्य करीत असतां त्यांची यांच्याशीं गांठ पडली. त्या वेळीं त्या फक्त सोळा वर्षांच्या होत्या. ज्या क्षणीं त्यांनीं पॅरिसमध्यें यांचें नृत्य पाहिलें, त्याच क्षणीं त्या यांच्या अंधभक्त बनल्या. नंतर यांच्याबरोबर हिंदुस्थानांत येऊन त्या यांच्या नृत्यांतील एकमेव जोडीदार बनल्या आहेत. ' शिवपार्वतीनृत्य'मध्यें ' उदयशंकर-सिमकी ' या जोडीनें येथें व परदेशांत मिळविलेलें यश केवळ अपूर्व आहे.

विष्णुदास शिराळी या कानडी गृहस्थांचे नेतृत्वाखालीं चालणारा ऑर्केस्ट्रा हा यांच्या नृत्यांतील बराच मोठा भाग व्यापतो. कोणीं तरी असें म्हटलें आहे कीं, यांच्या नृत्याच्या यशस्वितेंतील दोन तृतीयांश भाग ऑर्केस्ट्राकडे जातो. त्यांतील अतिशयोक्ति सोडून दिली तरी ऑर्केस्ट्राचा श्रेष्ठपणा कळून येण्यास हें उदाहरण पुरेसें आहे.

यांच्या सर्व नृत्याची यशस्विता सौंदर्य व संगीत या दोन्ही दृष्टींनीं परिपूर्ण अशा प्रेक्षकांवर होणाऱ्या काव्यमय परिणामांत सामावली आहे. त्याचप्रमाणें नाट्यशास्त्रानें सुचविलेल्या कोणत्याहि नियमांचें उल्लंघन करावयाचें नाहीं, हा दंडकहि यांनीं आपल्या मागें लावून घेतला असल्यानें शास्त्रीय व सर्वसाधारण अशा दोन्ही तऱ्हेच्या प्रेक्षकांच्या दृष्टीनें यांचा कार्यक्रम सरस होतो. नाट्यशास्त्रांत कथन केलेल्या सुंदर कल्पना हे अंगविक्षेपांचे साहाय्यानें तितक्याच रसिकतेनें व्यवहारांत आणून ठेवतात. मुद्राभिनय तर यांनीं इतका पराकोटीला नेलेला आहे कीं पौर्वात्य व पाश्चिमात्य अशा दोन्ही तऱ्हेच्या रसिकांचें मनोरंजन एकाच वेळीं करण्याचें सामर्थ्य त्याचें साहाय्यानें यांना मिळालें आहे.यांच्या गारुड्याचे (Snake Charmer) नृत्याचेंच घ्याना. यांचे हातांतील नसलेला साप बघण्यासाठीं किती प्रेक्षकांनीं आपली मान उंचावली आहे त्याला गणतीच नाहीं. तीच स्थिति रास-लीला व इतर ग्रामीण नृत्यांची आहे. त्यांतील स्वच्छंदीपणा व कला यांनीं कोणताहि रसिक सहज भारला जावा इतक्या उत्कटतेनें तीं करण्यांत येतात.

त्याचप्रमाणें हे व सिमकी यांचें राधाकृष्ण-नृत्यहि असेंच लोकप्रिय झालें आहे.

परन्तु या सर्वांपेक्षांहि यांचें ' शिवपार्वतीनृत्य ' हें नृत्य सरस आहे यांत शंका नाहीं. नऊ रसांतून प्रवास करणारा यांचा हा नृत्यप्रसंग यांच्या सर्वोत्कृष्ट नृत्यांत सामील होण्याच्या योग्यतेचा आहे. शांत रसांतून भयानक रसांत, करुण रसांतून रौद्र रसांत, बीभत्स रसांतून वीररसांत भावना हेलावत नेण्याचें या नृत्यांत प्रगट होणारें यांचें कौशल्य अत्युच्च आहे. न कळतच यांतील प्रत्येक पायरी ही अनंत काळपर्यन्त स्मृतींत रेंगाळणाऱ्या स्वप्नांचा एक भाग बनते.

या नृत्यांमधील सिमकीचें कौशल्यसुद्धां असेंच नयनमनोहर वाटतें. अभिनयाच्या प्रत्येक कृतीबरोबर ती आपल्याभोंवतीं सौंदर्याचीं नवींनवीं वलयें निर्माण करीत जाते.

अशा तऱ्हेच्या कलेचा सन्मान करण्यास रसिकजनांनीं अहमहमिकेनें धांवून यावें यांत कांहींच नवल नाहीं. यामुळें देशी व विदेशी, अनेक देशच्या, अनेक भाषांच्या, अनेक जमातींच्या लोकांनीं यांचेवर देणग्यांचा अक्षरशः पाऊस पाडला आहे.

निजिन्स्कीच्या मुलीनें यांना झारचिन्हांकित अंगठी दिली, सयाजीराव गायकवाडांनी प्राचीन मुद्राभिनयावरील आपल्याजवळ असणारे बहुमोल ग्रंथ दिले, इतकेंच काय रुडॉल्फ व्हॅलेन्टिओची Cobra Ring यांना देण्यांत आली.

परंतु या देणग्यांपेक्षांहि भावनेच्या उमाळ्यांतून बाहेर आलेले थोर लोकांचे आशीर्वादच यांना अधिक बहुमोल वाटणें साहाजिक आहे. अशा लोकांत पंचम जॉर्ज, डेन्मार्क, नॉर्वे, स्वीडनचे राजे, रवींद्रनाथ टागोर व जवाहरलाल नेहरू इत्यादि गृहस्थ आहेत. प्राचीन कलेसंबंधीं अनादर दाखवणाऱ्या नेहरूंच्याकडून मिळविलेल्या स्तुतीला या सर्व आ ीर्वादांत अधिक महत्त्व आहे, यांत शंका नाहीं.

आपल्या देशांतील लोकांच्या व देवतांच्या आयुष्याचें खरेंखुरें चित्रण करण्याचें आपलें ध्येय यांनीं अनेक वेळां बोलून दाखविलें आहे. प्राचीन हिंदुस्थानांतील लोकांचे सांस्कृतिक आयुष्य घडविण्याचे बाबतींत भारतीय नृत्यानें बजाविलेली कामगिरी केवळ अवर्णनीय आहे. अगदीं तीच–अगदीं त्याच प्रकारची–कामगिरी सध्यांहि नृत्यांनीं पार पाडावी व आपली पूर्वीची राहणी, पूर्वींचे आचार-विचार यांचे थोडेतरी नजीक आपल्या लोकांना नेऊन, पुनःप्रत्ययाच्या आनंदाचा लाभ त्यांना मिळवून द्यावा असा यांचा हेतु आहे.

बॉलरूममध्यें चालणाऱ्या धांगडधिंग्यानें आपला देश कायमचा भारला जाऊं नये अशी यांची मनापासूनची इच्छा आहे. कारण इतके दिवस आपल्या प्राचीन नृत्याकडे दुर्लक्ष केल्याचीं फळें आपण भोगतच आहोंत. आपला देश व आपले आचार यांना पारखे झालेले आपल्याकडील शेंकडो शिक्षितंमन्य विद्वान् लोक रात्रीमागून रात्री डोळे चोळीत चोळीत बॉलरूममध्यें ठेका धरून नाचत आहेत, परंतु साहेबांचें अनुकरण केलें या समाधानाखेरीज इतर कोणत्याहि समाधानाची त्यांना तिळमात्रहि प्राप्ति होत नाहीं.

या सर्व गोष्टींचा विचार करूनच यांचें असें ठाम मत बनलें कीं, पूर्वेकडील लोकांनाच काय परंतु पाश्चिमात्यांनासुद्धां हे 'बॉलरूम डान्सेस' म्हणजे एक शाप आहे व त्यापासून सुटण्याकरितां प्राचीन नृत्यांची त्यांना गोडी लावली पाहिजे.

हिंदुस्थानांतील पौर्वात्य नृत्याचे भरभराटीच्या मुळाशीं राजाश्रयाइतकीच लोकप्रियताहि होती. अशा तऱ्हेच्या कलावंतांचा संच जवळ असणें राजे लोकांना अभिमानास्पद वाटे आणि त्या कलावंतांनाहि कलाकुशल राजाधिराजांच्या पायांशीं ती वाहण्यांत आपल्या कलेचें सार्थक वाटे. नृत्यकलेला उत्तेजन देण्यांत कोणालाहि कमीपणा वाटत नसे.

परंतु हा काल पालटला. जातिभेदानें धुंदावलेल्या सभ्य गृहस्थांना कलेपेक्षां जातीकडे अधिक लक्ष द्यावेंसें वाटूं लागलें आणि या सर्व कलावंतांना जातिबहिष्कृत करण्यांत आलें. व अशा तऱ्हेनें इतके दिवस जीवाभावानें जतन करून ठेवलेली नृत्यकला नामशेष झाली.

या अवशेषीभूत नृत्यांचे संकलनानेंच हिंदुस्थानच्या पौर्वात्य नृत्यकलेचें दर्शन पाश्चिमात्य जनतेला करून द्यावयाचें असें यांनीं आपलें ध्येय ठरविलें आहे. प्राचीन काळच्या लेण्यांतील चित्रें पाहून व त्याबरहुकूम पोषाख करून शास्त्रीय हिंदी नृत्यांचे प्रयोग निर्भेळ सौंदर्यदृष्टीनें यांनीं अत्यंत यशस्वी रीतीनें केले व परदेशांतील तज्ज्ञ लोकांचें लक्ष आपणांकडे वेधून घेतलें. यांनीं नृत्यप्रयोग करून दाखविण्यापूर्वी भारतीय नृत्याबद्दल अनास्थेची भावना परदेशांत वावरत होती. आपल्याकडेहि हलक्या लोकांत ती कला अस्तित्वांत होती. पण प्राचीन काळीं ही कला ज्या तेजानें पूर्णत्वाला पोंचली होती, तेंच तेज यांनीं पुनः एकदां भारतीय नृत्यकलेला प्राप्त करून दिलें आहे.

हिंदी संस्कृतीसंबंधीं पाश्चात्य राष्ट्रांत नांदणारा गैरसमज दूर करण्याकरितां यांनीं योजलेलें नृत्य हें माध्यम खरोखरच अभिनंदनीय आहे. कारण अशा प्रकारच्या सांस्कृतिक नृत्यप्रदर्शनांनीं पाश्चात्य जनतेच्या मनांत हिंदी संस्कृतीसंबंधीं जी अनुकूल भावना उत्पन्न होईल त्याच्या शतांशानेंहि विद्वान् पुढाऱ्यांच्या अजोड वक्तृत्वानें होणें शक्य नाहीं.

"पाश्चात्य जनतेच्या डोक्यांत शिरलेलें हिंदुस्थानविरोधाचें खूळ नाहींसें करण्याचा एकच उपाय आहे व तो म्हणजे यांच्यासारख्या कलावंताच्या सहवासांत एक तास व्यतीत करणें" हे मुंबईच्या मेयरचे उद्गार घ्या, किंवा "हिंदुस्थानचें खरें स्वरूप जर हें असेल तर आमची अमेरिका हा एक जंगली लोकांचा बाजारच समजावा लागेल" हे यांचे नृत्यप्रयोग पाहून चकित झालेल्या एका अमेरिकन टीकाकाराचे उद्गार घ्या, दोहोंमध्यें वर प्रतिपादिलेल्या मताचीच गाढ छाया पडलेली दिसून येईल.

आणि म्हणूनच, यांच्या कांहीं योजनांत यांना मिळालेलें अपयश लक्षांत घेऊनहि परदेशी कलाप्रांगणांत देवादिकांचे आधारावर संथपणें प्रवेश करणारा एक तरुण परंतु यशस्वी नृत्यकलाविशारद या दृष्टीनें यांची योग्यता निःसंदिग्धपणें श्रेष्ठच राहील.

**उदास, यशवंतराव आनंदराव**—( जन्म स. १८४२–मृत्यु स. १८७७ )

प्रवासवर्णनकार. हे मूळ ओतूर ( जिल्हा पुणें ) येथील राहणारे. बी. ए. झाल्यावर यांनीं शाळाखात्यांत मध्यप्रान्तांत नोकरी धरली. पुढें मराठी ट्रान्स्लेटर होते. आणखी निरनिराळ्या खात्यांत यांनीं कामें केलीं. हे क्षयानें मृत्यु पावले. हे चांगले शोधक होते. यांची वृत्ति नम्र होती. लेथब्रिजच्या इतिहासाचें मराठी भाषान्तर यांनीं केलें आहे. धोममहाबळेश्वरवर्णन या १५० पानांच्या पुस्तकांत स्थळवर्णन, क्षेत्रमहात्म्य, इतिहासप्रकरण व निबंधसार असे चार भाग आले आहेत. त्यांतील वर्णन व विवेचन दोन्ही चांगलीं उतरलीं आहेत ( अ. म. वा. से. ).

**उपाध्याय, रामचरित रामप्रपन्नजी**—(जन्म स. १८७२–मृत्यु स. १९३९ ) अलीकडच्या काळांतील सुप्रसिद्ध दोनचार हिन्दी कवींपैकीं एक.

हे अजमगडचे शरयूपारीण ब्राह्मण. यांचा जन्म गाजीपूर येथें झाला. संस्कृत भाषेंतील व्याकरण, साहित्य व ज्योतिष या शास्त्रांचें अध्ययन यांनीं काशींत महामहोपाध्याय शिवकुमारशास्त्री यांचेकडे केलें. नंतर हे आपल्या गांवीं येऊन जमीनदारी व शेतकी पाहूं लागले.

पं. रामचरित त्रिपाठी या सुप्रसिद्ध हिन्दी भाषेंतील कवीच्या अनुकरणानें यांना कविता करण्याची गोडी लागली. प्रथम प्रथम जुन्या पद्धतीच्या कविता जुन्या भाषेंत केल्यानंतर लोकांची रुचि खड्या बोलीकडे विशेष आहे, हें पाहून यांनीं खड्या बोलींत कविता करण्यास प्रारंभ केला. ‘सरस्वती’ मासिकांत यांच्या पुष्कळ कविता प्रसिद्ध झाल्या.

यांचे काव्यग्रंथ—

१ सूक्तिसुक्तावली, २ राष्ट्रभारती, ३ देवदूत, ४ देवसभा, ५ रामचरितचन्द्रिका, ६ रामचरितचिंतामणि ( प्रबंधकाव्य ), ७ देवी द्रौपदी, ८ उपदेशरत्नमाला, ९ भारतभक्ति, १० मेघदूत, ११ विचित्र विवाह, १२ सत्य हरिश्चंद्र, १३ घटकर्परकी भाषाटीका, १४ अंजना, १५ सुंदरींसिंदूर प्रकरण, १६ भारतीय रत्नाकर, इत्यादि.

हिंदी भाषेंतील अलीकडील प्रमुख कवींत यांची गणना होते.

यांची राहणी अत्यंत साधी असे. गाजीपुर येथें यांनीं एक संस्कृतपाठशाळा, सनातनधर्ममंडळाची शाखा व वाचनालय स्थापन करून चालविलें होतें. ( क. कौ. २. २६४–६६, श्रीशुक्ल हिंदीसाहित्य का इतिहास )

**उपाध्ये, जयकृष्ण केशव**—( जन्म स. १८८३–मृत्यु स. १९३५ )

मराठींतील एक प्रसिद्ध कवि. यांचा जन्म नागपूर येथें झाला. २३ वे वर्षी घराचा त्याग करून वर्धा येथें तीन वर्षे रामनामाचें पुरश्चरण केलें. तेथें जुन्या मराठी ग्रंथांचें वाचन झालें. सर्व हिंदुस्थानभर प्रवास केला. लहान वयांतच कविता करण्याचा नाद लागला. लोकमान्यांचें ओंवीबद्ध चरित्र लिहून पहिला खंड प्रसिद्ध केला ( १९२४ ). निरनिराळ्या मासिकांतून कविता प्रसिद्ध केल्या आहेत. ‘पोपटपंची’ हा यांचा कवितासंग्रह प्रसिद्ध आहे. यांची ‘आधुनिक गीता’ म्हणून एक विनोदी काव्य विशेष प्रसिद्ध आहे.

वागीश्वरी, नागपूर, ह्या मासिकाचे कांहीं वर्षे संपादक होते.

**उपासनी महाराज**—(जन्म स. १८६८–मृत्यु स. १९४१ ) शिर्डीच्या साईबाबांच्या कृपेस पात्र झालेले सुप्रसिद्ध सत्पुरुष.

यांचें संपूर्ण नांव काशिनाथ गोविंद उपासनी-शुक्ल यजुर्वेदी माध्यंदिन शाखेचे हे ब्राह्मण.

प्रथम हे जळगांवला वैद्य होते ( १८९७ सुमार ). हातून चुकीचें औषध दिल्याचा गुन्हा होऊन यांना चार महिन्यांच्या साध्या कैदेची शिक्षा झाली होती.

नंतर हे शिर्डीस आले ( १९१० ). या ठिकाणीं हे ‘उन्माद अवस्थेंत’ होते.

हे पुढें शिर्डीहून नागपूर व खडगपूरला गेले. त्या ठिकाणींहि अंगास विष्ठा लावणें, मोरीचें पाणी पिणें यासारख्या सामान्य मनुष्यास चमत्कारिक वाटणाऱ्या गोष्टी यांनीं केल्या. ज्या खापरांत हे शौचविधि करीत, त्याच खापरांत भिक्षा मागण्याचा यांचा प्रघात असे. खडगपूरला तर हे दिगंबर अवस्थेंतच असत. त्या ठिकाणीं

यांच्या पायखान्याची लोकांनीं पूजा केली. या ठिकाणींच लोकांची यांचेवरील भक्ति थांबली नाहीं. पुढें पुढें तर यांच्या सांगण्यावरून पाडव्याच्या दिवशीं संक्रांत पाळण्यासारखीं कृत्यें करण्यापर्यंत तेथील लोकांची मजल गेली. धर्मशास्त्राचा या गोष्टीस कांहीं आधार नाहीं, ही गोष्ट हे स्वतः कबूल करीत असतां लोक केवळ यांच्या शब्दावरून या सर्व गोष्टी करीत (१९१४).

पुढें साकोरीस १९१७ सुमारास यांना स्वतःला स्त्रीत्वाची भावना झाल्याचा भास होऊं लागला. त्यामुळें हे क्वचित् लुगडें वगैरे नेसूं लागले.

साकोरीस आल्यावर तर यांच्या चमत्कारिक कृती वाढूंच लागल्या. याचा परिणाम यांच्या भक्तमंडळींत झपाट्यानें वाढ होण्यांत झाला. भक्तमंडळीचें यांचेवर इतकें प्रेम—भक्तमंडळींनीं यांना इतके पैसे दिले– कीं मरावयाचे वेळीं यांची एकंदर मालमत्ता अनेक लाखांची भरली.

यांच्या या इमारतींत भक्तमंडळीकरितां बांधलेली धर्मशाळा, ग्वाल्हेरचे श्रीमंत सरदार जाधव यांच्या मातोश्री श्रीमती जाधव यांनीं तीस-चाळीस हजार रुपये खर्च करून बांधलेलें दत्तमंदिर, ठिकठिकाणच्या भक्त-मंडळींनीं बांधलेलें यांचें स्थान व याशिवाय गणपती, शंकर, शनिमहाराज व खंडोबा यांचीं मंदिरें, यज्ञमंडप, गोशाळा, अन्नपूर्णागृह वगैरेंचा समावेश होतो.

ही सर्व वाढ क्रमाक्रमानें जरूरीप्रमाणें झाली असली पाहिजे. ज्या भाविकांना तेथील पारमार्थिक फायद्यांचा अनुभव येऊं लागला असेल तेच येथें राहिले असले पाहिजेत.

पुरुषांना स्त्रियांचा वेष देऊन हरतालिकेची पूजा करण्यास लावणें, स्वतः स्त्रीवेषांत बसून लोकांचेकडून बांगड्या मंगळसूत्रासारखे अहेर घेणें, इत्यादि यांच्या वर्तनाचा अन्वय सामान्य मनुष्याच्या बुद्धीपलीकडचा आहे.

परंतु यापेक्षांहि यांनीं आपल्या आश्रमांत पाडलेली दुसरी एक प्रथा अधिक लोकविलक्षण आहे. आत्मोन्नतीच्या पवित्र हेतूनें स्वतःशीं ब्राह्मविवाहपद्धतीनें विवाह लावून अनेक मुलींचा आपल्याशीं संबंध जोडीत आणि त्यांचा हे स्वीकार करीत. साकोरीला 'सतीचरित्र' म्हणून या कन्यांचें एक आत्मनिवेदनपर पुस्तक मिळतें. त्यांतहि 'यांच्याशीं आमचें लग्न लागलें असलें तरी यांचा आमचा संबंध लौकिक नसून पारमार्थिक-पितापुत्री-नात्याचा आहे' अशा तऱ्हेची कैफियत मांडली आहे. अशा तऱ्हेनें यांना अर्पण केलेल्या शिष्या सती गोदावरी व लग्न लागलेल्या सत्तावीस मुलींचीं नांवें प्रसिद्ध आहेत. यांपैकीं सती गोदावरी तर पूर्वविवाहित आहेत. या सर्व मुली ब्राह्मण, ब्राह्मणेतर व गुजराथी आहेत.

यांच्या म्हणण्याप्रमाणें यांच्या पत्नीच्या योगें यांना ह्या ब्रह्मस्वरूपाची प्राप्ति झाली. यांची शेवटची तिसरी पत्नी शिर्डीस आल्यानंतर वारली.

१७ ऑक्टोबर १९४० रोजीं केलेल्या आपल्या खाजगी मालमत्तेच्या मृत्युपत्रांतहि आपल्या तीन कन्यांना आणि एका भक्त स्त्रीला यांनीं ट्रस्टी नेमलें असून सती गोदावरी यांना मॅनेजिंग ट्रस्टी नेमिलें आहे.

एखाद्या भुलभुलैय्यांत सांपडावें त्याप्रमाणें यांच्या-संबंधीं निश्चित मत बनवूं इच्छिणाऱ्या मनुष्याची स्थिति होते. जर या सर्व मुली कन्या म्हणून आपल्या आश्रमांत ठेवण्याचें यांचें मनोगत होतें तर मग त्यांच्या-बरोबर विवाह लावण्याचा तरी खटाटोप यांनीं कशाला केला? या सर्व गोष्टींना धर्मशास्त्राचा कांहीं आधार नाहीं, मी म्हणेन तें धर्मशास्त्र ही आपली धर्मशास्त्राची व्याख्या यांनीं केव्हांच प्रसिद्ध केली आहे!

तीच गोष्ट यांच्या सर्वसाधारण बोलण्याची. 'गुदं वै गुरुपूजनम्' अशा प्रकारचें वाक्य उपनिषदांत आहे अशा उघड बोलण्याचें काय स्पष्टीकरण द्यावयाचें?

अशा तऱ्हेच्या मनुष्याच्या अन्तःकरणांत जे विचार स्फुरतील तें धर्मशास्त्र असें म्हणणें चमत्कारिक दिसतें.

यांचें एकंदर चरित्र पाहतां विचित्रपणा व विक्षिप्त-पणा यांचाच पगडा यांच्या एकंदर वागणुकीवर पडलेला दिसतो. मुरळ्या, देवदासी, विधवा यांच्या प्रश्नां-संबंधीं सरकार कायदे करीत असतां त्याच प्रकारचा एक नवीन प्रकार यांनीं उत्पन्न केला आहे.

धर्मनिष्ठेचीं अतिशय विपरीत उदाहरणें आपण इति-हासांत वाचलीं आहेत. परंतु सध्यांच्या सुधारणेच्या काळांत असाच प्रकार 'चक्षुर्वै सत्यम्' पाहावयास मिळावा ही गोष्ट देवावर अनन्य श्रद्धा ठेवणाऱ्या भाविकांना, धार्मिकांना व समाजाचें स्थैर्य इच्छिणारांना अत्यंत क्लेश-दायक वाटणें साहजिक आहे.

यांचें वाङ्मयः—१ साई वाक्सुधा (१–५ भाग), २ उपासनी वाक्सुधा (१–५ भाग), ३ सतीचरित्र (प्रवचनाचा भाग), ४ सिलेक्शन्स फ्रॉम वाक्सुधा

( गणेश कृष्ण ऊर्फ दादासाहेब खापर्डेकृत ). याशिवाय यांचीं इंग्रजी, कानडी, गुजराथी, तामीळ वगैरे भाषांत चरित्रें व प्रवचनें पुस्तकरूपानें भाषांतरित झालीं आहेत. मराठींत ' उपासनी लीलामृत ' नांवाचा चरित्रग्रंथ गद्य व पद्य ( ओवीबद्ध ) अशा दोन्ही स्वरूपांत प्रसिद्ध झालेला आहे. यांच्या विरुद्धहि कांहीं वाङ्मय प्रसिद्ध झालेलें आहे.

**उमरीकर, बाबामहाराज**—( जन्म स. १८३८– मृत्यु स.१९२४) मराठींतील संत कवि. यांना श्री.सदानंद महाराज असेंहि म्हणत. यांचे आजे व मोक्षगुरु, उद्धव चिद्धनांच्या आंबेजोगाई शाखेंतील बालकृष्ण हे होत.

यांच्या पित्याचें नांव विश्वनाथ. जन्मतःच नागानें यांच्यावर फणा धरिली होती म्हणून यांस शेष असेंहि म्हणत. हठयोग, राजयोग, प्राणायाम इत्यादि शास्त्रांत यांनीं प्रावीण्य मिळविलें. हे विरक्त होते तरी गृहस्थाश्रम स्वीकारला. पुढें आजे व गुरु बाळकृष्ण यांनीं आपली गादी चालविण्यास योग्य समजून यांना पूर्णाभिषेक केला व सदानंद असें यांना दीक्षानाम दिलें.

शेष म्हणे मज कृपा जेव्हां झाली ।
तया वेळीं गेली भेदभ्रांती ।
चराचर सर्व हरपलें दृष्टि ।
ऐसी कृपादृष्टि पूर्ण होय ॥

अशा सहज स्थितींत ते सतत असत. औरंगाबादचे पंढरीनाथ तुकाराम क्षीरसागर व भीमराव देशमुख हे यांचे आवडते शिष्य होते. उमरीचा कोमटी समाजहि यांस गुरुस्थानीं मानीत असे. उमरीचे मुसलमानहि यांस फार मानीत.

यांची सर्व कविता अध्यात्मपर असून ती सुमारें पस्तीस हजार आहे. यांच्या ग्रंथांपैकीं ' सुंदरविलास दीपिका ' व ' देशिकलीलामृत ' हे दोन ग्रंथ छापून प्रसिद्ध झाले आहेत. पैकीं पहिला सुंदरविलास नांवाच्या हिंदी ग्रंथाचें मराठी भाषान्तर आहे. दुसरा 'देशिक लीलामृत' यांचे गुरु बाळकृष्ण यांच्या चरित्रावर आहे. हे दोन्ही ग्रंथ ओवीबद्ध आहेत. 'सुंदर विलासा'चे ३४ अध्याय असून २०६६ ओंव्या आहेत. बद्ध, मुमुक्षु व मुक्त या विषयांचें क्रमानें विवेचन आहे. 'देशिकलीलामृत' या ग्रंथांत मुकुंदराजानें विवेकसिंधु ग्रंथ आंबेजोगाई येथें लिहिला त्या स्थळास ' मुकुंदराज गुंफा ' म्हणतात असें लिहिलें आहे. भंडाऱ्याजवळ अंभोरें गांवीं लिहिला, असें महाराष्ट्र सारस्वतकार भावे म्हणतात. दोन्ही ठिकाणीं मुकुंदराजांचीं ठिकाणें सध्यां आहेत ( मराठवाड्यांतील अर्वाचीन मराठी वाङ्मय पा. १–११ ).

संन्यास घेतल्यावर दोन दिवसांनीं हे समाधिस्थ झाले ( कार्तिक व. ३ शके १८४६ ). यांचे चिरंजीव अमृतराव महाराज विद्यमान पीठाधिपति आहेत.

**उमाजी नाईक**—( जन्म स. १७९१–फांशी स. १८३२ ) सुप्रसिद्ध बंडखोर रामोशी. याचा जन्म पुरंदर किल्ल्याच्या ईशान्य दिशेस एका कोसावर असणाऱ्या भिवडी गांवीं झाला. याच्या बापाचें नांव दादजी नाईक. खोमणे हें याचें उपनांव. जात रामोशी. दादजी नाईक वारला ( १८०२ ) तेव्हां उमाजी अकरा वर्षांचा होता.

वसईचा तह झाल्यानंतर ( १८०२ ) तेथील रामोशी मंडळी व पेशवे यांच्यांत कुरबुर होऊन पेशव्यांनीं रामोशांचे हक्क, वतनें, नेमणुका व जमिनी जप्त केल्या. तेव्हां ती रामोशी मंडळी निजाम राज्यांत आश्रयार्थ गेली आणि तिकडे त्यांचें बस्तान बसलें. तेव्हां उमाजीहि पण आपला चुलता राघू व इतर लोकांबरोबर माणकेश्वराच्या जवळच्या प्रदेशांत गेला. पण तिकडे कांहीं आरोप येऊन हे परत येत असतां राघू व त्याचा मुलगा चकमकींत मारले गेले आणि बाकीचे लोक परांड्याच्या किल्ल्यांत तीन दिवस अडकून पडल्यावर सुटून परत आले. त्यांत हा होता ( १८१५ ).

पुढें याला चांनजी मानिया, पुणें, यांचा माल पनवेलीजवळ खालापूर गांवीं लुटल्याबद्दल एक वर्षाची सक्त मजुरीची व फटक्यांची शिक्षा झाली. सुटून आल्यावर भोरजवळच्या वींगच्या कुळकर्ण्याच्या घरावर पडलेल्या दरोड्यांत याला पकडलें, पण यानें आपला निरपराधीपणा सिद्ध केल्यामुळें हा सुटला. याच वेळीं याचा भाऊ कृष्णा यास चोरीच्या आरोपावरून सात वर्षांची शिक्षा झाली. पण तो तेथून पळाला. याच वेळीं तुरुंगांतच या दोघां भावानीं अक्षरओळख करून घेतली.

पुढें याचा मित्र सत्तु याच्या हातून रागाच्या भरांत एका बाईचा खून झाला व पोलिसांनीं त्याला पकडलें. तेव्हां यानें आपल्या मित्रांच्या साहाय्यानें पोलिसांच्या हातून त्याला सोडविलें ( डिसें. १८२१ ). तेव्हांपासून पुणें प्रान्तांत याचा धुमाकूळ सुरू झाला.

दोन वर्षें अज्ञातवासांत काढल्यानंतर जेजुरीच्या यात्रेंत याचा भाऊ उचलेगिरीमुळें पकडला असतां त्याला दोन पोलिसांचे तलवारीनें खून करून यानें सोडविलें. तेव्हां याला सरकारकडून पकडलें जाणें किंवा उघड बंड करणें

याशिवाय मार्ग राहिला नाहीं. यानें सत्तूच्या साहाय्यानें बंडखोर होण्याचा मार्ग पसंत केला.

प्रथम आठदहा साथीदार व छोट्या चोऱ्या असा यांचा क्रम असे; पण पुढें यांचा संघ वाढला आणि यांनीं मोठाले दरोडे घालण्यास सुरवात केली. पुण्याजवळील भांबुडर्यास असलेल्या सरकारी खजिन्यावर यांनीं हल्ला केला. त्यांत सहा हजार दोनशें रुपये लुटले ( २४ फेब्रु. १८२४ ).

पुन्हां दोन महिन्यांनीं सासवडजवळ यांची व पोलिसांची चकमक झाली ( एप्रिल १८२४ ). यानंतर खुद्द सासवडमध्येंहि अशीच एक चकमक झाली ( एप्रिल १८२५ ). यानंतर सत्तु नीरेच्या कांठीं महामारीनें मेला ( २७ ऑगस्ट १८२५) आणि हा टोळीचा मुख्य झाला. या वेळीं टोळींत सुमारें सत्तर माणसें, थोडया तोडयाच्या बंदुका व तलवारी होत्या.

सरकारनें कॅ. मॅन्सफील्ड यांस कांहीं फौजेसह पाठविलें. त्यांना विशेष यश आलें नाहीं. पण याचा भाऊ अमृता त्यांच्या हातीं लागला. पण तो कबुलीजबाब देईना. नंतर ले. कारथ्यू यांना यांच्यावर छापा घालण्यास पाठविलें, पण त्यांचे श्रम वायां गेले.

मिरजेहून पुण्यास जाणारा पटवर्धनांचा वकील, पंढरपूरचा सावकार व फलटणचे बजाजी निंबाळकर यांची खाशी मंडळी यांना यांनीं लुटलें (१८२६). याच वेळीं जव्हारसिंग व रामसिंग या किक्वीच्या व पोलिस अधिकारी असणाऱ्या पितापुत्रांनीं यांचा पिच्छा पुरविला होता. तेव्हां यांनीं त्यांच्याच घराची लूट करून रामसिंग या त्याच्या मुलाला पकडून नेलें आणि 'पुनः वाटेस जाणार नाहीं' या अटीवर जीवदान दिलें. या सर्व प्रकारानें याचा बोलबाला वाढतच चालला.

याच वेळीं शिवनाक महारानें आपण सर्वांना पकडून देतों, असें सांगून सरकारी मदत घेतली व याच्या साथीदारांपैकीं भोजाजी नाईक याच्या घराला वेढा घातला. पण भोजाजी निसटला आणि त्याच्या घरची मंडळीहि भोजाजी, उमाजी वगैरेंनीं हल्ला करून सोडवून नेली आणि शिवनाकाला चांगलेंच जखमी केलें.

तेव्हां सरकारनें 'पूना हॉर्स' या फौजेच्या मुख्य अधिकाऱ्याला याच्यावर जाण्याचा हुकूम देऊन जेजुरी व वाल्हें यांच्यामध्यें एक पोलीस चौकी बसविली. पण यानें चौकीदारांनाच मारले व त्यांच्या तरवारी व बंदुका आपल्या लोकांस देऊन आपलें बळ वाढविलें.

आतां मात्र शंभर शंभराच्या दोन पायदळ तुकडया 'पूना हॉर्स' फौजेच्या मदतीकरितां देण्यांत आल्या. तेव्हां यानें कांहीं महिने हा भाग अजिबात सोडला. पण पुढें परत आला तेव्हां आपल्या विरुद्ध फारच गडबड चालू आहे असें याला दिसलें. विशेषतः कोळी लोक सरकारला मिळाले होते. सर्वसामान्य लोकांनीं तटस्थ राहावें अशी याची अपेक्षा होती ती फसली. तेव्हां सरकारला मदत करणाऱ्या लोकांचीं घरें जाळून त्यांना अद्दल घडविण्याचा यांनीं प्रयत्न केला. तेव्हां सरकारनें १ उमाजी ( रु. १२०० ), २ कृष्णाजी ( रु. १००० ), ३ पांडु ( रु. ८०० ), ४ पदोजी (रु.५००), ५ भवानी ( रु. २०० ), ६ भोजाजी ( रु. २०० ) अशीं बक्षिसें पकडून देणारास जाहीर केलीं.

याचीहि महत्त्वाकांक्षा वाढली व यानें कृष्णाजीस कोल्हापूरच्या छत्रपतींकडे (संभाजी ऊर्फ बुवासाहेब स. १८२२-३७ ) बोलणें करण्याकरितां पाठविलें. त्यांनींहि याचा शेलापागोटें देऊन योग्य सत्कार केला.

यापुढें यांनीं लूटमारीचें धोरण सोडून गांवच्या पाटलाला पत्र लिहून सरळ खंडणी मागण्याची पद्धति सुरू केली. जे सरळपणें खंडणी देणार नाहींत त्यांना दयामाया न करितां जुलूमजबरदस्ती, आग वगैरेंच्या धमक्या दिल्या जात, व प्रसंगीं त्याची अमलबजावणीहि होई. खुद्द सासवडसारख्या तालुक्याच्या गांवालाहि अशा 'खंडचिठ्ठ्या' अनेक वेळां गेल्या.

या खंडचिठ्ठ्या मे. उमाजी नाईक व भोजाजी नाईक यांच्या छावण्यांतून सुटलेल्या असत व सरकारी वसूल न देण्याची त्यांत स्पष्ट ताकीद असे.

याप्रमाणें कांहीं ठिकाणांवरून यांना खंडणी मिळाली व कांहीं ठिकाणांहून यानें सक्तीनें वसूल केली.

कोळी लोक रामोशांच्या विरुद्ध असत व ते पोलिसांत शिरून याला पकडून देण्याच्या कामीं सरकारला साहाय्य करीत म्हणून यानें कोळी लोकांच्या विरुद्ध एक जाहीरनामा काढला होता व कांहीं कोळ्यांचीं घरें जाळलीं होतीं.

गराडें गांवीं तर पाटलाच्या घरांत सशस्त्र पोलिसांचा कॅंप पडला असतां याच्या लोकांनीं त्या घरालाच आग लावून दिली. पण पाटलाच्या सुनेशिवाय कोणी दगावलें नाहीं. पुढें साकुर्डीच्या डोंगरापाशीं अशीच गोळागोळी होऊन चकमक झडली. एक शिपाई व दोन रामोशी मेले. हिला सोनापुराची चकमक म्हणतात.

या वेळीं यानें अधिक लोक जमा करण्याकरितां दूरदूर माणसें पाठविलीं. सरकारी शिपाईहि याच्या त्रासानें जेरीस आले. पुढें हा मावळाकडे वळला. तिकडे ब्रि. सरकारच्या व सचीवांच्या गांवांकडून खंडणी वसूल केली. भोजाजी नाईक आणखी साठ माणसें मदतीला घेऊन आला. पहिलीं ऐंशी माणसें होतींच. त्यांत कांहीं घोडेस्वारहि होते. असा याचा संच वाढत चालला.

कॅ. डेव्हिस हा त्या वेळीं यांचा पाठलाग करीत होता. हे जिकडे जाण्याची हूल दाखवीत त्याच्या अगदीं निराळ्या भागांत जाऊन प्रगट होत, आणि तेथें सांपडणाऱ्या चारदोन पोलिसांना प्रसंगीं ठारहि मारीत आणि त्यांचीं मुंडकीं गव्हर्नरकडे पाठवून पत्रांत तसें लिहून कळवीत.

या एकंदर प्रकारामुळें लोकांनाहि कसें वागावें हे समजेनासें झालें. याला खंडणी द्यावी तर सरकार रागावे. न द्यावी तर हा सर्व जाळून फस्त करी. सरकारनेंहि याला व याच्या सांथीदाराला पकडून देणारास प्रत्येकाबद्दल पांच हजारांची रक्कम देण्याचा पुनः जाहीरनामा लाविला.

कोल्हापूरकडील बंडावा मिटला आणि याला सर्व व्यवहार अवजड वाटूं लागला. आपलीं वतनें मिळालीं तर सर्व प्रकार मिटवून टाकावा असें याच्या मनांत आलें व त्याप्रमाणें बोलणीं करण्याकरितां यानें आपलीं चार माणसें निवडलीं आणि पुनः बोलवूं तेव्हां यावें असें ठरवून टोळीतील लोकांना निरोप दिला (१८३० जाने.).

कृष्णा नाईकानें पुण्यांत जाऊन तडजोडीचें बोलणें केलें. त्यावरून सरकारनें २० डिसें. १८२७ रोजीं शिपायांना ठार केल्याचा गुन्हा खेरीज करून बाकीच्या सर्व गुन्ह्यांची माफी केल्याचा जाहीरनामा काढला. त्या गुन्ह्याची चौकशी करून ज्यांच्यावर आरोप शाबीत होईल त्यांना शिक्षा केली जाईल असें याला कळविण्यांत आलें. या अटी उभय पक्षांना मान्य झाल्यावर कमांडिंग ऑफिसर व हा यांची भेट होण्याचें ठरलें. हा आपल्या दीडशें अनुयायांसह शिंगें, कर्णे, तुताऱ्या वाजवीत व डोक्यावर अबदागिरी धरून मिरवीत येऊन सासवडजवळच्या टेकडीखालीं दोघांची भेट झाली. अधिकाऱ्यानें माफीचा हुकूम वाचून दाखविला व ही भेट संपली. पुढें तर शिपायांच्या वधाबद्दल चौकशीची अट काढून टाकून याला बिनशर्थ माफी देण्यांत आली.

याच वेळीं पुण्यास धोंडोपंत नांवाच्या कलेक्टर कचेरींतील कारकुनास रामोश्यांकडून दरोडे घालवून त्यांत हिस्सा ठेविल्याबद्दल प्रथम फांशीची व अपिलांत जन्मठेपेची शिक्षा झाली होती. त्याची याच्याशीं तुलना होई.

पण याचा मात्र क्रम पुढें अगदीं बदलला. गुन्हे करणारा हा सरकारला गुन्हे पकडण्याच्या कामीं मदत करूं लागला, आणि पुढें तर याला तीस, भोजाजीला वीस, पांच नाईकांस प्रत्येकीं बारा, एक कारकुनास रु. दहा व बहात्तर रामोशी प्रत्येकीं पांच अशी पगाराची व्यवस्था सरकारांतून झाली ( १८२९ जाने. १७ ).

हा त्या प्रान्ताचा पोलीस अधिकारीच झाला. तथापि यानें आपला व्यवसाय कांहीं सोडला नाहीं. आपल्या लोकांमार्फत बित्तंबातम्या ठेवून हा लोकांना लुटण्याचें काम बरोबर करी. फिर्याद याच्याकडेच येत असल्यामुळें तिचा कांहीं उपयोग होत नसे. हेलपाटे व त्रास वांचविण्याकरितां लोक शेवटीं भरपावती लिहून देत, नाहींतर नाद सोडीत. वरपर्यंत पुष्कळ तक्रारी झाल्या पण बरेच दिवस त्याचा उपयोग झाला नाहीं. पुढें याला पुणें येथें राहण्यास भाग पाडण्यांत आलें. याचा पगार थोडा वाढविण्यांत आला. पण याचें वतन सुटेना व त्या वेळच्या परिस्थितींत याला असें पगार खात बसून राहणें आवडेना. तेव्हां यानें बंडाचें निशाण पुनः उभारलें.

साथीदारांना जमवून आणा-शपथा आल्या व खंडोबाचें दर्शन घेऊन कामाला सुरुवात झाली. पुणें, सातारा, नगर, सोलापूर, नाशिक व भोर संस्थान इतक्या भागांत यांची दंगल असे. मधूनच हा कोंकणातहि प्रगट होई. अवजड सामानसुमान नसल्यानें हालचाल जलद असे, आणि कोठेंहि डोंगर कपारींत राहत. तेव्हां साडेतीनशें लोक याच्या टोळींत होते.

सरकारी बंदोबस्तहि जिकडे तिकडे नाकेबंदी करणारा होता. गांवच्या पाटलांनाहि विशेष अधिकार मिळाले होते. जरा कोठें बातमी लागली कीं, सशस्त्र पोलिस हजर होत. छोट्या-मोठ्या चकमकीचे प्रसंग येऊन कांहीं माणसें जायबंदी होत व कांहीं मरत. नाकेबंदीमुळें अन्नवस्त्र मिळेना. दहशत, लुटालूट, जाळपोळ व हूल हे याचे मुख्य मार्ग होते. अशा या धांवपळींत व सरकारी रोषांत याचे अनुयायी टिकेनात. हळुहळू ते याला सोडूं लागले. लोक सरकारला व याला असे दोघांनाहि भीत व दुटप्पी वागत. लोक सरकारला अनुकूल वागणार नाहींत असा याचा अंदाज फसला.

शेवटीं याची नोकरी सोडून गेलेले कांहीं लोक फितूर झाले. याला पकडून देण्याच्या कामीं त्यांनींच साहाय्य केलें. सरकारनें प्रत्येकीं पांच हजार रुपये रोख व दोन चाहूर जमीन बक्षीस देण्याचें जाहीर केलें होतें. हेंहि तोंडाला पाणी सुटण्यासारखें आमिष होतें. शेवटीं ही रक्कम दहा हजारांपर्यंत वाढविण्यांत आली. तेव्हां पूर्वी याच्याच टोळींत असणाऱ्या नाना व काळू यांनीं भोराजवळील उत्रोळी गांवीं याला पैशाच्या लोभानें आणून खुबीनें शिल्लक राहिलेल्या पांचसात लोकांपासून अलग केला आणि पकडून भोर संस्थानच्या पोलिसच्या ताब्यांत दिला ( १५ डिसें. १८३१ ). यांच्यावर बंडखोरी व सरकारी नोकरींत राहून लुटालूट करणें असे दोन आरोप ठेवून पुणें येथें दोघा साथीदारांसह याला फांशीची शिक्षा देण्यांत आली ( ३ फेब्रु. १८३२ ).

हा जेजुरीच्या खंडोबाचा भक्त, परोपकारी आणि इष्टमित्रांचा समाचार घेणारा होता. याचें एकपत्नीव्रत कडकडीत असे. हा जेजुरीच्या खंडोबाच्या पुजाऱ्याला दरमहा पांच रुपये पुजेकरितां पाठविण्यास कधींहि चुकत नसे. त्यामुळें याच्याबद्दल लोकांत आदराची भावना होती. शेवटीं याच्याजवळ विशेष संपत्ति सांपडली नाहीं. हा शूर आणि मनाचा उदार होता. पकडल्यापासून फांशी जाईपर्यंतच्या कालांत हा मोकळ्या मनानें सगळ्या गोष्टी सांगे. त्यावरून हा आपणांस मोठा सरदार किंवा राजा समजे. हाताखालीं लोक वागवून अनेक वर्षे देशी-परदेशी अधिकाऱ्यांना यानें खेळवीत ठेविलें होतें यावरून याच्या शक्तीची व बुद्धिसामर्थ्याची कल्पना येते. स्वराज्याच्या कालांत हा खरोखरच मोठ्या पदवीस चढला असता. याला पकडण्याकरितां मुद्दाम नेमलेल्या कॅ. मॅकिन्टॉश या गृहस्थानें याचें समग्र चरित्र प्रसिद्ध केलें आहे, आणि त्या इंग्रजी चरित्राचा मराठींत अनंत नारायण भागवत यांनीं अनुवाद केला. आज सर्वत्र गायला जाणारा आणि अत्यंत लोकप्रिय असणारा उमाजीचा पोवाडा यानंतर रचलेला पण निराळी काव्यमय हकीगत देणारा आहे.

कॅ. मॅकिन्टॉशनें लिहिलेल्या इंग्रजी चरित्रांत याचे जाहीरनामे, खंडणी वसूल करण्याकरितां लिहिलेल्या चिठ्ठ्या व गव्हर्नर वगैरे अधिकाऱ्यांना लिहिलेलीं पत्रें मूळाबरहुकूम इंग्रजींत भाषान्तर करून छापलीं आहेत.

---

## ए

**एकबोटे, कृष्णाजी अनंत**—(जन्म स. १८८६–मृत्यु स. १९१६ )

मराठी भाषेतील सुप्रसिद्ध कादंबरीकार. हे मॅट्रिक झाल्यानंतर पोलीसखात्यांत मुख्य कारकुनाचें काम करीत. तथापि यांना लेखनवाचनाचा चांगला नाद होता. यांना सरकारी नोकरी असल्यानें 'सहकारी कृष्ण' या टोपण नांवानें सर्व लिखाण करावें लागलें.

सहकारी कार्याविषयीं लेखन करण्याचा यांचा प्रथम संकल्प असला तरी यांचें ललित वाङ्मयच विशेष लोकप्रिय झालें होतें. ललित वाङ्मयातहि कौटुंबिक वाङ्मय लिहिण्यांत यांचा हातखंडा असे. यापूर्वी सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या गेल्या असल्या तरी मध्यमस्थितींतील साधारण कुटुंबांत प्रत्यहीं घडणाऱ्या प्रसंगांची निवड करून त्यांची आकर्षक व ठसकेबाज मांडणी करण्याच्या बाबतींत यांनीं चांगलें यश संपादन केलें. कुटुंबशिक्षणमाला नांवाची एक ग्रंथमाला काढून ती थोडक्याच कालांत यांनीं चांगलीच लोकप्रिय केली होती.

त्या मालेंत यांनीं सुमारें ३५ छोट्या कादंबऱ्या प्रसिद्ध केल्या. त्यामुळें मिळालेल्या लोकप्रियतेनें यांचा आत्मविश्वास वाढला आणि यांनीं 'शापित महाराष्ट्र' नांवाची सुंदर ऐतिहासिक कादंबरी प्रसिद्ध केली. ती मोठी कादंबरी लोकांना फारच आवडली होती. त्यानंतर यांना अकालीं मृत्यु प्राप्त झाला. यांच्या मृत्युलेखांत 'महाराष्ट्राचा स्कॉट' हरपला असा यांच्यासंबंधीं केसरीनें उल्लेख केला होता. यांचें लेखन अनेक दृष्टींनीं महत्त्वाचें असूनहि पुरस्कर्ता नसल्यानें मागे पडलें आहे.

यांचे कथाग्रंथः—

१ अखेरचा स्वार्थत्यागी देशस्थ, २ अपमानाचा दान, ३ आत्मोद्धार, ४ आधुनिक स्वयंवर, ५ खुनाचा आरोप,

६ चैत्राचा महिना, ७ माझी कहाणी, ८ मानापमान, ९ वर्षारंभ, १० संकट कीं सौभाग्य, ११ संक्रांत, १२ हा संसार कीं नरकवास, १३ ही प्रेमाची मूस कां पुरुषार्थाची कूस.

कादंबरी ऐति. राजकुंवर ( १९१५ ), शापित महाराष्ट्र ( १९१६ ). एकांडा धारेकरी असेंहि यांनी कांहीं वेळां टोपण नांव वापरलेलें आहे.

**एकबोटे, व्यंकटेश यशवंत तथा विठ्ठलदेव**–( समाधि स. १८३३ )

नगर जिल्ह्यांतील भिंगार येथील सत्पुरुष. लहानपणापासूनच यांची वृत्ति परमार्थाकडे होती. संतचरित्रें, गीता व ज्ञानेश्वरी वगैरेंचा यांचा व्यासंग दांडगा असे. बालवयांतच यांनीं पंढरीची वारी सुरू केली व पहिल्याच खेपेस यांना पांडुरंगाचा साक्षात्कार झाला. वडिलांच्या मागें बंधु आनंदराव आणि यांच्यांत वांटणी झाली. तेव्हां यांच्या वांट्यास कांहीं कुळें आलीं. त्यांना यांनीं कर्जमाफी दिली व बाकीची संपत्ति ब्राह्मणांस दान दिली.

शके १७१५ (स. १७९३ ) सालीं यांना पुनः साक्षात्कार झाला व पुढील चाळीस वर्षे यांनीं दुधावर काढलीं.

यांची कीर्ति ऐकून श्रीमंत बाजीराव पेशवे यांचे दर्शनास भिंगारला गेले व यांचे पुढें मोहोरांची रास ठेविली. पण यांनीं तिला स्पर्शसुद्धां करण्याचें नाकारलें.

साधुसन्तांच्या पंक्तीस हे बसले असतां यांनीं एकदां पाण्याचें तूप बनविलें. त्या तुपाच्या कासंडीची अद्यापहि पूजा केली जाते. असे यांचे अनेक चमत्कार आहेत. यांची पत्नी गंगाबाई; पुत्र दोन व कन्या एक झाली. चैत्र कृ. १४स संन्यास घेऊन लगेच ' पुंडलिक वरदा हरी विठ्ठल ' म्हणून देह ठेवला. श्री. विनायक सीताराम शाळिग्राम संगमनेर यांनीं लिहिलेल्या नूतन संत-चरित्रांत यांचे ओंवीबद्ध चरित्र दिलें आहे. यांचें गोत्र भारद्वाज. यांचें घराणें भिंगार, पुणें वगैरे ठिकाणीं पसरलें आहे.

**एडवर्ड सातवा**—( जन्म ९ नवं. १८४१–मृत्यु स. १९१० मे १७ )

व्हिक्टोरिया राणीचे ज्येष्ठ पुत्र. जन्मानंतर एक महिन्यानें यांना ' प्रिन्स ऑफ वेल्स ' व ' अर्ल ऑफ चेस्टर' या पदव्या देण्यांत आल्या. बालपणचें शिक्षण लिटलटिन बाईच्या देखरेखीखालीं व नंतरचें हेनरी बर्च, गिब्स, रे. टार्व्हर, हर्बर्ट फिशर व प्रो. प्लेफेअर वगैरेंच्या नेतृत्वाखालीं झालें. यांनीं केंब्रिजच्या ट्रिनिटी कॉलेजांत रसायनशास्त्राचा अभ्यास केल्यानंतर स. १८५८ त यांना " नाइट ऑफ दि गॉर्टर " ही पदवी देऊन सैन्यावर सेनापति नेमण्यांत आलें. स.१८६३ त हे पार्लमेन्टचे सभासद झाल्यावर यांनीं 'ड्यूक ऑफ कॉर्नवाल' म्हणून लॉर्डांच्या सभेंत प्रवेश केला. याच वेळीं डेन्मार्कचा राजा नववा ख्रिश्चन याच्या अलेक्झांड्रा नांवाच्या मुलीशीं यांचा विवाह झाला. हिच्यापासून यांना पांच मुलें झालीं.

यांना सार्वजनिक व लोकहिताच्या कामाची आवड असे. अशा प्रसंगींचीं यांचीं भाषणेंहि उत्कृष्ट होत असत. स. १८७१ चें 'सर्व राष्ट्रीय प्रदर्शन' ह्यांच्या हस्तें उघडण्यांत आलें. त्याचप्रमाणें स. १८८६ च्या हिंदुस्थान व वसाहतीतर्फे भरलेल्या प्रदर्शनाचे हे अध्यक्ष होते. सन १८९६ त वेल्स विद्यालयाचे चॅन्सेलर म्हणून यांची नेमणूक झाली. ब्रिटिश म्यूझियमच्या व्यवस्थापकांतहि हे एक व्यवस्थापक होते. व्हिक्टोरिया राणीच्या मरणानंतर हे सातवे एडवर्ड या नांवानें राज्यारूढ झाले व पार्लमेन्टच्या कायद्याप्रमाणें " Edward VII, by the Grace of God, of the United Kingdom of Great Britain & Ireland and of all the British Dominions beyond the Seas King, Defender of the Faith, Emperor of India" ही पदवी धारण केली. ९ ऑगस्ट १९०२ मध्यें यांना राज्याभिषेक झाला.

यांनीं इटली, स्पेन ( १८५९ ), युनायटेड स्टेट्स्, कॅनडा ( १८६० ), हिन्दुस्थान ( १८७५ ), आयर्लंड ( १८८५ ), फ्रान्स ( १८८९ ), पोर्तुगाल वगैरे अनेक देशांतून प्रवास केला. सार्वजनिक शांततेच्या प्रस्थापनेसाठीं या प्रवासाचा बराच उपयोग झाला. स.१९०३-४ सालीं इंग्लंडचे फ्रान्स, स्पेन, इटली, जर्मनी व पोर्तुगाल या देशांशीं मित्रत्वाचे तह झाले. म्हणून यांना ' The Peace-maker ' —'शांतता प्रस्थापक' असें म्हणतात. स. १९०७ मध्यें अँग्लो-रशियन तह झाला. हे चांगल्या स्वभावाचे व मुत्सद्देगिरींत निष्णात असल्यामुळें यांनीं जनतेचें मन आपल्याकडे आकर्षिलें होतें.

**एल्विन, व्हेरिअर**—( जन्म स. १९०२ )

हिंदुस्थानांतील वन्य जातींत राहून त्यांची सेवा, सुधारणा व अभ्यास करणारे इंग्लिश गृहस्थ.

हे प्रथम स. १९२७ सालीं हिंदुस्थानांत आले. यांचे वडील इंग्लंडांतील सॅलिसबरीचे बिशप होते.

आईच्या व पित्याच्या कडील पुष्कळ पूर्वज हिंदुस्थानांत मुलकी व लष्करी नोकरींत होते. त्यामुळें कदाचित् यांना हिंदुस्थानाबद्दल विशेष महत्त्व वाटत असावें. हिंदुस्थानांत येण्यापूर्वी हे ऑक्सफर्ड येथें इंग्रजी भाषा व धर्मशास्त्र यांच्या अखेरच्या परीक्षा पहिल्या वर्गांत उत्तीर्ण झाले व स्वतः शिक्षण घेतलेल्या मेर्टन कॉलेजमध्यें लेक्चरर होते. इंग्रजी वाङ्मयांतील प्रावीण्याबद्दल यांना चार्लस ओल्डहॅम् शिष्यवृत्ति व मॅथ्यु ॲरनॉल्ड प्राइझ मिळालीं होतीं. हे आतां मिशनरी नाहींत.

हिंदुस्थानांतील लोकांबद्दल वाटणाऱ्या आपलेपणामुळें हे ऑक्सफर्ड येथील प्राध्यापकाची जागा सोडून इकडे आले. सुरवातीला हे पुण्याच्या 'ख्रिस्तसेवासंघ' या संस्थेंत काम करूं लागले. पण लवकरच यांना असें दिसून आलें कीं ख्रिस्ती धर्मप्रसाराच्या संस्थेशीं संबंध ठेवून आपणास मोकळेपणानें काम करतां येत नाहीं. म्हणून यांनीं मिशनरी कार्याशीं पर्यायानें संबंध असणाऱ्या संस्थांशींहि संबंध न ठेवण्याचें ठरविलें, व अगदीं स्वतंत्रपणें लोकांत मिसळून परोपकार व अभ्यास करण्यास सुरवात केली.

प्रथम ते महात्मा गांधींच्या असहकारितेच्या चळवळीकडे ओढले गेले. म. गांधींच्या साबरमतीच्या आश्रमांत हे राहण्यास गेले. दांडीचा मोर्चा व खुदाईखिदमतगारांची चळवळ यांसंबंधींचीं दोन पुस्तकें म. गांधींचा यांच्यावर झालेला परिणाम दर्शवितात. पुढें 'दि ट्रुथ अबाउट इंडिया' (१९३२) हें पुस्तक यांनीं लिहिलें. पण त्यामुळें सरकारशीं यांचा विरोध आला. राजकीय चळवळींपासून अलिप्त राहिल्याशिवाय आपणास कांहीं भरीव काम करणें अशक्य आहे अशी यांची खात्री झाली. मग यांनीं 'भूमिजनसेवामंडळ' काढलें (१९३३). तेव्हां यांना ख्रिस्तसेवासमाजांतील जुने सहकारी श्री. शामराव हिवाळे येऊन मिळाले. आणि या दोघांनीं वन्य अथवा आदिवासी जमातींच्या उन्नतीचें काम करण्याचें ठरविलें आणि त्याप्रमाणें मध्यप्रान्तात यांचें काम बऱ्याच ठिकाणीं चालू आहे.

त्या प्रान्तांतील गोंड जमातींत यांनीं आपलें काम सुरू केलें. कॉंग्रेसच्या औद्योगिक व विधायक बाबींचा समावेश यांनीं आपल्या कार्यक्रमांत केला तरी यांना सरकारी मदत मिळण्यास हरकत झाली नाहीं. गोंडांचा विश्वासहि यांनीं चांगला संपादन केला. यांच्या आश्रमांची व नसाहतींची संख्या हळूहळू वाढत चालली. महारोग्यांच्या शुश्रूषेकरितांहि यांनीं एक भाग उघडला.

या लोकांशीं हे अगदीं मिळूनमिसळून वागतात. यांच्याभोंवतीं त्या लोकांच्या स्त्रीपुरुषांचा नेहमीं गराडा असतो. अगदीं त्यांच्या क्षुल्लक घरगुती भांडणांत सुद्धां हे आपलेपणानें लक्ष घालतात. त्यांची भाषा तर यांनीं आत्मसात् केली आहेच पण त्यांच्यांतील बारीकसारीक गोष्टींचा यांनीं अगदीं चांगला परिचय करून घेतला आहे. यांनीं 'कोशी' नांवाच्या एका गोंड स्त्रीशीं विवाह केला (१९४०) असून यांना तिच्यापासून झालेल्या मुलाचें नांव 'जवाहरलाल' असें ठेवलें आहे.

संबळपूर नजीकच्या पाल लाहात्रा गावीं ओरिसांत यांचा सध्यां मुक्काम असून तेथें जंगलीसमाजाबद्दल शास्त्रीय संशोधनपर ग्रंथ लिहिण्याचें यांचें काम चालू असतें.

मध्यप्रांतांतील मंडला जिल्ह्यांत देवगड या ठिकाणीं 'बैगा' या जमातींत हे १९३२ पासून राहत आहेत. या ठिकाणीं यांनीं शाळा, दवाखाना व अनाथालय वगैरे निर्माण केलीं असून सुधारणेच्या जितक्या नजीक या लोकांना नेतां येईल तितकें नेण्याचा यांनीं प्रयत्न केला आहे. यांचें तेथील मातीनें बांधलेलें घर, त्यामध्यें असलेलें डेस्क, त्यालाच जोडून असलेली लायब्ररी, मुलांच्या खेळण्यांनीं भरून गेलेली तेथील जमीन व औषधांनीं भरलेलीं यांचीं कपाटें या गोष्टी तेथील वन्य जातींचा मोठाच आधार बनून राहिला असल्यास नवल नाहीं.

या सहवासामुळें वन्य जातींच्या चालीरीति, आचारविचार, भाषा, कपडे, वगैरे सर्व बारीकसारीक गोष्टींचें यांना अतिशय सूक्ष्म ज्ञान प्राप्त झालें. या ज्ञानाचा आपल्या परदेशी बांधवांना फायदा मिळावा या हेतूनें या जातींतील कांहीं कांहीं विशिष्ट पोटभेदांवर यांनीं विस्तृत पुस्तकें लिहिलीं आहेत. जंगली लोकांचा आयुष्यक्रम व त्यांच्या कल्पना यांच्याशीं एकरूप होऊन अत्यंत तादात्म्यतेनें यांनीं त्यांचेविषयीं दिलेली माहिती युरोपियनच काय परंतु सुशिक्षित हिंदी मनुष्यांसहि अपरिचित वाटण्याचा संभव आहे.

यापैकीं यांचें अतिशय नांवाजलेलें पुस्तक म्हणजे 'The Baiga' हें होय. मायकेल पर्वतांत राहणाऱ्या या जमातीसंबंधीं यांत अत्यंत चिकित्सक बुद्धीनें माहिती देण्यांत आली आहे. लैंगिक आचरणासंबंधींचा त्यांचा दृष्टिकोन, त्यांची जादूची पद्धत, न्यायदान, पुढचें धोरण ठरवण्याची त्यांची रीत, नृत्यकला, नात्याचे संबंध वगैरे गोष्टींचें यांत अत्यंत विस्तृतपणें परीक्षण करण्यांत आलें

असून शास्त्रीय व सामान्य अशा दोन्ही वाचकांचें समाधान करण्याचें सामर्थ्य या ग्रंथांत आहे. हिंदी मानवजातिशास्त्रावरील हा एक प्रमाणभूत ग्रंथ मानण्यास हरकत नाहीं.

याचेच पठोपाठ प्रसिद्ध झालेला यांचा ग्रंथ 'The Agaria' हा ग्रंथ यांच्या 'Baiga' ची पुरवणी मानण्यास हरकत नाहीं. ही जात धंद्यानें लोहार असून मंतरलेल्या लोखंडाचे ' (Magic Iron) अलंकार घालण्यांत त्यांना फार मजा वाटते. त्याचप्रमाणें यांचा 'Maria Murder and Suicide' हा ग्रंथहि सुप्रसिद्धच आहे. यांत बस्तार (Bestar) संस्थानांतील मुरिया या लोकांवर लिहिण्यांत आलें आहे. हे लोक जातीनें खुनी नाहींत. तर मग कोणत्या परिस्थितीमुळें ते खुनी बनले, याचा विचार या पुस्तकांत करण्यांत आला आहे. त्यामुळें सर्व रानटी जातींमध्यें होणाऱ्या गुन्ह्यांचें पृथक्करण आपणांस करतां येतें. या अभ्यासाकरितांच शरीररचनाशास्त्रज्ञाचा सन्मान्य हुद्दा बस्तार राज्यांत यांना देण्यांत आला असावा ( १९४० ).

याशिवाय 'The Muria and their Ghotul' हा यांचा ग्रंथहि प्रसिद्ध आहे.

वर उल्लेखलेले सर्वच ग्रंथ पूर्ण सहानुभूति व अत्यंत शास्त्रीय दृष्टीनें मिळवलेली माहिती यांतून उत्पन्न झाले असल्यानें त्यांच्या विश्वसनीयतेबद्दल शंका नाहीं.

वन्य जमातींत प्रसिद्ध असणारीं लोकगीतें, लोककथाहि यांनीं 'Folk Tales of Mahakoshal', 'Folk-Songs of the Maikal Hills' या नांवांखालीं एकत्रित केलीं आहेत. सांस्कृतिक अभ्यासाचें बहुमोल साधन या नात्यानें हे या गीतांकडे व कथांकडे पाहत असल्यानें या गीतांची हिंदी लोकांनीं केलेली आबाळ यांना अत्यंत क्लेशदायक वाटते. या गीतांचें हिंदी भाषांतरहि हे प्रसिद्ध करण्याचे तयारींत आहेत.

याशिवाय 'Aboriginals' व 'Leaves from the Jungle' ( हिंदुस्थानांतील आपल्या अनुभवांचें कथन ) हीं यांचीं पुस्तकेंहि प्रसिद्ध आहेत.

यांनीं कांहीं कादंबऱ्याहि लिहिल्या आहेत. 'A Cloud that is Dragonish', 'Phulamat of the Hills' अशीं त्यांचीं नांवें असून वन्य जातींच्या आचारविचारांची सूक्ष्म माहितीच कादंबरीच्या स्वरूपांत सांगण्यांत आली आहे. 'मॅन इन इंडिया' या सुप्रसिद्ध पत्राचे हे आज कित्येक दिवस संपादक आहेत.

बिहार-ओरिसामध्येंहि यांच्या कामाचा पसारा वाढत चालला असून सरकार व जनता या दोघांच्याहि विश्वासास हे पात्र झाले आहेत. परंतु कामाचें स्वरूपच इतकें प्रचंड व खर्चाचें आहे कीं मुंबईसारख्या ठिकाणीं या लोकांच्या फिल्मस् दाखवून पैसा जमा करण्याचें काम यांना वर्षांतून कांहीं दिवस करावें लागतें.

**एल्जिन, लॉर्ड**—( कारकीर्द स. १८६२-६३ )

हिंदुस्थानचे व्हाइसरॉय. कॅनिंगनंतर हे या पदावर आले, पण एका वर्षांतच हे मृत्यु पावले.

**एल्जिन, लॉर्ड**—( कारकीर्द स. १८९४-९८ )

हिंदुस्थानचे व्हाइसरॉय. यांचे वडीलहि हिंदुस्थानचे व्हाइसरॉय होते. यांच्या वेळीं हिंदुस्थानावर फार संकटें आलीं. चित्रळ प्रान्त व तिऱ्हा प्रान्त ( खैबरच्या खालीं दक्षिणेस ) यांवर आफ्रिडी लोकांनीं स्वारी केली. शेवटीं त्यांचा मोड झाला. स. १८९६ सालीं मोठा दुष्काळ पडला. त्यांत सातआठ लाख लोक मृत्युमुखीं पडले. अफूचा व्यापार कमी करण्याकरितां त्यावर नियंत्रण ठेवण्यांत आलें. स. १८९६ सालीं हिंदुस्थानांत प्लेगचा प्रादुर्भाव झाल्यानें लक्षावधि लोक मरूं लागले. पुढें दर वर्षी प्लेगची साथ हिंदुस्थानांत पसरूं लागली. स. १८९७ सालीं पुण्यास दोन प्लेग-अधिकाऱ्यांचे खून झाले. स. १८९७ सालीं राणी व्हिक्टोरियांच्या राज्यास साठ वर्षें झालीं म्हणून हीरकमहोत्सव करण्यांत आला व दिल्लीस मोठा दरबार भरविण्यांत आला.

# ऐ

**ऐनापुरे, वासुदेवशास्त्री**— ( जन्म स. १८६३–मृत्यु स. १९४१ )

मुंबईचे सुप्रसिद्ध वैद्य. यांचें आयुर्वेदाचें अध्ययन वासुदेवशास्त्री कऱ्हाडकर या मुंबईच्या प्रसिद्ध वैद्याच्या हाताखालीं झालें. हे बडोद्याच्या वैद्यकीच्या परीक्षा उत्तीर्ण झाले होते. जुन्या फार थोड्या व्युत्पन्न वैद्यांत यांची गणना असे. डॉ. पोपट प्रभुराम यांच्या प्रभुराम आयुर्वेद विद्यालयाचें मूळ जें आयुर्वेदविद्यालय त्याचे हे मुख्याध्यापक होते. स. १९२०-२४ पर्यंत वै. भ्र. हिलेंकरशास्त्री यांनीं काढलेल्या मराठी वैद्यक वर्गांतहि हे अध्यापन करीत. मुंबई वैद्यनियंत्रण कायद्याच्या निषेधार्थ भरलेल्या मुंबई प्रान्तीय वैद्यकसंमेलनाचे हे स्वागताध्यक्ष होते. वैद्यक, धर्म व समाज यांच्या अनेक सभा-संमेलनांत हे आस्थेनें भाग घेत. निखिल भारतवर्षीय आयुर्वेद महामंडळाच्या संस्थापकांपैकीं हे एक होते. पुणें वेदशास्त्रोत्तेजक सभा व नि. भा. आयुर्वेद विद्यापीठाचे हे परीक्षक असत.

प्रभुराम आयुर्वेद कॉलेजनें ‘प्राणाचार्य’ व शंकराचार्य पीठानें ‘ आयुर्वेद महोपाध्याय ’ या पदव्या देऊन यांना गौरविलें होतें. हे मोठे परोपकारी असून पैशाची अपेक्षा न करितां सेवावृत्तीनें औषधोपचार करीत असत ( आयुर्वेदाचार्य दा. ह. देशपांडे ).

# ओ

**ओक, जनार्दन विनायक**—( जन्म स. १८७९–मृत्यु स. १९१७ )

शिक्षक, संपादक व कोशकार. यांचा जन्म पुणें येथें झाला. एम्.ए. झाल्यानंतर (१९०१) फर्ग्युसन कालेजांत हे तीन वर्षे प्राध्यापक होते. पुढें मध्यप्रान्त शिक्षण खात्यांत बड्या पगाराची जागा मिळाल्यानें यांनीं ही नोकरी सोडली. कांहीं दिवस हे नागपूर नील सिटी स्कूलचे सुपरिंटेंडेंट होते, पण रिस्ले सर्क्युलरासारखीं सर्क्युलरें बजावण्याचें पातक आपल्या हातून होऊं नये म्हणून ती चारशें रुपये दरमहाची नोकरी सोडून हे प्रो. विजापूरकरांच्या समर्थ विद्यालयास येऊन मिळाले ( १९०८ ). हे विद्यालयाचे चालक व प्रो. विजापूरकर प्रचारक असा थाट जमल्यावर विद्यालय भरभराटीस येणारच. पण समिति कायद्यानें तें विद्यालय बंद झालें ( १९१० ). तेव्हां यांनीं ‘ लोकशिक्षण ’ मासिक काढून तें सहा वर्षे चालविलें. याच अवधींत यांनीं ‘ गीर्वाण लघुकोश ’ हा संस्कृत मराठी कोश केला. यांचें बीजगणितहि प्रसिद्ध आहे.

याशिवाय लोकशिक्षणमध्यें यांनीं लिहिलेल्या निबंधांपैकीं वर्णव्यवस्थेवरील निबंधाचाहि येथें उल्लेख करावयास पाहिजे. वर्णव्यवस्था ही समाजाला जरूर आवश्यक आहे, परंतु सध्याच्या तिच्या परिस्थितींत ती पाळणें अशक्य आहे असा त्या निबंधाचा सारांश आहे.

**ओक, महादेव पांडुरंग**—( जन्म स. १८७४–मृत्यु स. १९३० ) सुप्रसिद्ध संस्कृत शिक्षक व संस्कृत कवि.

कुलाबा जिल्ह्यांतील पेणजवळच्या वरसईचे हे राहणारे. पांडुरंगशास्त्री लोंढे यांच्याजवळ यांचें प्राथमिक संस्कृत शिक्षण झालें. मॅट्रिक ( १८९३ ). पेण येथें शिक्षक ( १८९५–१९०१ ). नंतर पुणें न्यू इंग्लिश स्कूलमध्यें आले. यांची संस्कृतशिक्षक म्हणून अतिशय ख्याति होती. तथापि यांचा विशेष गुण म्हणजे कोणताहि विचार हे सुलभ व ललित संस्कृतमध्यें सहज ग्रथित करीत असत हा होय.

त्या दृष्टीनें ‘ सूक्तिसुधातरंगिणी ’ अभ्यासण्यासारखी आहे. तें पुस्तक जर्मनींत पाठ्य पुस्तकांतहि समाविष्ट झालें आहे असें म्हणतात. ज्यांनीं ज्यांनीं यांची ही कृति पाहिली त्यांनीं त्यांनीं यांच्या या गुणाची वहावाच केली आहे.

यांचे ग्रंथः—

अभिनवरत्नमाला, सुबोधपाठावलिः, सुलभसंस्कृतप्रवेश, सूक्तिसुधातरंगिणी, ज्ञानेश्वरी ( संस्कृतमध्यें केली पण तींत पहिले ९ अध्यायच आहेत ).

**ओक, वामन दाजी**— ( जन्म स. १८४५–मृत्यु स. १८९७ )

कवि, काव्याभ्यासक, काव्यसंशोधक व निबंधलेखक. यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांतील चिपळूण तालुक्यांतील हेदवी नांवाचे गांवीं झाला. प्राथमिक शिक्षण गांवींच झाल्यावर रत्नागिरी हायस्कुलांतून मॅट्रिक झाले. यांनीं पहिली जगन्नाथशंकरशेट शिष्यवृत्ति मिळविली (१८७०). मुंबईस कॉलेजमध्यें असतां अभ्यास सोडून यांना नोकरी पत्करावी लागली. नागपूरच्या सिटीस्कूलांत हे काम करूं लागले ( १८७५ ). निबंधमालाकार चिपळुणकर व हे यांच्यांत मोरोपंताबद्दल ईर्षेचा सामना झाला. यांचा निबंध निबंधमालेंतच प्रसिद्ध झाला. यांनीं मालाकारांना चुका कबूल करावयास लावून जय मिळविल्यामुळें यांचें नांव महाराष्ट्रांत सर्वतोमुखीं झालें. नागपूरचें सिटीस्कूल सोडून हे मेल नार्मलस्कूलचे सुपरिंटेंडेंट झाले (१८८४). नंतर संबळपूरच्या हायस्कूलवरील मुख्याध्यापक झाले. तेथें यांनीं पांच वर्षें काम केलें. याच सुमारास निर्णयसागर छापखान्यानें ‘ काव्यमाला ’ व ‘ काव्यसंग्रह ’ हीं दोन मासिकें प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली होती. दुसऱ्या मासिकाचें संपादकत्व जनार्दन बाळाजी मोडक यांच्याकडे होतें. ते वारल्यावर ( १८९० ) यांना संपादक करण्यांत आलें. तें काम यांनीं इतकें उत्कृष्ट बजावलें कीं त्याबद्दल महाराष्ट्र यांचा नेहमीं कृतज्ञ राहील. यांच्यापुढें अर्थ व्यक्त करण्यास योग्य असणारी भाषा हात जोडून उभी असे. शुद्ध, रसाळ व भारदस्त भाषा हे वापरीत. पुस्तकपरीक्षणांत यांचा हातखंडा असे. गुणदोषांचें यथायोग्य विवेचन करून कवीचें हृद्गत हे व्यक्त करीत ( बालबोध, जुलै १८९७ ).

स. १८९१ सालीं यांची बदली रामपूरच्या हायस्कूलच्या हेडमास्तरच्या जागीं झाली. उद्योगातिरेक, पत्नीवियोग व विश्रान्तीचा अभाव यामुळें हे लवकर मृत्यु पावले.

वाङ्मयः— १ माधवनृपतिनिधनात्मक पद्यरत्नमाला १८८३, २ काव्यमाधुर्य १८८४, ३ लॉर्ड बेकन चरित्र १८८४, ४ कादंबरीकथासार १८८९, ५ मुद्राराक्षसकथासार १८८९, ६ वासवदत्ताकथासार १८८९ ( अ. म. वा. से. ).

**ओक, विनायक कोंडदेव**— ( जन्म स. १८४० –मृत्यु स. १९१५ )

चरित्रकार, कवि, बालोपयोगी निबंधकार. काव्यसंग्रहकार ओकांचे हे चुलतचुलत बंधु. यांचा जन्म हेदवी येथेंच झाला. थोडेंसें मराठी व इंग्रजी तीन इयत्ता एवढेंच यांचें शिक्षण. पण स्वकष्टानें यांनीं आपली मराठी भाषा चांगलीच कमावली. ‘ कँडीसाहेबानें मला लिहावयास शिकविलें ’ असें हे म्हणत. हे आठ रुपये पगाराच्या मास्तरापासून अ. डे. एज्युकेशनल इन्स्पेक्टरचे १०० रु. पगाराच्या जागेपर्यंत चढले. यांनीं ‘ बालबोध ’ नांवाचें मासिक सतत ३४ वर्षें चालविलें. यांनीं बालबोधांत एकंदर ४०२ चरित्रें, ४०२ कविता, ४०२ निबंध, ३७१ शास्त्रीय विषयावरील निबंध आणि इतर विषय ८५० एवढें लिहिलें आहे. यांनीं छोटींमोठीं सुमारें पन्नास पुस्तकें लिहिलीं आहेत. व त्यांतील बहुतेक निर्णयसागर छापखान्यानें छापलीं आहेत. यांच्या ग्रंथाचें स्वरूप लक्षांत घेतां यांस बालवाङ्मयाचे जनक म्हणणें अधिक शोभेल. यांची भाषा सुबोध, सरळ व मनोरम आहे. यांचें वाङ्मयः— १ लघुनिबंधमाला, २ मधुमक्षिका, ३ गद्यरत्नावली, ४ महन्मणिमाला, ५ पुष्पवाटिका, ६ शहाणपणाचा ओनामा, ७ मुलांचें कल्याण, ८ मुलास थोडासा बोध, ९ मुलास उत्तम बक्षीस, १० मनुष्याचें कर्तव्यकर्म, ११ अनुकरण, १२ शिक्षकास थोडासा बोध, १३ फुलांची परडी, १४ स्वदेशाभिमान, १५ प्रपंचरहस्य, १६ महाराष्ट्रवाङ्मय, १७ सांप्रतच्या लेखकांचें कर्तव्य, १८ शिमग्याविषयीं थोडा विचार, १९ स्त्रियांची परवशता, २० हिंदुस्थानचा संक्षिप्त इतिहास, २१ हिंदुस्थानकथारस, २२ इतिहासतरंगिणी, २३ शिपायांच्या बंडांचा इतिहास, २४ रोमचा इतिहास, २५ पीटर धि ग्रेटचें चरित्र, २६ शिकंदर बादशाहाचें चरित्र, २७ आल्फ्रेड दि ग्रेटचें चरित्र, २८ सर टॉमस मनरो यांचें चरित्र, २९ ग्लॅडस्टनचें चरित्र, ३० रावराजे दिनकरराव राजवाडे यांचें चरित्र, ३१ अमीर अबदुल रहमान चरित्र, ३२ ड्यूक ऑफ वेलिंग्टनचें चरित्र, ३३ जावजी दादाजींचें चरित्र, ३४ सॅम्युअल जॉन्सनचें चरित्र, ३५ वॉरन हेस्टिंग्सची गोष्ट, ३६ फ्रान्सांतील राज्यक्रान्तीचा इतिहास, ३७ बालबोध पहिलें, दुसरें, तिसरें, चौथें, व पांचवें पुस्तक, ४२ सोपें व्याकरण, ४३ आनंदराव, ४४ शिरस्तेदार, ४५ विद्यार्थ्यांचा व्याकरणमित्र, ४६ आब्राहाम लिंकनचें चरित्र, ४७ इसापनीति, ४८ कठीण शास्त्रांतील सोप्या गोष्टी ( अ. म. वा. से. ).

**ओगले, गुरुनाथ प्रभाकर**—( जन्म स.१८८६–मृत्यु स. १९४५ )

ओगले ग्लास वर्क्स या कांच, एनॅमल, कंदील,

स्टोव्ह, एव्हरसिल्व्हर भांडीं वगैरेंच्या सुप्रसिद्ध कारखान्याचे एक चालक.

कोल्हापूर येथील हायस्कूलमध्यें मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण झाल्यावर यांनीं मुंबईस 'व्हिक्टोरिया ज्युबिली टेक्निकल इन्स्टिट्यूट' मधील एल. एम्. इ. चा शिक्षणक्रम पहिल्या वर्गांत पहिले येऊन पुरा केला. त्यानंतर कांहीं काळ बार्शी येथील 'लक्ष्मी टेक्निकल इन्स्टिट्यूट'चे प्रमुख अध्यापक म्हणून काम केल्यावर यांनीं स्वतंत्र व्यवसाय करण्याकरितां 'अमेरिकन एंजिन कंपनी' स्थापन केली. दुर्दैवानें ज्या बँकेनें यांना भांडवल पुरवठा केला, ती बुडाल्याने सदर धंदा यांना सोडावा लागला, व हे किर्लोस्कर बंधूंच्या नवोदित कारखान्यांत एंजिनियर म्हणून काम करूं लागले.

याच वेळीं यांचे धाकटे बंधु श्री. श्रीपाद प्रभाकर ऊर्फ आत्मारामपंत ओगले यांनीं तळेगांवला कांचकारखान्यांत शिक्षण घेऊन किर्लोस्करवाडीला कांचकारखान्याचा श्रीगणेशा केला. पुढें श्री. आत्मारामपंतांनीं कऱ्हाडानजीक औंध संस्थानच्या हद्दींत स्वतंत्र वसाहत करून तेथें कांचकारखाना नेल्यावर किर्लोस्करवाडी सोडून हे त्यांना मदत करण्याकरितां आले. त्यानंतर हिंदुस्थान सरकारनें यांना कांचकामाचें उच्च शिक्षण घेण्याकरितां वार्षिक अडीचशें पौंडांची शिष्यवृत्ति देऊन विलायतेस पाठविलें. शेफील्ड येथील अभ्यासक्रम पुरा करून हे अमेरिकेला गेले व तेथील कारखान्याच्या कार्यपद्धतींचा अभ्यास करून हे हिंदुस्थानांत परत आले.

ओगलेवाडीच्या कारखान्यांत परदेशी कंदिलाचे ग्लोब उत्तम प्रकारचे तयार होऊं लागल्यावर यांनीं मूळ कंदीलच हिंदुस्थानांत तयार करण्याची कल्पना काढली. यांच्या बंधूंस ही कल्पना पटतांच यांनीं जर्मनीला जाऊन आवश्यक माहिती घेऊन तयारी केली आणि कंदील तयार करण्याचा विभाग कांचकारखान्याला जोडला. तथापि परदेशी चढाओढीमुळें स. १९३९ पर्यंत कारखान्याला भाग्याचे दिवस लाभले नाहींत. महायुद्ध सुरू होतांच हा कंदिलाचा धंदा युद्धकार्याला विशेष साहाय्यभूत आला व कारखान्याची भरभराट होऊन त्याची उभारणी स्थिर पायावर झाली.

या धंद्यापायीं यांना फारच झळ सोसावी लागली होती. अत्यंत कष्टप्रद स्थितींतहि यांचा आत्मविश्वास डळमळला नाहीं.

मुंबई प्रान्तांत राष्ट्रीय सभेचें मंत्रिमंडळ आलें, व त्यांनीं उद्योगधंद्यांना अनुकूल धोरण आंखलें. तेव्हां यांनीं सायकलींच्या कारखान्याची योजना परिश्रमपूर्वक आंखून त्यांना सादर केली. ती मान्यहि झाली होती. पण त्याच वेळीं बिर्ला बंधूंनीं 'हिंद सायकल्स' कारखाना काढल्यानें यांच्या योजनेला मूर्त स्वरूप आलें नाहीं.

त्यानंतर यांनीं विजेचे पंखे तयार करण्याची योजना तयार केली. तीहि राष्ट्रसभामंत्रिमंडळाला मान्य झाली होती. परंतु त्या मंत्रिमंडळानें राजीनामा दिल्यामुळें ती तशीच राहिली.

याच सुमारास सिलोन सरकारनें यांच्याकडून लंकेंत कांचकारखाना काढण्याची योजना मागविली. त्याप्रमाणें यांनीं योजनेचा आराखडा पुरविला. नुकताच त्या कारखान्याचा उद्घाटनसमारंभहि झाला. त्रावणकोर दरबारच्या सहकार्यानें यांनीं शीट ग्लासचा कारखाना अलवाये येथें काढला. त्याची सर्व व्यवस्था हेच पाहत होते. अगदीं अलीकडे सचिवोत्तम सर सी. पी. रामस्वामी अय्यर यांनीं यांना त्रिवेंद्रम् येथील मोठ्या सरकारी वर्कशॉपची पुनर्घटना करण्याकरितां सल्लागार नेमिलें होतें.

शिवाय इतक्या सर्व व्यवसायांत असतांना यांना लेखनाचाहि नाद होता. हे चांगल्यापैकीं लेखक होते. १ अमेरिकेचा प्रवास, २ एडिसनचें चरित्र हीं यांचीं पुस्तकें व कांहीं लघुकथा यांनीं लिहिलेल्या प्रसिद्ध आहेत.

ओगले बंधूंची औद्योगिक क्षेत्रांतील कामगिरी महाराष्ट्राचा व हिंदुस्थानचा औद्योगिक क्षेत्रांतील दर्जा वाढविणारी आहे यांत शंका नाहीं.

**ओगले, गोपाळ अनंत**— (जन्म स. १८७९– मृत्यु स. १९४५) नागपूरच्या 'महाराष्ट्र' या अर्धसाप्ताहिकाचे सुप्रसिद्ध संपादक.

कोंकणांत विजयदुर्ग येथें जन्म. शिक्षण रत्नागिरी व पुणें येथें झालें. प्रथम भोपटकरबंधूंच्या महाराष्ट्र विद्यालयांत शिक्षक होते. लो. टिळकांनीं सुरू केलेल्या दारूबंदीच्या पिकेटिंगमध्यें यांना दंडाची शिक्षा झाली होती (१९०८). स. १९०६-१० पर्यंत नागपूरचें 'देशसेवक' साप्ताहिक व मुंबईचें 'राष्ट्रमत' दैनिक वर्तमानपत्र यांशीं यांचा संबंध होता. पहिल्या पत्राचे हे मुख्य संपादक होते व दुसऱ्याचे हे सहसंपादक होते. त्या काळांत यांना प्रत्यक्ष तुरुंगवास घडला नसला तरी यांच्यावर सरकारी अवकृपा झाली होती. स. १९१४ मध्यें यांनीं

स्वतःच्या जबाबदारीवर नागपूर येथें 'महाराष्ट्र' हें मराठी साप्ताहिक सुरू केलें. तेंच यांनीं अत्यंत लोकप्रिय करून अर्धसाप्ताहिक केलें. सोलापूरच्या लष्करी कायद्याच्या संबंधीं लिहिलेल्या लेखामुळें स.१९३१ मध्यें यांना राजद्रोहाबद्दल कारावासहि पत्करावा लागला. यांच्या या पत्रानें वऱ्हाड मध्यप्रान्तांत राजकीय दृष्टीनें अत्यंत महत्त्वाची कामगिरी केली आहे. वृत्तपत्रांत पुण्याकडे केसरीचें जें स्थान आहे तेंच स्थान वऱ्हाड-नागपूरकडे महाराष्ट्राला आहे.

हे नमुनेदार संपादक असल्यामुळें यांना पुणें मराठी वृत्तपत्रकार परिषदेचें अध्यक्षस्थान देण्यांत आलें होतें.

राजकारणाप्रमाणेंच शैक्षणिक व औद्योगिक चळवळीकडे यांचें लक्ष असे. नागपूरच्या दादीबाई देशमुख कन्याशाळा, ओगले कांचकारखाना, पॉटरीवर्क्स व आगपेट्यांचा कारखाना यांशीं यांचा जिव्हाळ्याचा संबंध असे.

यांनीं 'महाराष्ट्र' पत्राचा ट्रस्ट केला आहे. यांचा ६१ वा वाढदिवस श्री. माधवराव पाध्ये यांच्या अध्यक्षतेखालीं थाटानें साजरा झाला होता.

**ओगले, श्रीपाद प्रभाकर**—(जन्म स. १८९०)

हिंदुस्थानांत प्रसिद्ध असणारे एक कारखानदार. यांचा जन्म सांगली संस्थानांतील शिरहट्टी येथें झाला. शिक्षण राजाराम हायस्कूल व कोल्हापूर येथें आलें. कांचेच्या धंद्यांतील शिक्षण तळेगांव-कांचकारखान्यांत घेतलें व स्वतंत्र कांचकारखान्यास सुरुवात केली (१९१४). गुरुनाथ प्रभाकर हे यांचे सख्खे थोरले बंधु होत.

**ओझा, महामहोपाध्याय गौरीशंकर हीराचंद**—(जन्म स. १८६३)

थोर संशोधक व इतिहासलेखक. सिरोही संस्थानांतील रोहेडा गांवीं 'एक सहस्र औंदीच ब्राह्मण' जातींत यांचा जन्म झाला. सहस्रऔंदीचांची एक शाखा सिरोही संस्थानांतील 'गोल' नांवाच्या गांवावरून 'गोरवाल' म्हणून प्रसिद्ध आहे. आबूपर्वताच्या आसपास यांची भरपूर वस्ती आहे. त्यांपैकीं बावीस प्रमुख आहेत म्हणून त्यांना 'बावीसस्थान' या नांवानें ओळखतात. हे त्यांपैकीं आहेत.

यांचे वडील विद्याव्यसनी व कर्मनिष्ठ ब्राह्मण होते. त्यांना नंदराम, भूरजी, ओंकारजी व गौरीशंकर असे चार पुत्र होते. यांनीं सहाव्या वर्षी गांवांतल्या शाळेंत प्रवेश केला. तेथें हिन्दी, हिशेब, पाढे वगैरेंचें यांनीं शिक्षण घेतलें. आठव्या वर्षी मुंज झाली. घरांतल्या रीतीप्रमाणें यांनीं शुक्लयजुर्वेद शिकण्यास आरंभ केला. आणि चाळीस दिवसांत चाळीस अध्याय तयार करून संहिता संपविली. याच वेळीं यांची बुद्धिमत्ता सर्वांच्या लक्षांत आली. पण घरची स्थिति बरी नसल्यानें यांचा एक सख्खा भाऊ नन्दराम मुंबईस मुनीमी करण्यास गेला होता त्याकडे शिक्षणाकरितां यांना रवाना करण्यांत आलें. त्या वेळीं राजपुतान्यांत रेल्वे नसल्यानें १६० मैल पायीं चालून अहमदाबादला जावें लागलें व रेल्वेचा आश्रय करावा लागला. मुंबईस आल्यावर कांहीं दिवस खासगी शाळेंत गुजराथी शिकून यांनीं गोकुळदास तेजपाळ सेमिनरी स्कूलमध्यें प्रवेश केला. नंतर तीन वर्षांनीं एल्फिन्स्टन हायस्कूलमध्यें प्रवेश केला. सकाळ संध्याकाळ विद्यालक्ष्मी पाठशाळेंत संस्कृत शिकण्याचें काम चालूच होतें (स. १८८६). मॅट्रिक झाल्यावर ईंटर परीक्षेच्या वेळीं आजारी पडल्यानें यांनीं कॉलेज सोडलें. पुढें सिरोहीस तीन महिने राहून पुनः मुंबईस आले. वकीलीचा अभ्यास सुरू केला पण तिकडे यांचें मन लागेना. रॉयल एशियाटिक सोसायटीच्या पुस्तकालयांत वाचीत बसण्याचा यांना नाद लागला. तेथें डॉ. भगवानलाल इन्द्रजीशीं यांचा परिचय झाला. यांना प्राचीन लिपि शिकण्याचा नाद लागला. त्यांत यांची चांगली प्रगति झालेली पाहून डॉ. भगवानलालनीं यांची गुजराथचा इतिहास लिहिण्यास मदत घेतली. प्राचीन नाण्यांचाहि यांचा अभ्यास त्याच्याच साहाय्यानें वाढला.

स्वतःच्या राजपुतान्याकडे यांचें मुंबईत असल्यापासूनच लक्ष होतें. त्यासंबंधीं सर्व साहित्य यांनीं चांगलें अभ्यासिलें होतें. यांच्या व्यासंगामुळें उदेपूरच्या इतिहास विभागांत प्रथम साहाय्यक, नंतर मंत्री म्हणून यांची नेमणूक करण्यांत आली.

नंतर उदेपूर-व्हिक्टोरिया हॉलमधील संग्रहालयाचे हे क्यूरेटर नेमिले गेले (स. १८९२). यांनीं आपले ग्रंथ पं. विनायकशास्त्री वेताळ ज्योतिषी उदेपूर यांच्या प्रेरणेमुळें हिन्दींत लिहिण्यास सुरुवात केली.

सर्वांना प्राचीन लिपींचें ज्ञान सुलभ व्हावें म्हणून यांनीं 'प्राचीन लिपि माला' नांवाचा अपूर्व ग्रंथ हिन्दींत प्रसिद्ध केला (स. १८९४). डॉ. बुइलरचा 'इंडिश पॅलियोग्राफी' हा जर्मन भाषेंतील ग्रंथ त्यानंतर दोन वर्षांनीं प्रसिद्ध झालेला आहे. प्राचीन लिपिमालेची दुसरी सुधारून वाढविलेली आवृत्ति यांनीं नंतर काढली (१९१८). तिच्या

बद्दल यांना 'मंगलाप्रसाद पारितोषिक' देण्यांत आलें (१९२४). महाराजकुमार बाबू रामदीनसिंग यांनीं टॉडच्या राजपुतान्याच्या इतिहासाचें भाषान्तर केलें होतें. त्यावर टिप्पणी देऊन संशोधित करण्याचें काम यांच्यावर सोंपविण्यांत आलें. तें काम तर यांनीं केलेंच, पण शिवाय टॉडचें चरित्रहि भक्तिभावानें प्रसिद्ध केलें (१९०२). यांनीं 'सोलंकीयोंका प्राचीन इतिहास' व 'भारत वर्ष के इतिहास की प्राचीन सामग्री' हीं छोटीं पुस्तकें लिहिलीं तेव्हां नागरी प्रचारिणी सभेनें यांना एक पदक देऊन यांचा गौरव केला. मेवाड व सिरोही राज्याचे इतिहास हेहि यांचे ग्रंथ अपूर्व आहेत. यांच्या 'राजपुतानेका इतिहास' या महत्त्वाच्या ग्रंथाचे चार भाग प्रसिद्ध झाले आहेत. हा ग्रंथ निःसंशय नमुनेदार आहे. त्यावरून यांची स्मरणशक्ति, संशोधनसामर्थ्य व उच्च भूमिका स्पष्ट होते. यांनीं 'मध्यकालीन भारतीय संस्कृति' या विषयावर हिंदुस्थानी अकॅडेमीद्वारा तीन व्याख्यानें दिलीं तीं पुस्तकरूपानें प्रकाशित झालीं आहेत. त्यांत स. ६००–१२०० पर्यंत भारतीय संस्कृतीच्या विविध विषयांचें विशदीकरण करण्यांत आलें आहे. हिंदुस्थान सरकारनें यांना रायबहादुर (१९११) व महामहोपाध्याय अशा दोन पदव्या देऊन यांच्या कार्याचा व विद्वत्तेचा गौरव केला आहे (१९२८).

लॉर्ड कर्झन उदेपूरला आले तेव्हां यांच्या कामावर ते अत्यंत खूष झाले. पुढें लॉर्ड मिंटोनें अजमेरच्या 'राजपुताना म्युझियम'चे यांना क्यूरेटर नेमलें. तेथें १९३८ पर्यंत म्हणजे ७५ वर्षे पूर्ण होईपर्यंत उत्साहानें काम करून सेवानिवृत्त झाले.

स. १९२० पासून नागरीप्रचारिणी पत्रिकेला पुराणतत्त्वशोधाचें रूप देऊन हे संपादक झाले. तेरा वर्षे हे संपादक होते. भरतपूरच्या हिंदी साहित्य संमेलनाचे हे अध्यक्ष होते (१९२७).

याशिवाय हे अनेक ठिकाणीं अध्यक्ष म्हणून निवडले आहेत, व छोटींमोठीं अनेक पुस्तकें यांनीं लिहून प्रसिद्ध केलीं आहेत.

राजपुतान्याचा इतिहास म्हणजे त्यावर राज्य करणारे मौर्य, मालव, ग्रीक, आर्जुनायन, वराक, हूण, गुर्जर, बैस, चावडा, गुहिल, प्रतिहार, चौहान, राठोड, कछवाह, यादव, परमार, सोलंकी, नाग, यौधेय, तंवर, दहिया, निकुंप, डोडिया, गौड, झाला इत्यादि राजवंशांचा इतिहास, शिलालेख, ताम्रपट, नाणीं इ. मौलिक साधनांच्या सूक्ष्म अध्ययनावर आधारलेला आहे. त्यासंबंधीं भाटांच्या गानांतील अनेक गोष्टींचा कल्पितपणा सिद्ध झाला आहे. हें सर्व काम यांनीं अतिशय उच्च भूमिकेवरून व शास्त्रशुद्ध पद्धतीनें केलें याच्याबद्दल जितका आदर दाखवावा तितका थोडाच आहे (भारतीय अनुशीलन).

**ओझा, सुखरामदास टी.**—(जन्म स. १८७२)

सिंध प्रान्तांतील सुप्रसिद्ध वैद्य. यांचे थोरले बंधु पं. दीपचंद हे उच्च इंग्रजी शिक्षण घेऊन वकील व पुढें जज्ज झाले, तरी यांना चुलत बंधु पं. पीतांबरदास यांच्यामुळें आयुर्वेदाकडे जावेंसें वाटलें. तेच यांचे या विद्येंतील गुरु होत.

कराची येथील १९ वें नि. भा. वैद्यक संमेलन यशस्वीपणें पार पाडण्याचें श्रेय यांनाच आहे. स. १९४४ सालीं यांनीं 'कॅन्सर-परिषद' भरविली आणि देशी वैद्यकाच्या दृष्टीनें या रोगाच्या निदानचिकित्सेवर चर्चा घडवून आणली.

यांना संस्कृत, हिंदी, सिंधी, गुजराथी, मराठी व इंग्रजी इतक्या भाषा चांगल्या अवगत आहेत. धंद्यांत यांची प्राप्ति मोठी असून आयुर्वेदाच्या उद्धारासाठीं यांनीं मोठाल्या देणग्या दिल्या आहेत.

यांनीं स्वतः आयुर्वेदीय क्षयरुग्णालय मोठी देणगी देऊन, देणग्या मिळवून आणि सरकारी मान्यता मिळवून चालविलें आहे.

यांना मुंबईच्या पोपट परशुराम कॉलेजनें 'प्राणाचार्य' ही बहुमानाची पदवी दिली व ती कराचीचे नगराध्यक्ष जमशेद मेहेता यांच्या हस्तें प्रचंड समारोहानें मानपत्रासह यांना अर्पण करण्यांत आली.

यांना ब्रि. सरकारकडून 'वैद्यरत्न' हा किताब १९३९त मिळाला आणि लोकमान्यतेबरोबर यांना राजमान्यताहि प्राप्त झाली (आयुर्वेदाचार्य पां. ह. देशपांडे).

**ओडूलमने, "विद्यावाचस्पति" आत्मारामशास्त्री**—(जन्म स. १८८१)

यांचा जन्म उत्तर कानडा जिल्हा, अंकोला तालुका येथें कर्नाटक देशस्थ ब्राह्मणांच्या कुळांत झाला. यांचे वडील नागेंद्रशास्त्री हे नांवाजलेले संस्कृत पंडित असून पुराणप्रवचन करीत असत. यांचें लहानपणीं कन्नड शाळेंत थोडेंसें प्राथमिक शिक्षण झाल्यानंतर यांनी इंग्रजी शाळेंत प्रवेश झाला. तेथें शिक्षण घेत असतां तीन-चार

वर्षानंतर हे आजारी पडले. तो आजार बराच बळावल्यामुळें यांची इंग्रजी शाळा सुटली. पुढें औषधोपचारांनीं प्रकृति सुधारल्यानंतर सांगली संस्थानांतील संस्कृत पाठशाळेंत राहून काव्य, अलंकार यांचा यांनीं अभ्यास केला. पुढें कांहीं काळ काशी क्षेत्रांत राहून तेथेहि तोच अभ्यास पुढें चालू ठेवला. पण काशीची हवाहि न पचल्यामुळें यांना तेथून म्हैसूर संस्थानांतल्या महाराजा संस्कृत कॉलेजांत राहून आपलें अध्ययन पुरें करावें लागलें. तेथें अभ्यास संपवून यांनीं व्याकरण व अलंकार या उभय शास्त्रांतील उच्च परीक्षा देऊन प्रशस्तिपत्रें मिळविलीं.

याप्रमाणें शिक्षण पुरें करून स. १९१२ सालीं यांनीं मद्रास प्रांतांतील मंगळूर शहरांत बी. एम्. हायस्कुलांत संस्कृत अध्यापकाची नोकरी धरली. तेथें सुमारें १३।१४ वर्षें नोकरी केल्यानंतर कुर्ग प्रांतांत मडिकेरी शहरांतील गव्हर्नमेंट सेंट्रल हायस्कूलमध्यें हे प्रधान संस्कृताध्यापक झाले. पुढें १९३९ सालांत हे नोकरींतून निवृत्त होऊन कारवारांत पेन्शन घेऊन राहिले आहेत. कर्नाटकांतील दक्षिण भागांत यांचा शिष्यवर्ग फार मोठा असून चाहते व मित्रहि पुष्कळ आहेत.

लहानपणापासूनच यांना लेखनाची फारच आवड असल्यामुळें मराठी पत्रांतून व मासिकांतून निरनिराळ्या विषयांवर हे लेख लिहीत असत. वेदान्त हा यांचा आवडता विषय असल्यामुळें त्याचा व्यासंग यांनीं प्रथमपासूनच केला होता. हुबळींतील श्रीशंकराचार्योत्सव संस्थेकडून यांना पांच वर्षांपर्यंत वेदान्तविषयक निबंधलेखनाबद्दल बक्षीस मिळालें आहे. मराठींत जसें हे सफाईदारपणें लिहितात तसेंच संस्कृतांतहि हे काव्य व गद्यरचना करितात. कलकत्ता नगरींत "निखिल भारत साहित्य संघा"कडून सन १९१९ सालीं "धर्मनीत्योरेकवाक्यता" या निबंधलेखनाबद्दल यांना "विद्यावाचस्पति" ही पदवी मिळाली आहे. संस्कृत व मराठी लेखनाप्रमाणेंच यांनीं आपल्या मातृभाषेंत–कन्नड भाषेंत–विविध विषयांवरील लेखांची व ग्रंथांची निपज केली आहे. यांनीं १९१६ पासून १९२५ सालापर्यंत मंगळूरच्या "स्वदेशाभिमानी" या कन्नड पत्राचें संपादकत्वाचें काम केलें होतें. याशिवाय, इतर कन्नड पत्रांतून व मासिकांतूनहि हे लिहीत असत. या सगळ्या लेखांचा पुस्तकरूपानें संग्रह केल्यास ४।५ हजार पृष्ठांचा ग्रंथ होईल. यांनीं कन्नड भाषेंत उच्च प्रतीचे ग्रंथहि लिहिले आहेत. मद्रास व म्हैसूर युनिव्हर्सिट्यांतून बी. ए., एम्. ए. परीक्षांना यांचे ग्रंथ पाठ्य-पुस्तक या नात्यानें लावण्यांत आले होते.

अखिल-भारतीय-सनातन-वर्णाश्रम-स्वराज्य-संघाच्या कर्नाटक शाखेची स. १९३४ सालांत दक्षिण कानड्यांतील कुंदापूर येथें जी परिषद भरली होती तिचे हे अध्यक्ष होते.

यांच्या मराठी, संस्कृत व कन्नड भाषांतील ग्रंथांची थोडक्यांत माहिती अशीः—

संस्कृत : १ पुष्पमाला ( काव्य ), २ स्वत्वसंजीविनी ( काव्य ), ३ गद्यपद्यसंग्रहः, ४ व्यावहारिकपरामर्षः, ५ ब्राह्मणाब्राह्मणवादमूलम्, ६ योगीशगीता (अमुद्रित), ७ सावित्रीचरितम् ( अमुद्रित ).

मराठी : १ आर्यमातेचा निरोप, २ मराठी लेखसंग्रह, ३ "तत्त्वज्ञान मंदिरा"तील निरनिराळे लेख.

कन्नड : १ हिंदुव्रतविवेक, २ संक्षेपगीता, ३ केतुभंग ( नाटक ), ४ नाटककला, ५ श्रीकृष्णचरितामृतम्, ६ ईश्वरज्ञान ( अमुद्रित. या ग्रंथास सुवर्णपदक मिळालें आहे ), ७ सनातन धर्म.

---

# औ

**औंधकर, विष्णु हरि**—( जन्म स. १८९४–मृत्यु स. १९४३ )

सुप्रसिद्ध नट, नाटककार व चित्रपटकथालेखक. यांचा जन्म नामदेव शिंपी जातींत कोल्हापूर येथें झाला. शिक्षण मराठी चार इयत्तेपेक्षां जास्त घेतां आलें नाहीं. स. १९०७ सालीं हे 'महाराष्ट्र नाटक मंडळी'त शिरले. मध्यें कांहीं दिवस ती कंपनी यांनीं सोडली होती, पण पुनः हे त्याच कंपनींत आले (१९१४). स. १९२५ पर्यंत हे त्याच कंपनींत होते. पुढें 'युनायटेड पिक्चर सिंडिकेट' मध्यें दिग्दर्शक होते ( १९२५-२७ ). पुढें

यांनीं ' समर्थ नाटक मंडळी ' सुरू केली. तिच्या तीन भागीदारांपैकीं हे एक होते.

यांच्या विठाई ( तोतयाचें बंड ), तुळशी ( विचित्र-लीला ), जिजाई ( शिवसंभव ), येसूबाई ( बेबंदशाही ) इत्यादि भूमिका विशेष प्रसिद्ध आहेत. हे स्त्रीभूमिका करण्यांत निष्णात होते, तसेंच पुरुषभूमिकाहि उत्कृष्ट करीत.

तसेंच हे उत्कृष्ट नाटककारहि होते. यांचीं 'बेबंदशाही' 'आग्र्याहून सुटका' व 'महारथी कर्ण' हीं नाटकें रंगभूमीवर अत्यंत यशस्वी झालेलीं आहेत.

त्याशिवाय यांनीं चित्रपटकथाहि पुष्कळ लिहिल्या आहेत. त्यांत अनन्यसाधारण यश यांना, कोल्हापूरच्या शालिनी सिनेटोनकरितां लिहिलेल्या व बाबुराव पेंटरनीं दिग्दर्शित केलेल्या ' सावकारी पाश 'नें मिळवून दिलें. रामराज्य, पनघट वगैरे कथांनीं तर यांना अखिल भारतीय प्रसिद्धि मिळवून दिली. हे कविताहि साध्या पण आकर्षक करीत.

**औंधचे राजे पंतप्रतिनिधि, भवानराव श्रीनिवासराव**— ( जन्म स. १८६८, अधिकारप्राप्ति १९०९ )

महाराष्ट्रांतील औंध संस्थानचे अधिपति. विद्या, कला, सेवा आणि त्याग या सर्वच दृष्टींनी यांनीं 'आदर्श राजा' असा सर्वांकडून बहुमान मिळविला आहे. शिवाय संस्थानचा कारभार पूर्णपणें लोकांच्या ताब्यांत देऊन स्वतःच्या कर्तबगारीवरील आणि प्रजाजनांवरील विश्वास यांनीं प्रगट केला आहे. सध्यांच्या काळांत हिंदुस्थानांतील संस्थानिकांत यांचें हें सर्वस्वी लोकतंत्र राज्य करण्याचें उदाहरण अद्वितीयच आहे. आपले राज्यांतील प्रत्येक खेडें अन्नवस्त्रादि आवश्यक गरजाबाबत स्वयंपूर्ण असावें अशी यांची लोकशाहीच्या बाबत कल्पना आहे. प्रत्येक गांवांतून होणारा वसूल त्या गांवांतच खर्च झाला पाहिजे, असें ध्येय प्रत्यक्ष अमलांत आणण्याचा प्रयोग हे करीत आहेत. त्याबाबत यांचे चिरंजीव बॅ. अप्पासाहेब पंत आणि नातू युवराज बापुसाहेब पंत यांचें उत्तम सहकार्य यांना लाभलें आहे.

यांचें प्राथमिक शिक्षण औंधास, हायस्कूलमधील शिक्षण साताऱ्यास, कॉलेज शिक्षण डेक्कन कॉलेज पुणें येथें होऊन हे बी. ए. झाले ( १८९४ ). नंतर यांनीं मुंबईस राहून एक वर्ष कायद्याचा अभ्यास केला. पुढें वडील श्रीनिवासराव पंतप्रतिनिधि ( स. १८४८–१९०१ ) यांचे ' चीफ सेक्रेटरी ' म्हणून हे काम पाहूं लागले ( १८९७–१९०१ ). वडील कैलासवासी झाले तेव्हां यांनीं संस्थान निष्कर्जी केलें होतें. मध्यें श्रीमंत परशुराम श्रीनिवास ऊर्फ दादासाहेब ( १९०१–५ ) व पुढें श्रीमंत गोपाळकृष्ण परशुराम ऊर्फ नानासाहेब (१९०५–१९०६ डिसें.) असे पितापुत्र प्रतिनिधिपदावर आले. पण कारभारी जेकब बापूजी यांच्या खुनाचा प्रयत्न केल्याचा त्यांच्यावर आरोप येऊन त्यांना धारवाड येथें राहण्याचा हुकूम झाला. आणि वारसदारांपैकीं विशेष योग्यतेचे म्हणून यांना संस्थानची गादी देण्यांत आली. अधिकारदान-समारंभ ता. ४-११-१९०९ रोजीं झाला. तेव्हांपासून आतांपर्यंत ३६ वर्षें यांची कारकीर्द अत्यंत यशस्वी झाली आहे. दीर्घकाळ यशस्वी राज्य करणारे, हिंदुधर्माचे अभिमानी, आचार व चारित्र्यसंपन्न आणि सर्व सुधारणा आपल्या राज्यांत आणून पोंचविणारे असें यांचें व यांच्या कारकीर्दीचें वर्णन करतां येईल.

हे पूर्ण निर्व्यसनी, कर्तव्यदक्ष, नियमित, कष्टाळू आणि ध्येयवादी आहेत. यांचे विचार उत्साहवर्धक आणि स्फूर्तिप्रद आहेत. यांच्यांत संदेशकथनाची शक्ति नैसर्गिक आहे.

पुणें येथें भांडारकरप्राच्यविद्यासंशोधनमंदिरांत चाललेल्या महाभारत-संशोधनाच्या कामास यांनीं प्रारंभी लक्ष रुपयांची देणगी दिली व तें काम चालतें केलें. तसेंच बनारस हिंदु–विश्वविद्यालयाला यांनीं दहा हजारांची देणगी दिली आहे. याशिवाय कोणीहि यांच्याकडून रिक्तहस्तानें परत जात नाहीं. तथापि त्यांतहि यांची एक प्रकारची दृष्टि असते. आपल्या राज्यांतील लोकांचा आपल्यावर पहिला हक्क आहे ही गोष्ट हे केव्हांहि डोळ्यांआड होऊं देत नाहींत. अशा वेळीं वशिल्यानें पैसे उकळण्यास आलेल्या लोकांना यांच्या स्पष्ट व सडेतोडपणाचा प्रसाद मिळतो.

सामाजिक बाबतींतहि यांचे विचार उदार आहेत. हे भोजनाच्या बाबतींत पंक्तिभेद मानीत नाहींत. यांचे घरांत पोटजातीय व पुनर्विवाहित संततीशीं विवाह झाले आहेत. यांनीं अस्पृश्यता शाळेंत, मंदिरांत, सभेंत, कारखान्यांत, खुद्द राजवाड्यांत आणि राज्यांत नष्ट केली आहे. राणीसाहेब अस्पृष्ट सुवासिनींना हळदीकुंकू देतात, तर राजेसाहेब अस्पृष्टांचे पंक्तीस जेवतात.

हे स्वतः वृद्ध व कर्मठ असले तरी नवे विचार आकलन

करण्याची शक्ति यांच्यांत आहे. जुने पुष्कळ आचार, नित्यकर्म, श्राद्धपक्ष, उपासना हे कटाक्षानें पाळीत असले तरी नव्या गोष्टी आत्मसात् करून पचविण्याची शक्ति यांच्यांत आहे.

यांना स्वतः चित्रें काढणें, दुसऱ्यांच्या चित्रांतील रसग्रहण करणें आणि चित्रांचा संग्रह करणें यांचा छंद आहे. याशिवाय फोटोग्राफी, कोरीव, कातीव, खोदीव वगैरे प्रकारच्या कलेचेहि हे भोक्ते आहेत. त्यामुळें चित्रकलेचा व विविध पदार्थांचा यांचा म्युझियम विविध, संपन्न आणि अपूर्व आहे यांत शंका नाहीं.

यांच्या चित्रकलेसंबंधीं रा. ब. म. वि. धुरंधर म्हणतात: "यांचीं चित्रें पौराणिक आणि ऐतिहासिक आहेत. तीं लोकप्रिय आणि सर्वोत्कृष्ट आहेत. यांच्या कलेमध्यें कोणत्याहि पद्धतीचें अनुकरण नाहीं. यांची पद्धत ही स्वतःचीच पद्धत आहे. म्हणून तिला 'औंध स्कूल' म्हणणें बरोबर होईल. यांचे चित्रांतील पेहेराव व पार्श्वभाग पूर्वपद्धतीचे महाराष्ट्रीय असतात. त्याकरितां हे व्यासंगहि चांगला करतात."

यांच्या चित्रविषयक ग्रंथांत १ चित्ररामायण, २ (मराठींतील सचित्र) अजिंठा, ३ श्रीशिवाजी आल्बम् (यांत हळदणकर, सरदेसाई, केतकर, चाफळकर, रा. ब. धुरंधर व श्रीमंत पंतसाहेब यांचीं चित्रें आहेत), ४ महाभारत (प्रसिद्ध होत आहे). ५ भवानीसहस्रनाम, हे प्रमुख होत.

यांचीं खालील चित्रें विशेष वाखाणण्यासारखीं आहेत:

१ महाभारत—कृष्णचरित्र, २ भीष्मप्रतिज्ञा, ३ मुरलीवादन, स्वतः काढलेल्या यांच्या चित्रांची संख्या ५०० पर्यंत असावी.

यांनीं आपल्या चित्रसंग्रहांत जुन्या-नव्या शेंकडों चित्रकारांचीं चित्रें लक्षावधि रुपये खर्चून जमविलीं आहेत. असा म्युझियम क्वचितच असेल. त्यांत प्राचीन काळापासूनच्या प्रसिद्ध चित्रकारांचीं चित्रें संग्रहित केलीं आहेत, त्याकरितां स्वतंत्र अदाह्य इमारत बांधून हा कलानिधि सुरक्षित ठेवण्याचा प्रयत्न केला आहे.

चित्राप्रमाणेंच चित्रकलेवरील ग्रंथसंग्रहहि यांनीं एकत्र करण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे. जगांतील अनेक भाषांतून चित्रकलेवर जेवढें म्हणून वाङ्मय प्रसिद्ध झालें आहे, तें आपल्या संग्रहीं आणण्याचा यांचा प्रयत्न वाखाणण्यासारखा आहे. महाराष्ट्र युनिव्हर्सिटी स्थापन झाल्यास त्या युनिव्हर्सिटीची चित्रकला–शाखा औंधास निघावी अशी यांची इच्छा आहे. त्याकरितां हे आपला चित्रसंग्रह व पुस्तकसंग्रह देण्यास तयार आहेत. ते उत्तम चित्रकला-टीकाकार आहेत व हा यांचा गुण अजिंठा व वेरूळ या दोन चित्रकलेवरील पुस्तकांत दिसून येतो. यांनीं आहारशास्त्र, व्यायामशास्त्र, नेत्रबलसंवर्धन वगैरेंचा शास्त्रीय अभ्यास केला असून त्यांवर ग्रंथ लिहिलेले आहेत व ते प्रमाणभूत मानले जातात.

कीर्तन हा विषय यांचा अत्यंत जिव्हाळ्याचा आहे. प्रतिवर्षी शिवजयन्ती (फाल्गुन व. ३) व वडील कै. श्रीनिवासराव पंतप्रतिनिधि यांची पुण्यतिथि भाद्रपद शु. १४ अशीं दोन कीर्तनें स्वतः करण्याची यांची पद्धत आहे. दोन्ही वेळीं अगदीं नवें आख्यान व पूर्वरंग हे करतात. व त्यांचीं पुस्तकेंहि छापून प्रसिद्ध केलेलीं आहेत. यांचा हा क्रम गादीवर आल्यापासून चालू असलेला दिसतो. त्याकरितां नित्य ठराविक वेळीं हे आख्यान बसविण्याची तालीम करीत असतात. यांचीं कीर्तनें अत्यंत परिणामकारक व ठसकेदार होतात. यांचें वक्तृत्व परिणामकारक आहे.

कीर्तनांत प्रत्येक वाक्याचा किंबहुना प्रत्येक शब्दाचा परिणाम श्रोत्यांवर व्हावा अशाविषयीं हे दक्ष असतात. एका कीर्तनाची सहा महिने तयारी करीत असतां परिणामकारक होण्याच्या दृष्टीनें शब्दांचे व वाक्यांचे पालट सारखे चालू असतात. ह्या परिणामकारकतेंत प्रसंगोचित अभिनयाची भर पडल्यानें कीर्तनाला अनुपमेय रंग चढतो. मोठा व गंभीर आवाज, तालबद्ध गाणें, अनुरूप अभिनय व रसपरिपोषक शब्दांची निवड यांमुळें यांचें कीर्तन अत्यंत आकर्षक होतें. शिवाय प्रत्येक गोष्ट अत्यंत रेखीव व मर्यादित असते. त्यामुळें ठराविक वेळांत सर्व कार्यक्रम व्यवस्थित पार पडतो. आजपर्यंत यांच्या कीर्तनसुमनहारांत पौराणिक १४ व ऐतिहासिक १४ अशीं २८ आख्यानें प्रसिद्ध झालीं आहेत.

आमच्या जुन्या राजेलोकांत व्यायामाचा शोक असे. त्याकरितां पदरीं पहिलवान बाळगण्याची पद्धत होती. त्यांतून स्फूर्ति घेऊन सर्वसामान्य स्त्रीपुरुषांच्या आटोक्यांत असणाऱ्या प्राचीन सूर्यनमस्काराच्या व्यायामाचा प्रचार यांनीं सुरू केला. सर्व शरीराला सारखा व्यायाम देणारा, कोठेंहि करतां येणारा आणि साधनरहित म्हणजे बिनखर्चाचा असा नमस्कारासारखा दुसरा व्यायाम नाहीं, ही गोष्ट यांच्या प्रथम ध्यानांत आली. आणि यांनीं आपल्या राज्यांतील शाळांत आवश्यक

म्हणून नमस्कार-व्यायामाचा समावेश केला. बाह्य शरीराच्या हालचालीबरोबर अन्तर्भागांत नाभीपासून कंठापर्यंत हालचाल व्हावी म्हणून ' हां हीं ' वगैरे मंत्राचा उपयोग यांनीं सुरू केला. त्याकरितां तक्ते काढले, मराठी-इंग्रजी पुस्तकें काढलीं, फिल्म तयार केल्या. यांनीं या देशांत तर प्रचार केलाच, पण इंग्लंडमध्यें शाळाखात्याच्या साहाय्यानें सर्वत्र व्याख्यानांचे दौरे काढले, मुलाखती दिल्या, मतें प्रदर्शित करविलीं व नमस्कारांचीं पुस्तकें लाखांनीं खपविलीं. याचा परिणाम म्हणजे या विषयावरील पुस्तकांच्या प्रती सर्व हिंदुस्थानांतील भाषांतून तर निघाल्याच, पण 'इंग्लंड, कॅनडा, आस्ट्रेलिया' येथील लोकांनींहि पुस्तकें लिहून यांच्या व्यायामाचा प्रसार केला. असे हे जबरे, चिकाटीचे व परिणामकारक व्यायामाचे प्रचारक आहेत. पुरुषांप्रमाणें स्त्रियांनाहि यांनीं साष्टांग नमस्कार घालण्यास लावलें आहे. सूर्यनमस्कार किंवा तृचाकल्प नमस्कारपद्धतीला यांनीं सार्वत्रिक स्वरूप दिलें आहे.

औद्योगिक प्रगति झाल्याशिवाय आपले शेतकरी सुखी होणार नाहींत अशी यांची खात्री आहे. आपल्या राज्यांतील कच्चा माल आपला आपण उपयोगांत आणून त्याचा पक्का माल आपणच तयार केला पाहिजे, आपल्या गरजा परावलंबी असतां उपयोगी नाहींत, मजुरी करण्याकरितां आपल्या लोकांना बाहेर जाण्याचा प्रसंग येतां उपयोगी नाहीं, म्हणून अनेक उद्योगधंदे यांनीं सुरू केले आहेत. किर्लोस्कर बंधु, ओगले बंधु, औंध सोप वर्क्स, म्हैसूरचा साखर कारखाना व हस्त कागद कारखाना हे कारखाने यांच्या साहाय्यानें व आश्रयानें उभारले गेले व आज भरभराटीस आले आहेत. स्वदेशीचे हे कटे पुरस्कर्ते आहेत. राजेसाहेब व राणीसाहेब यांचा आपल्याच राज्यांत तयार झालेला जाडाभरडा, हातसुताचा, हातमागावर विणलेला कपडा वापरण्यावर अत्यंत कटाक्ष आहे. आपली प्रजा सुखी तर आपण सुखी, असा यांचा विश्वास असल्यामुळें आपल्या शेतकऱ्यांना शेतकीबरोबर जोडधंदे पुरविण्याचा यांचा सतत प्रयत्न चालू असतो. भरपूर अन्नवस्त्र, आवश्यक सुखसोयी, स्वावलंबी उद्योगधंदे, आणि साक्षरताप्रसार यांच्या जोरावर यांनीं आपल्याकडे सर्वांचें लक्ष खेंचून घेतलें आहे. आज औंध संस्थानांत प्रत्येक गांवीं शाळा असून संस्थानांत साक्षरतेचें प्रमाण शेंकडा २० आहे इतकें हिंदुस्थानांत दुसरीकडे कोठेंहि नाहीं.

हे शुक्लयजुर्वेदाच्या माध्यंदिन शाखेचे ब्राह्मण आहेत. यांचें गोत्र सावर्णि हें आहे. यांच्या विशेष योग्यतेमुळें आणि सर्व गोष्टींत लक्ष घालण्याच्या स्वभावामुळें मराठी साहित्यसंमेलन–इंदोर, कीर्तनसंमेलन–वाई, सर्वपक्षीय-पंचांगपरिषद्-पुणें, व्यापारी परिषद–बारामती, चित्रकारपरिषद, व्यायाम-परिषद–बडोदें वगैरेंचें अध्यक्षपद यांना प्राप्त झालें आहे.

१ परशुराम त्रिंबक, २ श्रीपतराव परशुराम, ३ जगजीवनराव परशुराम, ४ (श्रीनिवास) भवानराव, ५ परशुरामराव भवानराव, ६ श्रीनिवासराव परशुराम, ७ परशुरामराव श्रीनिवास, ८ गोपाळकृष्णराव परशुराम, ९ भवानराव श्रीनिवासराव.

वरील औंधच्या पंतप्रतिनिधींपैकीं पहिल्या पांचांचीं चरित्रें आमच्या 'मध्ययुगीन चरित्रकोशांत' आलीं आहेत. ६-९ यांपैकीं सध्यां गादीवर असलेले श्रीमंत भवानराव यांचें चरित्र महत्त्वाचें असल्यानें आम्ही येथें दिलें आहे.

# क

**कझिन्स, डॉ. (जेम्स हेन्री) जयराम**— (जन्म स. १८७३)

आपल्या साहित्य व कलाविषयक कार्यानें चारहि खंडांत विख्यात झालेले थोर महापंडित. यांचा जन्म बेलफास्ट (आयर्लंड) या गांवीं झाला. यांचा विवाह स. १९०३ सालीं मार्गारेट एलिझाबेथ जिलेस्पी यांच्याशीं झाला. हे वीस वर्षांचे असतां यांनीं आपला पहिला काव्यग्रंथ प्रसिद्ध केला. ए. इ. व मि. यीट्स या सुप्रसिद्ध आयरिश कवींच्या सहकार्यानें यांनीं आयर्लंडांतील साहित्याचे पुनरुज्जीवनाकरितां १८९७ सालीं संस्था काढली. हे थिऑसॉफिकल सोसायटीचे सभासद १९०४ सालीं झाले व आयर्लंडांतील सोसायटीचा कार्यप्रचार अध्यक्षांचे

प्रतिनिधि म्हणून तेथें १९१५ पर्यंत करीत होते. स. १९१५ सालीं बेझंटबाईंनीं काढलेल्या 'न्यू इंडिया' या दैनिकाच्या संपादक-मंडळांत हे येऊन दाखल झाले, व तेव्हांपासून बाईच्या देहावसानापर्यंत त्यांचे कार्यात हे मदत करीत असत.

बाईंनीं काढलेल्या 'नॅशनल युनिव्हर्सिटी' व 'ब्रह्मविद्याश्रम' या दोन संस्थांत यांनीं प्राध्यापक म्हणून काम केलें. मद्रास विद्यापीठाच्या कलाविभागांतील मंडळावर व सीनेटमध्यें हे सभासद आहेत. मदनपल्ली येथील थिऑसॉफिकल कॉलेजचे हे कित्येक वर्षे प्रिन्सिपल होते. यांनीं १९३३ सालीं इंग्लिश काव्यसंग्रहाचे वीस विभाग व इंग्लिश गद्याचे वीस विभाग प्रसिद्ध केले (१९३४). यांनीं चारहि खंडांतील निरनिराळ्या विश्वविद्यालयांतून काव्य व कला या विषयांतील प्राध्यापक म्हणून कार्य केलें आहे. मॅजिक लेटर्नच्या साहाय्यानें प्रमुख चित्रकारांचीं मूळ चित्रें दोनदा जागतिक प्रवास करून देशोदेशांतील विद्वान् व रसिक लोकांना यांनीं दाखविलीं आहेत; व त्याबरोबरच शिक्षण, तत्त्वज्ञान, काव्य, हिंदी संस्कृति व थिऑसॉफी या विषयांवर व्याख्यानें दिलीं. या सर्व कार्यात यांच्या विद्वान् व कलाभिज्ञ पत्नी यांचें यांना पूर्ण साहाय्य असे.

जपानमध्यें कियोजीजुकु येथील विद्यापीठ व शिक्षणमंत्रीमंडळ या संस्थांकडून यांना स. १९१९-२० मध्यें इंग्लिश काव्याचे प्राध्यापक म्हणून केलेल्या कार्याबद्दल 'डॉक्टर' ही पदवी मिळाली. त्रिवेन्द्रम् येथील सरकारी चित्रसंग्रहालयाला संघटित स्वरूप देऊन त्रावणकोर संस्थानाच्या सांस्कृतिक जीवनाबाबत केलेल्या कार्याचें पारितोषिक म्हणून महाराजांनीं यांना महापंडित म्हणून दरबारी पोषाख व 'वीरशृंखला' संज्ञक सुवर्णकंकण देऊन बहुमान केला. दक्षिण हिंदुस्थानांतील शिक्षकसंघानें यांना कुलपति ही पदवी अर्पण केली आहे. हिंदु धर्मावरील यांचें असलेलें विशेष प्रेम व्यक्त करण्याकरितां यांनीं विधिपूर्वक हिंदुधर्माचा स्वीकार केला आहे व आपलें नांव तेव्हांपासून जेम्सच्या ऐवजीं जयराम असें ग्रहण केलें आहे. याप्रमाणे आपल्या साहित्य व कलाविषयक कार्यांनीं चारहि खंडांत विख्यात झालेले असे हे एक आधुनिक जगांतील महापंडित आहेत.

### यांचे ग्रंथ

१ Fundamental Unity of Asia = आशियाचें (सांस्कृतिक) मूलभूत ऐक्य.
२ Forest Meditation = अरण्यांतील चिंतन.
३ Bases of Theosophy = थिऑसफीचीं मूलतत्त्वें.
४ Work & Work-shop = कर्म व कर्मक्षेत्र.
५ Study in Synthesis = समन्वयात्मक अध्ययन.
६ Work of Promethean = प्रोमीथियनचें काम.
७ Samadarshana = समदर्शन.
८ Kingdom of Youth = तरुणांची सृष्टि (वा. ल. चिपळुणकर).

## कझिन्स, मिसेस मार्गारेट एलिझाबेथ—

(जन्म स. १८७८.—विवाह डॉ. कझिन्सबरोबर स. १९०३) अखिल भारतीय महिला परिषदेच्या संस्थापक.

या स. १९०४ सालीं थिऑसॉफिकल सोसायटीच्या सभासद झाल्या. इंग्लंडांतील व आयर्लंडांतील स्त्रियांच्या मतदानाच्या चळवळींत केलेल्या कार्यप्रसंगानें यांना वरील दोन्ही देशांत तुरुंगवास घडला. स. १९०४ ते १५ पर्यंत डब्लिन व लिव्हरपूल येथील सोसायटीच्या शाखांत यांनीं कार्य केलें. हिंदुस्थानांत आपल्या पतीबरोबर या स. १९१५ सालीं आल्या व मदनपल्ली व मंगलोर या दोन ठिकाणीं थिऑसाफिकल सो.च्या विद्यमानें चाललेल्या शाळांतून अध्यापनकार्य केलें. १९१७ सालीं राष्ट्रीय शिक्षणावर यांनीं व्याख्यानें दिलीं व राष्ट्रीय सभेंत दाखल झाल्या. स. १९२३ मध्यें मद्रास सरकारनें यांना निर्वेतन बेंच मॅजिस्ट्रेट म्हणून नेमिलें. या बाईंनीं चारहि खंडांत आपल्या यजमानांच्या बरोबर प्रवास करून त्यांचे साहाय्यानें अनेक चळवळी केल्या व संस्था स्थापन केल्या. स. १९०४ सालीं आयर्लंडमध्यें शाकाहाराकरितां एक संघ काढिला. १९२३ सालीं मद्रास येथें स्त्रियांकरितां सेवासदन काढिलें. १९२७ सालीं हिंदुस्थानभर प्रवास करून व सुप्रसिद्ध स्त्रीपुढाऱ्यांच्या मुलाखती घेऊन, त्यांच्या सहकार्यानें अखिल भारतीय महिला परिषदेची स्थापना केली व पहिल्या संमेलनाच्या अध्यक्ष डॉ. बेझंट या होत्या. हल्लीं सदर परिषदेच्या या उपाध्यक्ष आहेत.

१९२८ सालीं जिनिव्हा येथें यांनीं आन्तरराष्ट्रीय थिऑसाफिचें केन्द्र स्थापन केलें. १९३२–३३मध्यें सरकारी वटहुकुमाच्या अयोग्य अमलबारीचा निषेध म्हणून तो हुकूम मोडला व या तुरुंगांत गेल्या. यांना संगीतशास्त्रविशारद अशी आयर्लंडांतील रॉयल विश्वविद्यालयाकडून पदवी मिळाली आहे. विश्वविद्यालयांतील पाश्चिमात्य संगीतशास्त्राच्या अभ्यासमंडळाच्या या अध्यक्ष आहेत.

**यांचे ग्रंथ**

१ Awakening of Asian Womanhood, आशिया खंडांतील स्त्रियांची जागृति.

२. Music of Orient & Occident, पौर्वात्य व पाश्चिमात्य संगीत.

३ Indian Womanhood, ( हिंदी स्त्रिया ) (वा. ल. चिपळूणकर).

**कॅनिंग, लॉर्ड**—( कारकीर्द स. १८५६-१८६२ ) लॉर्ड डलहौसीनंतरचे हिंदुस्थानचे व्हाइसरॉय. यांच्या वेळीं १८५७ सालच्या बंडाची मोठीच धामधूम झाली. त्या प्रसंगांतून निभावून जाण्याइतपत हे करारी मुत्सद्दी होते. यांना हें शिक्षण यांच्या वडिलांकडूनच मिळालें होतें. यांचे वडील इंग्लंडांत परराष्ट्र मंत्री व मुख्य प्रधान अशा महत्त्वाच्या जागेवर काम करून मुत्सद्दी म्हणून विख्यात होते.

इंग्रजी राज्याची स्पष्ट कल्पना हिंदी लोकांस यांच्या कारकीर्दीत आली. सर्व यांत्रिक व राजकीय सुधारणा इंग्रजी राज्य स्थिर करण्याकरितां आणि येथील राजे-रजवाडे, जमीनदार यांना नामशेष करण्याकरितां चालल्या आहेत; शिवाय ख्रिस्ती धर्माच्या प्रसारालाहि तें उघड मदत करीत आहे; अशा समजुतीनें लोकांत असंतोष पसरला. शिवाय आपलें राज्य गेलें ही तीव्र जाणीवहि लोकांच्या मनांत होतीच. त्यामुळें बंडाचा वणवा पेटण्यास वेळ लागला नाहीं. पण एकजुटीच्या व शिस्तीच्या अभावीं बंडाचा मोड करण्यांत आला.

पण याचा परिणाम होऊन पार्लमेंटनें कायदा करून कंपनी रद्द केली व हिंदुस्थानचा कारभार इंग्लंडची राणी व्हिक्टोरिया हिच्या नांवें सुरू करण्यांत आला. हिंदुस्थानचा कारभार पाहण्याकरितां भारतमंत्र्याची नेमणूक होऊन त्याच्या मदतीस पंधरा सभासदांचें एक मंडळ देण्यांत आलें. येथील गव्हर्नर-जनरलास व्हाइसरॉय हा नवा हुद्दा देण्यांत आला. नियामक मंडळ रद्द करण्यांत आलें. हिंदुस्थानांतील सर्व सैन्य विलायत सरकारच्या नियंत्रणाखालीं ठेवण्याचें ठरलें. याच व्हिक्टोरिया राणीनें एक महत्त्वाचा जाहीरनामा काढला तो 'राणीचा जाहीरनामा' म्हणून प्रसिद्ध आहे ( १८५८ ). तो दिल्लीस मोठा दरबार भरवून मोठ्या इतमामानें यांनीं वाचून दाखविला. हा जाहीरनामा हिंदुस्थानच्या राज्य-घटनेचा मूळ पाया म्हणून उल्लेखण्यांत येतो.

बंडामुळें यांनीं आपला समतोलपणा ढळूं दिला नाहीं. आपल्या धिम्या व दयाशील स्वभावाला अनुसरून यांनीं पुढील सुधारणा अंमलांत आणल्या :

( १ ) कंपनीचें सैन्य व राणीचें सैन्य यांचें एकीकरण केलें. तसेंच हिंदी सैन्यांत पुष्कळ सुधारणा केल्या. ( २ ) जमाखर्चाची घडी तज्ज्ञांच्या सल्ल्यानें सुधारली. ( ३ ) वुडच्या खलित्यास अनुसरून यांनीं स. १८५७ मध्यें मुंबई, मद्रास व कलकत्ता येथें विश्वविद्यालयें स्थापून शिक्षणांत व ज्ञानांत एकसूत्रीपणा आणला. ( ४ ) कायदे एकत्रित करून 'पिनल कोड' व 'क्रिमिनल प्रोसीजर कोड' हीं कायद्याचीं पुस्तकें तयार केलीं व त्यांचा उपयोग सुरू केला. ( ५ ) शेती करणाऱ्या कुळांच्या हितरक्षणार्थ यानें स. १८५९ मध्यें कायदा तयार करून तो बंगाल, बिहार, मध्यप्रान्त, आग्रा व अयोध्या या प्रान्तांना लागू केला. ( ६ ) स. १८६१ मध्यें कौन्सिलसंबंधीं कायदा पास करण्यांत आला. त्या कायद्यान्वयें मुंबई, मद्रास व बंगाल या प्रांतांस कायदे-मंडळें देण्यांत आलीं. ( ७ ) पूर्वींचीं वरिष्ठ कोर्टें रद्द करण्यांत येऊन हायकोर्टें सुरू करण्यांत आलीं.

इतकीं कामें करून राज्याला एकसूत्री व व्यवस्थित रूप दिलें आणि यांनीं राजीनामा दिला. हिंदुस्थानचा पहिला व्हाइसरॉय होण्याचा मान यांना मिळाला. इंग्लंडमध्यें गेल्यावर तीनच महिन्यांनीं हे मृत्यु पावले.

**कनिंगहॅम, जनरल सर अलेक्झांडर**—( जन्म स. १८१४-मृत्यु स. १८९३ ) हिंदी पुराण-वस्तुसंशोधनाचे जनक व विख्यात संशोधक. हे प्रथम रॉयल एन्जिनियर्समध्यें भरती होऊन हिंदुस्थानांत १८३३ मध्यें आले, तें क्रमशः वाढत जाऊन मेजर जनरलच्या हुद्यावर १८६१ सालीं चढले. प्रथमपासूनच यांना या देशांतील प्राचीन संस्कृतीच्या सर्वांगीण अभ्यासाची गोडी लागली व यांनीं आपल्या देशभर संचाराचा उपयोग शिलालेखांच्या प्रती तयार करणें, नाणीं गोळा करणें, जुन्या ऐतिहासिक स्थळांविषयीं सांगोपांग माहिती मिळविणें, प्राचीन शिल्पकलेचे व इतर अवशेष उजेडांत आणणें व यासंबंधीं लेख लिहिणें यांत केला. हे या देशांत आले तेव्हां प्राचीन ब्राह्मी व खरोष्ठी लिपी प्रथमच उकलण्यांत आली होती आणि ज्या प्राचीन लेखांच्या अभ्यासावर हिंदुस्थानच्या इतिहासाची उभारणी करण्यांत आली त्यांच्या संग्रहाचे व अभ्यासाचे बाबतींत यांचा मोठाच वांटा होता. पुढें १८६१ मध्यें लॉर्ड कॅनिंग यांनीं आपल्या पुनर्घटनेच्या योजनेंत

पुरातत्त्वविभाग उघडून सर्व देशभर पसरलेल्या हिंदी संस्कृतीच्या अवशेषांची पाहणी करण्याचे ठरविलें, तेव्हां त्यांस यांच्यापेक्षां अधिक लायक विद्वान् त्या कामाकरितां मिळणें शक्य नव्हतें. सतत २३ वर्षे त्या कामांत घालवून यांनीं त्याबद्दल २३ रिपोर्ट प्रसिद्ध केले ते प्रत्येक संशोधकास प्रमाणभूत वाटण्यासारखे आहेत. किंबहुना, अशीं स्थळें अजून आहेत कीं, यांच्यानंतर कोणीहि संशोधक अजून तेथें पोंचला नाहीं. सत्तरी उलटून गेल्यावर हे स्वदेशीं परत गेल्यावर यांनीं आपल्या ज्ञानाची व अनुभवाची साक्ष पटविणारे हिंदुस्थानचा प्राचीन भूगोल, नाणकशास्त्र, स्थापत्य, कला इत्यादि विषयांवर प्रमाणभूत ग्रंथ लिहिले. रेल्वे नसलेल्या काळीं यांनीं उत्तर हिंदुस्थानांत एक-एका भागांत प्रवास करून तेथील सर्व प्रकारच्या माहितीचा सहानुभूतीनें पण चिकित्सक बुद्धीनें संग्रह करून अनेक ऐतिहासिक नवीं दालनें उघडलीं. सांची, भरहूत व बुद्धगया या प्रख्यात बौद्ध संस्कृतीच्या केन्द्रांचें संशोधन, तसेंच अशोकाच्या सर्व लेखांचें संकलन, प्रथम यांनींच करून ज्ञानांत फार मोठी भर टाकली. चिनी प्रवाशांच्या इतिवृत्ता-प्रमाणें कोणतीं स्थळें कोठें आहेत याबद्दल यांनीं केलेल्या सूक्ष्म संशोधनावर प्राचीन भारतीय भूगोल अद्याप पुष्कळसा आधारलेला आहे, त्यावरून यांचें स्थलज्ञान किती अचूक होतें हें दिसून येते. ऐतिहासिक संशोधनांत कालमान व कालगणना या विषयांची अतिशय आवश्य-कता असते, त्यासंबंधीं यांनीं प्रथमच 'A Book of Indin Eras' (हिंदी कालगणना) हे पुस्तक लिहिलें. पंजाब व वायव्य सरहद्द या बाजूचीं ग्रीक, शक, पल्हव, कुषाण यांचीं नाणीं व गांधार शिल्पकला यांबद्दल यांनीं केलेल्या संशोधनास आधारभूत मानणें भाग आहे. यांना संस्कृत विद्या व एतद्देशीय पांडित्य व संस्कृति यांबद्दल अत्यंत आदर असून हिंदी विद्वान् चिकित्सक होऊन आपल्या देशाच्या संस्कृतीचा इतिहास उजेडांत आणतील याबद्दल यांना खात्री वाटत असे. असा थोर वृत्तीचा अष्टपैलू विद्वान् भारतवर्षांतील पुराण-वस्तु-संशोधनाचा पाया दृढमूल करण्यास मिळावा ही गोष्ट कोणत्याहि इतिहासाभ्यासकाला भाग्याची वाटणें साहजिक आहे.

ऑफिसच्या कामाकरितां काढलेल्या सफरीचे वृत्तान्त यांनीं प्रसिद्ध केले आहेत. त्याचबरोबर बंगाल रॉयल एशिॲटिक सोसायटीच्या पत्रांत यांनीं लिहिलेल्या लेखांची संख्याहि उपेक्षणीय नाहीं. परंतु हें सर्व झालें स्फुट लिखाण. या सर्वांपेक्षां (1) The Bhilsa Topes, (2) The Buddist Period, (3) Corpus Inscriptionum Indicarum, (4) The Stupa of Bharhat, (5) The Book of Indian Eras, (6) Mahabodhi, (7) Inter alia on Ladak, (8) The Ancient Geography of India, ह्या यांच्या त्या त्या विषयांत क्रांतिकारक ठरलेल्या ग्रंथांस विशेष महत्त्व असणें साहजिक आहे. यांच्या अचाट परिश्रमांची कल्पना यांचा हा ग्रंथविस्तारच देऊं शकेल.

आपल्या लष्करांतील कार्यनिवृत्तीनंतर यांनीं आपली दृष्टि आपल्या आवडत्या व्यवसायावर—नाण्यांच्या अध्य-यनावर केंद्रित केली. अजूनहि नाण्यांचे बाबतींत यांनीं केलेलें कार्य प्रमाणभूत मानण्यांत येतें. मृत्यूपूर्वी आपला नाण्यांचा संग्रह यांनीं ब्रि. म्यूझियमला देऊन टाकला होता (का. ना. दीक्षित).

**करमरकर, विनायक पांडुरंग**—(जन्म स. १८९२) सुप्रसिद्ध मूर्तिकार.

यांचा जन्म सासवणें, जि. कुलाबा, येथें झाला. चित्र-कलेचें शिक्षण प्रि. ओटो रॉथफील्डच्या मदतीनें बांबे स्कूल ऑफ आर्टसमध्यें मेयो-मेडल मिळून पुरें झालें (१९१३). युरोपमध्यें याच विषयाचा अभ्यास करण्याची यांना संधि मिळाली (१९२०-२२). शिवाय कलकत्ता येथें शिल्पकाराचा धंदा हे चालवीत होते (१९१६-२६). पुणें येथील श्रीशिवाजी-महाराजांचा अश्वारूढ ब्रॉंझचा पुतळा यांनीं तयार केला (१९२८). गोंडलच्या महाराजांच्या निमंत्रणा-वरून १९३१ पासून गोंडळ मुक्कामीं पुतळ्यांचीं कामें केलीं.

**करसनदास, मूळजी**—(जन्म स. १८३२-मृत्यु स. १८७१) गुजराथमधील निर्भय आणि करारी समाजसुधारक. हे जातीनें कपोलवाणी आणि धर्मानें वैष्णव होते. यांचें मूळ गांव महुवाच्या जवळ वडाळ होतें, तरी यांचे पूर्वज मुंबईस येऊन राहिले. हे कॉलेज-मध्यें दाखल झाले, पण यांचें शिक्षण पुरें झालें नाहीं.

त्या वेळीं इंग्रजी शिक्षणामुळें लोकांत एक प्रकारची जागृति उत्पन्न झाली होती. अनेक संस्था व चर्चा-सभा चालू असत. त्यांत 'गुजराथी ज्ञानप्रसारक मंडळी' नांवाची एक संस्था होती. तेथें समाजांतील चालू रीति-रिवाजांबद्दल अनेक प्रकारची चर्चा चाले. तींत पारशी, गुजराथी व महाराष्ट्रीय तरुण भाग घेत. कार्य मोठें

आकर्षक चाले. पण गुजराथी तरुणांचें तेवढ्यानें समाधान होईना, म्हणून त्यांनीं 'बुद्धिवर्धक सभा' नांवाची निराळी संस्था काढली. तीत हे भाग घेत असत.

त्या वेळचे चर्चेचे विषय समुद्रगमन, विधवाविवाह, स्त्रीशिक्षण, सार्वत्रिक शिक्षण, हे प्रामुख्यानें असत. त्यांत हे नव्या मताचे जोरदार पुरस्कर्ते होते. यांचें केवळ व्याख्यानें देऊन समाधान होईना. तेव्हां यांनीं कन्याशाळेचें काम अंगावर घेऊन त्यांत लक्ष घातलें. तसेंच लोकमत जागृत करण्याकरितां पारशी गृहस्थाचे 'रास्तगोफ्तार' नांवाच्या पत्रांत हे लिहीत असत. पण लवकरच यांना असें दिसून आलें कीं, स्वतःचें पत्र असल्याशिवाय हिंदुसमाजांतील विविध गोष्टींची चर्चा मोकळ्या मनानें करितां येणार नाहीं. तेव्हां यांनीं 'सत्यप्रकाश' नांवाचें स्वतःचें साप्ताहिक पत्र काढिलें. ( १८५५ ). त्याच वेळीं 'बुद्धिवर्धक सभा' हें मासिकहि पण यांच्याच मताचें सुरू झालें. सत्यप्रकाशची संपादकीय जबाबदारी हे पार पाडीत आणि आर्थिक व्यवस्था सर मंगळदास नथुभाई वगैरे लोक पार पाडीत.

या सुमारास यांच्या कर्तृत्वानें मोहित होऊन यांना डिसा येथें शिक्षकाची नोकरी मिळाली. पण तेथें दहा महिन्यांत यांची प्रकृति बिघडली. गोऱ्या डॉक्टरनें यांना मांस खाण्याचा सल्ला दिला. पण यांनीं प्राण गेला तरी चालेल पण मांस खाणार नाहीं असें सांगितलें, आणि राजीनामा देऊन हे मुंबईस आपल्या आवडत्या कामाकडे आले. हे सुधारक असले तरी धार्मिक होते. या बाबतींत महाराष्ट्रांतील आगरकरांशीं यांचें साम्य आहे.

या वेळीं पहिल्या दोन्ही स्त्रिया वारल्यामुळें यांना तिसऱ्या लग्नाचा प्रसंग आला. तेव्हां यांनीं लग्नाच्या वेळीं घोड्यावर बसून जाण्याचा रिवाज मोडून हे पायींच सासऱ्याच्या घरीं गेले. त्यामुळें लग्न मोडण्याचा प्रसंग आला, तरी हे आपल्या विचारापासून ढळले नाहीत. शेवटीं कांहींनीं मध्यस्थी केल्यावर सासऱ्याला यांच्यापुढें नमतें घ्यावें लागलें.

यानंतर वाल्लभपंथाचे महाराज व ब्राह्मण यांत तंटा सुरू झाला. महाराजांच्या मंदिरांत छप्पन भोग अर्पण करण्याची पद्धत होती. पूर्वीपासूनच ही बाब टीकास्पद होती. ब्राह्मण व महाराज यांच्यांतील तंटा मिटला तरी महाराजांच्या मंदिराची सुधारणा करण्याच्या मिषानें टीका सुरूच राहिली. यांच्यासारख्या सुधारकांनीं 'सत्यप्रकाश' वगैरे पत्रांतून टीकेची झोड उठविली. शेवटीं एका पारशानें चालविलेल्या 'चाबूक' नांवाच्या पत्रावर बेअब्रूची फिर्याद करण्यांत आली. महाराजांना कोर्टात साक्षीकरितां बोलावण्यांत आलें. पण महाराजांना कोर्टात जाणें इष्ट व योग्य नव्हतें. तेव्हां ते मंदिरांत दरवाजे बंद करून बसले.

पण त्यामुळें आस्तिकांना महाराजांचें दर्शन होईना. दर्शन घेतल्याशिवाय अन्नपाणी घ्यावयाचें नाहीं असा पुष्कळच भक्तांचा नियम होता. शेवटीं वैष्णव समाजांतील थोर लोकांनीं एक करारनामा करून सर्व जिम्मेदारी आपणांवर घेतली. मंदिर उघडलें गेलें, आणि विरुद्ध वागणारांना जातिबहिष्कृत करण्याचें ठरलें.

यांच्या खऱ्या परीक्षेची वेळ ही होती. यांनीं जातिबहिष्काराचें भय असतांहि सुधारणापक्षाच्या दृष्टीनें अशा वेळीं माघार घेणें अपायकारक आहे हें लक्षांत घेऊन आपला निश्चय मोठ्या कणखरपणानें अंमलांत आणला. बहुतेक लोक महाराजांच्या पक्षाला गेले होते. आतां महाराजांचा पक्ष हा संप्रदायाचा प्रश्न झाला होता. त्यामुळें हे प्रायः एकाकी पडले. यांना उत्तेजन देणारेहि तटस्थतेचें धोरण दाखवूं लागले. यांनीं मात्र आपल्या सख्त टीकेला सुरुवात केली, आणि महाराजांचें धोरण कसें चुकीचें आहे हें सप्रमाण सिद्ध केलें. यानंतर सुरतेच्या मोठ्या मंदिराचे महाराज यदुनाथजी मुंबईस आले ( १८९० ). त्यांची सुधारणावादी पक्षाशीं सहानुभूति असल्याची बोलवा होती. पण ते जुन्या-नव्याचा समन्वय करण्याचा प्रयत्न करीत. शेवटीं त्यांच्याशीं शास्त्रार्थ करण्याकरितां सभा बोलावण्यांत आली. पण ती सभा उधळली गेली. तेव्हां 'सत्यप्रकाश' या आपल्या पत्राच्या द्वारें यांनीं महाराजांची, त्यांच्या पंथाची आणि तेथील अनाचाराची अशी चर्चा केली कीं महाराजांनीं यांच्यावर अब्रुनुकसानीचा दावा करून ५० हजार रुपये नुकसानभरपाई मागितली ( १८९१ मे १४ ). महाराजांना वाटलें हा गरीब एकाकी मनुष्य केवळ धाकानेंच बधेल; पण यांनीं आपलीं विधानें खरीं असून आपण बचाव करणार असल्याचें जाहीर केलें. तेव्हां भाटिया जातीच्या लोकांनीं सभा भरवून यांना जातीबाहेर टाकलें आणि यांना कोणी साक्षीदार वगैरे मिळूं नयेत म्हणून तसा ठराव करून सह्या घेण्याचें काम सुरू केलें. हा ठराव आणि त्यावर घेतलेल्या सह्यांचा अर्थ असाच झाला कीं, यांना खरा न्याय मिळूं देऊं नये. हें लक्षांत आल्यावर

यांनीं कांहीं पुढाऱ्यांवर न्यायदानाच्या कामांत अडथळा करण्याच्या मुद्यावर खटला भरला. तो खटला ' भाटिया कॉन्स्पीरसी केस ' या नांवानें प्रसिद्ध आहे. त्यामुळें यांना पुष्कळ लोकांनीं भय दाखविलें पण हे आपल्या कार्यापासून बिलकूल चलित झाले नाहींत. यांच्यावर एकदां हल्लाहि झाला. त्यांतून फौजदारी उत्पन्न झाली. अनेकांना हजारांनीं दंड झाले. यांनाहि खर्चाबद्दल एक हजार रुपये मिळाले. मात्र यांचा एकूण खर्च चार हजार रुपये झाला. मूळ कज्जा अजून कोर्टापुढें सुरूच झाला नव्हता.

हे महाराज कोर्टात येण्यास डरणारे नव्हते. मोठ्या थाटानें कोर्टात आले. भालदार-चोपदार व सपत्न वैष्णव यांनीं कोर्ट भरून गेलें. पैशालाहि तोटा नव्हता. पण यांची हिंमत अटळ होती. यांनीं हा ' वल्लभसांप्रदाय आधुनिक असून तो वैदिकधर्माविरुद्ध आहे, तसेंच महाराजांच्या अनीतीसंबंधीं मीं केलेले निर्देश खरे असून ' सिद्धान्त-रहस्य ' व त्यावरील गोकुळनाथजींची टीका तसेंच भजनें वगैरेंवरून ही गोष्ट सिद्ध होते ' असें म्हटलें. डॉ. भाऊ दाजी वगैरेंच्या साक्षीहि यांना पोषक अशा झाल्या. तेव्हां यांना अब्रुनुकसानीदाखल फक्त पांच रुपये देण्याचा हुकूम झाला. या प्रकारें धर्माच्या नांवावर चाललेल्या अनीतिकारक प्रकारांना आळा घालण्याचें अतिशय मोठें कार्य या खटल्यानें केलें आणि खरोखर धर्मगुरूंचीं मंदिरें सुधारण्याला या खटल्याची अतिशय मदत झाली. चहूंकडे या खटल्यामुळें अतिशय खळबळ माजली. टीका झाल्या. ' महाराजा लायबल केस ' या पुस्तकांत ही सर्व हकीगत वाचावयास मिळते.

हे दोन वेळां इंग्लंडला गेले. आणि राजकोट व लिमडी या दोन संस्थानांचा कारभार करण्याची ब्रिटिश सरकारतर्फे यांना संधि मिळाली. तिचा यांनीं उत्तम फायदा घेतला आणि आपल्या लोकोपकारक कार्यपद्धतीनें यांची कारकीर्द अतिशय लोकप्रिय झाली. शाळा, वाचनालयें, बाजार यांची यांनीं नवीन पद्धतीनें मांडणी केली. लांचलुचपत बंद केली. पोलिसबंदोबस्त उत्तम केला. अनेक प्रकारच्या संस्था काढून लोकांना चर्चा करण्यास उद्युक्त केलें. पुनर्विवाह करणारांना साहाय्य केलें आणि स्वतःचें चारित्र्य उत्तम ठेवून लोकांना उदाहरण घालून दिलें. सुधारणा करण्यास निघालेल्या माणसाची नीति आणि चारित्र्य उत्कृष्ट असलीं तरच त्याचा प्रभाव लोकांवर पडतो व कार्य यशस्वी होतें.

समाजसुधारणेचें कार्य करीत असतांच गुजराथी भाषेंत यांनीं खालील ग्रंथ करून महत्त्वाची वाङ्मयसेवा केली आहे :

१ इंग्लंडमां प्रवास ( हे पुस्तक फारच चांगलें असून याचें मराठींत भाषांतर झालें आहे ), २ प्रवास-प्रवेशक, ३ नीतिवचन, ४ संसारसुख, ५ कुटुंबमित्र, ६ गुजराथी-अंग्रेजीकोष, ७ महाराज लायबल केसनो हेवाल, ८ वेदधर्म, ९ देशाटन विशे निबंध, १० नीतिसंग्रह, ११ नीतिबोधक ( पत्रिका ), १२ राममोहनराय ( पत्रिका ), १३ सुधारो अने महाराज ( पत्रिका ), १४ अमूल्य वाण–सर चार्लस बार्टल फ्रीअरनु भाषण, १५ निबंधमाला.

सत्यप्रकाशसंपादक १८५५–९०, रास्तगोफ्तारसंपादक १८९०–९२, स्त्रीबोधसंपादक १८५९–९१. शिवाय इंग्रजींत महाराज लायबल केस प्रसिद्ध केली ( ग्रंथ अने ग्रंथकार ).

**करंदीकर, जनार्दन सखाराम**—( जन्म स. १८७५ ) केसरीचे संपादक व अनेक विषयांचे सूक्ष्म अभ्यासक.

यांचा जन्म कुंदगोळ, सं. जमखिंडी, येथें झाला. हे फर्ग्युसन कॉलेजांतून बी. ए. झाले ( १८९७ ). पुढें मुधोळच्या शाळेंत हेडमास्तर होते. नंतर एलएल. बी. झाले. नंतर धारवाड येथें शिक्षक होते.

समर्थविद्यालयांत शिक्षक ( १९०७ ) व तेथेंच वसतिगृहाचे सुपरिंटेंडेंट होते. याच सुमारास ' समर्थ ' साप्ताहिक व ' ग्रंथमाला ' मासिकाचे सहसंपादक होते. चित्रमयजगताचें संपादन हे कांहीं दिवस करीत असत. स. १९११ मध्यें यांनीं केसरींत लिहिण्यास सुरवात केली व १९१२ सालीं सहसंपादक म्हणून यांची तेथें नेमणूक झाली. मुळशी सत्याग्रहांत यांना तीन महिने सक्तमजुरीची शिक्षा झाली ( १९२२ ). पुणें येथील टिळक महाविद्यालयांत हे इतिहास व अर्थशास्त्र हा विषय शिकवीत असत. १९२७ मध्यें वांईस भरलेल्या राष्ट्रीय शिक्षणपरिषदेचे व झांशीस भरलेल्या बृहन्महाराष्ट्र परिषदेचे हे अध्यक्ष होते. स. १९३१ त केसरीचे मुख्य संपादक झाले. १९३२ मध्यें कायदेभंगाच्या चळवळींत भाग घेतल्यानें दोन वर्षांची शिक्षा झाली.

यांचे ग्रंथः—१ कौटिलीय अर्थशास्त्राचें मराठी भाषांतर ( श्री. हिवरगांवकर, नगर, यांच्या सहाकार्यानें भाग १–२. १९२६–२८ ), २ जगांतील क्रांतिकारक लढाया

(क्रोसीच्या 'डिसायसिव्ह बॅटल्स ऑफ दि वर्ल्ड'चें भाषांतर १९०८), ३ हिंदुत्ववाद, ४ भारतीय युद्धाचा काल-निर्णय, ५ भारतीय युद्धाचा तिथिनिर्णय अथवा गीता-जयंतीनिर्णय.

यांशिवाय राजकारण, इतिहास, इतिहाससंशोधन, अर्थशास्त्र, फलज्योतिष, पंचांगसंशोधन, गीतार्थ-चर्चा, रामदासी वाङ्मय वगैरेंवर यांचे अनेक लेख प्रसिद्ध झाले आहेत. यांचे विचार सूक्ष्म असून विचारांची पकड पक्की असते. त्यामुळें यांचें विशदीकरण आग्रही वाटलें तरी महत्त्वाचें असतें. यांची लेखणी विविध विषयांत सफाईनें चालते.

**करंदीकर, बाळकृष्ण शंकर**— ( मृत्यु स. १९११ ) शास्त्रीय वाङ्मयाचा लेखक. मुंबई विश्वविद्यालयाचे हे बी. एससी. होते. तळेगांव येथील पैसाफंड कांच-कारखान्याचे व्यवस्थापक होते. पेणचें 'कोंकण विद्यालय' यांनीं स्थापिलें. लेखन–वातावरण व वनस्पतिशास्त्र.

**करंदीकर, रघुनाथ पांडुरंग**— ( जन्म स. १८५७–मृत्यु स. १९३५ ) साताऱ्याचे सुप्रसिद्ध वकील व सार्वजनिक कार्यकर्ते. हे दादासाहेब या नांवानें ओळखले जात. यांचा जन्म खाडिलकर घराण्यांत झाला. करंदीकर घराण्यांत हे दत्तक आले होते. यांचें शिक्षण सातारा व पुणें येथें झालें. हे हायकोर्ट प्लीडर झाल्यावर कांहीं दिवस सबजज्ज होते ( १८८४ ). पुढें स्वतंत्रपणें वकिली करूं लागले. यांचे बोलणें खुबीदार असून उलटतपासणीच्या कामांत हे अत्यंत पटाईत असत. लो. टिळकांच्या विश्वासांतील मंडळींत यांची गणना असे.

आपल्या वकिलीच्या प्रचंड व्यापाबरोबरच हे सार्वजनिक कार्यांत भाग घेत व आपल्या ज्ञानाचा व इंग्रजी-मराठी ज्ञानाचा फायदा सर्वांना देत. दैनंदिनी लिहिण्याबद्दल यांची प्रसिद्धि होती. जुन्या ब्राह्मणांचा कर्मठपणा व नवीनांची तडफ यांचें यांच्यांत सुंदर मिश्रण झालें होतें. त्यामुळें यांच्या वेळच्या प्रसिद्ध खटल्यांत, सार्वजनिक कार्यांत व मोठ्या व्यवहारांत यांचा साक्षात् किंवा परंपरेनें संबंध येत असे.

हे भोर संस्थानच्या फॉरेस्ट कमेटीचे सभासद होते ( १८८५ ). तसेंच मुंबई कायदेमंडळाचे लोकनियुक्त सभासद होते ( १९११ ). तसेंच इग्लंडमध्यें गेले असतां यॉर्कशायरमधील लिकले येथें पहिली हिन्दी परिषद् यांनीं उघडली ( १९१९ ). प्रॉव्हिन्शिअल पोस्टल अँड आर. एम्. एस. परिषदेचे अध्यक्ष ( १९२८ ). वेस्टर्न इंडिया लाइफ अशुरन्स कंपनीच्या बोर्ड ऑफ डॉयरेक्टरचे चेअरमन व पुणें लॉ कॉलेजचे प्रोफेसर होते.

कौन्सिल ऑफ स्टेटचे निवडून आलेले हे सभासद होते ( १९२३ ).

याशिवाय महाराष्ट्र साहित्यसंमेलन (१९०५ सातारा) वगैरे अनेक संस्थांचें अध्यक्षपद यांच्याकडे चालून येत असे. शेवटीं हे नागपूर येथें दिवंगत झाले. यांचे ग्रंथ—

१ केदारखंडयात्रावर्णन, २ लेटर्स फ्रॉम इंग्लंड (१९०८).

**करंदीकर, विनायक जनार्दन**— ( जन्म स. १८७२–मृत्यु स. १९०९ ) कवि. जन्म धुळें येथें झाला. स्कूल फायनलपर्यंत शिक्षण तेथेंच झालें. पोलिसखात्यांत सुरवात करून अनेक ठिकाणीं अनेक प्रकारची नोकरी केली. स्वभाव चंचल व फंदी होता. आयुष्याला स्थिरता नव्हती. मृत्यूच्या अगोदर तीन वर्षे हे नगरदेवळें येथील जहागीरदारांकडे कारभारी म्हणून काम पाहत असत. केशवसुत, टिळक व हे समकालीन असून परस्परांत गाढ स्नेह असे. अर्वाचीन कवितेला नवें वळण लावण्यांत यांचा मोठा भाग आहे. हे आधुनिक राष्ट्रीय व ऐतिहासिक कवितेचे जनक होत. यांच्यांत प्रेरक शक्ति होती. लोकांच्या अन्तःकरणांना यांनीं हालविलें. बाह्य कसरतीपेक्षां अन्तःकरण हलविण्याकडे यांचें लक्ष असे.

१ विनायकाची कविता ( संग्राहक–द. अ. आपटे १९२० ), २ प्रभावती नाटक ( १८९२ ).

**कर्झन, लॉर्ड**— ( जन्म १८५९–मृत्यु स. १९२५. कारकीर्द स. १८९९-१९०५ )

हिंदुस्थानचे प्रसिद्ध व्हाइसरॉय व प्रसिद्ध राजकारणज्ञ. हिंदुस्थानांत व्हाइसरॉय म्हणून नेमण्यापूर्वीं हे चार वेळां हिंदुस्थानांत येऊन गेले होते. त्यामुळें यांना हिंदुस्थानची बरीच माहिती होती. कट्टर कॉन्झर्व्हेटिव्ह म्हणून यांची फार ख्याति होती. तसे अत्यंत हुषार व तडफदार म्हणून यांना लोक ओळखत. हट्टी, तडफदार, कुशाग्र बुद्धीचे व साधकबाधक विचार करणारे म्हणून यांची प्रसिद्धि होती. अमुक खात्यावरून यांचा हात फिरला नाहीं असें त्या वेळीं एकहि खातें शिल्लक राहिलें नाहीं. डलहौसीनंतर हिंदुस्थानच्या कारकारावर यांचाच ठसा जास्त उठला आहे. येथें येण्यापूर्वीं स. १८९१-९२ त यांनीं दुय्यम भारतमंत्र्याचें

काम केलें होतें. यांच्याइतका तरुण वयाचा व्हाइसरॉय अद्यापि कोणी आला नव्हता.

अफगाणिस्थानासंबंधीं यांनीं अलिप्तपणाचें पण स्नेहाचें धोरण स्वीकारलें. त्या वेळीं पूर्वीचा अमीर अबदुल रहमान वारला व त्याचा मुलगा हबीबुल्ला अमीर झाला. तेव्हां शिष्टमंडळ पाठवून यांनीं त्याच्याशीं नवा तह केला. त्या तहानें अफगाणिस्थानच्या अमिराच्या स्वतंत्र 'राजा' या दर्जाला मान्यता देण्यात आली.

या तहानें इंग्रज व अफगाण यांच्यांत सलोखा निर्माण झाला. याच वेळीं सरहद्द प्रान्ताच्या रक्षणार्थ तेथील लोकांचेंच लष्कर उभारण्याचें यांनीं ठरविलें. त्यामुळें तेथील लोकांचें रक्षण चांगलें होईल अशी यांची समजूत होती. पंजाबमधील कांहीं जिल्हे व सरहद्दीवरील कांहीं प्रदेश यांचा एक स्वतंत्र प्रान्त बनवून त्याचा कारभार एका लेफ्टनंट गव्हर्नरकडे सोंपविण्याच्या कल्पनेला मूर्त स्वरूप देणारे हेच होत.

स. १९०१ मध्यें व्हिक्टोरिया राणी वयाच्या ८२ व्या वर्षी मृत्यु पावली व सातवे एडवर्ड गादीवर आले, तेव्हां यांनीं दिल्लीस मोठा दरबार भरविला (१९०३ जाने. १).

इराणच्या आखातांतहि इंग्रजांचें प्रस्थ माजविण्याचा यांनीं प्रयत्न केला. पण १९०३ मध्यें यांनीं इराणच्या आखाताकडे स्वतः दौरा काढला, व ठिकठिकाणीं ब्रिटिश व्यापार वाढवून तेथें ब्रिटिश अधिकारी नेमिले. त्यामुळें इराण व इराणचें आखात येथें इंग्रजांचें वर्चस्व कायम राहण्यास मोठी मदत झाली.

तिबेटी सरकार रशियाशी गुप्त पत्रव्यवहार करून हिंदी व्यापारास आडकाठी आणूं लागलें. त्यामुळें यांनीं तिबेटवर स्वारी केली (१९०४). कर्नल यंगहज्बंडनें तिबेटी लोकांचा पराभव केला. त्यानंतरच्या तहानें इंग्रजांस बऱ्याच व्यापारी सवलती मिळाल्या. परंतु त्याला रशिया व चीन यांनीं जोराचा विरोध केल्यानें ब्रिटिश प्रधानमंडळानें तो तह रद्द केला.

स. १९०० सालीं येथें मोठा दुष्काळ पडून दहा लाख लोक मेले व १९०४-५ सालीं प्लेगचा कहर होऊन नऊ लाख लोक मृत्युमुखीं पडले. तेव्हां दुष्काळ व प्लेगसंबंधीं यांनीं कमिशनें नेमून चौकशी केली. दुष्काळाचें कारण जबर शेतसारा होय, असें मत रमेशचंद्र दत्त यांनीं दिलें. तेव्हां यांनीं पुढील व्यवस्था केली :

१ कालव्यांची वाढ, २ शेतकऱ्यांकरितां पतपेढ्या, ३ शेतकी कॉलेजें, ४ लांब मुदतीनें सारा वाढवावा, वाढ हप्त्यानें करावी व दरसाल आणेवारी करून सारा बसवावा असें ठरविलें. व ५ व्यापारी खातें निर्माण करून त्यावर स्वतंत्र अधिकारी नेमिला.

तसेंच यांनीं पुढील सुधारणा केल्या : १ हिंदी संस्थानांतील लोकांस लष्करी शिक्षण मिळावें म्हणून यांनीं राजकुमारपथकें निर्माण केलीं; व राजकुमारांस डेहराडूनच्या लष्करी कॉलेजांत शिक्षण मिळण्याची सोय केली. २ तसेंच यांनीं सरकारी उत्पन्नांत दरसाल भर पडूं लागलेली पाहून ५०० च्या ऐवजीं १००० रुपये उत्पन्नावर प्राप्तीवरील कर घेण्याचें ठरविलें. मिठावरील कर कमी केला व सोनें हें कायदेशीर चलन ठरविलें. ३ स. १९०४ मध्यें यांनीं पुराणवस्तूंच्या संरक्षणाचा कायदा पास केला. जुन्या ऐतिहासिक इमारतींची डागडुजी करण्याकरितां व ज्या इमारती जमिनींत पुरल्या गेल्या होत्या त्या उकरून काढण्याकरितां यांनीं "पुराणवस्तुसंशोधनखातें" स्थापन केलें. या खात्याचें काम फार समाधानकारक होत असून हिंदी कलाकुसरीचीं व संस्कृतीचीं स्मारकें रक्षिण्याकरितां तें खातें अहर्निश झटतें. या कार्याबद्दल यांचें नेहमीं अभिनंदन केलें जातें. ४ स. १९०४ सालीं यांनीं 'युनिव्हर्सिटी कमिशन' नेमिलें. त्याच्या शिफारशींप्रमाणें एक नवा कायदा पास करण्यांत आला. त्या कायद्यान्वयें विश्वविद्यालयांची सुधारणा करण्यांत आली. तसेंच दुय्यम खासगी शाळांच्या मान्यतेसंबंधीं कडक नियम करण्यांत आले. तसेंच त्यांची दरसाल तपासणी करण्याचें ठरलें. शिक्षणासंबंधीं यांचें हें धोरण लोकांना पसंत पडलें नाहीं.

बंगाल प्रांत फार मोठा असल्यानें त्याची फाळणी करून राज्यकारभाराच्या सोयीकरितां दोन प्रान्त करावे, असें ठरवून यांनीं त्याचे दोन भाग पाडले. आसाम, चितगांव व पूर्वबंगालमधील १५ जिल्हे असा एक भाग व बाकीचा दुसरा भाग करून त्यावर स्वतंत्र लेफ्टनंट गव्हर्नरची नेमणूक करण्यांत आली. या योजनेमुळें बंगाली लोक फार चिडले, पण यांनीं फाळणीचा बेत रद्द केला नाहीं. तेव्हां आपलें एकजीव झालेलें राष्ट्र विभागलें जातें म्हणून बंगालनें आणि त्याच्याकरितां सर्व हिंदुस्थाननें अभूतपूर्व चळवळ केली. खून-अत्याचारांना तर बंगालमध्यें ऊत आला. शेवटीं १९११ सालीं दिल्ली-दरबारांत फाळणी रद्द केल्याचें बादशहा पंचम जॉर्ज यांनीं जाहीर केलें. मात्र नव्या योजनेप्रमाणें पूर्वीच्या बंगालचे बिहार, ओरिसा, बंगाल व आसाम असे चार भाग आज झालेले आहेत.

हे १९०४ मध्यें थोडी रजा घेऊन इंग्लंडला गेले. पण व्हाइसरॉयच्या जागीं पुनः नेमणूक झाल्यानें हे त्याच वर्षाच्या डिसेंबरांत पुन: हिंदुस्थानांत आले. तेव्हां किचनेर हे सरसेनापति होते. त्यांचा व यांचा सरसेनापताच्या दर्जासंबंधीं तंटा लागला. त्याचा निकाल ब्रिटिश प्रधानमंडळानें यांच्याविरुद्ध दिला. त्यामुळें यांनीं व्हाइसरॉयच्या जागेचा राजीनामा दिला. स. १९०५ मध्यें इंग्लंडचे युवराज हिंदुस्थानांत आले. त्यांच्या स्वागतानंतर हे इंग्लंडला परत गेले व यांच्या जागीं व्हाइसरॉय म्हणून लॉर्ड मिंटो आले.

पहिल्या महायुद्धाचे वेळीं यांनीं इंग्लंडच्या प्रधानमंडळांत प्रवेश केला. तसेंच युद्धानंतरहि परराष्ट्रीय मंत्र्याचें काम यांनीं मोठ्या तडफदारीनें केलें.

हिंदुस्थानांतील प्रागतिकांच्या सनदशीर राजकारणाचा पायाच उखडून टाकण्याचें काम यांनीं केलें. आजपर्यंत राणीचा जाहीरनामा व ब्रिटिश मुत्सद्यांचीं वचनें हीं प्रागतिक राजकारणाचा पाया समजण्यांत येत; पण यांनीं राणीचा जाहीरनामा म्हणजे कांहीं राजा व प्रजा यांमध्यें झालेला कायदेशीर करार नव्हे, हें अगदीं स्पष्टपणें सांगितलें.

तसेंच हिंदी लोक कितीहि शिकले तरी इंग्लिश नोकरशाहीच्या अंगीं जी कार्यक्षमता आहे ती हिंदी सुशिक्षितांच्या अंगीं कधींच येणें शक्य नसल्यानें देशांतील सर्व वरिष्ठ अधिकार नेहमींच इंग्रजांच्या हातीं ठेविले पाहिजेत, असें यांचें मत होतें व तें ते उघडपणें बोलून दाखवीत.

यांनीं राजसत्ता हातीं घेतल्यापासून बहुतेक ठिकाणीं सरकारी बहुमत वाढविण्याचा प्रयत्न केला व चढाओढीच्या परीक्षांचे धोरण सोडून सरकारनियुक्ततेचें धोरण स्वीकारलें व सर्व राज्यकारभार अनियंत्रित व एकतंत्री करण्याचा प्रयत्न केला.

या प्रकारच्या यांच्या कारकीर्दीमुळें केसरीनें आपल्या अग्रलेखांत औरंगजेब बादशहाशीं यांची तुलना केली, आणि ना. गोखले यांनीं आपल्या शास्त्रशुद्ध भाषणानें बनारस कॉंग्रेसच्या अध्यक्षपदावरून यांच्या कारकीर्दीची छाननी करून यांच्या अप्रिय व अहितकारक धोरणाची उत्तम स्पष्टता केली ( १९०५ ).

**कर्वे, डॉ. सौ. इरावतीबाई**—(जन्म स. १९०५). मानववंशशास्त्रज्ञ व समाजशास्त्रज्ञ. जन्म- मिंज्यान ( ब्रह्मदेश ) येथें झाला. माहेरचें नांव करमरकर. स. १९२८ सालीं यांनीं एम्. ए. करितां चित्पावन कोंकणस्थ-ब्राह्मणसमाजशास्त्रविषयक निबंध लिहिला. बर्लिनच्या पीएच्. डी. झाल्या ( १९३० ). त्याकरितां यांच्या संशोधनात्मक निबंधाचा विषय- 'मनुष्याच्या डोक्याच्या कवटीची नेहमींची असमप्रमाणता' हा होता. मानववंशशास्त्र, प्राणिशास्त्र, संस्कृत व तत्त्वज्ञान या विषयांचा यांचा अभ्यास आहे. पुढें डॉ. दिनकर धोंडो कर्वे यांच्याशीं यांचा विवाह झाला ( १९२६ ). नंतर या श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी भारतवर्षीय महिला विद्यापीठाच्या रजिस्ट्रार झाल्या ( १९३१ ). तेथें अनाथ बालिकाश्रमाच्या आजन्म सेविकेच्या जागेचा राजिनामा देऊन १९३९ पासून या डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिट्यूटमध्यें समाजशास्त्राच्या अध्यापक ( रीडर ) आहेत. "नातेंवाचक शब्द व त्यांचा समाजशास्त्रदृष्ट्या अभ्यास", "महाराष्ट्रांतील निरनिराळ्या जातींची समाजशास्त्र दृष्ट्या पहाणी", "जातींतील स्त्रीपुरुषांचें शरीरमापन व रक्तसमूहाचें परीक्षण", "ग्रामनामांचा समाजशास्त्रदृष्ट्या अभ्यास" इत्यादि विषयांवर यांचें संशोधन चालू असून निरनिराळ्या तद्विषयक नियतकालिकांत त्यांचे संशोधनात्मक निबंध प्रसिद्ध झालेले आहेत.

**कर्वे, धोंडो केशव**—( जन्म स. १८५८ ) विधवाविवाह व स्त्रीशिक्षण यांचे पुरस्कर्ते. स्त्रीशिक्षणाचे पुरस्कर्ते म्हणून यांची कीर्ति जगांत झाली आहे.

यांचें प्राथमिक शिक्षण व इंग्रजी चार इयत्तांचें शिक्षण कोंकणांत मुरुड येथें झालें. पांचव्या इयत्तेपासून मुंबईस आले. एल्फिन्स्टनमधून बी. ए. झाले ( १८८४ ). गणिताच्या शिकवण्यांवर दिवस चालू असतां फर्ग्युसन कॉलेज, पुणें, येथें प्रोफेसर झाले ( १८९१–१९१४ ). आजीव सभासद झाल्यावर दुसऱ्याच वर्षी यांचा पुनर्विवाह झाला ( १८९३ ). तेव्हांपासून प्रत्यक्ष स्त्रीविषयक कामाला यांनीं सुरुवात केली. अनाथ बालिकाश्रम ही विधवांच्याकरितां संस्था स्थापन केली (१८९६) व तिची प्रगति व स्थित्यन्तरें होत हिंगणें येथें एक छोटेंसें विद्याभुवनच निर्माण झालें. 'अखिल-भारतीय महिलाविश्वविद्यापीठ' ही यांची सर्वश्रेष्ठ कामगिरी होय ( स्थापना स. १९१६ ). ती संस्था चांगली चालू लागल्यानंतर यांनीं खेडेगांवांत प्राथमिक शिक्षणाचा प्रसार व्हावा म्हणून घरोघर हिंडून हे फंड उभारतात व प्राथमिक शाळा चालवितात ( सुरुवात स. १९३६ ).

आतां अगदीं नवी समतासंघाची चळवळ यांनीं हातीं घेतली आहे ( स्थापना स. १९४४ ).

यांनीं आपलें आत्मवृत्त प्रसिद्ध केलें आहे तें वाचलें असतां यांचा प्रांजळपणा, एकमार्गीपणा, कळकळ व कार्यैकतत्परता चांगली कळून येते. प्रथम लोकांच्या विरोधांतून यांना मार्ग काढावा लागला. पण यांच्या चिकाटीनें व कार्यैकदृष्टीनें हे यशस्वीपणें आपला कार्यभाग पार पाडून देशाची सेवा करूं शकले. आतां यांचें स्त्रीशिक्षणाचें कार्य सरकारमान्यहि झालें आहे.

यांच्या कार्याची किंवा कार्यकर्तृत्वाची ज्याला माहिती नाहीं, असा सुशिक्षित मनुष्य महाराष्ट्रांतच काय, पण हिंदुस्थानांत क्वचितच सांपडेल. यांच्या आश्रमांत वाढलेल्या आणि विद्यालयांत शिकलेल्या महाराष्ट्राच्या शेंकडो स्वावलंबी कन्यांनीं, आपल्या या आवडत्या अण्णांचें नांव आपल्याबरोबर घरोघर नेलें आहे. ‘ अनाथ बालिकाश्रम ’, ‘कन्याशाळा’, ‘ महिलाविद्यालय ’, ‘ निष्काम-कर्ममठ ’, ‘ समता-संघ ’ व या सर्वांना शेखरीभूत असलेलें ‘ भारतीय महिलाविद्यापीठ ’ या यांनीं गेल्या चाळीस वर्षांत काढलेल्या संस्था, यांच्या कर्तृत्वाचें स्मरण देत, आज लोकांच्या डोळ्यांसमोर उभ्या आहेत. अणुमात्र बीजांतून असंख्य पक्षीकुलांना आश्रय देणाऱ्या भव्य वटवृक्षाचा विस्तार व्हावा व त्या वृक्षाचे पारंब्यांपासून पुढें अनेक वृक्ष निर्माण व्हावेत, त्याप्रमाणें सुमारें ५० वर्षांपूर्वी फक्त चारपांचच विधवा व कुमारिका मुलींनिशीं हिंगण्याच्या ओसाड माळावर स्थापन केलेल्या अनाथ बालिकाश्रमांतून उत्क्रान्त झालेल्या यांच्या या अनेक संस्थांचा इतिहास आहे.

हा सर्व इतिहास यांनीं आपल्या ‘ आत्मवृत्तां ’त प्रसिद्ध केला असून या आत्मावृत्ताची द्वितीयावृत्ति यांच्या ज्युबिलीचे वेळीं प्रसिद्ध करण्यांत आली आहे. महापुरुषांचीं चरित्रें हीं केव्हांहि स्फूर्तिदायकच असतात. परंतु, ज्यांच्या कर्तृत्वानें पुराणमताभिमानी समाजाचे विचारांत परिवर्तन घडून आलें आहे, अशा महापुरुषानें आपल्या जीवितकार्याच्या स्वतः केलेल्या वर्णनांहून अधिक स्फूर्तिदायक कांहींच असणें शक्य नाहीं (१९२८).

अबलोन्नतीच्या कार्याच्या कोणत्याहि अंगाची उपेक्षा यांनीं कधींहि केली नाहीं. स्वावलंबनक्षमतेला व्यावहारिक तसेंच बौद्धिक स्वरूप असतें. हिंदु स्त्रीला जसें कुटुंबांत, तसेंच समाजांत आणि जगतांतहि स्वतःचें स्वतंत्र असें स्थान व कार्यक्षेत्र आहे, स्त्री ही पुरुषाप्रमाणेंच समाजाचा स्वतंत्र व कार्यक्षम घटक असणें शक्य आहे, ही भावनाही आत्मप्रत्ययाची जाणीव यांच्या संस्थांनीं महिलावर्गात उत्पन्न केली, व यांतच यांच्या सर्व कार्याची थोरवी सांठवली आहे. व्यक्ति किंवा संस्था या केव्हांहि नश्वरच असतात. महत्त्व असतें तें त्यांनीं उत्पन्न केलेल्या विचारपरंपरेला. या दृष्टीनें यांनीं अबलोन्नतीचे क्षेत्रांत मिळवलेल्या यशापेक्षांहि केलेलें कार्य अधिक महत्त्वाचें आहे. या दृष्टीनें यांच्या महिलाविद्यापीठाकडे पाहावयास पाहिजे. १९१९ ते २७ या काळांत महिलाविद्यापीठांतून बाहेर पडलेल्या अठ्ठावीस तरुणींपैकीं तेवीस स्त्रिया शिक्षणाचे क्षेत्रांत प्रायः स्वावलंबनाचे तत्त्वावर लोककार्य करीत आहेत. याचे उलट मुंबई विश्वविद्यालयांतून बाहेर पडलेल्या ४१ पदवीधारिकांपैकीं फक्त वीसच हें कार्य व तेंहि सरकारी शाळांतून पार पाडण्यास समर्थ ठरल्या आहेत.

यांच्या कार्याचें वैशिष्ट्य सांगण्यास हे आंकडेच समर्थ आहेत. स्त्रियांना केवळ व्यावहारिक दृष्टीनें साक्षर व स्वावलंबनक्षम करणें एवढेंच जर यांचें ध्येय असतें, तर यांनीं ‘ अनाथ बालिकाश्रम ’ व ‘ महिलाविद्यालय ’ या दोन संस्थांवर समाधान मानलें असतें. परंतु या स्वावलंबनक्षमतेला मान्यतेची असणारी आवश्यकता पटल्यामुळें यांनीं आपल्या अबलोन्नतीच्या कार्याची परिसीमा राष्ट्रीय महिलाविद्यापीठांत केली. या सर्वांची एका पाठोपाठ झालेली स्थापना हा कांहीं योगायोग नाहीं. यांच्या कार्याची उत्क्रांति व परिणति या संस्थांच्या विकासांत व्यक्त झाली आहे.

सेवासदन व यांनीं काढलेल्या संस्था, स्त्रीशिक्षणाचे चळवळींत महाराष्ट्रानें मिळविलेलें केवळ अपूर्व यशच नव्हे, तर त्या चळवळीची परिणतावस्था दाखवतात. परतंत्र व गरीब महाराष्ट्र इतर बाबतींत जरी मागासलेला असला तरी स्त्रीशिक्षणाचेबाबत हिंदुस्थानांतील सर्व इतर प्रान्तांच्या पुढें आहेच; शिवाय तो इतर सर्व प्रगमनशील राष्ट्रांचे इतकाच पुढारलेला आहे हें या संस्थांनीं सिद्ध करून दिलें आहे.

**कर्वे, प्रा. रघुनाथ धोंडो**—( जन्म स. १८८२ ) महाराष्ट्रांतील संततिनियमनाच्या चळवळीचे जनक.

प्रा. धों. के. कर्वे यांचा हा पहिल्या बायकोपासून झालेला एकटाच मुलगा. अतिशय उज्ज्वल तऱ्हेनें बी. ए. पास झाल्यानंतर गणित शिकण्याकरितां फर्लो घेऊन हे पॅरिसला रवाना झाले. त्या ठिकाणीं पॅरिस युनिव्हर्सिटीचा

'दिप्लोम दे सुदस्युपेरिअर' हा डिप्लोमा घेऊन हे परतले ( १९२० ).

यानंतर अहमदाबादचें गुजराथ कॉलेज, मुंबईचें विल्सन कॉलेज वगैरे ठिकाणीं यांनीं गणिताच्या प्राध्यापकाचें काम केलें. परंतु यांचें संततिनियमन व स्वाभिमानी स्वभाव यांमुळें हे कोठेंहि कायम राहूं शकले नाहींत. मोत्यांचे सुप्रसिद्ध व्यापारी, व्हिक्टर रोझेन्थॉल यांचेहि हे कांहीं दिवस सेक्रेटरी होते ( १९२६ ).

परंतु या धकाधकीच्या मामल्यांत संततिनियमनाचा प्रचार यांनीं कधींहि थांबविला नाहीं. यांनीं या कार्यास 'संतति-नियमन' व 'गुप्त रोगांपासून बचाव' हीं दोन पुस्तकें लिहून सुरुवात केली ( १९२१ ). सामाजिक विचारांचा आधुनिक ज्ञानाच्या व बुद्धिप्रामाण्याचे दृष्टीनें विचार करून लोकशिक्षण देण्याचे हेतूनें यांनीं 'समाजस्वास्थ्य' मासिक सुरू केलें ( १९२७ ). याकरितां आर्थिक नुकसान सोसलें, लोकांच्या शिव्या खाल्या, अश्लीलतेच्या कायद्याखालीं होणारे अनेक खटले सोसले, परंतु आपले हें कार्य यांनीं सोडलें नाहीं.

भूमितींतील कृतीसंबंधींहि शाळेकरितां व कॉलेजकरितां यांनीं पुस्तकें लिहिलीं आहेत. रॅशनॅलिस्ट असोसिएशन ऑफ इंडियाच्या 'रीझन' या पत्राचेहि हे कित्येक दिवस संपादक होते. आधुनिक कामशास्त्र, आधुनिक आहारशास्त्र, त्वचेची निगा, वेश्याव्यवसाय वगैरे यांचीं पुस्तकेंहि प्रसिद्ध आहेत.

**कऱ्हाडकर, महामहोपाध्याय गोपाळाचार्य अण्णा घळसाशी**—( जन्म स. १८१७–मृत्यु स. १८९७ ) सुप्रसिद्ध संस्कृत पंडित व वैय्याकरण.

नारायणाचार्य–वासुदेवाचार्य–नारायणाचार्य–गोपाळाचार्य असा यांचा वंश आहे. यांना सखारामाचार्य व वासुदेवाचार्य असे दोन पुत्र होते. सध्यां यांचे वंशज ग्वाल्हेर येथें आहेत.

हे सात वर्षांचे असतांच यांचे वडील ब्रह्मावर्त येथें श्रीमंत बाजीराव पेशवे यांचे बरोबर असतां वारले. नंतर आजोबा वासुदेवाचार्य यांनीं यांची मुंज केली व यांना काशीस चिंतामणशास्त्र्यांचे शिष्य गोविंदाचार्य नृसिंहाचार्य अष्टपुत्रे यांचेपाशीं अध्ययनाकरितां ठेविलें. तेथें यांनीं व्याकरणाचें महाभाष्यान्त अध्ययन केलें.

पुणें येथील विश्रामबाग पाठशाळेवर प्रथम गोविंदाचार्य अष्टपुत्रे हे प्रधानाध्यापक होते. नंतर त्यांचे शिष्य धोंडशास्त्री डेग्वेकर प्रधानाध्यापक व हे उपप्रधानाध्यापक नेमले गेले. नंतर हेहि प्रधानाध्यापक झाले. त्या वेळचे पंडित त्र्यंबकशास्त्री शाळिग्राम, मोरशास्त्री साठे, राघवाचार्य रामानुज, राघवेंद्राचार्य गजेन्द्रगडकर, कृष्णाचार्य पंढरपुरकर व गोपीनाथदादा आगाशे वगैरे होते. त्या मंडळींत यांची विशेष चहा असे ( १८५६ ).

याच सुमारास विश्रामबाग पाठशाळेंत हे पाठ सांगत असतां एक परधर्मी अधिकारी आला. यांनीं पाठ बंद ठेविला. पण पुढें सहानुभूति ठेवणारे अधिकारी येतीलच आणि अनधिकारी लोकांना पाठ सांगण्याचा प्रसंग येणारच नाहीं अशी खात्री नसल्यानें यांनीं नोकरीचें त्यागपत्र देऊन देशान्तर करण्याचें ठरविलें, आणि तीर्थयात्रा करीत हे लष्कर ग्वाल्हेर येथें आले. तेथें राघवेन्द्राचार्यांचे पुत्र रामाचार्य यांनीं श्रीमंत बायजाबाई शिंदे सरकार यांच्यातर्फे यांना तेथें कायम राहून घेतलें.

तेथें यांचें अध्ययन-अध्यापनाचें कार्य चालू झालें. तेथें असतां यांनीं सगोत्रविवाहाच्या विरुद्ध निर्णय दिला ( १८५९ ). नंतर पुण्यास श्रीशंकराचार्य पीठ संकेश्वर व करवीर यांच्या नेतृत्वाखालीं यांना सरपंच नेमून पुनर्विवाहविषयक वाद झाला. आणि पुनर्विवाह अशास्त्र आहे, असा निर्णय झाला ( १८७० ). याच विषयावर पुनः मद्रास येथें वाद झाला. तेथें श्रीजगद्गुरु मध्वाचार्य सत्यवीरतीर्थ हे प्रमुख होते. दिवाणबहादूर आर. रघुनाथराव वगैरे मंडळी प्रतिपक्षी होती. तेथेंहि यांनाच सरपंचाचा मान देण्यांत आला. निर्णयहि वरच्याप्रमाणेंच झाला ( १८८४ ). नंतर यांना ब्रिटिश सरकारकडून 'महामहोपाध्याय' ही पदवी मिळाली. यानंतर यांनीं पुनः एकदां दक्षिणयात्रा मोठ्या समारंभानें केली. सिंहस्थांतील गोदायात्रा नाशिक येथें करावी, असा यांनीं निर्णय केला. पुढें ग्वाल्हेरीस गेले तेथें यांनीं विलायतेस गेलेल्या ब्राह्मणास प्रायश्चित्त नसल्याचा निर्णय दिला.

यांचा आचारावर मोठा कटाक्ष होता. अनधिकाऱ्याला विद्या देऊं नये, असा यांचा कटाक्ष असे.

यांचे प्रमुख शिष्य—१ सखारामाचार्य ( पुत्र ), २ वासुदेवाचार्य ( पुत्र ), ३ शुकाचार्य वासु. ( नातू ), ४ नारायणाचार्य वासु. ( नातू ), ५ वासुदेवाचार्य सखा. ( नातू ), ६ शंकरशास्त्री डेग्वेकर ( पंढरपूर ), ७ भिकाचार्य ऐनापुरे, ८ कांताचार्य पंडितराव (कोल्हापूर), ९ भालचंद्रशास्त्री गोळवलकर ( लष्कर ), १० व्यंकटरमणाचार्य शिरहट्टी ( सांगली-व्याकरण शालाध्यापक ),

११ पुरुषोत्तमशास्त्री साठे ( कानपूर ), १२ नंदकिशोर-भट्ट आशुकवि (नाथद्वारवल्लभाचार्य मठाचे विद्याधिकारी), १३ बलभद्रशास्त्री ( मुंबई ), १४ वामनाचार्य क्षीरसागर ( सद्धर्म-संपादक ), १५ दत्तात्रेयशास्त्री निगुडकर ( राजापूर संस्कृतपाठशालाध्यापक ), १६ बाळशास्त्री साने ( देवरुख ), १७ लक्ष्मण रघुनाथशास्त्री जोशी ( देवगड ).

यांचे ग्रंथः—१ शेखरभूषण, २ भागवतभूषण, ३ कुलदेवताभूषण, ४ विठ्ठलभूषण, ५ राधाकृष्णभूषण, ६ श्रीवेंकटेशसहस्रनामभूषण इत्यादि बारा भूषणें व सदाचारचंद्रिका ( यांत श्रावणी, श्राद्ध, संध्या, ब्रह्मयज्ञ वगैरे ) असे ग्रंथ संस्कृतमध्यें केले. त्यांपैकीं कांहीं मुद्रित व कांहीं अमुद्रित आहेत ( र. कृ. पाटणकर ).

**कवडे, कृष्णशास्त्री—** ( जन्म स. १८८३ )

सुप्रसिद्ध वैद्य व सार्वजनिक कार्यकर्ते. यांचा जन्म जुन्नर तालुक्यांतील पिंपरी गांवीं झाला. यांचें शिक्षण पुण्यांतच होऊन हे बी. ए. झाले आणि पुणें भावेस्कूल-मध्यें शिक्षकाचें काम करूं लागले. स. १९०५ सालच्या स्वदेशी बहिष्काराच्या चळवळीपासून हे स्वदेशीचे निस्सीम भक्त आणि लो. टिळकांचे कट्टे अनुयायी बनले. स. १९०८ सालीं टिळकांच्यावर झालेल्या खटल्याच्या हकीगतीचें पुस्तक यांनीं प्रसिद्ध केलें. त्या वेळच्या दडप-शाहीच्या काळांत तें साधें पुस्तकहि सरकारच्या डोळ्यां-वर आलें. तें पुस्तक तर जप्त झालेंच, शिवाय यांना भावेस्कूलमधील नोकरी सोडणें भाग पडलें. त्यानंतर कांहीं वर्षे हे लोकमान्य टिळकांच्या चिरंजीवांचे खासगी शिक्षक म्हणून काम करीत असत. राजकीय वातावरणांत अनेक स्थित्यन्तरें झालीं तरी अविचलितपणें टिळकांच्या तत्त्वांचा अभिमान धरणारीं यांच्यासारखीं माणसें विरळा.

याच वेळीं यांनीं स्वतंत्र धंद्याची तयारी म्हणून वैद्य-कीचा अभ्यास बाळशास्त्री लागवणकर आणि सदाशिव-शास्त्री भावे वैद्य यांचेपाशीं केला. अण्णासाहेब पटवर्ध-नांच्यापासूनहि यांनीं कांहीं धडे घेतले होते. स. १९११ सालीं यांनीं झंडु फार्मसीची एजन्सी घेतली आणि स्वतंत्रपणें वैद्यकीचा व्यवसाय सुरू केला.

हे जबर मेहनती, इंग्रजी, मराठी व संस्कृत भाषांचें त्यांत लेखन, वाचन व भाषण करण्यासारखें चांगलें ज्ञान असलेले, सार्वजनिक कार्य करण्याची नैसर्गिक आवड व चिकित्सक बुद्धि यांमुळें यांचें वैद्यकीच्या धंद्याचें बस्तान चांगलेंच बसलें. शिवाय हे अनेक कार्यांत आघाडीवर चमकूं लागले. स. १९१४ सालीं मथुरा निखिल-भारतीय वैद्यक संमेलनांत यांना 'वैद्य-पंचानन' ही मानाची पदवी देण्यांत आली. आणि यांच्या कामसू स्वभावामुळें स. १९१६ सालीं पुणें येथें भरलेल्या नि. भा. वैद्यक संमेलनाची जबाबदारी यांच्यावर टाकण्यांत आली. आणि कोचीनचे महाराज श्रीरामवर्मा यांच्या अध्यक्षतेखालीं तें संमेलन अत्यंत यशस्वी करून यांनीं भारतीय कीर्ति प्राप्त केली. आणि यांना राजमहेंद्री येथें भरलेल्या नि. भा. वैद्यक संमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान देण्यांत आला ( १९२२ ). त्यानंतर नि. भा. वै. संमेलनाचे प्रधानमंत्री व परीक्षक म्हणून अनेक वर्षे काम करून आयुर्वेदाच्या सेवकांतील आपलें प्रमुख स्थान यांनीं पुष्कळ वर्षे सतत टिकविलें.

गणेशोत्सव-मंडळ, पुणें नगरपालिका, सार्वजनिक सभा, वेदशास्त्रोत्तेजक सभा, वर्णाश्रम-स्वराज्य-संघ, स्वराज्य-पक्ष वगैरे विविध चळवळींत व संस्थांत यांचा प्रामुख्यानें भाग असे. पुष्कळ वर्षे यांच्या दवाखान्यांत पुण्यांतील विविध चळवळींचें केन्द्र असावयाचें. गांवां-तील गेल्या पिढींतील प्रमुख पुढाऱ्यांची बैठक यांच्या दवाखान्यांत असावयाची. त्यामुळें कांहीं वर्षे यांचा दवाखाना म्हणजे पुण्यांतील पुढाऱ्यांचें संमेलनस्थान व विविध चळवळींचें उगमस्थान होऊन राहिलें होतें. या सर्व व्यापाचा परिणाम या कष्टाळू व भावनाप्रधान माणसाच्या शरीरावर व धंद्यावरहि झाला.

या सर्व खटाटोपांत यांच्या आयुर्वेदीय कार्यासच केव्हांहि प्राधान्य द्यावें लागेल. पुणें नगरपालिकेंतील आयुर्वेदीय दवाखाना १९१२ च्या रेजिस्ट्रेशन कायद्यानें बंद होण्याचा प्रसंग आला होता, पण तो पुनः सुरू करण्याची यशस्वी खटपट यांनींच केली आणि त्याची आधींच असलेली लोकप्रियता कै. बाळशास्त्री लागवणकर यांच्या प्रयत्नानें रोजीं ४।५ शें रोगी येण्याइतपत वाढली व पुण्याबाहेरहि असे दवाखाने निघून चालूं लागले.

कै. शंकर दाजीशास्त्री पदे यांच्या खटपटीनें नि. भा. आयुर्वेद-महामंडळ सुरू झालें व ती संस्था नांवारूपाला आणून तिच्यामार्फत आयुर्वेदविद्यापीठ सुरू करून त्याद्वारा आयुर्वेदाचा अभ्यासक्रम तयार करणें, परीक्षा घेणें व तेथील पदवीधरांस लोकमान्यता मिळवून देणें इत्यादि आयुर्वेदाच्या उत्कर्षाला कारण होणाऱ्या गोष्टी प्रामुख्यानें करणाऱ्या वैद्यांत हे एक प्रमुख आहेत.

काश्मीरपासून कोलंबोपर्यंत व कच्छकाठेवाडापासून कलकत्त्यापर्यंतच्या बहुतेक वैद्यसंमेलनांना हे उपस्थित होते. हे उपस्थित असले म्हणजे ठराव, त्यांची भाषा, मान्यता व पुढील संस्कार पार पाडण्यास यांच्याशिवाय कोण पुढें होणार? हीं सर्व कामें यांनीं अत्यंत निरलसपणें करून यांनीं आपलें स्थान अढळ केलें. त्यामुळेंच म्हैसूर संमेलनापासून अहमदाबाद संमेलनापर्यंत पांच वर्षे आयुर्वेद-महामंडळ व आ. विद्यापीठ यांच्या कचेऱ्या पुण्यास ठेवून त्यांचें काम यांच्याकडे सोंपविण्यांत आलें. स. १९१८ सालीं इन्फ्लुएंझाच्या सांथींत यांनीं पुणें नगरपालिकेमार्फत आयुर्वेदीय रुग्णालय काढून तें यशस्वी रीतीनें चालवून दाखविलें.

स. १९२० नंतर राष्ट्रीय शिक्षण-संस्था काढण्याची दुसरी लाट उसळली. तेंव्हां यांनीं आयुर्वेद-शिक्षण-प्रधान संस्था स्थापण्याची खटपट करून टिळक महाविद्यालय स्थापण्यांत भाग घेतला. शेवटीं त्याला रुग्णालय जोडण्याची व्यवस्था केली. कै. नानलशास्त्री यांना यांचें सहकार्य असे. पुढें शुद्ध आयुर्वेदाचा वाद निघून हे कै. अप्पाशास्त्री साठ्यांच्या पक्षाला गेले व कै. नानल वगैरे मंडळी मिश्र-आयुर्वेद-पक्षांत गेली. मुंबई प्रान्तिक शुद्ध आयुर्वेद-संमेलन मुंबईस भरलें त्याचे हे अध्यक्ष होते. शिवाय अष्टांग-आयुर्वेद-विद्यालय, मराठी वैद्यकवर्ग व खासगी विद्यार्थी शिकविण्याचें यांचें काम सतत चालू असेच.

वैद्यक-पत्रिका संपादक, शिराधमनीवाद, क्षोमावरील संस्कृत निबंध, कांहीं औषधविषयक पुस्तकें असें लेखनकार्यहि यांनीं केलेलें आहे. यांचा साठीचा समारंभ वै. यादवजी त्रिकमजी आचार्य यांच्या अध्यक्षतेखालीं झाला. आतां सरकारी आयुर्वेद बोर्डांत हे निवडून आले आहेत.

**कँडी, मेजर टॉमस**—( जन्म स. १८०५–मृत्यु स. १८७७ ) मराठीचे कोशकार, शालेय पुस्तकांचे कर्ते व कायद्याच्या पुस्तकांचे भाषान्तरकार.

हे प्रथम हिंदुस्थानांत आले ते ईस्ट इंडिया कंपनीचे अधिकारी म्हणून (१८२२). स. १८३१ पासून यांनीं शिक्षणखात्यांत कामें केलीं. कॅप्टन मोलस्वर्थच्या मराठी-इंग्लिश कोशास यांनीं बरीच मदत केली होती. कॅप्टनसाहेबांच्या विलायतच्या प्रयाणामुळें अपूर्ण राहिलेला तो ग्रंथ यांनीं पूर्ण केला (१८४०-४७). या ग्रंथाची सुधारलेली आवृत्ति यांनीं पुन्हां एकदां काढली होती (१८७३). हे कांहीं वर्षे पूना कॉलेजमध्यें पहिले प्रिन्सिपाल (१८५१-५७) व डेक्कन कॉलेजमध्यें (१८६७) प्राध्यापक होते. माजी मराठी क्रमिक पुस्तकें, इंडियन पिनल कोड, सिव्हिल नि क्रिमिनल प्रोसिजर कोड यांचीं मराठी भाषांतरें यांनींच केलेलीं आहेत. शेवटीं कांहीं दिवस हे मराठी ट्रान्सलेटरहि होते.

**कंबळी, सर सिद्धप्पा तोटप्पा**—( जन्म स. १८८२ ) कर्नाटकांतील प्रसिद्ध लिंगायत व ब्राह्मणेतर पुढारी.

हे सरकारनियुक्त मंत्रिमंडळांत (१९३०-३७) व कूपर मंत्रिमंडळांत शेतकी व शिक्षण खात्याचे मंत्री होते. यांचें शिक्षण डेक्कन व फर्ग्युसन कॉलेजमध्यें झालें. एल्‌एल्‌. बी. झाल्यानंतर १९०६ ते ३० पर्यंत यांनीं धारवाडच्या कोर्टांत वकिली केली. १९२२ ते ३० पर्यंत हे हुबळी म्युनिसिपल बरोचे नॉन-ऑफिशिअल अध्यक्ष होते. १९२९-३० सालीं हे धारवाड डिस्ट्रिक्ट लोकल बोर्डाचे अध्यक्ष होते. १९२० सालीं यांनीं पहिली ब्राह्मणेतर-परिषद् भरविली. १९२० पासून मुंबई कायदे-मंडळाचे हे सभासद आहेत. १९२७ ते ३० पर्यंत हे मुंबई कायदे-मंडळाचे डेप्युटी प्रेसिडेंट होते.

हे पहिल्या कर्नाटक एकीकरण परिषद् ( बेळगांव ), महाराष्ट्र युनिव्हर्सिटी स्थापनेच्या विचाराकरितां भरलेल्या आमंत्रित शिक्षण तज्ज्ञ परिषदेचे शिक्षणमंत्री म्हणून ( १९३२ जुलै, पुणें ) अ. भा. वीरशैव परिषद् ( १९२७ बंगलोर, १९३६ रायचूर ) वगैरे ठिकाणीं हे अध्यक्ष व कानडी साहित्य-संमेलन उद्घाटक ( १९३३ हुबळी, १९३६ रायचूर ) होते. तसेंच राउंट टेबल कान्फरन्सचेंहि यांना निमंत्रण होतें पण हे जाऊं शकले नाहींत. यांना सरकारनें ' सर ' ही पदवी दिली ( १९३७ ).

**कॉटन, सर हेन्री जॉन स्टेडमन**—( जन्म स. १८४५–मृत्यु स. १९१७ नंतर )

हे अँग्लो-इंडियन अधिकारी असून राष्ट्रीय सभेचे अध्यक्षहि होते. यांचा जन्म तंजावर जिल्ह्यांतील कुंभकोण या गांवीं झाला. यांचें इंग्लंडमध्यें शिक्षण झाल्यावर बंगाल प्रांतांत यांची नेमणूक झाली. पुढें हे बंगाल सरकारचे मुख्य चिटणीस ( १८९१ ) व पुढें हिंदुस्थान-सरकारचे गृहमंत्री झाले ( १८९६ ). नंतर आसामचे चीफ कमिशनर म्हणजे लेफ्टनंट गव्हर्नर म्हणून यांची नेमणूक झाली. हें काम सहा वर्षे केल्यानंतर हे सेवा-

निवृत्त झाले. आणि यांना के. सी. एस्. आय्. या पदवीनें भूषविण्यांत आलें ( १९०२ ).

हे नोकरींत असतांनाच यांनीं ' न्यू इंडिया ' नांवाचें पुस्तक लिहिलें होतें ( १८८७ ). त्याची यांनीं यांची राष्ट्रीय सभेच्या मुंबईच्या अधिवेशनाचे अध्यक्ष म्हणून निवडणूक होण्याच्या सुमारास दुसरी आवृत्ति काढली. त्यांत यांनीं अमेरिकेंतल्याप्रमाणें हिंदुस्थानांत संयुक्त लोकसत्ताक राज्य स्थापण्याच्या योजनेचा पुरस्कार केला होता. शिवाय इंग्लंडांत राष्ट्रसभेच्या वतीनें निघणाऱ्या ' इंडिया ' पत्राच्या संपादकाचें कामहि हे करीत होते. बंगालमध्यें अधिकारी म्हणून असतां यांनीं बंगाल फाळणीस विरोध केला होता. तसेंच हिंदुस्थानांतील ब्रिटिशांचें राज्य तलवारीच्या जोरावर टिकलें नसून लोक तें चालू देतात म्हणूनच चालूं शकतें असें हे लिहीत व बोलत.

वरील प्रकारच्या यांच्या पूर्वपरंपरेमुळेंच यांना राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष करावें, अशा सूचना इंग्लंडहून येऊं लागल्या आणि यांनाहि इंग्लंडमध्यें पार्लमेंटच्या निवडणुकीस उभें राहावयाचें होतें त्या दृष्टीनें त्या सोयीच्या होत्या. अधिकारारूढ पक्षांच्या विशिष्ट भूमिकेवरून हिंदुस्थानास कांहीं फायदा होईल अशा त्या वेळच्या कल्पना असत. त्याप्रमाणें यांना स. १९०४ च्या मुंबईस झालेल्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष निवडण्यांत आलें. आणि पार्लमेंटमध्येंहि लिबरल पक्षातर्फे निवडणुकींत यश मिळवून यांचा प्रवेश झाला. दादाभाई नवरोजी व हे पार्लमेंटांत आपल्या पद्धतीप्रमाणें काम करींत असत.

हे लोकांचे हितकर्ते होते, तसेच ब्रिटिश सरकारचेहि हितकर्ते होते. लोकांच्या भावनांना योग्य वळण लावून असंतोष उत्पन्न न होतां ब्रिटिश राज्य कसें दीर्घकाळ टिकेल हेंच यांच्या सहानुभूतीचें सूत्र होतें. यांचा ' होम अँड इंडियन मेमरीज् ' ( १९११ ) हा ग्रंथहि यांच्या विचारसरणीवर व हिंदुस्थानच्या परिस्थितीवर प्रकाश पाडणारा आहे. ह्यूम, वेडरबर्न यांचीं चरित्रेंहि या दृष्टीनें अभ्यासण्यासारखीं आहेत.

**काणे, महामहोपाध्याय पांडुरंग वामन**— ( जन्म स. १८८० ) संस्कृत भाषा व हिंदुधर्मशास्त्र यांचे सुप्रसिद्ध अभ्यासक, चिकित्सक व लेखक.

हे रत्नागिरी जिल्ह्यांतील दापोलीचे राहणारे व तेथेंच यांचें मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण झालें. नंतर विल्सन कॉलेज मुंबई येथून हे एम्. ए. झाले व यांना ' झाला वेदान्त प्राइज ' मिळालें. निबंधाबद्दल यांना दोनदां ' मंडलिक गोल्ड मेडल ' व पारितोषिक मिळालें. यांनीं कायद्याची एल्एल्. एम्. ही परीक्षा दिलेली आहे. स. १९१३ सालीं हे मुंबई युनिव्हर्सिटींत ' विल्सन फॉयलॉलॉजिकल लेक्चरर ' होते. स. १९१५-१६ सालीं हे स्प्रिंगर रिसर्च स्कॉलर होते. तसेंच स. १९०९ व १९११ सालीं अनुक्रमें एल्फिन्स्टन व विल्सन कॉलेजांत हे संस्कृतचे प्राध्यापक होते. तसेंच स. १९१७-२३ पर्यंत यांनीं मुंबई सरकारी लॉ कॉलेजांत प्राध्यापकाचें काम केलें आहे.

यांशिवाय मुंबई व मुंबईबाहेरील अनेक संस्थांशीं यांचा निकट संबंध आहे. मुंबई रॉयल एशियाटिक सोसायटीचे हे व्हाइस-प्रेसिडेंट व फेलो, मुंबई विश्वविद्यालयाचे फेलो ( स. १९१९-१९२८ ), मुंबई मराठी ग्रंथ संग्रहालयाचे उपाध्यक्ष, द. ब्रा. को. हाउसिंग सोसायटीचे पूर्वींचे अध्यक्ष, मुंबई ब्राह्मण सभेचे ट्रस्टी वगैरे नात्यांनीं यांचा अनेक संस्थांशीं संबंध आहे.

यांनीं इंग्रजी व मराठी भाषेंत अनेक लेख व ग्रंथ लिहिले आहेत. त्यांत यांचा खोल अभ्यास व भरपूर माहिती स्पष्ट दिसून येते. यांचा ' हिस्टरी ऑफ धर्मशास्त्र ' ( भाग १-२ ) हा हिंदुधर्मशास्त्रावरील संशोधन व संकलन करणारा अनेक भागांतील ग्रंथ फारच महत्त्वाचा असून यांना भारतीयच काय पण जागतिक कीर्ति मिळवून देणारा होईल असें म्हणतात. यांनीं केलेल्या महत्त्वाच्या संशोधनात्मक लेखनाबद्दल यांच्या चहात्या विद्वान् मित्रांनीं यांच्या वयास साठ वर्षें पूर्ण झालीं तेव्हां यांना मोठ्या सन्मानानें इंग्रजी भाषेंतील एक लेखसंग्रहात्मक ग्रंथ अर्पण केला. ब्रिटिश सरकारनेंहि यांच्या विद्वत्तेचा गौरव करणारी महामहोपाध्याय ही पदवी यांना अर्पण केली. तसेंच मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीनें यांना ' कँबेल गोल्ड मेडल ' दिलें ( १९४४ ). हें मेडल दर तीन वर्षांनीं दिलें जातें. 'इंडियन अँटिक्विटीज ' वर प्रबंध लिहिणारांनाच हें दिलें जातें. सर जॉन मार्शल, प्रो. देवदत्त भांडारकर, प्रो. मक्डोनेल, डॉ. शामशास्त्री, सर गंगानाथ झा, दि. ब. कृष्णस्वामी आयंगार व प्रो. होडीवाला वगैरे बाराजणांना हें आतांपर्यंत दिलें गेलें आहे. हे तेरावे होत. यांना स. १९४५ च्या ऑल इंडिया ओरिएन्टल कॉन्फरन्सचे अध्यक्ष निवडण्यांत आलें.

**काथवटे, आबाजी विष्णु**—( जन्म स. १८४६–मृत्यु स. १९०७ )

हे वांईचे गृहस्थ पुण्याच्या डेक्कन कॉलेजांत बरींच वर्षे संस्कृतचे प्रोफेसर होते. यांचे ग्रंथः—१ शिक्षण व अध्यापन ( मराठी ), २ कीर्तिकौमुदी, ३ द्व्याश्रयकाव्य, ४ अथर्ववेद उत्तरभाग ( पुढले तीन संस्कृत ग्रंथ यांनीं संपादिलेले आहेत ).

**कादरबक्ष, सारंगीवाला**—( मृत्यु स. १९३४ )

बालगंधर्वाचा सारंगीवाला. नाकावर चांदीच्या फ्रेमचा चष्मा ठेवलेली, छोटीशी दाढी आणि लाल टोपी असलेली ही मूर्ति गंधर्वाच्या प्रेक्षकांचें लक्ष वेधीत असे. पुढें पुढें यांचा साथ इतका गाण्याबर-हुकूम होऊं लागली कीं, त्यांतून रफारसुद्धां स्वच्छ ऐकूं येत असे. एखादे दिवशीं हे साथीला नसले तर प्रेक्षकांतून विचारणा होऊं लागे.

हे गंधर्वांना नेहमीं 'महाराज' म्हणून संबोधीत, तर गंधर्व यांना सदोदित 'भय्या' म्हणून संबोधीत. यांची स्वरलोलुपवृत्ति ध्यानांत घेऊन 'विधिलिखित' नाटकाचे वेळीं गंधर्वांनीं यांच्याकडून बऱ्याचशा चाली पण घेतल्या. त्यांपैकीं 'का घातुक रुसवा' ही भैरवी तर फारच अप्रतिम होती. हें पद धंदेवाईक ग्रामोफोन कंपन्यांकरितां गाण्याचा योग आला नाहीं. पण कराचीचे धनाढ्य व्यापारी लाला लखमीचंद ईश्वरदास यांनीं आपल्या खासगी संग्रहांत तें रेकार्ड केलें आहे.

पदांतले शब्दन् शब्द मधुर सारंगीतून प्रगट करण्याच्या कसबामुळें एखादे दिवशीं बालगंधर्वाचा आवाज तितकासा बरा नसला तरी त्याची उणीव हे आपल्या सारंगीनें भरून काढीत. अशा या साथीवर खूष होऊन नाटक आटोपल्यावर 'नुसता तुमचा ऑर्केस्ट्रा मला ऐकावयाचा आहे' अशी इच्छा श्रीमंत सयाजीराव गायकवाडांनीं प्रदर्शित केली होती ('कलावंतांच्या सहवासांत'वरून ).

**कानिटकर, गोविंद वासुदेव**—( जन्म स. १८५४–मृत्यु स. १९१८ ) मराठी भाषेंतील सुप्रसिद्ध कवि व लेखक.

हे बी. ए. ( १८७६ ) व पुढें एल्‌एल्. बी. होऊन चार वर्षे वकिली केल्यानंतर यांना मुन्सफाची जागा मिळाली. नोकरीवर असतां यांनीं शेक्सपियरच्या हॅम्लेट, कोरिओलेनस, मर्चंट ऑफ व्हेनिस या तीन नाटकांचीं भाषान्तरें केलीं. जॉन स्टुअर्ट मिलच्या 'सब्जेक्शन ऑफ वुइमेन' या पुस्तकाचें 'स्त्रियांची परवशता' या नांवानें भाषान्तर केलें. स्पेन्सरच्या 'एज्युकेशन' या पुस्तकाचें मराठी भाषान्तर केलें. मुंबईस असतां बैरामजी मेहेरवानजी मलबारीशेट इंग्लंडला गेले असतां त्यांचें 'स्पेक्टेटर' हें पत्र हेच चालवीत. याशिवाय स्फुट लिहिण्याचें काम चालू असेच. यांच्या मराठी भाषेच्या सेवेबद्दल यांना पुणें येथील मराठी-साहित्य-संमेलनाचें अध्यक्षस्थान देण्यांत आलें होतें ( १९०६ ).

यांनीं मनोरंजन ( १८८६ ) मासिक काढलें. नंतर त्यांत निबंधचंद्रिकेचा समावेश केला व 'मनोरंजन व निबंधचंद्रिका' असें तें निघूं लागलें.

वरीलशिवाय यांचे ग्रंथः—१ कविकूजन ( संमोह-लहरी वगैरे कवितासंग्रह १९३३ ), २ बुद्धचरित्र ( संस्कृतांत काव्य ), ३ नारायणराव पेशवेवध काव्य, ४ अकबर काव्य, ५ कृष्णाकुमारी काव्य, ६ गीताञ्जलि, ७ मॅक्समुल्लरकृत धर्मविषयक व्याख्यानें ( कविकूजन प्रस्तावना— ले. अनुबाई वहिनीसाहेब घोरपडे, इचलकरंजी ).

**कानिटकर, नारायण बापूजी**—( जन्म स. १८५२–मृत्यु स. १८९७ ) मराठी भाषेंतील सुप्रसिद्ध नाटककार व पुणें येथील एक सार्वजनिक कार्यकर्ते.

हे मॅट्रिक झाले ( १८६८ ) आणि नंतर वकिलीची परीक्षा देऊन हे पुणें येथें वकिली करूं लागले. यांचा वकिलींतील जम चांगल्यापैकीं असे. त्या वेळीं नवे-जुने किंवा सनातनी-सुधारक असे विचाराचे दोन प्रवाह मोठ्या वेगानें वाहूं लागले होते. वर्तमानपत्रांत व घरांत सर्वत्र हेच वादविवाद चालत. यांच्या घरांत हे जुन्या मताचे आणि गोविंद वासुदेव हे नव्या मताचे असत. तसेंच यांना आपल्या परंपरेचा आणि मराठेशाहीचा अत्यंत अभिमान असे. तो यांच्या नाटकांत सर्वत्र प्रतिबिंबित झालेला दिसतो. महाराष्ट्राची रंगभूमि बारा वर्षे केवळ यांच्या गद्य नाटकांनीं गाजत होती असें म्हणणें अतिशयोक्तीचें होणार नाहीं. यांचीं नाटकें:—

१. मल्हारराव गायकवाड ( बडोद्याच्या विष-प्रयोग प्रकरणावर ). १८७४
२. शशिकला रत्नपाळ ( रोमियो-जुलियटच्या आधारें ). १८८२
३. प्रतापराव चंद्रानना ( सर वॉल्टर स्कॉटच्या केनिलवर्थ कादंबरीच्या आधारें ). १८८३

४. तरुणी-शिक्षण नाटिका ( सामाजिक ). १८८३
५. शिवाजी ( ऐतिहासिक ). १८८९
६. बाजीराव मस्तानी ( संगीत प्रेमबंधन ). १८९२
७. संमति कायदा. १८९२
८. न्यायविजय ( क्रॉफर्ड प्रकरणावर ). १८९२
९. भावी सुधारणा-प्रदीप ( शीघ्र सुधारणा दुष्परिणाम ). १८९२
१०. बाजी देशपांडे ( ऐतिहासिक, दुसरी आवृत्ति १९०५ ). १८९४
११. राजाराम ( अपूर्ण ). १८९६
१२. प्रतापगडचा मोहरा ( अपूर्ण ). १८९७

यांपैकीं बहुतेक पहिलें व शेवटचें खेरीज नाटकें रंगभूमीवर येऊन कांहीं तर अतिशयच लोकप्रिय झालीं होतीं. यांचें विवेचन जुन्याचा पुरस्कार करणारें आणि स्वाभिमानाला पोषक असे. मांडणी सोज्वळ व भाषा सफाईदार असे. तरुणीशिक्षण नाटिकेनें तर तेव्हां चांगलीच खळबळ उडविली होती.

शिवाय ते पुणें नगरपालिका सभासद, चिंचवडच्या मोरया गोसावी संस्थानचे ट्रस्टी आणि टिळकांच्या पक्षांतील विश्वासू कार्यकर्ते होते. यांचे चिरंजीव ग. ना. कानिटकर हे बाळूकाका म्हणून सर्वांच्या परिचयाचे आहेत.

**कानिटकर, नारायण विनायक**--( जन्म स. १८८७ ) दुर्जलकृषिसंशोधक.

हे बी. एस्सी. एम्. एजी. आहेत ( १९२१ ). यांचा विशेष विषय रसायनशास्त्र हा होय. एम्. एजी.च्या परीक्षेकरितां प्रादेशिक अर्थशास्त्र हा यांचा विषय होता. स. १९०९ मध्यें यांनीं शेतकी खात्यांत प्रवेश केला. त्यानंतर क्रमानें हे ' सॉइल फिजिसिस्ट ' या हुद्यापर्यंत चढले. १९२६ सालीं यांना मुंबई इलाख्याचे दुर्जलकृषिसंशोधक नेमण्यांत आलें व त्या जागेवरून हे १९४२ सालीं सेवानिवृत्त झाले.

यांना पहिल्यापासूनच दुर्जलकृषीचा म्हणजे थोड्या पावसावर पुरेपूर पीक काढण्याच्या विषयाचा नाद असे. १९३०-३१ सालीं हे अमेरिकेस गेले आणि तेथें या विषयाचें संशोधन व प्रत्यक्ष कार्य काय चाललें आहे याचा यांनीं सूक्ष्मपणें अभ्यास केला. मुंबई इलाख्याच्या सोलापूर व विजापूर या जिल्ह्यांतून पाऊस थोडा, कोठें जमीन उथळ व कोठें खोल काळी अशी आहे. अशा जमिनींत थोड्या पावसाच्या मदतीनेंहि पुष्कळ पीक कसें काढतां येईल याबद्दल यांनीं अत्यंत महत्त्वाची संशोधक कामगिरी केली असून, त्या कामगिरीला उपयुक्त संशोधक स्वरूपहि सुदैवानें हे सेवानिवृत्त होण्याच्या सुमारासच आलें; आणि या प्रकारें हें विशेष कार्य पूर्णतेस गेल्याचें श्रेय यांना मिळालें. या विषयावर यांनीं एक सुंदरसा ग्रंथहि लिहिला आहे. शिवाय शेतीविषयक रसायनशास्त्र, शेतीची प्रत्यक्ष कला व कांहीं समाजशास्त्रीय संशोधन यांनीं केलें आहे. जमिनीवर पडलेल्या पावसाच्या पाण्याचा किती अंश प्रत्यक्ष पिकास उपयोगी व किती व कोणकोणत्या प्रकारें फुकट जातो, व जमिनीवरून जो वाहून जातो तो जातांना जमिनीचा सकस भाग किती वाहून घेऊन जातो याची निश्चिती मुंबई इलाख्यांत यांनीं प्रथम केली. यांच्या संशोधनाचें सामान्य स्वरूप असें कीं थोड्या पावसाचे प्रदेशांत जो कांहीं पाऊस पडतो तो सर्वच्या सर्व जमिनींत जिरविण्यासाठीं जमिनीची बांधबंधस्ती समानतळींत घालतां येतील तेथें बांध घालून करावी, शेतीची नांगरट उतारकापती करावी, बी थोडें पेरून शेतांत झाडांची संख्या सामान्यतः घेतली जाते त्यापेक्षां कमी घ्यावी व जमिनीची वारंवार कुळवणी वगैरे करून जमिनींतील ओलावा हवेंत उडून जाऊं देऊं नये; म्हणजे शेतीतील थोड्या झाडांना या प्रकारें सांठवून ठेवलेला ओलावा पुरून त्यांना बीज येतें, पुष्कळशा झाडांचें गवत होऊन त्यांना दाणा न येतां तें सुकून जात नाहीं. शिवाय जें पावसाचें पाणी जमिनीवरून वाहून जातें तें जातांना सोलापूर जिल्ह्यातील दर एकरीं जमिनीवरून सामान्यतः दरसाल १०० गाड्या चांगली माती वाहून नेतें असें यांनीं सप्रयोग व सप्रमाण सिद्ध केलें. या संशोधनाचा परिणाम म्हणजेच सध्यां विजापूर, सोलापूर जिल्ह्यांत सरकारनें समपातळींत सार्वत्रिक बांध घालून ३।४ वर्षांत जमिनींची बांधणी शेतकऱ्याच्या खर्चानें करावयाचें प्रचंड खर्चाचें कार्य सुरू केलें हा होय. अर्थात् या प्रकारें चालू असलेल्या जमीनबांधणीच्या पद्धतीस ज्या सुधारणा हव्या आहेत त्यांचा निर्देश यांनीं आपल्या ग्रंथांत केला आहे.

( 1 ) Land and Labowr in an Indian Village No. 2, ( हा एम्. एजी. च्या परीक्षेकरितां संशोधनग्रंथ लिहिला ).

( 2 ) Dry Farming in India.

**कानिटकर, रावबहादुर वासुदेव बापूजी**—( मृत्यु स. १९०४ ) पुण्याचे सुप्रसिद्ध एंजिनियर व सार्वजनिक कार्यकर्ते.

गुजराथी, फारशी, इंग्रजी व मराठी या चार भाषा यांना फार उत्तम येत. केवळ स्वतःच्या गुणाच्या जोरावर चढत हे एक्झिक्युटिव एंजिनियरच्या जागेवर नेमिले जाऊन यांनीं तेथें पुष्कळ वर्षे काम केलें. सरकारनें यांना रावबहादुर पदवी देऊन गौरविलें होतें. पुणें नगरपालिकेचे हे अनेक वर्षे सभासद होते.

पुणें कॉंग्रेसचा सभामंडप यांच्या देखरेखीखालीं व यांच्या नकाशाप्रमाणें उभारला गेला. फर्ग्युसन कॉलेज पुणें, रे मार्केट पुणें, नगरवाचनमंदिर पुणें, आनंदाश्रम पुणें, भांडारकर-बंगला-संगम पुणें, जैनधर्मशाळा पुणें, एल्फिन्स्टन हायस्कूल मुंबई, सेक्रेटरिएट मुंबई, लक्ष्मीविलास राजवाडा बडोदें, फलटण वॉटर वर्क्स वगैरे इमारती यांच्या योजनेप्रमाणें झाल्या आहेत. शोभा, सोय आणि काटकसर यांचा उत्तम मेळ यांच्या योजनेंत असे. यांचें वाचन सूक्ष्म व भरपूर, स्वभाव स्वाभिमानी, करारी पण परोपकारी असे. यांचा ग्रंथः—१ चार नवलकथा.

**कानुगा, नित्यानंद**—( जन्म स. १९०० ) ओरिसा प्रान्तांतील कॉंग्रेस कार्यकर्ते व मंत्री. ह्यांचें शिक्षण रेव्हेनशॉ कॉलेज, कटक आणि लॉ कॉलेज, कलकत्ता यांत झालें. यांनीं कायदेभंगाच्या चळवळींत भाग घेतला व सहा महिन्यांची शिक्षा भोगली. त्याच्या परिणामामुळें हायकोर्टानें यांची सनद रद्द केली. हे कट्टे काँग्रेस-भक्त आहेत. हे ओरिसा पार्लमेंटरी पार्टीचे सेक्रेटरी होते व कटक कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष होते. ह्यांच्या सर्व कारकीर्दीवर लढाऊपणाची छाप पडली आहे आणि त्यामुळेंच लोकांच्या गळयांतील लाल होऊन राहण्याचा मान ह्यांना मिळाला आहे.

ओरिसामध्यें कॉंग्रेसनें स्थापन केलेल्या मंत्रिमंडळांत जमाबंदी व पब्लिक वर्क्स खात्याचे हे प्रधान होते. कोणत्याहि गोष्टीकडे अत्यंत मनापासून व आंतरिक दृष्टीनें पाहण्याच्या यांच्या परिपाठामुळें यांची कारकीर्द अत्यंत यशस्वी झाली.

**कान्हेरे, अनंत लक्ष्मण**—( फांशी स. १९१० एप्रिल १९ ) नाशिक येथें जॅक्सन नांवाच्या कलेक्टरचा गोळी घालून पिस्तुलानें खून केला म्हणून ठाण्याच्या तुरुंगांत तिघांना फांशीं दिलें त्यांपैकीं एक.

**कान्हेरे, सदाशिवशास्त्री**—( जन्म स. १८७८ ) सुप्रसिद्ध गीताप्रवचनकार व पुढें इंग्लंडमध्यें लंडन येथें इंग्लिश स्त्रीशीं लग्न करून राहणारे गृहस्थ. इकडे यांनीं गीतेवर प्रवचनें करून चांगली मान्यता व संपत्ति मिळविली होती.

हे १९१५ सालीं इंग्लंडला गेले व स. १९४५ च्या जानेवारींत परत आले. तेथें लंडन युनिव्हर्सिटींत संस्कृत व मराठी भाषेचे हे प्रोफेसर होते. तेथें यांनीं एका इंग्लिश स्त्रीशीं लग्न केलें. तिच्यापासून यांना एक वीस वर्षांची मुलगी आहे. तिच्या लग्नाची व्यवस्था करून यांनीं तिकडचे सर्व संबंध सोडून हे आतां इकडे आले आहेत. नुकताच प्रायश्चित्तविधि करून हे आतां पुनः शुद्ध शास्त्रीबुवा बनले आहेत. पुनः गीतेवर प्रवचनें देत हिंडावें अशी यांची इच्छा आहे. हे मुंबईस आले तेव्हां पं. राजेश्वरशास्त्री द्रविड, बनारस, यांना भेटले. पण त्यांनीं 'जाणूनबुजून दीर्घकाल यवनीसंसर्ग करणाराला प्रायश्चित्त नाहीं' असें सांगितलें.

**कामत, रामचंद्र कृष्ण**—( जन्म स. १८७२ ) धार्मिक ग्रंथांचे संशोधक व अभ्यासक.

यांचा जन्म गोमान्तक प्रान्तीं असनोडें गांवीं झाला. यांचे वडील मूळ बेळगांवाकडील चंदगड गांवीं राहणारे, सुखवस्तु माध्वसांप्रदायी गौड सारस्वत ब्राह्मण होते. पुढें सराफी धंद्यासाठीं ते तेथून शहापुरीं येऊन राहिले. तेथें यांचें शिक्षण मॅट्रिकपर्यंत झालें. यांचे गुरु पाटणेकर श्रीभाऊसाहेब फडणीस महाराज. त्यांच्या आज्ञेवरून हे बेळगांवच्या सुप्रसिद्ध रामतत्त्वप्रकाश छापखान्यांत मॅनेजरच्या कामावर राहिले. तेथें आलेल्या कामाच्या अनुभवावरून आणि लाभलेल्या विद्वानांच्या सहवासामुळें यांना श्रीगुरुचरित्रसंशोधनाची मूळ कल्पना सुचली, आणि आतां ती यांनीं यशस्वी करून दाखविली आहे.

बैलहोंगल येथें वामन नाईक यांच्या गिरणींत कॅशिअरचे नोकरीवर असतां श्रीटेंबेस्वामींच्या एका खासगी प्रवचनामुळें नामजपाचें महत्त्व यांना पटलें. नंतर यांचें 'नामचिंतामणि' हें पुस्तक तयार झालें. तसेंच भगवद्गीतेवरील निबंध, ईशप्रार्थनेची शक्ति हींहि लोकप्रिय पुस्तकें यांनीं लिहिलीं. हल्लीं हे एकनाथी भागवताचें संशोधन करीत आहेत.

**कामा, खरशेद्जी रुस्तुमजी**— ( जन्म स. १८३१; मृत्यु स. १९०९ ) पारशी समाजांतील सुप्रसिद्ध कार्यकर्ते व इराणच्या संस्कृतीशीं संबंध जोडणारे पुरुष.

मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें कांहीं दिवस अध्य-

यन केल्यानंतर यांनीं व्यापाराकडे लक्ष पुरविण्यास सुरुवात केली. प्रथमतः त्याकरितां यांनीं कलकत्ता व चीनची सफर काढली ( १८५४ ). यानंतर मंचरजी होरमानजी कामा व दादाभाई नौरोजी यांचे सहकार्यानें यांनीं लंडन येथें ' कामा अँड को. ' ही व्यापारी संस्था सुरू केली. इंग्लंडमधील पहिली हिंदी व्यापारी संस्था या दृष्टीनें या गोष्टीकडे विशेषेंकरून पाहावयास पाहिजे.

परंतु यांना पारशी समाज ओळखतो तें स्वतः इराणी भाषा शिकून ती आपल्या समाजबांधवांना शिकविणारे सत्पुरुष म्हणून; पद्टीचे व्यापारी म्हणून नव्हे.

यानंतर यांनीं फ्रान्स व जर्मनी येथें कांहीं दिवस वास्तव्य केलें. त्या देशांतील महापंडितांकडून इराणी भाषा व संस्कृति यांचें सम्यक् ज्ञान मिळवणें हा यांचा तेथील प्रमुख हेतु होता. याच वेळीं यांनीं फारसी, फ्रेंच व जर्मन यांचें अध्ययन केलें. प्रो. रॅप या जर्मन विद्वानांच्या कांहीं ग्रंथांचें यांनीं भाषांतर केलें आहे.

हिंदुस्थानांत परत आल्याबरोबर यांनीं आपल्या ध्येयाकडे लक्ष देण्यास सुरुवात केली. या सर्व कार्याचें श्रेय युरोपमधील वासाकडे देण्याचा यांचा प्रघात असे. हिंदुस्थानांत आल्याबरोबर यांनीं खालील गोष्टी करण्यास सुरुवात केली.

पारशी विद्यार्थ्यांना इराणी भाषेचा परिचय करून देण्याकरितां यांनीं एक वर्ग उघडला. प्रथमतः इतर कांहीं तरी उद्योग करून हा वर्ग चालविण्याचा यांचा प्रघात असे. परंतु पुढें आपलें सर्व लक्ष यांनीं यावरच केंद्रित केलें होतें.

यानंतरचें यांचें महत्त्वाचें कार्य ' जरदुस्ट्र-दिन 'नी खोल करणारी मंडळी ' या इराणी संशोधन-संस्थेच्या स्थापनेंत सामावलें आहे ( १८६४ ). अजूनहि ही संस्था व्यवस्थित चालली असून नवनवीन कार्यकर्त्यांना उत्साह देण्याचें पूर्वीचें काम या संस्थेनें पूर्वीच्याच जोमानें चालविलें आहे.

या काळची यांची आणखी एक महत्त्वाची चळवळ म्हणजे ' जरदुस्ट्र अभ्यास ' या मासिक पत्राचें संपादन होय ( १८६६ ). धार्मिक महत्त्व असणाऱ्या गोष्टींची व्यवस्थित माहिती जनतेला देणें हें यांच्या या मासिकाचें प्रमुख ध्येय होतें. १८६७ अखेर हें पत्र हे चालवीत असून एकंदर अकरा अंक या मासिकाचे निघाले आहेत.

याचप्रमाणें फारसी व इराणी भाषेंत संशोधन करणाऱ्या डॉ. हौग, प्रो. बॉप, प्रो. स्पाइगेल यांसारख्या विद्वानांना मदत करून उत्साहित करण्याचा यांचा सतत प्रयत्न असे. त्याचप्रमाणें 'मुल्ला फिरोझ मदरसा', 'जमशेटजी जिजीभाई झरथोष्ट्री मदरसा ' व ' नसरवानजी रतनजी टाटा मदरसा ' या इराणी संस्कृतीचें शिक्षण देणाऱ्या शिक्षण संस्थांशींहि यांचे असेच निकटचे संबंध असत.

या सर्व प्रयत्नांत, यांनीं बक्षिसें लावून निबंध मागविण्याचा प्रयत्न करून आणखी एक पाऊल पुढें टाकलें. याप्रमाणें व्हेन्दीदादच्या गुजराथी भाषांतरास रु. ८००, हेरोडोटसनें इराणी लोकांवर लिहिलेल्या ग्रंथावरील गुजराथी निबंधास रु. ५००, सर ऑलिव्हर लॉजच्या Substance of Faith चें पारशी दृष्टिकोनाच्या परीक्षणास रु. ५०० अशीं बक्षिसें यांनीं जाहीर केलीं होतीं. हे सर्व निबंध आतां प्रसिद्ध झालेले असून पहिला निबंध तर ग्रंथरूपानेंहि प्रसिद्धि पावला व शेवटचा निबंध मुंबई के. आर. कामा ओरि. इन्स्टिट्यूटच्या पत्रांत प्रसिद्ध झालेला आहे. ती संस्था यांच्या स्मरणार्थ स्थापिली आहे.

पारशी समाजांत आज दिसत असणाऱ्या शिक्षणप्रसाराचें श्रेयहि बहुतांशीं यांनाच आहे. शारीरिक, बौद्धिक व धार्मिक अशा तीनहि प्रकारच्या शिक्षणसंस्थांशीं यांचा घनिष्ठ संबंध असे. या सर्वांमध्यें पारशी धर्माच्या शिक्षणाचे क्षेत्रांत यांनीं केलेलें कार्य महत्त्वाचें आहे.

**कामा, भिकाजी रुस्तुम**— ( मृत्यु स. १९३६ ) सुप्रसिद्ध क्रांतिकारक देशभक्त स्त्री. भाई परमानंद वगैरे लोक इंग्लंडांत येण्यापूर्वीच या इंग्लंडांत येऊन स्थायिक झाल्या होत्या. दादाभाई नवरोजी ज्या वेळीं पार्लमेंटमध्यें निवडून आले तेव्हां यांनीं त्यांचेकरितां बरेच परिश्रम घेतले. परंतु पुढें पुढें नेमस्त राजकारणापासून सुरुवात करणाऱ्या यांचे मनांत हळुहळू कायाकल्प होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं.

त्यांतच १९०६ त यांनीं केलेल्या अमेरिकेच्या सफरीची भर पडली. यांची व सावरकरांची भेट झाल्यावर सावरकरांच्या सशस्त्र क्रांतिवादाचा पगडा यांचे मनावर बसूं लागला. याच वेळीं यांच्या उसळत्या भावनांचें द्योतक या नात्यानें यांनीं लाला लजपतराय व सरदार अजितसिंग यांचे हद्दपारीचे निषेधार्थ हिंदी लोकांना उद्देशून काढलेलें पत्रक पाहण्यासारखें आहे.

जर्मनींत होणाऱ्या आंतरराष्ट्रीय सोशॅलिस्ट कॉंग्रेसमध्यें हिंदुस्थानसंबंधींचा ठराव कोणत्या भाषेंत मांडावयाचा ही गोष्ट पं. श्यामजी कृष्णवर्मावर सोंपवण्यांत आली होती. सरदारसिंग, राणा व या यांनीं या परिषदेस हजर राहावें, असें क्रांतिकारक गोटांत ठरल्यावर मि. हिंडमन यांचेबरोबर या व ते स्टुटगार्ट येथें कॉंग्रेसला निघाले. या कॉंग्रेसला जाण्यापूर्वीच या दोघांनीं अभिनव-भारताची प्रतिज्ञा घेतली होती.

या कॉंग्रेसच्या इतर कामकाजाबरोबरच हिंदी प्रश्नांसंबंधीं विचार निघणें साहजिकच होतें. या कॉंग्रेसमध्यें हिंदी प्रश्न काढण्याच्याच विरुद्ध मि. रॅम्से मॅक्डोनॉल्ड वगैरे मंडळी होती. परंतु हिंडमन, जॉरिस वगैरे लोकांचा हिंदी प्रतिनिधींना भरपूर पाठिंबा मिळाल्यानें हिंदुस्थानसंबंधींचा एक महत्त्वाचा ठराव पास करण्यांत आला. हा ठराव कॉंग्रेसमध्यें पास करण्याचे पूर्वी या परिषदेंत यांनीं हिंदी 'राष्ट्रीय ध्वज' फडकाविला. या राष्ट्रध्वजावर 'वंदे मातरम्' अशीं अक्षरें स्पष्टपणें लिहिलीं असून त्यावर दाखवलेलीं आठ कमळें हीं हिंदुस्थानांतील आठ प्रांत सुचविणारीं होतीं. हिरवा, केशरी व तांबडा अशा तीन रंगांचे पट्टे त्यावर काढण्यांत आले होते. शक्ति, विजय व धैर्योत्साह या तीन महत्त्वाच्या गोष्टींचा निर्देश रंगांचे साहाय्यानें करण्याची ही कल्पना खरोखरच सुंदर आहे.

हा ध्वज घेऊन या त्या परिषदेंत उभ्या राहिल्या त्या वेळीं कोणी तरी राजघराण्यांतील स्त्रीच तेथें अवतरल्याचा सर्व प्रतिनिधींना भास झाला.

त्या वेळीं यांनीं मांडलेला ठरावहि असाच दणदणीत होता. 'हिंदुस्थानांत ब्रिटिशांची सत्ता चालू राहणें ही गोष्ट भारतीयांच्या हिताचे दृष्टीनें अतिशय विघातक आहे. त्या दलित देशांत वास्तव्य करणाऱ्या लोकांची संख्या जगाच्या एक पंचमांश आहे. या लोकांना दास्यमुक्त करण्याचे कामीं जगांतील सर्व स्वातंत्र्यप्रेमी लोकांनीं साहाय्य केलें पाहिजे. कारण कोणताहि समाज जुलमी व अनियंत्रित सत्तेखालीं राहूं नये, हीच गोष्ट जगाची सामाजिक घडी बसवण्यास आवश्यक आहे.'

या ठरावावरील यांचें भाषणहि असेंच खणखणीत होतें. हिंदुस्थानांतील अब्जावधि पौंड ब्रिटिश पळवीत असून त्यामुळें हिंदुस्थानची कशी दैना उडाली आहे याचें हृदयद्रावक वर्णन केल्यावर यांनीं 'उठल्यासुटल्या वसाहतींच्या प्रश्नावर चर्चा करतां, मग हिंदुस्थानसारख्या परायत्त देशाचें काय ?' असा रोखठोक सवाल टाकला. याच वेळीं सोशॅलिस्ट लोकांनाहि यांनीं हिंदी पक्षाकडे सहानुभूतीनें पाहण्याची विनंति केली होती.

**कॉयस, फादर जेन फर्डिनांड**—(जन्म स. १८७७–मृत्यु स. १९४४) हिंदुस्थानचे फ्रेंच मित्र व थोर संशोधक.

फ्रान्समधील ले मेर्डाक जिल्ह्यांतील एका लहानशा खेड्यांत यांचा जन्म झाला. टौलौझ येथें माध्यमिक शिक्षण पुरें केल्यानंतर हे ख्रिस्त-संघांत सामील होऊन हिंदुस्थानला आले (१८९५). विद्यार्थी ही यांची हिंदुस्थानांत येण्याविषयींची खरी भूमिका होती.

यांनीं आल्याबरोबर मदुरा-मिशनमध्यें अध्ययन करण्यास सुरवात केली, व त्याबरोबर त्रिचनापल्लीच्या सेंट जोसेफ कॉलेजशीं हे जोडले गेले. या ठिकाणीं यांनीं केलेल्या उपक्रमांपैकीं नॅचरल हिस्टरी म्युझियमची स्थापना ही गोष्ट विशेष महत्त्वाची आहे.

वेदान्त व तत्सम शास्त्रांचे अध्ययनाचा लाभ यांना क्युरेसिऑगच्या जेसुइट सेमिनरींत व नॉर्थ वेल्समधील सेंट ब्युनॉस कॉलेजमध्यें झाला. डब्लिनमधील सिलटाउन पार्कमध्यें यांना धर्मप्रचारकाची दीक्षा देण्यांत आली (१९०८). हीरेन एल्डेन, फ्लॅन्डर्स व फ्रेंच हाउस ऑफ फिलॉसफीमध्यें (गीमर्ट, हॉलंड) आपलें अध्ययन करीत असतांच यांना आपल्या शास्त्रीय ज्ञानाच्या भक्कम पायाविषयीं व अध्ययनाविषयीं शंका वाटूं लागली व पॅरिस युनिव्हर्सिटीच्या स्कूल ऑफ मेडिसिनमध्यें यांनीं ज्या वेळीं संशोधनास सुरवात केली त्या वेळीं तर ही शंका बळावतच चालली.

१९११ त हे हिंदुस्थानास परत आले व त्रिचनापल्लीच्या सेंट जोसेफ कॉलेजमध्यें केमिस्ट्रीचे प्रोफेसर म्हणून काम करूं लागले. या ठिकाणीं १९२२ पर्यंत काम केल्यानंतर सेंट झेवियर कॉलेजच्या (मुंबई) केमिस्ट्री विभागाचे दिग्दर्शक म्हणून यांची नेमणूक झाली.

या वेळपर्यंत एक उत्कृष्ट बायो-केमिस्ट म्हणून यांची ख्याति झाली होती. यांचें या विषयावरील प्रभुत्व लक्षांत आल्यावर हिंदुस्थानसरकारच्या विनंतीवरून मुंबईच्या हॉफकिन्स इन्स्टिट्यूटच्या फार्माकॉलॉजिकल लॅबॉरेटरीची स्थापना झाली (१९२४) व निवृत्त होईपर्यंत तेथें हें काम करीत असत (१९३२). इंडियन ड्रग इन्क्वायरी कमिटीचे सभासद, बॅांबे केमिकल

सोसायटीचे सभासद, मुंबई युनिव्हर्सिटीच्या फॅकल्टी ऑफ मेडिसिनचे सभासद व बी. ए., एम्. ए. च्या फ्रेंचचे परीक्षक अशा अनेक नात्यांनीं यांनीं हिंदुस्थान व हिंदी जनता यांची केलेली सेवा निश्चित महत्त्वपूर्ण आहे. या यांच्या कामगिरीबाबत फ्रेंच सरकारनें यांना ऑफिशियर डी ॲकेडमी ( १९२९ ) व ऑफिशियर डी लिन्स्ट्रक्शन पब्लिक ( १९३६ ) या पदव्या देऊन यांचा गौरव केला.

युद्धाचे धामधुमीच्या फ्री फ्रेंच कमिटीच्या कामांतहि यांनीं अशीच महत्त्वपूर्ण कामगिरी केली.

त्याचप्रमाणें मुंबईच्या प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियमच्या नॅचरल हिस्टरी सोसायटीचे अध्यक्ष व नॅचरल हिस्टरी सोसायटीचे कार्यवाह व त्या संस्थेच्या त्रैमासिकाचे एक संपादक या नात्यानें यांनीं केलेली कामगिरीहि कमी महत्त्वाची नाहीं. कोणतेंहि काम असो, त्यावर यांची कुशाग्र बुद्धि, स्पष्ट विचारशक्ति व शास्त्रीय विषयांच्या विद्यार्थ्याची तर्ककर्कशता यांची छाप पडलेली असावयाची आणि त्याचेच जोडीला आपल्या बुद्धीचा सद्व्यय करण्याची लागलेली उत्कंठा यामुळें यांचें कार्य निश्चित यशस्वी व्हावयाचें.

केवळ संशोधनापेक्षां व्यवहाराशीं ज्याचा अधिक मेळ बसतो अशा शास्त्रांचें अध्ययन करण्यांत यांचें मन विशेष रमे व त्यामुळेंच मानवी कष्ट कमी करण्यास मदत करणाऱ्या शास्त्रांच्या शाखा हा आपल्या कार्याचा प्रांत यांनीं निश्चित करून टाकला होता. हिंदुस्थानांतील जवळजवळ सर्व प्रांतांतील लोकांना सतत त्रास देणाऱ्या हुकवर्म व राउंडवर्मपासून होणाऱ्या रोगांवर जीं औषधें निघालीं आहेत त्यांचें Therapeutic मूल्य शोधून काढण्याचें काम यांनीं हॉफ्‌किन्स इन्स्टिट्यूटमधील आपल्या प्रयोगशाळेंत चालू ठेवलें होतें. या विषयावर यांनीं केलेल्या संशोधनापासून मिळालेले सिद्धांत इंडियन जर्नल ऑफ मेडिकल रिसर्चनें प्रसिद्ध केले असून सर्व शास्त्रीय मंडळांत एक व्यापक अध्ययन अशी या संशोधनास मान्यता मिळाली आहे. Pharmacology वरील पाठ्यपुस्तकांतहि त्याचा समावेश करण्यांत आला आहे.

सापाचें विष काढण्याचें यंत्र व त्यावरील औषधें हा यांच्या संशोधनाचा आणखी एक महत्त्वाचा प्रांत होता. पॅरिस म्युझियममधील सुप्रसिद्ध सर्पतज्ज्ञ डॉ. मेरे फिसलीक्स हे यांचे या संशोधनशाखेंतील सहकारी होते. जर्नल ऑफ फिजिऑलजी ॲंड पॅथॉलजी ऑफ पॅरिसमध्यें या दोघांनीं सापाचें विष काढण्याच्या यंत्राची रचना व कार्य यांसंबंधी केलेलें कार्य प्रसिद्ध झालें आहे. बहुधा बिनविषारी समजल्या जाणाऱ्या सापांचे जातींबद्दलचें हें संशोधन आहे. त्याच वेळीं हिंदुस्थानांत सर्पदंशावर अत्यंत गुणकारी समजल्या जाणाऱ्या औषधांच्या उपयुक्ततेवरील यांचें संशोधन चालूच होतें. या गोष्टींकरितां यांनीं अनेक आयुर्वेदिक व युनानी पद्धतींतहि कांहीं उपयुक्त औषध सांपडतें काय यासंबंधीं तपास केला. यासंबंधीं अगदीं त्वरित गुणकारी असें औषध यांना सांपडूं शकलें नाहीं. परंतु नाग व रसेल व्हेनम यांवर अतिशय उपयोगी म्हणून उपयोजिण्यांत येणारीं सर्व औषधें कोणताहि परिणाम दाखवीत नाहींत, ही गोष्ट यांनीं सिद्ध करून लोकांवर फार उपकार केले आहेत. या विषयावरील यांचा Indian Plant Remedies used in Snake-bite हा ग्रंथ सुप्रसिद्ध आहे.

ॲंटीव्हेनीनच्या केंद्रीकरणाच्या पद्धतीवरील यांचें संशोधनहि असेंच महत्त्वाचें असून प्लेगच्या केमो-थिरॅपीच्या संशोधनांतहि यांचा बराच मोठा हात होता. त्याचप्रमाणें हिंदुस्थानांतील उपयोगी औषधींचे व विषारी वनस्पतींचे यांना एकमेव तज्ज्ञ समजण्यांत येत असे.

त्याचप्रमाणें हिंदी औषधी वनस्पतींवर कीर्तिकर व बसु यांनीं केलेल्या संशोधनांत यांनीं सुचविलेले फेरफार देशी औषधें वापरणाऱ्या लोकांना महत्त्वाचे वाटण्याजोगे आहेत. याविषयीं चार खंडांत यांनीं प्रसिद्ध केलेलें A study of Indian Medicinal Plants हें पुस्तक या विषयावरील संदर्भग्रंथ मानण्यांत येतें. देशी पद्धतींत उपयोगिण्यांत येणाऱ्या निरनिराळ्या औषधांचें यांत वर्गीकरण करण्यांत आलें असून त्यांचा परिणाम व उपयोग यांची सखोल माहिती देण्यांत आली आहे. ज्या शास्त्रीय दृष्टीनें हे सर्व ग्रंथ लिहिले आहेत तिची सगळीकडे स्तुतिच झाली आहे. औषधी व विषारी वनस्पतींवर यांनीं बॉंबे नॅचरल हिस्टरी सोसायटीकरितां व कलकत्याच्या न्यू रिव्ह्यूकरितां एक लेखमालाहि लिहिली होती. ‘Notes on Indian Scorpions’ हा यांचा ग्रंथ प्रसिद्ध आहे. यांचे बहुतेक सर्व ग्रंथ डॉ. के. एस्. म्हसकर यांचे सहकार्यानें लिहिलेले आहेत.

आपलें सर्व आयुष्य हिंदुस्थानच्या सेवेंत व्यतीत करणाऱ्या हिंदुस्थानच्या पाश्चात्य मित्रांतील यांचें स्थान मोठें असून हिंदुस्थानचे हिताकरितां यांनीं घेतलेले श्रम बहुमोल आहेत.

**कालेलकर, दत्तात्रय बाळकृष्ण ऊर्फ काका**– ( जन्म स. १८८५ ) हिंदी व गुजराथी भाषेतील सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय लेखक.

सावंतवाडीजवळील एक लहानसें गांव यांचें जन्म-स्थान. यांचे वडील सरकारी नोकर होते. वडिलांची नोकरी नेहमीं फिरतीची, त्यामुळें प्रवासाचें बाळकडू यांना लहानपणापासूनच मिळालें, व त्यांतच भर पडली अंतर्मुख दृष्टीची. सृष्टीच्या व लोकजीवनाच्या आयुः-क्रमाकडे आत्मीयतेनें व तन्मयतेनें पाहण्याच्या वृत्तींत या गोष्टींचें पर्यवसान झालें.

कॉलेज शिक्षण घेत असतांनाच वंगभंगाची चळवळ सुरू झाली. ही चळवळ म्हणजे यांच्यासारख्या भावना-प्रधान गृहस्थाच्या मनाला चेतावणीच होती. कसेंबसें बी. ए. होऊन राष्ट्रीय शाळांमधून शिक्षणाचें काम कर-ण्यास यांनीं सुरुवात केली. याच वेळीं मुंबईच्या राष्ट्रमत या सुप्रसिद्ध मराठी दैनिकांतहि यांनीं काम केलें होतें.

परंतु यांना आपली अध्यापनाची खरी हौस पुरवून घेण्याची संधि मिळाली बडोद्याच्या गंगानाथ विद्यालयांत. परंतु हें सुखहि यांना फार दिवस मिळूं शकलें नाहीं. कारण वंगभंगाचे आंदोलनांत हें विद्यालय बंद पाडण्यांत आलें.

परंतु यांतूनच प्रवास करण्याची यांची अतृप्त आकांक्षा पुन्हां एकदां जोरावली. स्वामी आनंद, आचार्य कृपलानी व अनंतबुवा मर्ढेकर यांच्यासह यांनीं या वेळीं सर्व उत्तर हिंदुस्थानचा प्रवास केला.

परंतु हा प्रवास संपवितांच अध्यापनाकडे यांनीं पुन्हां एकदां लक्ष पुरविण्यास सुरुवात केली. हरिद्वारचें ऋषि-कुल, आर्यसमाजी गुरुकुल, राजा महेंद्रप्रताप यांचें प्रेम-महाविद्यालय, सिंधु-ब्रह्मचर्याश्रम, शांतिनिकेतन अशा किती तरी पीठांतून यांनीं आपले अगणित विद्यार्थी तयार केले. परंतु यांच्या दृष्टीनें या पीठाच्या सहवासाचा विशेष दुसराच आहे. आरंभीं क्रांतिवादी असणाऱ्या या गृहस्थांत कायाकल्प होऊन हळुहळू यांचें सेवापरा-यणी मनुष्यांत रूपांतर होत होतें !

यानंतर मात्र यांनीं गांधींच्या साबरमतीच्या आश्र-मांत राहावयाचें ठरविलें. शांतिनिकेतनमध्यें असते वेळे-पासूनच गांधींच्या सहवासाविषयींचें आकर्षण यांचे मनांत घोटाळूं लागलें होतें. त्याला आतां मूर्त स्वरूप मिळालें.

याच वेळीं गांधींनीं गुजराथ विद्यापीठाची योजना तयार केली. त्या वेळीं त्या संस्थेची स्थापना व जबाब-दारी व्यवस्थित पाडणारा यांच्याशिवाय शिक्षणतज्ञ गांधींच्या दृष्टिपथांत येऊं शकला नाहीं.

यानंतर गांधींनीं आपल्या आश्रमाचें स्थान वर्ध्याला हलविलें, त्याबरोबर हेहि तिकडेच राहावयास गेले. राष्ट्रभाषाप्रचाराचें मिशन हें यांनीं या वेळचें महत्त्वाचें कार्य होय.

भारतीय भाषासंघ, सार्वभाषिक वर्गकोश, हिंदुस्थानी प्रचार-सभा वगैरे अनेक उपाधींमुळें यांच्या 'काकावाडी' ची स्थापना झाली असून तिचे कार्यांत यांनीं मिळवलेलें यश केवळ स्पृहणीय आहे.

इतर कॉंग्रेस पुढाऱ्यांच्याप्रमाणेंच हेहि ' नऊ ऑगस्ट ' चळवळींत तुरुंगांत गेले होते.

परंतु गुजराथ–किंबहुना हिंदुस्थान–यांना ओळखतो, तें हे पट्टीचे साहित्यिक म्हणून, राजकारणतज्ञ म्हणून नव्हे. जन्मानें महाराष्ट्रांतील सारस्वत ब्राह्मण असून गुजराथी भाषेवर असणारें यांचें प्रभुत्व खरोखरच ' असामान्य ' या एकाच शब्दानें वर्णन करितां येईल.

यांच्या गुजराथी पुस्तकांत, कालेलकरना लेखो, दोन भाग ( विविध विषय ), जीवनविकास ( शिक्षणशास्त्र ), जीवनभारती ( साहित्य ), जीवनसंस्कृति ( संस्कृति धर्म ) हे निबंधसंग्रह; हिमालयनो प्रवास, ब्रह्मदेशनो प्रवास हे प्रवास व स्मरणयात्रा ( आत्मचरित्र ), जीवता तहेवारो, ओतरती दीवालो, लोकमाता, नक्षत्रमाला, जीवननो आनंद, सद्बोधशतकम्, लोकजीवन हे प्रबंध प्रमुख आहेत.

मराठी वाङ्मयांतील यांच्या ग्रंथांच्या अनुवादांची संख्या अशीच वाढत असून यांचे जवळ जवळ सर्व ग्रंथ मराठींत अनुवादित झाले आहेत. श्री. वा. कृ. चोरघडे हे त्यांचे सर्वसाधारण संपादक असून हिंडलग्याचा प्रसाद ( मराठी ) व हिमालयाचा प्रवास हे दोन ग्रंथ विशेष उल्लेखनीय आहेत.

कला–एक जीवनदर्शन, जीवनसाहित्य, गांधीवाद–समाजवाद ( संपादित ) व लोकजीवन हे यांचे प्रमुख हिंदी ग्रंथ होत.

यांचे ग्रंथ वाचीत असतांना किंवा यांच्या सहवासांत असतांना कोणती गोष्ट जर विशेष प्रामुख्यानें जाणवत

असेल तर यांचा सुसंस्कृतपणा. या मनुष्यानें हजारों मैलांचा प्रवास व तोहि डोळे, कान व हृदय हीं जागीं ठेवून केलेला आहे, याची जाणीव पटावी इतका बहुश्रुतपणा कोणाहि मनुष्याला यांचे ठिकाणीं दिसल्याशिवाय राहत नाहीं.

सौंदर्याची व कलेची अनासक्त पूजा हीच यांची सहजवृत्ति बनली आहे, आणि यांच्या प्रवासवर्णनांतील या गोष्टींमुळें यांस इतकी अनन्यसाधारण जनप्रीति लाभली आहे.

गुजराथी वाङ्मयसेवक यांचें ऋण मानतात, तें थोड्या वेगळ्या कारणांकरितां. गुजराथीमध्यें ह्रस्व-दीर्घांचें माजलेलें अराजक नाहींसें करण्याकरितां यांनीं तयार केलेला 'जोडणी-कोश' अतिशय परिणामकारक तोडगा ठरला आहे.

गुजराथी वाङ्मयावर आपली छाप—आपली प्रभावळ-निर्माण करण्यांतहि यांनीं असेंच मोठें यश मिळविलें आहे. यांची गुजराथी शैली ही बोलभाषेइतकी सुलभ पण अर्थगामी व मौलिक आहे. यांच्या कल्पना, उपमा, पर्याय सर्वच अपूर्व असल्यानें यांची एक स्वतंत्र धाटणी तयार झाली आहे. श्री. सुंदरम, उमाशंकर जोशी, स्नेहरश्मि, नगीनदास पारेख, भोगीलाल गांधी, चंद्रशंकर शुक्ल, कृष्णलाल श्रीधराणी यांसारखे लेखक आज गुजराथी साहित्यांत मोलाची भर घालीत आहेत; पण तें यांचें ऋण मान्य केल्यानंतरच !

गुजराथीनंतर एक राष्ट्रभाषासेवक म्हणून यांची योग्यता डोळयांत भरते. राष्ट्रभाषेच्या प्रश्नाला यांनीं दिलेली चालना व 'सर्वोदय' व 'सब की बोली' या पत्रांचे द्वारां यांनीं जनतेला दाखविलेलें तिचें विधायक स्वरूप पाहण्यासारखें आहे.

**काळी-कंबळीवाले, महात्मा**— ( अनुपलब्ध ) सुप्रसिद्ध परोपकारी संन्याशी. कोणा निराश झालेल्या व्यापाऱ्याला यांनीं उत्साह देऊन पुन्हां धंद्यांत घातलें. त्या व्यापाऱ्याचें भाग्य पुढे धंद्यांत उघडलें. व्यापाऱ्यानें देऊं केलेली कृतज्ञतेची भेट स्वीकारण्याचें यांनीं नाकारलें व सांगितलें "तुला पैसा खर्चच करावयाचा असेल तर हिमालयांतील यात्रेकऱ्यांचें दुःख नाहींसें करण्याकरतां कर." व्यापाऱ्यानें हृषीकेशपासून बदरीनारायणपर्यंत प्रवाश्यांकरतां मोठमोठ्या सोयी निर्माण केल्या. यांनीं या सर्वांवर देखरेख करण्याचें काम स्वीकारलें. हे स्वतः इतके विरक्त कीं आपल्या देखरेखीखालील अन्नछत्रांतसुद्धां जेवायचें तर तत्पूर्वी अमुक इतक्या घागरी छत्राच्या हौदांत भरल्या-खेरीज राहावयाचे नाहींत. यांनीं "पक्षपातरहित अनुभवप्रकाश" नांवाचा एक ग्रंथहि हिन्दींत लिहिला आहे. यांची कफनी काळ्या कांबळ्याची बनवलेली असे म्हणून यांचें नांव "काळी कंबळीवाले" असें पडलें होतें.

**काळे, त्र्यंबक गुरुनाथ**—( मृत्यु स. १९१४ ) रसायनशास्त्र व पुराणें यांचे अभ्यासक व संशोधक. यांचें घराणें मूळचें धारवाड जिल्ह्यांतील नरगेल या गांवचें. शुक्लयजुर्वेदी माध्यंदिन ब्राह्मण. यांचा प्रारंभींचा अभ्यास धारवाड येथें झाला. कॉलेजांत दाखल होण्यासाठीं हे पुण्यास आले. पण प्रतिकूल परिस्थितीमुळें यांना तें साधलें नाहीं. यांचा मराठी व संस्कृत–विशेषतः प्राचीन–ग्रंथांचा अभ्यास दांडगा होता. हुबळी येथें असतां यांनीं 'समालोचक' ( १९०८ ) नांवाचें मासिक काढलें होतें. पण तें फार वर्षे चालूं शकलें नाहीं. यांचे 'पुराण-निरीक्षण', 'भारतीय रसायनशास्त्र', 'रामायणनिरी-क्षण' हे ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहेत. 'भारतीय रसायन-शास्त्राचें' तर कानडी व हिंदी या भाषांत भाषांतरहि झालें आहे. हे अखेरीच्या दिवसांत पुणें, न्यू इंग्लिश स्कूलमध्यें संस्कृतचे शिक्षक होते.

यांचें वाङ्मयः—१ रसमंजरी-भाषान्तर, २ नित्यबोध-काव्य १९०२, ३ जपानची राष्ट्रभक्ति १९०५, ४ भारतीय रसायनशास्त्र, ५ रामायण-निरीक्षण १९१४, ६ पुराण-निरीक्षण १९१२.

**काळे, यादव माधव**— ( जन्म स. १८८१–मृत्यु स. १९४३ ) नागपूर कायदे-कौन्सिलचे अध्यक्ष, इतिहास-संशोधक, लेखक व बी. ए. एलएल. बी. वकील बुलढाणा ( वऱ्हाड ). हे मोठे मनमिळाऊ, अभ्यासक व लोकप्रिय गृहस्थ होते.

हे नागपूर कायदेकौन्सिलांत निवडून आलेले सभासद होते ( २४-३७ ). तेथें हे अध्यक्षहि झाले ( स. १९२६ ). तसेंच हे हैद्राबाद-संस्थान-प्रजापरिषद्-मुंबई-अधिवेशनाचे ( १९२६ ) व रावेरखेडी येथें होणाऱ्या बाजीराव उत्सवाचेहि अध्यक्ष होते ( १९३२ ).

तसेंच वऱ्हाड मध्यप्रांत व्हर्ना. लिटररी अॅकेडमी ( अध्यक्ष ), विदर्भ-साहित्यसंघ ( उपाध्यक्ष ), नागपूर-युनिव्हर्सिटी अॅकेडमी व एक्झिक्युटिव्ह कौन्सिल (मेंबर),

देशी भाषापरीक्षक-संघाचे प्रमुख वगैरे अनेक नात्यांनीं यांचा अनेक सरकारी व निमसरकारी संस्थांशीं संबंध असे.

यांचे ग्रंथः—१ वऱ्हाडचा इतिहास, २ गोंडांचा इतिहास, ३ शशिसेनाकाव्य (संपादित), ४ ऐतिहासिक पत्रें यादींचे संपादक ( सहकार्यानें ), ५ नागपूर प्रान्ताचा इतिहास ( १९३४ ), ६ नागपूर अफेअर्स ( पूना रेसिडेन्सी पेपर्स ), ७ नागपूर भोसल्यांची बखर ( संपादित ).

**काळे, रा. ब. रावजी रामचंद्र**—( जन्म स. १८६८–मृत्यु स. १९३६ ) साताराचे सुप्रसिद्ध वकील व सार्वजनिक कार्यकर्ते.

सातारा हायस्कूलमधून मॅट्रिकची परीक्षा पास होऊन हे डेक्कन व एल्फिन्स्टन कॉलेजमधून एम्. ए. झाले. मॅट्रिकच्या परीक्षेत पहिली 'जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ति' यांनीं मिळवली. यानंतर यांनीं एलएल. बी. पास होऊन वकिली करण्यास सुरुवात केली ( १८९२ ). यानंतर कांहीं दिवस हे सरकारी वकील व पब्लिक प्रॉसिक्युटर ( १९०२–२० ) होते. याचेच पाठोपाठ हे मुंबई कायदे-कौन्सिलांत निवडून आले व अगदीं थोड्या अपवादानें हे अखेरपर्यंत सतत निवडून येत. पहिल्या वार कौन्सिलमध्येंहि हायकोर्टतर्फे यांची नेमणूक झाली होती.

सातारा येथील लिबरल असोसिएशनचे संस्थापक ( १८९६ ) व कार्यकर्ते या नात्यानें हे प्रथम लोकांच्या डोळ्यांसमोर आले. साताऱ्याच्या नॅशनल लिबरल-लीगच्या संस्थापकांतहि हे प्रमुख होते.

हे साताऱ्याच्या 'ऐक्य' या साप्ताहिकाचे मूळ संस्थापक व संपादक होते. या पत्रांतील यांच्या स्पष्ट व सडेतोड विचारसरणीमुळेंच यांचेकडे घरचालत येणारें मंत्रिपद यांना मिळूं शकलें नाहीं.

प्रार्थनासमाजाचे चहाते व भक्तिमार्गाचे पुरस्कर्ते ही यांची आणखी एक महत्त्वाची भूमिका होती. न्या. मू. म. गो. रानडे व गो. कृ. गोखले हे यांचे राजकीय बाबतींतील गुरु व आदर्श होते.

यांच्या अभ्यासप्रधान व त्यागी सेवापर वृत्तीवर प्रकाश पाडणारी 'दि गोखले इन्स्टिटयूट ऑफ पॉलिटिक्स ॲंड इकॉनॉमिक्स' ( स्थापना स. १९३० ) ही संस्था आहे. हिच्याकरितां यांनीं भारतसेवकसमाजाला सव्वा लक्ष रुपये दिले. ना. गोखले यांनीं आपले गुरु महादेव गोविंद रानडे यांच्या नांवानें संस्था काढून ज्याप्रमाणें आपलें ऋण फेडलें त्याप्रमाणें यांनींहि पण गोखले यांचे नांवें राजकारण व अर्थशास्त्र यांचा सूक्ष्म अभ्यास करणारी ही संस्था निर्माण करून आपला गोखल्यांच्या कार्यपद्धतीसंबंधीचा उत्कट आदर व्यक्त केला. यांचे स्वतःचें नांव त्या संस्थेला देण्याची सूचना आली असतांहि यांनीं गोखल्यांच्या नांवें संस्था काढण्याचा हेतु सिद्धीस नेला यावरून यांच्या तत्त्वनिष्ठेची कल्पना येते. यांच्या हेतूप्रमाणें संस्थेचें कार्य चालू आहे. तिच्यामध्यें मुंबई युनिव्हर्सिटीच्या एम्. ए. परीक्षेस बसणारे अनेक पोस्ट ग्रॅज्युएट विद्यार्थी व्याख्यानादि रूपें शिक्षण घेत असतात. या संस्थेच्या कार्यकर्त्यांत यांचे जामात प्रि. ध. रा. गाडगीळ, यांच्याशिवाय श्री. व्ही. आर. गाडगीळ, बी. एजी. ( मुंबई ), एम्. एस्‌सी. ( कॅलिफोर्निया ) व श्री. एल्. व्ही. गोगटे, बी. एस्. ( एन्. करोलिना ) हे सद्गृहस्थ आहेत.

या संस्थेतर्फे १ हिंदी अधिकाऱ्यांचे पगार, २ ओटावा करारांचें परीक्षण, ३ पुण्यांतील फळबाजाराची पाहणी, ४ महाराष्ट्रांतील सहा जिल्ह्यांतील मोटार बसेसच्या वहातुकीची पाहणी अशीं अभ्यासपूर्वक लिहिलेलीं प्रकाशनें प्रसिद्ध झालीं आहेत. यांपैकीं पहिलीं दोन प्रि. ध. रा. गाडगीळ यांनीं लिहिलीं असून बाकीचीं दोन त्यांच्या साहाय्यानें त्यांच्या मदतनीसांनीं लिहिलीं आहेत. आणखीहि कांहीं पुस्तकें तयार आहेत.

सतत कांहीं तरी सार्वजनिक कार्य करीत राहणें आणि लोकांना उपयोगी पडणाऱ्या शिक्षणप्रधान संस्थांना मदत करणें हा यांचा स्वभावच बनला होता.

या दृष्टीनें साताऱ्च्या न्यू इंग्लिश स्कूलच्या वाचनालयाकरितां यांनीं दिलेली पांच हजार रुपयांची देणगी व भाऊराव पाटलांच्या रयतशिक्षण संस्थेस दिलेले अकरा हजार रुपये उल्लेखनीय आहेत. त्याचप्रमाणें यांनीं साताऱ्च्या कन्याशाळेस आपला पंचवीस हजार रुपयांचा वाडा देऊन कन्याशाळा व महिलासदन या संस्था 'सौ. सत्यभामाबाई काळे-शिक्षणमंदिर' या नांवानें अनाथ बालिकाश्रमानें चालवाव्यात असें ठरवून दिलें.

तसेंच 'दि रामचंद्र बल्लाळ काळे आयुर्वेदिक डिस्पेन्सरी फंड' या नांवें ट्रस्ट करून पांच हजारांची देणगी दिली व आयु. धर्मार्थ दवाखाना चालविण्याची व्यवस्था केली.

मृत्यूपूर्वी यांनीं ' काळे धर्मादाय निधि ' निर्माण करून संस्था व गरीब विद्यार्थी यांना दरमहा सहाशें रु. देण्याची व्यवस्था केली आहे.

मुंबई इलाख्यांतील जमीनधारापद्धति ( लँड रेव्हेन्यु कोडच्या १९२८ च्या बिल नं. १४ च्या मसुद्याची इंग्रजी चिकित्सा ), गृह्यधर्मचंद्रिका–विवाहसंस्कार, राष्ट्रीय–शिक्षण, सनातनधर्म–दीपिका, शिक्षणाचा प्रश्न, गीताधर्म-कौमुदी ( इंग्रजी ) हे यांचे ग्रंथ सुप्रसिद्ध आहेत. श्री. चं. ह. पळणिटकरांनीं ' पुरुषोत्तम ' नांवाचें यांचें चरित्र प्रसिद्ध केलें आहे.

**काळे, प्रो. वामन गोविंद**—(जन्म स. १८७६ ) सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ व अनेक व्यापारी संस्थांचे प्रवर्तक.

हे पुणें न्यू इंग्लिश स्कूल व फर्ग्युसन कॉलेज पुणें येथें शिक्षण घेऊन एम्. ए. झाले. नंतर डेक्कन एज्यु. सोसायटींत आजीव सभासद म्हणून प्रविष्ट झाले ( १९०७ ). यांचा विषय इतिहास व अर्थशास्त्र हा होय. हे मुंबई विश्वविद्यालयाचे फेलो ( १९१९-१९२४ ), कौन्सिल ऑफ स्टेटचे सभासद ( १९२१-२३ ), तसेंच इंडियन टॅरिफ बोर्डाचे सभासद होते ( १९२३-२५ ). डेक्कन एज्यु. सो.चे चिटणीस म्हणूनहि यांनीं काम केलें आहे ( १९२५-२८ ).

हे राजकारणांत प्रागतिक पक्षाचे आहेत. राजकारण व समाजसुधारणा यांवर यांनीं मधूनमधून लिहिलें असलें तरी यांचे ग्रंथ अर्थशास्त्रावरच विशेष आहेत. यांनीं अर्थशास्त्राचा अभ्यास विशेषतः जर्मन भाषेंतून केला आहे.

हिंदी अर्थशास्त्राचे जनक मानले गेलेल्या रानड्यांच्या व गोखल्यांच्या शिष्यत्वाचा मान यांना मिळालेला आहे. अध्ययन, अध्यापन व लेखन या त्रयीच्या साहाय्यानें यांनीं आपल्या गुरूंची परंपरा अत्यंत उज्ज्वल रीतीनें चालविली. पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजमध्यें इतिहास व अर्थशास्त्र यांचे जवळजवळ वीस वर्षेंपर्यंत हे प्राध्यापक होते. याच वेळीं आपल्या बहुमोल व बहुगुणी लेखांनीं यांनीं हिंदी अर्थशास्त्रीय विचारांना चालना दिली आहे.

इंडियन इकॉनमिक असोसिएशनचे हे प्रथमपासूनच एक मोठे कार्यकर्ते असून त्या संस्थेच्या इंडियन जर्नल ऑफ इकॉनमिक्स या पत्राचे अनेक वर्षे संपादक आहेत. बनारसला भरणाऱ्या इंडियन इकॉनमिक कॉन्फरन्सचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें होतें; परंतु त्याच वर्षी सरकारनें ' फर्स्ट इंडियन टॅरिफ बोर्ड'वर यांना नेमल्यानें तें स्थान हे स्वीकारूं शकले नाहींत. परंतु मग म्हैसूर येथें भरलेल्या इंडियन इकॉनमिक कॉन्फरन्सच्या १२ व्या अधिवेशनाचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें. त्या वेळीं यांच्या अध्यक्षीय भाषणाचा विषय ' इकॉनमिक्स इन इंडिया ' हा होता ( १९२९ ).

मुंबई सरकारनें नेमलेल्या लोकल सेल्फ गव्हर्नमेंट कमेटीचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें होतें (१९३८). सहकारी पतपेढ्या हा यांचा अत्यंत आवडीचा विषय असून त्यामधील एक थोर कार्यकर्ते व ग्वाल्हेर संस्थानचे सल्लागार या नात्यानें यांची योग्यता केव्हांहि मोठीच आहे.

यांच्या भूतपूर्व विद्यार्थ्यांनीं लिहिलेल्या स्फुटांचा संग्रह असणारा ' हिस्टॉरिकल अँड इकॉनमिक स्टडीज ' हा ग्रंथ यांना सादर करण्यांत आलेला आहे. मुंबई प्रांतांतील विद्यार्थिविश्वांत हे किती लोकप्रिय गृहस्थ आहेत याचा हा जिवंत पुरावाच आहे.

अर्थशास्त्रीय विषयांवरील यांचे ग्रंथ केव्हांहि प्रमाणभूत मानण्याइतके महत्त्वाचे आहेत. अर्थशास्त्रीय, व्यापारी व उत्पादक अशा अनेक संस्थांशीं यांचे संबंध निगडित झालेले आहेत.

यांचे ग्रंथः—( १ ) बँका व त्यांचे व्यवहार (मराठी), ( 2 ) Indian Industrial and Economic Problems, ( 3 ) Indian Administration, ( 4 ) Indian Economics, ( 5 ) Dawn of Modern Finance in India, ( 6 ) Gokhale and Economic Reforms, ( 7 ) India's War Finance, ( 8 ) Currency Reform in India, ( 9 ) Constitutional Reforms in India, ( 10 ) Economics of Protection in India, ( 11 ) Economics in India, ( 12 ) Problems of World Economy, ( 13 ) India's Finance Since 1921.

' अर्थ ' या मराठी साप्ताहिकाचे हे संस्थापक व संपादक आहेत.

**किबे, सरदार माधवराव विनायकराव**—( जन्म स. १८७७ )

इंदूर येथील सुप्रसिद्ध राजकारणज्ञ, संशोधक, अभ्यासक; संस्कृत, इंग्रजी, हिंदी व मराठी भाषेंत लेखनादि करणारे विद्वान् गृहस्थ.

यांचें घराणें मूळचें संगमेश्वरचें ( जि. रत्नागिरी, ता. राजापूर ); उपनांव 'देवेश्वर'. पुढें 'नाईक' म्हणूं लागले व नंतर 'किबे' म्हणून प्रसिद्ध झाले.

हें घराणें २०० वर्षांपूर्वी खानदेशांत चोरवाड प्रान्त, उत्राण येथें येऊन राहिलें. व पुढें होळकरशाहींत महेश्वरास आलें. तेथें विठ्ठल महादेव यांचे वडील बंधु बाळाजी महादेव हे जोगांचे पेढीवर काम करीत होते. विठ्ठल महादेव यांनींहि आपल्या कर्तबगारीस त्याच पेढीवर सुरवात केल्यामुळें ते आपणास जोग म्हणवूं लागले.

विठ्ठल महादेव हे श्रीमंत यशवंतराव महाराज होळकर यांच्या फौजेंत कर्नल फुलन् यांच्या कंपूंत तोफांवर अधिकारी होते. पुण्याच्या लढाईंत त्यांनीं स्वतः तोफा डागल्याचें अस्सल पत्र उपलब्ध आहे. त्यांना तुळसाबाईचा वध करून तिच्या फौजेनें नवं. १८१७ मध्यें कैदेंत घातलें.

विठ्ठल महादेव यांचे हातून ६ जाने. १८१८ रोजीं होळकरांच्या फौजेचा महत्पूरचे लढाईत सपशेल पराजय झाल्यानंतर मंदोसरचा तह होळकर सरकार व ईस्ट इंडिया कंपनीमध्यें झाला. त्यांनीं मरेपर्यंत होळकरशाहीचा कारभार केला. त्या वेळीं फौजेचे बखेडे व सरंजामी सरदारांचीं उत्पन्नें कमी करून, देशांत शांतता नांदवून व मुबत्ता वाढवून राज्याचें उत्पन्न ४ पासून २६ लक्षांवर नेलें. आमच्या मध्ययुगीन चरित्रांत विठ्ठल महादेव किबे ऊर्फ तात्या जोग यांचें चरित्र दिलें आहे. त्या विठ्ठल महादेवाचे सध्यांचे माधवराव हे वंशज होत. त्यांचा वंशक्रम असाः– महादेव-विठ्ठल-गणेश-विनायक-माधव.

हे संस्कृत, मराठी, इंग्रजी व हिंदी या भाषा उत्तम जाणणारे, त्यांतील वाङ्मयाचा व्यासंग करणारे आणि शेवटल्या तीन भाषांत लेखन करणारे आहेत. शिवाय राजकारणी मुत्सद्दी हा आपल्या घराण्याचा लौकिकहि यांनीं उत्तम प्रकारें संभाळला आहे. त्यामुळेंच रावबहाद्दूर ही इंग्रज सरकारकडून व वजीर–उद्दौला (अर्थ– "सचिवोत्तम") ही होळकर सरकारकडून पदवी देऊन यांचा गौरव करण्यांत आला आहे.

धाकटी पाती ( देवास ) चे हे दिवाण ( स. १९११-१४ ); इंदूरच्या महाराजांचे हे हुजूर सेक्रेटरी ( स. १९१४-१६ ); एक्साइज व होम मिनिस्टर ( स. १९१६-२६ ) व डेप्युटी प्राइम मिनिस्टर ( स. १९२६ ते १९३३ ) होते.

मराठी व हिंदी भाषेच्या विशेष सेवेमुळें ते महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे मुंबई ( स. १९२६ ) व मुंबई इलाख्याच्या सरदार, जहागिरदार, इनामदार, तालुकेदार परिषदेचे अध्यक्ष होते ( स. १९३१ ).

कोल्हापुरास श्रीमंत महाराजा गायकवाड न आल्यानें मराठी साहित्य संमेलनाचे हे अध्यक्ष होते ( १९३२ ). महाराष्ट्र साहित्य परिषदेचे अनेक वर्षें व मराठी साहित्य सभा इंदूरचेहि अध्यक्ष आहेत. इंदूरच्या धारासभेचे लोकनियुक्त सभासद आहेत.

यांचा व्यासंग मोठा व्यापक असून त्यांत सूक्ष्मताहि असते. पुराणवस्तु, प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन इतिहास, अर्थशास्त्र, राजकारण व साहित्य या विषयांवर यांचे लेख प्रसिद्ध झालेले आहेत. त्यांपैकीं मोहेंजोदारो व हरापा येथील संस्कृति भूमिगत केव्हां झाली असेल त्याचा रामायणावरून यांनीं लावलेला छडा व लंकेचा शोध महत्त्वाचा वाटतो.

यांचे लेख-वेदकालनिर्णय ( ग्रंथमाला–कोल्हापूर ), सार्वत्रिक, सार्वजनिक व सक्तीचें शिक्षण इत्यादि मराठी व दि लीग ऑफ नेशन्स व इंडियन स्टेट्स, करन्सीज इन इंडियन स्टेट्स, ब्रिटिश इंडियन सी कस्टम्स् ड्यूटी अँड इंडियन स्टेट्स हे इंग्रजी ग्रंथ महत्त्वाचे आहेत.

**किर्लोस्कर, बळवंत पांडुरंग ऊर्फ आणासाहेब**—( जन्म स. १८४३–मृत्यु स. १८८५ )

मराठी रंगभूमीवरील संगीत नाटकाचे नवयुगप्रवर्तक आचार्य, रसिक नाटककार व हौशी नट.

धारवाड जिल्ह्यांत गुर्लहोसूर गांवीं यांचा जन्म झाला. वयाच्या बाराव्या वर्षापर्यंत यांनीं कानडी-मराठींचा अभ्यास घरींच केला. पुढें इंग्रजी दोन इयत्तांचा अभ्यास यांचा कोल्हापूर येथें झाला. नंतर धारवाड येथें अभ्यास करून यांनीं मुलकी परीक्षा दिली. नंतर शिक्षणाकरितां यांना पुणें येथें ठेवण्यांत आलें. तेथें यांनीं कविता कराव्यात, नाटकें पाहावींत असा क्रम ठेविला. हरदास लोकांकरितां आणि पौराणिक नाटकांकरितांहि हे पदें करून देत. पुढें यांनीं भारत शास्त्रोत्तेजक नाटक मंडळी काढली आणि नगर येथें जाऊन 'विक्रम चरित्र' व 'बाजीरावाचा फार्स' वगैरे नाटकें केलीं. पण पुढें मंडळींतील लोक फुटल्यानें व यांनाहि घरच्या लोकांचा धाक उत्पन्न झाल्यानें हे गांवीं जाऊन तेथेंच राहूं लागले ( १८६६ ).

दक्षिणा प्राइझ कमेटीनें बक्षीस लावल्यावरून यांनीं घरीं बसल्या बसल्या शिवाजी महाराजांवर ५०० आर्या केल्या. पण तें बक्षीस यांना न मिळतां महादेव मोरेश्वर कुंटे यांच्या शिवाजी काव्यास मिळालें. नंतर बेळगांव येथें यांनीं आठ वर्षे शिक्षकाची नोकरी केली. तेथें असतांना स. १८७३ सालीं यांनी 'श्री शांकरदिग्विजय' हें गद्य नाटक लिहिलें. गायन, नाटक वगैरे यांचा छंद चालूच होता. त्या नोकरीनंतर यांनीं पोलीस खात्यांत जमादारीची व पुढें लवकरच रेव्हेन्यु कमिशनरचे आफिसांत नोकरी पत्करिली. ऑफिसच्या कामासाठीं हे पुण्यास आले असतां यांनीं एका पारशी कंपनीचें नाटक पाहिलें आणि यांना आपल्या मित्रमंडळीच्या साहाय्यानें नाटक करण्याची तीव्र इच्छा झाली. यांनीं स्वतःच संस्कृत शाकुंतलाचें मराठी भाषान्तर करून तें आपल्या निवडक सहकार्यांकडून क्रमानें रंगभूमीवर आणिलें. त्याच्या अपूर्व यशानें यांनीं कंपनीची रीतसर स्थापना केली, मिळकतीचा हिस्सा सर्वांना दिला आणि सौभद्र नाटक लिहून तें रंगभूमीवर आणलें. संपूर्ण महाराष्ट्राचें लक्ष यांनीं आपल्याकडे ओढून घेतलें. रसपूर्ण नाटक, उत्तम गुणी लोकांचा नटवर्ग आणि वैभवपूर्ण हौशी योजकता यांमुळें रसिक-अरसिक सर्वच लोकांत यांची चहा सुरू झाली. त्यानंतर यांनीं रामराज्यवियोग हे नाटक लिहिण्यास घेतलें. तीन अंक लिहून चवथा अंक सुरू केला आणि यांना देवाज्ञा झाली. यांच्या मंडळीला इंदूर सरकारचा आश्रय होता. हे खुद्द रेव्हेन्यु कमिशनरच्या आफिसनंतर इंदूर सरकारचे नोकर होते. पण कंपनीच्या दगदगीनें प्रकृति बिघडून मधुमेहाच्या विकारानें यांचा लवकर शेवट झाला. शेवटीं यांनीं आतुरसंन्यास घेतला होता. यांचे परमार्थ मार्गांतील गुरु रामचंद्रबुवा तिकोटेकर नांवाचे एक वेदान्तमार्गी गृहस्थ होते. मोरोबा वाघोलीकरांनींहि त्यांचाच उपदेश घेतलेला होता.

यांचें वाङ्मयः— १ फुटकळ उपलब्ध पद्यें सुमारें १९ कथाभागांवरील, २ अल्लाउद्दीनाची चितुडगडावरील स्वारी नाटक (१८७० सुमार अपूर्ण), ३ शांकरदिग्विजय नाटक (१८७३), ४ शाकुन्तल नाटक (पहिला प्रयोग ३१ ऑक्टो. १८८०, आनंदोद्भवनाटकगृह पुणें, प्रथम चार अंकी प्रयोग. १८८२ सालीं भाऊराव कोल्हटकर आल्यावर शकुन्तलेला पदें घालण्यांत आलीं), ५ सौभद्र, (पहिला तीन अंकी प्रयोग १८ नवें. १८८२, पहिला पांच अंकी प्रयोग मार्च १८८३), ६ रामराज्यवियोग (पहिले फक्त तीन अंक, पहिला प्रयोग २० ऑक्टो. १८८४).

शांकरदिग्विजयाचा मंगलाचरणाचा प्रवेश पूर्वीचीं गणपति-सरस्वतीचीं पात्रें गाळून यांनीं लिहिला असला तरी त्यावर पूर्वीच्या नाटकांची छाप आहे. विचित्र पोषाख केलेला विदूषक, त्याच्या बालिश कोट्या आणि तदनुरूप अभिनय हा तेथें यांनीं घातला आहेच.

कालिदासाच्या जगद्विख्यात शाकुंतल नाटकाचें यांचें भाषांतर सरस उतरलें आहे. मराठींत झालेलीं इतर भाषान्तरें प्रयोगाला व गाण्याला गैरसोयीचीं असून तितकीं सरस नाहींत. तथापि मूळ नाटकाचें बंधन असल्यामुळें तितकें आटोपसर, ठसठशीत व उठावदार वाटत नाहीं. पण शेवटलीं दोन नाटकें मात्र अगदीं स्वतंत्र व यांच्या उज्ज्वल प्रतिभेचा उत्कृष्ट नमुना आहेत. त्यांत चटकदार संवाद, कथानकाचा विकास, स्वभावपरिपोष, काव्यरचना, विनोद इत्यादि नाटकास आवश्यक असणारे गुण चांगले दृष्टीस पडतात.

शाकुन्तल नाटकाचें भाषान्तर, या दोन नाटकांतील प्रस्तावना व रचनाविशेष यांवरून यांचा संस्कृत भाषेचा आणि विशेषतः नाटकांचा अभ्यास चांगलाच व्यक्त होतो. तथापि केवळ नवीनपणापेक्षां संवादांचा चटकदारपणा, सहजमनोहर अशी पद्यरचना या गुणांमुळें यांचीं हीं नाटकें मराठीचे अविनाशी अलंकार झाले आहेत. आबालवृद्धांना घटकाभर करमणूक करून आनंद देण्याच्या बाबतींत यांच्याइतका यशस्वी नाटककार अद्यापि झाला नाही.

यांच्यापूर्वी होणारीं पौराणिक नाटकें सूत्रधार, विदूषक, गणपति व सरस्वती यांच्या अनुक्रमानें होणाऱ्या प्रवेशानें सुरू केलीं जात. यांनीं संस्कृत भाषेंतील पद्धतीचेंच अनुकरण केलें आणि सूत्रधार व पारिपार्श्वक यांचेकडून मंगलाचरणपूर्वक नटीशीं संभाषण करून नाटकाची प्रस्तावना केली. पौराणिक नाटकांतील सर्वच पात्रांचीं पदें सूत्रधारांनीं म्हणण्याची पद्धतिहि यांनीं बंद करून सूत्रधाराचें काम प्रस्तावनेपुरतेंच ठेवून त्या त्या पात्रास गाण्यास लावलें. पौराणिक नाटकांत विदूषक केव्हांहि प्रवेश करी तेंहि यांनीं बंद केलें. पौराणिक नाटकाला तुटक व चमत्कृतिप्रधान रूप आलें होतें तेंहि बदलून यांनीं सलग व रसाविर्भाव करणारी मांडणी करण्यास सुरवात केली. नाटक-मंडळ्यांचें बकाली स्वरूप नाहींसें करून त्यांना शिस्तवार व भार-

दस्त रूप दिलें. व्यसनी, अशिक्षित व हलक्या समजल्या जाणाऱ्या लोकांच्या ताब्यांत नाट्य संस्था होती ती यांनीं गुणी, सुशिक्षित, वजनदार व कलावान् लोकांच्या ताब्यांत आणली. नाटकांच्या रचनेंत यांनीं आमूलाग्र बदल केला त्याप्रमाणें नाटक-मंडळींच्या रचनेंतहि यांनीं अनदीं नवी व भारदस्त व्यवस्था उत्पन्न केली. एखाद्या राजाच्या मर्जीवर नाटकमंडळ्या न चालतां स्वतःच्या कलेवर व्यवस्थित चालतील अशी आर्थिक आंखणी करण्याचें श्रेयसुद्धां यांनाच द्यावयास पाहिजे. संगीताच्या कल्पनेंतसुद्धां यांनीं क्रान्ति केली. पूर्वी हरदासी पद्धतीवर रचलेलीं पदें नाटकांत प्रायः एकाच माणसानें म्हणजे सूत्रधारानें म्हटलेलीं ऐकण्याचा प्रसंग श्रोत्यांवर येई. पण यांच्या योजनेप्रमाणें वेगळाल्या चालींवर रचलेलीं सरस पदें वेगळाल्या नाणावलेल्या गायकांच्या तोंडून ऐकण्याची संधि श्रोत्यांना मिळूं लागली. पोषाख वगैरे बाबतींतहि अशीच क्रान्ति होत होत महाराष्ट्रांतील रंगभूमि आणि तीवर काम करणाऱ्या नटांनीं हिंदुस्थानांतील कोणत्याहि प्रान्तांपेक्षां आपला या कलेंतील व व्यवस्थेंतील अग्रेसरपणा चांगलाच व्यक्त केला आणि अजूनहि तो टिकविल्याचें श्रेयसुद्धां यांच्या भव्य आणि व्यापक योजकतेलाच द्यावें लागेल. समाजांतील तत्कालीन श्रेष्ठ पुढाऱ्यांचें सहकार्य मिळविण्याच्या यांच्या प्रयत्नासुद्धां महत्त्व द्यावयास पाहिजे. यांच्या हस्तपत्रकावर लो. टिळक वगैरेंच्या सह्या असत व यांच्या सल्लामसलतगारांतहि त्या वेळच्या न्या. रानडे, डॉ. गर्दे वगैरेंचा समावेश असे.

कर्तृत्व, गुणग्राहक भव्य दृष्टि आणि यांची यांना स्वस्थ बसूं न देणारी हौस या एकापेक्षां एक प्रकारांनीं यांच्या कर्तृत्वाचा प्रकर्ष झालेला आहे. कलेचा आविष्कार हा उचंबळून आपण होऊन प्रगट होत असतो. याबाबत यांचें उदाहरण नमुनेदार आहे. यांना नाट्यकलेची पराकाष्ठेची हौस. हे स्वतःहि नाटकांत कामें करीत. यांचीं सूत्रधार, बलराम व दशरथ हीं कामें प्रसिद्ध आहेत. यांना आवाजाची देणगी नसली तरी यांचा अभिनय चांगला व अर्थपूर्ण असे. आपल्या इष्टदेवतेच्या भक्तीचें निदर्शक असें यांनीं एक शिवपंचायतनाचें घेतलेलें चित्र प्रसिद्ध आहे. त्यांत यांनीं स्वतः शंकराची भूमिका पत्करून सुप्रसिद्ध नट भाऊराव कोल्हटकर यांस यांनीं पार्वतीची भूमिका देऊन मांडीवर घेतलें आहे, व इतर गण तयार करून शिवपंचायतनाचें चित्र काढलें आहे. या शिवपंचायतनाची किर्लोस्कर नाटक मंडळींत नित्य पूजा होत असे. यावरून यांच्या हौशी आणि रंगेल स्वभावाची, तसेंच मनांत आलेली कल्पना उत्कृष्टपणें व्यवहारांत आणण्याची चिकाटी, खर्चिकपणा आणि कलादृष्टि नजरेस येते.

मोरोबा वाघोलीकर, बाळकोबा नाटेकर, शंकर बापूजी मुजुमदार, भाऊराव कोल्हटकर, इत्यादि यांचे सहकारी होते. यांपैकीं पहिले तीन अगदीं प्रारंभापासून असून पुढले यांना क्रमानें येऊन मिळाले.

यांच्या सहकारी मंडळींनीं यांच्यानंतर कृतज्ञता प्रगट करण्याकरितां यांच्या नाटकांचे पुण्यामुंबईस प्रयोग करून त्याचें अठरा० रुपये उत्पन्न यांच्या वडिलांस दिलें. किर्लोस्कर मंडळीच्या उत्पन्नांत यांच्या पत्नीस अडीच आण्याचा हिस्सा ठेवून तो कायमपणें पोंचविला. त्यांनींहि गुर्लहोसुर या गांवीं यांच्या नांवें 'बळवन्तेश्वर' नांवाचें शिवालय बांधून त्याच्या पूजाअर्चेची व तेथें अन्न छत्र चालविण्याची व्यवस्था केली. किर्लोस्कर नाटक मंडळी यांच्या मागें पुष्कळच वर्षें अत्यंत वैभवानें व रुबाबानें चालली (१९२४). शेवटपर्यंत तिच्या व्यवस्थेचें काम कै. शंकर बापूजी मुजुमदार यांनीं चालविलें. 'किर्लोस्कर नाटक-गृह' बांधून त्यांचें भव्य स्मारक उभारलें. यांच्या कंपनींत भाऊरावांनंतर बालगंधर्वांसारखे विख्यात नट उदयास आले. अलीकडे यांची जन्मशताब्दि महाराष्ट्रांत साजरी झाली व यांचे ग्रंथ 'समग्र किर्लोस्कर' म्हणून प्रसिद्ध करण्यांत आले.

**किर्लोस्कर, लक्ष्मण काशीनाथ**—( जन्म स. १८६९ ) सुप्रसिद्ध कारखानदार. यांचा जन्म धारवाड येथें झाला. इंग्रजी पांच इयत्तांपर्यंत शिक्षण झाल्यावर मुंबई व्हिक्टोरिया ज्युबिली टेक्निकल इन्स्टिट्यूटमध्यें यांनीं दहा वर्षें शिक्षकाची नोकरी केली. नंतर वडील बंधूंसह यांनीं बेळगांव येथें सायकल-दुरुस्तीचें दुकान काढलें. स. १९०० सालीं शेतकीचीं लोखंडी आउतें तयार करण्याचा कारखाना काढला. अशा प्रकारचा हा हिंदुस्थानांतील पहिलाच कारखाना होय. स. १९१० सालीं कारखाना बेळगांव येथून औंध संस्थानच्या हद्दींत आणून किर्लोस्करवाडीची स्थापना केली. पुढें क्रमानें वाढ होत होत १९२० सालीं यांच्या चालकत्वाखालीं १६ लक्ष रुपये भांडवलाच्या लिमिटेड कंपनींत त्याचें रूपान्तर करण्यांत आलें. तेव्हांपासून किर्लोस्कर बंधु लि. या कारखान्याची भरभराट वाढतच आहे.

गेल्या दोनतीन वर्षांत किर्लोस्कर कारखान्याची आणखीहि बरीच वाढ झाली आहे. किर्लोस्करवाडी-प्रमाणें म्हैसूर संस्थानांतील हरिहर येथेंहि किर्लोस्कर कारखान्याचें एक भावंड निर्माण झालें असून त्याची उत्तरोत्तर अधिकाधिक प्रगति होत आहे. किर्लोस्कर-वाडीच्या कारखान्यांत सध्यां दीड हजाराहून अधिक लोक काम करीत आहेत. दोनशें अश्वशक्तीचीं एंजिन्स तयार करण्याचें काम किर्लोस्कर बंधु लवकरच हातीं घेणार असून त्याची पूर्वतयारी चालू आहे.

कारखान्याव्यतिरिक्त यांना खासगी असें जीवन नाहीं, असें म्हटलें तर अतिशयोक्ति होणार नाहीं. पाऊणशें वयमान होऊन गेल्यामुळें हे दिसायला वृद्ध दिसतात आणि यांना दिसतेंहि कमी. परंतु, तरी देखील हे घरीं स्वस्थ बसून कधींच राहावयाचे नाहींत. कारखान्याच्या यंत्रशाळेंत कसल्या तरी प्रयोगांत गर्क असलेले हे आढळतील. यांना बसून किंवा पडून राहणें ही फार मोठी शिक्षा वाटते. यांना साधें सुपारीचेंहि व्यसन नाहीं. यांना व्यसन असलेंच तर तें सतत काम करीत राहावयाचें आणि फावल्या वेळीं वाचनाचें. गेलीं पंचवीस वर्षे हे खादीचेच कपडे वापरीत आलेले आहेत व यांनीं चहापान वर्ज्य मानलेलें आहे.

**किशनप्रसाद, महाराजाबहादूर सर**—( जन्म स. १८६४–मृत्यु स. १९४० ) हैद्राबाद संस्थानचे मुख्य प्रधान, राजकारणी मुत्सद्दी व प्रसिद्ध उर्दू कवि. हे सुप्रसिद्ध मोगल बादशहा अकबर याच्या दरबारीं असणाऱ्या राजा तोडरमल्लांचे वंशज. यांचें घराणें हैदराबाद राज्याचे संस्थापक निजाम-उल्मुल्क यांचेबरोबर प्रथम दक्षिणेंत आलें. आणि त्यांचे पदरीं आजपर्यंत नांदत आलें आहे. तेथें यांच्या घराण्याला मोठी जहागीरहि पण आहे. पेशकार म्हणजे अर्थसचिव हा यांच्या घराण्याचा हुद्दा आहे.

प्रथम हे पेशकार झाल्यानंतर यांना 'राजा राजायान महाराजा बहाद्दूर' ही पदवी देण्यांत आली (१८९२). नंतर मुख्य प्रधानाच्या जागीं यांना कायम करण्यांत आलें ( १९०१ ). ब्रि. सरकारनें पुढें के. सी. आय. ई. या पदवीनें यांना भूषित केलें ( १९०३ ), व निजाम-सरकारनें 'समीनुस्सलतनत' ही पदवी दिली. पुढें ब्रि. सरकारनें जी. सी. आय. ई. ही पदवी दिली ( १९०७ ).

यांची कारकीर्द हिंदु-मुसलमानांचें ऐक्य व प्रजेचा संतोष या दृष्टीनें समाधानकारक चालू असतांच व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन यांनीं वऱ्हाडचा आणि निजामाच्या कर्जाचा प्रश्न उपस्थित करून २५ लक्ष रुपयांच्या खंडणी-वर वऱ्हाडप्रांत ब्रिटिशांना कायमचा देण्याबद्दल प्रश्न उपस्थित केला आणि तो यांच्याकडून मान्य करून घेतला. त्या कारवाईंत यांना आणि ब्रिटिश सरकारला अनेकांनीं दोष दिला.

सध्यांचे निजाम उस्मानअली हे स. १९११ सालीं गादीवर आले आणि हैद्राबादच्या राजकारणांत क्रांति घडून आली. जवळजवळ सर्व वरिष्ठ जागांवर मुसल-मानांची नेमणूक होऊं लागली व यांना आपल्या मुख्य प्रधानाच्या जागेचा राजीनामा द्यावा लागला.

सर अली इमाम यांना मुख्य प्रधान नेमून अन्तर्गत सुधारणा व वऱ्हाड परत मिळविण्याचा प्रश्न धसाला लावण्यांत आला. पण लॉर्ड रेडिंग यांनीं वऱ्हाडची मागणी कायमची नाकारली आणि निजामसाहेब अन्तर्गत सुधारणेकडे वळले. तेव्हां कार्यकारी मंडळाच्या अध्य-क्षाच्या जागीं यांची नेमणूक करण्यांत आली (१९१६), पण वार्धक्यामुळें यांना ती जागा सोडावी लागली ( १९३७ ) व सर अकबर हैदरी हे संस्थानच्या कार-भारांत व अधिकारांत लक्ष घालूं लागले.

हे अत्यंत विद्वान् व बहुश्रुत होते. फार्शी व उर्दू भाषेचा यांचा व्यासंग मार्मिक होता. उर्दूंत हे कविता करीत. यांचा बराच कवितासंग्रह प्रसिद्ध झालेला आहे. तो वेदान्ती पद्धतीचा गूढगुंजनात्मक आहे.

यांचें वर्तन संग्राहक धार्मिक पद्धतीचें असे. हे सर्व धर्मांच्या लोकांशीं अत्यंत समानतेनें वागत. दानधर्म उदारहस्तें करीत. हे रस्त्यानें चालले म्हणजे पैसे उधळीत. यांच्या बऱ्याच पूर्वी झालेले निजामसाहेबांचे दिवाण व यांचे पूर्वज राजा चंदूलाल यांच्या औदार्याची उज्ज्वल परंपरा यांनीं पुढें चालविलेली होती ( चंदूलाल पाहा ).

**किशोरीदत्तशास्त्री**—( मृत्यु स. १९४३ )

कानपूरचे सुप्रसिद्ध वैद्य व वैद्यकावरील ग्रंथकार. नि. भा. आयुर्वेद महामंडळाचे व विशेषतः त्याच्या विद्यापीठाचे हे जीव कीं प्राण होते. पुष्कळ वर्षे त्या संस्थांचे हे मंत्री होते. 'आयुर्वेद-संमेलन-पत्रिके'चे हे पुष्कळ वर्षे संपादक होते ( १९३७–१९४३ ). शिवाय 'चिकित्सक' नांवाचें मासिकहि यांनीं पुष्कळ वर्षे चालविलें. यांनीं जयपूर राजकीय संस्कृत कॉलेजच्या

शास्त्री व आयुर्वेदाचार्य या परीक्षा दिल्या होत्या. हे संयुक्तप्रांत आयुर्वेदमंडळाचे 'आयुर्वेदभूषण' व पोपट प्रभुराम आयुर्वेद कॉलेज मुंबईचे 'प्राणाचार्य' होते.

यांचे ग्रंथः—(१) गृहवस्तुचिकित्सा, (२) प्रमेह-चिकित्सा, (३) मकरध्वज, (४) सरलचिकित्सा. शिवाय यांच्या प्रेरणेनें प्रसिद्ध झालेले व संशोधून प्रसिद्ध केलेले संस्कृत ग्रंथ पुष्कळच आहेत (आयुर्वेदाचार्य पां. ह. देशपांडे).

**किंकेड, चार्लस ऑगस्टस**—(जन्म स. १८७०) प्रसिद्ध इतिहास-लेखक, अभ्यासक व आय्. सी. एस्. अधिकारी. शेरबर्न स्कूल व ऑक्सफर्डचें बॅलिओल कॉलेज येथें आपलें माध्यमिक व विश्वविद्यालयीन शिक्षण संपवून हे हिंदुस्थानला आले (१८९१). कराचीचे असि. कलेक्टर म्हणून यांनीं प्रथमतः काम करण्यास सुरवात केली. या जागेवरून चढत जाऊन निवृत्त होण्याचे सुमारास हे मुंबई हायकोर्टाचे न्यायाधीश बनले होते.

या सर्व कारभारांत यांना सर्व हिंदुस्थानचा प्रवास घडून हिंदी इतिहास, संस्कृति व आचारविचार यांमध्यें एक प्रकारची विशेष गोडी वाटूं लागली. हिंदी इतिहासा-वर यांनीं लिहिलेले यांचे ग्रंथ यांच्या या तन्मयतेचें जिवंत स्मारक होऊन आपणांसमोर खडे आहेत.

हिंदुस्थानांतील-विशेषतः सिंध, गुजराथ व महाराष्ट्र या प्रांतांतील सहवासानें उत्पन्न झालेल्या उत्कंठेनें, ऐतिहासिक माहिती मिळवून यांनीं ती छोट्या छोट्या पुस्तकांत एकत्र केली आहे. नाविन्याचे दृष्टीनें आपल्या देशी वाचकांना त्यांत विशेष महत्त्व वाटलें नाहीं तरी हिंदुस्थानची बदनामी करण्याचा पद्धतशीरपणें प्रयत्न ब्रिटिशांकडून होत असतां त्यांतील सौंदर्यस्थळें दाख-वण्याचा प्रयत्न त्यांच्याच एका जातभाईनें करावा हें विशेष कौतुकास्पद आहे.

सर्वच दृष्टींनीं रा. ब. द. ब. पारसनीस यांचे सह-कार्यानें यांनी लिहिलेला History of Marattha People हा त्रिखंडात्मक (१९१८, २२, २५) ग्रंथ विशेष महत्त्वाचा आहे. त्यामुळें यांचें नांव उच्चारतांच हा ग्रंथच प्रामुख्यानें डोळ्यांसमोर उभा राहतो.

यांच्या इतर ग्रंथांत (1) Deccan Nursery Tales (1914), (2) The Indian Heroes (1915), (3) The Tale of the Tulsi Plant, (4) The Out-laws of Kathiawar, (5) Tales from Indian Epics, (6) Tales of King Vikrama, (7) Tales of the Saints of Pandharpura, (8) Istur Phakde (1917), (9) The Hindu Gods and How to Recognize Them (1920), (10) Shrikrishna and other Stories (1920), (11) Tales from the Indian Drama, (12) The Anchorite, (13) Tales from Old Sind, (14) Folk Tales of Sind and Gujerat, व (15) Our Parsee Friends हे ग्रंथ प्रमुख आहेत.

यांचे चिरंजीव डेनिस किंकेड हेहि मुंबई इलाख्यांत सरकारी नोकर होते. त्यांचें 'Grand Rebel' हें शिवाजीच्या चरित्रावरील पुस्तक विशेष चटकदार म्हणून प्रसिद्ध आहे.

**कीथ, डॉ. आर्थर बेरीडेल**—(जन्म स. १८७९-मृत्यु स. १९४४) वैदिक वाङ्मय नि संस्कृत भाषा यांचे सुप्रसिद्ध पंडित व राज्यघटनाशास्त्रज्ञ.

एडिंबरो येथें आपलें प्राथमिक शिक्षण संपवून यांनीं बॅलिओल कॉलेजमध्यें प्रवेश केला (१८९७). यांचे पुढचेच वर्षी 'बोडन संस्कृत स्कॉलरशिप' मिळवून हे बी. ए. झाले. प्राच्यविद्या हा यांच्या अभ्यासाचा प्रमुख विषय होता. अशाच तऱ्हेनें प्रावीण्य मिळवून हे 'डॉक्टर ऑफ सिव्हिल लॉ', 'होम सिव्हिल सर्व्हिस' व 'आय. सी. एस्.'च्या परीक्षा पास झाले.

इंग्लिश वसाहतींच्या विभागांत प्रथमतः यांनीं काम करण्यास सुरवात केली. Colonial Navigation Conference ला हे ब्रि. सरकारचे प्रतिनिधि म्हणून हजर होते. या खात्यांत असतांना यांनीं इतक्या तन्मय-तेनें काम केलें कीं, वरच्या अधिकाऱ्यांनीं त्याबद्दल यांना शाबासकी तर दिलीच, परंतु त्याबरोबर ज्या वसाहतींशीं यांचा संबंध आला, त्यांच्या धन्यवादाचा लाभहि यांना मिळाला. या दृष्टीनें अलास्का बौंड्री अरबिट्रेशनमध्यें यांनीं केलेल्या कामगिरीबद्दल यांना देण्यांत आलेले धन्यवाद प्रमुख आहेत.

परंतु या कामाचे धबडग्यांत आपल्या आवडत्या अध्ययनापासून-पौर्वात्य भाषांच्या अध्ययनापासून-यांना कांहीं काळ दूर राहावें लागलें. परंतु त्या अध्ययनाची संधि येतांच ती यांनीं दवडली नाहीं. प्रो. मॅक्डोनेल हिंदुस्थानच्या सफरीवर जातांच त्यांचे जागीं संस्कृतचे

'बोडन प्रोफेसर' म्हणून यांची नेमणूक झाली (१९०७-०८). त्यानंतर संस्कृतचे 'रीजियस प्रोफेसर' म्हणून नेमणूक होण्याची संधि मिळतांच तीहि यांनीं दवडली नाहीं. आणि येथेंच यांच्या लौकिक आयुष्यास खरी सुरवात होते.

जवळजवळ तीस वर्षे अखंडपणे अध्ययन, अध्यापन व लेखन यांकरितां यांनीं आपणास वाहून घेतलें. प्रत्येक शास्त्रांत आपली स्वतंत्र दिशा प्रकट करणारी यांची बुद्धि, त्यामुळेंच यांच्या अभ्यासांत येणारी विविधता व कोणत्याहि गोष्टीचा अगदीं सूक्ष्मपणें विचार करण्याची यांची संवय कोणाहि इतिहासाभ्यासकाला आदरणीय वाटावी इतकी व्यापक आहे. यांचे गुरु प्रो. मॅक्डोनेल यांच्या सहकार्यानें यांनीं लिहिलेला 'Vedic Index of Names and Subjects' हा द्विखंडात्मक ग्रंथ यांच्या सर्व ग्रंथांत महत्त्वाचा समजण्यांत येतो. वेदां-संबंधीं पाश्चात्यांनीं लिहिलेल्या ग्रंथांतील एक श्रेष्ठ ग्रंथ येथेंच या ग्रंथाचें महत्त्व संपत नाहीं. प्रायः प्रत्येक वैदिक अभ्यासकाला या ग्रंथाच्या आधाराशिवाय आपला अभ्यास पुढें चालविणें अशक्य होऊन जातें. वैदिक भाषाशास्त्रावरील यांचें लिखाण असेंच महत्त्वाचें मानलें जातें.

'वैदिक इंडेक्स' या वेदावर यांनीं लिहिलेल्या पुस्तकाखेरीज हार्वर्ड ओरिएंटल सिरीजनें प्रसिद्ध केलेलें तैत्तिरीय संहिता (कृष्णयजुर्वेदाचें इंग्रजी भाषांतर) व Religion and Philosophy of the Veda and the Upanishadas हे यांचे ग्रंथ प्रमुख आहेत. पौर्वात्य धर्म व संस्कृति यांचें 'अखंड-भांडार' ही कीर्ति यांना या पुस्तकानेंच मिळवून दिली. हिंदुस्थानचा एकहि कालखंड असा नाहीं कीं, यांच्या एखाद्या ग्रंथाच्या आधाराशिवाय त्यामध्यें आपणांस प्रवास करणें शक्य होईल.

राज्यघटनाशास्त्रावरील प्रमाणभूत ज्ञाते म्हणूनहि यांची सर्व जगभर प्रसिद्धि होती. या शास्त्रावरील 'State Succession in International Law' (1907), 'Responsible Government in the Dominions' (1909), Imperial Unity and Dominions (दोन भाग, यांतील पहिल्या भागांत वसाहतींच्या स्वायत्ततेच्या मर्यादेचा विचार केला असून दुसऱ्या भागांत त्यांच्यामधील संघटनेच्या शक्यतेचा विचार केला आहे), Selected Speeches and Documents on the British Colonial Policy, 1763-1917 (1918), The Belgian Congo and The Berlin Act, Dominion Home Rule in Practice हे यांचे ग्रंथ सुप्रसिद्ध आहेत. यांमधील Responsible Government of Dominions हा त्रिखंडात्मक ग्रंथ विशेष महत्त्वाचा असून त्याकरितां ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटीनें यांना 'डॉक्टर ऑफ सिव्हिल लॉ' ही पदवी दिली.

अलीकडे बरेच दिवस यांनीं आपलें सर्व लक्ष हिंदी तत्त्वज्ञानावर लहान परंतु सूचक पुस्तकें लिहिण्यांत केंद्रित केलें होतें. या दृष्टीनें Samkhya System (1918) व Karma Mimamsa या यांच्या ग्रंथांकडे पाहिलें पाहिजे. यांपैकीं पहिल्या ग्रंथांत सांख्यपद्धतींतील महत्त्वाच्या तत्त्वांच्या वाढीची चर्चा केली असून दुसऱ्या पुस्तकांत कर्म-मीमांसेसबंधीं विद्यार्थ्यांना—हिंदी व परदेशी—वाटणारा बागुलबोवा नाहींसा करण्याचा प्रयत्न केला आहे. 'Indian Logic and Atomism' या यांच्या ग्रंथाचा उल्लेखहि याच ठिकाणीं करावयास पाहिजे.

हार्वर्ड ओरिएंटल सोसायटीनें प्रसिद्ध केलेले ऐतरेय-ब्राह्मण, ऐतरेय-आरण्यक, सांख्यायन-आरण्यक व कौषीतकी-ब्राह्मण यांचीं यांनीं केलेलीं इंग्रजी भाषांतरें यांच्या चिकित्सक व व्यापक बुद्धिमत्तेची साक्ष देण्यास समर्थ आहेत.

'Sanskrit Drama', 'History of Classical Sanskrit Literature' हे यांचे ग्रंथ संस्कृत वाङ्मया-वरील यांचें प्रभुत्व दाखविण्यास पुरेसे आहेत.

याशिवाय संस्कृत ग्रंथांची सूचि करण्याचे बाबतींतहि यांचा हात धरूं शकणारा चतुरस्त्र विद्वान् अजून उत्पन्न झालेला नाहीं. लंडनच्या इंडियन इन्स्टिटयूटमध्यें व ऑक्सफर्डच्या बोडलीयन लायब्ररीमध्यें असणाऱ्या संस्कृत व प्राकृत पुस्तकांची सूचि, बोडलीअन लायब्ररींतील पुस्तकांच्या सूचीची पुरवणी, त्याच लायब्ररींत असणाऱ्या प्राकृत पुस्तकांची सूचि इत्यादि यांचे या क्षेत्रांतील ग्रंथ महत्त्वाचे आहेत.

या सव्यसाची व व्यापक गृहस्थाच्या नेमणुकीशिवाय जगांतील कोणत्याहि प्राचीन शास्त्रविषयक संस्थांचें कार्य चालणें शक्य नव्हतें. इंग्लंडची रॉयल एशियॅटिक सोसायटी व त्याचप्रमाणें अमेरिकन व जर्मन ओरिएंटल

सोसायट्यांनीं यांना आपले सभासद करून घेतलें होतें. Royal Asiatic Society's Society, of Comparative Legislation व Zeischrift der Deutschen Morgenlandischen Gesselschaft या संस्थांच्या पत्रांतील यांचें लिखाण सतत चालू असे.

संस्कृत भाषा, शास्त्र व वेद यांमधील अत्यंत क्लिष्ट प्रमेयांचें संशोधन व त्यांचें सम्यग् ज्ञान प्राप्त करून देणारे चिकित्सक विद्वान् या नात्यानें हिंदी जनतेवर यांचें असणारें ऋण सहजासहजीं न फिटण्याइतपत मोठें आहे, यांत शंका नाहीं.

**कीर्तने, नीळकंठ जनार्दन**—(जन्म स. १८४४–मृत्यु स. १८९६ ) मराठी इतिहासाचे आद्य टीकाकार व चिकित्सक. विनायकराव कीर्तन्यांचे हे धाकटे बंधु. यांचें प्राथमिक शिक्षण कोल्हापुरास व मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण मुंबईस झालें. हे डेक्कन कॉलेजांत असतां यांनीं 'ग्रँट डफकृत मराठ्यांच्या बखरीवरील टीका' हा प्रसिद्ध निबंध लिहून वाचला ( १८६७ ). याच वेळीं यांनीं 'पूना यंग मेन्स ॲसोसिएशन' या संस्थेपुढें वरील निबंध वाचला तेव्हां कृष्णशास्त्री चिपळूणकर हे अध्यक्ष होते, व श्रोत्यांत शंकर पांडुरंग पंडित होते. या उभय विद्वानांनीं यांची खूप प्रशंसा केली. पंडितांनीं तर हा निबंध आग्रहपूर्वक मागून घेऊन 'इंदुप्रकाशां'त छापला. या निबंधांत सदर ग्रंथाचा कोतेपणा व प्रमाद दर्शविले आहेत. पुढें अस्सल कागदपत्रें शोधण्यानें यांच्या या निबंधांतील विधानांस पुष्टिच मिळाली आहे. याशिवाय यांचें टॅंपेस्ट नाटकाचें मराठी भाषान्तर व 'लोकप्रिय हिंदुधर्म व त्याची योग्यता' इत्यादि नांवाचा एक निबंध प्रसिद्ध आहे. यांशिवाय हंमीर महाकाव्याचें ( संस्कृत ) यांनीं केलेलें संपादन प्रसिद्ध आहे. इंडियन ॲंटिक्वेरी यांतहि यांनीं कांहीं इंग्रजी लेख लिहिले होते. हे जावरा व देवास धाकटी पाती यांच्या अधिपतींचे शिक्षक होते. देवासकडून यांना एक गांवहि त्याकरितां मिळाला होता. कांहीं दिवस हे मंगळूर ( काठेवाड ) व देवास धाकटी पाती येथील दिवाणहि होते.

यांच्या ग्रँट डफवरील निबंधाच्या अनेक आवृत्त्या निघाल्या व आपल्या लोकांनीं इतिहास-संशोधनाचें काम हातीं घेतलें. यांनींच 'मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें' संपादण्यास सुरवात करून पहिला खंड विविध ज्ञान-विस्तारांतून चिटणीसकृत शिवाजीचे सप्तप्रकरणी चरित्ररूपानें काढला ( १८८२ ).

**कीर्तने, रा. ब. विनायक जनार्दन**— ( जन्म स. १८३९–मृत्यु स. १८९१ ) नाटककार. जन्म राजुरी (जि. पुणें) येथें झाला. हे कऱ्हाडे ब्राह्मण. यांचे वडील दोन रुपयांच्या चाकरीपासून चढत जाऊन कोल्हापूर संस्थानचे कारभारी झाले. आई लहानपणींच वारली. शिक्षण कोल्हापूर येथें झालें. न्या. रानडे व यांचा घरोबा होता. स. १८५१ मध्यें यांच्या शाळेंत महादेवशास्त्री कोल्हटकर व विष्णुबोवा ब्रह्मचारी यांनीं यांच्या निबंधाची प्रशंसा केली. पुढें न्या. रानडे व हे एल्फिन्स्टन हायस्कूल मुंबई येथें गेले ( १८५६ ) व मॅट्रिक झाले ( १८५९ ). पुढें कॉलेज सोडून यांनीं साठ रुपयांवर शिक्षकाची नोकरी पत्करली ( १८६२ ). मराठी ज्ञानप्रसारक सभेपुढें इंग्लंडांतल्या सोळाव्या शतकाच्या अखेरीस झालेल्या राज्यक्रांतीवर ( १८५९ ) व 'हिंदुस्थानांतल्या प्राचीन विद्या' या विषयावर निबंध वाचले ( १८६० ). पुढें यांची धुळ्यास बदली झाली. तेथील कलेक्टर नाना मोरो जोशी यांचा स्नेह जमला व दोघांनीं तेथें एक पुस्तकालय स्थापन केलें. क्लबांत यांचें 'जयपाल' नाटक प्रथम वाचलें गेलें. जयपालचें संविधानक ओल्ड टेस्टामेंटमधील जॉबच्या चरित्रावरून घेतलें आहे. यांनीं विद्यार्थिदर्शेत लिहिलेल्या 'थोरले माधवराव पेशवे' नाटकाइतकें हें नाटक सरस नाहीं. यापुढें फक्त मालकमच्या इतिहासाचें भाषान्तर यांनीं 'मध्य हिंदुस्थानचा इतिहास' या नांवानें केलें. यानंतर यांनीं 'मथुरा' नाटक लिहावयास घेतलें होतें, पण तें पूर्ण झालें नाहीं.

हे धुळ्याहून कारवारास बदलले ( ६४ ). तेथें कंटाळून यांनीं राजिनामा दिल्यावर इंदूर संस्थानांत प्रथम विद्याखात्यांत ( ६५ ), पुढें सहा वर्षांनीं इंदूरच्या युवराजाचे शिक्षक ( ७१ ), सर टी. माधवराव यांच्या दिवाणगिरींत न्यायखात्यांत ५०० रु. पगारावर (७३), मग माधवराव बडोद्यास गेल्यावर त्यांचे मागें बडोद्यास नायब दिवाण ( ७५ ), असे हे फिरले व चढले. या वेळीं १५०० रुपये पगार न्याय, विद्या, पोलिस व खासगी वगैरे खात्यांवर देखरेखीचा अधिकार व वैभव प्राप्त झालें. वरिष्ठ शिक्षण देशी भाषेंत देण्याचे हेतूनें बडोद्यांत व्हर्नाक्युलर कॉलेज स्थापन झालें. हा प्रयोग पांच वर्षे यशस्वीपणें चालून दिवाण माधवराव विरुद्ध असल्यानें फिसकटला. पुढें बडोद्यास दिवाणगिरीवर हक्क असतांना ती मिळाली नाहीं, म्हणून रोषानें बडोदें सोडून हे पुण्यास आले ( ८६ ). पुढें इंदूरकर तक्तनशीन झाले तेव्हां त्यांनीं यांना दोन हजार पगारावर दिवाण नेमलें, पण

बेबनाव होऊन हे पुन्हां पुण्यास परत आले. यांस विसाव्या वर्षापासून मधुमेहाचा विकार होता. त्यानेंच हे वारले.

यांनीं 'चाळीस वर्षांमागचें पुणें' या नांवाची एक कादंबरी इंग्रजींत लिहावयास घेतली होती. तिचे ४० भाग ज्ञानप्रकाशांत छापले होते (१८९७). पुढें ती पूर्ण झाली नाहीं.

मराठींतील यांना पहिले नाटककार मानण्यांत येतें. स. १८६० पर्यंत फक्त पौराणिक नाटकें प्रचारांत असत.

**कीर्तिकर, कान्होबा रणछोडदास**—(जन्म स. १८४९–मृत्यु स. १९१९) कवि, वैद्य व शास्त्रज्ञ. जन्म मुंबई येथें झाला. हे सतरा वर्षांचे असतां मॅट्रिक झाले. मेडिकल कॉलेजांत कांहीं वर्षें घालवून (१८७०) हे विलायतेस गेले (१८७४). तेथें वैद्यकीच्या परीक्षा देऊन यांनीं बक्षिसेंहि मिळविलीं. इंडियन मेडिकल सर्व्हिसची परीक्षा देऊन हे हिंदुस्थानांत आले व ग्रँट मेडिकल कॉलेजमध्यें प्रोफेसर म्हणून काम करूं लागले. नंतर हे कांहीं वर्षांनीं पुनः इंग्लंडमध्यें गेले व नेटले रॉयल मेडिकल स्कूलमध्यें लष्करविषयक शस्त्रक्रियेचें व आरोग्यशास्त्राचें आणखी अध्ययन करून हे परत आले (१८७७). सोलापूर, कराची, सिंध हैदराबाद, बलुचिस्थान वगैरे ठिकाणीं नोकरी करून दुसऱ्या अफगाण युद्धांत हे आपल्या पलटणीबरोबर अफगाणिस्थानच्या मोहिमेवर गेले होते. ठाणें येथील इस्पितळावर बदली होऊन हे पुनः ग्रँट मेडिकल कॉलेजमध्यें प्रोफेसर झाले. हे पुढें ब्रिगेड सर्जन, लेफ्टनंट कर्नलच्या बड्या बड्या लष्करी हुद्यापर्यंत चढत गेले व स. १९०४ सालीं सेवानिवृत्त झाले.

सेवानिवृत्त झाल्यावर अंधेरीच्या 'अलेक्झांड्रा लॉज' नांवाच्या विद्याश्रमांत पाश्चात्य पंडितांप्रमाणें हे गृहस्थ थोर थोर कवींच्या, शास्त्रज्ञांच्या आणि संशोधकांच्या ग्रंथसमागमांत व लेखनव्यवसायांत गढून गेलेले दृष्टीस पडत. यांचा पुस्तकसंग्रह मोठा व मौल्यवान् होता. स. १८८३ सालीं यांना मुंबई विश्वविद्यालयाचे फेलो निवडण्यांत आलें होतें. स. १८९१ सालीं यांना विल्सन् फायलालॉजिकल लेक्चरर नेमलें, व तेव्हां यांनीं संस्कृत व प्राकृत भाषाविषयक व्याख्यानें दिलीं. यांनीं त्या वेळीं मराठी कवींच्यासंबंधीं सहा व्याख्यानें दिलीं. त्यांत 'मराठी कवींच्या वाङ्मयाची योग्यता कोणत्याहि उच्च परीक्षांना नेमण्याची आहे,' असें यांनीं प्रतिपादन केलें. बडोदें येथें भरलेल्या मराठी साहित्यसंमेलनाचे हे अध्यक्ष होते (१९०९). जळगांवच्या कविसंमेलनाचेहि हे अध्यक्ष होते.

यांचें वाङ्मयः— १ ब्राह्मधर्मप्रतिपादक वाक्यसंग्रह, २ भक्तिसुधा, ३ विलापलहरी, ४ इंदिराकाव्य, ५ आर्यसंगीत-माला, ६ डार्विन-चरित्र, ७ ज्ञानेश्वरवचनामृत, ८ रामदासवचनामृत, ९ अश्रु, १० इंद्रियविज्ञानविचार, ११ जलधिजवर्णन.

यांनीं वनस्पतिशास्त्राचा फार चांगला अभ्यास केला होता. मुंबई इलाख्यांतील विषारी वनस्पति, हिंदुस्थानांतील फुलें नसणाऱ्या वनस्पति, हिंदुस्थानांतील औषधी वनस्पति हे यांचे वनस्पतिशास्त्रविषयक ग्रंथ इंग्रजींत प्रसिद्ध आहेत.

वयाच्या १९ व्या वर्षी यांनीं (१) भक्तिसुधा हें काव्य लिहिलें. भार्येच्या अकालिक निधनामुळें यांना झालेलें दुःख यांनीं (२) विलापलहरी या काव्याच्या द्वारा व्यक्त केलें. पुढें टेनिसनच्या प्रिन्सेस काव्याच्या आधारें यांनीं (३) 'इंदिरा' काव्य लिहिलें. हें काव्य मुंबई विश्वविद्यालयानें स्कूल फायनलच्या परीक्षेस नेमलें होतें.

**कीलहॉर्न, डॉ. फ्रॅन्झ**—(जन्म स. १८४०–मृत्यु स. १९०८) प्रसिद्ध संस्कृत पंडित, प्राच्यविद्यानिष्णात व ऐतिहासिक. यांचा जन्म जर्मनींत झाला. प्रथमपासूनच यांचा ओढा संस्कृत भाषा व व्याकरण यांजकडे होता आणि प्रख्यात प्रो. मॅक्समूलर यांनीं सायणभाष्यासह ऋग्वेद-संहिता प्रथम प्रसिद्ध केली, त्यांस यांचें साहाय्य झालें. १८६६ मध्यें ह्यांची पूना कॉलेजांत संस्कृत व प्राच्यभाषा यांचे प्राध्यापक म्हणून नेमणूक झाली. त्यापूर्वीच शांतनवाचार्यकृत फिट्सूत्रें प्रसिद्ध करून व्याकरणाचे सूक्ष्म अभ्यासक असें नांव यांनीं कमाविलें होतें. येथें आल्यावर पं. अनंतशास्त्री पेंढारकर व इतर विद्वानांशीं यांचा संबंध येऊन व्याकरणांतील परिभाषेन्दुशेखरासारख्या कठीण ग्रंथाचे इंग्रजी भाषांतरास यांनीं हात घातला आणि नंतर पतंजलीच्या महाभाष्याची आवृत्ति प्रसिद्ध केली. इतरहि अनेक व्याकरणविषयक लेख लिहून वेळोवेळीं इंडियन अँटिक्वरी व इतर शास्त्रीय नियतकालिकांत प्रसिद्ध करून पहिल्या प्रतीचे वैय्याकरण व संस्कृत पंडित अशी यांनीं ख्याति मिळविली.

१८८५ नंतर यांनी आपल्या अनुपम संस्कृत ज्ञानाचा ओघ प्राचीन लेख-साहित्याकडे वळविला आणि शास्त्रीय पद्धतीनें शिलालेख–ताम्रपट आदिकरून इतिहासाचीं साधनें कशी संपादावीं व त्यांपासून इतिहासाची पुनर्घटना कशी करावी याचा नव्यानेंच उपक्रम केला. यांच्याच पुरस्कारामुळें हिंदुस्थान सरकारनें हीं इतिहासाचीं साधनें प्रसिद्ध करण्याकरितां इं. अँटिक्वरीचें परिशिष्ट म्हणून 'एपिग्राफिया इंडिका' या त्रैमासिकाची जबाबदारी ५० वर्षांपूर्वी घेतलीं व त्याचे आतांपर्यंत २५ व्हॉल्यूम प्रसिद्ध झाले आहेत. पाली-प्राकृत भाषांतून लिहिलेल्या प्राचीनतर लेखांकडे विशेष लक्ष न पोंचवितां गुप्तकालापासून नंतरच्या संस्कृत भाषेंत लिहिलेल्या निरनिराळ्या ऐतिहासिक घराण्यांच्या राजवटींतील लेखांवरच यांनीं भर देऊन त्यांचा काल निर्णय स्थिर करण्यासाठीं अविरत श्रम घेतले. लेखांत सांपडणाऱ्या वर्ष-तिथि-वार इत्यादींचा मेळ घालून बरोबर तिथि ठरवून मगच घराण्यांचे व राजांचे काल अचूक ठरवावयाचे असतात, त्या बाबतींत अविश्रांत मेहनत करून यांनीं पाया घालून दिला. कलचूरि अथवा चेदि संवत् यांचें आरंभस्थान यांनींच शोधून काढलें. सर्वांत महत्त्वाची व संशोधकास अत्यंत उपयोगी अशी यांची कामगिरी म्हणजे यांनीं उत्तर व दक्षिण हिंदुस्थानांत प्रसिद्ध झालेल्या सर्व लेखांचीं वर्षानुक्रमें पद्धतशीर यादी व राजवंशांचीं परिशिष्टें तयार करून भावी संशोधकांचा मार्ग सुलभ करून ठेवला आहे. यांच्या लेखवाचनांत बिनचूकपणा, यांनीं नमूद केलेल्या तारखांचा काटेकोरपणा व ऐतिहासिक निष्कर्ष-साधनांतील पद्धतशीरपणा अद्याप आदर्श मानला जातो. याप्रमाणें या देशांतील भाषा व इतिहास यांच्या संशोधनांत पूर्णपणें रंगून गेलेल्या या विद्वानानें सेवानिवृत्तीनंतर स्वदेशीं गेल्यावर गॉटिंजेन येथील विश्वविद्यालयांत संस्कृत प्राध्यापकाची जागा पत्करली व हिंदी विद्या व संस्कृति यांच्या अभ्यासाची आवड अनेक तरुण जर्मन विद्यार्थ्यांत उत्पन्न केली. डॉ. कीलहॉर्न व डॉ. बुल्हर यांच्याच प्रयत्नानें एक प्रसिद्ध आर्य भाषा व संस्कृति यांच्या संशोधनात्मक ग्रंथमाला प्रसिद्ध होत होती. हिंदुस्थानांतील परंपरागत विद्या व शास्त्रें यांच्याबद्दल उत्पन्न होत असलेल्या अनादरास या दोघां महापंडितांनीं वेळींच पायबंद घातला. या भूमीचें वैभव व महत्त्व युरोपांत प्रस्थापित करणें व इकडील संशोधकांस चिकित्सापद्धतीचे आदर्श घालून देणें या दुहेरी कामगिरीमुळें हे पूर्व व पश्चिम यांना सांधणारे खरेखुरे दुवे होत असें म्हणणें योग्य होईल ( का. ना. दीक्षित ).

**कुप्पुस्वामीशास्त्री एस.**—( जन्म स. १८८०–मृत्यु स. १९४३ )

मद्रास इलाख्यांतील सुप्रसिद्ध पंडित आणि संशोधक. यांचा जन्म तंजावर प्रांतांतील कावेरी नदीकांठीं गणपति अग्रहार या गांवीं झाला. तेथें यांचे कुटुंब 'मलायास्थ' या नांवानें ओळखलें जात असे. यांचें मूळ नांव वेंकटवर्मा असें होतें. यांच्या वडलांचें नांव सेतुराम अय्यर असें होतें. यांचे मातामह वेंगुशास्त्री चतुःशास्त्रपारंगत होते.

हे अनेक शास्त्रांत प्रवीण असले तरी पूर्वमीमांसेमधील प्राविण्याबद्दल यांची विशेष ख्याति होती. हे एम्. ए. महामहोपाध्याय, विद्यावाचस्पति, दर्शनकलानिधि, कुलपति, आय्. ई. एस्. वगैरे अनेक पदव्यांनीं भूषित होते.

मैलापूर ( मद्रास ) येथील संस्कृत कॉलेजचे हे प्रिन्सिपल होते ( १९०६–१० ). त्रिवेंद्री संस्कृत कॉलेजचेहि हे प्रिन्सिपल होते ( १९१०–१४ ). मद्रास प्रेसिडेन्सी कॉलेजचे संस्कृतचे प्रोफेसर व मद्रास गव्हर्नमेंट ओरि. मॅनुस्क्रिप्ट लायब्ररीचे क्युरेटर होते. हे स. १९३५ मध्यें सेवानिवृत्त झाले. हिंदुस्थानांतील अनेक विश्वविद्यालयांशी परीक्षक व इतर दृष्ट्या यांचा संबंध होता. यांनीं मद्रास युनिव्हर्सिटीचा संस्कृत ऑनर्स क्लासचा व शिरोमणि परीक्षेचा अभ्यासक्रम आंखला.

दुर्मिळ संस्कृत ग्रंथ मिळविणें आणि ते प्रसिद्ध करणें याबाबत यांची कामगिरी महत्त्वाची आहे. मीमांसेच्या प्रभाकर मताचे ग्रंथ यांनीं लोकांच्या पुढें प्रामुख्यानें आणले. 'जर्नल ऑफ दि ओरिएन्टल रिसर्च'चे हे संपादक होते. मद्रास संस्कृत ॲकॅडमी यांनीं काढली आहे. हे उत्तम शिक्षक व ग्रंथसंपादक होते. यामुळें यांना अनेक महत्त्वाच्या परिषदांचें अध्यक्षस्थान लाभलें. १ ऑल-इंडिया ओरि. कॉन्फरन्स, २ फिलॉसफिकल कॉंग्रेस, ३ कांजीपूर परिषद, ४ अद्वैत-सभा ऑफ साउथ इंडिया इत्यादि ठिकाणीं हे अध्यक्ष होते.

यांनीं मद्रास युनिव्हर्सिटीतर्फे संशोधनात्मक अनेक व्याख्यानमाला गुंफल्या. तसेंच अनेक ग्रंथ संपादन करून त्यांच्या उत्तम आवृत्त्या काढल्या ( न्यू इंडियन अँटिक्वेरी १९४३ एप्रिल ).

**कुमठेकर, रावबहादुर महादेव केशव**— ( जन्म स. १८५७–मृत्यु स. १९२९ ) पुणें नगरपालिकेचे लोकप्रिय चीफ ऑफिसर व सांगली संस्थानचे दिवाण. यांचा जन्म सातारा येथें झाला. घरची स्थिति बेताचीच असल्यानें शिष्यवृत्त्या व शिकवण्या यांच्या साहाय्यानें आपल्या कुशाग्र बुद्धीच्या जोरावर हे बी. ए. झाले ( १८८० ). यांचें कॉलेज शिक्षण एल्फिन्स्टन कॉलेजांत झालें. त्या वेळीं बी. ए. मनुष्य विरळा, इतका कीं बी. ए. माणसास लोक पाहावयास येत असत. प्रथम रु. ३५ वर रेव्हिन्यू खात्यांत कारकून, नंतर इगतपुरी येथें मामलेदार, तेथून १८८७ मध्यें पुणें शहर म्युनिसिपालिटीचे सेक्रेटरी म्हणून लेंड सर्व्हिसवर नेमण्यांत आलें. हीच जागा पुढें चीफ ऑफिसर म्हणून करण्यांत आली. त्या जागेवर यांनीं १८८७-१९१२ पर्यंत सतत २५ वर्षे काम केलें. कर्तबगार माणसाच्या आयुष्यांतील हा सुवर्णकाल म्हणतां येईल. ही कामगिरी यांनीं फारच प्रशंसनीय रीत्या चालवून शक्य तितकें लोकहित व समाजाचें कल्याण यांकडे तत्परतेनें लक्ष पुरविलें. श्रीमंतांपासून ते गरीबांपर्यंत सर्वांची सारखी दाद लागून त्यांचा मोठ्या आस्थापूर्वक व कळकळीनें विचार केला जाई. अजूनहि यांच्या परोपकारी व कनवाळू वृत्तीचें आदरानें स्मरण केलें जातें. म्युनिसिपालिटीनेंहि यांच्या लोकप्रिय कारकीर्दीच्या स्मरणार्थ सदाशिव पेठेंतील मुख्य रस्त्यास यांचें नाव दिलें आहे. सरकारनेंहि प्रथम रावसाहेब व नंतर रावबहादूर अशा पदव्या देऊन यांच्या कर्तबगारीचा गौरव केला. स्थानिक-स्वराज्य संस्थेंतील यांच्या आस्थेवाइक व कर्तव्यतत्पर मुख्याधिकारी म्हणून झालेल्या लौकिकामुळें सांगली संस्थानांत दिवाण म्हणून यांची नेमणूक झाली ( १९१२ ). तेथें दिवाण म्हणून यांनीं १९२२ पर्यंत काम केलें. या अवधींत यांनीं सांगली संस्थानचा दर्जा पुष्कळच वाढविला. त्यानंतर मात्र आपलें आयुष्य पुणें येथें सेवानिवृत्त म्हणून घालविलें. हे थिऑसॉफिस्ट होते. यांच्याजवळ असलेला त्या विषयाचा ग्रंथसंग्रह यांनीं शेवटीं पुणें येथील लॉजला देऊन टाकला.

या सार्वजनिक आयुष्याबरोबर आपल्या समाजांतील एकत्र कुटुंब संस्थेंतील आदर्श पुरुष म्हणूनहि यांचा निर्देश करावयास पाहिजे. आपल्या कुटुंबांतील जवळच्या व लांबच्या सर्वच संबंधी लोकांस हे विश्वासाचें आश्रयस्थान वाटत. यांना पुत्र तीन : १ कोंडोपंत ऊर्फ दादासाहेब हे डिस्ट्रिक्ट जज्जाच्या जागेवरून रिटायर्ड झाले. दुसरे श्रीनिवास ऊर्फ पंडितराव हे रा. ब. पारसनीस यांचे जामात होत. ते वयाच्या तेहेतिसाव्या वर्षी इन्कमटॅक्स इन्स्पेक्टर असतांनाच वारले. तिसरे केशवराव ऊर्फ भय्यासाहेब-यांना नाशिकचे सरदार आबासाहेब यांना दत्तक देण्यांत आलें. ते फर्स्टक्लास सरदार व फ. क्ला. ऑनररी मॅजिस्ट्रेट असून सरकारकडून त्यांना C. B. E. ही पदवी मिळाली आहे.

**कुमाराप्पा, प्रा. जे. सी.**— ( जन्म स. १८९२ ) अखिल-भारतीय ग्रामोद्योगसंघाचे संघटक व चिटणीस. हे धर्मानें ख्रिश्चन आहेत. यांचेच बंधु अर्थशास्त्रज्ञ भारतन् कुमाराप्पा होत.

यांचा जन्म तंजावर येथें झाला. यांचें बालपण मद्रासला गेलें. मॅट्रिक्युलेशनची परीक्षा पास झाल्यावर यांचें मद्रासला डेव्हेटेन कॉलेजांत शिक्षण झालें. नंतर हे अमेरिकेला गेले व तेथें न्यूयॉर्क संस्थानांतील सिरॅक्यूज युनिव्हर्सिटीचे हे बी. एससी. झाले. नंतर हे कोलंबिया युनिव्हर्सिटीचे एम्. ए. होऊन इंग्लंडला गेले, व तेथें इन्कॉर्पोरेटेड अकाउंटंट बनले.

यांनीं १९१९ पर्यंत लंडनमध्यें अकाउंटंटचें काम केलें व नंतर मुंबईला आल्यावर १९२९ अखेर यांचा तोच धंदा होता. त्यानंतर हे म. गांधींना येऊन मिळाले.

म. गांधींनीं यांना गुजराथ विद्यापीठांत अर्थशास्त्राचे प्रोफेसर नेमलें. प्राध्यापक असतांना यांनीं खेडा जिल्ह्यांतील मातर तालुक्याच्या ५० खेड्यांची आर्थिक पाहणी केली. १९३० त यंग इंडियाच्या संपादकत्वाचें काम यांचेवर सोंपविण्यांत आलें. १९३१ त यांना १ वर्ष सक्तमजुरीची शिक्षा झाली.

मध्यंतरीं कॉंग्रेसनें हिंदुस्थान व ब्रिटन या दोन राष्ट्रांतील आर्थिक देणींघेणीं काय आहेत यांची चौकशी करण्याकरितां नेमलेल्या कमिटीचे हे संचालक होते.

त्यानंतर यंग इंडियाच्या संपादकत्वाची जबाबदारी परत यांचेवर सोंपविण्यांत आली. याना नंतर पुन्हा दोन वर्षांची शिक्षा झाली. १९३२-३३ त ते नाशिक जेलमध्यें होते. तेथून सुटल्यावर १९३४ त बिहार भूकंपाच्या मध्यवर्ति संकट-निवारण कमिटीच्या कार्यकारी मंडळाचे हे सभासद होते. तेथील यांची कामगिरी अविस्मरणीय आहे.

१९३४ च्या अखेरीस मुंबईच्या कॉंग्रेसमध्यें ‘ अखिल-भारतीय ग्रामोद्योगसंघ ’ स्थापन झाला ( ऑक्टो. ).

त्याचे संघटक चिटणिसांचे जागी यांची निवड झाली. सध्यां हे तेथेंच काम करीत असतात. यांच्याकडून वऱ्हाड-मध्यप्रान्त व सरहद्दप्रान्त सरकारनें कॉंग्रेस मंत्रिमंडळ अधिकारावर असतां 'सर्व्हे ऑफ दि व्हिलेज इंडस्ट्री' रिपोर्ट तयार करून घेतले ते प्रसिद्ध आहेत (१९३९). या सर्व कार्यांतील अनुभवांचा परिणाम यांचे टांचणवजा ग्रंथांवर झालेला आहे.

(1) Survey of Matar Taluka, (2) Public Finance and our Poverty, (3) Organization and Accounts of Relief Work, (4) Philosophy of the Village Movement, (5) Why The Village Movement, (6) Nationalism, (7) Religeon of Jesus, (8) Education for Life. इत्यादि यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

यांपैकीं Why The Village Movement चा मराठी अनुवाद 'ग्रामोद्योगाचें अर्थशास्त्र' या नांवानें धुळयाच्या बाळुभाई मेहतांनीं केला आहे. यांच्याशिवाय निरनिराळ्या नियतकालिकांतूनहि यांनीं अनेक लेख लिहिले आहेत.

'कोणतीहि सामाजिक किंवा आर्थिक संघटना केवळ भौतिक दृष्टीनें उभारतां उपयोगी नाहीं. त्या संघटनेंत मानवी गुणांच्या विकासाला संपूर्ण वाव असला पाहिजे. तसेंच नीति आणि संस्कृति यांना मनुष्य पारखा होतां उपयोगी नाहीं. भांडवलशाही पद्धतींत उत्पादनाबरोबर सत्तेचेंहि केंद्रीभवन होतें. उत्पादनाच्या वाढीबरोबर कच्च्या मालाचा अखंड प्रवाह व बाजारपेठांची आवश्यकता सहजच उत्पन्न होते. लोभ किंवा हिंसा यांना संघटित रूप दिल्यानें त्यांतील घातुकपणा बिलकूल कमी होत नाहीं. दुर्बलांना बलिष्ठानें लुबाडावें आणि अधिक बलिष्ठ व्हावें याचा शेवट केव्हांहि युद्धांतच व्हावयाचा. जितकें सामर्थ्य प्रचंड तितकें युद्धाचें विनाशक स्वरूपहि व्यापक. अशा उत्पादन-पद्धतीनें संपत्तीहि विषम तऱ्हेनें वाटली जाते. थोडे लोक ऐषआराम भोगतात आणि बहुतेक लोकांना दारिद्र्यांत दिवस कंठावे लागतात. ज्याच्या हातांत मत्ता त्याच्या हातांत सत्ता. अशी स्थिति बनते. आर्थिक व राजकीय समतेच्या अभावीं व्यक्तित्वाचा विकास कुंठित होतो. मनुष्यांत उपजत असणाऱ्या स्फुर्ति, कौशल्य, योजकता, कल्पकता वगैरे गुणांचा नाश होऊन तो जर नुसता ठोकळा बनेल तर यापरती दुसरी कोणतीहि हानी नाहीं. ही हानी टाळण्याकरितां सांपत्तिक विषमता समाजांत उत्पन्न होतां उपयोगी नाहीं याबद्दल अत्यंत दक्षता बाळगली पाहिजे. याकरितां स्वावलंबी, विकेंद्रित व सहकारी भावनेवर आधारलेल्या ग्रामोद्योगप्रधान संस्कृतीचाच अवलंब केला पाहिजे', असें यांच्या तत्त्वज्ञानाचें सार आहे.

**कुर्तकोटी, डॉ. श्रीमत् जगद्गुरु शंकराचार्य, श्रीविद्याशंकरभारती, मठ-करवीर व संकेश्वर—** (जन्म स. १८७९ मे २०, शके १८०१ वैशाख व. १४). तत्त्वज्ञानाचे सुप्रसिद्ध अभ्यासक, विवेचक व हिंदुधर्माला नवजीवन देणारे प्रचारक.

यांचा जन्म धारवाड जिल्ह्यांतील कुर्तकोटी गांवच्या वतनदार पाटील कुलकर्ण्याच्या घराण्यांत झाला. यांचें मूळ नांव लिंगेश. कानडीचें प्राथमिक व इंग्रजीचें मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण धारवाड येथें झाल्यावर यांच्या कानीं स्वामी विवेकानंदांची अमेरिकेंतील धर्मविजयाची कामगिरी आली. तिचा परिणाम यांच्यावर इतका झाला कीं यांनीं धर्मप्रचाराचें कार्य करण्याच्या हेतूनें संस्कृत भाषा व वेदान्तादि शास्त्रांचा कलकत्ता व काशी येथें राहून अभ्यास केला. तेथेंच पंडितमंडळानें यांना "विद्याभूषण" ही पदवी दिली. नंतर शृंगेरीस जाऊन तेथील श्रीशंकराचार्यांकडून यांनीं सांप्रदायिक पद्धतीनें वेदान्ताचें तत्त्व समजवून घेतलें. शिवाय अनेक भाषांत लेखन, प्रवचन व अध्ययनअध्यापनाचें काम सतत चालू असेच.

तथापि या विविध उद्योगांत गर्क असतांना मनाला समाधान वाटेना. भक्तिमार्गाला लागल्यावांचून तत्त्वज्ञानाचा अनुभव येत नाहीं असा मनाचा ग्रह झाल्यामुळें त्यासाठीं सातारा जिल्ह्यांतील गोंदवलें येथील सत्पुरुषाकडे हे सातआठ वर्षे भक्तिभावानें उपासना करीत राहिले. श्रीगोंदवलेकरबुवांनीं प्रसन्न होऊन यांना 'महाभागवत' असें नांव दिलें. त्यानंतर त्याच नांवानें लोक यांना संबोधूं लागले. यांनाहि मन शान्त झाल्यासारखें वाटलें. मग यांनीं सार्वजनिक कार्यांत लक्ष घालण्यास सुरुवात केली. वैदिक धर्म आणि संस्कृत विद्या हा यांचा आवडता विषय होता. प्रो. रा. द. रानडे यांच्या सहवासानें यांनीं पाश्चात्य तत्त्वज्ञानाची माहिती करून घेतली. त्यामुळें यांची दृष्टि व्यापक झाली.

भांडारकर ओरिएन्टल रिसर्च इन्स्टिटयूट पुणें, दि इन्स्टिटयूट ऑफ फिलॉसफी अमळनेर, संस्कृत ॲकॅडमी बंगलोर, या संस्था काढण्यांत यांनीं भाग घेतला. धार-

वाडची 'दि संस्कृत लिटलरी सोसायटी' व तिनें चालविलेली 'श्रीशंकराचार्य संस्कृत पाठशाळा' या संस्थेचें व्यवस्थापकत्व यांच्या हातीं आलें. धारवाड येथें यांनीं कानडींत दिलेलीं भगवद्गीतेवरील प्रवचनें पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालीं आणि तें पुस्तक मुंबई विश्वविद्यालयानें कानडी घेऊन एम्. ए. ला बसणाऱ्यांसाठीं नेमिलें. 'दि हार्ट ऑफ भगवद्गीता' या यांच्या प्रबंधावरून अमेरिकेंतील एका विद्यापीठाकडून पीएच्.डी. ही पदवी यांना मिळाली. बंगलोर येथील संस्कृत ॲकॅडमीतर्फे निघणारें 'संस्कृत रिसर्च' नांवाचें त्रैमासिक यांच्याच संपादकत्वाखालीं निघूं लागलें. मुंबई विद्यापीठानें यांना वेदान्त विषयाच्या एम्. ए. चे परीक्षक नेमिलें. मुंबई सरकारनें मॉरल एज्युकेशन कन्सल्टेटिव्ह कमेटीवर यांना सभासद नेमिलें. शिवाय ख्रिश्चन मिशनऱ्यांप्रमाणें सहकारी चळवळींतहि हे भाग घेत.

अशा प्रकारच्या अनेक चळवळींशीं संबंध असल्यामुळें यांना फार फिरावें लागे. म्हणून सरकारी अधिकाऱ्यांच्या शिफारशींवरून यांना सदर्न मराठा रेल्वेनें सेकंड क्लासचा एक कायम मोफत पास दिला.

वैदिक धर्माच्या प्रचाराच्या दृष्टीनें यांची योग्यता लक्षांत घेऊन असे गृहस्थ शंकराचार्यांच्या पीठावर अधिष्ठित झाल्यास बरें होईल असें वाटल्यावरून यांना तशी विनंति करण्यांत आली आणि यांनींहि पण आपल्या ध्येयाला पूरक म्हणून कोल्हापूर येथें करवीरपीठाचें शंकराचार्यत्व स्वीकारलें (१९१७ जून ३). त्या वेळीं म्हैसूर, बडोदें वगैरेंचे महाराज, व्हाइसरॉय व गव्हर्नर वगैरेंकडून अभिनंदनपर तारा व पत्रें आलीं. पुढें पीठाच्या जहागिरींत कोल्हापूरकर छत्रपति ढवळाढवळ करूं लागले, तेव्हां हे एका छाटीनिशीं संस्थानाच्या बाहेर पडले व संकेश्वर पीठावरील आचार्यांशीं तडजोड करून दोन्ही पीठांतील तंटा यांनीं मिटविला.

नंतर मॉंटेग्यु-चेम्सफर्ड यांना मुलाखत देणें, प्रयाग येथें होमरूल लीगला आशीर्वाद देणें, महाराष्ट्रभर महाराष्ट्र हिंदुधर्म परिषदांचीं अधिवेशनें भरवून ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद, स्पृश्यास्पृश्य वाद, पतित-परावर्तन व हिंदुकरण वगैरे विषयांना प्रचंड प्रमाणांत चालना देणें वगैरे कामें यांनीं केलीं. महाराष्ट्रांत व इंग्लंडमध्यें विष्णु रघुनाथ करंदीकर यांना अधिकार देऊन अनेक लोकांना शुद्ध केलें व कांहीं युरोपीय लोकांना हिंदु धर्माची दीक्षा दिली. त्यांत मिस् मिलर नांवाच्या अमेरिकन स्त्रीचें यांनीं नाशिक येथें केलेलें हिंदुकरण अनेक कारणांनीं विशेष गाजलें.

पुण्याचें टिळक महाराष्ट्र विद्यापीठ स्थापण्यांत यांनीं भाग घेतला व त्याचे पहिले कुलगुरु हे निवडले गेले. हिंदुमहासभेच्या प्रयाग व लाहोर येथील अधिवेशनांचे हे अध्यक्ष निवडले गेले. हंपी येथील विजयनगर राज्याचा ६०० वर्षांच्या महोत्सव प्रसंगीं यांना अध्यक्ष निवडण्यांत आलें व तेथें 'दुसरे विद्यारण्य' असा यांचा गौरव करण्यांत आला. स. १९३३ सालीं अमेरिका येथील वर्ल्ड फिलॉसफी ऑफ फेथ या मोठ्या सभेचें अध्यक्षस्थान यांना देऊं केलें. पण तेथें न जातां नाशिक येथें परिषद् भरवून केलेल्या भाषणालाच मान्यता देऊन तिनें यांचा गौरव गेला.

लोकांनीं यांच्या पीठारोहणाचा रौप्यमहोत्सव केला (१९४२). त्या प्रसंगीं मोठमोठ्या माणसांनीं असा अभिप्राय व्यक्त केला कीं, हे केवळ योजना सुचविणारे नाहींत तर प्रत्यक्ष पुढें होऊन काम करून दाखविणारे आहेत. हे अनेक स्थित्यन्तरें व मतान्तरें यांतून गेले असले तरी हे आपल्या धार्मिक उच्च ध्येयावर नेहमीं अचल राहिले आहेत.

यांनीं आजपर्यंत हिंदुस्थानभर प्रवास करून संस्कृत, हिंदी, मराठी, कानडी आणि इंग्लिश भाषांत सुमारें ५००० पर्यंत व्याख्यानें दिलीं. यांचीं व्याख्यानें विवेचक आणि चिकित्सक असूनहि अत्यंत परिणामकारक होत. उपमा-दृष्टान्तांनीं कोणताहि विषय प्रतिपादण्यांत यांचा हातखंडा आहे. अत्यंत विरुद्ध असणारी सभाहि हे आपल्या वक्तृत्वानें सहज आपलीशी करतात. त्याग, ध्येयवाद, विद्वत्ता व योजकता यांचें आश्चर्यकारक मिश्रण यांच्यांत आढळतें.

यांचे ग्रंथ—

संस्कृत—१ सच्चिदानंदस्तवः, २ सिद्धान्तसारः, ३ अष्टोत्तरशतश्लोकी, ४ षड्दर्शनादर्शः, ५ समत्वगीतम् (भगवद्गीता तात्पर्य);

कानडी—भगवद्गीतासारविचार (धारवाड येथें दिलेलीं कानडींतील व्याख्यानें)

इंग्रजी—(1) Spiritual Knowledge and How to Attain It, (2) The Highest Goal of Human Life, (3) The Study of Sanskrit-a Plea for its Revival, (4) The Heart of Bhagawad-Gita, (5) Equality-a Study in the Bhagawad-Gita;

मराठी– १ गंगासंमति अथवा हिंदुकरण-मान्यता नाटक. मराठींत स्वधर्म नांवाचें साप्ताहिक पुष्कळ वर्षे यांनीं चालविलें व त्यांत अनेक महत्त्वाच्या विषयांवर लिहिलें.

**कुर्बान, फज्ल इलाही**—( जन्म स. १९०३ ) सुप्रसिद्ध समाजसत्तावादी. पिता-मलिक करम इलाही. माता-उमर खैर. जन्मस्थान-लाहोर. यांचें घराणें कक्केजई पठाणांपैकीं आहे. यांच्या पूर्वजांनीं मोगलांच्या वेळीं अफगाणिस्थानांतून येऊन लाहोरला वस्ती केली.

मॅट्रिक पास झाले तेव्हां यांना हिंदु-मुसलमान, तुर्क-जर्मन वगैरेबद्दल थोडी कल्पना आली होती ( १९१९ ). रौलट-कायद्याच्या वेळीं झालेली चळवळ आणि गोळीबारहि यांनीं प्रत्यक्ष पाहिलेला होता. देशभक्तिपर व्याख्यानें चालू आहेत आणि वर विमानें घरघरत आहेत, हा प्रसंग यांनीं डोळ्यांनीं पाहिला. 'भारत माता की जय', 'इस्लाम जिन्दाबाद' अशा ललकाऱ्या सुरू होत्या.

सभेच्या बाहेर येतांच यांना गोळीबाराच्या तयारींत लोक दिसले. त्या वेळीं पुढील संवाद झाला: 'तुम्ही हिंदुस्थानी असून आमच्यावर बन्दुका रोखायला तुम्हांला लाज नाहीं वाटत ?' 'कोण असा पुढारी आहे कीं ज्याचे मागें आम्हीं जावें?' 'आम्हांला परदेशी लोकांशीं लढण्यास कोण तयार करील?' या संवादांतील प्रश्नाचें उत्तर आपल्यापाशीं नाहीं, अशी यांची खात्री झाली. इतक्यांत गोळीबाराचा धडाका यांच्या कानीं आला. कित्येक लोक गोळीबारांत मेले. बापानें यांना शोधून आणून कोठडींत बंद करून ठेविलें.

कॉलेजमध्यें जाण्याची इच्छा घरच्या परिस्थितीमुळें यांना दाबून ठेवावी लागली. लढाई संपलेली असल्यानें नोकरी मिळणें कठीण होत चाललें होतें. इतक्यांत खिलाफत चळवळीच्या पुढाऱ्यांनीं सच्चया मुसलमानांनीं हिजरत म्हणजे देशत्याग करून मुसलमानी देशांत जाण्याचा फतवा काढला. हे जाणाऱ्या लोकांत सामील झाले. आणि तिकिटाशिवायच पेशावरला पोंचले. अखेर अनेक अडचणींतून यांनीं अफगाणिस्थानचा रस्ता पकडला.

सर्व रस्ता डोंगराळ होता. शिवाय पायींच प्रवास होता. चोर व लुटारू यांचें भय होतें. भाषा पुश्तु यांना बिलकुल येत नव्हती. रस्ता दाखवणारा मनुष्य दाखवील तसें जायचें व सांगेल तसें वागायचें. मधूनच गोळीबारहि ऐकूं यायचा. शेवटीं जलालाबाद, काबूल वगैरे ठिकाणीं सरकारी पाहुणचारहि यांना मिळाला. पण जगांत काय चाललें आहे याचा तेथील लोकांना पत्ता असल्याचें चिन्ह कोठेंच दिसेना. शस्त्र, व्यवस्था किंवा ज्ञान या बाबतींत तेथील मध्ययुग अद्यापि संपलेलें नव्हतें. सैनिकी शिक्षण व इंग्रजांना जिंकणें या गोष्टी तेथील लोकांच्या कल्पनेंतहि नव्हत्या. त्यामुळें हे तेथें अगदीं निराश झाले आणि यांनीं रशियांत जाण्याचें ठरविलें. बोल्शेविकांबद्दल यांनीं आतांपर्यंत विरुद्धच ऐकलें होतें; पण बोल्शेविकांशिवाय इंग्रजांविरुद्ध आपणांस कोणीच उपयोगी पडणार नाहीं अशी यांची खात्री होत चालली. तुर्कस्थानांतून रशियांत शिरतांच यांचें योग्य स्वागत झालें.

ताशकंद येथें बोल्शेविकांच्या नव्या राज्यव्यवस्थेचा यांना परिचय होऊं लागला. सर्वांना सारखें अन्न, सर्वांना सारखें काम पाहून यांना नवल वाटलें. तेथें सर्व शिक्षणापूर्वी लोकांना राजनीतीचें शिक्षण अधिक दिलें जाई. त्यामुळें मूळच्या सर्व गृहीत गोष्टी सोडाव्या लागत. हे अशा क्रमानें जवळ जवळ मार्क्सवादी बनले. नंतर यांना सैनिकी शिक्षण देण्यांत आलें. शेवटीं यांस शिक्षक बनवून मजूर व शेतकरी यांच्या संघटनांचें स्वतंत्र शिक्षण देण्यांत आलें. असें शिक्षण घेऊन हे जर्मनींत येऊन नंतर हिंदुस्थानांत पोंचले ( नवं. १९२६ ). कामाला सुरुवात केली नाहीं तोंच यांना पकडून पेशावरला नेलें व तेथें यांना पांच वर्षांची शिक्षा मिळाली ( १९२७ एप्रिल ). पण अपिलांत मॉस्कोला जाऊन शिक्षण घेणें हा गुन्हा नाहीं असें ठरून पांच वर्षांची शिक्षा तीन वर्षे करण्यांत आली. सुटल्यावर मिरत केसमधल्या लोकांना यांनीं मदत करण्यास सुरुवात केली व लाहोर येथें अध्ययन-चक्र चालविलें ( १९२९ ). पुढें यांना पुनः पकडून चौकशीशिवाय तुरुंगांत ठेवण्यांत आलें. नंतर चार वर्षांनीं यांची सुटका झाली ( १९३४ ). मजुरांतर्फे असेंब्लीच्या निवडणुकींत हे हरले. नंतर यांना पुनः सरकारनें लाहोरला नजरबंद केलें ( १९३६ ). यानंतर सुटका झाल्यावर अजबसुल्तानाबरोबर यांचा विवाह झाला.

रामगड कॉंग्रेसला हे आले होते. पण कम्युनिस्ट पकडले जाऊं लागले तेव्हां हे गुप्त झाले. शेवटीं कम्युनिस्ट सुटले तेव्हां ( मे. १९४२ ), हे बाहेर येऊन लायलपुरला काम करूं लागले. तेथें मजुरांच्या संपांत

यांना वीस दिवस तुरुंगांत राहावें लागलें. पण लढा यशस्वी झाला व यांना सोडण्यांत आलें.

धर्माकरितां देशत्याग करणारा हा तरुण क्रान्तीकरितां सर्वस्वाचा त्याग करण्यास केंव्हांहि सज्ज आहे ( नये भारतके नये नेता, पा. ४९२ ).

**कुवलयानंद स्वामी—** ( जन्म स. १८८३ ) अखिल भारतीय कीर्तीचे शारीरिक शिक्षणविशारद व जागतिक प्रसिद्धी असलेले योगशास्त्रज्ञ. यांचें समग्र नांव— जगन्नाथ गणेश गुणे. स.१९०३ सालीं हे मॅट्रिक झाले व यांना जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्ति मिळाली. उच्च शिक्षण बडोद्यास झालें व हे बी. ए. झाले ( १९१० ). बडोदा येथेंच सुप्रसिद्ध राजप्रिय राजरत्न प्रो. माणिकरावांकडे हे आकर्षिले गेले व त्यांच्याच शिष्यमंडळीत दाखल होऊन हे मल्लविद्येंत प्रवीण झाले. स. १९१६ पर्यंत हे बडोद्यासच शिक्षक होते. पुढें स. १९१६-२३ पर्यंत खानदेश शिक्षण मंडळाचे हे एक आजीव सदस्य होते.

यांच्या व इतर आजीव सदस्यांच्या परिश्रमामुळें खा. शि. मं. चें हायस्कूल चांगलेंच नांवारूपास आलें. परंतु १९२१ मध्यें त्याला राष्ट्रीय स्वरूप देण्यांत येऊन अमळनेरास स्वतंत्र राष्ट्रीय शिक्षण देणारें महाविद्यालय स्थापन करण्यांत आलें. त्यांत यांनींच पुढाकार घेतला होता व राष्ट्रीय महाविद्यालयाचें प्राचार्यपद दोन वर्षेपर्यंत यांच्याचकडे होतें. पुढें १९२३ सालीं तें अराष्ट्रीय झाल्यामुळें व यांना योगविद्येचें आधुनिक शास्त्रदृष्ट्या सर्वांगीण संशोधन करून तद्द्वारा जनसेवा करण्याची उत्सुकता असल्यामुळें यांनीं त्या मंडळाच्या सदस्यत्वाचा राजीनामा दिला.

खा. शि. मंडळांत असतांनाच १९१९ सालीं यांनीं श्रीक्षेत्र मालसर ( नर्मदातटाक ) येथील योगविद्याविशारद परमहंस श्री माधवदासजी महाराज यांचें शिष्यत्व स्वीकारलें व त्यांच्याच कृपेनें यांना अल्पकाळांत योगविद्येचा उत्कृष्ट लाभ झाला. १९२३ मध्यें खा. शि. मं. सोडल्यानंतर यांनीं लोणावळयास कैवल्यधाम स्थापन करण्याच्या तयारींत एक वर्ष घालविलें व १९२४ च्या आक्टोबरांत विजयादशमीच्या मुहूर्तावर कैवल्यधामाची स्थापना केली. सांप्रत महाराष्ट्रांतील जगद्विख्यात झालेल्या संस्थांपैकीं ती एक संस्था आहे.

'पूर्व व पश्चिम यांच्या संस्कृतीचा मेळ घालून दोहोंच्या संयोगानें अखिल मानव जातीला उद्बोधक असें नवीन तत्त्वज्ञान निर्मावयाचें,' असा या संस्थेचा मुख्य उद्देश आहे. पूर्वेकडील योगीजनांची संस्कृति ही अध्यात्मिक ज्ञानावर उभारलेली आहे, तर पश्चिमेची संस्कृति जड-वस्तुनिष्ठ असून प्रायोगिक विज्ञानावर आधारलेली आहे. यामुळें दोन्ही संस्कृति अत्यंत भिन्न आहेत. परंतु पुरातन योगीजनांच्या यौगिक सिद्धान्तांचें नव्या शास्त्राच्या साह्यानें स्पष्टीकरण करावें व त्यायोगें या दोन भिन्न संस्कृतींची सांगड घालून द्यावी, अशी यांची इच्छा आहे. त्याबरोबरच आत्मिक, सामाजिक व शारीरिक शिक्षणाचा प्रसार करावा असाहि या संस्थेचा हेतु आहे. आश्रमाच्या स्थापनेपूर्वीच यांनीं यौगिक क्षेत्रांत संशोधन केलें होतें. आश्रमाच्या स्थापनेबरोबरच यांनीं ' योगमीमांसा' नांवाचें त्रैमासिक चालू केलें व त्यांत इंग्रजी भाषेंतून आसनें, बंधक्रिया, मुद्रा व प्राणायाम यांचा 'क्ष' किरणादि अर्वाचीन शास्त्रीय साधनांच्या साहाय्यानें केलेला संशोधनात्मक अभ्यास त्यांत प्रसिद्ध करण्यास सुरवात केली. यांतील शास्त्रशुद्ध मांडणीमुळें जगाचें लक्ष यांच्या संशोधनाकडे लागलें.

शरीरशिक्षा व रोगपरिहार या बाबतींत योगाची उपयुक्तता अर्वाचीन शास्त्रांच्या आधारें यांनीं सिद्ध केली व आपल्या आश्रमांत अनेक रोग्यांना हे परिहार देऊं लागले.

योगोपचाराचें कार्य आधुनिक वैद्यकाचें ज्ञान असलेल्या व योगोपचाराचें तात्त्विक व प्रत्यक्ष ज्ञान संपादन केलेल्या तज्ज्ञांच्याच हातीं असावें असा यांचा कटाक्ष असून यांच्या हाताखालीं आजवर तीन M. B. B. S. पदवीधर योगचिकित्सेंत पारंगत झाले आहेत व ते कैवल्यधामाच्या विद्यमानें निरनिराळ्या केन्द्रांत योगचिकित्सेचें कार्य करीत आहेत. त्याचप्रमाणें आश्रमांतील अनेक सदस्यांनीं आयुर्वेद, पाश्चात्य वैद्यक व योगोपचार यांचें उत्तम ज्ञान संपादन केलें असून यांपैकीं एक सदस्य चरकतीर्थ स्वामी दिगंबरजी राजकोटच्या कैवल्यधामाचें अत्यंत यशस्वितेनें प्रमुखपद भूषवीत आहेत. लोणावळयास योगचिकित्सेकरितां येणाऱ्या रुग्णांच्या निदानाकरितां कैवल्यधामांत एक रुग्णविज्ञानशाला (Clinical Laboratory) असून तिचें नांव 'श्री नटवरसिंह रुग्णविज्ञानशाला' असें आहे. पोरबंदरचे महाराणा श्रीनटवरसिंहजी यांनीं आश्रमास रु. ३३००० ची देणगी दिल्यामुळें त्यांचें नांव या विज्ञानशालेस देण्यांत आलें आहे.

योगद्वारा स्वास्थ्यसंरक्षणाचें कार्य मुख्यतः लोणावळें,

मुंबई ( स्थापना १९३२ ), व राजकोट ( स्थापना १९४३ ) या ठिकाणीं कैवल्यधामाकडून केलें जातें. लोणावळ्यास भारतांतील सर्व प्रान्तांचे रुग्ण येतात. आश्रमाचें एक रुग्णसेवामंदिर असून त्यांत रुग्णांची शुश्रूषेबरोबर राहण्याजेवणाची सोय केली जाते. मुंबईस रोज दोनअडीचशें स्त्रीपुरुषांची स्वास्थ्यसंपादनार्थ हजेरी असते. मुंबईच्या Health Centre करितां मुंबई सरकारनें दोन लक्ष रुपये किंमतीची बॅकबेवरील रमणीय जागा कैवल्यधामास नाममात्र भाड्यानें दिली असून शिवाय या केन्द्रास सरकारकडून सालीना १ हजार रुपये ग्रँटहि मिळत असते. राजकोट येथील स्वास्थ्यसंरक्षणाचें कार्यहि उत्तम चाललें आहे. एवंच आजवर कधींहि न मिळालेलें यश योगचिकित्सेस कैवल्यधामानें मिळवून दिलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

स्वास्थ्यसंवर्धनाचें कार्यहि रोगोपहरणाच्या इतकेंच कैवल्यधामानें यशस्वी केलें आहे. यौगिक शारीरिक शिक्षणाची रचना आधुनिकशास्त्रदृष्ट्या विवेचून व सुसंघटित करून त्याला यांनीं सर्वत्र मानाचें स्थान मिळवून दिलें आहे. कैवल्यधाम स्थापन झाल्यानंतर अवघ्या तीनच वर्षांनीं संयुक्तप्रान्त सरकारनें कैवल्यधामाकडे एक डेप्युटेशन पाठविलें व त्या डेप्युटेशनचा अहवाल प्रसिद्ध करून यौगिक शारीरिक शिक्षण आपल्या प्रान्तांतील शिक्षणसंस्थांत प्रविष्ट करण्याचा प्रयत्न केला. १९३२ सालीं यांना लखनौस बोलावून कांहीं तात्पुरते शिक्षकहि यौगिक संघ व्यायामांत तयार करून घेतले. मुंबई सरकारनेंहि यांना १९२७ सालच्या शारीरिक शिक्षण कमेटीचे एक सदस्य नेमलें होतें व या कमेटीनें कैवल्यधामांतील यौगिक पद्धतीची शिफारस केली होती. पुढें १९३७ सालीं मुंबई सरकारनें नेमलेल्या शारीरिक शिक्षण समितीनें यांना अध्यक्षच निवडलें. या कमिटीनें शिफारस केल्याप्रमाणें मुंबई प्रान्ताचें सरकारी शारीरिक शिक्षणबोर्ड १९३८ मध्यें स्थापन झालें. तें बोर्ड अद्याप अस्तित्वांत असून त्याच्या अध्यक्षपदीं यांची आजवर तीन वेळां लागोपाठ नेमणूक झाली ( १९३८, १९४० व १९४३ ). प्रान्तांतील शारीरिक शिक्षणाची युद्धोत्तर रचना सुचविण्याकरितां या वर्षी मुंबई सरकारनें नेमलेल्या समितीचें अध्यक्षपद यांस देण्यांत आलें आहे.

१९३७च्या कमिटीनें शिफारसलेल्या शारीरिक शिक्षणक्रमांत यौगिक पद्धतीचा अन्तर्भाव केला असून त्या सालापासून यौगिक व्यायामाकडे सरकारी, निमसरकारी व खासगी शिक्षणसंस्थांतून अधिकाधिक लक्ष पुरविलें जात आहे. सारांश, कैवल्यधामाच्या उद्योगानें यौगिक शारीरिक शिक्षणासहि सरकारदरबारीं मान्यतेचें स्थान मिळालें आहे. इतर देशीविदेशी पद्धतींचाहि शास्त्रदृष्ट्या यांनीं उत्तम अभ्यास केला असल्यानें यांची शारीरिक शिक्षण क्षेत्रांतील कामगिरी चिरस्मरणीय झाली आहे.

कैवल्यधामाच्या शास्त्रीय कार्याची छाप देशीविदेशी विद्यापीठांवरहि पडत चालली आहे. १९३२ सालीं अमेरिकेंतील येल् युनिव्हर्सिटीनें K. T. Behanan यांस Research Fellowship देऊन योगाभ्यासाकरितां हिंदुस्थानांत पाठविलें. त्या वेळीं डॉ. बेहॅनन् यांनीं १ वर्ष यांचेकडेच अभ्यास केला. १९३७ सालीं अमेरिकेंतील कोलंबिया युनिव्हर्सिटींतील Deputy Director of Physical Education डॉ. जोसेफाइन रॅथब्रेन या कैवल्यधामाच्या मुंबई केंद्रांत येऊन यौगिक व्यायामपद्धतीचें शिक्षण घेऊन गेल्या. हिंदुस्थानांतहि त्रावणकोर युनिव्हर्सिटीनें आपल्या विद्यार्थ्यांकरितां यौगिक शारीरिक शिक्षणाचा उपक्रम केला असून कैवल्यधामाचे एक आजीव सदस्य डॉ. विणेकर, B. A., M. B. B. S. हे त्या विभागाचे Director आहेत. त्रावणकोर युनिव्हर्सिटीनें डॉ. विणेकर यांस तीन वर्षांकरितां कैवल्यधामाकडून मागून घेतलें आहे.

अशा रीतीनें रोगपरिहार व स्वास्थ्यसंवर्धन या दोनहि क्षेत्रांतील कैवल्यधामाची योगविषयक कामगिरी कितीहि महनीय असली तरी आश्रमाचें मुख्य व अंतिम ध्येय अध्यात्मच आहे. आजचे आश्रमांतील आजीव सदस्य अध्यात्माकरितांच स्वामीजींच्या नेतृत्वाखालीं एकत्र आलेले आहेत. मात्र कैवल्यधामाचें ध्येयभूत अध्यात्म केवळ व्यक्तिनिष्ठ नसून तें राष्ट्रनिष्ठ किंबहुना जगन्निष्ठहि आहे. वैयक्तिक अध्यात्म अभ्यास, वैराग्य, श्रद्धा, वीर्य इत्यादि साधनांनीं सिद्ध होतें. राष्ट्रनिष्ठ व जगन्निष्ठ अध्यात्माची गोष्ट तशी नाहीं. भारतीय व पाश्चात्य संस्कृतीचा आधुनिक शास्त्रदृष्ट्या समन्वय करून सिद्ध झालेल्या आध्यात्मिक मूल्यांवर समाजरचना झाल्याविना राष्ट्रीय अथवा जागतिक अध्यात्म सिद्ध होणार नाहीं. अशा अध्यात्माची सिद्धि, प्रचार व प्रसार करण्याच्या दृष्टीनेंच कैवल्यधामाची स्थापना झाली व वाढ होत आहे.

आध्यात्मिक मूल्यांची सिद्धि, प्रचार आणि प्रसार करण्यास आत्मनिष्ठ नव्या तरुणांची जरूर आहे. अशा

कांहीं व्यक्ति आजहि आश्रमाशीं निगडित आहेत. परंतु कार्यक्षेत्राच्या वाढीच्या दृष्टीनें एवंगुणविशिष्ट तरुण तयार करण्याकरितां यांनीं आपल्या पारमार्थिक गुरूंच्या नांवानें 'श्रीमन्माधवयोगमंदिर समिति' स्थापन केली असून या समितीच्या विद्यमानें लवकरच योगमहाविद्यालय काढण्याची सिद्धता सुरू आहे. या योगमहाविद्यालयाच्या अभ्यासक्रमांत योगविद्या, पाश्चात्य व पौरस्त्य दर्शनें, तौलनिक धर्मशास्त्र, मानसशास्त्र, शारीर, इन्द्रियविज्ञान, रोगपरीक्षा, रोगहरण यांचा अन्तर्भाव असून शासनशास्त्र, अर्थशास्त्र वगैरेंचाहि स्नातकांस परिचय होईल अशी व्यवस्था आहे. योग्य तो अध्यापक वर्ग तयार करण्याकरितां Postg-raduate Research Fellowships निर्माण केल्या असून त्यांत M. A., M. SC. पदवीधर आपापल्या विषयांत Doctorate मिळवितील असा उपक्रम केला आहे.

केवळ कर्मयोगाचाहि एक विभाग कैवल्यधामांत असून त्याचें केन्द्र बोरीवली ( मुंबई नजीक ) येथें आहे. आदिवासी वन्य जनतेची सेवा या केन्द्राकडून केली जाते. एक प्राथमिक विद्यालय, एक मुलांचें छात्रालय, एक मुलींचें छात्रालय, दोन आयुर्वेदीय दवाखाने अशा संस्था धर्मार्थ चालत असून शिवाय वन्य जातीस आर्यसंस्कृतीची शिकवण मिळावी म्हणून अनेक प्रयत्न या केन्द्रातर्फे केले जातात व ते नृपतिजनपदांना फार प्रशंसनीय वाटत आहेत. कैवल्यधामाचे एक आजीवसदस्य श्री. लक्ष्मणजी महाजन हे या केन्द्राचे धुरीण आहेत. आश्रमाच्या कार्यास अनेक राजेरजवाडे व धनिक यांनीं हजारों रुपयांची आजवर मदत केली असून आश्रमाची एकंदर मिळकत दोन ते तीन लक्षांची आहे.

स्वामीजींचा प्रेमळ स्वभाव, पवित्र आचरण, योगविद्येची सेवा, ज्ञानदान, आर्तसेवा, राष्ट्रीय वृत्ति आणि त्यागावर उभारलेली भव्य योजकता यांमुळें यांना विसाव्या शतकांतील महर्षींची पदवी प्राप्त झाली आहे. यांनीं आधुनिक पद्धतीनें योगाचा अभ्यास व प्रचार सुरू केला नसता तर योगाबाबतसुद्धां आम्हांला युरोपकडे पाहावें लागलें असतें.

यांचे कविताग्रंथ—१ सुदामदेव चरित्र ( १९०४ ), २ काव्यरत्नावलि ( १९०४ ), ३ कुवलयानंदाचीं गाणीं ( १९१७ ).

यांचे इंग्रजी भाषेंतील महत्त्वाचे ग्रंथ—१ योगमीमांसा ४ खंड, प्रत्येकीं ४ विभाग, २ योगासनें, ३ प्राणायाम. यांचा हिंदी ग्रंथ—१ यौगिक संघव्यायाम, शिवाय अनेक संशोधनात्मक इंग्रजी लेख व व्याख्यानें.

**कुळकर्णी, दिगंबर गोपीनाथ—** ( जन्म स. १९०६ ) एक महाराष्ट्रीय संशोधक. 'हिंदुस्थानांतील शेतीस मैलापाण्याचा उपयोग' या विषयावर संशोधनात्मक निबंध लिहिल्याबद्दल यांना पीएच्. डी. ही पदवी मुंबई विश्वविद्यालयाकडून देण्यांत आली ( १९३९ ). स. १९२८ सालीं बी. एजी. झाल्यापासून दहा वर्षें एफ्लुएंट फार्म हडपसर येथें वरील विषयाचें संशोधनकार्य हे करीत होते. स. १९३४ सालीं 'पुण्यांतील घाण पाण्याचा शेतीस उपयोग' या विषयावर पाठविलेल्या प्रबंधामुळें यांना एम्. एजी. ही पदवी देण्यांत आली. तोच विषय हिंदुस्थानच्या दृष्टीनें मांडून हे पीएच्. डी. झाले.

शहरांतील मैला पाण्याचा शेतकीच्या कामीं कसा उपयोग करितां येईल हा यांच्या अभ्यासांतील महत्त्वाचा विषय होय. दर माणशीं दर वर्षीं २ रुपये किंमतीचा मैला उत्पन्न होतो. त्याचा जर शेतीस पूर्ण उपयोग झाला तर ४० कोटींच्या हिंदुस्थानास ऐंशी कोट रुपये किंमतीचें खत शेतीस मिळून आर्थिक, आरोग्य व राष्ट्रीय दृष्ट्या फार मोठा उपयोग होणार आहे, हें यांनीं आपल्या निबंधांत दाखविलें आहे. हिंदुस्थानांतील मोठमोठ्या शहरांपुढें आज जो मैलापाण्याचा प्रश्न उभा आहे त्याबद्दलच यांनीं विशेष उहापोह केला आहे. हिंदी शेतीचा जिन्हाळ्याचा प्रश्न राष्ट्रहितदृष्ट्या कसा सोडवितां येईल हें दाखविणें हें यांच्या निबंधाचें वैशिष्ट्य आहे.

'हिंदुस्थानांतील साखरेचे कारखाने, त्यांची सद्यःस्थिति व भवितव्यता' या विषयावरील चढाओढीच्या निबंधाबद्दल मुंबई विश्वविद्यालयाकडून यांना 'ॲशबर्नर' प्राइझ देण्यांत आलें.

त्यानंतर स. १९३८–१९४२ पर्यंत लोण्याच्या पडजमिनी व त्यांची सुधारणा यांबाबत बारामती येथें यांनीं संशोधन केलें. लोण्याच्या जमिनीपासून 'सोडियम सल्फेट' क्षार तयार करून दाखविला असून हें कार्य मोठ्या प्रमाणांत कसें करून दाखवितां येईल हेंहि यांनीं सिद्ध केलेलें आहे. बारामती येथें मोठ्या प्रमाणावर सोडियम सल्फेट तयार करण्याचा सॉल्ट वर्क्स या नांवानें जो कारखाना उभारला आहे तो यांच्याच परिश्रमाचें फळ होय.

स.१९४५ सालीं यांनीं मोर्वी संस्थानांत इरिगेशनखालीं आणण्यास योग्य अशा जमिनींची पाहणी केली असून त्याबद्दलचे नकाशे संस्थानास तयार करून दिले आहेत. इरिगेशन स्कीम हातीं घेण्यापूर्वी इरिगेशनला योग्य अशा जमिनींची पाहणी आगाऊ करणें हें किती महत्त्वाचें आहे हें यांनीं दाखवून दिलें आहे. हा उपक्रम नवीन असून अखिल भारतांतील प्रथम प्रयत्न आहे.

**कुळकर्णी, रावसाहेब-पांडुरंग ज्ञानेश्वर**— ( जन्म स. १८८८ ) सुप्रसिद्ध संस्कृत पंडित, वारकरी वाङ्मयाचे अभ्यासक, सार्वजनिक कार्यकर्ते व मुत्सद्दी. यांचें लेखन पांडुरंगशर्मा या नांवानें प्रसिद्ध आहे. यांचें घराणें देवाच्या आळंदीजवळील चऱ्होली बुद्रुकचें राहणारें असल्यानें चार-पांच पिढ्यांपूर्वींपासूनच यांचा आळंदी व तेथें श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या दर्शनाकरितां येणाऱ्या वारकरी संप्रदायांतील प्रमुख लोकांशीं संबंध आला. बुद्धि तल्लख व वृत्ति धार्मिक असल्यानें यांनीं सुप्रसिद्ध ज्ञानेश्वरीज्ञ कै. कृष्णबुवा श्रीगोंदेकर, साखरे व जोग यांच्यापाशीं ज्ञानेश्वरांचें पद्धतशीर वाचन केलें. पण मूळ संस्कृत भाषेतील शास्त्रज्ञानाची यांना आवश्यकता वाटूं लागली म्हणून हे आपल्या स्वभावानुसार काशीस जाऊन दाखल झाले. काशीस हे सहा वर्षे होते. तेथें यांनीं म. म. गंगाधरशास्त्री तेलंग, सी. आय. ई., यांचे-जवळ वेदान्तशास्त्राचें अध्ययन केलें. त्याच वेळीं अलाहाबाद विश्वविद्यालयाचे मॅट्रिक होऊन कॉलेजमध्येंहि हे दाखल झाले. पण पुढें यांना कॉलेज शिक्षण पुरें करणें शक्य झालें नाहीं.

अभ्यासी वृत्ति, कष्टाळु स्वभाव, निर्भयपणा आणि महत्त्वाकांक्षा यांमुळें यांनीं जेथें जेथें पाऊल टाकलें तेथें तेथें आपली विशेष छाप बसविली. स. १९१७-२१ पर्यंत 'ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान' या विषयावर पुण्याच्या 'चित्रमय जगत्' मासिकांत यांनीं २९ लेखांक लिहिले. त्यांत यांनीं ज्ञानेश्वरांचें वेदांतविषयक प्रतिपादन श्री-शंकराचार्यांच्या अद्वैत मताचें केवळ अनुवादक नसून त्यांचे मायावादखंडन श्रीरामानुजाचार्यांच्या मताला जवळजवळ जुळतें आहे व ज्ञानेशांचा स्फूर्तिवाद शास्त्रार्थ पद्धतीनें सप्रमाण सिद्ध करण्याचा प्रयत्न यांनीं केला. तें सर्व प्रतिपादन अगदीं नवें आणि बिनतोड आहे. आज पंचवीस वर्षांपेक्षां अधिक दिवस ते लेख विद्वानांच्या पुढें असूनहि त्यांचें व्यवस्थित खंडन अद्यापि कोणीच करूं शकलें नाहीं. अलीकडेच नागपूरचे प्रो. शं. दा. पेंडसे यांनीं त्या प्रतिपादनाचें खंडनाचा प्रयत्न 'ज्ञानेश्वरदर्शन' या नांवाचा एक स्वतंत्र ग्रंथ पीएच्. डी. पदवीकरितां लिहून केला. तो प्रयत्न तितकासा यशस्वी झालेला नाहीं असें विद्वानांचें म्हणणें आहे. यावरून यांची मांडणी कशी जुन्यानव्या संस्कृत-प्राकृत ग्रंथांच्या भक्कम आधारावर उभारली आहे हें ध्यानांत येईल. या लेखांना अद्यापि ग्रंथरूपानें प्रसिद्धि लाभलेली नसली तरी त्यांतील विचार इंग्रजीमधूनहि मद्रासच्या तिसऱ्या ओरिएंटल ऑल इंडिया कॉन्फरन्सच्या वृत्तांतांत मांडला गेला आहे.

आळंदी येथील म्युनिसिपालिटीचे हे स. १९२०-३३ पर्यंत अध्यक्ष होते. यांच्या पद्धतीप्रमाणें हे कोणत्याहि सन्मानाच्या जागेचा निर्गुणनिराकार पद्धतीनें उपभोग घेणें शक्य नसतें. तेथेंहि यांनीं आपलें विशेष व्यक्तित्व खर्च करून कौन्सिलमध्यें नामंजूर झालेली आळंदी वॉटरवर्क्सची योजना खास गव्हर्नरच्या मंजुरीनें अंमलांत आणून यशस्वी केली. आज आळंदीस गांवांत व वारकऱ्यांना मोफत मिळत असलेल्या शुद्ध नळाच्या पाण्याचा पुरवठा हा यांच्या प्रयत्नाचें फळ होय. त्या वेळीं 'रावसाहेब' ही पदवी देऊन यांच्या त्यागी व सेवातत्पर वृत्तीचा सरकारनें गौरव केला ( १९२७ ). त्याप्रमाणें अद्यापि कोणत्याहि म्युनिसिपालटीनें न केलेलें मुलांच्या मोफत प्राथमिक शिक्षणाचें आळंदींतील कार्यहि यांच्याच प्रयत्नाचें फळ होय.

यापेक्षांहि यांचें प्रांतिक कायदे कौन्सिलांतील कार्य अत्यंत महत्त्वाचें आणि विशेष घटनामुळें महत्त्वपूर्ण आहे. स. १९३०-३७ सालअखेर हे कौन्सिलांतील लोकनियुक्त सभासद होते. कौन्सिलचे वृत्तांत सरकारनेंच प्रसिद्ध केलेले असल्यामुळें एक साधा पण प्रयत्नशील मनुष्य केवढें प्रचंड काम करूं शकतो याची त्यावरून उत्तम कल्पना येते. बहुमत करावयास लागणाऱ्या सूक्ष्मासूक्ष्म कारवाया, मंत्र्यांच्या अंतर्गत कारवायांवर प्रकाश पाडण्याकरतां करावे लागणारे साहसी प्रयत्न, एवढेंच नव्हे तर सरकारी बजेटांतील कुलंगडीं बाहेर आणण्याकरितां करावा लागणारा गौप्यस्फोट वगैरेमुळें यांनीं कौन्सिलमध्यें आपल्यासंबंधाचा एक विशेष दरारा उत्पन्न केला होता. यांनीं लक्ष घातलेलें काम हे इतक्या नेटानें, चिकाटीनें व बुद्धिमत्तेनें पार पाडीत कीं सर्वच लोक यांच्या कार्यपद्धतीनें चकित होऊन जात. धाडस हा एक यांच्या कार्यपद्धतीचाच भाग आहे. त्यामुळें यांचा वचक नाहीं असा अधिकारीसुद्धां क्वचितच आढळेल.

यांच्या कौन्सिलमधील निःस्वार्थी व निर्भय कामगिरीबद्दल आभार मानण्याकरितां मुंबईचे गव्हर्नर ना. आर. डी. बेल हे एकदां आळंदीस यांच्या घरीं आगाऊ न कळवितां मुद्दाम गेले होते.

अशा प्रकारें कोणतेंहि काम करण्याकरितां यांना अभ्यासहि जिवापाड करावा लागतो. पण अभ्यास, मेहनत याबद्दल हे कधींच विचार करीत नाहींत. आणि ईश्वरकृपेनें यांना शरीरप्रकृतीहि यांच्या बेडरवृत्तीला साजेशी लाभलेली आहे.

डि. लोकलबोर्डांतील नऊ वर्षांची यांची कारकीर्द अशाच थाटाची आहे. तेथें स्कूलबोर्डांतहि हे सहा वर्षे होते. हे आळंदीच्या वारकरी शिक्षण-संस्थेच्या संस्थापकांपैकीं एक असून त्या संस्थेचे स. १९१९-३० पर्यंत ट्रस्टीहि होते. आळंदी संस्थानचे हे ट्रस्टी आहेत (१९४३). याशिवाय विविधज्ञान विस्तारांत अध्यात्मरामायणाचें अर्वाचीनत्व, उपनिषदांचा परप्रांतांतील प्रवास वगैरे संशोधनप्रधान सुमारें पंधरा लेख यांनीं लिहिले आहेत. तसेंच भा. इ. सं. मं. च्या वृत्तांतांत वारकऱ्यांच्या वसाहती, तुकारामाचें अभंगान्तर्गत आत्मचरित्र व. भां. रि. इं. च्या ॲनल्समध्यें ज्ञानेश्वर-नामदेवांचें समकालीनत्व (इंग्रजी) वगैरे लेख व आळंदी पास्ट ॲंड प्रेझेंट (इंग्रजी) हें पुस्तक यांनीं लिहिलें.

**कुळकर्णी, रामकृष्ण केशव**— (जन्म स. १८७६-मृत्यु स. १९४४) एक ध्येयवादी व चिकाटीचे बालशिक्षण कार्यकर्ते. यांचा जन्म सातारा जिल्ह्यांत वडगांवनजीक पुसेसावळी येथें झाला. यांचें हायस्कूल-शिक्षण कोल्हापूर येथें होऊन हे डेक्कन कॉलेजांतून बी. ए. झाले (१८९८). यांना दक्षिणा फेलोशिप मिळाली. इतिहास व तत्त्वज्ञान हा विषय घेऊन दोन वर्षांचा अभ्यासक्रम एकाच वर्षांत उरकून हे एम्. ए. झाले (१८९९). हे अत्यंत बुद्धिमान् असल्यानें एम्. ए. च्या परीक्षेंत यांना तेलंग सुवर्णपदक मिळालें होतें. हे एल्एल्. बी. झाले तरी वकिली करण्यापेक्षां अध्यापनाकडे यांचा ओढा असल्यानें प्रथम उज्जयनीच्या माधव कॉलेजांत व नंतर ग्वाल्हेर येथील विक्टोरिया कॉलेजांत इतिहासाचे प्राध्यापक झाले. स. १९३५ सालीं हे तेथून सेवानिवृत्त झाले. यांची अध्यात्माकडे स्वाभाविकच प्रवृत्ति होती. देवासच्या श्रीशीलनाथमहाराजांच्या विशेष सहवासानें यांच्या अध्यात्मिक वृत्तीची वाढ होऊन हे सर्वांकडे समदृष्टीनें पाहणारे विश्वकुटुंबी बनले होते. अशा वृत्तीला पोषक असणाऱ्या या नवशिक्षिताचा कल थिऑसॉफिकल सोसायटीकडे वळल्यास आश्चर्य कसलें? स. १९१५ सालीं यांनीं मुंबई येथें शिक्षक पालक-संघाची स्थापना केली आणि त्या संस्थेचे चिटणीस म्हणून अत्यंत उत्साहानें आमरण काम केलें. स. १९२४ सालीं बालशिक्षण-शास्त्राच्या पुढील अभ्यासाकरितां यांनीं युरोप, अमेरिका, जपान व इंग्लंड या देशांत प्रवास करून त्या शास्त्रांतील अगदीं ताज्या कल्पना व पद्धति यांची कसोशीनें माहिती मिळवून तिचा प्रसार सुमारें ८-९ बालवार्षिकें (चाइल्ड ॲन्युअल्स) प्रसिद्ध करून या देशांत केला. शिवाय १३ इंग्रजी लघुपुस्तकें त्यांपैकीं कांहींचीं अनेक देशी भाषांतून भाषान्तरें करवून व १६ प्रासंगिक पत्रिका छापून बालशिक्षणशास्त्राचा यांनीं प्रचार केला. शिवाय दक्षिण व उत्तर हिंदुस्थानांत दौरा काढून हे या शिक्षण-पद्धतीचा प्रचार करीत.

**कुंझरू, पंडित अयोध्यानाथ**— (जन्म स. १८४०-मृत्यु स. १८९२)

सुप्रसिद्ध सार्वजनिक कार्यकर्ते व राजकारणी पुरुष. हें काश्मीरी ब्राह्मणाचें घराणें अनेक पिढ्यांपूर्वी अलाहाबाद येथें स्थायिक झालें. यांना लहानपणापासूनच सार्वजनिक कार्य करण्याचा नाद असे. यांनीं आग्रा येथें वयाच्या बाविसाव्या वर्षी वकिली करण्यास सुरुवात केली आणि स्वतंत्र बाण्याचे वकील म्हणून यांनीं लौकिक मिळविला. स. १८८६-९० पर्यंत हे संयुक्तप्रांत कायदे-मंडळाचे पहिले हिंदी सदस्य होते. तत्कालीन सहकाऱ्यांत यांच्याबद्दल अत्यंत पूज्यभाव असे. स. १८८८ सालीं अलाहाबाद येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेचे हे स्वागताध्यक्ष होते. त्या काळीं राष्ट्रीय सभेस सरकारचा फार विरोध होता. त्यास न जुमानतां आणि मुलकी व लष्करी अमलदारांनीं उपस्थित केलेल्या अडचणींस भीक न घालतां यांनीं आपल्या कर्तबगारीच्या जोरावर तें अधिवेशन यशस्वी करून दाखविलें.

हे आग्रा कॉलेजांत कायद्याचे प्राध्यापक होते. आग्रा येथील विक्टोरिया कॉलेजचे हे संस्थापक होत. अलाहाबाद व कलकत्ता विद्यापीठाच्या सेनेटचे हे सभासद होते.

स. १८७९ सालीं स्वतःचे एक लक्ष रुपये घालून यांनीं 'इंडियन हेरल्ड' नांवाचें पत्र काढलें. पण तें पुढें बंद पडलें. पुनः १८९० मध्यें 'इंडियन युनियन'

जन्मास आणलें आणि पंडित मदनमोहन मालवीय यांच्याकडे त्याचें संपादकत्व दिलें. यांचे पुत्र पं. हृदयनाथ कुंझरू होत.

**कुंझरू, पंडित हृदयनाथ**—(जन्म सन १८८७) भारत सेवक समाजाचे अध्यक्ष व सुप्रसिद्ध राजकीय कार्यकर्ते. यांना सार्वजनिक कार्य विधायक पद्धतीनें मनःपूर्वक करण्याचें शिक्षण प. वा. ना. गोखले यांजकडून मिळालें. हे अलाहाबाद युनिव्हर्सिटीचे बी. ए., बी. एससी. असून १९०९ सालीं भारत सेवक समाजास येऊन मिळाले. अर्थशास्त्राचें विशेष अध्ययन करण्याकरितां भारत सेवक समाजानें यांना इंग्लंडला रवाना केलें. तेथें 'लंडन स्कूल ऑफ इकॉनमिक्स' मध्यें यांनीं अभ्यास केला (१९११-१२). भारत सेवक समाजांत प्रवेश झाल्यापासून हे एक निष्ठावन्त आणि व्यासंगी कार्यकर्ते म्हणून जनतेच्या सतत डोळ्यांसमोर आहेत. खुद्द संस्थेंतहि यांच्या विशेष कार्यपद्धतीमुळें पूर्वीचे अध्यक्ष गोपाळ कृष्ण देवधर हे परलोकवासी झाल्यावर यांना अध्यक्ष निवडण्यांत आलें (१९३६). हिंदुस्थानांतील होणाऱ्या राज्यघटनात्मक चळवळींचे सूक्ष्म निरीक्षक या दृष्टीनें यांची कामगिरी महत्त्वाची आहे. चालू सार्वजनिक प्रश्नांची सांगोपांग माहिती यांच्याइतकी फारच थोड्यांना असेल. माँटफोर्ड सुधारणांच्या वेळीं प्रागतिक पक्षानें इंग्लंडला पाठविलेल्या शिष्टमंडळाचे सदस्य म्हणून यांनीं केलेली कामागिरी सुप्रसिद्ध आहे (१९१९). त्याचेच बरोबर संयुक्तप्रान्त कायदेमंडळाचे सभासद (१९२१-२३), ईस्ट आफ्रिकन नॅशनल काँग्रेसचे अध्यक्ष (१९२९), हिंदी विधिमंडळाच्या वरिष्ठ शाखेचे सभासद (१९३७ पासून) ई. आ. नॅ. काँग्रेसनें लंडनला नेलेल्या शिष्टमंडळाचे सदस्य (१९२९-३०) व आस्ट्रेलियांत सिडने येथें भरलेल्या दुसऱ्या ब्रिटिश कॉमनवेल्थ रिलेशन्स कान्फरन्समधील हिंदी शिष्टमंडळाचे सभासद (१९३८), अमेरिकेंत भरलेल्या पॅसिफिक रिलेशन्स् कॉन्फरन्समधील हिंदुस्थानचे प्रतिनिधि (१९४५) इत्यादि यांची कामगिरी महत्त्वाची आहे. लष्कराच्या हिंदीकरणावर हे नेहमीं भर देतात. हिंदी विधिमंडळानें निवडून दिलेल्या डिफेन्स कन्सल्टेटिव्ह कमेटी व स्टँडिंग एमिग्रेशन कमेटी यांचे हे सभासद होते.

पुण्यास भरलेल्यां राष्ट्रीय प्रागतिक परिषदेचे हे अध्यक्ष होते (१९३४). परद्वीपस्थ हिंदी लोक, ब्रम्ही निर्वासित, वगैरेसंबंधाची यांची कामगिरी महत्त्वाची आहे. बनारस हिंदु विद्यापीठ व अलाहाबाद विद्यापीठ यांच्या कार्यकारिणीचे हे सदस्य आहेत. बंगाल, बिहार, ओरिसा, मलबार वगैरे प्रान्तांतील दुष्काळ व व्याधि निवारणाबाबत यांनीं चांगली कामगिरी केली आहे. अलाहाबाद येथील सेवासमितीचे कार्यवाह, कमला नेहरू रुग्णालयाच्या स्थानिक कमेटीचे अध्यक्ष, अलाहाबाद येथें स्थापन झालेल्या हिंदुस्थान स्काउट ॲसोसिएशनचे नॅशनल कमिशनर वगैरे यांचीं कामें उल्लेखनीय आहेत. 'पब्लिक सर्व्हिसेस ऑफ इंडिया' हा यांचा ग्रंथ होय.

**कुंटे, महादेव मोरेश्वर**—(जन्म सन १८३५-मृत्यु स. १८८८) कवि, इतिहासकार व षट्दर्शनज्ञ. साताऱ्याजवळ माहुली गांवीं गरीब भिक्षुक घराण्यांत जन्म. यांचे नऊ वर्षांनीं धाकटे बंधु अण्णा म्हणून होते. बारा वर्षंपर्यंत आयुष्य उनाडपणांत काढून हे कोल्हापुरास पळाले. तेथें मराठी व इंग्रजी शिक्षण घेऊन आपले सहाध्यायी (रा.सा.) विठ्ठलराव पाठक, (रा.ब.) बाबाजीराव सामंत व हे असे तिघे पुढील अभ्यासाकरितां मुंबईस आले. पण जवळची पुंजी लवकरच संपल्यानें यांना परत यावें लागलें. पुनः हे मुंबईस जाऊन १८५९ मध्यें मॅट्रिक झाले व स. १८६४ सालीं बी. ए. झाले.

सिंधमध्यें कराची हायस्कूलच्या हेडमास्तरच्या जागीं यांची नेमणूक झाली. तेथें दोन वर्षांत हे सिंधीचे वाकबगार पंडित झाले. सिंधीचे हे मॅट्रिकचे परीक्षकहि असत. तेथून हे कोल्हापुरास राजाराम हायस्कूलमध्यें हेडमास्तर झाले. तेथें चार वर्षांत संस्कृतचें अध्ययन सुरू करून हे व्याकरण, अलंकार, न्याय वगैरे शास्त्रांत निष्णात झाले. तेथेंच यांनीं तत्कालीन राजाराम छत्रपतींच्या मृत्युविलापाचें काव्य केलें (१८७१). राजा शिवाजी, मन हीं काव्येंहि तेथेंच लिहून यांनीं प्रसिद्ध केलीं.

तेथून हे पुणें हायस्कूलावर हेडमास्तर म्हणून नेमून आले (१८७१). पुण्यास नेमणूक झाल्यापासून मधली दोन वर्षे खेरीज (१८७९-८०) हे सोळा वर्षे पुण्यासच राहिले. मधल्या दोन वर्षांत सहा महिने मुंबईस एल्फिन्स्टनमध्यें संस्कृतचे प्रोफेसर व पुढें यांची अहमदाबाद कॉलेजावर ॲक्टिंग प्रिन्सिपलच्या जागीं नेमणूक झाली. यापूर्वीच यांनीं मीमांसाशास्त्राचा अभ्यास केला. आपल्या ज्ञानाचा फायदा 'षड्दर्शनचिंतनिका' (१८७७) या मासिकाच्या द्वारें लोकांना देण्यास यांनीं सुरुवात केली. त्यांत हे इंग्रजी व मराठी अशा दोन्ही भाषांत लिहीत. त्यांजवरून यांचें त्या शास्त्रांतील नैपुण्य सहज दिसून येतें.

इटलीच्या विद्वत्परिषदेकडून 'आर्य लोकांच्या हिंदु-

स्थानांतील सुधारणाक्रमाचा इतिहास ' लिहिणारास बक्षिस देण्याचें प्रसिद्ध झालें. तेव्हां तें बक्षिस मिळविण्याच्या हेतूनें यांनीं 'व्हिसिसिटयूडस् ऑफ आर्यन् सिव्हिलिझेशन इन इंडिया ' (आर्यसंस्कृतीचीं स्थित्यंतरें) या नांवाचें एक मोठें पुस्तक लिहून तें रोम येथें पाठविलें आणि तें बक्षिस यांना मिळालें. हें पुस्तक यांच्या विद्वत्तेची व शोधक बुद्धीची ओळख पटविण्यास पुरेसें आहे.

यांनीं मुंबईस जाण्यापूर्वी 'ऋषि' नांवाचें इंग्रजी काव्य केलें. त्याची इंग्रजी कवींनींहि तारीफ केली. स. १८७६-७७ सालीं दुष्काळ पडला त्याला अनुसरून यांनीं 'फॅमिश्ड व्हिलेज' या नांवाचें इंग्रजी काव्य करून प्रसिद्ध केलें.

यांनीं सर्व हिंदुस्थानभर प्रवास केला होता. हे स. १८७८ पर्यंत पुण्यांतील प्रार्थना समाजाचे पुरस्कर्ते व अध्वर्यु होते. पण यांचें मतान्तर होतां होतां हे पूर्ण वारकरी सांप्रदायाचे बनले. हे शेवटीं रोज एक तास पायांत चाळ बांधून हातांत चिपळ्या व वीणा घेऊन घाम निघेपर्यंत भजन करीत.

औद्योगिक गोष्टीकडेहि यांचें लक्ष लागून यांनीं 'सूर्यशलाका' नांवाच्या शिसपेन्सिलीचा कारखाना काढला होता. यांत कांहीं वर्षें घालविल्यावर यांचें संगीतशास्त्राकडे लक्ष वेधलें. त्याचाहि खोल व्यासंग करून भारतीय संगीत श्रेष्ठ असल्याची यांची खात्री झाली. गायन समाजाचें काम हे मोठ्या आस्थेनें करीत.

भूगर्भशास्त्राकडे शेवटीं यांचें लक्ष वेधलें होतें. पुणें म्युनिसिपालिटीचे हे सभासद व चेअरमन होते.

यांना अनेक भाषा येत असत. आणि त्या भाषेंत हे मोठें रसाळ वक्तृत्व करूं शकत. थोडक्याच दिवसांत परकी भाषा तिच्यांतील सफाईदार रचनेसह आत्मसात् करणें हा यांचा मोठा गुण होय. मराठी भाषेंतील यांचें वक्तृत्व निःसंशय मेजवानीसारखें असे. साधें पण विविध माहितीनें भरलेलें, रसाळ पण विस्तृत असें यांचें भाषण असे. प्रथांप्रमाणें भाषणें शिल्लक ठेवण्याची कला आपणांकडे नव्हती याबद्दल चुटपुट लागल्याशिवाय राहत नाहीं.

यांच्या 'शिवाजी' वगैरे काव्याची नव्या साध्या मराठी वळणामुळें पंडिती वळणांतील त्या वेळच्या विद्वानांत टरच उडविण्यांत आली. संस्कृत शब्दांचा व अलंकारांचा सोस सोडून अस्सल व्यावहारिक भाषेंत यांनीं काव्य करण्याची प्रथा पाडून नवीन युगाच्या प्रवर्तकत्वाचा मान आपल्याकडे घेतला आहे. इंग्रजी वळणावरची कविता यांच्यानंतर सुरू झाली.

**कुंदगोळकर, सवाई गंधर्व-रामचंद्र गणेश—** (जन्म स. १८८५) सुप्रसिद्ध गवई व नट. हे गायनशास्त्रांत निष्णात असून उत्तम गायक असल्यानें यांना कै. दादासाहेब खापर्डे यांनीं उमरावतीस जाहीरपणें 'सवाई गंधर्व' अशी पदवी दिली. हे सुप्रसिद्ध गवई अबदुल करीमखांचे शिष्य होत. शिकवण व मेहनत करून यांनीं आपली विद्या कमावलेली आहे. त्यामुळें गवई या नात्यानें यांचा दर्जा फार उच्च मानण्यांत येतो. ख्यालासारख्या उच्च प्रकारच्या गायनपद्धतींत हे चांगलेच तयार आहेत. त्यांतील विलंपत व तयारीच्या विविध ढंगी फिरतीच्या प्रकारांत हे सारखेच प्रवीण आहेत. सुरेलपणा व गोडी या दोन्ही प्रकारांनीं अबदुल करीमखांची तरकीब राखून तींत आपल्या मेहनतीनें यांनीं भर टाकली आहे.

बालगंधर्व हे आपल्या मधुर आवजानें कीर्तीच्या शिखरावर होते त्या वेळींच यांनीं नाटकांत पदार्पण करून सुभद्रेचें काम सौभद्र नाटकांत करण्यास सुरुवात केली. आणि कांहीं दिवस बालगंधर्वांचें नांव यांनीं रसिकांना विसरावयास लाविलें. परंतु लवकरच यांच्या आवाजांत दोष उत्पन्न झाला. तो थोडा घोगरा झाला. पण खांसाहेबांच्या पद्धतीनें स्वराची व इतर मेहेनत रोजीं ८।८ तास करून यांनीं आवाजाला मऊपणा व सुरेलपणा आणल्यानें व गाणें अति ढंगदार, कसदार व वजनदार असल्यानें आज तरी महाराष्ट्रीयांत यांच्या तोडीचा श्रेष्ठ गायक विरळा. अबदुल करीमखांच्या गायकींतील मुलायमपणा व भावनेचा हळुवारपणा यांनीं आपल्या ठुंबऱ्या व नाटकांतील पदांत तंतोतंत ठेवला आहे. ठुंबरी ही ख्यालापेक्षां अलग ठेवून स्वतंत्र अंगानें भावप्रचुर म्हणणें आणि ठुंबरी-ख्याल-पदें इ. कोणत्याहि गायकींत एकेक स्वराची विश्लेषणपूर्वक अनेक तऱ्हांनीं बुद्धिप्रचुर बढत करणें यांत यांचा हातखंडा आहे.

**कुंवरसिंग—** (जन्म स. १७७८-मृत्यु स. १८५८ आक्टो. १३) सत्तावन सालच्या युद्धांतील प्रमुख. जगदीशपुरच्या उठावणींत २७ जुलै १८५७ रोजीं यांनीं सुरुवात करून सर्व बिहार पेटविला. १३ आक्टोबर १८५८ रोजीं त्या लढ्याचा यांच्या मृत्यूनें शेवट झाला. यांचे बंधु अमरसिंग शेवटीं नेपाळकडे निघून गेले.

**कृपलानी, आचार्य जे. बी.**— (जन्म स. १८८६ सुमार) बिहारमधील सुप्रसिद्ध कॉंग्रेस कार्यकर्ते व गांधींच्या एकनिष्ठ सिंधी शिष्यांपैकीं एक.

इतिहास व अर्थशास्त्र हे दोन विषय घेऊन एम्. ए. झाल्यानंतर (१९१२) कलकत्ता युनिव्हर्सिटीच्या ताब्यांत असणाऱ्या बिहारमध्यें यांनीं अध्यापनाचें काम सुरू केलें. मुझफरपूरला हे काम करीत असतां चंपारण्यांतील उंसाच्या व निळीच्या मळ्यांत काम करणाऱ्या मजुरांची स्थिति समजावून घेण्याच्या इच्छेनें आलेल्या म. गांधींशीं यांची गांठ पडली व पुढें लवकरच राष्ट्रसभेला डोळ्यांत तेल घालून जपणारे तिचे एकनिष्ठ सेवक म्हणून यांनीं प्रसिद्धी मिळविली. त्यामुळें जेथें गांधी, तेथें सावली-प्रमाणें असणाऱ्या त्यांच्या शिष्यांमध्यें यांची गणना होऊं लागली. या दृष्टीनें गांधींच्या बरोबर खेडा (गुजराथ) येथें यांनीं केलेलें गमन महत्त्वाचें आहे. परंतु यापुढें जवळजवळ एक वर्षभर हे पं. मदनमोहन मालवीयांचे खाजगी चिटणीस होते (१९१८). यानंतर कांहीं दिवस बनारस हिंदु विश्वविद्यालयांत हे राजकारण विषयाचे प्राध्यापक होते (१९१९). एक वर्षानंतर गांधींची असहकाराची चळवळ सुरू झाली (१९२०) आणि हे आपल्या या प्राध्यापकाच्या जागेचा राजीनामा देऊन बाहेर पडले व विश्वविद्यालयांतील आपल्या कांहीं विद्यार्थ्यांचे साहाय्यानें यांनीं मिरत येथें 'श्री गांधी आश्रम' सुरू केला. खादी व ग्रामोद्योग हा तेथील यांचा व्यवसाय होता. यानंतर कांहीं दिवस यांच्या या कार्यास थोडा खंड पडला. कारण या काळांत यांना गुजराथ विद्यापीठाच्या प्राचार्याची (प्रिन्सिपलची) जागा देण्यांत आली (१९२०-२७). परंतु या जागेवरून निवृत्त होतांच यांनीं आपलें हें कार्य पुन्हां एकदां नव्या जोमानें सुरू केलें. यू. पी., दिल्ली व सी. पी. मध्यें चालणाऱ्या खादी व ग्रामोद्योग संघटनेचे संयोजक व मिरतच्या श्रीगांधी आश्रमाचे संचालक या नात्यानें यांनीं केलेली कामगिरी, गांधींच्या कार्यपद्धतीवरील यांचा संपूर्ण विश्वास दर्शविण्यास पुरेशी आहे. आज जवळ जवळ अखंड तपभर राष्ट्रीय सभेचे चिटणीस होण्याचा मान यांना मिळाला आहे (१९३४ ते १९४५).

यांचे (१) The Gandhian Way (२) The Latest Fad (Basic Education) इत्यादि ग्रंथ सुप्रसिद्ध आहेत. हे गांधीवादाचे उत्कृष्ट भाष्यकार आहेत. काव्याची आवड व धार्मिक मनोवृत्ति हें यांचें वैशिष्ट्य आहे. गीता, बायबल व सिंधचा प्रख्यात सूफी कवि शाह अबदुल लतीफ यांचीं काव्यें हे यांचे आवडते ग्रंथ होत.

**कृष्णमाचारी, सर वंगल तिरुवेंकट**— (जन्म स. १८८१) बडोदें राज्याचे सुप्रसिद्ध दिवाण. मद्रास येथील प्रेसिडेन्सी व लॉ कॉलेजांत शिक्षण घेऊन एलएल्. बी. झाल्यानंतर हे मद्रास सिव्हिल-सर्व्हिसमध्यें शिरले. पुढें कोचीन राज्यांत चीफ रेव्हेन्यु कमिशनर व साउथबरो-कमेटीचे स्पेशल आफिसर म्हणून काम केलें (१९१३-१९). नंतर रामनद राज्यांतील कलेक्टर व लॉ डिपार्टमेंटचे सेक्रेटरी होते (१९२३). यानंतर बडोद्याचे दिवाण म्हणून यांची नेमणूक झाली (१९२७-१९४५). पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या राउंड टेबल कॉन्फरन्सचे हे सभासद होते व तेथें यांनीं निरनिराळ्या कमेट्यांवर कामें केलीं (१९२९-३१). जॉइंटपार्लमेंटरी कमेटीचे हे प्रेसिडेंट होते. हे बडोद्याच्या दिवाणपदावरून निवृत्त झाल्यानंतर सान्फ्रान्सिस्को परिषदेस हिंदुस्थान सरकारचे प्रतिनिधि म्हणून उपस्थित होते. यांना सर व के. टी., सी. आय. ई. इत्यादि पदव्या ब्रिटिश सरकारनें दिल्या आहेत.

**कृष्णमूर्ति जे.**—(जन्म स. १८९५) जगप्रसिद्ध तत्त्वज्ञानी.

यांचा जन्म दक्षिण हिंदुस्थानांत मदनपल्ली येथें तेलगू ब्राह्मणाच्या कुटुंबांत झाला. त्या वेळीं यांचे वडील तेथें तहशीलदार होते. यांची आई हे दहा वर्षांचे असतांना वारली. तिचे दहा दिवसांतच, एकदां हे स्नान करीत असतांना, एकदम ओलेतेच बाहेर आले व म्हणाले कीं, 'आतांच आई स्नान करून बाहेर आली आहे. ती तिकडे लुगडें बदलण्याकरितां जात आहे. मीहि तिकडेच जातों.' असें म्हणून ज्या खोलींत लुगडीं वाळत घालीत असत तिकडे हे गेले व कांहीं वेळानें ती दिसेनाशी झाली असें पाहून बाहेर आले.

स. १९०७ सालीं यांचे वडील सेवानिवृत्त झाले. ते १८८२ सालापासून थिऑसॉफिकल सोसायटीचे सभासद होते. सेवानिवृत्त झाल्यावर त्यांचें थिऑसॉफीवर प्रेम असल्याकारणानें, अड्यार येथें राहून आपण सोसायटीचें कांहीं तरी काम करावें, अशा इच्छेनें त्यांनीं डिसें. १९०७ मध्यें आपली सेवेची इच्छा बेझंट-बाईंच्यापाशीं प्रगट केली. पण त्यांचे कुटुंबांतील माणसें बरींच असल्यानें बाईंनीं प्रथम नकार दिला. पण पुढें

१९०९ च्या आरंभीं बाईनीं त्यांना 'हो' म्हटलें, व ते अड्यार येथें येऊन राहिले. त्यांना चार मुलगे होते. हें आठवें अपत्य असल्यानें, यांचें नांव तिकडील रिवाजाप्रमाणें ' कृष्णमूर्ति ' असें ठेवलें.

फेब्रु. १९०९ मध्यें मि. लेडबीटर हे अड्यार येथें कायम वस्तीकरितां येऊन राहिले. रोजचें कामकाज संपल्यावर ते सहकारी मंडळींना घेऊन पोहावयास जात असत. एके वेळीं हीं मुलें तळ्याचे कांठावरून पाहत उभीं असतां मि. लेडबीटर यांनीं ' तुम्हांला पोहावयास शिकावयाचें आहे का ?' असें म्हणून त्यांच्या वडिलांच्या संमतीनें त्यांना शिकविण्यास सुरुवात केली. थोडयाच दिवसांत, एके दिवशीं लेडबीडर हे पोहून परत आल्यावर, त्यांचे खासगी चिटणीस मि. अर्नेस्ट वुड यांना ग्रंथकार्याला सुरुवात करण्याचे पूर्वी म्हणाले कीं, " आज माझा एक अत्यंत प्राचीन जिवलग मित्र मीं ओळखला. तो तहशीलदार नारायणय्या यांचा द्वितीय पुत्र होय. त्या वेळचा त्याचा जन्म गौतमबुद्धांच्या वेळचा होता." लेडबीटर यांनीं यापूर्वी सोसायटीच्या अनेक सभासदांचे पूर्वजन्म संशोधिले होते. तेव्हां यापुढें यांचे जन्महि संशोधून पाहावे व हे या ठिकाणीं सोसायटीचे पीठामध्यें वास्तव्य करण्यास कां आले याची कारणपरंपरा शोधून पाहावी, अशी कल्पना दोघांच्याहि मनांत येऊन त्याजबद्दल नारायणय्या यांची संमति घेऊन, या कार्यास त्यांनीं आरंभ केला; व रोज एका जन्माचा वृत्तान्त लिहिण्याचा क्रम सुरू झाला. या वेळीं लेडबीटर हे कोचावर किंवा खुर्चीवर बसून, कधीं डोळे उघडे ठेवून तर कधीं मिटून, निवेदन करीत व मि. वुड हे तो मजकूर लिहून काढीत. लेडबीटर यांनीं त्यांना सांगून ठेवलें होतें कीं, मला महत्त्वाचा वाटेल तो भाग मला जसा दिसेल तसा मी सांगत राहीन. पण तुम्हांला एखादा तपशील विशेष विस्तारानें हवा असल्यास, तसें मला तुम्हीं सांगावें. याप्रमाणें पहिले दिवशीं यांचा बुद्धकालीन जन्म लिहिला गेला. याप्रमाणें रोज एक, असे दहा जन्म लिहिले गेले, व त्यांमध्यें अनेक वेळां या जन्मांतून यांची निःस्वार्थता, शुद्ध प्रेम व अलोट त्याग झालेले व गौतम बुद्धासारख्या महापुरुषांच्या सन्निध लोकसेवेचीं व्रतें घेतल्याचे प्रसंग पाहण्यांत आले व एकदम लेडबीटर यांना विचार उमगला कीं, मला व बेझंटबाईंना गुरुदेवांकडून जगद्गुरूंच्या आगमनाची जगभर जाहीर घोषणा करावी अशी जी आज्ञा मिळाली आहे, तदनुरूप या जन्मामध्यें, कदाचित् त्यांचे कार्याचें अधिष्ठान होण्याकरितां या मुलाचें आगमन सोसायटीचे हद्दींत झालें असेल. त्या वेळीं बेझंटबाई या युरोप व अमेरिकेमध्यें जगद्गुरूंच्या आगमनाबद्दल ' चेंजिंग वर्ल्ड ' या संज्ञेखालीं व्याख्यानें देत फिरत होत्या. त्यांजकडे हे पहिल्या दहा जन्मांचे पूर्व-वृत्तान्त त्यांनीं रवाना केले व नंतर फिरून दोन दशकें याप्रमाणें तीस जन्मांचे वृत्तान्त पाठविले. यानंतर बेझंटबाई १९०९ च्या अखेरीस हिंदुस्थानांत आल्या व दोघांसहि यांचें दिव्य भवितव्य प्रत्ययास आलें.

येथें आल्यावर अशा अलौकिक मुलाचें शिक्षण विशेष रीतीनें झालें पाहिजे, ही गोष्ट त्यांनीं त्यांचे वडिलांस कळविली व ' कृष्णमूर्ति व नित्यानंद या दोन्ही मुलांचे शिक्षणाची जबाबदारी, इंग्लंडांतील उच्च शिक्षणासह मजकडे आहे' असें सांगितलें व नारायणय्या यांना त्यांचेबद्दल विश्वास व आदर असल्यामुळें, त्यांनीं या योजनेला संमति दिली. या वेळीं हीं दोन्ही मुलें मैलापूर (मद्रास) या शाळेंत जात असत. त्या वेळीं शिक्षकांच्या मतानें नित्यानंद हा चलाख व बुद्धिमान् असून, हे अगदींच मंदबुद्धीचे होते.

जानेवारी ११ व १२ स. १९१० या दिवशीं अड्यार येथील पीठांतच यांना पहिली महादीक्षा प्राप्त झाली. ही दीक्षा मिळण्याची पूर्वतयारी म्हणून, यांचे गुरुदेव यांना स्वप्नस्थितींत रोज जो पाठ देत असत, तो सकाळीं उठल्यावर बेझंटबाईंचे खोलींत असतांना, ' स्वप्नस्मृति ' म्हणून हे लिहून काढीत. याप्रमाणें साधनचतुष्टयाबद्दल यांना मिळालेला उपदेश, यांनीं रोजचे रोज लिहून काढला. हाच उपदेश, अनुक्रमदृष्टीनें सुसंगत करून, ' At the Feet of the Master ' या नांवानें पुढें प्रसिद्ध झाला. या ग्रंथाची भाषा अत्यंत सुगम व सरळ अशी आहे, व त्यांत अत्यंत प्रसादहि भरलेला आहे.

वर लिहिलेल्या पूर्वजन्मांचा वृत्तान्त ' थिऑसॉफिस्ट ' मासिकांतून बाईनीं प्रसिद्ध केला व हा मुलगा जगद्गुरूंचे अवताराचें अधिष्ठान होणार असल्याचें आपलें मत प्रसिद्ध केलें, व यांना बरोबर घेऊन हिंदुस्थानांतील कांहीं ठिकाणीं त्यांनीं प्रवास केला. बनारस येथें असतांना तेथें चाललेल्या सेंट्रल हिंदु कॉलेजमधील शिक्षणकार्याचें त्यांनीं निरीक्षण केलें व कांहीं सभासदांना व तेथील प्राध्यापकांना साधन-चतुष्टयाच्या आधारें शिक्षणावर प्रवचनें केलीं. तीं कांहीं शिक्षकांना अत्यंत अलौकिक वाटलीं.

तीं पुढें 'Education as Service' या नांवानें प्रसिद्ध झाली. जगद्‌गुरूंचे कार्याची पूर्वतयारी म्हणून बाईंनीं 'ऑर्डर ऑफ स्टार इन् दि ईस्ट' ही संस्था काढली.

याप्रमाणें काम चाललें असतां, यांच्या भावी दैवी भवितव्याबद्दलच्या खऱ्याखोट्या वदंता कानीं जाऊन, दक्षिण हिंदुस्थानांतील नारायणय्यांचे कित्येक सनातनी वृत्तीचे नातलग व स्नेही यांना हा सर्व प्रकार अत्यंत अंधश्रद्धेचा व भ्रष्टाकाराचा अतएव मुलांच्या अनहिताचा असा वाटून त्यांना आपलीं मुलें परत घेण्याची त्यांनीं गळ घातली, व त्यांतच मि. लेडबीटर यांच्यावर पूर्वी शीलभ्रष्टतेचें जें वादळ सोसायटींत उठलें होतें त्याहि गोष्टीची त्यांचे मनावर भर दिली. त्यामुळें नारायणय्या यांचे मनाची चलबिचल होऊन त्यांनीं बेझंटबाईंना मुलें परत मिळण्याबद्दल खासगी मागणी करून इकार न मिळाल्यामुळें फिर्याद करण्याची कायदेशीर नोटीस दिली. हें पाहून आपल्या कार्यांत येणारें विघ्न टाळण्याकरितां बाईंनीं मुलांना लागलीच १९१२ सालीं विलायतेंत नेलें, व त्यांच्या ऑक्सफर्ड विश्वविद्यालयांतील शिक्षणाची योजना करून त्यांचे पूर्वशिक्षणाकरितां डॉ. अरंडेल, मि. जिनराजदास व प्रो. वुडहाउस यांची अनुक्रमें इतिहास, संस्कृत व इंग्रजी या विषयांकरितां नेमणूक केली. तोंच त्यांचेवर मद्रास हायकोर्टांत मुलांचे कबजाबद्दल यांचे वडिलांकडून दावा दाखल झाला. या दाव्याचे चौकशींत मुलें परत मिळण्याबद्दल कारण म्हणून जो लेडबीटर यांचे अनीतिमत्तेबद्दल आक्षेप दाखविण्यांत आला होता तो शाबीत झाला नाहीं, पण 'कायद्यानें बापाला मुलें परत घेण्याचा हक्क आहे' असा निर्णय झाला. पण बाईंनीं केलेल्या प्रिव्ही कौन्सिलचे अपिलांत हा निर्णय खालच्या कोर्टानें मुलांचें स्वतःचें मनोगत काय, हें न पाहिल्यानें व मूलतः फिर्याद कायद्यानें चालू शकत नसल्यानें, रद्द केला गेला ( एप्रिल १९१४ ).

याप्रमाणें हे व त्यांचे बंधु नित्यानंद यांचे शैक्षणिक जीवनास स्वस्थतेनें इंग्लंडांत सुरुवात झाली. नित्यानंद हे ऑक्सफर्ड विश्वविद्यालयाचे बी. ए. झाले व पुढें कायद्याचे अभ्यासास लागले. यांत बेझंटबाईचा हेतु असा होता की, हे संन्यस्तधर्मानें राहण्याचा संभव असल्यानें त्यांना लहान भावाचा सांपत्तिक आधार असावा. यांच्या शिक्षणाची वरप्रमाणें व्यवस्था केली होती, पण शिक्षकांचे नजरेस, व्यावहारिक शिक्षणाबद्दल यांची आत्यंतिक उदासीनता आढळून आली. यांनीं अनेक ग्रंथ वाचले, पण शिक्षकांचे दृष्टीनें त्यांना त्यांचे कार्यांत यश आलें नाहीं. १९२१ सालीं आपल्या बंधूंबरोबर हे हिंदुस्थानांत आले व लोककार्यांत लक्ष घालून व्याख्यान व लेखन करूं लागले. पुनः कांहीं दिवसांनीं ऑस्ट्रेलियाचे मार्गानें अमेरिकेंत गेले, व तेथें राहून कधीं युरोपांत व हिंदुस्थानांत प्रचारकार्य करूं लागले. यांचीं प्रवचनें ऐकून व विषयचर्चेची स्वतंत्र रचना व मौलिक स्वरूप पाहून बाईंच्या म्हणण्याप्रमाणें हे खरोखरच अलौकिक पुरुष आहेत असें लोकांस वाटलें. सो. च्या बाहेरचेहि शेंकडों लोक श्रवणास येऊं लागले. यांचे कार्याकरितां हॉलंडमधील बॅरन पॅलँड या नांवाचे एका श्रीमंत गृहस्थानें आपला मालकीचा एरडे या गांवीं असलेला एक प्राचीन किल्ला, भोंवतालचे पांच हजार एकर जमिनीसमवेत यांना बक्षीस दिला. बाईंनीं यांचेकरितां रहिवासाला म्हणून आर्यविहार नांवाची इमारत कालिफोर्निया( अमेरिका )मध्यें विकत घेऊन दिली. याप्रमाणें काम चालत असतां १९२५ सालचे अखेरीस सोसायटीचे सुवर्णमहोत्सवानिमित्त बेझंटबाईबरोबर हे हिंदुस्थानाकडे परत येत असतां यांचे बंधु नित्यानंद हे अमेरिकेंत क्षयानें वारल्याचें वृत्त यांचे कानीं पडलें. त्या योगें यांना आत्यंतिक दुःख झालें. पण त्या दुःखाग्नींतूनच 'मला आत्मज्ञान व अखंड शांति प्राप्त झाली' असें ते म्हणत.

सोसायटीचे सुवर्णमहोत्सवप्रसंगीं यांचें प्रवचन चालू असतां यांचे मुखांतून अखेरी-अखेरीस जगद्‌गुरूंचेच असे वाटणारे उद्गार निघाले, व हाच प्रसंग युरोप-अमेरिकेंतील व्याख्यानांतून अनेक वेळां व जास्त वेळपर्यंत पुनः पुनः होऊं लागला. यांचा योगाभ्यास १९२७ जाने. मध्यें पूर्ण झाला.

पण तेव्हांपासून यांचे मुखांतून सर्वांनाच अनपेक्षित अशी विचारसरणी नित्य निघूं लागली. यासंबंधींचें यांचें पहिलें प्रवचन म्हणजे 'Who brings the truth' हें असून तेव्हांपासून यांची विचारसरणी आजपर्यंत अखंड रीतीनें त्याच तऱ्हेची चालू आहे. लागलीच यांनीं यांचे कार्याकरितां बाईंनीं काढलेला संप्रदाय 'Order of Star in the East' बंद केला ( १९२८ ), अमेरिकेंतील घराचा त्याग केला, हॉलंडमधील वर लिहिलेला किल्ला व जमीन पूर्व मालकाला परत देऊन टाकली व आपण पूर्ण संन्यस्त वृत्तीनें राहूं लागले. 'मला संप्रदाय उत्पन्न करावयाचा नाहीं,

मला शिष्य नकोत, मी कोणाचाहि गुरु नाहीं. प्रत्यक्ष माझ्या योग्यतेचे होण्याचा प्रत्येक स्त्रीपुरुषाला निसर्गदत्त हक्क असतांना, त्यांनीं माझें किंवा कोणाचेंहि शिष्यत्व पत्करणें हा त्यांचा अपकर्ष आहे ' असें हे सांगूं लागले. व त्याप्रमाणें यांचा अजूनपर्यंत जीवनक्रम चालू आहे. यापुढें चालू युद्धामुळें किंवा अन्य कोणत्याहि जागतिक अगर वैयक्तिक घटनेमुळें, यांच्या जीवनौघाला काय वळण लागेल, हें भविष्यकालाचे उदरांत अज्ञात आहे.

' जगदुद्धाराचा प्रश्न हा मूलतः, व्यक्ति उद्धाराचाच प्रश्न आहे; व हा व्यक्तीच्या, कोणत्याहि धर्माच्या, पंथाच्या, संप्रदायाच्या, समाजाच्या, देवाच्या किंवा अन्य कोणाच्याहि एवढेंच नव्हे तर माझ्याहि द्वारां होणें शक्य नाहीं. उद्धार ज्याचा त्यानें स्वावलंबनानें करून घेतला पाहिजे. उद्धाराचा मार्ग पूर्वाचार्यांनीं आधींच सांगून ठेवलेला नाहीं. प्रत्येकानें आपला मार्ग शोधून निश्चित करावयाचा आहे ' याप्रमाणें या अलौकिक पुरुषाची शिकवण आत्यंतिक व्यक्तिमत्त्वाच्या पुरस्काराची आहे. यांचे ग्रंथः—

1. At the Feet of the Master, 2. Education as Service, 3. Kingdom of Happiness, 4. Who Brings the Truth, 5. Life in Freedem, 6. In What Authority, 7. Let Understanding be the Law, 8. Pool of Wisdom, 9. Life the Goal, 10. Search, 11. Immortal Friend. (वा. ल. चिपळुणकर)

**( मुम्मडी ) कृष्णराज वोडियार**— ( जन्म स. १७९४–मृत्यु स. १८६८ )

म्हैसूर संस्थानचे महाराज, कानडी भाषेंतील ग्रंथकार व कवि. यांच्या पित्याचें नांव चामराज, माता–केम्पन जांबे. स. १७९९–१८६८ पर्यंत हे राज्यावर होते. यांचें चरित्र आमच्या मध्ययुगीत चरित्रकोशांत ' कृष्णराज ओडियार ' या शब्दावर दिलें आहे. येथें फक्त यांच्या कानडी वाङ्मयांतील कार्याचा उल्लेख आम्ही करीत आहोंत. हे मोठे विद्वान् असून संस्कृतांतील पुराणें, इतिहास, काव्य वगैरेंचें यांनीं कानडी भाषेंत अवतरण केलें, तसेंच स्वतंत्रपणें नवीन ग्रंथहि निर्मिले.

यांचे ग्रंथः—१ अखंड कावेरी-माहात्म्य, २ अध्यात्म-रामायण, ३ अर्कपुष्करिणी-माहात्म्य, ४ उत्तरगीतें, ५ उत्तररामचरितकथे, ६ उषापरिणय, ७ कादंबरी, ८ काशीकण्ड, ९ कृष्णकथा-रत्नाकर, १० कृष्णकथासार-संग्रह, ११ गयचरित्रे, १२ चुंचनकट्टेयमाहात्म्य, १३ जातकसाम्राज्यटीके, १४ जैमिनिभारतद आश्वमेधिकपर्वदटीके, १५ तुलाकावेरीमाहात्म्य, १६ दशकुमारकथा-कलानिधि, १७ देवी भागवत तात्पर्यटीके, १८ देवी-माहात्म्य सप्तशती, १९ देवीसायुजरसीसमालिके, २० नजुडशतक, २१ नलोपाख्यान, २२ पंचतंत्र, २३ बत्तीस-पुत्तळयकथे, २४ वेताळपंचविंशती, २५ भक्तविलास इत्यादि एकावन्न ग्रंथ आहेत.

हे आपणांस स्वयंवृतकविताबधूरत्न व उभयकविता-लक्षणविचक्षण या नांवानें संबोधितात. यांचे ग्रंथ विशेषतः गद्यमयच आहेत. ३ च पद्यमय आहेत ( क. क. च. भा. ३ पा. १७२ पासून पुढें ).

**कृष्णराव, मास्तर**— ( जन्म स. १८९७ ) सुप्रसिद्ध गवई, नट व संगीत रचनाकार. यांचें समग्र नांव कृष्णराव गणेश फुलंब्रीकर.

महाराष्ट्रीय रसिकांचा आणि यांचा प्रथम परिचय यांच्या अगदीं बाळपणांत–नाट्यकलाप्रवर्तक मंडळीच्या ' संत सखूबाई ' नाटकांत विठ्ठलाचें काम करणारा मुलगा या नात्यानें झाला. घरची विपन्न स्थितीच यांना रंगभूमीचा आश्रय स्वीकारावयास कारणीभूत झाली. यांचें बालपण अत्यंत हालअपेष्टांत गेलें.

यांची बुद्धि कुशाग्र असली तरी अभ्यासाकडे लक्ष नसल्यानें गोड आवाजाच्या जोरावर यांनीं नाट्यकला-प्रवर्तक मंडळींत प्रवेश केला. संत सखूंतील विठ्ठलाची भूमिका व 'भक्तजन सखा' या पदानें यांनीं आपल्याकडे सर्वांचें लक्ष वेधून घेतलें. नवीन चाली लावण्याची लकब यांच्यांत तेव्हांच दिसून आली. नाट्यकलेंतील तीन वर्षांत यांना नाट्यसंगीत व शास्त्रीय संगीत यांचें शिक्षण श्री. सवाई गंधर्व यांनींच दिलें व त्यांनींच पुढील शिक्षणासाठीं अबदुल करीमखांकडे यांना नेलें. पुढें शिक्षणाकरितां यांनीं नाट्यकला सोडली ( १९१३ ).

अबदुल करीमखांकडे शिक्षण घेण्याची इच्छा असूनहि अटी झेंपेनात म्हणून तो नाद यांना सोडावा लागला. एके दिवशीं सहज कै. भास्करबुवा बखल्यांना यांनीं दोन पदें म्हणून दाखविलीं. तेव्हां यांच्या हुशारीची तारीफ करून ' शिकला तर चांगला शिष्य होईल ' या दृष्टीनें त्यांनीं यांना जवळ केलें. त्यांनीं आपल्या विद्येचीं सर्व दालनें यांच्याकरितां खुलीं केलीं आणि यांनींहि आपल्या बुद्धीच्या व स्मरणशक्तीच्या जोरावर त्याचा भरपूर

फायदा घेतला. अगदीं प्रवासांत असतांना जरी बुवांना एखादी चीज आठवली तर लगेच 'अरे कृष्णा, ही चीज टिपून घे, किती दिवस आठवत नव्हती.' अशा पद्धतीनें यांना शिक्षण दिलें गेलें. त्यामुळें अमुक एखाद्या मुष्किल रागाची चीज यांना येत नाहीं असें सहसा व्हावयाचें नाहीं. त्या वेळीं कै. विष्णु दिगंबर, रामकृष्णबुवा वझे आणि कै. भास्करबुवा बखले ही मंडळी दिल्ली, अमृतसर, जालंदर वगैरेकडे जात तेव्हां हे भास्करबुवांबरोबर असावयाचेच. तेव्हां यांना उत्तर हिंदुस्थानांतील विविध गायकी ढंगांचा परिचय होऊन त्यांचा अन्तर्भाव आपल्यांत करतां आला. आणि यामुळेंच बालगंधर्वांच्या आजारीपणांत गाण्याच्या बाबतींत तरी लोकांच्या मनाची पकड घेणारा हा नट गंधर्व कंपनींत गुरूच्या संमतीनें दाखल झाला (१९१७). प्रथम यांनीं श्रीमंत बडोदें सरकारसमोर शारदेचें महत्त्वाचें काम करून आपल्याकडे लक्ष वेधून घेतलें. पण एकच प्याल्यांतील शरदच्या भूमिकेनें हे अत्यंत लोकप्रिय झाले. आणि गंधर्व कंपनींतील हे आकर्षण होऊन बसले. भोसले-गंधर्व संयुक्त प्रयोगांत यांना सौभद्रांतील नारदाची भूमिका प्राप्त झाली (१९२१). यानंतर अकस्मात् बखलेबुवा वारले आणि लोकांना वाटलें कीं, यांचा खजिना आटला. पण यांनीं गंधर्वांच्या इच्छेनुसार नव्या नाटकांत नव्या चाली पुरवून आपली योग्यता सगळ्यांच्या निदर्शनास आणली. 'नंदकुमार' नाटकांतील चाली मास्तरांच्या प्रतिभेंतून निघाल्या आहेत (१९२२). उत्तम स्वररचना करून तदनुसार हिंदी व मराठी भाषेंत केलेली पद्यरचना यांच्या सारसंग्रहांत पाहावयास सांपडते. गंधर्व मंडळीची शक्ति 'बालगंधर्व' असले तरी त्यांना देखील आपल्या संगीतासाठीं हे नव्या नव्या सुंदर चाली देत. त्यांच्यामागें सतत पंधरा वर्षें उभी असलेली शक्ति म्हणजे मा. कृष्णराव हें कोणीहि रसिक कधींहि विसरूं शकणार नाहीं. जुन्या हिंदी स्वरकारांच्या पावलांवर पाऊल टाकून गोविंदराव टेंब्यांनीं महाराष्ट्रांत स्वररचनेची धमक उत्पन्न केली, तर यांनीं तोच कित्ता गिरवून प्रत्यक्ष हिंदींतच स्वररचना करण्यास सुरुवात केली. अशा स्वररचनेपैकीं कांहीं चिजा यांनीं आपल्या 'रागसंग्रह' पुस्तकांत संग्रहित केल्या आहेत. मधुर स्वररचना करण्याच्या आपल्या कौशल्यानें केवळ रंगभूमीवर विजय मिळवून हे थांबले नाहींत. तर 'धर्मात्मा', 'अमरज्योति' व 'गोपालकृष्ण' वगैरे चित्रपटांना यांनीं दिलेल्या चालींवर यांची स्वतःची अशी निश्चित छाप आहे.

**केडगांवकर, श्रीनारायणमहाराज**—(जन्म स. १८९१) पुण्याजवळील केडगांवचे प्रसिद्ध सत्पुरुष. हे शिंदगी (जि. विजापूर) गांवच्या संति उपनांवाच्या दे. ऋ. ब्राह्मण घराण्यांतील आहेत. यांच्या घराण्यांत 'भीमाशंकर संति' नांवाचे एक सत्पुरुष होऊन गेले. त्यांचीं कानडी पदें अद्यापि गाणगापुरीं म्हटलीं जातात. कद्रिविलिंग-भीमाशंकर-शिवराम-नारायण असा यांचा वंश आहे. यांचे वडील-मातोश्री हे तीन वर्षांचे असतांच वारले. पुढें नरगुंदास चुलत्यानें पालनपोषण केलें. धारवाडास अजोळीं मुंज झाल्यावर यांनीं घर सोडलें (१८९८). पुढें पुण्याजवळ बोपगांवीं त्रिंबकराव अत्रे कुलकर्णी यांजकडे हे येऊन राहिले. जवळच आर्वीलाहि हे राहत. तेथें यांचें दैवी सामर्थ्य प्रगट होऊं लागलें. तेथून त्यांचे भाचे व सदाशिवराव देशपांडे, बढाणें (सुपें) यांजकडे हे येऊन राहूं लागले व तेथें स्नान, संध्या व भूतबाधानिवारण वगैरे चमत्कारांमुळें हे नारायणमहाराज म्हणून प्रसिद्ध झाले. बढाण्याच्या बेटांत औदुंबराचे झाडाखालीं हे तपश्चर्येस बसत. तेथें भूगर्भांत दत्ताच्या पादुका असल्याचा यांना दृष्टान्त झाला. जमीन उकरतां खरोखरच ताजीं फुलें वाहिलेल्या पादुका सांपडल्या. तेव्हां चोहोंकडून लोक यांच्या व पादुकांच्या सेवेकरितां येऊन तेथेंच राहूं लागले. तेव्हां यांनीं थोड्या अन्तरावर सोयीची जागा पाहून सध्यांच्या भव्य व पक्क्या धर्मशाळा व सुंदर दत्तमंदिर बांधलें व तेथें मोठ्या समारंभानें दत्ताच्या मूर्तीची स्थापना केली (शके १८३५ वैशाख–स. १९१३). तेंच सध्यांचें नारायणमहाराजाचें बेट होय.

यांची दिनचर्या अगदीं साधी असून त्यांत गूढ असें कांहीं नाहीं. सूर्योदयापूर्वीं स्नान करून संधिकालीं सूर्याला अर्घ्यप्रदान करण्यावर यांचा कटाक्ष आहे. जुन्या परंपरेच्या वैदिक धर्माचे हे कट्टे पुरस्कर्ते असून त्यांत भक्तिमार्गाचें सुंदर मिश्रण यांनीं केलें आहे. स्नानसंध्येप्रमाणेंच देवदर्शन व भजन यांचा यांच्या नित्यकर्मांत समावेश झालेला आहे.

यांची वृत्ति चमत्कार करण्याची नाहीं. अद्‌भुत किंवा अचाट गोष्टींची हे कधीं तरफदारी करीत नाहींत. यांचा उपदेशहि भक्तिमार्गाला अनुसरून उपवास, देवदर्शन, जप, नित्यनेम वगैरे अगदीं साध्या स्वरूपाचा असतो. तथापि लोक हे चमत्कार करितात असें सांगतात. पुणें

डेक्कन कॉलेजचे प्रो. वुडहाउस हे एकदां शिकारीला गेले असतां पाणी नसलेल्या ठिकाणीं यांनीं त्यांना झरा उत्पन्न करून पाणी पिण्याला दिल्याचा चमत्कार मुंबईच्या टाइम्स ऑफ इंडियांत त्यांनीं आपल्या सहीनें प्रसिद्ध केला होता ( श्रीनारायणचरित्र पा. ५४ ).

यांनीं १९३६ सालीं बेटांत अतिशय मोठ्या प्रमाणा-वर एक अभूतपूर्व अनुष्ठान केलें. सर्व वेदांचीं पारायणें, सर्व पुराणांचें वाचन, दर तासाला १०८ सत्यनारायण व अनेक लहानमोठीं ऋक्संहिता स्वाहाकारासारखीं अनुष्ठानें असा सतत चोवीस तास चालणारा अभूतपूर्व कार्यक्रम आठ दिवस यांनीं अगदीं शिस्तींत पार पाडला. यानंतर हे सर्व हिंदुस्थानांत हिंडून शास्त्रोक्त पद्धतीनें तीर्थयात्राहि करून आले. सर्व कार्यक्रम अत्यंत भव्य प्रमाणांत आणि शिस्तीनें पार पाडण्याची यांची हातोटी अलौकिक आहे. याशिवाय यांचें सतत मुक्तद्वार अन्नछत्र चालू असतेंच. यांत विशेष हें आहे कीं, हे कोणाकडे केव्हांहि याचना करीत नाहींत. पुढें ठेवलेलें सुद्धां प्रसाद म्हणून परत करावयाचें असा यांचा कटाक्ष आहे. केवळ देवस्थानाकरितां आग्रहानें दिलेलें तेवढें हे घेतात. अशा तऱ्हेचा वार्षिक ५०-६० हजारांचा खर्च यांचा अव्या-हतपणें चालू आहे. शिवाय नैमित्तिक खर्च लक्षावधि रुपयांचे झालेले दिसतात. सामान्य लोकांना दैवी सामर्थ्याशिवाय यांच्या एकंदर व्यवस्थेची उपपत्ति लागत नसल्यास आश्चर्य कसलें ?

**केतकर, वेंकटेश बापूजी**—( जन्म स. १८५४– मृत्यु स. १९३० ) महान् ज्योतिर्ज्ञ व संशोधक.

यांचें हायस्कूलमधील शिक्षण बेळगांवीं झालें. मॅट्रि-कच्या परीक्षेंत यांचा तिसरा नंबर आला, व यांना 'बाई माणिकबाई बयरामजी जीजीभाय प्राइझ' मिळालें. गरीबीमुळें उच्च शिक्षण घेणें अशक्य होऊन यांनीं शाळाखात्यांत नोकरी धरली ( स. १८७५ ). पुढें क्रमानें चढत जाऊन फर्स्ट असिस्टंट डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टरच्या हुद्यापर्यंत जाऊन पेन्शन घेतलें ( १९११ ). दरम्यान बागलकोटच्या इंग्रजी शाळेंत हेडमास्तर असतांना बदलीचे हुकूम आले असतांहि 'ज्योतिर्गणित' हा ग्रंथ लिहिण्याचें काम चालू असल्यानें सर्व बढतीचे प्रसंग यांनीं बाजूस सारले.

यांचे वडीलहि चांगले ज्योतिषी होते. त्यांनीं केरो-पंती ग्रहसाधनकोष्टक हा ग्रंथ संस्कृतांत उतरला आहे. यांचे पूर्वज पांचसहा पिढ्या पैठण येथें राहत होते. तेथून बापू हे नरगुंदास व पुढें रामदुर्गास आले. तेथील संस्थानिकांचा यांस आश्रय होता. नरगुंद संस्थानचे अधिपति बाबासाहेब यांनीं सत्तावन सालच्या बंडांत सामील होतांना बापूंना 'माझ्या पदरचें एक रत्न तुमच्या स्वाधीन करतों त्याचा संभाळ करावा' असें पत्र लिहून रामदुर्गकरांच्या स्वाधीन केलें.

बापूजी आणि वडील बंधु बळवंतराव हे यांचे ज्योति-षशास्त्रांतील गुरु होत. ग्रहलाघव, सूर्यसिद्धान्त वगैरे ग्रंथांचें सोपपत्तिक ज्ञान यांनीं विशेषतः वडील बंधूंपासून संपादन केलें. त्यांत कांहीं भागाची उपपत्ति मनाला पटेना म्हणून यांनीं आपलें लक्ष आंग्ल ज्योतिषशास्त्राकडे वळ-विलें. उच्च गणिताशिवाय तें शास्त्र हस्तगत होत नाहीं असें पाहून तशा पुस्तकांचा स्वतःच्या मनानें एक क्रम निश्चित करून त्यांचा अभ्यास केला व त्यांत प्रावीण्य संपादन केलें, असें वॉशिंग्टन येथील प्रख्यात गणितवेत्ता सायमन न्यूकम यांच्या पत्रावरून ध्यानांत येतें. तसेंच प्रो. केरो लक्ष्मण छत्रे यांनीं ग्रंथाशिवाय भंगी काढून बिनचूक सारण्या केल्याबद्दल यांना शाबासकी दिली.

यानंतर ग्रहलाघव पद्धतीचा परंतु सूक्ष्म असा एक संस्कृत श्लोकबद्ध करणग्रंथ पंचांगकर्त्यांना मार्गदर्शक होण्याकरितां यांनीं केला ( स. १८९९ ). त्याचें नांव 'केतकीग्रहगणितम्.' याची पहिली आवृत्ति संपून दुसरी आवृत्ति प्रसिद्ध झाली आहे. त्यांत यांचे पुत्र द. वें. केत-करकृत संस्कृत उपपत्तिभाष्यहि छापलें आहे.

यानंतर यांनीं 'वैजयन्ती पंचांग-गणितम्' हा तिसरा ग्रंथ तयार केला. शास्त्रशुद्ध पंचागासंबंधानें जागृति व्हावी म्हणून मुद्दाम शुद्ध व सूक्ष्म तिथि, नक्षत्रें व योग यांच्या साधनासाठीं सारण्या तयार करून त्या या ग्रंथांत प्रसिद्ध केल्या. याचीहि दुसरी आवृत्ति निघाली आहे. अशा प्रकारें करणग्रंथ तयार झाल्यावर त्याच्या आधारें शास्त्र-शुद्ध असें केतकी पंचांग काढण्यास यांनीं सुरवात केली. ( शके १८२१ ). तें आजपर्यंत अव्याहत चालू आहे. स. १९०५ पासून श्रीमान् खेमराज श्रीकृष्णदास, मालक श्रीवेंकटेश्वर प्रेस, यांनीं यांचें पंचांग छापण्याची जबाब-दारी आपणाकडे घेतली. ती त्यांच्या मुलांनींहि पुढें चालविली आहे.

शके १८२१-२८ पर्यंत कै. कृ. गु. संगमकर, हेडमास्तर कानडी शाळा बागलकोट व बाळंभट कोटभट यांच्या मदतीनें हे स्वतःच पंचांग तयार करीत. कमलाकरशास्त्री

जोशी खेड, जनार्दनशास्त्री निगुडकर राजापूर, उप्पिनबेटीगिरी धारवाड, हे धर्मशास्त्रलेखनाचें काम करीत असत. पुढें शके १८२८-४१ पर्यंत माईणकरशास्त्री यांनीं पंचांग-प्रकाशनाचें कार्य अत्यंत दक्षतेनें बजावलें. पण पुढें प्रकृतीच्या अस्वास्थ्यानें त्यांना काम होईना व हेहि वृद्ध झाले. अशा स्थितींत यांनीं पंचांग काढणें बंद करण्याचें ठरविलें. पण या प्रसंगीं धारवाड ट्रेनिंग कॉलेजचे प्रिन्सिपल नरहर वेंकटेश कोल्हटकर यांनीं श. १८४२-४४ हीं पंचांगें प्रसिद्ध केलीं. त्यानंतर अनंत गणेश हेर्लेकर व भास्कर रामचंद्र जोशी हे पुढें आले. हेर्लेकर वारल्यावर भास्कर रामचंद्र जोशी व त्यांचे बंधु नाथ दैवज्ञ हे पंचांग करीत. त्यानंतर केतकरांचे मेव्हणे गोपाळ बळवंत जोशी, पेन्शनर फडणीस, हे पंचांग करूं लागले.

शास्त्रीय गोष्टींचा प्रचार करण्यास या देशांत अत्यंत प्रतिकूलता असतांहि यांच्या पंचांगास बरीच मान्यता मिळाली आहे. यांच्या केतकी व वैजयंती या ग्रंथांच्या आधारें पुष्कळ पंचांगें प्रसिद्ध होतात.

यांनीं केलेले ग्रंथः—

१ ज्योतिर्गणितम् (संस्कृत १८९८), २ केतकी ग्रहगणितम् (संस्कृत), ३ वैजयन्ती पंचांगगणितम् (संस्कृत), ४ मराठी ग्रहगणित सोपपत्तिक (१९१४), ५ मराठी नक्षत्रविज्ञान (१९१६), ६ संस्कृत केतकी परिशिष्ट (१९१६), ७ मराठी गोलद्वय प्रश्नविमर्श (१९१८), ८ इंडियन अँड फॉरिन क्रॉनॉलॉजी (१९२३ इंग्रजी), ९ संस्कृत सौरार्थ-ब्राह्मतिथिगणितम् (१९२७), १० संस्कृत भूमंडलीय ग्रहणगणितम् (१९३०), ११ शास्त्रशुद्ध पंचांग अयनांश-निर्णय (१९२९), १२ केतकी परिमल भाष्य–केतकी ग्रहगणितावरील टीका (१९३०). याशिवाय यांचे तेहतीस संशोधनात्मक लेखांचा सारांश यांच्या चरित्रांत दिला आहे.

यांपैकीं आठवा ग्रंथ रॉयल एशियाटिक सोसायटीनें प्रसिद्ध केला आहे, यावरून त्याचें महत्त्व ध्यानीं येईल. बाकीचे सर्व ग्रंथ यांनीं स्वतःच प्रसिद्ध केले आहेत. परिमलभाष्य प्रसिद्ध करण्यास श्रीमंत जमखिंडीकरांनीं पांचशें रुपयांची देणगी दिली होती.

लो. टिळक व डॉ. मो. गो. देशमुख यांच्याजवळ रावसाहेब कृष्णराव देवल यांनीं ज्योतिष व तत्संबंधीं इतर गणित-ग्रंथ करण्याकरितां तीन हजार रुपये दिले, तेव्हां त्यांनीं यांना 'शुद्ध गणित ग्रंथ लिहिणारे कोणी तरी भेटतील, परंतु ज्योतिष विषयाचे ग्रंथ लिहिणारे आज आपलेवांचून कोणी नाहीं', असा गौरव करून फर्लो घेतल्यावर आपण पुणें येथें येऊन लेखनादि व्यासंग करावा, म्हणून लिहिलें. पण हे स्वातंत्र्य गमावण्यास तयार झाले नाहींत (१९०७). पुनः लो. टिळक यांनीं आपल्या शुद्ध पंचांगास आधारभूत असा करणग्रंथ करण्याविषयीं यांना विनंति केली. पण यांनीं आपणास 'रेवती पक्ष' मान्य नसल्यामुळें त्या पंचांगाचा ग्रंथ लिहिण्याचें काम अंगावर घेणें म्हणजे 'ज्ञानपण्य-वाणिज्या'ची वृत्ति स्वीकारल्याप्रमाणें होतें म्हणून यांनीं तें कार्य अंगावर घेण्याचें नाकारलें (१९२०).

यांची पंचांगविषयक कामगिरी निःसंशय अभिनंदनीय आहे; पण आपसांतील यादवीमुळें देशाला त्याचा व्हावा तितका फायदा झालेला नाहीं. पंचांग कमेटी आणि हे यांचें सहकार्य होऊं शकलें नाहीं. हे प्रथम रैवत पक्षाचे होते, नंतर यांनीं चित्रापक्ष स्वीकारला असें धरून चाललें तरी यांना आपणास पटेल तें बोलण्याचा अधिकार होता. लो. टिळक व दीक्षित यांनाहि यांना रैवतपक्ष मान्य आहे असें वाटत होतें; पण तशी स्थिति नव्हती. यांनीं केवळ एक पक्ष म्हणून रैवतपक्षाचा निर्देश केलेला आहे, व इ. स. १८८५ पासून हे चित्रापक्षाचा पुरस्कार करीत होते.

दीक्षितांचा समज ज्योतिर्गणिताचें हस्तलिखित वाचून झाला आणि तो त्यांनीं आपल्या भारतीय ज्योतिष शास्त्राच्या इतिहासांत नमूद केला. पण ज्योतिर्गणित छापतांना त्यांत केलेल्या दुरुस्तीकडे दीक्षितांचें लक्ष गेलें नाहीं. पण यांनीं चित्रापक्ष घेतला तेव्हां टिळकांच्या रेवतीपक्षाशीं विरोध येऊन शुद्ध पंचांगाच्या प्रचाराचें कार्य घोटाळ्यांत पडलें.

या काळचे यांना गणेश दैवज्ञ (ग्रहलाघवकार) म्हणावयास हरकत नाहीं. यांनीं एकच विषय हातीं घेऊन केलेले परिश्रम एखाद्या तपस्व्यास शोभण्यासारखे आहेत. यांनीं आपले ग्रंथ स्वतःच्या पदरास खार लावून प्रसिद्ध केले. यांना समाजाकडून द्रव्यरूप उत्तेजन नको असून मान्यतारूप उत्तेजन पाहिजे होतें. परंतु दूरदूरच्या ठिकाणीं यांना उत्तेजन लाभलें तरी महाराष्ट्रांत तें यांना यांच्या हयातींत मिळालें नाहीं.

**केतकर, डॉ. श्रीधर व्यंकटेश**— (जन्म स. १८८४–मृत्यु स. १९३७) महाराष्ट्रीय ज्ञानकोशकर्ते,

समाजशास्त्रज्ञ, संशोधक व नवविचारप्रवर्तक आचार्य. यांचें मूळ घराणें कोंकणांतील अंजनवेलीचें. तेथें यांचे आजोबा पोथ्या लिहिण्याचा व विकण्याचा धंदा करीत. यांचे वडील रायपूर ( मध्यप्रान्त ) येथें पोस्टमास्तर होते. वडील लहानपणींच वारल्यानें हे उमरावतीस वकिली करणाऱ्या आपल्या चुलत्याकडे-नारायणरावांकडे आले. यांचें प्रवेशपरीक्षेपर्यंत शिक्षण उमरावतीस झालें व पुढील मुंबईस विल्सन कॉलेजमध्यें झालें. हायस्कूलमध्यें असतांच यांच्या बहुश्रुतपणामुळें यांना शिक्षकमुद्धां 'एन्सायक्लोपीडिया' म्हणत असत. याच वेळीं यांची आई व बहीण वारल्यानें हे स्वतंत्र झाले आणि यांच्या आयुष्याला स्वच्छन्दी असें स्वरूप प्राप्त झालें.

इंटर व बी. ए. च्या परीक्षेत यांना एकदां अपयश आलें आणि हे पदवीपरीक्षा न देतांच अमेरिकेस गेले. त्या वेळीं इंग्रजांचें राज्य घालविण्याकरितां बंड करणें म्हणजे देशाभिमान अशा सार्वत्रिक समजुतीची छाप यांचेवरहि पडली होती. पण हे अमेरिकेला गेल्यामुळें यांच्या जीवितकार्याला निराळें स्वरूप आलें. अमेरिकेला जाण्यापूर्वी सहाच महिने बाळकृष्ण संतुराम गडकरी यांच्या सहकार्यानें 'महाराष्ट्र वाग्विलास' नांवाचें मासिक यांनीं काढलें होतें.

यांनीं अमेरिकेस जावें अशी यांच्या चुलत्यांची इच्छा नव्हती. तसेंच यांचेजवळ जाण्याला पैसेहि नव्हते. पण यांनीं वडिलार्जित घरदार विकून हातीं येतील ते पैसे घेऊन अमेरिकेस प्रयाण केलें ( १९०६ ) आणि तेथें कार्नेल युनिव्हर्सिटींत हे दाखल झाले. यांचा अध्ययनाचा मुख्य विषय समाजशास्त्र हा होता. नंतर तेथें हे प्रथम बी. ए. ( १९०७ ), नंतर एम्. ए. ( १९०८ ) व पीएच्. डी. ( १९११ ) झाले. सर्वच विषयांकडे लक्ष देण्याच्या यांच्या वृत्तीमुळें हे पीएच. डी.च्या परीक्षेत प्रथम नापास झाले होते (१९१०). या वेळीं यांना श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांच्याकडून शिष्यवृत्ति मिळत असे. पीएच. डी. साठीं 'हिंदुस्थानांतील जातिसंस्थेचा इतिहास' हा विषय यांनीं संशोधनार्थ घेतला होता.

स.१९०९ सालीं 'History of Caste in India' Vol. I या नांवानें यांचें हें संशोधन प्रथम प्रसिद्ध झालें. याच ग्रंथाचा दुसरा भाग स. १९११ सालीं पुरा होऊन 'Hinduism : Its Formation and Future' या नांवानें इंग्लंडांत प्रसिद्ध करण्यांत आला. या दोन्ही ग्रंथांचें अमेरिकन व इंग्रज विद्वानांकडून चांगलें स्वागत झालें. इंग्लंडमध्यें असतांना 'अथीनियन्' पत्रांत पुस्तकांवर अभिप्राय देण्याचें काम यांनीं बरेच दिवस केलें. स्टॅटिस्टिकल असोसिएशन, रॉयल एशियॅटिक सोसायटी यांसारख्या संस्थांच्या सभांसहि हे हजर राहत.

हिंदुस्थानांत आल्यावर ( १९१२ ऑक्टो. ) पुढें काय करावयाचें हा प्रश्न यांना सोडवावा लागला. ता. १ जुलै १९१३ पासून एक वर्षभर कलकत्ता विद्यापीठाच्या पोस्ट-ग्रॅज्युएट शाखेंत अर्थशास्त्र, शासनशास्त्र व सार्वराष्ट्रीय कायदा या विषयाचे व्याख्याते म्हणून यांनीं काम केलें. 'An Essay on Indian Economics', 'Hindu Law' ( १९१४ ) हे यांचे उद्बोधक प्रबंध याच वेळीं लिहिले गेले. पण सालअखेर हेंहि काम सुटलें.

स. १९१४ च्या डिसेंबरमध्यें हे मद्रासच्या राष्ट्रीय सभेला गेले व तेथें भाषावार प्रान्तरचना करणाऱ्या तत्त्वाचा प्रसार करण्याकरितां एक पत्रक छापून यांनीं तें प्रतिनिधींमध्यें वांटलें. तेथून सिंहलद्वीप, कोचीन इत्यादि प्रान्तांची यांनीं सफर केली व पुनः सायन्स कॉंग्रेसला हजर राहण्यासाठीं हे मद्रासला आले. तेथें मराठी व तेलगू भाषेंतील सुप्रसिद्ध लेखक श्री. के. व्ही. लक्ष्मणराव यांची ओळख झाली. लक्ष्मणरावांनीं यापूर्वीच तेलगू ज्ञानकोशाला सुरुवात केली होती. त्यामुळें मराठी ज्ञानकोशाच्या यांच्या कल्पनेस चालना मिळाली.

याच सुमारास 'राष्ट्रधर्मप्रचारकसंघ' या नांवाचा एक नवीन उपक्रम करून त्या कार्याचा यांनीं संस्कृत व्याख्यानद्वारां आंध्र व उत्कल देशांतील बेझवाडा, गुंतूर, राजमहेंद्री, कोकोनाडा, विजयनगर, गंजम, कटक, जगन्नाथपुरी इत्यादि शहरीं प्रचार केला. हिंदुस्थानाची भाषावार प्रान्तरचना आणि देशभाषेच्या द्वारें सर्व राज्यकारभार व शिक्षण, हें यांचें तत्त्वसार होतें. हल्लींचे प्रसिद्ध आंध्र राष्ट्रभक्त डॉ. पट्टाभिसीतारामय्या यासारखी मंडळी या उद्योगांत तेव्हां यांची अनुयायी होती. त्या वेळीं यांनीं रचलेला पुढील संस्कृत श्लोक त्या प्रांतांत सार्वजनिक प्रसंगीं राष्ट्रगीतासारखा गायला जात असे:—

'प्राचीना ननु शातवाहननृपा भृत्यास्तु येषां श्रुतम् ।
विद्याशौर्यपरोद्यमैः खलु युतास्तस्मात् त्रिलिंगा वयम् ।।
स्वत्वस्थापनमेव धर्मविभवो येषां बुधैर्ज्ञायते ।
दुर्दान्ता निजधर्मपालनपराः कार्ये नवान्ध्रा वयम् ।।'

हें काम संपवून कलकत्ता, रायपूर असा प्रवास करून हे नागपुरास आले. तेथें मध्यप्रान्ताच्या राजकीय परिस्थितीसंबंधीं एक उद्बोधक व विचारप्रवर्तक व्याख्यान देऊन यांनीं आपल्याकडे सर्वांचें लक्ष वेधून घेतलें व ज्ञानकोशाची कल्पना पुढें मांडली. स. १९१५ च्या मुंबईच्या राष्ट्रीय सभेस हे हजर राहिले, पुण्यास कांहीं व्याख्यानें दिलीं, लो. टिळकांचा पाठिंबा मिळविला, ८ जुलै १९१६ ला महाराष्ट्रीय ज्ञानकोश मंडळ लि. ही कंपनी रीतसर नोंदविली, व सतत बारा वर्षे खपून हें अगदीं नवीन व कष्टसाध्य असणारें देशी भाषेंतील अपूर्व कार्य सिद्ध करून दाखविलें. ज्ञानकोशाचें कार्य जरी नागपूरला सुरू झालें तरी स. १९१८ सालीं त्याची एक शाखा पुण्यास उघडण्यांत आली. कार्यसौकर्याच्या दृष्टीनें पुढें पुण्याच्या शाखेलाच मुख्य कार्यालयाचें स्वरूप आलें आणि तेथेंच तें कार्य पूर्ण झालें. याच वेळीं चातुर्वर्ण्य संरक्षणपीठासारख्या योजना मांडण्याचें काम हे करीत असतच.

ज्ञानकोशाच्या कल्पनेपेक्षां तो पार पाडण्याकरितां आवश्यक असणारा व्यापकपणा, उद्योग आणि चिकाटी या बाबतींत यांचें वैशिष्ट्य दिसून आलें. ज्ञानकोशाच्या प्रस्तावनेचे पांच खंड हे यांच्या स्वतंत्र व शोधक प्रज्ञेचीं वैशिष्ट्यें स्पष्टपणें दाखवून देतात. या बाबतींत द्रव्य आणि ग्रंथ या दोन्ही संपादनाच्या जबाबदाऱ्या यांनीं पूर्णपणें पार पाडल्या आहेत. व त्याबाबत सर्व मूळ योजनाहि यांच्याच होत्या. स. १९२७ सालीं हें काम पूर्ण झालें आणि यांनीं आपला अनुभवहि पुढच्यांस उपयोगी पडावा म्हणून 'ज्ञानकोशमंडळाचा इतिहास' या पुस्तकांत सांगून टाकला.

वरील कार्य चालू असतांच त्यांत समाविष्ट होणाऱ्या विषयांच्या चर्चेसाठीं व पुरवणीवजा मजकूर देण्यासाठीं 'विद्यासेवक' नांवाचें एक मासिक यांनीं सुरू केलें (१९२५). 'गोविंदपौत्र' या नांवानें लिहिलेलीं स्फुट काव्यें, गोंडवनांतील प्रियंवदा, परागंदा, आशावादी या कादंबऱ्या, निरनिराळ्या देशांतील कहाण्या, महाराष्ट्रीयांचें काव्यपरीक्षण हे निबंध, स्त्रीसत्तापराभव (अपूर्ण) हें नाटक, हे सर्व 'विद्यासेवकां'तून प्रसिद्ध झाले. 'निःशस्त्रांचें राजकारण' या ग्रंथाचा कांहीं भागहि विद्यासेवकांतून प्रसिद्ध झाला. यांखेरीज गांवसासू, ब्राह्मणकन्या, विचक्षणा या यांच्या कादंबऱ्या स्वतंत्रपणें प्रसिद्ध झाल्या. याशिवाय यांच्या संकीर्ण लेखाचा एक संग्रह स. १९१५ मध्यें श्रुतिबोध मंदिरांतून प्रसिद्ध झाला होता.

मुख्यतः ज्ञानकोशाच्या कार्यांतून रिकाम्या झालेल्या मंडळीस गुंतविण्याच्या दृष्टीनें विद्यासेवक चालू असतांच 'पुणें समाचार' या नांवाचें दैनिक यांनीं सुरू केलें (१९२७). पण तें एक वर्षांतच संपुष्टांत आलें. यानंतर यांचें त्यांच्या जुन्या सहकाऱ्यांशीं बिनसून यांनीं विद्यासेवक स्वतःकडे घेतलें पण तेंहि बंद पडलें (सप्टें. १९२८). तथापि यांचें स्फुट लेखन सतत चालू असे.

ज्ञानकोशाचें कार्य संकलनप्रधान असल्यानें संशोधनात्मक लिहिण्याची यांची हौस पुरी झालेली नव्हती. यांचा संकलनापेक्षां संशोधनाकडे विशेष कल होता हें ज्ञानकोश व विशेषतः त्याच्या प्रस्तावनाखंडावरून सहज ध्यानांत येतें. त्याकरितां वैयक्तिक जबाबदारीवर 'प्राचीन महाराष्ट्र' नामक चार खंडात्मक ग्रंथ लिहून प्रसिद्ध करण्याचें कार्य यांनीं सुरू केलें. त्यांतील एक खंड 'सातवाहन पर्व' तेवढा प्रसिद्ध झाला (१९३५) व बाकीचा बराच भाग लिहून तयार आहे.

'कायस्थ प्रभूंचा सामाजिक इतिहास', 'महायुद्धोत्तर जग', 'आंगिरसांचें सत्र' (ओंवीबद्ध काव्य) व एक कादंबरी येवढें यांचें वाङ्मय अप्रकाशित आहे. 'भारतीय समाजशास्त्र' हा यांचा ग्रंथ प्रसिद्ध झाला आहे. यांच्या मृत्यूनंतर 'Victorious India' या नांवाचा यांचा ग्रंथ यांच्या पत्नीनें प्रसिद्ध केला.

ही यांची वाङ्मयसेवा लक्षांत घेऊन पुणें येथील महाराष्ट्र शारदोपासक संमेलन (१९२९) व महाराष्ट्र साहित्य-संमेलन हैद्राबाद (१९३१) यांचें अध्यक्षपद यांना देण्यांत आलें.

यांचा राजकीय तत्त्वविचाराचा विलासहि वेळोवेळीं पाहावयास मिळे. 'निःशस्त्रांचें राजकारण' या पुस्तकांत यांनीं आपली राजकीय मतप्रणाली मांडली आहे. स. १९२६ मध्यें यांनीं 'स्वयंनिर्णयी संघ' काढला. पण त्याकडून प्रत्यक्ष स्वरूपाचें कार्य घडलें नाहीं. पुढें स. १९३४ सालीं यांनीं भारतमंत्र्यावर न्यायमंदिरांत दावा लावून हिंदुस्थानचें स्वातंत्र्य प्रस्थापित करण्याचा उद्योग केला. स. १९३५ चा कायदा मंजूर झाल्यानंतर हें स्वराज्य आपणच मिळविलें असून राष्ट्रीय सभा तें श्रेय अन्यायानें हिरावून घेत आहे अशा श्रद्धेनें यांनीं महाराष्ट्र प्रांतिक सभेवर दावा केला होता.

यावरून दिसून येईल कीं हे एक विलक्षण विचाराचे गाढे पंडित होते. राहणी, पोषाख, विचार, मतें या सर्व बाबतींत हे सर्वांपेक्षां निराळे असत आणि यांचा सर्व वर्तनक्रम निर्भयपणें चाललेला असे. पण ज्ञानकोश संपल्यानंतर यांचें संघटित सामर्थ्य लयास जाऊन हे एकाकी झाले. स्वाभाविक चंचलपणा, विक्षिप्तपणा आणि एकांडेपणा यांमुळें यांना संघटित शक्ति पुनः निर्माण करतां आली नाहीं. शेवटीं पुणें येथें सांपत्तिक व शारीरिक दुःस्थितींत मधुमेहानें यांना मृत्यु आला. शेवटीं यांचा अन्त्यविधि यांच्या पत्नीच्या इच्छेप्रमाणें दहन न करितां पुरून पण वैदिक मंत्रांनीं करण्यांत आला.

यांच्या पत्नी मिस् एडिथ कोहन या जर्मन ज्यू असून त्यांची व यांची भेट इंग्लंडमध्यें झाली. त्या सेंट अँड्रयूज युनिव्हर्सिटीच्या पदवीधर असून ' तुलनात्मक धर्मशास्त्र ' या विषयाचा त्यांनीं अभ्यास केला होता. लंडनमधील ' स्कूल ऑफ ओरिएंटल स्टडीज ' चा मराठीचा डिप्लोमाहि त्यांनीं घेतला होता. शिवाय त्यांना फ्रेंच व डच भाषा अवगत होत्या. प्राचीन भारतीय संस्कृतीसंबंधीं बरेंच महत्त्वाचें लिखाण जर्मन भाषेंत असल्यानें जर्मन भाषा जाणणाऱ्या विद्वानांच्या साहाय्याची अपेक्षा ज्ञानकोशास होती. म्हणून जर्मन ग्रंथांचें भाषान्तर करण्याचें काम यांनीं त्यांच्याकडे सोंपविलें. या जर्मनचें इंग्रजींत करीत आणि नंतर इंग्रजीचें मराठी केलें जाई. पुढें त्यांना हिंदुस्थानांत बोलावण्यांत आलें व यांनीं त्यांना व्रात्यस्तोम विधीनें शुद्ध करून घेऊन त्यांच्याशीं वैदिकपद्धतीनें विवाह केला ( १४ मे १९२० ). व त्यांचें नांव शीलवतीबाई असें ठेवलें. या विवाहापासून यांना औरस संतति झाली नाहीं. प्रसिद्ध जर्मन पंडित विंटरनिट्झ यांच्या जर्मन भाषेंतील संस्कृत वाङ्मयाच्या इतिहासाचें शीलवतीबाईनीं केलेलें इंग्रजी भाषान्तर कलकत्ता युनिव्हर्सिटीनें प्रसिद्ध केलें आहे.

तथापि आपल्या स्वभावविशेषानुसार व पत्नीच्या शिशुसंगोपनाच्या तीव्र इच्छेमुळें ठाण्याच्या अनाथालयांतून तीनचार वर्षांचा एक ब्राह्मण बालक व मुंबईच्या एका सूतिकागृहांतून दहा दिवसांच्या आंतील एक बालिका मिळवून यांनीं त्यांचें अपत्यनिर्विशेष संवर्धन केलें. बालकाचें मूळ नांव दामोदर हरी बापट होतें. त्याला विधिपूर्वक दत्तक घेऊन त्याचें नांव दामोदर श्रीधर केतकर करण्यांत आलें व मुलीचें नांव वीरा ठेवण्यांत आलें. तिचें वय यांच्या मृत्युसमयीं तेरा वर्षांचें होतें. पुणें येथें डेक्कन जिमखान्यापलीकडे यांनीं ' आशास्थान ' नांवाचा एक छोटा बंगला बांधला होता. पण तो सोडून पुण्याच्या कँप विभागाचा जो एकदां यांनीं आश्रय केला तो शेवटपर्यंत कायमच होता.

' महाराष्ट्र ज्ञानाच्या दृष्टीनें युरोपियन राष्ट्रांच्या बरोबरीचाच काय पण थोडा अधिक व्हावा आणि मराठींत लिहिलेल्या ग्रंथांचें इतर देशी भाषांत आणि युरोपांतील भाषांतसुद्धां भाषान्तर व्हावें, तिकडील लोकांना ज्ञानाच्या विविध शाखांत परिपूर्णता मिळविण्याकरितां महाराष्ट्रांत येण्याची आवश्यकता वाटावी आणि जगांतील सर्व विश्वविद्यालयांत व धर्मपीठांत महाराष्ट्रांतील माणसाला तज्ज्ञ म्हणून बोलावणें भाग पडावें, महाराष्ट्राचें राज्य स्वतंत्र असावें आणि मराठींतून लिहिलेल्या कायद्यांना मराठींतून सही केल्याशिवाय कायदेशीरपणा येऊं नये ', अशी यांची महत्त्वाकांक्षा होती. आणि त्या दृष्टीनें यांच्या ज्ञानकोशादि सर्व कामाकडे पाहिले असतां यांच्या प्रचंड कामाचें आणि अनाकलनीय मतप्रतिपादनाचें महत्त्व ध्यानांत येतें.

भिक्षुकी, अल्पसंतुष्ट आणि जागतिक दृष्टि न ठेवतां केलेल्या प्रत्येक कामाची हे अत्यंत सडेतोडपणें हजेरी घेत. त्यामुळेंच यांना बरोबरीच्या लोकांत प्रायः कोणीच मित्र नव्हता. पण प्रतिष्ठित आणि रूढ उद्योगांची चिकित्सा करून, नवी दृष्टि उत्पन्न करणारांची प्रथम सर्वत्र अशीच उपेक्षा व अवहेलना होत असते.

वाङ्मयासारख्या अत्यंत महत्त्वाच्या व्यवहाराला यांनीं ज्ञानकोशाचें कार्य व्यावसायिक पद्धतीनें पार पाडून भारदस्त व स्वावलंबी रूप प्राप्त करून दिलें. ज्ञानकोशाकरितां यांनीं एका पैचीहि कोणाची देणगी स्वीकारली नाहीं. लेखनादि मदतहि मोबदल्याशिवाय घेतली नाहीं. मराठी भाषेंत अज्ञात असलेल्या किती तरी ज्ञानाच्या शाखा लोकांना परिचित करून दिल्या. प्रस्तावना खंडांत तर असें संकलनपूर्वक संशोधनात्मक वाङ्मय निर्माण केलें कीं, त्यांच्या इंग्रजी, फ्रेंच व जर्मन भाषान्तराची आवश्यकता प्रतिपादली गेली. आपल्या वागणुकीनें यांनीं स्वार्थत्याग आणि देशभक्ति यांच्या व्याख्या बदलण्यास भाग पाडलें आणि जागतिक ज्ञानाच्या झगझगाटांत आपण कुठें आहोंत हें आपल्या व्यापक आणि सर्वगामी पांडित्यानें दाखविण्याचें काम करून महाराष्ट्राचा मोठेपणा सर्व प्रकारें वाढविला. ज्ञानाची वाढ आणि विचाराचें नाविन्य यांमुळेंच राष्ट्राला जिवंतपणा येत असतो. तें कार्य यांनीं समाजाचा रोष पत्करूनहि स्वयंप्रेरणेनें जन्मभर मोठ्या प्रचंड प्रमाणांत स्वतःच्या हिंमतीवर केलें,

याबद्दल कोणालाहि शंका घेतां येणार नाहीं. अशा युग-प्रवर्तक माणसांची परंपरा चालविण्यास एखादा दुसरा शिष्य असमर्थ असतो. राष्ट्रांतील प्रत्येक घरांत यांच्या कार्याची अग्रपूजा करणारे अनुयायी उत्पन्न होतात व यांचें कार्य तनमनधन अर्पण करून चालविण्यास पुढें सरसावतात.

यांचे ग्रंथः—

१. समाजशास्त्र— ( १ ) History of Caste in India ( १९०९ ), ( २ ) Hinduism : Its Formation and Future ( १९११ ), ( ३ ) Hindu Law (१९१४), ( ४ ) ज्ञानकोशाचे पांच प्रस्तावना खंड (१९२०-२३), ( ५ ) भारतीय समाजशास्त्र (१९३६), ( ६ ) कायस्थ प्रभूंचा सामाजिक इतिहास ( अप्रसिद्ध ).

२. कादंबऱ्या— ( १ ) गोंडवनांतील प्रियंवदा ( १९२६ ), ( २ ) परागंदा ( १९२६ ), ( ३ ) आशावादी ( १९२७ ), ( ४ ) गांवसासू ( १९३० ), ( ५ ) ब्राह्मणकन्या ( १९३० ), ( ६ ) विचक्षणा ( १९३६-३७ ).

३. काव्य— ( १ ) उत्तर अमेरिकेंतील वसंतकाल, ( २ ) आंगिरसाचें सत्र ( अप्रसिद्ध ).

४. नाटक— ( १ ) स्त्रीसत्तापराभव ( अपूर्ण ).

५. अर्थशास्त्र— ( १ ) An Essay on Indian Economics ( १९१४ ).

६. राजकारण— ( १ ) निःशस्त्रांचें राजकारण, ( २ ) Victorious India.

७. संकीर्ण— ( १ ) संकीर्ण लेख ( १९१५ ).

**केदार, तुकाराम जयराम**—(जन्म स. १८८६) नागपूर येथील सुप्रसिद्ध वकील, नागपूर विश्वविद्यालयाचे माजी व्हाइस-चॅन्सेलर व सार्वजनिक कार्यकर्ते.

यांचा जन्म वर्धा येथें झाला व शिक्षण नागपूर येथें झालें. हे बी.ए., एल्एल्. बी. आहेत. यांचें शिक्षण सरकारी शिष्यवृत्ति मिळून झालें आहे; यावरून यांची हुषारी ध्यानांत येते.

स. १९०६ सालीं हे बी.ए. झाले. नंतर कांहीं दिवस शिक्षक होते. पुढें स. १९१० सालीं हे एलएल. बी. झाले. प्रथम वर्धा येथें वकीली करून ( १९१०-२७ ) नंतर स. १९३० पासून नागपूर हायकोर्टांत ॲडव्होकेट म्हणून नांवारूपास चढले.

यांच्या सार्वजनिक आयुष्यक्रमास प्रारंभ स. १९१२ पासूनच झाला. त्या सालीं यांचा वर्धा म्युनिसिपालिटींत प्रवेश झाला. त्यानंतर प्रत्येक निवडणुकींत यश येऊन हे वर्धा म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष झाले ( १९२२-२५ ). त्यापूर्वी टिळक होमरूल लीगचे हे अध्यक्ष होते.

स. १९२७ मध्यें हे मध्यप्रान्त व वऱ्हाडतर्फे प्रान्तिक कायदेमंडळांत निवडून आले. तेव्हांपासून स. १९४५ पर्यंत हे तेथें सभासद आहेत. मध्यें प्रथम हे मंत्री म्हणून नेमिले गेले ( १९२८-२९ ). पुढें पुनः डॉ. राघवेन्द्र राव यांचे सहकारी मंत्री म्हणून यांची निवड झाली होती ( १९३० ).

नागपूर विश्वविद्यालयाचे व्हाइस-चॅन्सलर म्हणून सहा वर्षे यांनीं महत्त्वाचें काम केलें ( १९३९-४४ ). यांच्या कामगिरीचा गौरव म्हणूनच यांना डि. लिट्. ही पदवी दिली ( १९४३ ). हिंदुसभेनें हैदराबाद संस्थानांत सत्याग्रहाची चळवळ सुरू केली तेव्हां हैदराबादच्या विद्यार्थ्यांकरितां नागपूर युनिव्हर्सिटीनें केलेल्या तत्परतेच्या योजनेमुळें यांची सर्वत्र वाखाणणी झाली. त्याचप्रमाणें वर्धा कॉमर्स कॉलेज सरकारनें बंद केलें होतें तें उघडण्याची खटपट करून यांनीं यश मिळविलें.

यांचें वाचन व्यापक असून यांचे हातून महत्त्वाचें लेखन चालू असतें. यांचें कालिदासाच्या कालासंबंधींचें इंग्रजींतील फुटकळ लेखन यांच्या लेखनाविषयीं आशा उत्पन्न करणारें आहे. ऋग्वेदांतील पुराव्यावरून आर्यांचें वसतिस्थान आशियामायनरजवळ असल्याचा यांचा सिद्धान्त अभ्यासी लोकांना विचार करावयास लावणारा आहे.

**केरकर, केसरबाई**—( जन्म स. १८९० सुमार ) सुप्रसिद्ध गायिका. अल्लादियाखांच्या गायनाची पद्धतशीर परंपरा चालवणाऱ्या मंजीखांबरोबरच यांचाहि प्रामुख्यानें उल्लेख केला जातो. अल्लादियाखांच्याकडे शिकण्यास येण्यापूर्वी यांनीं जरी रामकृष्णबुवा वझे, भास्करबुवा बखले, अबदुल करीमखां वगैरे अनेक संगीतश्रेष्ठींची तालीम घेतली असली तरी यांच्या गायनावरील खांसाहेबांचा ठसा सहज उठून दिसण्याइतपत स्पष्ट आहे. ख्यालाच्या गायकींत बाबलीबाई, अंजनीबाई व ताराबाई शिरोडकर यांनीं जी कीर्ति मिळवली, तिचीच सुधारून वाढवलेली आवृत्ति आज यांचेकडे आलेली आहे. वस्तुतः ख्यालाची गायकी ही स्त्री आवाजास न पचणारी; परंतु त्यांतहि प्रावीण्य संपादन करून रसिकांकडून वाहवा मिळवणें ही गोष्ट यांना एकाच औषधीच्या साहाय्यानें सिद्ध झाली आहे, तिचें नांव

मेहनत. यांचा आवाज गोड व सुरेल आहे. परंतु गाणें ऐकतांना त्यांतील गोडीपेक्षां पुरुषी ईदीच आपणांस अधिक जाणवते. तथापि मेहनतीमुळें त्याला बांधेसूदपणा व गोलाई हीं सहजच प्राप्त झालीं आहेत. एकदां गाणें सुरू झालें कीं मग याहि सर्व बाह्य गोष्टींवरचें आपलें लक्ष नाहींसें होऊन त्यांतील सहजता आपणांस विशेष आकर्षित करते. विलंपत, तान, मुरकी, खटका–या कोणत्याहि गोष्टी घ्या; ज्या सहजतेनें त्या या सर्व गोष्टी हाताळतात ती प्रेक्षणीय असते. यांच्या तानेंतील वैचित्र्य, बिकटता व सहजता हे गुण जसे प्रमुख आहेत, त्याप्रमाणेंच अनेक आवर्तनें दमशास टिकवून सुंदरपणें समेवर येणें हा यांच्या गायनाचा आणखी एक विशेष आहे. सम घेतल्यावर पुन्हां तान घेण्यास सुरवात करून निरनिराळ्या लयींनीं मध्य व तार सप्तकांत फिरत करून पुन्हां एकाद्या सुंदर ठिकाणीं सम घेणें म्हणजे यांच्या हातचा मळ आहे. श्रोत्यांच्या मनाला धन्यता वाटावयास लावण्याचें व पुन्हां असें गाणें ऐकण्याचा योग येईल किंवा नाहीं अशी हुरहूर लावण्याचें सामर्थ्य यांच्या या गुणांमुळेंच यांना प्राप्त झालें आहे. गाण्यांतील सौंदर्य प्रगट करण्याचें यांचें कसब इतरत्र क्वचितच दिसतें.

**केवलानंदसरस्वती स्वामी**—(जन्म स. १८७७) वाईचे सुप्रसिद्ध पंडित व जुन्या नव्या शास्त्राचे सूक्ष्म अभ्यासक. पूर्वाश्रमींचें यांचें नांव नारायणशास्त्री मराठे.

यांचें जन्मस्थान मुडकोली (ता. रोहें, जि. कुलाबा). यांना व्यवहार, धर्म व वेदान्त यांचें बौद्धिक व आचारात्मक शिक्षण मातापितरांकडून मिळालें. वाईचे श्रीप्रज्ञानंद सरस्वती हे यांचे गुरु होत. त्यांच्याच नांवानें यांनीं पुढें प्राज्ञपाठशाळा काढली. यांचे मामांचे गुरु बाळशास्त्री धोंडशास्त्री डेंग्वेकर होत. यांनीं आस्तिक षड्दर्शनांचें अध्ययन व वाचन केलें. मराठी भाषेंतील शास्त्रीय, इतिहासात्मक व निबंधात्मक ग्रंथांचें यांचें वाचन चांगलें आहे. गाणें व हार्मोनियम यांचाहि यांनीं सखोल अभ्यास केला आहे. प्राज्ञपाठशाळेचे हे संस्थापक व चालक असून यांनीं ३० वर्षें तेथें अध्यापनाचें काम केलें. अकोला ब्राह्मण परिषदेचे हे अध्यक्ष होते (१९२८). स. १९३१ मध्यें यांनीं संन्यास घेतला व बद्रिनारायणाचें दर्शन घेतलें. धर्मनिर्णयमंडळाच्या स्थायी धर्मचर्चामंडळाचे हे कायमचे अध्यक्ष आहेत. धर्मकोशाची मूळ योजना करून कामाला आरंभ यांनींच केला.

**केशवराव, न्यायमूर्ति**—(जन्म स. १८६७– मृत्यु स. १९३२ मे २१) हैद्राबादचे सुप्रसिद्ध वकील व सार्वजनिक कार्यकर्ते.

ब्रिटिश हिंदुस्थानांत न्या. महादेव गोविंद रानडे यांच्या चरित्राला जें महत्त्व आहे तें हैदराबाद संस्थानांत यांच्या चरित्राला आहे. त्या संस्थानांतील बहुतेक सार्वजनिक चळवळींच्या व व्यापक तत्त्वज्ञानाच्या जनकत्वाचा मान यांच्याकडे जातो.

यांचा जन्म पुरजळ (ता. बसमत, जि. परभणी) येथें अजोळीं झाला. यांचें मूळ गांव त्याच तालुक्यांत 'कोरटें' या नांवाचें एक खेडें असून यांच्या घराण्यांत तेथील जोशीपणाची वृत्ति पूर्वीपासून चालू आहे. त्यामुळें हे केव्हां केव्हां 'मी जोशी आहें' असें आपल्या व्याख्यानांत अभिमानानें सांगत. यांच्या वडिलांचें नांव संतुकराव. आपले मेव्हणे हरी रावजी शेष यांच्यामार्फत विशेष शिक्षण न होतां हे तहसील कचेरींत द. म. १५ रु.च्या नोकरीवर लागले (१८८२). नोकरींत फायदा होत असूनहि स्वतंत्रपणें धंदा करण्याकरितां हे वकिलीची परीक्षा उत्तीर्ण झाले (१८९०). हे वरच्या वर्गांत उत्तीर्ण झाल्यामुळें यांना हायकोर्टाची सनद मिळाली.

यांनीं प्रथम गुलबर्गा येथें पांचसहा वर्षें वकीली करून चांगला जम बसविला व हैदराबादेस वकीली करण्याकरितां येऊन राहिले (१८९६). गुलबर्गा येथें आल्यापासूनच पुण्यामुंबईच्या चळवळींकडे आपलेपणानें पाहणें व शक्य तर त्यासंबंधीं विचारविनिमय करणें वगैरे गोष्टींचा यांना नाद असे. दर सुट्टींत हे तिकडे मुद्दाम जात व व्याख्यानें वगैरे श्रवण करीत.

हैदराबादेस ज्या रामाचार्यांच्या मदतीनें हे आले होते ते लवकरच वारले आणि मराठी बोलणाऱ्या वकिलांत यांनीं लवकरच अग्रमान पटकाविला. औरंगाबादच्या हिंदु-मुसलमानांच्या दंग्यांत यांनीं हिंदूंच्यातर्फे वकीलपत्र स्वीकारण्याचें धाडस केलें. त्यामुळें हिंदूंचें पुढारीपण यांच्याकडे सहजच चालून आलें. तसेंच वरंगळच्या हिंदु-मुसलमानांच्या दंग्यांत व कुबेर येथील जलालशहाच्या खुनाच्या खटल्यांत यांनीं केलेल्या कामगिरीनें यांचें नांव सर्वतोमुखीं झालें.

तेथील सरकारचेंहि यांच्याकडे लक्ष गेलें आणि यांना फॅक्टरी ॲक्ट करण्याकरितां नेमलेल्या कमिशनवर सभा-

सद म्हणून घेण्यांत आलें (१९१९). यांनींहि त्यांत दोन वर्षेपर्यंत काम करून सरकार व लोक या दोघांचाहि विश्वास संपादन केला.

याच सुमारास न्यायमूर्ति राय बालमुकुंदसाहेब हे सेवानिवृत्त झाल्यावर हायकोर्टात त्यांच्या जागीं हिंदु जज्जाची निवड व्हावयास पाहिजे होती, पण ती तशी झाली नाहीं. ज्या हायकोर्टांत शेंकडा नव्वद खटले हिंदूंचे व हिंदुधर्मशास्त्राचे तेथं एकहि हिंदु जज्ज नाहीं अशी स्थिति झाली. ही गोष्ट मुख्य प्रधान सर अली इमाम यांच्या ध्यानांत येऊन त्यांनीं यांची ॲडिशनल जज्ज म्हणून नेमणूक केली. या जागेचा पगार दोन हजारच होता. तथापि यांनीं ती जागा पत्करिली, व आपल्या अखंड समाजसेवेचें कार्यहि चालू ठेविलें.

त्या अवधींत गुलबर्गा हिंदु-मुसलमानदंगा चौकशी वगैरे अनेक कमेट्यांवर यांनीं काम केलें. आणि पांच वर्षे काम करून सेवानिवृत्त झाले (१९२६).

संस्थानांतील बहुतेक शिक्षणसंस्था, बहुतेक सार्वजनिक चळवळी, आर्यसमाज, मराठी वर्तमानपत्रें व मासिकें यांच्या जनकत्वांत यांचा महत्त्वाचा भाग असे. संस्थानाबाहेरील भारत इतिहास-संशोधक मंडळ, पुणें, सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटी, पुणें, वगैरेंशीं हे अगदीं आपलेपणाचा संबंध ठेवीत. हे उमरावती विदर्भ-संघाचे अध्यक्ष, जळगांवच्या विदर्भ-साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष, पुणें वाचनालय-परिषदेचे अध्यक्ष, विदर्भ साहित्य-परिषद, हैदराबाद, स्वागताध्यक्ष (१९२७) व पुणें येथें भरलेल्या दे. ऋ. ब्रा. परिषदेचे अध्यक्ष होते (१९३२).

हैदराबाद संस्थानांतील कायदे मंडळांतहि यांनीं महत्त्वाचें काम केलें. सर्व प्रकारच्या लोकांत मिळून-मिसळून काम करण्याची यांची हातोटी वाखाणण्यासारखी होती.

**केशवसुत**—(जन्म स. १८६६–मृत्यु स. १९०५) सुधारणेची घोषणा करणाऱ्या व गूढगुंजनात्मक आधुनिक मराठी कवितेचे जनक. यांचें संपूर्ण नांव–कृष्णाजी केशव दामले. यांचें 'केशवसुत' हें सध्यां प्रचारांत असणारें नांव 'काव्यरत्नावली'कार नारायण नरसिंह फडणीस यांनीं प्रथम उपयोगांत आणलें. रत्नागिरी जिल्ह्यांतील मालगुंड हें यांचें जन्मस्थान. यांचे वडील केसोपंत मराठी शाळामास्तर होते. लहानपणीं यांची लिहिण्याची पद्धत फारच सावकाश असल्यानें हे तेविसाव्या वर्षी मॅट्रिक पास झाले (१८८९). मुंबई, खानदेश, भडगांव, फैजपूर, धारवाड यांसारख्या अनेक ठिकाणीं यांनीं नोकऱ्या केल्या (१९०३). यानंतर कांहीं कामासाठीं हुबळी येथें गेले असतां तेथेंच प्लेग होऊन हे मृत्यु पावले.

यांची प्रसिद्धि मुख्यतः कवि म्हणून असली तरी तिची प्राप्ति यांना मृत्यूनंतर किती तरी दिवसांनीं झाली आहे. यांच्या मृत्यूनंतर पांच-सहा वर्षांनीं श्री. रा. ग. गडकरी हे कवि म्हणून लोकांच्या प्रथम डोळ्यांसमोर आले. त्यांनीं प्रथम आपण 'केशवसुतांचे सच्चे चेले' असल्याचें जाहीर करून यांच्या संप्रदायाची स्थापना केली व नंतर बालकवि ठोंबरे, रेंदाळकर व टिळक या कवींनीं यांचेंच ऋण मान्य करून यांचा संप्रदाय पक्का केला. या लोकांनीं 'तुतारी मंडळ' काढून आपल्या प्रत्येक कवितेच्या प्रसिद्धीबरोबर तुतारी मंडळाचें नांव घालावयाचें ठरवलें, व अशा तऱ्हेनें विस्मृतीच्या खोल दरींत पडलेलें यांचें नांव पुन्हां एकदां वर येण्यास सुरुवात झाली.

यांच्या इतक्या विविध, परिणामकारक व उत्साहवर्धक कविता पूर्वी मराठींत फारच थोड्या लिहिल्या गेल्या होत्या. इंग्रजी धर्तीच्या कविता करणारे वस्तुतः हे पहिलेच गृहस्थ नव्हेत. इंग्रजी भावगीतांचीं रसाळ रूपांतरें विष्णु मोरेश्वर महाजनी यांनीं कांहीं कमी प्रसिद्ध केलीं नव्हतीं. यांचा काव्यरचनाकाल वीस वर्षांचा (१८८५–१९०५) हा असून यांच्या एकंदर १३२ कविता प्रसिद्ध आहेत. त्यांपैकीं १५ कविता भाषांतरित आहेत. यांच्या स्वतंत्र कवितांपैकीं 'तुतारी', 'झपूर्झा', 'स्फूर्ती', 'वातचक्र', 'आम्ही कोण' व 'घुबड' या कविता विशेष प्रसिद्ध आहेत. यांच्या कवितेवरील पहिलें पुस्तक हरिभाऊ आपट्यांचें 'केशवसुतांची कविता' हें विशेष महत्त्वाचें आहे. याच पुस्तकाची दुसरी (१९२१) व तिसरी आवृत्ति (१९२७) यांचे भाऊ सीतारामपंत दामले यांनीं प्रसिद्ध केली. नाट्यछटाकार दिवाकर यांनीं यांच्या आयुष्याचीं कांहीं टांचणें एकत्र करून प्रसिद्ध केलीं.

**केळकर, नरसिंह चिंतामण**— (जन्म स. १८७२) महाराष्ट्राचे थोर मुत्सद्दी, देशभक्त आणि मराठी साहित्याचे आचार्य.

पंढरपुराजवळ मोडलिंब येथें वडील मामलेदार असतां तेथें यांचा जन्म झाला.

यांचें शिक्षण मिरज येथें होऊन हे मॅट्रिक झाले (१८८८). हे बी. ए. (१८९१) व एलएल. बी. (१८९४ मध्यें) झाल्यानंतर यांनीं सातारा जिल्ह्यांतील वकिलीची सनद काढिली. पण तो धंदा यांनीं अवघे नऊच महिने केला. इतक्यांत लो. टिळकांनीं यांना आपले मदतनीस म्हणून बोलाविलें आणि हेहि इतर चालून आलेलीं लाभस्थानें बाजूला सारून पुण्यास नोकरीवर येऊन दाखल झाले (१७ मार्च १८९६). हे अशा स्थिर योगावर पुण्यास येऊन दाखल झाले कीं, यांचें आसन पुढें कोणताहि कुयोग डळमळवूं शकला नाहीं. उलट टिळक-केळकर ही जोडी एकमेकांना पूरक असल्याचा अनुभव लोकांना आला. हे पुण्यास आल्यानंतर लॉ क्लासमध्यें शिकविण्याची व 'मराठ्या'ची बहुतेक जबाबदारी यांच्याकडे आली. स. १८९७ सालीं खटला होऊन टिळकांना शिक्षा झाली तेव्हां सोयीच्या दृष्टीनें केसरी आणि मराठा या दोन्ही पत्रांचें संपादकत्व यांच्याकडे आलें. खाडिलकर केसरीकरितां होते तरी जाहीर संपादक म्हणून हेहि लेखन करीत. टिळक तुरुंगांतून परत आल्यानंतर मात्र हे मराठ्याचे संपादक राहिले आणि हें संपादकत्व यांच्याकडे पुढें सतत सन १९१८ पर्यंत होतें. स. १९१० ते १९१८ पर्यंत हे पुनः दोन्ही पत्रांचेंहि संपादक होते. नंतर १९१९ मध्यें हे टिळकांच्याबरोबर विलायतेस गेल्यानें खाडिलकर हे केसरीचे एक वर्षभर संपादक होते. पण हे स. १९१९ अखेर विलायतेहून आल्यावर १९२० च्या मे महिन्यांत यांनीं केसरीचें संपादकत्व पुनः पत्करिलें तें मध्यें एक वर्ष सोडून स. १९३१ च्या जानेवारीच्या अंकापर्यंत यांच्याकडेच होतें.

पुणें सार्वजनिक सभेची, दुष्काळासंबंधीं फॅमिन कोड अमलांत आणून शेतकऱ्यांना सूट व माफी योग्य प्रमाणांत मिळावी, अशी चळवळ होती. तेव्हांच्या व प्लेगच्या वेळीं व्हालंटियर म्हणून केलेल्या कामामुळें आणि टिळकांचे मदतनीस म्हणून यांच्यावर लोकांचा विश्वास बसत चालला. स. १८९८ मध्यें म्युनिसिपालिटीच्या नव्या निवडणुकी निघाल्यापासून तेथें हे निवडून येऊं लागले. तेथेंहि यांच्याकडे पुढारीपणा सहजच आला. हे मार्केट कमेटीचे सहा वर्षे चेअरमन होते. स. १९१२ सालीं यांना व्हाइस-प्रेसिडेंट निवडण्यांत आलें व स. १९१८ सालीं यांची निवडणूक अध्यक्षाच्या जागीं झाली. यापूर्वी सरकारनें नेमलेल्या सभासदांपैकीं अध्यक्ष निवडला जात असे, पण ती प्रथा आतां बदलली. तेव्हांपासून १९२४ पर्यंत हे अध्यक्ष निवडून येत. पुढें मात्र यांनीं म्यु. निवडणुकीस उभें राहण्याचें स्वेच्छेनें सोडलें.

स. १९०१-०४ पर्यंत टिळकांच्याबरोबर त्यांच्या परिवारांतील माणसांनाहि ताईमहाराज प्रकरणानें ग्रासलें होतें. त्या वेळीं नेहमींच्या संपादकीय कामाबरोबरच प्रत्येक ठिकाणीं यांचें वकीलपत्र दाखल असे. आणि घरचा वकील म्हणून किरकोळ समजलीं जाणारीं पण मेहनतीचीं कामें यांच्यावर सोंपविलीं जात. शेवटीं टिळकांना हायकोर्टानें सर्व फौजदारी आरोपांतून मुक्त केल्यावर या प्रकरणास उतार लागला.

याच वेळीं वंगभंगाची चळवळ जोरांत सुरू झाली. त्या वेळीं प्रान्तिक कामें करण्यास बरीच मंडळी पुढें आली होती. पण परप्रान्तांशीं व कॉंग्रेसमधील इतर पुढाऱ्यांशीं व्यवहार करण्यांत टिळकांना यांच्याशिवाय खरा कोणाचाच आधार नव्हता. त्या वेळीं नोकरापेक्षां सहकाऱ्याच्या भूमिकेंत यांचें रूपान्तर अधिक झालें. कारण कोणतेंहि काम व्यवस्थित आणि मनःपूर्वक करण्याचा यांचा स्वभाव आहे. परदेशी बातमीदार वगैरे टिळकांच्याकडे येत. त्यांची रीतसर व्यवस्था लावणें यांच्या मदतीशिवाय टिळकांना अशक्य होतें. टिळकांचा हा माध्याह्नकाळ होता. त्यांच्या तेजानें सरकारचेसुद्धां डोळे दिपत होते. जवळ असणारांनासुद्धां सुरक्षितपणा नव्हता. तेव्हां यांच्याहि परीक्षेची वेळ होती. टिळक तर १९०८ सालीं तुरुंगांत गेलेच, पण त्यांच्या खटल्याचें मोठ्या तातडीनें यांनीं प्रसिद्ध केलेलें पुस्तकहि जप्त झालें. याच वेळीं टिळकांना झालेल्या शिक्षेसंबंधीं यांनीं लिहिलेल्या मराठ्यांतील लेखाबद्दल यांना १२०० रु. दंड व १४ दिवसांची कैद व माफी मागेपर्यंत फिरून कैद, अशी चमत्कारिक शिक्षा देण्यांत आली (१९०८).

यानंतर नाशिक येथें जॅक्सनचा खून झाला व राजकीय वातावरण अधिक बिकट झालें. या वेळीं केसरी व मराठा हीं दोन्हीं पत्रें खाडिलकरांच्या नांवावर होतीं. खाडिलकरांचें म्हणणें, मराठा केळकरांच्या नांवावर असावा, कारण त्यांत हेच बहुतेक लिहीत असत; पण केसरी मात्र आपल्या नांवावर असावा. पण वडिलकीच्या नात्यानें यांना तसें करणें अपमानास्पद वाटूं लागलें. टिळकांना मंडाले येथें लिहिलें असतां त्यांनीं यांच्या म्हणण्यास मान्यता दिली. पण स. १९१० सालीं यांनीं आपल्या नांवें केसरीचें डिक्लेरेशन करितांच खाडिलकरांनीं आपला केसरी कचेरीशीं असलेला संबंध सोडला व

दोन्ही पत्रांचें संपादकत्व यांचेकडे आलें. त्या वेळीं बाहेरच्या विधायक चळवळी बंदच पडल्या होत्या आणि राष्ट्रीय सभा प्रागतिकांच्या हातांत गेली होती. तेव्हां यांनीं आपल्या लेखनशक्तीच्या आणि विचाराच्या जोरावर केसरीचें धोरण कायम ठेवून केसरीला लोकप्रिय केलें, आणि त्याला सरकारी झळ लागूं दिली नाहीं. या महत्त्वाच्या प्रसंगांत यांनीं केलेलें हें कार्य यांच्या आयुष्यांतील फार मोठें राष्ट्रीय कार्य गणलें पाहिजे.

टिळक सुटून येतांच पुनः बाहेरच्या कार्यास सुरुवात झाली. बेळगांवच्या परिषदेंत कॉंग्रेसमध्यें शिरण्याबद्दल ठराव झाला ( १९१६ ) आणि लखनौ कॉंग्रेसमध्यें सर्व पक्ष पुनः कॉंग्रेसमध्यें एकवटले. या सर्व कार्यांत टिळकांना यांचा उजव्या हातासारखा उपयोग होई. यांच्या इतपत विधायक व सनदशीर कार्य उरकणारा मनुष्य टिळकांच्या पाशीं कोणीहि नव्हता. त्यामुळेंच यांना कॉंग्रेसचे सेक्रेटरी निवडण्यांत आलें. तथापि विलायतला जाणाऱ्या कॉंग्रेस डेप्युटेशनचे सेक्रेटरीहि यांनाच निवडण्यांत आल्यामुळें यांनीं कॉंग्रेसच्या सेक्रेटरीचें काम सोडलें. होमरूललीगच्या डेप्युटेशनचे हे सेक्रेटरी होतेच. इंग्लंडमध्यें दोन्ही डेप्युटेशनचे सेक्रेटरी असणाऱ्या यांनाच इंग्लंडांतील कॉंग्रेस कमेटीचें मुखपत्र ' इंडिया ' चें संपादकत्व देण्यांत आलें. विलायतेहून आल्यावर सोलापूर येथें १९२० सालीं दोन्ही पक्षांची संयुक्त प्रान्तिक परिषद भरली. तिचें अध्यक्षस्थान यांना देण्यात आलें. या एकंदर अनुभवामुळें शेवटीं टिळकांनीं यांना केसरी संस्थेचे एकमेव चालक नेमणें अगदीं साहजिक आहे.

टिळक वारले त्याच दिवशीं गांधींच्या असहकारितेचा पुकारा झाला आणि जुन्या अनुभवी पुढाऱ्यांचीं मतें विरुद्ध असतांहि कलकत्त्यास राष्ट्रसभेनें असहकारितेला मान्यता दिली आणि राष्ट्रसभेच्या निर्णयापुढें मान वांकविणें अवश्य म्हणून यांनीं कौन्सिल बहिष्काराच्या चळवळीचा पुरस्कार सांगूनसवरून मुदतबंद एक वर्षापुरता केला. पण गांधींच्या चळवळींचें धोरण यांना अविवेकी वाटल्यानें त्याचा सर्वस्वीं पुरस्कार यांनी केला नाहीं.

पुढें कॉंग्रेसमध्येंच गया येथें कौन्सिल-प्रवेशवादी स्वराज्यपक्ष निघाला ( १९२३ ) त्यांत महाराष्ट्राबाहेरील दास, नेहरू वगैरेंनीं पुढाकार घेतला. हे महाराष्ट्रांतील या पक्षाचे अध्यक्ष होते. पुढील कायदेमंडळाच्या निवडणुकींत प्रचंड बहुमतानें हे निवडून आले ( १९२४-२५ ) व असेंब्लींत हे त्या पक्षाचे व्हिप होते. विठ्ठलभाई पटेल हे असेंब्लीचे अध्यक्ष निवडून आल्यावर यांना त्यांचे जागीं स्वराज्य पार्टीचे उपाध्यक्ष निवडण्यांत आलें, पण नागपूर कायदेकौन्सिलचे अध्यक्ष ना. श्री. ब. तांबे यांना एक्झिक्यूटिव्ह कौन्सिलर निवडण्यांत आलें. तेव्हां स्वराज्य-पक्षांत अधिकाराच्या जागा पत्करण्यावरून मतभेद होऊन महाराष्ट्रीयांचा प्रतिसहकार पक्ष निघाला. आणि त्या पक्षातर्फेंहि हे प्रचंड मतांनीं निवडून आले ( १९२७-३० ).

१९२७ अखेर यांनीं टिळक-चरित्राचा उत्तरार्ध दोन खंड लिहिल्यावर एक वर्षभर केसरीचें संपादकत्व सोडलें होतें ( १९२८ ). नंतर पुनः दोन वर्षें संपादकत्व पत्करून केसरीचा ज्युबिलीचा अंक काढून तें कायमचें सोडलें ( १९३१ ). तथापि यांच्या विविध प्रकारच्या लेखनांत बिलकुल खंड पडलेला नाहीं. केसरी अर्धसाप्ताहिक यांनींच केला ( १९२८ ).

यांची सहृदयता, मनमिळाऊपणा, कामाचा उरक आणि जबाबदारीची जाणीव यांमुळें हे कोठें तरी महत्त्वाच्या ठिकाणीं अध्यक्ष झाले नाहींत असें वर्ष क्वचितच सांपडेल. बडोदा येथें भरलेल्या मराठी साहित्य-संमेलनाचें अध्यक्षपद यांना दोन वेळां देण्यांत आलें (१९२२, १९३१ ), मुझफरनगर ( १९२४ ), संस्थान परिषद, दिल्ली ( १९२४ ), कानपूर हिंदुमहासभा जादा, संगीत-परिषद, ग्रंथसंग्रहालय ( १९२५ ), दलितोद्धार, दिल्ली, डाक्का, प्रांतिक हिंदुसभा ( १९२८ ) हिंदुमहासभा, जबलपूर ( १९२९ ), प्रान्तिक हिंदुसभा लाहोर ( १९२० ), रयत सभा, अहमदाबाद (१९२९) इत्यादि ठिकाणीं हे अध्यक्ष होते. एका उद्योगी गृहस्थानें १३०४ सभांचे हे अध्यक्ष झाल्याचें गणित प्रसिद्ध केलें होतें.

यांचे प्रमुख ग्रंथः— १ सुभाषित व विनोद, २ मराठे व इंग्रज ( १९१८ ), ३ टिळक-चरित्र ( भाग १,२,३ ); व तोतयाचें, बंड, चंद्रगुप्त, कृष्णार्जुन युद्ध. अमात्यमाधव, वीरविडंबन, संत भानुदास वगैरे नाटकें. यांचा सर्व लिखाणाचा संग्रह ' समग्र केळकर वाङ्मय ' या नांवानें बारा खंडांत प्रसिद्ध झाला आहे.

लिहिण्याची अत्यंत हौस असलेला यांच्यासारखा लेखक विरळा. ती हौसच यांना अजूनहि नव्यानव्या क्षेत्रांत पदार्पण करण्यास उत्तेजित देत आहे. यांनीं हाताळला नाहीं असा वाङ्मयांत एकहि प्रान्त सांपडणार नाहीं . तसेंच अत्यंत जलद आणि सुबोध वाङ्मय निर्माण

करण्यांत यांचा हातखंडा आहे. १ कवि, २ शास्त्रकार, ३ कादंबरीकार, ४ लघुकथा-लेखक, ५ इतिहास-संशोधक, ६ नाटककार, ७ प्रबंधकार, ८ संपादक–इत्यादींपैकीं यांच्या गुणांचा उत्कर्ष कोठें आढळतो ? या प्रश्नाचें उत्तर देणें कठीण असलें तरी अनुक्रमानें शेवटाकडे आपणांस धांव घ्यावी लागेल. कोणताहि विषय साधकबाधक प्रमाणांनीं समतोलपणें मांडण्यांत हे कुशल आहेत. भावनेच्या आहारीं न जातां व्यावहारिक बुद्धीनें सुवर्णमध्य काढण्यांत यांच्या आयुष्याचें सार आहे. यांच्या या स्वभावविशेषाचा फायदा राष्ट्राला अगदीं आणीबाणीच्या प्रसंगीं झालेला आहे. बिनीवर जाऊन चार हात करणाऱ्या योद्धयापेक्षां सौम्यपणानें मुद्दा न सोडतां कार्य साधणाऱ्या मुत्सद्याची यांची प्रकृति आहे. चिरोलकेसच्या वेळीं लोकांकडून रुपयारुपयानें जमा केलेला एक लक्ष रुपयांचा टिळक ज्युबिली फंड ( १९१९ ) केसरीच्या खजिन्यांतून तीन लाखांच्या रूपानें सव्याज परत देऊन, लोकमान्य टिळक ट्रस्ट उभारून, यांनीं आपल्या चारित्र्याला नैतिक अधिष्ठान मिळवून दिलें आहे ( १९३० ). साधा मनुष्य बेताच्या भांडवलावर सारासार विचारानें केवळ सद्‌बुद्धीच्या जोरावर राष्ट्राची कशी सेवा करूं शकतो याचें हे मूर्तिमंत उदाहरण आहेत.

**केळुसकर, कृष्णराव अर्जुन**—( जन्म स. १८६०–मृत्यु स. १९३४ ) मराठींतील सुप्रसिद्ध लेखक व सार्वजनिक कार्यकर्ते.

यांचा जन्म कोंकणी मराठा घराण्यांत रत्नागिरी जिल्ह्यांतील केळुस या गांवीं झाला. हे मॅट्रिक होते. यांना मराठी, इंग्रजी व संस्कृत या भाषांचें ज्ञान चांगलें असे. हे उत्तमपैकीं शिक्षक होते. यांनीं मुंबईच्या विल्सन हायस्कुलांत जवळजवळ ४५ वर्षे शिक्षकाचें काम केलें. जातिवंत शिक्षकाच्या अंगीं असणारे गुण यांच्या अंगीं होते. कोणत्याहि जातींतील होतकरू विद्यार्थी दिसल्यास त्याला हरतऱ्हेनें मदत करण्याच्या कामीं हे सदोदित तत्पर असत. यांना लोक ' दादा ' म्हणत. या दादांचे कृतज्ञतापूर्वक उपकार स्मरणारे डॉ. भी. रा. आंबेडकरांसारखे पुष्कळ थोर लोक आहेत. मागसलेल्या जातींतील विद्यार्थ्यांना मदत करून पुढें आणण्याविषयीं यांची खटपट असे. ब्राह्मणेतर मंडळींत विधायक पद्धतीनें सतत कार्य करीत राहणाऱ्या लोकांत यांना मानाचें स्थान दिलें पाहिजे. यांनीं स. १८९२ सालीं ' अध्यात्मिकज्ञानरत्नावली ' मासिक काढून तें सतत सात वर्षे चालविलें. स. १९०७–१४ पर्यंत हे सरकारच्या आश्रयानें चाललेल्या ' जगद्‌वृत्त ' पत्राचे संपादक होते. याशिवाय तुकारामाचें चरित्र, गौतम बुद्धाचें चरित्र, सात उपनिषदांचीं भाषान्तरें, अनेक इंग्रजी ग्रंथांचीं भाषान्तरें व भगवद्गीता ( मूळ श्लोक, पदें, पदार्थ सरलार्थ, वामनी समश्लोकी, मोरोपंती आर्या, मुक्तेश्वरी ओवी, तुकारामाचा अभंग, उद्धवचिद्घनाची सवाई व श्लोक-सूचिसह ) वगैरे यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

यांनीं शिवाजीमहाराजांचें चरित्र विस्तृतपणें लिहून प्रथम १९०७ सालीं प्रसिद्ध केलें. त्यांत थोडी भर घालून व दुरुस्ती करून मराठी व इंग्रजी अशीं दोन्ही पुस्तकें १९२१ सालीं यांनीं प्रसिद्ध केलीं.

यांच्या शिवाजीचरित्राचें उत्तम इंग्रजी भाषान्तर होऊन तें जगांत सर्वत्र पसरावें अशी मूळ इच्छा कोल्हापूरचे श्रीशाहु छत्रपति यांची. पण ते हें पुस्तक प्रकाशित होण्याच्या सुमारास मृत्यु पावले व हे गरीब गृहस्थ चांगलेच आर्थिक पेंचांत सांपडले. पण ही हकीगत इंदूरच्या होळकर सरकारनां कळतांच त्यांनीं यांना बोलावून उदार देणगी दिली, यांना कर्जांतून सोडविलें आणि भाषान्तरकार प्रो. एन्. एस्. ताकाखाऊ यांनाहि योग्य मोबदला मिळाला. शाहूमहाराज गेल्यानें त्यांची यांना मदत झाली नाहीं तरी हें सर्व कार्य त्यांच्या प्रेरणेनें झालेलें असल्यामुळें यांनीं इंग्रजी पुस्तक त्यांना अर्पण केलें. हें यांचें शिवाजीचरित्र प्रौढ, शुद्ध, भारदस्त व वैशिष्ट्यपूर्ण आहे. यांच्या गौरवार्थ एक मंडळ स्थापन होऊन त्यानें यांच्या लेखांचा संग्रह, ' विचारसंग्रह ' नांवानें प्रसिद्ध केला.

**कोकटनूर, डॉ. जी. रामचंद्र**—( जन्म स. १८९३ ) सुप्रसिद्ध डॉक्टर व हुकेरीरोडच्या 'कर्नाटक हेल्थ इन्स्टिट्यूट'चे संस्थापक.

हे पुणें न्यू इंग्लिश स्कूलमधून मॅट्रिक झाले (१९१३) व इंटरसायन्सचा अभ्यास करून वडील बंधूंच्या बोलावण्यावरून हे अमेरिकेस रवाना झाले (१९१६). तेथें यांनीं मिनेसोटा युनिव्हर्सिटींत मेडिकल कोर्स घेतला व हे प्रथम बी. एस. व नंतर बी. एम्. झाले. यानंतर यांनीं न्यूयॉर्कजवळील जर्सी शहरांतील ख्राइस्ट हॉस्पिटलमध्यें जवळजवळ १६ महिने हाउस फिजिशियन व सर्जन म्हणून काम केलें व एम्. डी. ही डिग्री घेतली. यानंतर यांनीं मिचिगन कॉपर मायनिंगमध्यें असिस्टंट फिजिशियनची नोकरी पत्करिली. अशा तऱ्हेनें सुमारें ११ वर्षे काम केल्यावर तिकडील अनुभव पुरेसा वाटून हे

युरोपमध्यें गेले. व्हिएन्ना येथें यांनीं डोळ्याचे रोग व युरॉलॉजी यांचा विशेष विषय म्हणून कांहीं महिने अभ्यास केला. याप्रमाणें ८ वर्षें शिक्षण व अनुभव संपादन करून हे हिंदुस्थानांत परत आले (१९२४). लागलीच बेळगांव येथें ठळकवाडीस प्रशस्त बंगल्यांत यांनीं आपला दवाखाना व रुग्णालय उघडलें. त्याचाच विस्तार होत होत आज हुक्केरीरोडवरील कर्नाटक हेल्थ इन्स्टिटयूट व हॉस्पिटलचा पसारा झालेला आपणांस दिसत आहे. तेथें शस्त्रक्रिया व उपचार करण्याची सर्व व्यवस्था असून क्षयरोग्यांकरितां स्वतंत्र विभाग आहे.

**कोकटनूर, डॉ. वामन रामचंद्र**—( जन्म स. १८८६ ) अमेरिकेंत वास्तव्य करून राहिलेले जगप्रसिद्ध रसायनशास्त्रज्ञ. यांची फार मोठे रसायनशास्त्रज्ञ म्हणून सर्व जगभर ख्याति आहे. मुंबई विद्यापीठाचे बी. एस्सी. झाल्यानंतर ( १९११ ) हे अमेरिकेंतील कॅलिफोर्निया युनिव्हर्सिटींत रवाना झाले. याचे आधी कांहीं दिवस पुण्याच्या 'रानडे इंडस्ट्रियल इन्स्टिटयूट'-मध्यें रसायनशास्त्रज्ञ म्हणून हे काम करीत होते ( १९११-१२ ). यानंतर हे मिनेसोटा युनिव्हर्सिटींत एम्.एस्. (१९१४) व पीएच्. डी. (१९१६) झाले.

यानंतर मिनेसोटा युनिव्हर्सिटींत शेवलीन फेलो (१९१४-१५), व रीसर्च असिस्टंट (१९१५-१७) म्हणून काम केल्यानंतर, प्रथमतः मॅथिसन अल्कली वर्क्सचे रीसर्च केमिस्ट (१९१७-१८) व नंतर नायगरा अल्कली कंपनीच्या रीसर्च डिपार्टमेंटचे प्रमुख म्हणून यांनीं काम केलें. यानंतर मात्र यांनीं कन्सल्टिंग प्रॅक्टिस करण्यास सुरुवात केली. याच सुमारास हेलन ग्रेबर या अमेरिकन स्त्रीबरोबर हे विवाहबद्ध झाले.

क्लोरिन व कॉस्टिक सोडा यांच्या उपयोगासंबंधींची यांची तज्ज्ञता लक्षांत घेऊन आपल्या पुनर्रचनेच्या वेळच्या पंचवार्षिक योजनेंत प्रथम १९२८ सालीं व नंतर १९३८ सालीं सोव्हिएट रशियाच्या अधिकाऱ्यांनीं यांना आपले तज्ज्ञ व सल्लागार नेमिलें. स. १९३०-३१ सालीं ध्रांगध्रा येथील 'श्रीशक्तिअल्कलीवर्क्स'वर टेक्निकल ॲडव्हायसर म्हणून यांची नेमणूक झाली. हे जरी मधून मधून इकडे येत असले तरी लग्न झाल्यापासून हे अमेरिकेंतच स्थायिक झाले आहेत व तेथें यांनीं तिसांपेक्षां अधिक केमिकल पेटंटस् घेतलेलीं आहेत. तेथें यांनीं प्रथम 'एरोप्लेन डोप सॉल्व्हंट' व 'व्हॅट डाइज' तयार केले व वॉर गॅसेसचा शोध लावला. हे अमेरिकन केमिस्ट सोसायटीचे व हिस्टरी ऑफ सायन्स सोसायटीचे सभासद आहेत.

स. १९४० च्या अमेरिकन पेटन्टस ऑफिसच्या परिषदेंत एक प्रमुख संशोधक म्हणून यांचा गौरव करण्यांत आला होता. त्याच वर्षीं परदेशी असूनहि अमेरिकनशास्त्र-साधनेंत अमूल्य भर घालणारा शास्त्रज्ञ म्हणून न्यूयॉर्क वर्ल्ड फेअरच्या 'हॉल ऑफ फेम'मध्यें यांचें नांव घालण्यांत आलें. न्यूयॉर्कमधील यांच्या प्रयोगशाळेच्या स्थापनेला लेस्टर हॉफ् हैम या धनिक गृहस्थांचें साहाय्य झालें आहे. या प्रयोगशाळेनें जगाला मोठाले शोध दिले आहेत. हिंदुस्थानांतील अमेरिकन वकील व व्यापारी यांचे हे सल्लागार होते (१९२८-३२). आज अमेरिकेच्या केमिकल वॉरफेअर सर्व्हिसमध्यें हे कॅप्टनच्या हुद्यावर आहेत. हुक्केरी रोडवर मोठें हॉस्पिटल चालविणारे सुप्रसिद्ध डॉक्टर यांचे सख्खे बंधु होत. यांना शास्त्राच्या इतिहासाचा छंद असून यांचें लेखनहि भरपूर आहे. यांचे कांहीं प्रसिद्ध ग्रंथ—

(1) The Antiquity of Chemical Warfare In India, (2) Discovery of Firearms and Gunpowder in Ancient India, (3) Hieroglypic Findings on the Origin of Chemistry, (4) Ancient Hindu Conception of Cosmogony.

**कोकर्डेकर, लक्ष्मणराव जानराव**—( जन्म १९०३-मृत्यु १९४२ )

व्यायामाचे बर्लिन येथील पीएच्. डी. व राष्ट्रीय वृत्तीचे तडफदार तरुण. यांचें मूळचें आडनांव धबडगांव. कोकर्डा व त्याच्या आसपासच्या सोळा गांवांची वतनदारीची सनद पुण्याच्या पेशव्यांकडून लष्करी कामगिरीबद्दल यांच्या घराण्याला मिळाली होती. शिवाय अकोला जिल्ह्यांतील अकोटची देशमुखीहि यांच्या घराण्याकडे होती. यांचे आजोबा गंगारामपंत दोन हजार फौजेसह सेनापति तात्या टोपे यांच्या मदतीस निघाले. पण नर्मदेवरच लक्ष्मीबाई झांशीवाली पडल्याचें कळल्यावरून ते परतले. त्यामुळें इंग्रजांची यांच्या घराण्यावर अवकृपा झाली. पुढें यांचे वडील दर्यापूर तालुक्यांतील दारापुरास स्थायिक झाले व तेथेंच यांचा जन्म झाला.

हे अमरावतीस हायस्कूलमध्यें शिकत असतां यांनीं कलकत्ता जादा कॉंग्रेसच्या ठरावानुसार शाळा सोडली ( १९२० ). वऱ्हाड मध्यप्रांतांतील शाळा सोडणारे हे पहिले विद्यार्थी होत. असहकारितेचा कांहीं दिवस प्रचार केल्यावर म. गांधींचे प्रायव्हेट सेक्रेटरी यादवाड-

कर ( पटवर्धन ) यांच्या आजारीपणाच्या गैरहजेरींत हे साबरमती आश्रमांत गेले. तेथें चार वर्षें राहून स्नातक परीक्षेचा यांनीं अभ्यास केला. खादी व ग्रामसुधारणा यांत हे निष्णात बनले. गुजराथेंतील कांहीं गांवें पूर्ण स्वावलंबी, निष्कर्ज करण्याच्या यशस्वी प्रयोगांत यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला. मलबार प्रलयनिवारण कार्यार्थ म. गांधींच्या प्रेरणेनें हे मलबारांत गेले. तेथें नारळाच्या दोराचा व्यापार संघटित करण्यास यांनीं मदत केली.

उमरावती हनुमान व्यायाम-मंडळांत यांचा प्रवेश झाला व त्या संस्थेच्या मुद्रणालयाकरितां मुद्रणकलेचें शिक्षण घेण्यास हे पुण्यास आले. तेथें अनेक चळवळींत हे भाग घेत. पुढें वऱ्हाडांत जाऊन विदर्भ युवक-परिषद डॉ. हर्डीकरांच्या अध्यक्षतेखालीं अमरावतीस भरविली ( १९२८ ) व दुसऱ्या महायुद्धाकरितां हिंदी तरुणांनीं तयारी करण्याचा ठराव केला. पुढें फिजिकल कल्चर इन्फर्मेशन ब्यूरो काढून जगांतील व्यायाम संस्थांची माहिती आणवून यांनीं स्वतः युरोपमध्यें जाण्याचें निश्चित केलें. हनुमान व्यायाम-मंडळाची इमारत वादळानें कोसळली तिच्याकरितां दहाबारा हजार रुपये जमविले ( १९२८ ). कलकत्ता व पुणें येथें मंडळाच्या २००।२०० खेळाडूंचीं व्यायामाचीं निदर्शनें करविलीं.

मंडळानें यांना जर्मनीस रवाना केलें. बर्लिनला हे सुमारें साडेतीन वर्षें राहिले. स. १९३० च्या गोलमेज-परिषदेस हे प्रेक्षक म्हणून मुद्दाम लंडनला उपस्थित होते. बर्लिनचा व्यायामाचा डिप्लोमा यांनीं मिळविला. ' भारतवर्षांतील धर्मानुबद्ध व्यायामपद्धति ' या विषयावर निबंध लिहून डॉक्टरेट मिळविली. फिजिकल फिटनेसचा नवा फॉर्म्युला तयार करून बर्लिन ॲकॅडमीस दिला व त्यासाठीं ॲलेक्झांडर हंबोल्ट स्कॉलरशिप मिळविली. व युरोपांतील शा. शि. विषयावरील सर्वांत उच्च डिप्लोमा संपादन केला.

पुनः परत आल्यावर गव्हर्नरच्या पेट्रनेजखालीं ' स्पोर्ट ॲंड ॲथलेटिक असोसिएशन फॉर सी. पी. ॲंड बेरार ' अशी एक संस्था स्थापन करून लेख व प्रचार-द्वारा कार्य सुरू केलें.

मध्यप्रान्त कौन्सिलांतील उमेदसिंग ठाकूरांना लष्करी शिक्षणाचे बिलाबाबत यांनीं बरीच मदत केली ( १९३५-३६ ).

नागपूर विद्यापीठानें डायरेक्टर ऑफ फिजिकल एज्युकेशन नांवाचीं जागा उत्पन्न करून तीवर यांची नेमणूक केली. कॉंग्रेसनें अधिकारग्रहण केलें तेव्हां यांना व्यायामाचे चीफ ऑर्गनायझर नेमलें; पण कॉंग्रेसनें अधिकारन्यास केल्यावर हे नागपूर विद्यापीठाकडे आले. युद्धांतहि प्रत्यक्ष भाग घेण्याची त्यांची इच्छा होती. तसा प्रयत्नहि चालू होता. पण एकाएकीं मोटारचा धक्का लागून हा कर्तबगार व धडाडीचा पुरुष मृत्युमुखीं पडला.

**कोटणीस, डॉ. द्वारकानाथ एस्.**— ( जन्म स. १९१२, मृत्यु स. १९४२ चीन ) चीनच्या स्वातंत्र्य-युद्धास मदत करण्यास गेलेल्या कॉंग्रेस मेडिकल मिशनचे सदस्य.

हे मूळ सोलापूरचे. मुंबईच्या ग्रँड मेडिकल कॉलेजमधून एम्. बी. बी. एस्. होतांच यांनीं कॉंग्रेस मिशनच्या-बरोबर चीनला जाण्याचें ठरविलें. स्पेनच्या रणांगणावर जाऊन अनुभव घेऊन आलेले डॉ. अतल यांचे पुढारी होते. डॉ. जीवराज मेहेता व डॉ. विधनचंद्र रॉय यांनीं परीक्षा करून नागपूरचे डॉ. एम्. चोळकर, कलकत्त्याचे डी. मुकर्जी, विजयकुमार बसू व हे यांची निवड केली. मुंबईस सरोजिनी नायडू यांच्या अध्यक्षतेखालीं निरोप-समारंभ होऊन हे मुंबईहून रवाना झाले. चीनला पोंचतांच यांना यांच्या वडिलांच्या मृत्यूची बातमी कळली. यांचे वडील गिरणींत कारकून असून त्यांनीं यांना कर्ज काढून शिक्षणाला मदत केली होती. मुलगा कर्ज फेडण्यास मदत करण्याऐवजीं चीनला मदत करण्यास गेला असें पाहून वैतागानें यांच्या वडिलांनीं आत्महत्त्या केली होती. वडिलांच्या मृत्यूपेक्षां मृत्यूच्या या पार्श्वभूमीनें हे अगदीं वेडे होण्याच्या बेताला आले. पण यांनीं संयम करून आपलें अंगीकृत कार्य करण्याला सुरुवात केली.

येनानपासून १५ मैलांवर एक हॉस्पिटल चालविण्याची कामगिरी यांच्यावर प्रथमतः सोंपविण्यांत आली. तेथें दोनशें खाटा असल्यामुळें यांना व डॉ. बसू यांना भरपूर काम पडे. डॉ. अतल देखरेख करीत. डॉ. चोळकर व मुकर्जी ८० मैलांवर असलेल्या एका मेडिकल कॉलेज-मध्यें शिकवीत. तेथील भयंकर थंडीमुळें चोळकर एक वर्षाची आश्वासित मुदत संपतांच हिंदुस्थानला परतले. मुकर्जी स्वतःच्या किडनी ऑपरेशनकरितां हॉंककॉंगला गेले. दुसरें महायुद्ध सुरू झाल्यानें ते हिंदुस्थानाकडे वळले व रंगूनला पकडले गेले.

यानंतर हे चुंकिंगवरून ब्युसिंगला निघाले. लढाईच्या धांदलीनें कसे तरी तेथें पोंचून अनेक खेड्यांच्या एका केंद्रावर हे काम करूं लागले. रोज मध्यवर्ती ठिका-

णाची व्यवस्था पाहून किती तरी खेड्यांत यांना पायपीट करावी लागे. डॉ. अतल तर या त्रासाला कंटाळून हिंदुस्थानला रवाना झाले ( मार्च १९४० ). हे व बसू मात्र मिशनरी वृत्तीनें चिनी लोकांची सेवा करीत सारखें काम करीत राहिले.

यानंतर प्युपिंगला डॉ. बेथ्यून यांचे स्मरणार्थ स्थापन झालेल्या हॉस्पिटल व मेडिकल स्कूलचे यांना मुख्य नेमण्यांत आलें. शस्त्रक्रिया करण्याचें काम यांच्याकडे असे. रोज दोन याप्रमाणें यांनीं शस्त्रक्रिया केल्या. जपानी हल्ले दहशतीकरितां चालूच असत. त्यांत बसू व हे अलग झाले व धांवपळींत यांचे फार हाल होऊं लागले. याच वेळीं यांनीं 'कुओचिंग लान' नांवाच्या चिनी स्त्रीशीं लग्न केलें. ती यांच्या तेथें नर्सचें काम करीत असे ( १९४१ नवं. ).

याच वेळीं यांना अपस्माराचे झटके येऊं लागले. आपल्या स्त्रीपासून ही गोष्ट हे लपवीत. त्याकरितां झटक्याची कल्पना येतांच हे जवळच्या एका टेंकडीवर जाऊन बसत. शेवटीं निःसत्त्व अन्न व श्रमातिरेक यांमुळें यांना को-कुंग या उत्तर चीनमधील एका लहानशा खेड्यांत मृत्यूनें गांठलें आणि या देशभक्त तरुणाचा अकालीं अंत झाला. यांना चिनी भाषा उत्तम अवगत झाली असून तेथील लोकांचा यांनीं कमालीचा विश्वास संपादन केला होता.

अपुऱ्या वैद्यकीय साधनांनीं यांनीं नेलेल्या मिशननें केलेल्या कार्यापेक्षां त्यामागें असणाऱ्या भावनेला विशेष महत्त्व आहे. स्वतः पारतंत्र्यांत असतांना जगाच्या कोणत्याहि भागांत स्वातंत्र्यावर घाला येतांच धांवून जाणाऱ्या हिंदुस्थानच्या विशाल हृदयाचें प्रतीक या दृष्टीनें आपण यांच्या कार्याकडे पाहिलें पाहिजे.

**कोट्टूर, रावसाहेब जी. एल्.**— ( जन्म स. १८८७ सुमार, मृत्यु स. १९३९ ) कापसाचे सुप्रसिद्ध संशोधक. हे माध्ववैष्णव ब्राह्मण. पूना ॲग्रिकल्चरल कॉलेजमधून शिक्षण घेऊन बी.एजी. झाल्यावर स. १९०९ सालीं यांचा प्रवेश शेतकीखात्यांत झाला. दहा वर्षांच्या दीर्घ प्रयत्नानंतर यांना धारवाड येथें कर्नाटक प्रान्ताचे कापसाच्या बियांचे संशोधक नेमण्यांत आलें. सतत अठरा वर्षें या विषयाचें यांनीं अत्यंत कसोशीनें संशोधनकार्य केलें, आणि त्यावर एम्. एजी. ही पदवी यांना मिळाली. या कार्याबरोबरच यांनीं ज्वारी व भुईमूग या पिकांच्या बियांच्या सुधारणेबाबतहि महत्त्वाचें कार्य केलें. पिकांच्या सुधारणेबाबत आधुनिक जननशास्त्राचा उपयोग करण्याचा प्रारंभ करण्याचें श्रेय यांना आहे. पूर्वोक्त प्रकारें कापसाचें बीं सुधारण्याबाबतचें यांचें कार्य अत्यंत महत्त्वाचें आहे. यांनीं धारवाडच्या बाजूस पेरल्या जाणाऱ्या कुमठा नांवाच्या जातीमधून धारवाड नं. १ व धारवाड नं. २ हे सुधारलेले कापसाचे वाण निष्पन्न करून त्यांना शेतींत स्थान दिलें. त्याचप्रमाणें त्याच भागांत असलेल्या धारवाड अमेरिकन नांवाच्या कापसाच्या जातींमधून गदग नं. १ या नांवाचा एक कापसाचा वाणहि निष्पादन करून तो कर्नाटकच्या शेतींत कायम केला. यापुढें विशेषतः कापसाच्या झाडाला 'मुकारा' नांवाचा जो एक रोग कर्नाटकांत पुष्कळ प्रमाणांत होत असे त्याचा त्रास मिटविण्याकरितां यांनीं कापसाच्या दोन भिन्न वर्णाचा संकर करून त्यापासून 'जयवंत' नांवाच्या एका नव्या कापसाच्या जातीची निष्पत्ति केली. त्याहि पुढें जाऊन 'नवा जयवंत' या नांवानें आणखी एक सुधारलेला कापसाचा वाण यांनीं तयार केला असून या दोन नव्या वाणांना कापसाच्या सुकाण्याचा रोग अगदींच विरळा होतो. हे वाण कर्नाटकांत तूर्त समृद्धपणें पसरविण्याची योजना सरकारनें केली आहे, व त्या योगानें तेथील शेतकऱ्यांचा पुष्कळ फायदा झाला आहे. यांचें या संशोधनाबद्दल शास्त्रीय निबंधलेखन पुष्कळ आहे, व त्यांच्या कामगिरीला याप्रमाणें सैद्धांतिक व उपयुक्त अशा दोन्ही प्रकारचें जें स्वरूप आहे तें प्रत्येकीं अत्यंत उच्च दर्जाचें मानण्याच्या किंमतीचें आहे. दुर्दैवानें यांना अकाल मृत्यु आला नसता तर यांची कामगिरी उत्तरोत्तर जास्तजास्तच संस्मरणीय झाली असती.

**कोट्याळकर, बर्माप्पा रामाप्पा**—( जन्म स. १८९२-मृत्यु स. १९४२) प्रसिद्ध चित्रकार व मूर्तिकार. यांचें गांव औंध संस्थानांतील गुणदाळ तालुक्यांतील कोट्याळ. शिक्षण आजोळीं मनगुळी येथें कानडी तीनचार इयत्तांपर्यंत झालें. लहानपणापासूनच चित्रें काढण्याचा आणि मूर्ति करण्याचा यांना नाद होता. हे जातीनें लिंगायत कुंभार.

हे कुंभार असल्यानें यांना मातकामाचें बाळकडू होतें. त्यामुळें क्ले-मॉडेलिंगमध्यें यांचा हातखंडा असे. हां हां म्हणतां बोटानें व हातानें हे शाडूच्या अगर मातीच्या सुंदर मूर्ति तयार करीत. त्याप्रमाणें पेंटिंग्ज करण्यांतहि ते अत्यंत वाकबगार होते.

सोलापूरच्या श्री. जिर्गे वगैरेंच्या आश्रयानें चित्रें

करीत, पडदे रंगवीत व यात्रेंतील हालत्या चित्रांचीं प्रदर्शनें हे भरवीत.

श्रीमंत राजेसाहेब भवानराव पंतप्रतिनिधि, औंध, यांच्या आश्रयास हे आले. तेथें गणपति, रामपंचायतन, महिषासुरमर्दिनी वगैरे चित्रें यांनीं काढलीं ( १९१९ ). नंतर सोलापूरला पुनः गेले. तेथून पुनः आपण होऊन औंधास आले ( स. १९२९ ).

चित्रकार या नात्यानें यांची योग्यता मोठी आहे. यांचें चित्रांतील प्रमाण व भावनालेखन अप्रतिम असे. पेन्सिल स्केच अत्यंत जोमदार असे. यांचीं पेन्सिल स्केचेस पेन्टिंग्जपेक्षांहि जोमदार आहेत.

यांचें सर्व काम मॉडेलशिवाय स्मरणावर चाले. कोणत्याहि प्रसंगाची यांना थोडक्यांत तोंडी कल्पना दिली कीं, प्रतिभेनें हे यथातथ्य चित्रण करीत. एकेका चित्रांत पन्नासपन्नास व्यक्ती चित्रीत असत.

यांची पेंटिंग्जची पद्धति जुनी असली तरी पेंटिंग्जमध्यें यांनी नव्या तंत्राचा अवलंब केला होता. यांचें पॅचवर्कहि चांगलें असे.

चित्रकार धुरंधरांच्याप्रमाणें यांची मानवसृष्टि स्वतंत्र आहे. व्यक्तींच्या चेहऱ्यांत कानडी धर्तीचा सारखेपणा असतो. पण तज्ज्ञांचे मतें हा दोष नसून गुणच आहे.

यांचीं फुटकळ चित्रें बरींच आहेत. श्रीमंतांच्या आज्ञेवरून गीतेंतील विभूतियोगाचीं ४४ चित्रें, तसेंच गजगौरीव्रताचीं ९-१० चित्रें यांनीं काढलीं. दिल्लींतील हिंदुमहासभेच्या दिवाणखान्यांतील श्रीशिवाजीमहाराजांचें चित्र व श्रीमंतांचा पोर्ट्रेट हीं उत्कृष्ट साधलीं आहेत. औंध येथील म्युझियममध्यें यांचीं पुष्कळ उत्कृष्ट चित्रें पाहावयास मिळतात.

**कोयाजी, सर जहांगीर कुंवरजी**—( जन्म स. १८७५ ) सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ.

कॉलेज व व्यवहार या दोन्ही क्षेत्रांत सारख्याच सव्यसाचीपणानें यश मिळविणारे एक अर्थशास्त्री, हा यांचा विशेष आहे. मुंबई युनिव्हर्सिटीची बी. ए. पदवी मिळवून व त्या विद्यापीठाच्या कांहीं कॉलेजांतून प्राध्यापक म्हणून काम केल्यानंतर हे उच्च शिक्षणाकरितां केंब्रिजला रवाना झाले. त्या ठिकाणीं अर्थशास्त्र हा मुख्य विषय घेऊन हे केंब्रिजची उच्च परीक्षा पास झाले ( १९१० ). यानंतर बरींच वर्षे हे कलकत्त्याच्या प्रेसिडेन्सी कॉलेजमध्यें अर्थशास्त्राचे प्रोफेसर होते ( १९११-३० ). यानंतर लीग ऑफ नेशन्समध्यें हिंदी प्रतिनिधी म्हणून यांची नेमणूक झाली. या ठिकाणींच आर्थिक घसरगुंडीच्या अध्ययनाचा पुरस्कार करणारा ठराव यांनीं पास करून घेतला. प्रो. ओहलीन यांच्या "दि कोर्स अँड फेझेस ऑफ दि वर्ल्ड इकॉनमिक डिप्रेशन" या सुप्रसिद्ध रिपोर्टाचें जनकत्व आपणांस यांच्या या ठरावासच दिलें पाहिजे.

कलकत्त्याच्या प्रेसिडेन्सी कॉलेजमध्यें प्रोफेसर असतांनाच प्रथम 'इंडियन फिस्कल कमिशन' व नंतर 'रॉयल कमिशन ऑन् इंडियन करन्सी अँड एक्स्चेंज'चे यांना सभासद निवडण्यांत आलें.

पाटणा व मद्रास युनिव्हर्सिटींमधील बनाइली व सर विल्यम मेयर व्याख्यानमालांचे व्याख्याते म्हणून यांना बोलावण्यांत आलें होतें.

१९३१ त प्रेसिडेन्सी कॉलेजच्या प्रिन्सिपलच्या जागेवरून निवृत्त झाल्यानंतर कांहीं काळ हे आंध्र युनिव्हर्सिटी आर्ट्स कॉलेजमध्यें प्रिन्सिपल व अर्थशास्त्राचे प्रोफेसर म्हणून काम करीत होते ( १९३२-३५ ).

लाहोर येथें भरलेल्या इंडियन इकॉनमिक कॉन्फरन्सच्या सहाव्या अधिवेशनाचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें होतें. यांच्या अध्यक्षीय भाषणाचा विषय 'डिस्क्रिमिनेटिंग प्रोटेक्शन फॉर इंडिया' हा होता. हिंदी आर्थिक धोरण व चलन यांमधील सर्व हिंदी अर्थशास्त्रज्ञांतील ज्ञानवृद्ध व वयोवृद्ध असणारे हे गृहस्थ आहेत.

'The Indian Fiscal Problem', 'Indian Currency and Exchange', 'The Indian Currency System', 'India and the League of Nations', 'The Economic Depression', 'Studies in the Shahnameh' हे यांचे ग्रंथ त्या त्या विषयांत प्रमाणभूत मानले जातात.

**कोरेकल, कविसम्राट् यशवंतराव**—( जन्म स. १८८५ )

सुप्रसिद्ध मराठी व उर्दू कवि. यांचा जन्म हैद्राबाद येथें झाला. एक वर्षाच्या आंत आईबाप निवर्तल्यानें चुलत भावानें यांना वाढविलें. त्या काळच्या मानानें व संस्थानांतल्या वातावरणाप्रमाणें उर्दू, फारशी व इंग्रजी भाषांचें ज्ञान वेतानें संपादन केल्यावर हे वयाच्या तेरावे वर्षी कचेरीत उमेदवार म्हणून लागले. यांचा

विपुल असणारा वाङ्मयसंसार सरकारी नोकरी करीत असतांच वाढलेला आहे.

प्रथम हे उर्दू कविता करीत व त्यामुळें यांची प्रसिद्धिहि चांगली झाली. पण पुढें यांनीं मराठींत कविता करण्याचा प्रघात सुरू केला. वृत्तांचा यांचा अभ्यास फारच सूक्ष्म आहे. याशिवाय गायन, वादन, कातरकाम वगैरे अनेक कलांचा यांचा सूक्ष्म अभ्यास आहे.

यांना सकलकलाकोविद, काव्यकौस्तुभ, वृत्तसम्राट् वगैरे पदव्या आहेत. यांची कविता विपुल असून तिच्यावर प्राचीन कवितांची बरीच छाप आहे.

यांचें वाङ्मयः—मराठी–१ काव्यकुसुमकलिका ( ४ भाग ), २ विरोधवैचित्र्य नाटक वगैरे. हिंदी–१ कौस्तुभ-किरण ( लघुकथा-निबंध ), २ हिंदी गद्य, ३ हिंदी कविता. उर्दू–१ कलामे नुसरत ( दीवान-कवितासंग्रह ), २ मकसदेहयात ऊर्फ इस्तियाके-ताअलीम ( संगीत नाटक अंक ३ ), ३ करिश्मेइष्क ( नाटक ).

**कोलब्रुक, हेन्री टॉमस**—( जन्म स. १७६५–मृत्यु स. १८३६ ) हिंदी इतिहास-संशोधनशास्त्राचे जनक व हिंदुस्थानचे इंग्रज मित्र.

हिंदुस्थानांतील यांच्या राजकीय हालचालींचें महत्त्व-मापन 'मध्ययुगीन चरित्रकोशांत' (पान २७७) करण्यांत आलें आहे.

यांच्या वडिलांचें नांव सर जॉर्ज कोलब्रुक. पुढें संस्कृत वाङ्मयाचे कट्टर अभिमानी बनलेले हे गृहस्थ, सुरुवातीला हिंदुस्थान, त्याची संस्कृति व भाषा यांसंबंधीं अत्यंत प्रतिकूल असत. चार्लस् विल्कीन्सला 'संस्कृत-वेडा' हें यांनीं केलेलें पदवीदान, एशियॅटिक मिसलेनीला 'मूर्खपणाचा बाजार' हें यांनीं दिलेलें नामाभिधान किंवा अकबराच्या राजवाड्याला 'एखादें बारीकसारीक रत्न जेथें सांपडेल असा उकीरडा' हें यांनीं दिलेलें शेलापागोटें ऐकून कोणालाहि हंसूंच येईल.

परंतु संस्कृत वाङ्मयाशीं जोंपर्यंत यांचा साक्षात् संबंध आला नव्हता तोंपर्यंत यांचे हे विचार तग धरून होते. हिंदु लोक व संस्कृत भाषा यांसंबंधी यांना खरेंखुरें आकर्षण वाटूं लागलें, पर्मनन्ट सेटलमेंट प्रश्नावर यांचेकडे बरींच शिष्टमंडळें आलीं त्या वेळीं. यानंतर यांनीं बरेंच हिंडून त्या वेळीं आपणास विशेष जाणवलेल्या गोष्टी Agriculture of Bengal या पुस्तकांत नमूद करून ठेवल्या. इंग्लिश चढाओढ व कच्च्या कापसाची निर्यात यांमुळें बंगालमधील गरीब हातमागवाल्यांचें कसें नुकसान होत आहे याचें विदारक वर्णन या पुस्तकांत करण्यांत आलें आहे. कच्च्या कापसापेक्षां सुताचे स्वरूपांत कापूस पाठविण्याची यांनीं केलेली सूचनाहि अशीच महत्त्वाची आहे.

यांच्या संस्कृत ज्ञानाचा पहिला उपयोग यांनीं 'Digest of Hindu Law' या ग्रंथाचें संस्कृतमधून भाषांतर करते वेळीं केला. पुढें कलकत्त्यास चीफ जज्ज झाल्यानंतर यांनीं फोर्ट विल्यम कॉलेजमधील विद्यार्थ्यां-करितां 'संस्कृत ग्रामर', 'संस्कृत डिक्शनरी', 'हितोपदेश' व 'अमरकोश' (१८०८) प्रसिद्ध केले. त्याचप्रमाणें दायविभागावरील दोन सुप्रसिद्ध टीकांचें यांनीं भाषांतर प्रसिद्ध केलें. परंतु केवळ भाषांतरानें काम भागत नाहीं असें लक्षांत येतांच, जीमूतवाहन व मिताक्षरा या दोहोंचा आधार घेऊन यांनीं आपला स्वतंत्र ग्रंथ प्रसिद्ध केला. मृत्यूपूर्वी आपला दहा हजार पौंड किंमतीचा ग्रंथसंग्रह यांनीं ईस्ट इंडिया कंपनीला देऊन टाकला.

पहिल्या दर्जाचे प्राच्यविद्यापंडित अशी यांची कीर्ति आहे. 'संस्कृतचे उत्कृष्ट पंडित ही यांची कीर्ति यांच्या Miscellaneous Essays ( २ भाग ) या ग्रंथामुळें झाली. आपल्या आजच्या ऐतिहासिक ज्ञानाच्या किंवा याच्या परंपरेंतील पुढील दुव्यांनीं इतिहासांत घातलेल्या प्रचंड भरीच्या निकषावर जर आपण यांचें कर्तृत्व ताडून पाहूं लागलों तर ती थोडीशी दिशाभूल होईल. प्रत्यक्ष पाश्चात्य पंडितांत ज्या वेळीं वाङ्मयीन परीक्षण हा भाग अज्ञात होता त्या वेळीं हिंदी धार्मिक विचार-प्रवाह व तत्त्वज्ञान यांचें अत्यंत प्रमाणभूत व अचूक परीक्षण करण्याचें कार्य यांनीं केलें आहे. यांच्या Miscellaneous Essays या ग्रंथाचें पाहिल्यास कोणत्याहि एकाच विषयाला हे चिकटून राहिले आहेत असें नाहीं. ज्योतिष, कायदा, गणित यांचें हे जितक्या भेदकपणें विवरण करतात तीच तर्कशुद्धता भाषाशास्त्राची चर्चा करतांना प्रकट होते.

या गोष्टीची जाणीव फ्रेंच लेखकांना सुद्धां झालेली आहे. संस्कृत भाषा व तदनुषंगिक इतर शास्त्रें यांवर इतके सुंदर ग्रंथ जर यांनीं लिहिले नसते तर हा फारच मोठा कालखंड पाश्चात्य जगाला अज्ञात राहिला असता, ही गोष्ट आतां सर्वत्र मान्यता पावली आहे.

सांख्य, न्याय, वैशेषिक, मीमांसा व वेदान्तशास्त्रांचा केवळ युरोपियन जनतेला परिचय करून देण्यांतच यांचें समाधान झालें नाहीं. हिंदुस्थानांतील अनेक पंथोपपंथांचें उत्कृष्ट विवरण यांनींच प्रथम मोठ्या प्रमाणावर केलें. अशा प्रकारचें कार्य अलीकडे डॉ. भांडारकरांनीं केलें. हे व कर्नल मॅकेन्झी यांचेमुळेंच जैन धर्माची उत्पत्ति व तत्त्वें यांचें संशोधन झालें. हिंदुस्थानांतील अतिशय जुना धर्मपंथ ही पदवी हे दोन संशोधक व बुल्हेर, जॅकोबी व होर्नेल या यांच्या परंपरेंतील मंडळी यांचेमुळेंच जैनधर्माला प्राप्त झाली.

याच कारणामुळें यांनीं जे जे निबंध लिहिले, ते सर्व त्या त्या शास्त्रांत प्रमाणभूत मानण्या इतपत महत्त्वाचे मानले जातात. वेदावर यांनीं लिहिलेला निबंध (१८०५) हा हिंदूंच्या पवित्र ग्रंथांचा पाश्चात्य जगाला परिचय करून देण्याचा पहिलाच प्रयत्न आहे. परंतु वेदाच्या अभ्यासकाला अनुवादकापेक्षां अधिक किंमत मिळणें शक्य नाहीं, या यांच्या सदोष विधानामुळें यांचें हें संशोधन जरा डागळलें गेलें.

याचप्रमाणें हिंदु बीजगणित, अंकगणित, भूमिति व ज्योतिष यांचा सखोल अध्ययन करणारे हे पहिले युरोपियन गृहस्थ असून संस्कृतशीं घनिष्ठ संबंध ठेवून इतक्या आत्मविश्वासानें या शास्त्राकडे पाहणारे हे शेवटचेच गृहस्थ आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं, आणि म्हणूनच हिंदूंच्या बीजगणितावरील यांनीं केलेल्या विवरणास ( १८१७ ) एक विशिष्ट महत्त्व आहे. ज्या वेळीं पाश्चात्य लोक अरब व ग्रीक लोकांचेपासून गणिताच्या बाराखड्या शिकत होते त्या वेळीं हिंदी लोक आपल्या गणिती ज्ञानाचे उच्च शिखरावर होते, हीच गोष्ट यामध्यें सिद्ध करण्यांत आली आहे. या सर्व विधानांसाठीं यांनीं भास्कराचार्यांच्या लीलावतीचा व बीजगणिताचा आधार घेतला आहे. भास्कराचार्यांच्या या दोन पुस्तकांचा व ब्रह्मगुप्ताच्या स्फुटसिद्धान्ताच्या १२ व्या व १८ व्या प्रकरणाचा अनुवाद यांनीं केलेला आहे.

याचेच बरोबर एशियॅटिक रीसर्चेमध्यें सती जाण्याच्या मधील खऱ्या भावना प्रकट करणारा खऱ्या हिंदु विधवेच्या कर्तव्यावरील एक निबंध यांनीं प्रसिद्ध केला होता ( १७९५ ). सतीचा प्रकार त्या वेळीं कायद्यानें बंद केला जात असतांना यांनीं सतीचें गुणग्रहण करण्यांत दाखविलेलें धैर्य विशेष आहे.

याच वेळीं यांनीं हिंदु-विशेषतः ब्राह्मणवर्गाच्या धार्मिक आचारांवर व समारंभांवर तीन निबंध लिहिले (१७९५-१८०१). तसेंच चार्वाक, लोकायतिक, माहेश्वर, पाशुपत, पांचरात्र व भागवत या संप्रदायांसंबंधीं यांनीं प्रसृत केलेली माहितीहि अशीच महत्त्वाची आहे. 'Observations on the Sect of Jains' या निबंधांत यांनीं ग्रीक इतिहासाचा आधार घेऊन बुद्धधर्मापेक्षां जैनधर्म अधिक प्राचीन आहे, असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे.

दक्षिण बिहार, दिल्ली यांसारख्या ठिकाणच्या लेण्यांचें वर्णन व मूल्यमापन करण्याकरितां यांनीं पांच निबंध लिहिले आहेत. Indian and Arabian Division of Zodiac and Hindu Astronomy हा यांचा ज्योतिषशास्त्रावरील निबंधहि महत्त्वाचा आहे. बंगाल रॉयल एशियॅटिक सोसायटीचे अध्यक्ष व रॉयल एशियॅटिक सोसायटीचे डायरेक्टर या नात्यानें यांनीं बजावलेली कामगिरीहि महत्त्वाची आहे,

**कोल्हटकर, अच्युत बळवंत**— ( जन्म स. १८७९–मृत्यु स. १९३१ ) मराठींतील विशेष पद्धतीच्या लेखनशैलीचे जनक, लोकप्रिय वर्तमानपत्रकार व चतुरस्र वाङ्मयसेवक.

यांचे चुलते बळवंतराव व पिते वामनराव. बळवंतरावांनीं यांचें पालनपोषण केलें. म्हणून हे आपणास अच्युत बळवंत म्हणवीत. पुण्याच्या डेक्कन कॉलेजमध्यें असतांनाच यांनीं नाटकें व खेळ यांवर एक मोठा प्रबंध लिहिला होता. हे बी. ए., एलएल्. बी. झाले व यांनीं नागपूर येथें वकिलीला सुरवात केली. प्रथम हे 'शुभसूचक' साप्ताहिकांत लिहीत ( १९०६ ); पण पुढें नागपूरला गेल्यावर यांनीं आपल्या चुलतभावास बोलावून घेऊन एक छापखाना व 'देशसेवक' पत्र सुरू केलें ( १९०७ ). नागपूरला बोलावलेल्या कॉंग्रेसचा अध्यक्ष कोण असावा असा त्या वेळीं प्रश्न होता. हे लो. टिळकांच्या जहाल पक्षाचे होते. यांच्या लिहिण्याचा परिणाम म्हणून यांना राजद्रोहाच्या आरोपावरून अडीच वर्षांची शिक्षा झाली. तुरुंगांत यांचे अत्यंत हाल झाले व पत्र बंद पडलें. देशांतील वातावरण सरकारी दडपशाहीनें इतकें बदललें कीं, बाहेर आल्यावर यांना काय करावें हें सुचेना. यांनीं मद्रासला एका पेढीवर नोकरी पत्करली. पण लवकरच मुंबईचा आश्रय करून चार भाषांत वेदांचें भाषांतर करण्याची घोषणा करून 'श्रुतिबोध' नांवाचें मासिक

सुरू केलें. आणि त्यांत ऋग्वेदाचें भाषान्तर आरंभिलें. त्या कामीं श्री. दत्तो अप्पाजी तुळजापूरकर व रामचंद्र विनायक पटवर्धन हे यांचे सहकारी होते. तथापि ऋग्वेदाचें भाषान्तर पुरें होण्यापूर्वीच हा प्रचंड उद्योग सोडून हे आपल्या वृत्तपत्रव्यवसायाच्या दैनंदिन धबडग्यांत तन्मय झाले. त्या क्षेत्रांत मात्र एक यशस्वी संपादक म्हणून यांचें नांव चिरंतन टिकण्यासारखें आहे. यांचें लेखन कल्पकता व भावना यांनीं ओथंबलेलें असल्यामुळें बहुजनसमाजाचे हे लवकरच अत्यंत आवडते बनले.

वृत्तापेक्षां मताकडे यांचा ओढा असे. त्यामुळें उपरोध, उपहास व विरोध यांचा एकदां यांच्या लालित्यपूर्ण लेखणींतून वर्षाव सुरू झाला की प्रतिपक्षाची समता टिकणें अशक्य, त्याप्रमाणेंच स्वकीयांना आनंदाच्या उकळ्या आल्याशिवाय कधींहि राहावयाच्या नाहींत. बहुजनसमाजाला तर आपल्या आकर्षक पण सुलभ लिहिण्यानें यांनीं वर्तमानपत्रें वाचावयास शिकविलें असें म्हणण्यांत बिलकुल अतिशयोक्ति नाहीं. मराठींतील सध्यांच्या ललित पण सुलभ, विविध प्रकारच्या लेखनशैलीचे हे आद्य प्रवर्तक होत. मात्र कवीप्रमाणें अशा प्रकारचे आकर्षक लिहिणारे निरंकुश असतात. व त्या दृष्टीनें अशा लेखकांचे लेख तर्ककर्कश बुद्धीनें तपासावयाचे नसतात. १९१५-३१ पर्यंत यांनीं किती तरी वर्तमानपत्रें काढलीं आणि किती तरी बंद पडलीं. एका वेळीं यांचीं दोन दोन तीन तीन सुद्धां पत्रें चालू असत. शिवाय नाटकें-कादंबऱ्या लिहिणें, नाटक मंडळ्या काढणें, नाटक मंडळ्यांत स्वतः काम करणें चालूच असे. मात्र यांच्या या अफाट व अचाट कर्तृत्वाला अर्थशास्त्राचा आधार नसल्यानें यांचें आयुष्य द्रव्यदृष्टीनें अपेशी ठरल्यास त्यांत आश्चर्य कसलें? शेवटीं तर यांनीं आपल्या कुशल लेखणीचा स्वकीयांवरहि वार केल्यानें हे अगदींच असहाय झाले. यांनीं काढलेलीं दैनिकें: १ संदेश (१९१५-२१), २ मेसेज, इंग्रजी (१९१७), ३ संजय (१९१८), ४ इंदुप्रकाश (लेखक १९२१), ५ वंदे मातरम् (लेखक १९२२), ६ संदेश (१९२३), ७ स्वातंत्र्य (लेखक १९२४), ८ संदेश (१९२८-३०), ९ राष्ट्रमत (१९२९) १० दैनिक वृत्त (लेखक १९३०), ११ डेली न्यूज (लेखक १९३०), १२ प्रभात (लेखक १९२९-३१). साप्ताहिकें: १ शुभसूचक (लेखक १९०६), २ देशसेवक (१९०७-८), ३ सुदर्शन (लेखक १९२१-२२), ४ टिळक (लेखक १९२२), ५ युगान्तर (१९२४), ६ चाबूक (लेखक १९२४), ७ रणसंग्राम (लेखक १९२४) ८ विदूषक (१९२६), ९ चाबुकस्वार (१९२५-२७), १० संदेश (१९२७). मासिकें: १ श्रुतिबोध (जुलै १९१२-१५सप्टें.), २ उषा (१९१३), ३ महाराष्ट्र मंगलमाला (१९३०). नाटकें: १ विवेकानंद, २ नारिंगीनिशाण, ३ ताई तेलीण (अप्रसिद्ध), ४ बड्याबोळ (अप्र.), ५ देवी अहिल्या (अप्र.), ६ तिनें काय सांगितलें (अप्र.), ७ सौख्यसोपान, ८ मस्तानी, ९ नूतनचंद्र (अप्र.), १० इश्श मेलं पुणें (अपूर्ण व अप्र.). कादंबऱ्याः १ इंग्रजांचा पराभव, २ लोकमान्यांच्या समाधीपुढें, ३ साधु कीं सैतान (अपूर्ण), ४ चोरून चुंबन (अपूर्ण), ५ नर्सची करुण कहाणी (अपूर्ण). गोष्टीः १ पहिली रात्र, २ दुसरी रात्र, ३ विसकटलेली वेणी, ४ रंगीला रसूल (सरकार जप्त), ५ कोल्हापूरच्या अक्कासाहेब, ६ गुलाबी विधवा, ७ भोळा सांब. ग्रंथः १ चोरी कशी करावी? २ संक्रान्तीचा तिळगुळ म्ह. सर्वधर्म परिषद, ३ सौ. वत्सलाबाईंचीं पत्रें, ४ भगतसिंगाचें चरित्र (सरकार जमा), ५ बाबू गेनू चरित्र, ६ नाना फरारीचा पवाडा (सरकार जमा). प्रस्तावनाः १ सम्राट् अशोक, २ भस्मासुर, ३ दर्यादौलत, ४ जेधेजवळकर. लेख–१ चित्रमय जगत्, २ मनोरंजन, ३ मौज, ४ करमणूक, ५ प्रभात, ६ मनोरमा. कविताः १ मत्कुण, २ कंवारी, ३ गणेशपुराण ओव्या.

**कोल्हटकर, श्रीपाद कृष्ण**—(जन्म स. १८७१–मृत्यु स. १९३४) मराठींतील सुप्रसिद्ध विनोदी लेखक, नाटककार, टीकाकार व चतुरस्र लेखक.

यांचा जन्म नागपुरांत आणि बालपण बुलढाणा व अकोला येथें गेलें. लहानपणीं हे बावळट व अर्धवट म्हणून समजले जात. त्यामुळें हे एकान्तप्रिय बनले. मराठी पांचव्या इयत्तेंत असतांनाच यांनीं एक तीन अंकी संगीत नाटक लिहिलें, व इंग्रजी पांचव्या इयत्तेंत असतां 'सुखमालिका' नांवाचें नाटक लिहिलें. पण तें पुढें गहाळ झालें. त्या नाटकांतील कांहीं कल्पनांचा पुढें गुप्तमंजूष व प्रेमशोधन या नाटकांत यांनीं उपयोग करून घेतला.

यांना व्हर्नाक्युलर एक्झॅमिनेशनमध्यें पहिला नंबर येऊन द. म. १० रु. ची शिष्यवृत्ति मिळाली. तेव्हां आत्मविश्वास वाढून यांनीं इंग्रजी कादंबऱ्या व मराठींतील अरेबियन नाइटस् व निबंधमाला वाचण्याचा सपाटा लावला. स्कॉटच्या कादंबऱ्यांनीं बाणेदारपणा व स्त्रीदाक्षिण्य अंगीं येतें असें यांचें म्हणणें होतें.

अरेबियन नाइटस् व निबंधमाला यांची कल्पना व

पाचारण केलें ( १९१० ). हार्वर्डमध्यें संस्कृत, पाली इत्यादि पौर्वात्य भाषांचे आचार्य असणाऱ्या प्रो. ल्यानमन यांचे सहकार्यानें यांनीं तें काम पुरें केलें ( १९११ ); आणि हे स्वदेशीं आले ( १९१२ ).

हिंदुस्थानांत आल्याबरोबर यांनीं पांच वर्षांच्या करारानें पुणें फर्ग्युसन कॉलेजांत पालीच्या प्रोफेसरची जागा स्वीकारली. या वेळीं डॉ. पु. वि. बापट, चिं. वि. जोशी, ना. के. भागवत, कै. चिंतामण वैजनाथ राजवाडे ह्या सर्व मंडळींनीं यांच्याच हाताखालीं पाली भाषेचा अभ्यास केला.

प्रो. वुड्स यांच्या आग्रहावरून १९१८ सालीं हे दुसऱ्यांदा अमेरिकेला गेले आणि तेथून १९२२ सालीं परत आले.

यानंतर तीन वर्षे हे गुजराथ विद्यापीठाच्या पुरातत्त्वमंदिराचे पाली-भाषाचार्य होते. यांनीं लिहिलेल्या बऱ्याच पुस्तकांचें लेखन याच काळांत झालेलें आहे. त्यामध्यें समाधि-मार्ग ( १९२५ ) व बौद्ध संघाचा परिचय ( १९२६ ) हे दोन ग्रंथ प्रमुख होत.

याच वेळीं प्रो. ल्यानमन सेवानिवृत्त झाल्यामुळें विसुद्धीमग्गाचें अपुरें राहिलेलें संस्करण पुरें करण्यासाठीं डॉ. वुड्स यांनीं यांस पुनः आमंत्रण केलें ( १९२६ ). तें संस्करण छापून तयार झाल्यावर हे परतले ( १९२७ ). याच ग्रंथाचें नागरी भाषेंतील संस्करण अंधेरीच्या भारतीय विद्याभवन या संस्थेनें प्रसिद्ध केलेलें आहे.

हिंदुस्थानांत आल्यावर हे गुजराथ विद्यापीठांत आपल्या खर्चानेंच राहत असत. त्या वेळीं लेनिनग्राड येथें बौद्ध धर्माचे अध्ययनासाठीं स्थापन झालेल्या संस्थेंत काम करण्याकरितां यांना पाचारण करण्यांत आलें ( १९२९ ). पण प्रकृति ठीक न राहिल्यानें हे परत हिंदुस्थानांत आले ( १९३० ) आणि त्याच वेळीं सुरू झालेल्या सत्याग्रहांत सामील झाले.

डॉ. वुड्स यांचे आग्रहावरून यांनीं यानंतर आणखी एकदां अमेरिकेचा प्रवास केला ( १९३१-३२ ). यानंतर कांहीं काळ बनारस विद्यापीठाचे पाहुणे म्हणून यांना बोलावणें करण्यांत आलें होतें. त्या तेथील यांच्या निवासाचें ' हिंदी संस्कृति व अहिंसा ' हा यांचा ग्रंथ स्मारक आहे. आपले प्राचीन भारतासंबंधींचे व सामाजिक तत्त्वज्ञानासंबंधींचे विचार प्रकट करणें हा यांचा या ग्रंथलेखनांतील प्रमुख हेतु होता.

श्रमजीवि वर्गांत बुद्धाच्या अहिंसा-तत्त्वज्ञानाच्या प्रसारानें स्पृश्यास्पृश्य भेद नाहींसे करून समता स्थापन करतां येणें शक्य आहे, अशी कल्पना यांचे मनांत कित्येक दिवस घोळत होती. या विचारास मूर्त स्वरूप मिळण्याचा योग परळ येथील ' बहुजन-विहाराच्या ' स्थापनेबरोबर सिद्धीस गेला ( १९३७ ).

१९१० सालीं सयाजीराव गायकवाडांचे सांगण्यावरून दिलेल्या व्याख्यानांचा संग्रह— बुद्ध, धर्म आणि संघ— हें यांचें पहिलें पुस्तक मानण्यास हरकत नाहीं. बुद्धलीलासारसंग्रह हें त्रिखंडात्मक पुस्तक यांनीं यानंतर प्रसिद्ध केलें. गौतम हा बुद्ध होण्याच्या पूर्वीच्या जन्मांतील कथा पहिल्या भागांत, खुद्द बौद्ध जन्मांतील कथा दुसऱ्या भागांत व बुद्धाचा उपदेश व त्याचें परिनिर्वाण कथन करणाऱ्या कथा तिसऱ्या भागांत अशी या पुस्तकाची रचना आहे. ' भगवान् बुद्ध ' हें गौतम बुद्धाचें यांनीं लिहिलेलें टीकात्मक चरित्रहि असेंच प्रसिद्ध आहे.

आपल्या पूर्वायुष्याचा वृत्तांत ' निवेदन ' ( १९२४ ) या नांवानें यांनीं प्रसिद्ध केला असून ' खुलासा ' या नांवाचा यांच्या उत्तर आयुष्याचा वृत्तांत मुंबईच्या ' प्रकाश ' पत्रांत १९३७-३८ त क्रमशः प्रसिद्ध झालेला आहे.

यांचें लेखन व वक्तृत्व हें अत्यंत परिणामकारक असून त्यामध्यें एक विशेष प्रकारचा जिव्हाळा आढळतो. मग तें एखाद्या जुन्या ग्रंथाचें रूपान्तर असो किंवा यांचें आत्मचरित्र असो. अगदीं सामान्य स्थितींतून जागतिक प्रसिद्धि मिळविणारे हे गृहस्थ आहेत.

**कौजलगी, हणमंतराव श्रीपतराव**—( जन्म स. १८९०–मृत्यु स. १९४५ ) कर्नाटकांतील सुप्रसिद्ध सार्वजनिक कार्यकर्ते, कॉंग्रेसचे पुढारी व कानडी लघुकथालेखक.

स. १९१४ सालीं हे एलएल. बी. झाले आणि हे विजापूर येथें वकिली करूं लागले. यांची वकिली उत्तम प्रकारें चालत असतांच असहकारितेच्या चळवळींत यांनीं वकिली सोडली ( १९२० ) व यांनीं आपलें आयुष्य सार्वजनिक कार्याला सर्वस्वीं अर्पण केलें. यांची कामगिरी विशेषतः खेडेगांवांतील शेतकरीवर्गांत झाली आहे. त्यांचीं दुःखें यांनीं अनेक वेळां वेशीवर टांगून दाद लावून दिली. खेड्यांतील ग्रामीण जीवनांत बदल

(स. १८८२). प्रथम हे नट म्हणून मंडळींत शिरले, व थोड्याच दिवसांत हे मंडळीचे आधारस्तंभ व भागीदारहि बनले.

हे स्त्रियांची भूमिका यथातथ्य करणारे आणि उत्कृष्ट गायक म्हणून प्रसिद्ध होते. संगीत नाटकांचें नावीन्य, किर्लोस्कर मंडळीची भारदस्त व थाटाची सजावट आणि उत्कृष्ट गायकांची निवड यांमुळें यांची नाटकें अत्यंत लोकप्रिय झालीं. अभिनयाच्या दृष्टीनें संगीत नाटकें पाहण्याची दृष्टि त्या वेळीं नव्हती.

हे अंगानें गोंडस, गोरे, सरळ व तरतरीत नाकाचे, किंचित् लहान डोळयांचे असत. यांचा आवाज अत्यंत गोड व पल्लेदार असे. संगीत नाटकांचा जमाना सुरू झाल्यापासून यांच्यासारखा चढा, पल्लेदार व सुरेल आवाज दुसऱ्या कोणाचाहि नसे. तथापि यांचें गाणें शास्त्रशुद्ध नसे. यमन, भूप, भैरवी वगैरे परिचित राग सोडून इतर राग हे भेसळ करून गात.

यांची पहाडी आवाजाची जात पूर्वी तमाशांतून अति चढ्या स्वरानें लावण्या म्हणणाऱ्या गायकांची असे. यांच्या मानानें बालगंधर्वांचा आवाज मऊ आणि लवचीक आहे. यांच्या गाण्यांत गायकीपेक्षां लावणी-तुंबरीचा ढंग असे आणि हेंच यांच्या लोकप्रियतेचें बीज होतें.

यांचे स्त्रीवेषांतील काम केवळ सौंदर्याच्या दृष्टीनें ठीक असे आणि अशी गोष्ट सांगतात कीं, हे एके वेळीं पैज मारून स्त्रीवेषानें बायकांतून हळदीकुंकू घेऊन बिनबोभाट परत आले. तथापि यांच्या स्त्रीवेषांत नटवेपणा तितकासा नव्हता. बालगंधर्वांचें सोंग किंवा चित्रहि पाहून हा चेहरा स्त्रीचा किंवा पुरुषाचा असा भ्रम पडतो, तशी यांची स्थिति नव्हती.

यांचें बोलणेंहि ठसठशीत व उठावदार असे. बालगंधर्वांच्या बोलण्यांतील कोमलता, लवचीकपणा, किंवा लाडिकपणा यांच्यांत नसे; थोडा कठोरपणाच भासे.

हे खेळाचा दिवस एकादशीप्रमाणें व्रतस्थपणानें पाळीत. खेळ चालू असतां पाणी पिण्याची यांना संवय असे. नाजूक प्रकृति असल्यानें मेहनतीनें यांचे डोळयांवर लाली चढत असे.

यांनीं मृत्युपत्रानें सार्वजनिक कार्याकरितां तीन हजार रुपये देऊन नटाला सार्वजनिक जीवनाची जाणीव असते हे दर्शविलें आहे.

**कोसंबी, श्री. धर्मानंद**— (जन्म स. १८७६) पालीभाषा व बौद्धधर्म यांचे जगप्रसिद्ध अभ्यासक व तज्ज्ञ.

तरुणपणींच कांहीं सांसारिक आपत्तीमुळें यांचें मन बुद्धाकडे वळलें आणि त्याच्या धर्माचें ज्ञान मिळविण्यासाठीं हे घराबाहेर पडले (१८९९). तें ज्ञान प्राप्त करून घेण्याच्या हेतूनें प्रथम संस्कृत भाषेचें अध्ययन करण्याचें यांनीं ठरविलें. याकरितां पुणें, ग्वाल्हेर व काशी अशी त्रिस्थळी यात्रा करून यांनीं भट्टोजी दीक्षिताची कौमुदी व साहित्य यांचें चांगलें अध्ययन केलें. आणि त्यानंतर नेपाळांत बौद्ध धर्माचें ज्ञान मिळेल अशा समजुतीनें यांनीं नेपाळचा प्रवास केला. तेथें यांची निराशा झाली आणि मोठ्या प्रयासानें हे बुद्धगयेला आले. तेथें बुद्धधर्माचें सम्यग्ज्ञान होण्यास सिंहलद्वीपालाच गेलें पाहिजे असें कळल्यावरून हे अनेक हालअपेष्टा सोशीत सिलोनला गेले. या वेळीं कोलंबो शहराजवळच असणाऱ्या विद्योदय विद्यालयांत भिक्षुधर्मानें राहून यांनीं महास्थविर सुमंगलाचार्य यांच्या हाताखालीं अध्ययन केलें. परंतु थोड्याच दिवसांत प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें हे हिंदुस्थानला परतले. यानंतर सारनाथ, कुसिनारा, लुम्बीनीवन, कपिलवस्तु वगैरे अनेक बौद्धक्षेत्रांची यात्रा केल्यानंतर यांनीं बौद्ध ग्रंथाचा अभ्यास करण्याकरितां काढलेली ब्रह्मदेशची सफर पुरी केली (१९०६).

याचे पुढें मात्र हें भटकें जीवन सोडून, इतके दिवस कष्टानें मिळवलेल्या बौद्ध वाङ्मयाचा प्रचार करण्यांतच यांनीं आपलें जीवन व्यतीत केलें. वंगभंगाचे चळवळींत उत्पन्न झालेल्या कलकत्त्याच्या नॅशनल कॉलेजमध्यें व कलकत्ता युनिव्हर्सिटीमध्यें पालीच्या प्राध्यापकाचें काम करण्याची संधि यांना मिळाली.

परंतु पालीचा प्रसार महाराष्ट्रांतच करावयाचा यांची इच्छा होती. या दृष्टीनें यांनीं बडोद्याच्या सयाजीराव गायकवाडांची गांठ घेतली. दर वर्षी निदान एक पुस्तक लिहिण्याचे अटीवर दरमहा पन्नास रुपये देण्याचें महाराजांनीं यांना अभिवचन दिलें. आणि हे पुण्यास येऊन राहिले. ह्या वेळीं डॉ. भांडारकरांच्या मदतीनें यांनीं पाली भाषेला मुंबई युनिव्हर्सिटींत प्रवेश मिळविला.

अमेरिकेंतील हार्वर्ड युनिव्हर्सिटींत प्रोफेसर जेम्स एच. वुड्स यांना पाली शिकविण्याचे निमित्तानें यांची त्यांच्याशीं ओळख झाली, व 'विसुद्धिमग्ग' या बौद्ध ग्रंथाचें संशोधन करण्याकरितां यांना त्यांनीं अमेरिकेला

पाचारण केलें ( १९१० ). हार्वर्डमध्यें संस्कृत, पाली इत्यादि पौर्वात्य भाषांचे आचार्य असणाऱ्या प्रो. ल्यानमन यांचे सहकार्यानें यांनीं तें काम पुरें केलें ( १९११ ); आणि हे स्वदेशीं आले ( १९१२ ).

हिंदुस्थानांत आल्याबरोबर यांनीं पांच वर्षांच्या करारानें पुणें फर्ग्युसन कॉलेजांत पालीच्या प्रोफेसरची जागा स्वीकारली. या वेळीं डॉ. पु. वि. बापट, चिं. वि. जोशी, ना. के. भागवत, कै. चिंतामण वैजनाथ राजवाडे ह्या सर्व मंडळींनीं यांच्याच हाताखालीं पाली भाषेचा अभ्यास केला.

प्रो. वुड्स यांच्या आग्रहावरून १९१८ सालीं हे दुसऱ्यांदा अमेरिकेला गेले आणि तेथून १९२२ सालीं परत आले.

यानंतर तीन वर्षे हे गुजराथ विद्यापीठाच्या पुरातत्त्वमंदिराचे पाली-भाषाचार्य होते. यांनीं लिहिलेल्या बऱ्याच पुस्तकांचें लेखन याच काळांत झालेलें आहे. त्यामध्यें समाधि-मार्ग ( १९२५ ) व बौद्ध संघाचा परिचय ( १९२६ ) हे दोन ग्रंथ प्रमुख होत.

याच वेळीं प्रा. ल्यानमन सेवानिवृत्त झाल्यामुळें विसुद्धीमग्गाचें अपुरें राहिलेलें संस्करण पुरें करण्यासाठीं डॉ. वुड्स यांनीं यांस पुनः आमंत्रण केलें ( १९२६ ). तें संस्करण छापून तयार झाल्यावर हे परतले ( १९२७ ). याच ग्रंथाचें नागरी भाषेंतील संस्करण अंधेरीच्या भारतीय विद्याभवन या संस्थेनें प्रसिद्ध केलेलें आहे.

हिंदुस्थानांत आल्यावर हे गुजराथ विद्यापीठांत आपल्या खर्चानेंच राहत असत. त्या वेळीं लेनिनग्राड येथें बौद्ध धर्माचे अध्ययनासाठीं स्थापन झालेल्या संस्थेंत काम करण्याकरितां यांना पाचारण करण्यांत आलें ( १९२९ ). पण प्रकृति ठीक न राहिल्यानें हे परत हिंदुस्थानांत आले ( १९३० ) आणि त्याच वेळीं सुरू झालेल्या सत्याग्रहांत सामील झाले.

डॉ. वुड्स यांचे आग्रहावरून यांनीं यानंतर आणखी एकदां अमेरिकेचा प्रवास केला ( १९३१-३२ ). यानंतर कांहीं काळ बनारस विद्यापीठाचे पाहुणे म्हणून यांना बोलावणें करण्यांत आलें होतें. त्या तेथील यांच्या निवासाचें ' हिंदी संस्कृति व अहिंसा ' हा यांचा ग्रंथ स्मारक आहे. आपले प्राचीन भारतासंबंधींचे व सामाजिक तत्त्वज्ञानासंबंधींचे विचार प्रकट करणें हा यांचा या ग्रंथलेखनांतील प्रमुख हेतु होता.

श्रमजीवि वर्गांत बुद्धाच्या अहिंसा-तत्त्वज्ञानाच्या प्रसारानें स्पृश्यास्पृश्य भेद नाहींसे करून समता स्थापन करतां येणें शक्य आहे, अशी कल्पना यांचे मनांत कित्येक दिवस घोळत होती. या विचारास मूर्त स्वरूप मिळण्याचा योग परळ येथील ' बहुजन-विहाराच्या ' स्थापनेबरोबर सिद्धीस गेला ( १९३७ ).

१९१० सालीं सयाजीराव गायकवाडांचे सांगण्यावरून दिलेल्या व्याख्यानांचा संग्रह– बुद्ध, धर्म आणि संघ– हें यांचें पहिलें पुस्तक मानण्यास हरकत नाहीं. बुद्धलीलासारसंग्रह हें त्रिखंडात्मक पुस्तक यांनीं यानंतर प्रसिद्ध केलें. गौतम हा बुद्ध होण्याच्या पूर्वींच्या जन्मांतील कथा पहिल्या भागांत, खुद्द बौद्ध जन्मांतील कथा दुसऱ्या भागांत व बुद्धाचा उपदेश व त्याचें परिनिर्वाण कथन करणाऱ्या कथा तिसऱ्या भागांत अशी या पुस्तकाची रचना आहे. ' भगवान् बुद्ध ' हें गौतम बुद्धाचें यांनीं लिहिलेलें टीकात्मक चरित्रहि असेंच प्रसिद्ध आहे.

आपल्या पूर्वायुष्याचा वृत्तांत ' निवेदन ' ( १९२४ ) या नांवानें यांनीं प्रसिद्ध केला असून ' खुलासा ' या नांवाचा यांच्या उत्तर आयुष्याचा वृत्तांत मुंबईच्या ' प्रकाश ' पत्रांत १९३७-३८ त क्रमशः प्रसिद्ध झालेला आहे.

यांचें लेखन व वक्तृत्व हें अत्यंत परिणामकारक असून त्यामध्यें एक विशेष प्रकारचा जिव्हाळा आढळतो. मग तें एखाद्या जुन्या ग्रंथाचें रूपान्तर असो किंवा यांचें आत्मचरित्र असो. अगदीं सामान्य स्थितींतून जागतिक प्रसिद्धि मिळविणारे हे गृहस्थ आहेत.

**कौजलगी, हणमंतराव श्रीपतराव**—( जन्म स. १८९०–मृत्यु स. १९४५ ) कर्नाटकांतील सुप्रसिद्ध सार्वजनिक कार्यकर्ते, कॉंग्रेसचे पुढारी व कानडी लघुकथालेखक.

स. १९१४ सालीं हे एलएल. बी. झाले आणि हे विजापूर येथें वकिली करूं लागले. यांची वकिली उत्तम प्रकारें चालत असतांच असहकारितेच्या चळवळींत यांनीं वकिली सोडली ( १९२० ) व यांनीं आपलें आयुष्य सार्वजनिक कार्याला सर्वस्वीं अर्पण केलें. यांची कामगिरी विशेषतः खेडेगांवांतील शेतकरीवर्गांत झाली आहे. त्यांचीं दुःखें यांनीं अनेक वेळां वेशीवर टांगून दाद लावून दिली. खेड्यांतील ग्रामीण जीवनांत बदल

व्हावा एतदर्थ यांचे अनेक प्रयत्न चालू होते. विशेषतः खादीकार्यास यांनीं आपलें तन, मन, धन अर्पण केलें होतें. कर्नाटक चरखा संघाचे व कर्नाटक प्रान्तिक कॉंग्रेस कमेटीचे हे अध्यक्ष होते. यांना राजकीय चळवळींत (स. १९२०,' ३१,' ३२) अनेक वेळां कारागृहवास घडला होता. यांच्या लघुकथाहि खेड्यांतील जीवनाचा यथार्थ परिचय करून देणाऱ्या आहेत. विनोदी लेखक म्हणून हे प्रसिद्ध होते. यांच्या मराठींतील लघुकथा 'कमलाकान्त' या नांवानें किर्लोस्कर मासिकांत प्रसिद्ध झाल्या आहेत. यांच्या खादी प्रेमामुळें लोक यांना 'खद्दर कौजलगी' म्हणत. सदाशिवराव कर्नाळ, सुबराव हळदीपूर, मध्वराव कब्बूर आणि नारायणराव जोशी हे यांचे सहकारी यांच्या आधींच दिवंगत झाले.

**कौल, पंडित राजा हरिकिसन**—(जन्म स. १८६९–मृत्यु स. १९४२) सुप्रसिद्ध दिवाण व अनेक मोठालीं कामें करणारे.

यांचें शिक्षण लाहोर येथील सरकारी विद्यापीठांत झालें. यांनीं स. १८९० सालीं असिस्टंट कमिशनरच्या जागेवरून, लाहोरचे डिस्ट्रिक्ट जज्ज, डेप्युटी कमिशनर वगैरे अनेक कामें केल्यावर १९१३–१४ सालीं गुन्हेगार जातींच्या संबंधीं रिपोर्ट लिहिण्याची खास कामगिरी यांच्यावर सोंपविण्यांत आली. स. १९१७–१९ मध्यें यांना डेप्युटी कमिशनर फॉर क्रिमिनल ट्राइब्ज नेमण्यांत आलें. नंतर कमिशनर म्हणून काम केल्यावर यांची रॉयल कमिशनवर नेमणूक झाली (१९२३–२४). नंतर हे सेवानिवृत्त झाले. स. १९२५ सालीं एकॉनमिक इन्क्वायरी कमेटीचे व पुढें इंडियन टारिफ बोर्डाचे हे सभासद होते (१९२६–२७). नंतर हे भरतपूर संस्थानचे दिवाण होते (१९२७). जम्मू व काश्मीर राज्याचे हे मुख्य प्रधान होते (१९३१–३२). हे पत्याळा संस्थानचे अर्थसचीव होते (१९४०).

---

## ख

**खत्री, बाबू कार्तिकप्रसाद**—(जन्म स. १८५२–मृत्यु स. १९०४) हिन्दी भाषेंतील एक पण्डित व ग्रन्थकार. ह्यांचे वडील बलदेवप्रसाद यांनीं 'शब्दकल्पद्रुम' हा वैद्यकीवरील संस्कृत कोश तयार केला. लहानपणींच यांनीं वैद्यक-ग्रन्थ मुखोद्गत केले. इंग्रजी व विशेषतः बंगाली भाषा यांना चांगली येत असे. परन्तु यांना हिन्दी भाषेची सर्वांत विशेष आवड असल्यामुळें यांचे बरेच ग्रन्थ हिन्दींतूनच प्रसिद्ध झालेले आहेत. हिन्दी गद्य लेखनाची प्रथा यांनींच निर्माण केली. हिन्दी नन्दकोश व सारस्वतदीपिका हे ग्रन्थ यांनीं प्रसिद्ध केले. 'प्रेमविलासिनी' व 'हिन्दीप्रकाश' हीं वर्तमानपत्रें यांनीं चालविलीं. त्याचप्रमाणें 'भारतजीवन' व 'सरस्वतीपत्रिका' यांचे हे संपादक होते. यांनीं आसामांत थोडाफार हिन्दीप्रचारहि केला. काशीच्या नागरीप्रचारिणी सभेचे हे सभासद होते.

उषाहरण, जया, प्रमिला, मधुमालती, दीनानाथ, कुलटा, दलितकुसुम, शिवाजी, पाकराज, विक्रमादित्य, अहिल्याबाई, मिराबाई, ईला, प्रातःस्मरण, सतीसत्त्वरक्षा, शृंगारदान, वणिग्बंधु वगैरे स्वतंत्र पुस्तकें यांनीं लिहिलीं आहेत.

**खरे, गणेश सखाराम**—(जन्म स. १८५४–मृत्यु स. १९१२) सुप्रसिद्ध जंत्रीकार, अभ्यासक व गणितज्ञ. यांचा जन्म गुर्लेहोसूर (जि. बेळगांव) येथें झाला. बेळगांव व पुणें येथें शिक्षण होऊन यांना ओव्हरसिअरच्या परीक्षेंत पहिला क्रमांक मिळाला (१८७७).

सरकारी नोकरींत शिरल्यावर यांनीं सरहद्द प्रान्त रेल्वे, सिंध, मालेगांव, पुणें व नगर भागांत कालव्यांचीं कामें केलीं. तसेंच कुरुंदवाडच्या पाणीपुरवठ्याची पहिली योजना यांनीं तयार केली. १९१० सालीं हे सेवानिवृत्त झाले. ज्योतिष व गणित हा यांचा आवडता विषय होता. शं. बा. दीक्षितकृत 'ज्योतिर्विलास अथवा रात्रांची दोन घटका मौज' या पुस्तकांतील नक्षत्रपट यांनीं तयार केला. तसेंच इतिहास-संशोधकांना उपयुक्त १५० वर्षांची शिवकालीन जंत्री यांनीं तयार केली. त्यापैकीं ९९ वर्षांची जंत्री ओरिएंटल बुक एजन्सी पुणें, यांनीं 'खरे जंत्री' या नांवानें १९२३ मध्यें प्रसिद्ध केली आहे. मराठ्यांच्या इतिहासाच्या अभ्यासाला आवश्यक असणारा कालनिर्णय करण्यास यांनीं केलेली मोडकांच्या जंत्रीच्या पूर्वीच्या ९९ वर्षांची ती जंत्री अतिशय महत्त्वाची समजण्यांत येते. ती शक १५५१-१६४९ (स. १६२९-१७२८) पर्यंतची आहे. तिच्यामुळें या कालांतील शक, संवत, इसवी, फसली, सुहूर, जुलूस, राज्याभिषेक, हिजरी या सनांतील घटिकापळांसह तिथि, तारीख, मास, वार काढतां येतात व जुन्या कागदपत्रांतील कालनिर्णय सहज करितां येतो. यापूर्वी कालनिर्णयाकरितां गणिती तज्ज्ञांचा आश्रय करावा लागत असे. यांच्या जंत्रींतहि पंचांगांच्या भिन्नतेमुळें आणि सूक्ष्म गणिताच्या अभावीं क्वचित् दोष आढळतात. तथापि ते फार थोडे आहेत.

रा. ब. कृ. ब. देवल यांनीं प्रसिद्ध केलेल्या संगीत शास्त्राच्या सर्व निबंधांतील गणितविषयक चर्चा यांनीं केली आहे. त्याप्रमाणें त्यांनीं तयार केलेल्या श्रुति-हार्मोनियममध्यें प्रत्येक सप्तकांत बावीस श्रुतींच्या पट्ट्या बसविण्याची योजना यांनीं केली.

एंजिनियर लोकांना उपयोगी पडणारी 'अर्थ-वर्क टेबल्स' नांवाचीं दोन पुस्तकें यांनीं प्रकाशित केलीं. या पुस्तकांचा खप मुंबई इलाखा, सिलोन व ब्रह्मदेश या ठिकाणीं झाला. कात्रजचा तलाव व खानदेशांतील बंधारे हे दोन संशोधनात्मक निबंध यांनीं लिहून प्रसिद्ध केले. डॉ. सर रामकृष्ण गो. भांडारकर यांना ८१ व्या वर्षी अर्पण केलेल्या ग्रंथांत 'उदात्त, अनुदात्त व स्वरित' या विषयावर यांचा निबंध आहे. शिवाय अनेक संस्था व विद्यार्थी यांना यांनीं देणग्या दिल्या.

**खरे, गणेश हरी**— (जन्म स. १९०१) इतिहासांतील अनेक शाखांचा शास्त्रशुद्ध अभ्यास करणारे गृहस्थ. शिक्षण-कॉलेजच्या पहिल्या वर्षापर्यंत. १९२० अखेरीस असहकारितेच्या चळवळींत ह्यांचें कॉलेज सोडून देशसेवेंत पदार्पण; १९२२-२३ मध्यें एक वर्ष तुरुंगवास; १९२४ जून ते १९२८ डिसेंबरपर्यंत सातारा राष्ट्रीय शाळेंत शिक्षक; १९२९ जुलै ते १९३० जून–शिवचरित्र-कार्यालय पुणें, येथें नोकर; १९३० जुलै ते आजतागायत भारत इतिहास-संशोधक मंडळ, पुणें, येथें नोकर; येथील हुद्दा क्यूरेटर; संस्कृत, इंग्रजी, फार्सी, उर्दू, कानडी, हिंदी या भाषांचें ज्ञान बऱ्यापैकीं; अरबीचें प्राथमिक ज्ञान; मूर्तिकांड; लिपिशास्त्र; नाणकशास्त्र; प्राचीन, मध्ययुगीन व अर्वाचीन इतिहास यांचा व्यासंग; आतांपर्यंत एकट्यानें लहान-मोठीं सोळा व इतरांबरोबर दोन मिळून १८ पुस्तकें व १४० लेख लिहिले त्यांचीं अनुक्रमें दोन हजार व एक हजार पृष्ठें झालीं आहेत. मुख्य पुस्तकें अशीं:–दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाचीं साधनें, खंड १-३; ऐतिहासिक फार्सी साहित्य, खंड १-३; शिवचरित्र–साहित्य, खंड ६; शिवचरित्रवृत्त-संग्रह, खंड २-३; हिंगणे दफ्तर, खंड १; मूर्तिविज्ञान; आळंदी, पंढरपूर, भोर संस्थान व भोर म्यूझियम व शनवारवाडा यांविषयीं मार्गदर्शिका. यांचीं पुस्तकें सामान्यतः साधनविषयक असलीं तरी मूर्तिविज्ञान, श्रीविठ्ठल आणि पंढरपूरसारखीं पुस्तकें संकलनात्मक आहेत. लेख मुख्यतः विवेचनात्मक व घटनार्थनिर्धारक आहेत. थोडेसे इंग्रजी लेख सोडल्यास बहुतेक लिखाण मराठींतून झालें असलें तरी प्रमाणभूत असल्यानें इंग्रजी सरकारी नियतकालिकांतून आधारास घेतले जाते.

**खरे, दाजी आबाजी**— (जन्म स. १८५६–मृत्यु स. १९१६) मुंबईचे प्रसिद्ध वकील व सार्वजनिक कार्यकर्ते. वडील लवकर वारल्यानें यांचें व यांच्या वडील बंधूंचें संगोपन यांचे चुलते रावजी धोंडो मामलेदार यांनीं केलें. हे मॅट्रिक (१८७३) व पुणें डेक्कन कॉलेजांतून बी. ए. झाले (१८७७). कॉलेज–शिक्षण शिष्यवृत्त्यांवर झालें. १८८० सालीं एलएल. बी. झाल्यावर मुंबई हायकोर्टांत यांनीं वकीली सुरू केली. वकीलीला आवश्यक असणारे गुण यांच्याजवळ भरपूर असल्यानें मुंबईशिवाय बाहेरहि यांचें नांव विख्यात झालें. हे अनेक सार्वजनिक कार्यांत भाग घेत. हे मतानें नेमस्त व समाजसुधारक होते. धारवाडच्या प्रांतिक परिषदेचे हे अध्यक्ष होते (१९०३). स. १८९७ च्या खटल्याच्या वेळीं हे लो. टिळकांकरितां विलायतेसहि गेले होते. यांनीं 'पुनरुद्वाह' नांवाचें

एक विद्वत्ताप्रचुर पुस्तक प्रसिद्ध केलें. यांच्या छबू नांवाच्या मुलीनें ईश्वरप्रसाद गणेश पंडित नांवाच्या अहमदाबादच्या परप्रान्तीय माणसाशीं लग्न केलें होतें.

कायमधारापद्धति व कायमकुळपद्धति हा ह्यांचा राष्ट्रीय-सभेंतील आवडता विषय होता. यांनीं स. १८९३ च्या लाहोर कॉंग्रेसमध्यें या संबंधाचा ठराव मांडला. इंग्लंडला पाठविण्यांत आलेल्या कॉंग्रेसच्या शिष्टमंडळाचे यांना सभासद निवडण्यांत आलें. स. १९०६ सालीं यांच्याच ठरावानें पास झालेली कॉंग्रेसची घटना तयार करण्याचे कामीं यांनीं अत्यंत मेहनत घेतली. स. १९०९-१३ पर्यंत हे मि. डी. ई. वाच्छा यांच्याबरोबर कॉंग्रेसचे सेक्रेटरी होते. तेथें हिंदुस्थानांतील कापडाच्या धंद्याची वाढ खुंटविणारा हिंदी कापडावरील कर रद्द करण्यासंबंधींचा ठराव यांनीं मांडला. स. १९१३ सालीं मुस्लीम लीगनें स्वराज्याचें ध्येय मान्य केलें, तेव्हां राष्ट्रसभेंत आलेल्या लीगच्या अभिनंदनाच्या ठरावाला यांनीं दुजोरा दिला ( राष्ट्रीय सभेचा इतिहास भा. १, पा. ११७ ).

**खरे, नारायण भास्कर**— ( जन्म स. १८८१ ) नागपूरचे एक माजी राष्ट्रसभा पुढारी, मुख्य प्रधान व व्हाइसरॉयच्या एक्झिक्युटिव्ह कौन्सिलमधील परराष्ट्रीय खात्याचे मुख्य.

यांचें इंग्रजी सहा इयत्तापर्यंतचें शिक्षण मुंबईस झाल्यावर हे प्लेगमुळें जबलपूर येथें आपले मामा कृ. भा. गोखले यांच्याकडे गेले. तेथें दुसऱ्या वर्गांत बी. ए. झाल्यावर ( १९०२ ), लाहोर येथें मेडिकल कॉलेजांत ( १९०२-७ ) शिक्षण घेऊन एम्. बी. झाले. परीक्षेंत पहिला क्रम आल्यानें सुवर्णपदक व सर्जरींत रौप्यपदक मिळालें. १९०७ पासून असिस्टंट सर्जन म्हणून मध्यप्रान्तांत यांनीं नोकरी केली व १९१३ सालीं एम्. डी. झाले. हे पंजाब विश्वविद्यालयाचे पहिले एम्. डी. होत. १९१६ सालीं यांनीं नागपूरला स्वतंत्रपणें धंद्यास सुरुवात केली. धंद्यांत यांचा पहिल्यापासून उत्तम बस बसला.

स. १९२२ सालीं स्थापन झालेल्या नागपूर अनाथ वि. गृहाच्या संस्थापकांत हे असून त्या संस्थेचे १२ वर्षे अध्यक्ष होते. नागपूर पायोनियर विमा कंपनीचे हे पहिले डायरेक्टर व १९२० सालीं नागपूर राष्ट्रीय सभेच्या कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष होते. १९२३ व १९२६ च्या लेजिस्लेटिव्ह असेंब्लीच्या निवडणुकींत हे स्वराज्यपक्षातर्फे निवडून आले. त्या वेळीं दुफळी होऊन हे राष्ट्रसभेला चिकटून राहिले व प्रचाराकरितां निघालेल्या ' तरुण भारत ' पत्राचे हे मुख्य संपादक बनले. १९३० मध्यें सविनय कायदेभंग चालू होईपर्यंत तें पत्र चालू होतें. यांनीं सहकुटुंब मीठ विकून कायदेभंग केला व मराठी मध्यप्रान्तांत जंगलसत्याग्रहाची योजना आंखली. तेव्हां यांना आरंभींच जामीन न दिल्यामुळें १ वर्षाची शिक्षा झाली. पण पुढें हृदयविकारामुळें यांना सोडण्यांत आलें. १९३२च्या सत्याग्रहांत यांनीं आर्थिक जबाबदारी स्वतःवर घेऊन लढा चालू ठेवला. गांधी-आयर्विन करारानंतर म. गांधींनीं हरिजनांच्या उद्धाराकरितां आंदोलन सुरू केलें, तेव्हां यांनीं तीन हजार रुपये दिले. राष्ट्रीय सभेनें पाटण्याच्या अधिवेशनांत कायदेकौन्सिलांत प्रवेश करण्याचा आदेश दिला (१९३४), तेव्हां बॅ. मोरोपंत अभ्यंकरांना यांनीं निवडणुकींत सर्वतोपरी साहाय्य केलें, पण ते निवडून आल्यावर वारले. तेव्हां त्यांच्या जागीं यांची बिनविरोध निवडणूक झाली. तेथें यांनीं ' आर्य मॅरेज व्हॅलिडेशन ॲक्ट ' या नांवाचा कायदा पास करून घेतला. त्यामुळें आर्यसमाजी लोकांची विवाहाच्या बाबतींतील अडचण दूर झाली. पूर्वीं आर्यसमाजी लोकांस आपली समाजपद्धतीनें केलेलीं लग्नें सिव्हिल मॅरेज ॲक्टाखालीं नोंदवावीं लागत. १९३६ सालीं प्रान्तिक कायदेमंडळाच्या निवडणुकी लढविण्याचें राष्ट्रसभेनें ठरविलें. तेव्हां यांची राष्ट्रसभेच्या कायदे मंडळाच्या मुख्याच्या जागीं पुढारी म्हणून एकमुखानें निवड झाली. स. १९३७ सालीं राष्ट्रसभेनें मंत्रिमंडळ स्वीकारण्याचें ठरविलें. तेव्हां गव्हर्नरनें यांना पुढारी म्हणून बोलाविलें व आपल्या प्रमुखत्वाखालीं यांनीं प्रधानमंडळ बनविलें, व हे मुख्य प्रधान झाले आणि धडाडीनें राष्ट्रसभेच्या जाहीरनाम्याप्रमाणें अहिंसावादी व हिंसावादी राजकीय गुन्हेगार सोडले, छापखान्यांच्या पूर्वी घेतलेल्या जामिनक्या रद्द केल्या व रकमा परत दिल्या, शेतकऱ्यांचा सारा रुपयास दोन आणे कमी केला, शाळेंतील मुलांना लष्करी व बंदुकीचें शिक्षण देण्यास मान्यता दिली, जप्त पुस्तकांवरील जप्ती उठवली. असा तडफदार कार्यक्रम चालू असतांच शरीफ नांवाच्या दिवाणानें हिंदु मुलीवर बलात्कार करणाऱ्या जाफर हुसेन नांवाच्या एज्युकेशनल इन्स्पेक्टरला दया दाखवून तुरुंगांतून सोडविलें म्हणून यांनीं त्याला राजीनामा द्यावयास भाग पाडलें. या निमित्तानें कॉंग्रेस पार्लमेंटरी कमेटीला यांच्या कारभारांत लक्ष घालणें भाग पडलें. पण यांना तें न खपून यांनीं २० जुलै १९३८ रोजीं घाईनें प्रधानपदाचा राजीनामा दिला. संयुक्त जबाबदारीचे तत्त्वाप्रमाणें दोन दिवाणांनीं यांच्याबरोबर

राजीनामे दिले. पण बाकीचे दोघे मंत्री, पुढें दोन दिवसांत होणाऱ्या कॉंग्रेस पार्लमेंटरी कमेटीच्या संमतीशिवाय राजीनामें देईनात, तेव्हां त्यांना गव्हर्नरनें बडतर्फ केलें. यांनीं लगेच गव्हर्नरकडे जाऊन दुसऱ्या मंत्रिमंडळाची यादी गव्हर्नरला सादर केली. पण जबाबदार राष्ट्रसभेला सोडून परस्पर गव्हर्नरकडे हे गेले. म. गांधींनीं 'हा आपला मोठा प्रमाद झाला,' असें यांच्याकडून लिहून घेतलें आणि यांना मंत्रिपद सोडण्यास भाग पाडलें. पुढें तर कॉंग्रेस पक्षाशीं सतत विरोधाचें धोरण स्वीकारल्यानें दोन वर्षेपर्यंत यांचें राष्ट्रसभेचें सभासदत्वहि रद्द करण्यांत आलें.

पुढें (१९४३) हे व्हाइसरॉयच्या एक्झिक्युटिव्ह कौन्सिलचे सभासद बनले. आणि राष्ट्रसभेचे विरोधी बनून सरकारी धोरणाचें समर्थन करूं लागले. तथापि तेथेंहि यांनीं दक्षिण आफ्रिकेंतील सरकारनें तेथील हिन्दी लोकांशीं चालविलेल्या अन्यायाच्या परिमार्जनाचा प्रतिकार करण्याकरितां जशास तसें धोरणाचा पुरस्कार करून आपल्या राष्ट्रीय व लढाऊ धोरणाची प्रचीति आणून देण्याचा प्रयत्न केला (१९४५).

**खरे, वासुदेव वामनशास्त्री**—(जन्म स. १८५८—मृत्यु स. १९२४) मराठी कवि, नाटककार व इतिहाससंशोधक. यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांतील गुहागर गांवीं झाला. तेथेंच प्राथमिक शिक्षण झाल्यावर हे साताऱ्यास आले (१८७६) व तेथें पंडित अनंताचार्य गजेन्द्रगडकरांचेजवळ संस्कृताचें अध्ययन केलें. पुढे पुणें येथें संस्कृत शिक्षकाची नोकरी पत्करून प्रसिद्ध नारायणशास्त्री गोडबोल्यांच्या जवळ हे व्याकरणाचें अध्ययन करूं लागले. तेव्हां यांचा विष्णुशास्त्री चिपळूणकर, जनार्दन बाळाजी मोडक, काशीनाथ नारायण साने वगैरेंशीं परिचय होऊन यांना इतिहासाच्या अभ्यासाची व संशोधनाची गोडी लागली. टिळक व आगरकर यांच्याशींहि यांचा दाट परिचय झाला. पुणें न्यू इंग्लिश स्कूलच्या स्थापनेच्या वेळीं जे लोक शिक्षक म्हणून दाखल झाले त्यांत हे होते. तेथें एक वर्षभर काम केल्यावर हे मिरजेच्या शाळेंत शिक्षक म्हणून गेले. यांचें पुढील सर्व आयुष्य मिरजेसच गेलें.

संस्कृताचे शिक्षक हा उपजीविकेचा धंदा व इतिहाससंशोधनादि कामें हौसेचीं, असा यांचा कार्यक्रम सुरू झाला. यांचा इतिहासविषयक पहिला ग्रंथ 'नाना फडणिसाचें चरित्र' हा होय. तो लिहीत असतां यांना मिरजमळा संस्थानच्या ताब्यांत असलेल्या पटवर्धनी दप्तराचा सुगावा लागला. पटवर्धन सरदारांची चलती १७६०-१८०० पर्यंत चांगलीच होती. त्या वेळीं हिंदुस्थानच्या वेगवेगळ्या भागांतून झालेला सगळा पत्रव्यवहार तेथें एकत्र व शिस्तवार होता. घराण्यांत पुढें वांटण्या होऊन विभाग पडले तरी दप्तर एकत्रच राहिलें. त्यांच्या नकला यांनीं स्वतः व मदतनीसामार्फत करून घेतल्या आणि ते कागद १८९७ सालीं 'ऐतिहासिक लेखसंग्रह' मासिक काढून प्रसिद्ध करण्यास सुरुवात केली. पुढें पुरेसे वर्गणीदार न मिळाल्यानें १९२४पर्यंत बारा खंडांत ग्रंथरूपानें ते प्रसिद्ध केले. त्याला माहिती देणाऱ्या विस्तृत प्रस्तावना लिहिल्या. यांच्या सारसंकलक प्रस्तावनांमुळें त्या कागदांचा उपयोग अभ्यासकांना चांगला होतो. उपजीविकेचा धंदा शिक्षकाचा तोहि अगदीं ४० रु. दरमहा प्राप्तीचा. इतिहास–संशोधनाचें काम हौसेचें पण खर्चाचें. त्याची तोंडमिळवणी नाटकें लिहून यांना करावी लागे. त्यामुळें यांचें आयुष्य गरीबींतच गेलें.

यांच्या संशोधकी कामाप्रमाणेंच यांचीं नाटकें उच्च दर्जाचीं असून तीं रंगभूमीवरहि पुष्कळ दिवस गाजलेलीं आहेत. भाषाप्रभुत्व, रसिकता, मार्मिकता व विनोद हे यांचे गुण त्यांत उत्कटत्वानें प्रकट झाले आहेत.

यांचें वाङ्मय– १ समुद्र-काव्य १८८४, २ यशवंतराव महाकाव्य १८८८, ३ गुणोत्कर्ष नाटक १८८५, ४ तारामंडळ नाटक, ५ संगीत चित्रवंचना नाटक, ६ संगीत कृष्णकांचन नाटक १९१७, ७ शिवसंभव नाटक, ८ संगीत उग्रमंगल नाटक, ९ संगीत देशकंटक नाटक, १० नाना फडणिसाचें चरित्र १८९२, ११ अधिकारयोग १९०८, १२ हरिवंशाची बखर (संपादित १९०९), १३ इचलकरंजी संस्थानचा इतिहास १९१३, १४ मालोजी व शहाजी १९२०, १५ ऐतिहासिक लेखसंग्रह भाग १-१२, १८९७-१९२४. यांचें चरित्र दा. मो. भट यांनीं लिहून पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलें आहे.

**खाडिलकर, नाट्याचार्य कृष्णाजी प्रभाकर**—(जन्म स. १८७२) सुप्रसिद्ध ध्येयवादी मराठी वृत्तपत्रकार, परदेशांतील राजकारणाचे सूक्ष्म निरीक्षक, नाटककार, गद्य रंगभूमीचे प्रस्थापक व वैदिक वाङ्मयाचे अभ्यासक.

यांचा जन्म सांगली येथें झाला व तेथें शिक्षण होऊन हे मॅट्रिक झाले (१८८९). पुणें फर्ग्युसन व डेक्कन कॉलेजांत अभ्यास होऊन हे तत्त्वज्ञान घेऊन बी. ए. झाले (१८९२) व सांगलीसच सरकारी हायस्कुलांत

शिक्षक बनले ( १८९२-९४ ). पण ती नोकरी सोडून मुंबईस एलएल. बी.चा अभ्यास करण्याकरितां गेले. तेथें असतां यांचें 'सवाई माधवरावाचा मृत्यु' हें नाटक व 'ब्राह्मण व त्यांची विद्या' या ग्रंथावरील टीका विविधज्ञान-विस्तारांत प्रसिद्ध झाली आणि त्यामुळेंच केसरीशीं यांचा संबंध आला. १८९६ च्या सप्टेंबरांत 'राष्ट्रीय महोत्सव' हा यांचा पहिला अग्रलेख केसरींत प्रसिद्ध झाला. त्यानंतर टिळक राजद्रोहाच्या आरोपावरून तुरुंगांत गेले असतां यांनीं केसरीचा सांधा बरोबर जुळविला. म्हणून यांचे टिळकांनीं आभार मानले. केसरी सोडून हे नेपाळांत गेले. तेथें यांनीं कौलांचा कारखाना काढला व राजवाड्याला कौलें पुरविलीं, अशी एक आश्चर्यकारक घटना यांच्या चरित्रांत आहे. पण तिच्या मागील राजकारण उघड झालेलें नाहीं ( १९०२-४ ). त्यानंतर टिळकांना शिक्षा होऊन ते मंडालेस गेले, तेव्हां केसरी व मराठा या दोहींचे १९०८-९ सालीं व १९१८-२० सालीं लो. टिळक व केळकर विलायतेस गेल्यामुळें दीडदोन वर्षे हे केसरीचे जाहीर संपादक होते. स. १९१० सालीं यांची मान्यता नसतां तुरुंगांतून टिळकांची मान्यता आणून केळकर संपादक झाले, म्हणून यांनीं जो केसरीवर बहिष्कार पुकारला तो टिळक सुटून आल्यावर १९१५ सालीं संपून हे पुनः केसरीकचेरीत जाऊं लागले. लो. टिळक वारल्यानंतर यांनीं केसरी संस्था कायमची सोडली आणि हे मुंबई येथें निघणाऱ्या लोकमान्य दैनिकाचे संपादक बनले ( मार्च १९२१ ). तें दैनिक यांच्या संपादकत्वाखालीं फारच लोकप्रिय झालें. राष्ट्रसभेचा पुरस्कार हे उत्कृष्ट करीत असतां चालकमंडळीकडून यांच्या मतावर दडपण व संपादनसामर्थ्याविषयीं संशय प्रगट होऊं लागतांच यांनीं आपल्या स्वतःच्या मालकीचें 'नवाकाळ' नांवाचें दैनिक सुरू केलें ( एप्रिल १९२३ ). तेंहि अत्यंत लोकप्रिय करून यांनीं आठवड्याचा नवाकाळ सुरू केला ( १९२५ सप्टें. ). १९२७ सालीं हिंदुमुसलमानांचे दंग्यावरील लेखामुळे ७०० रु. दंड व पोलिस सुपरिं.ला १५०० रु. अब्रू नुकसानीदाखल यांना द्यावे लागले. पुढें राजद्रोहाच्या आरोपावरून खटला होऊन एक वर्षाची शिक्षा झाली ( फेब्रु. १९२९ ). या वेळीं यांचा मुलगा यशवंत याच्याकडे नवाकाळचें संपादकत्व गेलें. स. १९३१ सालीं नवाकाळ—वाडीची खरेदी होऊन त्या पत्राला स्थैर्य प्राप्त झालें, आणि हे निवृत्तीच्या मार्गाला लागले. ६ मे १९३३ रोजीं सांगलीस दत्तमंदिर बांधून तेथें अनेक तत्त्वज्ञानाच्या विषयांवर धार्मिक प्रवचनें सांगण्यास यांनीं सुरुवात केली.

यांना दोनदां नाट्यसंमेलनाच्या ( १९०७, १९१७ पुणें ) व नागपूर मराठी साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान मिळाला ( १९३३ ). हे मॉंटफोर्ड सुधारणान्वयें होणाऱ्या मुंबई कौन्सिलच्या निवडणुकीस डेमोक्रॅटिक पक्षातर्फे उभे होते; पण लो. टिळकांच्या मृत्यूनंतर कलकत्ता कॉंग्रेसच्या ठरावाप्रमाणें यांनीं आपली उमेदवारी परत घेतली ( १९२० सप्टें. ).

यांच्या सर्वच लेखनांत कणखर ध्येयवाद आढळून येतो. स्वकीयांचा आत्मविश्वास जागृत करीत त्यांना ध्येयवादी बनवावयाचें आणि प्रतिपक्षावर सारखा जोरकस हल्ला करीत राहावयाचें, हा यांचा बाणा यांच्या लेखनांत स्पष्ट व्यक्त होतो; मग तें वृत्तपत्रीय लेखन असो किंवा करमणुकीकरितां लिहिलेलें नाटक असो. परदेशी राजकारणावरील यांच्या लेखांतसुद्धां हीच यांची दृष्टि आढळून येते. मुख्य उद्दिष्ट सोडून किरकोळ गोष्टींवर यांनीं आपली लेखणी कधींहि चालविली नाहीं. हे दैनिकाचे यशस्वी संपादक असूनहि यांना उत्तरप्रत्युत्तरें, खुलासेप्रतिखुलासे, टीकाप्रतिटीका असल्या तात्कालिक खुसखुशीत मजकुराची कधीं जरूरी भासली नाहीं. यांनीं संपादकत्व सोडतांच लोकमान्य दैनिक बंद पडलें आणि यांनीं केवळ स्वतःच्या हिंमतीवर काढलेला 'नवाकाळ' मात्र जोरानें चालत राहिला, यांत यांचें संपादनसामर्थ्य व्यक्त होतें.

परदेशी राजकारणाच्या बाबतींतहि अगदीं प्रारंभापासून यांचें लक्ष असे. बोअर युद्धविषयक लेखनाच्या नादानें यांची एलएल. बी.ची परीक्षा हातची गेली ( १९०० ). पुढें यांनीं गनिमी काव्याचें युद्ध ही लेखमाला लिहिली ( १९०१ ). केसरींतील परराष्ट्रीय राजकारणावरील लेख प्रायः यांचेच असत. त्यामुळेंच यांना 'परराष्ट्रमंत्री' असें टिळक विनोदानें म्हणत. बाल्कन युद्धावरील लेखमाला यांनींच लिहिली ( १९१३ ). पहिल्या महायुद्धावरील केसरींतील व चित्रमयजगत्‌मधील यांचें मसिक समालोचन इतकें लोकप्रिय झालें कीं, तें पुढें पुस्तकरूपानेंहि निघालें. या युद्धाच्या वेळीं यांनीं जरी खुद्द कांहीं लिहिलें नसलें तरी यांनीं घालून दिलेल्या परंपरेंतून येणारें समालोचन लोकांना विशेष मार्मिक वाटतें.

यांच्या नाटकांतसुद्धां असाच विशेषपणा आहे. यांचीं नाटकें हेतुप्रधान आहेत. यांचीं कथानकें लोकपरिचित व हेतु लोकप्रिय असल्यानें यांनीं अपेशी ठरलेली गद्य

रंगभूमि रसपरिपोषक कुशल मांडणीनें सजीव करून 'गद्य रंगभूमीचे प्रस्थापक' अशी पदवी प्राप्त केली. संगीतानें अभिनयप्रधान गद्य रंगभूमीला निर्माल्य करून टाकलें होतें. यांनीं गद्य नाटकें करूनहि नाटकमंडळ्या लोकप्रिय होऊन चालूं शकतात हें दाखवून दिलें. प्रसिद्ध महाराष्ट्र नाटक मंडळी यांच्याच नाटकांमुळें पुढें आली आणि कीचकवधासारख्या नाटकानें तर तिला मुबलक पैसाहि मिळवून दिला. प्रथम गद्य नाटकांतील अभिनयप्राधान्य ध्यानांत घेऊन संगीत नाटकें लिहिण्याचा यांचा विचारहि नव्हता. पण टिळकांच्या तुरुंगवासानंतर यांना केसरीवर बहिष्कार घालावा लागला, तेव्हां आर्थिक प्रश्न सोडविण्याकरितां नाटककार म्हणून प्राप्त झालेल्या लौकिकाचा फायदा घेऊन यांनीं संगीत नाटकें लिहिलीं. यांच्या कवितेंत प्रसाद नसला तरी नव्यानव्या गायकी चालींचा आश्रय करून आणि गद्यपद्याचा सुंदर मेळ साधून गंधर्वांसारख्यांकडून आपलीं नाटकें रंगभूमीवर आणवून, सर्वांना मागें सारून दोन तपांपेक्षां अधिक काळ रंगभूमीवर यांनीं आपलें स्वामित्व कायम ठेवलें.

यांचें वाङ्मयः— नाटकें— १ कांचनगडची मोहना (१८९७), २ सवाई माधवरावाचा मृत्यु (१८९५ विविधज्ञान विस्तार, नंतर पुष्कळ फेरबदल करून १९०६), ३ कीचकवध (१९०६), ४ बायकांचें बंड (गद्य १९०७, संगीत १९३५), ५ भाऊबंदकी (१९०९), [ जप्त १९१०, जप्ती उठली १९४० ], ६ प्रेमध्वज (१९१०), ७ संगीत मानापमान (१९११ मार्च), ८ सं. विद्याहरण (१९१३), ९ गद्य सत्त्वपरीक्षा (१९१४), १० सं. स्वयंवर (१९१६ डिसें.), ११ सं. द्रौपदी (१९२०), १२ सं. मेनका (१९२६), १३ गद्य सवतीमत्सर (१९२७), १४ सावित्री (१९३० लिखित).

धार्मिक प्रवचनात्मक पुस्तकें—१ संध्या, २ त्रिसुपर्ण, ३ सौर, ४ रुद्र. उपनिषदें– ऐतरेय, ईशावास्य, मांडूक्य वगैरे.

**खानखोजे, पांडुरंग सदाशिव**—( जन्म स. १८८५ ) सुप्रसिद्ध कृषितज्ज्ञ व राजकारणी पुरुष.

हे मध्यप्रान्तांतील वर्धा येथले मूळचे राहणारे. हे वयाच्या २१ व्या वर्षी शेतकीचें उच्च शिक्षण घेण्याकरितां अमेरिकेस गेले (१९०६) आणि तेव्हांपासून हे अद्यापि तिकडेच आहेत. मध्यें कांहीं वेळां यांनीं इकडे येण्याचा प्रयत्न केला; पण अद्यापि यांचा इकडे येण्याचा प्रयत्न सफल झालेला नाहीं.

हे कॅलिफोर्निया युनिव्हर्सिटीला जोडलेल्या ऑरेगन ॲग्रिकल्चरल कॉलेजमधून कृषिविषयांत बी. एस्सी. झाले (१९११) व नंतर दोन वर्षांनीं वॉशिंग्टन युनिव्हर्सिटींतून एम्. एस्सी. झाले.

स. १९१३ सालीं हे अमेरिकेंत असतां यांनीं हिंदुस्थानांत औद्योगिक शिक्षणाचा प्रसार करण्याकरितां एक योजना तयार केली होती, आणि यांनीं त्याकरितां तिकडे दौरेहि काढले होते. या बाबतींत यांना साहाय्य करण्याकरितां पुलमन (वॉशिंग्टन) येथें 'असोसिएशन फॉर दि प्रमोशन ऑफ इंडस्ट्रियल एज्युकेशन इन् इंडिया' या नांवाची एक संस्थाहि स्थापण्यांत आली होती. या संस्थेच्या प्रसिद्धिपत्रकांत वॉशिंग्टन स्टेट कॉलेजचे प्रेसिडेंट मि. इ. ए. ब्रायन (अध्यक्ष), सी.एच्. हॅरिसन (उपाध्यक्ष) व व्हाय्. डी. कार्डिफ (चिटणीस) यांच्या सह्यांनिशीं जें निवेदन प्रसिद्ध करण्यांत आलें, त्यांत त्यांनीं यांच्या कार्यपद्धतीचा अत्यंत गौरव केला आहे.

अमेरिकेंतील विद्यार्जन आटोपल्यावर स. १९१४ च्या सप्टेंबरांत हे युरोपमार्गे हिंदुस्थानांत यावयास निघाले. पुढें पालेर्मो (इटली) येथून ग्रीसमार्गे हिंदुस्थानात हे येत असल्याचें यांचें पत्र आलें, पण पहिलें महायुद्ध सुरू झाल्यामुळें यांना स्वदेशीं येणें कठीण झालें. त्यानंतर स. १९२१ पर्यंत यांच्याविषयीं इकडे कांहींच वृत्त आलें नाहीं. या दीर्घ अवधींत हे कांहीं वर्षे इराणांतील घशघई संस्थानामध्यें शिक्षणमंत्री आणि व्यापार व कृषि विभागाचे डायरेक्टर होते. तेथून तें राज्य सोडून हे १९२१ च्या नवंबरांत बर्लिनला गेले. यांच्या तेथील कामाबद्दल त्या संस्थानचे अमीर व प्रजाजन यांनीं मुक्तकंठानें प्रशंसोद्गार काढले आहेत.

बर्लिनमध्यें ह्यांची स्वामी सत्यदेवांशीं मुलाखत झाली. स्वामींनीं आपल्या 'मेरा जर्मन यात्रा' या आपल्या हिन्दी पुस्तकांत यांच्यासंबंधीं पुढील उद्गार काढले आहेत. 'यांच्याशीं माझा पूर्वीच परिचय होता. हे मोठे नम्र आणि विनयी आहेत. अमेरिकन विश्वविद्यालयाचे हे एम्.एस्सी. असूनहि साध्या मजुराप्रमाणें हे हिन्दी माणसाच्या सेवेंत तत्पर असतात. साधेपणा आणि सेवाव्रत धारण करून हिंदुस्थानांतून आलेल्या विद्यार्थ्यांना हे साहाय्य करीत असतात. यांना हिंदुस्थानांत जाण्याकरितां पासपोर्ट मिळत नाहीं.'

अमेरिकेंत न्यूयॉर्क शहरीं भारतीय विद्यार्थ्यांनीं

स्थापन केलेली 'दि हिंदुस्थान असोसिएशन ऑफ अमेरिका' या नांवाची एक सुप्रसिद्ध संस्था आहे. तिच्या आद्य संस्थापकांपैकीं हे एक आहेत. या संस्थेतर्फे 'दि हिंदुस्थानी स्टुडंट' या नांवाचें एक नियतकालिक प्रसिद्ध होत असतें. हे स. १९२४ सालीं जर्मनींतून मेक्सिकोंत गेल्यावर कांहीं दिवसांनीं यांना तेथील 'नॅशनल अग्रिकल्चर कॉलेजां'त कृषिशास्त्राच्या प्रोफेसराची जागा मिळाली.

हे स. १९२४ पासून अमेरिकेंत मेक्सिको देशांत वास्तव्य करून आहेत. यांनीं तेथील वास्तव्यांत कृषिविषयक जें महत्त्वाचें संशोधन केलें व पिकांबद्दल जे उपयुक्त शोध लावले, त्याबद्दल तेथील सरकारकडून व अन्य संस्थांकडून यांचा मोठा गौरव करण्यांत आला. विशेषतः तेथील 'नॅशनल ॲकॅडमी ऑफ सायन्स' या विख्यात वैज्ञानिक संस्थेकडून यांचा जो अपूर्व सन्मान करण्यांत आला तो भारतवर्षाला व विशेषतः महाराष्ट्राला खचित अभिमानास्पद वाटण्यासारखा आहे.

कलकत्त्याच्या 'मॉडर्न रिव्ह्यू'चे संपादक रामानंद चतर्जी यांच्याच संपादकत्वाखालीं हिन्दींत निघणाऱ्या 'विशालभारत' नांवाच्या पत्रांत श्री. भवानीदयाल संन्यासी यांनीहि यांच्या आतिथ्यशीलतेची प्रशंसा करून यांना हिंदुस्थानांत येण्याबद्दल पासपोर्ट मिळत नसल्याबद्दल तक्रार केली ( १९२८ डिसें. ).

यांची 'दुर्जल कृषि' नांवाची लेखमाला पुणें येथें चित्रशाळेतर्फे प्रसिद्ध होणाऱ्या चित्रमयजगत् या मासिकांत क्रमशः तीन वर्षे ( १९१३, १९१४, १९१५ ) मध्यें प्रसिद्ध झाली आहे ( आनंदराव जोशी–पुरुषार्थ १९४१ मे ).

यांनीं गवतापासून अन्न तयार करण्याचा शोध लावला आणि तो ब्राझील सरकारला दिला. तसेंच गव्हासंबंधीं यांनीं अनेक शोध लावलेले आहेत.

**खानसाहेब, डॉक्टर**—( जन्म स. १८८३ ) सरहद्द प्रान्तांतील राष्ट्रसभेचे मुख्य प्रधान.

हे सरहद्दगांधी अबदुल गफारखान यांचे थोरले बंधु. हे पेशावर येथें मिशन स्कूलमध्यें शिकून मॅट्रिक झाले आणि मुंबईच्या मेडिकल कॉलेजांत एक वर्ष काढून हे इंग्लंड येथें गेले. तेथें एम्. आर्. सी. एस्. ही पदवी मिळवून हे पहिल्या महायुद्धांत सामील झाले. महायुद्धानंतर देखील हे फ्रान्समध्यें काम करीत होते. पुढें इकडे सत्याग्रहाची चळवळ सुरू झाली तेव्हां यांना मोठ्या मुष्किलीनें इकडे येण्याची परवानगी मिळाली. हे इकडे आले तेव्हां घरांतील बहुतेक माणसें तुरुंगांत होतीं. ही स्थिति पाहतांच यांनीं तिकडील नोकरीचा राजीनामा दिला व पेशावर येथें आपला डॉक्टरीचा धंदा सुरू केला.

काँग्रेसनें मंत्रिमंडळ स्वीकारलें तेव्हां हे मुख्य प्रधान होते. पुढें काँग्रेसनें मंत्रिमंडळाचा त्याग केला तेव्हां यांनीं तें सोडलें. पुनः यांनीं मंत्रिमंडळ बनविण्याची जबाबदारी पत्करून हे मुख्य मंत्री झाले ( मार्च १९४५ ). यांनीं एका युरोपियन स्त्रीशीं विवाह केला असून यांचीं मुलेंहि चळवळींत भाग घेणारीं आहेत ( खान बंधू–प्रेमा कंटक ).

**खानापूरकर, विनायक पांडुरंग**—( जन्म स. १८५८–मृत्यु स. १९१९ ) सुप्रसिद्ध गणितज्ञ ज्योतिषी.

हे जामदग्न्यगोत्री ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. सातारा जिल्ह्यांतील खानापूर येथें राहणारे होत. यांचें संस्कृत भाषा, व्याकरण, ज्योतिष इत्यादिकांचें अध्ययन जुन्या पद्धतीनें झालें असून शिवाय युरोपीय गणित आणि ज्योतिष यांचें अध्ययन केरोपंत नाना छत्रे, रावजी मोरेश्वर देवकुळे यांजपाशीं झालें. स. १८७५ मध्यें पुणें येथें वेदशास्त्रोत्तेजक सभा सुरू झाली, तिजपुढें यांची भारतीय ज्योतिष आणि संस्कृत व्याकरण यांची परीक्षा झाली.

वैनायकीय द्वादशाध्यायी या नांवाचा ताजक ग्रंथ वर्षफल करण्यास फार सोयीचा असा यांनीं केला आहे. तसेंच कुंडसार, अर्घकांड, युक्लिडच्या दोन पुस्तकांतील सिद्धान्तांच्या प्रतिज्ञांचा वृत्तबद्ध संस्कृत अनुवाद, सिद्धान्तसार हे संस्कृत ग्रंथ यांनीं केले आहेत. सिद्धान्तसार ग्रंथांत पृथ्वीच्या गति इत्यादिकांचें विवेचन आधुनिक मताप्रमाणें केलें आहे. भास्करीय लीलावती, बीज, गोलाध्याय व गणिताध्याय यांचें मराठी भाषान्तर यांनीं सोपपत्तिक केलें आहे ( भा. ज्यो. इ. पा. ३०७ ).

**खापर्डे, गणेश कृष्ण**—( जन्म स. १८५४–मृत्यु स. १९३८ ) सुप्रसिद्ध वकील, विद्वान्, वक्ते व सार्वजनिक कार्यकर्ते पुरुष.

यांचा जन्म निजाम राज्यांत इंगोली येथें झाला. त्या दिवशीं गणेशचतुर्थी असल्यामुळें यांचें गणेश असें नाव ठेवण्यांत आलें. तथापि लोकांत हे दादासाहेब या नांवानें प्रसिद्ध होते. यांचें मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण नागपूर, उमरावती व अकोला येथें झालें. त्याच वेळीं यांनीं संस्कृतचें अध्ययन त्या वेळीं प्रसिद्ध असणारे नारायणशास्त्री पिंजरकर यांचेपाशीं शास्त्रशुद्ध पद्धतीनें केलें. त्याचा परिणाम यांच्यावर सबंध आयुष्यभर आढळून येत असे. स. १८७३ सालीं हे मुंबईस एलिफन्स्टन कॉलेजांत दाखल झाले. क्रमानें बी. ए. होऊन (१८७७) चार वर्षे फेलोशिपचा उपभोग घेऊन एल्‌एल्. बी. झाले (१८८३). स. १८८४-८९ पर्यंत एक्स्ट्रॉ असिस्टंट कमिशनर म्हणून नोकरी करून स. १८९० सालीं यांनीं नोकरी सोडून वकीलीला सुरुवात केली.

वकिलीला आवश्यक असणारे गुण तर यांच्याजवळ होतेच. शिवाय विद्वत्ता, मोहक वाणी, सरकारी कामाचा अनुभव यांमुळें लवकरच हे वऱ्हाडांतील प्रमुख वकील बनले. फौजदारी खटल्यांतील मार्मिक व शोधक पण गोड उलट तपासणीमुळें आणि दिवाणी खटल्यांतील सूक्ष्म विवेचनामुळें यांचा दर्जा सारखा वाढतच चालला. पैशाचा तर यांच्यावर नुसता पाऊस पडे. एके वर्षी यांना ऐंशी हजार रुपये मिळाल्याचा दाखला आहे.

या यांच्या उत्कर्षाबरोबरच सार्वजनिक कार्यांतहि यांनीं पदार्पण केलें. स. १८९५ पासून सरकारनें काढून टाकीपर्यंत हे उमरावती म्युनिसिपालिटीचे व्हा. चेअरमन होते. म्हणजे तेव्हांचे त्या संस्थेचे सर्वात मोठे लोकनियुक्त अधिकारी होते. उमरावती जिल्हा बोर्डाचे कित्येक वर्षे अध्यक्ष होते (१८८९-१९०७). एवढेंच कीं, दरम्यान हे सरकारनियुक्त अध्यक्ष नेमले गेल्यामुळें यांना उपाध्यक्ष म्हणण्यांत येई.

यांच्या कार्यकर्तृत्वामुळें स. १८९२ सालीं नागपूर येथें भरलेल्या सामाजिक परिषदेचें अध्यक्षस्थान व स. १८९७ सालीं उमरावती येथें भरलेल्या राष्ट्रीय सभेचें स्वागताध्यक्षपद यांनाच देण्यांत आलें.

कॉंग्रेसमध्यें यांनीं अनेक परिणामकारक भाषणें केलीं. यांपैकीं, मुंबई (१८९८), मद्रास (१९०३) व काशी (१९०५) येथील लॉर्ड कर्झनच्या धोरणावर केलेलें उपरोधिक भाषण हीं तीन भाषणें यांचीं फार प्रसिद्ध आहेत. स. १९०५ सालीं मध्यप्रान्त-प्रांतिक परिषदेचें अध्यक्षस्थान यांनाच देण्यांत आलें होतें.

हे स्वाभिमानी असल्यानें प्रथमपासूनच राष्ट्रीय विचाराचे होते. पण यांची एक सून श्रीमंत बाबामहाराज पुणें यांची कन्या असल्यामुळें आणि त्यांची सर्व जिनगी श्रीमंत जगन्नाथमहाराजांच्या हातीं जाईपर्यंत बाबामहाराजांच्या जिनगीचे हे एक ट्रस्टी असल्यामुळें लोकमान्य टिळकांशीं यांचा परिचय झाला व स्नेह वृद्धिंगत होत गेला, व हे राष्ट्रीय पक्षाशीं एकरूप झाले. पुढें तर हे असें स्पष्ट सांगत कीं, 'मी एका लोकमान्य टिळकांखेरीज जन्मांत कधीं कोणाचा अनुयायी झालों नाहीं.'

स. १९०७ सालीं यांच्यावर सरकारी रोष होऊन यांना उमरावती शहर म्युनिसिपालिटीच्या उपाध्यक्षपदावरून काढून टाकण्यांत आलें, तेव्हां यांनीं जिल्हाबोर्डाचें उपाध्यक्षत्वहि सोडून दिलें. यांच्याविषयीं सहानुभूति व सरकारचा निषेध करण्याकरितां सर्व लोकनियुक्त सभासदांनींहि राजीनामे दिले. या वेळीं यांनीं निर्भयपणें राष्ट्रीय पक्षाचा पुरस्कार करून कोणताहि धोका पत्करण्याची तयारी दाखविली.

कॉंग्रेसच्या सुरक्षितपणाकरितां फिरोजशाह मेथा यांनीं नागपूर हें तिचें पूर्वनियोजित स्थळ रद्द करून ती सुरतेस भरविण्याचें निश्चित केलें (१९०७), तेव्हां सुरत येथें आपल्याला अनुकूल भूमिका उत्पन्न करण्याकरितां लो. टिळकांनीं यांनाच तेथें पाठविलें. यांनींहि पण पक्षकारांची घेतलेली फी परत करून १६ डिसेंबरला सुरत गांठली. आणि मराठी, उर्दू, हिंदी, संस्कृत वगैरे भाषांप्रमाणेंच गुजराथी भाषेंतहि आपलें मोहक, विनोदी आणि विलक्षण परिणामकारक वक्तृत्व चालवून यांनीं तेथील वातावरण बदलून टाकलें. स. १९०८ सालीं टिळकांना पकडल्याचें कळतांच वडिलांचें दुसरे दिवशींचें श्राद्ध व इतर कामें बाजूस सारून हे मुंबईस येऊन त्यांच्या सन्निध दाखल झाले, व शिक्षा होतांच हे अपील वगैरे खटपटीकरितां परस्पर मुंबईहूनच इंग्लंडला रवाना झाले. खटपटीला यश न येतांच हे परत आले व मंडाले येथें टिळकांना भेटून सव्वादोन वर्षांनीं पुनः घरीं गेले. त्या अवधींत यांच्या वृद्ध माता मुक्ताबाई ७३ वर्षांच्या होऊन मृत झाल्या होत्या. त्यांची यांची अखेरची भेटहि झाली नाहीं.

टिळक सुटून आल्यावर पुनः राजकीय चळवळीस रूप येऊं लागलें. कॉंग्रेसमध्यें राष्ट्रीय पक्षानें शिरावें असें ठरतांच त्या प्रश्नाचा निर्णय करण्याकरितां बेळगांव येथें

मुंबई प्रांतिक परिषदेचें अधिवेशन भरविण्यांत आलें (१९१ ). त्या परिषदेचें अध्यक्षस्थान टिळकांनीं यांनाच दिलें. त्या वेळचें यांचें भाषण अत्यंत मार्मिक व विचारपूर्ण असें आहे.

स. १९१७ सालीं भारतमंत्री मॉंटेग्यु राजकीय सुधारणांबाबत चौकशी करण्याकरितां हिंदुस्थानांत आले तेव्हां त्यांना भेटण्याकरितां दिल्लीस गेलेल्या कॉंग्रेस डेप्युटेशनमध्यें हे होते. तसेंच दिल्लीच्या कौन्सिलांतहि हे होते (१९१८). मॉंटफोर्ड सुधारणा अंमलांत आल्यावर 'कौन्सिल ऑफ स्टेट'मध्यें हे निवडून आले व तेथें यांनीं उत्कृष्ट कामगिरी केली. स. १९१९ सालीं खांडवा येथें भरलेल्या वऱ्हाड-मध्यप्रान्त प्रांतिक परिषदेच्या अध्यक्षस्थानीं यांची योजना झाली होती. थोड्याच दिवसांनंतर कॉंग्रेस डेप्युटेशनमधून हे इंग्लंडास गेले. तेथें यांचा मुक्काम तेव्हां ७-८ महिने होता. तेथील यांच्या इंग्रजींतील विनोदी वक्तृत्वामुळें यांची इतकी प्रसिद्धि झाली कीं, यांना तेथील वृत्तपत्रांनीं 'हिन्दी मार्क ट्वेन' म्हणून टोपण नांव दिलें.

स. १९२० सालीं लोकमान्य मुंबईस विशेष आजारी आहेत असें कळतांच हे ताबडतोब मुंबईस आले. शेवटीं त्यांचें देहावसान होतांच यांनीं आपली कर्तव्यबुद्धि जागृत ठेवून सर्वांस सुचविलें कीं, 'बळवंतरावांसारखा पुरुष पुनः आतां होणें नाहीं, व आपल्यांपैकीं कोणाहि एकाला त्यांचें काम पुढें चालवितां येणें शक्य नाहीं. तेव्हां आपण आतां त्यांच्याच शपथा घेऊन अखिल महाराष्ट्रासाठीं एक मंडळ नेमून त्याच्या सल्ल्यानेंच सर्वजण चालत जाऊं. असें करूं तरच आपला निभाव लागेल व त्यांचें कठीण कार्य आपण पुढें चालवूं शकूं.' पण ही यांची सूचना अनेक कारणांनीं त्या वेळीं अमलांत आली नाहीं.

असहकारितेचा ठराव प्रथम ज्या कॉंग्रेसमध्यें पास झाला त्या कलकत्त्याच्या (१९२०) व त्यानंतरच्या नागपूरच्या कॉंग्रेसला (१९२१) हे गेले होते. पण यांच्या सांगण्याचा तेथें परिणाम झाला नाहीं. तेव्हांपासून देशांत असहकारितेची चळवळ सुरू झाली व हे राजकारणांतून प्रायः निवृत्त झाले.

त्यानंतर श्रीजगन्नाथमहाराजांच्या दाव्याकरितां हे इंग्लंडला गेले व तिकडे पांच महिने होते (१९२३). पुण्याचें टिळक स्मारक-मंदिर उघडण्याचा समारंभ यांचेच हस्तें झाला. त्या वेळीं यांनीं केलेल्या अतिसुंदर भाषणामुळें महाराष्ट्राच्या राजकारणाला वळण लागण्यास अतिशय मदत झाली. स. १९२८ ऑक्टोबरांत यांच्या पत्नी सौ. लक्ष्मीबाई ऊर्फ आईसाहेब वारल्या. आणि आपला सार्वजनिक व्याप यांनीं अगदीं सोडला.

यांच्या घरीं नित्य पंक्तीस घरच्या मंडळीइतकी तरी पाहुण्यांची गर्दी असे. नेहमीं ५०-६० विद्यार्थ्यांना तरी फी, पुस्तकें, भोजन वगैरेपैकीं कांहींची तरी मदत होत असे. मधुकरी इतकी वाढण्याचा परिपाठ असे कीं, मधुकऱ्याचें एक वेळचें पोट यांच्या घरच्या अन्नानें भरावें.

यांच्या उंच, भव्य शरीरयष्टीप्रमाणेंच यांचा पोषाखहि नेहमीं भपकेदार व वैशिष्ट्यपूर्ण असे. विशेषतः यांचा भरजरी फेटा डोक्यावर श्रींच्या वेलांटीप्रमाणें मोठ्या भपकेदारपणें उभवून डोक्याला लपेटलेला असे. त्यामुळें यांच्याकडे कोणाचेंहि सहज लक्ष वेधे. औदार्यपूर्ण व खर्चिक वागणूक, भपकेदार पोषाख आणि भारदस्त खुमासदार भाषण यांमुळें यांना लोक 'वऱ्हाडचे नबाब' या टोपण नांवानें संबोधीत.

**खांडेकर, विष्णु सखाराम**—(जन्म स. १८९८) महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध कथालेखक, कादंबरीकार व टीकालेखक.

यांचे वडील आत्मारामपंत सांगलीस मुन्सफ होते. परंतु कोंकणांतील आपल्या एका जमीनदार चुलत्याला दत्तक गेल्यानें हे विष्णु सखाराम बनले (१९१६). वडील पूर्वींच वारले असल्यानें (१९११) व दत्तक वडिलांशीं यांचें कधींच जमूं न शकल्यानें शिक्षण व मनः-स्वास्थ्य यांना हे मुकले. वकिलीची परीक्षा देऊन काल कंठणें शक्य असतांहि, आगरकरांच्या त्यागी जीवनाची चमत्कारिक छाप मनावर शाळेंत असले वेळेपासूनच बिंबली गेली असल्यानें यांनीं कोंकणांतील शिरोड्याला 'ट्यूटोरियल इंग्लिश स्कूल' नांवाची शाळा काढली (१९२०), व ती नांवारूपास आणण्याची जिवापाड मेहनत घेतली. आतां यांचा या शाळेशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध नाहीं.

उत्कृष्ट कल्पनासौंदर्य बाळगणारे एक रसिक लेखक या दृष्टीनें सर्वसाधारण मराठी वाचक यांना ओळखतात. परंतु यापेक्षांहि महाराष्ट्रांत प्रचलित होऊं पाहणाऱ्या 'जीवनासाठीं कला' या विचारप्रणालीचे जनक या

दृष्टीनें यांस विशिष्ट महत्त्व आहे. सुसंगति, स्वभाव-चित्रण किंवा प्रसंगीं लालित्य या बाह्य गोष्टींपेक्षां वाचकाला पुनःप्रत्यय पटवून प्रत्यक्ष जीवनांत उपयोगी पडणारे नवीन संदेश देणारें वाङ्मय उत्पन्न करणें हें वाङ्मयसेवकाचें कार्य आहे, अशा प्रकारची विचारसरणी यांनीं या वादामध्यें गोवलेली आहे.

अर्थातच याशिवाय अन्य दृष्टिकोनांतून ' कांचनमृग ', ' उल्का ', ' क्रौंचवध ' हें यांचें कादंबरी-वाङ्मय, ' नवमल्लिका ', ' पहिली लाट ', ' घरट्याबाहेर ' हे यांचे कथासंग्रह किंवा ' छाया ', ' देवता ', ' संगम ' या यांच्या पटकथा तपासून पाहणाऱ्या वाचकांची थोडी निराशाच होण्याचा संभव आहे.

**खांबेटे, महादेव लक्ष्मण**—( जन्म स. १८६८ ) प्रसिद्ध वकील, व्यापारी व रत्नपारखी. यांचा जन्म आंजर्लें येथें झाला. रत्नागिरी हायस्कुलांतून मॅट्रिक होऊन ( १८८९ ) हे डिस्ट्रिक्ट प्लीडर झाले (१८९३). यांनीं १९१४ पर्यंत खानदेशांत जळगांवीं वकिली केली.

१९०२–२७ पर्यंत सोन्या-चांदीच्या मालाचें व मोतीं-जवाहिरांचें दुकान यांनीं घातलें. त्याचप्रमाणें दागिने व भांड्यांचा कारखाना चालविला. त्याबद्दल अनेक ठिकाणांहून पदकें व प्रशस्तिपत्रें मिळालीं.

जळगांव नगरपालिकेंत सभासद, कार्याध्यक्ष व उपाध्यक्ष म्हणून कामें केलीं. खांबेटे व्यायामशाळा १५०० रु., आंजर्लें इंग्रजी शाळा १२०० रु., जळगांव हायस्कूल १००० इत्यादि पुष्कळ देणग्या दिल्या.

जवाहिराचा व्यापार सुरू केल्यावर मौल्यवान् धातु, मोतीं व रत्नांचा अभ्यास केला, व त्यासंबंधीं मौक्तिक-प्रकाश, रत्नप्रदीप ( दोन खंड ) असे तीन सुंदर शास्त्रीय ग्रंथ प्रसिद्ध केले. या ग्रंथांत यांचा अभ्यास व अनुभव चांगला व्यक्त झाला आहे.

**खुदाबक्ष, मुहम्मदबक्ष, खानबहादूर**—(जन्म स. १८४२–मृत्यु स. १९०८ ) पाटणा ओरिएन्टल पब्लिक लायब्ररीचे संस्थापक. तीच लायब्ररी पुढें ' खुदाबक्ष लायब्ररी ' म्हणून यांच्या नांवानें प्रसिद्ध झाली. यांनीं लायब्ररीच्या इमारतीकरितां ऐंशीं हजार रुपये खर्च केले ( १८९१ ). हे सुप्रसिद्ध वकील असून निजामसंस्थानच्या हायकोर्टचे हे मुख्य न्यायाधीश होते ( १८९४–९८ ). यांचा जन्म बिहारमधील चाप्रा गांवीं झाला.

यांनीं पाटणा ओ. प. लायब्ररी तेथील हस्तलिखितें पाटण्याच्या बाहेर हलवावयाचीं नाहींत, या अटीवर सार्वजनिक केलेली आहे. या वाचनालयांत मुसलमानी वाङ्मयाचा अतिशय उत्तम संग्रह आहे. त्यांत अरबी, फारशी व इराणी भाषेंतील अत्यंत दुर्मिळ व महत्त्वाचे हस्तलिखित ग्रंथ आहेत.

जुन्या मुसलमानी जगांत वाङ्मय व ज्ञान या दोन्ही शाखांत तत्कालीन पंडितांनीं प्रगट केलेल्या चांगल्या-वाईट समजुतींची यथार्थ कल्पना आणून देणारा अमोल पुस्तकसंग्रह अशी त्याची जगभर प्रसिद्धी आहे. आपल्या वडिलांच्या अखेरच्या इच्छेला मान देण्याकरितां यांनीं या कार्यांत लक्ष घातलें. पण तेंच पुढें यांचें जीवितकार्य होऊन बसलें. दुर्मिळ हस्तलिखित ग्रंथ जमविणें व त्यांचा ज्ञानेच्छु लोकांकडून उपयोग झालेला पाहणें यांतच यांचा सर्व आनंद सामावला जाऊं लागला. कधींकधीं तर आपल्या मासिक प्राप्तीपेक्षांहि जास्त खर्च हे या ग्रंथ-संग्रहाकरितां करीत. यांच्याजवळ प्रथम १४०० हस्त-लिखितें होतीं. तीं वाढवीत हा संग्रह सार्वजनिक करिते वेळीं ४००० झालीं व यांच्या मृत्युसमयीं ती संख्या ५००० पर्यंत गेली होती. यांमध्यें डी. सॅकी, सर जॉर्ज औसले व मि. ब्लॉकमान यांसारख्या तज्ज्ञ प्राच्यविद्या-पंडितांनीं जमविलेल्या हस्तलिखितांचाहि संग्रह करण्यांत आला. ' महबूब-उल्-अल्बाब ' या आपल्या हस्तलिखितांच्या संग्रहाची यांनीं केलेली सूची प्रसिद्ध आहे.

सर डेन्शन रॉस व सर चार्लस लॉयल यांचेमुळें लॉर्ड कर्झन यांचें लक्ष या संग्रहाकडे गेलें. तेथील अपूर्व व अमोल संग्रह पाहून ते तर थक्कच झाले. त्यांनीं वाचनालयाकरितां इमारत व हस्तलिखितांची सूची या दोन कामाकरितां सरकारी मदत देण्याची ताबडतोब व्यवस्था केली. त्याप्रमाणें सर डेन्शन रॉस यांच्या नेतृत्वानें तयार झालेली तेथील हस्तलिखितांची अनेक खंडात्मक सूची सरकारनें प्रसिद्ध केली आहे.

मृत्युपूर्वी यांनीं प्रकट केलेल्या इच्छेस अनुसरून यांचा दफनविधि यांच्या प्रिय ग्रंथसंग्रहालयाचे आवारांतच उरकण्यांत आला.

**खेर, बाळ गंगाधर**—( जन्म स. १८८८ ) सुप्रसिद्ध काँग्रेसकार्यकर्ते व मुंबई इलाख्याचे माजी मुख्य प्रधान.

जन्मस्थान रत्नागिरी. नगर सोसायटी हायस्कूलमधून मॅट्रिक व मुंबई, विल्सन कॉलेजमधून बी. ए. (१९०६).

संस्कृतचें 'भाऊ दाजी' पारितोषिक मिळालें. नंतर १९०८ मध्यें एलएल. बी. झाले व सॉलिसिटर फर्ममध्यें नांव नोंदविलें (१९०९). स. १९१२ मध्यें युरोप व अमेरिकेचा प्रवास करून परत आले. परत आले तेव्हां जवळ खिशांत अवघे दोन रुपये होते. तेव्हां नोकरी-करितां वर्तमानपत्रांत पुढीलप्रमाणें जाहिरात दिली: 'डबल ग्रॅज्युएटला नौकरी पाहिजे आहे.' त्यावरून न्या. बीमन यांनीं यांना आपले सेक्रेटरी म्हणून बोलाविलें. न्यायमूर्ति डोळ्यांनीं जवळजवळ अंध होते. स. १९१६ मध्यें हे न्यायमूर्तींबरोबर पुनः परदेशांत प्रवासास निघाले. परत आल्यावर मणिलाल नानवटी-बरोबर सॉलिसिटरची फर्म चालू केली (१९१८). तिचें उद्घाटन न्या. बीमन यांच्या हस्तें केलें, आणि त्याच व्यवसायांत उत्तम यश संपादन केलें.

सामाजिक कार्य तेव्हांपासून चालू होतेंच. राज-कारणाकडे तर लहानपणापासूनच ओढा होता. गांधींच्या राजकारणाकडे अभ्यासपूर्वक यांनीं लक्ष दिलें (१९२२). तेव्हां हे स्वराज्यपार्टीचे व बार्डोली चौकशी कमेटीचे सेक्रेटरी होते. यांनीं मुंबईत हरिजनांच्या उद्धारार्थ एकसारखे प्रयत्न चालू ठेविले. महाराष्ट्र हरिजन-सेवक-संघाचे हे अध्यक्ष होते. स. १९३० मध्यें मीठसत्याग्रहांत यांनीं भाग घेतला व यांना ८ महिने सश्रम कारावास व २५० रु. दंड झाला. स. १९३२ मध्यें यांना दोन वर्षें कारागृहवास भोगावा लागला. यांच्या या एकनिष्ठ व गोडव्या कार्याचा परिणाम म्हणून स. १९३७ सालीं राष्ट्रसभेचीं मंत्रिमंडळें स्थापन झालीं, तेव्हां मुंबई प्रान्ताचें मुख्य मंत्रिपद यांच्याकडे आपण होऊन चालत आलें, आणि यांनींहि पण तें अत्यंत यशस्वीपणें चालवून आपला व राष्ट्रसभेचा लौकिक वाढविला.

पुढें दुसरें महायुद्ध सुरू होतांच सरकारचा युद्ध-हेतु स्पष्टपणें जाहीर होईना, म्हणून राष्ट्रसभेच्या मंत्रिमंडळानें राजिनामे दिले. तेव्हां यांनींहि राजीनामा दिला. ८ ऑगष्ट १९४२ च्या 'चलेजाव' घोषणेमुळें सर्व राष्ट्रसभेचे पुढारी तुरुंगांत गेले; त्यांत हेहि तुरुंगांत गेले. जवळजवळ दोन वर्षानंतर तुरुंगांतून सुटून येतांच यांनीं सर्व प्रान्तभर हिंडून विधायक कार्यास सुरुवात केली.

हे बहुभाषाकोविद आहेत. कानडी साधारण व गुज-राथी भाषाहि हे सफाईदारपणें हाताळूं शकतात. कायदे-भंगाच्या चळवळींत हजारों लोक तुरुंगांत गेले, पण आपणास अपमानकारक वाटणाऱ्या अटींना मान न तुकवितां प्रत्यक्ष आपल्या जन्मदात्याच्या अन्त्यदर्शना-साठीं तुरुंगांतून बाहेर पडण्याचें यांनीं नाकारलें. अत्यंत ध्येयनिष्ठ, बुद्धिमान्, निग्रही, सच्छील, चारित्र्यसंपन्न व अजातशत्रु असा यांचा लौकिक आहे, आणि अधिकाराचा उपभोग घेतल्यानंतरहि यांनीं तो टिकविला आहे.

## ग

**गजेन्द्रगडकर, राघवेन्द्राचार्य वेंकटाचार्य**— (जन्म स. १७९२–मृत्यु स. १८५२) विख्यात संस्कृत पंडित. धारवाड जिल्ह्यांत निजामच्या राज्याच्या सीमेवर गजेन्द्रगड या नांवाचा एक किल्ला आहे. त्याच किल्ल्या-वर यांचा जन्म झाला. यांच्या मातेचें नांव सावित्री. पिता लवकर वारल्यानें यांचें पालनपोषण मातेनेंच केलें. सांगलीजवळील हरिपुर गांवीं चुलते व्यासाचार्य यांच्या-जवळ प्राथमिक अध्ययन केल्यावर पंढरपुरीं विठ्ठलो-पाध्याय यांच्याकडे हे उच्च शिक्षणाकरितां गेले. तेथें प्रसिद्ध पंडित पंढरपूर कृष्णाचार्य, हुलगी कृष्णाचार्य इत्यादि यांचे सहाध्यायी होते. विठ्ठलोपाध्याय हे धर्म-सिंधुकार काशीनाथोपाध्याय यांचे बंधु व गदाधरीचे व्याख्याकार कृष्णंभट आर्डे यांचे शिष्य होत. ते तेथील न्यायाधीश असल्यानें त्यांना शिकविण्यास वेळ मिळेना म्हणून हे ज्ञानसूर्य म्हणून प्रसिद्ध असलेल्या नागोजी-भट्टाच्या परंपरेंतील नीळकंठशास्त्री थत्ते यांच्याकडे पुणें येथें येऊन राहिले. यांची बुद्धिमत्ता पाहून थत्त्यांनीं यांना सकुटुंब होते तरी घरीं आश्रय देऊन निष्णात केलें. तेथें यांचे सहाध्यायी भास्करशास्त्री अभ्यंकर, मेरुशास्त्री गोडबोले व कुप्पाशास्त्री द्रविड वगैरे पंडित होते. असे निष्णात शिष्य तयार झाल्यावर अखेरचे दिवस काशीस घालविण्याच्या हेतूनें ते निघाले. हे त्यांना नाशिकपर्यंत पोंचविण्यास गेले होते. पुण्यास कांहीं दिवस राहून हे गजेन्द्रगडाकडे निघाले असतां यांना सातारच्या छत्रपतींनीं आश्रय देऊन ठेवून घेतलें. तेथें यांच्याकडे देशोदेशींचे एका वेळीं २०० पर्यंत विद्यार्थी

शिकत असत. त्यांची सर्व प्रकारें तेथें व्यवस्था होत असल्यानें घराला गुरुकुलाचें स्वरूप असे. कर्नाटकांतील प्रसिद्ध वैय्याकरण हन्नुरदासाचार्य, त्यांचे बंधु खुब्बाचार्य, बापुशास्त्री पटवर्धन, अनंतशास्त्री पेंढारकर वगैरे यांचे शिष्य होत.

पूर्वमीमांसेचें अध्ययन केल्यावांचून उत्तरमीमांसेचें अध्ययन विफल होय, हें जाणून यांनीं श्रौताग्न्याधानपूर्वक पूर्वमीमांसेचें अध्ययन केलें होतें. प्रातःकाळीं अग्नीची उपासना झाल्यावर देवघराच्या पुढील सोप्यावरून हे सकाळीं विद्यार्थ्यांना वेदान्ताचे पाठ देत आणि भोजनोत्तर इतर दर्शनांचे पाठ चालत. असें सतत वीस वर्षें अध्यापन-कार्य यांनीं सातान्यास केलें. यानंतर ग्वाल्हेरनराधीशानें प्रधानन्यायाधीशपदावर यांची नेमणूक केल्यावर हे ग्वाल्हेरला गेले. पण तेथें जातांच यांचा कनिष्ठ पुत्र वामनाचार्य काशीस महामारीनें मृत्यु पावल्याची दुःखद वार्ता ऐकतांच यांनीं न्यायाधीशाची जागा सोडली व हे ब्रह्मावर्ती गंगातटाकीं येऊन राहिले व तेथें यांनीं आपलें शेष आयुष्य सत्कर्मात व्यतीत केलें. यांचे ग्रंथ—व्याकरण-१ विषमी, २ चंद्रिका (या दोन्ही शब्देंदुशेखरा-वरील टीका आहेत. पहिली मुद्रित व दुसरी अमुद्रित), ३ प्रभा (कौस्तुभव्याख्या, अमुद्रिता), ४ त्रिपथगा (परिभाषेन्दुशेखरव्याख्या—मुद्रिता), ५ प्रभा (शब्द-रत्नव्याख्या—अमुद्रिता. या टीकेंत स्वकृत भाष्यटीकेचा निर्देश आहे पण ती उपलब्ध नाहीं). वेदान्त—६ विष्णु-सहस्रनामटीका (मुद्रित), ७ नारायणोपनिषद्व्याख्या (मुद्रित), ८ उपाधिखंडनटीका (अमुद्रित), ९ गीता-टीका ( ,, ), १० श्वेताश्वतर टीका ( ,, ), ११ रामतापिन्यादि उपनिषद्व्याख्या ( ,, ).

यांचे तृतीय पुत्र रामाचार्य हे ग्वाल्हेर राज्याचे आस्थान पंडित असल्यानें त्यांचें घराणें तिकडे आहे. यांचे द्वितीय पुत्र नारायणाचार्य यांचा वंश सातान्यास असून त्यांनीं यांच्या पांडित्याची परंपरा अखंड चाल-विली आहे.

**गजेन्द्रगडकर, नारायणाचार्य राघवेन्द्रा-चार्य**—(जन्म स. १८१८—मृत्यु स. १८७३) सुप्रसिद्ध संस्कृत पंडित. हे न्याय, वेदान्त, व्याकरणादि शास्त्रांत निष्णात होते. विद्यार्थी तयार करणें हा त्या वेळच्या पंडितांस असणारा छंद यांनाहि होता. तथापि यांची कीर्ति पुनर्विवाहवादामुळें विशेष झाली. पुणें येथें श्रीशंकराचार्यांच्या पुढें शके १७९१ फा. व. ११ ते १७९२ चैत्र शु. ३ पर्यंत नऊ दिवस हा वाद चालला. उभयपक्षांचे पांचपांच मिळून दहा पंच होते. गोपाळा-चार्य अण्णा कऱ्हाडकर हे सरपंच होते. विष्णुशास्त्री पंडित हे वादी व हे प्रतिवादी होते. पंडितांना न्या. रानडे, डॉ. भांडारकर वगैरे मदत करीत होते. त्यांना उत्तर देण्याचें काम यांच्याकडे होतें. शेवटीं पांच विरुद्ध चार अशा बहुमतानें पुनर्विवाह अशास्त्र, असा शंकराचार्यांनीं निर्णय दिला.

यांचे ग्रंथ—१ महावाक्यार्थखंडनम्, २ ब्रह्मानंदीखंडनम्, ३ ब्रह्मविद्याभरणखंडनम्, ४ श्वेताश्वतरोपनिषद्व्याख्या (मुद्रिता), ५ शंकरपादभूषणखंडनम्, ६ पुनर्विवाह-खंडनम्, ७ न्याये बहूनि कोडपत्राणि.

**गजेन्द्रगडकर, अनंताचार्य नारायणाचार्य**—(जन्म स. १८३५—मृत्यु स. १८९३) सुप्रसिद्ध संस्कृत पंडित. यांचा जन्म वाई येथें रड्डी यांच्या घरीं झाला. यांचें अध्ययन ब्रह्मावर्ती आजे राघवेन्द्राचार्य यांजपाशीं झालें. तेथें व्याकरण व न्यायशास्त्राचें अध्ययन पुरें केलें. स. १८६० चे सुमारास हे सातान्यास परत आले. तेथें आपले वडिलांच्या जवळ अद्वैतसिद्धि, न्यायामृत-चंद्रिका वगैरे ग्रंथांचें अध्ययन केलें व घराण्यांतील अध्यापनाचें कार्य सुरू केलें. स. १८७८ सालीं कऱ्हाड मुक्कामीं मायणीचे गर्बारे यांचे मुलाचे दत्तकासंबंधीं श्रीशंकराचार्यासमोर जो वाद झाला त्यांत हे मुख्य होते. स. १८८४ सालीं मद्रास येथें स्त्रीपुनर्विवाहाच्या अशास्त्रतेबद्दल दि. ब. रघुनाथराव यांनीं जो वाद उपस्थित केला त्यांत हे मुख्य होते. समयसूचकता व वक्तृत्व यांबद्दल यांची ख्याति असे. यांनीं शब्देन्दु-शेखराच्या तिङन्त प्रकरणावर केलेलें व्याख्यान अमुद्रित आहे.

**गजेन्द्रगडकर, बाळाचार्य अनंताचार्य**—(जन्म स. १८६२—मृत्यु स. १९२२) सुप्रसिद्ध संस्कृत पंडित. यांना अनेक ग्रंथ मुखोद्गत असत. द्वैत व अद्वैत वेदान्त यांनीं अनेकांना शिकविला. सुधातत्त्वप्रका-शिकादि ग्रंथ यांचे तयार असत. सदर ग्रंथांचें ठरलेलें अवलोकन करण्याचा यांचा क्रम आमरण चालू होता. पंजाब, म्हैसूर, जयपूर, पुणें, बडोदें वगैरे ठिकाणीं हे परीक्षक असत. विद्याव्यासंग, सरळपणा, आस्तिक-वृत्ति, जिज्ञासा व देशाभिमान यांचा यांच्या आचरणांत उत्तम मेळ दिसे. द्वैत-वेदान्तभूषण, पुराणभूषण, नरसिंहाचार्य (मृत्यु स. १९३५), सुप्रसिद्ध पंडित

व्याकरणनिष्णात विद्यावाचस्पति सेतुमाधवाचार्य ( मृत्यु स. १९३८ ), प्रो. अश्वत्थामाचार्य, एम्. ए. एल्फिन्स्टन कॉलेज, मुंबई, ( जन्म स. १८९१ ), केशवाचार्य बी. ए. एलएल्. बी. सातारा, मुंबई हायकोर्टाचे न्यायमूर्ति प्रल्हादाचार्य, एम्.ए., एलएल्. बी. ( जन्म स. १९०० ) हे यांचे पांच पुत्र होत.

**गजेन्द्रगडकर, न्यायमूर्ति प्रल्हादाचार्य बाळाचार्य**—( जन्म स. १९०० ) मुंबईचे सुप्रसिद्ध वकील व मुंबई हायकोर्टाचे न्यायाधीश.

लहानपणापासूनच हुषार विद्यार्थी म्हणून यांची ख्याति आहे. बी. ए.च्या परीक्षेत हे पहिल्या वर्गात पास झाल्यावर पुणें डेक्कन कॉलेजांत यांना 'दक्षिणा फेलो' नेमलें. हे एम्. ए.ची परीक्षा संस्कृत घेऊन पहिल्या वर्गांत पास झाले व यांना 'झाला' वेदान्त प्राइझ व भगवानदास शिष्यवृत्ति मिळाली. हे एलएल्. बी. झाल्यावर मुंबई येथें वकिली करूं लागले. तेथें वकील म्हणून इतका मोठा लौकिक अल्पवयांतच झाला कीं यांना हायकोर्टें न्यायाधीशाची जागा देण्यांत आली. धर्मकोशाच्या संपादकमंडळांत हे आहेत.

असें क्रमानें पांच पिढ्या पहिल्या प्रतीचे विद्वान् निर्माण करणारें घराणें क्वचितच आढळतें.

**गज्जर, त्रिभुवनदास कल्याणदास**—( जन्म स. १८६३–मृत्यु स. १९२० ) गुजराथमधील सुप्रसिद्ध रसायनशास्त्रज्ञ.

यांचा जन्म सुरत येथील सुतार जातीच्या कुटुंबांत झाला. हे मॅट्रिक झाल्यावर रसायनशास्त्र घेऊन मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजांतून पहिल्या वर्गात बी. एस्सी. ची परीक्षा पास झाले. एम्. ए. होऊन यांनीं कायद्याचाहि अभ्यास सुरू केला होता. पण यांच्या मनांत विज्ञान आणि रसायन यांसंबंधीं लोकहितार्थ अधिक काम करण्याची इच्छा होती. म्हणून यांनीं कराचीच्या सिंध कॉलेजमध्यें प्राध्यापकाचें काम पत्करिलें. पण श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांच्या आश्रयानें रासायनिक व्यवसाय करणें अधिक सोईचें म्हणून यांनीं बडोदा कॉलेजमध्यें रसायनशास्त्राच्या प्राध्यापकाची जागा पत्करिली.

बडोदा राज्यांत यांनीं रंगकामाच्या व्यवसायासंबंधीं अहवाल तयार केला, त्याची अंमलबजावणी करण्याकरितां छापकामाची व रंगकामाची प्रयोगशाळा काढली आणि व्यापक पायावर उद्योगसंस्थेची योजना आंखली. तदनुसार गायकवाड सरकारनें स. १८९० च्या जूनमध्यें बडोदा येथें कलाभवनाची स्थापना केली. त्या संस्थेचें यांना मुख्य नेमण्यांत आलें आणि यांनीं १८९६ पर्यंत ती संस्था भरभराटीस आणण्याकरितां पुष्कळ श्रम केले. याच वेळीं रंगविद्येंत पारंगत होण्याकरितां यांनीं जर्मन भाषेचें ज्ञान संपादन केलें आणि 'रंगरहस्य' नांवाचें त्रैमासिक सुरू केलें. कलाभवनाचा विकास होत होत तें उद्योगधंद्यांचें विद्यापीठ बनावें म्हणून यांनीं रात्रंदिवस प्रयत्न केले. पण यांची बदली निराळ्या खात्यांत होण्याचा प्रसंग येतांच या मानी गृहस्थांनीं कलाभवन सोडलें ( १८९६ ).

बडोद्याहून हे मुंबईस आले तेव्हां विल्सन कॉलेजमध्यें यांची रसायनशास्त्राचे प्राध्यापक म्हणून नेमणूक झाली. तेथें युनिव्हर्सिटी सुधारणेची चळवळ करून यांनीं रसायनशास्त्राचा निराळा अभ्यासक्रम तयार केला व अशा तऱ्हेनें रसायनशास्त्रांत निष्णात झालेले विद्यार्थी बाहेर पडण्याची व्यवस्था केली. या वेळीं मुंबईस प्लेगचा आजार सुरू झाला. तेव्हां यांनीं त्या आजारावर आयोडिन टरक्लोराइड नांवाचें औषध शोधून काढलें. परदेशी कंपन्या या औषधाच्या पेटंटकरितां यांना मोठी रक्कम देत असतांहि यांनीं ती घेतली नाहीं, व स्वतःहि त्याचें पेटंट घेतलें नाहीं. लोकांच्या उपयोगाकरितां त्याची कृति जाहीर केली. १८९८ मध्यें मुंबईच्या महाराणी व्हिक्टोरियाच्या पुतळ्याचे तोंडास कोणी तरी पक्का रंग फांसून तो काळा केला. तो रंग कोणालाहि काढतां येईना, तेव्हां यांनीं तो काढून तो पुतळा पूर्ववत् स्वच्छ केला.

आपल्या देशांत शास्त्रज्ञ तयार करण्याच्या तळमळीनें यांनीं १८९९ सालीं 'टेक्नोकेमिकल लॅबोरेटरी' नांवाची स्वतंत्र प्रयोगशाळा मुंबईस स्थापन केली. युनिव्हर्सिटी व मेडिकल कॉलेज या संस्थासुद्धां आपले विद्यार्थी तेथें प्रयोग करण्यास पाठवीत असत, अशी येथील ख्याति होती. यानंतर यांनीं कांहीं जातीच्या खऱ्या मोत्याचें कमी होणारें तेज त्यास पुन्हां प्राप्त करून देणारी रासायनिक क्रिया शोधून काढली.

यामुळें जगांतील रसायनशास्त्रज्ञांना यांनीं चकित केलें, यांची जगभर ख्याति झाली आणि या धंद्यांत यांनीं लाखों रुपये कमाविले. ती कमाई यांनीं रसायनशास्त्राच्या प्रचाराकरितां खर्च केली. १९०२ सालीं यांच्या योजना, प्रेरणा आणि अविश्रान्त श्रम यांच्या जोरावर बडोदा येथें 'अलेंबिक केमिकल वर्क्स' स्थापण्यांत आलें.

स. १९०२ सालीं श्री. गोवर्धनराम त्रिपाठींच्या सह यांनीं 'कल्याणग्राम' नांवाच्या एका नमुनेदार वसाहतीची योजना आंखली.

वैज्ञानिक संशोधन, त्याचा व्यवहारांत उपयोग करणारे कारखाने व त्यांमध्यें काम करणारे लोक यांचा या वसाहतींत प्रामुख्यानें समावेश करण्यांत आला होता. पण यांची आर्थिक स्थिति पुढें बदलल्यानें ती यशस्वी होऊं शकली नाहीं. १९१० मध्यें यांची पत्नी वारली आणि यांना निद्रानाशाचा आजार जडला. यांचे शेवटचे दिवस करुणापूर्ण आर्थिक अडचणींत गेले.

**गझनवी, अब्दुल करीम अबु अहमद**— (जन्म स. १८७२) बंगालमधील लोकप्रिय जमीनदार व सार्वजनिक कार्यकर्ते.

लंडनचें सेंट पीटर्स स्कूल, जर्मनींतील जेना व इंग्लंडमधील ऑक्सफर्ड विश्वविद्यालयांत आपलें शिक्षण संपवून हे हिंदुस्थानांत आले व यांनीं आपली मालमत्ता ताब्यांत घेतली (१८९४).

जुन्या इंपीरियल लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमध्यें हिंदु-मुसलमानांच्या हितसंबंधांसंबंधीं खटपट करून यांनीं आपल्या लौकिक आयुष्यास सुरुवात केली (१९०९-१२). यानंतर कांहीं दिवस मुसलमानांच्या हित-संरक्षणाकरितां बंगालतर्फे व्हाइसरॉयच्या एक्झिक्युटिव्ह कौन्सिलमध्येंहि यांनीं काम केलें (१९१३-१६). याच वेळीं यात्रेकरूंच्या रहदारीसंबंधीं चौकशी करण्याकरितां सिरीया, पॅलेस्टाइन व हेदजाझचे राजे हुसेन यांच्या दरबारीं गेलेल्या एका राजकीय मंडळावर यांची नेमणूक झाली होती (१९१३). कांहीं दिवस हे बंगाल सरकारचे प्रधानहि होते (१९२४-२७).

'Pilgrim Traffic to Hedjaz and Palestine'. व 'Moslem Education in Bengal' हीं यांचीं पुस्तकें प्रसिद्ध आहेत.

**गडकरी, राम गणेश**— (जन्म स. १८८५-मृत्यु स. १९१९) मराठींतील सुप्रसिद्ध प्रतिभाशाली कवि, नाटककार व विनोदी लेखक.

यांचा जन्म गुजराथमध्यें झाला. वयाचीं दहा वर्षे उलटण्यापूर्वीच पितृवियोगाची आपत्ति कोसळली. पण प्राप्त परिस्थितीला तोंड देत हे एकोणिसाव्या वर्षी प्रवेश-परीक्षा पास झाले. कॉलेजच्या पहिल्या वर्षांत अपयश आल्यानें हे किर्लोस्कर नाटक मंडळींत लहान मुलांचे शिक्षक बनले. तेथें श्री. कृ. कोल्हटकरांशीं परिचय होऊन त्याचें मैत्रींत रूपान्तर झालें व मंडळीबरोबर गांवोगांवीं हिंडावें लागल्यानें एकंदर अनेक गोष्टींचा यांना अनुभव आला. १९११पूर्वी यांच्या कांहीं कविता व नाट्यपर विनोदी लेख प्रसिद्ध झाले असले तरी यांना लोकप्रियता देणारें वाङ्मय यानंतरच प्रसिद्ध झालेलें आहे.

यांच्या वाङ्मयाचे तीन भाग पडतात : काव्य, स्फुट लेख व नाटकें. यांच्या सर्व कवितांचा संग्रह वाग्वैजयंती या नांवानें यांच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झाला आहे. यांच्या उत्कृष्ट कविता १९११-१६ या पांच वर्षांत प्रसिद्ध झाल्या. आधुनिक कवींपैकीं केशवसुत हे यांचे फार आवडते होते. हे आपणास 'केशवसुताचा सच्चा चेला' म्हणवितात. त्यांच्या तुतारीच्या धर्तीवर दसरा व झपूर्झाच्या धर्तीवर कलगीचें गाणें इत्यादि कविता यांनीं रचल्या. गुलाबी कोडें, राजहंस, मुरली, घुंगुरवाळा इत्यादि यांच्या कविता सरस आहेत. हे आपल्या कविता गोविंदाग्रज या नांवानें प्रसिद्ध करीत.

'संपूर्ण बाळकराम' हा यांच्या विनोदी लेखाचा संग्रह प्रसिद्ध आहे. बाळकराम हें यांनीं आपल्या गद्य लेखना-करितां टोपण नांव घेतलें होतें. यांत १९१३-१५ चे अवधींत लिहिलेले 'रिकामपणची कामगिरी' हे पांच लेख हा मुख्य भाग आहे. त्यांत ठकीच्या लग्नाकरितां कराव्या लागणाऱ्या खटपटींचें वर्णन केलें आहे. कल्पकता, कोटि-बाजपणा, व्यंगोक्ति, अतिशयोक्ति इत्यादिकांमुळें हे लेख चुरचुरीत व मनोरंजक झाले आहेत. 'कवींच्या कार-खान्यांत' व नाट्यविषयक लेखहि मजेदार आहेत. शिवाय मूकनायक, सकाळचा अभ्यास, दीडपानी नाटक हीं छोटीं प्रहसनेंहि यांनीं लिहिलेलीं आहेत.

कविता व स्फुट लेख या यांच्या वाङ्मयापेक्षांहि नाटककार म्हणून हे लोकांच्या विशेष ध्यानांत येतात. प्रेमविवाह, पुनर्विवाह व विषमविवाह यांसंबंधीं असणारें प्रेमसंन्यास, पतिव्रतेचा प्रभाव दाखविणारें पुण्यप्रभाव, दारूबाजीचे दुष्परिणाम दर्शविणारें एकच प्याला व कोणतेंहि प्रतिपाद्य नसलेलें भावबंधन हीं यांचीं चार नाटकें आणि संभाजीचरित्रावरील 'राजसंन्यास' व 'वेड्यांचा बाजार' हीं अपूर्ण नाटकें एवढा यांचा वाङ्मयसंसार आहे. यांनीं आपल्या लेखनानें आपल्या-कडे सर्वांचें कमालीचें लक्ष वेधून घेतलें. यांच्याइतकी लोकप्रियता मराठी वाङ्मयांत अद्यापि कोणाहि लेख-काच्या वांट्यास आलेली नाहीं. तरुणांच्या मनाला मोहिनी घालणाऱ्या सर्व गुणांचा यांच्या लेखनांत उत्कृष्ट

संगम झाला आहे. सरस प्रेमगीतें, कल्पकता नि कोटि-बाजपणा, रहस्यपूर्ण नाट्यकथानकें, करुण नि हास्य यांचा परमोत्कर्ष साधणारे नि हृदय हलवून सोडणारे नाट्यप्रसंग आणि प्रवाही अलंकारिक भाषा यांमुळें यांनीं तरुणांचे डोळे दिपवून टाकले. हे संदेश सांगणारे किंवा आदर्श लेखन करणारे नसतांहि उज्ज्वल कल्पकता व उत्कट भावना यांमुळें मराठींतील अत्यंत लोकप्रिय कवि बनले आहेत. याच गुणावर लुब्ध होऊन प्र. के. अत्रे व कमतनूरकर यांसारखे प्रथितयश नाटककार आपणास यांचे शिष्य म्हणवून घेण्यांत धन्यता मानीत असल्यास नवल नाहीं. यांच्या ग्रंथांचें रसग्रहणपर वाङ्मय जितकें प्रसिद्ध झालें आहे तितकें इतर दुसऱ्या कोणाहि मराठींतील ग्रंथ-काराच्या वांट्यास अद्यापि आलेलें नाहीं.

यांचें वाङ्मय– १ वाग्वैजयन्ती (संपूर्ण कवितासंग्रह), २ संपूर्ण बाळकराम, ३ प्रेमसंन्यास, ४ पुण्यप्रभाव, ५ भावबन्धन, ६ एकच प्याला, ७ राजसंन्यास ( अपूर्ण ); ८ वेड्यांचा बाजार ( अपूर्ण ).

**गणपत कृष्णाजी**—( मृत्यु स. १८९० सुमार ) मुंबईच्या प्रारंभींच्या मुद्रणविशारद लोकांपैकीं एक.

मराठीच्या बाबतींत टंकमुद्रणाचा प्रारंभ व प्रसार करण्याचें श्रेय यांच्याकडे जातें. हे भंडारी जातीचे होते. प्रथम यांनीं एक लांकडी यंत्र तयार केलें, शिशाचे तुकडे जमविले, अक्षरें कशीं उठतात तें पाहिलें, शाईचे निरनिराळे प्रयोग करून शाईहि ठरवली, लोखंडी प्रेस तयार केला, शिळा विकत घेतली व १८४१ मध्यें आपलें पहिलें पंचांग छापलें. पुढें उत्तेजन मिळवून स्वतः टाइप करण्याचा प्रयत्न यांनीं १८४३ मध्यें सुरू केला. आणि मोठ्या प्रयत्नानें अक्षराचे ठसे तयार करून अक्षरें ओतण्याचा कारखाना सुरू केला. पुढें कित्येक वर्षें या छापखान्यांत जितकें सुबक काम होत असे तितक्या प्रमाणांत उत्कृष्ट काम दुसऱ्या कोणत्याहि छापखान्यांत होत नसे. आतां जरी आपणांस त्या कलेचें विशेष महत्त्व वाटत नसलें तरी मराठीचे आद्य टंकमुद्रणकार या दृष्टीनें यांचें महत्त्व विशेष आहे. यांच्या कार्यारंभशताब्दीचा उत्सव मुंबईस साजरा करण्यांत आला. यांनीं काढलेली महाभारताची सुप्रसिद्ध दाक्षिणात्य प्रत यांच्या नांवानेंच प्रसिद्ध आहे.

**गणपुले, परशुराम बळवंत**— ( जन्म स. १८७५ ) गुजराथमधील मंगलोरी कौलें, अदह्य विटा, चिनी नळ, कप-बशा, कांचेच्या चिमण्या, बरण्या वगैरेंचे यशस्वी कारखानदार व दानशूर गृहस्थ.

मोरजवळ गुंजवणें येथें जोगदेव सावकारांकडे यांचे वडील कारकून होते. तेथेंच यांचा जन्म झाला. वयाच्या पांचव्या वर्षी वडील वारल्यानें हे आईबरोबर आपले मामा विनोद यांचेकडे बडोद्यास गेले. तेथेंच यांचें प्राथमिक शिक्षण होऊन यांनीं कलाभुवनमधील अभ्यासक्रम पुरा केला व विनोद मामांच्या कॉंट्राक्टरच्या धंद्यांत हे शिरले.

पहिल्या महायुद्धापूर्वी बडोद्याच्या महाराजांची कौलें-विटांची फॅक्टरी बुडत होती. ती यांनीं सवलतीनें चालविण्यास घेतली व त्यांत चांगलें यश संपादन केलें. अनुभवानें आत्मविश्वास उत्पन्न झाल्यामुळें बिलिमोरा येथें कौला-विटांचा कारखाना काढून त्याला लिमिटेड कंपनीचें स्वरूप दिलें. पुढें वांकानेरला ( काठेवाड ) फायर ब्रिक्स व फायर क्लेचा कारखाना यांनीं भाड्यानें चालविण्यास घेतला. तेथील अनुभवानें यांना आपण पॉटरी वर्क्स चांगलें करूं शकूं याची कल्पना आली. तेव्हां यांनीं मोर्वीच्या महाराजांचा बरण्यांचा कारखाना चालविण्यास घेतला व त्यास आपलें स्वतःचें परशुराम हें नांव देऊन 'परशुराम पॉटरी वर्क्स कं. लि.' असें रूप दिलें. त्या कारखान्याची दुसऱ्या महायुद्धामुळें चांगली भरभराट झाली. नंतर यांनीं ठाण (लक्तर स्टेट) येथील एका पार्श्याचा एक पॉटरी व क्रॉकरीचा कारखाना होता तो सुमारें दोन लक्ष रुपयांस विकत घेतला. त्याची यांच्या नेतृत्वानें उत्तम भरभराट झाली.

यांच्या वयाला सत्तर वर्षें झालीं तेव्हां यांच्या सत्तरीचा समारंभ मोर्वीच्या महाराजांच्या अध्यक्षतेखालीं मोर्वी येथें झाला ( फेब्रु. २८।४५ ). त्या वेळीं यांचे चहाते, एजंट वगैरे लोकांनीं यांना एक लक्ष पंधरा हजारांचा निधि अर्पण केला. त्यांत यांनीं स्वतःचे पस्तीस हजार रुपये घालून दीड लाखाचा निधि विश्वस्त पंचांच्या स्वाधीन केला. त्यांतून पॉटरीच्या धंद्यांत प्राविण्य मिळविण्याकरितां शिष्यवृत्ती द्याव्यात असा यांचा हेतु आहे.

यांच्यावर मोर्वीच्या महाराजांचा अत्यंत विश्वास असून इतरहि लोकोपयोगी कामांत यांचा ते सल्ला व साह्य घेत असतात. यांनीं आपल्या सचोटीनें व कर्तव्यदक्ष स्वभावानें परप्रान्तांत चांगलें यश संपादन केलें आहे.

**गर्गे, शंकर काशिनाथ**— ( जन्म स. १८८९– मृत्यु स. १९३१ ) मराठींतील नाट्यछटा नांवाचा लेखन-प्रकार प्रचारांत आणणारे प्रसिद्ध लेखक. हे "दिवाकर"

ह्या नांवानें प्रसिद्ध असून नाटयछटाकार म्हणून ओळखिले जातात. हे गर्गे घराण्यांत दत्तक होते. यांचे जन्मदाते वडील गोविंद बळवंत दिवाकर हे होत. वयाच्या ३ऱ्या वर्षीच 'दिवाकरां'ना आजीच्या (आईची आई) मांडीवर देण्यांत आलें.

स. १९०८ सालीं स्कूल फायनल होऊन प्रथम यांनीं पुण्याच्या फौजदार कचेरींत कारकुनाची नोकरी धरली. परंतु डोळ्यांच्या अधूपणामुळें ही नोकरी यांना सोडावी लागली. नंतर वर्षभर 'डिप्रेस्ड क्लासेस मिशन'च्या शाळेंत शिक्षकाची नोकरी केल्यावर हे नूतन मराठींत शिक्षक म्हणून आले. ह्या ठिकाणीं यांनीं आमरण शिक्षकाचें काम केलें.

हरीभाऊ आपटे ज्याप्रमाणें शेक्सपिअरच्या ग्रन्थवाचनानें नांवारूपास आले, त्याप्रमाणें आपणहि यावें अशा स्वयंप्रेरणेनें यांनीं शेक्सपिअरच्या अभ्यासांत मन घातलें. ह्या कार्यांत यांना कै. प्रि. वासुदेवराव पटवर्धनांचें उत्तेजन मिळालें व यांनीं मराठी वाङ्मयांत एका विशिष्ट प्रकारच्या लिखाणाची निर्मिति केली. ह्या त्यांच्या लिखाणास 'नाटयछटा' या नांवानें संबोधण्याची प्रथाहि कै. पटवर्धनांनींच काढिली. पटवर्धनांचेबद्दल यांना नितान्त आदर असे.

यांच्या नाटयछटा प्रथम प्रसिद्धीस आणण्याचें श्रेय श्री. न. चिं. केळकरांना आहे. 'महासर्प' व 'फाटलेला पतंग' या दोन नाटयछटा केळकरांच्यामुळें प्रथम ता. १५-४-१९१३ च्या केसरींत प्रसिद्ध झाल्या. यांच्या एकंदर ४६ नाटयछटा नियतकालिकांतून प्रसिद्ध झाल्या. पुणें हेंच यांच्या साहित्यसंसाराचें कार्यक्षेत्र आणि त्यांतहि ठराविक ४-५ पेठांबाहेर यांनीं क्वचितच पाऊल टाकलें असेल. या मर्यादित क्षेत्रांतूनच यांनीं आपल्या लेखनांतील प्रसंगांची आणि पात्रांची निवड केली. यांचा ग्रंथसंग्रह व चित्रसंग्रह चांगला असे.

**गंगाधर कविराज**— (जन्म स. १८५९- मृत्यु स. १९२३) बंगालमधील आयुर्वेदीय नवयुगप्रवर्तक. हे मुर्शिदाबादचे राहणारे. 'राजेमहाराजांचे विश्वासपात्र वैद्य व विपुल ग्रंथनिर्मिति करणारे लेखक' अशी यांची प्रसिद्धि असे. यांचे ग्रंथहि विद्वत्ताप्रचुर आणि विविध विषयांवर लिहिलेले आहेत. जुन्या पद्धतीच्या पंडितांप्रमाणें यांचा सर्व वेळ अध्ययन, अध्यापन व ग्रंथलेखन यांत व्यतीत होत असे. याचे जोडीला मोठा वैद्यकीचा धंदा होताच.

यांनीं वैद्यक ११, तन्त्र २, व्याकरण ८, साहित्य १२, धर्मशास्त्र ७, उपनिषद् ८, दर्शन १४, ज्योतिष १ व इतर १३ असे ग्रंथ केले असून ते स्वतःचा छापखाना काढून बहुतेक मुद्रितहि केले आहेत. यांत मुग्धबोध व्याकरणावरील महावृत्ति टीका यांनीं अगदीं पहिल्या वयांत लिहिली असूनहि ती प्राचीन टीकांच्या तोडीची आहे. तसेंच चरकावरील 'जल्पकल्पतरु' ही टीका फारच पांडित्यप्रचुर व उपयुक्त समजण्यांत येते. मनुस्मृतिवरील टीकेंत यांनीं जागोजाग कुल्लूकाचें निर्भीडपणें खंडन केलें आहे.

यांच्या शिष्यांत म. म. द्वारकानाथ सेन, सुश्रुतभाष्यकार प्रा. हाराणचंद्र चक्रवर्ति व प्रशिष्यांत लक्ष्मीरामस्वामी, वैद्यराज योगेन्द्रनाथ व कविराज उमाचरण ही मंडळी मोडतात (आयुर्वेदाचार्य पां. ह. देशपांडे.).

**गाझीउद्दीन हैदर**— (कारकीर्द स. १८१४-१८२७) लखनौचे नबाब. हे सादतअलीचे चिरंजीव. हे बापापासून वेगळे राहत असत. त्यामुळें दरबारी लोकांशीं यांचें नीट नव्हतें. यांचेभोंवतीं वेगळेच हलके लोक जमा झालेले होते. यांनीं प्रसिद्ध मुत्सद्दी हकीम मेहेंदी यास कमी करून आपला खानसामा आगा मीर यास दिवाणगिरी दिली. स. १८०१ सालीं सादतअलीशीं झालेल्या तहानें यांच्या अयोध्येच्या राज्यांत इंग्रजांना हात घालण्याचें कारण उरलेलें नव्हतें. पण नेपाळच्या लढाईकरितां इंग्रजांनीं शेंकडा साडेसहा टक्के व्याजानें यांच्याकडून दोन कोट रुपये घेतले. शिवाय रिसाला व हत्ती यांनीं आपण होऊन मदतीस धाडले. यामुळें स. १८१९ मध्यें दिल्लीचा बादशाहा ब्रिटिशांशीं अराजनिष्ठ आहे असें वाटल्यावरून त्याची बादशाहात कमी करून यांना बादशाहा हें पद दिलें व यांना आपल्या नांवें नाणीं पाडण्याची परवानगी दिली (स. १८१९). पण मुसलमानांना हा दिल्लीच्या गादीचा अपमान वाटला, त्यामुळें लखनौच्या बाहेर या गोष्टीस फारशी प्रसिद्धि मिळाली नाहीं. पुनः ब्रह्मदेशच्या लढाईच्या वेळीं यांनीं कांहीं शर्तीवर इंग्रजांस एक कोट रुपये दिले (१८२५). त्यामुळें ग. ज. ॲम्हर्स्ट यांनीं स्वदस्तूरचें पत्र लिहून यांचें अभिनंदन केलें. यानें पुनः पन्नास लक्ष रुपये कंपनीसरकारास दिले (स. १८२६).

यांनीं सादतअलीची 'अमानी' पद्धत बंद करून

'इजारा' ही वसुलाची पद्धत सुरू केली. त्यामुळें वसूल कमी पडला. जमीनदार व तालुकदार लोक पुनः स्वच्छंदानें वर्तू लागले.

यास रसायनविद्या व शिल्पविद्या यांचा नाद होता. पण तेच विषय यास राज्यकारभारापासून परावृत्त करण्यास कारण झाले. गैरशिस्त व उधळा कारभार, दरबारांत प्रजेचा प्रवेश न होणें, मर्जीतल्या माणसांवर फाजील विश्वास, उपचार व मानमतराब यांवर विशेष प्रीति, यांमुळें यांच्या राज्यकारभारास बेशिस्त स्वरूप आलें.

ब्रिटिश सरकारवर सर्वस्वीं विश्वास ठेवल्यानें त्यांच्या सल्ल्याप्रमाणें यांनीं सर्व सैन्य कमी केलें. राजवाड्यांत पाहऱ्यापुरतेंहि सैन्य शिल्लक राहू दिलें नाहीं. राज्यांतील वसूलहि दुसऱ्याच्या मदतीवांचून करतां येत नसे. ( अयोध्येचे नबाब ).

**गाडगीळ, धनंजय रामचंद्र**— ( जन्म स. १९०१ ) सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ आणि 'गोखले इन्स्टिट्यूट ऑफ पॉलिटिक्स अँड एकॉनमिक्स' या संस्थेचे प्रमुख.

यांचा जन्म नागपुरास व शिक्षण तेथील पटवर्धन हायस्कुलांत झालें ( १९१५ ). नंतर हे उच्च शिक्षणाकरितां इंग्लंडला रवाना झाले व केम्ब्रिजच्या क्वीन्स कॉलेजांत अभ्यास ( १८-२३ ) करून हे बी. ए. (२१), एम्. लिट्. ( २३ ), व एम. ए. ( २५ ) झाले. इकडे आल्यानंतर मुंबई सरकारच्या फायनन्स डिपार्टमेंटमध्यें ॲसिस्टंट सेक्रेटरी म्हणून हे काम करूं लागले ( १९२४ आक्टो.–१९२५ जून ). पुढें त्या जागेचा राजीनामा देऊन यांनीं सुरतच्या म. ठा. बा. कॉलेजचे प्रिन्सिपल म्हणून काम केलें ( १९२५-३० ). पण गोखले इन्स्टिट्यूट ऑफ पॉलि. ॲण्ड एकॉ.चें चालकत्व यांना देण्याचें ठरतांच यांनीं ती मोठ्या पगाराची व अधिकाराची जागा सोडून हे त्या संस्थेंत काम करूं लागले आणि पुण्यास स्थायिक झाले.

वरील संस्थेंत यांनीं महत्त्वाचें संशोधन स्वतः केलें आणि इतरांकडून करवून घेतलें. यांच्या नेतृत्वामुळेंच अर्थशास्त्रीय सूक्ष्म अध्ययन, अध्यापन आणि संशोधन यांचें मोठें क्षेत्र, असा या संस्थेस मोठा लौकिक प्राप्त झाला आहे.

यांच्या या लौकिकामुळेंच म्हैसूर येथें भरलेल्या 'ऑल-इंडिया इकॉनमिक्स' कॉन्फरन्सच्या २४ व्या अधिवेशनाचे यांना अध्यक्ष निवडण्यांत आलें. यांच्या अध्यक्षीय भाषणाचा विषय 'Economic Policy of the State in India' हा होता ( १९४० ).

यांचे ग्रंथ अत्यंत शास्त्रीय पद्धतीनें सूक्ष्म अभ्यास करून लिहिलेले असल्यामुळें शास्त्रीय जगांत त्यांना अत्यंत मानाचें स्थान आहे.

यांचा 'फेडरेटिंग इंडिया' हा ग्रंथ हिंदुस्थानांत चर्चिल्या जाणाऱ्या अत्यंत महत्त्वाच्या प्रश्नावर प्रकाश पाडणारा आहे. त्यांत यांनीं मुस्लीम विभागांतील मुस्लीम जनता त्यांच्या पुढाऱ्यांच्या भूमिकेचा पूर्णपणें पाठपुरावा करणार असेल तर हिंदुस्थानच्या सध्याच्या विद्यमान सीमांत एक मुस्लीम व दुसरें मुस्लीमेतर अशीं दोन फेडरेशनें स्थापन झाल्याचा देखावा शांतपणें पाहण्याशिवाय दुसरें गत्यन्तर नाहीं, असा आपला अभिप्राय नमूद केला आहे.

प्राथमिक-माध्यमिक व उच्च अशा सर्व शिक्षणविषयक चळवळींशीं असणारे यांचे संबंध अतिशय निकटचे आहेत. मुंबई युनिव्हर्सिटीच्या सिनेट, सिंडिकेटचे सभासद, फेलो व डेक्कन पोस्ट-ग्रॅज्युएट रिसर्च इन्स्टिट्यूटच्या कौन्सिलचे सभासद या नात्यांनी यांनीं केलेली कामगिरी, यांचें या विषयाबद्दलचें असणारें प्रेम व तज्ज्ञता दाखविण्यास पुरेशीं आहेत. हिंदुस्थान सरकार व मुंबई सरकार शिक्षण व अर्थशास्त्र यांसंबंधी काम करणाऱ्या कोणत्याहि महत्त्वाच्या कमेटीवर यांचें नांव प्रायः घालतात.

यांचे ग्रंथ—

( 1 ) The Industrial Evolution of India ( 1924 ). ( 2 ) The Bombay Land Revenue System ( 1928 ). ( 3 ) The Salaries of Public Officials in India ( 1931 ). ( 4 ) Imperial Preference for India ( 1932 ). ( 5 ) A Survey of the Marketing of Fruit in Poona ( सहकार्यानें 1933 ). ( 6 ) A Survey of Motor-Bus Transportation in Six Districts of the Bombay Presidency ( सहकार्यानें 1935 ). ( 7 ) A Survey of Farm Business in Wai Taluka ( सहकार्यानें 1940 ). ( 8 ) Regulation of Wages and other problems of Industrial Labour in

India (1943). (9) War and Indian Economic Policy (सहकार्यानें 1943). (10) Poona : A Socio-Economic Survey. Part I. Economic (1945). (11) Federating India (1945).

**गाडगीळ, नरहर विष्णु**—(जन्म स. १८९६) महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध राष्ट्रसभा कार्यकर्ते, राजकारणी व ग्रंथकार.

यांचें शिक्षण नीमच, मुंबई, बडोदा व पुणें येथें झालें. हे बी. ए., एलएल. बी. झाल्यानंतर यांनीं पुणें येथें वकिलीचा धंदा करण्यास सुरवात केली (१९२०). सार्वजनिक कार्याचा यांना पहिल्यापासूनच नाद होता. हे पुणें जिल्हा कॉंग्रेस कमेटीचे मंत्री (१९२१-२४), सभासद, प्रान्तिक कॉंग्रेस कमेटी (१९२१-३२), ऑल इंडिया कॉंग्रेस कमेटी (१९२९-४५), अध्यक्ष, महाराष्ट्र प्रान्तिक कॉंग्रेस कमेटी (१९३१, १९३९-१९४५), पुढारी, यूथलीग, उपाध्यक्ष, मुंबई प्रान्तिक यूथलीग (१९२८-३२), अध्यक्ष, पुणें, यूथलीग (१९२८-३२), सभासद, पुणें नगरपालिका (१९२८-३२), व तेथें उपाध्यक्ष (१९२८). जी. आय्. पी. वर्कर्स युनियन (१९३०), यूथ कान्फरन्स सबर्बन डि. मुंबई व नाशिक वगैरे अनेक ठिकाणचीं अध्यक्षपदें यांच्याकडे आपणहून चालत येऊं लागलीं.

नंतर राष्ट्रसभेचे उमेदवार म्हणून मुंबई प्रान्ताच्या मध्यविभागाकडून यांची दिल्लीच्या कायदेमंडळांत प्रचंड बहुमतानें निवडणूक झाली (१९३५). तेथें हे राष्ट्रसभापक्षाचे प्रतोद होते. तेथील यांची कामगिरी यांनीं 'हिंदी कायदे मंडळांतील सहा वर्षे' (१९३५-४१) या नांवाच्या साडेचारशें पानांच्या पुस्तकांत मराठींत प्रसिद्ध केली आहे.

यानंतर ८ ऑगष्ट १९४२ च्या चळवळींत हे तुरुंगांत स्थानबद्ध होते. तेथून दोन वर्षांनीं यांची मुक्तता झाली. लागलीच यांनीं राष्ट्रसभेच्या विधायक कार्यास सुरवात केली. राष्ट्रसभेचें कार्य हा यांचा धर्मच झाला आहे. आजपर्यंत हे अनेक वेळा तुरुंगांत गेले. अलीकडे तेथें ग्रंथलेखनहि करण्यास यांनी सुरवात केली आहे. अन्तर्गत योजकता व व्यापक उठावणी या दोन्ही दृष्टींनीं यांची कामगिरी महत्त्वाची आहे. यांचें बेडर मैदानी वक्तृत्वहि प्रभावी आहे. महाराष्ट्रांतील ब्राह्मणेतर समाजाला राष्ट्रसभेच्या कार्याला लावण्याचे श्रेयांतहि यांच्या धोरणीपणाला मोठा वाटा दिला पाहिजे.

यांचे ग्रंथ—१ हिंदी अंदाजपत्रकें (भाग १-२ १९४२), २ ग्यानबाचें अर्थशास्त्र (१९४३), ३ सभाशास्त्र (१९४४), ४ कायदेमंडळांतील सहा वर्षे (१९४४ आक्टो.), ५ राज्यशास्त्रविचार (१९४५) इत्यादि.

**गामा, थोरला— रुस्तुम-इ-हिंद**— (जन्म स. १८८० सुमार) जगप्रसिद्ध हिन्दी पहिलवान. यांनीं युरोपियन पहिलवानांत सर्वश्रेष्ठ ठरलेला रशियन पहिलवान झिस्को यास बर्लिन येथें व नंतर पुनः पतियाळा येथें चीत करून विजय मिळविला. झिब्रोस्कि व पिटर्सन या जगप्रसिद्ध युरोपियन पहिलवानांना यांनीं अनुक्रमे तीन व एका मिनिटांत पतियाळास चीत केलें. अमेरिकेंतहि यांनीं विजय मिळवून हिंदी पहिलवानांचें सर्वश्रेष्ठत्व अद्यापि कायम राखलें आहे. यांचे धाकटे बंधु इमामबक्ष व हे दोघेहि पतियाळा संस्थानचे आश्रित आहेत.

**गामा, कल्लू**— (जन्म स. १८९८ सुमार) हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध पहिलवान. हे प्रसिद्ध शीख पहिलवान कीकरसिंगावर जय मिळविणाऱ्या कल्लू अलियाचे पुत्र होत. यांना राधनपुरच्या नबाबाचा आश्रय होता. स. १९१९ सालीं पुण्याच्या डेक्कन जिमखान्यावर कोल्हापूरच्या दीपासिंगाबरोबर यांची कुस्ती होऊन यांचा पहिला नंबर आला.

**गायकवाड, महाराज-सयाजीराव गोविंदराव**—(कारकीर्द स. १८२०-४७) बडोदा राज्याचे अधिपति.

आनंदरावांच्या निधनानंतर हे बडोद्याच्या गादीवर आले. हे हुषार होते. माळव्याच्या लढायांत आपलें सैन्य वापरल्याबद्दल यांनीं इंग्रजांकडे रक्कम मागितली होती. हे गादीवर असतांना आनंदरावांच्या राणीनें व सयाजीरावांच्या दोन सावत्र आयांनीं आपल्या मुलांना वारस ठरविण्याबद्दल प्रयत्न करून पाहिले होते.

हे प्रजेचे आवडते राजे होते. इंग्रजांना हुलकावण्या देऊन त्यांच्या तावडींतून सुटण्याचा यांनीं बराच प्रयत्न केला. तत्कालीन इंग्रजांच्या अधाशीपणामुळें यांचा स्वभाव हट्टी बनला होता, असें 'रूलर्स ऑफ बडोदा' या पुस्तकाच्या कर्त्याचें मत आहे. इंग्रजांनीं कांहीं ना कांहीं कारणानें जप्त केलेला सर्व मुलूख यांनीं पुन्हां सोडविला व संस्थानांत ढवळाढवळ करणाऱ्या इंग्रजांच्या कारवाया बंद पाडल्या. लष्कर, सरदार, सावकार, मुत्सद्दी व प्रजा वगैरे सर्वांवर यांचा वचक असे. यांना तीन पुत्र होते

त्यांच्या पश्चात् त्यांचे वडील चिरंजीव गणपतराव (१८४७-५६) हे गादीवर आले. नंतर खंडेराव (१८५६-७०) व त्यानंतर मल्हारराव (१८७०-७५) गादीवर आले.

बडोद्याच्या गायकवाड घराण्यापैकीं पहिले व दुसरे दमाजी (पा. ४४४), पिलाजीराव (पा. ५१४), गोविंदराव (पा. ३३८), फत्तेसिंगराव (पा. ५३३) व आनंदराव (पा. १०७) यांचीं चरित्रें मध्ययुगीन चरित्रकोशांत दिलीं आहेत. या भागांत पहिले व दुसरे सयाजीराव, गणपतराव, खंडेराव व मल्हारराव यांचीं चरित्रें कारकीर्दींच्या क्रमानें दिलीं आहेत.

**गायकवाड, महाराज-गणपतराव सयाजीराव**— (कारकीर्द स. १८४८-१८५६ नवं.) बडोदा राज्याचे अधिपति.

पहिल्या सयाजीरावांचे ज्येष्ठ पुत्र असून हे त्यांच्यानंतर बडोद्याचे अधिपति झाले. हे बहुधा दिवाणामार्फतच राज्यकारभार चालवीत. ह्यांच्या कारकीर्दीत गुजराथेंत आगगाडी सुरू झाली. प्रजेच्या जमिनीची नुकसान-भरपाई आणि संस्थानचा मार्गावरील जकातीचा तोटा हे भरून मिळण्याच्या अटीवर यांनीं राज्यांतील जमीन आगगाडीसाठीं दिली (स. १८५६). हे व ह्यांचे बन्धु खण्डेराव यांच्यांत नेहमीं तंटे होत. तांबवेकर नांवाच्या दिवाणावरूनहि यांचा रेसिडेन्ट ऑटरॅमशीं खटका उडून प्रकरण गव्हर्नर जनरलपर्यंत गेलें. परंतु पुढील घटनेच्यापूर्वीच हे १९ नोव्हेंबर १८५६ रोजीं निवर्तले. ते निपुत्रिक असल्यामुळें यांच्यानंतर बंधु खण्डेराव हे गादीचे वारस झाले.

**गायकवाड, महाराज-खंडेराव सयाजीराव**- (कारकीर्द स. १८५७-७१) बडोदा राज्याचे अधिपति. हे आपले ज्येष्ठ बंधु गणपतराव याच्यानंतर गादीवर आले (१८५७).

हे कणखर स्वभावाचे, निर्व्यसनी व कांहींसे हेकेखोर होते. यांना कुस्तीचा व शिकारीचा फार नाद होता. हे स्वतः उत्तम कुस्ती खेळत व यांच्या पदरीं नामांकित पहिलवानांचे संघ असत. शिकारीचा यांना इतका नाद होता कीं, मकरपुऱ्याच्या मागच्या बाजूला एक मोठें वन तयार करण्यांत आलें होतें. कोणतेंहि काम करण्यांत यांचा विशेष जलदपणा प्रगट होत असे.

एकदां शहरांत पाण्याचा पुरवठा करण्याची कल्पना यांच्या मनांत आली. नर्मदेचें पाणी कालवा काढून बडोद्याला आणण्याची ती योजना होती. ती पुढें सफल झाली नाहीं, पण त्या कामाकरितां काढून ठेवलेल्या द्रव्यनिधींतून मकरपुऱ्याचा राजवाडा, दोन चांदीच्या तोफा, कांहीं जडजवाहीर इत्यादि वस्तु निर्माण करण्यांत आल्या.

बडोदें येथील जवाहीरखान्यांत जें मौल्यवान् जवाहीर दिसतें तें यांनीं खरीदलेलें आहे. त्याचप्रमाणें मोत्याची चादर म्हणून जी दाखविण्यांत येते तीहि यांनींच पैगंबराच्या कबरीवर टाकण्याकरितां तयार करविली. पुढें हे वारले त्यामुळें पैगंबराच्या कबरीकडे ती चादर न जातां बडोद्याच्या नजरबागेंत राहिली.

नजराणे घेण्याची पद्धत यांनीं विशेष जारीनें सुरू केल्यामुळें अनेक नालायक लोकांची गर्दी यांच्याभोंवतीं जमा झाली. शिवाय यांचे धाकटे बंधु मल्हारराव यांनीं राज्य मिळविण्याकरितां केलेला कट याच वेळीं उघडकीस येऊन त्यांना तुरुंगांत टाकण्यांत आलें (१८६३).

हे अत्यंत लोकप्रिय होते. यांचा रुबाबदार चेहरा, यांची दातृत्वशक्ति व यांचा मायाळू दिलदार स्वभाव यांमुळें प्रजाजनांना हे हवेसे वाटत. दूरदूरच्या पहिलवानांप्रमाणें काशीरामेश्वरकडील पंडितहि यांच्याकडून आपला फायदा करून घेत.

हिंदुस्थान सरकारशींहि यांचें सलोख्याचें नातें होतें. स. १८५७ सालच्या बंडाच्या वेळीं यांच्या राजनिष्ठेवर अवलंबून आपलें सैन्य गुजराथेंतून काढून इंग्रज सरकारनें दिल्ली-लखनौकडे नेलें. यांनीं राजनिष्ठा प्रदर्शित करून साहाय्य केलें नसतें, तर पश्चिम हिंदुस्थानावर इंग्रजांचें राज्य क्वचितच राहिलें असतें, असे इंग्रज अधिकाऱ्यांचे उद्गार आहेत. आणि त्या वेळीं गुजराथेंत शांतता राखल्याबद्दल बंडाचा वणवा शांत झाल्यावर बडोदें सरकारला द्यावा लागणारा फौजेच्या खर्चाबद्दल ३ लक्ष रु. कर हिंदुस्थान सरकारनें माफ केला. त्याचप्रमाणें 'हिज हायनेस दि महाराजा ऑफ बडोदा' ही पदवी देखील त्या वेळीं मिळाली. याशिवाय मोर्चेल वापरण्याचा अधिकार व यांना दत्तक घेण्याचा अधिकार दिला तो वेगळाच. याप्रमाणें यांची कारकीर्द चांगली भाग्याची झाली. पण हे वारल्यावर यांच्या पत्नी जमनाबाईसाहेब गरोदर होत्या. त्यांना मुलगीच झाल्यामुळें यांचे धाकटे बंधु मल्हारराव गादीवर आले. त्यांना पदच्युत केल्यावर

जमनाबाईसाहेबांच्या मांडीवर दत्तक देऊन दुसरे सयाजीराव महाराज यांची कारकीर्द सुरू झाली.

हे शिपाई वृत्तीचे असल्यानें त्या वेळीं बडोद्यास बंदुका, तोफा, दारूगोळा वगैरेंचे कारखाने होते. हे मोठ्या तोफाहि विकत घेऊं लागले. पण पुढें त्या इंग्रजांनीं विकत घेतल्या. यांच्याविरुद्ध स. १८५७ मध्यें कोळ्यांचें बंड झालें होतें. १८६३-६७ या दोन सालीं यांच्या खुनाचाहि प्रयत्न झाला होता. २० नवं. १८७० सालीं यांना मकरपुरा राजवाड्यांत जलोदरानें देवाज्ञा झाली.

**गायकवाड, महाराज-मल्हारराव सयाजीराव**—(कारकीर्द स. १८७१-७५) बडोदा राज्याचे अधिपति. खंडेरावानंतर जमनाबाईंना मुलगी झाल्यामुळें हे बडोद्याच्या गादीवर आले. खंडेराव-महाराजांच्या लोकांवर यांनीं शस्त्र धरून त्यांचे दिवाण भाऊ शिंदे यांना तुरुंगांत टाकलें व पुढें ते बहुतेक विषप्रयोगानें वारले. जमनाबाई खिन्न होऊन आपल्या मुलीसह पुण्यास येऊन राहिल्या. सर्वत्र बेबंद-शाही सुरू झाली. कर्नल रॉबर्ट फेअर हे रेसिडेंट म्हणून बडोद्यास आले (१८७३ मार्च १८), त्या दिवशीं शहरांत आठ जणांना फटक्यांची शिक्षा देण्यांत आली होती.

हे स्वभावतःच साधेभोळे आणि गरीब होते. आणि कोणीं कांहीं सांगितलें कीं तेंच खरें वाटावें अशी यांची वृत्ति असे. त्यामुळें स्वार्थी माणसांचा गराडा यांच्या-भोंवतीं पडला व राज्यांत अव्यवस्था होऊन तिजविषयींचा बोभाटा रेसिडेंट कर्नल फेअर यांनीं वर कळविला. तेव्हां चौकशी करण्याकरितां ग. ज. नॉर्थब्रूक यांनीं एक कमिशन नेमलें (१८७३). त्यांत अध्यक्ष सर रिचर्ड मीड, जयपूरच्या महाराजांचे मुख्य प्रधान नबाब फैज-अलीखान, मुंबई इलाख्यापैकीं रॉव्हिन स्क्राफ्ट आणि कर्नल एथरिज हे दोन गृहस्थ असे चार सभासद नेमिले. त्यांच्या चौकशीवरून 'अव्यवस्था आहे' अशी सरकारची खात्री झाली. तेव्हां अठरा महिन्यांत चांगला दिवाण नेमून सुधारणा करण्याविषयीं सरकारनें यांना सुचविलें. तेव्हां यांनीं नाना खानविलकर यांना बदलून दादाभाई नवरोजी यांना मुख्य प्रधान नेमलें. पण कर्नल फेअर व यांचें बिलकुल जमेना. कर्नल फेअर यांना बडो-द्याहून बदलावें असें यांनीं वर लिहिलें आणि त्याप्रमाणें त्यांचे जागीं सर लुई पेली यांची नेमणूकहि झाली. इतक्यांत विषप्रयोगाचें प्रकरण उद्भवलें.

कर्नल फेअर हे सकाळीं सात वाजतां बाहेरून फिरून बंगल्यांत आले तेव्हां सरबताचा पेला त्यांच्या मेजावर ठेवला होता. त्यांतले दोनतीन घोट ते प्याले व लिहा-वयास बसले. अर्ध्या तासानंतर त्यांना मळमळूं लागलें व कसेंसेंच होऊं लागलें. तेव्हां त्यांनीं बाकीचें सरबत न पितां तें बंगल्याच्या पडवींत फेंकून दिलें. रिकामा पेला पुनः मेजावर ठेवतांना तळांत व कांठाला लागलेला पदार्थ काळा असल्याचें त्यांना दिसलें व त्यांना आपणास विषप्रयोग झाला असल्याची खात्री झाली. डॉक्टर व केमिकल ॲनालायझर यांच्याकडून तोच निर्णय आला. खुद्द महाराजांचा या कामीं हात असावा असा संशय प्रगट करण्यांत आला. तेव्हां हिंदुस्थान सरकारनें चौकशीकरितां हाय कमिशन नेमलें. तें असें:—

१ नामदार सर रिचर्ड कौच, अध्यक्ष, २ श्रीमंत महाराज जयाजीराव शिंदे, सभासद, ३ श्रीमंत रामसिंगबहादुर, जयपूरचे महाराज, सभासद, ४ कर्नल सर रिचर्ड मीड, सभासद, ५ दिनकरराव रघुनाथ राजवाडे, सभासद, ६ मे. फिलिप स्यांडेल मेलव्हिल, सभासद.

स. १८७५ च्या फेब्रु. २७ पासून ३१ मार्चपर्यंत चौकशी झाली. प्रत्यक्ष राजा अपराधी धरून त्याच्या चौकशीचा हिंदुस्थानांत हा पहिलाच प्रसंग होता, यामुळें या चौकशीकडे लोकांचें विशेष लक्ष वेधलें. एतद्देशीय राजे लोकांना इंग्रजांकडून न्याय मिळण्याविषयीं लोक साशंक होते. तसेंच लोकांनाहि अशा प्रसंगीं आपलें कांहीं कर्तव्य आहे याची जाणीव होती. रेसिडेंटांनीं खटल्याच्या खर्चाकरितां अधिक रक्कम मिळणार नाहीं असें यांना कळवितांच सार्वजनिककाका गणेश वासुदेव जोशी, पुणें, यांनीं जितकें द्रव्य लागेल तितकें देण्याचें आश्वासन देऊन एका मोठ्या पेढीवर लाख रुप-यांची रक्कम अनामत ठेवली. शिवाय लोकांनीं वर्गणी जमविण्यासहि सुरुवात केली.

वरील मंडळीपैकीं तिघां हिंदी गृहस्थांनीं महाराजांना निर्दोषी ठरविलें, पण युरोपियन लोकांनीं पूर्ण दोषी ठरविलें. वरच्या सरकारनें महाराजांना विषप्रयोगाच्या आरोपांतून दोषमुक्त केलें, पण दुसरे आरोप गृहीत धरून यांना पदच्युत केलें (१८७५ एप्रिल २३).

महाराणी जमनाबाईसाहेबांच्या मांडीवर एक मुलगा दत्तक देऊन त्याचें नांव सयाजीराव ठेवलें व होळकर सरकारकडून सर टी. माधवराव यांस मागून घेऊन कुल-मुखत्यारी देऊन दिवाण नेमलें. शेवटीं पदच्युतस्थितींत मद्रास येथें यांचा अन्त झाला.

**गायकवाड, महाराज-सयाजीराव खंडेराव**— (जन्म स. १८६३-मृत्यु स. १९३८, कारकीर्द स. १८८१-१९३८) जागतिक प्रसिद्धि असलेले राज्य-व्यवस्थापक, ज्ञानोपासक व समाजसुधारक बडोदा राज्याचे अधिपति. हे कवळण्याच्या काशिराव गायकवाडांचे द्वितीय चिरंजीव. यांना कै. खंडेराव गायकवाडांच्या पत्नी जमनाबाईसाहेब यांनीं दत्तक घेतलें (२७ मे १८७५). यांचें मूळचें नांव गोपाळराव असें होतें, तें बदलून सयाजीराव ठेवण्यांत आलें.

दत्तक देण्याकरितां आणलेल्या मुलांना 'कां आलांत?' असा प्रश्न केला असतां यांनींच फक्त 'महाराज होण्याकरितां' असें उत्तर देऊन जमनाबाईचें लक्ष आपणांकडे विशेष ओढून घेतलें.

यांना शिक्षण देण्याच्या बाबतींत यांच्या मातोश्री जमनाबाई, दिवाण सर टी. माधवराव व मि. इलियट यांनीं अत्यंत दक्षता बाळगून मेहनत घेतली. प्रिन्स ऑफ वेल्सचें स्वागत, दिल्ली दरबाराला जाणें, वगैरेंनीं यांच्या शिष्टाचारपूर्वक वागणुकीला वळण लागत गेलें. यांचें लग्न होऊन (१८८०) राज्यकारभाराचें व्याख्यानद्वारा शिक्षण मिळून यांना अधिकारपद प्राप्त झालें (१८८१ डिसें.). अशा तऱ्हेनें बाराव्या वर्षी खेडेगांव सोडून निरक्षर स्थितींत बडोद्यास आलेला गरीब मराठ्याचा मुलगा अठराव्या वर्षी बडोद्यासारख्या मोठ्या राज्याचा कारभार स्वतःच्या जबाबदारीवर चालवूं लागला.

मागच्या खंडेराव व मल्हारराव यांच्या राजवटींत राज्यकारभार नियमित नसून त्यांत प्रमाणबद्धता कांहींच नव्हती. त्यामुळें राज्याची आर्थिक स्थिति बिलकुल चांगली नव्हती. पण मध्यन्तरींच्या काळांत त्यांत आमूलाग्र बदल झाला. यांनीं राज्यकारभार हातीं घेतला तेव्हां जुनी वर्जफेड व्यवस्थित करूनहि संस्थानच्या तिजोरींत दीड कोटि रुपये शिल्लक असलेले आढळले. शाळाखातें, वैद्यकीय खातें वगैरेंची स्थापना व विशेषतः बडोदा कॉलेजची स्थापना या सुधारणांमुळेंच दिवाण सर टी. माधवराव यांस 'राजा' ही मानाची पदवी ब्रिटिश सरकारनें बहाल केली (१८७७).

राज्यकारभाराची व्यवस्था पाहण्यास सुरवात केल्यावर प्रथम यांना बारीकसारीक गोष्टींकडेसुद्धां लक्ष द्यावें लागलें. प्रत्येक किरकोळ गोष्टीला यांना मंजुरी द्यावी लागे. त्यामुळें यांचा फार वेळ खर्च होई. याबरोबरच अधिकाऱ्यांना जबाबदारीची जाणीव होत नसे. तेव्हां यांनीं नियमबद्धता निर्माण करून जबाबदारीची विभागणी केली आणि आपल्या राज्याचें यंत्र आपल्या गैरहजेरींतहि सुरळित चालण्याची व्यवस्था केली. नंतर आपण परदेशांत राहून आपलें राज्य कसें चालतें याची प्रचीतीहि यांनीं पाहिली. जगाच्या प्रवासांत उपयुक्त व प्रगतिपर अशी कोणतीहि गोष्ट आढळतांच ती पहिल्या दर्जाच्या तज्ज्ञांच्या सल्ल्यानें योजना आंखून अमलबजावणीकरितां योग्य अधिकाऱ्याकडे सोंपविणें आणि मग त्याच्या अधिकारांत आपण हात न घालणें, हें यांच्या कारभाराचें प्रमुख सूत्र होय. शिवाय आरंभलेली योजना लहरीनें मध्येंच न सोडतां ती चिकाटीनें शेवटपर्यंत नेऊन यशस्वी करण्यांत यांचा हातखंडा असे.

राज्यावर येतांच यांनीं प्रजा सुखी राहावी व तिची भरभराट व्हावी म्हणून एक जाहीरनामा काढला आणि राज्याच्या प्रत्येक भागांत प्रवास करून सर्व राज्य नजरेखालीं घातलें. पहिल्या कांहीं खेपा तर यांनीं बैलगाडींतूनहि केल्या. राज्यकारभार चालविण्याकरितां अधिकाऱ्यांचें सल्लागार मंडळ नेमलें (१८८३). आणि त्याची वाढ करीत तें सत्तावीस सभासदांचें करण्यांत आलें. त्याला लेजिस्लेटिव्ह कौन्सिल किंवा धारासभा असें म्हणतात. यांनीं राज्यांत न्याय व अंमलबजावणी या खात्यांची विभागणी केली. ही सुधारणा ब्रिटिश मुलखांतहि १९४५ सालापर्यंत झाली नाहीं. संस्थानांत दिवाणी व फौजदारी कायदे करण्यांत आले (१८९२). ग्रामपंचायतींचा पुनरुद्धार करून त्यांच्यामार्फत गांवची सर्व व्यवस्था व्हावी, असें यांनीं ठरवून दिलें (१९००). आरोग्य, पोलिस, पाणी वगैरे बाबतींत नव्या योजना केल्या व आपले हुकूम सरकारी आज्ञापत्रिकेच्या द्वारें प्रसिद्ध करण्याची व्यवस्था केली.

यांना वरिष्ठ इंग्रज सत्तेशींहि सतत झगडावें लागलें. या दृष्टीनें सेटलमेंट कमिशनरचे असिस्टंट वासुदेव सदाशिव बापट यांची रेसिडेंटनें यांच्या गैरहजेरींत दरबारकडून चौकशी करवून त्यांना सहा महिन्यांची शिक्षा व दहा हजार रुपये दंड करविला (आगस्ट १८९४) असतां यांनीं परत येतांच त्यांना निर्दोषी म्हणून सोडलें (१८९५). यामुळें संस्थानच्या अन्तर्गत कारभारांत ब्रिटिश सरकारचा कितपत हात असावा असा प्रश्न उपस्थित झाला. त्याबद्दल यांना पुष्कळच मानसिक त्रास सहन करावा लागला व वरिष्ठ सरकारशीं झगडावें लागलें.

१९०० सालीं हे युरोपमध्यें असतां व्हाइसरॉय कर्झन हे बडोद्याहून ग्वाल्हेरीस गेले. बडोद्यास हे नसल्यामुळें

त्यांनीं स्वागतसमारंभ करून घेण्याचें नाकारलें. पुढें लवकरच संस्थानिकांच्या वागणुकीसंबंधीं 'कर्झनसर्क्युलर' बाहेर पडलें. त्यांत संस्थानिकांविषयीं जरा अपमानकारक भाषा होती. शिवाय संस्थानिकांनीं व्हाइसरॉयच्या परवानगीशिवाय हिंदुस्थानच्या बाहेर जाऊं नये, तशी परवानगी देणें सर्वस्वीं त्यांच्या स्वाधीन राहील, वगैरे मजकूर असल्यानें यांना तो अत्यंत अपमानकारक वाटला. हे १९०१ सालीं हिंदुस्थानांत परत आले व त्या सर्क्युलराबद्दल आपली तीव्र व स्पष्ट नापसंती यांनीं व्हाइसरॉयना कळविली.

१९०३ सालीं बादशहा सातवे एडवर्ड यांच्या राज्यारोहणानिमित्त दिल्ली येथें दरबार भरविण्याचें व हत्तीवरून मिरवणूक काढण्याचें ठरविण्यात आलें व त्याबरोबरच सर्व संस्थानिकांनीं दरबारांत व मिरवणुकींत भाग घ्यावा अशा अर्थाचा हुकूम काढण्यांत आला; याबद्दलहि यांनीं समयोचित शब्दांत नाखुषी व्यक्त केली.

तसेंच यांच्या खास नोकरांचे पोषाख निळ्या रंगाचे होते. निळा रंग सार्वभौमत्वाचा निदर्शक, अर्थातच व्हाइसरॉयनीं अशा तऱ्हेचे बरोबरीचे निदर्शक पोषाख वापरण्यास संस्थानिकास बंदी केली.

ता. १ जाने. १९०४ रोजीं दिल्लीस दरबार भरविण्यांत आला. समारंभाचे वेळीं व्हाइसरॉयचें भाषण झाल्यावर बादशहांचें भाषण वाचण्यांत आलें. नंतर प्रणाम करून राजनिष्ठा व्यक्त करण्याचा कार्यक्रम सुरू झाला. निजामसाहेब कुर्निसात करून परत आपले जागेवर येऊन बसले. नंतर यांची पाळी आली. तेव्हां यांनीं 'राज्यारोहण व नूतन वर्षाबद्दल माझा अभिनंदनपर संदेश बादशहांना कळविण्याची तसदी व्हाइसरॉयनीं घ्यावी' असे सूचक उद्गार काढले. १९०५ सालीं प्रिन्स ऑफ वेल्स हिंदुस्थानांत आले असतां हे बडोद्यास नव्हते. कर्झनसाहेब यांना कोठेंहि बाहेर जाण्याची बंदी करणार होते; पण वरून, तसें करण्यास मनाई झाली, असें म्हणतात. लॉर्ड मिंटो यांच्या वेळीं 'देशांत अशांतता व अराजकता माजली असल्यानें तिच्या नाशार्थ संस्थानिकांनीं मदत करावी' असें सर्क्युलर काढलें असतां 'एकट्या गायकवाड सरकारखेरीज करून इतर सर्वांनीं आपआपल्या संस्थानांतून राजद्रोहाचें समूळ उच्चाटन करण्यास संमति दिली आहे' वगैरेसारखी टीका टाइम्समधून यांच्यावर झाली. अरविंद घोष व श्यामजी कृष्णवर्मा हे जहाल राजकारणी पुरुष प्रथम यांच्याकडे नोकर असल्यानेंहि यांचेविरुद्ध जरा संशयाचेंच वातावरण असे.

ता. २२ जून १९११ रोजीं लंडन येथें झालेल्या राज्यारोहणसमारंभास हे हजर होते. पुढें डिसेंबरांत बादशहांची स्वारी दिल्लीस आली. तेथें दरबारांत व्हाइसरॉय व एक्झिक्युटिव कौन्सिलर यांनीं दरबारी प्रणाम केल्यानंतर हैद्राबादचे निजाम व यांची पाळी आली. बादशहांनीं नजर केलेलें स्वस्तिक व पट्टा घालण्याचें हे विसरले होते. शिवाय राजा व राणी यांना दोन प्रणामांऐवजीं यांनीं एक केला व पाठ न दाखवितांच परत येण्याचेंहि अवधान यांना राहिलें नाहीं. या अपमानकारक चुकीबद्दल यांनीं पत्र लिहून दिलगिरी प्रदर्शित केली. तरीहि या प्रसंगानें हे सर्वसाधारण सरकारी कार्यकर्त्यांच्या टीकांस पात्र झाले. बॅ. के. ग. देशपांडे यांना नोकरींतून कमी करण्याची मागणी यांना मान्य करावी लागली. यांनीं त्यांना नुकसानीबद्दल दहा हजार रुपये देऊन नोकरींतून रजा दिली. बडोदा कॉलेजचे प्रो. डी. एल्. पुरोहित हे पांडेचरीस जाऊन अरविंद घोषांना भेटून आले म्हणून त्यांना नोकरींतून कमी करण्याचा प्रसंग आला असतां त्यांनींच राजीनामा दिला.

हे आपल्या प्रजेंत जरी अत्यंत लोकप्रिय होते तरी त्याचाच उलट परिणाम म्हणून वरिष्ठ सरकारास अप्रिय बनले. त्यामुळें यांना वारंवार मानसिक त्रास भोगावा लागे. महायुद्धाच्या वेळीं ५० लक्षांची मदत व १ कोटीचे वॉरबॉंडस् घेऊन यांनीं मदत केली. ब्रिटिश सरकारनेंहि यांना जी. सी. आय. ई. ही पदवी देऊन यांना यांच्या युद्धकामगिरीबद्दल गौरविलें (१९१७).

हे राज्यावर आले तेव्हां यांच्या राज्यांत १८० प्राथमिक शाळा होत्या. पुढें यांनीं १८९३ सालीं अमरेली प्रान्तांत प्रयोगादाखल सक्तीच्या प्राथमिक शिक्षणाची योजना अमलांत आणली (१८९३) व स. १९०६ सालीं सर्व राज्यांत प्राथमिक शिक्षण सार्वत्रिक व सक्तीचें करण्यांत आलें. त्याकरितां २५३९ शाळा चालविण्यांत येऊं लागल्या (रिपोर्ट ३०-३१ पान २३७). याच पद्धतीनें दुय्यम व उच्च शिक्षणाची व्यवस्था करण्यांत आली. अनेक शिष्यवृत्त्या निर्माण करून निरनिराळ्या विषयांत अभ्यास करण्याला उत्तेजन देण्यांत आलें व औद्योगिक शिक्षणाकरितां कलाभुवनासारख्या संस्थाहि निर्माण करण्यांत आल्या. स्त्रीशिक्षणाकरितां पुस्तकी व औद्योगिक शिक्षणाची योजना आंखून त्याकरितांहि यांनीं अनेक शिष्यवृत्त्या ठेवल्या. मुंबई इलाख्यांतील उच्च शिक्षण घेणाऱ्या स्त्रियांकरितां एक लक्ष रुपयांची देणगी महाराणीसाहेबांनीं दिली.

वाचनालयाबाबतहि यांच्या संस्थानांतील प्रगति अपूर्व आहे. शाळांप्रमाणेंच वाचनालयें प्रत्येक गांवीं निर्माण करण्याकरितां यांनीं स्वतंत्र वाचनालयखातें उघडून त्या-मार्फत वाचनालयें काढण्याची व्यवस्था केली. अमेरि-केंतल्याप्रमाणें फिरत्या वाचनालयांची व्यवस्थाहि यांनीं आपल्या संस्थानांत केली आहे. यांच्या मध्यवर्ती वाचना-लयांत लाखांवर पुस्तकें असून अनेक विभाग पाडून त्याची व्यवस्था करण्यांत आली आहे.

याशिवाय संस्कृत, मराठी, गुजराथी, हिन्दी व इंग्रजी इत्यादि भाषांतून ३०० च्या वर ग्रंथ यांनीं छापवून प्रसिद्ध केले व अनेक ग्रंथांना उत्तेजनादाखल मदत केली. देशी भाषांना इंग्रजी भाषेमुळें जी ओहोटी लागली आहे तिच्या प्रतिकारार्थ 'श्री सयाजी शासन शब्दकल्पतरु' या प्रचंड कोशाची रचना करण्यांत आली. यांत वेग-ळाल्या आठ भाषांतील शब्द दिले असून राजकीय कार्यांत व व्यवहारांत सर्व प्रान्तांत एक भाषा प्रचलित होऊन तिला राष्ट्रभाषेचें स्वरूप येईल अशी व्यवस्था आधींच करण्यांत आली आहे.

ज्ञानप्रसाराप्रमाणेंच समाजसुधारणेच्या बाबतींतहि यांनीं हिंदुस्थानांत अघाडीचा मान पटकाविलेला आहे.

१ मिश्रविवाह (सगोत्र व असवर्ण विवाहाला मान्यता), २ पडदापद्धतिबंदी, ३ बालविवाहबंदी, ४ विधवाविवाह, ५ अस्पृश्यतानिवारण (१८८२ सालीं अस्पृश्यांकरितां १८ शाळा काढल्या), ६ विवाहविच्छेद, ७ कन्याविक्रयबंदी, ८ स्त्रियांचा वारसा, वगैरे कायदे करून यांनीं सामाजिक सुधारणा प्रत्यक्ष अमलांत आणल्या. वाटेल त्यानें पौरोहित्य करण्यापेक्षां विशिष्ट शिक्षण घेतलेल्यांनींच पौरोहित्य करावें म्हणून त्यांच्याहि वकिलाप्रमाणें परीक्षा घेऊन, त्यांना सनद देण्याची व्यवस्था यांनीं केली. यामुळें त्यांच्याहि उपजीविकेचा प्रश्न सुटला आणि लोकांना सुशिक्षित पुरोहित मिळूं लागले.

सुधारणांच्या या प्रत्यक्ष पुरस्कारामुळेंच यांना स. १९०४ सालीं राष्ट्रसभेबरोबर भरलेल्या 'राष्ट्रीय सामा-जिक परिषदेचे' अध्यक्ष निवडण्यांत आलें. हिंदुस्थानां-तच काय, पण बाहेर देशांतहि आढळलेली चांगली गोष्ट हे आपल्या राज्यांत आणून सोडण्याविषयीं अगदीं तत्पर असत.

यांनीं केलेल्या सुधारणा किंवा औद्योगिक प्रयत्न ब्रिटिश सरकारचें केवळ अनुकरण म्हणून कधींच केल्या गेल्या नाहींत. ब्रिटिश राज्यांत बालविवाहाला प्रतिबंध कर-णारा शारदाकायदा होण्याअगोदर किती तरी पूर्वी यांच्या राज्यांत बालविवाहाला प्रतिबंध करणारा कायदा जारी होता. ब्रिटिश राज्यांत हिंदु कायद्याला रूप देण्याचें १९४५ सालीं अशक्य वाटणारें काम १९०५ सालींच यांनीं पूर्ण केलें आहे. याशिवाय राज्यांतील कोणतीहि बाब अशी नाहीं, की तींत यांनीं सुधारणा व वाढ करून त्यांत उपयुक्तता व सोईस्करपणा आणला नाहीं.

यांनीं हिंदुस्थान, चीन, जपान, अमेरिका व युरोप या देशांत प्रवास केला. युरोपांत तर हे वारंवार जात व तेथें दीर्घकाल राहत. त्यामुळें यांच्यावर वरिष्ठ सरकारचा रोष झाल्याचींहि उदाहरणें आहेत. पण हेहि आपल्या हक्क व स्वातंत्र्याविषयीं दक्ष असल्यानें यांनीं आपला कार्यक्रम कधीं सोडला नाहीं. आणि यांनीं आपल्या डोळे उघडे ठेवून केलेल्या प्रवासाचा फायदा आपल्या राज्याला भर-पूर दिला.

यांनीं राज्यावर येतांच अनेक समाज-सुधारणांचा पुरस्कार कायद्यानें केलेला असला तरी हे जुलमानें कोणतीहि सुधारणा समाजावर लादण्याच्या सर्वस्वीं विरुद्ध असत. अस्पृश्यतानिवारणाच्या पुरस्काराबाबत यांची बरोबरी करणारा कोणीहि सांपडणार नाहीं. त्यांचें शिक्षण, वसतिगृहें व त्यांना नोकऱ्या देण्याच्या बाबत यांनीं जास्तींत जास्त व्यवस्था केली. अस्पृश्यांना आपलें खंडेरावाचें खासगी मंदिर खुलें करण्याचें काम यांनीं केलें; पण राज्यांतील सर्व मंदिरें अस्पृश्यांना खुलीं करण्याचे बाबतींत लोकमताचा थोडा विरोध दिसतांच मनांतून इच्छा असूनहि तो प्रश्न तसाच तहकूब ठेवला.

सर टी. माधवराव, व्ही. पी. माधवराव, काजी शहा-बुद्दीन, सर रमेशचंद्र दत्त, सर मनुभाई मेथा, कृष्णमाचारी इत्यादि यांचे प्रमुख दिवाण होत.

यांचें पहिलें लग्न तंजावरच्या मोहिते कुलांतील राजकन्या लक्ष्मीबाईशीं झालें व त्यांचें नांव चिमणाबाई असें ठेवण्यांत आलें. त्यांना एक कन्या झाली, पण ती लहानपणींच वारली. त्यांचें दुसरें अपत्य फत्तेसिंहराव. पण त्यानंतर त्या लवकरच वारल्या (१८८५). त्यांच्या लग्नाच्या दहाव्या दिवशीं लक्ष्मीविलास राजवाड्याचा कोनशिलासमारंभ झाला. 'चिमणाबाई न्यायमंदिर' त्यांच्या स्मरणार्थ आहे. फत्तेसिंहराव स. १९०८ सालीं वारले. त्यांचे चिरंजीव प्रतापसिंह हे सध्यां गादीवर आहेत.

दुसरा विवाह देवासचे सरदार बाजीराव अमृतराव घाटगे यांच्या कन्या गजराबाईशीं झाला. त्यांचेंहि नांव चिमणाबाईच ठेवण्यांत आलें. त्याहि पतिनिष्ठ असून निरनिराळ्या कामीं यांना मदत करीत असतात. आपल्या सुधारक पतीचे विचार त्यांनीं आत्मसात केले. त्यांनीं स. १९१४ सालीं पडदाचाल जाहीर रीतीनें सोडली. यांना जयसिंहराव, शिवाजीराव, इंदिराराजे व धैर्यशीलराव अशीं अपत्यें झालीं. यांपैकीं जयसिंहराव व शिवाजीराव वारले. इंदिराराजे यांचें कुचबिहारच्या राजाशीं लग्न झालें.

यांच्या आयुष्याचे सहा काळखंड पडतात.—१.राज्याशीं संबंध येण्यापूर्वीचा बाल्यकाळ. तो अगदीं खेड्यांत गरीब कुटुंबांत गेला (१८६३-७५), २. शिक्षणकाळ. यांचें शिक्षण घरींच अनुभवपद्धतीनें झालें (१८७५-८१), ३. राज्यारोहण झाल्यानंतर राज्यपद्धतीची पुनर्घटना व तिचा अंमल करण्याची व्यवस्था करण्याचा काळ (१८८१-८७), ४. यानंतर प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें प्रवास वगैरे करून विविध अनुभव संपादन करण्याचा काळ (१८८७-९५), ५.मनामध्यें जमविलेल्या नव्या कल्पना व नवे विचार यांचा उच्चार व आचरण करण्याचा काळ (१८९५-०९), ६. यापुढील काळ मात्र यांनीं आपली राज्यव्यवस्था सुप्रतिष्ठित करून स्थैर्यानें तिची प्रगति करण्यांत घालविला (१९०९-३८). अशा प्रकारें यांच्या आयुष्याचें थोडक्यांत चित्र काढतां येईल.

हिंदुस्थानांत ब्रिटिश राज्य आणि संस्थानें यांतील राज्यकारभाराची नेहेमीं तुलना होते. या तुलनेंत ब्रिटिश राज्यापेक्षांहि सर्व प्रकारें व्यवस्थित अणि प्रगतिपर राज्यकारभार चालविण्याच्या बाबतींत यांची व यांच्या संस्थानची ख्याति आहे. अठराव्या वर्षी अधिकार प्राप्त झाल्यापासून यांनीं आपल्या प्रगतिपर धोरणाला सुरवात केली आणि आपल्या दीर्घकालीन कारकीर्दीत हे आपल्या जागरूक धोरणापासून कधींच च्युत झाले नाहींत. त्यामुळें यांनीं आपल्या प्रजेची व राज्याची भरभराट तर साधलीच पण उत्कृष्ट राज्यकर्ता अशी कीर्तिहि कमावली. ब्रिटिश राज्यांत अनेक वेळां असंतोषानें उग्र रूप धारण केलें; पण हे परप्रान्तांत राज्य करीत असूनसुद्धां यांनीं आपल्या राज्यांत खरोखरच अभिमान बाळगण्यासारखें विश्वासाचें वातावरण शेवटपर्यंत कायम टिकविलें. यांच्या राज्यांत लहरीपणाला थोडासुद्धां वाव नसे. प्रत्येक गोष्ट योजनापूर्वक आरंभून ती योजनेबरहुकूम तज्ज्ञांकडून पार पाडण्यावर यांचा कटाक्ष असल्यानें गोंधळ किंवा धरसोड न होतां आंखीव पद्धतीनें सर्व गोष्टी पार पडत. प्रत्येक खात्यावर पूर्ण वाकबगार माणसें नेमण्यावर यांचा कटाक्ष असे व जगांतील पहिल्या दर्जाच्या लोकांशीं आपल्या राज्यकारभाराचा संबंध येईल अशी व्यवस्था हे ठेवीत. जेथें यांचा संबंध येई तेथें आपली छाप ठेवण्याची कला यांना पूर्ण साधली होती. राउंड टेबल कॉन्फरन्सशीं संबंध येतांच 'संस्थानिकांनीं आपले हक्क कमी झाले तरी फेडरेशनचा पुरस्कार करून आपली जूट व शक्ति वाढवावी' असा यांनीं आदेश दिला. तसेंच यांचा अनेक जागतिक परिषदांशीं संबंध आला व तेथेंहि यांनीं उत्कृष्ट व नवीन विचारांचीं भाषणें करून आपली छाप कायम ठेवली. सतत ध्येयवादानें आणि संग्राहक बुद्धीनें वागून यांनीं आपला उत्कर्ष साधला, आपल्या प्रजेचें कल्याण केलें, मराठ्यांच्या उज्ज्वल इतिहासांत भर घातली आणि जगांतील एक कर्तबगार आणि यशस्वी महाराजा म्हणून अलौकिक कीर्ति मिळविली.

**गायकवाड, सिताराम रामचंद्र**— (जन्म स. १८५९, मृत्यु स. १८९७) शाईच्या कागदाचे उत्पादक व स्थलवर्णनकार. यांचें शिक्षण मॅट्रिकपर्यंत झालें होतें. रसायनशास्त्राचा यांचा अभ्यास चांगला होता. यांनीं शाईचा कारखाना काढून चांगले पैसे कमाविले. यांनीं शाईचे कागद, गोळ्या, पूड वगैरे तयार करण्याची कल्पना काढून स. १८८८ सालीं चांगली प्रसिद्धि मिळविली. यांच्या शाईच्या कागदाची फार वाखाणणी झाली. स. १८९० सालीं हे कागद विलायतेंत एक लाख खपले. यांचा विद्याव्यासंग जबर होता. यांनीं लिहिलेलें 'पुणें वर्णन' हें पुस्तक विशेष प्रसिद्ध आहे. या पुस्तकांत पुण्यासंबंधींची प्राचीन व तत्कालीन सर्व माहिती दिली आहे.

यांचें वाङ्मय— (१) विजापूरवर्णन १८८४; (२) पुणें वर्णन भाग १।२, १८८६।१८८८; (३) कुणकेश्वर; (४) सोलापूर जिल्ह्याचा भूगोल; (५) विजापुरांतील प्राचीन इमारती १८८७; (६) बाळबाळंतीणसंगोपन १८८८; (७) आशीरिया १८९५.

**गांगुली, सुप्रकाश**— (जन्म स. १८८६) कलाविशेषांचे सुप्रसिद्ध अभ्यासक व बडोद्याच्या आर्टगॅलरीचे व्यवस्थापक. हे जगप्रसिद्ध कवि रवीन्द्रनाथ टागोर यांचे भाचे. यांचें शिक्षण डोव्हेटन विद्यापीठ, कलकत्ता, येथें झालें. नंतर उत्तम कला व पुराणवस्तु-

संशोधन यांचे अभ्यासासाठीं हे युरोपास गेले. यानंतर यांनीं डॉ. बी. बी. स्पूनर यांचे सहकारी म्हणून इंपीरियल अर्किऑलॉजिकल सर्व्हेमध्यें सहा वर्षें काम केलें. तेथें यांनीं बंगाल, बिहार, ओरिसा, आसाम व छोटा नागपूर या प्रान्तांतील जुने शिलालेख घेऊन त्यांचे फोटो काढणें, त्यांची यादी तयार करणें, कलकत्ता येथील पदार्थसंग्रहालय आणि त्याच्या शाखा यांमधून जुन्या हिंदी कलावशेषांचा अभ्यास करणें अशा तऱ्हेचा व्यासंग केला.

(1) 'Descriptive Guide to the Baroda Museum and Art Gallery', (2) 'A Monograph on Ragas and Raginis', (3) 'A Monograph on Rajput and Kangra Paintings', (4) 'A Short History on the Art of Brocade Weaving in Gujarat', (5) 'Moghal Textiles', (6) 'Lacquer Work in India' हे यांचे ग्रंथ सुप्रसिद्ध आहेत.

**गांगुली, सुरेन्द्रनाथ—** ( मृत्यु स. १९२१ सुमार ) सुप्रसिद्ध बंगाली चित्रकार. अवनींद्रनाथ टागोरांचे शिष्य.

यांचीं 'नारद', 'नहुष', 'Discomfited Durvasa' इत्यादि चित्रें प्रसिद्ध आहेत. यांच्यावर कोणत्याहि कलमाची छाप पडलेली नसून यांचें कलम अगदीं स्वतंत्र आहे. अजिंठा-चित्रपद्धतीचा क्वचित् भास होतो. हे एकवीस वर्षांचे अल्पवयी मृत्यु पावले.

**गांधी, मंगळदास—** ( जन्म स. १८९४ सुमार ) अट्टल चोर. उंच देहयष्टि, मजबूत हाडपेर, पाणीदार डोळे व एका पायानें लंगडा. हा हुषार, कल्पक व दूर दृष्टीचा होता. हा सत्यवादी असल्यानें तुरुंगांत यास लोक ' महात्मा गांधी ' असें विनोदानें म्हणत.

हा मूळ काश्मीर प्रान्तांतील जम्मूचा राहणारा. याला उर्दू लिहितांवाचतां येतें व इंग्रजीहि थोडेंफार समजतें. गेल्या महायुद्धांत लष्करांत भरती होऊन हा मेसापोटेमियांत गेला होता. तेथें यानें अनेक धाडसाचीं कामें केलीं. शत्रूचे प्रदेश जिंकल्यावर ते लुटण्याचे देखावे यानें पाहिले होते व ती कला याला अवगत झाली होती.

पहिलें महायुद्ध संपल्यावर बेकारींत हा मोटार ड्रायव्हर झाला. पण लवकरच याचा साहसी स्वभाव जागृत होऊन हा लूटमार करूं लागला. अशा प्रकारें हा अट्टल चोर बनला व याला अनेक ( सात आठ ) वेळां तुरुंगांत जावें लागलें. मध्यंतरीं एकदोनदा उपरती होऊन हा आपल्या गांवीं निघून गेला होता; पण कांहीं दिवस लोटले की नशेबाजाच्या तल्लफीप्रमाणें ही याची वृत्ति जागृत होई व हा मुंबईस येऊन आपलें चौर्यकर्म सुरू करी.

स. १९३१ च्या गणेश चतुर्थीच्या रात्रीं ठाकुरद्वारावरील एका प्रभु गृहस्थाच्या घरीं चोरी करावयाचें यानें ठरविलें होतें. हें बिऱ्हाड दुसऱ्या मजल्यावर असल्यानें हा वर जाणाऱ्या पाण्याच्या नळाला धरून मध्यरात्रीच्या सुमारास वर चढला. आतां खिडकीला हात घालणार तोंच आंतून कोणीं खिडकी उघडली व याचा हात निसटून हा इतक्या उंचावरून खालीं पडला. हें पाहतांच आंतून खिडकी उघडणाऱ्या वृद्धाच्या तोंडून ' अरेरे ! माझ्या दाराशीं हत्या होणार ! फुकट मरणार बिचारा ! ' असे उद्गार निघाले. या उद्गारांचा याच्या मनावर फारच परिणाम होऊन याला लाज वाटली व पश्चात्तापानें यानें इतःपर चोरी करावयाची नाहीं असें ठरविलें ( गुन्हेगार, पा. १२६-१२९ ). गुन्हेगारांचें मानसशास्त्र या दृष्टीनें हें चरित्र अभ्यासण्यासारखें आहे.

**गांधी, महात्मा-मोहनदास करमचंद—** ( जन्म स. १८६९ ऑक्टोबर २ ) हिंदुस्थानचे जगप्रसिद्ध पुढारी व विसाव्या शतकांतील अभिनव राजकीय तत्त्वज्ञानी.

यांचा जन्म काठेवाडांत सुदामपुरी अथवा पोरबंदर येथें झाला. यांचे आजे उत्तमचंद हे पोरबंदरचे आणि वडील करमचंद हे पोरबंदर, वांकानेर व राजकोट या संस्थानांचे दिवाण होते. यांची आई कर्मठ, धर्मशील व करारी होती. हे संप्रदायानें वैष्णव असून जातीनें वैश्यांपैकीं बनियामोढवाणी होत.

यांचें शिक्षण काठेवाड हायस्कूलमध्यें झालें. हे मॅट्रिक झाल्यावर ( १८८७ ) पुढल्याच वर्षी शिक्षणाकरितां इंग्लंडला रवाना झाले ( १८८८ ). तेथें हे लंडन युनिव्हर्सिटीचे मॅट्रिक होऊन बॅरिस्टरीची परीक्षा उत्तीर्ण झाले ( १८९१ ).

यांनीं प्रथम मुंबई हायकोर्टाची सनद काढली ( १८९३ ). पण त्याच सालीं दक्षिण आफ्रिकेंत एका कुळाची बाजू समजावून देण्याकरितां यांना जाण्याची संधि मिळाली. पगार, कचा खर्च व एक वर्षाची मुदत ठरली व हे झांजीबारला पोंचले. तेथें यांना

काळागोरा हा भेद प्रत्येक ठिकाणीं जाणवूं लागला. दरबानच्या कोर्टात डोक्याला पगडी घालून हे बसले असतां यांना मॅजिस्ट्रेटनें पगडी काढण्यास सुनाविलें. पण यांनीं पगडी काढण्याचें नाकारून हे कोर्टाबाहेर पडले.

हिन्दी लोकांच्या श्रमानें आफ्रिकेचें नंदनवन झालें; पण त्यांना तेथें मजूरापेक्षां जास्त किंमत नाहीं. यांनासुद्धां तेथें 'मजूर वकील' असेंच म्हणत असत. प्रथम हिंदुस्थान सरकारच्या प्रोत्साहनानें ते मजूर तिकडे गेले, पण त्यांना नागरिकत्वाचा साधा हक्कहि नाकारण्यांत येऊं लागला. यानंतर कांहीं हिन्दी लोक साउथ आफ्रिकन रिपब्लिक-मध्यें शिरले. तेथें बोअर लोकांचें राज्य होतें. तेथें आशियांतील लोकांच्या विरुद्ध कायदे होऊं लागले, तेव्हां परवाने असणारांनींच व्यापार करावा असें ठरलें. पण बोअर लोकांनीं हिन्दी लोकांना परवाने देण्याचेंच बंद केलें. तेव्हां प्रिटोरिया येथील ब्रिटिश एजंटांनीं "परवान्याची फी सरकारकडे पाठवून द्या व तरीहि परवाना न मिळाला तर परवान्याशिवाय व्यापार करा" असा सल्ला हिन्दी लोकांना दिला. यामुळेंच यांना कायदेभंगाची कल्पना प्रथम मिळाली असावी. नंतर जेव्हां हिन्दी लोक पकडले जाऊं लागले तेव्हां यांनीं पैसे न देतां तुरुंगांत जाण्याची सूचना केली. या दडपशाही-विरुद्ध यांनीं पाठविलेले अर्ज ब्रिटिश सरकारनेंहि निर्दोषी ठरविले. त्या वेळीं नाताळ इंडियन कॉंग्रेसचे हे सेक्रेटरी असत व तेथें ही चळवळ जोरांत होती. हिंदुस्थान सरकारपुढें या तक्रारी मांडण्याकरितां हे हिंदुस्थानांत आले (१८९६). पण तिकडे यांच्या-विषयीं लोकमत अत्यंत कलुषित करण्यांत आलें व हे तिकडे परत गेले असतां लोकांच्या क्षोभांतून पोलिसाचा वेष घालून यांना बाहेर पळावें लागलें.

हक्क पाहिजेत तर जबाबदारीहि पत्करिली पाहिजे म्हणून बोअर युद्धांत यांनीं ऐन रणक्षेत्रांतून जखमी लोकांना उचलून आणण्याचें ब्रिटिशांतर्फे काम केलें (१८९९). प्रकृतीकरितां हे १९०१ सालीं हिंदुस्थानांत आले असतां तिकडे ब्रिटिश व बोअर यांचा तह होऊन त्यांत हिंदी लोकां-संबंधीं प्रतिकूल धोरणावर शिक्कामोर्तब झालें आणि यांनीं ब्रिटिशांना केलेली मदत वायां गेली. तेव्हां यांनीं 'ट्रान्सव्हाल ब्रिटिश इंडियन असोसिएशन' स्थापली व आपण तिचे सेक्रेटरी झाले. जोहान्सबर्गमध्यें प्लेग झाला असतां हिन्दी लोकांच्या शुश्रूषेबाबत यांनीं अत्यंत कष्ट केले. नंतर 'इंडियन ओपिनियन' नांवाचें इंग्रजी, गुजराथी, हिंदी व तामीळ या चार भाषांत चाल-विण्यांत येणारें साप्ताहिक काढलें (१९०४). रस्किनचें 'Unto This Last' हें पुस्तक वाचून यांना एक नवा मार्ग सुचला आणि यांनीं 'फिनिक्स' नांवाची वसाहत स्थापिली. छापखाना व पत्रें वसाहतीच्या स्वाधीन केलीं व शिवाय स्वतःचे पाऊण लाख रुपये अर्पण केले. याच वेळीं टॉलस्टॉयच्या Kingdom of God is Within You या पुस्तकाचा व भगवद्गीतेचा यांच्यावर विशेष परिणाम झाला. झुलू या स्थानिक लोकांनीं बंड केलें असतां यांनीं डोली-वाहकाचें काम करून लोकांची शुश्रूषा केली (१९०६). ही कामगिरी उरकून हे जोहान्सबर्गला येतात तों "नवीन परवाने काढण्याबद्दलचा आणि त्याकरितां करावयाच्या अर्जावर गुन्हेगाराप्रमाणें 'अंगठ्याचा ठसा असावा' असा हुकूम काढणारा 'काळा कायदा' निघाला (१९०६). ही अपमान-कारक पद्धत अमान्य करावयाची व जरूर तर त्याकरितां सत्याग्रह करून तुरुंगांत जावयाचें असें यांनीं जाहीर भाषण केलें. परंतु या धमकीस न जुमानतां तो कायदा बादशाहाच्या मंजुरीकरितां इंग्लंडला पाठविण्यांत आला. तेव्हां हे इंग्लंडला गेले व तेथें यांनीं केलेल्या प्रयत्नास यश येऊन बादशहांनीं त्या कायद्यास मान्यता देण्याचें नाकारलें.

परंतु पुढच्याच वर्षी वसाहतीला स्वातंत्र्य देण्यांत आलें आणि वसाहतीच्या कौन्सिलांत बादशहांनीं मंजूरी न दिलेल्या त्या कायद्याला मान्यता देण्यांत आली. अशा स्थितींत यांना कायदेभंगाची मोहीम सुरू करण्या-शिवाय गत्यंतर राहिलें नाहीं. यांच्यासह कित्येकांना पकडण्यांत आलें, पण चळवळ फोफावतच चालली. तेव्हां ज. बोथाच्या गव्हर्नमेंटनें जनरल स्मट्सना मध्यें घालून यांच्याशीं वाटाघाटी सुरू केल्या. तेव्हां असें ठरलें कीं, परवानगीच्या सक्तीचा कायदा रद्द करावा पण हिन्दी लोकांनीं स्वेच्छेनें आपलीं नांवें रजिस्टर करून सर्टि-फिकिटें घ्यावींत. अंगठ्याचा ठसा देऊन सक्तीनें नांव नोंदविणें यांत गुन्हेगारीचें रूप होतें, तसें स्वेच्छेनें नांव नोंदविण्यांत नव्हतें. पण हा फरक सामान्य लोकांच्या लक्षांत येईना. त्यामुळें ते लोक यांच्याविरुद्ध गेले व यांचा जीव घेण्याची भाषा बोलली जाऊं लागली. पण या धमकीला भीक न घालतां हे कचेरींत जावयास निघतांच यांना एका पठाणानें बेशुद्ध होईपर्यंत मारलें. हे शुद्धीवर येतांच यांनीं प्रथम आपलें नांव नोंदविण्याकरितां अर्ज केला. पण गव्हर्नमेंटनें स्वेच्छेनें नांव नोंदविणारास सवलत

देऊन इतरांबाबत मात्र जुनाच कायदा पास केला. तेव्हां जोहान्सबर्गला पुनः सभा भरवून लोकांनीं आपली सर्टिफिकिटें जाळून टाकलीं व पुनः एकदां कायदेभंगास सुरवात झाली ( जुलै १९०८ ). त्यांत यांना, यांच्या पत्नीला व कित्येक लोकांना तुरुंगवास घडला व कित्येकांच्या घरादारांचा व धंद्याचा पूर्ण नाश झाला. पण अखेर जून १९१४ ला या लढ्याचा पूर्ण शेवट होऊन इंडियन रिलीफ बिलान्वयें हा कायदा मागें घेण्यांत आला, ३ पौंड डोईपट्टी रद्द झाली व इतर कमीपणा आणणाऱ्या गोष्टी दूर होऊन यांचा १०० टक्के जय झाला. येथें यांच्या चरित्रांतील आफ्रिका खंड संपतो. या जयामुळें यांच्या चळवळीच्या एका नव्या पद्धतीकडे जगांतील सर्व लोकांचें लक्ष वेधलें व यांचें सर्वत्र कोडकौतुक झालें.

यानंतर हे इंग्लंडला गेले, तेव्हां नुकतीच पहिल्या महायुद्धास सुरवात झाली होती. ' अँब्युलन्स कोअर ' काढून युद्धास मदत करण्याची यांची इच्छा होती; पण प्रकृति बिघडल्यानें हे हिंदुस्थानांत आले ( १९१५ जाने. ) ना. गोखल्यांना हे सुरवातीपासूनच गुरु मानीत. त्यांच्या सांगण्यावरून कोणच्याहि चळवळींत भाग घेण्यापूर्वी एक वर्ष हिंदुस्थानभर हिंडून येथील परिस्थिति अवलोकन करण्याचें यांनीं ठरविलें. या वेळीं ना. गोखले वारले. त्यांनीं 'गांधी हे खरोखर महात्मा आहेत, माझे गुरु रानडे किंवा राममोहन रॉय हेच फार तर, यांची बरोबरी करूं शकतील ' या शब्दांनीं यांना गौरविलें होतें. त्यामुळें हिंदुस्थानांत येतांच यांना लोक ' महात्मा ' म्हणूं लागले.

नंतर यांनीं अहमदाबादेजवळ साबरमतीच्या तीरीं ' सत्याग्रहाश्रम ' ( १९१५ मे २५ ) काढला. आफ्रिकेंतील यांच्या फिनिक्स वसाहतीचीच कल्पना या आश्रमाच्या मुळाशीं होती. यांच्या तत्त्वावर विश्वास ठेवणारे कांहीं स्त्री-पुरुष यांना मिळाले. जातिभेद न पाळण्याचें यांच्या आश्रमाचें तत्त्व होतें. एका अस्पृश्य कुटुंबालाहि आश्रमांत आश्रय देण्यांत आला. त्यामुळें यांची आर्थिक मदत बंद पडली. मग यांनीं अस्पृश्यांत जाऊन राहण्याचें ठरविलें. तथापि तसें होण्यापूर्वी यांना पंधरा हजारांचा अनपेक्षित चेक मिळाला.

यांचा विशेषपणा बनारस हिंदुविश्वविद्यालयाच्या उद्घाटनसमारंभाच्या वेळीं यांनीं केलेल्या भाषणानें सर्वांच्या लक्षांत आला आणि बहुजनसमाजाचें लक्ष यांनीं आपल्याकडे वेधून घेतलें ( ४ फेब्रु. १९१६ ). यांचा स्पष्टवक्तेपणा तेथें कोणालाच झेपला नाहीं. राजेमहाराजे तर केव्हांच सभेंतून अदृश्य झाले, पण डॉ. बेझंटसारख्यांनाहि सभास्थान सोडावें लागलें.

यानंतर फिजी बेटांत पाठविण्यांत येणाऱ्या मुदतबंद मजुरांची पद्धत बंद करण्यांत येईल असें आश्वासन देऊन, तिकडे मळेवाल्यांना मात्र ही पद्धत पांच वर्षें आम्ही बंद करीत नाहीं असें आश्वासन सरकारनें दिल्याची बातमी सर्वत्र पसरली. तेव्हां यांनीं सत्याग्रह करण्याची घोषणा करतांच व्हाइसरॉयनें ती पद्धति बंद केल्याचें जाहीर केलें ( १२ मे १९१७ ). अशा कार्यामुळें लोकांचें यांच्याकडे विशेष लक्ष वेधत चाललें.

लखनौ राष्ट्रसभेच्या वेळीं बिहारमधील कांहीं प्रतिनिधींनीं चंपारण्यांतील शेतकऱ्यांकडे यांचें लक्ष वेधिलें. तेथें शेतकऱ्यांना सक्तीनें नीळ पेरावयास लावीत. १९१७ च्या एप्रिलमध्यें हे मोतीहारी गांवीं चौकशीकरितां गेले. तेव्हां यांच्या या वास्तव्यामुळें सार्वजनिक शांततेस धोका असल्यानें जिल्हा सोडून जाण्याचा यांना हुकूम झाला. तो हुकूम यांनीं मानण्याचें नाकारिलें व खटला भरला असतां गुन्हा कबूल करून शिक्षा भोगण्यास तयार झाले. पण सरकारी हुकमानें खटला काढून घेण्यांत आला; आणि यांना व यांच्या अनुयायांना तेथें काम करण्यास मोकळीक मिळाली. तेथें यांच्या अनुयायांत राजेन्द्रप्रसाद, कृपलानी, सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सो.चे डॉ. देव व स्वयंसेवकांत शंकरराव देव होते. पुढें सरकारनें चौकशी करण्याकरितां कमिशन नेमिलें, त्यांत यांचा समावेश केला. कमिशनच्या वृत्तान्ताला अनुसरून सरकारनें एक कायदा केला व शेतकऱ्यांचीं गाऱ्हाणीं दूर करण्यांत आलीं. हीं गाऱ्हाणीं त्यापूर्वीच्या शंभर वर्षांत कोणत्याहि उपायानें दूर झालीं नव्हतीं.

या वेळीं अहमदाबादेंतील मजूर व मालक यांच्यांतील तेढ वाढत चालली. तेव्हां यांनीं मजुरांची बाजू घेतली. पण पुढें बावीस दिवसांत यांच्याकडून कांहींच न झाल्यानें संपवाल्या मजुरांत शिथिलता येत चालली. तेव्हां यांनीं प्राणान्तिक उपोषणाचा निश्चय जाहीर करून तीन दिवसांतच मजूर व मालक यांचा सलोखा घडवून आणला ( १९१८ ). याच वेळीं यांनीं यांच्या पद्धतीनें काम करणाऱ्या मजूर महाजन संस्थेची स्थापना केली.

यानंतर गुजराथेंत खेडा जिल्ह्यांत दुष्काळ पडला

( १९१८ मार्च ) व शेतकऱ्यांना शेतसारा भरणें अशक्य झालें. शेतकऱ्यांनीं यांना निमंत्रण केलें. यांनीं योग्य भाषेंत अर्ज करून सारातहकुबी मागितली. पण यांचा अर्ज फेटाळला गेला. तेव्हां यांनीं शेतकऱ्यांना सारा न देण्याचा सल्ला दिला. सारा न दिल्यानें शेतांतील पिकें जप्त करण्यांत आलीं. त्यावर यांनीं जप्त केलेली पिकें कापून नेण्याचा शेतकऱ्यांना सल्ला दिला. त्यामुळें शेतकऱ्यांना शिक्षा झाल्या, पण पुढें तडजोड होऊन हें प्रकरण मिटलें.

सरकारलाहि यांच्या प्रभावी नेतृत्वाची कल्पना आली व सरकारला युद्धाच्या कामीं मदत करण्याकरितां भरविलेल्या दिल्ली दरबारास यांनीं एकदां नाकारिलें असतां पुनः आमंत्रण देऊन नेण्यांत आलें. तेथें यांनीं हिंदुस्थानची आकांक्षा हिंदी भाषेंतून मांडली आणि आपलें सत्याग्रहाच्या चळवळीचें काम बंद करावयास सांगणें म्हणजे जीवन तहकूब करावयास सांगणें आहे असें लिहून कळविलें.

पहिलें महायुद्ध संपल्यानंतर 'डिफेन्स ऑफ इंडिया ॲक्ट' आपोआप रद्द होणार होता. तेव्हां सरकारनें रौलेट ॲक्टसारखे काळे कायदे घडविले. त्याला विरोध करण्याकरितां यांनीं ६ एप्रिल १९१९ हा दिवस ठरविला. सर्व हिंदुस्थानभर हरताळ, उपवास, प्रार्थना, मिरवणुकी व सभा झाल्या. जप्त व बेकायदा वाङ्मयहि प्रसिद्ध करण्यांत आलें. हे दिल्लीकडे जात असतां पंजाब व दिल्ली प्रांतांत जाण्यास यांना बंदी करण्यांत आली. यांनीं हुकूम मानण्याचें नाकारिलें. तेव्हां यांना पकडण्यांत आलें त्यामुळें सर्व हिंदुस्थानभर दंगे होऊन अनेक भयंकर गोष्टी घडल्या.

यांना ११ एप्रिलला मुंबईस आणून सोडलें. तेथें मुंबई प्रान्ताच्या बाहेर न जाण्याचा हुकूम यांच्यावर बजावण्यांत आला. तो मोडण्याचा यांचा विचार होता. पण ठिकठिकाणच्या अत्याचारांच्या बातम्या ऐकून यांनीं अत्याचार थांबविण्याकरितां तीन दिवसांचें उपोषण करून ही अखिल भारतीय स्वरूपाची पहिली अपूर्व मोहीम बिनमुदत तहकूब केली.

ता. १३ एप्रिल १९१९ रोजीं अमृतसर येथें 'जालियनवाला बाग' नांवाच्या बंदिस्त जागेंत मनाई केलेली सभा भरविली म्हणून यांत्रिक तोफांतून गोळीबार करण्यांत आला. त्यांत चारशें लोक मृत्यु पावले व बाराशेंच्या वर लोक जखमी झाले. शिवाय, लष्करी कायदा पुकारून लोकांचे अनन्वित हाल करण्यांत आले ते वेगळेच. त्याच्या चौकशीकरितां सरकारनें हंटर कमिशन नेमिलें. त्यांत राष्ट्रसभेपैकीं कोणी नव्हतें. राष्ट्रसभेनें स्वतंत्र चौकशी-कमिशन नेमून सरकारी कमिशनशीं सहकार्य करण्याचा प्रयत्न केला; पण तो न जमल्यानें तिनें आपलें चौकशीचें काम स्वतंत्रच केलें. पण हें सर्व प्रकरण व त्यावर पांघरूण टाकण्याच्या सरकारी धोरणामुळें लोक अत्यंत असंतुष्ट झाले. त्यांतच खिलाफतविषयक धोरणानें मुसलमान समाज अत्यंत नाखूष बनला आणि सरकारनें देण्यास काढलेल्या मॉंटफोर्ड सुधारणाहि अत्यंत हिणकस आढळल्या. तेव्हां यांच्या निर्भय आणि परिणामकारक ठरलेल्या असहकारितेशिवाय तरणोपाय नाहीं असें सर्वांना वाटूं लागलें. यांनींहि पण प्रसंगाप्रसंगानें व्यक्त केलेल्या असहकारितेची घोषणा टिळकांच्या मृत्यूच्या दिवशीं जाहीरपणें केली ( १ ऑगस्ट १९२० ). यांचा सत्याग्रह आफ्रिकेपासूनच प्रसिद्ध होता पण 'नॉन-को-आपरेशन' म्हणजे असहकारितेच्या नव्या चळवळीचा जन्म मात्र या वेळीं झाला.

असहकारितेच्या चळवळींतील कार्यक्रम यांनीं पुढीलप्रमाणें मांडला : १ सरकारी पदव्या व मानाच्या जागांचा त्याग, २ सरकारी व निमसरकारी समारंभांत भाग न घेणें, ३ सरकारी व निमसरकारी शाळाकॉलेजांतून मुलें काढून त्यांची राष्ट्रीय शाळांत व्यवस्था करणें, ४ ब्रिटिश कोर्टांवर बहिष्कार घालून खासगी लवादांमार्फत तंटे मिटविणें, ५ मेसापोटेमियांतील लष्करी कामाकरितां कारकून व मजूर म्हणून भरती न होणें, ६ कौन्सिल उमेदवारांनीं आपलीं नांवें परत घेणें व उभे राहणारांना मतें न देणें, व ७ परदेशी मालावर बहिष्कार.

यांत पुढें पोलीस नि लष्कर यांना सरकारी नोकरींतून निवृत्त करण्याच्या प्रयत्नाचा व सारबंदीचाहि समावेश झाला.

वरील कार्यक्रम शिस्तीनें पार पाडण्याकरितां हे व अलीबंधु यांनीं देशभर दौरे काढून लोकांत उत्साह व शिस्त उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला. या नव्या कार्यक्रमाला मान्यता घेण्याकरितां कलकत्त्यास राष्ट्रसभेचें जादा अधिवेशन भरविण्यांत आलें (१-९ सप्टें. १९२०). यांच्या ठरावाला प्रचंड बहुमतानें मान्यता मिळाली. यांनींहि 'माझा कार्यक्रम पार पाडाल तर एक वर्षांत स्वराज्य' हा मंत्र उच्चारून देशभर नवें चैतन्य निर्माण

केलें. नवीन सुधारणांना अनुसरून होणाऱ्या कौन्सिल निवडणुकींत शेंकडा ऐंशी लोकांनीं मतें दिलीं नाहींत. लेखन व भाषण यांच्या द्वारां यांनीं देशांत अगदीं नवा आत्मविश्वास उत्पन्न केला. यांच्या चळवळींच्या प्रभावांत नवेजुने सर्व पुढारी ओढले गेले. प्रान्तोप्रान्तीं देशाकरितां सर्वस्वाचा त्याग करून मोठमोठे वजनदार लोक रात्रंदिवस काम करूं लागले. पं. मोतीलाल नेहरु व चित्तरंजन दास यांच्यासारख्यांनींसुद्धां वकीली सोडली. राष्ट्रसभेच्या नागपूर येथील वार्षिक अधिवेशनांत तर यांच्या कर्तृत्वाचा विशेषच प्रभाव पडून यांचें नेतृत्व पक्कें झालें ( १९२० डिसें. ). राष्ट्रसभेनें 'सनदशीर मार्गानें वसाहतींचें स्वराज्य ' हें ध्येय सोडून ' शांततेच्या व न्याय्य मार्गानें स्वराज्य ' असा त्यांत बदल केला.

आपल्या या नव्या चळवळीची छाप लोकांवर किती बसली हें पाहण्याकरितां यांनीं एक कोटीचा टिळक स्वराज्य फंड उभारणें, वीस लाख चरके सुरू करणें, मद्यबंदी घडवून आणणें व ग्रामपंचायती स्थापन करणें असा कार्यक्रम हातीं घेऊन तो यशस्वीपणें पार पाडला. टिळक स्वराज्य फंड तर १५ लक्षांनीं अधिकच जमला आणि यांच्या चळवळीला लोकांचा भरपूर पाठिंबा आहे ही गोष्ट सिद्ध झाली. अलीबंधूंच्या भाषणांतील अत्याचारप्रवर्तक वाक्यांबद्दल यांनीं त्यांना जाहीर माफी मागण्यास भाग पाडलें ( १९२१ मे ); पण जुलैंत यांनीं मुलकी व लष्करी नोकरांना सरकारशीं असहकार करण्याचा आदेश दिला. तेव्हां सर्वत्र खटले व दडपशाही सुरू झाली. सप्टें. १७ ला युवराज हिंदुस्थानांत आले तेव्हां तर हरताळ, निषेध वगैरे होऊन दंगे व रक्तपातहि झाला. यांनीं पांच दिवसांचा उपवास जाहीर करून एक दोन दिवसांत शांतता स्थापन केली. या वेळीं २०।२५ हजार लोक बंदींत पडले, त्यांत दास, नेहरु, लजपतराय यांच्यासारखीं माणसें होतीं. तरीहि सत्याग्रह थांबण्याचें चिन्ह दिसेना.

ता. १ फेब्रुवारी १९२२ ला यांनीं व्हाइसरॉयना पत्र लिहून ' दडपशाही बंद करून नागरिक हक्कांच्या शाश्वतीची हमी द्या, नाहीं तर बार्डोली तालुक्यांत सारा-बंदीची मोहीम सुरू करतों ' असें कळविलें. उत्तरीं नकार येतांच अहमदाबाद राष्ट्रसभेनें दिलेल्या सर्वाधिकाराला अनुसरून यांनीं ती योजना आंखली. पण ५ फेब्रु. रोजीं बिहारमध्यें चौरीचुरा येथें दंगा होऊन लोकांनीं पोलीसांना जाळल्यामुळें यांनीं आपल्या 'अनत्याचाराच्या तत्त्वाला बाध आला ' म्हणून ही चळवळ बिनमुदत स्थगित केली आणि प्रायश्चित्तादाखल पांच दिवसांचा उपवास केला. कायदेभंगाची चळवळ बंद करून यांनीं भूमिका तयार करण्याकरितां देशाला विधायक कार्यक्रमाचा आदेश दिला. सरकारनेंहि यांना ' यंग इंडिया ' मधील तीन लेखांबद्दल सहा वर्षांची शिक्षा दिली ( १९२२ मार्च ).

या तुरुंगवासांतून यांची सुटका अपेंडिसायटिसवरील शस्त्रक्रियेकरितां प्रथम झाली ( १२-१-२४ ). पुढें एक महिन्यांत यांना मुक्त करण्यांत आलें. त्यापूर्वीच राष्ट्रसभेच्या अनुमतीनें स्वराज्यपक्षानें कौन्सिलांत प्रवेश केला होता. देशांत फेरनाफेर असे दोन पक्ष पडले होते. यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या बेळगांव राष्ट्रसभेंत दोन्ही पक्षांना आपल्या इच्छेप्रमाणें काम करण्यास संमति देऊन यांनीं समेट घडून आणला ( १९२४ डिसें. ).

पण कायदेमंडळांतील अडवणूक यशस्वी होत नाहीं अशी खात्री पटतांच १९२९ च्या राष्ट्रसभेंत पं. मोतीलाल नेहरू यांनीं कायदेमंडळावरील बहिष्काराचा व सत्याग्रहांत सामील होण्याचा ठराव मान्य करून घेऊन पुनः सत्याग्रहाचें शिंग फुंकण्यांत आलें आणि त्याचें नेतृत्व यांनीं पत्करिलें.

कांहीं तरी साध्या घटनेंतून आश्चर्यकारक परिणाम घडवून आणण्याची यांची हातोटी अद्भुत आहे. याबाबत ' दांडीची यात्रा ' काढून मिठाचा कायदा मोडण्याचा जो सत्याग्रह यांनीं केला त्याचें उदाहरण नमुनेदार आहे. हिंदुस्थानाच्या प्रचंड किनाऱ्यावर अपरंपार मीठ पैदा होत असतां येथें परदेशांतून मीठ येतें आणि येथील लोकांना मिठावर प्रचंड कर भरण्याचा प्रसंग येतो, या साध्या घटनेवर यांनीं सर्वांना सहज पटतील अशा अकरा मागण्यांचा मसुदा तयार करून तो व्हाइसरॉयला सादर केला ( ३० जानें. १९३० ). आणि आपल्या चळवळीची पद्धतशीर मांडणी करून हे कार्याला लागले. सरकारकडून मागण्या मान्य करणें दूरच राहिलें, उलट धमकावणीचें उत्तर आलें. तेव्हां यांनीं ' गुडघे टेकून भाकरी मागितली असतां धोंडा पदरांत टाकला ' असें प्रत्युत्तर देऊन ' या चळवळींत यश मिळालें नाहीं तर साबरमती आश्रमांत पुनः पाऊल टाकणार नाहीं, ' ' माझ्या आयुष्यांतील हा स्वराज्याचा शेवटला लढा आहे ' इत्यादि प्रतिज्ञा जाहीर करून सर्वांचें लक्ष आपणांकडे खेचून घेतलें. ' अत्याचार घडले तरी हा लढा मी थांबविणार नाहीं ' असेंहि लोकांना आश्वासन

दिलें व १२ मार्च १९३० ला साबरमती आश्रमांतून बाहेर पडले. आधल्या दिवशींच चार प्राध्यापक व सोळा विद्यार्थी यांचें 'अरुण दळ' पुढल्या मुक्कामावर दाखल झालें होतें. ठरलेल्या वेळीं हे आपल्या ७२ सत्याग्रह्यांसह निघाले. सकाळीं एका ठिकाणीं तर संध्याकाळीं दुसऱ्या ठिकाणीं असे मुक्काम करीत दांडीकडे प्रयाण सुरू झालें. यामुळें गुजराथेंतच काय पण हिंदुस्थानच्या अणुरेणूंतून स्पंदन सुरू झालें. बेकायदा मीठ तयार करणें, त्याची विक्री करणें, जंगल-सत्याग्रह वगैरे प्रकार सर्वत्र सुरू झाले. हिंदुस्थानांतच काय पण जगांतील सर्व वर्तमानपत्रांत त्याचे ध्वनि उमटूं लागले. सरकारी नोकर व कौन्सिलांतील सभासद राजीनामे देऊं लागले. प्रथम न पकडतांच सत्याग्रह्यांचा आवेश नष्ट करण्याचा सरकारचा विचार होता. पण यांनीं मिठागरावर हल्ले करण्याची सूचना दिली. शेवटीं कराडी येथें यांना पकडून येरवडा येथें चौकशीशिवाय अटकेंत ठेवण्यांत आलें (४ मे १९३०). यामुळें चळवळ शिथिल न होतां अधिकच फोफावली. 'नवजीवन' पत्र जप्त झालें. सप्रू-जयकर यांच्या दौत्यानें काम भागत नाहीं असें पाहून तुरुंगांत असणाऱ्या नेहरू पितापुत्रांना येरवडा येथें आणवून त्यांची व यांची भेट करविण्यांत आली.

पण वाटाघाटी करून जाहीर केलेल्या १ राष्ट्रीय सरकार, २ विभक्त होण्याचा हक्क, ३ राष्ट्रीय कर्ज व ४ संक्रमणकालांतील बंधनें या अटी सरकारला मान्य न झाल्यानें तडजोड फिसकटली. पहिली गोलमेज परिषद् लंडन येथें यांच्याशिवायच पार पडली (१२ नवं.१९३०). पण यांच्याशिवाय परिषद् म्हणजे आंकड्याशिवाय पूज्यें होत. लगेच यांना यांच्या १९ अनुयायांसह तुरुंगांतून मुक्त करण्यांत आलें (२५ जाने. १९३१). व्हाइसरॉयनें सलोखा व शांतता यांची इच्छा करणारें पत्र यांना धाडलें. शेवटीं स्वतःपुरतें मीठ करण्याच्या व तुरुंगांतील चळवळे बिनशर्त सोडण्याच्या अटींवर तडजोड झाली (५ मार्च १९३१); आणि यांची तिसरी सत्याग्रहाची प्रचंड चळवळ विजयी होऊन येथें समाप्त झाली. हे राष्ट्रसभेचे एकमेव प्रतिनिधि म्हणून गोलमेज परिषदेस गेले व तेथें यांनीं देशाची शिष्टाई उत्कृष्टपणें केली.

पण परत येण्यापूर्वीच देशांत चळवळ सुरू होऊन अनेक पुढारी तुरुंगांत गेले होते. यांनीं सामोपचाराचा पुष्कळ प्रयत्न करून पाहिला. पण यश न आल्यानें चळवळीचें शस्त्र यांनीं बाहेर काढण्यापूर्वीच यांना मुंबईस अटक होऊन येरवड्याच्या तुरुंगांत ठेवण्यांत आलें (४ जाने. १९३२)

गोलमेजपरिषदेनें अस्पृश्यांना हिंदूंतून वेगळें काढून त्यांना स्वतंत्र मतदारसंघ दिला होता. ही अनिष्ट गोष्ट बदलून घेण्याकरितां यांनीं तेथें प्राणान्तिक उपोषण आरंभिलें आणि शेवटीं संयुक्त मतदारांनीं निवडलेल्या चारांपैकीं एकाला अस्पृश्यांनीं निवडावें असें ठरून हें प्रकरण यशस्वी झालें (२०-२६ सप्टें. १९३२).

शेवटीं यांनीं 'अस्पृश्यतेचा नायनाट करण्याकरितां' उपवास-कालांत मिळालेल्या सर्व सवलती त्याच कामाकरितां पुनः मिळवून तुरुंग हें अस्पृश्यतानिवारणकार्याचें केन्द्र बनविलें.

हिंदुस्थानांतील प्रमुख पंडितांची परिषद् येरवडा तुरुंगांत भरवून त्यांच्या सहीनें प्रचलित अस्पृश्यतेला शास्त्रांत आधार नसल्याचें पत्रक प्रसिद्ध केलें (३३). अखिल भारतीय हरिजन सेवक संघ काढून त्याचें नेतृत्व घनश्यामदास बिर्लांना दिलें व बाप्पा ठक्करांना चिटणीस केलें. गौरवदर्शक 'हरिजन' शब्द उपयोगांत आणला. त्याकरितां पंचवीस लाखांचा निधि उभारण्याचें ठरविलें व हरिजन साप्ताहिक सुरू केलें (११ फेब्रु. १९३३). अस्पृश्यतानिवारणाबाबत लोकांत जागृति व प्रांजलपणा आणण्याकरितां यांनीं ११ दिवसांचा उपवास आरंभला. या वेळीं सरकारनें यांना मुक्त केलें. यांनीं या मुक्ततेचा उपयोग राजकीय चळवळीकडे करण्याचें नाकारिलें. तथापि यांनीं सामुदायिक कायदेभंग बंद करून फक्त वैयक्तिक कायदेभंग चालू ठेवला. त्याकरितां यांना पकडून (१ ऑगष्ट १९३३) स्थानबद्ध करण्यांत आलें (४ ऑगष्ट). पण यांनीं स्थानबद्धतेची अपमानकारक अट मोडल्यामुळें यांना एक वर्षाची शिक्षा झाली. यांना मागें मिळालेल्या तुरुंगांतील सवलती या वेळीं बंद झाल्या. यांनीं पुनः उपोषण आरंभलें. पांच दिवसांत यांना हॉस्पिटलांत पोंचवावें लागलें.

पण हा खेळ खेळण्यापेक्षां शिक्षेची मुदत यांनीं हरिजनकार्यांत घालविण्याचें ठरवून हे राजकारणापासून निवृत्त झाले (३ आगष्ट १९३४) व यांनीं दहा महिनेपर्यंत हरिजनांच्या उद्धारार्थ हिंदुस्थानांत प्रचंड दौरा काढला. या दौऱ्यांत पुणें येथें यांच्यावर बॉंब टाकण्याचा प्रयत्न झाला. अजमेर येथें यांच्या एका अनुयायाकडून स्वामी लालनाथ नांवाच्या सनातनी विरोधकावर लाठी प्रहार झाला. त्याबद्दल यांनीं सात दिवस उपवास करून प्रायश्चित घेतलें. मलबारांतील गुरुवायूरच्या मंदिरप्रवेशा-

बद्दल मतमोजणी केली असतां यांना शेंकडा सत्तर मतें अनुकूल पडलीं. या वेळीं यांनीं प्रचंड जागृति करून या कामाकरितां आठ लक्ष रुपये जमविले.

पूर्वी हे राष्ट्रसभेंतून कायदेमंडळांतील कार्यास वाव देण्याकरितां बाजूस सरले होते ( १९२४-३० ). आणि मुंबईस भरलेल्या अधिवेशनापासून हे राष्ट्रसभेचे चार आणे देणारे साधे सभासदहि राहिले नाहात ( २६ आक्टो. १९३४ ). राष्ट्रसभा व आपण यांच्यांत अहिंसादि बाबतांत पूर्ण मतैक्य नसल्यानें आपल्या सत्याग्रहादि चळवळींत यशस्वी होत नाहीं हें यांनीं राष्ट्रसभा सोडण्याचें कारण दिलें. तथापि ' अखिल भारतीय ग्रामोद्योग संघ ' काढण्याचा ठराव करून यांच्या कार्याला राष्ट्रसभेनें आपला पाठिंबाच दिला. मात्र यांनीं ग्रामोद्योगाची सर्व योजना राष्ट्रसभेंतून हेतुपूर्वक अलग ठेवली व तिची मांडणी मध्यप्रान्तांत वर्ध्याजवळ शेगांवीं झोपड्या बांधून आरंभिली.

गोलमेजपरिषदेच्या वाटाघाटींतून बाहेर पडलेल्या १९३५च्या राज्यघटनेप्रमाणें आलेल्या निवडणुकी राष्ट्रसभेनें लढवून हिंदुस्थानच्या अकरा प्रान्तांपैकीं सात प्रान्तांत राष्ट्रसभेचीं मंत्रिमंडळें दैनंदिन व्यवहारांत ढवळाढवळ न करण्याचें हिंदुस्थान सरकारचें आश्वासन मिळून स्थापन झालीं ( १७ जुलै १९३७ ). त्यांनीं राजबंदी सोडणें, जुलमी कायद्यांचें उच्चाटण करणें, दारुबंदी, शिक्षणाची वर्धा-योजना, कशील त्याची जमीन, राष्ट्रभाषाप्रचार, साक्षरता-प्रसार, गुजराथेंतील करबंदीच्या चळवळींत जप्त झालेल्या जमिनी परत देणें वगैरेसारखीं कामें करून जनतेच्या मनावर पूर्ण छाप बसविली. हा सर्व परिणाम स्थितप्रज्ञा-प्रमाणें राष्ट्रसभेपासून अलग झालेल्या या महात्म्याचा होय, हें अगदीं उघड गुपित आहे.

पण ३ सप्टें. १९३९ रोजीं ब्रिटिशसरकारच्या मागोमाग हिंदुस्थानसरकारनें विधिमंडळाची संमति न घेतांच हिंदुस्थानला जर्मनांविरुद्ध युद्धांत लोटतांच राष्ट्रसभेच्या आदेशानुसार सातहि प्रान्तांतील मंत्रिमंडळांनीं राजिनामे दिले ( २२ आक्टो. १९३९ ).

राजकोट राज्यांत राजकीय सुधारणांबाबत नेमलेल्या कमेटींतील प्रथम जाहीर झालेली नांवें परत घेतलीं जातांच यांनीं वचनभंगाबद्दल उपोषणास सुरुवात केली. पण व्हाइसरॉयनें मध्यस्थी करितांच यांनीं उपवास सोडला. पण दडपणानें मिळालेला न्याय कलंकित म्हणून यांनीं राजकोटचा प्रश्नच सोडून दिला (१७ मे १९३९).

संप्रदायाचें स्वरूप येतें म्हणून १४४ निष्ठावन्त कार्यकर्त्यांचा ' गांधीसेवा-संघ ' विनोबा भावे, किशोरीलाल मश्रूवाला वगैरे ९ सभासदांपुरता मर्यादित केला ( मलिकंदा, १९४० ).

हिंदुस्थानला युद्धोत्तर राष्ट्रीय सरकार देण्याच्या स्टॅफर्ड क्रिप्स योजनेचा 'Post-dated Cheque' ' पुढल्या तारखेची हुंडी ' म्हणून यांनीं धिःकार केला ( १९४२ ).

परंतु एकीकडून वाढती दडपशाही व दुसरीकडून जपानी स्वारीचें दडपण यांमुळें मुंबईस भरलेल्या कॉंग्रेस कमिटीनें पुढील निर्णय घेण्याचें ठरविलें ( ७ ऑगस्ट १९४२ ): "दाराशीं आलेल्या जपानचा प्रतिकार करण्यास हिंदुस्थानचीं राज्यसूत्रें हिंदी माणसाचेच हातीं असलीं पाहिजेत व त्याकरितां इंग्रजी सत्ता येथून नाहींशी झाली पाहिजे." पण हा निर्णय बाहेर येण्याच्या पूर्वीच यांना व इतर कार्यकर्त्यांना पकडण्यांत आलें. या वेळच्या खळबळीची कल्पना ६०,२२९ लोकांना अटक, १८०००, स्थानबद्ध, ९४० ठार व १६३० जखमी हे आंकडे देतील.

या चळवळीची ' चले जाव ' म्हणून प्रसिद्धि असून ' करेंगे या मरेंगे ' हा या वेळचा मंत्र होता. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याकरितां केलेलें हें ' अनत्याचारी उघड बंड ' होतें. या वेळीं झालेला पूल पाडणें, तारा तोडणें, रूळ उखडणें वगैरे कार्यक्रम यांच्याशीं चर्चा झालेला पण यांनीं मान्यता न दिलेला होता.

यांना आगाखान पॅलेस, पुणें, येथें ठेवण्यांत आलें. तेथें आपल्यावरील जपान-धार्जिणेपणाचा आरोप धुऊन टाकण्याकरितां यांनीं २१ दिवसांचा उपवास केला. तेथेंच प्रथम त्यांचे एकनिष्ठ सहकारी महादेवभाई देसाई (१९४३ ऑगस्ट १५) व नंतर यांच्या पत्नी कस्तुरबा यांना देवाज्ञा झाली ( १९४४ फेब्रु. १८ ). पुढें यांना केवळ प्रकृतीच्या निमित्तानें मुक्त करण्यांत आलें ( ६ मे १९४४ ).

वेव्हेलयोजनेकरितां भरलेल्या सिमला कॉन्फरन्सच्या-वेळीं हे सल्लागार म्हणून सिमल्यास उपस्थित होते (१५ जुलै १९४५). यांनीं त्या योजनेसंबंधीं अनुकूल धोरण स्वीकारलें, पण मुस्लीम लीगचे नेते जिना यांच्या विरोधामुळें ती परिषद् अयशस्वी झाली. आणि येथें ' तिसरी सत्ता आहे तोंपर्यंत जातीजातींत ऐक्य होणें अशक्य आहे ' या यांच्या उक्तीचें पुनः एकदां प्रत्यन्तर आलें.

यांची एखाद्या प्रश्नाकडे सर्वांचें लक्ष केन्द्रित करून विचार करावयास लावण्याकरितां केवळ पाण्यावर राहून

उपवास करण्याची पद्धत आहे. उपवास करण्यापूर्वी हे त्याचा हेतु नि परिणाम यांची योग्य तऱ्हेनें भरपूर प्रसिद्धि होईल अशी व्यवस्था करितात व आपल्याकडे सर्वांचें लक्ष वेधून घेतात. ह्यांचे प्रमुख उपवास—

| सन | मुदत | हेतु |
|---|---|---|
| १९१८ | ३ दिवस | मजूर-मालक ऐक्य किंवा प्राणान्त. |
| १९१९ एप्रिल | ३ दिवस | अत्याचार थांबविणें. |
| १९२० | ७२ तास | अहिंसाभंग. |
| १९२१ सप्टें. | ५ दिवस | ऐक्य व शांतता. |
| १९२२ फेब्रु. | ५ दिवस | चौरीचुरा दंगा प्रायश्चित्त. |
| १९२४(१०ऑक्टो.) | २१दिवस | हिंदु-मुसलमानांचें ऐक्य. |
| १९३२ सप्टें. | ६ दिवस | अस्पृश्यांचा मतदारसंघ संयुक्त करणें किंवा प्राणान्त. |
| १९३३ फेब्रु. | ५ दिवस | अस्पृश्यतानिवारण जागृति |
| १९३३ मार्च | २१ दिवस | आश्रमवासीयांचें नैतिक अधःपतन. |
| १९३३ आगष्ट | ५ दिवस | हरिजन कार्यास बंदी. |
| १९३४ आगष्ट | ७ दिवस | स्वामी लालनाथ लाठी-प्रहार प्रायश्चित्त. |
| १९३९ मे | ५ दिवस | राजकोट वचनभंग. |
| १९४३ फेब्रु. | २१ दिवस | जपान-धार्जिणेपणाचा आरोप धुऊन टाकणें. |

मोठमोठाले निधि उभारून सार्वजनिक कार्यांची व्यवस्था करण्याचें आणि आपल्या चळवळीसंबंधीं असणारी लोकांची अनुकूलता निदर्शनास आणण्याचें कामहि यांचें सतत चालू असतें. त्यावरून यांची व्यापक संघटना आणि भव्य दृष्टि यांचीहि कल्पना येते. यांनीं जमविलेले कांहीं निधि—

| साल | नांव | संकल्प | जमलेली रकम |
|---|---|---|---|
| १९२१ | टिळक स्वराज्य फंड | १ कोटी | १ कोटि २५ लक्ष |
| १९२५ | चित्तरंजनदास स्मारक | | १० लाख |
| १९२९ | खादी | | ३ लाख |
| १९३३ | हरिजनसेवक | २५ लाख | ८ लाख |
| १९४१ | अँड्र्यूज स्मारक | | ६ लाख |
| १९४४ | कस्तुरबा स्मारक | १ कोटि | १ कोटि १२ लक्ष |

यांशिवाय यांचे सूत, खादी, ग्रामोद्योग, गांधी-सेवा-संघ वगैरेकरितां अनेक लहानमोठे निधि आहेत.

यांच्या पूर्वी हिंदुस्थानांत मवाळ व जहाल असे दोन राजकीय पक्ष होते. यांच्या कार्यपद्धतींत मवाळांचा अभ्यासूपणा आणि जहालांची चढाई यांचें योग्य मिश्रण आढळतें. यांनीं जहालांच्या दहशतवादांतील हिंसा काढून टाकली, विधायक कार्यक्रमाची जोड देऊन लोक संघटित केले आणि त्यांचा दाब राज्य-सत्तेवर आणून ती काबीज करण्याचा प्रयत्न आरंभला. त्यामुळें जहाल-मवाळ सर्वच यांच्या कार्यक्रमांत सामील झाले.

यांच्यांत लोकसंग्रह करण्याची, लोकांवर छाप ठेवण्याची आणि लहानमोठीं माणसें उपयुक्त कामास लावण्याची हातोटी विलक्षण आहे. त्यामुळें यांच्या प्रभावळींत हिंदुस्थानांतील पहिल्या दर्जाचीं माणसें एकत्र झालीं आहेत. तसेंच त्या त्या विषयाचा मूलगामी विचार करणारे तज्ज्ञहि यांच्यापाशीं आहेत. त्यांच्या सल्ल्यानें यांचें काम योजनापूर्वक चालत असल्यामुळें यांचे विरोधक उथळपणानें उपहासास्पद होतात. तसेंच संपत्तीचें महत्त्वहि हे पूर्ण ओळखतात. यांची प्रत्येक योजना भक्कम आर्थिक पायावर उभारलेली असते, आणि जेथें बिनहिशेबी पैसा खर्च करावा लागतो अशा कामाकरितांहि यांनीं अनेक पद्धतशीर योजना आखलेल्या असतात. त्यामुळें यांच्या बहुविध योजना आणि चळवळी पद्धतशीरपणें चाललेल्या आढळतात. राजकारणाची झळ लागूं नये अशा चळवळी यांनीं राजकारणापासून पूर्ण अलग राखलेल्या असतात, हें खादी, सूत, ग्रामोद्योग वगैरेंच्या संस्थांवरून आपणांस दिसून येतें.

अस्पृश्यतानिवारणाच्या चळवळींत यांनीं आपण सनातनी हिंदु असल्याचें सांगितलें होतें. पण मानव धर्माविरुद्ध असणारी अस्पृश्यता शास्त्रांत असणें यांना शक्य वाटत नाहीं. ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादांत ब्राह्मणांच्या त्यागाची व तपस्येची प्रशंसा करून ब्राह्मणेतरांना ब्राह्मण होण्यास पुनर्जन्म घेतला पाहिजे असें यांनीं प्रतिपादिलें. वर्णव्यवस्था यांना पूर्वी ईश्वरी देणगी आहे असें वाटे. पण आतां तेथें अहंकाराशिवाय कांहीं शिल्लक नाहीं असें वाटून हे पूर्णपणें तिच्या व जातिभेदाच्या विरुद्ध झाले आहेत. विवाह केल्यावर पतिपत्नींनीं पूर्ण ब्रह्मचर्य पाळावें असें हे उपदेशितात. वैदिक मंत्रांचें हिंदी भाषा-

न्तर करून त्याचा विवाहांत यांनीं उपयोग केला. जुना संस्कार किंवा नोंदणी यावर कटाक्ष न ठेवतां हे स्वतःच्या जबाबदारीवर विवाह लावतात.

हे औषध म्हणूनसुद्धां मांस भक्षणाच्या विरुद्ध आहेत. दूध काढण्याच्या विशेष क्रूर पद्धतीमुळें हे गाई-म्हशीचें दूध पीत नाहींत, पण शेळीचें पितात.

लोकव्यवहाराकरितां जन्मभाषेइतपत उत्कृष्ट माध्यम नाहीं असा यांचा कटाक्ष असून हिंदुस्थानाकरितां प्रान्तिक भाषांशीं समन्वय पावणारी हिंदुस्थानी भाषा उपयोगांत आणण्यावर यांचा कटाक्ष आहे. हिन्दीऐवजीं हिन्दुस्थानी भाषा आणि देवनागरीप्रमाणें उर्दू लिपीहि आवश्यक करण्याकडे यांचा कल आहे. उर्दू लिपीचा आग्रह धरून हे हिन्दी संमेलनांतून नुकतेच बाहेर पडले. राष्ट्रसभेंत किंवा कोठेंहि हे हिन्दी किंवा गुजराथी भाषांत व्यवहार करतात. याशिवाय कितीतरी भाषा व लिपि शिकण्याचा यांचा व्यासंग चालू असतो. सध्या यांना तेरा भाषा येतात.

लोकांचा पूर्णपणें पाठिंबा मिळविण्यास भाषा, पोषाख, गरजा वगैरे प्रकारांनीं आपण पूर्णपणें त्यांच्याशीं तन्मय झालें पाहिजे आणि त्यांच्या अडचणी उलगडण्याचा प्रयत्न केला पाहिजे असा यांच कटाक्ष आहे. हे धार्मिक असले तरी ईश्वरावर हवाला ठेवून स्वस्थ बसणारे नाहींत. यांचा ईश्वराइतकाच स्वतःच्या कर्तृत्वावर विश्वास असून हे निराश कधींच होत नाहींत.

सत्य आणि अहिंसा यांवरील यांचा विशेष कटाक्ष राष्ट्रसभेला झेपेना म्हणून हे राष्ट्रसभेंतून बाहेर पडले. जाति-जातींत ऐक्य करण्याचे बाबतींत यांना अपेश आलें. मुसलमान व हरिजन यांनीं यांचें धोरण लक्षांत घेऊन स्वतःच्या जातीचा प्रमाणाबाहेर फायदा करून घेतला. मुसलमान तर चौदा मागण्या, पाकिस्थान आणि आतां पन्नास टक्के प्रतिनिधित्व 'पॅरिटी' अशा क्रमानें वाट चालून राष्ट्र-सभा ही सवर्ण हिंदूंची असें ठरविण्यांतहि यशस्वी झाले आहेत. हरिजनहि मुसलमानांचाच मार्ग आक्रमण करीत आहेत. अशा तऱ्हेनें आपसांत एकी करण्याच्या नादांत राष्ट्रांत निराळेच प्रश्न उत्पन्न झाले आणि राष्ट्राचें अखंडत्वच धोक्यांत आलें. उशीरा कां होईना पण आतां मात्र त्यांच्या अनुनयाचा मार्ग यांनीं सोडलेला दिसतो.

यांच्या तत्त्वज्ञानांतील हरताळापासून करबंदीपर्यंतचा कार्यक्रम आणि सत्य, अहिंसा, चरखा, खादी, सेवा वगैरे आवश्यक नित्यकर्म प्रसिद्ध आहे. पण तें तत्त्वज्ञान कौटुंबिक प्रश्न सोडविण्यास उपयोगी पडलें तरी जागतिक प्रश्न सोडविण्यास कितपत उपयोगी पडेल याबद्दल अजून संशय आहे. तथापि लोकशाहींत उदय पावलेल्या अनेक राजकीय तत्त्वज्ञानांत यांच्या तत्त्वज्ञानाला विशेष स्थान आहे यांत शंका नाहीं.

उत्कट संग्राम किंवा उग्र तपस्या यांपैकीं एकाचें अखंड आचरण करण्यांत आपलें सर्व आयुष्य यांनीं वेंचिलें आहे आणि तीं दोन्ही एकमेकाला पूरक होतील अशी दक्षता यांनीं घेतली आहे.

यांचें बहुतेक सर्व महत्त्वाचें इंग्रजी गद्य लिखाण हरिजन व यंग इंडिया यांमध्यें वेळोवेळीं लिहिलेल्या स्फुटांत विखुरलेलें आहे. सत्य परिस्थितीचें निदर्शन हेंच ध्येय प्रत्येक लिखाणांत कायम ठेवण्याचा यांचा कटाक्ष असल्यानें यांच्या लेखनाची एक स्वतंत्र अशी धाटणी उत्पन्न झाली आहे. भाषेकडे वाचकाचें पूर्ण दुर्लक्ष होईल इतकें साधें लिहून त्याचें सर्व लक्ष प्रतिपाद्य विषयावर केंद्रित करणें, हें यांच्या या धाटणीचें प्रमुख वैशिष्ट्य आहे.

हे आपल्या लिखाणांत अलंकार वापरण्याच्या कधींहि भरीस पडत नाहींत. परंतु यामुळेंच ज्या क्वचित्प्रसंगीं हे अलंकाराचा उपयोग करितात तेव्हां तो अतिशय प्रभावी असतो. 'हिमालयीन प्रमाद', मिस् मेयोच्या पुस्तकावर 'ड्रेन इन्स्पेक्टर्स रिपोर्ट' हा यांनी मारलेला शेरा किंवा क्रिप्स योजनेवरील 'Post-dated Cheque' हा अभिप्राय हे या दृष्टीनें पाहण्यासारखे आहेत.

यांच्या प्रत्येक लिखाणाच्या मागें दडलेले विचार यांनीं प्रगट केलेल्यापेक्षां अधिक महत्त्वाचे असतात. यांचें लेखन वाचीत असतांना, या लेखांत प्रगट केलेल्या मुद्द्यांपेक्षां अधिक मौल्यवान् विचारसंपदा या मनुष्याचे हृदयांत जागृत असल्याची जाणीव सतत कायम राहते.

यांच्या लिखाणांत आग्रहहि असतो. परंतु आपल्या प्रतिपक्षीयांचें म्हणणें विचारांत घेतांना त्याची छाया स्वतःवर हे कधींहि पडूं देत नाहींत. प्रतिपक्षाचें म्हणणें किंचित्‌हि विकृत न करतां मांडावयाचें, त्यानंतर त्यावरील आपलें म्हणणें मांडावयाचें व शेवटीं आपल्या मतावरील आपला विश्वास अधिकांत अधिक जोरदार भाषेंत प्रगट करावयाचा, ही यांच्या लेखनाची नेहमींची पद्धत आहे.

परंतु या शेवटच्या भागांत मात्र हे प्रत्येक शब्दामागें आपल्या सर्व आयुष्याची तपश्चर्या उभी करतात.

समाजाचें बळ त्याच्या आर्थिक व्यवस्थेवर अवलंबून आहे हें ध्यानांत घेऊन यांनीं ग्रामोद्योग, चरखा, सूत-संघ व खादी यांकडे लक्ष दिलेलें आहे. यंत्रयुगानें आर्थिक विषमता निर्माण व्हावी आणि सर्व दृष्टीनें समाज नाशाच्या मार्गास लागावा यापरती यांना दुसरी कोणतीहि हानि वाटत नाहीं. म्हणून यांनीं घरबसल्या पोटाला देणारा चरखा प्रचारांत आणला. तीन लाख लोकांना कामाला लावून एक कोटि रुपयांची खादी दरवर्षी निर्माण करण्याची व्यवस्था केली. तसेंच वर्धा-शिक्षणयोजनेप्रमाणें हस्तव्यवसायाचें शिक्षण देऊन शाळा स्वावलंबी करण्याची यांची योजना आहे.

विसाव्या शतकांतील एका नव्या नीतिप्रधान राज-कीय तत्त्वज्ञानाचे पुरस्कर्ते व त्याचा प्रत्यक्ष व्यवहारांत प्रयोग करून दाखविणारे महात्मे अशी यांची भूमिका आहे. यांचे गुरु गो. कृ. गोखले यांच्या राजकारणाच्या अध्यात्मीकरणाची कल्पना यांनीं प्रत्यक्ष व्यवहारांत आणली. निर्भेळ सत्य आणि पराकाष्ठेची अहिंसा हीं यांचीं प्रमुख साधनें आहेत. सत्य हा यांचा परमेश्वर असून अहिंसेनें त्याचा शोध लावणें शक्य आहे असा यांचा सिद्धान्त आहे. मगनलाल गांधींच्या 'सदाग्रह' शब्दाचें यांनीं 'सत्याग्रह' या शब्दांत रूपांतर केलें. कायदेभंग, अनत्याचार व असहकार हे सर्व सत्याग्रहाचेच प्रकार होत. हे आपल्या नीति आणि आचार यांवर उभारलेल्या सामुदायिक संघटनेनें हें राज्ययंत्र ढिलें करून प्रतिस्पर्ध्याला तडजोड करण्यास भाग पाडतात आणि प्रभावी होतात.

हे केवळ तत्त्वाच्या भोवऱ्यांत सांपडून व्यवहार विसरत नाहींत. स्वतःच्या समाजाला प्रतिष्ठितपणें अन्न-वस्त्र मिळवितां आलें पाहिजे आणि कोणत्याहि देशांतील माणसाशीं आपल्याला प्रेमानेंच राहतां आलें पाहिजे, असा यांच्या अहिंसेचा व्यापक अर्थ आहे.

म. गांधी यांचीं गुजराथी पुस्तकें:—१ आत्मकथा (दोन भाग), २ गोसेवा, ३ नीतिनाशने मार्गे, ४ अनासक्ति योग (गीता भाषान्तर), ५ गीतापदार्थ-कोष, ६ गीताबोध, ७ धर्ममंथन, ८ त्यागमूर्ति, ९ गाम-डांनी वहारे, १९ हिंद-स्वराज्य, ११ सर्वोदय, १२ एक सत्यवीरनी कथा, १३ सो टका स्वदेशी, १४ देशी राज्योनो प्रश्न, १५ राष्ट्रभाषा विषे विचार, १६ गांधी-वाइसरॉय पत्रवहेवार, १७ वर्णव्यवस्था, १८ व्यापक धर्मभावना, १९ रचनात्मक कार्यक्रम–तेनुं रहस्य अने स्थान इत्यादि. हींच यांचीं पुस्तकें इंग्रजी, हिन्दी वगैरे अनेक भाषांत प्रसिद्ध झालीं आहेत.

**गिडने, सर हेन्री अल्बर्ट जॉन**—(जन्म स. १८७३) नेत्ररोगाचे तज्ज्ञ व अँग्लो-इंडियन लोकांचे पुढारी. यांचें शिक्षण कलकत्ता, ऑक्सफर्ड, केम्ब्रिज व लंडन येथें झालें.

हे एफ्. आर. सी. एस्.; एफ्. आर. एस्. सी. ओ. (ऑक्स्फर्ड); एफ. आर. एस्. ए. (लंडन), डी. पीएच्. (कँटब) वगैरे पदव्या मिळविलेले सेवानिवृत्त आय्. एम्. एस्. लेफ्टनंट कर्नल आहेत.

हे ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटीचे पोस्टग्रॅज्युएट कोर्सचे नेत्ररोगांवरील लेक्चरर होते (१९११).

यांनीं हिंदी लष्करी खात्यांत प्रवेश केला (१८९८). चीन (१९००-०१), ईशान्य (१९१३) व वायव्य (१९१४-१५) सरहद्दीवर काम केलें. शेवटच्या ठिकाणीं हे जखमींहि झाले होते.

इंडियन अँड डोमिसाइल्ड युरोपियन असोसिएशनचे अध्यक्ष व इंग्लंडला गेलेल्या अँग्लो-इंडियन शिष्ट-मंडळाचे हे पुढारी होत. लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे सभासद (१९२४-१९४५) व रॉयल मजूर कमिशनचे असिस्टंट कमिशनर होते.

पहिल्या राउंडटेबल कॉन्फरन्स लंडनचे हे सभासद होते.

यांच्या ग्रंथाचें नांव—Numerous Works on ophthalmic Surgery.

**गिरोलीकर, महाराज प्रल्हाद अण्णा लोथे**—(जन्म स. १८५६–समाधि स. १९२४) वऱ्हाडांतील सुप्रसिद्ध सत्पुरुष. हे कृष्णशास्त्री बारशीकरांच्या हाताखालीं नागपुरास शिकले. अध्ययनाचा विषय व्याकरणशास्त्र, पण वेदान्तशास्त्रांत यांच्यासारखें सुबोध, चित्ताकर्षक व परिणामकारक प्रवचन करणारे विरळा! यांचें रूपसौंदर्य अवर्णनीय असून आत्मप्रसाद, गुरुप्रसाद व देवताप्रसाद यांच्या योगें मुखावर जें स्मित विलसत असे तें नास्ति-काच्या ठिकाणींहि आस्तिक्याची भावना उत्पन्न केल्या-शिवाय राहत नसे. स्वदेशीची चळवळ १९०६ सालीं उदय पावली. तेव्हां पोलिसांच्या धाकानें सर्व लोक दूर राहत, पण हे जाहीर सभांना नेमानें हजर राहत. पूर्ण सनातनी पद्धतीचा घरांतील आचार असूनहि अस्पृश्यता-

निवारणासंबंधीं चाललेल्या प्रयत्नांची बाजू हे समजावून घेत.

घरांत शंकराची उपासना इतकी उज्ज्वल होती कीं, महाशिवरात्रीच्या सुमारास काशीक्षेत्राच्या आसपास असले तरी घरच्या उत्सवास नेमानें यावयाचेच. तेथें भागवतपुराण नित्यनेमानें वाचलें जाई. यांच्या घराण्यांत सत्पुरुष म्हणून प्रसिद्ध असलेले हे सातवे पुरुष होत. सात पुरुषांनीं अयाचित वृत्तीनें आपली जीवनयात्रा चालविली. यांना वैद्यकीचें ज्ञानहि उत्कृष्ट होतें.

यांच्या गिरोली येथें समाधिस्थलीं काळ्या पाषाणाचें सुंदर टुमदार देवालय उभारण्यांत आलें आहे. तेथें यांची पुण्यतिथि चैत्र वद्य दशमीस होत असते. यांचें चरित्र 'संतमाला' ग्रंथांत प्रसिद्ध झालें आहे.

यांची परंपरा यांचे पुतणे आबाजी महाराज गिरोलीकर उत्तम प्रकारें चालवीत आहेत.

**गिल्डर, डॉ. मंचरशा धनजीभाई दोराबजी**—(जन्म स. १८८२) सुप्रसिद्ध डॉक्टर व राष्ट्रसभेच्या मुंबई प्रांताच्या मंत्रिमंडळांतील आरोग्यमंत्री.

ग्रँट मेडिकल कॉलेज, मुंबई व युनिव्हर्सिटी कॉलेज, लंडन, येथें आपलें वैद्यकीय शिक्षण संपवून हे एम्. डी., एफ. आर. सी. एस. झाले.

मुंबईच्या गोकुळदास तेजपाल हॉस्पिटलचे मुख्य या नात्यानें हे प्रथम जनतेच्या डोळ्यांसमोर आले. पारशी फीवर हॉस्पिटल, के. ई. एम्. हॉस्पिटल व जी. एस. मेडिकल कॉलेज या संस्थांशींहि यांचे निकटचे संबंध आहेत.

परंतु या सर्वांपेक्षांहि हे जनतेला परिचित आहेत ते 'मजुरांचे डॉक्टर' म्हणून. काँग्रेस राजवटींतील मुंबई-सरकारचे आरोग्यमंत्री या दृष्टीनें यांनीं केलेली कामगिरी यांच्या याच वृत्तीची द्योतक आहे.

The Human Electro-cardiogram (सर टॉमस लुइस यांचे सहकार्यानें) व The Pulse in the Aortic Disease हे यांचे ग्रंथ सुप्रसिद्ध आहेत.

**गुणे, वैद्य गंगाधरशास्त्री गोपाळ**—(जन्म स. १८७५) नगरचे सुप्रसिद्ध वैद्य. महाराष्ट्रांतील कर्तबगार निष्णात वैद्यांत यांची गणना होते. अगदीं गरीबींतून स्वकष्टानें व दृढ व्यासंगानें हे एक मोठे वैद्य म्हणून प्रसिद्धीस आले. पण त्यापेक्षां नगरच्या आयुर्वेद-महाविद्यालयाचे संस्थापक, प्रधानाध्यापक, 'भिषग्विलास' या मासिकाचे संपादक आणि आयुर्वेदाश्रम फार्मसी लि. या औषधी कारखान्याचे संचालक म्हणून यांचा लौकिक अखिलभारतीय स्वरूपाचा झाला आहे.

मॅट्रिकपर्यंत इंग्रजी शिक्षण झाल्यावर कोल्हापूरचे वै. बाबासाहेब गुणे आणि पुण्याचे वै. वाकणकर यांचेकडे यांचें ग्रांथिक व प्रात्यक्षिक शिक्षण झालें. शिवाय पंढरपुरचे हेल्थ ऑफीसर डॉ. त्र्यं. र. गुणे यांचेजवळ अॅलोपाथीचेहि शिक्षण यांनीं घेतलें. होमिओपाथीचाहि यांचा व्यासंग आहे.

यांनीं ग्रंथलेखनहि बरेंच केलें आहे. 'औषधीगुणधर्मशास्त्र' हा यांचा चार खंडात्मक ग्रंथ प्रसिद्ध आहे. डेंग्यु, इन्फ्लुएंझा, इत्यादि रोगांवर यांचीं छोटीं पुस्तकें आहेत. याचबरोबर 'भिषग्विलास' हें मासिक आज सतत वीस वर्षांपेक्षां अधिक काल हे चालवीत आहेत.

प्रथम नगर येथें १९१७ सालीं आयुर्वेदविद्यालय काढून यांनीं कामास सुरुवात केली. पण मध्यतरीं ती संस्था बंद करून हे अमळनेरच्या राष्ट्रीय विद्यालयांत आयुर्वेदाचे अध्यापक म्हणून गेले (१९२०). पण ती संस्था बंद झाल्यावर पुनः नगरास येऊन हे तेथील आपलीं सर्व कामें पूर्ववत् करूं लागले. आज महाराष्ट्रांतील अग्रेसर विद्यालयांत यांच्या विद्यालयाची गणना होते.

स. १९३८ च्या वैद्यकनियंत्रण कायद्याला अनुसरून स्थापन झालेल्या वैद्यकबोर्डानें यांच्या विद्यालयास मान्यता देऊन प्रारंभीं मोठी देणगी व ग्रँटहि दिली. विद्यालय पुष्कळ वर्षे देणगीवर चालून सरकारी मदतीवर वाढीस लागलें तरी आज त्याचा खर्च आयुर्वेदाश्रम फार्मसी लि. या यांच्या औषधी कारखान्याकडून प्रामुख्यानें चालल्यानें आधुनिक उपकरणांनीं, पदवीधर वैद्य नि डॉक्टर अध्यापकांनीं व रुग्णालय, प्रयोगशाळा शवच्छेदनगृह या साधनांनीं संपन्न असें त्याचें महाविद्यालय झालें आहे.

यांना चाळीसगांवच्या महाराष्ट्रप्रांतीय व नागपूरच्या नि. भा. वैद्यकसंमेलनाचें अध्यक्षपद देण्यांत आलें होतें. देशी वैद्यकबोर्डाचे सभासद म्हणूनहि तीन वर्षे यांनीं काम केलें. देशी व पाश्चात्य असें वैद्यकाचें मिश्र शिक्षण द्यावें या मताचे हे कट्टे पुरस्कर्ते आहेत. वैद्यकनियंत्रणाचा कायदा घडवून आणणारांपैकीं हे एक होत. आयुर्वेदांतील मूलतत्त्व त्रिदोष हें होय. त्रिदोषांच्या चर्चेकरितां व ते दृक्प्रत्ययसिद्ध आहेत, हें ठरविण्याकरितां भरलेल्या पनवेल व बनारस परिषदेंत हे प्रमुख होते.

**गुणे, डॉ. त्र्यंबक रघुनाथ**— ( जन्म स. १८७७ ) श्रीक्षेत्रपंढरपूरचें आरोग्य सुधारण्यांत यांनीं आपलें सर्व आयुष्य वेंचलें. कॉलऱ्यापासून श्रीपांडुरंगांच्या दर्शनास येणाऱ्या अनेक भाविकांचे प्राण वांचविण्याचें श्रेय त्यांनीं संपादिलें आहे. त्याबद्दल यांची अखिलभारतांत किंबहुना अखिल जगांत आदर्श आरोग्य-संरक्षक म्हणून त्या खात्यांतील लोकांनीं स्तुति केली.

हे सन १८९३ त मॅट्रिक, व सन १८९८ त ग्रँट मेडिकल कॉलेजांतून एल्. एम्. ॲन्ड एस्. ची परीक्षा दुसऱ्या वर्गांत उत्तीर्ण झाले. सर्व शिक्षण निरनिराळ्या छात्रवृत्तींवर झालें. डॉक्टर झाल्यावर गुजराथेंत कांहीं दिवस असिस्टन्ट सर्जन म्हणून काम केलें. पुढें सन १९०१ जुलैंत पंढरपुरास यांनीं मेडिकल ऑफिसरची नौकरी पत्करली. सन १९२२ पर्यंत हे त्या कामावर होते. यांचे सर्व लक्ष पंढरपूरचें आरोग्य सुधारण्याकडे असे. बावीस वर्षांतील यांची स्पृहणीय कामगिरी पाहून १९२२ पासून पंढरपुरास हेल्थऑफिसरची जागा निर्माण करून व यांची स्पेशल केस करून यांना पंढरपूरचे फर्स्ट क्लास हेल्थ ऑफिसर नेमिलें.

दूरदूरच्या गांवांहून पंढरपुरास यात्रेनिमित्त पायीं येणाऱ्या यात्रेकरूंचें आरोग्य नीट न राहिल्यानें यात्रा पंढरपुरास आली म्हणजे त्या दिवसांत दररोज कॉलऱ्यानें ६०० पर्यंत मृत्यु होत. किंबहुना मुंबईइलाखा, मध्यप्रांत, कर्नाटक इत्यादि दूरदूरच्या भागांत हा संसर्गजन्य रोग यात्रा झाल्यावर जोरांत बळावत असे. तें सर्व यांच्या परिश्रमानें बंद होऊन आतां पंढरपुरास यात्रेंत लागण झाल्याचें क्वचितच ऐकूं येऊं लागलें. "ट्रॉपिकल कॉन्फरन्स ऑफ मेडिसिन" या आंतरराष्ट्रीय वैद्यक-सभेंत पंढरपूरच्या आरोग्यव्यवस्थेचें वर्णन होऊन ती व्यवस्था अखिलभारतांत आदर्श ठरली आहे. 'टाइम्स ऑफ इंडिया'नें (१४ जुलै १९२७) पंढरपूरच्या आरोग्य व्यवस्थेबद्दल लिहितांना यांचा पंढरपुरांतील एक 'तेजस्वी तारा' म्हणून उल्लेख केला.

यांचें ॲलोपथीचें ज्ञान सूक्ष्म असून ते सोलापूर, नगर, नाशिक इत्यादि जिल्ह्यांत ख्यातनाम डॉक्टर म्हणून प्रसिद्ध आहेत. आर्यवैद्यकाचाहि यांचा अभ्यास सखोल असून यांनीं पाश्चत्य व पौर्वात्य वैद्यकाचा तुलनात्मक अभ्यास करून आर्यवैद्यकावर एक तुलनात्मक सुंदर ग्रंथ लिहिला आहे. अद्याप तो अप्रकशित आहे.

**गुणे, डॉ. पांडुरंग दामोदर**— ( जन्म स. १८८२–मृत्यु स. १९२२ ) प्रसिद्ध भाषाशास्त्रज्ञ व वेदाभ्यासक.

यांचा जन्म अहमदनगर जिल्ह्यांतील राहुरीस झाला. अहमदनगर एज्युकेशन सोसाएटीच्या हायस्कूलमधून हे मॅट्रिक झाले व यांना दुसरी जगन्नाथशंकरशेट शिष्यवृत्ति मिळाली ( १९०० ). तसेंच विल्सन कॉलेज, मुंबई, येथें शिक्षण घेऊन भाऊ दाजी प्राइज मिळवून बी. ए. व झाला-वेदान्त शिष्यवृत्ति मिळवून हे एम्. ए. झाले. १९०८-१० मध्यें हे फर्ग्युसन कॉलेजांत संस्कृतचे प्राध्यापक होते. हिंदुस्थानसरकारकडून शिष्यवृत्ति मिळाल्यानें संस्कृतचा विशेष अभ्यास करण्याकरितां हे जर्मनींत लिप्झिक येथें गेले, आणि तेथें तीन वर्षे अभ्यास करून पाएच. डी. पदवी संपादन करून हे हिंदुस्थानास परत आले (१९१४). इकडे आल्यावर 'माझा युरोपचा प्रवास' (१९१५) व 'जर्मनींतील लोकशिक्षण' (१९१६) हीं दोन पुस्तकें यांनीं लिहिलीं.

जर्मनींत असतां यांनीं तेथें आपल्या आवडत्या 'भाषाशास्त्र' या विषयाचें संशोधनपूर्वक अध्ययन केलें. भाषाशास्त्रावर यांनीं लिहिलेलें 'An Introduction to Comparative Phylology' हें इंग्रजी पुस्तक व त्या विषयावरील यांचे अनेक इंग्रजी-मराठी निबंध यांचा त्या विषयावरील अधिकार दाखविण्यास पुरेसे आहेत. यांचा प्राकृत भाषांचा व्यासंगहि वाखाणण्यासारखा होता. भांडारकर-प्राच्यविद्यासंशोधनमंदिर, पुणें, या संस्थेच्या संस्थापकांपैकीं हे एक प्रमुख होते (१९१६). मुंबई युनिव्हर्सिटींतील विल्सन फॉयलॉलॉजिकल लेक्चर्स देण्याचा मानहि यांना मिळाला होता.

यांनीं मराठी कवितेच्या पूर्वीच्या व हल्लींच्या स्थितीविषयीं तुलनात्मक प्रासंगिक विचार (महाराष्ट्र-साहित्य पत्रिका), भाषाशास्त्र व निरुक्ति (विविध-ज्ञानविस्तार), मराठी भाषेचा कालनिर्णय (भा. इ. सं. मं. षष्ठ इतिवृत्त), अपभ्रंश भाषेंतील वाङ्मय (भा. इ. सं. मं. सप्तमवृत्त) व अनेक ग्रंथांचीं परीक्षणें लिहिलीं आहेत.

**गुप्त, बालमुकुन्द**—( जन्म स. १८६५–मृत्यु स. १९०६ )

हिन्दी भाषेचे एक अप्रतिम लेखक, कवि व परीक्षणकार. सरल, शुद्ध व चटकदार भाषा लिहिण्यांत हे

प्रवीण असत. यांच्या कविताहि सुंदर व मार्मिक असत. 'भारतमित्र' या प्रसिद्ध हिन्दी वर्तमानपत्राचे हे संपादक होते. हिंदीच्या उन्नतीसाठीं यांनीं बरीच खटपट केली.

हे हरियाना प्रान्तांतील रोहतक जिल्ह्यामधील गुरियानी गांवचे राहणारे. तेथें यांचा जन्म झाला. हे अग्रवाल वैश्य. यांचे पूर्वज दीघल येथून गुरियानी गांवीं आल्यामुळें यांना दीघलिया म्हणूनहि म्हटलें जात असे. यांच्या वंशाचें 'नग्गे पोते' हें एक नांवहि प्रसिद्ध आहे.

प्रथम स. १८८७ त चुनारच्या 'अखबारे चुनार' या व नंतर स. १८८८-८९त लाहोरच्या 'कोहिनूर' या उर्दू पत्राचे हे संपादक होते. परंतु याच वेळीं यांनीं पं. दीनदयाल शर्मा यांच्यासमवेत हिंदी शिकण्याची प्रतिज्ञा करून ती ताबडतोब तडीस नेली. पुढें स. १८८९ च्या शेवटीं 'हिंदुस्थान' या पं. मदन मोहन मालवीयजींच्या संपादकत्वाखालीं चालणाऱ्या हिंदी वर्तमानपत्राशीं यांचा संबंध आला. याच पत्राचे दुसरे संपादक पं. प्रतापनारायण मिश्र यांच्या साहाय्यानें यांना हिंदीचें चांगलें ज्ञान झालें. नंतर कांहीं दिवस 'हिंदुस्थान'चे सहसंपादक म्हणून राहून हे त्यांतून पृथक् झाले. पुढें ५ वर्षेपर्यंत हे 'हिन्दी बंगवासी'चे सह-संपादक होते. या वेळीं यांनीं आपल्या योग्यतेचा पूर्ण परिचय करून दिला. स. १८९८ त 'भारतमित्रा'चें संपादकत्व स्वीकारून शेवटपर्यंत त्याच्या उन्नतीसाठीं यांनीं प्रयत्न केला.

'मडेल भगिनी', 'हरिदास', 'रत्नावली नाटिका', 'शिवशंभुका चिट्ठा', 'स्फुट कविता', 'खिलौना', 'खेल-तमाशा', 'सर्पाघात-चिकित्सा' इत्यादि यांचीं लिखित आणि अनुवादित पुस्तकें होत.

हे उद्योगी व सत्यप्रिय असत. ते सनातन धर्माचे कट्टे अनुयायी होते. प्राचीन कवि, पंडित वगैरे लोकांची निंदा करून कोणी आपली प्रतिष्ठा वाढवूं लागला तर यांना तें सहन होत नसे (क. कौ. २. १९४).

**गुप्त, मैथिलीशरण रामचरण**—(जन्म स. १८८६) वर्तमान हिन्दी भाषेतील सर्वोत्कृष्ट कवि. वाल्मिकी, तुळसीदास यांच्या परंपरेस शोभणारी हृदयाचा ठाव घेणारी यांची कविता आहे.

यांचा जन्म चिरगांव (झांशी) येथें झाला. यांचे वडील कविताप्रेमी असून कविता करीत असत. तसेंच यांचे बंधु सियारामशरण हेहि हिन्दींतील सुप्रसिद्ध कवि आहेत.

यांची कविता व्याकरणशुद्ध, साधी पण अत्यंत भावनामय आहे. त्याग, कर्तव्य आणि नीतिमत्ता यांचा सहज संदेश देण्याची यांच्या काव्यांतील शक्ति आश्चर्यकारक आहे. वाल्मिकी, तुळशीदास वगैरे राष्ट्रीय कवींनीं ज्यांच्या त्यागावर पूर्णपणें प्रकाश पाडला नाहीं असे प्रसंग निवडून यांनीं त्यावर आपल्या प्रतिभाशक्तीनें प्रकाश पाडला.

या दृष्टीनें यांचीं 'साकेत' व 'यशोधरा' हीं दोन काव्यें पाहण्यासारखीं आहेत. साकेत काव्यांत लक्ष्मणपत्नी उर्मिलेचा त्याग यांनीं उठावदारपणें वर्णिला आहे. रामाबरोबर लक्ष्मण सर्वांना उठावदारपणें दिसतो. पण त्याची पत्नी उर्मिला कोठेंच वर्णिलेली नाहीं. तसेंच गौतमबुद्धाचा त्याग सर्वांच्या नजरेंत भरतो पण त्याची पत्नी बिचारी यशोधरा अवर्णितच राहते. या दोन्ही स्त्रियांच्या त्यागाचें आणि उदात्ततेचें वर्णन यांनीं मोठ्या आत्मीयतेनें आपल्या काव्यांत केलें. वियोगस्थितींत लक्ष्मणाचा मोठेपणा सांभाळण्याविषयीं उर्मिला अगदीं दक्ष होती. एकदां लक्ष्मण रामाला सोडून हिला भेटण्यास आल्याचा भास झाला. तेव्हां हिला अत्यंत धक्का बसला आणि हिच्या तोंडून उद्गार निघाले—

प्रभु नहीं फिरे, क्या तुम्हीं फिरे।
हम गिरे, अहो! तो गिरे गिरे॥

राम परत फिरल्याशिवाय लक्ष्मणानें परत फिरणें हा हिला कमालीचा अधःपात वाटला.

यांच्या 'भारतभारती' या काव्यानें वाचकांच्या मनांत राष्ट्रीय भावना निर्माण केल्या आहेत. प्रारंभींच कवि विचारतो—

हम कौन थे, क्या हो गये है, और क्या होंगे अभी।
जाओ, विचारो, आज मिलकर ये समस्याएँ सभी॥

सध्यांच्या दुःस्थितीचें वर्णन करतांना शेतकऱ्यांचें दुःख तर अगदीं मोजक्या शब्दांत पुढीलप्रमाणें वर्णिलें आहे—

बरसा रहा है रवि अनल, भूतल तवासा जल रहा।
है चल रहा सन-सन पवन, तनसे पसीना ढल रहा॥
देखो कृषक, शोणित सुखाकर हल तथापि चला रहे।

या काव्याच्या शेवटीं कवीनें कळकळीनें विचारलें आहे कीं—

हतभाग्य हिंदुजाति ! तेरा पूर्वदर्शन है कहाँ ?।
वह शील, शुद्धाचार, वैभव, देख अब क्या है वहाँ ।।

'जयद्रथवध' व 'पंचवटी' या यांच्या काव्यांत मनोहारिता आणि सहजता हे यांचे प्रमुख गुण उत्कटतेनें पाहण्यास सांपडतात. पंचवटी या खंडकाव्यांत लक्ष्मणाचें चरित्र प्रामुख्यानें रंगविलें आहे. त्यांत यांचे काव्यांत सर्वत्र आढळणारा प्रसाद भरपूर आढळतो. यांच्या कल्पनेचा विलास पाहा—

है बिखेर देती वसुन्धरा, मोती, सबके सोनेपर,
रवि बटोर लेता है उनको, सदा सबेरा होनेपर ।।
और विरामदायिनी अपनी, सन्ध्या को दे जाता है, ।
शून्य श्याम तनु जिससे उसका, नया रूप झलकाता है ।।

सरस व भावनाप्रधान कविता लिहून लोकांना संदेश देणारा हा महाकवि, चिरगांवांत गेलें असतां, अंगांत कोपरापर्यंत मळकट बंडी, गुढघ्याखालीं येण्यास भिणारें साधें धोतर आणि डोईवर बुंदेली पगडी अशा पोषाखांत चारचौघांतून निवडून काढणें कठीणच पडेल. तथापि कालानुसार होत जाणारे बदल आत्मसात् करून नव्या पिढीबरोबर नव्या पद्धतीनें व नव्या विचारानें कविता करून आपलें अग्रस्थान टिकविण्याचें कसब मात्र यांच्याजवळ पूर्ण आहे. कथात्मक काव्य लिहीत असतांहि त्यांत समरस होऊन राष्ट्रीय भावनांचा आविष्कार करण्यांत हे सिद्धहस्त आहेत. हे संदेश देणाऱ्या कविता लिहीत नाहींत, पण यांच्या काव्यांतून लोकांना संदेश मिळाल्याशिवाय राहत नाहीं. हे गायक नाहींत, पण काव्य म्हणतांना हे स्वतः आणि लोकांनाहि काव्यांतील भावनेशीं एकरूप करून तन्मय करून सोडतात.

अर्वाचीन काळांत यांच्याइतका लोकप्रिय कवि हिंदी भाषा बोलणारांत दुसरा नाहीं. प्रसाद, ओज, करुणादि रस व शब्दालंकार इत्यादि गुणांनीं यांचें काव्य पूर्ण असतें. यांचे काव्यावर पाश्चात्य छाप नसून तें पूर्ण भारतीय वळणाचें आहे. तसेंच तें प्रायः गूढ किंवा आत्मचिंतनपर नाहीं. यांच्या काव्यांत हिन्दी संस्कृतीचें पुनरुज्जीवन करण्याची तळमळ दिसून येते. आणि तें निद्रिस्त मनाला धक्के देऊन जागृत केल्याशिवाय राहत नाहीं. तसेंच यांचें काव्य अगदीं खालच्या थरांतील दीन लोकांच्या मूक भावना प्रकट करतें. त्यामुळें सर्व समाजाला हे आपले कवि वाटतात. साधी भाषा, मनाला भिडणारे विचार आणि तळमळ यांमुळें जनतेचे खरेखुरे कवि होण्याचें भाग्य यांना लाभलें आहे.

याच यांच्या लोकप्रियतेमुळें यांचे काव्यग्रंथ खपतातहि भरपूर. आपल्या ग्रंथांच्या मुद्रणाकरितांच केवळ यांनीं आपल्या चिरगांवीं छापखाना काढला असून यांचे बंधु सियारामचरणजी त्याची सर्व व्यवस्था पाहत असतात. यांच्या पन्नाशीचे व साठीचे उत्सव सर्वत्र मोठ्या समारंभानें साजरे झाले.

विनयामुळें पन्नाशीच्या उत्सवाच्या वेळीं हे कोठेंच उपस्थित झाले नाहींत; मात्र काशीच्या उत्सवमंडळास यांनीं पुढील निरोप धाडला—

'यह सुयोग दुर्लभ, पर सुनिये, निज भविष्य है उदार।
जो पिछे आ रहे है, उन्हींका, मै आगेका जयजयकार ।।'

यांचें वाङ्मय—१ भारतभारती, २ जयद्रथवध, ३ रङ्गमें भंङ्ग, ४ किसान, ५ पद्यप्रबन्ध, ६ शकुन्तला, ७ विरहिणी व्रजाङ्गना, ८ पत्रावली, ९ वैतालिक, १० चन्द्रहास, ११ तिलोत्तमा, १२ प्लासीका युद्ध, १३ पञ्चवटी, १४ मेघनादवध, १५ स्वदेशसंगीत, १६ वनवैभव, १७ बकसंहार, १८ सैरन्ध्री, १९ अनघ, २० द्वापर, २१ यशोधरा ( गद्ययुक्त ), २२ हिंदू, २३ गङ्गल घट, २४ विकट भट, २५ गुरुकुल, २६ सिद्धराज, २७ साकेत, २८ झंकार, २९ वीराङ्गना इत्यादि.

**गुरु, पं. कामताप्रसाद गंगाप्रसाद**—( जन्म स. १८७५ )

हिंदी भाषेचे व्याकरणकार, कवि व लेखक. यांचा जन्म मध्यप्रांतांतील सागर शहरीं झाला. हे कान्यकुब्ज ब्राह्मण असून कंपिलेचे पाण्डेय होत. परंतु वंशपरंपरेमुळें यांना गुरु नांवानेंच संबोधिलें जातें.

यांचें शिक्षण सागर येथेंच होऊन संस्कृत घेऊन हे प्रवेशपरीक्षा उत्तीर्ण झाले. त्यानंतर उर्दू व फारसीचें शिक्षण घेऊन यांनीं २ वर्षें सागरच्या हायस्कूलमध्यें शिक्षकाचें काम केलें. नंतर यांची रायपूर येथें बदली झाली. या ठिकाणीं यांचा व पं. माधवरावजी सप्रे यांचा निकट संबंध येऊन सप्रे यांना साहित्याबाबत यांनीं पुष्कळ मदत केली. यानंतर कालाहंडी संस्थानांत हे शाळेचे डेप्युटी इन्स्पेक्टरहि झाले. त्याचप्रमाणें हे कांहीं दिवस छुईखदान संस्थानच्या राजकुमाराचे शिक्षक होते. पुढें जबलपूरच्या नॉर्मल स्कूलमध्यें हिंदी साहित्य व व्याकरण शिकविण्यासाठीं यांची नेमणूक झाली. स. १९२० च्या सुमारास १ वर्षपर्यंत हे प्रयागच्या "बालसखा" व "सरस्वती" पत्रांचे संपादक होते.

जबलपूरच्या राष्ट्रीय हिंदी मंदिरांतहि हे एक वर्ष संपादक होते.

शिक्षकाच्या कार्यास आरंभ केल्यानंतर हिंदी साहित्याकडे यांची आवड जाऊन हे लेख व कविता लिहूं लागले. यांचें लिखाण 'सरस्वती'मधून प्रसिद्ध होत असे. यांचे टिकात्मक इंग्रजी लेख मुंबईच्या 'इंडियन एज्युकेशन' या मासिकांतून येत असत. यांच्या कविता व लेख टोपण नांवानें प्रसिद्ध होतात.

यांना इंग्रजी, हिंदी, संस्कृत व फारसी यांशिवाय उडिया, बंगाली आणि मराठीचेंहि थोडेंफार ज्ञान आहे. हिंदी व इतर भारतीय भाषांच्या व्याकरणाचें तुलनात्मक अध्ययन यांनीं केलें आहे. यांना हिंदी भाषा व व्याकरणाचें प्रमाण म्हणून मानलें जातें.

'सत्य प्रेम' व 'पार्वती और यशोदा' (उडिया पुस्तकाच्या आधारें) या कादंबऱ्या; 'सुदर्शन' व 'हिंदुस्तानी शिष्टाचार' हीं नाटकें; 'भौमासुर-वध', 'विनय पचासा' व 'पद्यपुष्पावली' हीं पद्यात्मक पुस्तकें; 'अत्याचारी' (पद्य-विनोद संबंधीं पुस्तक) आणि 'भाषा-वाक्यपृथक्करण' व 'सहज हिंदी रचना' हीं व्याकरणात्मक पुस्तकें इत्यादि वाङ्मय यांनीं निर्माण केलें. 'भाषा-वाक्यपृथक्करण' व 'सहज हिंदी रचना' हीं पुस्तकें मध्यप्रांतांतील हिंदी शाळांत प्रचलित आहेत. यांचें सर्वात महत्त्वपूर्ण व विद्वत्तासूचक पुस्तक म्हणजे "हिंदी व्याकरण" हें होय. या पुस्तकाच्या सुधारणेसाठीं जी कमिटी नेमली होती तिनें हें पुस्तक अद्वितीय ठरविलें आहे. मध्यप्रांत सरकारनें या पुस्तकाबद्दल यांना एक सुवर्णपदक बक्षिस दिलें. मध्यप्रांतांतील सध्यांच्या प्रचलित हिंदी पाठ्य पुस्तकांशीं यांचा विशेष संबंध होता.

हे प्रयाग हिन्दी साहित्य संमेलन व मध्यप्रांतीय हिन्दी साहित्य-संमेलन (जबलपूर) यांच्या कार्यकारिणी सभेचे सभासद आहेत. त्याचप्रमाणें जबलपूरच्या कवि-समाजाचे हे अध्यक्ष आहेत. मध्यप्रांत शिक्षण-विभागाच्या अनेक उच्च हिन्दी परिक्षांचे हे परीक्षकहि आहेत. हे मध्यप्रांतांतील एक उत्कृष्ट टीकाकार म्हणून समजले जातात. यांची भाषा व्याकरणसंमत, सारगर्भित व सहजसुलभ असून यांच्या कविता प्रसादपूर्ण आणि भावनामय असतात. (क. कौ. २ ३०३-३०७).

**गुरुदत्त विद्यार्थी**—(जन्म स. १८६४ एप्रिल २६–मृत्यु स. १८९० मार्च १८) प्रतिभाशाली वैदिक पंडित आणि आर्यसमाजाचे प्रारंभीच्या पुरस्कर्त्यांपैकीं एक प्रमुख. आर्यसमाजाचे हे प्रमुख उपदेशक होते.

हे एम्. ए. असून सायन्स आणि गणित विषयांत निष्णात होते. महर्षि दयानंदस्वामी अजमेर येथें मृत्युशय्येवर असतां हे त्यांच्या दर्शनाकरितां गेले. स्वामीजींना तेव्हां अत्यंत वेदना होत होत्या. तथापि त्यांच्या तोंडावर वेदनांचा कोणताहि परिणाम दिसत नव्हता. त्यांची ती आश्चर्यकारक सहनशीलता पाहून हे नास्तिक व अनीश्वरवादी असतां आस्तिक व ईश्वरवादी बनले. आणि त्यांच्यापासून प्रेरणा घेऊन आपलें सर्व आयुष्य आर्यसमाज आणि वैदिक साहित्याच्या सेवेला यांनीं अर्पण केलें.

लाला लजपतराय, महात्मा हंसराज आणि हे अशा तिघांनीं मिळून महर्षि दयानंदांच्या स्मारकार्थ दयानंद अंग्लो-वैदिक कॉलेजची स्थापना केली (स. १८८६ लाहोर) आणि त्याकरितां सर्वस्वाचा त्याग करून इतरांनाहि असाच त्याग करण्याची यांनीं स्फूर्ति उत्पन्न केली. दयानंद अँग्लो-वैदिक कॉलेज सोसायटीच्या कार्याचा मोठा व्याप प्रचंड स्वरूपांत सतत वाढत चालला आहे. दुर्दैव एवढेंच कीं, यांचा देहान्त फार लवकर झाला.

इंग्रजींतील 'वैदिक मॅगेझिन' मासिक यांनींच प्रथम सुरू केलें. यांचें वाङ्मय हिन्दी, उर्दू व इंग्रजीमध्यें आहे. यांचे ग्रंथ—

(१) गुरुदत्तलेखावली (हिन्दी), (२) ओंकार उपासना (उर्दू). इंग्रजी—(३) Evidences of Human Spirit, (४) Wisdom of the Rishis, (५) Terminology of the Vedas, (६) Upanishadas with Commentary, (७) Mundak-Upanishada (Translation and Exposition), (८) Criticism on Monier William's Indian Wisdom.

**गुला महाराज**—(जन्म स. १८९८–मृत्यु स. १९३८ जुलै १९) भिल्ल समाजाला पुनर्जन्म देणारे पश्चिम खानदेशांतील साधु पुरुष. भिल्लसमाजाची लोकसंख्या पश्चिम खानदेश जिल्ह्यांत सुमारें साडेतीन लाख असून हे लोक स्वभावानें प्रामाणिक आहेत. शिक्षणाचा अभाव व दारूचें व्यसन यांमुळें या समाजाची अत्यंत दुर्दशा झाली आहे. पण या दुर्दशेंतून भिल्लांचा उद्धार करणारा त्यांच्याच जातींत निर्माण झाला. तळोद्यापासून चार

मैलांवर असणाऱ्या मोरवड गांवीं यांचा जन्म झाला. मोरवडचें नांव यांनीं आवडीनें रंजनपूर असें ठेविलें. यांच्या आईचें नांव मैना व बापाचें नांव भायल्या. बापाचा धंदा सालदारी, रखवाली किंवा गुराची राखोळी. हाच धंदा यांच्याहि वाट्यास आला. पण भिल्लांत क्वचित् आढळणारें नित्य स्नान, तुळशीला पाणी घालणें व सूर्यदर्शन झाल्याशिवाय न जेवणें इत्यादि नियम हे पाळीत असत. या नियमांमुळें यांनीं सालवारी सोडून रखवाली व मजूरी हे दोन स्वातंत्र्यानें करितां येणारे धंदेच करून आपली उपजीविका करण्यास सुरवात केली. हळुंहळूं यांच्या मुखातून सर्वाभूतीं परमेश्वर असल्याचें तत्त्वज्ञान बाहेर पडूं लागलें, त्या अर्थीं हे 'आप' हा शब्द वापरूं लागले व यांचे नियम निष्ठेनें पाळणाऱ्या लोकांचें एक 'आपमंडळ' सहज तयार झालें. लोक यांना गुलामहाराज म्हणत असले तरी हे आपणास 'गुलाम भगवान्' भगवंताचे गुलाम असें म्हणवून घेत. हे अगदीं निरक्षर होते; तथापि कांहीं गूढार्थक मजकूर यांनीं एका फळीवर लिहून घेतला व तो मजकूर आपल्या अन्तर्यामींच्या विचाराचें प्रतिबिंब असें मानून त्याची आपल्या झोपडींत रोज सकाळसंध्याकाळ व दर सोमवारीं जाहीर रीतीनें आरती करण्याचा प्रघात यांनीं सुरू केला. आरतीकरितां तेलवातीशिवाय कशाचीच अपेक्षा नसे. आरतीसमारंभ सुरू केल्यापासून हे चारपांच महिन्यांतच वारले; तथापि हा साप्ताहिक जाहीर आरतीचा समारंभ वाढतांवाढतां मोरवड तथा रंजनपूरला पंढरपूरचें भाग्य प्राप्त झालें. लक्षावधि भिल्लांच्या व भिल्लेतरांच्या स्त्रीपुरुषांना तो गांव क्षेत्रासारखा वाटूं लागला. यांच्या मृत्यूनें तर या यात्रेला ओहटी न लागतां भरतीच येऊं लागली. कित्येक प्रसंगीं रेल्वेलाहि गुलामहाराज स्पेशल ट्रेन सोडाव्या लागत. यांची पत्नी दगीबाई यांचे बंधु रामदास महाराज व मुलगा शंकर महाराज ह्यांनीं यांचें काम पुढें चालविण्याचा प्रघात चालू ठेवला.

दुर्दैवानें यांच्यामागें या सामुदायिक आरतीसमारंभास उतरती कळा लागली. तरी पण दूरदूरच्या खेड्यांतील शेंकडो कुटुंबांतून यांच्या नियमांचें निष्ठापूर्वक पालन, नित्य यांच्या तसबिरीची पूजा व सकाळ-संध्याकाळ भक्तिभावानें आरती केली जाते.

यांच्या शिकवणीचें सार-शौचास पाणी न्या, रोज स्नान करा, गंध व कुंकूं लावा, दारू पिऊं नका, मांस खाऊं नका, खरें बोला, देवाला भजा-इत्यादि ( आप श्री गुलामहाराज चरित्र-शंकर विनायक ठकार ).

**गुलाबराव महाराज**—( जन्म स. १८८१-समाधि स. १९१५ ) अतिमानुष कोटींतील महान् साधु व कवि.

यांचा जन्म उमरावतीपासून १२ मैलांवर असणाऱ्या लोणी ( टाकळी ) या गांवीं झाला ( शके १८०३ आषाढ शुद्ध १० ). पित्याचें नांव गोंदूजी, मातेचें नांव अलोकाबाई व आडनांव मोहोड. यांचें घराणें सूर्यवंशी भारद्वाज गोत्री राणारजपूत असूनहि व्यवहारांत आपणास हे शूद्र म्हणवीत. माधान गांवची पाटीलकी यांचे घराण्यांत वंशपरंपरेनें चालू आहे. हे सुमारें नऊ महिन्यांचे होतांच यांचे डोळे आल्याचें निमित्त होऊन त्यांतच कांहीं अपघातानें ते बिघडून हे कायमचे अंध बनले. यांची आई यांच्या चवथ्या वर्षींच वारली. यांचा प्रतिपाळ अजोळीं मातामहीनें म्हणजे आईच्या आईनें केला. माधानपासून ४ मैलांवरील आखातवाड-दत्तापूर या गांवच्या गणाजी भुयार यांच्या वडील कन्येशीं शके १८१४ फाल्गुन व. ५ रोजीं यांचें लग्न झालें. यांच्या पत्नीचें नांव मनकर्णिका. हे कुटुंबाला नांवानेंच हाका मारीत. यांनीं पत्नीला व्यंकटेशस्तोत्र, शिवलीलामृत व ज्ञानेश्वरी शिकविली. यांना एक पुत्र झाला. शके १८२७ च्या श्रावण वद्यांत यांची पत्नी निवर्तली. यांनीं आपल्या झाप्या नांवाच्या कुत्र्यास व हिराबाई नांवाच्या वेश्येस अनुग्रह करून सद्गतीस पोंचविलें. श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं स्वप्नांत दर्शन देऊन मांडीवर बसवून शके १८२४ सालीं वैदिक धर्माचा व कृष्णभक्तीचा उपदेश करून त्याच्या प्रसाराची यांना आज्ञा दिली. तेव्हांपासून यांनीं 'ज्ञानेश्वरकन्या' व 'श्रीकृष्णपत्नी' असें नामाभिधान धारण केलें व हे गळ्यांत मंगळसूत्र, वेणी-कुंकवादि सौभाग्यचिन्हे धारण करूं लागले.

यांची कविताशक्ति सद्य-स्फूर्तिजन्य असल्यानें प्रत्यहीं नूतन पद्यांनीं भगवंताना आळविणें, गद्यपद्यमय ग्रंथरचना करून लोकांस सन्मार्गी लावणें, मुमुक्षूंचा उद्धार करणें, सत्संगति व प्राचीनअर्वाचीन ग्रंथांचें परिशीलन हा यांचा नित्य व्यवसाय होता.

ज्ञानोत्तरकालीं देखील दृष्ट दुःखनिवृत्त्यर्थ व परमानंदप्राप्तीकरितां भगवद्भक्ति हें यांचें ध्येय होतें. त्याप्रमाणें हे नित्य पार्थिवपूजा, श्रीज्ञानेश्वरमहाराजांच्या पादुकांची व कृष्णमूर्तीची पूजा, एक वेळ भोजन, दर गुरुवारीं ज्ञानेश्वरमहाराजांची पालखी, वर्षांतून एक वेळ आळंदीची वारी व प्रतिवर्षीं मार्गशीर्षांत कात्यायनी-

व्रतोत्सव मोठ्या समारंभानें करीत. या व्रताचा उद्देश श्रीकृष्ण हे पति व आपण स्वतः पत्नी या अत्युच्च मधुर भक्तीचा प्रत्यक्ष आचरणानें आस्वाद घेतां यावा हा असे. फार काय, महाराज 'वासुदेव' हें नांव कधीं तोंडानें उच्चारीत नसत. इतकी प्रात्यक्षिक मधुरभक्ति आचरणारे महात्मे श्रीगौरांगानंतर हेच आपल्याकडे होऊन गेले.

यांची अलौकिक बुद्धिमत्ता व भक्ति-ज्ञान-वैराग्यादि संपत्ति लहानपणापासून प्रगट दिसूं लागली. यांनीं सांख्य, योग, वेदान्त, वैद्यक, व्याकरणादि विषय लोकांस शिकविले. हस्तस्पर्शानें व्याधि-पीडित जनांचे रोग दूर केले. यांचें आचरण अत्यंत शुद्ध व श्रौतपरंपरेला धरून होतें. उपासनादृष्टीनें हे हरिहरोपासक असून, मधुराद्वैताचे पुरस्कर्ते व मधुराद्वैतदर्शनाचे आचार्य होत. यांनीं नाडीवरून रा. रा. ल. रा. पांगारकरांना ओळखून काढलें. यांची ग्रंथपरीक्षणाची पद्धत म्हणजे अनुक्रमणिका व प्रस्तावना यांवरून हात फिरविला कीं झालें. ग्रंथाच्या अमक्या पानांत अमका श्लोक आहे हें हे बिनचुक सांगत; हा यांचा मोठा दृष्ट चमत्कार असे. पृथ्वींतील सर्व धर्मांचीं तत्त्वें यांना अवगत होतीं. यच्चावत् लौकिक व अलौकिक शास्त्रांचें हृदय यांना करतलामलकवत् होतें. जगांतील कोणत्याहि भाषेंतील धर्मशास्त्रविषयक विचार यांना पूर्ण ज्ञात असून श्रुति-युक्ति-अनुभवानें ते दुसऱ्यास समजावून देण्यांत कुशल व अधिकारानुरूप नित्यनूतन साधनप्रक्रिया सांगण्यांत हे प्रवीण होते. यांनीं आपल्या स्वयंस्फूर्तीच्या प्रासादिक, ओजस्वी व वेगवती वाणीनें हजारों अभंग, ओंव्या, पदें, लावण्या, श्लोक वगैरे केले आहेत. ते इतरांना अनेक जन्मांत करणेंहि अशक्यच आहे (श्रीगुलाबवाटिका-विहार–वासुदेव वामन मुळेकृत).

'यांच्याकडे पाहिलें कीं हा पुरुष मूर्तिमंत चमत्कार आहे असें वाटे. हे बोलूं लागले कीं, भक्तिप्रेमाचा नुसता पाऊस पडे. हे चर्चा करूं लागले कीं, यांची निर्दोष वादसरणी, विलक्षण ज्ञान व युक्तिवाद पाहून मन कुंठित होई. यांची अत्यंत मधुर वाणी ऐकून चित्त नागासारखें डोलूं लागे. पूजादि कर्मे हे इतक्या सशास्त्र रीतीनें व सद्भावनेनें तासचे तास करीत कीं, ती यांची कर्मनिष्ठा पाहून कर्मठालाहि धन्यता वाटे. कर्मज्ञान-उपासना या तीनहि बाबतींत यांचें अन्तःकरण व आचरण इतकें बिनखोड असून अत्याजमनोहर होतें कीं ही साधुमूर्ति लोकांना मार्ग दाखविण्यासाठींच अवतरली आहे असें भाविकांच्याच काय पण सुबुद्ध तार्किकांच्याहि मनाला वाटे.

अव्यंग कर्म, विशुद्ध ज्ञान व अलोट भक्ति ह्या तिहींचें एकीकरण सत्पुरुषावांचून अन्यत्र कोठेंहि दिसत नाहीं. हें सर्व यांच्यांत होतेंच. पण याशिवाय अर्वाचीन चिकित्सक दृष्टीलाहि ज्याचा उलगडा होत नाहीं अशा कित्येक गूढ गोष्टी यांजजवळ होत्या. यांच्या सहवासानें ही एक लोकोत्तर विभूति आहे असें कोणाहि पुरुषास कबूल करावें लागे (ल. रा. पांगारकर).

कुणबी कुलांत जन्म, वयाच्या नवव्या महिन्यांत प्राप्त झालेलें अंधत्व, शिक्षणाचा अभाव, खेड्यांतील राहणी, आणि सत्संगतीहि नाहीं, अशा स्थितींत जुन्या-नव्या शास्त्रांतील व अनेक धर्मांतील पारंगतत्व यांच्यांत कसें आलें याचें उत्तर यांनीं आपल्या ग्रंथांत दिलें आहे.

हे प्रथम दुसऱ्याकडून ग्रंथ वाचवून घेत, पण ज्ञानेश्वरांनीं अनुग्रह करून यांना मंत्र दिल्यावर यांना ज्ञानसिद्धि प्राप्त झाली. यांचें आश्चर्यकारक ज्ञान म्हणजे श्रीज्ञानेश्वरमहाराजांनीं दिलेल्या मंत्राचा प्रभाव होय, हें यांनींच स्पष्ट लिहून ठेविलें आहे.

यांचा 'संप्रदाय सुरतरु' हा ग्रंथ अत्यंत महत्त्वाचा आहे. त्यांत यांनीं आपलें जीवितकार्य नमूद केलें आहे. त्यांत यांची नम्रता व आत्मविश्वास उत्कटपणें दिसून येतो. त्याचा प्रास्ताविक भाग असा–' पूर्वी प्रल्हादाची आर्तता पुरविली हें ऐकून मी अयोध्येस गेलें, तर रामरायांना कैकेयीनें वनांत धाडलें होतें, आणि माझी इच्छा अपुरी राहिली. पुढें कृष्णावतारीं गेलें, तों कृष्णाला अक्रूरानें मथुरेस नेलें; पुढें पंढरपुरीं इच्छा पुरी व्हावी म्हणून गेलें, तों पांडुरंगाची मूर्ति अनागोंदीच्या राजानें आपल्या राजधानीस नेली; आतां आळंदीला मात्र दुर्दैवाची वावटळ विरून गेली आणि ज्ञानराजांच्या कृपेचा मेघ कारुण्याच्या धारांचा अखंड वर्षाव करीत आहे. परंतु त्याच वेळीं चातकाला मुखरोग व्हावा तशी माझी अवस्था झाली आहे. पण तोहि नामस्मरणानें गेला असून त्या करुणाघनाचें अमृतजल प्राशन करावयास मिळालें आणि जो अपूर्व आनंद आला त्याचा उद्‌गार म्हणजेच हा संप्रदायसुरतरु.'

बुवाबाजीचा यांना अत्यंत तिटकारा असे. मनुष्यानें होतां होईतों संसारी असावें असा हे उपदेश करीत. सक्तीनें धर्मान्तर झाल्यास प्रायश्चित्त देऊन शुद्ध करावें

असें हे म्हणत. सत्यशोधक समाजाचें तत्त्वज्ञान आणि प्रचारपद्धति यांना बिलकूल मान्य नसे. यांचे ग्रंथ लिहून घेण्याचें श्रेय यांचे अनुग्रहीत शिष्य नारायण पैकाजी पंडित, श्रीज्ञानेश्वरमंदिर, पाताळेश्वररस्ता, नागपूर व उमरावतीचे कै. हरिभाऊ केवले यांना आहे. यांचें अप्रसिद्ध वाङ्मयहि पुष्कळ आहे. त्याच्या प्रसिद्धीची खटपट श्री. शंकर जयराम सूर्यवंशी, पेन्शनर, नाशिक हे करीत आहेत. यांचे दोन अभंग नमुन्यादाखल पुढें दिले आहेत.

समदृष्टि नव्हे मांगासवें खाणें ।
यथेच्छ सेवणें वेश्येलागीं ।।
समदृष्टीसाठीं देह व्हावा तृण ।
क्षणोक्षणीं प्राण कासावीस ।।
जोडा आणि तोंड एकाचि चर्माचे ।
संघटन त्यांचें करूं नये ।।
अन्न आणि विष्ठा एकाचि धान्याची ।
साम्यता दोहोंची म्हणूं नये ।।
देह प्राण मन बुद्धि या उपाधि ।
सोडिलिया शुद्धि समता गे ।।
ज्ञानेश्वर-स्वामी न होतां कृपाळ ।
वटवट वेळ वृथा सारी ।।

—गाथा १२६२

धर्मचाड तरी पहावें भारत ।
समन्वयीं चित्त ठेवोनीया ।। १
नीतिचाड तरी गावें रामायण ।
वाल्मिकी-कीर्तन काव्यशुद्ध ।। २
भक्तिचाड तरी शुद्ध भागवत ।
सदा हृदयांत ठेवा वेगीं ।। ३
ज्ञानचाड तरी वसिष्ठ स्मरवा ।
अन्तरीं धरावा गुह्यभाव ।। ४
गुरुचाड तरी स्मरा ज्ञानेश्वर ।
हेंचि धर्मसार बोलिलें म्यां ।। ५

यांचे ग्रंथ मराठी व संस्कृत भाषेंत आहेत. क्वचित् हिन्दींत कवित्व आढळतें.

मराठी-१ संप्रदायसुरतरु ( भाग १-२ ओंवीबद्ध, दोन आवृत्त्या), २ पत्रव्यवहार ( भाग १-२, दोन आवृत्त्या ), ३ व्यवहारधर्मबोध ( दुसरी आवृत्ति, पूर्वीचें नांव साधुबोध ), ४ अलौलिकव्याख्यानमाला, ५ अभंग-गाथा, ६ भागवत-रहस्य ( खंड १-२ ), ७ पदांची गाथा ( भाग १-२ ), ८ हरिपाठप्रवेश ( श्रीज्ञानेश्वरकृत हरिपाठावरील टिपणें ), ९ योगप्रभाव, १० प्रेमनिकुंज, ११ स्त्रीगीतसंग्रह.

यांशिवाय पुढील ग्रंथ अप्रसिद्ध आहेतः—मराठी-१ इतर संकीर्ण प्रकरणें, संस्कृत-१ एकादशीनिर्णयः; २ संप्रदायकुसुममधु; ३ प्रमोदकल्लोलः; ४ वाल्मिकीसारोद्धारः; ५ श्रीधरोच्छिष्टपुष्टिः ( भागवतदशमस्कंधटीका ), ६ नारदसूत्रभाष्यम् इत्यादि.

**गुलाम अलिया**—( जन्म स. १८५०-मृत्यु स. १९०३ ) सुप्रसिद्ध हिन्दी पहिलवान. पॅरिसमध्यें जाऊन सॅन्डोशीं कुस्ती मागितली पण ती यांना मिळाली नाहीं. पण १९०२ सालीं परिस-प्रदर्शनांत संपूर्ण युरोपांतील पहिलवानांत यांचा पहिला क्रम मान्य करण्यांत आला. थोरल्या गामाच्या पूर्वी रुस्तुम-इ-हिंदचा किंवा जगांतील अद्वितीय मल्लाचा मान यांचा होता. हे कलकत्त्यास मृत्यु पावले. औंधसरकारचे आश्रित निजाम वल्लद-इमाम उद्दीन हे यांचे शागीर्द होत.

**गुंगा**—( जन्म स. १९०१- मृत्यु स. १९४४ ) हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध मल्ल. यांच नांव फिरोजुद्दीन, बापाचें नांव गामु बालीवाला. आजोबाचें नांव बाली. यांचा जन्म सियालकोटजवळ उगोकी गांवीं झाला. यांचे वडील लोकरीचा व्यापार करीत असत.

यांची लहानपणीं प्लेगच्या आजारामुळें बोलण्याची व ऐकण्याची शक्ति नष्ट झाली. म्हणून यांस गुंगा म्हणत. वयाच्या १६-१७ व्या वर्षापासूनच यांनीं कुस्ती खेळण्यास सुरुवात केली. यांचे कुस्तींतील पहिले प्रतिस्पर्धी गामा हे होत. त्यांचा यांनीं अगदीं सहजपणें पाडाव केला. नंतर झालेल्या आणखी दोन सामन्यांत यांनीं त्यांना चीत केलें. याच वेळीं यांनीं गुत्तासिंग, हैदर, गामा एका व कालीया या जलालपूरच्या उत्कृष्ट खेळाडूंना लीलेनें जिंकलें. पण यांच्या आयुष्यांत गामाचा भाऊ इमामबक्षाबरोबर झालेल्या कुस्तीइतकी मोठी कुस्ती कधींच झाली नसेल. यांची ही कुस्ती चार वेळां झाली व पहिल्याच खेपेस वीस मिनिटांत यांनीं त्यास चीत केलें. दुसऱ्यांदा इमामबक्षानें यांना ५५ मिनिटांत लोळविलें. तिसरी अनिर्णीत राहिली. पण चौथी मात्र यांनीं जिंकली. हे व्यायामाकरितां दररोज दोन हजार दंड व दोन हजार बैठका काढीत. श्री. एस्. मुजुमदार यांनीं केलेल्या तपासणीप्रमाणें यांच्या शरीराच्या निरनिराळ्या अवयवांचीं मापें खालीलप्रमाणें आहेतः-उंची-५ फूट ११॥ इंच. मान

१८ इंच. छाती ४९। इंच. मनगट ७१⁄२ इंच. मांड्या २७१⁄२ इंच. पोटऱ्या १६ इंच. हात १३। इंच. दंड १६॥ इंच. हे मृत्यूपूर्वी पुष्कळ दिवस कोल्हापूरच्या महाराजांचे आश्रित होते. रुस्तुम-इ-हिंदचा किंवा जागतिक अद्वितीय मल्लाचा मान हे कांहीं दिवस जगले असते आणि परदेशाला गेले असते तर यांना मिळाला असता.

**गुंजीकर, रामचंद्र भिकाजी**—( जन्म स. १८४३ एप्रिल ३०–मृत्यु स. . . ° जून १८ ) मराठी भाषेंतील सुप्रसिद्ध ग्रंथकार व लेखक.

गुंजी (परगणा खानापूर, जि. बेळगांव) या गांवावरून यांना गुंजीकर म्हणूं लागले. वास्तविक यांच उपनांव केंकरे. यांचा जन्म जांबोटी गांवीं व तेथेंच यांच प्राथमिक शिक्षण झालें. पुढें इंग्रजी शिक्षणाकरितां हे बेळगांवीं गेले. तेथें इंग्रजी सहावीपर्यंत शिक्षण घेऊन पुढील शिक्षणाकरितां हे मुंबईस रवाना झाले व तेथें मॅट्रिक झाले ( १८६४ ). एल्फिन्स्टन कॉलेजांत नांव घालून स्वावलंबनानें यांनीं अभ्यास सुरू केला. पण यांना कॉलेजशिक्षण अर्धवट सोडावें लागलें ( १८६६ अखेर ). पुढें एल्फिन्स्टन हायस्कूलांत शिक्षक, हुबळीस हेडमास्तर व असिस्टंट डेप्युटी एज्यु. इन्स्पेक्टरच्या जागेवरून हे सेवानिवृत्त झाले ( १८९८ ). तीस वर्षांच्या नोकरींत यांनीं २० वर्षे मुंबईसच काढलीं.

मुंबईस असतां प्रथम हे 'मित्रोदय' पत्रांत लिहीत. पुढें यांनी स्वतःच्याच संपादकत्वाखालीं 'विविधज्ञानविस्तार' हें मासिक सुरू केलें ( १८६७ ). हे सरकारी नोकर असल्यानें यांचें नांव संपादक म्हणून त्यावर दिलें नसलें तरी पहिलीं सात वर्षे संपादनकार्य हेच करीत. पुढेंहि त्या मासिकावर संपादक म्हणून कोणाचें नांव घालीत नसत. निबंधमालेच्या पहिल्या अंकांत या विविधज्ञानविस्तारावर गौरवपर लिहिलें आहे.

तसेंच स्वधर्म, स्वभाषा व स्वसंस्कृति यांच्यावर ख्रिस्ती व सुधारक यांचे होणारे हल्ले सडेतोडपणें परतविणारें 'दंभहारक' मासिकहि काढण्यास यांचें नेतृत्व कारण होतें ( पहिला अंक १० आक्टो. १८७१–१८७५ ).

मुंबई विद्याखात्यानें केलेल्या शुद्धलेखनाचे नियमांविरुद्ध यांचा अभिप्राय असल्यानें विविधज्ञानविस्ताराचा सरकारी आश्रय बंद झाला. आणि यांना त्या मासिकाशीं असलेला संबंध सोडावा लागला ( १८७५ जाने ). यांच्यानंतर यांच्याइतक्याच तत्परतेनें हरि महादेव पंडित हे वि. ज्ञा. विस्ताराचें काम पाहूं लागले.

यांना बंगाली व कानडी याहि दोन भाषा चांगल्या येत असत.

यांचे ग्रंथ—१ मोचनगड-मराठींतील पहिली ऐतिहासिक कादंबरी ( १८७१ ), २ गोदावरी ( अपूर्ण ), ३ अभिज्ञानशाकुन्तल ( भाषान्तर १८७० ), ४ रोमकेतुविजया ( रोमियो आणि ज्युलिएटचें रूपान्तर १८६९ ), ५ विद्यावृद्धीच्या कामीं आजची अनास्था ( व्याख्यान ), ६ सरस्वती-मंडळ ( १८८४ ), ७ भ्रमनिरास, ८ सौभाग्यरत्नमाला, ९ कौमुदीमहोत्साह ( रा. का. पां. परब यांचे सहकार्यानें त्रैमासिक वैय्याकरण सिद्धान्तकौमुदीचें सटीप भाषान्तर–१८७५ सुरू. अपूर्ण), १० रामचंद्रिका ( विस्तृत धातुरूपावलि ), ११ सुबोधचंद्रिका ( भगवद्गीता, टीका १८८८ ), १२ कन्नडपरिचय ( १८९५ ), १३ लाघवी लिपि किंवा अति त्वरेनें लिहिण्याची युक्ति ( १८७४ ).

याशिवाय गणित, ज्योतिष, आरोग्य, कालनिर्णय, नीति, इतिहास वगैरे विषयांवरील अनेक निबंध, पुस्तकपरीक्षणें व इतर विषयांवर यांचे लहानमोठे ८९ लेखांची यादी, यांच्या भाषा, व्याकरण, लिपि वगैरेवरील अनेक संकलित लेखांच्या आरंभी दिलेली आढळते.

**गोकाक, विनायकराव कृष्णराव**—( जन्म स. १९०८) इंग्रजी भाषेचे सुप्रसिद्ध प्राध्यापक व लेखक आणि कानडी भाषेंतील उत्कृष्ट कादंबरीकार, कवि व टीकाकार.

यांचा जन्म सावनूर ( जि. धारवाड ) येथें झाला व तेथेंच यांचें हायस्कूलमधील शिक्षण झाल. नंतर धारवाडच्या कर्नाटक कॉलेजांत यांनीं प्रवेश केला. नंतर हे एलिस पारितोषिक घेऊन पहिल्या वर्गांत बी. ए. झाले ( १९२९ ) व एम्. ए. झाले ( १९३१ ). इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व, अस्खलित वक्तृत्व आणि परिणामकारक अध्यापन व या गोष्टींबरोबरच गोड स्वभावानें यांनीं विद्यार्थ्यांचीं मनें भारून टाकलीं असल्यास नवल नाहीं.

अशा माणसाला अधिक ज्ञान मिळविण्याकरितां डेक्कन एज्युकेशन सोसायटीनें इंग्लंडला पाठविण्याचें ठरवावें ही गोष्ट अपेक्षितच होती. ऑक्सफर्ड येथें जाऊन इंग्रजी वाङ्मयाचा अभ्यास दोन वर्षेपर्यंत यांनीं जीझस कॉलेजमध्यें केला ( स. १९३६-३८ ) आणि

बी. ए.च्या परीक्षेंत पहिल्या पांचांत यांचा क्रमांक आला.

परदेशांतून या देशांत आल्यावर सांगलीच्या विलिंग्डन कॉलेजमध्यें हे प्रथम प्राध्यापक म्हणून आणि नंतर प्रिन्सिपल म्हणून काम करीत होते. यांच्या विशेष योग्यतेमुळें सांगलीचें ऑक्सफर्ड झालें होतें. पण शेवटीं यांनीं डेक्कन एज्युकेशन सोसायटीच्या आजन्म सभासदत्वाचा त्याग केला आणि यांच्या लाभाला तेथील विद्यार्थी मुकले. यांच्या जागेवर आलेले प्रि. पंडित यांनीं यांच्यासंबंधीं प्रथम काढलेले उद्गार ध्यानीं घेण्यासारखे आहेत. प्रि. पंडित म्हणाले, 'प्रि. गोकाक हे प्रि. आगरकर, ना. गोखले, रँ. परांजपे यांच्या परंपरेंत शोभणारे प्रिन्सिपल होते. त्यांची जागा सहज भरून निघणें अशक्य आहे.' यावरून यांची योग्यता स्पष्ट होते.

सध्यां हे धारवाडच्या कर्नाटक कॉलेजमध्यें इंग्रजीचे प्रोफेसर आहेत.

विद्यार्थि-दशेतच यांचें कानडी भाषेकडे लक्ष वेधलेलें होतें. त्या भाषेंत यांच्या लेखनाचा चांगलाच प्रभाव पडूं लागला होता. पुढें पुढें तर उत्कृष्ट कवि, टीकाकार व नाटककार म्हणून यांचा लौकिक झालेला आहे. कानडी भाषेला पुरोगामी वळण लावण्याच्या कामीं यांच्या साहित्यसेवेचा फार उपयोग झालेला आहे.

कानडीप्रमाणें इंग्रजींतहि हे कविता करतात. यांनीं नाटकें लिहिलीं आहेत आणि इतर लेखनहि हे करीत असतात. तेंहि अत्यंत श्रेष्ठ प्रतीचें असतें, असें तज्ज्ञांचें मत आहे.

**गोखले, कृष्णाजी केशव**—(मृत्यु स. १९२७) मराठींतील कथालेखक, जत संस्थानचे न्यायमूर्ति व दिवाण.

स्त्रीशिक्षणाचे हे पुरस्कर्ते होते. यांचे लेखनांतहि त्याचें प्रतिबिंब दिसतें. यांनीं सुमारें पाऊणशें गोष्टी लिहिल्या. इंग्रजी कथांचें बेमालूम रूपान्तर करण्याची यांची हातोटी चांगली होती. सध्यांच्या लघुकथांपेक्षां यांच्या गोष्टी त्या वेळच्या पद्धतीप्रमाणें रहस्यप्रधान होत्या. लोकांना विचार करावयास लावण्यापेक्षां करमणूक करण्याकडे त्या वेळीं वाङ्मयाचा कल असे.

यांचें वाङ्मय—१ आजपासून पन्नास वर्षांनीं (आंग्ल कादंबरी-लेखिका जेन ऑस्टेनच्या प्राइड अँड प्रेज्युडिसचें रूपान्तर), २ तिलोत्तमा (गायनाची लोकप्रियता वाढविण्याकरितां), ३ एकत्र कीं विभक्त (एकत्र कुटुंबपद्धतींतील दोष दाखविणारी कादंबरी १९२०), ४ हिंदु स्त्रियांची कायदेशीर दुर्दशा (मनोरंजन-लेखमाला), ५ खूप केलीत सूनबाई व इतर गोष्टी, ६ मूर्तिमन्त गुलामगिरी (नवयुग मासिकांत प्रसिद्ध झालेली).

**गोखले, गंगाधर नीळकंठ**—(जन्म स. १८८७) थिऑसॉफिकल सोसायटीचे हिंदुस्थानांतील एक प्रमुख कार्यकर्ते व स्थापत्यविशारद.

यांचें मूळ ठिकाण मिरज. यांचे आईबाप लहानपणींच निवर्तले. वडील असिस्टंट एंजिनियरचे हुद्द्यापर्यंत चढले होते. यांचें शिक्षण सातारा व पुणें येथें झालें. पुण्याचे सायन्स कॉलेजांतून पदार्थविज्ञान व रसायन हे विषय घेऊन स. १९०६ मध्यें बी. एस्‌सी. झाले. त्याच कॉलेजांतून १९०९ सालीं एल्. सी. ई.चे परीक्षेंत पहिल्या वर्गांत पहिले आले. शिवाय मुंबई युनिव्हर्सिटीकडून एक सुवर्णपदक, एक शिष्यवृत्ति व दोन पारितोषिकें मिळालीं. यामुळें या वेळचे सरकारी नियमाप्रमाणें यांना मुंबई इलाख्याचे पब्लिक वर्क्स खात्यांत एकदम असिस्टंट एंजिनिअरची जागा मिळाली. त्या खात्यांत यांची नोकरी धारवाड, नीरा कॅनाल व सिंध प्रांतांत झाली. या खात्यांत यांनीं १९१० ते १९२३ पर्यंत नोकरी केली. अखेरचीं कित्येक वर्षें हे एक्झिक्युटिव्ह एंजिनिअरचे हुद्द्यावर होते. यांचेच कारकीर्दींत लॉइड बराज या जगांतील एक प्रचंड म्हणून प्रसिद्ध असलेल्या सक्करच्या धरणाचें काम सुरू झालें. त्या योजनेंत यांचा चांगलाच हात होता. पुढें १९२४ सालांत कराचीस नादिरशा-दिनशा एंजिनिअरिंग कॉलेज निघालें, तेव्हां त्या कॉलेजचे पहिले प्रिन्सिपल म्हणून यांची नेमणूक झाली. तें काम यांनीं १९२३ ते १९३५ पर्यंत केलें. मध्यंतरीं १९१८ मध्यें हे इंडियन डिफेन्स फोर्समध्यें दाखल होऊन कराचीच्या ११ व्या विभागाचे १९२९ ते १९३५ पर्यंत सेकंड लेफ्टनंट कमांडिंग ऑफिसर होते. त्याचप्रमाणें हे डिस्ट्रिक्ट स्कॉउट कमिशनर होते. एंजिनिअरिंग कॉलेजाची भरभराट यांचे कारकीर्दींत झपाट्यानें झाली. कॉलेज सुरू झाल्यापासून पांचवे वर्षीच यांचा एक विद्यार्थी युनिव्हर्सिटीचे अखेरचे परीक्षेंत यांचेप्रमाणेंच पहिल्या वर्गांत पहिला आला. पुढेंहि हा मान यांच्या आणखी दोन विद्यार्थ्यांना मिळाला. याप्रमाणें यांचें अध्यापन-कार्य अत्यंत यशस्वी व वरिष्ठ प्रतीचें असून हे विद्यार्थि-वर्गांत अत्यंत लोकप्रिय असत. सन १९२७ सालीं हे

एकदां इंग्लंडची सफर करून आले. तेथून आल्यावर यांनीं आपला पोषाख पार बदलून टाकला. धोतराचा काचा, अंगांत एक स्वच्छ पांढरा सदरा व वरून ऋतुमानाप्रमाणें खाकेखालून एक शुभ्र साधें उपरणें अगर शाल, पायांत पुणेरी जोडा व डोकें शिरस्त्राणहीन. हाच पोषाख अजून यांचा कायम आहे. कराचीस असतांना आठवड्यांतून एकदां धर्मप्रवचन, एक दिवस गोरगरीबांच्या झोपड्यांत जाऊन त्यांना औषधपाणी देणें अगर धान्य वगैरे वांटणें असा यांचा कार्यक्रम असे. कराचीच्या श्रीशिवाजी हायस्कूल, मित्रमंडळ, ब्राह्मणसभा, सिंध असोसिएशन वगैरे हरएक संस्थांस यांचें भक्कम साहाय्य व आधार असे.

स. १९३५ सालीं यांनीं कराची सोडली तेव्हां तेथील 'सिंध-मराठा' या साप्ताहिकानें 'गोखले विशेषांक' काढला. त्यांत यांच्या अनेक स्नेह्यांनीं यांच्या गौरवपर लेख लिहिले. सरकारी नोकरींत असतांहि यांनीं आपल्या निर्लोभी, निःस्पृह, धीट व सरळ वर्तनानें वरिष्ठांवरहि छाप ठेविली. तरुण वयांत सर्व हितचिंतकांच्या उपदेशाविरुद्ध सेवानिवृत्ति पत्करिली आणि उर्वरित आयुष्य थिऑसॉफीच्या सेवेमध्यें घालविण्याचा संकल्प करून हे अड्यार तेथें दाखल झाले (१९३५). त्याच सालीं हिंदी शाखेचे जनरल सेक्रेटरी म्हणून यांची नेमणूक झाली आणि १९४४ अखेरपर्यंत यांनीं तें काम केलें. काम करीत असतां अनेक जुनाट प्रश्नांचा निकाल केला. तसेंच बनारस येथील सोसायटीच्या इमारतींची सुधारणा करून येथें सौंदर्याचें व शांतीचें वातावरण उत्पन्न केलें. सामुदायिक पूजेकरितां 'ज्योतिरालय' स्थापून भिंतीवर मानवाच्या उत्क्रांतीवर प्रकाश पाडणारीं चित्रें, सभागृहांत कुबेर, अग्नि, वरुण व वायु यांचीं चित्रें, खुल्या मैदानांत हिंदुस्थानचें शुभ्र मानचित्र, हिमालयावर भगवान् दक्षिणामूर्ति व त्यांचे दोन शिष्य व दुसऱ्या बाजूवर अढळपद मिळविणाऱ्या ध्रुवबाळाची मूर्ति स्थापिली.

यांनीं युरोपकडे १९२७ व १९३५ सालीं (सहकुटुंब) प्रवास करून तेथील स्थितींचें निरीक्षण केलें.

यांचे ग्रंथः—

1. Practical Education, 2. Seientific Religion, 3. Europe in Summer of 1935, 4. Indian Theosophist, 5. Arts and Science Courses, 6. Engineering Courses, 7. Technical and Industrial Education = Educational Magna Charta.

**गोखले, नामदार गोपाळ कृष्ण**— (जन्म स. १८६३ मे ९–मृत्यु स. १९१५ फेब्रु. १९) हिंदुस्थानचे सुप्रसिद्ध राजकारणी पुढारी, इंग्रजी भाषेंतील जगप्रसिद्ध वक्ते व सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटी या संस्थेचे संस्थापक.

यांचा जन्म चिपळूण तालुक्यांत ताम्हणमळा येथें झाला. प्रथम कोल्हापूर येथें शिक्षण घेऊन मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजांतून हे बी. ए. झाले (१८८४). तेव्हांपासून १९०२ पर्यंत हे डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सभासद व फर्ग्युसन कॉलेजमध्यें प्राध्यापक होते. तेथें हे गणित, इंग्रजी, अर्थशास्त्र व इतिहास हे विषय शिकवीत. १८८७ मध्यें हे पुणें सार्वजनिक सभेचे चिटणीस, १८८८ मध्यें सुधारक या इंग्रजी-मराठी साप्ताहिकाचे संपादक झाले. त्यांत हे विशेषतः इंग्रजी विभागांत लिहीत. लो. टिळक व हे १८८९ सालीं पहिल्यानें राष्ट्रसभेंत प्रविष्ट झाले.

१८९४ सालीं सरकारनें उघडपणें सांगितलें कीं, 'सर्व वरिष्ठ जागा नेहमींच युरोपियनांना मिळाल्या पाहिजेत.' यावर यांनीं कडक टीका केली व सरकारवर वचनभंगाचा आरोप केला. स. १८५८ चा जाहीरनामा अगदीं खऱ्या अर्थानें घ्यावयाचा नाहीं, असें सर जेम्स फिट्झ जेम्स स्टीफन यांच्यासारख्या इंग्लिश जज्जाचें म्हणणें असेल तर आतांपर्यंत दिलेलीं सगळीं वचनें कागदाच्या चिटोऱ्यांप्रमाणें कचऱ्याच्या पेटींत टाकण्याच्या योग्यतेचीं आहेत असें म्हणावें लागेल, असे निराशेचे उद्गार यांनीं काढले. रयतेच्या कळकळीनें राज्यकारभारावरील खर्च कमी करून त्यांच्यावरील कराचा बोजा कमी करावा म्हणून हे शुद्ध गणिती पद्धतीनें विचार मांडीत.

१८९५ सालीं पुणें येथें भरणाऱ्या राष्ट्रसभेचे हे स्थानिक चिटणीस होते, व १९०४ सालीं राष्ट्रसभेचे हे जोडचिटणीस होते.

१८९७ सालीं हे पुण्याच्या डेक्कन सभेचे प्रतिनिधि म्हणून हिंदुस्थानच्या जमाखर्चाची तपासणी करण्याकरितां नेमलेल्या वेल्बी कमिशनपुढें साक्ष देण्याकरितां इंग्लंडला जाण्याकरितां निघाले. उमरावती काँग्रेसमध्यें यांना निरोप देण्याचा थाटाचा समारंभ झाला. साक्षी देणारांत सुरेंद्रनाथ बानर्जी, दादाभाई नवरोजी वगैरे लोक होते. तेथें यांनीं उत्तम प्रकारें साक्ष देऊन उत्तम लौकिक संपादन केला.

प्लेगच्या धामधुमींत लष्करांतील शिपायांनीं पुण्यांतील स्त्रीपुरुषांवर अनन्वित अत्याचार केल्याचीं यांना इंग्लंड-मध्यें अनेक मित्रांचीं पत्रें गेलीं. पत्रें लिहिणारांनीं आपली नांवें बाहेर न फोडण्याची यांना विनंति केली होती. त्या पत्रांच्या आधारें यांनीं लंडन मँचेस्टर गार्डियनमध्यें तशीं विधानें केलीं. पण तीं विधानें सिद्ध करण्याकरितां यांना मिळालेली खासगी माहिती प्रगट करणें विश्वासघाताचें वाटलें. शिवाय खासगी मिळालेली माहिती खरी असली तरी तिच्याशीं अनेक स्त्रीपुरुषांच्या बेअब्रूचा संबंध होता. म्हणून यांनीं ती माहिती प्रगट करण्यापेक्षां विधानें परत घेऊन माफी मागण्याचा प्रतिष्ठित मार्ग पत्करिला. त्यामुळें हे विवेचक लोकांच्या आदरासच पात्र झाले ( १८९८ ).

१९०० मध्यें मुंबई प्रांतिक कौन्सिलमध्यें गेल्यावर लँड रेव्हेन्यूसंबंधींच्या सरकारी धोरणावर यांनीं कडक टीका केली.

१९०२ पासून पुढें अखेरपर्यंत हे वरिष्ठ कायदे-मंडळांत काम पाहत असत. त्या कायदे-मंडळांतीलहि अंदाजपत्रकांवरील यांचीं भाषणें माहितीपूर्ण, परिणाम-कारक, कळकळीचीं आणि विद्वत्ताप्रचुर असत.

१९०४ सालीं यांना ब्रिटिश सरकारनें सी. आय. ई. ही पदवी देऊन यांचा गौरव केला.

पुढें हे इंग्लंडला गेले ते बनारस कॉंग्रेसपूर्वी तेथील अध्यक्षपद स्वीकारण्यास परत आले.

लॉर्ड कर्झन यांचे कारकीर्दींत अंदाजपत्रकांत कृत्रिम रीतीनें दाखविलेली शिल्लक हा यांचा कौन्सिलांतील धिःकाराचा विषय होता. ही कृत्रिम शिल्लक हुंडणा-वळींतील हातचलाखीमुळें दिसे. ' चलनी नाण्याचें धोरण तरी निर्दोष करा किंवा कर तरी कमी करा ' असें हे बजावीत. मिठाच्या करावर बोलतांना तीन पै किंम-तीच्या मिठाच्या टोपलीस पांच आणे कसे पडूं लागले हें यांनीं सप्रमाण दाखविलें. पब्लिक सर्व्हिस कमिशन व स्टेट सेक्रेटरीचे हुकूम यांबाबत यांचीं भाषणें माहिती-पूर्ण असत.

आदर्श शिस्तीला धरून वागणारे नेमस्त म्हणूनच यांची ख्याति होती. पण यांच्या थंड वृत्तीसुद्धां कधीं-कधीं अनावर होत. लॉर्ड कर्झन यांचें दडपशाहीचें धोरण, बंगालची फाळणी, कलकत्ता कॉर्पोरेशनच्या हक्कांवर गदा, युनिव्हर्सिटी कायद्यांत सुधारणा व महाग शिक्षण हीं कृत्यें पाहून यांचेंहि मन फार क्षुब्ध होई. व हे प्रकटपणें म्हणत, ' जनतेच्या हिताच्या दृष्टीनें नोकरशाहीशीं सहकार्य करण्याच्या वृत्तीला रामराम ठोकावा लागेल,' ' अलीकडे बंगालमध्यें जे महापूर आले त्यांमुळें कांठावर इकडे तिकडे पाणी जाणें साहजिक आहे. ज्या वेळीं प्रचंड जनसमुदाय जागा होऊन गुलामगिरीच्या नाशाकरितां व स्वातंत्र्याच्या संपादनाकरितां स्वयंस्फूर्तीनें चळवळ करूं लागतो, त्या वेळीं कांहीं किरकोळ अतिरेकाच्या गोष्टी होणें अपरि-हार्य असतें,' ' अगदीं अखेरचा उपाय म्हणून व लोकांचें भक्कम पाठबळ असेल तर बहिष्कार शस्त्राचा उपयोग करण्यास हरकत नाहीं ' ( १९०५ बनारस ), ' पांच खेड्यांपैकीं चार खेड्यांतून शाळा नाहींत व आठ मुलांपैकीं सात मुलें अज्ञानांतच लहानचीं मोठीं होत आहेत.' साक्षरतेचें प्रमाण शेंकडा बारा आहे असें म्हणण्यापेक्षां वरील मांडणी अधिक परिणामकारक व स्पष्ट आहे.

बनारस राष्ट्रसभेचे अध्यक्ष असतां लॉर्ड लिटनचें एक पत्र यांनीं उघडकीस आणलें. त्यांत ' ह्या मागण्या व आकांक्षा कधीं पुऱ्या होऊं शकणार नाहींत व होणारहि नाहींत हें आपण जाणतों ' इत्यादि मजकूर होता.

' सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटी ' म्हणजे भारत-सेवक-समाजाची स्थापना ही यांची एक अत्यंत महत्त्वाची कामगिरी आहे ( १९०५ ). अशी संस्था स्थापण्याची कल्पना यांच्या मनांत १८९७ सालापासून होती. वेल्बी कमिशनपुढें साक्ष देण्याकरितां हे इंग्लंडला गेले असतां, यांनीं तेथें असलेल्या डॉ. र. पु. परांजपे यांच्याशीं तेथें अशी संस्था स्थापन करण्याबद्दल वाटा-घाट केली होती. जून १२, १९०५ रोजीं ही संस्था स्थापण्यांत आली. यांच्याशिवाय आरंभीं गो. कृ. देवधर, न. अ. द्रविड व अनंत विनायक पटवर्धन हे तीन सभासद होते. संस्थेचा आरंभ शिवराम हरि साठे यांच्या हस्तें करण्यांत आला.

या संस्थेचे पुढील सहा उद्देश आहेत—(१) स्वतःच्या उदाहरणानें व उपदेशानें देशांत उत्कट देशभक्ति जागृत करणें. ( २ ) सर्वसाधारण जनतेच्या प्रश्नांचा विचार करून त्यांना राजकीय शिक्षण देणाऱ्या चळवळी आरंभणें. ( ३ ) जातीजातींत सहकार्य व सलोखा वाढविणें. ( ४ ) शैक्षणिक चळवळींना—विशेषतः स्त्रीशिक्षण, मागासलेल्यांचें शिक्षण, तसेंच औद्योगिक व शास्त्रीय शिक्षण यांस मदत

करणें. ( ५ ) देशांतील उद्योगधंद्यांचे वाढीस मदत करणें. ( ६ ) मागासलेल्या लोकांच्या उन्नत्यर्थ प्रयत्न करणें.

ब्रिटिशांचा हिंदुस्थानशीं आलेला संबंध दैवी योजनेमुळें आला असून त्याच्यापासून घटनात्मक पद्धतीचा आपणांस लाभ मिळवावयाचा आहे; तसा लाभ मिळविण्याकरितां जातीय, प्रांतिक व धार्मिक दृष्टीपासून पूर्ण अलिप्त असणारे पण सतत देशसेवा करीत राहणारे राष्ट्रीय मिशनरी निर्माण झाले पाहिजेत, अशा लोकांनी देशाच्या कार्यापुढें सर्व वैयक्तिक स्वार्थ तुच्छ मानून धर्मबुद्धीनें अखंड राजकारण करणें आवश्यक आहे, उपजीविकेचा दुसरा कोणताहि उद्योग न करितां आपली सर्व शक्ति देशाच्या कामीं खर्ची घालणारे लोकच फक्त असें कांहीतरी कार्य करूं शकतील, निदान पांच वर्षेपर्यंत एकादें सार्वजनिक विधायक कार्य केल्याशिवाय या संस्थेत प्रवेश मिळणार नाहीं, अशा यांनीं आंखून दिलेल्या धोरणानें आतापर्यंत ही संस्था चालत आहे.

पुणें हें या संस्थेचें मुख्य केंद्र असून मद्रास, मुंबई, नागपूर, अलाहाबाद येथें हिच्या शाखा आहेत. लाहोर व कटक येथें कार्याची केन्द्रें आहेत. यांच्यानंतर ना. श्रीनिवासशास्त्री, कै. गो. कृ. देवधर हे अध्यक्ष होते. आतां पं. हृदयनाथ कुंझरू हे अध्यक्ष, अमृतलाल ठक्कर, श्री. ग. वझे, नटेश अप्पाजी द्रविड, आर. सूर्यनारायणराव व आर. आर. बखले हे या संस्थेतील प्रमुख कार्यकर्ते आहेत.

सुरतेच्या फुटीनंतर राष्ट्रसभेच्या चळवळींत यांनीं विशेष पुढाकार घेतला. द. आफ्रिकेला यांनीं भेट दिली व म. गांधींच्या सत्याग्रहाच्या चळवळीस यांनीं मोठी मदत केली. स. १९०९ च्या राष्ट्रसभेच्या अधिवेशनांत सत्याग्रहाच्या पंथाबद्दल यांनीं आनंद व्यक्त केला व त्या पंथाच्या तत्त्वज्ञानाबद्दल यांनीं स्पष्टीकरण केलें. वरिष्ठ कायदेमंडळांतील यांचें काम अधिक प्रमाणांत चालू होतेंच. १९१४ सालीं राष्ट्रसभेतील दोन पक्षांत एकीकरण करण्याचा प्रयत्न झाला. या एकीकरणाबाबत प्रथम हे अनुकूल होते. पण पुढें तें फलदायी होईल असें यांना वाटेनासें झालें.

यांचें सार्वजनिक जीवन निष्ठामय व त्यागपूर्ण होतें. अत्यंत कठोर गोष्टी सौम्य शब्दांत पण आधारासह मांडण्याची हातोटी यांना फार चांगली साधली होती. हे टीका करीत असतां गोड भाषा वापरीत असले तरी हे शिष्टाईचा आव आणून गुळमुळीत धोरण स्वीकारीत नसत.

लोकांच्या वतीनें राजदरबारीं राज्यकर्त्यांना विरोध करूनहि सरकारमान्यता कायम ठेवण्याचा मान यांनींच प्रथम मिळविला. हे आपणांस न्या. महादेव गोविंद रानडे यांचे शिष्य म्हणवीत, आणि त्यांच्या नेतृत्वावर यांची अत्यंत श्रद्धा असे. सरकारविरोधी भडक चळवळीपुढें विधायक पद्धतीनें सतत काम करीत राहण्याचा यांचा सोज्वल मार्ग बहुजनसमाजाला तितकासा आकर्षक वाटला नाहीं, यामुळें लोकमान्यता न लाभतां लोकविरोधालाच यांना बळी पडावें लागलें. यांनीं आंखून दिलेल्या मार्गानीं देशसेवा करणारा एक मोठा वर्ग आहे. आणि म. गांधींसारखे लोकोत्तर पुरुष यांचेच शिष्य म्हणवून घेण्यांत अभिमान मानतात. त्याग आणि विधायक कार्य यांच्या पायावर उभारलेल्या यांच्या निःस्वार्थ देशसेवेबद्दल कोणालाहि आदरच व्यक्त करावा लागेल.

यांचे ग्रंथ—१ शालेय-अंकगणित, मराठी व इंग्रजी भाग १-३. २ Speeches ( मद्रासच्या नटेसन कंपनीनें प्रसिद्ध केलेली ).

**गोखले, रामचंद्र जनार्दन**—( जन्म स. १८७५ ) गूढचिकित्सामंडळाचे संस्थापक व चालक.

यांचा जन्म सातारा जिल्ह्यांत दहिवडी येथें झाला. सातारा व पुणें येथें शिक्षण होऊन हे बी. ए. झाले ( १८९८ ) व ट्रेनिंग कॉलेजमध्यें शिक्षकाची नोकरी केली.

अज्ञानाच्या मुळाशीं सूक्ष्मावलोकनाचा व चिकित्सेचा अभाव असतो. अंधश्रद्धेमुळें गूढ उकलण्याची माणसाला बुद्धिच होत नाहीं. गूढ चमत्कार व भ्रम यांचें संशोधन करून त्यांतील सत्य प्रगट केल्यास लोकांची चिकित्साबुद्धि व शोधक वृत्ति वाढेल आणि त्यामुळें अज्ञान व अंधश्रद्धा कमी होईल. या हेतूनें यांनीं गूढचिकित्सामंडळ ही संस्था काढली ( १९३३ ).

आजपर्यंत या मंडळाने संशोधनपूर्वक निर्णीत केलेल्या गोष्टी—१ सर्पविषावर रामबाण उपाय म्हणून मानलेल्या सुमारें ७५ वनस्पति व २० मान्त्रिक उपाय यांचें मुंबईच्या हाफ्‌किन्स इन्स्टिट्यूटमध्यें डॉ. के. एस्. म्हसकर यांनीं केलेल्या प्रयोगांवरून वैयर्थ्य.

२. सर्पभक्षक प्रो. राव यांचेजवळील सर्पविषावरील उपायांची निरुपयोगिता.

३. सर्पाचें श्रवणेन्द्रिय तीक्ष्ण तर नाहींच, पण त्यास संगीत वा मधुर स्वर यांची आवड नाहीं, याची प्रयोगानें सिद्धि.

४. सर्पमणि व त्याचे गुण यांविषयीं लोकभ्रमाची निवृत्ति.

५. भुताटकीच्या बहुतेक चमत्कारांची अविश्वसनीयता.

६. विस्तवावरून चालत जाण्यास मंत्रतंत्राची मुळींच जरूरी नाहीं. अनवाणी चालणाऱ्या कोणाहि माणसास तळव्याच्या जाडपणामुळें ३–४ पावलें विस्तवावरून चालत जातां येतें.

७. फलज्योतिषाचें अशास्त्रीयत्व.

८. भोलानाथ नंदीचें अतीन्द्रिय ज्ञान सत्य नाहीं. त्याचें विशिष्ट माणसाजवळ किंवा वस्तूजवळ जाऊन थांबणें हें शिकविलेल्या खुणांवर अवलंबून आहे.

९. पौर्णिमा व अमावास्या या दिवशीं रोग, विशेषतः मानसिक रोग, वाढतो किंवा मृत्यु जास्त होतात, अशी समजूत आहे. पण यास प्रत्यक्ष अनुभवाचा आधार मुळींच नाहीं. हे दिवस व अन्य दिवस यांत या दृष्टीनें फरक आढळून येत नाहीं. ही गोष्ट यांनीं पुणें-मुंबईचे मृत्यूचे आंकडे व वेड्याच्या इस्पितळांतील मुख्य डॉक्टरांचा अनुभव मागवून त्यांवरून सिद्ध करून दाखविली.

यांचे ग्रंथ—१ लोकभ्रम, २ फलज्योतिषचिकित्सा, ३ व्यायामशास्त्र, ४ पुरुषार्थाचें मूळ, ५ आरोग्यदीप, शिवाय भूमिति व भूगोल विषयांवरील अनेक शालेय पुस्तकें.

**गोखले, शंकर लक्ष्मण**—( जन्म स. १८६९ ) अमेरिकेंत स्थायिक झालेले सुप्रसिद्ध हिन्दी विज्ञानाचार्य व संशोधक.

यांचा जन्म वाई येथें अत्यंत गरीब भिक्षुक ब्राह्मणाच्या घराण्यांत झाला. यांच्या वडिलांचें नांव लक्ष्मण विठ्ठल गोखले. लहानपणीं आई-वडील वारल्यानें यांचे आप्त गं. ब. गोखले यांनीं यांचें पालनपोषण केलें. हे बी. ए. नागपूरच्या स्कॉटिश मिशनच्या कॉलेजमधून व केमिस्ट्री घेऊन हे एम्. ए. झाले. १८९८ सालीं यांनीं इंदूरच्या होळकर कॉलेजांत प्राध्यापकाची जागा स्वीकारली. तेथें अध्यापनाबरोबर यांचें अध्ययनहि चालू होतें. त्यामुळें १९०५ सालीं हे फिजिक्स हा विषय घेऊन पुनः एम्. ए. झाले. कॉलेजांत हे फिजिक्स व केमिस्ट्री हे दोन्ही विषय शिकवूं लागले.

पण या आपल्या आवडत्या विषयाचें अधिक ज्ञान मिळविण्याकरितां हे १९११ सालीं अमेरिकेला रवाना झाले. तेथें गेल्यानंतर यांची योग्यता लक्षांत घेऊन सुप्रसिद्ध हार्वर्ड विद्यापीठांत प्रयोगशाळेंतील दुय्यम म्हणून यांची नेमणूक झाली. या प्रयोगशाळेंत यांनीं High Pressures वर संशोधन सुरू केलें. हें यांचें संशोधन इतकें समाधानकारक झालें कीं, तेथील सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ डॉ. चार्लस व पी. स्टीनमेझ यांनीं यांची खास शिफारस करून G. E. C. मध्यें यांना जागा मिळवून दिली. त्या ठिकाणीं जनरल इलेक्ट्रिक कंपनीच्या एंजिनिअरिंग लेबोरेटरीचे प्रमुख डॉ. लुई व पी. रॉबिन्सन यांचे हाताखालीं काम करण्याची संधि यांना मिळाली. या ठिकाणीं हे आठ वर्षें होते. या अवधींत यांनीं कितीतरी शास्त्रीय प्रबंध लिहिले, प्रयोग-साधनें तयार केलीं व लोहचुंबकीय परिमाणें (Magnetic Measurements) निश्चित केलीं. १९२० च्या डिसेंबरांत हे परत हिंदुस्थानांत आले, व ज्या ठिकाणीं हे प्राध्यापक होते त्याच इंदूरच्या होळकर कॉलेजांत प्रिंसिपल झाले. परंतु १९२२ मध्यें परत हे अमेरिकेला गेले.

अमेरिकेंत जाण्यापूर्वी कांहीं दिवस इंग्लंडमध्यें ग्लासगो येथील बावर्ड व टॅटलॉक यांच्या लॅबोरेटरींत काम करीत असतां व्होल्टेजचें त्वरित मापन करण्याकरितां यांनीं पोटेन्टिओ मीटर तयार केला. अमेरिकेंत गेले तेव्हां G. E. C. मधील यांची जागा राखून ठेवली होतीच. त्या ठिकाणीं हे १९३३ अखेर होते. पुढें हे सेवानिवृत्त झाले. रिसर्च एंजिनियर फॉर मॅग्नेटिक्स हा यांचा तेथील हुद्दा होता. तेथील यांचें मुख्य संशोधन चुंबनप्रक्रिये (Magnetization) बद्दल आहे. हें संशोधन यांनीं १९१३ मध्यें सुरू केलें आणि १९२३ मध्यें पूर्ण केलें.

स. १९१३ च्याहि पूर्वी ५० वर्षें अनेक संशोधकांनीं याबद्दल प्रयत्न केला होता. चुंबकाची शक्ति व सिद्ध चुंबन ( Magnetization Produced ) यांमधील संबंध निश्चित करण्याचे प्रयत्न अनेक संशोधकांनीं केले. जर्मन शास्त्रज्ञ डॉ. फ्रालीश ( १८८२ ), बांझा क्रेट व डॉ. स्टिनमेझ व केनेली ( १८९९ ) या तिघांचे सिद्धान्त अनुक्रमें बरोबर समजण्यांत येत. पण यांनीं या तिघांच्या संशोधनांतील मूळ नियमच चुकीचा असल्याचें सिद्ध केलें, आणि नवीन बिनचूक सिद्धान्ताची मांडणी करण्याकरितां प्रयोगांना सुरुवात केली. आटोकाट प्रयत्नानंतर यांचा चुंबनप्रक्रियेसंबंधींचा सिद्धान्त १९२६ च्या सप्टेंबरांत मान्य होऊन प्रसिद्ध करण्यांत आला.

'गोखले लॉ' या नांवानें यांचा हा सिद्धान्त प्रसिद्ध आहे.

केनेलीच्या सिद्धान्ताचें खंडन करण्यास हे उद्युक्त झाले, याचें कारण पुढीलप्रमाणें आहे. चुंबनशक्तीच्या अंतिम मर्यादेचें मोजमाप करण्यांत हे गुंतले होते. त्यासाठीं बनविलेल्या स्वतःच्या प्रयोगसाधनांतून केनेलीच्या सिद्धान्ताशीं विसंगत असे निर्णय यांना मिळूं लागले. पण स्वतःच्या साधनाबद्दल तर यांची खात्री होती. प्रयोगान्तीं यांचा संशय खरा ठरून यांनीं केनेलीचा सिद्धान्त चुकीचा ठरविला.

स. १९२८ मध्यें चुंबनप्रक्रिया व चुंबनशक्ति यांमधील प्रमाणासंबंधीचे सिद्धान्त यांनी सिद्ध करून दाखविले. हे सिद्धान्त शोधून प्रस्थापित करण्यासाठीं यांनी उपयोगांत आणलेलें सॅच्युरेशन थर्मामीटर पुढें G. E. C. आपल्या कारखान्यात वापरूं लागले.

विश्वविद्यालयांत उपयोगी पडेल अशी चुंबकीय आवरणाची (Magnetic Shielding) एक अत्यंत सुलभ रीति शोधल्याबद्दलचें श्रेय, या विषयावरील आपले सिद्धान्त १९२९ सालीं यांनीं प्रसिद्ध केल्यानंतर यांना देण्यांत येऊं लागलें. यांनीं त्याचें पेटंट घेतलें आहे.

यांच्या दीर्घकाल सतत चाललेल्या संशोधनांतून अनेक शाखांत यांनीं नवे सिद्धान्त प्रस्थापित केले आहेत. स्फेरिकल हार्मॉनिक्स या गणितांतील उच्चतर शास्त्रावर यांनीं कांहीं नवे सिद्धान्त बसविले आहेत.

तसेंच हिंदुस्थानच्या प्राचीन वाङ्मयाचा व समाजाचा यांचा व्यासंग गाढ आहे. भगवद्गीता, महाभारतांत व रासक्रीडा, भागवतांत प्रक्षिप्त असल्याचें यांचें संशोधन विचारणीय आहे. औंधच्या पुरुषार्थ व पुण्याच्या सह्याद्रि मासिकांत यांचे व यांच्या पत्नी उमाबाई यांचे लेख प्रसिद्ध होत असतात.

**गोगटे, गणेश वामन**—(जन्म स. १८७४–मृत्यु स. १९२९) मराठींतील चरित्रकार आणि स्वामी विवेकानंदांच्या समग्र ग्रंथांचे अनुवादक.

रत्नागिरीच्या दक्षिणेस असणाऱ्या गोळप गांवीं यांचा जन्म झाला. हे मॅट्रिक झाल्यावर ग्रँट मेडिकल कॉलेजमध्यें गेले. पण लवकरच यांना शिक्षणाला रामराम ठोकावा लागला आणि हे व्यापारांत शिरले. पण तो अयशस्वी होऊं लागल्यावर हे राष्ट्रमत, मनोरंजन वगैरे नियतकालिकांत लेख लिहूं लागले. बहुतेक सर्व विषयांत यांच्या लेखणीचा संचार असे. नोकरी करावयाची नाहीं असा यांचा बाणा असल्यानें हे आर्यन वॉच कंपनींत काम करीत. पण अशा कामापेक्षां काव्यशास्त्रविनोदाकडे यांचें लक्ष जास्त असे. त्यामुळें यांच्या लिहिण्यांत बहुश्रुतता आलेली होती. वेदान्त विषयाकडे यांचें लक्ष विशेष असल्यानें यांनीं विवेकानंदांच्या ग्रंथांस मराठी पेहराव चढविला आणि ते ग्रंथ तेरा खंडांत प्रसिद्ध झाले. ग्रंथांतील अर्थाकडे यांचें लक्ष विशेष असल्यानें यांनीं केलेलें भाषान्तर रसाळ झालें आहे. ग्रंथावर नांव घालावयाचें नाहीं, असा यांचा बाणा असल्यानें यांचे ग्रंथ प्रसिद्ध होऊनहि यांचें नांव अज्ञात राहिलें आहे. यांचे ग्रंथः—१ समग्र विवेकानंद (१–१३ खंड), २ कौंट टॉलस्टॉयचें चरित्र (१–५ खंड), ३ कैसरची प्रभावळ, ४ प्रिन्स बिस्मार्क, ५ ज्ञानदीप (अ. म. वा. से. २२७).

**गोगटे, राजाराम विनायक**—(जन्म स. १८९५) अमेरिकेंतील United Nations Relief and Rehabilitation Administration, Washingtion या ४४ राष्ट्रांनीं स्थापिलेल्या संस्थेच्या शिष्टमंडळांतील सभासद म्हणून हिंदुस्थानांत आलेले महाराष्ट्रीय गृहस्थ.

हे मूळचे इंदूरचे. यांचें शिक्षण पुणें व मुंबई येथें झालें. वयाच्या २५ व्या वर्षी यांनीं हिंदुस्थान सोडलें. प्रथम जपान येथें जाऊन नंतर अमेरिका, कॅलिफोर्निया, कोलंबिया, हर्बर्ट वगैरे ठिकाणीं जाऊन शिक्षण घेतलें. समाजशास्त्र व तत्त्वज्ञान हे यांचे विषय होते. १९२३ सालीं हे प्राध्यापक झाले. १९२६ च्या सुमारास सॅनफ्रान्सिस्को येथें विश्वविद्यालयीन जागतिक संमेलन भरलें होतें. त्यांत हे भारताचे प्रतिनिधि होते. तिकडील अनेक विश्वविद्यालयांत यांनीं काम केलें आहे. आलगा लँडन या स्त्रीशीं यांचा विवाह झाला आहे. धर्म ही खासगी बाब म्हणून कोणींच धर्मान्तर केलें नाहीं. हे अमेरिकेचे नागरिक झाले आहेत. तेथें ॲग्रिकल्चरल इकॉनॉमिस्ट म्हणून युद्ध-कचेरींत हे 'इंडिया डेस्क'चें काम पाहूं लागले. दोन वर्षे काम पाहिल्यावर वरील संस्थेंत भारतीय तज्ज्ञ म्हणून यांची नेमणूक झाली व तेथून हे हिंदुस्थान सरकारनें दिलेल्या आठ कोटि रुपयांच्या देणगीचा विनियोग करण्यासंबंधीं वाटाघाट करण्यासाठीं शिष्टमंडळाबरोबर हिंदुस्थानांत आले.

**गोडबोले, कृष्णशास्त्री**—( जन्म स. १८३१–मृत्यु स. १८८६ ) प्रसिद्ध गणित-ज्योतिषशास्त्रज्ञ.

यांचा जन्म वाईचा. हे चित्पावन ब्राह्मण. यांचा अभ्यास मराठी शाळेंत, संस्कृत पाठशाळेंत व पूना संस्कृत कॉलेजांत झाला. यांस लहानपणापासून गणिताचा नाद होता. यांनीं पाठशाळेंत शंकर जोशी यांजपाशीं ज्योतिषशास्त्राचें अध्ययन केलें. पुढें पूना कॉलेजच्या नॉर्मल स्कूलचे हे शिक्षक झाले. त्यांत मुख्यतः हे गणित शिकवीत. पुढें मुंबईच्या वेधशाळेंत, पूना ट्रेनिंग कॉलेजांत, सिंधहैद्राबाद हायस्कूल, कराची हायस्कूल, मुंबई ऍल्फिन्स्टन हायस्कूल वगैरे ठिकाणीं यांनीं कामें केलीं. सिंधप्रांतांत असतां सिंधीचें व फारसीचें यांनीं अध्ययन केलें. स. १८७१–७९ पर्यंत मुंबई विश्वविद्यालयांत हे सिंधी भाषेचे परीक्षकहि असत.

स. १८५६ मध्यें यांनीं व वामन कृष्ण जोशी गद्रे यांनीं मिळून ग्रहलाघवाचें मराठी भाषांतर सोदाहरण करून छापलें. तें बहुतेक विश्वनाथी टीकेचें भाषान्तर आहे. या पुस्तकाची दुसरी आवृत्ति छापली आहे. यांनीं ग्रहलाघवाची उपपत्तीहि मराठींत लिहिली आहे. तींत मल्लारीटीकेंतील दोष दुरुस्त केले आहेत असें समजतें. ही छापण्याजोगी आहे. याशिवाय स. १८८५ च्या सुमारास लिहिलेला ज्योतिषशास्त्राच्या इतिहासाचा लहानसा लेख शं. बा. दीक्षितांनीं पाहिला होता. स. १८६२ सालीं यांनीं 'ज्योतिःशास्त्र' या नांवाचें मराठी पुस्तक इंग्रजींतील चेंबर्सच्या पुस्तकावरून लिहून छापलें. तें आतां प्रचारांत नाहीं. हॅडनच्या बीजगणिताचें मराठी भाषान्तर पूर्वीं झालें होतें तें स. १८५४ मध्यें दुरुस्त करून यांनीं छापिलें. तें बरींच वर्षें शाळाखात्यांत चालत असे. स. १८७४ मध्यें हे व गोविंद विठ्ठल करकरे या दोघांनीं मिळून मराठींत युक्लिडच्या भूमितीच्या पहिल्या चार पुस्तकांचें भाषान्तर केलें. त्यापूर्वीं नानाशास्त्री आपटे यांनीं केलेलें युक्लिडच्या पुस्तकाचें भाषान्तर मराठी शाळांत चालत असे. पुढें स. १८८५ पासून कै. रा. मो. देवकुळे यांचें पुस्तक चालूं लागलें. स. १८८२ मध्यें 'वेदांचें प्राचीनत्व' या नांवाचा एक निबंध यांनीं थिऑसाफिस्ट मासिकांत इंग्रजी लिहिला तो निराळा छापला आहे. 'मासानां मार्गशीर्षोऽहम्' या गीतावाक्यावरून मार्गशीर्षांत वसंत असें घेऊन शकापूर्वीं ३० हजार वर्षें वेदकाळ असें सिद्ध करण्याचा त्यांत प्रयत्न आहे. सिंधी भाषेंत यांनीं अंकगणिताचें पुस्तक केलें (स. १८६९) व मराठी भाषेचें एक चांगलें व्याकरण स. १८६७ मध्यें केलें. स. १८९५ मध्यें त्याची तिसरी आवृत्ति छापली. सिंधीभाषेविषयींहि यांनीं एक पुस्तक केलें ( स. १८६८ ). 'पंचांग मध्यम रविचंद्रावरून करावें' असें यांचें मत एकदां प्रसिद्ध झालें होतें ( भा. ज्यो. इ. पा. ३०५ ). लघुचिंतामणीचें यांचें सोदाहरण मराठी भाषान्तर आहे.

यांचे ग्रंथ– १ चेंबरचें ज्योतिशास्त्र १८६२, २ मराठी भाषेचें नवीन व्याकरण १८६७, ३ ग्रहलाघव-भाषान्तर १८५६, ४ सिंधी भाषेचें निरूपण.

**गोडबोले, डॉ. नरसिंह नारायण**—( जन्म स. १८८८ ) सुप्रसिद्ध रसायनशास्त्रज्ञ, संशोधक व अभ्यासक.

यांचा जन्म धारवाड येथें झाला. तेथेंच इंग्रजी माध्यमिक शिक्षण होऊन हे डेक्कन कॉलेज, पुणें, येथून बी. ए. ( १९०७ ) व फर्ग्युसन कॉलेजमधून बी. एस्सी. झाले (१९०८). नंतर यांनीं एम्. ए. ही डिग्री घेतली (१९१०). नंतर रसायनशास्त्राचे प्राध्यापक म्हणून कराचीच्या डी. जी. कॉलेजमध्यें व सायन्सचे प्राध्यापक म्हणून लाहोरच्या सरदार दयाळसिंग कॉलेजमध्यें यांनीं काम केलें. तेथून बनारस हिंदुविश्वविद्यालयांत यांना आणण्यांत आलें. नंतर हे जपान, फिलिफाइन आयलंडस् वगैरे ठिकाणीं प्रवास करून तेथील औद्योगिक शिक्षणाची यांनीं पाहणी केली ( १९१७–१८ ). तेथून आल्यावर डिपार्टमेंट ऑफ् इंडस्ट्रियल केमिस्ट्रीची यांनीं तेथें स्थापना केली आणि तेथें हे प्रिंसिपल म्हणून काम करूं लागले ( १९१९ ). जपानची यांनीं केलेली औद्योगिक पाहणी यांनीं व्याख्यानांनीं लोकांच्या समोर मांडली. पंजाब, कलकत्ता व म्हैसूर येथील विश्वविद्यालयांकडून यांचीं 'जपानची आर्थिक व औद्योगिक प्रगति' या विषयावर मुद्दाम व्याख्यानें करविण्यांत आलीं ( १९१९–२० ).

बनारस हिंदुविश्वविद्यालयांत अप्लायिड केमिस्ट्रीचें प्राध्यापकत्व चालू असतांच Semi-Large Scale Manufacturing ला यांनीं सुरुवात केली होती. अशा तऱ्हेचा हा जगांतील पहिलाच प्रयत्न आहे.

पुढें हे जर्मनींत गेले आणि बर्लिन विश्वविद्यालयांत चार टर्मस्मध्यें यांनीं पी. एचडी. ही पदवी संपादन केली. तेथील यांचा संशोधनाचा विषय 'शेंगादाण्याचें पृथक्करण' हा होता ( १९२३–२५ ).

नंतर बनारस येथें आल्यावर यांनीं तेथें हिंदुविश्वविद्यालयातर्फें 'कॉलेज ऑफ टेक्नॉलजी' काढलें. आणि

प्रत्यक्ष शिक्षण देण्याकरितां १ ऑइल, सोप्स, फॅटस्, २ फार्मास्युटिकल, ३ सिरेमिक्स, ४ फाइन केमिकल, ५ ग्लास इंडस्ट्री या शाखा सुरू केल्या.

तेलें, साबण आणि चरबी यांचें पृथक्करण करण्यांत हिंदुस्थानांत यांचा पहिला नंबर आहे. हिंदुस्थानचे या विषयांतील प्रतिनिधि म्हणून युरोपांतील एका कॉन्फरन्स-करितां यांची हिंदुस्थानसरकारतर्फे निवडणूक झाली होती. पण इतर कांहीं खासगी कारणानें हे तिकडे जाऊं शकले नाहींत.

यांचें तूप, त्यांतील भेसळ व त्याचें शास्त्रीय पृथक्करण वगैरे प्रतिपादन करणारें एक इंग्रजी पुस्तक प्रसिद्ध आहे. त्याप्रमाणें सर्व प्रकारच्या दुधांत गोदुग्धाचा उत्कृष्टपणा सिद्ध करणाऱ्या यांच्या ग्रंथाची जगभर ख्याति झाली आहे. मांस, मासे व अंडीं या सर्वांपेक्षां गोदुग्ध हें सर्व प्रकारें उत्कृष्ट असल्याचें यांनीं सिद्ध केलें आहे. जर्मन भाषेंत व अमेरिकेंत यांच्या उत्कृष्ट प्रतिपादनामुळेंच या ग्रंथाचा प्रसार झाला आहे.

गृहोद्योग, ग्रामोद्योग व लहानमोठे धंदे आपल्या देशांत काढून कसे चालवितां येतील याबद्दल यांचा व्यासंग सतत चालू असतो. घरगुती धंदे कसे चालवावेत याची पाहणी करण्याकरितांच यांनीं पुनः एकदां जपानला फेरी मारली ( १९३६–३७ ). मेहेनत, स्वस्ताई आणि सुबकपणा यांबाबत यांनीं जपानमध्यें हिंडून अभ्यास केला.

रबर इंडस्ट्री विद्यालय, काड्याच्या पेट्या, शिसपेन्सिली इत्यादि उद्योगांबाबत सर्व दृष्टींची सूक्ष्म माहिती व तपशीलवार आंकडे यांच्याइतके इतरत्र क्वचितच तयार आढळतील.

यांचे ग्रंथ—

( 1 ) Butter-Fat सद्गोपाल यांच्या सहकार्यानें ( १९३० ) दुसरी आवृत्ति, ( १९३६ ), ( 2 ) Candle Manufacture (पहिली आवृत्ति १९३५, दुसरी आवृत्ति १९४५), ( 3 ) " Manufacture of Lead and Slate Pencils " (१९४५), ( 4 ) " Milk, the Most Perfect Food ", ( 5 ) " The Rubber Industry in India " ( 6 ) " Manufacture of Plastics " यांपैकीं शेवटचे दोन ग्रंथ All-Indi Manufacturer's Organisation नें प्रसिद्ध केलें आहे.

**गोडबोले, परशुराम बल्लाळ ऊर्फ परशुराम तात्या**—( जन्म स. १७९९–मृत्यु स.१८७४ ) मराठी भाषेंतील कवि, छंदशास्त्रज्ञ व संस्कृत नाटकांचे मराठी भाषान्तरकार.

यांचें मूळ गांव रत्नागिरी जिल्ह्यांतील पावसगोळ प. बळवंत–परशुराम–बळवंत–परशुराम असा यांचा वंशक्रम आहे. यांचें घराणें वाईस रास्त्यांच्या आश्रयानें आलें. यांचा जन्म वाईसच झाला. यांचें मोडी अक्षर उत्तम होतें. यांचें संस्कृत भाषेचें अध्ययन नारायणशास्त्री देवांचे पाशीं झालें. यांचे बंधु दाजीबा. त्यांस मोरोपंतादि मराठी कवींचीं काव्यें वाचण्याचा फार नाद असे. हे पुढें पुणें येथें आपले मामा जोग यांच्या पेढीवर नोकरीस राहिले. पुणें येथें ' बोर्ड ऑफ एज्युकेशन ' या मंडळीनें मराठी कोश तयार करण्याकरितां जी विद्वान् मंडळी नेमली त्यांत यांची योजना झाली. पुढें मे. कँडी यांनीं शाळांकरितां क्रमिक पुस्तकें लिहिण्याबाबत यांची मदत घेतली. त्या जागेवर हे अखेरपर्यंत होते. हे त्यांचे उजवे हात होते. तेव्हांच्या मराठी क्रमिक पुस्तकांतल्या सगळ्या कविता यांच्या आहेत. सरकारी काम संभाळून यांनीं अनेक मराठी ग्रंथ केले.

यांचें मराठी भाषेवर उत्तम प्रभुत्व असे. यांनीं केलेलीं भाषान्तरें हीं भाषान्तरें वाटत नाहींत इतकीं तीं सफाईदार झालीं आहेत. मराठी कवींच्या काव्यांचा अभ्यास यांनींच मराठींत प्रथम पद्धतशीर सुरू केला. हे मोठे रसिक आणि मर्मज्ञ होते. मराठी कवितेचा अर्थ लावण्याच्या कामीं यांचा हातखंडा असे. विशेषतः मोरोपंतांची आर्या लावण्यांत यांची फार प्रसिद्धि होती. महाराष्ट्रांत कवींचें माहात्म्य वाढत चाललेलें पाहून यांना फार संतोष होई.

यांनीं संस्कृताचें मराठी करून नवी कविता रचून आणि जुन्या कविता लोकांत प्रसिद्धीस आणून मराठी भाषेची फार मोठी सेवा केली आहे. मराठी वाङ्मयाचें महत्त्व ज्यांच्या प्रयत्नामुळें लोकांच्या लक्षांत येऊं लागलें त्या लोकांत यांना अग्रस्थान दिलें पाहिजे.

यांचें वाङ्मयः—

संस्कृतवरून मराठीः—१ वेणीसंहार, ( १८५७ ), २ उत्तरराम चरित्र (१८५९), ३ शाकुन्तल (१८६१), ४ मृच्छकटिक, ५ नागानंद, ६ पार्वती-परिणय; जुन्या कवींच्या काव्यांतील निवडक संग्रहः—७ नवनीत,

८ केकादर्श ( केकावलीवरील टीका ), ९ सर्वसंग्रह ( माधव चंद्रोबाचे मदतनीस ), १० तुकारामाची गाथा ( रा. ब. शंकर पांडुरंग पंडितांना मदत ); नवीन ग्रंथः—११ मराठ्यांच्या इतिहासावर सोप्या कविता, १२ नामार्थदीपिका, १३ बाळबोधामृत, १४ कादंबरी-सार, १५ वृत्तदर्पण.

**गोडबोले, रघुनाथ भास्कर**—(मृत्यु स.१८८७) मराठी भाषेंतील सुप्रसिद्ध कोशकार.

यांचा जन्म वाई येथें झाला. पुणें येथें थोडें इंग्रजी शिक्षण झाल्यावर कांहीं वर्षें सैन्यांत व नंतर शाळा-खात्यांत नोकरी केली. हे परमार्थवृत्तीचे होते. यांनीं निजाम राज्यांतील नांदेडजवळील हंसराज नांवाच्या साधूंचा अनुग्रह घेतला होता.

यांचें वाङ्मय—१ मराठी भाषेचा नवीन कोश ( १८७० ), २ हंसकोश ( १८७६ ), ३ भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश ( पहिली आवृत्ति, निर्णय-सागर १८७६, दुसरी आवृत्ति चित्रशाळा १९२८ ), ४ मराठी-इंग्रजी कोश ( १८८० ), ५ भारतवर्षीय अर्वाचीन चरित्रकोश ( १८८१ ).

यांनीं स्वयंस्फूर्तीनें फारच माहिती संशोधनपूर्वक एकत्र करून प्रसिद्ध केली आहे. संशोधनाचें युग सुरू होण्यापूर्वीं झालेले यांचें हें काम फारच महत्त्वाचें आहे. यांचा हंसकोश यावांचून आजहि अभ्यासकांचें पदोपदीं नडतें, यावरून त्या ग्रंथाची योग्यता समजून येईल.

यांच्या कोशांपैकीं शब्दकोशाची कल्पना जुनीच होती, पण प्राचीन-अर्वाचीन कोशाची कल्पना मराठींतच काय पण संस्कृतादि जुन्या व इंग्रजी वगैरे अर्वाचीन भाषांत सुद्धां अपूर्व आहे. त्या कोशाकरितां भारतीय युद्धापर्यंत प्राचीन व भारतीय युद्धानंतर अर्वाचीन अशी कल्पना धरून यांनीं व्यक्ति, ग्रंथ, स्थळें वगैरेंची वर्णक्रमानें माहिती देण्याचा प्रयत्न केला आहे. आधाराकरितां प्रायः रामायण, महाभारत हे प्रमुखत्वानें पण इतरहि कांहीं उपलब्ध असलेलीं पुराणें घेतलीं आहेत. जागोजाग आधारहि देण्याचा प्रयत्न केला आहे. हे अगदीं सनातनी मताचे असल्यानें वेद-शास्त्राविरुद्ध असलेल्या मतांचा हे कडक निषेध करतात. वैदिक ग्रंथांतील माहिती इतरांना देणें शास्त्रशुद्ध नाहीं म्हणून यांनीं दिली नाहीं. श्वेतकेतूवर उपनिषदांतील माहिती देणें बरोबर नाहीं, म्हणून यांनीं त्या उपनिष-दांचा अनुवाद असणाऱ्या आत्मपुराणांतून माहिती दिली आहे. रामशास्त्री सुरपुरकर हे यांचे प्राचीन कोशाचे साहाय्यक होते. यांनीं तो कोश शके १८९२-९८ या सात वर्षांत पुरा केला.

**गोडबोले, रामशास्त्री**—( जन्म स. १८३७– मृत्यु स. १९१३ ) महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध पंडित व वैय्याकरण. यांचे गुरु साताराचे भास्करशास्त्री अभ्यंकर. हे मूळचे माहुलीचे राहणारे. भास्करशास्त्री अभ्यंकर कैलासवासी झाले तेव्हां त्यांचे नातू वासुदेवशास्त्री अभ्यंकर सुमारें आठ वर्षांचे होते. त्यांच्या दहाव्या दिवशीं गुरूंना तिलांजलि देतांना त्यांनीं 'अध्यापनाचें व्रत विनामूल्य आजीव चालवीन' असा यांनीं संकल्प केला आणि तो अखंडपणें मोठ्या निष्ठेनें चालविला. हे जरी माहुलीस राहत तरी साताऱ्यास गुरुजींच्या घरीं जाऊन त्यांचे दोन नातू व प्रमुख शिष्य यांना निरलसपणें विद्यादान करीत. त्यामुळें यांचा मुक्काम एक रात्र साताऱ्यास व एक रात्र माहुलीस होई. शेवटीं हे पुण्यास राहण्यास आले. तेथेंहि यांचें अध्या-पनाचें कार्य सतत चालू असे.

महाराष्ट्रांतील व्याकरणशास्त्राच्या परंपरेचा संबंध यांच्याशीं किंवा गजेंद्रगडकर घराण्याशीं पोंहचतो. व्याकरणशास्त्राचे सिद्धान्तकौमुदी, प्रौढमनोरमा, शब्द-रत्न, शब्दकौस्तुभ, परिभाषेन्दुशेखर, लघुशब्देन्दुशेखर, परमलघुमंजूषा, वैय्याकरणभूषण, पातंजलमहाभाष्य, कैयट वगैरे व्याकरणशास्त्रांतील ग्रंथांचें अध्यापन यांच्यापाशीं चाले. इतर शास्त्रांचेहि ग्रंथ हे शिकवीत.

यांना संस्कृत भाषेंत कविता करण्याची शक्ति चांगली होती. हे स्तोत्रें सहज व सरस करीत. तीं लिहून ठेवण्याची यांना आवश्यकता वाटत नसे.

यांचा मंत्रशास्त्राचा चांगला व्यासंग असे. सप्तशती वगैरे ग्रंथ यांना मुखोद्गत असून ते यांच्या नित्य पठनांत असत.

यांचा शुद्ध आचार, अध्यापनाचें अखंड चाललेलें निरपेक्ष कार्य आणि पांडित्य यांमुळें भोर, इचलकरंजी, औंध आणि मिरज येथील राजांवर यांचें चांगलें वजन असे. यांनीं कधींहि कोणापाशीं याचना केली नाहीं. आगगाडींत बसावयाचें नाहीं असा यांचा नियम होता. नमस्कार घालण्याचा नियम कधीं चुकला नाहीं. शेवटीं नमस्कार घालीत असतांच हृदयक्रिया बंद पडून यांना मृत्यु आला.

यांचे प्रमुख शिष्य—पं. रघुनाथशास्त्री अभ्यंकर, कै. म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर, कै. महादेवशास्त्री जोशी, कै. बापुशास्त्री जोशी ( धारवाड ), कै. मोरशास्त्री दिवेकर, कै. विठ्ठलशास्त्री धारुरकर, कै. विनायकशास्त्री खानापूरकर इ.

**गोडे, परशुराम कृष्ण**—( जन्म स. १८९१ जुलै ११ ) सुप्रसिद्ध संशोधक व अभ्यासक. यांचा जन्म देवरुख ( जि. रत्नागिरी ) येथें झाला. गोडे यांचें मूळ उपनांव ठाकूर होतें. हें घराणें काश्यप गोत्री कऱ्हाडे ब्राह्मणाचें असून त्याचें मूळ वसतिस्थान रत्नागिरी जिल्ह्यांतील देवगड तालुक्यांत जामसांडें व हुडपीड गांवीं होतें असें यांनीं सिद्ध केलें आहे. हल्लींचे जामसांडे येथील ठाकूर व गोडे हे एकच होत. यांनीं आपल्या घराण्याविषयीं बरेंच ऐतिहासिक संशोधन केलें आहे. प्रसिद्ध केलेल्या कागदपत्रांमध्ये गोडेबखर व मुडागडच्या लढाईचा इतिहास ( Bombay Uniuersity Journal, January 1937 ) हे महत्त्वाचे आहेत. रा. गोडे यांचे एक पूर्वज नारो रायाजी गोडे ( ठाकूर ) यांनीं सुमारें दहा हजार सैन्य जमा करून स. १७४८ मध्यें तुळाजी आंग्रे यानें वसविलेल्या मुडागडावर स्वारी करून तो किल्ला जमीनदोस्त केला. या पराक्रमाबद्दल गंगाधर कृष्ण प्रतिनिधि यांनीं नारो रायाजी यांस विशालगडच्या पायथ्याशीं असलेलीं देवडें व भडकंबें हीं दोन गावें खोती इनाम दिलीं तीं अद्याप गोडे घराण्याकडे चालू आहेत. सुमारें स. १७८२ पासून आजतागायत गोडे घराण्याची वस्ती भडकंबें येथें आहे.

यांचे वडील कृष्णाजी गोविंद गोडे ( स. १८६१–१९३० ) हे समाजसुधारक होते. यांना वाचनाचा फार नाद असून त्यांच्या विचारावर कै. आगरकर व लोकमान्य टिळक यांच्या लेखांचा फार परिणाम झाला होता. त्यांनीं आपल्या तीन मुलींस महर्षि अण्णासाहेब कर्वे यांच्या शिक्षणसंस्थेंत शिक्षण दिलें व नंतर या मुलींपैकीं सर्वांत थडील कै. सौ. बनूबाई सहस्त्रबुद्धे, रावबहादुर डॉ. दत्तात्रेय लक्ष्मण सहस्त्रबुद्धे यांच्या पत्नी व त्यांच्या भगिनी कै. सौ. मालतीबाई कर्वे, प्रा. र. धों. कर्वे यांच्या पत्नी यांनीं रा. परशुराम कृष्ण गोडे यांचें शिक्षण पूर्ण केलें. स. १९०० ते १९०७ पर्यंत रा. गोडे यांचें प्राथमिक शिक्षण राजापूर, रत्नागिरी व कोल्हापूर ( समर्थ विद्यालय ) येथें होऊन स. १९०८ सालीं हे पुढील शिक्षणाकरितां न्यू इंग्लिश स्कूलमध्यें दाखल झाले. स. १९१० मध्यें ते मॅट्रिक परीक्षा पास होऊन त्यांनीं फर्ग्युसन कॉलेजमध्यें पुढील अभ्यासक्रम पूर्ण केला. नंतर स. १९१६ त हे बी. ए. ( सेकंड क्लास ऑनर्स–संस्कृत ) ची परीक्षा पास झाले. नंतर पुण्यांतील तीन हायस्कुलांत शिक्षकाची नोकरी करून स. १९१८ मध्यें हे एम्. ए. ची परीक्षा ( इंग्रजी व संस्कृत ) पास झाले. स. १९०८ ते १९१८ पर्यंत यांना कै. डॉ. पांडुरंग दामोदर गुणे यांच्या अध्यापनाचा लाभ झाला. स. १९१८–१९१९ रा. गोडे हे कर्वे युनिव्हर्सिटीमध्यें इंग्रजी व संस्कृत या विषयांचे प्राध्यापक होते. डॉ. गुणे व त्यांचे साहाय्यक यांनीं याच वेळीं भांडारकर ओरिएण्टल रिसर्च इन्स्टिटयूट स्थापन केली. डॉ. गुणे व प्रा. रा. द. रानडे ( हल्लीं अलाहाबाद युनिव्हर्सिटीमधील तत्त्वज्ञान विषयाचे प्रधान अध्यापक ) यांचे सल्ल्यावरून यांनीं भांडारकर इन्स्टिटयूटमध्यें असिस्टन्ट क्यूरेटरची जागा २६ एप्रिल १९१९ रोजीं पत्करिली. लवकरच म्हणजे जानेवारी १९२१ मध्यें यांना इन्स्टिटयूटचे क्यूरेटर नेमण्यांत आलें व त्या जागेवर हे आजपर्यंत नोकरी करीत आहेत. स. १९४३ मध्यें इन्स्टिटयूटच्या रौप्यमहोत्सवप्रसंगीं यांना त्यांच्या प्रशंसनीय सेवेबद्दल व संशोधनात्मक कार्याबद्दल संस्थेकडून एक रौप्यपदक ( Distinguished Services Medal ) सर राधाकृष्णन् यांचे हस्तें अर्पण करण्यांत आलें.

यांचें संशोधनकार्य हे बी. ए. च्या वर्गांत असतांना सुरू झालें असें म्हणण्यास हरकत नाहीं. यांचा पहिला संशोधनात्मक निबंध महाभारताविषयीं असून तो Sanskrit Research ( Bangalore ) या नियतकालिकांत १९१६ मध्यें प्रसिद्ध झाला. या निबंधाबद्दल डॉ. कुर्तकोटी ( हल्लीं शंकराचार्य ) यांनीं यांना ५० रुपयांचें बक्षिस दिलें. तदनंतर यांनीं आपली नोकरी संभाळून संशोधनास वाहून घेतलें. सन १९२२ डॉ. गुणे ( भाण्डारकर इन्स्टिटयूटचे पहिले चिटणीस ) वारल्यामुळें यांना मार्गदर्शक असा गुरु मिळाला नाहीं. नंतर यांनीं १९२५ पासून त्यांच्या ताब्यांत दिलेल्या सरकारी हस्तलिखित-संग्रहाचा उपयोग करून संस्कृत ग्रंथ व ग्रंथकार यांचें कालनिर्णयात्मक संशोधन सुरू केलें व तद्विषयक सुमारें २०० निबंध अनेक प्राच्यविद्याविषयक नियतकालिकांत प्रसिद्ध केले. सन १९४१ सालीं यांचीं ५० वर्षे पूर्ण झालीं त्या वेळीं यांनीं आपल्या

२०२ निबंधांची सूचि ( Bibliography ) प्रसिद्ध केली. या सूचीचे शेवटीं यांनीं हिंदुस्थानांतील व बाहेरील विद्वानांचीं मतें छापलीं आहेत त्यावरून यांच्या संशोधन-कामगिरीची पूर्ण कल्पना येईल. स. १९४१ नंतर यांचें लक्ष हिंदी संस्कृतिविषयक इतिहासाकडे वेधलें व सुमारें १०० निबंध यांनीं या संस्कृतीसंबंधानें लिहिले आहेत. या निबंधांत कांहीं निबंध मराठ्यांच्या इतिहासाबद्दल आहेत. यांनीं वरील सूचीच्या शेवटीं आपल्या निबंधांचें विषयवारी वर्गीकरण ( Subject-Index ) केलें आहे. त्यांतील विषयः—अलङ्कारशास्त्र, छन्दःशास्त्र, संस्कृत ग्रंथांचे टीकाकार, धर्मशास्त्र, लोककथा, गणित, हिंदी संस्कृति, हिंदुस्थानचा इतिहास (गुजरात, काठेवाड, माळवा, महाराष्ट्र, राजपुताना, विजयनगर वगैरेबद्दल व मुसलमानांच्या इतिहासासंबंधीं), जैन ग्रंथ व ग्रंथकार, ज्योतिःशास्त्र, कामशास्त्र, काव्य, कोश, मीमांसा, नाटक, नाट्य, नाणकशास्त्र, न्यायशास्त्र, मानसशास्त्र, पुराणें, संगीत, समाजशास्त्र, तन्त्र, वैद्यक, वेदान्त, विज्ञान, व्याकरण, योग—येणेंप्रमाणें आहेत. संस्कृत वाङ्मयाचा बिनचूक इतिहास लिहिण्यास यांच्या निबंधांची बरीच मदत होईल असें प्रसिद्ध आंग्ल प्राच्यविद्याविशारद डॉ. ए. बी. कीथ ( एडिंबरो ) यांचें मत आहे. ते लिहितातः—"Your excellent contributions to our exact knowledge of literary Chronology. Such work is most useful to future historians of Sanskrit literature and I am very glad,you are taking it up so consistently." यांच्या कांहीं निबंधांचीं भाषांतरें, हिंदी, संस्कृत व गुजराती मासिकांत प्रसिद्ध झालीं आहेत. यांच्या निबंधांचीं व्यक्तिशः येथें नांवें देणें शक्य नाहीं, परंतु त्यांचें थोडेंसें दिग्दर्शन करणें जरूर आहे तें येणेंप्रमाणें:—बैलगाडीचा इतिहास, नथीचें प्राचीनत्व, कऱ्हाडे ब्राह्मणांचा इतिहास, जिलबीचा इतिहास, अंजीराचा इतिहास, जोंधळ्याचा इतिहास, भवानी तरवारीसंबंधीं तत्कालीन पुरावा देणारा लेख, चहाचा इतिहास, छत्रपति संभाजीचा पारिजात-ध्वज ( भगवा झेंडा ), गाबीत, साळी व पद्मसाळी या जातींचा इतिहास, सवाई जयसिंगनें केलेल्या अश्वमेधाबद्दल निबंध, कागदाचा इतिहास, गुलाबपाण्याचा इतिहास इत्यादि. रा. गोडे यांच्या सर्व निबंधांचें पुस्तकरूपानें प्रसिद्धीकरण झाल्यास त्याचा सर्व इतिहास-संशोधकांस बराच उपयोग होईल असें मत बऱ्याच तज्ज्ञांनीं प्रकट केलें आहे. आजतागायत यांनीं ३०० निबंध प्रसिद्ध केले आहेत व त्यांची एकूण पृष्ठसंख्या जवळजवळ २००० आहे.

ऐतिहासिक संशोधनाखेरीज बरेंच संपादकीय काम यांनीं केलें आहे. या कामाचा आरंभ १९३० मध्यें झाला. प्रा. रा. द. रानडे यांनीं स्थापन केलेल्या ॲकडेमी ऑफ फिलासफी ॲन्ड रिलिजन या संस्थेचे हे आरंभापासून चिटणीस आहेत. या संस्थेच्यातर्फे यांनीं Review of Philosophy and Religion हें नियतकालिक सुरू करून तें १९३६ पर्यंत चालविलें. स.१९३८-१९४०त यांनीं Oriental Literary Digest नांवाचें मासिक डॉ. सुमित्र मंगेश कत्रे ( हल्लीं डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिट्यूटचे डायरेक्टर ) यांचे साहाय्यानें चालविलें. नंतर १९३८ मध्यें या दोघां विद्वानांनीं New Indian Antiquary नांवाचें मासिक सुरू केलें तें आजतागायत चालू आहे. या मासिकांत जगांतील सर्व नामांकित विद्वानांचे प्राच्यविद्याविषयक लेख येत असतात. रा. गोडे व डॉ. कत्रे यांनीं New Indian Antiquary-Extra Series नांवाची ग्रंथमालाहि सुरू केली आहे. त्यांत कांहीं विद्वानांचे ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. या दोघांनीं संपादन केलेल्या ग्रंथांमध्यें, प्रा. पां. वा. काणे स्मारक-ग्रंथ, डॉ. टॉमस स्मारक-ग्रंथ, सर डेनिसन रॉस स्मारक-ग्रंथ व सुखटणकर स्मारक-ग्रंथ हे उल्लेखनीय आहेत. हे हल्लीं कलकत्त्याचे सुप्रसिद्ध विद्वान् डॉ. बी. सी. लॉ यांचा एक स्मारक-ग्रंथ संपादीत आहेत. सन १९३६ पासून यांनीं तयार केलेली भाण्डारकर इन्स्टिट्यूटमध्यें असलेल्या सरकारी हस्तलिखितांची वर्णनात्मक सूची छापण्याचें काम सुरू झालें आहे. या सूचीचे यांनीं केलेले ४ भाग या संस्थेनें प्रसिद्ध केले आहेत व पुढील भागांचें प्रकाशन चालू आहे. यांनीं संपादन केलेल्या ग्रंथांची पृष्ठसंख्या सुमारें १०,००० होईल. सन १९३७ पासून यांच्या सर्व संपादकीय कार्यामध्यें यांचे मित्र डॉ. कत्रे यांचें अमूल्य साहाय्य झालें आहे. त्याचप्रमाणें त्यांना सन १९२५ ते १९४३ कै. डॉ. सुखटणकर ( भाण्डारकर इन्स्टिट्यूटच्या महाभारताचे प्रसिद्ध संपादक ) यांच्या मैत्रीचा व साहचर्याचा चिरस्मरणीय लाभ झाला व या मैत्रीचें प्रतीक म्हणून यांनीं सुखटणकर स्मारक-ग्रंथ ( २ भाग ) नुकतेच ( १९४४-४५ ) प्रसिद्ध केले आहेत. यांशिवाय रा. गोडे यांनीं सुमारें ३५० ग्रंथांचें समालोचन प्रसिद्ध केलें आहे.

**गोपालाचार्लू, पंडित डी.**—( जन्म स. १८५० –मृत्यु स. १९२५ ) आयुर्वेदाच्या क्षेत्रांत काम करणारे सुप्रसिद्ध पंडित.

यांचें घराणें पिढीजात वैद्याचें असून यांचें वैद्यकीचें शिक्षण पित्याजवळ झालें. पण तेवढ्यानें तृप्त न होतां म्हैसूर राजकीय आयुर्वेदपाठशाळेंत पुट्टस्वामीशास्त्रीपाशीं यांनीं आयुर्वेदाचें आणखी अध्ययन केलें. व तेथील धर्मार्थ चिकित्सालयांत अनुभव संपादन केला, व परीक्षेंत उत्तम यश संपादन केलें. हिंदुस्थानभर प्रवास करून चर्चा व अवलोकन केल्यावर मद्रास येथें वैद्यकी व चिकित्साधर्मवैद्यशाळेंत प्रधानाध्यापकाचें काम केलें. याच वेळीं यांनीं अनेक अनुभूत औषधीकल्प निश्चित केले. त्यांतील प्लेगावरील यांचा 'हैमादिपानक' हा अमोघ ठरला. या सर्व औषधीकल्पांचे जोरावर यांनीं स्वतःचा 'आयुर्वेदाश्रम' काढला. त्यांतून प्राप्त झालेला पैसाहि यांनीं विद्यार्थ्यांना वेतनादि रूपानें वाटून टाकला. 'नात्मार्थं नापि कामार्थमथ भूतदयां प्रति ॥ यो वर्तते चिकित्सायां स सर्वमतिवर्तते ॥' ही चरकोक्ति यांनीं सार्थ केली. वैद्यकींत मिळविलेला धनसंचयहि यांनीं स्वतः स्थापन केलेल्या 'मद्रास आयुर्वेद-कलाशाळा' या संस्थेस अर्पण केला.

यांच्या दिगंत कीर्तीला साजेसा सन्मानहि यांना लाभला. मुंबई, गद्वाल, काशी व कलकत्ता संमेलनांत यांना प्लेगावरील औषधाबद्दल सुवर्णपदकें देण्यांत आलीं. कलकत्ता व नाशिक संमेलनांत यांना अनुक्रमें भिषड्मणि व आयुर्वेदमार्तंड या पदव्या देण्यांत आल्या. १९१३ सालीं वैद्यरत्न हा ब्रि. सरकाराकडून किताब यांना प्राप्त झाला. १९०९ व १३ सालीं यांना केरळ वैद्य समाज सप्तम-महोत्सव (१९०९) व मुंबई संमेलन (१९१३), हरिद्वार, ऋषिकुल ब्रह्मचर्याश्रमाचें वैद्य-संमेलन (१९१७), त्याच सालीं आंध्र आयुर्वेद-संमेलन बेझवाडा, तेन्नाळदेशांत गुण्टूर-आयुर्वेद-युनानी वैद्य सं., सर्वांत महत्त्वाचें लाहोर नि. भा. आयुर्वेद महासंमेलन (१९१८), तिरुवहीन्द्रपूर–दुसरें द्राविड वैद्यसंमेलन (१९१९) इत्यादि ठिकाणीं यांना अध्यक्षपदाचा मान मिळाला. यांच्या भाषणांत आयुर्वेदीय तत्त्वज्ञानाचें सोपपत्तिक विवेचन व मध्यवर्ति, कायमच्या आयुर्वेदपदार्थ-संग्रहाची योजना यांबाबतचे विचार महत्त्वाचे होते (आयुर्वेदाचार्य पां. ह. देशपांडे ).

**गोविंद**—( जन्म स. १८७४–मृत्यु स. १९२६ ) मराठी भाषेंतील राष्ट्रीय वृत्तीचे शाहीर कवि.

यांचें समग्र नांव गोविंद त्र्यंबक दरेकर. जात मराठा. यांचे वडील लहानपणींच वारले. आणि लहानपणींच ताप येऊन हातपाय कायमचे लुळे पडल्यानें हे पंगू झाले व यांना शिक्षण घेतां आलें नाहीं. स. १८९८-९९ च्या सुमारास बॅ. वि. दा. सावरकरांची व यांची गांठ पडली. त्यांच्यापासून यांना राष्ट्रीय कविता करण्याची स्फूर्ति मिळाली. सावरकरांची 'मित्रमेळा' नांवाची एक संस्था होती. तेथें हे आपल्या देशप्रेमानें रसरसलेल्या कविता म्हणून दाखवीत. १९०६ च्या सुमारास हीं वेळोवेळीं रचलेलीं यांचीं कवनें 'लघु-अभिनवमाला' म्हणून प्रसिद्ध करण्यांत आलीं. त्या मालेंतून प्रसिद्ध झालेल्या नऊ पुष्पांपैकीं पांच पुष्पें यांचीं आहेत. पुढें मित्रमेळ्याचें रूपान्तर 'अभिनव भारत' या क्रांतिकारक संस्थेंत करण्यांत आलें. स. १९०८-९ चे दडपशाहीचे काळांत हीं सर्व पुष्पें सरकारनें जप्त केलीं. त्यानंतर १९१७ पर्यंत यांनीं कविता लिहिल्या नाहींत. १९१८ मध्यें होमरूलची चळवळ सुरू झाल्यावर यांनीं पुनः कविता लिहिण्यास सुरुवात केली.

'गोविंदाची कविता' या नांवानें यांचा कविता-संग्रह प्रसिद्ध झाला आहे (१९३०-३१). यांच्या या संग्रहांतील बहुतेक कविता १९१८ नंतर लिहिलेल्या आहेत. यांच्या काव्याचा मुख्य विशेष म्हणजे रसरसणाऱ्या भावना. यांचा आवडता रस म्हणजे वीररस. यांच्या भावनेची गंगा वीररसानें फोफावत अनुप्रास आणि नादमाधुर्य यांच्या दुथडींतून चालली कीं, श्रोत्यांच्या अंतःकरणाला देशाभिमानाची भरती आल्याशिवाय कधींहि राहत नाहीं. राष्ट्रीय वृत्तीच्या शाहीर कवींत यांचें स्थान अद्वितीय आहे. राजस्थानच्या इतिहासांत चांदभाटाला जो मान दिला जातो तोच मान आधुनिक महाराष्ट्राच्या इतिहासांत यांना देणें योग्य होईल.

यांच्या 'महाराष्ट्राची भूपाळी', 'सुंदर मी होणार' वगैरे कविता त्या वेळीं सर्वतोमुखीं झाल्या होत्या.

**गोविंददास जीवनदास शेठ**—( जन्म स. १८९६ ) हिन्दी भाषेंतील सुप्रसिद्ध लेखक, नाटककार. राजकारणी, सार्वजनिक कार्यकर्ते, व्यापारी व दानशूर गृहस्थ.

हे आपले वडील जीवनदास यांना वयाच्या साठाव्या

वर्षी दसऱ्याच्या दिवशीं झाले. त्या वेळीं यांच्या वडिलांनीं लाखों रुपये धार्मिक कार्यांत व उत्सवांत खर्च केले. यांचें शिक्षण घरींच हिन्दी व इंग्रज शिक्षकाच्या तज्ज्ञ देखरेखीखालीं झालें. इतर विषय न शिकतां यांनीं इंग्रजी साहित्याचाच विशेष अभ्यास केला. बंगाली, मराठी, गुजराथी वगैरे भाषा हे स्वतःच शिकले.

१९२० सालीं यांनीं असहकारितेच्या चळवळीत उत्साहानें भाग घेतला. यांचें वय लहान असलें तरी यांच्या नेतृत्वाची महती जनतेस समजली. १९२३ सालीं हे स्वराज्यपक्षातर्फे मध्यप्रान्तांतील जमीनदारांचे प्रतिनिधि म्हणून दिल्लीच्या मध्यवर्ति कायदे मंडळांत निवडून आले. तसेंच १९२५ सालीं सर एम्. बी. दादाभाई व सर हरिसिंग गौर यांसारखे प्रतिस्पर्धी असतां हे कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें निवडून आले. १९२९ सालीं राष्ट्रसभेच्या आदेशाप्रमाणें यांनीं आपल्या कायदेमंडळांतील सभासदत्वाचा राजीनामा देऊन हे सत्याग्रहांत सामील झाले. या मुदतींत तीन वेळां एक ते सहा वर्षेपर्यंत शिक्षा होऊन यांना कारावास भोगावा लागला. १९३३ सालीं पुनः दिल्लीच्या मध्यवर्ति कायदेमंडळांत हे निवडून आले. तेथें व्यापारधंद्यांतील दर्दी सभासद म्हणून यांची ख्याति होती.

असहकारितेच्या चळवळींत यांनीं ऑननरी मॅजिस्ट्रेटची जागा तर सोडलीच, पण वार्षिक ६०-७० हजार रुपयांचा फायदा देणारा लॅंडर अरबथनॉट या इंग्रज दुकानाशीं असलेला दीर्घकालीन संबंधहि सोडला.

वयाच्या अकराव्या वर्षापासून यांना हिन्दी वाचनाचा नाद लागला व पुढील तीनचार वर्षांत यांनीं चम्पावती, कृष्णलता व सोमलता या तीन कांदबऱ्या लिहिल्या. नंतर सोळाव्या वर्षी यांनीं शेक्सपिअरच्या रोमिओ ॲंड ज्युलिएट, पॅरोक्लिस प्रिन्स ऑफ टायर व विन्टर्स टेल यांच्या आधारें सुरेन्द्रसुन्दरी, कृष्णकामिनी, होनहार आणि व्यर्थसंदेश या कांदबऱ्या लिहिल्या. याच वेळीं कवितेबद्दल यांना आवड उत्पन्न होऊन 'बाणासुर-पराभव' हें एक महाकाव्य यांनीं लिहिलें. यांत १८ सर्ग असून विविध छन्दांमुळें तें मनोहर झालें आहे.

यांची नाटककार म्हणूनहि चांगली प्रसिद्धि आहे. यांचीं आधुनिक पद्धतीचीं एकांकी नाटकें यशस्वी झालीं आहेत. तीं वाचनीय म्हणून त्यांचा खप चांगला होतो. हीं लहान नाटकें ललित प्रसंगीं करून दाखविण्याची पद्धतहि पडत चालली आहे. जुन्या रामलीला वगैरेपेक्षां साहित्यिक दृष्टि यांमध्यें अधिक आढळते.

जबलपुरांतील शारदाभुवन वाचनालयाची स्थापना २५ हजार रुपये देऊन यांनीं केली आणि त्याची व्यवस्था जबलपूर राष्ट्रीय हिन्दी मन्दिरातर्फे करण्यांत आली. टिळकस्वराज्य फंडास यांनीं १० हजार रुपये दिले. जबलपूर प्लेग रिलीफ कमेटीस यांनीं १५ हजार रुपये जमवून दिले. याशिवाय यांनीं किती तरी संस्थांना मोठाल्या देणग्या दिल्या आहेत.

पुण्याच्या तृतीय महाराष्ट्र प्रान्तिक माहेश्वरी सभेचे व जळगावच्या पंचम मुंबईप्रान्तीय माहेश्वरी सभेचे हे अध्यक्ष होते. अखिल भारतीय माहेश्वरी परिषदेचें मन्त्रिपद यांनीं पुष्कळ वर्षे भूषविलें आहे.

यांच्या कांदबऱ्या–१ चम्पावती, २ कृष्णलता, ३ सोमलता, ४ सुरेन्द्रसुंदरी, ५ कृष्णकामिनी, ६ होनहार, ७ व्यर्थसन्देह.

काव्यें–बाणासुरपराभव.

नाटकें—१ कर्तव्य, २ हर्ष, ३ प्रकाश.

यांनीं 'धुवांधार' वगैरे पुष्कळ चित्रपटकथाहि लिहिल्या आहेत.

**गोस्वामी, किशोरीलाल श्रीवासुदेवशरण**—( जन्म स. १८६५–मृत्यु स. १९३१ ) हिन्दीचे सुप्रसिद्ध लेखक व कवि.

वृन्दावनच्या प्रसिद्ध श्रीकेदारनाथजी महाराजांचे हे नातू, त्याचप्रमाणें यांचे मातामह गोस्वामी श्रीकृष्ण-चैतन्यदेवजी हे भारतेन्दु बाबू हरिश्चन्द्रांचे गुरु. त्यामुळें भारतेन्दूशीं यांचा निकट स्नेहभाव झाला.

वयाच्या ८ व्या वर्षी यांच्या विद्याभ्यासास प्रारंभ झाला. आपल्या मातामहांच्यापाशीं यांनीं हिन्दी साहित्य, पिङ्गलशास्त्र वगैरेचा अभ्यास केला. राजा शिवप्रसाद सितारेहिन्द व भारतेन्दूच्या प्रेरणेवरून यांनीं "प्रण-यिनी–परिणय" ही हिन्दी कादम्बरी प्रथम लिहिली. यांचें शिक्षण काशीस झालें. यांनीं संस्कृतातील न्याय, योग, व्याकरण, वेदान्त, ज्योतिष इत्यादि विषयांचें अध्ययन करून साहित्यांतील 'आचार्य'–परिक्षेपर्यंतचे ग्रन्थ वाचून काढले. यांच्या पित्याबरोबर हे आरा येथें कांहीं दिवस राहत होते. तेथेंहि यांनीं प्रसिद्ध विद्वान् श्रीपीताम्बर मिश्रजी व रुद्रदत्तजी यांचेजवळ संस्कृता-ध्ययन केलें. आरा येथें वाचनालय नसल्यामुळें यांनीं तेथें आर्य पुस्तकालयाची स्थापना केली व तद्वारें हिन्दीचा प्रसार केला. तेथील प्रसिद्ध वैद्यराज पं. बालगोविन्द

त्रिपाठी यांच्या साहाय्यानें यांनीं तेथें ‘ वर्णधर्मोपयोगिनी ’ सभेचीहि स्थापना केली व तिच्याद्वारां एक पाठशाळा सुरू केली. स. १८९०त याच सभेचे प्रतिनिधि म्हणून हे दिल्लीच्या भारतधर्म महामण्डलांत गेले.

‘कुरमी जाती’च्या वर्णव्यवस्थेवर यांनीं संस्कृतांत एक पुस्तक लिहिलें असून तें “ विज्ञ वृन्दावन ” पत्रांतून प्रसिद्ध झालें.

‘ सरस्वती ’ या प्रसिद्ध हिन्दी मासिकाचे व ‘ नागरी-प्रचारिणी पत्रिका ’, ‘ नागरी प्रचारिणी ग्रन्थमाला ’, ‘ बालसखा ’ वगैरेंचे हे संपादक व सह–संपादक होते. मध्यंतरीं यांनीं ‘ उपन्यास ’ व ‘ श्रीवैष्णव सर्वस्व ’ अशीं दोन मासिक पुस्तकें सुरू केलीं. १९१३ त यांनीं वृन्दावन येथें ‘ सुदर्शन छापखाना ’ उघडला. नागरी प्रचारिणी सभेचे हे प्रथमपासूनच सभासद होते; परंतु पुढें सभेच्या कार्यकर्त्यांशीं मतभेद होऊन यांनीं सभेचा संबन्ध सोडून दिला. आग्रा येथील गौड महासभेचे हे अध्यक्ष होते. तसेंच रीवाँ राज्यांतील चतुःसम्प्रदाय श्रीवैष्णव महासभेचे हे पंच असून रीवांचे स्वर्गीय महाराज यांचा आदर करीत असत.

हीरक-महोत्सवाचे वेळीं यांनीं महाराणी व्हिक्टोरियाचें संस्कृतांत चरित्र लिहून काशीच्या ‘वैष्णव-समाजा’-तर्फे तें इंग्लंडला पाठविलें.

यांनीं एकंदर २७ काव्यात्मक, २५ चरित्रात्मक, २५ नाटकें, ६५ कादम्बऱ्या, १५ साम्प्रदायिक विषयांवरील, ११ विविध विषयांवर, ११ गाण्याचीं इतकीं विविध विषयांवरील पुतकें लिहिलीं. यांशिवाय ‘मयूखमालिनी’, ‘ प्रणयोच्छ्वास, ’ ‘ शृङ्गाररत्नमाला,’ ‘ शृङ्गारसुधाकर,’ ‘ शृङ्गारसुधाबिन्दु, ’ ‘ सांख्यसुधाकर, ’ ‘ संक्षिप्त सांख्य–तत्त्व–समास–कारिका ’ हीं ७ संस्कृत पुस्तकें व सुमारें ४१ स्फुट लेख इत्यादि लिखाण यांनीं लिहिलें. यावरून हिन्दी साहित्याची यांनीं केलेली सेवा व यांचें साहित्यमय जीवन यांची कल्पना येईल. साहित्याशिवाय यांना इतर कशांतहि गोडी लागत नसे. भोजन, भजन व निद्रा यांशिवायचा सर्व वेळ हे साहित्योत्पत्तीसाठीं खर्च करीत. हे नेहमीं म्हणत कीं, ‘ एकाद्या सभेंत जाऊन हिन्दीची सेवा करण्यापेक्षां घरीं राहूनच ती अधिक होते. लोकांनीं यांना पुष्कळ वेळा पदव्या देण्याचें ठरविलें, पण यांना ही गोष्ट न आवडल्यामुळें यांनीं तिचा इन्कार केला. एकदां भारत–धर्म मण्डळानें यांना एक पदवी लिहून पाठविली असतां यांनीं असें प्रत्युत्तर दिलें कीं ‘ असाहित्य–सेवक साहित्य–सेवकांना पदवी देऊन आपली अयोग्यताच प्रगट करीत नाहींत, तर साहित्य–सेवकांचा अपमानहि करतात. ’ हे हिन्दींत फार सुंदर व्याख्यान देत. व्रजभाषा व खडीबोली या दोहोंमध्यें ते त्वरित कविता करीत. ह्याच गुण यांच्या संस्कृत कवितेंतहि दिसून येई. अनेक भाषांत लिहिण्यांत यांचा हातखंडा असे ( क. कौ. २:२१४-२१ ).

**गोहरजान**—( जन्म स. १८७०–मृत्यु स. १९३० ) सुप्रसिद्ध गायिका व उर्दू भाषेंतील कवयित्री.

वयांत आल्यावर यांनीं गायनकला संपादन केली. नजीरखाँ व प्यारासाहेब हे यांचे गायनकलेंतील गुरु. ख्याल, होरी वगैरे उच्च दर्जाचे गाण्याचा यांचा अभ्यास चांगला होता व यांनीं तो शेवटपर्यंत टिकविला होता.

तथापि ठुमरी-गायक म्हणून पुढें यांची कीर्ति फार झाली. ठुमरीच्या गायनांत आवश्यक असणारा भाव या फार उत्कृष्ट करीत. कवनांतील भावना स्वराइतकीच बोलांच्या लडिवाळपणानें प्रदर्शित करण्याची यांची हातोटी अपूर्व होती. स्वर, भाव आणि शब्दांचें रसानुकूल ठसकेदार उच्चारण यांमुळें यांच्या गायनाची मोहिनी सर्व प्रकारच्या श्रोत्यांवर सहज पडे. गोड, गोल, सुरेल आणि भरदार आवाजाची देणगीहि यांना होती.

ऐन तारुण्यांत या दरभंगा दरबारांत गायिका होत्या. पुढें कलकत्त्यास राहूं लागल्या. उतार वयांत यांनीं म्हैसूर दरबारचा आश्रय घेतला. सर्व हिंदुस्थानभर भरपूर प्रसिद्धि, उत्तम लौकिक आणि विपुल संपत्ति यांचा लाभ यांना झाला.

**गोहेल, सूरसिंहजी जगतसिंहजी**—( जन्म १८७४–मृत्यु स. १९०० ).

‘ कलापी ’ या टोपणनांवाखालीं प्रसिद्ध असलेले गुजराथी कवि. हे काठेवाडांतील लाठी देशचे ठाकोर-साहेब होत. यांचें शिक्षण राजकुमार कॉलेजांत झालें. स. १८९५ त हे गादीवर बसले. वयाच्या १६ व्या वर्षी यांच्या रमा नांवाच्या आवडत्या बायकोच्या दासींमध्यें शोभना नांवाची एक ६-७ वर्षांची दासी होती. तिनें ह्यांचें मन आकर्षून घेतलें. पुढें ती वयांत आल्यावर तिचें एक लग्न यांनीं लावून दिलें असतांनाहि तिच्यावरील प्रथमच्या प्रेमपाशांत सांपडून जनापवादास न भितां यांनीं तिच्याशीं लग्न केलें ( १८९८ ). तिचेंहि

आपल्या नवऱ्यावर प्रेम नव्हतें. 'हृदय-त्रिपुटी' नांवाच्या आपल्या काव्यांत यांनीं हिचा व रमेचा संबंध कसा होता हें सांगितलें आहे.

लहानपणापासून इंग्लिश, संस्कृत, उर्दू व गुजराथी वाङ्मयाचा यांनीं अभ्यास चालू ठेवला होता. यांच्या मनाचा कल विशेषतः काव्य व तत्त्वज्ञान ह्यांकडे विशेष असे. संस्थानी कारस्थानांच्या त्रासामुळें हे त्यापासून अलिप्त असत. विद्वानांच्या सहवासाची यांना विशेष आवड असे. पुढील वयांत यांना संसाराचा अत्यंत वीट आला. यांच्या प्रणय-कवितांना 'प्रणयगीता' असें एका ग्रंथकारानें म्हटलें आहे. ह्या कविता उर्दू कवींच्या गझल वृत्तांत असून उर्दू कवितांच्या प्रेमगीतांची छटा त्यांत दिसते. उर्दू शर्फा कवीच्या कवितांचें यांनी भाषांतर केलें आहे व तें बरें साधलें आहे. यांचें 'कमलिनी' हें काव्य शेलेच्या 'मेघ' या कवितेच्या धर्तीवर आहे. यांचें काश्मीर-प्रवासवर्णनपर काव्य उत्कृष्ट झालेलें आहे. त्याचप्रमाणें यांचें 'हमीर' हें ऐतिहासिक प्रसंगावरील काव्य फार सुंदर आहे. ह्यांचीं मिश्र गुजराथींतील काव्यापेक्षां शुद्ध गुजराथींतील काव्यें सरस आहेत. यांचीं प्रेमासंबंधींचीं कडवीं गुजराथी लोकांत म्हणींसारखीं प्रचलित आहेत. निसर्गाशीं यांच्या काव्याचा विशेष संबंध असल्यानें यांना गुजराथचा वर्ड-स्वर्थ असें म्हणतात.

आपनी यादी, शिकारिनी, ग्राम्य माता, अस्वस्थ गृहिणी, बिल्वमंगल इत्यादि यांच्या कविता फार प्रसिद्ध आहेत.

**गोळे, महादेव शिवराम**—(जन्म स. १८५८ फेब्रु.–मृत्यु स. १९०७ डिसें.) मराठी भाषेंतील विचार-वन्त ग्रंथकार. (वरील जन्म-मृत्यूचे सन मराठी ग्रंथसूचींत १८५९-१९०६ असे दिले आहेत.)

यांचा जन्म सातारा जिल्ह्यांतील मर्ढे येथें झाला. यांचे वडील हे सहा-सात वर्षांचे असतांना वारले. यांचा व यांचे धाकटे बंधु गोपाळराव यांचा सांभाळ आईनें केला. यांचे आईचे वडील कृष्णंभट गोखले हे अतिशय भाविक असे हरिभक्त होते. यांनीं पुण्यांत शनि-वार पेठेंत गोवर्धनेश्वराचें देऊळ बांधलें. गोखल्यांच्याकडे हे प्रथम आईबरोबर आले आणि तेथें यांचें पुढील शिक्षण झालें. इंग्रजी सहावीपर्यंत खासगी तऱ्हेनें अभ्यास करून हे हायस्कूलमध्यें दाखल झाले. मॅट्रिक (१८७७), सायन्स हा ऐच्छिक विषय घेऊन हे बी. ए. व एम्. ए. झाले (१८८३), व लागलीच डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सभासद बनले. प्रथम हे शाळेचे सुपरिंटेंडेंट म्हणून काम करीत होते. पुढें आगरकरांच्या मृत्यूनंतर हे फर्ग्युसन कॉलेजचे प्रिन्सिपल झाले (१८९५). १९०२ मध्यें हे सेवानिवृत्त होऊन आपल्या शेतीच्या गांवीं जाऊन राहिले.

यांचे कुटुंबाचा मृत्यु, वडील चिरंजीवाचें अकाली निधन, शेतींतील नुकसान वगैरेमुळें हे थकत चालले. अखेर दम्याचा विकार फारच बळावला तेव्हां हे नाशिक येथें येऊन राहिले व तेथें यांचा अंत झाला.

यांचे 'ब्राह्मण आणि त्यांची विद्या' आणि 'हिंदु-धर्म आणि सुधारणा' हे दोन ग्रंथ भाषा व विचार या दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचे आहेत. समाजशास्त्रदृष्ट्या हिंदुधर्माची चिकित्सा करून त्या धर्माचें रहस्य प्रगट करण्याचा मान यांना दिला पाहिजे. प्रायः जुन्या आचारविचारांचें समर्थन करण्याकडे यांचा कल असला तरी त्यांतील विवेचन अत्यंत खोल व मार्मिक आहे यांत शंका नाहीं. यांची भाषा तर फारच मनोहर, साधी, सरळ, पोक्त व स्वाभाविक असून अत्यंत प्रवाही आहे. क्लिष्ट सामाजिक विषय यांनीं एखाद्या कादंबरी-सारखा रसाळ बनविला आहे. यांचे हे ग्रंथ मराठी भाषेचे अविनाशी अलंकार होत.

यांचें वाङ्मयः—१ शाळेचा अभिमान (१८९४), २ कुळाचा अभिमान, ३ संस्कृत कोर्सेस, ४ अमरसार (संस्कृत-मराठी, संस्कृत-इंग्रजी, इंग्रजी-संस्कृत कोश १८८३), ५ ब्युबानिक प्लेग व त्यासंबंधीं लोकांची कर्तव्यें (१८९७), ६ हवा (१८९१), ७ ब्राह्मण आणि त्यांची विद्या (१८९५), ८ हिंदुधर्म आणि सुधारणा (पहिली आवृत्ति १८९८, दुसरी आवृत्ति १९२७).

**गोंदवलेकर महाराज**—(जन्म स. १८४४–मृत्यु स. १९१३)

एक सत्पुरुष. आजा लिंगोपंत, पिता रावजी व माता गीताबाई. हे सातारा जिल्ह्यांतील दहीवडीचे शुक्ल यजुर्वेदी ब्राह्मण. यांचें पाळण्यांतील नांव गणपति. घरांत पंढरीची वारी कित्येक पिढ्यांपासून होती.

अवूच्या पहाडांतील योग्यापाशी योगाभ्यास केला. वऱ्हाडांत गेले असतां श्रीतुकाराममहाराज येळीवकर यांना गुरु केलें. हे रामदासी परंपरेंतील होते. यांची परंपरा कल्याणस्वामींकडून आली होती.

दक्षिणोत्तर सर्व तीर्थयात्रा केल्या. काशीची कावड रामेश्वरास अनेकवार घातली. मथुरावृंदावन, अयोध्या वगैरे करून नेपाळांत गेले. नैमिषारण्याच्या एकान्तांत कांहीं काळ वस्ती केली. उज्जयिनीच्या बाहेर वनांत १२ वर्षे घोर तपश्चर्या केली. इंदूरलाहि थोडा वेळ राहिले. तिकडे कांहीं अद्भुत चमत्कार केले. नंतर गोंदवल्यास आले. मातोश्रींना घेऊन पुनः एकदां तीर्थयात्रा केल्या.

यांनीं रामदासी संप्रदायाचा व रामभक्तीचा प्रसार फार मोठ्या प्रमाणावर केला. गोंदवलें, पंढरपूर, सोलापूर, हर्दा, वऱ्हाड, आटपाडी इत्यादि ठिकाणीं यांनीं राममंदिरें बांधलीं व हजारों लोकांस रामनामाचा छंद लावला. यांचे हजारों शिष्य आहेत. यांना रामदासस्वामींचा दुसरा अवतार म्हणतात. नामप्रीति, दक्षता, शिस्त, टापटीप, व्यवहारचातुर्य इत्यादि गुण यांच्यांत होते. यांचे शिष्य जालना येथील अनंतसागर हे महान् सत्पुरुष होते. ब्रह्मानंद ( अनंतशास्त्री ) व श्रीशंकराचार्य ( डॉ. कुर्तकोटी ) हीं शास्त्रज्ञ पंडित माणसें यांच्या प्रमुख शिष्यांत मोडतात. कर्नाटकांत तमण्णाशास्त्री ऊर्फ सच्चिदानंद यांनीं महाराजांवर कवनें करून यांचा संप्रदाय व कीर्ति वाढविली आहे.

यांनीं परमार्थाप्रमाणें प्रपंचहि व्यवस्थित केला. स्नानसंध्या, पंचमहायज्ञ, अतिथिसत्कार, अन्नदान व नामसंकीर्तन यांमुळें यांचें घर राममंदिरासारखें सर्वकाळ पवित्र वाटे. श्रीसमर्थांच्या उपदेशाप्रमाणें यांचें वर्तन होतें. हे कुळधर्मकुलाचार यथास्थित चालवीत. नित्य सकाळीं एकनाथी भागवत, दासबोध यांचें निरूपण स्वतः करीत. यांचें सायंकाळचें भजन फार प्रेमळ असे. यांचा नामस्मरणाचा मुख्य उपदेश असे. हे नामस्मरणांत तल्लीन होत. गाईवर व ब्राह्मणांवर यांची निष्ठा मोठी होती.

महाराजांचें कवित्व व पत्रव्यवहारहि उपलब्ध आहेत. यांचें एक चरित्र सोलापूरचे घुगरदरे मास्तर यांनीं छापलें आहे. त्र्यं. ना. देशपांडे शिवापूर, पुणें यांनीं यांच्या 'तोंडचीं गद्यपद्यरूप वचनें' एकत्र काढलीं असून तीं क्रमशः 'मुमुक्षु' मासिकांत प्रसिद्ध झालीं आहेत. ( ल. रा. पांगारकर-संत-चरित्रमाला ).

**गौड, रामदास ललिताप्रसाद**—( जन्म स. १८८१ ) हिन्दी व उर्दू भाषेंतील कवि, लेखक व सार्वजनिक कार्यकर्ते.

यांचा जन्म जौनपूर येथें झाला. जात कायस्थ. हल्लीं हे काशीस राहतात. आपल्या वडिलांकडून यांनीं फारसी, गणित व इंग्रजीचें शिक्षण घेतलें. यांची आई व आजी नित्य नियमानें श्रीतुळशीदासाचें रामचरितमानस वाचीत असल्यामुळें बालवयांतच यांना त्याबद्दल प्रेम उत्पन्न झालें. पुढें वयाच्या १० व्या वर्षी यांनीं एक पांच-सहाशें छन्दांनीं युक्त असें रामायण लिहिलें. त्यानंतर यांनीं 'स्वप्नादर्श'ची रचना केली.

वयाच्या १५ व्या वर्षी जौनपूर हायस्कूलमधून हे प्रवेशपरीक्षा पास झाले. नंतर ७ वर्षांनीं सेंट्रल कॉलेजमधून हे बी. ए. झाले. स. १९०४ ते ६ पर्यन्त हे कायस्थपाठशाळेंत रसायनशास्त्राचे प्रोफेसर व स. १९०४ ते १९१८ पर्यंत सेंट्रल कॉलेजांत रसायनशास्त्राचे डेमॉन्स्ट्रेटर होते. मध्यंतरीं स. १९०८ मध्यें हे रसायनशास्त्र घेऊन एम्. ए. झाले. पुढें स. १९१८ मध्यें बनारस हिंदु विश्वविद्यालयाच्या प्राच्य विभागांत ते रसायनशास्त्राचे प्रोफेसर व सेनेट व कला, शास्त्र व प्राच्यविद्याशास्त्री मंडळाचे सदस्य होते. स. १९२०-२१ च्या असहयोग चळवळींत यांनीं ही नोकरी सोडून मिर्झापूरच्या राष्ट्रीय विद्यालयांत काम करूं लागले. १३ डिसेंबर १९२१ रोजीं प्रांतिक कॉंग्रेस कमिटीच्या ५५ सभासदांबरोबर यांनाहि अटक होऊन १॥ वर्ष कारावासाची शिक्षा झाली. परंतु पुढें स. १९२३ त सरकारनें सर्वांच्या बरोबर यांनाहि सोडून दिलें. तेव्हांपासून हे काशीस राहतात. हे ज्ञानपरिषदेचे ऑनररी फेलो व हिन्दी साहित्य-संमेलनाचे सभासद आहेत.

वयाच्या १८-२० वर्षाचे वेळीं छत्तीसगडच्या 'मित्र' या पत्रांत यांच्या 'रस' या टोपण नांवानें कविता येत असत. हल्लीं त्यांनीं 'रघुपति' हें नांव धारण केलें आहे. बी. ए. झाल्यानंतर स. १९०५ पर्यन्त यांनीं हिन्दी ग्रंथांची एक सूची इंग्रजींत तयार करून तींत ग्रंथांचा निर्माणकाल, कवींचें संक्षिप्त वृत्त वगैरे गोष्टी अनेक ग्रंथ व रिपोर्टांचे आधारें संकलित केल्या होत्या.

कायस्थपाठशाळेंत असतांना यांनीं 'गौड हितकारी' नामक उर्दू पत्राचें संपादन केलें. यांच्या या कामगिरीमुळें गौड कायस्थांच्या इतिहासाची माहिती उजेडांत आली व तीवरून यांनीं पुढें 'तजकिरये सुचारवंशी' नामक गौड कायस्थांचा इतिहास लिहिला.

मानसिक, सामाजिक, धार्मिक वगैरेबद्दलचा संकुचित-

पणा नष्ट करण्यासाठीं यांनीं प्रयाग येथें 'विज्ञान-परिषद' स्थापून व्याख्यानें व पुस्तकांच्या द्वारें शास्त्रीय ज्ञानाच्या प्रसारास सुरुवात केली. यासाठीं स. १९१५ त यांनीं 'विज्ञान' मासिकहि सुरू केलें. त्यांतील भुनगा पुराण, वायुमण्डलपर विजय, वैज्ञानिक अद्वैतवाद, रसायन, विज्ञानसूत्र इत्यादि लेख विद्वत्तापूर्ण आहेत. यांचे शेंकडों लेख 'अब्दुल्लाह' नांवानेंहि निघालेले आहेत. राष्ट्रीय विद्यालयासाठीं यांनीं ७ पोथ्या हिन्दी-मध्यें लिहिल्या.

उर्दू, इंग्रजी, फारसी, संस्कृत या भाषांचे हे विद्वान् आहेत. याशिवाय बंगाली, गुजराथी, मराठी व प्राकृत भाषांचेंहि यांना यथोचित ज्ञान आहे. यांचें वक्तृत्वहि परिणामकारक असतें. पूर्वी हे चिकित्सक शास्त्रज्ञ होते; अलीकडे हे भाविक भगत बनले आहेत (क. कौ. २, ३५२-५५).

**ग्रिफिथ, राल्फ टॉमस हॉचकिन**—(जन्म स. १८२६-मृत्यु स. १९०६) वेद व पुराणग्रंथ यांचे सुप्रसिद्ध अभ्यासक व अनुवादक.

विल्टशायर परगण्यांतील कोर्सली हें गांव यांचें जन्मस्थान. वेस्टमिन्स्टर स्कूल व ऑक्सफर्डचें क्वीन्स कॉलेज येथें आपलें शिक्षण संपवून हे एम्. ए. झाले (१८४७). विश्वविद्यालयांत अध्ययनाचे कालांतच सुप्रसिद्ध संस्कृत-भाषाभ्यासी विल्सन यांचे सहवासामुळें संस्कृत भाषाध्ययनाची यांना आवड उत्पन्न झाली, काशीच्या क्वीन्स कॉलेजमध्यें इंग्लिश वाङ्मयाचे प्राध्यापक म्हणून नेमणूक होऊन हे हिंदुस्थानांत आले. 'Specimens of Old Indian Poetry' या रामायणमहाभारताच्या कांहीं भागाच्या अनुवादानें संस्कृत वाङ्मयाशीं असणारा आपला संबंध प्रगट केला (१८५३).

इंग्लिशचे प्राध्यापक, प्रिन्सिपल व शेवटीं 'डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन' अशा क्रमानें हे चढत गेले. आणि १८८५ त निवृत्त झाल्याबरोबर निलगिरीमधील कोटगिरींत यांनीं आपलें उर्वरित आयुष्य संस्कृत ग्रंथांचे सान्निध्यांत व्यतीत केलें.

याच ठिकाणीं वेदांचा छंदोबद्ध अनुवाद करण्याच्या यांच्या अनेक वर्षांच्या कल्पनांना मूर्त स्वरूप मिळण्याचा योग आला. The Hymns of the Rig-veda, The Hymns of the Sam Veda, The Hymns of the Yajur Veda, The Hymns of the Atharwa Veda अशा क्रमानें यांचीं ऋक्, यजुस्, साम, अथर्व या चार वेदांचीं भाषांतरें लवकरच प्रसिद्ध झालीं. (१८८९-९७). The Birth of the War-God (१८५३), Idylls from the Sanskrit (१८६६), The Ramayana of Walmiki (१८७०-७५) हे यांचे इतर अनुवादित ग्रंथहि प्रसिद्ध आहेत.

'पंडित' या संस्कृत पत्राचे हे संस्थापक व बरींच वर्षे संपादक होते.

केवळ भाराभर भाषांतरें करणारे अशी यांची प्रसिद्धि कधींच नव्हती. वेदांतील मूळ वातावरण, कल्पना व धाटणी या गोष्टी तंतोतंत आपल्या अनुवादांत उतरविण्यास यांच्या काव्यगुणापेक्षां यांचें संस्कृतचें ज्ञानच अधिक उपयोगी पडलें. आपल्याकडील मल्लिनाथादि टीकाकारांचें अनुकरण व पाश्चात्य टिपणीपद्धतीचा अवलंब अशा दुहेरी दृष्टिकोनांतून यांचीं भाषांतरें निघालेलीं आहेत. त्यामुळें यांच्या भाषांतराच्या तंतोतंत खरेपणाबद्दल कधीं कधीं वाद उत्पन्न होतो; परंतु सर्वसाधारण वाचकाला वेदांची मूळकल्पना समजावून घेण्यास यांच्याइतके रसाळ व वाचनीय अनुवाद दुसरे नाहींत.

यामुळेंच पूर्ण पाश्चिमात्य ज्ञानानें युक्त असलेला पौर्वात्य विद्याभ्यासक अशी यांची भूमिका कधींच नसूनहि प्रमुख प्राच्यविद्यासंशोधकांत एक निश्चित स्थान यांना मिळालें आहे.

**ग्रियर्सन, सर जॉर्ज अब्राहम**—(जन्म स. १८५१ जाने ७-मृत्यु स. १९४१ मार्च ८) हिंदुस्थानांतील भाषाशास्त्राच्या अभ्यासाचे जनक, पुरातत्त्ववेत्ते व सरकारी अधिकारी.

हे जुन्या सरकारी नोकरांपैकीं असून त्यांचे स्कॉलर्शिप व भरपूर मेहेनत हें वैशिष्ट्य होतें. वयाच्या २३ व्या वर्षी हे सिव्हिल सर्व्हंट म्हणून नोकरींत दाखल झाले; त्या वेळेपासूनच हे आपला फुरसतीचा वेळ हिंदुस्थानांतील असंख्य भाषा व लिप्या यांच्या अभ्यासांत घालवूं लागले. यांनीं आपला कालिदासावरील पहिला निबंध १८७७ मध्यें प्रसिद्ध केला. तेव्हांपासून अखेरपर्यंत यांचा व्यासंग सतत चालू होता. १९३६ सालीं यांचा ८५ वा वाढदिवस साजरा करण्यांत आला. त्या वेळीं यांना 'व्हाल्यूम ऑफ इंडियन अँड इराणियन स्टडीज' हा ग्रंथ अर्पण करण्यांत आला. त्या ग्रंथांत हिंदुस्थानांत ६० वर्षेंपर्यंत यांनीं केलेल्या भाषाशास्त्रविषयक अभ्यासाचा अत्यंत गौरवपूर्वक उल्लेख करण्यांत आला आहे. त्याच

ग्रंथांत २० पानें यांच्या लिखाणाच्या सूचीनें व्यापलेलीं पाहून यांच्या लिखणाचा व्याप ध्यानांत येतो. तसेंच हिंदुस्थानांतील २०० पेक्षां अधिक लिप्यांवर असलेलें यांचें प्रभुत्वहि समजून येतें. अनेक लिप्यांप्रमाणें अनेक भाषाहि यांना येत असल्या तरी हिंदुस्थानांतील वायव्य भागाच्या भाषेवर यांचें विशेष प्रभुत्व होतें. यांनीं त्यांपैकीं कित्येक ज्ञात व अज्ञात भाषांचीं व्याकरणें लिहिलीं. तसेंच मध्ययुगीन व अर्वाचीन इन्डो-आर्यन ग्रंथांचीं भाषान्तरें केलीं.

यांनीं 'लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया' या ग्रंथाचे २० खंड प्रसिद्ध करून हिंदुस्थानांतील भाषांच्या अभ्यासकांना पूर्वपरंपरा तर प्रगट करून दाखविलीच, शिवाय त्या त्या भाषेंतील अनेक उतारे देऊन नवीन अभ्यासकांना सांगाडा निर्माण करून देऊन त्यांच्या घटनेचा अभ्यास करून, त्यांची वर्गवारी करण्याचा प्रयत्न केला. यांच्या या कार्यामुळें हिन्दी विश्वविद्यालयांचें भाषाशास्त्राच्या शास्त्रीय अभ्यासाकडे लक्ष ओढलें गेलें. यापुढें प्रत्येक संशोधकावर यांच्या या कार्याची छाप पडणें अपरिहार्य होऊन बसलें आहे.

यांचा हा प्रचंड प्रयत्न भाषाशास्त्रांतील नवीन शोधास जन्म देणारा असल्यानें यांच्या उत्तर आयुष्यांत यांच्यावर जगांतील सर्व भागांतून पदव्या व मान यांचा वर्षाव झाला. बंगालच्या व मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीच्या शाखेचे हे ऑननरी फेलो होते. नागरी प्रचारिणीसभा ( काशी ), बिहार अँन्ड ओरिसा रिसर्च सोसायटी, दि मॉडर्न लँग्वेज असोसिएशन, लिंग्विस्टिक सोसायटी ऑफ इंडिया व बंगीय साहित्य परिषद या संस्थांचे हे ऑनररी सभासद होते. मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीचें कँबेल गोल्ड मेडल व बंगाल रॉयल एशियाटिक सोसायटी सर वुइल्यम जोन्स गोल्डमेडल हीं यांना मिळालीं होतीं.

# घ

**घाटगे, श्रीमंत जयसिंगराव आबासाहेब**—( जन्म स. १८५७ मार्च १२–मृत्यु स. १८८५) कोल्हापूर राज्याचे रीजंट स. १८८२–८५.

कोल्हापूर राज्यापैकीं कागलचे जहागीरदार व छत्रपति शाहूमहाराजांचे जनक. शिवाजीमहाराज स. १८७० सालीं गादीवर आले व त्यांना लवकरच वेड लागलें, तेव्हां यांना स. १८८२ पासून कोल्हापूर संस्थानचे रीजंट नेमण्यांत आलें. यांनीं तो कारभार उत्तम चालविला, तेव्हां ब्रिटिश सरकारकडून यांना नऊ तोफांची सलामी मिळाली.

यांची माता कोल्हापूरच्या छत्रपति घराण्यांतील छत्रपति शिवाजी तथा बाबासाहेब महाराज ( स. १८६२–६६ ) यांच्या भगिनी अक्कासाहेब महाराज या होत. यांची पहिली पत्नी मुधोळच्या राजेसाहेबांची एकुलती एक कन्या होय. या उभयतांपासून झालेले यशवंतराव यांना दत्तक देण्यांत आलें ( १८८४ मार्च १८ ) आणि शाहूमहाराज हें नांव धारण करून कोल्हापूरचे छत्रपति म्हणून ते प्रसिद्धीस आले.

**घाटगे, विठ्ठलराव**—( जन्म स. १९२०–मृत्यु स. १९४३ ) दुसऱ्या महायुद्धांत जर्मनीविरुद्ध लढतांना कामी आलेले पण रणांगणावरील पराक्रमाबद्दल सर्वश्रेष्ठ 'व्हिक्टोरिया क्रॉस' मिळविणारे मराठा वीर. यांचा जन्म कुलाबा जिल्ह्यांत झाला.

**घाटे, दत्तात्रेय कोंडो**—( जन्म स. १८७५–मृत्यु स. १८९९ ) सुप्रसिद्ध मराठी कवि. हे 'दत्त कवि' या नांवानें विशेषतः लोकांच्या परिचयाचे आहेत.

यांचा जन्म अहमदनगर येथें झाला. हे जातीनें मराठा असणारे गृहस्थ १८९० सालीं मॅट्रिक व १८९८ सालीं बी. ए. झाले. याच वर्षी हे नोकरीच्या हेतूनें बडोद्यास गेले. तेथें यांचा सुप्रसिद्ध राजकवि चंद्रशेखर यांच्याशीं स्नेह जमला. पण तेथें उद्भवलेल्या प्लेगला हे अकालीं बळी पडले.

यांनीं कवितालेखन आठ वर्षे केलें. त्यांपैकीं शेवटल्या साडेचार वर्षांत लिहिलेल्या कविता यांचे पुत्र विठ्ठलराव

यांनीं 'दत्तांची कविता' म्हणून प्रसिद्ध केल्या (१९२२). त्यांत एकंदर ४८ कविता आहेत.

यांची कविता बहुतेक सुबोध व करुण असली तरी तिचें वैशिष्ट्य शिशुगीतांत आहे. मराठी काव्यांतील वत्सलरसाचें जनकत्व यांच्याकडे सोपविण्यांत येतें.

यांच्या कवितांपैकीं 'फुलें विकणारी पोर' व 'एका आसन्नमरण दुष्काळपीडितास' या हृदयद्रावक आहेत. 'निज नीज माझ्या बाळा' हें करुण निद्रागीत उत्कृष्ट आहे. गोविंदाग्रजांच्या 'राजहंसां'तील हृदयंगम पण परिस्थितीशीं विसदृश 'मोत्याचा चारा', 'कौस्तुभ-माळेमधला' अशा कल्पना यांच्या काव्यांत नाहींत. हिंदु विधवेचें यथार्थ चित्र या करुण गीतांत आहे. यांच्या शिशुगीतांपैकीं 'शहाणी बाहुली' हें गीत अप्रतिम आहे ( अ. म. वा. से. २३७ ).

**घाटे, महामहोपाध्याय भटजीशास्त्री कृष्ण-शास्त्री**—( जन्म स. १८७४–मृत्यु स. १९१० ) नाग-पूरचे सुप्रसिद्ध पंडित.

यांचें अध्ययन तळेगांव दशसाहस्र येथें झालें. हे अध्ययनाकरितां नागपुरास आले व तेथें कै. म. म. अंबा-दासशास्त्री यांचे वडील कृष्णशास्त्री यांचेपाशीं व रंगाचार्यां-जवळ क्रमानें अध्ययन केलें. हे न्याय, वेदान्त, ज्योतिष, साहित्य वगैरे अनेक शास्त्रांत निष्णात होते. पण बाणा मात्र वैय्याकरणाचा. हे कट्टे कर्मकांडी होते. यांनीं १८८२ सालीं अग्निहोत्र घेतलें. भोसले सरकारनें यांना जहागीर दिली होती. यांना सरकारनें स. १९०० सालीं महामहो-पाध्याय केलें. यांचें अध्यापनाचें व्रत अखंड चालू असे. प्रो. गोपाळराव गर्दे, महामहोपाध्याय डॉ. केशवरावजी ताम्हन, परिभाषेन्दुशेखराचे भाषान्तरकार रा. ब. नारायणरावजी वाडेगांवकर इत्यादि मंडळी यांच्या शिष्यवर्गांत मोडतात. यांचे पुत्र कै. वैय्याकरणकेसरी बाळशास्त्री हहि नागपूरचे धर्माधिकारी व यांची कीर्ति चालविणारे होते. यांच्या मृत्यूनंतर यांच्या फोटोचें अनावरण म. म. डॉ. ताम्हण यांनीं केलें.

**घाटे, विनायक सखाराम**—( जन्म स. १८८०–मृत्यु स. १९१९ ) संस्कृतचे प्रसिद्ध प्राध्यापक व वेदांचे अभ्यासक.

अल्पवयांत कुटुंबाची जबाबदारी पडल्यामुळें शिष्यवृत्ति व नोकरी करून शिक्षण पूर्ण करावें लागलें. मॅट्रिकच्या परीक्षेंत मुंबई इलाख्यांत हे पहिले आले व संस्कृतमधील प्राविण्यामुळें पहिली जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्ति यांना मिळाली. एम्. ए. मध्येंहि भगवानदास शिष्यवृत्ति यांना मिळाली. पुढें हे सरकारी शिष्यवृत्तीनें युरोपमध्यें जाऊन बी. ए. ( केंम्ब्रिज ) व डी. लिट्. ( पॅरिस ) झाले. डेक्कन कॉलेज, पुणें, व एल्फिन्स्टन कॉलेज, मुंबई येथें यांनीं प्राध्यापकाचें काम केलें. यांना संस्कृत, जर्मन व फ्रेंच या भाषा चांगल्या येत.

यांचे ग्रंथ—१ रत्नावलीवरील टीका, २ ऋग्वेदावरील व्याख्यानें, ३ 'वेदान्त' या विषयावर डी. लिट्.-करितां फ्रेंच भाषेंत लिहिलेला प्रबंध. पुढें त्याचें इंग्रजी भाषेंत भाषान्तर केलें.

**घारपुरे, जगन्नाथ रघुनाथ**—( जन्म स. १८७२ जून ) इंडियन लॉ सोसायटीचे संस्थापक, पुण्याच्या लॉ कालेजचे प्रिंसिपल, कायदेपंडित व हिंदुधर्मशास्त्राचे प्रसिद्ध अभ्यासक.

हे वसिष्ठ गोत्री चित्तपावन ब्राह्मण. मूळ गांव मळण, ता. गुहागर. मराठेशाहींत घाटावर साखरवाडी ( ता. पाटण, जि. सातारा ) येथें वस्ती. पूर्वज दातेगड व गुणवंतगडावर बंदोबस्तास होते. जन्म नागपुरास व शिक्षण इंदुरास होऊन कलकत्ता विश्वविद्यालयाची प्रवेशपरीक्षा दिली ( १८९० ). पुणें, बडोदें व मुंबई येथें कॉलेजशिक्षण होऊन बी. ए. ( १८९५ ) व एल्एल्. बी. ( १९०० ) झाले. मुंबई हायकोर्टांत वकीलीस सुरुवात केली ( १९०१ एप्रिल ). मध्यें कांहीं दिवस मराठा हायस्कूल, मुंबईचे सुपरिंटेंडेंट होते. मुंबई येथें न्यू लॉ क्लास सुरू केला ( १९०३ ). दिवाणबहादूर पद्मनाथ भास्कर शिंगणे व म. गांधी त्या वेळीं यांचे सहकारी होते.

तेव्हांपासूनच हे मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या कार्य-कारिणींत आहेत. हिंदुधर्मशास्त्राचा यथासांग अभ्यास व्हावा म्हणून धर्मशास्त्रग्रंथमाला चालू केली ( १९०९ ), व त्या मालेंत अनेक धर्मशास्त्रविषयक ग्रंथ मूळ व इंग्रजी भाषान्तर यांसह प्रसिद्ध केले.

इंडियन लॉ सोसायटीची स्थापना करून ( ४ मार्च १९२३ ) तिच्यातर्फे पुणें येथें लॉ कॉलेज सुरू केलें ( १९२४ ). हिंदु लॉ कोडिफिकेशन कमेटीचे हे सभासद आहेत.

शिवाय स्त्रियांच्या वाढत्या मागणीनुसार प्रचलित कायद्याची सुधारणा करण्याचा विचार करण्याकरितां नेमलेल्या समितीचे हे सभासद आहेत ( १९३९ ).

याशिवाय हे हिंदु एज्युकेशन फंडाचे १९२२ पासून सेक्रेटरी आहेत. दक्षिणी ब्राह्मण सहकारी संस्थेची (१९१४) व दक्षिणी ब्राह्मण शिक्षणविषयक सहकारी संस्थेची स्थापना यांनीं केली आहे. यांनीं हिंदु धर्मशास्त्राचे मूळ ग्रंथ, त्यांवरील संस्कृत टीका व त्यांचें इंग्रजी भाषान्तर असे अडतीस ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. त्यांपैकीं कांहीं पुढें दिले आहेत—

१ याज्ञवल्क्यस्मृति ( विज्ञानेश्वरकृत मिताक्षरा व तीवरील विश्वेश्वरभट्टाची सुबोधिनी व बाळंभट्टाची लक्ष्मीदेवी या टीकांसह ).

२ स्मृतिचंद्रिका ( देवण्णभट्टकृत ).

३ स्मृतिमुक्ताफलम् ( वैद्यनाथ दीक्षितीयम् १–६ भाग ).

४ दीपकलिका ( याज्ञवल्क्यस्मृतीवरील शूळपाणीची टीका ).

५ द्वादशमयूख ( नीलकंठभट्टकृत ).

इंग्रजी भाषान्तरें—१ व्यवहारमयूख, याज्ञवल्क्यस्मृतीवरील टीका व वीरमित्रोदय, धर्मद्वैतनिर्णय (संस्कृत) वगैरे. इंग्रजी—Rights of Woman Under Hindu Law, ( 2 ) Sapindya Or the Law of Sapindya Relationship, ( 3 ) Sapindya-Popular Treatise, ( 4 ) Smriti-Chandrika.

**घुर्ये, डॉ. गोविंद सदाशिव**—(जन्म स.१८९३) सुप्रसिद्ध मानववंशशास्त्रज्ञ, समाजशास्त्रज्ञ, अभ्यासक व ग्रंथलेखक.

हे मूळचे रत्नागिरी जिल्ह्यांतील मालवणचे राहणारे असून यांचे इंटरपर्यंतचें शिक्षण जुनागड येथें झालें. १९१८ सालीं हे मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजमधून संस्कृत व इंग्लिश घेऊन एम्.ए. पहिल्या वर्गात पास झाले. यांना बी.ए.च्या परीक्षेंत भाऊ दाजी प्राइज व गंगादास रंगिलदास स्कॉलरशिप मिळाली होती. पुढें एल्फिन्स्टन कॉलेजांत हे दक्षिणाफेलो होते. एम्.ए.च्या परीक्षेंत यांना चॅन्सेलर्स मेडल, भगवानदास पुरुषोत्तमदास आणि सर लॉरेन्स जेंकिन्स स्कॉलरशिप्स् मिळाल्या. पुढें यांना स्प्रिंगर रिसर्च स्कॉलरशिप व भगवानदास मूळजी प्राइज मिळालें. स. १९१९ पासून कांहीं काळ हे एल्फिन्स्टन कॉलेजांत संस्कृतचे प्रोफेसर होते. स. १९१९–२० पर्यंत यांनीं युनिव्हर्सिटी स्कूलमध्यें सोशिऑलजीचा अभ्यास केला, व युनिव्हर्सिटीची स्कॉलरशिप मिळाल्यामुळें हे अधिक अभ्यासाकरितां इंग्लंडला गेले. १९२०–२३ मध्यें लंडन येथील स्कूल ऑफ इकॉनॉमिक्स व केंब्रिज येथें अध्ययन केल्यानंतर हे केंब्रिजचे पी. एच्‌डी. झाले. स. १९२३ पूर्वीच्या गव्हर्नमेंट सबॉर्डिनेट सर्व्हिसचा यांनीं राजीनामा दिला. यांना एक वर्ष मुंबई युनिव्हर्सिटीची स्पेशल स्कॉलरशिप मिळाली होती. स. १९२४ पासून मुंबई युनिव्हर्सिटीनें यांची ' रीडर इन सोशिऑलजी ' म्हणून नेमणूक केली. यांचीं कित्येक ग्रंथपरीक्षणें ' सर्व्हंट ऑफ इंडिया,' सोशल सर्व्हिस क्वार्टर्ली, जर्नल ऑफ दि बॉंबे ब्रँच ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी, करंट सायन्स व जर्नल ऑफ दि युनिव्हर्सिटी ऑफ बॉंबे यांत प्रसिद्ध झालीं आहेत. यांशिवाय लंडन, व्हिएन्ना येथील सोशिऑलाजिकल व ' मॅन इन इंडिया ' पत्रांत यांचे लेख प्रसिद्ध झाले आहेत. यांचें संशोधनात्मक लेखन सतत चालू असतें.

यांचें संशोधनात्मक लेखन अगदीं नवें आणि जगांतील त्या शास्त्रावर लिहिलेल्या ग्रंथांचा विचार लक्षांत घेऊन लिहिलेलें असल्यामुळें मौलिक असतें. यांच्या कांहीं लेखांची यादी पुढें दिली आहे.

1. Rent Statistics of the Bombay Labour Office ( Indian Economist, 1925 ), 2. Growth of Population in India and Elsewhere ( Indian Economist, 1925 ), 3. Ethnic Theory of Caste ( Man in India, 1925 ), 4. Civilization and Fecundity ( Man in India, 1925 ), 5. Funerary Movements in India—Two articles ( Man in India, 1926 ), 6. Some Village Studies ( in collaboration with another ) ( Indian Journal of Economics, 1927 ), 7. Working Class Conditions in Bombay ( Indian Journal of Economics, 1931 ), 8. Untouchable Classes and their Assimilation in Hindu Society ( Aryan Path, Feb. 1933 ), 9. Fertility Data of the Indian Census of 1931 ( Bombay University Journal, 1934 ), 10. The Age of Marriage ( Marriage Hygiene, 1935 ), 11. Presidential Address, Section of Anthropology ( Indian Science Congress, 1935 ), 12. A Note on the Indian Potter's Wheel ( Man in India, 1936 ), 13. Marriage and

Widowhood in India ( Marriage Hygiene, ( 1936 ), 14. Account of an Exploratory Tour in certain parts of Sind in search of Pre-historic Culture ( Bombay University Journal, 1936 ), 15. A Note on Cross-Cousin Marriage in Kathiawar ( Bombay University Journal, 1936 ), 16. Disposal of Human Placenta ( Bombay University Journal, 1937 ), 17. A Buddhist Site near Khairpur ( Bombay University Journal, 1937 ), 18. Census Contribution to the Racial Analysis of India ( Quarterly Journal of Mythic Society, 1937 ), 19. The Social Process ( R. R. Kale Memorial Lecture, 1938, G. I. P. E. ), 20. Social Work and Sociology ( Reprinted from the Servant of India, 1938 ), 21. Physical Data from Kathiawar ( Jubilee Number of the Journal of the Bombay Anthropological Society ), 22. Some Problems in Indian Ethnic History ( Presidential Address to the Section of Ethnology and Folk-lore of the 9th All-India Oriental Conference, 1938 ), 23. A Type of Boomerang from Palanpur ( Current Science, 1939 ), 24. Two Old Sites in Kathiawar ( Bombay University Journal, 1939 ), 25. Some Old Sites in Palanpur ( Science and Culture, 1939 ), 26. Sex Habits of a Sample of Middle Class People in Bombay ( Indian Population Problems, 1939 ), 27. Birth Control Practice in Bombay ( Indian Population Problems, 1939 ), 28. Salary and other Conditions of Work of Clerks in Bombay City (Bombay University Journal, 1941 ), 29. Woman and Indian Life of To-morrow ( Bulletin of National Council of Women, Feb. and March 1942), 30. Anthropological Approach to the Study of Indian Sociology ( Science and Culture, April 1942 ), 31. Dual Organization in India ( J. R. A. I., 1923 ), 32. Egyptian Affinities of the Indian Funerary Practices ( Anthropos, 1923 ).

यांचे ग्रंथ—

Caste and Race in India ( Kegan Paul & Co., 1932), " Aborigines-So-called-and Their Future " ( Gokhale Institute of Economics & Politics, Poona, 1943 ).

**घुले, महामहोपाध्याय कृष्णशास्त्री**—( जन्म स. १८७३ ) नागपूर येथील सुप्रसिद्ध पंडित व संस्कृत आणि मराठी भाषेतील प्रसिद्ध लेखक.

हे म. म. भाऊशास्त्री यांचे चिरंजीव. यांचा विशेष व्यासंग व्याकरण, वेदान्त, मीमांसा, धर्मशास्त्र आणि वैदिक वाङ्मय यांचा आहे. संस्कृत, मराठी, हिंदी, गुजराथी, बंगाली, उर्दू, इंग्रजी आणि फ्रेंच या भाषांशीं यांचा परिचय आहे. यांचा शिष्यवर्ग मोठा आहे. यांचें शिक्षण वडील व म. म. भट्टजीशास्त्री घाटे यांचेजवळ झालें. यांना विद्याभूषण, विद्वन्मणि, वेदान्तकेसरी व महामहोपाध्याय अशा पदव्या आहेत.

यांनीं लिहिलेले निबंध पुष्कळ आहेत. यांच्या पुस्तकांची व प्रसिद्ध झालेल्या प्रमुख निबंधांची यादीः— संस्कृत ग्रंथ–१ पतितोद्धारमीमांसा १८९७, २ विज्ञानशतकावरील टीका, ३ हौत्रध्वान्तदिवाकरः, ४ सापिण्ड्यभास्करः, ५ हरहरीयस्तोत्रम्.

मराठी वैदिक–१ ऋग्वेदाचें मराठी भाषान्तर, पहिलीं ९१ सूक्तें (१९०४), २ भ्रातृव्य आणि सापत्न, ३ दिति आणि अदिति, ४ मित्र व अमित्र, ५ वसिष्ठ व विश्वामित्र, ६ ऋग्वेदांतील सरस्वती नदी.

इतर विषय–१ महादेवाचें मूळ स्वरूप, २ रहस्यसिद्धान्तमंडन, ३ गोत्रप्रवरांचा ऐतिहासिक विचार, ४ भिन्नशाखीय विवाह ( मंडन ) इत्यादि.

विडम्बन काव्यें–१ मोहरमाची पांचवी तारीख, २ माझी कुमारी कविता इत्यादि.

**घुले, महामहोपाध्याय भाऊशास्त्री तथा सीतारामशास्त्री हरिराम**—( जन्म स. १८२८– मृत्यु स. १९२५ ) नागपूरचे सुप्रसिद्ध पंडित.

यांचें घराणें काशीहून नागपुरास आलें. यांचें अध्ययन काशी येथें चुलते चिंतामणशास्त्री, भिकोबा पाठक व नागपूर येथें रंगाचार्य यांचेपाशीं झालें. हे सदाशिवभट्टांचे

नातू. हे व्याकरण व मंत्रशास्त्रांत प्रवीण होते. यांचा वंशवेल—गंगारामभट्ट–भैरवभट्ट–अनंतभट्ट ( महाभारत टीका–दुर्बोधचंद्रिकाकर्ते )–धुंडिराजभट्ट ( यांचें घराणें मथुरेंत आहे. यांनीं सप्तशतीवर दंशोद्धार नांवाची टीका केली ), बाळकृष्णभट्ट ( अनंतभट्टाचे दुसरे पुत्र )– आत्मारामभट्ट–गोविंदभट्ट–रामकृष्ण ( मलमासटिप्पणी व नामस्मरण मीमांसाकर्ते )–सदाशिवभट्ट ( वैय्याकरण-केसरी ), हरिराम–भाऊशास्त्री तथा सीताराम–कृष्णशास्त्री ( हयात ).

यांनीं शेखरविवृतिसंग्रह ( शब्देन्दुशेखरटीका ) व णेरणौ (पा. सू. १. ३. ६७) सूत्रावर गजसूत्रवृत्ति नांवाची टीका लिहिली.

हे १९१८ सालीं महामहोपाध्याय झाले. हे वयाच्या ९८ व्या वर्षी वारले. हे संस्कृतांत कविता सहज करीत. यांच्या घराण्यांतील पूर्वजांना काशी येथें व्यास व अश्वत्थामा यांचें साक्षात् दर्शन झालें होतें अशी काशीस आख्यायिका आहे.

**घुले, सदाशिवभट्ट रामकृष्णभट्ट**—( जन्म स. १७७९–मृत्यु स. १८५४ ) सुप्रसिद्ध वैय्याकरण व पंडित.

पुण्याकडे नागोजीभट्टांची परंपरा नीळकंठशास्त्री थत्ते यांनीं आणली त्याप्रमाणें यांनीं ती परंपरा नागपूर येथें आणली. यांनीं बालसरस्वती रानडे यांच्या गुरूंचे गुरू काशीनाथशास्त्री अष्टपुत्रे यांचा वादांत पराभव केला होता असें म्हणतात. हे नागपूर येथें आल्यानंतर अंध झाले. यांचे शिष्य रंगाचार्य ( मृत्यु स. १८८५ सुमार ). यांचे ग्रंथ—१ शब्देन्दुशेखरा-वरील टीका सदाशिवभट्टी, २ पतितोद्धार-मीमांसा.

यांनीं व्याकरणशास्त्रावरील वादांत जय मिळविल्यानें यांना अमृतराव पेशव्यांनीं वैय्याकरणकेसरी ही पदवी दिली होती ( नीरजोल्लास, डिसें. १८९२ ).

**घोले, डॉ. विश्राम रामजी**—( जन्म स. १८३३ एप्रिल १४–मृत्यु स. १९०० सप्टें. १० ) शस्त्रक्रिया करणारे पुण्यांतील सुप्रसिद्ध डॉक्टर व सार्वजनिक कार्यकर्ते.

यांचें घराणें मराठेशाहीपासूनच लष्करी पेशाचें होतें. अंजनवेलचा गोपाळगड यांच्या पूर्वजांच्या गोपाळ या नांवानें प्रसिद्ध आहे. गोपाळ–संभाजी–रामजी–विश्राम असा यांचा वंश आहे.

यांच्या पित्याचें नांव रामजी संभाजी घोले. हे चवदाव्या पलटणींतील जमादार होते. हे मूळचे चिपळूणचे राहणारे. जातीनें यादव कुळांतील गोपाळ म्हणजे गौळी. यांचा जन्म वेंगुर्लें येथें झाला. त्या वेळीं यांचे वडील आपल्या पलटणीसह वेंगुर्लें येथें होते. त्यांची बदली सिंध प्रान्तांत झाल्यावर हे आपल्या आजोळीं टिटवें ( जि. ठाणें, निजामपूर प्रान्त ) येथें राहिले. वयाच्या सोळाव्या वर्षानन्तर हे दापोलीस आपल्या मामाकडे गेले. ते तेथें पेन्शनर सुभेदार होते. तेथें हे मराठी शाळेंत जाऊं लागले. पुढें यांच्या वडिलांची पलटण पुण्यास आली तेव्हां हे पुण्यास आले व तेथें रे. मिचेल यांच्या इंग्रजी शाळेंत यांचें इंग्रजी शिक्षण सुरू झालें. तेथें यांचे सहाध्यायी भिकाजी अमृत चौभे होते. वडिलांची बदली मुंबईस झाल्यावर हे तेथील मनीस्कूलमध्यें सहा महिने इंग्रजी शिकले व पांच रुपये दरमहावर सेकंड ग्रेड अप्रेंटिस म्हणून नोकरीस लागले ( १८५२ मे १८ ).

ठाणें सिव्हिल इस्पितळ, चौदावी पायदळ पलटण कराची, सातवी पायदळ पलटण, बाटलीवाला इस्पितळ मुंबई अशा क्रमानें चढत जाऊन स्टूडंट अप्रेंटिस म्हणून यांना मुंबईच्या ग्रँट मेडिकल कॉलेजांत अभ्यास करण्याची परवानगी मिळाली. तेथून हॉस्पिटल असि-स्टंटची परीक्षा उत्तीर्ण होऊन प्रथम मुंबई व नंतर पुणें येथें जनरल ड्यूटीवर यांची नेमणूक झाली ( १८५७ जुलै ). अहमदनगर, सोलापूर, ग्वाल्हेरजवळ सिहूर, बुंदेलखंड, राणीपूर ( महुप्रांत ), झांशी, ललितपूर वगैरे ठिकाणीं युरोपियन पलटणींचे डॉक्टर म्हणून हे बंडाच्या ऐन वणव्यांत व भोंवतीं गोळी लागून लोक मरत असतां काम करीत होते.

असेंच नोकरीनिमित्त लष्कराबरोबर अनेक ठिकाणीं हिंडून पुढील परीक्षांचा आणखी अभ्यास करण्याकरितां हे मुंबईच्या ग्रँट मेडिकल कॉलेजांत दाखल झाले ( १८६८ नवं. ). उत्तम शस्त्रक्रिया करणारा व्हावें अशी यांची महत्त्वाकांक्षा होती. त्याप्रमाणें एल्. एम्. ची परीक्षा उत्तीर्ण होऊन ( १८६९ सप्टें. २३ ) यांची असिस्टंट सर्जन म्हणून नेमणूक झाली. कुमठा, वसई व पुणें येथें यांची नोकरी झाल्यावर हे सेवानिवृत्त झाले ( १६ एप्रिल १८८९ ). नोकरीच्या अवधींत पुण्याच्या बैरामजी जिजीभाई मेडिकल स्कूलमध्यें हे शस्त्रक्रियाशिक्षकाचें

कामहि कांहीं दिवस करीत असत. यांना प्रथम रावसाहेब ( १८८४ ), नंतर रावबहादूर ( १८८७ ) अशा पदव्या देऊन सरकारनें यांचा गौरव केला. हिंदुस्थानच्या व्हाइसरॉयचे ऑनररी सर्जन व मुंबई युनिव्हर्सिटीचे फेलोहि यांना नेमण्यांत आलें. १८७४-८२ पर्यंत यांनीं पुणें येथें नोकरी करीत असतां ९२३२ शस्त्रक्रिया केल्याचा दाखला उपलब्ध आहे.

हे पुणें नगरपालिकेंत १६ वर्षें सभासद व कमिशनर होते. पुणें नगरपालिकेनें गव्हर्नर लॉर्ड रे यांच्या हस्तें पुणें येथें जी उद्योगशाळा उघडली तिचें श्रेय यांना आहे. त्याबाबत यांचे सहकारी माधवराव कुंटे होते. खडकवासल्याचें पाणी पुण्याला पुरविण्याची योजनाहि यांचीच होय.

हे एकेश्वरमतवादी असून मूर्तिपूजेच्या विरुद्ध होते; तथापि हे सत्यशोधक नव्हते. यांनीं आपली मयत कन्या व पूज्य वडील यांच्या स्मरणार्थ पुणें बुधवारांत कोतवालचावडीजवळ व दारुवाल्याच्या पुलाजवळ अशीं दोन कारंजीं व हौद बांधले आहेत. त्या वेळीं बापुसाहेब मेहेंदळे यांनीं रोगपरीक्षा व यांनीं शस्त्रक्रिया करावी अशी प्रसिद्धी होती. हे शेवटपर्यंत लोकांच्या उपयोगी पडण्यास अत्यंत तत्पर असत.

यांचे ग्रंथ— १ संसर्गजन्य रोग ( १८६५ ), २ आवर्षण ( १८८१ ), ३ Agricultural Reform in India ( १८८१ ), ४ हवापाणी ( वसंत व्याख्यानमालेंतील तीन व्याख्यानें ).

**घोष, अरविंद**—( जन्म स. १८७२ ऑगस्ट १५ ) विख्यात क्रान्तिकारक, राजकारणी, इंग्रजी भाषेंतील लेखक, कवि, जगविख्यात योगी आणि विशेषतः एका अभिनव तत्त्वज्ञानाचे प्रवर्तक.

यांचे वडील कृष्णधन घोष हे ॲलोपथीचे डॉक्टर होते. यांचें प्राथमिक शिक्षण दार्जिलिंग येथें झाल्यावर वयाच्या सातव्या वर्षी यांना यांच्या दोन बंधूंसह शिक्षणाकरितां इंग्लंडास पाठविण्यांत आलें व तिकडे मँचेस्टर येथें एका मिशनऱ्याच्या घरीं ठेवण्यांत आलें. पुढें लंडनच्या सेंट पॉल स्कूलमध्यें पांच वर्षे अभ्यास केला. तेथें शिष्यवृत्ति मिळवून केम्ब्रिजच्या किंग्ज कॉलेजांत हे गेले आणि भाषाविषयक परीक्षेंत पहिल्या वर्गांत उत्तीर्ण झाले. तेथें यांनीं फ्रेंच भाषेचाहि चांगला अभ्यास केला. आय्. सी. एस्.च्या परीक्षेंत हे ग्रीक व लॅटिन भाषांत गुणानुक्रमें दुसरे आले. पण आवश्यक असणाऱ्या अश्वारोहण परीक्षेंत हे दाखल न झाल्यानें यांची ती परीक्षा हातची गेली. मग हे बडोदा राज्यांतील वरिष्ठ नोकरींत दाखल झाले ( १८९३ ).

तेथें क्रमानें रेव्हेन्यु, नंतर शिक्षण, पुढें बडोदा कॉलेजांत इंग्रजीचे प्राध्यापक व व्हाइस-प्रिन्सिपलचे कामहि यांच्यावर सोंपविण्यांत आलें. तेथें असतां यांचें लक्ष हिन्दवी भाषा, संस्कृति व धर्म यांकडे वेधलें. हे इंग्लंडांतून इकडे आले तेव्हां अन्तर्बाह्य इंग्रज बनले होते. जन्मभाषासुद्धां धड येत नव्हती. पण यांची दृष्टि पालटत चालली. वाचनाबरोबर यांनीं लेखनकार्यहि सुरू केलें. यांच्या इंग्रजी कविता यांच्या कॉलेजच्या मासिकांत प्रसिद्ध होत. यांचें रामायण व भारत यांच्या कांहीं भागांचें भाषान्तर फारच यथातथ्य असल्याची प्रशंसा इंग्रजींत यथार्थ भाषान्तर करणारे म्हणून प्रसिद्ध असलेल्या रमेशचंद्र दत्तांनीं केलेली आहे.

बडोदा सरकारच्या नोकरींत असतां यांना उघडपणें हिंदुस्थानच्या राजकारणांत भाग घेणें शक्य नव्हतें; तथापि यांनीं मुंबईच्या ' इंदुप्रकाश ' दैनिकांत त्या वेळच्या राष्ट्रसभेच्या मवाळ धोरणावर टीका करणारी लेखमाला सुरू केली. स्वातंत्र्याकरितां सरकारला अर्जविनंत्या करण्याच्या भलत्या मार्गापासून परावृत्त होण्याचा त्यांतील उपदेश इतका कणखर पण तर्कशुद्ध असे कीं, शेवटीं यांना आपली लेखमाला बंद करावी लागली.

बडोद्यास असतां यांचा विवाह भूपालचंद्र बसू यांची कन्या मृणालिनी यांच्याशीं झाला. पण ऐहिक आयुष्य सुखांत घालविण्याकडे यांचा ओढा पहिल्यापासूनच नव्हता. यांचा आपल्या पत्नीशीं मधूनमधून झालेला पत्रव्यवहार आतां प्रसिद्ध झाला आहे. त्यांत मातृभूमीला स्वातंत्र्य प्राप्त करून देण्याची, स्वदेशबांधवांना सुस्थितीस नेण्याची व अखेर ईश्वरी साक्षात्कार करून घेण्याची यांची जळजळीत तळमळ दिसून येते.

बडोद्यालाच यांनीं योगाभ्यासास सुरुवात केली. नर्मदा कांठीं ब्रह्मानंद नामक कोणी योगी राहत असत. भेटीस आलेल्या कोणाकडेहि ते कधीं पाहत नसत. पण ते यांच्याकडे यांची ओळख पटूनच कीं काय एकाग्रतेनें पाहत. त्यांच्या एका शिष्याकडून हे प्रथम प्राणायाम शिकले. नंतर श्री. विष्णु भास्कर लेले नांवाच्या

महाराष्ट्रीय योगाभ्यासी गृहस्थाकडूनहि यांनीं १९०८ च्या सुमारास कांहीं मार्गदर्शन घेतलें. समाधीची किल्ली यांनीं त्यांचेपासून समजावून घेतली. इतके दिवस यांना मन एकाग्र करितां येत असे, पण तें विचाररहित मूक करितां येत नसे. श्री. लेले यांनीं यांना तीन दिवसांत ती विद्या शिकविली व यांना ईश्वरी आदेशावर अवलंबण्यास सांगितलें.

बंगालमध्यें नवशिक्षितांत इंग्रजांच्या प्रत्येक गोष्टीला प्रतिक्रिया सुरू झाली होती. त्यांतच वंगभंगामुळें अगदीं अनपेक्षित अशी भर पडली. त्यामुळें बंगाल व सर्व हिंदुस्थानभर भयंकर आंदोलन सुरू झालें. अशा वेळीं यांना बडोद्यांत नोकरी करीत स्वस्थ राहवेना. यांनीं तेथील नोकरी सोडली, हे कलकत्त्यास दाखल झाले ( १९०६ ) आणि राष्ट्रीय शिक्षण देण्याकरितां नवीन निघालेल्या नॅशनल कॉलेजचे उदरंभर वेतनावर प्रिन्सिपल झाले. तेथें असतां यांनीं आपलें सुप्रसिद्ध ' वन्दे मातरम् ' हें साप्ताहिक पत्र सुरू केलें. त्यांतील लेखाबद्दल सरकारनें यांच्यावर राजद्रोहाचा खटला भरला, पण त्यांत हे निर्दोषी ठरले.

यांच्या राजकीय स्वातंत्र्याच्या घोषणेचीं दोन अंगें होतीं. एक पूर्ण स्वातंत्र्य आणि दुसरें आध्यात्मिक राष्ट्रीयत्व. वसाहतीचे स्वराज्यापेक्षां पूर्ण स्वातंत्र्यांतील व्यापक अर्थ स्पष्ट होता. पण यांच्या आध्यात्मिक राष्ट्रीयत्वाची कल्पना लोकांना सहज पटणें अशक्य होतें. आपल्या राष्ट्रीय चळवळीचा नेता ईश्वर असून पाश्चिमात्य संस्कृतीच्या मायापटलाचा भेद-छेद करून सनातन धर्माची प्राणप्रतिष्ठा भूतलावर करणें हें त्या चळवळीचें ध्येय आहे, असें हे प्रतिपादन करीत. मिदनापूरच्या प्रान्तिक अधिवेशनांत हे भेद प्रथम व्यक्त झाले व सुरतेच्या राष्ट्रसभेच्या वेळीं त्यांना तीव्र स्वरूप आलें ( १९०७ ). सुरतेचें अधिवेशन उधळल्यानंतर त्यांतील जहाल लोकांच्या परिषदेचें अध्यक्षस्थान यांनीं घेतलें. तेथून बंगालकडे परततांना यांनीं स्वपक्षाचें समर्थन करणारीं बडोदें, मुंबई, पुणें वगैरे अनेक ठिकाणीं व्याख्यानें दिलीं. हे केवळ कंठघंटारवानें वक्तृत्वाचें प्रदर्शन न करतां शान्तपणें व हलक्या आवाजांत पण तर्कशुद्ध व हृदयस्पर्शी भाषण करणारे वक्ते होते. त्यामुळें यांचें भाषण ऐकण्याकरितां जमलेल्या प्रचंड समुदायांत परमावधीची शान्तता नांदत असे. आधींच ' वन्दे मातरम् 'मधील यांच्या लेखांनीं लोक भारले गेले होते. आतां तर यांचें प्रत्यक्ष दर्शन घडणार व यांच्या तोंडून व्याख्यान ऐकावयास मिळणार म्हणून लोकांच्या मनांत राष्ट्रीयत्वाच्या भावनेला नुसता पूर आला होता. १९०७ च्या खटल्यांतून यांची सुटका झाल्यावर रवीन्द्रनाथ टागोरांनीं ' Aurobindoo, Accept the Salutations of Ravindra ' ही कविता यांना उद्देशून प्रसिद्ध केली.

याच वेळीं बंगालमध्यें राजकीय अत्याचार सुरू झाले. त्यांत यांचे बरेच सहकारी व यांचा भाऊ बरीन्द्र हाहि होता. सरकारला या चळवळीचा हे आत्मा वाटूं लागले. त्यांत यांना एक वर्ष कच्चा तुरुंगवास सोसावा लागला. यामुळें यांच्या जीवनाला निराळें वळण लागून हे गूढवादी महायोगी बनले. तेथें यांना साक्षात्कारहि झाला. तेथें हिंदुधर्मांतील तत्त्वांची सत्यता ईश्वरानें आपणास पटविली आणि त्याचा प्रचार करण्याचें कर्तव्य आपणाकडे सोंपविलें, अशी यांची श्रद्धा झाली.

माणिकतोळा बॉंब कटाच्या खटल्यांत बाबू चित्तरंजन दास यांनीं यांच्या बचावाचें काम केलें. राजकीय स्वातंत्र्याचें ध्येय प्रचलित करणें हा राजकीय गुन्हा नव्हे, या मुद्यावर त्यांनीं विशेष भर दिला. शेवटीं एक वर्षाच्या बंदिवासानंतर हे निर्दोषी सुटले ( १९०९ ).

बाहेर आल्यानंतर राजकीय कार्य विशेषच बिकट झाल्याचें यांना आढळलें. दडपशाहीमुळें यांच्या अनुयायांची पांगापांग झाली होती, यांचा ' वन्दे मातरम् ' छापखाना देखील जप्त झाला होता. तेव्हां यांनीं 'कर्मयोगिन्' हें इंग्रजी व 'धर्म' हें बंगाली साप्ताहिक सुरू केलें, आणि राजकीय प्रश्नाइतक्याच तीव्रतेनें आध्यात्मिक प्रश्नांचीहि चर्चा मोठ्या जोरानें चालू ठेवली. सरकारच्या दडपशाहीच्या धोरणाचा प्रतिकार म्हणून यांनीं स्वदेशी व बहिष्कार या चळवळींना भरपूर पाठिंबा दिला, दक्षिण आफ्रिकेंतील म. गांधींच्या निःशस्त्र प्रतिकारालाहि भरपूर पाठिंबा दिला, आणि त्याचबरोबर गीता, उपनिषदें वगैरे वाङ्मयाचें मंथनहि सुरू ठेवलें.

पण एकीकडे अत्याचारी चळवळीनें जनतेला अगदीं सतावून सोडण्याचें सरकारी धोरण आणि दुसरीकडे आपला द्विविध कार्यक्रम अमलांत न येण्याची परिस्थिति पाहून यांचें मत कच खाऊं लागलें. यांना सरकार हद्दपार करणार अशाहि अफवा ऐकूं येऊं लागल्या. शेवटीं उत्तरपारी येथील भाषणांत 'आमची चळवळ केवळ राजकीय नाहीं, तर ती धार्मिकहि आहे. सनातन धर्माचें पुनरुत्थान याच व्यापक अर्थानें ती चळवळ केली पाहिजे' असा संदेश देऊन हे राजकारणांतून निवृत्त झाले,

प्रथम पाँडेचरी येथें एका मित्रासह जाऊन राहूं लागले (१९१०). पण हें यांचें फ्रेंचांच्या हद्दींतील गमन विशेष संशयास्पद झालें. मात्र यांच्यावर या वेळीं भरलेला तिसरा खटला निष्फळ ठरला.

पाँडेचरीच्या एकान्तांत राहूं लागतांच यांचे आध्यात्मिक क्षेत्राचा इतका विकास झाला कीं, यांना हिंदुस्थानांतील राजकीय कार्याची धुरा वाहण्याचें काम अगदीं कःपदार्थ वाटूं लागलें. तेथें राहूं लागतांच यांच्याभोंवतीं 'योगाश्रम संस्था' जणूं आपोआप येऊन उभी राहिली. यांना पॉल व मिरा रिचर्ड हे दोन युरोपियन सहाध्यायी येऊन मिळाले. तेथें यांनीं सुरू केलेल्या 'आर्य' या इंग्रजी मासिकावर संपादक म्हणून यांच्याबरोबर त्या दोघांचीं पहिल्यापासून नांवें असत (१९१४–२१). नंतर पॉल हे हिंदुस्थान सोडून गेले तरी मिराबाई येथेंच राहिल्या. त्या योगाभ्यासाबरोबर आश्रमाचा विकास व व्यवस्था पाहण्याचें कामहि करीत असतात. तेथें ३०० वर साधकांना राहण्याची व अभ्यासाची सर्व सोय आहे. सर्व जगांतील व नाना व्यवसायांतील साधक स्त्रीपुरुष येथें येतात व अभ्यास करतात. हे त्यांना वर्षांतून एकदां दर्शन देतात. साधकांच्या अभ्यासाची व्यवस्था मिराबाई पाहत असल्यानें यांच्यासुद्धां सर्व लोक त्यांना माता (Mother) म्हणून संबोधतात.

लो. टिळकांनीं मंडालेहून सुटल्यानंतर यांना बोलाविलें असतां यांनीं उत्तर दिलें कीं, "ईश्वर प्रत्येकाला एकवार कार्याची संधि देतो, त्या वेळीं आपण आपलें कर्तव्य पार पाडावें. तो काळ गेला कीं आपण दुसऱ्या माणसाकरितां जागा खालीं करावी."

यांचें तेथील कार्य तत्त्वज्ञ, योगाभ्यासी, कवि, द्रष्टा किंवा जगदुद्धार करणारा महामनस्वी अशा अनेक दृष्टींनीं अत्यंत विचारार्ह आहे. यांची विचारसरणी स्वतंत्र आणि अगदीं नवी आहे. यांच्या या विषयावरील प्रमुख ग्रंथाचें नांव The Life Divine (ईश्वरी जीवित) असून यांनीं कल्पिलेल्या योगमार्गाचें नांव 'Creation of Superman' (अतिमानुष निर्मिति आणि तद्द्वारा मानव जातीचें एकीकरण) आहे. या कार्यसिद्धीची प्रक्रिया म्हणजे 'ईश्वरी संज्ञान जगांत अवतीर्ण करणें.' यांच्या तात्त्विक विचारांचें दिग्दर्शन असें–यांचें ब्रह्म केवळ शान्त नसून गतिमय आहे, यांना मायावाद मान्य नसून लीलावाद मान्य आहे. ब्रह्म हें चैतन्य, आनंद, परमन, मन, जीवात्मा, प्राण व अखेर जड यांत अवतरतें. या पायऱ्यांना हे अनुक्रमें परमात्मा, आत्मा, ईश्वर, पुरुष, मन, जीव, प्राण व जड हीं नांवें देतात. अशाच क्रमानें त्याचा उपसंहार होतो. मनुष्य हा मनःप्रधान असून तो परमात्म्यापर्यंत उत्क्रान्त व्हावयाचा आहे. या उत्क्रान्त होण्याच्या प्रयत्नाला योग असें म्हणतात. पातंजल योगाचें ध्येय दुःखपरिहार, विवेकानंदाच्या राजयोगाचें ध्येय परमानंदाचा अनुभव, तसें यांच्या योगाचें ध्येय जगाला परमात्मरूप करणें असें आहे. म्हणून यांनीं आपल्या योगाचें नांव मनुष्याला परमात्मा बनविणारा–'समन्वययोग' असें ठेविलें आहे.

हे इंग्रजी भाषेंतील उत्कृष्ट कवि आहेत. यांनीं काव्यविषयक अगदीं नव्या कल्पना प्रगट केल्या आहेत. तसेंच ठरीव पद्धतीहून यांनीं कविता अगदीं वेगळ्या पेहरावांत लोकांच्या पुढें आणली आहे. शब्द, वाक्प्रचार आणि छंद हे सर्व यांच्या कवितांत बदललेले आढळतात. ब्रह्मानंदापर्यंत कविप्रतिभा मार्ग काढीत राहील आणि ती शेवटीं ब्रह्मानंदांत रंगेल असें हें काव्याचें ध्येय मानतात. हें ध्येय सन्तकवींच्या ध्येयासारखें आहे. पण सन्तकवींच्या काव्यांत दृश्य जगाबद्दल दिसत असलेली उपेक्षा यांना मान्य नाहीं. कारण यांच्या मतें दृश्य जगांत परमात्मा आविष्कृत होणार असल्यानें जगांतील आनंदस्वरूपांत कलाद्वारां रंगून जाणें हें परमार्थ साधन होय. सन्तकवींनीं फक्त भक्तिरसच आळविला, पण सर्व रस आळवून त्यांच्या द्वारें एकच ब्रह्मानंद प्रतीत करणें हा कलाक्षेत्रांतील यांचा विशेष आहे. 'काव्य' या नांवाची विस्तृत लेखमाला यांनीं आपल्या आर्य मासिकांत प्रसिद्ध केली आहे (१९१८-२०). शिवाय यांनीं ऋग्वेदासारख्या प्रचण्ड महाकाव्याचा आध्यात्मिक पद्धतीचा अर्थ लावून प्रसिद्ध केला. तो अर्थ वाचकांना मोठा कल्पनारम्य होऊन बसला आहे. तसेंच यांचा गीतेवरील ग्रंथ यांच्या अगदीं अभिनव तत्त्वज्ञानाची स्पष्ट कल्पना आणून देण्यास समर्थ आहे. हा अभिनव तत्त्वज्ञानाचा आविष्कारच यांच्या आयुष्याचें सारसर्वस्व म्हणून सांगतां येईल.

यांचें लेखन जितकें प्रचंड तितकेंच सहज समजण्यास कठीण आहे. तथापि यांचें इंग्रजी भाषेवरील प्रभुत्व अवर्णनीय आहे.

यांचे प्रमुख ग्रंथ—

( 1 ) The Life Divine, ( 2 ) Lights on Yoga, ( 3 ) The Riddle of this World, ( 4 ) Yogic Sadhan, ( 5 ) Ahana (कवितासंग्रह), ( 6 ) Love and Death (कविता), (7) The Objects of Yoga, ( 8 ) The Ideal of the Karmayogin, (9) Brain of India, ( 10 ) Renaissance in India, ( 11 ) Self-Determination, ( 12 ) Superman, ( 13 ) Ishopanishad, ( 14 ) Essays On the Gita, ( 15 ) The Mother.

**घोष गिरीशचंद्र**—( जन्म स. १८२९-मृत्यु स. १८६९ ) सुप्रसिद्ध इंग्रजी संपादक व लेखक.

ग्रंथ—रामदुलाल डे (चरित्र) १८६८. वर्तमानपत्रें—दि बंगाल रेकार्डर ( १८४९ ). बेंगाली ( १८६१ ).

**घोष, डॉ. धर्मदास**—( जन्म स. १८९१-मृत्यु स. १९३९ ) परराष्ट्रीय वकील म्हणून काम करणारे पहिले हिन्दी ॲडव्होकेट. स. १९३१ साली त्यांची कलकत्त्यास स्पेनकरितां 'व्हाइस कॉन्सल' म्हणून नेमणूक झाली. हिंदुस्थान सरकारनें ब्रिटिश सरकारच्या परवानगीनें यांना फ्रान्स सरकारच्या अधिकाराखालील स्पेनचे कलकत्त्यांतील 'व्हाइस कॉन्सल' म्हणून मंजुरी दिली. ककिनाच्या राजकन्येशीं यांचा विवाह झाला होता.

हे सच्छील व माणुसकीला धरून वागणारे होते. पुष्कळशा व्यायामविषयक व सामाजिक संस्थांशींहि यांचा संबंध होता. 'कलकत्ता क्लब'चे हे प्रमुख सभासद होते. कलकत्ता बॉय् स्काउट्स संस्थेशीं यांचा स्काउट मास्टर म्हणून संबंध घडून आला. तेथील 'बस्ती बॉइज् कॅम्प'ला यांनीं पुष्कळ मदत केली. आपल्या उज्ज्वलकुमार नामक मृत एकुलत्या एक मुलाचे स्मरणार्थ गरीब मुलांचें संगोपन करणारी एक संस्था सुरू करावी अशी त्यांची इच्छा होती. परंतु ही इच्छा सत्यसृष्टींत येण्यापूर्वीच रक्तदाब वाढून यांचा अंत झाला.

**१. घोष, मनमोहन**—( जन्म स. १८४४-मृत्यु स. १८९६ ) सुप्रसिद्ध कायदेपंडित व राष्ट्रसभेचे पुढारी.

हे डाक्का जिल्ह्यांतील विक्रमपूरच्या पुरातन कायस्थ घराण्यांतील रामलोचन घोषांचे पुत्र. हे राजा राममोहन राय यांच्या स्नेह्यांपैकीं होते. यांचें शिक्षण कृष्णनगर कॉलेजिएट स्कूल व प्रेसिडेन्सी कॉलेज, कलकत्ता, येथें झालें.

यांनीं 'इंडियन मिरर' नांवाचें नियतकालिक सुरू केलें ( १८६१ ). हे इंग्लंडला आय्. सी. एस्. होण्याकरिता गेले. पण ती परीक्षा न देतां बॅरिस्टर होऊन परत आले ( १८६६ ). हे पहिले हिन्दी बॅरिस्टर होत. १८८५ मध्यें हिन्दी प्रश्नावर माहिती देण्याकरितां बंगालचे प्रतिनिधि म्हणून यांना इंग्लंडला धाडण्यांत आलें. राष्ट्रसभेंत न्याय व अंमलबजावणी खात्याची विभागणी करण्याच्या ठरावावर बोलण्यास यांनीं सुरवात केली. कलकत्ता विश्वविद्यालयाचे हे फेलो होते.

स. १८८८ सालीं अलाहाबाद कॉंग्रेस अधिवेशनाशीं यांचा संबंध आला. पब्लिक सर्व्हिसेस संबंधाचा ठराव यांनीं कॉंग्रेसपुढें मांडला. न्याय व अंमलबजावणी खातें या प्रश्नांचा खास अभ्यास यांनीं केला होता. स. १८९५ सालीं पुणें अधिवेशनांत या विषयावरील ठराव यांनीं कॉंग्रेसपुढें मांडला. या खात्याचे एकीकरणावरच हिंदुस्थानांतील ब्रिटिश सत्ता अधिष्ठित झाली आहे, हें मि. जेम्स ह्यांचें गुप्त पत्रक यांनीं या कॉंग्रेसमध्यें बाहेर फोडलें. स. १८९६ च्या कलकत्ता अधिवेशनांत यांच्या मृत्यूबद्दल दुखवट्याचा ठराव पास करण्यांत आला ( राष्ट्रीय सभेचा इतिहास, पा. ११३ ).

**२. घोष, मनमोहन**—( जन्म स. १८६९-मृत्यु स. १९२४ ) इंग्रजी भाषेंत कविता करणारे सुप्रसिद्ध बंगाली कवि.

भागलपूर हें यांचें जन्मस्थान. वयाच्या सातव्या वर्षींच यांना आपले बंधु-श्री. अरविंद घोष-यांचेबरोबर इंग्लंडला पाठविण्यांत आलें. प्रथमतः मॅंचेस्टर गार्डियन स्कूल व नंतर लंडनच्या सेंट पॉल्स स्कूलमध्यें यांना ठेवण्यांत आलें. अशा तऱ्हेनें जवळ जवळ अठरा वर्षांच्या दीर्घ कालावधीनंतर हे ऑक्सफर्डचे पदवीधर होऊन हिंदुस्थानला परतले ( १८९४ ). या कारणानें आपल्या स्वतःच्या देशांतील आचारविचारांशीं व भावनांशीं यांना कधींहि समरस होतां आलें नाहीं. स्वतःच्या मातृभूमींतच एकाद्या वनवाश्याच्या मनःस्थितींत यांनीं आपलें सर्व आयुष्य घालविलें व शेवटपर्यंत परत इंग्लंडला जाण्याचा ध्यास यांना सोडतां आला नाहीं.

हिंदुस्थानांत परत आल्यावर कलकत्त्याच्या प्रेसि-

डेन्सी कॉलेजमध्यें हे इंग्लिशचे प्रोफेसर बनले. ज्ञानाच्या कोणत्याहि शाखेचें काव्यांत रूपान्तर करण्याच्या यांच्या अतुल धाटणीमुळें हे लवकरच अतिशय लोकप्रिय झाले.

परंतु या सर्व कार्यांत यांचें दुःखी मन कधींहि समाधान पावूं शकलें नाहीं. त्यांतच यांना आपल्या पत्नीच्या मृत्यूचा धक्का बसला व हे हृदयविकारानें मृत्युमुखीं पडले.

परंतु यांची सर्व कविता मात्र यांचें नांव अनंतकाळपर्यंत चिरस्थायी करण्याइतकी उच्च दर्जाची आहे. ऑक्सफर्डला असतांनाच यांनीं बिन्यन, स्टिफन फिलिप्स, आर्थर क्रिप्स या आपल्या कविमित्रांचे सहकार्यानें Primavera नांवाचा कवितासंग्रह प्रसिद्ध केला. ऑर्डिंग्टन, सिमॉन्ड्स, ऑस्कर वाइल्ड, अर्नेस्ट डॉन्सन या सुप्रसिद्ध लेखकांच्या मैत्रीचा लाभहि यांना लंडन येथेंच झाला. यानंतर यांनीं Love Songs and Elegies हें आपलें पुस्तक प्रसिद्ध केलें (१८९८) व त्याच्या पुढच्याच वर्षी 'The Garland'मध्यें यांच्या तीन कविता संग्रहीत करण्यांत आल्या.

यांच्या मृत्यूनंतर यांचे कविमित्र लॉरेन्स बिन्यन यांनी यांच्या कांहीं अप्रसिद्ध कविता Songs of Love and Death (१९२६) या नांवाखालीं एकत्रित केल्या. यांचें उरलेलें अप्रसिद्ध साहित्य यांच्या मुलींनीं कलकत्ता युनव्हर्सिटीला देऊन टाकलें.

प्रणय, मृत्यु, निसर्ग यांपैकीं कोणत्याहि विषयांवरील यांची कविता घेतली असतां शास्त्रशुद्धता, प्रमाणबद्धता व दुःखाची एक कारुण्यपूर्ण छटा या गोष्टी त्यांत प्रामुख्यानें आढळून येतात. भावनाप्रवणता हा एक गुण सोडून दिला तर यांच्या सर्व कविता ध्वनि व धाटणी या दोन्हीं दृष्टींनीं पाश्चिमात्य पद्धतीच्या आहेत. हिंदुस्थानांत असतांनासुद्धां यांच्या निसर्गाचे वर्णनांत बीच, ओक, पॉपलर या विलायती वनस्पतींचे उल्लेख येतात. अर्थातच पाश्चात्य विचाराचा आयुष्याच्या महत्त्वाच्या भागांत पडलेल्या छायेचा हा परिणाम होता. इतकें असूनहि यांच्या कवितेंतील अभिजातपणामुळें हिंदी काव्यक्षेत्रांतहि यांचें नांव अमर आहे.

**घोष, मोतीलाल**—(जन्म स. १८४५-मृत्यु स. १९२२ सप्टें. ५) कलकत्त्याची अमृतबझारपत्रिका व इंडियन स्पिरिच्युअल मॅगेझिन यांचे विख्यात संपादक.

खऱ्या संपादकाला आवश्यक असणारे समयसूचकता, हजरजबाबीपणा, निर्भयपणा आणि अन्तःप्रेरणा वगैरे गुण यांच्याजवळ भरपूर होते. इतर लेखकांनीं लिहिलेल्या भाराभर मजकुराचें कार्य यांचें एखादें लहानसें मर्मभेदक वाक्य करूं शकत असे. अन्योक्ति हें तर प्रतिस्पर्ध्याला नामोहरम करणारें यांचें अमोघ शस्त्र होतें.

यांची तीव्र स्मरणशक्ति प्रतिपक्ष्याला चीत करण्याचे वेळीं यांना अचूक उपयोगी पडे. यांच्या तीव्र स्मरणशक्तीला बळी पडलेले यांचे सर्वांत मोठे शत्रु म्हणजे, हिंदुस्थानचे व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन होत. त्यांनीं कलकत्त्यास पदवीदानप्रसंगीं सत्यवक्तेपणा हा पाश्चात्यांचा सर्वांत मोठा सद्गुण म्हणून वर्णिला आणि पौर्वात्य त्या गुणाला पारखे आहेत असें प्रवचन झोडलें. या वेळीं यांनीं तत्काल 'प्रॉब्लेम्स ऑफ दि फार ईस्ट' या त्यांच्या पुस्तकांतील वरील विधानास विसंगत असणारे उतारे प्रसिद्ध केले. ते उतारे चक्क सिद्ध करून देत होते कीं, पाश्चिमात्यांच्या सत्यप्रियतेची तरफदारी करून पौर्वात्यांना खोटें बोलणारे असें उघडउघड म्हणणारे हे गृहस्थहि भरपूर खोटें बोलणारे आहेत. या यांच्या खोटें बोलण्यासंबंधींचे त्यांच्याच ग्रंथांतील उतारे प्रसिद्ध करण्याच्या क्लृप्तीनें त्या वेळीं लोकांची भरपूर करमणूक झाली आणि यांचें सर्वत्र कौतुक झालें. असे नमुनेदार प्रसंग यांच्या संपादकीय आयुष्यांत पुष्कळच घडले.

यांचे बंधु बाबू शिशिरकुमार घोष यांच्यानंतर हे पत्रिकेचे संपादक बनले. हें पत्र प्रथम बंगालींत प्रसिद्ध होत असे. पण व्हर्नाक्युलर प्रेस ॲक्टमधून सुटण्याकरितां तें पंधरा दिवसांत इंग्रजी करण्यांत आलें.

यांच्या पत्रानें उघडकीस आणलेलीं रहस्यें ज्या पक्षासंबंधीं असत त्यांचे मनांतसुद्धां यांच्याबद्दल आदर कमी होत नसे. कारण, यांची लेखनपद्धति वरवर, खेळकर आणि कोणाच्याहि मनाला न बोचणाऱ्या विनोदानें युक्त असे. तसेंच ज्यांच्या विरुद्ध यांनीं लिहिलें असेल, त्यांच्या गुणग्रहणाच्या वेळींहि हे तितकेंच मोकळेपणानें लिहीत.

राज्यघटनेचें पूर्ण ज्ञान, मार्गदर्शन करण्याची पात्रता, हक्काबद्दल जागरूकता आणि राष्ट्रीय हिताच्या ध्रुव ताऱ्याकडे अचल दृष्टि यांमुळेंच वृत्तपत्रकाराचें आयुष्य यशस्वी होतें याचें हे मूर्तिमंत उदाहरण होत. यांचे नातू तुषारकांति घोष.

**घोष, डॉ. राशबिहारी**—( जन्म स. १८४०–मृत्यु स. १९२१ ) बंगालमधील सुप्रसिद्ध कायदेपंडित व कार्यकर्ते.

कलकत्ता युनिव्हर्सिटी व राष्ट्रसभा या दोन संस्थांमध्ये यांचें कार्य विखुरलेलें आहे. हे प्रथम जनतेच्या डोळ्यांसमोर आले ते नामांकित वकील म्हणून. १८६७ त यांनीं आपली वकिली सुरू केली व थोड्याच दिवसांत यांच्या वकिली ज्ञानाबद्दल सर्वत्र वहावा सुरू झाली.

कायद्याचे परीक्षक म्हणून प्रथम कलकत्ता युनिव्हर्सिटीशीं यांचा संबंध आला ( १८७७ ). आणि नंतर फेलो ( १८७९ ), सिंडिकेटचे सभासद ( १८८७ ) या क्रमानें तो दृढ होत गेला. मध्यंतरींच युनिव्हर्सिटीनें ' डॉक्टर ऑफ लॉ ' ही पदवी देऊन यांचेविषयींची आपली कृतज्ञता प्रगट केली. कलकत्ता युनिव्हर्सिटीच्या फॅकल्टि ऑफ लॉचें अध्यक्षस्थानहि यांना देण्यांत आलें होतें ( १८९३–९५ ). कलकत्ता युनिव्हर्सिटीला यांनीं मृत्यूपूर्वी अनेक लाखांची मोठी देणगी दिली.

कॉंग्रेसशीहि यांचा असाच दृढ संबंध असे. कलकत्त्याच्या ( १९०६ ) अधिवेशनाचे स्वागताध्यक्ष, सुरतेच्या मोडलेल्या व नंतर पुन्हां भरलेल्या राष्ट्रसभेचे अध्यक्ष ( १९०७ ) व पुन्हां एकदां मद्रासच्या ( १९०८ ) अधिवेशनाचे अध्यक्ष—असा मान यांना लागोपाठ मिळत गेला. ' जपान व पर्शिया या देशांची होत जाणारी प्रगति पाहिल्यानंतर सरकारच्या भुलथापांवर विसंबून आम्ही आमच्या स्वातंत्र्याचा लढा थांबवणें अशक्य आहे; सुरुवातीला आमचा पराभव होईल, पण त्यामुळें आमच्या हृदयांतील देशप्रीतीची ज्योत विझणार नाहीं,' असा विचारप्रवाह यांनीं त्या अध्यक्षीय भाषणांतून मांडला.

१९१७ त इंग्लंडला गेलेल्या कॉंग्रेस-शिष्टमंडळांतहि यांचा समावेश करण्यांत आला होता. त्याच वर्षी ॲनी बेझंटच्या मुद्यांना विरोध करण्याकरितां ऑ. इं. कॉं. क. व मुस्लिम लीग कौन्सिल यांच्या कलकत्ता येथें भरलेल्या जोड अधिवेशनाचेहि हे अध्यक्ष होते. ' इंडिया ' या सुप्रसिद्ध मासिकाच्या व्यवस्थापकमंडळाचे हे बरींच वर्षे अध्यक्ष होते.

**घोष, लालमोहन**—( जन्म स. १८४९–मृत्यु स. १९०९ ) राष्ट्रसभेचे सुप्रसिद्ध कार्यकर्ते.

हे बॅरिस्टर होऊन हिंदुस्थानांत आले ते पट्टीचे वक्ते म्हणून कीर्ति मिळवूनच ( १८७३ ). आल्याबरोबर यांनीं कलकत्ता येथें वकिली सुरू केली. परंतु थोड्याच दिवसांत प्रथम इंग्लंडमध्यें घेण्यांत येणाऱ्या सिव्हिल सर्व्हिसच्या परीक्षेसंबंधींचा हिंदी दृष्टिकोन समजावून देण्याच्या हेतूनें व नंतर हिंदी मागण्यांना तोंड फोडण्याकरितां यांना इंग्लंडला जावें लागलें ( १८७९, ८० ). या वेळींच यांच्या सुप्रसिद्ध वक्तृत्वाला आंतरराष्ट्रीय स्वरूप प्राप्त झालें. इल्बर्ट बिलाचे विरुद्ध यांनीं तेथें केलेल्या भाषणाची सर्वत्र अत्यंत स्पष्ट शब्दांत वाखाणणी झाली. यानंतर पार्लमेंटमध्यें प्रवेश मिळवण्याच्या हेतूनें यांनीं आणखी एकदां इंग्लंडला गमन केलें. प्रागतिक पक्षातर्फे डेप्टफोर्ड परगण्यातर्फे हे लागोपाठ दोनदां उभे राहिले. परंतु त्यांत यांना यश मिळूं शकलें नाहीं. यानंतर हिंदुस्थानांत आल्यावर यांनीं आपल्या वकिलीच्या धंद्यास पुनः सुरुवात केली. १९०३ सालीं भरलेल्या मद्रास कांग्रेसचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें होतें. हिंदुस्थानांतील गरीब जनतेवर सरकारनें लादलेलें करांचें ओझें व त्याचे दुष्परिणाम हा यांच्या अध्यक्षीय भाषणाचा विषय होता. कॉंग्रेस अधिवेशनामधील अविस्मरणीय अध्यक्षीय भाषणांत यांच्या या व्याख्यानाची गणना होते.

यानंतर मात्र यांनीं पूर्णपणें राजकारणसंन्यास घेऊन आपलें सर्व लक्ष वाङ्मयाकडे केंद्रित करण्याचा प्रयत्न केला. ' मेघनादवध ' या सुप्रसिद्ध बंगाली कवितेचा यांनीं छंदोबद्ध इंग्रजींत केलेला अनुवाद या दृष्टीनें महत्त्वाचा आहे. यांचे बरेचसे लेख यांच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध करण्यांत आले.

**घोष, ज्ञानेन्द्रचन्द्र**—(जन्म स. १८९४) सुप्रसिद्ध रसायनशास्त्रज्ञ व संशोधक.

यांचें शिक्षण कलकत्त्याच्या प्रेसिडेन्सी कॉलेजमध्यें झालें. एम्. एससी. झाल्यावर यांनीं आचार्य रे यांच्या हाताखालीं संशोधनास सुरुवात केली. स. १९१७ सालीं त्यांनीं इंग्लंडास प्रयाण केलें, व स. १९२० सालीं आल्यावर डाक्का विद्यालयांत रसायनाचार्याची जागा पत्करली. अजूनहि ते याच ठिकाणीं असून यांचें संशोधन चालू आहे.

यांचें नांव घेतलें कीं यांचें तीव्र विच्छेद्यावरील कार्य डोळ्यांपुढें उभें राहतें. अरहिनिअसचा दलसिद्धान्त तीव्र विच्छेद्याला लागू पडत नाहीं, या अपवादाचें स्पष्टीकरण करण्याचा प्रयत्न अनेकांनीं केला. पण या प्रश्नाचा

उलगडा नीटपणें करण्याचा पहिला मान यांसच आहे. यांच्या मतें तीव्र विच्छेद्यांचें नेहमींच संपूर्ण विदलन होतें, पण परस्पराकर्षामुळें सर्वच दल सारख्याच सुलभतेनें भ्रमण करूं शकत नाहीं. या विचारांच्या द्वारें यांनीं आपलें एक समीकरण बसाविलें व या समीकरणापासून निघणारे निर्णय व प्रायोगिक अनुभव साधारणतः जुळतात हें दाखविलें. हा सिद्धान्त यांनीं स. १९१८ मध्यें मांडला. यांनीं डॉ. कामण्णा, बसू, पुरकायस्थ इत्यादिकांबरोबर प्रकाशरसायनांतहि संशोधन केलें आहे. इंडियन केमिकल सोसायटीच्या संस्थापकांपैकीं हे एक असून गेलीं अनेक वर्षे 'जर्नल ऑफ इंडियन केमिकल सोसायटी'च्या संपादकाचें काम पाहत आहेत.

---

## च

**चकबस्त, पंडित ब्रजनारायण**—( जन्म स. १८८१– मृत्यु स. १९२५ ) उर्दू भाषेंतील प्रसिद्ध कवि. हे लखनौस वकिली करीत. उर्दू कवितेंत यांनीं नवीनता उत्पन्न केली. देशभक्ति व इतर अनेक विषय यांनीं कवितेंत आणिले. यांची भाषा अत्यंत सफाईदार असे. यांचा स्वतंत्र कवितासंग्रह प्रसिद्ध नसला तरी 'सुबहे वतन' या पुस्तकांत यांच्या पुष्कळ चांगल्या कविता आल्या आहेत ( क. कौ. ४. पा. ५७१ ).

**चट्टोपाध्याय, कमलादेवी**—( जन्म स. १९०३ ) राष्ट्रसभेंतील समाजवादी पक्षाच्या सुप्रसिद्ध कार्यकर्त्या व प्रसिद्ध वक्त्या.

यांचा जन्म मंगलोरच्या सारस्वत ब्राह्मणाच्या घराण्यांत झाला. यांचे वडील सरकारचे बडे अधिकारी होते आणि मातोश्री श्रीमान् व वतनदार घराण्यांतील होत्या. एका कान्व्हेन्टमध्यें यांनीं केम्ब्रिज सीनियरपर्यंत अभ्यास केला. नंतर यांनीं मद्रासच्या क्वीन मेरी कॉलेजांत प्रवेश केला. विवाहामुळे यांना शिक्षण अर्धेच सोडावें लागलें.

पुढें यांचा पुनर्विवाह कवि हरीन्द्रनाथ चट्टोपाध्याय यांच्याशीं झाला. या दक्षिण कानडामधील सारस्वत ब्राह्मण तर ते बंगालमधील विक्रमपूरचे बंगाली ब्राह्मण. पुनर्विवाहालासुद्धां विरोध करणाऱ्या समाजांत अगदीं भिन्नप्रान्तीय विवाहास कोण मान्यता देणार! पण विरोध सहन करण्यांत यांनीं मोठेंच धैर्य दाखविलें. लग्नानंतर यांनीं भारतीय रंगभूमीच्या सुधारणेकरितां आपल्या पतीबरोबर रंगभूमीवर पदार्पण करून अनेक नवीन प्रयोग प्रचारांत आणले.

नंतर समाजशास्त्राचा अभ्यास करण्यास या युरोपमध्यें गेल्या. लंडन विद्यापीठांत यांनीं समाजशास्त्राचा अभ्यास सुरू केला तेव्हां यांचे पति डॉक्टरेटकरितां तेथेंच अभ्यास करीत होते. पण थोड्याच दिवसांत हिंदुस्थानांत गांधींच्या असहकारितेचें युग सुरू झालें; तेव्हां आपला अभ्यास अर्धाच सोडून मायभूमीसाठीं कर्तव्य करण्यास यांनीं इकडे धांव घेतली. तिकडे केलेला रंगभूमीचा अभ्यास इकडे आल्यावर यांना उपयोगी पडला, आणि विविध प्रयोग करून यांनीं आपल्याकडे सर्वांचें लक्ष वेधून घेतलें. यामुळेंच पुण्यास भरणाऱ्या अखिल-भारतीय स्त्रीशिक्षणपरिषदेचें मंत्रिपद यांना देण्यांत आलें, आणि स्त्रियांत चळवळ करण्याच्या कामीं यांनीं त्याचा भरपूर फायदा घेतला. यामुळें लागोपाठ तीन वेळां वरील परिषदेचें मंत्रिपद यांच्याकडे देण्यांत आलें.

यांच्या प्रयत्नसातत्यामुळें आणि नेतृत्वामुळें बर्लिन, जिनेव्हा, प्राग व एल्सिनोर येथील आन्तरराष्ट्रीय परिषदांसाठीं हिन्दी प्रतिनिधि म्हणून यांची निवड झाली होती. लेखन, वक्तृत्व यांतील तडफदारपणा, विचाराची उदारता आणि स्वतंत्रवृत्ति हें यांचें वैशिष्ट्य आहे. शेवटीं कवि हरीन्द्रनाथ चट्टोपाध्याय यांच्याकडून यांनीं काडीमोड करून घेतली आहे.

**चट्टोपाध्याय, हरींद्रनाथ**—(जन्म स. १८९८). इंग्रजी भाषेंतील सुप्रसिद्ध कवि, नाटककार व रेडिओ कलावंत.

हैदराबाद येथें आपलें प्राथमिक शिक्षण घेतल्यानंतर यांनीं नाटकें लिहिण्यास सुरवात केली. परंतु थोड्याच

दिवसांत नाटकावरील यांचें लक्ष उडून योगमार्गाकडे हे वळले व अरविंद घोष यांच्या पॉंडेचरीच्या आश्रमांतील दोन वर्षांचें अध्ययन यांनीं पुरें केलें. सध्यां हे Little Theatre च्या चळवळींत व्यग्र आहेत.

काव्यगायक व वक्ते या दोन्ही दृष्टींनीं यांनीं इंग्लंड, अमेरिका वगैरे देशांत फिरून फार मोठी कीर्ति मिळवली आहे. लंडनच्या एका Little Theatre मध्यें यांनीं 'तुकाराम' या आपल्या इंग्रजी नाटकाचा प्रयोगहि करून दाखविला होता (१९२८). रशिया, इंग्लंड वगैरे देशांत हिंडून आधुनिक नाट्यशास्त्राच्या यांनीं केलेल्या अध्ययनाचें हें फळ होतें.

यांचें काव्य ग्रंथः— (1) The Feast of Youth, (2) The Magic Tree, (3) Perfume of Earth, (4) Wizard's Mask, (5) Out of the Deep Dark Mould, (6) Ancient Wings, (7) Grey Clouds and White Showers, (8) Strange Journey इत्यादि.

नाटकें:— (1) The Sleepers Awakened, (2) Abu Hassan Returned from Abroad, (3) The Coffin, (4) Five Verse Plays, (5) Five Prose Plays, (6) Poems and Plays इत्यादि.

**चतर्जी, बंकिमचंद्र**—(जन्म स. १८३८ जून २५–मृत्यु स. १८९४) सुप्रसिद्ध बंगाली कादंबरीकार, बंगाली कवि व 'वन्देमातरम्' या राष्ट्रगीताचे जनक. यांना आधुनिक बंगाली भाषेचे निर्माते व आद्यप्रवर्तक मानण्यांत येतें.

यांचा जन्म कलकत्त्याजवळ कान्तलपारा या गांवीं झाला. यांचे वडील यादवचंद्र हे मेदिनीपूर येथें डेप्युटी कलेक्टर होते. तेथें यांचें शाळेंतील शिक्षण झालें. हुगळी कॉलेज (१८४७) व प्रेसिडेन्सी कॉलेज (१८५७) यांमध्यें यांनीं शिक्षण घेतलें. यांच्या सहाध्यायांत कलकत्ता हायकोर्टाचे मुख्य न्यायाधीश द्वारकानाथ मित्र व सुप्रसिद्ध समाजसुधारक केशवचन्द्र सेन हे होते. कलकत्त्याला १८५८ सालीं विश्वविद्यालय स्थापन झालें. तेथें यांनीं कायद्याचीहि परीक्षा दिली आणि डेप्युटी मॅजिस्ट्रेटच्या हुद्यावर जेसोर येथें यांची नेमणूक झाली (१८६२). तेथून डेप्युटी कलेक्टर वगैरे अनेक हुद्यांवर यांनीं कामें करून निःपक्षपाती म्हणून फार मोठी ख्याति मिळविली. सरकारी अधिकाऱ्यांनाहि कोर्टांत ओढण्यास हे दचकत नसत.

यांनीं 'वंगदर्शन' नांवाचें पत्र १८७२ सालीं सुरू केलें. तथापि यांच्या खऱ्या वाङ्मयनिर्मितीचा काळ १८६५–८७ हा आहे. त्या कालांत यांनीं चवदा कादंबऱ्या लिहिल्या. तेव्हां देशी भाषेंत लेखन करणें कमीपणाचें समजलें जाई. लेखन, भाषण, आचार व विचार या सर्व बाबतींत इंग्रजांची पूर्ण छाया पडलेली असे. यांनींसुद्धां प्रथम 'राजमोहन्स वाइफ' व 'ॲडव्हेन्चर्स ऑफ ए यंग हिंदु' या दोन गोष्टी इंग्रजींतच लिहिल्या. परंतु यानंतर यांच्या विचारांत क्रान्ति होऊन यांनीं आपलें सर्व लिखाण बंगाली भाषेंतच केलें.

यांनीं अनेक विषयांवर लिहिलें असलें तरी यांचें नांव सर्वतोमुखीं होण्यास यांच्या कादंबऱ्याच कारण झाल्या आहेत. यांच्या कादंबऱ्या सामाजिक, ऐतिहासिक व संमिश्र अशा तीन स्वरूपांच्या आहेत. यांच्या कादंबऱ्या अत्यंत लोकप्रिय झाल्या. यांची भाषा अकृत्रिम, सुबोध, हृदयस्पर्शी आणि सरस आहे. कल्पनाचातुर्याबरोबर मार्मिक व भारदस्त विनोदहि यांच्या लेखनांत भरपूर आढळतो. असंभाव्य नि काल्पनिक सृष्टीपेक्षां नित्य व्यवहारांतील स्वभावचित्रण करण्याकडे यांचा कल असल्यानें वाचक पात्राशीं समरस होतो. शिवाय विवेकाला चालना देऊन स्वाभिमानाला जागृत करण्याचा जिव्हाळाहि यांच्या लेखनांत आढळतो.

वाई येथें प्रसिद्ध होणाऱ्या 'कादंबरी-कल्पद्रुम' या मासिकांत यांच्या बऱ्याच कादंबऱ्यांचीं भाषान्तरें भावे व चितळे यांनीं करून प्रसिद्ध केलीं. नंतर कै. वा. गो. आपटे यांनीं 'संपूर्ण बंकिमचंद्र' तीन भागांत प्रसिद्ध केला.

कादंबरीलेखनाशिवाय अनेक ऐतिहासिक, धार्मिक आणि तात्त्विक चर्चात्मक निबंध लिहून यांनीं बंगाली साहित्यांत पुष्कळच भर घातलेली आहे. त्या वेळच्या कोणत्याहि धार्मिक किंवा सामाजिक लाटेंत न सांपडतां यांनीं हिंदुधर्म, संस्कृति व भाषा यांबद्दल अभिमान वाटेल असें धोरण स्वीकारलें. याची प्रचीति 'आनंदमठ' (१८८२) नांवाच्या यांच्या सुप्रसिद्ध कादंबरींत चांगली येते. हिंदुस्थानांत कितीहि भेद असले तरी स्वदेश, स्वधर्म आणि स्वसंस्कृति हें अधिष्ठान सर्वांचें एकच आहे. तें डोळ्यांपुढें ठेवून 'संतान-संघ' काढण्याची आणि त्याच्या द्वारां, भारताची सेवा करण्याकरतां

संन्याशी वृत्तीनें राहणाऱ्या लोकांची एक परंपरा निर्माण करण्याकरितां 'सर्व्हंट्स् ऑफ इंडिया' या त्याच धोरणावर १९०५ सालीं निघालेल्या संस्थेची कल्पना यांनीं आपल्या 'आनंदमठा'त १८८२ सालींच प्रथित करून ठेविली होती. त्याच कादंबरीत सध्यां राष्ट्रसभेनें मान्य केलेलें 'वन्दे मातरम्' हें राष्ट्रगीत प्रथम सहज तयार करून यांनीं प्रथित केलें. तें अखिल हिंदुस्थानचें राष्ट्रगीत होईल अशी तेव्हां यांना कल्पनाहि नव्हती. यांच्या गीतांत पुढें 'सप्तकोटिकंठ' हा बंगालच्या लोकसंख्येला उद्देशून असणारा निर्देश प. वा. सरलादेवी चौधराणी यांनीं बदलून अखिल भारताला उद्देशून 'त्रिंशत्कोटि' असा केला आणि तें प्रथम बनारस राष्ट्रसभेंत त्यांनींच म्हटलें. पुढें त्या गीतांतील मूर्तिदर्शक निर्देश मुसलमानांकरितां राष्ट्रसभेनें काढून पहिलें कडवेंच फक्त राष्ट्रगीत म्हणून मान्य केलें.

यांची देशभाषेबद्दलची तळमळ व सेवा लक्षांत घेऊन कलकत्ता विश्वविद्यालयाच्या सेनेटगृहांत यांचा पुतळा उभारण्यांत आला. १९३८ जून २५ रोजीं यांची जन्मशताब्दि मोठ्या समारंभानें देशभर साजरी झाली.

यांच्या लेखनांत संस्कृत भाषेचा भारदस्तपणा व बंगालीचा जोम यांचा सुंदर मिलाफ आढळतो. लोकांना संदेश देण्याचें ध्येय पुढें ठेवूनहि यांनीं कलेची हानि केलेली नाहीं. जुन्या संस्कृतीच्या अभिमानाची गुप्त सरस्वती यांच्या वाङ्मयांतून जुन्या दृश्यांच्या वर्णनानें मधूनमधून प्रगट होते. त्यामुळें यांच्या लिखाणाला जडवादाचें रूप न येतां त्यांत अन्तःप्रेरणा आढळते. इंग्लंडपासून शिस्त शिकावी व स्फूर्तीकरितां हिंदुधर्माकडे जावें असा यांचा आदेश होता.

यांच्या कादंबऱ्या—१ दुर्गेशनंदिनी, २ कपालकुंडला, ३ मृणालिनी, ४ रजनी, ५ चंद्रशेखर, ६ विषवृक्ष, ७ आनंदमठ, ८ देवी चौधराणी, ९ राजसिंह, १० सीताराम, ११ कृष्णकान्तेर विल.

यांपैकीं कपालकुंडला, कृष्णकान्तेर विल इत्यादींचे चित्रपट झाले आहेत.

बंकिमचंद्रांच्या 'आनंदमठ' या सुविख्यात कादंबरींत घातलेल्या पद्याला आज राष्ट्रगीताचा मान प्राप्त झाला आहे. तें पद्य पुढीलप्रमाणें:—

वन्दे मातरम्
सुजलाम् सुफलाम् मलयजशीतलाम्
सस्यशामलाम् मातरम् वन्दे०
शुभ्रज्योत्स्ना-पुलकित-यामिनीम्
फुल्ल-कुसुमित-द्रुमदल-शोभिनीम्
सुहासिनीम् सुमधुरभाषिणीम्
सुखदाम् वरदाम् मातरम् वन्दे०
सप्त (त्रिंशत्) कोटि-कंठ-कलकल-निनाद-कराले
द्वित्रिंशत्कोटिभुजैर्धृत-खर-करवाले
के बोले मा तुमि अबले
बहुबलधारिणीम्, नमामि तारिणीम्
रिपुदलवारिणीम् मातरम् वन्दे०
तुमि विद्या, तुमि धर्म।
तुमि हृदि, तुमि मर्म
त्वं हि प्राणाः शरीरे।
बाहुते तुमि मा शक्ति
हृदये तुमि मा भक्ति।
तोमारई प्रतिमा घडी
मन्दिरे मन्दिरे, मातरम्।
त्वं हि दुर्गा दशप्रहरणधारिणी
कमला कमलदलविहारिणी।
वाणी विद्यादायिनी
नमामि त्वाम्। नमामि कमलाम् अमलाम्
अतुलाम् सुजलाम् सुफलाम् मातरम्, वन्दे०
श्यामलाम् सरलाम् सुस्मिताम् भूषिताम्
धरणीम् भरणीम् मातरम् वन्दे मातरम्

**चतर्जी, रामानंद**—(जन्म स. १८६५ मे २८—मृत्यु स. १९४३ सप्टें. २०) हिंदुस्थानांतील जगद्विख्यात संपादक व राष्ट्रीय वृत्तीचे गृहस्थ.

यांचा जन्म बंगाल्यांतील सुप्रसिद्ध चट्टोपाध्याय नांवाच्या ब्राह्मण कुलांत झाला. कलकत्ता येथें कॉलेजचें शिक्षण घेत असतांच 'दासी' या नियतकालिकाचें हे संपादन करीत. कॉलेजचें शिक्षण पुरें होतांच प्रथम हे कांहीं दिवस प्रयाग येथील कायस्थ कॉलेजांत प्राध्यापकाचें काम करीत. नंतर हे अलाहाबाद विश्वविद्यालयाचे फेलोहि झाले. पण पुढें यांनीं संपादकीय व्यवसाय स्वीकारला.

कांहीं दिवस 'इंडियन मेसेंजर' या पत्राचे हे संपादक होते. पुढें यांनी 'प्रदीप' नांवाचें स्वतःचें नियतकालिक काढलें. स. १९०१ मध्यें यांनीं 'प्रवासी' हें बंगाली मासिक सुरू केलें. तसेंच पुढें सुप्रसिद्ध आंग्ल मासिक 'मॉडर्न रिव्ह्यू' हें सुरू केलें (१९०७). यांपैकीं शेवटलीं दोन दीर्घकाल चालून त्यांनीं वृत्तपत्र-

सृष्टींत उच्च स्थान पटकाविलें व यांनाहि कीर्ति व पैसा मिळवून दिला.

हे ब्राह्मो समाजाचे कर्ते अनुयायी व राजकारणांत पूर्ण स्वातंत्र्यवादी होते. लो. टिळकांनीं सुरू केलेल्या स्वराज्याच्या चळवळीस यांनीं 'Towards Homerule' ही ग्रंथमाला सुरू करून उत्कृष्ट साहाय्य केलें. तसेंच मि. जे. टी. संडरलन्ड यांचें 'इंडिया इन बॉन्डेज' हें पुस्तक प्रकाशित करून येथील ब्रिटिश राजनीतीवर झगझगीत प्रकाश पाडला. सरकारनें तें पुस्तक शेवटीं जप्त केलें व यांना त्याबद्दल प्रायश्चित्त भोगावें लागलें. तथापि तें पुस्तक अमेरिकेंत प्रसिद्ध झालेंच.

हे राष्ट्रसभेचे अनुयायी होते. तथापि राष्ट्रसभेचें मुसलमानविषयक धोरण यांना पसंत नसल्यानें हे हिंदुसभेंत प्रविष्ट झाले. सुरत येथील अ. भा. हिंदुमहासभेच्या अधिवेशनाचे हे अध्यक्ष होते ( १९२९ एप्रिल ). राष्ट्रसभेच्या हिंदु-मुसलमानविषयक विषम धोरणाचे प्रत्यक्ष चटके बंगालमध्यें अनुभवास येत होते. त्यामुळेंच अ. भा. जातिनिर्णय विरोधी परिषदेच्या (मुंबई १९३४) अध्यक्षस्थानावरून यांनीं जातिनिर्णयाचा राष्ट्रघातकपणा स्पष्ट केला.

बंगालमध्यें मुस्लीम मंत्रिमंडळ असनस्थ झाल्यानंतर त्या प्रान्तांत हिंदुहितविरोधी अनेक गोष्टी झाल्या. दुय्यम शिक्षणाचा कायदा, कलकत्ता विश्वविद्यालयांतील श्री-कमल या पूज्य चिन्हाचें उच्चाटन, दंगे, हिंदु स्त्रियांचें अपहरण इत्यादि झालेल्या प्रकारांविरुद्ध यांनीं आकाश-पातळ एक केलें. आणि सरकारास दुय्यम शिक्षण कायदा परत घेण्यास भाग पाडलें.

यांच्या निर्भीड व स्पष्ट विचारसरणीमुळें, तसेंच हिन्दी आकांक्षा स्पष्टपणें मांडण्याच्या पद्धतीमुळें यांनीं जगांतील विचारवन्त लोकांत मानाचें स्थान पटकाविलें होतें. १९२६ मध्यें राष्ट्रसंघानें आपलें काम कसें चालतें हें पाहण्याकरितां यांना निमंत्रण केलें होतें.

यांच्या मॉडर्न रिव्ह्यूच्या स्थापनेपासून यांच्या मृत्यूपर्यंत त्या पत्रापासून यांना किंवा त्यांच्यापासून त्या पत्राला अलग करणें ही अत्यंत कठीण गोष्ट असे. हिंदुस्थानांतील एक उत्कृष्ट मासिक हा दर्जा त्या पत्राला देऊनच हे थांबले नाहींत, तर मॉडर्न रिव्ह्यूबरोबरच यांनीं हिंदी वृत्तपत्रव्यवसायाला व हिंदी आकांक्षांना आंतरराष्ट्रीय नकाशावर नेऊन खडें केलें.

अर्थातच या प्रचंड यशस्वितेच्या बुडाशींहि तशींच महत्त्वाचीं कारणें असत. त्या पत्राचा नियमितपणा, त्याची छपाई, त्यांतील चित्रें या सर्व बाह्य गोष्टी सोडून दिल्या तरी त्याचें खरें महत्त्व नवनव्या साहित्यप्रकारांना उत्तेजन देण्याचे यांचे धोरणांत सामावलेलें असे. रवींद्रनाथ टागोरांचा पाश्चात्य वाचकांना मॉडर्न रिव्ह्यूतर्फे झालेला परिचय हें या गोष्टीचें उत्तम उदाहरण आहे. मात्र वर्तमानपत्री स्वरूप आपल्या मासिकांतील लेखांना हे कधींच येऊं देत नसत. प्रत्येक लेख त्या विषयांतील तज्ज्ञांच्या अनेक वर्षांच्या अभ्यासाचें फळ असावें असा यांचा कटाक्ष असे.

परंतु या सर्वांपेक्षांहि 'Notes' या नांवाखालीं प्रसिद्ध होणारीं यांचीं संपादकीय स्फुटें सर्वत्र लोकप्रिय असत. यांचा राजकारणाचा खोल अभ्यास व तितकीच कुशाग्र स्मृति यांचा मधुर संगम यांच्या या स्फुटांत होत असल्यानें हिंदी वृत्तपत्रव्यवसायांतील चमकदार संपादकीय लेख म्हणून त्यांची सर्वत्र वाहवा होत असल्यास नवल नाहीं.

**चतर्जी, डॉ. शरच्चंद्र**—( जन्म स. १८७६- मृत्यु स. १९३८ ) आंतरराष्ट्रीय कीर्ति मिळविणारे बंगाली कादंबरीकार.

भागलपूर हें यांचें जन्मस्थान. मतिलाल चट्टोपाध्याय यांच्या सात मुलांपैकीं हे दुसरे चिरंजीव. यांच्या वडिलांना वाङ्मयाचा अतिशय शोक असे. ते कविता करीत, गोष्टी खरडीत, मोठमोठे ग्रंथराजसुद्धां लिहीत; पण सर्व अपूर्ण! त्रासून डोक्यांत राख घालून स्वतः राहत असणाऱ्या मेहुण्याच्या घराला रामराम ठोकीत; कांहीं तरी नोकरी शोधत; लवकरच तिला कंटाळत व पुन्हां येरे माझ्या मागल्या या नात्यानें मेहुण्याच्या घरीं येऊन नव्या उत्साहानें नव्या ग्रंथास सुरुवात करीत.

आपल्या वडिलांच्या गोष्टींचा शेवट कसा होईल याचा विचार करतां करतांच यांनीं सतराव्या वर्षी गोष्टी लिहिण्यास प्रारंभ केला. परंतु रवींद्रनाथांच्या इतकी सुंदर आपली गोष्ट होईपर्यंत आपलें लेखनकौशल्य बाहेर प्रकट करावयाचें नाहीं या हव्यासामुळें यांची पहिली कथा प्रसिद्ध होण्यास बराच वेळ लागला.

अशा तऱ्हेनें सुरू केलेल्या लेखनव्यवसायावर गरिबीच्या जाचानें तात्पुरता पडदा टाकला. कांहीं तरी

लहानशा भांडणाच्या प्रसंगानें हे आपल्या घरांतून बाहेर पडले व संन्याशी होऊन निरनिराळ्या गांवीं फिरले. या प्रवासांत यांना अनेक तऱ्हांचे लोक भेटून त्यांच्या अंतरात्म्यांशीं तादात्म्य होण्याची संधी यांना मिळाली. या प्रवासांतून लवकरच हे घरीं परतले. परंतु लेखणी व कागद यांचा संयोग होण्यास आणखी बरींच वर्षे लोटावीं लागलीं.

वयाच्या सत्ताविसाव्या वर्षी गृहहीन, धनहीन व उदास अशा स्थितींत हे ब्रह्मदेशाला निघाले. अघोरबाबू नांवाच्या यांच्या काकांनीं रंगून येथें यांना आश्रय दिला. परंतु यांच्यामागें हात धुऊन लागलेल्या परिस्थितीनें यांच्या काकांना काळाचे स्वाधीन करून पुन्हां एकदां यांचेवर मात केली व पहिल्याप्रमाणेंच यांची भ्रमन्ती सुरू झाली.

अनेक ठिकाणीं नकार घेत घेत एक्झॅमिनर ऑफ पब्लिक वर्क्स ॲंड अकाउंटस्च्या ऑफिसमध्यें हे अगदीं लहान पगारावर क्लार्कच्या जागीं चिकटले. या गोष्टीला कारणीभूत होणारी गोष्ट म्हणजे यांची संगीतसाधना होय. संगीताच्या निमित्तानें परिचय झालेल्या लोकांत श्री. एम्. के. मित्र हे यांचे ऑफिसर असणारे गृहस्थ होते व त्यांचेमुळेंच यांना नोकरी मिळाली.

सबंध आयुष्यांत एकाग्र व शांत चित्तानें निरीक्षण व अध्ययन करण्याची यांना मिळालेली ही पहिलीच संधि होती. लहानपणीं गरिबीमुळें एफ्. वाय्. चा वर्ग पैशाच्या अभावीं सोडून द्यावा लागला. पुढें नोकरीकरितां वणवण भटकण्यांतच सर्व वेळ गेलेला. अशा स्थितींत थोडी शांतता मिळतांच यांची रसिकवृत्ति खडबडून उठली व यांनीं श्री. मित्र यांच्या लायब्ररींतील मिल, कँट-हेगेल, शॉपेनहॉवर यांसारख्या लोकांचीं पुस्तकें वाचण्यास सुरुवात केली. याच वेळीं यांनीं रवींद्रनाथांच्या उत्तमोत्तम ग्रंथांचें अध्ययन केलें. या सर्व ग्रंथांच्या वाचनामुळें यांची ललित वाङ्मयासंबंधींची उत्कंठा जागृत झाली.

अशा तऱ्हेच्या मनःस्थितींत असतांना फेरबदल म्हणून कांहीं दिवस हे कलकत्त्याला आले. या वेळीं 'यमुना' नांवाचें पत्र काढणारे यांचे कांहीं बालमित्र यांना भेटले. 'बरेच दिवसांत मी लेखणी व कागद यांना लेखनाकरतां हातमुद्रां लावला नाहीं' या यांच्या म्हणण्याकडे लक्ष न देतां यांच्या मित्रांनीं यांचेकडून 'यमुना' करितां लेखन करण्याचें वचन घेतलें. रंगूनला अनेक रिमाइंडर्स पाठविल्यानंतर यांची एक गोष्ट आली व ती 'यमुना'मध्यें प्रसिद्ध झाल्याबरोबर सगळीकडे तिच्यासंबंधीं एकच चर्चा सुरू झाली. रवींद्रनाथांनीं ही गोष्ट माझी नाहीं असें प्रसिद्ध केल्याबरोबर लोकांची उत्कंठा द्विगुणित झाली व बंगाली भाषेंत आतां क्रांति होणार असें भाकीत लोक करूं लागले.

आतां लेखनाकडे अधिक लक्ष देण्यास यांनीं सुरुवात केली. यांची 'बडी दिदी' ही कादंबरी 'भारती' मासिकांत क्रमानें छापून येण्यास सुरुवात झाली. मासिकांत ज्या वेळीं या कादंबरीचें शेवटचें प्रकरण आलें त्या वेळीं लेखक म्हणून यांचें नांव प्रसिद्ध करण्यांत आलें. परंतु यांचा लाजाळूपणा इतका होता कीं, रंगूनच्या कांहीं मित्रांनीं 'या कादंबरीचे लेखक तुम्हीच का?' असें विचारलें असतां यांनीं चक्क 'एकाच नांवाचीं दोन माणसें असूं नयेत का?' असें विचारलें.

यानंतर "यमुना"त आलेलें यांचें लेखन म्हणजे "परिणीता", "चंद्रनाथ" व "चरित्रहीन" हीं पुस्तकें होत. याच वेळीं "भारतवर्ष"चे संपादक द्विजेंद्रलाल रॉय यांनीं आपल्या पत्राकरतां लिहिण्याची यांना विनंति केली व थोड्याच दिवसांत हे हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध मासिकांचे अखंडपणें लिहिणारे लेखक बनले. श्रीकान्त, गृहदाह, दत्ता, पल्लीसमाज या यांच्या उत्कृष्ट कादंबऱ्या याच पत्रांतून प्रसिद्ध झालेल्या आहेत.

१९१३ त यांची प्रकृति फारच बिघडली व डॉक्टरनीं यांना ब्रह्मदेश सोडण्याविषयीं सुचवलें. परंतु या वेळीं यांचेपुढें मुख्य प्रश्न आर्थिक होता. येथें महिना १०० रुपये देणारी नोकरी सोडून हिंदुस्थानांत काय करावयाचें, हा यांचेपुढील मोठाच प्रश्न होता. परंतु कलकत्त्याच्या एका प्रकाशकानें यांना १०० रुपये देण्याचें कबूल केल्यानें जवळजवळ १० वर्षे सहवास घडलेल्या ब्रह्मदेशाला सोडून हे कलकत्त्याला आले.

यांच्या कादंबऱ्यांचें बंगाली जनतेकडून केल्या जाणाऱ्या स्वागताचें प्रमाण दिवसेंदिवस वृद्धिंगत होत होतें. यांच्या या लोकप्रियतेचें प्रमाण ज्या वेळीं देशबंधु चित्तरंजन दासांनीं यांना आपल्या "नारायण" या पत्राकरितां कांहीं लेखन करण्याची विनंति केली त्या वेळीं अत्युच्च झालें. यांनीं त्या पत्राकरितां पाठवलेली "स्वामी" ही गोष्ट वाचून त्यांना इतका आनंद

झाला कीं त्यांनीं यांचेकडे एक कोरा चेक पाठवून त्यासोबत चिठ्ठी धाडली : "इतक्या अमोल गोष्टीचें मोल ठरवण्याचें धाडस मला करवत नाहीं, ज्या कलावंतानें ही गोष्ट लिहिली त्यानेंच हें काम करावें." तेव्हां यांनीं चेकवर हंसत हंसत १०० चा आंकडा लिहिला.

याच सुमारास प्रसिद्ध झालेल्या यांच्या 'पाथेर देवी' या सुप्रसिद्ध कादंबरीच्या १००० प्रति तिचे प्रसिद्धीचे दिवशींच उडाल्या व ३००० ची पहिली आवृत्ति एक महिन्यांत व ५००० ची दुसरी आवृत्ति तीन महिन्यांचे आंत खलास झाली. ही गोष्ट परदेशांत जरी विशेष आश्चर्यकारक नसली तरी आपल्या देशांत–आणि ही कादंबरी 'बंगवाणी' मासिकांत दोन वर्षे क्रमशः प्रसिद्ध होत होती ही गोष्ट लक्षांत घेतली असतां–विशेष नवलपूर्ण आहे. ही कादंबरी बंगाल सरकारनें त्यांतील राजकीय भावनादर्शनाबद्दल पुढें जप्त केली. याचें मराठी भाषान्तर 'भारती' हेंहि जप्त आहे. यांची ही कादंबरी यांच्या ब्रह्मदेशांतील निरीक्षणाचें एक मोहक स्वरूप आहे येवढेंच येथें सांगतां येईल.

मुख्यतः कथालेखक या नात्यानें हे हिंदी जनतेस परिचित आहेत. यांच्या अनेक गोष्टींचीं नाटक व चित्रपट झालेले आहेत. त्यांपैकीं बहुतेक नाटकें शिशिरकुमार बहादुरींच्या कंपनीनें रंगभूमीवर आणलीं. बडी दिदी, देवदास व काशीनाथ ह्या अत्युत्कृष्ट चित्रपटांचे यशांत कथालेखक या नात्यानें असणारा यांचा वांटाहि लहानसहान नाहीं.

इतर कथालेखकांप्रमाणें कथानकाचा आराखडा मनांत करून ठेवण्यापेक्षां कथानकाचा विषय व पात्रांचे स्वभाव यांचा प्रथम विचार करण्याची यांची पद्धत असे. 'चरित्रहीन' सारख्या कांहीं कादंबऱ्या त्यांतील महत्त्वाचे असणारे शेवटचे प्रसंग रंगवून नंतर मग पुऱ्या केलेल्या आहेत.

घाईघाईनें लिहिण्याची यांची पद्धत नसे. कारण लेखन म्हणजे यांना बौद्धिक कार्य वाटे आणि म्हणूनच शब्दांच्या वावटळींत हे कधींच सांपडत नाहींत.

इतक्या प्रचंड प्रमाणांत लिहिणारे लेखक अर्थातच अतिशय थोडे आहेत; परंतु साधे व गैरमहत्त्वाचे लहान लहान प्रसंग अतिशय आकर्षक व वेधक भाषेंत सांगण्याची यांची ढब हिंदुस्थनांतील जवळ जवळ कोणत्याहि लेखकांत नाहीं असें म्हणण्यास हरकत नाहीं.

कादंबऱ्यांचे शेवट—मग ते आनंदपर्यावसायी असोत किंवा दुःखपूर्ण असोत—अतिशय परिणामकारक करण्यांत यांचा हातखंडा आहे. नायकनायिकेच्या लग्नानें किंवा एकाद्या हास्यास्पद मृत्यूनें शेवट होणाऱ्या आपल्याकडील चित्रपटांत यांच्या 'बडी दिदी' किंवा 'देवदास' यांतील शेवट, त्यांतील मूळ कथेच्या विकृत स्वरूपांतहि स्वागतार्ह वाटल्यास नवल नाहीं.

यांच्या बहुतेक पुस्तकांत बंगालची सामाजिक स्थिति पार्श्वभूमीदाखल घेतलेली असते. बंगालमध्यें जमीनदार विपुल असल्यानें उच्च व मध्यमवर्गीय जमीनदारांची स्थिति अतिशय उत्कृष्ट तऱ्हेनें चित्रित केलेली आढळते. त्यांतील स्पष्टपणा तर अत्यंत वाखाणण्यासारखा असतो.

बंगाली भाषेला सुबोधपणा आणण्याचें काम रवींद्रनाथ टागोर यांनीं केलें; तथापि जुनेपणा घालवून आजचें शुद्ध स्वरूप बंगालीला देण्याचें काम यांनीं केलें. रवीन्द्रबाबूंनीं उच्चवर्गीय पांढरपेशा वर्गातील लोकांचीं चित्रें रंगविण्याची कामगिरी केली असली तरी अज्ञान व दलित अशा बहुजन समाजाचीं चित्रें आपल्या कथा-कादंबऱ्यांच्या द्वारें चितारण्याचें काम यांनीं केलें. विशेषतः समाजांतील निरनिराळ्या वर्गांतील पतिता स्त्रियांचें चरित्र चित्रित करतांना त्यांतील उज्ज्वल भाग व्यक्त करून दाखविण्याचें कौशल्य यांच्यांत विशेष दिसतें. यांच्या लेखीं पतिता ही शापभ्रष्ट देवता असल्यानें समाजातील बहिष्कृत असलेल्या पतितेच्या जीवनांतील विशेष भाग गृहिणीपेक्षांहि उज्ज्वलतर असल्याचें यांनीं दाखविलें आहे. या विशिष्ट वर्गातील लोकांच्या जीवनांतील इतिहास यांनीं अत्यंत तन्मयतेनें सूक्ष्मसूक्ष्म भावनाहि व्यक्त करून मोठ्या हळुवार अन्तःकरणानें रेखाटला आहे. स्वभावरेखन हा कादंबरी वाङ्मयाचा आत्मा आहे. त्यांत बंगाली लेखक अधिक यशस्वी झालेले आहेत. यांची स्वभावरेखनांत बरोबरी करणारा लेखक जगांतसुद्धां क्वचितच आढळेल, म्हणून यांना चित्रकाराची उपमा द्यावीशी वाटते.

हिंदुस्थानांतील कादंबरीकारांचें वर्णनक्षेत्र शहरी पांढरपेशा लोकांपलीकडे अद्यापहि गेलेलें नाहीं. त्यांतहि एका ठराविक वर्गाचें ठराविक पद्धतीनें केलेलें वर्णनच सर्वत्र आढळतें. याला यांचें वाङ्मय अपवाद समजलें पाहिजे. यांच्या वाङ्मयांत समाजांतील अनेक थर यथार्थ चित्रित केलेले आढळतात. हे पांढरपेशासमाजाचें क्वचित् येणारें

चित्रणसुद्धां अधिक आधुनिक पद्धतीनें करतात. स्वभावांतील बारीक खोचा व्यक्त करण्याकरितां यांना प्रसंगहि अधिक उत्पन्न करावे लागतात. त्यामुळें केवळ कथानकावर तरंगत जाणाऱ्या आणि स्वभावरेखनाची अपेक्षा नसलेल्या वाचकांना यांच्या कादंबऱ्या कंटाळवाण्या वाटण्याचा संभव आहे. तसेंच यांची भाषा-सुद्धां स्वतंत्र आहे. वंगभाषाशास्त्रज्ञ आज जरी यांची भाषा प्रातिनिधिक मानीत नसले तरी कालान्तरानें महाकवींची भाषा म्हणून यांच्याच भाषेला मान्यता देण्याचा प्रसंग भाषाशास्त्रज्ञांवर येईल.

यांचे ग्रंथ—१ विराज बौ, २ बिंदूर छेले, ३ बडी दिदी, ४ पंडितमहाशय, ५ वैकुंठेर विल, ६ चंद्रनाथ, ७ परिणीता, ८ देवदास, ९ श्रीकान्त ( १-४ भाग ), १० काशीनाथ, ११ निष्कृति, १२ चरित्रहीन, १३ स्वामी, १४ दत्ता, १५ पल्लीसमाज, १६ बामुनेर माया, १७ देना पाउना ( मराठी-भैरवी ), १८ नव-विधान, १९ हरिलक्ष्मी, २० शेष प्रश्न, २१ विप्रदास, २२ अनुराधा, सती, परेश, २३ शुभदा, २४ शेषेर परिचय ( अपूर्ण ), २५ रमा, २६ पाथेर देवी ( जप्त ), २७ छबी, २८ गृहदाह, २९ मेज दिदी, ३० अरक्षणीय.

यांनीं आपलीं सर्व पुस्तकें बंगाली भाषेंत लिहिलीं. कांहीं कथांना नाटकाचें रूपहि यांनीं दिलें. यांपैकीं बहुतेक पुस्तकांचीं मराठी, गुजराथी, हिंदी व इतर भाषांत भाषान्तरें झालीं आहेत. ‘श्रीकान्त’ या यांच्या कादंबरीचें तर इंग्रजी व फ्रेंच भाषेंत भाषांतर झालें आहे. या ग्रंथांच्या वंगालींत व इतर भाषांत अनेक आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या.

**चतुर्वेदी, जगन्नाथप्रसाद कालीप्रसाद**—( जन्म स. १८७५ ) हिन्दी साहित्यविकासासाठीं तन, मन व धन अशा त्रिविध प्रकारें साहाय्य देणारे प्रख्यात हिन्दी कवि, विनोदी लेखक, वक्ते, वर्तमानपत्रकार व सार्वजनिक कार्यकर्ते.

यांचा जन्म नडिया जिल्ह्यांतील छिटका गांवीं झाला. यांचे पूर्वज आगरा जिल्ह्यांतील राहणारे असून व्यापाराकरितां बंगालमध्यें जाऊन राहिले. छिटका हें गांव यांच्या पूर्वजांचेंच होतें. हे २ वर्षांचे असतांनाच यांच्या पित्याचा अंत झाला. पुढें यांचे मामा पं. बलदेव-प्रसाद पाण्डेय यांनीं यांचें पालनपोषण केलें. वयाच्या १३ व्या वर्षी जमुई मायनर स्कूलच्या चवथ्या वर्गांत यांचें नांव घालण्यांत आलें. बुद्धीनें तीव्र असल्यामुळें स. १८९८ त हे मेट्रोपोलिटन इन्स्टिटयूटमधून प्रवेश-परीक्षा दुसऱ्या वर्गांत पास झाले. परंतु पुढें एफ्. ए.च्या परीक्षेंत अपयश आल्यामुळें यांनीं कॉलेज सोडलें.

लहानपणापासूनच यांना हिन्दी लिहिण्यावाचण्याचा व कविता करण्याचा नाद असल्यामुळें कॉलेज सोडल्यावर हे ‘ भारतमित्र ’ पत्रांत मधून मधून लेख व कविता लिहूं लागले. ‘ भारतमित्रा ’चे संपादक बाबू बालमुकुन्द गुप्त यांच्याशीं यांची चांगली मैत्री झाली. याच सुमारास यांनीं ‘ संसार-चक्र’ ही एक सुंदर कादम्बरी लिहिली. हे स. १९०३-४ च्या सुमारास ४ महिनेपर्यंत ‘ हितवार्ता’चे सहसंपादक होते. पुढें स. १९०४ पासून १९२५ पर्यंत यांनीं लाखेची दलाली सुरू केली. “ मिरजामल जगन्नाथ आणि कं. ” हें यांच्या पेढीचें नांव होतें.

हे हिन्दी गद्य व पद्यलेखनांत प्रसिद्ध आहेत. यांचें लिखाण भावपूर्ण, रसाळ व बोचक असे तरी पण वाचकांना हे मूर्तिमान् हास्यरसच भासत. यांचें वक्तव्यहि व्यंग व हास्यरसपरिपूर्ण असे. प्रायः सर्वच हिन्दी साहित्य-सम्मेलनांत हे हजर असत. लाहोरच्या १२ व्या हिं. सा. सं. प्रसंगीं यांची अध्यक्ष म्हणून निवड करण्यांत आली. प्रथम बिहार प्रादेशिक हिन्दी साहित्य सम्मेलनाच्या अध्यक्षपदाचाहि मान यांनाच मिळाला होता.

( १ ) बसन्त मालती, ( २ ) तूफान, ( ३ ) भारतकी वर्तमान दशा, ( ४ ) गद्यपद्य-माला, ( ५ ) कृष्णचरित्र, ( ६ ) स्वदेशी आन्दोलन, ( ७ ) अनुप्रासका अन्वेषण, ( ८ ) हिन्दी-लिंगविचार, ( ९ ) मधुर मीलन ( नाटक ), ( १० ) निबंधनिचय वगैरे गद्यपद्यात्मक पुस्तकें यांनीं लिहिल्यांपैकीं प्रमुख होत. यांच्या लेखनावर तात्कालिक लेखनाची छाया आहे.

**चतुर्वेदी, माखनलाल नन्दलाल**—( जन्म स. १८८८ ) हिन्दी भाषेंतील प्रसिद्ध लेखक, कवि व सार्वजनिक कार्यकर्ते.

यांचा जन्म मुंबईस झाला. हे हुशंगाबादचे राहणारे. येथेंच यांनीं आपलें शिक्षण करून हे नॉर्मल परीक्षा पास झाले व स. १९०४ मध्यें खांडव्यास शिक्षक बनले. येथें असतांनाच हे स्वतंत्रपणें इंग्रजी शिकले.

पं. माधवराव सप्रे यांच्या मदतीनें यांनीं ‘ कर्मवीर ’ साप्ताहिक पत्र सुरू केलें. स. १९२१ च्या असहयोगाच्या

चळवळींत यांना ८ महिन्यांची शिक्षा झाली. तुरुंगांतून सुटल्यावर हे पुन्हां राजकीय चळवळींत शिरले. मध्य-प्रांतीय जनता यांना फार मान देते. हे निर्भीड व स्पष्ट-वक्ते आहेत.

हे लहानपणापासून कविता करीत असत. "एक भारतीय आत्मा" या नांवानें यांच्या कविता प्रसिद्ध होत. यांच्या काव्यांत शुद्ध देशभक्ति व आत्मत्यागाचें प्रभावशाली वर्णन असतें.

यांचें कृष्णार्जुनयुद्ध नाटक, व हिमकिरीटिनी नांवाचा कवितासंग्रह प्रसिद्ध आहे. (क. कौ. २ ४९५-९६).

**चमूपति**—(जन्म स. १८८३–मृत्यु स. १९३७) सुप्रसिद्ध आर्यसमाजी पंडित व ग्रंथकार.

यांचा जन्म बहावलपुर संस्थानांत झाला. हे पंजाब विश्वविद्यालयाचे एम्. ए. होते. नंतर हे मुलतान गुरु-कुलाचे हेडमास्तर झाले. नंतर हे लाहोरास आले व वैदिक संशोधनाच्या कार्यास लागले. यांचा सर्व वेळ शास्त्र-चिन्तन आणि प्रचारांत जात असे. पुढें पुष्कळ वर्षे गुरुकुल विद्यालय, कांगडीमध्यें तुलनात्मक अर्थविज्ञानाचे हे प्रोफेसर होते. हे आर्यसमाजांतील पहिल्या श्रेणीचे संशोधक, मिशनरी व संशोधक होत. यांनीं इंग्रजी, हिन्दी व उर्दू या भाषांत पुष्कळ पुस्तकें लिहिलीं आहेत.

यांचे ग्रंथ—

हिन्दी—१ ऋषिदर्शन, २ जीवनज्योति (वेदमन्त्रोंका हिन्दी भाष्य), ३ सोमसरोवर (पवमान सोमसूक्त), ४ यमयमीसूक्त (समालोचना), ५ यास्क-युगकी वेदार्थ शैलियाँ, ६ योगेश्वर कृष्ण (जीवनचरित्र), ७ वेदार्थकोष, ८ वृक्षोंका आत्मा, ९ वैदिक दर्शन, १० संध्यारहस्य, ११ देवयज्ञपर आध्यात्मिक दृष्टि, १२ हमारे स्वामी.

उर्दू—१ दयानंद आनंदसागर, २ वैदिकस्वर्ग, ३ सत्यार्थप्रकाश, उर्दू अनुवाद, ४ परमात्माका स्वरूप, ५ मज़हबका मकसद, ६ चौदहवींका चांद, ७ रंगीला रसूल.

इंग्रजी—(1) Glimpses of Dayananda, (2) Ten Commandments of Dayananda, (3) Dialogue between Yama and Yami.

**चंदावरकर, सर नारायण गणेश**—(जन्म स. १८५५-मृत्यु स. १९२३) राष्ट्रसभेचे सुप्रसिद्ध कार्यकर्ते, वक्ते व हायकोर्टातील न्यायमूर्ति.

१८७७ त हे बी. ए. झाले व तावडतोब इन्दुप्रकाशचे संपादक बनले (१८७८–८९). याच कालावधींत यांनीं कायद्याच्या अध्ययनास सुरुवात केली व १८८१ त हे वकील झाले. एक अत्यंत यशस्वी कायदेपंडित अशी कीर्ति यांना सुरुवातीपासून मिळण्यास सुरुवात झाली.

सरकार, मुंबई युनिव्हर्सिटी व कॉंग्रेस अशा त्रिविध तऱ्हेचें यांचे सार्वजनिक कार्य आहे. हे मुंबईस भरलेल्या पहिल्या काँग्रेसला उपस्थित होते (१८८५). यांच्या कायद्यामधील सखोल ज्ञानामुळें यांना मुंबई हायकोर्टाचे जज्ज व नंतर चीफ जज्ज नेमण्यांत आलें (१९०१, १९०९).

याच कालांत व्हाइसरॉयचे निमंत्रित पाहुणे म्हणून हे दिल्ली दरबारास हजर राहिले. मॉंटफर्ड सुधा-रणांचें धोरणहि यांना मान्य असून त्याप्रमाणें मुंबई लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचें पहिलें अध्यक्षपद यांनीं स्वीकारलें.

मुंबई युनिव्हर्सिटीचे फेलो या नात्यानें प्रथम यांचा त्या युनिव्हर्सिटीशीं संबंध आला व प्रथम 'जस्टिस ऑफ दि पीस' (१८८९), नंतर युनिव्हर्सिटीचे मुंबई असेंब्लींतील प्रतिनिधि व शेवटीं व्हाइस-चॅन्सेलर या निरनिराळ्या प्रसंगांनीं तो दृढ होत गेला.

कॉंग्रेसच्या इंग्लंडमध्यें गेलेल्या शिष्टमंडळांत यांच्या वकिलीनैपुण्यामुळें यांचा समावेश करण्यांत आला (१८८५) आणि लाहोरला भरलेल्या कॉंग्रेसच्या १६ व्या अधिवेशनाचें अध्यक्षस्थान यांना देऊन यांच्या कार्यासंबंधीची कृतज्ञता लोकांनीं प्रगट केली (१९००). हिंदी उद्योगधंद्यांसंबंधीं सरकारी धोरण, विशेषतः देशाची आर्थिक स्थिति जागच्याजागीं स्थिर असतां राज्य-व्यवस्थेचा खर्च वाढवण्याची सरकारी पद्धति, हा यांच्या व्याख्यानाचा प्रमुख विषय होता.

हे इंदूरच्या होळकर सरकारचे कांहीं महिने मुख्य प्रधान होते. पण लवकरच हे त्यागपत्र देऊन परतले.

स. १८९९ पर्यंत हे मुंबईचे सर फिरोजशहा मेहेता यांचे सहकारी म्हणून राजकारणांत भाग घेत असत. परंतु न्यायमूर्तींच्या जागेवर नेमणूक झाल्यावर हे राज-कारणांतून प्रायः निवृत्त झाले.

भक्ति-संप्रदायावर यांचा विश्वास असून हे प्रमुख ार्थनासमाजी होते. मुंबई युनिव्हर्सिटीचे माजी उपकुलगुरु ाठ्ठलराव हे यांचे चिरंजीव होत.

**चंदूलाल नारायणदास**—( जन्म स. १७६६–त्यु स. १८४५ एप्रिल १५ ) हैदराबाद राज्याचे ख्य प्रधान व दानशूर गृहस्थ. हे 'राजा चंदूलाल' या ांवानें सर्वत्र ओळखले जात.

यांचा जन्म झाला त्याच वर्षी यांचे वडील राय ारायणदास वारले. तेव्हां राय नानकराम या यांच्या लत्यानें यांचें पालनपोषण केलें. साधारण शिक्षण ाल्यावर चुलत्याच्या हाताखालीं यांची नेमणूक कर-ांत आली. चुलता सेवानिवृत्त झाल्यावर यांना करोड-ारी खात्याचे प्रमुख नेमण्यांत आलें. स. १८०४ सालीं ार आलम हा हैदराबादचा मुख्य प्रधान झाला तेव्हां ानें यांना आपला विश्वासूक मदतनीस म्हणून हाताशीं तलें. स. १८०६ सालीं पेशकार व फायनान्स खात्याचे ्वाणाच्या हुद्यांवर यांची नेमणूक करण्यांत आली. ार आलम यांच्या मृत्यूनंतर नवाब मुनिरुलमुलक यास री दिवाण नेमण्यांत आलें तरी पेशकार या नात्यानें ज्यकारभाराचीं सर्व सूत्रें यांचेच हातीं राहावीं अशी ाश्चित योजना करण्यांत आली. अशा रीतीनें स. १८०८ ासून राज्यकारभाराची सर्व सत्ता यांच्या हातीं आली ाणि नवाब मुनिरुलमुलक यांच्या पश्चात् दिवाणपदाचे ागीं यांची नेमणूक झाली. अशा प्रकारें ३५ वर्षे राज्य-ारभार केल्यावर ६ सप्टें. १८४३ रोजीं यांनीं आपल्या ागेचा राजीनामा दिला.

हे अत्यंत धर्मनिष्ठ असून दातृत्वाबद्दल यांची अत्यंत याति होती. यांच्या उदार देणग्यांमुळें या राज्यांत जारों कुटुंबांचें पालनपोषण होत असे. राजिनाम्यानंतर ाजामसरकारनें यांस एक कोटि रुपयांचें बोनस, कित्येक ांवांची जहागीर, व तीस हजार रुपये महिना ेन्शन चालू केलें.

यांना राजा बालाप्रसाद व नारायणप्रसाद हे दोन त्र व एक कन्या होती. वरील दोन्ही पुत्र निपुत्रिक ारल्यानें कन्येचे पुत्र राजा किशनप्रसाद हे यांचे वारस ाले.

**चंद्रचूड, नरसो बाळकृष्ण**—(जन्म स. १८७३–त्यु स. १९४३ ) पुण्यांतील प्रमुख वकील व दे. ऋ. ा. च्या स्वतंत्र संस्थांचे जनक.

हे पेशवाईंतील सुप्रसिद्ध गंगोबातात्या चंद्रचूड घराण्यांपैकीं होत. हे फर्ग्युसन कॉलेजांतील जुन्यांतले जुने विद्यार्थी व फेलो. डे. ए. सोसायटीला ज्युबिलीच्या वेळीं माजी विद्यार्थ्यांपैकीं थैली देण्यांत हे प्रमुख होते. पुण्यांतील बार असोसिएशनचे हे मृत्युसमयीं अध्यक्ष होते. पुणें म्युनिसिपालिटींत हे नऊ वर्षे सतत सभासद होते. कौन्सिल-प्रवेशाच्या बाबतींत मतभेद होऊन प्रथम स्वराज्यपक्ष व नंतर प्रतिसहकार पक्षाची स्थापना झाली. त्या वेळीं यांनीं दोन्ही नव्या पक्षांस मदत केली व पुणें शहरातर्फे हे प्रांतिक विधिमंडळांत निवडूनहि गेले. विधिमंडळांत यांनीं चांगली कामगिरी केली. कै. ह. भ. प. पांगारकर यांना थैली अर्पण करण्याच्या कामीं यांनीं पुण्यातर्फे पुढाकार घेतला.

पुणें येथें दे. ऋ. ब्रा. ची संस्था काढण्याची यांची कामगिरी विशेष महत्त्वाची आहे. ब्राह्मणांत पोटजातींचे संघ काढण्याची प्रवृत्ति या वेळेपर्यंत प्रायः नव्हती. पुढारी लोक जातिभेद व पोटजाती यांच्या विरुद्ध बोलण्यांत मोठेपणा मानीत. पण खासगी जीवन व सार्वजनिक व्यवहारांतील अन्तःप्रवाह जातीयतेनें परिपूर्ण असत. त्यामुळें समाजांत असावा तसा एकोपा व दिलसफाई नव्हती. त्यामुळें अर्धवट लोक उघडपणें इतर बरोबरीच्या जातींबद्दल अपमानास्पद व हीनतादर्शक बोलत. सरकारी धोरणहि जातीयता वाढण्यास पोषक होतें. दे. ऋ. ब्रा. समाज हा उशीरा शहराकडे वळला. वतनें व शेतकी हा त्याचा पेशा. तो सुटूं लागतांच शहराकडे ते लोक वळले. त्यांची जपणूक करणें व मानहानीच्या परिस्थितीं-तून सोडविणें याकरितां दे. ऋ. ब्रा. संघ काढण्याची कल्पना यांनीं उचलून महाराष्ट्रभर तिचा प्रचार केला व अत्यंत विरुद्ध वातावरणांतहि सुरुवात करून लोकांना व प्रतिस्पर्ध्यांना ही चळवळ पटवून दिली, हा यांच्या आयुष्यांतील महत्त्वाचा भाग आहे. आतां इतर ब्राह्म-णांनाहि ही गोष्ट पटली असून त्यांनींहि असे संघ निर्माण केले आहेत. प्रत्येक लहान गटांच्या कांहीं स्वतंत्र अडचणी असतात त्या नाहींशा करण्याकरितां आणि राष्ट्रीय प्रश्न समाजाच्या सर्व वर्गांत पोंचविण्याकरितां अशा संघटनांची जरूरी असते, ही गोष्ट आतां सर्वमान्य झाली आहे.

**चंद्रशेखर**—( जन्म स. १८७१–मृत्यु स. १९३७ ) मराठी भाषेंतील पंडिती वळणाचे सुप्रसिद्ध अर्वाचीन कवि.

यांचें समग्र नांव वामन शिवराम गोऱ्हे. यांचें गांव नाशिक. यांच्या मातेचे नांव मणिकर्णिकाबाई. यांचा गर्भ आईच्या उदरांत नऊ महिन्यांच्या ऐवजीं अठरा वर्षे राहिला; नंतर निष्णात वैद्याच्या गुणावह औषधी क्रियेनें यांना जन्म प्राप्त झाला. हे शुक्ल यजुर्वेदी माध्यंदिन शाखेचे ब्राह्मण होते.

यांचें प्राथमिक शिक्षण नाशिक येथें झालें. नाशिक, बडोदें व पुणें येथें यांचें प्रवेशपरीक्षेपर्यंत शिक्षण झाल्यावर यांनीं अहमदाबाद येथें दोन वर्षें धंदे-शिक्षण घेण्याचा प्रयत्न केला. पण शेवटीं बडोदें येथें येऊन यांनीं प्रथम दिवाण कचेरींत व नंतर चीफ मेडिकल ऑफिसरच्या कचेरींत कारकुनाच्या जागेवर नोकरी केली.

यांना लहानपणापासूनच कविता करण्याचा नाद होता. यांची पहिली कविता 'नारायणा शरण त्या करुणालया मी' ही असली तरी पुण्याच्या 'करमणूक' पत्रांत 'कोकिळ' ही यांची पहिली प्रसिद्ध झालेली कविता होय (१८ मे १८९५). बडोद्यास दत्तात्रय कोंडो घाटे या कविमित्राशीं यांचा परिचय झाला. १९३२ सालीं हे सेवानिवृत्त झाले. यांना आयुष्याच्या शेवटल्या भागांत बडोदा सरकारच्या दरबारांत 'राजकवि' ही पदवी लाभली होती.

यांनी प्रासंगिक व रूपान्तरित कविता बरीच लिहिली. 'काय हो चमत्कार' व 'उघडं गुपित' हीं दोनच प्रेमकाव्यें यांनी लिहिलीं. यांनी गोदागौरव व सोमनाथ हीं दोन खंडकाव्यें लिहिण्यास सुरुवात केली, पण तीं अपूर्ण आहेत.

प्रसाद व माधुर्य या दोनहि गुणांच्या दृष्टीनें केलेली शब्दांची बिनचूक निवड, शुद्धता, निर्दोष वृत्तरचना, स्वाभाविक यमकें आणि मधुर अनुप्रास या दृष्टीनें यांचें काव्य अपूर्व आहे. विलक्षण सफाई हा यांच्या काव्याचा आत्मा आहे. यांच्या काव्याची रचना अगदीं निरपेक्ष व स्वतःच्या मनोविनोदार्थ आहे. 'तुझ्यास्तव उपेक्षिल्या बहुविधा सुविद्या कला, तुझ्यास्तव न तीं पदें, उपपदें मिळालीं मला' हा यांचा स्वतःविषयींचा निर्देश यथार्थ आहे. आपला स्वतःचा व्यक्तिविषयक निर्देश आपल्या काव्यांत करणें हे प्रायः टाळीत असत.

यांच्या समग्र काव्याचा संग्रह भारत-गौरव ग्रंथमालेनें प्रसिद्ध केला आहे. त्यांत यांच्या लहानमोठ्या ८९ कविता आहेत. यांच्या विखुरलेल्या कविता एकत्र करण्याचें काम नांदेडचे कवि राजेश्वर यादव मुळावेकर (यादवसुत) यांनीं केलें आणि यांच्या काव्याचा परिचय श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यांनीं लिहिला. प्रा. रा. श्री. जोग यांनींहि आपल्या अर्वाचीन मराठी काव्य-ग्रंथांत यांच्या काव्यांचें समालोचन केलें आहे.

**चंद्रात्रेय, लक्ष्मण नारायणशास्त्री**—(जन्म स. १८५२-मृत्यु स. १९२०) शुक्ल यजुर्वेदाचे मराठी भाषान्तरकार, कुंडनिर्माणशास्त्रज्ञ व अभ्यासी गृहस्थ.

हे नाशिक जिल्ह्यांतील सटाण्याचे राहणारे. यांचे वडील संस्कृत व्याकरणांत निष्णात होते म्हणून त्यांना व्याकरणाचार्य अशी पदवी प्राप्त झाली होती. हे सटाणें येथें भिक्षुकी करीत. पुढें मराठी सहावी (व्ह. फा.) पास झाल्यावर यांनीं मामलेदार कचेरींत नोकरी धरली. नाशिक जिल्ह्यांतील सर्व तालुक्यांत यांची बदली झाली होती. कांहीं दिवस तगाई-मामलेदारहि होते. कुशल जमाबंदी कारकून म्हणून जिल्हाधिकाऱ्यांना हे माहीत होते. यांनीं वडिलांच्या जवळ व स्वतःच्या अभ्यासानें संस्कृत वाङ्मयाचा अभ्यास केला. हे नाशिकचे कलेक्टर मि. जॅक्सन यांना संस्कृत संशोधनांत मदत करीत असत. या जॅक्सनसाहेबांचा पुढें नाशिक येथें राजकीय कारणानें खून झाला.

उत्तम व्याख्याते, पुराणिक व विद्वान् म्हणून त्या जिल्ह्यांत यांची ख्याति होती. यांचें वैदिक व श्रौत याज्ञिक विषयांचें चांगलें वाचन असे. कुंडनिर्माणशास्त्राचा सखोल अभ्यास होता. नाशिकच्या सोमयज्ञांत भाग घेतला होता व अनेक शतचंडी यज्ञ स्वतः यांनीं पार पाडले होते.

हे उत्तम संस्कृत कवि होते. एकाद्या नैमित्तिक प्रसंगावर लगेच हे संस्कृतांत कविता करीत. यांनीं चारी धाम यात्रा केल्यावर यात्रेचें सविस्तर वर्णन संस्कृत कवितांत करून ठेविलें आहे.

यांचा शुक्ल यजुर्वेदाचा सांग अभ्यास होता. शुक्ल यजुर्वेदाच्या वाजसनेय शाखेचें मराठी भाषान्तर यांनीं पूर्णतेला नेलें. तें मंत्र, अन्वय, शब्दार्थ, अर्थ, भावार्थ, विनियोग व व्याकरण प्रतिपादक टीपा अशा स्वरूपांत आहे. त्याचे पहिले पांच अध्याय 'वेदपुष्प' या नांवानें छापून प्रसिद्ध झाल्यावर छापलेले पाहण्यापूर्वीच एकाएकीं हे वारले. फलज्योतिषाचाहि यांचा अभ्यास होता. तत्संबंधीं स्वतः लिहिलेला यांचा एक हस्तलिखित ग्रंथहि

आहे. विद्यासंपादन हेंच ब्राह्मणाचें मुख्य कर्तव्य, असें हे मानीत व निष्कर्जी असणें ही आयुष्यांतील यशाची गुरुकिल्ली आहे असा हे उपदेश करीत.

**चंद्रात्रेय, प्रा. मोहिनीराज लक्ष्मण**—( जन्म स. १८९२ डिसें. ४ ) उत्तम गणिती, गणितसंशोधक व सार्वजनिक कार्यकर्ते.

घरची स्थिति अत्यंत गरिबीची असल्यानें स्वावलंबनानें हे मॅट्रिक झाले ( १९१० ). पण मॅट्रिक परीक्षेत मुंबई विश्वविद्यालयांत यांचा सहावा क्रमांक आला असल्यानें यांचें पुढील सर्व शिक्षण शिष्यवृत्ति मिळून झालें. फर्ग्युसन कॉलेजांत चारहि वर्षे पहिल्या नंबरची शिष्यवृत्ति यांची असे. बी. ए. च्या परीक्षेंत हे गणित विषय घेऊन पहिल्या वर्गात दुसरे आले ( १९१४ ). फर्ग्युसन कॉलेजांत फेलो म्हणून दोन वर्षे यांनीं काढलीं. मिश्रगणित घेऊन एम्. ए. मध्यें पहिल्या वर्गांत पहिले आल्यानें 'चॅन्सेलर्स मेडल' यांना मिळालें (१९२६). मुंबई युनिव्हर्सिटींत मिश्रगणित घेऊन फर्स्ट क्लासांत पहिले येणारे हे पहिलेच विद्यार्थी होत.

यांनीं डेक्कन, इस्माईल, एंजिनिअरिंग या कॉलेजांत व रॉयल इन्स्टिटयूट इत्यादि संस्थांत प्राध्यापकाचें काम केलें. प्रारंभापासून गणिताचे उत्तम अध्यापक म्हणून यांची कीर्ति आहे. यांचे देखरेखीखालीं 'डेम्लो-नंबर्स'वर यांचे एक विद्यार्थी डी. आर. काप्रेकर यांनीं बरेंचसें संशोधन केलें आहे. उदा. ४२५५५१३ ही अशी संख्या आहे. यांत ४२ + १३ = ५५ व मधील आंकडेहि ५,५ असेच आहेत. या असल्या संख्यांचे गुणधर्म व तत्संबंधीं विशिष्ट नियम शोधून काढल्यानें गणिताला मोठीच चालना मिळाली आहे. यांसंबंधीं नवीन नवीन संशोधन चालू असून संख्यालेखनांत त्यामुळें बरीच भर पडण्याची शक्यता आहे. असल्या संख्यांबद्दल युरोपांतहि कुतूहल निर्माण झाल्याचें दिसतें.

गणितविषयांतील 'सापेक्षतासिद्धान्त' गणिताचा यांचा अभ्यास उच्च दर्जाचा असून त्या विषयांत हे हिंदुस्थानांतील निरनिराळ्या विश्वविद्यालयांत एम्. ए. चे परीक्षक असतात. या विषयांत यांनीं 'सापेक्षता सिद्धान्ताचें ध्येय' या नांवाचें एक पुस्तकहि लिहून प्रसिद्ध केलें आहे. या विषयासंबंधीं कांहीं नवीन कल्पना मांडण्याचे यांचे प्रयत्न आहेत. यांनीं इतरहि गणितविषयांत थोडें संशोधन केलें आहे.

यांनीं प्राचीन हिंदूंच्या गणिताचाहि अभ्यास केला असून 'सूर्यसिद्धान्ताचें नवीनीकरण' या नांवाच्या ग्रंथांत सूर्यसिद्धान्ताची मांडणी यांनीं नवीन पद्धतीनें केली असून प्राचीन गणित ज्योतिषाच्या उपयोगाचा नवीन मार्ग दाखविला आहे.

यांनीं आपल्या वडिलांच्या हाताखालीं यज्ञकुंडनिर्माणशास्त्राचा अभ्यास केला आणि त्या विषयांत चांगला अधिकार संपादन केला. तसेंच 'कुंडार्क' नांवाच्या संस्कृत ग्रंथावर उपपत्तीसह विवेचन करणारा ग्रंथ तयार केला.

ज्ञानकोशांत गणित विभागांत बीजभूमिति व शून्यलब्धि अथवा कलनशास्त्र या विषयावर लिहिलेले लेख यांचे आहेत. कॉलेजकरितां इंग्रजींत 'बीजभूमिति'वर पुस्तक लिहिलें असून तें बरेंच वाखाणलें गेलें. बी. ए. करितांहि स्थितिशास्त्र, गणितशास्त्र, त्रिपरिमाणभूमिति इत्यादि पुस्तकें यांनीं लिहिलीं आहेत.

धार्मिक मनःप्रवृत्ति असल्यानें स्वतःच्या माध्यंदिन शाखेच्या उन्नतीकरितां नव्या विशिष्ट कल्पनांनीं हे परिश्रम करीत असून तत्संबंधीं अखिल महाराष्ट्रांतील मध्यवर्ति मंडळाचे कार्याध्यक्ष आहेत. गरीबांना मदत करण्याची व आपले विचार निर्भयपणें मांडण्याची यांची सतत तयारी असते.

**चापेकर, दामोदर हरि**—( जन्म स. १८७०–फांशी स. १८९७ ) पुण्याचे प्लेग अधिकारी रँड यांना खून करणारा मनुष्य.

**चापेकर, बाळकृष्ण हरि**—( जन्म स. १८७३–फांशी स. १८९९ मार्च १३ ) पुण्याचे प्लेग अधिकारी लेफ्टनंट आयर्स्ट यांचा खून करणारा मनुष्य.

**चापेकर, वासुदेव हरि**—( जन्म स. १८७९–फांशी स. १८९९ मार्च १३ ) वरील दोघा बंधूंची खुनी म्हणून माहिती देणाऱ्या द्रविडबंधूंचा खून करणारा म्हणून यास फांशीची शिक्षा झाली. हे तिघेहि सख्खे बंधु असून एका कीर्तनकाराचीं मुलें होतीं. यांना लष्करांत शिरण्याची इच्छा होती. पण ब्राह्मण म्हणून यांना लष्करांत शिरण्यास बंदी झाली. द्रविडबंधूंचा खून झाला त्याच्या दुसऱ्या दिवशीं चौकशीकरितां पकडून यांना फरासखान्यांत नेलें असतां तेथें फौजदार रामजी पांडू हे यांना कांहीं टाकून बोलले. तेव्हां यांनीं लपवून आणलेलें सहा बारी पिस्तुल अंगरख्यांतून बाहेर काढून तें प्रथम रामजी पांडू व नंतर ब्रुइनवरती झाडलें. तेव्हां यांच्यावर झडप घालून यांना पकडण्यांत आलें. यांच्या-

बरोबर यांचा रानडे नांवाचा एक मित्र होता, त्यालाहि फांशीची शिक्षा देण्यांत आली. शिक्षा सुनावण्यांत आली तेव्हां यांनीं 'पुढल्या जन्माची शिक्षाहि वाटेल तर आतांच द्या' असा जबाब दिला.

**चापेकर, नारायण गोविंद**—(जन्म स. १८६९) समाजशास्त्र, ग्रामसंस्था, संस्कृत नि मराठी वाङ्मय यांचे अभ्यासक, स्वतंत्र विचाराचे प्रतिपादक व सार्वजनिक कार्यकर्ते.

जन्म मुंबईस आणि तेथेंच एल्‌एल्. बी. अखेर शिक्षण झालें. ठाण्यास चार वर्षें वकीली केल्यानंतर मुन्सफ म्हणून यांची नेमणूक झाली. स. १९२५ सालीं फर्स्टक्लास सबजज्जाच्या जागेवरून हे सेवानिवृत्त झाले.

१९२७ पासून महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्याध्यक्ष व महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचे आठ वर्षें हे संपादक होते. १९३१ पासून औंध संस्थानांत हायकोर्ट जज्ज नेमण्यांत आले. बडोदे येथें भरलेल्या मराठी साहित्य संमेलनाचे हे अध्यक्ष होते (१९३४).

यांची पहिल्यापासून चौकस व अभ्यासू वृत्ति असून आस्थेवाईकपणानें विचार करण्याची व मांडण्याची वृत्ति विशेष आहे. खेडेगांवांत राहण्यावर यांचा कटाक्ष असून ग्रामसंस्थेचा सूक्ष्म अभ्यास आंकड्यांनिशीं तपशीलवार मांडून यांनीं आपला 'आमचा गांव-बदलापूर' हा महत्त्वाचा ग्रंथ प्रसिद्ध केला.

'पुढारलेल्या माणसांच्या सहवासानें खेड्यांतील मागासलेले लोक सहजच सुधारतात. तो एक शिक्षणाचा प्रकार आहे. तसेंच क्षुद्र अंमलदाराच्या अन्यायी वागणुकीस अंशतः कां होईना, पण आळा बसतो. याबरोबरच खेड्यांतील परंपरागत संस्कृति अभ्यासण्याची संधि मिळते, ती निराळीच. याकरितां सुशिक्षितांनीं खेड्यांत राहिलें पाहिजे व खेड्यांतील लोकांशीं आपलेपणाचा निकटचा संबंध ठेवला पाहिजे. सध्यां शहरांतील लोक खेड्यांतील जनतेशीं अत्यंत तुटकपणें वागतात, ही गोष्ट अत्यंत हानिकारक आहे. खेड्यांत राहून समाजाच्या घटनेकडेहि लक्ष दिलें पाहिजे. समाजांत होणाऱ्या प्रत्येक घडामोडीच्या मागें एकच कारण नसून अनेक कारणें असतात. तीं सर्व समजून घेतल्यावांचून कोणत्याहि घटनेचें आकलन होत नाहीं.'—खेड्यांशीं निकट संबंध ठेवण्याची व तेथील समाजरचनेचा सूक्ष्म अभ्यास करण्याची यांची ही दृष्टि अत्यंत महत्त्वाची आहे. या आपल्या कल्पनेप्रमाणें हे प्रत्यक्ष वागण्याचा प्रयत्न करीत असतात.

यांचें वाङ्मय—

१ पैसा, २ गच्चीवरील गप्पा, ३ एडमंड बर्कचें चरित्र, ४ निवडक लेख, ५ वैदिक निबंध, ६ आमचा गांव-बदलापूर, ७ समाजनियंत्रण, ८ साहित्यसमीक्षण, ९ चापेकर, १० चित्पावन, ११ हिमालयांत, १२ रजःकण, १३ जीवनकथा, १४ पेशवाईच्या सावलींत.

**चावरे, निलकंठराव**—(जन्म स. १८९७) अमेरिकेंतील फोर्डच्या कारखान्यांतील सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय एंजिनियर.

यांचा जन्म सातारा येथें झाला. यांचें मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण मात्र कोल्हापुरांतील 'राजाराम हायस्कूल'मध्यें झालें. कै. शाहूमहाराजांच्या मनांत केवळ प्रवासखर्च देऊन चार विद्यार्थ्यांना परदेशांत पाठवून ते पुढें स्वावलंबनानें काय करतात हें पाहण्याची कल्पना आली. त्या चार विद्यार्थ्यांत यांची निवड झाली आणि हे अमेरिकेस रवाना झाले (१९१५). तेथें हे चौघेहि विद्यार्थी एकत्र राहत. यांना तेथें फक्त दोन महिने पुरेल एवढाच खर्च देण्यांत आला होता. पण तेवढ्या रकमेंत यांना तेथें एक महिना काढणेंहि अशक्य झालें. तेव्हां प्रत्येकानें कोठें तरी नोकरी पत्करिली. यांनीं एका रेस्टॉरंटमध्यें वेटरची नोकरी पत्करिली आणि दोन वर्षांत हे तेथील वेटर्सचे मुख्य बनले.

अशीं तीन वर्षें गेल्यानंतर हे मिसेस ओक्स नांवाच्या पंचावन्न वर्षें वयाच्या विधवाबाईच्या घरीं मुलें संभाळणें वगैरे कामाकरितां राहिले. आणि त्या घरांतील लोकांचा यांनीं विश्वास संपादन केला.

अमेरिकेंत पोंचल्याबरोबर आपल्या उपजीविकेच्या व्यवस्थेबरोबर मिशिगन युनिव्हर्सिटींत नांव घालून यांनीं एंजिनियरिंगच्या अभ्यासासहि सुरवात केली. तेथें यांनीं स्वावलंबनानें अभ्यासक्रम पुरा केला आणि मोठे हुषार विद्यार्थी म्हणून यांनीं तेथील प्राध्यापकांवर आपली छापहि बसविली. त्यामुळेंच प्रो. हॉपकिन्स यांनीं यांची शिफारस हेन्री फोर्ड यांच्याकडे केली आणि त्यांनीं यांना यांचा कोर्स पुरा होतांच आपल्या मोटारच्या कारखान्यांत घेतलें (१९२०). तेथें यांचा इतका लौकिक झाला कीं १९३१ सालीं 'गॉर्की प्लँट्स्'-मध्यें काम करण्यासाठीं सल्लागार म्हणून रशियन सरकारनें

यांना आपल्याकडे बोलावून घेतलें. प्रथम अडीचशें रशियन लोकांना मोटारी तयार करण्याचें शिक्षण घेण्याकरितां अमेरिकेंत पाठविण्यांत आलें होतें. त्याचें शिक्षण पूर्ण झाल्यावर अमेरिकेंतून पांच सल्लागार मागविण्यांत आले, त्यांत हे पहिले होते.

प्रथम हे सहा महिन्यांच्या मुदतीनें रशियांत गेले पण तेथें यांच्या सल्लामसलतीचें महत्त्व इतकें वाटलें कीं यांची वर्षावर्षाची मुदत पांच वेळां वाढवून घेण्यांत आली आणि अशा तऱ्हेनें यांचा रशियांतील मुक्काम साडेपांच वर्षं झाला (स. १९३१-३७). यांनीं रशियन लोकांचा इतका विश्वास संपादन केला कीं अजूनहि हे त्यांचे सल्लागार आहेत. हे १९२१ सालीं व १९३९ सालीं हिंदुस्थानांत आले होते. यांच्यासंबंधीं विश्वेश्वरय्या यांनीं पुढील उद्गार काढले आहेत, 'He is a Man who knows his business well.'

**चांदोरकर, गोविंद काशिनाथ**—(मृत्यु स. १९२१) मराठी इतिहास-संशोधक. यांचीं आर्यलिपी (१९०८) व महाराष्ट्रीय संतकविकाव्यसूचि (१९१६) हीं दोन पुस्तकें प्रसिद्ध आहेत.

हे धंद्यानें वकील असून धुळें येथें 'प्रभात' नांवाचें मासिक कांहीं दिवस चालवीत होते. यांनीं ज्ञानेश्वराचा योगवासिष्ठ ग्रंथ शोधून काढला.

**चांदोरीकर, त्र्यंबकशास्त्री अमृतशास्त्री**—(जन्म स. १८६२–मृत्यु स. १९४३) बनारसमधील नामांकित वैद्य.

यांचें घराणें नाशिक जिल्ह्यांतील चांदोरी गांवचें. हे वासिष्ठगोत्री देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण. यांचे आजोबा पं. विष्णुशास्त्री प्रथम काशीवास करण्यास चांदोराहून आले. त्यांचे पुत्र पं. अमृतशास्त्री काशींत पुराण सांगत व वैद्यकीचाहि व्यवसाय करीत. विद्वान् व सच्छील म्हणून काशींत त्यांचा मोठा मान असे. यांच्या घराण्यांत पांच पिढ्या आयुर्वेदाची परंपरा चालू होती. आयुर्वेदाचें शिक्षण यांनीं वडिलांपाशींच घेतलें. पं. बाळशास्त्री रानडे व बाबाशास्त्री यांचेजवळ यांनीं संस्कृतमधील इतर शास्त्रांचें अध्ययन केलें. अमृतशास्त्रींच्या आग्रहावरून यांना शिकविण्याकरितां बाबाशास्त्रींना आपला संन्यासग्रहणाचा बेत चारपांच वर्षं पुढें ढकलावा लागला. हेच बाबाशास्त्री संन्यासग्रहणानंतर श्रीपूर्णाश्रम या नांवानें प्रसिद्ध झाले.

वयाच्या छत्तिसाव्या वर्षी यांचे वडील दिवंगत झाले. तोंपर्यंत अध्ययन व व्यायाम हे दोनच उद्योग यांनीं केले. हे १९०० पर्यंत जोर रोज काढीत. यामुळें ब्यायशीं वर्षांपर्यंत यांची शरीर-प्रकृति व अध्ययनाची उपस्थिति उत्कृष्ट प्रकारची असे.

वडिलांचे मागें यांनीं आपला वैद्यकीचा व्यवसाय सुरू केला. आरंभीं हे व्हिजिट फी एक रुपया घेत, पण शेवटीं यांची व्हिजिट फी बावन्न रुपये झाली. तरीहि किती तरी रोग्यांना दररोज निराश व्हावें लागे. परगांवीं जाण्यास तर हे दर दिवसास हजार रुपयेसुद्धां घेत.

यांच्या चिकित्सेची पद्धत अशी असे कीं, यांनीं एकदां रोगी तपासला कीं, त्याची संपूर्ण हकीगत तो रोगी पूर्ण बरा होईपर्यंत यांचे डोक्यांतून जात नसे. मग त्याला बरें करण्याकरितां हे अविश्रान्त खटपट करीत. रोगी गरीब असो किंवा श्रीमंत असो, एकदां यांनीं केस हातांत घेतली कीं, त्याला लागतील तीं औषधें हे स्वतः तयार करीत. मग श्रम व पैसा यांची पर्वा यांनीं कधींच केली नाहीं. अर्जुनाला परीक्षेचे वेळीं झाडावरील राघूचा कंठच दिसत असे, त्याप्रमाणें यांना फक्त हातीं घेतलेल्या रोग्याचे रोग व त्यांवरील उपाय एवढ्याच गोष्टी दिसत. परंतु इतक्या परिश्रमानें आपलें स्वतःचें काम करीत असतांना रोग्याचे वृत्तींत जर धरसोड आढळली तर मात्र हे अतिशय रागावत.

निरनिराळ्या असाध्य किंवा कष्टसाध्य रोगांवर काय उपाययोजना करावी यासंबंधीं यांचा अहोरात्र विचार चालू असे. रात्रीं एकान्तांत एखाद्या पट्टशिष्याला जवळ घेऊन उपाय-योजनेसंबंधीं हे विचार करीत. रात्रीं तीन चार तासांपेक्षां अधिक झोप यांनीं कधींच घेतली नाहीं. पहाटे तीनच्या सुमारास उठून हे आवश्यक ग्रंथावलोकन करीत. अशा प्रकारच्या चिकित्सेनें व औषध-योजनेनें यांनीं शेंकडों लोकांना जीवदान दिलें. त्यामुळें यांची कीर्ति दिगंत झाली. मुंबई, कलकत्ता वगैरे ठिकाणीं जाण्याचा प्रसंग यांचेवर तर वरचेवर येई व यांना कीर्ति व धन यांचा भरपूर लाभ होई. पण निःस्पृहता व मानीपणा या यांच्या गुणांमुळें केवळ धनसंचय करण्याकडे यांची कधींच प्रवृत्ति नव्हती.

अध्यापन करण्याच्या कामीं यांनीं कधींच आळस केला नाहीं. आयुर्वेद शिकावयास येणाऱ्या विद्यार्थ्यास हे आनंदानें शिकवीत. दिवसांतून दोनतीन तास तरी

यांचे शिकविण्यांत जात. शिकवितांना यांना ग्रंथ कधींच हातांत घ्यावा लागत नसे. माधवनिदान, वाग्भट, सुश्रुत हे ग्रंथ यांना टीकेसुद्धां पाठ असत व इतर कित्येक ग्रंथ यांना अवगत असत. त्यामुळें यांचे विद्यार्थीहि चांगल्या योग्यतेस चढलेले आढळतात. कै. आप्पाशास्त्री साठे, मुंबई व वैद्य श्रीनिवासशास्त्री चुनेकर, बनारस हे यांचे प्रसिद्ध विद्यार्थ्यांपैकीं होत. श्री. श्रीनिवासशास्त्री चुनेकरांनीं नव्याजुन्या पद्धतींचा अभ्यास करून काशी प्रान्तांत सिद्धहस्त वैद्य म्हणून मोठा लौकिक संपादन केलेला आहे.

अत्यंत नीटनेटक्या राहणीचे म्हणून यांची प्रसिद्धी होती. सर्व कामाला हे ऊन पाणी वापरीत. थंड पाण्याला स्पर्शहि करीत नसत. दोन वेळां साधें जेवण व दोन वेळां मिळून एक शेर दूध हा यांचा आहार.

यांनीं सुमारें एक लाख रुपये खर्चून काशीस सुंदर वाडा बांधला व त्याचें नांव ' अमृतभवन ' असें ठेवलें. यांतील विविध सोयी व योजना पाहून यांच्या कलात्मक दृष्टीची कल्पना येते. चौथ्या मजल्यावर सुंदर संगमरवरी देवघराची योजना करून मध्यभागीं कुलदेवताची यांनीं स्थापना केली आहे व दोन्ही बाजूंना वडील व गुरु पं. बाबाशास्त्री यांच्या संगमरवरी मूर्ति बसविल्या आहेत.

यांनीं एकंदर सहा विवाह केले. शेवटला विवाह सत्तराव्या वर्षी झाला. त्या वेळीं यांनीं आपले दांत, स्नायु वगैरेंची शक्ति प्रदर्शित करून लोकांना निरुत्तर केलें. यांना पंचाननशास्त्री व षडानन असे दोन पुत्र आहेत. यांना हिंदुस्थान सरकारकडून वैद्यरत्न ही पदवी मिळाली.

**चिटणवीस, सर गंगाधरराव माधवराव**—( जन्म स. १८६३- मृत्यु स. १९२९ जून २७) मध्यप्रान्तांतील सुप्रसिद्ध जमीनदार, पुढारी व कायदेमंडळाचे अध्यक्ष.

यांचें शाळेंतील शिक्षण नागपूर येथील मिशनरी हायस्कूलमध्यें झालें व उच्च शिक्षणाकरितां यांनीं मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजांत प्रवेश केला. परंतु यांचे वडील रा. सा. माधवराव गंगाधरराव हे १८८५ सालीं वारल्यानें यांना कॉलेज सोडणें भाग पडलें.

स. १८८८ सालीं नागपूर जिल्हा बोर्डाचे उपाध्यक्ष झाल्यापासून यांच्या सार्वजनिक जीवनक्रमास सुरुवात झाली. नंतर तेथें व नागपूर म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष (१८९३-१९१८), व्हाइसरॉयच्या कायदेमंडळांतील मध्यप्रान्ताचे पहिले लोकनियुक्त सभासद, मॉंटफोर्ड-सुधारणांनंतर मध्यप्रान्त कायदेमंडळाचे अध्यक्ष ( १९२१-१९२५ ), नील सिटी हायस्कूल कमेटीचे व नेटिव्ह जनरल लायब्ररीचे अध्यक्ष वगैरे निरनिराळ्या सार्वजनिक संस्थांत पुढाकार घेऊन यांनीं लोकसेवेचें कार्य केलें.

हे स्वतः प्रभु ज्ञातीचे होते. प्रभु एज्युकेशन सोसायटीचे अध्यक्ष या नात्यानेंहि यांनीं आपल्या ज्ञातीची सेवा चांगल्या प्रकारें केली.

औद्योगिक चळवळींतहि यांचें लक्ष होतें. पुलगांव गिरणी कंपनीचे चेअरमन व नागपूरच्या स्वदेशी मिलच्या कामांतहि हे लक्ष घालीत.

यांची राहणी व पोषाख हीं जुन्या पद्धतीचीं असत. हिंदुधर्माचा यांना मोठा अभिमान असे. तथापि इतर धर्माच्या लोकांविषयीं यांची वागणूक अत्यंत प्रेमाची व आदराची असल्यानें त्यांच्यांतहि यांची मानमान्यता चांगली असे.

१९०० सालीं लाहोर येथें भरलेल्या राष्ट्रसभेचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याविषयीं यांना विनंति करण्यांत आली होती. पण यांनीं ती कांहीं खासगी कारणानें नाकारली.

नागपूर येथें मशिदीवरून वाद्यें वाजवीत जाण्याचा हिंदूंनीं सत्याग्रह केला तेव्हां यांनीं त्यांत भाग घेतला होता.

**चिटणीस, मल्हार खंडेराव**—(जन्म स. १८६०- मृत्यु स. १९०८ ) उमरावती येथील प्रसिद्ध वकील, मराठी कवि व ग्रंथकार.

यांचे ग्रंथ—१ अन्तरिक्षांतील चमत्कार ( १८९६ ), २ नवकुसुममाला ( १९०७ ).

**चित्रावशास्त्री, सिद्धेश्वर विष्णु**—( जन्म स. १८९४ फेब्रु. १ ) वेदशास्त्रांचे अभ्यासक, ऋग्वेदाचे भाषान्तरकार, चरित्रकोशकार, धर्मतत्त्वाचे प्रचारक व सार्वजनिक कार्यकर्ते.

जन्मस्थान पुणें. शिक्षण संस्कृतपाठशाळा पुणें येथें झालें. व्याकरणाचें भाष्यान्त व इतर शास्त्रांचे प्राथमिक ग्रंथ शिकल्यानंतर वेदशास्त्रोत्तेजक सभेच्या कांहीं परीक्षा यांनीं दिल्या. पुढें चिदंबरपीठाच्या आचार्यांकडून 'विद्यानिधि'

ही पदवी मिळाली. यांना आधुनिक शालेय पद्धतीच्या शिक्षणाचा लाभ बिलकूल मिळाला नाहीं.

'आचार्य' पाक्षिकाच्या सहसंपादकाचें काम कांहीं वर्षें केल्यानंतर मुंबईच्या संस्कृतपाठशाळेवर मुख्याध्यापक म्हणून यांची नेमणूक झाली. तेथें कांहीं काल काम केल्यावर ज्ञानकोशमंडळांत सहसंपादक म्हणून यांची नेमणूक होऊन वैदिक विभागाचें काम यांच्याकडे देण्यांत आलें. तेथें प्रस्तावनाखंडांपैकीं दुसऱ्या खंडांतील कांहीं भाग व तिसऱ्या खंडांतील 'दाशराज्ञ युद्ध' व 'वैदिक शब्दसृष्टि' हीं दोन महत्त्वाचीं प्रकरणें यांच्या हातून तयार झालीं. विशेषतः दाशराज्ञयुद्धासंबंधीं व्यक्तींचे उल्लेख सर्व ऋग्वेदभर सांपडत असल्याचें दर्शवून त्या युद्धानंतर ऋग्वेदांतील मंत्रांची रचना झाली असल्याचें तेथें प्रथमच सप्रमाण प्रगट करण्याची संधि यांना मिळाली (१९१९–१९२१).

ज्ञानकोशांत असतांनाच सरस्वतीमंदिर ही संस्था काढण्यांत यांनीं भाग घेतला आणि ज्ञानकोशांतील काम समाप्त झाल्यावर यांनीं विद्याप्रसारिणी सभा काढून तिच्यातर्फे भारत हायस्कूल व त्याला अंगभूत असणाऱ्या संस्था काढण्यांत भाग घेतला. तसेंच वैदिक संशोधन-मंडळ, दे. ऋ. ब्रा. सभा पुणें व हिंदु मिडल क्लास हाउसिंग सोसायटीच्या संस्थापकांपैकीं हे एक आहेत.

पुणें येथें हिंदुसभा स्थापन झाल्यापासून प्रथम पुणें हिंदुसभा व नंतर महाराष्ट्र हिंदुमहासभा यांचे हे अध्यक्ष होते (१९२४-३६). त्या वेळीं यांनीं महाराष्ट्रांत व महाराष्ट्राच्या बाहेर हिंडून व्याख्यानें वगैरे देऊन सभेच्या राजकीय व सामाजिक कार्याचा प्रभावी प्रचार केला. शुद्धीची शास्त्रीयता सप्रमाण सिद्ध करून शुद्धीचा विधि आतांपर्यंत कोणीं लिहिला नव्हता तो नवा तयार केला, त्याला यवतमाळ येथें भरलेल्या महाराष्ट्र हिंदुधर्मपरिषदेच्या अधिवेशना-कडून मान्यता घेतली आणि शेंकडों लोकांना स्वतः शुद्ध करून घेतलें. प्रायः तो विधि आतां सर्वत्र प्रचलित झाला आहे.

शुद्धीचें काम सतत चालावें म्हणून 'श्रद्धानंद शुद्धि निधि' नांवाचा पांच हजारांचा निधि यांनीं जमा केला आणि तो विश्वस्त नेमून त्यांच्या ताब्यांत दिला. त्याप्रमाणें विहारभूकंपनिधि व काश्मीरनिधि म्हणून हजारों रुपये जमवून ती रक्कम आपद्ग्रस्तांकरितां तिकडे पाठवून दिली.

पुणें येथें भरलेल्या ब्राह्मण्यसंरक्षक परिषदेचे हे मुख्य कार्यकर्ते होते (१९२२). महाराष्ट्र हिंदुधर्म परिषदेच्या मुख्य कार्यवाहाचें काम यांनीं पुष्कळ वर्षें केलें. हे पुणें येथें कै. राजे लक्ष्मणराव भोसले यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या त्या परिषदेचे मुख्य कार्यवाह होते (१९२४) आणि पुनः पुणें येथें बॅ. जमनादास मेहेता यांचे अध्यक्षतेखालीं अधिवेशन भरलें तेव्हां हे स्वागताध्यक्ष होते (१९३२); तसेंच पुणें येथें भरलेल्या अखिल भारतीय शुद्धिसभेचेहि हे स्वागताध्यक्ष होते (१९३५). शुद्ध झालेल्या गावड्यांच्या अडचणी दूर करण्याकरितां गोव्याच्या पोर्तुगीज गव्हर्नरकडे अखिल भारतीय हिंदुसभेनें पाठविलेल्या शिष्टमंडळाचे हे सदस्य व चिटणीस होते (१९३०).

टिळक महाविद्यालयांतील संस्कृतचे प्राध्यापक, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, नागपूर युनिव्हर्सिटी व वेदशास्त्रो-त्तेजक सभा येथें वेद, धर्मशास्त्र व उभय मीमांसांमध्यें यांनीं अनेक वेळां परीक्षक म्हणून काम केलें.

प्रयाग, सोनगीर, मुंबई, पुणें वगैरे ठिकाणीं भरलेल्या अखिलभारतीय विद्वत्परिषदेंत प्रतिनिधि म्हणून हे उप-स्थित होते आणि तेथें यांनीं महत्त्वाचा भाग घेतला. 'स्वधर्म' साप्ताहिकाच्या सहसंपादकाचें कामहि यांनीं बरींच वर्षें केलें. सार्वजनिक कार्यांबरोबरच यांनीं केलेली वाङ्मयसेवा विविध आणि महत्त्वाची आहे. नित्यकर्म, संस्कार, धर्म वगैरे विषयांवर यांनीं लिहून प्रसिद्ध केलेलीं पुष्कळ पुस्तकें सूक्ष्म अभ्यास व उप-युक्तता या दृष्टींनीं महत्त्वाचीं ठरलीं असून त्या प्रत्येकाच्या अनेक आवृत्त्या निघाल्या आहेत.

मराठी भाषेंत ऋग्वेदाचें भाषान्तर करण्याचें काम अनेकांनीं आरंभिलें, पण तें संपूर्ण करण्याचें भाग्य प्रथम यांनाच लाभलें. यांनीं इतरांप्रमाणें आपलें भाषान्तर अपुरें राहिलें तरी अनेकांचें मिळून मराठींत निदान एकतरी भाषान्तर पुरें व्हावें म्हणून उलट क्रमानें भाषान्तर करण्यास सुरवात केली. ऋग्वेदाचें भाषान्तर पूर्ण झाल्यानंतर 'ऋग्वेदाचा उपसंहार' लिहिण्याची मनीषा यांनीं धरली. त्याकरितां प्राचीन वेदादि पुराणान्त वाङ्मयाचा साग्र अभ्यास करण्यास यांनीं सुरवात केली. त्यांतूनच पुढें चरित्रकोशाची कल्पना उदय पावली, ती भारतवर्षीय चरित्रकोश मंडळ लि. स्थापून प्राचीन, मध्ययुगीन व आतां अर्वाचीन चरित्र-कोश प्रसिद्ध होऊन पूर्ण होत आहे. यांपैकीं प्राचीन

चरित्रकोश हा ग्रंथ संशोधन, मांडणी, बिनचूकपणा व आधारांसह दिलेल्या भरपूर माहितीमुळें मराठींत तर अपूर्व आहेच, पण इंग्रजी भाषान्तर झाल्यास जगांत महत्त्व पावण्याच्या योग्यतेचा आहे असें त्यासंबंधीं तज्ज्ञांचें मत आहे.

यांचें वाङ्मय :

नित्यकर्म—१ संध्या, २ ब्रह्मयज्ञ, ३ वैश्वदेव, ४ पूजा, ५ श्राद्धप्रयोग; संस्कार–६ चौल, ७ उपनयन, ८ समावर्तन, ९ विवाह, १० शुद्धि, ११ यज्ञोपवीत; धर्म–१२ गणेशाथर्वशीर्ष; विचार–१३ हिंदुधर्मतत्त्वसंग्रह, १४ धर्मशिक्षण, १५ देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मण; भाषान्तर—१६ ऋग्वेदाचें संपूर्ण मराठी भाषान्तर; कोश–१७ प्राचीन चरित्रकोश, १८ मध्ययुगीन चरित्रकोश, १९ अर्वाचीन चरित्रकोश; संस्कृत–२० महाभाष्य शब्दकोशः, २१ पाणिनीय सूत्रतत्परिशिष्टानां सूत्रपाठाः तेषां शब्दकोशाश्च (गव्हर्नमेंट ओरिएन्टल सिरीजमध्यें प्रसिद्ध ) इत्यादि.

**चिनॉय, सर सुलतान मेहेरअली**—( जन्म स. १८८५ ) एफ. एम्. चिनॉय अँड कंपनी या सुप्रसिद्ध व्यापारी संस्थेचे उत्पादक व मॅनेजिंग डायरेक्टर.

भारदा न्यू हायस्कूल व एलफिन्स्टन कॉलेजमध्यें आपलें शिक्षण संपवून हे व्यापारधंद्यांत शिरले. 'बॉंबे गॅरेज' या मोटारी व पेट्रोल यांचा व्यापार करणाऱ्या मुंबईच्या सुप्रसिद्ध संस्थेचे हे प्रमुख संस्थापक आहेत. या संस्थेची अहमदाबादलाहि एक शाखा आहे. हिंदुस्थानांतील बिनतारी तारायंत्राची व्यापारी पद्धतीवर उभारणी करण्याची कल्पना यांची असून The Indian Radio and Cable Communications Co. Ltd. या संस्थेची स्थापना यांनीं त्याकरितां केलेली आहे.

**चिपळुणकर, कृष्णशास्त्री हरि**—( जन्म स. १८२४–मृत्यु स. १८७८ मे २० ) सुप्रसिद्ध पंडित व मराठी लेखक.

यांचा जन्म पुणें येथें झाला. पुणें विश्रामबागेंतील पाठशाळेंत यांनीं संस्कृताचें अध्ययन केलें. यांचे गुरु विख्यात पंडित मोरशास्त्री साठे. त्यांच्यापाशीं यांनीं अलंकार, न्याय व धर्म या तीन शास्त्रांचा अभ्यास केला. यांची बुद्धिमत्ता विशाल असल्याचें पाहून यांना ते 'बृहस्पति' म्हणत. संस्कृताचा अभ्यास संपविल्यावर तेथेंच सुरू झालेल्या पूना कॉलेज या इंग्रजी शाळेंत यांनीं इंग्रजीचा अभ्यास केला. आणि अर्थशास्त्र, मानसशास्त्र, तर्कशास्त्र वगैरे शास्त्रांवरील ग्रंथांचें यांनीं चांगलें पर्यालोचन केलें. विद्याभ्यास आटोपल्यावर यांना ट्रान्स्लेटर एक्झिबिशनरची जागा सरकारनें दिली ( १८५२ ). यापुढें पुणें पाठशाळेंत असिस्टंट प्रोफेसर, दक्षिणा प्राइज कमेटीचे सेक्रेटरी, पुना ट्रेनिंग कॉलेजचे प्रिन्सिपल इत्यादि जागांवर बदलत बदलत शेवटीं १८६८ सालीं यांची बदली 'रिपोर्टर ऑन दि नेटिव्ह प्रेस' या जागेवर झाली.

या वेळीं खिस्ती धर्मोपदेशकांचा फार सुळसुळाट झाला होता. बाटाबाटीचा प्रकार फार मोठ्या प्रमाणांत चाले. त्याला आळा घालण्यासाठीं ख्रिस्तीमताचें खंडनार्थ यांनीं 'विचारलहरी' नांवाचें पाक्षिक सुरू केलें ( १८५२ ). ट्रेनिंग कॉलेजांत असतां शाळापत्रकाचें संपादकत्व यांच्याकडेच होतें. शालापत्रकांतून प्रसिद्ध झालेल्या व्याकरणावरील २५ निबंधांखेरीज यांचें लिखाण भाषान्तर स्वरूपाचें आहे. यांनी संस्कृत व इंग्रजी ग्रंथांचीं भाषान्तरें करून शुद्ध मराठी भाषा कशी लिहावी यांचें चांगलें वळण लावून दिलें. यांचे भाषान्तरित ग्रंथ शुद्ध, सरळ व सुगम लेखनपद्धतीमुळें भाषान्तरित असल्याची कल्पनाहि येत नाहीं. हे उत्तम वक्ते असून त्या वेळचे पुण्याचे पुढारी गणले जात असत. हे मतानें सुधारक असून पुनर्विवाह वादांत अनुकूलपक्षाचे पंच होते.

यांचें वाङ्मय–१ अरबी भाषेंतील सुरस व चमत्कारिक गोष्टी, २ अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह १८६१, ३ अर्थशास्त्र परिभाषा १८५५, ४ साक्रेतिसाचें चरित्र १८५२, ५ रासेलस १८७३, ६ पद्यरत्नावलि–काव्यसंग्रह १८६५, ७ दादोबाकृत व्याकरणावरील टीकात्मक लेख.

**चिपळुणकर, गणेश विष्णु**—( जन्म स. १८६५– मृत्यु स. १९०६ ) स्वदेशी को–ऑ. स्टोअर्सचे व्यवस्थापक व भारतादि ग्रंथांचे मराठी भाषान्तर प्रसिद्ध करणाऱ्या चिपळुणकर आणि मंडळीचे उत्पादक.

यांचा जन्म भोर येथें आजोळीं श्री. फाटकांकडे झाला. वडील अगदीं बालपणीं वारल्यानें संगोपन मामांनीं केलें. पुण्यास बुधवारांत प्रथम यांचें शिवणकामाचें दुकान होतें. त्यांतून यांनीं कापडदुकान चालू केलें. या दुकानाचें

रूपान्तर स्वदेशी को-ऑपरेटिव्ह स्टोअरमध्यें झालें. या स्टोअरची शाखा मुंबईस काळबादेवी रस्त्यावर आंग्रेवाड्यांत उघडण्यांत आली ( १९०४ ). हें काम चालू असतांच यांनीं ग्रंथप्रकाशनाचें काम हातीं घेतलें. भागवत व रामायण या ग्रंथांचें मराठी सुरस भाषान्तर विद्वान् लेखकांकडून करवून घेऊन तें प्रसिद्ध केलें. नंतर महाभारताचें भाषान्तर प्रसिद्ध करण्यास आरंभ केला. आदि व सभापर्व प्रसिद्ध केल्यावर वनपर्वाच्या प्रसिद्धीच्या वेळीं यांच्यावर अनेक आपत्ति कोसळल्या. दुसऱ्या भागाच्या प्रस्तावनेंत यांनीं त्याची माहिती दिली आहे. नंतर हे लवकरच वारले. पुढील भाग प्रसिद्ध करण्याचें काम यांचे सहकारी बाळकोबा ठकार वगैरेंनीं केलें.

**चिपळुणकर, गोपाळ महादेव**—( जन्म स. १८८४–मृत्यु स. १९२९ ) महाराष्ट्रांतील स्त्रीशिक्षणाचे सक्रिय पुरस्कर्ते व ग्रंथकार.

बी. ए. झाल्यावर हे मुंबईस शिक्षक होते (१९०९-११). नोकरीवर हक्क ठेवून अधिक शिक्षणासाठीं स्वतःच्या खर्चानें अमेरिकेस गेले. तेथें एम्. ए. होऊन परत येतांना इंग्लंड, फ्रान्स, जपान वगैरे देशांत जाऊन आले. येथील शिक्षणाधिकारी यांची तिकडील एम्. ए. पदवी लक्षांत घेऊनहि बढतीची जागा देण्याचें नाकारूं लागले तेव्हां यांनीं सरकारी नोकरीचा राजीनामा दिला व हे इंडियन वुइमेन्स युनिव्हर्सिटीचे आजन्मसेवक झाले. यांनीं अविश्रांत श्रम करून मोठमोठ्या देणग्या मिळविल्या व पुणें येथें शहरांत कन्याशाळा उघडली ( १९१८ ). शेवटपर्यंत या कन्याशाळेचे हे प्रधानाध्यापक होते. आरंभीं या शाळेंत ३ मुली होत्या, त्या त्यांच्या मृत्युसमयीं तेथें ४०० मुली झाल्या.

या शाळेच्या उत्कर्षाकरितां यांनीं फार खटपट केली. हिंगण्याच्या अध्यापिका शाळेचेहि हे सुपरिंटेंडेंट होते. अनाथबालिकाश्रमाकरितां भाऊबीजफंडाची कल्पना यांचीच. ती यांनीं चांगली यशस्वी करून दाखविली. सर्व आयुष्य यांनीं स्त्रीशिक्षणाकरितां खर्च केलें.

स्त्रियांच्या शिक्षणाबद्दल व्याख्यानें व लेख लिहिण्याचें काम यांचें सतत चालू असे. मासिक मनोरंजन, चित्रमयजगत्, यशवंत वगैरे मासिकांत यांचे अनेक महत्त्वाचे लेख प्रसिद्ध झाले. हे थिऑसॉफिकल सोसायटीचे सभासद होते. मृत्यूनंतर यांच्या अनेक आठवणी मनोरमा (१·१०) व यशवंत (१३) मासिकांत प्रसिद्ध झाल्या. यांच्या कार्यांत तडफ, तन्मयता आणि सातत्य दिसे.

यांचे ग्रंथ—१ सायंटिफिक बेसिस ऑफ वुइमेन्स एज्युकेशन, २ व्यायाम, ३ शुद्धलेखनाचा राजमार्ग, ४ स्त्रीजीवनविषयक प्रश्नावली, ५ औषधावांचून निरोगी कसें राहावें.

**चिपळुणकर, लक्ष्मण कृष्ण**—(जन्म स.१८५२–मृत्यु स. १९०० ) चरित्रकार व इतिहासकार. सुप्रसिद्ध कृष्णशास्त्री चिपळुणकरांचे हे द्वितीय चिरंजीव. बी. ए. झाल्यावर ( १८७५ ) हे वऱ्हाडांत शाळाखात्यांत नोकर होते. अकोला हायस्कूलचे हे कांहीं वर्षे मुख्याध्यापक होते. यांनीं आपले बंधु विष्णुशास्त्री यांचें विस्तृत चरित्र लिहिलें. त्याच्या दोन आवृत्त्या निघाल्या ( १८९४, १९२१ ).

यांचा महाराष्ट्राचा इतिहास हा दुसरा ग्रंथ होय ( १३१०–१७०७ ). हा ग्रंथ स्वतंत्र असून १८९४ पासून ग्रंथमालेंतून प्रसिद्ध झाला.

**चिपळुणकर, वासुदेव लक्ष्मण**—( जन्म स. १८७७ आगष्ट ४ ) सुप्रसिद्ध थिऑसफिस्ट, सार्वजनिक कार्यकर्ते, वक्ते व ग्रंथकार.

हे मॅट्रिक झाल्यावर वकील झाले व वऱ्हाडांत अकोला येथें वकिली केली ( १९०० ते १९४४ ). १९४४ पासून पुणें येथें येऊन राहिले. १९०१ पासून थिऑसफिकल सोसायटीचे सभासद. १९०३ पासून १९४४ अकोला येथील स्थानिक शाखेचे व १९२७–३८ पर्यंत महाराष्ट्रीय शाखेचे चिटणीस होते.

अकोला, विद्यार्थी साहाय्यक मंडळाचे कार्यवाह ( १९१४–१९४४ ), जेलमध्यें प्रवचनकार्य ( १९१२–१९२० ), बाबूजी देशमुख वाचनालय संस्थेचे कार्यवाह ( १९००–१९१५ ) व अध्यक्ष (१९१५–३७), जिल्हा हिंदुसभा कार्यवाह, म्युनिसिपालिटी–सभासद व सेक्रेटरी ( १९००–१९०५ ) इत्यादि सार्वजनिक कार्य यांनीं केलीं.

वाङ्मय—१ सिद्ध पुरुष व त्यांचा संप्रदाय ( सहलेखक ), २ थिऑसफी व तिचे टीकाकार, ३ अर्वाचीन चरित्रकोशांतील प्रमुख थिऑसफिस्टांचीं चरित्रें, ४ 'धर्मजागृति ' मासिक वगैरेंमधील लेख इ.

**चिपळुणकर, विष्णुशास्त्री कृष्ण**—( जन्म स. १८५० मे २०–मृत्यु स. १८८२ मार्च १७ ) अर्वाचीन मराठी वाङ्मयांतील प्रसिद्ध निबंधलेखक व

टीकाकार. यांच्या प्रभावी लेखनशक्तीनें महाराष्ट्रांत एक नवें युग सुरू झालें.

हे प्रसिद्ध कृष्णशास्त्री चिपळूणकरांचे ज्येष्ठ चिरंजीव होत. यांचा जन्म पुणें येथें झाला. यांचें पालनपोषण आजा-आजींनीं केलें. त्यामुळें आईबापांपेक्षांहि त्यांच्या-बद्दल यांच्या मनांत अधिक पूज्यभाव होता. प्राथमिक शिक्षण इन्फंट स्कूल नांवाच्या गांवठी शाळेंत होऊन घरीं तीन इयत्ता करून पूना हायस्कूलांत हे इंग्रजी चौथींत दाखल झाले ( १८६१ ) व वयाच्या सोळाव्या वर्षी मॅट्रिक झाले. पुढें पूना कॉलेजांत दाखल होऊन दुसऱ्या वेळीं हे बी. ए. परीक्षेंत उत्तीर्ण झाले (१८७२). कॉलेजांत असल्या वेळेपासून लेखनवाचनाचा यांना नाद होता. वडिलांनींहि वीस भागांनंतरचें रासेलसचें भाषान्तर यांच्याकडूनच करवून घेतलें. तें उत्कृष्ट उतर-ल्यानें यांना आत्मविश्वास उत्पन्न झाला आणि यांनीं ग्रंथरचना करण्याचा निश्चय केला. बी. ए. परीक्षा पदरांत पडतांच यांनीं संस्कृत कवि या लेखमालेस आरंभ केला.

पूना हायस्कूलमध्यें यांची नेमणूक झाली तेव्हां 'राजा शिवाजी' या काव्याचे कर्ते महादेव मोरेश्वर कुंटे हे मुख्याध्यापक होते. त्यांची विक्षिप्त व यांची अधिक स्वतंत्र वागणूक आणि अनियमितपणा यांमुळें दोघांत लवकरच वैमनस्य उत्पन्न झालें. १८७४ सालीं यांनीं 'निबंधमाला' मासिक सुरू केलें. त्यांत यांनीं मेकॉले, मॉरिस, मिल्ल वगैरे पाश्चात्य ग्रंथकार, हिंदु-स्थानांतील मिशनरी व त्यांच्या तंत्रानें वागणारे आपल्या-कडील स्वाभिमानशून्य सुधारक आणि सरकार यांच्यावर प्रखर तडाखे उडविण्यास सुरवात केली. तेव्हां हे वरच्या अधिकाऱ्यांच्या व त्यांच्या तंत्रानें वागणाऱ्या स्वकीयांच्या रोषास पात्र झाले आणि यांची बदली रत्नागिरीसारख्या दूरच्या ठिकाणीं करण्यांत आली.

आधींच सरकारी नोकरीची नावड व त्यांत वरील प्रकारानें यांना सरकारी नोकरीचा कंटाळा आला. 'निबंधमाला' सुरू होतीच. रत्नागिरीस जाण्यापूर्वी यांनीं 'काव्येतिहाससंग्रह' मासिक व 'चित्रशाळा' हे उद्योग सुरू केले होते. वरील सर्व सुरळित चालली होतीं व त्यांना लोकाश्रयहि लाभत होता. तेव्हां हे नोकरीचा राजीनामा देऊन पुण्यास परत आले. याच वेळीं 'किताबखाना' नांवाचें पुस्तकविक्रीचें दुकान यांनीं सुरू केलें. राजीनामा देण्यापूर्वीच स्वतंत्र शाळा काढण्याची कल्पना यांच्या मनांत होती. ती मूर्त स्वरूपांत आणण्याची संधि येतांच यांनीं आपले सहकारी रा. म. ब. नामजोशी व बाळ गंगाधर टिळक यांसमवेत १ जाने. १८८० रोजीं 'न्यू इंग्लिश स्कूल' नांवाची शाळा सुरू केली. या नव्या शाळेंतील ध्येय-प्रेरित विद्वान् व तरतरीत शिक्षकांमुळें या शाळेकडे विद्यार्थ्यांची रीघ लागली व इतर शाळांना परिणाम जाणवूं लागला. शेवटीं 'आर्यभूषण' हा स्वतंत्र छाप-खाना काढून केसरी व मराठा अशीं इंग्रजी व मराठी साप्ताहिकें मतप्रचारार्थ काढण्याचा संकल्प यांनीं जाहीर केला व त्याप्रमाणें तीं पत्रें सुरू झालीं. त्या वेळीं त्यांत बहुतेक वाङ्मयविषयक लेख यांचे असत.

निबंधमालेचे आठ वर्षांत ८४ अंक बाहेर पडले. काव्येतिहाससंग्रहांत बरोबरीनें काम करणारे रा. ब. का. ना. साने यांच्याशीं यांचें जमेना तेव्हां हे त्यांतून बाहेर पडले. रोज ग्रंथमाला वगैरे काढण्याच्या नव्या नव्या योजना चालू होत्याच. इतक्यांत केसरी-मराठ्या-वरील कोल्हापूरच्या बर्व्यांचा बेअब्रूचा खटला सुरू झाला. अशा दगदगींत यांना देवाज्ञा झाली.

यांनीं काढलेल्या सर्व संस्था आज अत्यंत भरभराटींत उत्कर्षाला चढलेल्या आहेत.

यांच्या लेखनाला १८६८ सालीं रासेलसच्या भाषा-न्तरानें सुरवात झाली. १८७१ मध्यें शालापत्रकाचें सर्वच काम वडिलांनीं यांच्यावर सोंपविलें. शेवटीं यांत मिशनऱ्यांवर कडक टीका येऊं लागली तेव्हां तें न आवडून शाळाधिकाऱ्यांनीं तें बंद केलें ( १८७५ ). त्यांत यांनीं जे निबंध लिहिले त्यांतील बरेचसे भाषा-न्तरित व रूपान्तरित आहेत. त्यांतल्या त्यांत चंद्र व तारे, मनुष्याचें आटोकाट ज्ञान वगैरे लेख सुंदर आहेत. स्वतंत्र लेखांत प्रवास व शिक्षकाचें ज्ञान हे लेख चांगले आहेत. निबंधमालेंतील सर्व लेखन यांचेंच आहे ( १८७४–१८८१ ).

यांचें वाङ्मय—१ निबंधमाला (८४ अंक), २ विनोद आणि महदाख्यायिका, ३ संस्कृत कविपंचक, ४ किरकोळ लेखांचा संग्रह, भाग १, २-संग्राहक खं. भि. बेलसरे.

मालेंतील मुख्य विषयांचे पुढीलप्रमाणें विभाग पडतात—

१ भाषाविषयक—मराठी भाषेची सांप्रतची स्थिति, भाषादूषण, लेखनशुद्धि, भाषापद्धति, भाषान्तर व इंग्रजी भाषा.

२ वाङ्मयविषयक व चर्चात्मक—इतिहास, वाचन, वक्तृत्व, विद्वत्त्व आणि कवित्व, ग्रंथावर टीका—डॉ. जॉन्सन, मोरोपंताची कविता.

३ परमतखंडन—लोकहितवादी.

४ सामाजिक—संपत्तीचा उपभोग.

५ राजकीय—आमच्या देशाची स्थिति.

६ मानसशास्त्र—गर्व या मुख्य विषयापेक्षां-( १ ) पत्रव्यवहार, ( २ ) चमत्कारिक माहिती, ( ३ ) भाषा-परिज्ञान, ( ४ ) सुभाषित, अर्थ-सादृश्य व साहित्य. ( ५ ) उतारे, ( ६ ) विनोद व महदाख्यायिका.

७ ग्रंथावर टीका—वेदार्थयत्न, तारा, रसायनशास्त्र, भारत-वर्षीय ऐतिहासिक कोश, ब्राह्मणांची गुलामगिरी, टेम्पेस्ट इ.

यांच्या मालेंतील लेखनामुळें आपणांस देशसेवेची व वाङ्मयसेवेची स्फूर्ति झाल्याचें कादंबरीकार ह. ना. आपटे, काळकर्ते शि. म. परांजपे, इतिहासाचार्य वि. का. राजवाडे, रसिक श्री. कृ. कोल्हटकर, अष्टपैलू साहित्यिक न. चिं. केळकर, संतवाङ्मयसेवक ल. रा. पांगारकर हे लोक मान्य करतात. या यांच्या अनुयायांवरून यांच्या त्या वेळच्या प्रभावाची स्पष्ट कल्पना होते.

यांचें लेखन मराठींत युगप्रवर्तक मानण्यांत येतें. यांनीं ओजस्वी लिखाण करून मराठी भाषा आणि महाराष्ट्रीय लोक यांच्यांत आत्मविश्वास उत्पन्न केला. इंग्रजांनीं राजकीय परतंत्रतेबरोबर मानसिक गुलामगिरीहि पराकाष्ठेची उत्पन्न केली होती. तिचा प्रतिकार करण्यास तितकाच कठोर हल्ला करणारा पुरुष निर्माण व्हावयास पाहिजे होता. तो यांच्या रूपानें अवतरला. धर्म, चालीरीति, वाङ्मय वगैरेंची जितक्या उत्कटतेनें पायमल्ली चालली होती तितक्याच उत्कटतेनें प्रतिहल्ला करणारे हे भेटले. यांनीं देशांतील विचारांची दिशाच बदलण्याचें प्रमुख काम केल्यामुळें यांनीं आपणांस 'मराठी भाषेचे शिवाजी' म्हणविणें बिलकूल अतिशयोक्तीचें नाहीं. १८७४ पूर्वीचा महाराष्ट्र व नंतरचा महाराष्ट्र यांत जमीनअस्मानचें अन्तर आहे. स्वत्त्वापासून विन्मुख झालेल्या महाराष्ट्राला जोराचा धक्का देऊन आत्मनाशापासून परावृत्त करण्याचें श्रेय बऱ्याच अंशीं यांना व यांच्या कार्याला दिलें पाहिजे.

**चिपळुणकर, विष्णु गोविंद**—(जन्म स.१८६२-मृत्यु स. १९१६ ) मराठींतील उत्कृष्ट ग्रंथकार, अभ्यासक, डॉक्टर, नाटककार व वक्ते.

यांचा जन्म पुण्याचा, पण शिक्षण बडोद्यास झालें. बडोद्याच्या व्हर्नाक्युलर कॉलेजांत सर भालचंद्र कृष्ण भाटवडेकर यांच्या हाताखालीं यांनीं वैद्यकीचें शिक्षण घेतलें. मराठी भाषेंत यांनीं अनेक अभ्यासपूर्वक उत्कृष्ट पुस्तकें लिहिलीं आहेत. शिवाजीच्या जीवनावर दोन व संभाजीवर एक अशीं तीन नाटकें यांनीं लिहिलीं आहेत.

यांचे ग्रंथ—१ हिंदुस्थानांतील सर्प, २ मृगयाकुतूहल, ३ हिंदुस्थानांतील मोजणी ( १८९४ ), ४ शारीर-शिक्षण ( १८९४ ), ५ विचारी प्रेमला अथवा शिक्षणाचा जयजयकार, ६ काश्मीरवर्णन.

**चिरमुले, वासुदेव गणेश**—( जन्म स. १८६३ ) महाराष्ट्रांतील विमाक्षेत्रांतील यशस्वी कार्यकर्ते.

१८८१ सालीं हे मॅट्रिक झाले. पुण्याच्या डेक्कन कॉलेजांतून बी. ए. व पुढें एलएल्. बी. झाल्यावर यांनीं मुधोळराज्यांत दोन वर्षे न्यायाधीशाचें काम केलें. १८९३ सालीं सातारा येथें वकीली करण्यास यांनीं सुरुवात केली आणि १८८८ साली असि. पब्लिक प्रॉसिक्युटर झाले. १९१३ सालीं यांनीं वकिली सोडली आणि सातारा येथें वेस्टर्न इंडिया लाइफ इन्शुरन्स कंपनी लि. स्थापन केली. साताऱ्यासारख्या जिल्ह्याच्या गांवीं यांनीं ही कंपनी स्थापून तिला अखिल महाराष्ट्रांत अग्रेसरत्व मिळवून दिलें. विमाकंपनीसारख्या अत्यंत सुरक्षित व कायदेशीर व्यवसायाकडे यांनीं लक्ष देऊन कंपनी उभारली आणि ती अत्यंत पद्धतशीर चालवून महाराष्ट्रांत या नव्या व्यवसायाचा मार्ग मोकळा करून दिला.

यांनीं वेस्टर्न इंडिया बँक लि. सुरू केली. सातारा येथील स्वदेशी कमर्शिअल कंपनीचे हे संस्थापक व चालक होते. आतां आपलीं कामें आपल्या कर्तबगार सहकाऱ्यांवर सोंपवून हे निवृत्त झाले आहेत.

स्वतःच्या बुद्धीनें नवा व्यवसाय उभारणें आणि हातीं घेतलेलें काम लक्षपूर्वक यशस्वी करून दाखविणें हा यांचा गुण वाखाणण्यासारखा आहे. त्यामुळें यांना टिकाऊ यश प्राप्त झालें आहे. यांचें चरित्र प्रसिद्ध झालेलें आहे.

**चिंतामणि, सर चिरावुरी यज्ञेश्वर** ( जन्म स. १८८०-मृत्यु स. १९४१ ) तत्त्वनिष्ठ, प्रामाणिक नि समतोल वृत्तीचे राजकारणी पुरुष व पहिल्या प्रतीचे वृत्तपत्रकार. इंग्रजी भाषेवरील प्रभुत्वामुळें यांच्या

'लीडर' या इंग्रजी दैनिकाला हिंदुस्थानांत महत्त्वाचें स्थान प्राप्त झालें.

प्रतिकूल परिस्थितीमुळें यांना विजयनगरच्या महाराज कॉलेजमधील शिक्षण, पदवी मिळण्यापूर्वीच सोडून द्यावें लागलें. परंतु दीर्घोद्योग नि व्यासंग यांच्या योगें ती उणीव यांनीं पुरेपूर भरून काढली. आपल्या प्रान्तांतून वऱ्हाड मध्यप्रान्तांत येऊन रा. ब. मुधोळकरांच्या नेतृत्वाखालीं सामाजिक परिषद्, औद्योगिक परिषद् व प्रदर्शनें वगैरेचें कार्य तीन वर्षे केल्यानंतर हे संयुक्तप्रांतांत गेले. आणि तेथें यांनीं आपल्या आयुष्याचीं तीस एकतीस वर्षे व्यतीत केलीं. त्या कालांत त्या प्रान्तांतील व अखिल हिंदुस्थानांतील राजकीय घटनांशीं यांचा संबंध आला.

स. १९१६ ते २३ पर्यंत व स. १९२७ पासून १९३६ च्या अखेरीपर्यंत हे संयुक्तप्रान्ताच्या विधिमंडळाचे सभासद होते. स. १९२१-२३ च्या दरम्यान यांनीं त्या प्रान्ताचें शिक्षण-मंत्रिपद भूषित केलें. हे प्रागतिक प्रतिनिधि म्हणून विलायतेंत हिंदुस्थानची बाजू मांडण्याकरितां दोनदां गेले. प्रागतिक पक्ष राष्ट्रीय सभेंत असतां हे प्रतिवर्षी तिच्यांत प्रत्यक्ष भाग घेत. स. १९१६ साली लखनौ येथें जो कांग्रेस-मुस्लीम-लीग करार झाला, तो यांना तत्त्वतः मान्य नव्हता तरी तो घडून आणण्यांत यांनीं जातीनें भाग घेतला. 'तो करार देवाणघेवाण स्वरूपाचा आहे. हिंदुस्थानांत अल्पसंख्य म्हणून ज्या प्रान्तांत त्यांचें मताधिक्य आहे तेथेंहि मुस्लिमांना प्रमाणाबाहेर जागा द्याव्या' हें धोरण लखनौकरार करणाऱ्यांनीं अवलंबिलेलें नव्हतें असें हे पुढेंहि त्याचें समर्थन करीत. आणि 'दोघांच्या संमतीनें नवा करार झाल्याशिवाय तो करार नाहींसा करण्याचा अधिकार सरकारला नाहीं,' असें हे म्हणत.

प्रागतिकांनीं राष्ट्रीय सभा सोडल्यावर हे अनेक वर्षे नॅशनल लिबरल फेडरेशनचे सेक्रेटरी व उपाध्यक्ष होते (१९१८, २०, १९२३-२९) व नॅशनल लिबरल फेडरेशनचे अध्यक्षस्थानहि यांनीं दोनदां मंडित केलें (१९२०, ३१). पहिल्या गोलमेजपरिषदेचे हे सदस्य होते व सदर परिषदेच्या हिंदी मतदानसमितीचे सभासद म्हणूनहि यांनीं काम केलें. वऱ्हाड मध्यप्रांताचे माजी गव्हर्नर श्रीपाद बळवंत तांबे व भारतसेवक रघुनाथ रामचंद्र बखले यांच्यासमवेत सदर समितीच्या अहवालाला यांनीं जी भिन्नमतपत्रिका जोडली आहे ती विचारप्रवर्तक आहे.

स. १९०९ सालीं पं. मालवीयांच्या सहकार्यानें यांनीं अलाहाबादला 'लीडर' नांवाचें दैनिक पत्र काढलें. याचे आधीं मद्रासचा 'हिंदु' व 'भारत' या हिन्दी दैनिकांत हे काम करीत. लीडरशीं यांचा संबंध आमरण राहिला. स. १९३५ सालीं कलकत्ता येथें अखिल भारतीय वृत्तपत्र परिषदेचे हे अध्यक्ष होते. मुंबईचे जहांगीर पेटिट यांनीं लक्षावधि रुपये खर्चून मुंबईस 'इंडियन डेली मेल' नांवाचें दैनिक काढलें. भरपूर पगार देऊन त्याचे यांना संपादक केलें. लवकरच मुंबईस संप झाला तेव्हां यांनीं संपवाल्यांच्या मागण्या न्याय्य होत्या असें लिहून त्यांच्याबद्दल सहानुभूतीचें धोरण स्वीकारलें. पण पेटिट पडले गिरणीवाले. त्यांनीं यांना धोरण बदलण्याविषयीं टुमणें लावलें. पण या प्रामाणिक आणि स्वाभिमानी गृहस्थानें आपलीं मतें न सोडतां नोकरी सोडून अलाहाबादचा रस्ता पकडला. यांना दिलेला दहा हजारांचा चेकहि यांनीं स्वीकारला नाहीं. दहा हजारांचा चेक परत करणारा संपादक पाहून पेटिट यांना आश्चर्याचा धक्काच बसला. लोकमताला वळण लावणाऱ्या आणि आपल्या प्रान्ताचें मत प्रतिबिंबित करणाऱ्या पत्राचें वजन राजकीय पुढाऱ्यांपेक्षांहि अधिक असतें, असें हे नेहमीं म्हणत.

ना. गोखले यांना हे गुरु मानीत आणि न्यायमूर्ति रानड्यांच्या विचाराची छाप यांच्यावर पडली होती. सामाजिक सुधारणांसंबंधीं रानड्यांनीं दिलेलीं व्याख्यानें संपादून यांनीं तीं प्रसिद्ध केलीं आहेत.

'विभक्त मतदार-संघामुळें राष्ट्रांतील एक समाज दुसऱ्या समाजाबद्दल अगदीं बेफिकीर बनतो व स्वार्थाशिवाय त्याला दुसरें कांहींहि सुचत नाहीं, जात्यंधता परमावधीला पोंचते व त्यामुळें राष्ट्रहितालाहि धोका पोंचतो.' अशा या मतामुळें जातिनिर्णयविरोधी परिषदेचे हे अध्यक्ष होते (१९३५).

संस्थानी राज्यकारभार ब्रिटिशांवर विश्वास ठेवून चालविण्यापेक्षां आपल्या प्रजाजनांवर विश्वासून चालवावयास पाहिजे, असें यांनीं अखिलभारतीय प्रजापरिषदेचे अध्यक्ष म्हणून प्रतिपादलें (मुंबई १९२९).

प्रधानमंडळाची संयुक्त जबाबदारी हा लोकमतानुवर्ती राज्ययंत्राचा आत्मा होय, अशी यांची भावना असल्यामुळें हे मॉंटफर्ड सुधारणांच्या अमदानींत संयुक्त प्रान्तांत शिक्षणमंत्री असतांना तेथील गव्हर्नरानें सदर तत्त्वाला मान्यता देण्याचें नाकारतांच आपले सहकारी

मंत्री पं. जगत् नारायण यांच्यासह यांनीं आपल्या मंत्रिपदाचा राजिनामा दिला. स्वार्थ आणि पैसा यांच्या आहारीं हे कधींच गेले नाहींत. असें असूनहि सरकारनें यांना सर ही पदवी दिली होती.

यांची स्मरणशक्ति विलक्षण असल्यामुळें अनेक गोष्टी हे वर्णन करून सांगत तेव्हां ऐकणारा थक्क होई. घडणाऱ्या गोष्टीपेक्षां त्याची पार्श्वभूमि तपशीलवार ठाऊक असल्याशिवाय त्या गोष्टीचें यथार्थ स्वरूप ध्यानांत येत नाहीं, असें यांना वाटे. त्याप्रमाणें मागील तपशील हे बरोबर ध्यानांत घेत.

आयुष्यभर अंगिकारलेला व्यवसाय व त्यांत दिसून आलेली चमक यांमुळें हे आदर्श उदाहरण होऊन बसले आहेत. वृत्तपत्र-व्यवसायाच्या धंद्यांत द्रव्यप्राप्तीच्या बाबतींत कितीहि अनुकंपनीय स्थिति असली तरी त्या धंद्यांत अनेक आकर्षणें असतात. 'या व्यवसायाचें श्रेष्ठत्व त्यापासून मिळणाऱ्या पैशांत नसून केवळ त्याच धंद्याला मिळत असलेल्या मोठेपणांत आहे,' असें हे म्हणत.

यांचे ग्रंथः— (1) Indian Social Reform (1901), (2) Speeches and Writings of Sir Pherozeshah Mehta (1905), (3) Indian Politics Since the Mutiny (1937, आंध्र विद्यापीठांत १९३५ त दिलेलीं चार व्याख्यानें).

**चिंतामणिपेठकर, पांडुरंग व्यंकटेश**— (जन्म स. १८५१-मृत्यु स. १८७९) मराठी भाषेंतील सुप्रसिद्ध कवि.

मुंबई विश्वविद्यालयाचे हे पदवीधर असून सरकारी शाळाखात्यांत नोकर होते. डेप्युटी एज्युकेशनल इन्स्पेक्टरचे हुद्यापर्यंत हे चढले होते. यांना इंग्रजी व मराठी या भाषांखेरीज कानडी, उर्दू, संस्कृत व गुजराथी या भाषा चांगल्या येत. 'गंगावर्णना' या काव्यामुळें यांचें नांव विशेष गाजलें. या काव्यास 'दक्षिणा प्राइज कमिटी'नें ४०० रुपयांचें बक्षिस दिलें होतें. या काव्यावर विविध ज्ञान-विस्ताराच्या जुलै १८७६ च्या अंकांत विस्तृत परीक्षण आलें आहे. हे अकालीं वारल्यानें यांची निराळी अशी कांहीं काव्यकृति नाहीं.

**चिंतामणि रघुनाथाचार्य**—(जन्म स. १८२८-मृत्यु स. १८७९) नवीन ताऱ्यांचे संशोधक व ज्योतिषी.

हे मद्रास येथील वेधशाळेंत सतरा वर्षें फर्स्ट असिस्टंट होते. आपल्या प्रांतांत जसे केरोपंत, काशीकडे बापुदेव, तसे मद्रास इलाख्यांत हे होत. यांची जन्मभाषा तामीळ होती. यांना संस्कृत येत नसे असें यांनींच लिहिलें आहे. तरी युरोपीय गणिताचें आणि ज्योतिषाचें ज्ञान यांस उत्तम होतें, व त्यामुळें भारतीय ज्योतिषाचें ज्ञान साहजिक झालें होतें. हे पुष्कळ वर्षें वेध घेत असत. त्या कामीं यांची फार प्रसिद्धी आहे. स. १८७२ पासून विलायतेंतील रॉयल ॲस्ट्रॉनॉमिकल सोसायटीचे हे फेलो होते. हे प्रथम स. १८४७ मध्यें मद्रास वेधशाळेंत नोकरीस लागले व तेव्हांपासून शेवटपर्यंत तेथेंच होते. यांचे वडीलहि मद्रास वेधशाळेंत असिस्टंट होते. मद्रास वेधशाळेंत तारास्थितिपत्रक (कॅटलॉग) तयार झालें आहे, त्यांतले पुष्कळ वेध यांनीं घेतले आहेत. यांनीं नवीन दोन रूपविकारी (अनियत तेजस्क) तारे स. १८६७ व १८७८ मध्यें शोधून काढल्या. अशा प्रकारच्या शोधासंबंधाच्या यादींत हिंदु मनुष्याचें नांव यांचेंच पहिलें आहे.

'ज्योतिषचिंतामणि' या नांवाचा ग्रंथ यांनीं केला आहे. त्याचे तीन भाग आहेत. पहिल्यांत मध्यम गति, पृथ्व्यादि ग्रहांचा आकार, महत्त्व इत्यादिकांचें विवेचन आहे. दुसऱ्यांत स्फुट गतिस्थिति इत्यादि आहे. तिसऱ्याचें नांव करणपद्धति आहे. त्यांत ग्रहगणित करण्याकरितां कोष्टकें आहेत. हा ग्रंथ मूळचा तामीळ भाषेंत आहे असें दिसतें. त्याचें संस्कृत भाषांतर करून ते तामीळ, तेलंगी आणि देवनागरी लिपींमध्यें छापण्याची तजवीज करण्याकरितां मद्रास येथें सभा भरून ८०० पानें, ५०० प्रती व ७००० खर्च असा अंदाज झाला होता (स. १८७४), पण हा ग्रंथ छापला गेला नाहीं.

हे स. १८६९ पासून दृग्गणित पंचांग या नांवाचें पंचांग नॉटिकल अल्मनाकच्या आधारें करीत असत. यांच्यामागें यांच्या दोन पुत्रांनीं छापलेलें स. १८८६ चें पंचांग शं. बा. दीक्षितांनीं पाहिलें होतें. त्यांत अयनांश २५।५ व वर्षमान सूर्यसिद्धान्ताचें आहे असें दिसतें. यांचे वडील पुत्र सी. राघवाचार्य स. १८८९ च्या सुमारास निवर्तले. धाकटे पुत्र व यांचे मेहुणे पी. राघवाचार्य हेहि तें पंचांग करीत. हे व आचार्य चिंतामणि एकच होत (भा. ज्यो. इ. ३०४).

**चेट्टियार, राजा, सर, अन्नमलाई, चेट्टिनाड**— (जन्म स. १८८१) सुप्रसिद्ध व्यापारी, धनिक आणि अन्नमलाई विश्वविद्यालयाचे जनक.

चेट्टियार ( किंवा श्रेष्ठी ) मंडळी ही शतकानुशतकें व्यापार करणारी प्रमुख मंडळी आहेत. त्यांपैकीं हे अत्यंत मोठे व्यापारी होत. यांचा व्यापार हिंदुस्थानांत तर आहेच, पण हिंदुस्थानच्या बाहेर सिलोन, ब्रह्मदेश, चीन, कोचीन वगैरे देशांतहि पसरलेला आहे. नाणावलेल्या व्यापाऱ्याप्रमाणें बँकेचा व्यवहारहि यांचा मोठा आहे. यांच्या बँकाहि देशीं व परदेशीं पसरलेल्या आहेत.

हे मद्रासच्या कायदेमंडळांत होते. तसेंच कौन्सिल ऑफ स्टेटमध्येंहि तीन वेळां निवडून गेले होते. इंपिरियल बँक ऑफ इंडियाचे गव्हर्नर, सभासद, इंडियन मर्चंट चेंबर ऑफ बांबे, आजीव सभासद, मद्रास युनिव्हर्सिटी सिनेट वगैरे मानाच्या जागा यांना प्राप्त झालेल्या आहेत.

यांनीं वीस लक्ष रुपये देऊन आपल्या नांवाची अन्नमलाई युनिव्हर्सिटी स्थापन केली. ती हिंदुस्थानांतील इतर युनिव्हर्सिट्यांप्रमाणें केवळ परीक्षा घेणारी नसून प्रत्यक्ष शिक्षण देणारी आहे. तिच्या द्वारां तामिळ भाषेला उत्तेजन मिळावें अशी यांची इच्छा आहे. सध्यां कांहीं वर्षे तेथील शिक्षण इंग्रजी माध्यमानेंच चालत असलें तरी कांहीं वर्षांच्या मुदतीनंतर तें तामीळमध्यें चालविण्यांत येणार आहे हे लक्षांत घेऊन तिचा कारभार चालतो.

तसेंच Lady Pentland's Women's and Children's Hospital आणि विलिंग्डन क्लब यांच्या मोठ्या आश्रयामुळें स्थापन झाले आहेत.

अशा यांच्या लोकसेवेमुळें आणि औदार्यपूर्ण दातृत्वामुळें ब्रि. सरकारनें यांना रावबहादुर ( १९१२ ), दिवाणबहादुर ( १९२२ ), सर ( १९२३ ) व राजा ( १९२९ ) अशा पदव्या देऊन यांना गौरविलें आहे. यांच्या साठाव्या वर्षी यांना एक लेखसंग्रहात्मक ग्रंथ अर्पण केला गेला.

कुमार राजा सर मुठिआ चेट्टियार, बी. ए., हे यांचे चिरंजीव होत. मद्रासचे मेयर, शिक्षण, आरोग्य व स्थानिक स्वराज्य-खात्याचे मंत्री म्हणूनहि त्यांनीं मद्रास प्रान्तांत कामें करून आपल्या वडिलांचा लौकिक वाढविला आहे. वडिलांचेप्रमाणेंच त्यांनीं व्यापारी कामाचा अवाढव्य व्याप सांभाळला आहे.

**चेट्टी, गुझुलू लक्ष्मीनरसू**—( जन्म स. १८०६–मृत्यु स. १८६८ ) मद्रास प्रान्तांतील सार्वजनिक कार्यकर्ते, ख्रिस्ती मिशनऱ्यांना विरोध करणारे हिंदुधर्माभिमानी व कायदेमंडळाचे सभासद.

यांचा जन्म पेरियामेट ( मद्रास ) येथें झाला. यांना इंग्रजी व तामीळ यांचें शिक्षण जुन्या मिशनरी स्कूलमधून मिळालें. हे पिढीजात व्यापारी पेशाचे होते व यांनीं व्यापारी पेशाच स्वीकारला. तथापि शाळेंत असल्यापासूनच राजकारणाकडे यांचा ओढा असे.

यांचे वडील सिधुलू हे वारले त्या सालीं अमेरिकेनें इजिप्त व हिंदुस्थान या देशांशीं कापसाचा व्यापार सुरू केला. त्या व्यापारांत यांना अतोनात फायदा झाला. त्या वेळीं हिंदु लोकांस इंग्रजी शिकण्याची गोडी नव्हती. त्यामुळें ईस्ट इंडिया कंपनीच्या कारभारासंबंधीं बिलकुल माहिती नसे. याकरितां यांनीं 'मद्रास नेटिव्ह असोशिएशन' नांवाची संस्था स्थापन करण्यांत पुढाकार घेतला आणि या संस्थेंत सर्व दर्जांच्या लोकांचा समावेश करून घेतला. या संस्थेतर्फे लोकांच्या तक्रारी पार्लमेंटकडे पाठविण्याची व्यवस्था होई.

युरोपियन मिशनऱ्यांचें कार्य बाह्यतः शिक्षणप्रसाराचें असलें तरी अन्तःस्थ धर्मप्रचार करणें हेंच होतें, हें यांच्या लक्षांत आलेलें असल्यामुळें यांचा व त्यांचा सतत खटका उडे. मिशनऱ्यांना तोंड देण्याकरितांच 'क्रेसेंट' नांवाचें वर्तमानपत्र यांनीं काढलें व त्याचे मि. हर्ले हे संपादक म्हणून नेमिले. हा यांचा उद्देश लक्षांत आल्यानंतर सरकारकडून यांना वर्तमानपत्रांना मिळणाऱ्या कोणत्याहि सवलती मिळाल्या नाहींत.

यांनीं एका सभेंत व्याख्यान देऊन मिशनऱ्यांनीं हिंदूंच्या धार्मिक व्यवहारांत ढवळाढवळ व टीकाप्रतिटीका करूं नये, असा ठराव करून तो पार्लमेंटकडे पाठविला. तसेंच मद्रास युनिव्हर्सिटींत टेक्स्टबुक म्हणून बायबल नेमिलें होतें. त्याविरुद्ध तक्रार करून यांनीं तें अभ्यासक्रमांतून काढण्यास भाग पाडिलें ( १८४६ ).

१८५२ मध्यें ब्रिटिश पार्लमेंटचे मेंबर मि. डॅनबी सिमूर हे मद्रास येथें आले. यांच्या विशेष प्रसिद्धीमुळें ते यांचेच पाहुणे म्हणून मद्रास येथें राहिले. यांच्या सह मद्रास प्रान्तांत हिंडून त्यांनीं लोकांच्या तक्रारी ऐकल्या व त्या दूर करण्याचें आश्वासन दिलें. यांच्या असोशिएशनतर्फे तयार केलेला लोकल सेल्फ गव्हर्नमेंटचा मसुदा ब्रिटिश पार्लमेंटचे मेंबर अर्ल ऑफ एलन यांनीं पार्लमेंटमध्यें मांडला. १८५५ मध्यें चवदा हजार लोकांच्या सह्या घेऊन ईस्ट इंडिया कंपनीच्या कारभारा-

विरुद्ध तक्रार करणारा अर्ज यांनीं पार्लमेंटकडे पाठविला. १८५४ मध्यें पचैयप्पा फंडाचे हे मुख्य ट्रस्टी झाले व यांनीं तेथील कामगिरी उत्तम प्रकारें केली. १८५७ मध्यें हे मद्रास असोशिएशनचे प्रेसिडेंट झाले. या यांच्या अनेक प्रकारच्या कामगिरीबद्दल सरकारनें यांना सी. एस्. आय्. ही पदवी दिली. १८६३ मध्यें हे मद्रास कायदेमंडळाचे सभासद नेमले गेले.

निजाम सरकारनें टिपु सुलतानाच्या विरुद्ध झालेल्या लढाईंत इंग्रजांना चांगलीच मदत केली होती. त्यामुळें म्हैसूरचें राज्य आपल्याकडे असावें अशी निजामाची इच्छा होती. पण यांनीं कृष्णराज वोडियार यांस दत्तक घेण्यास लावून त्यास इंग्रजांच्या मान्यतेनें म्हैसूरच्या गादीवर बसविलें. तसेंच तंजावरच्या विधवा राण्यांना योग्य सन्मानानें वागविण्यास इंग्रजांना भाग पाडलें.

यांनीं स्त्रीशिक्षणास व विधवाविवाहास प्रोत्साहन देऊन स्वतःच्या खर्चानें कांहीं मुलींच्या शाळा चालविल्या.

१८६४ सालीं यांचें क्रिसेंट पत्र बंद पडलें व व्यापारहि खालावला. यामुळें शेवटले दिवस यांचे हलाखींत गेले.

यांच्या मृत्यूनंतर जॉन ब्रूस नॉर्टन, एम्. पी., यांच्या नेतृत्वानें यांचें स्मारक करण्याचें ठरून यांचें पचैयप्पा हॉलमध्यें एक तैलचित्र व प्रेसिडेन्सी कॉलेजमध्यें यांचे नांवें संस्कृत स्कॉलरशिप चालू करण्याकरितां फंड उभारण्यांत आला. त्याला त्रावणकोरचे महाराज व दिवाण सर माधवराव यांनीं मदत करून प्रोत्साहन दिलें.

**चेट्टी, फिलॉमेना थम्बू** ( जन्म स. १९१३) हिंदुस्थानांतील जगप्रसिद्ध फिडलवादनपटु.

म्हैसूरच्या राजाचे खासगी कारभारी राजसभाभूषण टी. थम्बू चेट्टी यांची ही कन्या. म्हैसूरच्या सिस्टर मॉरिस यांच्याजवळ वयाच्या सहाव्या वर्षी यांनीं वाद्यवादन शिकण्यास सुरवात केली. नंतर कलकत्ता स्कूल ऑफ म्युझिकच्या प्रो. पी. एच्. सान्द्रे यांच्याजवळ या शिकल्या. नंतर पॅरिसच्या संगीतशाळेंत या चार वर्षे होत्या. त्या वेळीं रुमानियांतील सुप्रसिद्ध वादक एनेस्को हे यांचे शिक्षक होते. यांनीं लंडनच्या एवोलियन हॉलमध्यें आपला पहिला जाहीर प्रोग्रॅम स. १९३५ मध्यें केला.

यानंतर लंडन व ऑक्सफर्ड येथें यांच्या वाद्यवादनाचे पुष्कळ कार्यक्रम झाले. त्यांत बादशाह पंचम जॉर्ज यांच्यापुढें झालेला कार्यक्रम विशेष उल्लेखनीय आहे.

हिंदुस्थानांत येतांच म्हैसूरच्या राजेसाहेबांपुढें यांचा पहिला कार्यक्रम झाला व नंतर प्रमुख शहरीं यांनीं कार्यक्रम केले.

फिडलवादनांत जागतिक महत्त्व मिळविणारी ही पहिली हिंदी स्त्री होय.

**चेट्टी, सर षण्मुखम्**—( जन्म स. १८९२ ऑक्टो. १७ ) कोचीन संस्थानचे मुख्य प्रधान, लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे माजी अध्यक्ष आणि जस्टिस-पक्षाचे प्रमुख.

हे बी. ए., एलएल्. बी. असून कोईमतूर येथें वकीली करीत.

मद्रास कायदे-मंडळांतील निवडून आलेले सभासद ( १९२० ), तेथें डेव्हलपमेंट मिनिस्टरचे कौन्सिल-सेक्रेटरी ( १९२२ ), मध्यवर्ति कायदेमंडळांत निवडलेले सभासद ( १९२३ ), नॅशनल कन्व्हेन्शन ऑफ इंडिया-तर्फे इंग्लंडला (१९२४), तसेंच एम्पायर पार्लमेंटरी असोसिएशनच्या प्रतिनिधि-मंडळांतील हिंदी प्रतिनिधि म्हणून यांनीं ऑस्ट्रेलियाला भेट दिली ( १९२६ ). मध्यवर्ति कायदे-मंडळांत हे पुनः निवडून आले आणि तेथें राष्ट्र-सभापक्षाचे प्रतोद झाले ( १९२६ ). हे जिन्हेवा येथें भरलेल्या 'इंटरनॅशनल लेबर कॉन्फरन्स'च्या ११ व्या अधिवेशनाला 'इंडियन एम्प्लायर्स डेलिगेट'ला मार्ग-दर्शक म्हणून हिंदुस्थान सरकारकडून पाठविले गेले ( १९२८ ) व १२ व्याला प्रतिनिधि म्हणून गेले.

हे सेंट्रल बँकिंग इन्क्वायरी कमेटीचे सभासद होते. पुढें मध्यवर्ति कायदे-मंडळांत हे बिनविरोध पुनः निवडून आले ( १९३० ) व तेथें हे उपाध्यक्ष झाले ( १९३१ ).

जिनेव्हाच्या 'इंटरनॅशनल लेबर कॉन्फरन्स' ला व इटावा येथें भरलेल्या 'इंटरनॅशनल एकानॉमिक कॉन्फरन्स'ला हे हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून गेले होते ( १९३२ ). पुढें मध्यवर्ति कायदे-मंडळाचे अध्यक्ष झाले ( १९३३ ). हिंदुस्थान सरकारनें यांना लीग ऑफ नेशन्स-मध्यें प्रतिनिधि म्हणून पाठविलें ( १९३८ ).

**चेम्सफर्ड, लॉर्ड**—( कारकीर्द स. १९१६–२१ ) हिंदुस्थानचे व्हाइसरॉय. हार्डिंजनंतर हे व्हाइसरॉय म्हणून आले.

हे आले तेव्हां महायुद्ध चालू होतें. तें संपतांच युद्धकालापुरते केलेले विशेष कायदे रद्द करण्याचा सरकारचा विचार दिसेना. उलट रौलट ॲक्टच्या स्वरूपांत त्यांचें पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न होऊं लागला. पहिल्या महायुद्धाच्या कामीं हिंदुस्थाननें साम्राज्य सरकारला जी मदत केली त्यामुळें हिन्दी जनतेचा आत्मविश्वास जागृत झाला. तशांतच कानपूर-राष्ट्रसभेंत राष्ट्रसभा व मुस्लीम लीग यांच्यांत एकी होऊन त्यांनीं सुधारणांचा एक खलिता सादर केला. तेव्हां भारतमंत्री मॉंटेग्यु यांनीं एक घोषणा करून (१९१७) देशाचा कारभार लोकमतानुवर्ती करण्याचें व हिंदुस्थानास सम्राज्यान्तर्गत स्वराज्य क्रमशः देण्याचे जाहीर केलें. नंतर हिंदुस्थानांत येऊन 'मॉंटफर्ड रिपोर्ट' प्रसिद्ध केला व त्याला अनुसरून १९१९ चा सुधारणा-कायदा झाला. त्या सुधारणा 'मॉंटफर्ड' सुधारणा या नांवानें प्रसिद्ध आहेत. त्यांत १ भारतमंत्र्याचा पगार व त्याच्या कौन्सिलचा खर्च इंग्लंडनें सोसावा, २ भारतमंत्र्याच्या कौन्सिलांत तीन हिंदी सभासद असावे, ३ हिंदुस्थान सरकारच्या कार्यकारी मंडळांत तीन हिंदी सभासद असावेत, ४ गव्हर्नर जनरलला मदत करण्याकरितां कौन्सिल ऑफ स्टेट व लेजिस्लेटिव्ह असेंब्ली अशीं दोन कायदेमंडळें असावींत, ५ प्रान्तांतून द्विदल राज्यव्यवस्था सुरू करण्यांत येऊन कांहीं खातीं लोकनियुक्त हिंदी प्रधानांकडे सोंपवावीं. ६ प्रांतिक कौन्सिलांत शेंकडा सत्तर सभासद लोकनियुक्त असावेत, ७ प्रांतिक अगर वरिष्ठ कौन्सिलास अंदाजपत्रक पास अगर नापास करण्याचा अधिकार असावा, ८ सर्वत्र प्रात्यक्षिक निवडणुकीचें तत्त्व सुरू करण्यांत यावें, हे मुद्दे प्रमुख होते.

या सुधारणांचें 'उजाडलें पण सूर्य कोठें आहे?' या स्वरूपांत लोकांनीं स्वागत केलें. म. गांधींच्या नेतृत्वानें असहकारिता व सत्याग्रहाच्या चळवळीचा जन्म याच वेळीं झाला. हरताळ व बहिष्काराचें युग सुरू झालें.

तुर्कस्तानचा सुलतान हा मुसलमानांचा खलिफा होता. त्याच्या हक्कावर गदा आल्यास आपल्या धर्मावर गदा येते म्हणून मुसलमानांनीं खिलाफत चळवळ सुरू केली. त्याला म. गांधींनीं पाठिंबा दिल्यानें हिंदुमुसलमान यांची एकी झाली आणि असहकारितेच्या चळवळीस उग्र स्वरूप प्राप्त झालें.

**चोभे, भिकाजी अमृत**—(जन्म स. १८३४-मृत्यु स. १९१९ ऑक्टो. १९) पुण्यांतील सुप्रसिद्ध उदार डॉक्टर, मुंबई, युनिव्हर्सिटी स्थापनेपूर्वीचे मुंबईच्या ग्रँट मेडिकल कॉलेजचे पदवीधर, शारीर व इंद्रियविज्ञानशास्त्र यांवरील मराठींतील लेखक व पुणें बी. जे. मेडिकल स्कूलमधील शिक्षक. त्या स्कूलमध्यें 'भिकाजी प्राइज' म्हणून यांच्या नांवची बक्षिसें दरवर्षी दिलीं जातात.

मुंबईस वैद्यकशाळा स. १८३७ सालीं निघाली. तेथें देशी भाषांतून शिक्षण देण्याची सोय स. १८७५ पर्यंत होती. त्यामुळें अनेक शास्त्रांतील ग्रंथ मराठींत तयार झाले. हे रावसाहेब होते.

यांचे ग्रंथ—१ मानुष शारीरशास्त्र सचित्र (पहिली आवृत्ति १८६३, दुसरी आवृत्ति १८७२) २ मानुष इंद्रियविज्ञानशास्त्र सचित्र (१८६५). यांच्या स्वकृत लावण्या व पोवाडे यांचा हस्तलिखित संग्रह यांचे नातू डॉ. राहतेकर यांच्याजवळ आहे. प्रसिद्ध कै. डॉ. शं. अ. चोभे यांचे भाऊ होत.

**चौकर, विनायक बळवंत तथा भाऊसाहेब**—(जन्म स. १८५५-मृत्यु स. १९३४) नगर जिल्ह्यांतील नामांकित वकील व सार्वजनिक कार्यकर्ते.

हे बी. ए., एलएल्. बी. होते. यांच्या समकालीन विद्यार्थ्यांत लो. बाळ गंगाधर टिळक, दाजी आबाजी खरे, वामन शिवराम आपटे वगैरे पुढें लोकप्रसिद्ध झालेल्या व्यक्ति होत्या. हे आपल्या वकिलीच्या धंद्याबरोबरच लहानमोठ्या सर्व चळवळींत भाग घेत. आकलन, निर्णय आणि स्पष्टवक्तेपणा हे यांचे प्रमुख गुण असत आणि यांच्या शुद्ध आचरणामुळें लोकांवर यांचा अत्यंत प्रभाव असे.

यांची स्मरणशक्ति चांगली असल्यामुळें यांना अनेक प्रसंगांचें तपशीलवार स्मरण असे, आणि ते आठवणीच्या रूपानें नेहमीं व्यक्त होई. कांहीं लोकांच्या आग्रहावरून यांनीं आपलें विस्तृत आत्मचरित्र लिहून काढलें. पाऊणशें वर्षांचें वय झाल्यावर उत्तम मोडी अक्षरांत सुमारें हजार चतकोर लिहून यांनीं तें पुरें केलें. त्यांतील 'डेक्कन कॉलेजांतील संस्मरणीय प्रसंग' हें प्रकरण लोकशिक्षणांत प्रसिद्ध झालें (जून १९४१). त्यावरून यांचें आत्मचरित्र म्हणजे महाराष्ट्राच्या पाऊणशें वर्षांच्या इतिहासाची चांगली पुरवणी असें समजावें लागेल.

यांच्या प्रसिद्ध झालेल्या डेक्कन कॉलेजविषयक लेखांत डॉ. कीलहॉर्नसारख्या संस्कृतच्या प्राध्यापकाचें संस्कृत भाषेचें ज्ञान कसें तुटपुंजें असे, तेव्हांच्या विद्यार्थ्यांच्या चळवळी कशा चालत, तसेंच महादेव गोविंद रानडे वगैरे लोक विद्यार्थ्यांना कसे उपयोगी पडत, यांचें चांगलें ज्ञान होतें.

**चौधरी, जावजी दादाजी**—( जन्म स. १८३९-मृत्यु स. १८९२ एप्रिल ५ ) जागतिक प्रसिद्धि मिळविणारे महाराष्ट्रीय मुद्रणकलाविशारद, पंचांगकार व मुंबईच्या निर्णयसागर छापखान्याचे चालक.

हे जातीनें मराठा असणारे गृहस्थ, मुंबईस जन्मास आले. हे प्रथम तीन रुपये दरमहावर छापखान्यांत शिरले आणि शेवटीं दरमहा चार हजार रुपये पगार वांटणारे कारखानदार बनले. हे छापखान्याच्या धंद्यांत केवळ स्वपराक्रमानें उदयास आले. यांनीं १८६४ सालीं टाइप पाडून ते स्वतंत्रपणें विकण्याचा धंदा सुरू केला. १८६९ मध्यें यांनीं स्वतःचा छापखाना काढला, तोच मुंबईचा सुप्रसिद्ध निर्णयसागर छापखाना होय. नवीन वळणाचे सुंदर टाइप पाडण्यांत आणि पुस्तकें सुबक छापण्यांत यांनीं फार मोठा लौकिक संपादन केला. संस्कृत, मराठी, हिन्दी, गुजराथी व इंग्रजी भाषेंतील शेंकडों पुस्तकें छापून वाङ्मयांत अमूल्य भर घातली. संस्कृत व मराठी भाषेंतील महत्त्वाचे प्राचीन ग्रंथ संशोधनपूर्वक छापून प्रसिद्ध करण्यांतहि यांनींस पुढाकार घेतला. संस्कृत भाषेंतील जुने नामांकित ग्रंथ प्रसिद्ध करणारें ' काव्यमाला ' व मराठींतील जुन्या काव्यांना प्रसिद्धि देणारें 'काव्यसंग्रह' हीं मासिकें यांच्याच नेतृत्वानें प्रसिद्ध होत असत. गुणी ग्रंथकारांना आणि संशोधकांना यांनीं चांगलें उत्तेजन दिलें. देवनागरी टाइपाचा वळणदारपणा आणि अत्यंत सुबक छपाई यांबद्दल यांची जगभर झालेली ख्याति यांच्यामागेंहि दीर्घकाळ टिकून आहे. सरकारनें यांना जे. पी. केलें होतें.

तुकाराम जावजी ( मृत्यु स. १९१८), पांडुरंग जावजी वगैरेंनींहि यांची परंपरा चांगली चालविली.

**चौधरी, पंडित बदरीनारायण गुरुचरणलाल**—( जन्म स. १८५६–मृत्यु स. १९२४ ) हिन्दी भाषेंतील सुप्रसिद्ध लेखक, कवि व नाटककार.

यांचा जन्म मिर्ज़ापुर येथें ब्राह्मण कुलांत झाला. यांच्या आईनें यांना सहाव्या वर्षी अक्षरओळख करून दिली. समयानुसार यांना फारसीचेंहि शिक्षण देण्यांत आलें. गोंडा येथें यांना इंग्रजी शिक्षण देण्याची व्यवस्था झाली. अवधेश महाराज सर प्रतापनारायण सिंह, लाल त्रिलोकनाथ सिंह इत्यादींच्या संगतीनें यांना घोड्यावर बसणें, हत्तीवर बसणें, नेम मारणें व शिकार करणें यांबद्दल आवड उत्पन्न झाली.

स. १८६८ मध्यें हे गोंडा येथून फैजाबाद येथें गेले व तेथील जिल्हा स्कूलमध्यें शिक्षण घेऊं लागले. याच वर्षी यांचा विवाह समसा ( जि. जौनपूर ) येथें झाला. स. १८६९ सालीं यांचे आजोबा वारल्यामुळें यांना मिर्ज़ापुरच्या शाळेंत यावें लागलें. प्रथम यांना वडिलांकडून आणि नंतर प्रसिद्ध काव्यरसज्ञ पं. रामानंद पाठक यांच्याकडून संस्कृतचें शिक्षण मिळालें व कवितेबद्दल आवड उत्पन्न झाली. साहित्याबरोबर संगीत व प्रवासामुळें अनेक भाषांचें ज्ञान यांना झालें. स. १८७२ सालीं हे कलकत्त्याहून आले व आजारी पडले. त्या अवधींत व्रजभाषेंतील प्राचीन ग्रंथ वाचण्याची व श्रवण करण्याची संधि यांना मिळाली. याच वेळीं पं. इंद्रनारायण शंगलू नांवाच्या चळवळ्या गृहस्थांशीं यांचा संबंध आला. त्यांच्या सहवासानें यांचा सभा, समाज, वर्तमानपत्रें आणि उर्दू काव्यरचना वगैरेबद्दलचा उत्साह वाढला. उर्दू काव्यरचनेबद्दल यांची आवड इतकी वाढली कीं, त्या भाषेकरितां यांनीं आपलें टोपण नांव ' अब्र ' व हिन्दीकरितां ' प्रेमघन ' असें घेतलें. यांची भारतेन्दु हरिश्चन्द्रांशींहि चांगली मैत्री झाली.

स. १८७४ मध्यें यांनीं ' सद्धर्मसभा ' व स. १८७५ मध्यें ' रसिकसमाज ' यांची मिर्ज़ापुरांत स्थापना केली. या वेळीं यांनीं पुष्कळ कविता लिहिल्या. स. १८६७ मध्यें निघत असलेल्या ' कविवचनसुधा'मध्यें यांचे बरेचसे लेख येत असत. स. १८७२ मध्यें यांनीं ' आनन्दकादम्बिनी ' मासिक सुरू केलें. पण त्यामुळें संतुष्ट न होतां स. १८८२ मध्यें ' नागरी-नीरद ' साप्ताहिक यांच्या संपादकत्वाखालीं निघूं लागलें. त्यांत यांचे गद्य, पद्य व स्वतंत्र ग्रंथ प्रसिद्ध झाले आहेत. यांचें लेखन प्रायः स्वतःच्या मनःप्रसन्नतेकरितां असे. यांचें लेखन यांची कर्तृत्वशक्ति व रसज्ञता चांगल्या प्रकारें प्रगट करतें. व्रजभाषेलाच हे कवींची भाषा मानतात. लेखनांतील सफाईकडे यांचें अत्यंत लक्ष असे. त्यामुळें कोणतेंहि लेखन दोनचार वेळां लिहिल्याशिवाय हे प्रसिद्धीस देत नसत. हे कलकत्त्याच्या तृतीय हिन्दी-साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष होते ( १९१२ ). यांचे

१ भारतसौभाग्य नाटक, २ प्रयागरामागमन नाटक, ३ वारांगनारहस्य नाटक (अपूर्ण), ४ भारत बधाई, ५ आर्याभिनन्दन, ६ वर्षाबिन्दू, ७ हार्दिक हर्षादर्श, ८ कजली-कादम्बिनी वगैरे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

**चौधरी, रामभुजदत्त**—( जन्म स. १८६८-मृत्यु स. १९२३ ) पंजाबचे सुप्रसिद्ध पुढारी, लाहोरचे वकील, उत्तम वक्ते, सरकारच्या डोळ्यांत सलणारे असहकारितेच्या चळवळींतील पुढारी व आर्यसमाजी सुधारक.

असहकारितेच्या चळवळीत यांनीं विशेष पुढाकार घेतला होता. पंजाबप्रकरणांत यांना जन्मठेपेची शिक्षा झाली होती.

**चौधरी, सरलादेवी**—( जन्म स. १८७२-मृत्यु स. १९४५ ) बंगालमधील सुप्रसिद्ध समाजसेविका, गायिका, लेखिका आणि राष्ट्रीय कार्यकर्त्या.

या जगप्रसिद्ध बंगाली कवि रवींद्रनाथ टागोर यांच्या भाची. वयाच्या अवघ्या सतराव्या वर्षी कलकत्याच्या बेथ्यून कॉलेजांतून या बी. ए. झाल्या. पुढें रवीन्द्र-नाथांच्या प्रेरणेनें यांनीं साहित्यसेवा सुरू केली. एके काळीं अत्यंत गाजलेल्या 'भारती' मासिकाच्या या संपादिका होत्या. 'जीवनेर झरा पाता' ही यांची बंगाली आत्मकथा 'देश' या साप्ताहिकांतून प्रसिद्ध होत होती. ती यांच्या मृत्यूनें अपुरीच राहिली असली तरी तिनें सर्वांना अत्यंत चटका लावला.

स. १९०५ सालीं लाहोरचे सुप्रसिद्ध वकील व आर्य-समाजी पुढारी पंडित रामभुजदत्त यांच्याशीं यांचा विवाह झाला. या अन्तर्प्रान्तीय विवाहानंतर यांनीं 'हिंदुस्थान' या उर्दू साप्ताहिकाचें संपादन केलें.

या उत्कृष्ट कवयित्री होत्या. त्याचप्रमाणें गायनकलेंतहि या प्रवीण होत्या. 'वंदे मातरम्' या गीताचें प्रान्तिक स्वरूप घालवून त्याला राष्ट्रीय स्वरूप यांनीं दिलें. त्याकरितां यांनीं बंगालच्या लोकसंख्येला उद्देशून असणारा 'सप्त-कोटि' हा शब्द बदलून त्या वेळच्या लोकसंख्येला उद्देशून 'त्रिंशत्कोटि' असा बदल केला. तसेंच त्यांतील बंगाली भाषेंतील भाग काढून फक्त संस्कृत भाषेंतील भाग बनारस राष्ट्रसभेच्या वेळीं यांनीं जाहीरपणें म्हटला. त्याला दिलेली सध्यांची धीरगंभीर चाल यांच्या व रवीन्द्रनाथ टागोर यांच्या योजकतेचें फळ होय.

यांच्या साहित्यसेवेपेक्षां यांचें राजकीय व सामाजिक कार्य अधिक महत्त्वाचें आहे. मात्र तें वाङ्मयाप्रमाणें मूर्त स्वरूपांत स्थिर राहूं शकत नाहीं. बंगाल प्रान्तांत राष्ट्रवाद व स्वदेशी यांच्या प्रचारासाठीं यांनीं अविश्रान्त श्रम केले.

१९१९ सालीं या म. गांधींच्या सान्निध्यांत आल्या. असहकारितेच्या चळवळींत यांनीं प्रत्यक्ष भाग घेतला, आणि त्या वेळीं पंजाबांतील डायरशाहीविरुद्ध यांनीं अत्यंत निर्भयपणें प्रचार केला. ही एकच गोष्ट यांची कर्तृत्वशक्ति दर्शविण्यास पुरेशी आहे. अखिल भारतीय काँग्रेस कमिटीच्या सरचिटणीस होण्याचा मान महिला-वर्गांत आतांपर्यंत फक्त यांनाच मिळाला आहे.

बंगाल प्रान्तांत वीराष्टमीची स्फूर्तिदायक प्रथा यांनींच सुरू केली. नवरात्रांत दुर्गापूजेच्या दिवशीं हा समारंभ केला जातो. वीरवृत्ति व राष्ट्रवृत्ति महिलांच्या अंगीं बाणावी या दृष्टीनें वीराष्टमीचे कार्यक्रम आंखले जात. लहान मुलांना आणि युवकांना वीरोचित खेळांत आणि सामन्यांत भाग घ्यावयास लावून त्यांत यशस्वी होणाऱ्यांना अध्यक्ष स्त्रीकडून 'वीराष्टमीपदक' देण्याचा जो अभिनव उपक्रम यांनीं केला तो विशेष उल्लेखनीय वाटतो. पहिल्या वीराष्टमीच्या दिवशींच यांनीं कलकत्ता शहरांत अस्त्रविद्यासंमेलन भरविलें आणि मुर्शिदा-बादच्या डॉवेजर नबाब बेगमसाहेबांच्या कन्या मिसेस् सुजातालि बेग यांच्या हस्तें हिंदु युवकांना पारितोषिकें देवविण्याचा समारंभ घडवून आणला.

१९२५ सालीं या कलकत्त्यास भरलेल्या ऑल इंडिया सोशल काँग्रेसच्या अध्यक्ष होत्या. साक्षरताप्रसाराच्या प्रत्येक कमिटींत यांनीं प्रत्यक्ष भाग घेतला होता. १९२६ सालीं कलकत्त्यांतील हिंदी पत्रकारसंघाच्या अध्यक्षपदावर यांची निवड झाली होती.

सार्वजनिक कार्यक्षेत्रांत पदार्पण करण्यापूर्वी कांहीं दिवस यांनीं म्हैसूर महाराणी गर्ल्स स्कूलच्या सुपरिं-टेंडेंटचें काम केलें.

आधुनिक बंगालमध्यें नवचैतन्य निर्माण करणाऱ्यांत यांना प्रमुख स्थान आहे.

**चौबळ, सर महादेव भास्कर**—( जन्म स. १८५७-मृत्यु स. १९३३ ) मुंबई सरकारच्या कार्यकारी-मंडळाचे सभासद, हायकोर्टचे न्यायमूर्ति व सार्वजनिक कार्यकर्ते.

यांचें शिक्षण पुणें येथें सरकारी हायस्कूल व डेक्कन

कॉलेज यांमध्यें झालें. हे बी. ए. झाल्यानंतर यांनीं मुंबईच्या एलिफन्स्टन हायस्कूलमध्यें शिक्षकाचें काम केलें ( १८७९-८३ ). हे एलएल्. बी. झाल्यानंतर यांनीं मुंबई हायकोर्टात वकीली सुरू केली. यांच्या काम करण्याच्या तडफदार पद्धतीनें यांना सरकारी वकील नेमण्यांत आलें ( १९०६ ). नंतर यांना हायकोर्टांत दुय्यम न्यायमूर्तीची जागा देण्यांत आली ( १९०८ ). यानंतर हे मुंबई-गव्हर्नरच्या कार्यकारी मंडळांत सभासद नेमिले गेले ( १९१०-१२ व १९१५-१७ ). 'पब्लिक सर्व्हिसेस कमिशन' चे सभासद ( १९१३-१५ ), इंडियन वुइमेन्स युनिव्हर्सिटीचे चॅन्सेलर ( १९२० ) व डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे चेअरमन वगैरे कामें यांनीं केलीं. त्याप्रमाणें सरकारनें यांना पदव्या देऊन गौरविलें होतें.

पण या सर्व कार्यापेक्षां अगदीं वेगळ्या स्वरूपाचें कार्य यांच्या हातून घडलें. तळेगावचें समर्थ विद्यालय सरकारच्या अवकृपेला बळी पडल्यानंतर त्याचें पुनरुज्जीवन करण्याचें कै. प्रो. विष्णु गोविंद विजापूरकर यांनीं ठरविलें. त्या कार्यांत त्यांना यांचें उत्तम प्रकारचें साहाय्य होऊन ती संस्था 'नवीन समर्थ विद्यालय' या नांवानें पुन्हां सुरू झाली. तसेंच त्या वेळीं त्या संस्थेचे अध्यक्ष होऊन व सुमारें पन्नास हजार रुपयांचा निधि जमा करून दिला.

पण असहकारितेच्या काळांत यांना आपला संबंध त्या संस्थेशीं असणें बरें वाटलें नाहीं म्हणून यांनीं तसें गव्हर्नमेंटला कळविलें व दुसऱ्या खेपेस हे अध्यक्षपदाकरितां उभे राहिले नाहींत.

**चौहान, सुभद्राकुमारी**—( जन्म स. १९०४ ) सुप्रसिद्ध आधुनिक हिन्दी कवयित्री.

जन्मस्थान-प्रयाग. जात-क्षत्रिय. पित्याचें नांव ठाकुर रामनाथसिंह. वडील भजनाचे प्रेमी असल्यानें याहि लहानपणापासून भजनांत रंगत. यांनीं प्रयागच्या क्रास्थवेट गर्ल्स स्कूलमध्यें शिक्षण घेतलें. १९२० सालीं खांडव्याचे ठाकुर लक्ष्मणसिंह चौहान, बी.ए.,एल्एल्.बी., यांच्याशीं यांचा विवाह झाला.

असहकारितेच्या चळवळींत यांनीं शाळा सोडली व नुकत्याच पास झालेल्या आपल्या पतींनाहि वकीली न करण्याचा सल्ला दिला. तेव्हां ते जबलपुरला जाऊन माखनलाल चतुर्वेदींबरोबर 'कर्मवीर' पत्राचें संपादन व राष्ट्रसभेचें काम करूं लागले. याहि त्यांच्याबरोबर जबलपुरास येऊन मध्यप्रांतांतील राष्ट्रीय चळवळींत भाग घेऊं लागल्या. नागपूरच्या झेंडासत्याग्रहांत यांना दोनदां अटक झाली. चळवळ शिथिल झाली तरी यांची राष्ट्रीय वृत्ति सतत जागृत आहे, हें यांच्या अलीकडील कवितांवरून दिसून येतें. यांची कविता शुद्ध व भावनापूर्ण असते. यांच्या फुटकळ कविता पुष्कळ आहेत. मुकुल, बिखरे मोती इत्यादि यांचे कवितासंग्रह प्रसिद्ध आहेत.

**चौंडेमहाराज, बाळकृष्ण मार्तंड**—( जन्म स. १८७७ ) सुप्रसिद्ध गोरक्षण कार्यकर्ते व रामदासी संप्रदायाची संघटना करणारे सत्पुरुष.

यांचा जन्म वाई येथें देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणाच्या घराण्यांत झाला. जानकी मातेचा वियोग चवथ्या वर्षींच झाला. वडील मार्तंडशास्त्री महाराष्ट्रांतील जाड्या विद्वानांत गणले जात. यांच्या घराण्यांतील पुरुषांत भगवद्भक्ति, त्याग, शील व कीर्तनप्रवचनादि आध्यात्मिक गुणांचें विशेष प्राधान्य असून वक्तृत्व, गायन, वादनादि गुणहि कुळपरंपरेनें आलेले आहेत.

वयाच्या पंधराव्या वर्षापासून यांनीं कीर्तन करण्यास सुरुवात केली आणि आपल्या रसाळ वाणीनें काशीपासून रामेश्वरापर्यंत भक्ति व गोसेवा यांचा प्रचार केला. २१ व्या वर्षी श्रीसमर्थसंप्रदायांत यांचा प्रवेश झाला. खुद्द सज्जनगडावर ९ महिन्यांत १३ कोटी रामनामाचें पुरश्चरण यांनीं केलें. त्याशिवाय अनेक शहरांत शेंकडों नामजपयज्ञ यांनीं घडवून आणले.

१९०५ सालीं कार्तिक शुद्ध दशमीच्या दिवशीं वाई येथें कृष्णेच्या घाटावर एक गाय लोळण घेत आहे व कसाब तिला काठ्यांनीं मारतो आहे, हें दृश्य पाहून यांचें मन द्रवलें. यांनीं त्या गाईला तर प्राणदान दिलेंच, शिवाय तत्क्षणीं तन मन धन गोमातेच्या पायीं अर्पण केलें. श्रीगोवर्धन संस्थेचा हाच शुभारंभ होय. याकरितां यांनी हिंदुस्थानभर हिंडून जागृति केली. १९०६ सालीं काशीक्षेत्रीं रामघाटावर 'बालकराममंदिर' स्थापिलें.

कसाबांनीं खरेदी केलेल्या गायी त्यांचेपासून विकत घेतल्यास चौपट नफा कसाब घेतात व त्या पैशांतून अनेक गायींचे गळे गोवतात. यासाठीं कसाबांचे हातीं पडण्यापूर्वी शेतकऱ्यांकडून गायी घेणें, शेतकरी बंधूंचीं थकलीं भागलेलीं निरुपयोगी गाईगुरें घेऊन त्यांना उपयुक्त गाईबैल मोफत देणें, शेण-खतासाठीं गाईंचे कळप शेतांत बसविणें इत्यादि प्रकारचें व्यावहारिक स्वरूप यांनीं गोरक्षण चळवळीला दिलें. नवीन ३०।४० गोशाळा स्थापन केल्या; औंध, सांगली, कोल्हापूर अशा संस्थानां-

कडून वधिकांना गोविक्रय करण्यास प्रतिबंधक असे कायदे घडविण्याचा प्रयत्न केला; राष्ट्रीय गोसप्ताहाच्या पुरस्कारानें देशभर जागृति निर्माण केली आणि गोरक्षण वृत्तपत्र, गोरक्षणी मेळे, स्त्रीपुरुष कीर्तनकार प्रचारक, यांचे साहाय्यानें गोरक्षणाच्या चळवळीचा प्रचार केला. गोरक्षणाच्या चळवळीचा हे आत्मा आहेत. विशेषतः या कामीं कार्यकर्ते स्त्रीकीर्तनकार तयार करून यांनीं त्यांना मानाचें स्थान प्राप्त करून दिलें. राष्ट्रांतील राजकीय, जातीय व पंथीय पुढाऱ्यांची या चळवळीबद्दल सहानुभूति मिळविण्याचें श्रेय यांना आहे. गोवर्धनसंस्था स्थापून, वाढवून, रजिस्टर करून तिला सर्व प्रकारें भरभराटीचें स्वरूप यांनीं आणून दिलें. संस्थेच्या भरभराटीस मुख्यत्वें यांची त्यागवृत्ति कारण झालेली आहे. अंगावर खादीचे जाडेभरडे कपडे, डोक्याला कुंचडें व घोंगड्याची मेखला घालून नित्य प्रवास व दगदग सोसून यांनीं देशभर प्रवास केला आणि गोरक्षणाची चळवळ दशदिशांस फैलाविली. समर्थ-शिष्यांच्या पालख्या प्रतिवर्षी दासनवमीस सज्जनगडावर नेण्याचा नवा उपक्रम केला व रामदासी संप्रदायाचें संघटन आरंभिलें. आपला शिष्यवर्ग यांनीं याच चळवळींत राबविला. कनक व कान्ता यांबाबत यांचें वर्तन आदर्शभूत आहे आणि तेंच यांच्या यशाचें गमक आहे.

धार्मिक दृष्टीनें गोमातेच्या रक्ताचा एकहि थेंब या भूमींत सांडूं नये, यासाठीं गोहत्या कायद्यानें बंद व्हावी अशा ध्येयानें प्रेरित होऊन शेतकऱ्याच्या झोंपडीपासून व्हाइसरॉयच्या प्रासादापर्यंत चळवळीचा धूमधडाका यांनीं चालविला असला तरी गोरक्षणाच्या आर्थिक दृष्टीकडे यांनीं बिलकूल दुर्लक्ष केलेलें नाहीं. गायींची अवलाद सुधारावी, हल्लींपेक्षां त्यांचें दूध दुप्पट-तिप्पट वाढावें, उत्तम वळूंचा पुरवठा व्हावा, याकरितां संवर्धन कार्याकडे यांचें पूर्ण लक्ष आहे. गोवर्धन-संस्थेच्या पुरस्कारानें तीन लाख रुपये भांडवलाची गोवर्धन डेअरी फार्म लि. या नांवाची एक कंपनी याच हेतूनें उभारली गेली आहे व तिचें कामहि सुरू आहे.

कै. वल्लभदास मुरलीधरदास यांच्या लाख रुपयांच्या देणगींतून मुंबईस गोवर्धनवाडी खरेदून तिच्या भाड्यांतून प्रचारखर्च चालविण्याची व्यवस्था यांनीं केली.

'माझ्या एका हातांत रामनाम व दुसऱ्या हातांत गोसेवा असल्यावर मी कलिकाळालाहि अजिंक्य आहें.' हें यांचें ब्रीदवाक्य आहे.

---

## छ

**छत्रपति, संभाजी ऊर्फ आबासाहेब महाराज**—( कारकीर्द स. १८१२-खून स. १८२१ जुलै १७ ) कोल्हापूरचे छत्रपति.

यांच्यामागें अल्पवयी मुलगा बाळासाहेब व धाकटा बंधु शहाजी यांचे दोन पक्ष निर्माण होऊन त्यांच्यामध्यें बर्चस्वाकरितां युद्ध जुंपलें. पण बाळासाहेब लवकरच वारले व शहाजीचा पक्ष सत्ताधीश झाला.

**छत्रपति, शहाजी ऊर्फ बुवासाहेब महाराज**—( मृत्यु स. १८३८ नवं. २९, कारकीर्द स. १८२२-३८ ) कोल्हापूरचे छत्रपति.

यांनीं गादीवर येतांच प्रतिपक्षीयांवर सूड उगविण्यास सुरुवात केली. तसेंच संभाजी महाराजांच्या खुनाचा वहीम असलेल्या कागलकर घाटग्यांचे संबंधी व त्यांचे दरबारांतील स्नेही यांच्यावरहि यांनीं शिस्त धरली. तेंव्हां कंपनी सरकारपर्यंत गाऱ्हाणीं जाऊन ब्रिटिशांनीं यांच्या कारभारांत हात घातला. कित्तूरच्या बंडखोरांना मदत व आसपासच्या ब्रिटिश मुलखांतील लुटालूट यामुळें आधींच हे ब्रिटिशांच्या रोषास पात्र झाले होते. त्यामुळें १८२६ सालीं तह होऊन इनामदार-जहागीरदारांना संरक्षण व सैन्याची संख्या मर्यादित करण्याचा करार झाला होता. तसेंच ब्रिटिशांच्या शत्रूला आश्रय देऊं नये असेंहि ठरलें होतें, पण त्याप्रमाणें यांचें वर्तन न घडल्यानें यांचे चिकोडी व मनोळी हे तालुके खालसा करण्यांत आले. १८३० सालीं हे आपली गमावलेली सत्ता परत मिळविण्यासाठीं बेळगांवास गेले. तेथें ब्रिटिश अधिकाऱ्याची मुलाखत घेत असतां यांच्या नोकराच्या हातून चुकीनें पिस्तुल उडून नाजूक परिस्थिति उत्पन्न झाली होती. या भयंकर प्रसंगांतून यांचा निभाव ब्रिटिश सरकारनें नेमलेले यांचे कारभारी रामराव

अक्कबरनवीस यांच्या चातुर्यानें झाला. पुढें हे तीर्थयात्रेस गेले असतां तिकडेच दिवंगत झाले.

यांच्या मागें वयाला पुरीं आठ वर्षेंहि न झालेला मुलगा दत्तक देऊन कारभार चालू करण्यांत आला.

**छत्रपति, शिवाजी महाराज ऊर्फ बाबा महाराज**—( जन्म स. १८३०–मृत्यु स. १८६६ ऑगस्ट, कारकीर्द स. १८६२-६६ ) कोल्हापूरचे छत्रपति.

यांच्या भगिनी अक्कासाहेब या कागलकरांना दिल्या होत्या. त्यांचे चिरंजीव जयसिंगराव आबासाहेब घाटगे होत.

यांच्या वेळीं पुष्कळ भानगडी होऊन बरीच वर्षे कारभार ब्रिटिश सरकारतर्फे चालत असे. यांना १८६२ सालीं नवा तह होऊन अधिकार मिळाले.

हे मृत्यु पावण्याच्या आदल्या दिवशीं पाटणकर घराण्यांतील एक पुत्र दत्तक घेण्यांत आला व त्याचें नांव राजाराम महाराज असें ठेवण्यांत आलें.

राजाराम महाराज हे छत्रपति शिवाजी ऊर्फ बाबा महाराज यांच्या भगिनी आऊबाईसाहेब व श्रीमंत रामचंद्रराव पाटणकर यांचे पुत्र होत.

**छत्रपति, राजाराम महाराज**—( जन्म स. १८४८–मृत्यु स. १८७० फ्लॉरेन्स, इटली कारकीर्द स. १८६६–७० ) कोल्हापूरचे छत्रपति.

हे पाटणकर घराण्यांतून दत्तक आलेले होते. यांची जनकमाता आऊसाहेब पाटणकर या यांच्या दत्तक वडील बाबा महाराजांच्या बहीण होत. यांच्या जनक वडिलांचें नांव रामचंद्रराव पाटणकर.

हे धीरोदात्त स्वभावाचे असून होतकरू होते. परंतु हे इंग्लंडहून परत येते वेळीं फ्लॉरेन्स, इटली येथें आपल्या वयाच्या २२ व्या वर्षी मृत्यु पावले. यांच्या मागून शिवाजी दत्तक आले.

**छत्रपति, शिवाजी महाराज**—( मृत्यु स. १८८३ डिसें. २५, कारकीर्द स. १८७०-१८७३ ) कोल्हापूरचे छत्रपति.

यांना नगर येथें मृत्यु आला. यांचे वडील छत्रपति राजाराम महाराज. त्यांना पुत्र नव्हता म्हणून यांना दत्तक घेतलें होतें. यांच्या जनक वडिलांचें नांव दिनकरराव भोसले. यांना वेड लागलें असें समजून यांना यांचे नातेवाईक, तरुण बायको व वृद्ध मातापिता यांच्यापासून अलग लांब नगर येथें ठेवण्यांत आलें. एका हडेलहप्पी सोजराची देखरेख व यांना अत्यंत अप्रिय असणारा रावबहादुर बर्वे यांचा कारभार अशी व्यवस्था करण्यांत आली. तेथें पहारा करणाऱ्या नोकराशीं मारामारी होऊन तींमध्यें यांचा अन्त झाला. यांचा तुरुंगवास व छळ यांसंबंधीं पुण्याच्या केसरीनें कांहीं हृदयविदारक माहितीचा पत्रव्यवहार प्रसिद्ध केला. त्यामुळें बाळ गंगाधर टिळक व गोपाळ गणेश आगरकर यांच्यावर रा. ब. बर्वे यांनीं बेअब्रूची फिर्याद केली. तेव्हां त्या तरुण संपादकांना आपली बाजू सिद्ध न करितां आल्यानें तुरुंगवास पत्करावा लागला. यांनाहि पुत्र नसल्यानें रीजंट श्रीमंत जयसिंगराव आबासाहेब घाटगे यांचे पुत्र यशवंतराव यांना महाराणी आनंदीबाईसाहेबांना दत्तक देण्यांत आले व त्यांचें नांव शाहू महाराज असें ठेवण्यांत आलें.

**छत्रपति, शाहू महाराज**—(जन्म स. १८७४–मृत्यु स. १९२२ ) सुप्रसिद्ध समाजसुधारक, तडफदार सार्वजनिक कार्यकर्ते व कोल्हापूरचे विख्यात छत्रपति.

हे श्रीमंत जयसिंगराव आबासाहेब घाटगे जहागीरदार कागल यांचे ज्येष्ठ चिरंजीव. यांची जन्मदात्री माता मुधोळच्या राजेसाहेबांची एकुलती एक कन्या राधाबाई होत. यांना शिवाजीमहाराजांच्या पत्नी महाराणी आनंदीबाईच्या मांडीवर दत्तक देण्यांत आलें, यांचें मूळचें यशवंतराव हें नांव बदलून शाहू असें ठेवण्यांत आलें ( १८ मार्च १८८४ ) आणि वयाच्या दहाव्या वर्षी हे कोल्हापूरचे छत्रपति शाहूमहाराज बनले.

प्रथम श्री. कृ. भि. गोखले व नंतर मि. फिट्झिराल्ड यांना यांचे शिक्षक म्हणून नेमण्यांत आलें. यांनीं सात-आठ वर्षे इंग्लंडमध्यें राहून शिक्षण घ्यावें असा त्यांचा हेतु होता. पण आबासाहेब घाटगे इंग्लंडला जाऊन आले आणि इंग्लंडला जाऊन शिक्षण घेण्याच्या ते साफ विरुद्ध झाले. तेव्हां फिट्झिराल्ड राजिनामा देऊन गेले आणि हे शिक्षणाकरितां राजकोटला दाखल झाले ( १८८५ ). तेथें गेल्यावर लवकरच यांचे वडील वारले. पुढें तेथील हवा मानवेना म्हणून हे धारवाडास शिक्षणार्थ राहिले होते. याच सुमारास बडोद्याचे मे. गुणाजीराव खानविलकर यांची नात लक्ष्मीबाईशीं यांचा विवाह

झाला ( स. १८९१ ). त्या वेळीं लक्ष्मीबाईंचें वय अकरा वर्षांचें होतें. शिक्षण संपल्यावर ( १८९३ ) यांना ४ एप्रिल १८९४ रोजीं अधिकारप्राप्ति झाली. याच सुमारास संस्थानचे मुख्य दिवाण खानबहादूर मेहेरजी कुंवरजी तारापोरवाला यांच्या जागीं सर रघुनाथराव सबनीस व सरन्यायाधिशाचे जागीं असलेले श्री. बळवंतराव जोशी मरण पावल्यानें के. एन्. पंडित आले आणि राज्यकारभारांत नवें युग सुरू झालें.

हे गादीवर आल्यानंतर थोड्याच दिवसांत फांशीच्या शिक्षेला ब्रिटिश-सरकारच्या मंजुरीची अट नाहींशी झाली. नरसोबाच्या वाडीच्या महारोग्यांची संख्या पाहून यांनीं व्हिक्टोरिया महारोगी आश्रम उघडला (घाटवळ). गंजन नांवाच्या गवताची राळ करणें, शेणगांवच्या कांताच्या कारखान्याला उत्तेजन, पन्हाळ्यास कॉफीची लागवड, इनामदारांना कर्जमुक्त करण्याची व्यवस्था, वेठीची पद्धत बंद, तुरुंगांत सुधारणा आणि शाहूपुरीची स्थापना, घायाळीची लागवड, श्रीशाहूछत्रपति-मिल्स वगैरे अनेक प्रयत्न उद्योग-धंद्याची वाढ करण्याच्या दृष्टीनें यांनीं केले. तसेंच व्यापाराच्या सोयीच्या उतारपेठा स्थापणें हाहि एक महत्त्वाचा विचार यांच्या डोक्यांत असे.

या यांच्या सुरवातीच्या कार्यामुळें सर्वत्र यांच्या हुषारीचा बोलबाला झाला. पुण्याच्या सार्वजनिक संस्थेनें मानपत्र देऊन यांचा गौरव केला ( १८९४ ). फर्ग्युसन कॉलेजच्या पायाचा दगड यांच्या हस्तें बसविण्यांत आला व साम्राज्य सरकारनें जी. सी. एस्. आय्. ही पदवी देऊन यांचा गौरव केला ( १८९५ ). प्रथम हे ठराविक वेळीं लोकांच्या तक्रारी ऐकत, पण पुढें ती पद्धत लोकांना गैरसोयीची म्हणून यांनीं केव्हांहि लोकांना भेटण्याची मोकळीक ठेवली. यांच्या या लोकांत मिसळून वागण्याच्या पद्धतीनें हे फारच लोकप्रिय झाले. प्रधान-मंडळ व पोलिटिकल एजंट कर्नल डब्ल्यू. रे यांतील तेढहि यांनीं खुबीनें मिटविली. प्लेग व दुष्काळ या आपत्तींनाहि यांनीं मोठ्या योजकतेनें तोंड दिलें ( १८९९ ).

परंतु केवळ राज्यकारभार सुरळीत चालवून स्वस्थ बसणारी यांची प्रकृति नव्हती. त्या वेळीं सर्व देशभर शिक्षणप्रसाराची लाट उसळलेली होती. बहुजनसमाजांत शिक्षणाचा प्रसार झाल्याशिवाय त्याचा उद्धार होणार नाहीं, म्हणून प्रथम समाजांतील सर्व वर्गांना शिक्षण सुलभ करण्याचें धोरण यांनीं स्वीकारलें. या दृष्टीनें प्रथम कांहीं मराठा विद्यार्थ्यांना यांनीं आपल्या वाड्यांत ठेवून त्यांची उत्तम व्यवस्था केली. पण या सुखसोयींचा अनिष्ट परिणाम दिसून येतांच 'व्हिक्टोरिया मराठा बोर्डिंग हाउस' यांनीं सुरू केलें. त्याला सत्तेचाळीस हजारांची देणगी, वार्षिक मदत व दोन हजारांचें जमीनीचें उत्पन्न करून दिलें ( १९०१ ). याप्रमाणें जैनवसतिगृह, लिंगायत बोर्डिंग, नामदेव बोर्डिंग, श्रीमंती राधाबाई सारस्वत बोर्डिंग, प्रभू बोर्डिंग, मिस् क्लार्क अस्पृश्य बोर्डिंग, कारंजकर विद्यार्थी वसतीगृह, वगैरे निरनिराळ्या जातींचीं वसतिगृहें काढण्यास यांनीं मदत केली, शिकून तयार झालेल्या लोकांकरितां शेंकडा पन्नास जागा राखून ठेविल्या व अशा तऱ्हेनें स. १८९४ सालीं ब्राह्मणेतर कारकुनांची संख्या शेंकडा दहा होती ती १९०५ सालीं साठ केली.

जातिभेद प्रगतीच्या आड येतो व तो नष्ट करण्यास शिक्षणाशिवाय उपाय नाहीं हा यांचा सिद्धान्त होता. म्हणून प्राथमिक शिक्षण सक्तीचें करण्याची यांनीं घोषणा केली ( १९१२ ). प्रथम वतनदार शिक्षक निर्माण करण्याची यांची योजना होती; पण ती रद्द करून पुढें पगारी शिक्षक नेमण्यांत आले ( १९१७ ). सक्तीच्या शिक्षणाची पहिली शाळा चिपरी, पेटा करवीर येथें यांच्या हस्तें उघडण्यांत आली. प्रारंभीं या कार्यास एक लाख रुपये खर्च होत; परंतु पुढें तो खर्च तीन लाखांपर्यंत वाढला. प्राथमिक शिक्षणाच्या या खर्चाकरितां राजाराम कॉलेज बंद करावें अशीहि यांची योजना होती. ( १९१८ ). पण पुढें संयुक्त प्रांतांतील आर्यप्रतिनिधि-सभेच्या ताब्यांत ते कॉलेज व हायस्कूल देण्यांत आलें व त्यांना भरपूर वार्षिक मदत देण्याची व्यवस्था यांनीं केली. याशिवाय राज्याबाहेरील नाशिक विद्यार्थी वसतिगृह, अहमदनगर 'चौथे शिवाजी' वसतिगृह, पुणें ताराबाई वसतिगृह व शिवाजी मराठा वसतिगृह ह्या संस्था यांच्या शिक्षणविषयक कळकळीचीं स्मारकें होत.

सुरवाती सुरवातीला धार्मिक विधि अत्यंत कसोशीनें हे पाळीत; पण एकदां कार्तिक स्नानाचे वेळीं स्नान न करितां संकल्प सांगणाऱ्या ब्राह्मणाच्या उत्तरानें यांचा स्वाभिमान डिवचला गेला. तेव्हां यांनीं व यांच्या परिवारांतील मंडळींनीं वेदोक्त धर्मकृत्यें करण्यास सुरवात केली (१९०१). ज्या ब्राह्मणांनीं या कार्याला संमति दिली त्यांना पुराणमताभिमानी जनतेकडून अत्यंत त्रास झाला. खुद्द राजोपाध्येहि पुराणमतवाद्यांत सामील झाले. म्हणून यांनीं त्यांचें इनाम खालसा केलें. श्रीशंकराचार्य मठांतहि एक

शिष्य वेदोक्ताला अनुकूल व दुसरा प्रतिकूल म्हणून भेद पडला आणि हें वेदोक्ताचें प्रकरण चांगलेंच गाजलें.

या वेदोक्त प्रकरणांतून ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद निर्माण झाला ( १९१० ). सत्यशोधकसमाज जरी १८७३ सालीं स्थापन झाला होता तरी जोतिबा फुल्यांच्या नंतर तो नामशेषावस्थेंतच होता. यांच्यासारखीं थोर घराण्यांतील माणसें तिकडे लक्ष देऊं लागतांच तो पुनः एकदां लोकांत गाजूं लागला. पुरोहिताचें काम कोणींहि करावें, त्याकरितां ब्राह्मणच पाहिजे असें नाहीं असें यांचें म्हणणें होतें. पण ब्राह्मणांचा पौरोहित्याचा अधिकार तर कायदेशीर मानला गेला होता. अशा या लढ्यांत १९११ सालीं कोल्हपूर येथें सत्यशोधकसमाजाचें पुनरुज्जीवन करण्यांत आलें आणि ब्राह्मणांच्या विरुद्ध उघड मोहीम सुरू झाली. शंकराचार्यांच्या नेतृत्वाखालीं ब्राह्मणांनीं जोराचा विरोध आरंभिला. यांनीं उघडपणें सत्यशोधक समाजाला मदत करण्यास सुरुवात केली. त्याचा परिणाम कांहीं लोकांच्या उत्साहातिरेकांत झाला. १९१४ सालीं एडवर्ड बादशहाच्या पुतळयास डांबर फासलें गेलें आणि त्याचा संबंध सत्यशोधक चळवळीशीं जोडला गेला. त्यामुळें सत्यशोधक समाजाचें यांचें संस्थानांतील कार्य स्थगित झालें.

अशा स्थितींत त्यापेक्षां जास्त व्यापक विचारावर उभारलेल्या प्रार्थनासमाज व थिऑसॉफिकल सोसायटी यांची मदत घेण्याचा यांनीं प्रयत्न केला. पण वेदावर विश्वास ठेवणारा आणि जातिभेद न मानणारा आर्यसमाजाचा लढाऊ कार्यक्रम यांना जास्त पसंत पडला व त्याला आश्रय देण्यांत आला. मागसलेल्या समाजांत चैतन्य उत्पन्न करण्याच्या स्थूल दृष्टीनेंच हे कोणत्याहि चळवळीकडे पाहत, सूक्ष्म तपशीलाकडे यांचें लक्ष नसे.

अस्पृश्यांची अस्पृश्यता नष्ट करून सर्व प्रकारें त्यांना आपल्या बरोबरीस आणून बसविण्याचा यांचा प्रयत्न असे. महारांना दिलेलीं वतनें त्यांच्या पोटापुरतीं नाहींत, म्हणून त्यांना बलुतें मागून लाचारीनें राहावें लागतें; सबब त्यांची लाचारी नष्ट करून त्यांनीं आत्मविश्वासानें व मानानें राहावें म्हणून यांनीं बलुते पद्धति हुकमानें बंद केली ( १९१८ ). पण तो हुकूम बदलून सर्कारनें काम घेऊं नये असें यांना पुढें जाहीर करावें लागलें. यांनीं त्यांच्या शिक्षणाची व्यवस्था करून त्यांना नोकऱ्या दिल्या. पुढें तर हे त्यांच्याबरोबर जाहीरपणें भोजनें देखील करूं लागले.

समतावादी समाजसुधारक ही यांची मुख्य भूमिका होती. सनातन धर्माविरुद्ध इतका जबाबदार, कर्तृत्वशाली आणि निर्भय पुढारी अद्यापि उत्पन्न झाला नव्हता. तात्त्विक प्रतिपादनापेक्षां आचारावर यांचा भर असे. त्यामुळें यांच्या चळवळीस तात्काळ प्रतिक्रिया सुरू होई.

**छत्रपति, राजाराम महाराज**—( जन्म स. १८९७–मृत्यु स. १९४०, कारकीर्द स. १९२२-१९४० ) कोल्हापूरराज्याचे छत्रपति. यांच्या शिक्षणाकरितां मिसेस आयर्विन नांवाच्या स्कॉच अमेरिकन बाईची योजना झाली होती. पांचगणी, बेंगळूर येथील शिक्षणानें समाधान होईना तेव्हां यांना इंग्लंडला रवाना करण्यांत आलें ( १९१२ मे ). तिकडील शिक्षण घेऊन हे अमेरिकामार्गे परत आले ( १९१५ जुलै ).

यांचा विवाह बडोद्याचे युवराज फत्तेसिंगराव गायकवाडांची कन्या इंदुमती राजे यांच्याशीं बडोदें येथें झाला ( १९१८ एप्रिल १ ). या लग्नांत गायकवाडांनीं यांना सहा लक्ष सत्तर हजार रुपये हुंडा दिला. लग्नानंतर त्यांचें नांव ताराबाई ठेवण्यांत आलें. यांच्या दुसऱ्या पत्नी विजयमालाबाई होत.

यांना तीन गोलमेजपरिषदांपैकीं दोहोंचें प्रतिनिधित्व मिळालें होतें. यांना शिकारीचा व घोड्यांच्या शर्यतीचा बराच नाद असे. यांनीं आपल्या कारकीर्दींत सामाजिक व धार्मिक सुधारणा घडवून आणण्याचा योग्य मार्गानें प्रयत्न केला.

यांच्या वेळीं औद्योगिक दृष्ट्या संस्थानची प्रगति झाली. यांनीं श्रीछत्रपति शाहू स्पिनिंग अँड वीव्हिंग मिल, शुगर मिल व बँक ऑफ कोल्हापूर या संस्था स्थापन केल्या. संस्थानच्या मालकीची रेल्वे असून यांनीं सिनेमाच्या धंद्यांतहि बरेंच लक्ष घातलें होतें.

यांच्या राज्यांत शिक्षणाची सोय उत्तम असून ती अधिक उपयुक्त व कार्यक्षम करण्याचा यांनीं प्रयत्न केला. मागासलेल्या जाती व स्त्रिया यांना शिक्षणांत अधिक सवलती देण्याचा परिपाठ यांनीं पुढें चालविला.

यांच्या मागें ताराबाई महाराणीसाहेबांच्या मांडीवर भोसले घराण्यापैकीं एका शाखेंतील मुलगा दत्तक घेऊन त्यांच्या अज्ञान अवस्थेंत महाराणीसाहेबांच्या अध्यक्षतेखालीं रीजन्सी कौन्सिल नेमून राज्यकारभार चालू झाला.

**छत्रे, विनायक ऊर्फ केरो लक्ष्मण**—( जन्म स. १८२४–मृत्यु स. १८८४ ) गणितशास्त्र व सृष्टिशास्त्र यांचे अभ्यासक व तज्ज्ञ. हे प्रत्यक्ष वेधहि घेत.

हे अष्टागरांतील नागांवीं जन्मलेले चित्पावन ब्राह्मण. यांचें शिक्षण मुंबई येथें एलिफन्स्टन इन्स्टिटयूशनमध्यें झालें. प्रो. ऑर्लिबार साहेबांचे हे प्रिय शिष्य होते. स. १८४० मध्यें मुंबई येथें कुलाबादांडीवर अन्तरिक्ष चमत्कार व लोहचुंबक यांचे अनुभव घेण्याकरितां वेधशाळा झाली. तिची सुरवात ऑर्लिबारसाहेबांनीं केली. तेथें यांची असिस्टंटच्या जागीं नेमणूक करण्यांत आली. स. १८५१ जूनच्या ७ तारखेस पुणें संस्कृत पाठशाळेच्या जागीं 'पूना कॉलेज' झालें. त्यानंतर कांहीं महिन्यांनीं त्या संस्थेच्या नॉर्मल स्कूलमध्यें सृष्टिशास्त्र व गणित शिकविण्याकरितां असिस्टंट प्रोफेसरच्या जागीं यांची नेमणूक झाली. त्या कॉलेजांत मराठी व इंग्रजी या दोन्ही भाषांत हे शिकवीत असत. पुढें त्या कॉलेजचा नॉर्मल स्कूल हा भाग वेगळा झाला त्यांत हे अध्यापक होते व पुढें कांहीं वर्षे त्याचे मुख्य सुपरिंटेंडेंटहि होते. त्या वेळेस त्या विद्यालयास व्हर्नाक्युलर कॉलेज असेंहि म्हणत. हल्लीं त्यास ट्रेनिंग कॉलेज म्हणतात. या वेळीं कांहीं दिवस हे एंजिनिअरिंग कॉलेजांतहि सृष्टिशास्त्रावर व्याख्यानें देत. मध्यें कांहीं दिवस हे अहमदनगर इंग्लिशस्कूलचे हेडमास्तर होते. स. १८६५ मध्यें यांस पूना कॉलेजांत गणित व सृष्टिशास्त्र यांचे प्रोफेसर नेमले. तेथें हे विषय हे इंग्रजींत शिकवीत. त्या कॉलेजास पुढें डेक्कन कॉलेज म्हणण्यांत येऊं लागलें. स. १८७९ मध्यें यांनीं पेन्शन घेतलें. नेटिव्ह लोकांस मिळणारें अति मोठें पेन्शन पांच हजार रुपये साल यांस मिळालें. स. १८७७ सालीं दिल्लीदरबारच्या वेळीं रावबहाद्दूर असा किताबहि यांना मिळाला. यांच्या अंगच्या अनेक सद्गुणांत सतत विद्याव्यासंग व सौजन्य हे गुण विशेष होते.

यांच्याविषयीं सरकारच्याहि मनांत आदर असे. निगर्वी वृत्ति असल्यामुळें विद्यार्थी वर्गाशीं हे खेळीमेळीनें वागत असून त्यांच्या अडचणींचें निरसन करण्यासाठीं हे केव्हांहि तयार असत. मृत्यूनंतर सरकारनें यांच्या कुटुंबासाठीं द. म. १०० चें पेन्शन दिलें. यांच्या स्मारकासाठीं त्या वेळच्या परिस्थितींतहि ११००० रु. च्यावर निधि जमला यावरून यांच्या लोकप्रियतेची कल्पना सहज होते.

सूर्यावरील डाग व पर्जन्यवृष्टि यांमध्यें कांहीं परस्पर संबंध आहे असें यांचें मत होतें.

ग्रहसाधनाचीं कोष्टकें हा आपला ग्रंथ यांनीं R.S 'Vince च्या ग्रंथांच्या आधारें केला ( १८६० ). या ग्रंथांत वर्षमान सूर्यसिद्धान्तांतील घेतलें आहे व ग्रहगतिस्थिति सायन घेतल्या आहेत. यामुळें या ग्रंथावरून ग्रह सायन येतात. रेवतीयोगतारा झिटापिशियम मानली आहे. ती शके ५७४ मध्यें मेषसंपाती होती. त्या वर्षी अयनांश शून्य मानावें आणि अयनगति वर्षाची ५०. १ विकला घेऊन त्याप्रमाणें अयनांशसंस्कार सायन ग्रहास करून निरयन ग्रह करावे असें यांचें म्हणणें आहे. यांत निरयन वर्षमान शुद्ध म्हणजे ३६५।१५।२३ घेतल्यासारखें होतें. हें वर्षमान व ५०. २ अयनगति घेऊन यांनीं स. १८६५ पासून नॉटिकल आल्मनाकवरून निराळें पंचाग सुरू केलें. कै. बाबासाहेब पटवर्धनांचें यांना मोठें साहाय्य होतें. त्या पंचागास यांनीं पटवर्धनी पंचांग असें नांव दिलें आहे. यांच्या ग्रंथावरून ग्रहस्थिति पुष्कळ शुद्ध येते. परंतु तो ग्रंथ आणि पटवर्धनी पंचाग सध्यां प्रचारांत नाहींत.

तिथिसाधनाचा तिथिचिंतामणीसारखा ग्रंथ यांनीं केला व तो काशीला छापला. हल्लीं तो ग्रंथ व ग्रहसाधनाचीं कोष्टकें हे दोन्ही ग्रंथ मिळत नाहींत. निरयन पंचांग करण्यास प्रत्यक्ष तो ग्रंथ उपयोगी नाहीं. शिवाय त्यांत लॉगॅरिथम आणि त्रिकोणमिति यांचें साह्य लागतें. यामुळें जुन्या जोशांस त्यावरून गणित करतां येत नाहीं. यांनीं मराठी शाळांस उपयोगी अशीं पदार्थविज्ञानशास्त्र आणि अंकगणित हीं दोन पुस्तकें केलीं आहेत.

**छत्रे, विष्णुपंत मोरोपंत**—( जन्म स. १८४०–मृत्यु स. १९०६ ) हिंदुस्थानांतील पहिले सुप्रसिद्ध सर्कसवाले व गायनशास्त्रज्ञ.

यांचा जन्म कृष्णाकांठीं असणाऱ्या अकलखोपास झाला. हे पटवर्धनांचे आश्रित. पण जमखिंडीकर १८५७ च्या बंडामुळें संकटांत आल्यानें हे रामदुर्गकर भाव्यांच्याकडे चाबुकस्वाराच्या जागेवर नोकरीस राहिले ( १८५८ ). तेथें यांनीं तीन वर्षे नोकरी केली. पुढें नोकरी सोडून ग्वाल्हेरास जाऊन गेल्या शतकांतील सुप्रसिद्ध अश्वहृदयज्ञ बाबासाहेब आपटे यांच्याकडे अश्वविद्या व रहिमतखांचे वडील हद्दूखां यांचेजवळ गायनविद्या शिकण्यास यांनीं सुरवात केली व दोन्ही विद्यांत यांनीं चांगलीच प्रगति संपादन केली. गायनाच्या प्रकारांत हे 'धृपदे' म्हणून प्रसिद्ध होते.

परत आल्यावर हे श्रीमंत रघुनाथराव विंचुरकर यांचेकडे विंचुरास नोकरीस राहिले ( १८७० ). तेव्हां हे घोड्यावर बसून चोहोंकडे हिंडत. या वेळीं यांच्या अश्वशिक्षणपटुत्वाची सर्वत्र ख्याति झाली. अनेक राजेमहाराजांना यांच्या या विद्येबद्दल आदर असे.

याच सुमारास मुंबईस चेअर्नी विल्सन या युरोपियन गृहस्थाची सर्कस आली. त्यांतील घोड्यांचे खेळ पाहून लोक फारच खूष झाले. त्यावरून प्रेरणा घेऊन यांनीं सर्कस काढली; तिच्या तालमी घेतल्या व खेळ करीत हे निघाले. यांचे मित्र नारायण परशुराम टिल्लू व अनेक राजेमहाराजे यांचें यांना साहाय्य असे. यांनीं मुंबईस येईपर्यंत घोडीं वगैरे स्वतःच्या मालकीचीं घेतलीं. हे मुंबईस आले तेव्हां विल्सनची सर्कस यांच्या शेजारीच तंबू ठोकून खेळ करीत होती. पण यांच्या सर्कसचे खेळ सुरू होतांच त्यांचा खर्च भागेना म्हणून त्याला आपले खेळ बंद करावे लागले ( १८८३ ). दुसऱ्या वर्षी तर त्याचा तंबू व इतर सामान यांनीं विकत घेतलें. त्याच्या सर्कशींतील दोन इंग्लिश स्त्रिया व चार काम करणारे युरोपियन आपल्याकडे नोकर ठेवले. अशा तऱ्हेने यांनीं आपली ' ग्रँड इंडियन सर्कस ' सर्व हिंदुस्थानभर फिरविण्यास सुरुवात केली. विल्सनच्या सर्कशीपेक्षां यांच्या सर्कशींतील जनावरांचे खेळ सफाईदार व उत्तम होत. नंतर नंतर तर यांनीं हिंदुस्थानच्या बाहेरील चीन, जपान, ब्रम्हदेश वगैरे देशांत यशस्वी दौरे करण्यास सुरुवात केली.

अशा तऱ्हेनें ऐन भराभराटींत यांनीं आपली सर्कस आपले कनिष्ठ बंधु काशिनाथपंत यांच्या स्वाधीन केली. त्यांनीं तर यांच्याहि पुढें जाऊन यांची सर्कस आशियाच्या बाहेर अमेरिकेंतील सॅनफ्रान्सिस्कोपर्यंत फिरविली. ते १९२४ डिसेंबर ११ रोजीं वारले. यांच्या सर्कशींत कामें करून तयार झालेल्या देवलबंधूंनीं स्वतंत्र सर्कस काढून आशिया, अमेरिका, युरोप व आफ्रिका या चारहि खंडांत यशस्वी दौरे करून यांची परंपरा चालू ठेवली.

यांचा दुसरा गुण गाण्याचा. यांची सर्कस काशीस असतां ( १८९२ ) तेथें यांचे गुरु हद्दुखा यांचे पुत्र रहिमतखां अत्यंत करुणास्पद स्थितींत आढळले. ताबडतोब यांनीं त्यांना आपल्या जवळ ठेवून त्यांची जन्मभर व्यवस्था केली.

आयुष्याच्या शेवटलीं सात आठ वर्षे यांनीं केवळ रहिमतखांच्या व आपल्या ' गुणीजन ' आवडाजी यांच्या संगतींत घालविलीं.

**छत्रे, सदाशिव काशीनाथ**—( जन्म स.१७८८-मृत्यु स. १८३० ) मराठींतील आद्य गद्य ग्रंथकार.

त्या वेळच्या पद्धतीप्रमाणें यांचें संस्कृतभाषेचें शिक्षण झालें होतें. यांचा मराठी काव्यांचा चांगला अभ्यास होता. त्या अभ्यासाच्या जोरावर मराठीचे तज्ज्ञ अशी ख्याति यांनीं मिळविली. १८०८ सालीं हे उद्योगानिमित्त मुंबईस आले. तेव्हां पेशवाईचा अंमल असल्यानें इंग्रजी शाळा नव्हत्या. तरी हे एका मिशनऱ्यापाशीं इंग्रजी शिकले. पेशवाईनंतर इंग्रजांचें लक्ष विद्याप्रसाराकडे लागलें. त्या वेळीं समाजांतील वजनदार व इंग्रजी जाणणारा यांच्यासारखा गृहस्थ त्यांना मिळाला आणि यांना शाळांचे तपासनीस म्हणून मोठ्या पगाराची व मानाची जागा देण्यांत आली. १८१४ पासून अखेरपर्यंत हे त्या कामावर होते. या नात्यानें यांनीं अनेकांना उत्तेजन देऊन नांवारूपास आणलें. त्यांपैकीं बाळशास्त्री जांभेकर व वृत्तपत्रकार भाऊ महाजन हे प्रमुख होत. यांची भाषा सरळ सुबोध व सुरम्य म्हणून प्रसिद्ध असे.

यांचे ग्रंथ—१ बालमित्र, २ वेताळपंचविशी (१८५२), ३ सिंहासन बत्तिशी ( १८५४ ), ४ इसापनीति ( १८६१ ). यांपैकीं पहिलीं दोन विल्ड्न्स फ्रेंड्स् व इसॉप्स फेबल्स यांचीं अनुक्रमें भाषान्तरें आहेत.

**छोटूराम, सर**—( जन्म स. १८८२-मृत्यु स. १९४५ ) पंजाबमधील सुप्रसिद्ध राजकारणी व जाट लोकांचे पुढारी.

रामरिचपाल हें यांचें खरें नांव. परंतु सर्व भावंडांत धाकटा म्हणून छोटूराम हेंच टोपण नांव घेऊन हे प्रसिद्धीला आले.

दिल्लीपासून अठ्ठावीस मैलांवर असणारें घारीसांपला हें गांव यांचें जन्मस्थान. बी. ए. झाल्यावर १९११ त हे आपल्या गांवीं वकिली करूं लागले. याच वेळीं जाट समाजाची अज्ञान, निर्धनता वगैरेमुळें होत असणारी दुर्दशा यांच्या ध्यानांत आली. त्या मागासलेल्या जातीला थोडें तरी राजकीय शिक्षण देण्याचे हेतूनें यांनीं ' जाट गॅझेट ' नांवाचें साप्ताहिक सुरू केलें ( १९१६-२४ ). याच सुमारास हे कॉंग्रेसचे एकनिष्ठ कार्यकर्ते बनले.

सुशिक्षित जाटांना जरी कॉंग्रेसमध्यें सामील होण्याचा हे उपदेश करीत तरी इतरांनीं कॉंग्रेसमध्यें सामील

होण्यास यांचा विरोध असे. दोन आघाड्यांवर युद्ध करणें त्यांना जमणार नाहीं असा यांचा या बाबतींत तर्कवाद असे.

हिंदु-मुस्लीम संघटनेसंबंधीं असणारें कॉंग्रेसचें गुळ-गुळीत धोरण न पटून यांनीं राजीनामा दिला ( १९२० ). पंजाबसारख्या प्रांतांत या संघटनेची इतकी जरूरी असतांना खादीसारख्या 'विधायक' कार्यावरच कॉंग्रेस आपली शक्ति खर्च करते हें यांना कधींच पटूं शकलें नाहीं.

अशा तऱ्हेनें कॉंग्रेसमधून बाहेर पडल्यानंतर हे युनियनिस्ट पक्षांत शिरले. 'जमिनदारी' प्रश्नावर एकत्र जमणाऱ्या सर्व जातींच्या लोकांना एकत्र आणणें या ध्येयवाक्यावर फझली हुसेन यांनीं स्थापन केलेल्या युनियनिस्ट पक्षाच्या संघटनेंत हे प्रमुख होते ( १९२४ ) व फजली हुसेन यांच्या मृत्यूनंतर सतत अठरा वर्षें हे त्या पक्षाचे प्रमुख होते.

प्रथम मुख्य प्रधान सिकंदर हयातखान व पुढें प्रधान मलिक खिजार हयातखान यांचे हे उजवे हात असत. मुहम्मदअल्ली जिना पंजाबमध्यें मुस्लिम लीग मंत्रिमंडळ बनवूं शकले नाहींत, त्याच्या मुळाशीं यांच्यासारखे पुढारी होते. शिक्षणमंत्री, डेव्हलपमेंट खात्याचे मंत्री व शेवटीं महसूलमंत्री या नात्यानें यांनीं केलेलें कार्य खरोखरच महत्त्वाचें आहे.

## ज

**जॅक्सन, ए. एम. टी.**—( खून स. १९०९ डिसें. २१ ) इंडियन सिव्हिल सर्व्हिसमधील एक अधिकारी व संस्कृतादि प्राच्यभाषांचे अभ्यासक.

हे कोल्हापूर राज्यांत कर्नल रे यांच्यानंतर रेसिडेन्टचें काम करीत होते ( १९०० सुमार ). पुढें यांची नाशिक येथें कलेक्टर म्हणून नेमणूक झाली. त्या वेळीं राजकीय वातावरण प्रक्षुब्ध होतें. गणेश दामोदर सावरकर यांना एक कवितेचें चोपडें प्रसिद्ध केल्याबद्दल यांनीं जन्मठेपेची शिक्षा दिली. त्यांतच एका युरोपियन एंजिनियरनें एका गाडीवाल्यास मारलें असतां यांनीं त्यास निर्दोषी सोडलें. अशा स्वरूपाच्या कारणांनीं यांच्या बद्दल विरुद्ध वातावरण उत्पन्न झालें. याच संधीला यांची बदली होऊन यांना पानसुपाऱ्या सुरू झाल्या. यांच्या सत्काराकरितां मुद्दाम मंगळवारसारख्या आड-वारीं यांना विशेष आवडणाऱ्या 'शारदा' या नाटकाचा प्रयोग किर्लोस्कर संगीत मंडळींनीं ठेवला. तेथें हे दरवाजांतून आंत शिरले आणि आपल्या बसण्याच्या खुर्चीपाशीं आले. खुर्चीवर बसत असतां अनंत लक्ष्मण कान्हेरे नांवाच्या १९ वर्षांच्या तरुणानें पिस्तुलाच्या साहाय्यानें चार गोळ्या झाडून यांचा खून केला. या खुनाच्या खटल्यांतून एका मोठ्या कटाचा सुगावा लागला आणि त्यांतून चार खटले निर्माण झाले. त्या खटल्यांतील आरोपी व त्यांना झालेल्या शिक्षा पुढें अनुक्रमानें दिल्या आहेत.

या खटल्यांतील गुन्हा घडण्यास कारण झालेलें पिस्तुल पुरविणारे विनायक दामोदर सावरकर हे आरोपी प्रत्यक्ष ताब्यांत न आल्यानें त्यांच्याशिवाय खटला चालून निकाल देण्यांत आला. ते सांपडल्यानंतर त्यांचा खटला चालविण्यांत आला.

खटला पहिला—१ अनंत लक्ष्मण कान्हेरे, २ कृष्णाजी गोपाळ कर्वे, ३ विनायक नारायण देशपांडे ( या तिघांना फांशी ), ४ गणेश बळवंत वैद्य, ५ शंकर रामचंद्र सोमण, ६ वामन ऊर्फ दाजी नारायण जोशी ( या तिघांना जन्मठेप ), ७ दत्तात्रेय पांडुरंग जोशी ( तीन वर्षें सक्तमजुरी ).

खटला दुसरा—या खटल्यांतील ५४ आरोपींपैकीं ३८ आरोपींना स्पेशल ट्रिब्यूनलपुढें चौकशीकरितां पाठविण्यांत आलें.—

१ केशव श्रीपत चांदवडकर ऊर्फ ब्रह्मगिरीबुवा ( पंधरा वर्षें काळेंपाणी ), २ गोपाळ कृष्ण पाटणकर, ३ त्रिंबक गंगाधर मराठे, ४ कृष्णाजी गोपाळ खरे ( दहा वर्षें सक्तमजुरी ), ५ व्यंकटेश परशुराम नागपूरकर ( सात वर्षें सक्तमजुरी ), ६ दामोदर महादेव चंद्रात्रेय,

७ पुरुषोत्तम लक्ष्मण दांडेकर, ८ गोपाळ गोविंद धारप, ९ सखाराम दादाजी गोऱ्हे, १० विष्णु महादेव भट ( पांच वर्षे सक्तमजुरी ), ११ श्रीधर वासुदेव सिधये, १२ वामन काशीनाथ पाळंदे, १३ दामोदर चिंतामण परांजपे, १४ रघुनाथ विद्याधर भावे ( चार वर्षे सक्तमजुरी ), १५ विष्णु गणेश केळकर, १६ काशीनाथ दाजी टोणपे ( तीन वर्षे सक्तमजुरी ), १७ विनायक गोविंद तिखे, १८ बळवंत रामचंद्र बरवे, १९ सखाराम रघुनाथ काशीकर ( दोन वर्षे सक्तमजुरी ), २० विनायक वासुदेव मनोहर, २१ गंगाराम रूपचंद मारवाडी, २२ रघुनाथ चिंतामण आंबेडकर, २३ नारायण दामोदर सावरकर ( सहा महिने सक्तमजुरी ), २४ रामचंद्र बाबाजी काथे, २५ विनायक काशीनाथ गायधनी, २६ गोविंद सदाशिव बापट, २७ हरि अनंत थत्ते, २८ त्र्यंबक विनायक जोग, २९ शंकर पांडुरंग महाजन, ३० मुकुंद पांडुरंग मोघे, ३१ केशव गणेश परांजपे ( दोषमुक्त करून सोडले ), ३२ विनायक सदाशिव बरवे, ३३ विनायक काशीनाथ फुलंब्रीकर, ३४ शंकर बळवंत वैद्य ( खटला चालू करण्यापूर्वी सुटका ), ३५ विश्वास बळवंत डावरे, ३६ अनंत विष्णु कोनकर, ३७ पुरुषोत्तम वामन गोखले ( कटाचा आरोप शाबीत झाला नाहीं. पण हत्यान्याच्या कायद्याखालीं ३ वर्षे सक्तमजुरी ).

**खटला तिसरा**—या खटल्यांत वरील आरोपींपैकीं फक्त क्रमांक १८ व १९ हे आरोपी होते.

**खटला चवथा**—विनायक दामोदर सावरकर ( २ जन्मठेपी ).

**माफीचे साक्षीदार**—१ काशीनाथ हरि अंकुशकर, २ दत्तात्रय पांडुरंग जोशी, ३ वा. रा. कुलकर्णी बी. ए., एल्‌एल्. बी., ४ चतुर्भुज अमीन ( आचारी ), ५ गणेश बळवंत वैद्य.

**जगताप, बाबुराव गणपतराव**—( जन्म स. १८९० ) मराठा समाजांतील सुप्रसिद्ध सार्वजनिक कार्यकर्ते, शिक्षणशास्त्रज्ञ व अनेक शिक्षणसंस्थांचे चालक.

यांचें मूळ गांव आंबळें ( ता. पुरंदर ). वडील नवव्या वर्षी वारल्यानें यांचें शिक्षण रा. ब. रामजी पांडु डे. पोलीस सुपरिंटेंडेंट या आपल्या चुलत्याकडेच झालें. पुण्याच्या नूतन मराठी विद्यालयांतून मॅट्रिक ( १९०८ ) व फर्ग्युसन कॉलेजांतून हे बी. ए. झाले ( १९१३ ). तेव्हां कुस्ती व क्रिकेट खेळण्याबद्दल यांची प्रसिद्धि होती. पुढें यांनीं नाशिकच्या पोलीस ट्रेनिंग स्कूलमध्यें सरकारी खर्चानें अठरा महिने शिक्षण घेतलें. पण यांना पाहिजे असलेली इन्स्पेक्टरची जागा न मिळाल्यानें यांनीं लेफ्टनंट म्हणून बडोद्याच्या लष्करी खात्यांत नोकरी पत्करिली ( १९१६ फेब्रु. ) तेथें कै. सयाजीराव गायकवाडांच्या शरीररक्षकाच्या जागेपर्यंत हे चढत गेले. पण नोकरीचा पेशा स्वभावास समाधानकारक न वाटल्यानें हे तेथून परत आले ( १९१८ ) आणि लागलीच जुलै महिन्यांत पुणें येथें इंग्रजी शाळा सुरू करून यांनीं आपल्या आवडत्या शिक्षण कार्यांत पाऊल टाकलें. तीन विद्यार्थ्यांवर मराठा स्टुडन्टस् ब्रदरहूडच्या जागेंत यांचे वर्ग सुरू झाले. १९१९ सालीं श्रीशिवाजी मराठा सोसायटी स्थापन झाली. सोसायटीनें प्रथम यांच्या शाळेला ग्रँट दिली व पुढें शाळा सोसायटीला जोडून घेण्यांत आली.

तेव्हांपासून हायस्कूल, प्रायमरी स्कूल, स्वतःची जागा, ऐंशी हजारांची प्रायमरी स्कूलची भव्य इमारत, व्यायामशाळा ( १९२५ ), कै. गणपत विठूजी शिंदे यांचे स्मरणार्थ विद्यार्थी वस्तुभांडाराची इमारत (१९२७), दि. ब. वंडेकर लायब्ररी इमारत ( १९२८ ), २६ हजारांची वसतिगृहाची इमारत ( १९३७ ), ढुबे बिल्डिंग ( १९३९ ) शिवाय साडे एकतीस हजारांचा अवस्थि बाग व कॉलेजांतील विद्यार्थ्यांकरितां ताराबाई बोर्डिंग हाउस या प्रकारें सोसायटीच्या कार्याचा पसारा सतत वाढत चालला आहे.

पुणे नगरपालिकेनें सुरू केलेलें गांधी ट्रेनिंग कॉलेज ( १९३९ ) तिनें बंद करण्याचें ठरवितांच या सोसायटीनें तें ताब्यांत घेऊन आपल्या जागेंत सुरू केलें ( १९४२ जून ) आणि यांनीं त्याची घडी योग्य तऱ्हेनें बसविली. तसेंच ' सोलापूर ट्रेनिंग कॉलेज 'हि सोसायटीने चालविण्यास घेतलें आहे ( १९४३ ).

अशा प्रकारें ७०० मुलांचें एक हायस्कूल, ५०० मुलांचें प्रायमरी स्कूल व पुणे नि सोलापूर येथील ट्रेनिंग कॉलेजें व्यवस्थित चालवून यांनीं महाराष्ट्रांतील मराठा समाजांत समाजकार्याची आवड व आत्मविश्वास उत्पन्न केला.

' शिक्षक ' मासिक यांनीं केवळ मागसलेल्या वर्गाच्या शिक्षकांकरितां सुरू केलें ( १९२२ ), तें दोन तपेंपर्यंत यांच्या संपादकत्वाखालीं अखंडपणें चालत आहे. शिक्षणक्षेत्रांत या मासिकाचें स्थान फार उच्च आहे.

' महाराष्ट्र हितचिंतक भ्रातृमंडळा 'तर्फे नाटकें करून

आपल्या संस्थांना आर्थिक मदत करणें, 'कौटुंबिक उपासना मंडळ' चालवून धार्मिक शिक्षण व समतेचा प्रचार करणें, बालवीर चळवळीत जिल्हा स्काउट कमिशनर म्हणून व अखिल भारतीय मराठा शिक्षण परिषदेचे व डेक्कन मराठा एज्युकेशन असोसिएशनचे चिटणीस वगैरे यांनीं केलेली कामगिरी निःसंशय नमुनेदार आहे.

याशिवाय साक्षरताप्रसारक-मंडळाचे, पुणें नगरपालिकेचे सभासद, तेथें स्कूलबोर्डाचे ३ वर्षे व जिल्हा स्कूलबोर्डाचे ७ वर्षे कार्याध्यक्ष होते. महाराष्ट्र युनिव्हर्सिटी कमेटीचे व खेर मंत्रिमंडळानें नेमलेल्या प्रायमरी एज्युकेशन बोर्डाचे हे सभासद होते व पुनःहि निवडून आले.

हे सेवानिवृत्त होऊन कोल्हापूर राज्यांत शिक्षणाधिकारी म्हणून गेले. पण श्रीशिवाजी मराठा सोसायटींत यांची आवश्यकता वाटूं लागली म्हणून यांना बोलविण्यांत आलें आणि हेहि पण तेथील फायदेशीर असणारी जागा सोडून सोसायटीच्या सेवेला हजर झाले ( १९४५ ).

हे आदर्श शिक्षक व समाजसेवक आहेत. शिक्षकाच्या पेशाबद्दल यांना अभिमान वाटतो. शिक्षकाला आवश्यक असणाऱ्या रुबाबदार शरीरयष्टि, स्पष्ट व खणखणीत वाणी, नियमितपणा, कष्टाळू स्वभाव, अभ्यासू वृत्ति, चारित्र्य, सौंदर्यदृष्टि व तळमळ इत्यादि गुणांचा मेळ यांच्यांत उत्तम झालेला आढळतो.

यांचें वाङ्मयः—१ मन्वतर वाचनमाला-शालेय, २ माझी शाळा ( १९३६ ), ३ अध्यापनाचा परिचय ( १९३६ ), ४ शाळा कशी चालवावी ( १९३९ ), ५ मराठा समाजांतील शिक्षण-संस्था ( १९३९ ), ६ टॉलस्टायच्या ८ गोष्टी, ७ शिशुसंगोपन ( १९४० ).

**जगन्नाथदास पुरुषोत्तमदास 'रत्नाकर'**—( जन्म स. १८६६–मृत्यु स. १९३२ ) व्रज भाषेतील सुप्रसिद्ध कवि.

यांचा जन्म काशीस झाला. यांचे पूर्वज पानिपतचे राहणारे असून ते मोगल बादशहाच्या दरबारीं मोठे मोठे अधिकारी होते. यांचे पणजोबा एकदां जहांदरशाहाबरोबर काशीला आले व तेव्हांपासून ते तेथेंच राहूं लागले. हे आग्रवाल वैश्य होत.

यांचे वडील फारसीचे उत्तम जाते होते. त्यांचाच गुण याचे अंगीं उतरून यांना कवितेची रुची उत्पन्न झाली. यांचे वडिलांचा भारतेन्दूशीं स्नेह असल्यामुळें त्यांच्या सत्संगतीचाहि यांच्यावर परिणाम झाला.

हे स. १८९१ त काशी येथें फारसी घेऊन बी. ए. झाले. पुढें एम्. ए. लाहि यांनीं हाच विषय घेतला. यांचे शिक्षण काशींतच झालें. बी. ए. होण्यापूर्वीपासूनच हे उर्दू काव्यरचना करीत असत. परंतु नंतर हिन्दी भाषेबद्दल हळूहळू यांना आत्मीयता वाटूं लागून हे लवकरच हिन्दी साहित्याचार्य व व्रजभाषेंतील सर्वश्रेष्ठ कवि बनले. स. १९००–१९०२ पर्यंत हे अवागढ संस्थानांत व अयोध्यानरेश कै. सर प्रतापनारायणसिंह बहादुर यांचे प्रायव्हेट सेक्रेटरी होते. स. १९०६ त महाराजांच्या मृत्यूनंतर यांच्या कार्यदक्षतेवर प्रसन्न होऊन अयोध्येच्या राणीसाहेबांनीं यांना आपले प्रायव्हेट सेक्रेटरी केलें.

यांच्या कविता सरस व भावपूर्ण असतात. आजपर्यंत त्यांनीं 'हिन्डोला,' 'समालोचनादर्श,' 'साहित्यरत्नाकर,' 'घनाक्षरी-नियम-रत्नाकर,' 'हरिश्चन्द्र,' 'गंगावतरण,' 'कलकाशी,' 'अष्टकरत्नाकर,' 'ऊधवशतक' इत्यादि काव्यग्रंथांची रचना केली. स. १९२८ त बिहारी-सतसईवर यांनीं एक मोठी ललित टीका लिहिली आहे. 'हमीर हठ' (चंद्रशेखर), 'हितकारिणी' ( कृपाराम ) व 'कंठाभरण' ( दूलह ) वगैरे कवींचीं काव्यें यांच्याच संपादकत्वाखालींल होत. "साहित्यसुधानिधि" नांवाचें मासिक हे पुष्कळ वर्षेपर्यंत काढीत. त्यांत यांचें कांहीं काव्य व दोहे प्रसिद्ध झाले आहेत.

यांच्या या वाङ्मयीन कार्याचा गौरव करण्यासाठीं कलकत्त्याच्या हिंदी साहित्यसंमेलनाचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें ( १९२३ ).

**जगन्नाथप्रसाद 'भानु'**—( जन्म स. १८५९–मृत्यु स. १९४५ ) हिन्दी व उर्दू भाषांतील सुप्रसिद्ध कवि, ग्रंथकार व साहित्यभक्त.

यांच्या पित्याचें नांव बख्शीराम. ते उत्तम कवि होते. त्यांनीं केलेलें हनुमाननाटक हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. मध्यप्रदेशांत त्यांच्याबद्दल चांगला आदर आहे.

इंग्रजी व हिन्दी भाषांचें साधारण ज्ञान संपादन करून हे शिक्षणखात्यांत दरमहा १५ रुपयांवर नोकरीस लागले व आपल्या हुषारीनें एक्स्ट्रा असिस्टंट कमिशनर व नंतर असिस्टंट सेटलमेंट ऑफिसच्या हुद्यावर पोंचले. कांहीं दिवस हे सेटलमेंट ऑफिसरहि होते. ही जागा फक्त आय्. सी. एस्. अधिकाऱ्यांना देण्याचा रिवाज होता. पण हे

तसे नसतांना यांना ती जागा देण्यांत आली. ३४ वर्षे नोकरी करून हे सेवानिवृत्त झाले व विलासपूर ( मध्य-प्रान्त ) येथें राहूं लागले.

नोकरींत असतां यांनीं लोकोपयोगी पुष्कळ कामें केलीं. खांडवा जिल्ह्यांत पन्नास नवीं गांवें रयतवारी पद्धतीनें बसवून त्यांचा चांगला बंदोबस्त केला. प्लेग, पटकी व दुष्काळ अशा प्रकारच्या संकटांत यांनीं लोकांना उत्तम साहाय्य केलें, त्यामुळें लोक यांच्या नांवाचीं भजनें कृतज्ञतेनें तिकडे गातात.

यांचें हिन्दीवर अत्यंत प्रेम असून तिच्या सेवेकडे यांचें सतत लक्ष असे. साहित्य आणि काव्यशास्त्र यांचें यांना उत्तम ज्ञान असून यांचा वेळ प्रायः त्या कामीं लागे.

यांचे छन्दःप्रभाकर व काव्यप्रभाकर हे ग्रंथ यांच्या काव्यशास्त्रांतील पांडित्याचा चांगला परिचय देतात. हिन्दी भाषेंत या ग्रंथांना चांगला मान आहे. यांच्या अनेक वर्षांच्या सखोल अभ्यासाचा हा परिपाक आहे. यांनीं अभ्यासाबरोबर त्याकरितां पैसाहि पुष्कळ खर्च केला. छन्दःप्रभाकराच्या लोकप्रियतेची कल्पना त्याच्या प्रसिद्ध झालेल्या अनेक आवृत्त्यांवरून सहज येते.

हे उर्दूंतहि उत्तम कविता करीत. उर्दू कविता प्रसिद्ध करतांना हे ' फैज ' हें टोपण नांव घेत. विलासपूरला यांचा स्वतःचा एक ' जगन्नाथ प्रेस ' आहे.

यांनीं अनेक विद्वानांच्या समोर काशी येथें छंदःशास्त्र-विषयक अनेक चमत्कार करून दाखविले. तेव्हां लोक यांना साक्षात् पिङ्गलाचार्य म्हणूं लागले व कवींचे 'भानु' असा यांचा गौरव झाला. जबलपुर, सागर, खांडवा, बैतुल, नरसिंहपुर वगैरे शहरांत यांच्या नांवें ' भानु कविसमाज ' स्थापन झाले. तेथें वर्गणी नसते पण हे मात्र त्या समाजांना साहाय्य करून उत्साह देतात. यांनीं एक काव्यविषयक मासिकहि चालविलें होत.

ब्रिटिश सरकार व देशी राज्यें यांत यांच्याविषयीं चांगला आदर आहे. यांना दिल्ली दरबारपदक, रायसाहेब व रावबहाद्दूर या पदव्या मिळाल्या. हे फर्स्ट क्लास ऑनररी मॅजिस्ट्रेट होते. हे अखिल भारतीय कविसंमेलनाचे अध्यक्ष झाले होते ( १९२५ ). हैदराबादचे माजी निजाम यांचा फार आदर करीत. एका राजांनीं यांना साहित्याचार्य ही पदवी दिली.

यांना हिन्दीशिवाय उर्दू, मराठी व उडिया या भाषा चांगल्या येत. शिवाय यांचा संस्कृत व इंग्रजी भाषांचा अभ्यास वाखाणण्यासारखा होता.

यांचे हिन्दी ग्रंथ—

१ काव्यप्रभाकर, २ छन्दःप्रभाकर, ३ नवपंचामृत रामायण, ४ काव्यकुसुमाञ्जलि, ५ छन्दःसारावली, ६ हिन्दीकाव्यालंकार, ७ अलंकार-प्रश्नोत्तरी, ८ रस-रत्नाकर, ९ काव्यप्रबंध, १० नायिकाभेद, ११ शंकावली, १२ अंकविलास, १३ कालप्रबोध, इत्यादि. उर्दू— १ गुलजारे सखून, २ गुलजारे फैज, इत्यादि.

**जगन्नाथ शंकरशेट** ऊर्फ **नाना शंकरशेट—** ( जन्म स. १८०३ फेब्रु. १०–मृत्यु स. १८६५ जुलै ३१ ) मुंबई शहरांतील सुप्रसिद्ध धनिक, अव्वल इंग्रजींतील सार्वजनिक कार्यकर्ते व थोर दानशूर नागरिक.

हे मुंबईचे दैवज्ञ ब्राह्मण ( सोनार ). यांचे पूर्वज मुरबाड (कल्याण भिवंडीजवळ जि. ठाणें) येथील राहणारे. यांचें उपनांव मुर्कुटे. यांचें घराणें अनेक पिढ्या व्यापार करणारें. त्यांपैकीं यांचे अजोबा बाबुलशेट यांनीं मुरबाड सोडून घोडबंदरावर वसाहत केली. वडील शंकरशेट प्रथम मुंबईत येऊन स्थायिक झाले. म्हैसूरच्या लढाईत टिपू ठार होऊन इंग्रजांचा जय झाला तेव्हां शंकरशेटांना कल्पनेबाहेर नफा होऊन त्यांच्याजवळ सोळा लक्ष रुपये रोख व एक लक्षाचें जवाहीर जमलें ( १७९९ मे ).

यांची माता भवानीबाई यांच्या जन्मानंतर थोड्याच वर्षांत वारली. तिच्या स्मरणार्थ गवालीया टंकजवळ भवानीशंकराचें देवालय व धर्मशाळा बांधण्यांत आली. पुढें यांच्या अठराव्या वर्षी वडिलांनीं देह ठेवला ( १९२२ ) आणि घरगुती व व्यापारधंद्याची प्रचंड जबाबदारी यांच्यावर येऊन पडली.

मुंबईस प्रथम ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या साहाय्यानें शिक्षण-प्रसाराचे काम सुरू झालें. पण त्यांना फारसें यश आलें नाहीं. तेव्हां लोकांनीं आपल्या संस्था काढण्यास सुरुवात केली. यांपैकीं सुरवातीच्या बहुतेक संस्थांचें धुरीणत्व यांचे-कडे असे. कांहीं प्रमुख संस्थाः—१ बॉंबे नेटिव्ह स्कूल बुक अँड स्कूल सोसायटी ( स्थापना १८२२ आगष्ट २१ ), एतद्देशीय लोकांत शिक्षणप्रसार करण्याकरितां निघालेली ही पहिली संस्था होय. याबाबत सदाशिव काशिनाथ छत्रे यांचें यांना साहाय्य होतें. २ बॉंबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी. वरील सोसायटीचें रूपान्तर या संस्थेंत झालें ( १९२४ ). या संस्थेची भरभराट मुंबई इला-

ख्यांत झालेली दिसतांच अशा शिक्षण देणाऱ्या संस्था जागोजाग निघूं लागल्या. ३ एल्फिन्स्टन फंड ( १८२७ ). माउंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन यांनीं राजिनामा दिला तेव्हां मुंबईंत उच्च शिक्षणाची सोय करण्याकरितां फंड ऊभारण्याचें ठरून चार लक्ष त्रेचाळीस हजार नऊशें एक रुपयांचा फंड जमला. त्या फंडाचे शेवटपर्यंत हे ट्रस्टी होते. ४ बोर्ड ऑफ एज्युकेशन ( १८४१ ). एल्फिन्स्टन फंडाच्या मार्फत उच्च शिक्षणाकरितां एल्फिन्स्टन कॉलेजची स्थापना होतांच ( १८३७ ), बॉंबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीचा त्या कॉलेजबरोबर मिलाफ करून सोसायटीचें नांव एल्फिन्स्टन इन्स्टिटयुट असें बदलण्यांत आलें. पुढें तीन वर्षांनीं बोर्ड ऑफ एज्युकेशनची स्थापना झाली. या बोर्डांत तीन नेटिव्ह सभासद वार्षिक निवडणुकीनें येत. त्यांत हे सतत सोळा वर्षे म्हणजे बोर्डाचें अस्तित्व होतें तोंपर्यंत निवडून येत. ५ स्टुडन्टस लिटररी अँड सायंटिफिक सोसायटी ( १८४५ ). ६ जगन्नाथ शंकरशेट मुलींची शाळा ( १८४८ ). ही शाळा त्या वेळीं यांनीं आपल्या स्वतःच्या वाड्यांत सुरू केली व लोकविरोधाला तोंड दिलें. ७ धि जगन्नाथ शंकरशेट फर्स्ट ग्रेड अँग्लो-व्हर्नाक्युलर स्कूल ( १८५७ एप्रिल २५ ) इत्यादि.

तसेंच खुनासारख्या मोठ्या खटल्यांचा निर्णय देण्याकरितां बसणाऱ्या 'ग्रड ज्यूरी' मध्यें एतद्देशीयांचा समावेश होण्याचा हक्क मिळविणें ( १८२९ ), सती जाण्यास प्रतिबंधक कायदा करण्याच्या कामीं साहाय्य करणें ( १९३० ), जस्टिस ऑफ दि पीस होण्याचा अधिकार एतद्देशीयांना देणें ( १८३७ ), इत्यादि गोष्टींनीं यांच्या सार्वजनिक आयुष्याला उजाळा मिळाला आहे. मुंबई शहराची आरोग्यकारक व्यवस्था करण्याबावत म्युनिसिपल कमिशनर या नात्यानें यांनीं केलेली कामगिरीहि अशीच महत्त्वाची आहे.

धि बॉम्बे असोसिएशन ( १८५२ ) ही राजकीय काम करणारी संस्था स्थापण्यांत हे प्रमुख होते. धि बॉम्बे ब्रंच ऑफ धि रॉयल एशियाटिक सोसायटीच्या मुंबई शाखेला यांनीं पांच हजार रुपये दिल्यानें तेथें नॅचरल हिस्टरीचे मौल्यवान् ग्रंथ घेऊन 'जगन्नाथ शंकरशेट लायब्ररी' या नांवानें एक स्वतंत्र विभागच त्या संस्थेला जोडण्यांत आला आहे ( १८६५ ).

ॲग्रिहॉर्टिकल्चरल सोसायटी ऑफ वेस्टर्न इंडिया आणि जिऑग्रफिकल सोसायटी या दोन्ही सोसायटीच्या उत्पादकांत हे प्रमुख असून हे दोन्हींचे अध्यक्षहि होते. तसेंच व्हिक्टोरिया अँड अलबर्ट म्युझियम अथवा सर्वपदार्थसंग्रहालयाला यांनीं पांच हजार रुपये दिले आणि त्या संस्थेची पहिली सभा ( १८५८ डिसें. ) व कोनशिलासमारंभ यांच्याच अध्यक्षतेखालीं साजरा झाला (१८६२).

मुंबई कायदेकौन्सिलच्या पहिल्या सभासदांत हे प्रमुख होते ( २२ जाने. १८६१ ). तथापि त्यापूर्वीहि मुंबईच्या गव्हर्नरकडून यांचा हरएक बाबतींत सल्ला घेतला जाई. त्याला महत्त्वहि तसेंच दिलें जाई.

मुंबईच्या राणीच्या बागेंत यांचा पुतळा उभारण्याकरितां मुंबईंत पंचवीस हजार रुपये जमा करण्यांत आले होते.

मुंबई विश्वविद्यालयांत मॅट्रिक परीक्षेंत संस्कृत घेऊन पहिला व दुसरा क्रमांक येणाऱ्या विद्यार्थ्यास जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ति मिळत असते. ती यांच्या स्मरणार्थ यांचे पुत्र विनायकराव यांनीं केलेल्या व्यवस्थेप्रमाणें मिळते. यांचा संस्कृत भाषेचा अभिमान व सतत बेचाळीस वर्षे केलेले विद्यावृद्धीचे प्रयत्न ध्यानांत घेऊन त्यांनीं मुंबई विश्वविद्यालयाच्या ताब्यांत कांहीं रक्कम दिली. तिच्या व्याजांतून २५-२५ रुपयांची एक शिष्यवृत्ति तीन वर्षे व २०-२० रुपयांची एक, जे मॅट्रिकमध्यें पास होऊन संस्कृत भाषेंत पहिले व दुसरे येतील त्यांना देण्याची व्यवस्था केली. पण पुढें कांहीं काळानें व्याजाचा दर कमी झाल्यावर तीनच्या दोन, पंचवीसच्या अठरा व वीस रुपयांची बारा रुपये करून तीन वर्षांच्या ऐवजी दोन वर्षे चालतील अशी व्यवस्था करण्यांत आली.

**जमशेदजी जिजिभाई, सर**—( जन्म स. १७८३–मृत्यु स. १८५९ ) सुप्रसिद्ध व्यापारी व दानशूर पारशी गृहस्थ.

जन्मस्थान मुंबई. मूळ स्थान नवसरी. लहानपणींच आईबाप वारले. यांचें पालनपोषण फ्रेमजी नसरवानजी यांनीं केलें. कारण त्यांनीं लहानपणींच आपल्या मुलीशीं यांचा वाङ्निश्चय केला होता. यांना गुजराथी व त्याबरोबरच थोडें इंग्रजीचें शिक्षण देण्यांत आलें.

फ्रेमजी यांचा रिकाम्या बाटल्यांचा व्यापार होता. त्यामुळें हेहि याच व्यापारांत पडले व बाटलीवाला या नांवानें प्रसिद्ध झाले.

१७९९ सालीं आपले नातेवाईक मेरवानजी माणिकजी यांच्याबरोबर कारकून म्हणून हे चीनला गेले. चीनमध्यें असतां यांनीं व्यापाराची चांगलीच माहिति करून घेतली.

हे मुंबईस आल्यावर यांच्या प्रामाणिक व मेहनती स्वभावामुळें यांना पंचवीस हजार रुपये कर्ज सहज उभारतां आलें. तें उभारून यांनीं चीनशीं व्यापार सुरू केला व स्वतः चार वेळां चीनला जाऊन आले. चवथ्या खेपेस परत येतांना मात्र यांचें जहाज फ्रेंचांनीं पकडलें. त्या वेळीं यांचा माल तर गेलाच, शिवाय कैदी म्हणून केप ऑफ गुड होपला यांना आणण्यांत आलें. तेथें डचांचा अंमल होता. पण इंग्रज वकिलाच्या दयाळुपणा-मुळें यांना मोकळे करून कलकत्त्यास आणून सोडण्यांत आलें. तेथून हे मुंबईस भणंग स्थितींत आले. यांच्या या निराशाजनक स्थितींत यांच्या सहकाऱ्यांनीं यांना मदत करून उत्साह दिला. १८०७ मध्यें शेवटची चीनची सफर करून हे मुंबईस स्थायिक झाले.

मुंबईस राहिल्यावर यांनीं जैन, पारशी व मुसलमान भागीदार घेऊन अफू व कापूस यांचा व्यापार सुरू केला. या धंद्यांत हे जातीनें सर्वत्र लक्ष ठेवीत. १८२२ मध्यें या धंद्यामुळें यांचें भांडवल दोन कोटी रुपये झालें व हे मुंबईस पहिल्या प्रतीचे व्यापारी ठरले. याच साला-पासून यांनीं आपला धर्मादाय सुरू केला.

यांचा व्यवहार प्रचंड प्रमाणांत सर्व प्रकारच्या लोकांशीं होता तरी यांचा कोर्टकचेऱ्यांशीं कधींहि संबंध आला नाहीं. उलट हे आपसांतील भांडणें आपणच मिटविण्याचा सल्ला देत.

यांनीं बेनिव्होलन्ट इन्स्टिटयूट काढून त्यातर्फे मुलांची एक व मुलींच्या तीन शाळा काढल्या. मुलींच्या शाळेमध्यें मुली येईनात. तेव्हां एक युरोपियन शिक्षकीण ठेवून यांनीं आपल्या मुलीस शिक्षण दिलें. अशा प्रकारें यांनीं स्त्रीशिक्षणाचा प्रचार केला.

यांच्या दानधर्माची कल्पना खालील यादीवरून येईल. १ स. १८२२ सालीं तीन हजार रुपये भरून पैशाकरितां तुरुंगांत पडलेल्यांना यांनीं सोडविलें. २ स. १८२४ मध्यें सुरत येथील जळालेली अग्यारी पुनः बांधून दिली. ३ स. १८३५ मध्यें सुरतेस २० हजार घरें जळालीं तेव्हां यांनीं ३५ हजार रुपये व तांदूळ पाठ-विले. ४ साष्टी व मुंबई यांच्यामधील सामुद्रधुनीवर सरकारच्या साहाय्यानें, पूल बांधला. एकूण खर्च एक कोट ऐंशी हजार. ५ पूना वॉटर वर्क्सकरितां एक लक्ष ऐंशी हजार खर्च. ६ स. १८८३ सालीं मुंबईच्या जम-शेदजी जिजिभाई हॉस्पिटलकरितां एक लक्ष रुपये दिले. त्या हॉस्पिटलजवळ २३ हजार रुपये खर्चून एक तळें बांधलें. ८ सुरतेच्या धर्मशाळेकरितां एक लक्ष पंचवीस हजार व नवसरीच्या धर्मशाळेकरितां ६२ हजार. ९ मुंबईच्या जमशेदजी जिजिभाई आर्ट स्कूलकरितां १ लक्ष रु. १० अग्यारी पुणेंकरितां ४५ हजार रुपये. ११ मुंबई, लाइसरोड धर्मशाळा १ लक्ष पन्नास हजार. १२ सर जमशेदजी जिजिभाई बेनिव्होलंट ट्रान्सलेशन फंड, १ लक्ष ५० हजार. अशा प्रकारें पंचवीस कोटींपेक्षां अधिक दानधर्म करून यांनीं आपलें नांव चिरका-लीन केलें.

या यांच्या परोपकारी कृत्यांमुळें सरकारनें यांना सर ही बहुमानाची पदवी दिली ( १८४२ ). टाउन हॉलमध्यें यांचा पुतळा उभारण्यांत आला ( १८५६ ) व महा-राणी व्हिक्टोरिया यांनीं यांना मानाचें रत्नजडित पदक दिलें ( १८५८ ).

यांच्या या विशेष प्रसिद्धीमुळें जमशेदजी जिजिभाई दुसरे, तिसरे व चवथे अशा नांवांचे पुढील पुरुष प्रसिद्ध झाले.

**जयकर, नामदार डॉ. मुकुंदराव रामराव—** ( जन्म स. १८८० सुमार ) हिंदुस्थानांतील विख्यात कायदेपंडित, राज्यघटनाशास्त्रज्ञ, प्रिव्ही कौन्सिलचे न्याय-मूर्ति, इंग्रजी भाषेंतील जगप्रसिद्ध वक्ते व अष्टपैलू विधा-यक मुत्सद्दी.

ह्यांचे वडील बालवयांतच वारल्यामुळें, आजोबा कै. रा. ब. वासुदेव जगन्नाथ कीर्तीकर, सरकारी वकील, आणि नंतर मुंबई हायकोर्टाचे प्यूनीं जज्ज, यांनीं यांचें संगोपन-संवर्धन केलें.

यांचें इंग्रजी शिक्षण एलफिन्स्टन हायस्कुलांत झालें आणि कॉलेज शिक्षण झेवियर कॉलेजांत होऊन तेथून हे बी. ए. झाले. यांनीं गव्हर्नमेंट लॉस्कूलमधून एलएल. बी. च्या टर्म्स भरल्या व त्या वेळीं एलफिन्स्टन कॉलेजमध्यें संस्कृत व इंग्रजी हे मुख्य विषय घेऊन हे एकदम एम्. ए., एलएल. बी. झाले.

१९०५ सालीं हे हायकोर्टांत प्रॅक्टिस करूं लागले. पुढें १९३७ सालीं फेडरल कोर्ट ऑफ इंडियाचे एक जज्ज म्हणून हिंदुस्थान सरकारनें यांची नेमणूक केली. त्यानंतर लंडन येथील ज्यूडीशियल कमिटीचे एक मेंबर म्हणून सरकारनें यांची नेमणूक केली. १९४२ सालीं यांनीं या सरकारी उच्च जागेचा राजीनामा दिला.

तरुणपणापासूनच विद्याव्यासंग आणि शिक्षण,

अध्ययन व अध्यापन यांची यांना भारी हौस. आर्यन एज्युकेशन सोसायटीच्या हायस्कूलचे हे संस्थापक व कांहीं वेळपर्यंत प्रिन्सिपल होते. गव्हर्नमेंट लॉ स्कूलचे हे पार्ट-टाइम प्रोफेसर होते. १९०७ ते १९१२ पर्यंत लॉ स्कूलमध्यें प्रोफेसर म्हणून काम केल्यावर यांना डावलून एका कमी दर्जाच्या युरोपियन प्राध्यापकाला यांच्यावरचा दर्जा देण्यांत आल्यामुळें, सरकारच्या या कृत्याचा तीव्र निषेध करून यांनीं स्वाभिमानपूर्वक आपल्या त्या जागेचा राजीनामा सरकारकडे पाठविला!

यांचा कॉलेजशिक्षणापासून संस्कृतचा व्यासंग दांडगा आहे. मरहूम राइट ऑनरेबल सर डी. एफ्. मुल्ला यांचा हिंदु लॉवरील ग्रंथ, 'स्त्रीधन' आणि 'विधवांचा वारसा' हे दोन भाग यांनीं लिहून दिल्यावांचून पुरा होऊं शकला नाहीं!

१९४२ सालीं इंदूर येथील शैक्षणिक परिषदेचें अध्यक्ष-स्थान यांना देण्यांत आलें. त्याचप्रमाणें त्याच सालीं अमरा-वतीस भरलेल्या महाविदर्भ परिषदेचेहि हे अध्यक्ष झाले. या दोनहि ठिकाणीं यांनीं केलेलीं भाषणें यांच्या विद्वत्तेची प्रगट साक्ष पटविणारीं आहेत. फर्ग्युसन कॉलेजमध्यें 'प्लेस ऑफ इंग्लिश लिटरेचर' (इंग्लिश वाङ्मयाचें स्थान) या विषयावर यांनीं केलेलें भाषण हें शिक्षण विषयावरील भाषणाचा एक उत्कृष्ट नमुनाच असून, मुंबई युनिव्हर्सिटीच्या इंटरच्या परीक्षेकरतां तें टेक्स्ट म्हणून लावण्याइतक्या योग्यतेचें आहे.

यांचे आजोबा कै. रा. ब. वासुदेव जगन्नाथ कीर्तीकर यांनीं लिहिलेल्या 'स्टडीज इन् वेदान्त,' या पुस्तकाचें संपादन-प्रकाशन १९२४ सालीं यांनीं केलें. यांनीं आपली दीड एक लाख रुपये किंमतीची उत्तम लॉ-लायब्ररी आजोबांच्या स्मरणार्थ 'कीर्तीकर लॉ लायब्ररी' म्हणून येथील ॲडव्होकेटस् ॲसोसिएशनला दिली. ती तिच्या संभारव्यवस्थेसह तर दिलीच, पण सालोसाल तिची व्यवस्था ठाकठीक राखण्यासाठीं वर २५ हजार रुपयांची रोख देणगीहि दिली.

शिक्षण क्षेत्रांत यांचें नांव कोणालाहि विसरतां येणार नाहीं, इतकी यांची या क्षेत्रांतील कामगिरी मोठी व मोलाची आहे. मुंबई युनि-व्हर्सिटीनें १९२४-२५ सालीं एक 'रिफॉर्म्स कमिटी' युनिव्हर्सिटीच्या शिक्षणक्रमांत सुधारणा सुचविण्यासाठीं नेमली होती तिचे हे एक सदस्य होते. या कमिटीपुढें यांनीं एक निश्चित असा शिक्षणक्रम-सुधारणेचा कार्यक्रम ठेविला होता. भाषावार विभाग-युनिव्हर्सिट्या सुरू करण्याची या कमिटीपुढील सूचना परिणत स्वरूप पावली. नंतर डेक्कन कॉलेजचा प्रश्न नेटाला लागला. सरकारनें हें कॉलेज रद्द करावयाचें ठर-विल्यामुळें, त्याविरुद्ध हे निकरानें झगडले, ते इतके कीं यांचा तो झगडा मुंबई युनिव्हर्सिटीच्या इतिहासांत चिरस्मरणीय झाला, आणि त्यांतून आज होऊं घातलेल्या 'महाराष्ट्र युनिव्हर्सिटीच्या' कल्पनेचें बीज अंकुरित झालें.

१९४१ सालीं महाराष्ट्र युनिव्हर्सिटीच्या संघटनेची शिफारस करण्यासाठीं एक कमिटी यांच्याच अध्यक्षते-खालीं नेमण्यांत आली, आणि या जयकर-कमिटीचा अहवाल १९४२ सालीं प्रसिद्ध झाला. या महाराष्ट्र विद्यापीठाच्या संकल्पपूर्तीला अवास्तव विलंब लागला असल्यास, त्याबद्दलची योग्य ती मजबूत आणि त्वरेची संघटना न केल्याबद्दल महाराष्ट्रीयांनीं इतरांना किंवा सरकारला दोष न देतां, तो स्वतःचाच दोष असल्याची प्रांजल कबूली दिली पाहिजे. मुसलमानांनीं आपल्या युनिव्हर्सिटीची आपल्याला पाहिजे तशी संघटना त्वरेनें केली तशी ती महाराष्ट्रीयांना कां करितां येऊं नये? तरी पण यांच्या प्रयत्नांना आतां मूर्त स्वरूप येऊन लवकरच महाराष्ट्र युनिव्हर्सिटीची स्थापना होईल अशी आशा वाटूं लागली आहे.

साहित्याप्रमाणें कला व संगीत यांचाहि यांना लहान-पणापासून अतिशय नाद आहे. अत्यंत शास्त्रशुद्ध पद्धतीनें कला व संगीत यांचा अभ्यास करण्यासाठीं नियमितपणें खूप वेळ यांनीं खर्चा घातला आहे. पं. विष्णु दिगंबर पलुस्कर यांच्या गांधर्व महाविद्यालयातर्फे भरलेल्या एका संगीत परिषदेचे अध्यक्ष या नात्यानें यांनीं केलेलें भाषण हा आधुनिक संगीत वाङ्मयांतील एक अविस्मरणीय आणि अमर असा भाग ठरेल. पुणें शहरीं भरलेल्या एका नाट्य परिषदेचे अध्यक्ष म्हणून यांनीं १९१८ सालीं केलेलें भाषणहि अत्यंत मनोवेधक तसेंच उद्बोधक आहे. मुंबईस स्वातंत्र्यवीर सावरकर यांचे अध्यक्षतेखालीं भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाचे स्वागताध्यक्ष या नात्यानें १९३७-३८ सालीं यांनीं केलेलें मार्मिक भाषणहि याच सदरांत घालतां येईल.

मुंबईच्या आर्ट स्कूलमधील फ्रीहँड ड्रॉइंगच्या शिक्षण-क्रमाबर यांनीं केलेलें मार्मिक भाषण आणि नव्या दिल्ली-तील सरकारी इमारतीवर कलाकुसरीचीं कामें हिंदी कलाकारांनाच देण्याबाबत यांनीं मध्यवर्ती असेंब्लींत केलेले

सतत प्रयत्न, यांच्या कलेविषयींच्या अभिजात हौसेची उत्कृष्ट साक्ष तर पुरवितातच, पण याहि क्षेत्रांत किती उत्तम प्रकारचा अभ्यास करून किती उच्च दर्जाचें ज्ञान यांनीं संपादन केलें आहे यावरहि प्रकाश टाकणारा आहे.

बालवयापासूनच राष्ट्रीय विचारांकडे ओढ असून चारित्र्य व शिस्त यांवर यांचा विशेष कटाक्ष आहे. बालवयांत यांनीं लिहिलेलीं पत्रें आणि केलेलीं भाषणें यांतून राष्ट्राभिमानी बाणा व्यक्त झालेला दिसतो. 'लाइफ ऑफ ॲन एनशंट ब्रह्मचारी ' अगर ' एका प्राचीन ब्रह्मचाऱ्याचें जीवन ' या विषयावर यांनीं १८९५ सालींच एक निबंध वाचला. त्यांत यांची चारित्र्य व शिस्त यांची आवड ठळक रीतीनें प्रतीत होते.

हिंदुधर्म आणि जगांतील तत्सदृश इतर धर्म यांचा यांनीं तरुणपणींच सखोल अभ्यास केला. १९०१ ते १९०३ पर्यंत सरस्वती मंदिरमध्यें यांनीं जे लेख मराठींतून प्रकाशित केले, त्यांतून यांचीं धर्मविषयक तुलनात्मक आणि खात्री व विश्वास पटविणारीं मतें स्पष्ट रीतीनें व्यक्त झालीं. विलायतेस वारंवार जाऊन आले तरी, यांच्या धार्मिक विचारांत फरक झाला नाहीं आणि यांचे विचार व आचार यांत सुसंगतीच राहिली.

राष्ट्रीय विचारांत देखील शिक्षणप्रचार आणि अध्ययन अध्यापनाची आवड यांमुळें तरुण-वरुणश्रेणींत यांनीं धडाडीची कामगिरी केल्याचे अनक दाखले सांपडतात.

या क्षेत्रांत पुढें पुढें मिरविण्याचा यांचा स्वभाव नसला तरी, यांनीं बजावलेली भरीव कामगिरी उल्लेखण्यासारखी आहे. ' भांडारकर रिसर्च इन्स्टिट्यूट ' या महत्त्वाच्या संस्थेला वेळोवेळीं मिळालेल्या उदार व भरीव मदतीच्या अनेक देणग्यांचे मागें यांचे प्रयत्न आहेत. तसेंच 'महाभारत'–संशोधनाचा ग्रंथ प्रकाशित करण्यासाठीं सरकारी देणग्या मिळविण्यांतहि यांचा बराचसा हात आहे. महाराष्ट्रांतील शिक्षण व संशोधन यांचा भावी इतिहास यांच्या उल्लेखावांचून पुराच होणार नाहीं.

शिक्षण-तज्ज्ञ म्हणून यांना तरुण वयापासूनच सर्वत्र मान्यता मिळाली. नागपूर, लखनौ, पाटणा, अन्नामलाई इत्यादि केंद्रीय युनिव्हर्सिट्यांकडून पदवीदानसमारंभाचीं मुख्य भाषणें करण्याचीं निमंत्रणें यांना आलीं आणि यांनीं त्या त्या ठिकाणीं जीं भाषणें केलीं तीं शिक्षणक्षेत्रांत विद्यार्थी व प्राध्यापक या उभयतांनाहि महत्त्वाचें मार्ग-दर्शन करण्याइतकीं चिरस्थायी स्वरूपाचीं आहेत.

शिवाय अनेक कॉलेजांतून अनेक महत्त्वाच्या विषयांवर यांचीं विचार-प्रवर्तक भाषणें विद्यार्थ्यांकरितां झालीं आहेत. अनेक राजकीय परिषदांचे अध्यक्ष व मुख्य वक्ते म्हणूनहि यांनीं भाषणें केली आहेत. एका संस्थानी परिषदेचे व पोस्टमनांच्याहि परिषदेचे अध्यक्ष म्हणून यांनीं काम केलें आहे. या भाषणांतून यांचा सखोल अभ्यास व निरीक्षण यांचा प्रत्यय येतो. पोस्टल खात्यांतील कमी पगाराच्या नोकरांचे पगार वाढविण्याचे पुरस्कारासाठीं यांनीं आपल्या भाषणांत जो समर्पक व सखोल युक्तिवाद मांडला तो केवळ बिनतोड आहे.

विद्यार्थ्यांत यांनीं केलेलें कार्य विशेष उल्लेखनीय असून शिक्षकांपेक्षां विद्यार्थिवर्गानेंच यांना जास्त जवळ केल्याचे दाखले फार सांपडतात. विद्यार्थ्यांच्या अनेक सभांपुढें यांनीं भाषणें केलीं व विद्यार्थ्यांच्या अनेक परिषदांच्या अध्यक्षस्थानीं यांची योजना झाली. हैद्राबाद–सिंधमधील विद्यार्थी परिषदेचे अध्यक्ष म्हणून यांनीं केलेल्या कामगिरीचा या बाबतींत ठळक उल्लेख होण्यासारखा आहे.

१५ मे १९१७ रोजीं नाशिक येथील सामाजिक परिषदेचे अध्यक्ष या नात्यानें ह्यांनीं आपलें पहिलें सार्वजनिक जाहीर भाषण केलें. त्या भाषणांत यांनीं व्यक्त केलेल्या कल्पना, प्रतिपादिलेले विचार आणि सुचविलेली संघटना, श्रोत्यांना फारच आवडली आणि त्याबद्दल यांचें सर्वत्र अभिनंदन झालें.

२६ जानेवारी १९१८ रोजीं लोणावळा येथें पुणें जिल्हा परिषदेचे अध्यक्षस्थानावरून यांनीं पहिलें राजकीय भाषण केलें. त्या वेळीं लो. टिळक यांनीं यांच्या कर्तबगारीची व गुणांची प्रशंसा केली.

१९१७ डिसेंबरमधील कलकत्त्याच्या काँग्रेसमध्यें यांनीं ' स्वराज्य ' या विषयावर भाषण केलें. नंतर १९१८ सप्टेंबरमध्यें मुंबई शहरीं भरलेल्या काँग्रेसच्या खास अधिवेशनांतहि याच विषयाचा पुरस्कार यांनीं केला. १९२० च्या सप्टेंबरांत कलकत्त्यास भरलेल्या काँग्रेसच्या खास अधिवेशनांत, म. गांधींच्या असहकारितेच्या ठरावावरील एका उपसूचनेंतहि यांनीं स्वराज्याच्या याच उदात्त कल्पनेचा पुरस्कार केला. १९२५ च्या कानपूर काँग्रेसमध्यें हे ' प्रतियोगी सहकार ' व ' बंगालच्या राजकीय कार्यकर्त्यांचा बंदिवास ' या विषयांवर बोलले.

हे तरुणपणापासून कट्टे राष्ट्रवादी असून ' अत्यंत

निर्भय व स्पष्ट वक्ते मुत्सद्दी' अशी यांची ख्याति आहे. सुदवातीला असहकारितेच्या चळवळींत हे सामील झाले. पण नंतर असहकारितेच्या चळवळीवरील चौकशी कमिटीच्या रिपोर्टानंतर यांनीं आपला कायद्याचा व्यवसाय फिरून सुरू केला. १९२० सालीं गांधीजींनीं सुरू केलेल्या टिळक स्वराज्य फंडाला यांनीं पंचवीस हजार रु.ची देणगी दिली.

मुंबईच्या कायदे-मंडळांत हे स्वराज्य पक्षाचे पुढारी होते. त्या वेळीं यांनीं कायदे-मंडळांतील आपलीं पहिलीं अव्वल दर्जाचीं भाषणें केलीं. त्यांत 'सरकारवरील निंदाव्यंजक ठराव', 'अंदाजपत्रकी धोरण', 'लॉर्ड ऑलिव्हर यांची घोषणा' व 'मद्यपान बंदीचें सरकारी धोरण' या विषयांवरील यांचीं भाषणें उल्लेख करण्याइतकीं महत्त्वाचीं आहेत. माहिती, आंकडे व तपशील यांनीं खच्चून भरलेलीं, परंतु अत्यंत विचारप्रवर्तक अशीं अस्सल पार्लमेंट-पटु वक्त्याला शोभेशीं, हीं भाषणें झाल्याबद्दल यांचा सर्वत्र गौरव झाला. यांचीं भाषणें ऐकणें म्हणजे श्रोत्यांना एक वक्तृत्वाची मेजवानीच वाटे। (१९२५)

यानंतर यांनीं 'प्रतिसहकार पक्षाची' संघटना केली आणि मध्यवर्ती कायदे-मंडळांत हे निवडून आले. तेथें हे नॅशनॅलिस्ट पक्षाचे डेप्युटी लीडर म्हणून चमकले. सिमल्याच्या बैठकींत तर विरोधी पक्षाचे पुढारी म्हणूनहि हे गाजले. मध्यवर्ती कायदे-मंडळांतहि ह्यांनीं अनेक महत्त्वाच्या विषयांवर संस्मरणीय अशीं भाषणें केलीं. त्यांत 'आय. एम. एस. नोकऱ्यांचें हिंदीकरण', 'कार्यकारी मंडळावरील नामदार', 'सरकारच्या हिंदुस्थानविषयक धोरणांच्या घोषणेची मागणी', 'लाला लजपतराय यांच्या मृत्यूबाबतचा ठराव' इतक्या विषयांवरील भाषणें उल्लेखनीय आहेतच. पण त्याहिपेक्षां 'क्रिमिनल लॉ अमेंडमेंट', 'सुवर्ण परिमाण', 'अल्पवयी विवाहाबाबतचें शारदा बिल', हिंदुस्थानकरितां खास प्रिव्ही कौन्सिल, व 'ट्रान्सफर ऑफ प्रॉपर्टी' या विषयांवरील यांचीं भाषणें फारच मुद्देसूद आणि प्रभावी होतीं. 'गेन्स ऑफ लर्निंग', 'ॲडॉप्शन व्हॅलिडेटिंग', 'अमेंडमेंट ऑफ स्पेशल मॅरेज ॲक्ट' इतक्या उत्कृष्ट कायद्यांची घडण घडविण्यांत यांचा मुख्य हात होता. याखेरीज 'अस्पृश्यता-निवारण' व 'देवदासी बिल' या दोन समाजोपकारी बिलांचा प्रस्तावहि यांनींच मध्यवर्ती कायदे-मंडळांत केला.

वरील मुदतींतच यांनीं राजकीय विषयांवर अन्यत्र केलेलीं भाषणेंहि अत्यंत मनोवेधक आहेत. त्यांतील मुद्दाम नमूद करण्यासारखीं भाषणें म्हणजे 'अकोला परिषदेच्या' अध्यक्षस्थानावरून केलेलें आणि ठाणा जिल्ह्यांतील शहापूर येथें केलेलें भाषण हीं होत. प्रतियोगी सहकार-पक्षाची संघटना व प्रचार करतांना कलकत्ता शहरीं १९२६ सालीं केलेलीं दोन भाषणें आणि पुण्यांतील किर्लोस्कर थिएटरमध्यें केलेलें भाषणहि संस्मरणीय आहे.

'शांतिदूत' म्हणून यांनीं आपल्या आयुष्यांत बजावलेली कामगिरीहि फार महत्त्वाची व सुदीर्घ परंपरेची आहे. साबरमतीचा करार आणि बारडोली सत्याग्रहाची तडजोड ह्यांनीं जमवून आणिली (१९२५–२६). अनेक संस्थासमारंभांचें अध्यक्षस्थान स्वीकारून अत्यंत महत्त्वाच्या विषयांवर यांनीं एक हजारांवर भाषणें केलीं आहेत. समाजसेवेचीं मोठमोठीं कामें त्यांच्या प्रेरणेनें व सहकार्यानें झालीं असून हिंदी स्त्रियांच्या उन्नतीकरितां यांनीं केलेले कळकळीचे प्रयत्न तर सर्व-विश्रुत आहेत.

अनेक ब्रिटिश मुत्सद्यांशीं यांची दाट मैत्री आहे. पण कोणाहि ब्रिटिश मुत्सद्याचे आहारीं न जातां हे सर्वांवर वजन ठेवून आहेत. सर्व राजकीय पक्षांच्या पुढाऱ्यांना हे प्रिय असून मित्र व शत्रू अशा दोघांनाहि यांच्याविषयीं आदरभाव वाटतो.

तिन्हीहि 'गोलमेज परिषदांना' सदस्य या नात्यानें हे हजर होते. या परिषदांच्या एकंदर नऊ कमिट्यांपैकीं पांच कमिट्यांवर यांनीं काम केलें आहे. 'जॉइंट सिलेक्ट कमिटी'वरील सदस्य म्हणून हिंदी हितसंबंधांकरितां यांनीं आपल्या प्रयत्नाची पराकाष्ठा केली.

गांधी–आयर्विन करार घडवून आणण्याच्या दोन प्रख्यात शांतिदूतांत हे सर तेज बहादूर सप्रू यांच्या जोडीला होते. दुसऱ्या गोलमेज परिषदेला महात्मा गांधी गेले त्या वेळींहि यांनीं योग्य ते प्रयत्न केले. मरहूम मि. रॅम्से मॅकडोनाल्ड यांनीं कॉम्युनल ॲवार्डचा निर्णय दिला त्या वेळीं गांधीजींच्या संस्मरणीय उपोषणानंतर जो पुणें-करार झाला, त्यासाठींहि यांनीं महत्त्वाची खटपट केली.

सर्वांवर सारखें वजन ठेवून सर्वांच्या आदरास पात्र होणारे जे कांहीं हाताच्या बोटांवर मोजण्याइतकेच पुढारी देशांत आहेत अशा पुढाऱ्यांत यांना मानाचें स्थान आहे. यांच्यावर सर्वांचा सारखा विश्वासहि असल्यामुळें आजच्या आणीबाणीच्या काळांत देखील सर्व

पक्षांना एकत्र आणण्याच्या कामीं वापरतां येण्याजोगी एक शक्ति या नात्यानें ह्यांचा उपयोग होऊं शकेल.

यांचें असामान्य व्यक्तिमत्त्व आणि व्यापक वजन यांचें रहस्य यांच्या विशिष्ट निस्पृही वृत्तींत आहे. सरकारनें आतांपर्यंत यांना मोठमोठ्या हुद्याच्या जागा आणि K. C. S. I. सारख्या पदव्या देऊं केल्या, पण यांनीं साधा 'मिस्टर'च राहणें पत्करलें. यांच्या ह्या त्यागी वृत्तीचीं कारणेंहि उघड आहेत. संस्कृत व विद्याभ्यास यांची यांना बालवयापासून आवड. हिंदु संस्कृतीचें हे एक आदर्श प्रतीक आहेत. देशसेवेकरितां यांनीं आपला वेळ व शक्ति खर्ची घातल्याच, पण सल्लामसलत देऊन, द्रव्याची मदत करून आणि अनेक मार्गांनीं यांनीं अनेक होतकरू व्यक्तींना व उपयुक्त संस्थांना मोलाची मदत केली आहे. अशांपैकीं रामकृष्ण आश्रम, खार; नॅशनल मेडिकल कॉलेज, अनाथ महिलाश्रम-माटुंगा, आर्यन एज्युकेशन सोसायटी व मराठी ग्रंथ-संग्रहालय यांचा प्रामुख्यानें उल्लेख करितां येईल. आपल्या पाठारे प्रभु जातीच्याहि अनेक संस्थांना यांनीं उदार हस्तें मदत केली आहे. परंतु दाता या दृष्टीनें आकुंचित जातीय वृत्ति सोडून यांनीं सदैव सत्पात्रींच दान करण्यावर कटाक्ष ठेविला. अशा रीतीनें यांनीं दिलेल्या देणग्यांचा आंकडा सहज दोन लाख रुपयांवर जाईल!

१९१९ सालीं जालियनवाला बागेच्या अत्याचाराची चौकशी करणाऱ्या पंजाब कमिटीवरील आपल्या उत्कृष्ट कामगिरीनें हे फारच प्रकाशांत आले. यांनीं या अत्याचारांबाबत प्रसिद्ध केलेला अहवाल इतिहासांत अमरस्थान पटकावीलच. इंग्लंडांत १९४० सालीं ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटीनें यांना D. C. L. ही उच्च पदवी देऊन यांच्या विद्वत्तेच्या लौकिकावर योग्य कळस चढविला आहे.

मागें म्हटल्याप्रमाणें बालवयापासूनच हे कट्टे राष्ट्रवादी आहेत. प्रथम हे 'होमरूलर' होते. नंतर काँग्रेसचे सदस्य असतांना काँग्रेस पक्षांतील स्वराज्य पक्षांत हे दाखल झाले. त्याचेंच कालमानाप्रमाणें रूपांतर प्रतिसहकार पक्षांत झालें. तरीहि हे कित्येक वर्षें काँग्रेसचे सभासद राहिले. नंतर स्वराज्य पक्षांतील बहुतेकांनीं नॅशनॅलिस्ट पक्ष काढला, त्यांत इतर सर्व पक्ष व नेमस्त यांचाहि अंतर्भाव करण्यांत आला होता. परंतु अखेर हे विलायतेस गोलमेज परिषदेंत काम करीत असतांना यांच्या मित्रांनीं यांना लोकशाही स्वराज्य पक्ष वेगळा काढून सोडलें व हे एकांडे शिलेदारच राहिले. देशहिताचा लढा लढण्यासाठीं मजबूत पक्ष-संघटना करण्याचे प्रयत्न यांनीं वारंवार केले, परंतु ते व्यर्थ गेले. ज्यांच्या ज्यांच्याविषयीं यांनीं मनांत आशेचे मनोरे बांधले असे यांचे बरेच मित्र व सहकारी यांचेपासून दूर झाले. याचीं कारणें त्यांचीं त्यांनाच माहीत. अखेर हे पक्षविरहित झाले. हे हिंदुमहासभावादी आहेत आणि त्या वेळीं पार्लिमेंटरी कमिटीपुढें यांनीं जी तडफदार साक्ष दिली तीमुळें मुसलमान व सरकार या दोघांनाहि जबर आश्चर्याचे धक्के बसले! आज हे कोणत्याहि विशिष्ट पक्षांत नसले तरी वर एकदां म्हटल्याप्रमाणें सर्व पक्षांना हे आवडतात, सर्व पक्षांतील लोक यांना मान देतात, आणि सर्वांना यांचा दराराहि वाटतो.

पक्ष-प्रचारासाठीं हे बाहेर पडत त्या वेळीं ज्या ज्या ठिकाणीं हे गेले तेथील लोकांनीं यांना डझनावारी मानपत्रें दिलीं आहेत. हे अत्यंत निर्भय स्पष्टवक्ते असले तरी प्रतिपक्षीय व त्यांचीं तत्त्वें यांविषयीं आदर ठेवून आणि सहिष्णुता वृत्तीनेंच यांचीं भाषणें होतात. खाजगी व राजकीय बाबींत योग्य तारतम्य राखण्याचें कौशल्य व सांस्कृतिक सौजन्य यांचे ठिकाणीं आहे. आणि यांतच लहानापासून मोठ्यापर्यंत, तसेंच शत्रुमित्रांतहि यांना आदरानें स्थान हें यांचें रहस्य आहे.

यांच्या निर्भय वृत्तीचें एकच उदाहरण नमूद करणें पुरेसें होईल. स्वराज्य पक्ष स्थापन झाला त्या वेळीं, महात्माजींच्याबरोबर हेच झगडले. आणि स्वराज्यपक्षांतून प्रतियोगी सहकार पक्ष निघाला, त्या वेळींहि यांना पं. मोतीलाल नेहरू यांचेशीं निकरानें झगडावें लागलें व त्यांतहि हे यशस्वी ठरले. मित्रांप्रमाणें शत्रूंना देखील यांचा सल्ला उपयोगी पडतो.

अनेक राजकीय परिषदा यशस्वी करण्यास यांचें सहकार्य कारणीभूत झालें आहे. देशांतील सर्व पक्षांची एकजूट करण्यावर यांचा नेहमीं कटाक्ष असतो. म. गांधींनीं उपवास केला तेव्हां त्यापासून त्यांना परावृत्त करण्यासाठीं किंवा त्यांचे हेतु साध्य व्हावे म्हणून, अनेकांना एकत्र जमवून परिषद भरविण्याचे कामीं यांचाच पुढाकार उपयोगी ठरला आहे.

हिंदु-मुसलमानांच्या ऐक्यासाठीं देखील यांनीं थोडे थोडके प्रयत्न केले नाहींत. पण बॅ. जिना व त्यांचे अनुयायी यांच्या दुराग्रही हटवादामुळें यांना त्यांत यश आलें नाहीं. या मुस्लीमलीगवाल्यांच्या दुराग्रही हटवादाला ब्रिटिश सत्ताधाऱ्यांचीच कशी फूस

होती, हें पुढें इतिहासांत नमूद होईलच. गोल-मेज परिषदेंत आणि हिंदुस्थानांतील अनेक परिषदांत यांनीं याच दृष्टीनें पुष्कळ प्रयत्न केले. पण तेहि वरील कारणांमुळेंच व्यर्थ गेले. अनेक अपक्ष परिषदा व कमिट्यांच्या सभा भरविण्यामागें यांचा हात असून व्हाइसरॉयच्या कौन्सिलची हिंदीकरणाच्या दृष्टीनें दोनदां वाढ करविण्याचें बरेंचसें श्रेय यांनाच आहे. सरकारनें या बाबतींत यांच्या सर्व शिफारसी अंमलांत आणल्याच नाहींत, 'पण दोन्हींहि प्रसंगीं लोकपक्षानेंहि दिलें तें पदरांत पाडून घेण्याची तत्परता दाखविली असती तर, सध्यांपेक्षां हिंदी जनतेचा खचित जास्त फायदा झाला असता.' असें कांहीं तज्ज्ञांचें मत आहे.

देशाच्या औद्योगिक प्रगतीसाठींहि यांनीं कळकळीचे व महत्त्वाचे अनेक प्रयत्न केले आहेत. दिल्लींतील एक व पुण्यांतील एक अशा दोन्हींहि औद्योगिक प्रदर्शनांचें उद्घाटन यांचे हातूनच झालें. गोलमेज परिषदांतून हिंदुस्थानच्या व्यापारधंद्यासंबंधीं यांनीं केलेलीं भाषणें यांच्या देशी उद्योग-धंद्यांतील प्रगतीविषयींच्या कळकळीचे अमर असे पुरावेच होत. हिंदुस्थानांतील आणि विशेषतः महाराष्ट्रांतील औद्योगिक प्रगतीच्या अनेक प्रयत्नांना यांनीं आस्थेवाईकपणानें हातभार लावला. अनेक व्यक्तींना व संस्थांना प्रत्यक्ष भांडवलाची व अन्य स्वरूपाची मदत यांनीं देशी धंद्यांकरितां केली आहे. १९३५ सालीं यांनीं साताऱ्यास वेस्टर्न इंडिया लाइफ इ. कं. ची इमारत व श्री. चिरमुले यांच्या तसबिरीचा अनावरण-समारंभ केला त्या वेळीं व्यापार-धंद्यांतील मागासलेपणाबद्दल आपल्या भाषणांत यांनीं महाराष्ट्रीयांना दोष दिला; आणि त्या वेळींच १९२० सालीं म. गांधींनीं काढलेल्या टिळकस्वराज्य-फंडाच्या अव्यवस्थेवर टीका केली. त्या रकमेचा विधायक व प्रचारकार्यासाठीं व्हावा तसा उपयोग न होतां, निष्फळ उधळपट्टी झाली, असा यांच्या टीकेचा रोख होता.

बारकाईनें यांच्या जीवन-चरित्राचें निरीक्षण केल्यास हिंदुस्थानांतील स्त्रियांच्या चळवळी व संघटना यांच्यामागें यांच्याच आत्मिक प्रेरणांचें सूत्र असल्याचें आढळून येतें. स्त्रियांचे कौटुंबिक व सामाजिक हक्क यांना हिंदुकायद्यांत योग्य स्थान प्राप्त करून देण्यासाठीं हे सतत झटले. नाशिक, मुंबई व कलकत्ता इत्यादि प्रमुख शहरांत यांनीं त्यासंबंधीं दिलेल्या व्याख्यानांमुळें स्त्रियांचे ठिकाणीं स्वतःच्या उन्नतीची जाणीव व जागृति फैलावली. स्त्रियांच्या उन्नतीचे प्रयत्नासाठीं मिळालेली एकहि संधि यांनीं वाया घालविली नाहीं. अस्पृश्योद्धारासाठीं यांनीं केलेले प्रयत्नहि असेच कळकळीचे आहेत. दोन्हीहि क्षेत्रांत यांनीं केलेलें कार्य विस्मयजनक व कौतुकास्पद आहे.

सर्व कार्यांत यांचा भर स्वावलंबी प्रयत्नावर असतो. स्वाभिमानाला मारक असें कोणतेंहि कार्य हातीं घेऊं नये यावरहि यांचा तितकाच कटाक्ष आहे. या दृष्टीनें मद्रासेंतील एरोडें येथील यांचें भाषण मोठें मनोवेधक आणि मार्गदर्शक ठरेल. शारीरिक तंदुरुस्तीवरहि यांचा कटाक्ष असून, १९४३ सालीं जळगांव येथील शारीरिक शिक्षण-परिषदेचे अध्यक्ष या नात्यानें यांनीं केलेलें भाषण यांच्या शारीरिक शिक्षणाच्या आवडीचें, सखोल विचारांचें आणि अभ्यासाचें द्योतक आहे.

अनेक लहानमोठ्या कमिट्यांचे हे सदस्य होते. तरी प्रत्येक सार्वजनिक कामांत यांना प्रसिद्धीचा स्वाभाविक तिटकारा आहे. अगदीं ताजें उदाहरण म्हणजे सप्रू कमिटीचा अहवाल होय. यांच्या बौद्धिक शक्तीचें तें एक अमर स्मारकच ठरणार आहे. हा एकच ग्रंथ आमूलाग्र काळजीपूर्वक कोणींहि अभ्यासिला तरी हिंदुस्थानांत ब्रिटिश सरकारचें राज्य स्थापन झाल्यापासून आजतागायत घडलेल्या सर्व ऐतिहासिक व राजकीय घटनांचें ज्ञान त्याच्या पदरांत पडल्यावांचून राहणार नाहीं.

सामाजिक, राजकीय व सांस्कृतिक कार्य करणाऱ्या शेंकडों संस्थांशीं, केवळ सदस्य म्हणून नव्हे तर, सल्लागार आणि द्रव्याच्या व इतर दृष्टीनें मदत देणारा जिव्हाळ्याचा मदतगार म्हणून यांचे संबंध आलेले आहेत. या सर्व विविध स्वरूपाच्या उपयुक्त संस्थांना हे उपकारक असें स्फूर्तिस्थान ठरले आहेत.

१९३७ ते १९४१ चे दरम्यान अत्यंत वरच्या श्रेणींतील न्यायाधिकाराच्या जागा यांना सरकारनें दिल्या व त्यांवरील आपले अधिकारहि यांनीं चालविले तरी त्याबद्दलच्या अहंकाराचा लवलेशहि यांचे ठिकाणीं नाहीं. देशोद्धार, हिंदु संस्कृतीच्या प्रचाराची कळकळ आणि इतरांच्या सद्गुणांविषयीं व सन्मताविषयींचा आदर या सर्व सद्गुणांसह लोकसेवा करण्याची हौस यांच्यांत अद्यापहि तरुणाप्रमाणें आहे. असा सर्वगुणसंपन्न अष्टपैलू हिरा हिंदुसमाजाला केवळ भाग्यानेंच लाभला आहे.

१९१७ सालापासून हिंदुस्थानांत अशी एकहि राजकीय चळवळ नसेल कीं, जिच्याशीं यांचा प्रत्यक्ष संबंध आला नाहीं. या कालापासून हे स्वातंत्र्याचे पुरस्कर्ते

आहेत. स्वातंत्र्यवीर सावरकर आणि मौ. हजरत मोहानी यांची बिनशर्त मुक्तता करण्यासंबंधींचा जो ठराव मुंबईला कायदेकौन्सिलच्यापुढें आला होता त्या ठरावाला मुख्य पाठिंबा यांचा होता. १९३७ सालीं वीर सावरकरांची सुटका झाली त्याचें श्रेय श्री. जम्नादास मेहेता यांना कांहीं लोक देतात व तेहि घेतात. पण यासंबंधींचा खरा इतिहास प्रसिद्ध झाला तर दिसेल कीं, या घटनेचें बरेंच श्रेय यांनाच आहे.

अनेक सामाजिक, राजकीय व अन्य क्षेत्रांत यांनीं जी विविध स्वरूपाची भरीव कामगिरी बजाविली तिच्या उल्लेखावांचून हिन्दुस्थानच्या आधुनिक इतिहासाची पूर्तताच होणार नाहीं. अशा पूर्ततेची भूमिका तयार करण्यासाठीं यांचीं भाषणें, लेख व पत्रव्यवहार यांचा जो अफाट संग्रह शेंकडों फायलींतून त्यांच्या कपाटांतून पडून आहे तो छापून प्रसिद्ध करण्याचा आग्रही लकडा जनतेनें यांच्या मागें लावला पाहिजे. कारण त्याच्या प्रकाशनामुळें केवळ महाराष्ट्राच्याच नव्हे तर, हिन्दुस्थानच्या व्यापक अशा समकालीन राजकीय इतिहासावर, प्रकाश पडण्यासारखा आहे. शिवाय त्यामुळें ह्यांच्या यथार्थ जीवनकार्याचीहि ओळख जनतेला होईल. आणि यांचें जीवनकार्य व त्यांतील थोरवी यांविषयीं योग्य आदर बाळगण्यास जनता समर्थ होईल.

आजच्या तरुण पिढीला हे दुरावलेले वाटत असले तरी, सांस्कृतिक, लष्करी संघटनात्मक, शैक्षणिक व कायद्यासंबंधींच्या अनेक आधुनिक घटनांना यांची स्फूर्ति व प्रेरणा आजहि कारणीभूत झाली आहे. दक्षिणी संस्थानच्या समाईक हायकोर्टाचा प्रश्न हें या बाबतचें ताजें उदाहरण होय.

यांच्यासंबंधींचें हें प्रकाशन प्रसिद्ध होणें का आवश्यक आहे, याचें आणखीहि एक महत्त्वाचें कारण आहे. ज्यांच्याशीं यांचे दाट संबंध आले आणि ज्यांच्याशीं यांनीं सहकार्य केलें, अशी जुनी पिढी आणि मधली पिढी आज दृष्टीआड होत असून अनेक कारणांमुळें आजच्या नव्या पिढीला यांची यथार्थ योग्यता आकलन झालेली नाहीं. याला जीं अनेक कारणें आहेत त्यांत निंदेची चिखलफेंक हें एक प्रमुख कारण होय! आजची तरुण पिढी यांची योग्य कदर करीत नसली तरी यांचें ऋण देशावर आहे तसेंच देशाचें ऋण यांचेवरहि आहे. आणि तें ऋण फेडण्याचा प्रभावी आणि अखेरच्या मोलाचा मार्ग म्हणजे यांनीं स्वतःच्या संग्रहांतील हा आत्मचरित्रपर माहितीचा सागर जनतेला प्रकाशित करून उपलब्ध करून देणें होय.

यांच्या चरित्राचें खरें रहस्य थोडक्यांत सांगावयाचें झालें तर असें म्हणतां येईल कीं, आरंभीं लोकांस अप्रिय असणारीं कार्यें बुद्धिपुरस्सर हातांत घ्यावयाचीं व दीर्घ प्रयत्न करून आपल्या वक्तृत्वानें व अहर्निश प्रयत्नानें त्यांना लोकप्रिय करून दाखवायचें, व तसें झालें म्हणजे मग आपल्या सहकाऱ्यास प्रोत्साहन देऊन पुढें करावयाचें व आपण स्वतः गाजावाजा न करतां नम्रतेनें मागें राहावयाचें, हें यांचें स्वभाववैशिष्ट्य होय. आर्यन एज्युकेशन सोसायटीची शाळा, स्वराज्यपक्ष, प्रतिसहकारपक्ष, कायदेकौन्सिलांतील यांचें नेतृत्व, यांचें शांतिदूतत्व, गोल-मेजपरिषदेंतील प्रभावी कार्य, तसेंच अपक्षपरिषदेंतील कामगिरी, सप्रु कमिटीचा अहवाल व अगदीं अलिकडील कामगिरी म्हणजे महाराष्ट्र-विद्यापीठ ह्या सर्व गोष्टी ह्याच स्वभाववैशिष्ट्याची साक्ष देतील. हें यांचें रहस्य यांच्या अतिजवळच्या प्रेमळ स्नेह्यांसच माहीत असेल.

**जयकर, रामचंद्र बाळकृष्ण**—(जन्म स. १८२५-मृत्यु स. १८६६ जुलै ३१) प्रसिद्ध समाजसुधारक, मुंबईच्या परमहंस सभेचे पहिले व शेवटले अध्यक्ष.

ही परमहंस सभा रा. ब. दादोबा पांडुरंग यांनीं स्थापिली. या परमहंस सभेंत दादोबांनीं लिहिलेल्या प्रार्थना वाचण्यांत येत. परंतु दादोबा व 'प्रभाकर' पत्राचे चालक भाऊ महाजन हे सभेमध्यें प्रसिद्धपणें भाग घेत नसत, तर हे उघडपणें पुढाकार घेत असत, म्हणून यांची योजना अध्यक्षपदीं झाली असावी.

हे एकेश्वर मताचे असून जातिभेदाचे कट्टे दुष्मन होते. आपल्या आचरणांत देखील यांनीं कोणत्याहि प्रकारचे जातिनिर्बंध पाळले नाहींत व आपल्या मतांच्या प्रसारार्थ शक्य तितका प्रयत्न करण्यांत केव्हांहि कसूर केली नाहीं. स्त्रीशिक्षणाच्या बाबतींतहि यांचे विचार उदार व क्रियाशाली होते.

परमहंसमंडळ केवळ मुंबईपुरतेंच नव्हतें. त्याच्या शाखा पुणें, अहमदनगर, सातारा, बेळगांव, रत्नागिरी इत्यादि स्थळीं होत्या. एकंदर सभासद एक हजारपर्यंत असावेत असें स. १८८५ सालीं 'पोलिटिकल ऋषि' अशी सही करणारांनीं जाहीर केलें होतें. लोकांत या संस्थेची चर्चा बरीच चालू होती.

परमहंसमंडळांत सभासद करून घेतेवेळीं प्रत्येकास

प्रथम एक प्रार्थना वाचावयास सांगत, नंतर जातिभेद न मानण्याची तयारी झाली आहे असें पटवून देण्यासाठीं किरिस्तावानें तयार केलेला पावाचा एक तुकडा खावयास देत असत. वर्षांतून कांहीं वेळां सहभोजन होत असे. हें सर्व गुप्तपणें होत असे. नांवें उघडकीस येण्याबद्दल प्रत्येकजण भीत असे. नॉर्मल क्लासचे विद्यार्थी फणसवाडींत दुमेख्याच्या चाळींत दुसऱ्या मजल्यावर राहत असत. हेच विद्यार्थी परीक्षा पास झाले म्हणजे शिक्षक म्हणून बाहेरगांवीं जात व तेथें या संस्थेच्या मताचा प्रचार-प्रसार करीत असत. उच्चनीच भेदामुळें आपलें कसें नुकसान होत आहे व जातिभेद घालविल्याशिवाय राष्ट्राची खरी उन्नति होणें अशक्य आहे, हें सर्वांना पटवून देण्यांत येई. स. १८६० पर्यंत ही मंडळी चालू होती. नंतर कोणी तरी सभासदांच्या नांवांचेंच पुस्तक लांबविलें व त्यामुळें सर्वांचें धाबें दणाणलें. आपआपल्या जातीकडून आपल्याला त्रास होणार असें ज्याला त्याला वाटूं लागलें. अशा प्रकारें ही संस्था मोडली.

यांपैकीं बाबा पदमनजी, कासमभाई ढालवाणी, शाहूराव कुकडे इत्यादि पुढें ख्रिस्ती झाले.

भिकोबादादा चव्हाण, त्यांचे बंधु सखाराम लक्ष्मण, लक्ष्मणशास्त्री हळबे, सखारामशास्त्री, बाळ भास्कर शिंत्रे, हे परमहंस मंडळींचे आस्थेवाईक प्रचारक असत. यांपैकीं शास्त्रीमंडळीखेरीज बाकीच्यांचा उत्साह शेवटपर्यंत कायम होता.

**जयचंद्र, विद्यालंकार**—(जन्म स. १८९८) हिंदुस्थानांतील प्रमुख इतिहासशास्त्रज्ञ, अभ्यासक व लेखक. यांचा राजकारण, समाजशास्त्र, पुरातत्त्व व भूगोल यांचा अभ्यास चांगला आहे.

हे गुरुकुल विश्वविद्यालय कांगडी (हरिद्वार) येथील विद्यालंकार आहेत. यांचा 'भारतीय इतिहास की रूपरेखा' या ग्रंथास हिंदीसाहित्यसंमेलनानें 'मंगलाप्रसादपारितोषिक' (रु. १२००) दिलें. यांच्या दुसऱ्या ग्रंथाचा नागरी प्रचारिणीसभेकडून गौरव झाला. यांनीं अनेक विद्यापीठांत इतिहासाचे प्राध्यापक म्हणून काम केलें. यांनीं 'भारतीय इतिहासपरिषद' स्थापण्यांत पुढाकार घेतला. या संस्थेतर्फे भारताचा इतिहास हिन्दी व इंग्रजी भाषांत वीस खंडांत लिहिला जात आहे. त्याचे दोन खंड प्रसिद्ध झाले आहेत. त्याच्या संपादकांत सर यदुनाथ सरकार, नीळकंठशास्त्री, प्रबोधचंद्र बागची, डॉ. राजेन्द्रप्रसाद, रा. ब. गो. स. सरदेसाई वगैरे लोक आहेत.

यांचे ग्रंथः—१ भारतीय इतिहास की रूपरेखा (२ खंड), २ भारतभूमि और उसके निवासी, ३ भारतीय वाङ्मय के अमरत्व, ४ इतिहासप्रवेश (भारतीय इतिहास का दिग्दर्शन), ५ जातीय शिक्षा.

**जयतिलक, सर डॉन बॅरन**—(जन्म स. १८६८-मृत्यु स. १९४२) सिलोनमधील सुप्रसिद्ध सार्वजनिक कार्यकर्ते, ग्रंथकार व मंत्री.

विद्यालंकार ओरिएंटल कॉलेज केलनिया, वेस्ली कॉलेज कोलंबो व जीझस कॉलेज ऑक्सफर्ड, येथें आपलें विश्वविद्यालयीन शिक्षण संपवून हे बॅरिस्टर झाले.

१९२४ पासूनच सिलोन लेजिस्लेटिव्ह कौन्सिल व स्टेट कौन्सिलशीं यांचा घनिष्ठ संबंध असे. नंतर गृहमंत्री व स्टेट कौन्सिलचे पुढारी म्हणून यांची निवड झाली (१९३१). १९३८ सालीं रॉयल एशिॲटिक सोसायटीचे अध्यक्ष म्हणून यांची जी निवड झाली, ती शेवटपर्यंत कायम होती.

'शरणंकर संघराज'चें यांनीं लिहिलेलें चरित्र सुप्रसिद्ध आहे. याचेचबरोबर सिंहली भाषेंत यांनीं संपादन केलेल्या अनेक ग्रंथांत सिंहली भाषेच्या शब्दकोशास विशेष महत्त्व आहे.

**जयदेव शर्मा, विद्यालंकार**—(जन्म स. १८९२ ऑगस्ट १८) चतुर्वेदांचें हिन्दींत भाषांतर करणारे आर्यसमाजी पंडित. हे वैदिक साहित्य, इतिहास, संस्कृत साहित्य, समाजशास्त्र, ज्योतिष, कर्मकाण्ड, प्राचीन समाज वगैरेचे अभ्यासक आहेत.

हे गुरुकुल विश्वविद्यालय कांगडी (हरिद्वार)चे विद्यालंकार आहेत. शिवाय हे मीमांसातीर्थ आहेत. यांनीं अनेक ठिकाणीं राहून ग्रंथांचें संशोधन व संपादन केलें. हे साधुवृत्तीचे, विद्याप्रेमी व चारित्र्यसंपन्न गृहस्थ आहेत.

यांचे ग्रंथ—१ चतुर्वेदांचें हिन्दी भाषांतर, २ जायसवाल जातिका इतिहास, ३ पुराणमतपर्यालोचन, ४ विधवाविवाह (बंगाली ईश्वरचंद्र विद्यासागरांच्या पुस्तकाचें हिंदी भाषान्तर), ५ मुद्राराक्षससमीक्षा (संस्कृत), ६ ईशोपनिषद (हिन्दी), ७ वात्स्यायन कामसूत्राविष्कार (हिन्दी) इत्यादि.

**जयप्रकाश नारायण**—( जन्म स. १९०३ सुमार ) कॉंग्रेस सोशॅलिस्ट पक्षाचे सुप्रसिद्ध पुढारी व क्रांतिकारक राजकीय कार्यकर्ते.

बिहारमधील सरण तालुक्यांतील सिताब्दियारा हें गांव यांचें जन्मस्थान. लहानपणापासून उच्च शिक्षणाविषयीं मनांतून आकर्षण असल्यामुळें वयाच्या एकोणिसाव्या वर्षी हे अनेक प्रयत्नांनीं अमेरिकेला पोंचले ( १९२२ ). सुट्टीच्या दिवशीं बारा बारा तास शेतांत काम करून पैसे मिळवून त्याचे आधारावर यांनीं आपलें शिक्षण पुरें केलें. याच वेळीं यांना आर्थिक विषमतेचे भयंकर परिणाम दृष्टीस पडले व शास्त्रीय विषयांवरील यांचें लक्ष उडून मार्क्सचे ग्रंथ वाचण्यांत यांनीं आपला सर्व काळ घालविण्यास सुरुवात केली. अशा तऱ्हेनें हे हिंदुस्थानांत समाजवादी विचारसरणी घेऊन परत आले ( १९२९ ). यांनीं आल्याबरोबर अलाहाबादच्या स्वराज्यभवनांत पं. जवाहरलाल नेहरू यांची गांठ घेतली. त्यांनीं यांची तावडतोब शेतकरी संघटनेच्या कार्यासाठीं नेमणूक केली. १९३० च्या कायदेभंगाच्या वेळीं कॉंग्रेसच्या चिटणिसांच्या गैरहजेरींत हे कांहीं काळ चिटणीसहि होते. परंतु सर्व जनतेनें एकदम उठाव केल्याशिवाय देशाला स्वातंत्र्य मिळणें अशक्य आहे, ही यांची समाजवादी विचारसरणी सारखी वाढत होती आणि यांच्या या विचारसरणीचें दृश्य फल म्हणजे नाशिक तुरुंगांत कॉंग्रेस सोशॅलिस्ट पक्षाच्या स्थापनेचें यांनीं केलेलें सूतोवाच (१९३२-३३) व पुढें त्या पक्षाची करण्यांत आलेली स्थापना होय. पुढे बनारस विद्यापीठाचे आचार्य नरेंद्रदेव यांच्या अध्यक्षतेखालीं पाटणा येथें कॉंग्रेस सोशॅलिस्ट पक्षाचें पहिलें अधिवेशन भरविण्यांत आलें.

यांच्या या संघटनेच्या प्रभावी कार्याची कल्पना दृश्य स्वरूपांत १९४२ च्या 'चलेजाव' चळवळीचे वेळीं यांच्या भूमिगत चळवळीमुळें पाहावयास मिळाली. सुरुवातीलाच सर्व पुढारी तुरुंगांत गेले असतां या चळवळीचें कार्य या पक्षामुळेंच कांहीं काळ पुढें चालू राहिलें.

अतिशय प्रसिद्धिपराङ्मुख अशी यांची ख्याति असल्यानें कोणास माहीतहि नसलेलें यांचें नांव देवळी तुरुंगांत पत्नीची भेट घेत असतां एक राजकीय पत्र देण्याच्या यांनीं केलेल्या प्रयत्नाच्या सरकारी पत्रकामुळें सर्वप्रसिद्ध झालें. आणि हजारीबाग तुरुंगांतून गुप्त होऊन ४२ च्या चळवळींत आघाडीवर चमकल्यानें तर यांचें नांव सर्वतोमुखीं झालें. नंतर यांना मोठ्या प्रयत्नानें पकडून लाहोरच्या किल्ल्यांत स्थानबद्ध करण्यांत आलें. यांच्या चळवळीची माहिती प्रथम १९४२ च्या चळवळीबद्दल सरकारनें काढलेल्या पत्रकावरून लोकांच्यापुढें आली.

'समाजवादच कां' हा यांचा समाजवादावरील ग्रंथ प्रसिद्ध आहे. 'मतांमध्यें जमीन-अस्मानाइतकें अंतर असूनहि यांनीं दाखविलेली धडाडी व यांची पक्षसंघटना यांमुळें मला यांचेबद्दल कौतुक वाटतें' हे गांधींनीं यांच्याबद्दल काढलेले उद्गार यांच्या कार्यपद्धतीची श्रेष्ठता पटवून देण्यास पुरेसे आहेत.

**जयशंकरप्रसाद देवीप्रसाद**—( जन्म स. १८८९–मृत्यु स. १९३७ ) हिन्दी भाषेंतील सुप्रसिद्ध कवि, नाटककार, कादंबरीकार, लघुकथालेखक व टीकाकार. हे 'प्रसाद' या नांवानें विशेष प्रसिद्ध आहेत.

यांचा जन्म काशी येथें 'सुंघनीसाहु' नांवानें प्रसिद्ध असणाऱ्या प्रतिष्ठित, धनिक व उदार घराण्यांत झाला. यांच्या संस्कृत व हिन्दी शिक्षणाला घरींच सुरुवात झाली. नंतर आठव्या इयत्तेपर्यंत शिक्षण शाळेंत झालें. याच सुमारास यांचे वडील वारल्यामुळें यांचे वडील बंधु शंभुरत्नजी यांनीं यांचा इंग्रजी, उर्दू, फारशी वगैरेंचा अभ्यास पुढें चालविला. पण तेहि वारल्यानें घरची जमिनदारी, कारखाने वगैरेंचा भार यांच्यावर पडला. तथापि कविता करण्याचा नाद यांना वयाच्या पंधराव्या वर्षापासून होता.

सोळाव्या वर्षी 'भारतेन्दु'मध्यें यांची कविता प्रथम प्रसिद्ध झाली. पुढें यांच्या प्रेरणेनें निघालेल्या 'इन्दु' मासिकांत यांचें काव्य, नाटक, लघुकथा, निबंध वगैरे वाङ्मय प्रसिद्ध होऊं लागलें.

यांना नवीन युगाचे प्रवर्तक व सर्वश्रेष्ठ कवि मानतात. यांनीं हिन्दींत भिन्नतुकान्त Blank Verse म्हणजे निर्यमक कविता करण्यास प्रथमच सुरुवात केली. तसेंच आधुनिक हिन्दींत छायावादाचें जनकत्व यांच्याकडे जातें. यांच्या कवितेंत भावनेस प्राधान्य असे. तसेंच हे हिन्दी भाषेंतील सर्वश्रेष्ठ नाटककार समजले जात. कथालेखनांतहि यांनीं नवीन पद्धति स्वीकारली. शिवाय यांचें संशोधनात्मक लिखाणहि महत्त्वाचें आहे. अशा यांच्या विविध क्षेत्रांतील महत्त्वपूर्ण कामगिरीमुळें हिन्दी

' रवीन्द्रनाथ ' असा यांना गौरव प्राप्त झाला. यांच्या प्रभावी कार्यामुळें यांची परंपरा निर्माण झाली असून त्या परंपरेचे हे आचार्य आहेत.

यांचीं नाटकें:—१ स्कन्दगुप्त, २ अजातशत्रु, ३ चन्द्रगुप्त, ४ ध्रुवस्वामिनी, ५ विशाख, ६ कामना, ७ जनमेजयका नागयज्ञ, ८ राज्यश्री, ९ एकघूंट; उपन्यासः १० कंकाल, ११ तितली, १२ इरावती; कविताः १३ कामायनी, १४ आंसू, १५ लहर, १६ झरना, १७ महाराणा का महत्त्व, १८ प्रेमपथिक, १९ करुणालय, २० काननकुसुम; कहानीसंग्रहः २१ आकाशदीप, २२ इन्द्रजाल, २३ प्रतिध्वनि, २४ आंधी, २५ छाया; विविधविषयः २६ काव्य और कला तथा अन्य निबंध, २७ चित्राधार इ. (क. कौ. २. ५०६-८ व यांच्या आंसू काव्याच्या प्रस्तावनेवरून ).

**जव्हेरी, दिवाणबहादूर कृष्णलाल मोहनलाल**—( जन्म स. १८६८ ) गुजराथी साहित्यभक्त, गुजराथी साहित्याचा इंग्रजींत इतिहास लिहिणारे, संशोधक, सार्वजनिक कार्यकर्ते व मुंबई हायकोर्टांतील न्यायमूर्ति.

हे भडोचचे मोढवाणी. सुरत येथें गुजराथीचें शिक्षण झाल्यावर थोडे दिवस भडोच येथें व पुढें भावनगरच्या हायस्कुलांत शिक्षण झालें. तेथें यांचे वडील बंधु मोतीलाल शिक्षक होते. तेथें हे बी. ए. झाले ( १८८८ ). भावनगरच्या सामलदास कॉलेजमध्यें एम्. ए. चे वर्ग नसल्यानें हे त्याकरितां मुंबईस आले व एल्फिन्स्टन कॉलेजांतून एम्. ए. झाले. तेथें फारसीचे अध्यापक म्हणून यांनीं काम केलें व हे एल्‌एल्. बी. झाले.

१८९३–१९०५ पर्यंत यांनीं हायकोर्टांत वकिली केली. नंतर स्मॉलकॉज जज्ज व पुढें हायकोर्ट जज्ज झाले. तेथून हे १९२८ सालीं निवृत्त झाले. त्याच सालीं यांना दिवाणबहादूर पदवी मिळाली.

गुजराथमधील शिक्षणाशीं यांच्या घराण्याचा यांचे आजे रणछोडदास यांच्यापासून संबंध होता. त्यांना तिकडे ' शिक्षणाचे जनक ' असें लोक संबोधीत. यांचे वडील मोहनलाल ' होप वाचनमाला कमेटी 'चे सभासद होते. ते डेप्युटी असल्यानें सुरत जिल्ह्यांतील खेड्यांत आजहि शाळा तपासावयाला येणाऱ्या डेप्युटीला ' मोहनलाल ' म्हणून संबोधितात. यांनींहि ती परंपरा पुढें चालविली.

१८९३–१९०५ पर्यंत हे मुंबई विश्वविद्यालयांत फारसीचे परीक्षक होते. मुंबई विश्वविद्यालयांत परीक्षक, सभासद वगैरे अनेक नात्यांनीं यांचा १९२४ पर्यंत सतत संबंध असे. शाळाखात्याच्या बुककमेटीवर हे असत. ' मॉडर्न रिव्ह्यू 'तील गुजराथी पुस्तकांचें समालोचन यांचें असे. तसेंच मुंबईस भरलेल्या गुजराथी साहित्यपरिषदेचे स्वागताध्यक्ष हे होते ( १९२६ ).

याशिवाय अनेक संस्थांशीं यांचा निकटचा संबंध असे. यांना फारसी, उर्दू, बंगाली व मराठी याहि भाषा चांगल्या येत.

जुन्या फारसी सनदा व हस्तलिखितें शोधण्याचा व वाचण्याचा यांना नाद असे. त्यावर यांनीं अनेक लेख लिहिले आहेत. वैष्णवसंप्रदायांतील श्रीनाथजीमहाराजांना अकबर व शहाजहान बादशहांकडून मिळालेल्या सनदांचें गुजराथी व इंग्रजी भाषान्तर करून पुस्तकरूपानें यांनीं प्रसिद्ध केलें. फोर्बस गुजराथी सभेच्या त्रैमासिक व इतर अनेक नियतकालिकांनीं यांच्या पंचाहत्तरीनिमित्त विशेष अंक काढले होते.

यांचे ग्रंथ—गुजराथी-१ हैदरअली अने टिपु सुलतान ( १८९४ ), २ दयाराम अने हाफेझ ( १८९५ ), ३ औरंगजेब अने रजपूतो ( १८९६ ), ४ मोहर्सानीना नीतिवचनो ( १८९७ ), ५ कृष्णचरित्र ( १९०८ ), ६ गुजराथी साहित्यना मार्गसूचक स्तंभो ( भाग १–२, १९२७–३० ).

फारसी-इंग्रजीः—(1) Persian Prosody with Figures of Speech (1890), इंग्रजी–(2) Translation into English of Saadis Tayyabat, (3) Outlines of Essays for Higher Standards of High Schools (1892), (4) Translation into English of the Gazals of Hafez (1892), (5) Introduction to the Anware Sohaili (1892), (6) Notes on the Akhlake Mohasini, (7) Shivaji or the Dawn of Maratha Empire (1898), (8) Further Milestones in Gujerathi Literature (1924), (9) Imperial Farmans (1929).

**जहांगिर, सर कांवसजी**—( जन्म स. १८७९ ) पारशी समाजांतील सुप्रसिद्ध कार्यकर्ते व व्यापारी.

मुंबईचें सेंट झेवियर कॉलेज व केम्ब्रिजच्या सेंट जॉन्स कॉलेजमध्यें शिक्षण संपवून यांनीं व्यापारांत लक्ष

घातलें. कांवसजी जहांगिर अँड को. लि. या सुप्रसिद्ध व्यापारी संस्थेचे हे प्रमुख संस्थापक आहेत.

परंतु यापेक्षांहि सार्वजनिक कार्यकर्ते या नात्यानें मुंबई कॉर्पोरेशन (सभासद १९०४-२१, अध्यक्ष १९१९-२०), लेजिस्लेटिव्ह असेंब्ली (सभासद १९३३, एक्झिक्युटिव्ह कौन्सिलचे सभासद १९२१-२२, १९२३-२८) वगैरे ठिकाणीं यांचे संबंध अतिशय दृढ आहेत.

राउंड टेबल कॉन्फरन्स (१९३०, ३१, ३२), लंडन मॉनेटरी अँड इकॉनॉमिक कॉन्फरन्स (१९३३), एम्पायर पार्लमेंटरी कॉन्फरन्स, लंडन (१९३५), कॉरोनेशन, लंडन (१९३७) वगैरे अधिवेशनांना हे हिन्दी व्यापाऱ्यांचे प्रतिनिधी म्हणून हजर होते.

**जाधव, नामदेवराव**—(जन्म स. १९२१) व्हिक्टोरिया-क्रॉस मिळविणारे सुप्रसिद्ध शिपाई.

हे नगर जिल्ह्यांतील निमज गांवीं गरीब कुटुंबांत जन्मास आले. यांच्या वडील भावामुळें हे पक्के हरिभक्त होते. भरलेल्या नदींतून पोहून जाऊनहि हे आपल्या देवाची पूजा करीत. शेजारच्या साखरेच्या कारखान्यांत नोकरी करीत असतां हे आपल्या सहकाऱ्याच्या सल्ल्यानें ५ व्या मराठा लघु पायदळांत सामील झाले. शिक्षण घेतांना हे संकेतविभागांत विशेष निष्णात ठरले. पुढें यांनीं प्रत्यक्ष रणक्षेत्रांत जाण्याच्या इच्छेनें इटलीकडे जाणाऱ्या सैन्यांत आपलें नांव नोंदविलें. इटलीच्या रणांगणावर सेनियो नदी ओलांडण्याच्या प्रसंगीं यांनीं 'न भूतो' शौर्य दाखविल्याबद्दल यांस सध्यांच्या काळांत सर्वश्रेष्ठ असणारा मान—व्हिक्टोरिया-क्रॉस देण्यांत आला.

**जाधव, भास्करराव विठोजीराव**—(जन्म स. १८६७ जून १७) ब्राह्मणेतर समाजाचे सुप्रसिद्ध पुढारी व विचारांना चालना देणारे समाजसुधारक.

यांचा जन्म नागांव (ता. अलिबाग, जि. कुलाबा) येथें झाला. प्राथमिक शिक्षण महाड येथें व इंग्रजी शिक्षण मुंबईस एलिफन्स्टन हायस्कूलमध्यें झालें. मॅट्रिकमध्यें मुंबई युनिव्हर्सिटींत यांचा पहिला नंबर आला (१८८८). विल्सन व एलिफन्स्टन कॉलेजांतून हे बी. ए. (फर्स्टक्लास १८९२), एम्. ए. (१८९५). व एलएल्. बी. झाले (१८९७).

कोल्हापूर दरबारांत यांनीं सर्व खात्यांत व स्पेशल ड्युटीचीं कामें केलीं. निवृत्त होतांना हे सरसुभे पदावर होते (जून १८९५–जाने. १९२२).

नोकरी करीत असतां के. श्री. शाहूछत्रपतींच्या कृपेनें सर्व प्रकारच्या शिक्षणविषयक, सामाजिक व धार्मिक चळवळींत भाग घेण्याची संधि यांना मिळाली. कोल्हापूरची वेदोक्त चळवळ, मराठा शिक्षणपरिषदेची स्थापना, सत्यशोधक चळवळीचें पुनरुज्जीवन व परिषदा भरविणें यांत यांनीं भाग घेतला. स. १९१७ पासून ब्राह्मणेतर चळवळीस प्रारंभ झाला, तींत यांनीं आघाडीस काम केलें. स. १९१९ सालीं इंग्लंडला जाऊन इंडिया बिलावरील सिलेक्ट कमिटीपुढें साक्ष देऊन यांनीं मराठ्यांकरितां राखीव जागा मागितल्या.

स. १९२२ चे सुरुवातीस पेन्शन घेतल्यावर मुंबई-सरकारनें यांना कायदेकौन्सिलचे मेंबर नेमलें. साताऱ्यास राहून सातारा जिल्ह्यातर्फे यांची मुंबईच्या कायदे-कौन्सिलांत निवडणूक झाली (१९२३). तेव्हांच तेथें ब्राह्मणेतर पक्षाची स्थापना होऊन यांना त्या पक्षाचें पुढारी-पण मिळालें. त्याच वर्षाचे अखेरीस शिक्षण, मेडिकल व रिलीफ वगैरे खात्यांचे हे मिनिस्टर झाले. स. १९२६ सालच्या निवडणुकींत यश मिळालें, पण पक्षांत फूट पडल्यानें यांना मिनिस्टरी मिळाली नाहीं. स. १९२८ ऑक्टोबरमध्यें शेतकी खात्याचे हे मिनिस्टर झाले.

इंपीरियल कौन्सिल ऑफ ॲग्रिकल्चरल रिसर्चच्या स्थापनेंत यांनीं भाग घेतला. १९४० च्या कौन्सिलच्या निवडणुकीस उभे न राहतां सेंट्रल लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत निवडून आले. सदर सालीं राउंड टेबल कॉन्फरन्सवर हजर राहण्याचें निमंत्रण यांनीं स्वीकारलें. १९३१ सालींहि हे त्या कॉन्फरन्सला गेले. तेथें मिलिटरी कमेटीवर यांनीं काम केलें. १९३४ पर्यंत असेंब्लींत काम करीत असतां यांना अनेक कमिट्यांवर नेमणूक होऊन काम करण्याची संधि मिळाली. १९३५ च्या कायद्या-प्रमाणें अस्तित्वांत आलेल्या पण बहुमताचा पाठिंबा नसलेल्या कूपर मंत्रिमंडळांत हे होते.

यानंतर यांनीं व्यापारांत लक्ष घातलें. वॉर्डन इन्शु-रन्स कंपनीच्या स्थापनेंत भाग घेऊन त्या कंपनींत चेअर-मनचें काम यांनीं केलें. रिझर्व बँकेच्या मुंबई शाखेवर डायरेक्टर म्हणून यांची नेमणूक झाली. इंटरनॅशनल बँक स्थापन झाली तेव्हां आरंभीं तिच्या चेअरमनचें काम यांनीं केलें. बॉबे प्रॉव्हिन्शिअल बँकेच्या डायरेक्टरचें कामहि यांनीं सतत १० वर्षे केलें. बॉबे को ऑपरेटिव्ह

इन्शुरन्स कंपनीच्या डायरेक्टरचें कामहि पांच वर्षे केलें. १९४५ च्या जानेवारीपासून कोल्हापूर येथील रीजन्सी कौन्सिलमध्यें रेव्हेन्यु मिनिस्टरचें कामहि हे करीत आहेत.

बॉंबे प्रॉव्हिन्शिअल वॉर कमेटी, प्रॉव्हिन्शिअल रूरल डेव्हलपमेंट बोर्ड व प्रॉव्हिन्शिअल को-ऑपरेटिव्ह सुपरव्हिजन बोर्डाचें काम यांनीं केलें आहे.

यांनीं मराठींतून धार्मिक, सामाजिक वगैरे विषयांवर अनेक चर्चात्मक व संशोधनात्मक लेख लिहिले आहेत. विशेषतः प्रचलित रूढ विचारांना धक्के देऊन विचारप्रवृत्त करण्याकडे यांच्या लेखन-भाषणाचा विशेष कल असतो.

यांचा ग्रंथ–मराठे व त्यांची भाषा.

**जायसवाल, डॉ. काशीप्रसाद**—( जन्म स. १८७१–मृत्यु स. १९३१ ) बिहार प्रांतांतील सुप्रसिद्ध प्राच्यविद्यासंशोधक.

बिहार प्रांतांतील झालडा हें गांव यांचें जन्मस्थान. अलाहाबाद युनिव्हर्सिटींतून एम्. ए. डिग्री घेऊन हे उच्च शिक्षणाकरितां ऑक्सफर्डला रवाना झाले ( १९०६ ). तेथें यांनीं जीझस कॉलेजमध्यें आपलें नांव दाखल केलें व इतिहास हा ऐच्छिक विषय घेऊन हे एम्. ए. झाले ( १९०९ ). त्याच्या आधींच्या वर्षी चिनी भाषेवरील यांच्या प्रभुत्वाबद्दल यांना डेव्हीस शिष्यवृत्तीचा लाभ झाला होता. यानंतर लिंकन्स इन्मधून बॅरिस्टर होऊन हे हिंदुस्थानला परतले.

युरोपमध्यें लाला हरदयाळ वगैरे लोकांमधील यांच्या मैत्रीमुळें अलाहाबाद हायकोर्टानें यांना वकिलीची सनद देण्याचें नाकारलें. तेव्हां यांनीं कलकत्ता येथें वकिली करण्यास सुरुवात केली. १९१६ त पाटणा येथें हायकोर्टाची स्थापना झाल्यानंतर यांनीं आपला मुक्काम पाटण्याला हलविला व अखेरपर्यंत हे तेथेंच असत.

कलकत्ता व पाटणा या दोन्ही ठिकाणीं इन्कमटॅक्स व हिंदु लॉवरील यांची प्रॅक्टिस जरी पुष्कळ असे तरी प्राचीन इतिहास व राज्यघटना यांचे संशोधनांतच हे आपला बराचसा वेळ खर्च करीत.

यांच्या सर्व ग्रंथांपैकीं 'Hindu Polity' (१९२४) हा प्राचीन हिंदुस्थानच्या राज्यघटनेचा इतिहास सर्वांत महत्त्वाचा आहे. बुद्धधर्मोपदेशक-संघटनेच्या यांच्या ज्ञानामुळें 'राजकीय संघ' वगैरे शब्दांचा जास्त मुद्देसूद अर्थ लावणें यांना शक्य झालें. गव्हर्नमेंट ऑफ इंडियाचे सभासद असतांना शंकरन् नायर यांनीं एक टिप्पणी प्रसिद्ध केली. हिंदुस्थानच्या लांबलचक इतिहासांत फ्री गव्हर्नमेंटची पद्धत कोठेंच आढळत नाहीं आणि त्यामुळें अशा तऱ्हेच्या कारभारासंबंधीं हिंदी लोक पूर्वी व सध्यांसुद्धां लायक नाहींत, ह्या सरकारी मुद्याचें खंडन करणें हा त्या टिप्पणीचा प्रमुख हेतु होता. या मुद्द्यांना योग्य आधार त्यांना पुरवितांनाच यांना या पुस्तकाची कल्पना सुचली व पुढें Hindu Polity नांवानें तें यांनीं प्रसिद्धहि केलें. या पुस्तकांत बिहारमध्यें भरभराटीस आलेल्या ऐतिहासिक लोकशाह्यांची माहितीहि देण्यांत आली. अशा तऱ्हेनें तत्कालीन राजकीय व कायमचें ऐतिहासिक महत्त्व आसणारा यांचा हा ग्रंथ आहे.

यांच्या या इतिहासाच्या राजकारणीकरणाच आणखी एक प्रमुख उदाहरण म्हणजे चंदेश्वराच्या राजनीतिरत्नाकराची ( C. A. D. १३००-२५ ) यांनीं प्रसिद्ध केलेली मूळ प्रत होय. परकीयांना नागरिकांचे हक्क देऊं करण्याचे बाबतींत हिंदुस्थानचे राजेच पुढें होते असा सिद्धान्त यांनीं वरच्या व या ग्रंथांत सिद्ध केला.

प्राचीन हिंदु कायद्याचा इतिहास व त्याचा मोठेपणा हाच यांच्या टागोर लॉ–लेक्चर्सचा प्रमुख विषय होता ( १९१७ ). परंतु यापेक्षां प्राचीन हिंदी इतिहासावरील यांचें कार्य अधिक महत्त्वाचें आहे. History of India ( स. १५०–३५० ) व An Imperial History of India हे यांचे प्राचीन इतिहासावरील प्रमुख ग्रंथ होत.

पहिल्या ग्रंथांत व्हिन्सेंट स्मिथनें अज्ञात म्हणून ठरविलेल्या कालाचा संगतवार इतिहास यांनीं प्रथमच सप्रमाण पुढें मांडला आहे. तर दुसरा ग्रंथ हा हिंदी इतिहासावरील बुद्धधर्मीय संस्कृत ग्रंथांवरील यांची टीका आहे. हा संस्कृतग्रंथहि अकराव्या शतकांत करण्यांत आलेल्या त्याच्या तिबेटीयन भाषांतराशीं ताडून यांनीं प्रसिद्ध केला.

परंतु यापेक्षांहि ओरिसामधील भुवनेश्वराजवळील हाथीगुंफेचे लांबलचक शिलालेख वाचण्यांत यांचें कौशल्य व्यक्त झालें. अशोकाच्या सुप्रसिद्ध शिलालेखांच्या खालोखाल या शिलालेखाचें महत्त्व आहे. खिस्तपूर्व दुसऱ्या शतकांतील इतिहासावर एक मोठा प्रकाश-झोत टाकण्याचें सामर्थ्य या लेखांत आहे.

अशा तऱ्हेनें महत्त्वपूर्ण काम केल्यानंतर मानसन्मानांचा वर्षाव यांचेवर झाला असल्यास नवल नाहीं. लंडनच्या रॉयल एशियॅटिक सोसायटीनें यांना मौर्यांच्या नाण्यावर व्याख्यान देण्यास बोलाविलें; बडोद्याच्या ऑल इंडिया

ऑरिएन्टल कॉन्फरन्सनें यांना आपले अध्यक्ष केलें ( १९३३ ). गायकवाड सुवर्ण-महोत्सवाचीं व्याख्यानें देण्याची संधिहि यांना देण्यांत आली.

हिंदुस्थानच्या प्राचीन इतिहासांत काम करणारे संशोधक आतांपर्यंत कांहीं थोडे झालेले नाहींत. परंतु एक स्वतंत्र राष्ट्रीय दृष्टि पुढें ठेवून तिचे अनुरोधानें काम करणारे यांच्यासारखे इतिहाससंशोधक खरोखरच फार थोडे आहेत.

**जालवणकर, श्रीनारायणमहाराज**— ( जन्म स. १८०६–वैकुण्ठवास स. १८६८ ) एक महाराष्ट्रीय सत्पुरुष. देशस्थ ब्राह्मण. यांचे वडील नामांकित पुराणिक होते. त्यांना तात्या म्हणत. यांचा अल्पवयांत विवाह झाला. तेव्हां हे पळून मथुरेस गेले व तेथें गोवर्धनबाबा नांवाच्या हठयोग्याजवळ राहिले. तेथून ग्रामस्थांबरोबर परत आले. तेव्हां यांचा एक पुत्र व पत्नी लवकरच निवर्तलीं. पुढें हे गिरनारपर्वतावर दत्ताची आराधना करण्याकरितां गेले व तेथें चवदा दिवस उपवास केला. पुढें वैराग्यानें कडेलोट करून घेतला तेव्हां श्रीदत्तानें मलंगवेषांत येऊन यांचें संरक्षण केलें. रत्नागिरीकडे नारायणभट देवदखे यांस यांनीं दीक्षा दिली. नारायण-भट–राधाकृष्ण तोरणे–शंकर व्यंकटेश टाकी–रामचंद्र शंकर अशी यांची शिष्य परंपरा आहे.

यांच्या ग्रंथांचा प्रचार बराच झालेला आहे आणि ते सर्व छापलेले आहेत. तसेंच यांचा संचारहि भरतखंडभर असे. सद्भक्ति-प्रकाश मासिकांत यांचीं अठ्ठावीस पत्रें छापलेलीं आहेत. यांशिवाय यांचीं शेंकडों पत्रें असावींत. पण पुढें यांनीं पत्रें लिहिणें सोडलेलें दिसतें.

हजारों लोकांना यांनीं मंत्रानुग्रहादि देऊन पावन केलें. हें करतांना यांनीं ब्राह्मण–ब्राह्मणेतर, स्त्रीपुरुष, श्रीमंतगरीब वगैरे भेद केला नाहीं. भाविक दिसला कीं, त्याला यांनीं आश्रय दिलाच म्हणून समजावें. अध्यात्म रामायण, भागवत, गीता वगैरे ग्रंथांवर हे पुराणें सांगत आणि तीं वक्तृत्वपूर्ण असत. हीं निरूपणें ऐकून पुष्कळ लोक यांना शरण येत. अशा लोकांस हे बोध-सागरादि ग्रंथ समजावून देत. यांच्या शिष्यांत रघुनाथ भाऊ दिघे, बाळभट ढेकणे व गं. भा. नानीबाई असे कांहीं परमकृतार्थ शिष्य झाले. व्यासाचार्य प्रभृति कांहीं पुरुष स्वयंकृतार्थ झाले. यांना प्रवचनाधिकारहि मिळाले होते. पण केवळ प्रवचननैपुण्यानें परंपरा चालवितां येत नाहीं, म्हणून शेवटीं यांना निराश होऊन स्वस्थ बसावें लागलें.

यांचे ग्रंथः—१ बोधसागर, २ कैवल्यसागर ( स. १८९८ ), ३ ज्ञानसागर (स. १८८५), ४ विज्ञानसागर ५ आनंदसागर, ६ शांतिसागर ( स. १८९० ), ७ करुणासागर ( पूर्वार्ध व उत्तरार्ध ), ८ समाधितत्त्वो-पदेश ( प्रकरणें तीन ), शिवाय किरकोळ पदें, धांवे, अभंग, बोधाष्टक, चिद्रत्नमाला, विचारमाला वगैरे.

**जांभेकर, बाळ ( शास्त्री ) गंगाधर**—( जन्म स. १८१०–मृत्यु स. १८४६ ) मराठींतील पहिले वर्त-मानपत्रकार, अनेक भाषाभिज्ञ, अभ्यासक, लेखक, समाजसुधारक व संशोधक.

यांचा जन्म राजापूर तालुक्यांत पोंबर्ले या गांवीं झाला. यांचे वडील चांगले व्युत्पन्न भिक्षुक असत. त्यांनीं यांना चांगली काव्यव्युत्पत्ति करून दिली. हे बापू छत्रे यांचे तालमींत तयार झाले. दुपारीं इंग्रजी शिकून संध्याकाळी बापुशास्त्री शुक्ल यांचेपाशीं कौमुदी शिकत.

यांनीं दोन गोऱ्यांची रस्त्यांतील मारामारी एकदां पाहिली. त्याकरितां कोर्टांत यांना साक्षीस बोलाविलें असतां इंग्रजी येत नसतांहि यांनीं त्यांचा इंग्रजी संवाद बरोबर सांगितला, अशी यांच्या बुद्धिमत्तेची गोष्ट दादोबा पांडुरंग आपल्या आत्मचरित्रांत देतात.

हे प्रो. अर्लिबार यांचेपाशीं गणित शिकले. स. १८२८ मध्यें यांचा विद्याभ्यास पुरा झाला व हे एल्फिन्स्टन विद्यालयांत अर्लिबार यांचे असिस्टंट म्हणून गणित शिकविण्याचें काम करूं लागले. पुढें हे १८३२ च्या सुमारास अक्कलकोटच्या दोघा धाकट्या राजांस इंग्रजी शिकविण्यास १॥ वर्षे होते. एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूट-मध्यें आध्यापक ( १८३४ ), एज्युकेशनल इन्स्पेक्टर ( १८४२-४४ ) व नॉर्मल स्कूल इत्यादि ठिकाणींहि यांनीं कामें केलीं. विद्यार्थ्यांना हे तारे व त्यांचें अंतर समजावून देत. एकदां हे प्राचीन शिला-लेखाचा शोध लावण्याकरितां कनकेश्वरीं गेले असतां उष्णता लागून ताप आला व त्या दुखण्यांत यांचा अन्त झाला.

यांनीं भाऊ महाजनांच्या सहकार्यानें ‘ दर्पण ’ नांवाचें इंग्रजी-मराठी साप्ताहिक वर्तमानपत्र काढलें ( १८३२ ). त्यांत हे इंग्रजी विभागांत लिहीत. त्यामुळें यांना जे. पी. करण्यांत आलें.

'दिग्दर्शन' नांवाचें एक भारदस्त व प्रौढ मासिकहि यांनीं चालविलें होतें (प्रारंभ १८४०). त्यांत यांचा शास्त्रीय लेख लिहिण्यावर भर होता. पण हें लोकाश्रयाच्या अभावीं कांहीं वर्षांनीं बंद करावें लागलें.

ग्रहणाविषयीं खरी वस्तुस्थिति व्याख्यानांत वर्णन केल्यानें आणि श्रीपाद शेषाद्रि नांवाचे ख्रिस्ती झालेल्या ब्राह्मणास शुद्ध करून घेतल्यानें यांना वाळींत पडावें लागलें.

यांचें वाङ्मय–१ विद्येचे उद्देश, लाभ व संतोष (भाषान्तर), २ बालव्याकरण, ३ नीतिकथा, ४ सारसंग्रह (भाषान्तर), ५ हिंदुस्थानचा इतिहास, पहिली आवृत्ति (१८४२), ६ रॉयल एशियाटिक सोसायटी व जिऑग्राफिकल सोसायटीपुढें वाचलेले इंग्रजी निबंध (शिलालेख व ताम्रपत्र यांवर), ७ उपदेशचंद्रिका मासिकांतील लेख (१८४४ सुमार), ८ संध्येचें भाषान्तर, ९ इंग्लंडचा इतिहास (गोल्डस्मिथच्या इंग्रजी ग्रंथाचें भाषान्तर), १० हिंदुस्थानांतील इंग्रजी राज्याचा इतिहास, ११ शून्यलब्धि गणित, १२ हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास (मुसलमानी अंमल).

**जिनराजदास सी.**—(जन्म स. १८७५) थिऑसॉफिकल सोसायटीचे जगप्रसिद्ध बौद्धधर्मीय कार्यकर्ते, अध्यक्ष, ग्रंथकार व वक्ते.

यांचा जन्म सिलोनमध्यें झाला. कर्नल ऑल्कॉट यांनीं सीलोनमध्यें शाळा काढून त्याचे इन्स्पेक्टर म्हणून मि. लेडबीटर यांना सीलोनला पाठविलें. ब्राझीलमध्यें स्थानिक लोकांकडून मारला गेलेला आपला धाकटा भाऊ जिराल्ड याचा सीलोनमध्यें पुनर्जन्म झाला आहे असा आदेश त्यांना मिळाला असल्यानें सीलोनमध्यें भेटणाऱ्या कोणत्याहि मुलाकडे हे त्या दृष्टीनेंच पाहण्याचा प्रयत्न करीत. यांची अध्यात्मप्रवण वृत्ति व कार्य करण्याची हौस पाहून आपला मृत भाऊ तो हाच अशी खुणगांठ मनाशीं बांधून यांनीं त्यांच्या आई-वडिलांची समजूत घालून यांना इंग्लंडला नेलें व तेथें यांच्या शिक्षणाची सर्व सोय केली (१८८९).

हे केम्ब्रिज विद्यालयांतून संस्कृत व भाषाशास्त्र घेऊन एम्. ए. झाले (१९००) व पुढें कायद्याचाहि अभ्यास यांनीं केला. यानंतर इटलींतील पेव्हियाचे विद्यापीठांत वाङ्मय व भौतिकशास्त्र घेऊन यांनीं आपल्या कलापूर्ण पण शास्त्रीय ग्रंथरचनाकौशल्याचा पाया घातला.

स्वदेशीं परत येऊन कोलंबो येथील आनंद कॉलेजमध्यें व्हा. प्रिंसिपल म्हणून यांनीं काम करण्यास सुरवात केली. १९०४ सालीं थि. सो. चे आन्तरराष्ट्रीय व्याख्याते म्हणून यांची अमेरिकेंत नेमणूक झाली व तेव्हांपासून स. १९११ पर्यंत तेथेंच यांनीं हें कार्य केलें. या सालाचे अखेरीस हे हिंदुस्थानांत आले व तेव्हांपासून जाऊन येऊन हिंदुस्थान हेंच यांचें मुख्य वसतिस्थान बनलें आहे. मध्यंतरीं इंग्लंडमध्यें श्री. कृष्णमूर्तींचे संस्कृताचे शिक्षक म्हणून हे राहिले (१९१२–१३). बेझंटबाईंच्या होमरूलच्या चळवळीचें कार्यहि यांनीं इंग्लंड व हिंदुस्थान या ठिकाणीं केलें. स. १९२१–२८ पर्यंत हे थिऑसॉफिकल सोसायटीचे आन्तर-राष्ट्रीय उपाध्यक्ष होते. बेझंटबाई आजारी असतांना तात्पुरते अध्यक्ष, लेडबीटर यांचे मृत्यूनंतर सोसायटीच्या अन्तःशाखेचे प्रमुख व ॲरंडेल यांचे मृत्यूनंतर हे अध्यक्ष बनले (१९४५).

स. १९१६ सालीं तिकडील स्त्रियांचे चळवळींत काम केलेल्या मिस डॉरेथी मार्गारेट ग्रॅहेम यांच्याशीं यांचा इंग्लंडमध्यें विवाह झाला. स. १९३०–३१ सालापर्यंत दोघेहि एके ठिकाणीं असत. पण १९२७ सालापासून कृष्णमूर्तींचे तत्त्वज्ञानाचे मांडणीसंबंधीं दोघांचें भिन्न मत होऊन हे उभयतां वेगळे राहूं लागले. हल्लीं त्या इंग्लंडमध्यें राहतात.

यांची बुद्धि कलात्मक व रहस्यग्राही असून यांची दृष्टि जागतिक व आन्तर अनुभवामुळें सखोल बनली आहे. हे प्लेटो व उपनिषदें यांचे तत्त्वज्ञानाशीं विशेष समरस होतात. अड्यार लायब्ररीचे डायरेक्टर म्हणून यांनीं अनेक वर्षें काम केलेलें आहे. यांची ग्रंथसंपत्ति फार विपुल आहे. यांनीं लहानमोठे सत्तावन ग्रंथ लिहिले आहेत. यांच्या लिहिण्यांत कलात्मक, शास्त्रीय व तत्त्वज्ञानपूर्ण अशा तीनहि बाजू दिसून येतात. यांना इंग्रजी, फ्रेंच, इटालियन, स्पॅनिश व पोर्तुगीज या भाषा उत्तम अवगत असून त्यांत हे जरूरीप्रमाणें व्याख्यानें देतात. विशेषतः स्पॅनिश व पोर्तुगीज भाषा जाणणारे यांच्यासारखे दुर्लभ वक्ते सोसायटीमध्यें असल्यानें द. अमेरिकेंत थि. सो. चे प्रचारार्थ यांनाच जावें लागतें. तेथें जाऊन यांनीं तिकडील पांच-सात देशांमधून उत्तम प्रकारें व यशस्वी रीतीनें प्रसार केला आहे. यांच्या कांहीं ग्रंथांचीं भाषान्तरें अनेक युरोपियन व चिनी भाषेंत झालेलीं आहेत. यांनीं कांहीं लहान परंतु काव्यमय पुस्तकें बौद्ध ग्रंथसंग्रहांतून लिहिलीं असून, तीं लहान मुलांना व तरुणांना अत्यंत मनोरंजक व स्फूर्तिप्रद झालीं आहेत. या पुस्तकांच्या

भाषेचें सहज व सुलभ स्वरूप पाहून अनेकांना कौतुक वाटतें. इतर पुस्तकांतील शास्त्रीय व अध्यात्मिक भाषा यांतील सारख्याच नैपुण्यामुळें हे सर्वत्र लोकप्रिय झाले आहेत. हिंदी कला व संस्कृति यांचे हे मोठे मार्मिक निरीक्षक व भोक्ते आहेत. या दोहोंचीहि ओळख हे परदेशांत आज अनेक वर्षे करून देत आहेत.

यांचे ग्रंथ—(1) First Principles of Theosophy, (2) Occult Chemistry, (3) Golden Book of Theosophical Society, (4) Theosophy and Modern Thought, (5) Occult Investigations, (6) Abul Fazl and Akbar, (7) Art and Emotions, (8) Art as Will and Idea, (9) Nature of Mysticism, (10) Christ and Buddha, (11) Wonder Child, (12) Flowers and Gardens इत्यादि.

**जिनविजयजी मुनि**—( जन्म स. १८८६ ) सुप्रसिद्ध जैन साधु व संस्कृत, प्राकृत, पाली वगैरे भाषांचे अभ्यासक.

यांचा जन्म परमारवंशांतील रजपूत घराण्यांत झाला. यांचें मूळ नांव किसनसिंह. बापाचें नांव वृद्धिसिंह. आईचें नांव राजकुंवर. जन्मस्थान–मेवाडांतील उदेपूर राज्यांत रुपाहेली. हे अविवाहित असून यांचा सर्व अभ्यास खाजगी रीतीनें झाला.

हे जैन साधूंच्या सहवासानें दीक्षा घेऊन जैन संन्यासी बनले. पण जैन साधूंचा कडक आचार आणि प्रतिबंधक राहणी यांना पटेना. शेवटीं यांनीं वेष बदलून एक अध्यापक व साहित्यसेवक म्हणून जीवन व्यतीत करण्यास सुरवात केली. अध्ययन–अध्यापन व ग्रंथलेखन–संपादन या कार्यांत यांचें सर्व आयुष्य व्यतीत होत असतें. हे उदार व सुधारक विचाराचे असल्यानें इंग्लंड, जर्मनी वगैरे देशांत अभ्यासाकरितां जाऊन हे कित्येक वर्षे राहून आले आहेत.

म. गांधींच्या प्रेरणेनें हे गुजराथ विद्यापीठांत आले आणि तेथील कार्यानें पुरातत्त्वविद्येचे एक गाढे अभ्यासक व विद्वान् लेखक म्हणून यांनीं कीर्ति संपादन केली. 'जैनतत्त्वसार ' आणि ' विज्ञप्तित्रिवेणी ' हे यांचे येथील आगमनानंतरचे पहिले ग्रंथ होत. त्यानंतर पद्धतशीर अभ्यास करून प्राचीन साहित्य, इतिहास, धर्मग्रंथ वगैरेंवर व्याख्यानें, लेख व ग्रंथ वगैरे द्वारा यांनीं उत्कृष्ट कामगिरी केली आहे.

गुजराथ पुरातत्त्व मंदिराचें काम यांच्या देखरेखीखालीं उत्तम चाललें होतें. पण तें कार्य सत्याग्रहाच्या चळवळींत बंद पडलें. तथापि प्रबंधचिन्तामणि संपादित करून यांनीं तें कार्य पुढें चालविलें. यांच्या अशा व्यासंगामुळेंच मुंबई युनिव्हर्सिटीनें यांना वसनजी माधवजी व्याख्यानमाला गुंफण्याकरितां बोलाविलें. यांनीं त्या वेळीं दिलेल्या व्याख्यानांच्या प्रसिद्धीनंतर सोलंकीच्या इतिहासावर विशेष प्रकाश पडलेला आढळेल. डॉ. रवीन्द्रनाथ टागोरांच्या शान्तिनिकेतनांत जैन साहित्याच्या इतिहासाचे अध्यापक म्हणून यांनीं अनेक वर्षे काम केलें आहे.

यांनीं प्रसिद्ध केलेले प्राचीन जैन लेखसंग्रहाचे दोन्ही खंड महत्त्वाचे आहेत. पहिल्या भागांत राजा खारवेलाचा लेख असून दुसऱ्या भागांत गुजराथ, काठेवाड, राजपुताना वगैरे भागांत मिळालेले ५५७ लेखांचा संग्रह आहे.

यांचें वाङ्मय–१ जैनतत्त्वसार ( १९१३ ), २ विज्ञप्तित्रिवेणी ( १९१४ ), ३ शत्रुंजय तीर्थोद्धार–प्रबंध ( १९१४ ), ४ कृपारस कोश ( १९१५ ), ५ प्राचीन जैनलेखसंग्रह ( भाग १, १९१६, भाग २, १९२० ), ६ द्रौपदीस्वयंवर नाटक ( संस्कृत, १९२५), ७ हरिभद्राचार्यस्य समयनिर्णयः ( संस्कृत १९२९ ), ८ कुमारपाल प्रतिबोध ( प्राकृत, १९२८ ), ९ पुरातत्त्व संशोधननो इतिहास ( १९२९ ), १० पालि पाठावलि ( १९२९ ), ११ प्राकृत कथासंग्रह, १२ अभिधान दीपिका-पालीभाषा शब्दकोश ( १९२२ ), १३ जैन ऐतिहासिक गुर्जर काव्यसंचय ( १९२४ ), १४ जीतकल्पसूत्र ( प्राकृत, १९२५ ), १५ विजयदेव माहात्म्य ( संस्कृत १९२६ ), १६ प्राचीन गुजराथी गद्यसंदर्भ ( १९२८ ), १७ खरतरगच्छपट्टावलिसंग्रह, १८ प्रबंधचिन्तामणि (संस्कृत), १९ पुरातनप्रबन्धसंग्रह (संस्कृत), २० विविधतीर्थकल्प ( संस्कृत-प्राकृत ), २१ प्रबन्धकोश ( संस्कृत ) इत्यादि.

**जिना, बॅ. मुहंमदअल्ली**—( जन्म स. १८७६ डिसें. २५ ) हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध मुसलमान पुढारी, विख्यात राजकारणी मुत्सद्दी, नामांकित कायदेपंडित व वक्ते.

कराचीच्या सुप्रसिद्ध व्यापारी खोजा कुटुंबांत यांचा जन्म झाला. कराचीला मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण संपविल्यानंतर हे इंग्लंडला गेले व बॅरिस्टर होऊन आले (१८९२-९६).

इंग्लंडमध्यें असतांनाच दादाभाई नवरोजींच्या सहवासाचा लाभ यांना मिळाला. तिकडे जाण्यापूर्वीच गोखल्यांच्या व्यक्तिमत्वानें हे भारले गेले होते. राजकारणांतील गोखले-नवरोजी यांचें ऋण यांनीं अनेक वेळेला बोलून दाखविलें आहे.

हिंदुस्थानांत परत आल्यानंतर यांनीं मुंबईच्या हायकोर्टांत आपलें नांव दाखल केलें (१९०६). त्या वेळचे ॲडव्होकेट-जनरल मि. मॅकफर्सन यांच्या चेंबरमध्यें काम करण्यास सुरवात करून यांनीं आपली वकिली आरंभिली. थोड्याच दिवसांत आपली बाजू तडफदारपणें पटवून देणारे कायदेपंडित अशी यांची प्रसिद्धि झाली.

वकिलींतील यांच्या यशाची खरी सुरवात 'कॉकस' खटल्याच्या वेळीं झाली. सुरवातीपासूनच मेहतांच्या अनुयायांत हे मोडत. त्यामुळें कॉकस प्रकरणीं आपलें वकीलपण मेहतांनीं यांचेकडेच दिलें. हा खटला स्मॉल कॉज कोर्टांत एतत चाळीस दिवस चालला. यामुळें लोकांच्या एकदम डोळ्यांसमोर तर हे आलेच; पण यांचा जाहीर सत्कारहि करण्यांत आला (१९०७).

याच सुमारास दादाभाई नवरोजींनीं यांना आपले प्रायव्हेट सेक्रेटरी नेमल्यानें हे राजकारणांत ओढले गेले. या वेळच्या काँग्रेसच्या बहुतेक अधिवेशनांनाहि हे हजर असत. १९०६ च्या कलकत्ता अधिवेशनांत मौलवी मुहंमद युसुफ यांच्या वक्फ-अल-औलदविषयींच्या ठरावावर यांनीं पहिलें जाहीर भाषण केलें. १९१० सालीं विल्यम वेडर्बर्न यांचे अध्यक्षतेखालीं अलहाबाद येथें ऐक्याचा मार्ग काढण्याकरितां भरलेल्या हिंदुमुसलमान पुढाऱ्यांच्या अधिवेशनांसहि हे हजर राहिले.

१९१० सालीं मुंबई इलाख्याच्या मुसलमानांतर्फे हे मध्यवर्ति कौन्सिलमध्यें निवडून आले. गोखल्यांचा प्राथमिक शिक्षणाचा कायदा व बसूंचें स्पेशल मॅरेज बिल पास करण्यांत यांनीं त्या वेळीं बरेच परिश्रम घेतले. परंतु वक्फ व्हॅलिडेटिंग बिलाची अंमलबजावणी करण्यांत यांनीं सर्वांत मोठें कौशल्य प्रगट केलें. प्रिव्ही कौन्सिलमधील मुस्लिम कायद्याचा चुकीचा अर्थ लावण्याच्या पद्धतीमुळें पास झालेल्या ठरावाला विरोध करणें हें या बिलाचें प्रमुख कर्तव्य होतें. लॉर्ड हार्डिंज यांनीं या बिलाची कायद्यांत अंमलबजावणी करण्यासाठीं यांची मुद्दाम स्वतंत्र नेमणूक केली. या कार्यानें असेंब्लीतील आपल्या सहकारी वर्गाचा तर यांनीं विश्वास संपादन केलाच पण त्याबरोबरच यांच्या कर्तृत्वाकडे तटस्थपणें पाहणाऱ्या सनातनी मुसलमानांचीं मनेंहि यांनीं जिंकलीं व ते यांच्याकडे नेतृत्वाचे दृष्टीनें पाहूं लागले.

परंतु यांचे असेंब्लींतील या कार्याला यानंतर तीन वर्षे खळ पडला. १९१३ सालीं हे प्रथम इंग्लंडला गेले व लंडन येथें यांनीं 'लंडन इंडियन असोसिएशन' या विद्यार्थी संघटना करणाऱ्या संस्थेची स्थापना केली. तिच्या खटपटीमुळें शैक्षणिक केंद्रांत हिंदी विद्यार्थ्यांना प्रवेश मिळवण्याबाबतींत जी तसदी सोसावी लागत असे तिची चौकशी करण्यासाठीं इंडिया ऑफिसनें कमेटी नेमली.

यानंतर हे हिंदुस्थानांत परत आले व पुनः इंडिया कौन्सिलच्या भावी स्वरूपासंबंधीचा हिंदी दृष्टिकोन समजावून देण्याचे हेतूनें काँग्रेसच्या शिष्टमंडळाचे सभासद म्हणून हे परत इंग्लंडला गेले (१९१४). या विषयावर कांहीं महिन्यांपूर्वी कराचीच्या काँग्रेसमध्यें व आग्राच्या मुस्लिम लीगच्या अधिवेशनांत यांनीं जे ठराव मांडले होते त्यांचाच पुनरुच्चार यांनीं इंग्लंडमध्यें केला.

१९१६ च्या निवडणुकींत व्हाइसरॉयच्या एक्झिक्युटिव्ह कौन्सिलमध्यें हे निवडून आले. फिरोजशहा मेहता यांचे मृत्यूनंतर असेंब्लींतील पक्षोपपक्षांचें राजकारण जरी यांनीं सोडून दिलें तरी होमरूललीग, काँग्रेस स्वतंत्रपक्ष, स्वराज्यपक्ष, नॅशनॅलिस्ट पार्टी इत्यादि पक्षांच्या राजकारणाचा यांनीं त्या त्या वेळीं असेंब्लींत पुरस्कार केला. गयाकाँग्रेसनंतर कायदेमंडळांत सरकारला संघटित विरोध करण्यासाठीं निघालेल्या स्वराज्यपक्षानें ज्या वेळीं इतर पक्षांचे लोक घ्यावयाचें ठरविलें त्या वेळीं यांचेच मदतीनें दासबाबूंनीं नॅशनॅलिस्ट पक्षाची स्थापना केली (१९२६).

यांनीं पुढें स्वतंत्र मतदारसंघाचा पुरस्कार केल्यानें यांना जात्यंध ठरविण्याचा घाट स्वराज्य पक्षानें घातला. त्या वेळीं नॅशनॅलिस्ट पक्षांतील लोकांना जातीय धोरणावर स्वातंत्र्य देऊन असेंब्लींत यांनीं स्वतंत्र पक्ष स्थापन केला व मुसलमान सभासदांप्रमाणेंच सर पुरुषोत्तमदास ठाकूरदास व हरिसर्वोत्तमराव या दोन हिंदु सभासदांचा आपल्या पक्षांत समावेश करून घेऊन यांनीं प्रतिपक्षांस चीत केलें.

यांच्या या असेंब्लीतील विजयाच्या-विशेषतः तेथील

यांच्या स्थानाच्या मुळाशीं यांचें वादविवादपटुत्व तर आहेच; पण त्याबरोबरच यांचा स्वार्थनिरपेक्षपणा व प्रामाणिक वृत्ति या गोष्टींना विशेष महत्त्व आहे. सरकारचा कोणत्याहि बाबतींत मिंधेपणा स्वीकारावयाचा नाहीं या यांच्या ठराविक धोरणामुळें कोणत्याहि गोष्टीचा खोल विचार करून आपलें मत निर्भीडपणें मांडणें यांना शक्य होतें. लोकांचें कल्याण ही एकच वृत्ति असेंब्लींतील कोणत्याहि ठरावासंबंधीं विचार करतांना हे कायम ठेवत असल्यानें एक यशस्वी कायदेकौन्सिलर हें यांचें स्थान विशेष महत्त्वाचें ठरलें आहे. यांच्या इतर कार्यासंबंधीं मतभेद व्यक्त करणाऱ्या लोकांचेंसुद्धां यांच्या या धोरणाबद्दल एकमत आहे. शेरियट बिलाचें कायद्यांत रूपांतर करण्यासाठीं यांनीं घेतलेले श्रम यांच्या या वृत्तीचे द्योतक आहेत.

यांच्या सार्वजनिक आयुष्याचे ठळक दोन भाग पडतात. त्यांत खिलापत चळवळ फिसकटेपर्यंतचा पहिला भाग असून त्या वेळेपासून आजतागायतचा इतिहास दुसऱ्या भागांत मोडतो. 'हिंदु मुस्लिम ऐक्याचे वकील' ही पदवी यांना यांच्या पहिल्या भागांतील कार्यानें मिळवून दिली तर सरकारच्या साहाय्यानें मुसलमानांचें एक स्वतंत्र नवें राष्ट्र निर्माण करणारे मुत्सद्दी हें यांच्या दुसऱ्या भागांतील चळवळीचें स्वरूप आहे.

राष्ट्रीय सभतील यांचे आगमनाचे वेळेपासूनच यांनीं मुस्लिम-लीग व तिच्या चळवळी यांचेकडे जातीय म्हणून दुर्लक्ष केलें. १९०६ सालीं जातीय मतदार-संघाची मागणी लॉर्ड मिंटोकडे करण्यास गेलेल्या आगाखान शिष्ट-मंडळांत सामील होण्यास यांनीं दिलेला नकार, अलाहाबादच्या कॉंग्रेसमध्यें जातीय प्रतिनिधित्वाचा निषेध करणारा यांचा ठराव (१९१०) व मुस्लिम-लीग व कॉंग्रेस यांना एका पातळीवर आणून राष्ट्रीय चळवळी संयुक्तपणें करण्याच्या योजनेस यांनीं दिलेला पाठिंबा (कराची १९१३) या गोष्टी यांच्या तत्कालीन वृत्तीच्या द्योतक आहेत. परंतु या सर्व गोष्टींचा कळस १९१५ सालीं मुंबई येथें भरलेल्या कॉंग्रेस व मुस्लिम-लीग यांचे अधिवेशनाचे वेळीं झाला. लखनौ कराराची प्रस्तावना करणारा ठराव पास होण्यास पठाण गुंडांचा विरोध दिसतांच स्थलांतर करून ताजमहाल हॉटेलमध्यें यांनीं तो ठराव रात्रीं पास करून घेतला. १९१६ सालीं लखनौ करारामुळें संस्मरणीय झालेल्या कॉंग्रेस-मध्येंहि यांनीं मनापासून भाग घेतला. मुसलमानांचे लोकसंख्येच्या प्रमाणावर कायदेमंडळांतील जागांची विभागणी या करारांत करण्यांत आली असून पंजाब ५० टक्के, बंगाल ३० टक्के, बिहार २५ टक्के, मध्यप्रांत व मद्रास १५ टक्के जागा देण्याचें वचन संयुक्त मतदारसंघाचे अटीवर या करारानें दिलें.

यांच्या या राष्ट्रीय भूमिकेवर, टिळक व हॉर्निमन या दोन राष्ट्रीय महत्त्व पावलेल्या व्यक्तींचे खटले अत्यंत जोरदारपणें चालविणाऱ्या यांच्या वकिली कौशल्यानें कळस चढला. याच वेळीं ॲनि बेझंट यांच्या तुरुंगवासामुळें होमरूल लीगच्या चळवळीकडे यांचें लक्ष वेधलें व हे मुंबईच्या होमरूल लीगचे अध्यक्ष बनले. यानंतर खिलापतीची चळवळ सुरू झाली व कॉंग्रेसनें मुसलमानांना खिलापत प्रकरणीं मनापासून मदत केली. याचे उलट मुसलमानहि असहकारितेच्या चळवळींत कॉंग्रेसच्या खांद्याला खांदा लाऊन लढत असल्याचीं दृश्यें दिसलीं.

परंतु खिलापत प्रकरणाचा निकाल मुसलमानांच्या मनाविरुद्ध लागल्यानें ते सवत्या सुभ्याच्या मागें लागले. असहकारितेच्या चळवळींत दिसून आलेली जागृति हें हिंदूंच्या संघटनेचें एक स्वरूप आहे, अशी कल्पना करून घेऊन न्यूनगंडाची कल्पना त्यांना सारखी डाचूं लागली व त्याचें पर्यवसान जातीय दंग्यांत झालें.

या मुसलमानांच्या वृत्तीवर तोडगा म्हणून कॉंग्रेसनें संयुक्त मतदार-संघाचा प्रचार सुरू केला. परंतु संयुक्त मतदार-संघ हा मुसलमानांवर वर्चस्वा ठेवण्याचा कॉंग्रेसचा म्हणजे पर्यायानें हिंदूंचा डाव आहे, या कल्पनेनें पछाडल्यानें १९२४ पासून पुढें मुस्लिम-लीगनें आपला स्वतंत्र मतदार-संघाचा आग्रह तसाच चालू ठेवला.

अशा तऱ्हेनें हिंदु-मुस्लिम एकीच्या नादांत हिंदु लोकच अधिक प्रबळ होत आहेत अशी यांच्या मनाची समजूत होत गेली व अखेर १९२६ सालीं यांनीं आपला जातीय दृष्टिकोन बदलल्याचें जाहीर केलें.

सायमन कमिशनच्या वेळीं हिंदु-मुसलमानांमधील विरोध प्रथम उघड झाला. मुस्लिम-लीगच्या १९२४-२६ अधिवेशनांनीं मान्यता दिलेल्या चवदा मागण्या यांनीं सायमन कमिशनपुढें ठेवल्या (१९२७). अल्पसंख्याकांना परिणामकारक प्रतिनिधित्व; स्वतंत्र मतदार-संघ; पंजाब, बंगाल इत्यादि प्रांतांतील मुसलमानी मताधिक्य कायम व धार्मिक स्वातंत्र्यासाठीं सरकारी संरक्षण हे त्यांतील प्रमुख मुद्दे होते.

परंतु स्वतंत्र मतदार-संघांत अभिप्रेत होणारा परस्पर

अविश्वासाचा आविष्कार काँग्रेसच्या त्या वेळच्या धोरणास मानवण्यासारखा नव्हता. मुसलमानांच्या हितरक्षणासाठीं कांहीं राखीव जागा काँग्रेसनें देऊं केल्या व स्वतंत्र मत-दार-संघ मागें घेण्याची सूचना यांना केली. दिल्ली येथें मुसलमानांची एक बैठक भरवून यांनीं सरहद्दप्रांत व बलुचिस्थान यांना इतर प्रांतांचे हक्क द्यावेत व सिंध प्रांत मुंबई इलाख्यापासून वेगळा करावा, या अटींवर संयुक्त मतदार-संघास मान्यता दिली. मुस्लिम लीगच्या वर्चस्वाखालीं दोन मुसलमानप्रधान प्रांत आणण्याचा यांचा हेतु होता. काँग्रेसनें यांच्या या सूचनेस मान्यता दिली व दिल्लीच्या कन्व्हेन्शनला हजर राहण्याचें आमंत्रण दिलें.

याच वेळीं प्रसिद्ध झालेल्या नेहरू रिपोर्टांत संयुक्त मतदार-संघांत मुसलमानांनीं यावें या हेतूनें कांहीं जागा मुसलमानांसाठीं राखून ठेवल्या होत्या व इतर जागा लढविण्यास मान्यता दिली होती. असें असतांना यांनीं काँग्रेसवर वचनभंगाचा आरोप ठेवला व ऐक्याची आशा फिसकटून टाकली.

राउंड टेबल कॉन्फरन्सच्या वेळींहि यांनीं आपल्या चवदा मुद्द्यांच्या पलिकडे सरण्यास नकार दिला. या वेळीं गांधींनीं दिलेला कोरा चेकहि ' हा आम्हांस हिंदुकडेच वटवावा लागणार ' या मुद्द्यावर यांनीं नाकारिला.

१९३२ सालीं मॅक्डोनाल्ड यांनीं दिलेल्या जाति-निर्णयांतहि पुन्हां एकदां स्वतंत्र मतदार-संघास मान्यता देण्यांत आली. त्याबरोबरच मंत्रिमंडळांत व सरकारी नोकऱ्यांत मुसलमानांना एकतृतीयांश जागा देऊं केल्या. परंतु यांनीं या गोष्टीस नकार दिला व एकद्वितीयांश जागांची मागणी केली.

१९३५ च्या कायद्याप्रमाणें १९३७ सालीं प्रांतिक स्वराज्याची स्थापना झाली. एकपक्षीय मंत्रिमंडळाची पद्धत जरी या कायद्यानें स्वीकारली असली तरी अल्प-संख्याक जातीचे मंत्री मंत्रिमंडळांत घेण्याची सूचना या कायद्यानें केली आहे. त्याप्रमाणें सर्व मंत्रिमंडळांत मुसल-मान सभासद काँग्रेसनें घेतले. परंतु धोरणांतील भिन्नते-मुळें यांच्या पक्षांतील सभासदांऐवजीं राष्ट्रीय मुसल-मानांना घेण्यांत आले. त्यामुळें यांनीं आपला बोलण्याचा सूर बदलला व 'मुस्लिम राष्ट्र हें स्वतंत्र राष्ट्र आहे, त्यांत बहुमत असलेल्या पक्षांचे सभासद कायदेमंडळांत घेतलेच पाहिजेत' असें म्हणण्यास सुरवात केली.

मुस्लिम-लीगचे १९४० च्या लाहोरच्या अधिवेशनाचे अध्यक्षस्थानावरून यांनीं पाकिस्तानची अधिकृत रीतीनें मागणी केली. हिंदुस्थानांत भौगोलिक दृष्ट्या जवळ जवळ असलेले मुस्लिम-प्रधान प्रांत स्वतंत्र व्हावेत, त्यांचें एक संघराज्य स्थापन व्हावें व बलुचिस्थान, सीमाप्रांत, सिंध, बंगाल हे प्रांत व भोपाळ, हैदराबाद व काश्मीर संस्थानांतील कांहीं भाग यांत सामील करावे, असा ठराव या अधिवेशनानें पास केला. यांत पुढें आसाम व पंजाब यांचा समावेश करून हिंदुस्थानच्या अकरा प्रान्तांपैकीं सहा प्रान्त पाकिस्थानांत आणण्याबद्दल बोलण्यांत येऊं लागलें.

कधींहि न पुरवतां येण्याजोगी अशा प्रकारची मागणी मागण्यांत यांनीं कौशल्य प्रगट केलें आहे. ' हिंदु व मुसलमान हीं दोन राष्ट्रें आहेत ' असें म्हटल्यानें अल्प-संख्य असणाऱ्या मुसलमानांना बहुसंख्य हिंदूंच्या बरोबरीचे हक्क प्राप्त होतात, ही यांची पाकिस्तानच्या मागण्यांतील प्रमुख गोम आहे.

मुसलमानांच्या हक्कांचें संरक्षण हिंदु मंत्रिमंडळें कधींहि करूं शकणार नाहींत, हें यांनीं आपल्या पाकि-स्तान योजनेचें प्रमुख कारण सांगितलें. काँग्रेस मंत्रि-मंडळांनीं मुसलमानांचा छळ केला, या यांच्या मोघम विधानाचा खरेपणा सिद्ध करण्याचें आव्हान काँग्रेस-मंत्र्यांनीं देतांच ' ती चौकशी रॉयल कमिशन नेमून करा' असें यांनीं उत्तर दिलें. काँग्रेस कारभाराबरोबर सरकारी कारभाराचें परीक्षण रॉयल कमिशनकडून होणार अस-ल्यानें सरकार या कमिशनला संमति देणार नाहीं, असा राजकारणी कावा यांच्या या उत्तरांत आहे. यानंतर आलेल्या क्रिप्स योजनेनें प्रांतिक स्वयंनिर्णयास पाठिंबा देऊन यांच्या या वक्तव्यास दुजोराच दिला.

परंतु यापेक्षांहि हातातोंडाशीं आलेली ' वेव्हेल योजना ' फिसकटून टाकण्यांत यांनीं आणखी एक पाऊल पुढें टाकलें. काँग्रेसला स्पृश्य हिंदूंची प्रतिनिधि ठरवून मुसलमानांचे सर्व प्रतिनिधि निवडण्याचा अधिकार लीगला देण्याविषयींचा आग्रह यांनीं धरला व ही योजना फेटाळली गेली. परंतु काँग्रेसच्या केवळ हिंदूंच्या प्रति-निधित्वाची सत्यता यांनीं १९४५ च्या मध्यवर्ति निवड-णुकीचे वेळीं प्रत्ययास आणून दिली. यांचेसुद्धां मुस्लिम-लीगचे सर्व उमेदवार राष्ट्रीय मुसलमानांचा पराभव करून निवडून आले आहेत.

यावरून ध्यानांत येईल कीं, ' आपल्याशिवाय राष्ट्रांतील कोणतीहि महत्त्वाची राजकीय घडामोड

होऊं नये' ही आपली महत्त्वाकांक्षा यांनीं मोठ्या कसोशीनें सिद्धीस नेली आहे. लखनौ कराराचे वेळीं लोकसंख्येच्या प्रमाणांत प्रतिनिधित्व टिळकांनीं मुसलमानांना देऊं करतांच जरूरीपेक्षां जास्त सौजन्य दाखविलें म्हणून सर्व काँग्रेसभर त्यांचेवर टीका झाली. परंतु तीच काँग्रेस आज मध्यवर्ती कायदेमंडळांत व मंत्रिमंडळांत हरिजनेतर हिंदु व मुसलमान यांना सारख्या जागा देण्यास तयार झाली आहे.

लॉर्ड डफरिन यांनीं हिंदु व मुसलमान हीं स्वतंत्र राष्ट्रें आहेत, असा पुकारा केल्यापासून दोघांत दुहीला सुरुवात झाली आणि सरकारी धोरणानें यांचा पाठपुरावा केला. पण त्यांतूनहि स्वतःचें वैशिष्ट्य राखून जातीचा अनपेक्षित लाभ घडवून आणण्याचें श्रेय यांच्या राजकारणी बुद्धीस दिलें पाहिजे. वकिली कौशल्य आणि दमदार इंग्रजी वक्तृत्व हीं यांचीं दोन प्रमुख आयुधें आहेत.

बहुमतावर चालणाऱ्या लोकशाहीच्या सध्यांच्या कालांत कांहीं प्रभावी अल्पमतवाले गट कसें राजकारण खेळतात याचा नमुना यांच्या राजकारणांत मिळतो. कांहीं प्रान्तांत आपणांस बहुमताच्या जोरावर सत्ता चालविण्यास मिळणार पण मध्यवर्ति सत्तेंत मुसलमान अल्पमतवाले म्हणून कायमचे निर्माल्य ठरणार असें पाहतांच या महत्त्वाकांक्षी पुरुषाच्या तल्लख बुद्धीनें फेडरेशनला विरोध करून हिंदुस्थानांत दोन राष्ट्रें निर्माण करण्याची कल्पना जोरानें पुरस्कारली, 'पाकिस्तान नाहीं तर सर्व ठिकाणीं पन्नास टक्के प्रतिनिधित्व' हा पवित्रा उभा केला आणि त्याला तात्त्विक मान्यता मिळविण्यापर्यंत मजल आणली. राजकारणी पुरुषाला अशक्य कांहींच नसतें, ही गोष्ट यांनीं चवदा मागण्या मान्य करून घेऊन आणि पाकिस्तान किंवा पन्नास टक्के ही मागणी दृष्टीच्या टप्प्यांत आणून 'राजकारणांतील प्रतिसृष्टि निर्माण करणारा मुत्सद्दी' असा लौकिक संपादन केला. खरोखर जगांतील थोर राजकारणी मुत्सद्यांत यांची गणना करावी लागेल.

**जिन्सीवाले, प्रा. श्रीधर गणेश**—(जन्म स. १८५२-मृत्यु स. १९०३) सुप्रसिद्ध पंडित, नामांकित वक्ते व कर्मनिष्ठ प्राध्यापक.

यांचें घराणें मूळचें नगर जिल्ह्यांतील सांकूर गांवचें. ग्वाल्हेरीस शिंद्यांचे सैन्यांत या घराण्यांत जिनसीचें म्हणजे तोफखान्याचें काम होतें, त्यावरून या घराण्यास जिन्सीवाले हें नांव मिळालें. पुढें यांच्या वडिलांस योग्य वांटा न मिळाल्यानें त्यांनीं आपल्या भावावर नऊ लाखांचा दावा नादारी कोर्टांत दाखल केला, पण शेवटीं नव्वद हजारांची तडजोड व दावा हीं अपेशी होऊन यांना अक्षरशः मधुकरी मागून आपला अभ्यास पार पाडावा लागला.

हे पांच इयत्ता झाल्यावर पुण्यास आले व त्याच सालीं मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण झाले (१८६८). चांगल्या प्रकारें उत्तीर्ण झाल्यानें अनेक शिष्यवृत्त्या मिळून यांना खर्चाची चिन्ता राहिली नाहीं. हे डेक्कन कॉलेजांतून बी. ए. (१८७३) व एम्. ए. (१८७६) झाले. पुणें हायस्कुलांत दीड वर्ष शिक्षकाचें काम केल्यावर मुंबईच्या विल्सन कॉलेजांत प्राध्यापक म्हणून यांची नेमणूक झाली. तेथून स्त्रीशिक्षणविषयक केलेल्या कांहीं विधानांबद्दल यांच्यावर माफी मागण्याचा प्रसंग आला असतां यांनीं माफी मागण्यापेक्षां राजीनामा देण्याचा स्वाभिमानी मार्ग पत्करिला आणि हे नोकरींतून मुक्त झाले (१८९०). येथून पुढें यांनीं कोठेंच नोकरी केली नाहीं.

नोकरी व पत्नी यांचा वियोग घडल्यानंतर यांचें आयुष्य विद्याव्यासंगातच गेलें.

करारीपणा, सत्यप्रीति, स्वाभिमान, स्वकुल, धर्म, देश यांबद्दल प्रीति, अल्पसंतोष आणि मानधनता हे यांचे विशेष गुण होत. इतिहासाची गोडी, विस्तृत वाचन व थोडीशी विचक्षणता हे गुण यांना इंग्रजी शिक्षणानें प्राप्त झाले होते. तथापि हे कर्मठ सनातनी होते. याला अपवाद फक्त यांच्या 'वेद पौरुषेय आहेत' या मताचा. स्वस्थितीविषयीं अत्यंत निरुत्साही जनमनास यांच्या भाषणानें फिरून उत्साह प्राप्त होत असे. यांनीं जवळजवळ एक तप लोकांस आपल्या धर्मशास्त्र व इतिहास या विषयाचें ज्ञान व्याख्यानद्वारा देण्यांत खर्चिलें. 'आपलें राष्ट्र, भरतखंड, महाराष्ट्र व आपण मराठे हे कायमचेच अवनत झालों, आतां फिरून आपणांस वर येण्याची आशा नाहीं, आपल्यांत कांहीं चिवटपणाच नाहीं,' हा समज चुकीचा आहे हें सिद्ध करण्याची व 'आपल्या राष्ट्राच्या पिंडांत असा कांहीं जोम आहे कीं, आज जरी तें रोग्यासारखें भासत आहे तरी कालान्तरानें रोग नाहींसा होऊन फिरून आपणास स्वतंत्र कर्तृत्वाचे दिवस येतीलच येतील' अशी श्रोत्यांची खात्री पटवून त्यांच्यांत नवीन उमेद उत्पन्न करण्याची यांची हातोटी वाखाणण्यासारखी असे. निबंधमालेच्या

द्वारें जें स्वाभिमान व आत्मविश्वास उत्पन्न करण्याचें काम विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं केलें तेंच काम यांनीं व्याख्यानद्वारा केलें. यांचें व्याख्यान म्हणजे विविध ज्ञानानें भरलेल्या एखाद्या ग्रंथसंग्रहासारखें असे.

**जीवराम, कालिदासशास्त्री**—( जन्म स. १८८१ ) गोंडलचे सुप्रसिद्ध राजवैद्य.

लहानपणीं मधुकरी मागून यांनीं शास्त्री ही पदवी संपादन केली. पुढें मुंबईस येऊन वेंकटेश्वर प्रेसमध्यें द. म. १२ रुपयांवर हे लागले. पण गिरनारला जाण्याची यांना बुद्धि झाली आणि तेथें यांना अच्युतानंद ब्रह्मचारी भेटले. त्यांचेजवळ संस्कृत, आयुर्वेद, मंत्रशास्त्र, योगशास्त्र व रसशास्त्र या विद्या शिकून रसशास्त्रावरचीं बरींच हस्तलिखितें घेऊन हे मुंबईस आले; तेथेंहि रसवैद्य बालशंकरभाईजवळ आयुर्वेदाचा आणखी अभ्यास करून यांनीं दवाखाना काढला. रसरत्नसमुच्चयाच्या भाषान्तराचें काम यांनीं या वेळींच सुरू केलें.

प्रथमतः फक्त ४० रु. च्या भांडवलावर यांनीं मुंबईस औषधींचा कारखाना सुरू केला. पण पुढें अच्युतानंदांच्या आज्ञेवरून गोंडल येथेंच यांनीं विधिपूर्वक कारखाना सुरू केला. तेथील नरेशांचेंहि यांना पुष्कळ साहाय्य झालें. कारखाना झपाट्यानें वाढूं लागला व त्याची देशभर ख्याति झाली.

स. १९१५ मध्यें हे गोंडलनरेशांचे राजवैद्य झाले. स्वतः गोंडलनरेश वैद्यपंचानन असून एम्. डी. आहेत. त्यांनीं राजवैद्य या मानावर चढविलेल्या या गृहस्थांची योग्यता किती मोठी असावी याची कल्पना यावरून येते.

कारखान्यांत केवळ शास्त्रशुद्ध औषधेंच बनवून हे स्वस्थ बसले नाहींत, तर जुनीं हस्तलिखितें जमा करून त्यांच्या प्रकाशनाचेंहि फार मोठें काम यांनीं केलें. आजवर यांनीं ( १ ) रसमंजरी, ( २ ) रसरत्नसमुच्चय, ( ३ ) रसोद्धारतंत्र, ( ४ ) रसेन्द्रमंगल, ( ५ ) रसकामधेनू, ( ६ ) रसप्रकाशसुधाकर, ( ७ ) राजमार्तंड, ( ८ ) मंत्रखंड, ( ९ ) ऋद्धिखंड, ( १० ) व्याधिनिग्रह, ( ११ ) प्रशस्तौषधसंग्रह इ. वैद्यक व इतर बरेंच ग्रंथ प्रसिद्ध केले. त्यांतील ' रसोद्धारतंत्र ' या ग्रंथाच्या, आजवर अठरा आवृत्त्या निघाल्या. ' आयुर्वेदरहस्यार्क ' व ' पारद ' या दोन मासिकांतून यांनीं फुटकळ लेखनहि बरेंच केलें आहे.

यांच्या रसशाळेचा युरोप व अमेरिकेंतहि बोलबाला झाला आहे. इटलीचे आयुर्वेदज्ञ प्रो. ए. जी. कारपानी यांनीं एक आयुर्वेदीय मासिक सुरू केलें असून ' राजवैद्य जीवराम कालिदासशास्त्री ' नांवाची एक लायब्ररीहि स्थापन केली आहे.

यांनीं लक्षावधि रुपये मिळविले. स्वतः लक्षाधिकांचा संचय केला, पण लक्षावधि आर्तांना औषधें, अन्न, वस्त्र इ. साठीं मुक्तहस्तानें यांनीं साहाय्य केलें. गेल्या बत्तीस वर्षांत यांच्या रसशाळेनें साडेतीन लाख रुपये धर्मार्थ खर्च केले आहेत.

यांची बाहेरगांवीं जाण्याची एका दिवसाची फी, हजार रुपये असल्याचें ऐकण्यांत आहे. स. १९४२ च्या ' नि. भा. आयुर्वेद-महासंमेलन लाहोर'चे हे अध्यक्ष होते. तेथील यांचें भाषणहि यांच्या लौकिकाला साजेल असेंच झालें ( आयुर्वेदाचार्य पां. ह. देशपांडे ).

**जुम्मामिया**—(जन्म स. १७९४–मृत्यु स. १९०४) बडोद्याचे सुप्रसिद्ध व्यायामप्रवीण सीद्दी पहिलवान.

हे व यांचे बंधु यांना पेंढाऱ्यांनीं पकडून नेलें असतां यांनीं सुटका करून घेऊन बडोदें गांठलें व तेथें यांनीं आपला पहिलवानांत प्रवेश करून घेतला. या वेळीं सयाजीराव गोविंदराव गादीवर होते. पुढें श्रीमंत खंडेरावमहाराज गादीवर आल्यानंतर तर बडोद्यास मल्लविद्या कळसास पोंचली. तेव्हां यांची योग्यता लक्षांत घेऊन यांना सर्वत्र मोठेपणा देण्यांत आला.

यांचा पोषाख पोटऱ्यांपर्यंत विजार, अंगांत एक सदरा व डोकीस सफेत कानटोपी असा असे. कानटोपीचा एक कान वर मुरडलेला असे. हे सर्व कपडे खादीचे असून स्वतः शिवलेले असत. हे रस्त्यानें जातांना नेहमीं खाऊकरितां मुलांचा तांडा यांच्याबरोबर असे. आणि हेहि मुलांशीं अत्यंत ममतेनें वागून त्यांना खाऊ देत.

हे बालब्रह्मचारी होते. तसेंच नेहमीं आनंदी असत. हे मुलास ' बाबा ' व मुलीस ' माई ' असें संबोधीत.

मरणापूर्वीं सुमारें तीन वर्षेंच यांनीं कुस्ती सोडली होती. या वयांतसुद्धां यांचें शरीर अत्यंत प्रेक्षणीय असे. यांचें उघडें शरीर पाहिलें असतां उत्कृष्ट शिल्पशास्त्राचा कोरीव नमुनाच आपल्यापुढें उभा असल्याचा भास होई.

यांचा निमगोरा वर्ण, करडी दाढी आणि भव्य शरीरयष्टि यांबरोबरच वृत्ति मात्र शांत व दयाळु असे. मुसलमान

होते तरी कोणताहि तामस आहार हे सेवीत नसत. रोज दोनतीन स्नानें व पांच वेळां निमाज पढत असत. मुलें किंवा फकीर यांच्या मेळ्यांत हे सदोदित राहत. निरिच्छ व निस्पृह अशी यांची वृत्ति होती. यांची व्यायामशाळा एका झोपडींत असे. मात्र तेथें मोठ्या लोकांची रहदारी असे.

यांना अस्थिसंधीची विद्या उत्कृष्टपणें येत असे. यांच्यापासूनच प्रो. माणिकराव यांनीं अस्थिसंधानविद्या संपादन केली. याशिवाय पोहणें, घोड्यावर बसणें वगैरे विद्यांत हे निष्णात होते.

गोरगरिबांना अन्नदान करणें हें यांचें मुख्य व्रत असे. त्यामुळें फकीर नेहमीं यांच्याकडे येत. कित्येक वेळां तर मिठाई मागवून हे वांटीत. शेवटीं सर्व वांटून शिल्लक न उरल्यानें उपाशीं राहण्याचाहि प्रसंग यांच्यावर येई. विद्यार्थी अतिथि वगैरेंबद्दल अशा औदार्याच्या यांच्या गोष्टी पुष्कळ आहेत. खंडेरावमहाराजाच्या पश्चात् यांनीं सरकारी नोकरी सोडली व अस्थिसंधानविद्येवर हे उपजीविका करूं लागले. पुढें प्रो. माणिकराव तयार झाल्यानंतर यांनीं तेंहि करणें सोडलें. यांनीं अनेक गुरूंपासून कुस्ती बिनोट, लकडी, कट्यार, मल्लखांब वगैरे विद्या संपादन केल्या होत्या. यांचें घर व आई जामनगरास होतीं. पुढें आई वारल्यावर घर यांनीं आप्तांना देऊन टाकलें. शेवटीं यांनीं आपल्या अनेक शिष्यांपैकीं माणिकराव यांना आपली तलवार, नमिदातुरी व एक ताईत देऊन आपली व्यायामसंस्था चालविण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणें जुम्मादादा व्यायाममंदिर सध्यां ते चालवीत आहेत. अस्थिसंधानाचें कामहि ते चांगल्या प्रकारें करतात ( वि. स. वाकसकर ).

**जेधे, केशवराव मारुतराव**—(जन्म स. १८९६) सुप्रसिद्ध राष्ट्रसभा–कार्यकर्ते व मराठा समाजाचे पुढारी.

हे पुणें येथील राहणारे असून यांचें शिक्षण पुणें हायस्कूल व फर्ग्युसन कॉलेज, पुणें, येथें झालें. हे जातीनें मराठा असून विद्यार्थी असतांनाच यांनीं ब्राह्मणेतर पक्षाच्या कामांत पुढाकार घेण्यास सुरुवात केली ( १९१८ ). लो. टिळक इंग्लंडहून परत आले तेव्हां यांनीं त्यांच्या स्वागताला व मानपत्राला ते सुधारणाविरोधी म्हणून विरोध केला ( १९२० ). प्रिन्स ऑफ वेल्सच्या स्वागताकरितां स्वयंसेवकांची उभारणी केली ( १९२१ ), पुण्याचें शिवस्मारक केवळ मराठ्यांचेंच असावें म्हणून यांनीं ' शिवस्मारक ' नांवाचें साप्ताहिक पत्र काढलें ( १८२३ ) व शेवटीं दैनिक ' मजूर ' पत्र काढून ब्राह्मणजातीवर कडक टीका करण्यास यांनीं सुरुवात केली ( १९२४ ). पुणें नगरपालिकेंत सभासद म्हणून निवडून आले असतां यांनीं नगरपालिकेतर्फे सुप्रसिद्ध समाजसुधारक व ब्राह्मणविरोधक म. जोतिराव फुले यांचा पुतळा उभारण्याची चळवळ सुरू केली. कै. दिनकरराव जवळकर यांच्या सहकार्यानें ' कैवारी ' नांवाचें मराठी साप्ताहिकहि यांनीं मुंबईस सुरू केलें होतें ( १९२७ ). मुंबईप्रान्त शेतकरी–परिषदेचे हे जनरल सेक्रेटरी असतां त्या परिषदेतर्फे स्मॉल–होल्डिंग बिलाला यांनीं विरोध केला ( १९२८ ).

' देशाचे दुष्मन ' नांवाचें जातीजातींत वैमनस्य उत्पन्न करणारें पुस्तक लिहिल्याबद्दल यांना जवळकरांच्यासह सहा महिन्यांची शिक्षा झाली होती. पण अपिलांत हे निर्दोषी म्हणून सुटले. अस्पृश्यांच्या पर्वती–सत्याग्रहांतहि यांनीं पुढाकार घेतला होता. येथून पुढें मात्र जातिविषयक चळवळी सोडून राष्ट्रीय सभेच्या कायदेभंगाच्या चळवळींत यांनीं भाग घेण्यास सुरुवात केली (१९३०–३२) यांना त्याबद्दल तुरुंगवासहि भोगावा लागला.

दिल्लीच्या कायदेमंडळांत महाराष्ट्र मध्यविभागाचे राष्ट्रसभेचे प्रतिनिधि म्हणून श्री. न. वि. गाडगीळ, यांचेबरोबर यांची प्रचंड बहुमतानें निवडणूक झाली ( १९३५ ). तेथील यांचें कामहि तडफदार झालें. यानंतर म. प्रां. कॉं. कमिटीचेहि हे अध्यक्ष होते ( १९३८ ). ऑगस्ट १९४२ च्या ' चलेजाव ' चळवळींत यांना दोन वर्षे तुरुंगांत विनाचौकशी ठेवण्यांत आलें.

प्रथम ब्राह्मणेतर चळवळींत झालेल्या अतिरेकानें ब्राह्मणेतरांचें हित होणें अशक्य अशी खात्री झाल्यानंतर राष्ट्रसभेच्या व्यापक व विधायक कार्यांत यांनीं भाग घेण्यास सुरुवात केली व ब्राह्मणेतर समाजाला विधायक कार्याचें उत्तम वळण दिलें. कोणतेंहि काम मनापासून व तडफदारपणें करण्याबद्दल यांची प्रसिद्धि आहे.

सखारामपंत, बाबुराव व हे असे तिघे भाऊ आहेत सखारामपंत वडिलार्जित समयांचा कारखाना, भांड्यांचें दुकान व दोन लाख भांडवलाचा ' मेटल शीट वर्क्स ' नांवाचा मोठा कारखाना चालवितात. बाबुराव श्रीशिवाजी मराठा सोसायटी, मराठा फ्री बोर्डिंग वगैरे संस्थांचे आधारस्तंभ आहेत. या दोघां बंधूंच्या सहकार्यामुळेंच यांना आपला आवडता सार्वजनिक चळवळीचा व्याप चालविणें शक्य झालें आहे.

**जोग, विष्णुबुवा**—( जन्म स. १८६४–मृत्यु स. १९२० ) सुप्रसिद्ध मल्लविद्याविशारद, भागवतधर्मप्रचारक व ग्रंथकार.

यांचे घराणें पुणें येथें प्रसिद्ध होतें. यांचे बंधु पिलोबा, गुण्याबावा व पांडोबा तालीमबाज मल्ल आणि पट्टीचे पोहणारे म्हणून प्रसिद्ध होते. पांडोबा हे नगरकरांच्या तालमीचे वस्ताद होत. कै. वासुदेवराव देशमुख, भाऊसाहेब गोखले, महाराज वामनराव लिमये ही मंडळी त्यांच्या परंपरेंतील होत. मल्लविद्येबरोबरच वारकरी संप्रदायाचे ते अनुयायी होते. तेच सर्व संस्कार यांच्यांतहि असत. यांचें शालेय शिक्षण मराठी लिहितां वाचतां येण्याइतपत होतें. यांनीं विवाह न करितां नैष्ठिक ब्रह्मचर्य पत्करिलें.

तरुणपणींच यांनीं अमृतानुभव व ज्ञानेश्वरी या ग्रंथांचें अध्ययन कै. नानामहाराज साखरे यांच्यापाशीं केलें. त्यांच्याचपाशी 'वासुदेवमनन' या ग्रंथाचेंहि यांनीं मनन केलें. केशवानंद उदासी यांचें 'शारीरशास्त्र' यांनीं साद्यन्त श्रवण केलें. पण यांच्या मनाला शांति मिळेना. तेव्हां हे काशीच्या श्रीकृष्णानंदस्वामींकडे गेले. तेथें स्वामींच्या जवळ यांनीं भाष्य ऐकलें. नंतर आळंदीस श्रीज्ञानेश्वरमहाराजांजवळ अनुष्ठान केलें तेव्हां यांना शांति प्राप्त झाली.

ज्ञानेश्वरीवर यांची अलोट श्रद्धा होती. ज्ञानेश्वरीच्या प्रचारार्थ आपला जन्म आहे असें यांना वाटे. यांचें जीवितध्येय ज्ञानेश्वरी व अमृतानुभव यांची चर्चा, निरूपण व पारमार्थिक ग्रंथलेखन हें ठरलें. यांनीं वारकरी संप्रदायाचें पद्धतशीर शिक्षण देण्याचें कार्यहि जन्मभर केलें. शिवाय तसें शिक्षण देणारी 'वारकरी शिक्षणसंस्था' काढून तिच्याकरितां स्वतःचे पंचवीस हजार रुपये खर्च केले. भव्य शरीरयष्टि, निरभिलाष वृत्ति, सरळ व सडेतोड प्रतिपादन यांमुळें यांची लोकांवर छाप असे.

कै. बंकटस्वामी, कै. मारुतिबुवा गुरव आळंदी, सर परशुरामभाऊ कॉलेजचे प्रिंसिपल शं. वा. दांडेकर व लक्ष्मणबुवा इगतपुरीकर वगैरे यांचे प्रमुख शिष्य होत. यांचे अनुयायी मराठी बोलणाऱ्या सर्व महाराष्ट्रभर पसरलेले आहेत.

यांचें वाङ्मय—१ महीपतीनें निवडलेले ज्ञानेश्वरींतील वेंचे ( सार्थ ), २ तुकारामाच्या अभंगाचा गाथा ( सार्थ ), ३ चांगदेव पासष्टी ( सार्थ ), ४ हरिपाठ ( सार्थ ), ५ अनुभवामृत ( सार्थ ), ६ वेदान्तविचार ( सार्थ ).

**जोशी, डॉ. आनंदीबाई**—( जन्म स. १८६५–मृत्यु स. १८८७ फेब्रु. २७ ) परदेशीं जाऊन शिक्षण घेतलेली पहिली महाराष्ट्रीय महिला.

यांचा जन्म पुणें येथें झाला. यांचे वडील गणपतराव केतकर हे कल्याणचे इनामदार होते. यांचा विवाह ठाण्याचे त्या वेळचे पोष्टमास्तर गोपाळ विनायक जोशी यांच्याशीं वयाच्या दहाव्या वर्षी झाला. हेच गोपाळराव पंचहौदमिशन प्रकरणाचे उत्पादक व महाराष्ट्रांतील विचित्र व्यक्ति म्हणून पुढें प्रसिद्धीस आले. त्यांनीं आपल्या ह्या द्वितीय पत्नीच्या विद्याभ्यासाकडे निरनिराळ्या गैरसोयी सहन करून प्रथमपासूनच चांगलें लक्ष ठेविलें व नंतर डॉक्टरच्या परीक्षेसाठीं यांना अमेरिकेंत पाठविलें.

ह्या निसर्गतः बुद्धिमान् होत्या. एक महाराष्ट्रीय तरुण ब्राह्मण स्त्री एकटीच परदेशीं जाणार हें ऐकून लोकांत अनेक शंका कुशंका निघूं लागल्या. परंतु श्रीरामपूरच्या कॉलेजांतील आपल्या व्याख्यानांत यांनीं अमेरिकेला आपल्या एकटेपणानें जाण्याची मीमांसा व अमेरिकेसारख्या सुधारक देशांतून आपण हिंदु आणि ब्राह्मण या स्थितींत परत येणें संभाव्य आहे वगैरे मुद्यावर उत्तररूप असें उत्कृष्ट व्याख्यान दिलें.

स. १८८३ च्या एप्रिलमध्यें या कलकत्त्याहून अमेरिकेस गेल्या. तेथें यांचा मुक्काम रोझेल येथें कार्पेंटर नामक कुटुंबांत होता. मिसेस कार्पेंटर यांनीं यांची सर्व व्यवस्था लावून देऊन फिलाडेल्फिया येथील स्त्रियांच्या वैद्यकीय पाठशाळेंत यांच्या शिकण्याची योजना केली. यांच्या हुशारीमुळें तेथील युनिव्हर्सिटीनें यांना यांच्या निर्वाहापुरती स्कॉलरशिप दिली. तीन वर्षांचा नियमित अभ्यास पूर्ण होऊन या डॉक्टरीची शेवटची एम्. डी. ची परीक्षा पास झाल्या. पदवीदान प्रसंगीं 'वुइमेन्स फिलाडेल्फिया कॉलेज'च्या चॅन्सेलरनें यांच्या विद्वत्तेची बरीच प्रशंसा केली. यांच्या यशाची बातमी हिंदुस्थानांत पोहोंचतांच कोल्हापुरास आबासाहेब कागलकरांनीं स्त्रियांकरितां एक इस्पितळ बांधण्याचें ठरवून त्यावर यांची द. म. ३५० रु. वर नेमणूक केली. पण त्या कामावर रुजू होण्यापूर्वीच, मुंबईस क्षयानें या मृत्यु पावल्या.

**जोशी, गणेश कृष्ण**—( जन्म स. १८६७–मृत्यु स. १९२२ ) अभिनयप्रधान गद्य नाटकांचे प्रवर्तक व अभिनयकुशल नट.

यांचें घराणें मूळचें आडिवरें ( जि. रत्नागिरी ) येथील. घरची स्थिति गरिबीची. वडील लहानपणींच वारल्यानें दहाव्या वर्षीच मधुकरीला कंटाळून हे कालेंकर नाटक मंडळींत पळून गेले. यांनीं आपल्या काम करण्याच्या कौशल्यानें तेथें बरीच प्रसिद्धि मिळविली. १८८१ मध्यें ती मंडळी बंद पडली. त्याच सुमारास रा. कृ. ब. जोशी यांनीं ठाणें येथें शाहूनगरवासी नाटक मंडळी काढली; तींत हे गेले. ही मंडळी पहिलीं ७।८ वर्षें पौराणिक नाटकें करीत असे. नंतर बदलत्या अभिरुचीस अनुसरून त्या मंडळीनें गद्य नाटकें करण्यास सुरुवात केली. याच सुमारास महाराष्ट्र रंगभूमीची सजावट, पडदे, सीनसिनरी वगैरेंनीं सुधारणा होऊं लागली होती. नवीन सजावटीनें या मंडळीनें बरेच खेळ बसविले; पण आर्थिक स्थिति सुधारेना. मंडळीचा मुक्काम पुण्यास होता ( १८९१ ). तेथें प्रो. वासुदेव बाळकृष्ण केळकर यांनीं ही मंडळी हाताशीं धरली. आणि यांच्या अंगच्या अभिनयाचा व विशेष प्रकारच्या अवाजाचा उपयोग होऊन यांचा व मंडळीचा लौकिक वाढत चालला.

या वेळेपर्यंत या मंडळीनें शेक्सपियरचीं झुंझारराव, हॅम्लेट, तारा व मंजुघोषा, मोचनगड, वीरकान्त-वीरसेन वगैरे इतर नाटकें रंगभूमीवर आणलीं. १८९२ सालीं त्या संस्थेनें ऐतिहासिक नाटकें बसविण्यास सुरुवात केली व त्या प्रयत्नांत चांगलेंच यश लाभलें. राणा भीमदेव या नाटकांत हे भीमदेवाची भूमिका करीत. त्यांतील आवाज, अभिनय व तद्रूपता यांमुळें प्रेक्षक भारले जात. यांच्या कामांतील सहजपणानें अभिनय म्हणजे काय हें लोकांना समजूं लागलें. याच सुमारास श्री. वासुदेव रंगनाथ शिरवळकरकृत तुकाराम या धार्मिक नाटकाचा प्रयोग करण्यांत आला. या नाटकांतील तुकारामाची भूमिका हे इतक्या हळुवारपणें करीत कीं, या विसाव्या शतकांतील तुकारामाच्या दर्शनार्थ भाविक प्रेक्षकांच्या उड्या पडत. प्रसंगानुसार उच्चार व अभिनय करण्याच्या कामांत यांचा त्या वेळीं अत्यंत लौकिक झाला. या नाटकाप्रमाणेंच त्राटिका, फाल्गुनराव व मानाजीराव ( मॅक्बेथ ) या नाटकांतील कामें करून सहज व सूक्ष्म भावना व्यक्त करणारा अभिनय करण्याच्या बाबत यांनीं रसिकांकडून धन्यवाद मिळविले.

यांचें शरीर साधारण बाळसेदार असे. पण आवाजाची देणगी यांना अपूर्व होती. त्यांत एक प्रकारची लहर असून कोणताहि भाव व्यक्त करण्याचें कसब त्यांत व्यक्त होई. हॅम्लेटसारख्या नाटकांत यांचें अभिनयकौशल्य आणि आवाजांतील फेरबदल करण्याचें कसब चांगलें व्यक्त होई. आईची निर्भर्त्सना करतांना यांच्या चेहऱ्याचा व आवाजाचा चढउतार असा कांहीं ठसकेबाज होत जाई कीं आईच्या विरुद्ध बोलतांना हा गृहस्थ अगदीं निरुपाय होऊन मोठ्या खेदानें बोलत आहे असा भास सर्वांना होई. मल्लिकेशीं बोलत असतां नर्म हास्यविनोद करण्यांत पटाईत असणाऱ्या माणसाचा आभास हे उत्पन्न करीत; तसेंच स्मशानांत खांचा खणणारांशीं बोलतांना असें खेळीमेळीचें वातावरण हे निर्माण करीत कीं जणूं कांहीं हे एक त्यांच्यापैकींच आहेत असें वाटे. प्रत्येक वाक्याचा उच्चार करतांना मनोविकाराचें प्रतिबिंब त्यांत हे असें उतरवीत कीं ऐकणारा या माणसाच्या कौशल्यानें दिपून जाई. मराठी रंगभूमीवर यांच्यासारखा नट अद्यापि झाला नाहीं. प्रथम यांच्या जोडीला बाळाभाऊ जोगांसारखे कुशल, स्त्रियांची भूमिका करणारे गृहस्थ होते. पण पुढें प्रायः यांच्या एकट्याच्या जिवावरच मंडळी चालत असे.

**जोशी, गणेश वासुदेव**—( जन्म स. १८२८ एप्रिल–मृत्यु स. १८८० जुलै २५ ) महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध सार्वजनिक कार्यकर्ते व वकील. हे 'सार्वजनिक काका' या नांवानें सुप्रसिद्ध होते.

यांचें घराणें मूळचें रत्नागिरीचें. यांचा जन्म साताऱ्यास झाला. यांचे वडील वासुदेव शिवराम हे १८३० सालीं 'सदर अमीन'च्या जागेवर असतां मृत्यु पावले. तेव्हां त्यांच्या तीन मुलांस वयांत येईपर्यंत दरमहा सोळा रुपये व पत्नीस हयातीपर्यंत साडे-सदतीस रुपये पेन्शन चालू होतें. यांनीं साताऱ्यास मराठी शिक्षण झाल्यावर पुण्याच्या नाझर कचेरींत नोकरी पत्करली ( १८४८ ). पण सात आठ वर्षांनीं ती नोकरी गेली आणि यांनीं वकिलीची परीक्षा दिली ( १८६५ ).

पुढें यांनीं थोडा इंग्रजीचाहि अभ्यास केला. वकिलीच्या धंद्यांतहि यांचा लवकरच चांगला बस बसला. आपल्या मातेच्या सांगण्यावरून यांनीं पुण्यास विष्णु मंदिर व हौद बांधला ( १८६८ ). तें 'नव्या विष्णूचें मंदिर' म्हणून प्रसिद्ध आहे.

पुण्याची सुप्रसिद्ध 'सार्वजनिक सभा' यांनीं पुढाकार घेऊन स्थापिली ( २ एप्रिल १८७०, वर्षप्रतिपदा ). तात्कालिक निमित्त पुण्याच्या पर्वती संस्थानांतील अव्यवस्था दूर करणें हें असलें तरी दुसरेंहि लोको-

पयोगी कामें करण्याचा उद्देश पुढें ठेवण्यांत आला. प्रथम सभेंत राजेमहाराजे, इनामदार, जहागीरदार वगैरेंचाहि समावेश असे. पण पुढें १८९६-९७ सालीं लो. टिळकांनीं सभा आपल्या मताच्या लोकांच्या हातीं घेतली आणि एकसंबेकर नांवाच्या सभेच्या प्रचारकानें काढलेल्या हस्तपत्रकामुळें सरकारनें सभेची राजमान्यता काढून घेतली. तेव्हांपासून तिच्यांत सरकारशीं संबंध असलेले लोक भाग घेत नाहींत.

मुंबईस 'बॉंबे असोसिएशन', कलकत्त्यास 'ब्रिटिश इंडियन असोसिएशन' तशी पुण्यांत 'सार्वजनिक सभा' होती. पर्वती संस्थानचें प्रकरण संपल्यावर पुणें शहर सुधारणा, कायद्याचे मसुदे देशी भाषेंत प्रसिद्ध व्हावेत म्हणून खटपट, मुंबई हायकोर्टांत एतद्देशीय न्यायाधीश नेमण्याची खटपट व त्याप्रमाणें नानाभाई हरिदास यांची हायकोर्ट जज म्हणून नेमणूक, ज्यूरीचे हक्क, रेल्वे-उतारूंच्या तक्रारी, नगरपालिकेंत लोकनियुक्त सभासदांच्या नेमणुका, संस्थानिक व सरकार यांच्या परस्पर संबंधाविषयीं सरकारास सूचना करणे, सरकारनें नेमलेल्या चौकशीकमिशनपुढें साक्ष देण्यास प्रतिनिधि पाठविणें, महाराष्ट्रांतील सर्व जिल्ह्यांची सांपत्तिक पाहणी करून वृत्तान्त प्रसिद्ध करणें (१८७२), हिंदुस्थानचा प्रतिनिधि कॉमन्स सभेंत घेण्याविषयीं मागणी करणें (१८७४), दुष्काळकमेट्या नेमणें, मदतीकरितां निधि गोळा करणें, दुष्काळाकडे लक्ष वेधण्याकरितां देशी-परदेशी पत्रांत लेख लिहिणें वगैरे कामें करण्यांत हे पुढाकार घेत. माधवराव रानडे यांना सर्व प्रकारें सहाय्य करीत, पण सरकारी नोकर असल्यानें ते आपलें नांव कोठें येऊं देत नसत.

देशाच्या वाढत्या दारिद्र्यावर स्वदेशी वस्तूंच्या प्रचारासारखा दुसरा उपाय नाहीं असें ठरतांच यांनीं 'देशी व्यापारोत्तेजक मंडळ' नांवाची संस्था काढली, तिच्यामार्फत जागोजाग देशी मालाचीं दुकानें उघडलीं व स. १८७२ जानेवारी १२ रोजीं देशी कापड वापरण्याची शपथ घेऊन आपल्या जुन्या पोषाखास रजा देऊन खादीचीं दाभणकाठी धोतरें, कंदी पागोटें व खादीचा अंगरखा हा जाडाभरडा पोशाख घालून यांनीं स्वदेशीचें व्रत जन्मभर निष्ठेनें चालविलें. यांच्या स्वदेशीची व्याख्या सूक्ष्म असल्यानें स्वतः सूत काढून घरच्या मागावर विणलेला कपडा हे वापरीत असत. स्वदेशी छत्र्या, काड्याच्या पेट्या व देशी माग यांचा कारखाना आपल्या घरीं काढून यांनीं बरीच झीज सोसली.

बडोद्याचे महाराज मल्हारराव गायकवाड यांची कर्नल फेअरवर विषप्रयोग केल्याबद्दल कमिशनपुढें चौकशी चालली असतां दोन लक्षांपेक्षां अधिक खर्च संस्थानच्या तिजोरींतून होणार नाहीं असा हुकूम निघाला. तेव्हां यांनीं एक लक्ष रुपये एका पेढीवर ठेवून लोकांतर्फे जरूर तो खर्च करण्याचें आश्वासन दिलें व कमिशनमध्यें देशी लोक असावेत असा सभेतर्फे अर्जहि व्हाइसरॉयला केला.

यापुढें सावकार व कुळें यांच्यांत बेबनाव होऊन त्याचें पर्यवसान दंग्यांत झालें. ऋणमुक्त होण्याच्या हेतूनें सावकारांजवळील कागद-पत्रें जाळणें, त्यांचे नाक-कान कापणें व लूट करणें हें या दंग्याचें सामान्य स्वरूप असे. या दंग्याला प्रथम सुरुवात पुणें जिल्ह्यांतील सुप्यास झाली व पुढें हे दंगे इतर जिल्ह्यांत पसरले. या दंग्याची सार्वजनिक सभेमार्फत यांनीं चौकशी करून दंग्याचीं कारणें व त्यांवरील उपाय सुचविले. त्याला अनुसरून 'दक्षिणेंतील शेतकऱ्यांचा कायदा' पास करण्यांत आला.

लवादकोर्टाची स्थापना, कलकत्त्यास व मुंबईस वर्तमानपत्रकारांची परिषद भरविणें (१८७८ जाने. व मार्च), शेतकी कमिशनच्या वेळीं शेतकऱ्यांची बाजू योग्य तऱ्हेनें मांडणें, बंडवाले वासुदेव बळवंत फडके यांचें वकीलपत्र घेण्यास कोणी धजत नसतां त्यांचें वकीलपत्र घेऊन काम चालविणें, जळालेला विश्रामबाग वाडा बांधण्याकरितां निधि उभारणें वगैरे अनेक कार्यें करीत यांनीं आपला देह सार्वजनिक कार्याकरितां चंदनाप्रमाणें झिजविला. अफगाणिस्थानच्या अमीराकडे जाऊन रदबदली करण्याचीहि तयारी यांनीं सरकारला कळविली होती. सुरतेच्या दंग्यामुळें तेथील वकीलांवर संकट आलें असतां हे त्यांच्या मदतीकरितां गेले होते.

यांच्या स्मारकाकरितां सहा हजार रुपये वर्गणी जमली. त्यांत नऊ हजार रुपये घालून 'सार्वजनिक सभेचा दिवाणखाना' खरेदी करण्यांत आला. सार्वजनिक सभा, तिचा दिवाणखाना व दिवाणखान्याशेजारील जोशी हॉल हीं यांचीं स्मारकें होत.

**जोशी, गणेश व्यंकटेश**—(जन्म स. १८५१ जून ८—मृत्यु स. १९११ मे २०) महाराष्ट्रीय अर्थशास्त्रज्ञ व राजकारणी पुरुष.

यांचा जन्म मिरजेस झाला. यांचे वडील मिरज संस्थानचे पोतनीस होते. यांचे आजोबा स. १८१८ त

मिरजकरांच्यातर्फे पेशव्यांकडे वकील असून त्या वेळच्या इंग्रजांबरोबर झालेल्या अखेरच्या चकमकींत सामील होते. हे बी. ए.च्या परीक्षेंत तर्कशास्त्रामध्यें पहिले आले. विद्याभ्यास संपल्यावर यांनीं शाळाखात्यांत नोकरी धरली ( १८७३ ). या वेळेपासूनच यांनीं लोकोपयोगी कामास प्रारंभ केला. हे उत्तम शिक्षक म्हणूनहि प्रख्यात होते. नाशिक, रत्नागिरी, मुंबई, सोलापूर, सातारा, पुणें वगैरे ठिकाणीं यांनीं नोकरी केली. हे १९०७ सालीं सेवानिवृत्त झाले. यांची राहणी अगदीं साधी होती. हे अत्यंत विनयशील पण धर्मनिष्ठ गाणपत्य व नियमित वागणारे होते. यांचा आवडता विषय आंकडेशास्त्राचा. सरकारी अहवालांतील आंकडे घेऊन त्यांची तुलना परराष्ट्रांतील जमाखर्चाशीं करून हिंदुस्थानची दारिद्र्यावस्था यांनीं सिद्ध केली. यांचें कोणतेंहि विधान निराधार नसे, त्यामुळें सरकारास तें मान्य करावें लागे. टाइम्स ऑफ इंडियांत यांचे लेख ' J ' अशा इंग्रजी सहीनें येत. यांचें अध्ययन व विद्वत्ता इतकी मोठी असे कीं, न्या. म. गो. रानडे हेहि यांची सल्ला घेत. ना. गो. कृ. गोखल्यांनीं वेल्बी कमिशनपुढें जी साक्ष दिली तिची सर्व तयारी यांनींच करून दिली. तसेंच सुरेंद्रनाथ बानर्जी, ना. सयानी, रमेशचंद्र दत्त यांनाहि वेळोवेळीं यांची मदत होत होती. सार्वजनिक सभा त्रैमासिक, इंडियन रिव्ह्यू , मराठा वगैरे नियतकालिकांत यांचे लेख आलेले आहेत.

मुंबईच्या कायदे-कौन्सिलचे हे सभासद होते. हे १९०८ सालीं धुळें येथें भरलेल्या मुंबई प्रांतिक परिषदेचे अध्यक्ष होते. यांचीं भाषणें माहितीनें भरलेलीं असत. महाराष्ट्रांतील सर्व राजकीय पुढारी यांना मान देत. शिक्षण सार्वत्रिक व मोफत करावें अशी यांची इच्छा होती. यांचा अंत अंतर्गळाच्या विकारानें झाला. शेवटपर्यंत यांचें अध्ययन सुरू होतें. यांच्या बहुतेक लेखांचें व भाषणांचें एक पुस्तक यांच्या चिरंजिवांनीं १९१२ सालीं प्रसिद्ध केलें.

**जोशी, गंगाधरशास्त्री**—( जन्म स. १८७३– मृत्यु स. १९३६ ) पुण्यांतील व्यासंगी वैद्य व चिकित्सक शास्त्रज्ञ.

यांचा जन्म व शिक्षण पुणें येथें झालें. यांनीं कै. अण्णासाहेब पटवर्धन यांच्या हाताखालीं पुष्कळ वर्षें काम केलें ( १९००–१९१६ ). यांचा वनस्पतींचा अभ्यास चांगला होता म्हणून त्यांच्या प्रदर्शनाचा भाग यांच्याकडे सोपविण्यांत आला ( १९१७ ). हे आयुर्वेद महाविद्यालय, पुणें येथें डॉ. गणनाथ सेन यांचें ' प्रत्यक्ष शारीर ' शिकवीत असतां त्यांतील ' शारीरे सुश्रुतो नष्टः' हा शेरा, व रोहिणी ( Artery ), नीला ( Vein ), धमनी वगैरे शब्द चुकीच्या अर्थानें वापरल्याचें यांनीं दाखविलें. त्याकरितां सुश्रुताचें इंग्रजी भाषान्तर करून यांनीं तें प्रसिद्ध केलें. पुढें डॉ. गणनाथ सेनांनीं 'संज्ञापंचकविमर्शः' हा निबंध प्रसिद्ध करून आपलेंच म्हणणें बरोबर असल्याचें लिहिलें. तथापि यांचा दोन हृदयांचा ( छाती व मस्तक 4th Ventricle ) सिद्धान्त मात्र त्यांनीं म्हैसूर संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणांत मान्य केला. यांनीं कै. अण्णासाहेब पटवर्धन यांच्या स्मारकार्थ आठ हजार रुपये जमवून त्याच्या व्याजांतून ' आयुर्वेद पारंगत ' होणाराला शिष्यवृत्ति देण्याची व्यवस्था केली आहे.

**जोशी, गोविंद महादेव**—( जन्म स. १८९५ मार्च २४ ) महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध अभ्यासक, नवविचारप्रवर्तक, वक्ते आणि ग्रंथलेखक.

बी. ए. झाल्यानंतर यांनीं शिक्षकाचा व्यवसाय पत्करला. संस्कृत, इंग्रजी, गणित, समाजशास्त्र, धर्मशास्त्र व ज्योतिष या विषयांचा यांचा व्यासंग मूलग्राही पद्धतीचा आणि नवा दृष्टिकोन व्यक्त करणारा आहे. हे पूर्ण आधुनिक जगांत वावरत असूनहि सनातन वैदिक धर्माच्या मूल तत्त्वांचें स्पष्टीकरण हे आधुनिक समाजशास्त्रज्ञांच्या ग्रंथाधारें उत्कृष्ट व निरुत्तर करण्याच्या पद्धतीनें करतात. बहुजनसमाजाच्या विचारप्रवाहाविरुद्ध प्रतिपादन करून लोकांना विचार करावयास भाग पाडण्याची शक्ति यांच्या प्रतिपादनांत आहे.

समाजजीवन मासिक ( १९३९–४२ ) व इतर नियतकालिकें यांमधून समाजशास्त्रावर हे सतत लिहीत असतात.

यांचे ग्रंथ—१ हिंदूंचें समाजरचनाशास्त्र. याचें गुजराथी भाषान्तर श्री. लीलाधर जीवनराव यादव, बी. एस्सी. सी.ई. यांनीं करून प्रसिद्ध केलें, २ धर्मशास्त्रविचार परीक्षण ( १९३३ ), ३ हिंदूंचें अर्थशास्त्र ( भाग पहिला १९३७ ), ४ सनातन धर्माचें स्वरूप ( १९४० ).

**जोशी, रावबहादुर नरहर सदाशिव**—( जन्म स. १८९३ ) सुप्रसिद्ध स्थापत्यविशारद व बॉंबे सेंटर ऑफ दि इन्स्टिटयूशन ऑफ एंजिनिअर्स (इंडिया), येथील १९४५ सालचे अध्यक्ष.

यांचें शिक्षण पुणें येथें नूतन मराठी विद्यालय, फर्ग्युसन कॉलेज व कॉलेज ऑफ एंजिनिअरिंग या संस्थांत होऊन हे बी. ई. झाले. मेंबर ऑफ दि इन्स्टिट्यूट ऑफ एंजिनिअर्स, इंडिया व मेंबर ऑफ दि रॉयल सॅनिटरी इन्स्टिट्यूट लंडन, होण्याचा मानहि यांना मिळला आहे. सध्यां हे नीरा कॅनल डिव्हिजन, पुणें या विभागांत एक्झिक्युटिव्ह एंजिनिअर आहेत. बॉंबे एंजिनिअरिंग कॉंग्रेसचे १८ वर्षें व इन्स्टिट्यूट ऑफ एंजिनिअर्सचे १७ वर्षें ते सभासद असून दोन्ही संस्थांच्या वार्षिक अधिवेशनांत यांनीं अनेक निबंध वाचले. याबद्दल बॉंबे एंजिनिअरिंग कॉंग्रेसकडून पदक व इन्स्टिट्यूशन ऑफ एंजिनिअर्स व्हाइसरॉय पारितोषिक यांना देण्यांत आलें.

पाणी सांठविण्याचीं धरणें व पाटबंधारे या विषयाचे हे विशेष अभ्यासक असून बृहन्महाराष्ट्रांतील शेती व पाणीपुरवठा या विषयाचा यांचा सूक्ष्म अभ्यास आहे. दक्षिण हिंदुस्थानांतील भूगर्भभागाचा ( ट्रॅप रॉक् ) यांनीं विशेष अभ्यास केलेला असून भूगर्भांतून उसळून आलेल्या लाव्हापासून हा खडक कसा तयार झाला ह्यासंबंधीं यांनीं अगदीं नवी उपपत्ति बसविली आहे. यांनीं प्रचलित लिपींचा तुलनात्मक अभ्यासहि केला असून लिपि ध्वनिशुद्ध करण्याकरितां एक अगदीं नवी पद्धति यांनीं बसविली. ह्या ध्वनिशुद्ध पद्धतीनें तारा देण्याकरितां मॉर्सकोड्ऐवजीं यांनीं ध्वनिशुद्ध लिपिहि तयार केली असून ती व्यवहारांत आणिली गेली आहे. या नव्या पद्धतीनें हिंदुस्थानांतील सर्व भाषांतील तारा बिनचूक देतां येतात.

परंतु सरकारी नोकरींत असतांनाहि बदलत्या राजकीय परिस्थितीपासून यांनीं आपल्या विचारांना कधींहि दूर जाऊं दिलें नाहीं. त्याचप्रमाणें हक्कांकरितां वरिष्ठ अधिकाऱ्यांशीं झगडण्याचा प्रसंग आला असतां हे मागें सरकले नाहींत. इतकें असूनहि यांच्या कार्यांतील सफाईमुळें यांना रावबहाद्दूर ही पदवी देणें सरकाला भाग पडलें.

यांनीं आजपर्यंत एकविसांपेक्षां अधिक निबंध इंग्रजींत लिहिले असून त्यांत कालवे, भूपृष्ठाखालील पाणी, बांधकामाच्या सामानाचें आकुंचन-विकास, या विषयांबरोबरच हिंदुस्थानांतील भाषांना योग्य ( ध्वनिशुद्ध ) तारलिपि, महाराष्ट्रांतील काळा खडक कसा बनला, वगैरे अगदीं भिन्न क्षेत्रांतील विषय आहेत. त्यांच्या प्रसिद्धीचीं ठिकाणें इन्स्टिट्यूशन ऑफ एंजिनियर्स ( इंडिया ), बॉंबे एंजिनियरिंग कॉंग्रेस, म्हैसूर एंजिनियर्स असोसिएशन, इंडियन सायन्स कॉंग्रेस हीं आहेत.

**जोशी, नारायण मल्हार**—( जन्म स. १८७९ ) कामगारांचे सुप्रसिद्ध पुढारी, सर्व्हंट्स् ऑफ इंडिया सोसायटीचे माजी सभासद व त्यागी सार्वजनिक कार्यकर्ते.

प्राथमिक शिक्षण सहा इयत्तांपर्यंत झाल्यावर यांना शाळेंतून काढून जोसपणाची वृत्ति संभाळण्याकरितां तीन वर्षेपर्यंत संहितेपर्यंतचें वैदिक शिक्षण देण्यांत आलें. यांचे बंधु महादेवराव यांना तें न पटून यांना पुण्यांत करंदीकर-लवाटे वगैरे मित्रांनीं चालविलेल्या न्यू प्रिपरेटरी क्लासेसमध्यें घालून वर्ष दीड-वर्षांत इंग्रजी चार इयत्तांचें शिक्षण देण्यांत आलें. नंतर न्यू इंग्लिश स्कूलमधून हे मॅट्रिक व डेक्कन कॉलेजांतून बी. ए. झाले. पुढें नगर व पुणें येथें खाजगी शाळांत, तसेंच मुंबई व रत्नागिरी येथें सरकारी शाळांत नोकरी करून यांनीं शिक्षकाचाच पेशा पत्करून हे एस. टी. सी. झाले. पण नामदार गो. कृ. गोखले यांनीं काढलेल्या भारत सेवक समाजास हे येऊन मिळाले ( १९०९ ) व यांनीं आपणास मजूर संघटनेस वाहून घेतलें.

स. १९१६ सालीं लढाईचे दिवसांत ज्ञानप्रकाशचे प्रतिनिधि म्हणून हे मेसापोटेमियांत जाऊन आले. सेंट्रल लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे हे आज चोवीस वर्षें सभासद असून ज्येष्ठत्वाच्या नात्यानें 'फादर ऑफ दि असेंब्ली' या मानाच्या पदवीस पात्र झाले आहेत. राउंड टेबल कॉन्फरन्स, मजूर परिषद् वगैरे निरनिराळ्या निमित्तांनीं हे सुमारें सोळा वेळां युरोपला व एक वेळ अमेरिकेला जाऊन आले आहेत.

हिन्दी मजुरांची व कामगारांची दुःस्थिति तिकडील पुढाऱ्यांपुढें मांडून, प्रसंगीं त्यांच्याशीं भांडून यांनीं त्यांना बरीचशी सुस्थिति प्राप्त करून दिली. या यांच्या कामगिरीमुळें हे केवळ हिंदुस्थानांतच नव्हे तर सबंध जगांत प्रसिद्धि पावले आहेत. हे हल्लीं भारतसेवक समाजांतून निवृत्त झाले असले तरी यांचीं पूर्वींचीं सर्व कामें पूर्वीच्याच जोमानें चालू आहेत.

कोणतेंहि काम असो, तें हातीं घेतलें कीं त्याचा पिच्छा पुरवावयाचा, त्यांतल्या तपशीलाच्या गोष्टींकडे बारकाईनें लक्ष पुरवावयाचें असें यांचें धोरण असल्यानें यांनीं काम करतांना जिवाकडे केव्हांहि पाहिलें नाहीं. यांची चिकाटी दांडगी असून पद्धतशीर काम करण्याच्या

संचयीमुळें यांच्या हातून इतकी भरीव कामगिरी होऊं शकली. वक्तृत्व, भाषेचा शृंगार किंवा कल्पनेची भरारी नसूनहि यांचें भाषण किंवा लेखन परिणामकारक झाल्याशिवाय राहत नाही. याचें कारण प्रतिपाद्य विषयाची भरपूर माहिती व सयुक्तिक कोटिक्रम हें होय. सर्व पक्षांतील लोकांना यांच्याविषयीं आदर वाटतो व सर्वांना यांच्या मताचा विचार करावा लागतो, याचेंहि कारण हेंच होय.

**जोशी, नारायण विष्णु**—( जन्म स. १८८५ ) सुप्रसिद्ध सूक्ष्म जंतुशास्त्रज्ञ व संशोधक.

रत्नागिरी जिल्ह्यांतील बाम्नी गांवीं यांचा जन्म व प्राथमिक शिक्षण झालें. पुढील शिक्षण मुंबईस होऊन १९०४ सालीं हे बी. ए. झाले. बी. ए.करितां वास्तव व रसायन हे यांचे विशेष विषय होते. १९०७ सालीं शेतकी कॉलेजांतून बाहेर पडलेल्या सुरवातीच्या पदवीधरांपैकीं हे एक होत. १९०८ सालीं यांनीं पूना अग्रिकल्चरल कॉलेजांत प्रवेश करून रसायनशास्त्रांत विशेष प्राविण्य दाखविलें. त्यामुळें दोन वर्षांत इंपिरियल अग्रिकल्चरल इन्स्टिट्यूट पुसा ( बिहार ) या मध्यवर्ति संस्थेंत जंतुशास्त्राच्या संशोधनाची शाखा प्रथमच उघडण्याकरितां यांची नेमणूक झाली. याप्रमाणें संशोधन शाखेंतील प्रमुख संशोधकाच्या जागेवर यांची नेमणूक झाली. यांनीं लावलेल्या शोधांपैकीं पुढील महत्त्वाचे आहेत.

१ शेतीला हिरव्या पाल्याचें खत लावण्याचें यांचें संशोधन तागाच्या सालीचा धागा व पानाचें खत अशा दुहरी तऱ्हेनें यशस्वी ठरलें.

२ यांनीं तीन सूक्ष्म जंतूंच्या जाती शोधून काढल्या. दुधाचें दहीं करणारे, वनस्पतींतील सेल्युलोजची विघटना करणारे व नैट्राइट हें रासायनिक द्रव्य सिद्ध करणारे जंतु. यांच्या या संशोधनास फारच महत्त्व आहे.

३ सशंग शेंगेच्या मूळावर असलेल्या गांठीमधील हवेंतील नैट्रोजन शोषून घेणाऱ्या जंतूंच्या शोधाबद्दल यांना एम्. एस्‌सी. ही पदवी मिळाली.

४ यांनीं शेणासंबंधीं केलेलें नवीन संशोधनहि असेंच महत्त्वाचें आहे. शेणांत बराच भाग सेल्युलोजचा व थोडा नैट्रोजनचा असतो. आजपर्यंत या दोहोंपैकीं एका कार्यासाठीं शेणाचा उपयोग करतांना दुसऱ्या तत्त्वाचा नाश पत्करावा लागत असे. यांनीं तयार केलेल्या भट्टींत शेणांतील तान्तव द्रव्याचा वायु बनून त्याचा जळणासारखा उपयोग होतो व खताला उपयोगी पडणारा नत्रभागहि सुरक्षित राहतो. याप्रमाणें गुरांच्या शेणापासून विजेचे दिवे, पंखे, रेडिओ वगैरे चालवितां येतात. या तऱ्हेची भट्टी औंधच्या राजेसाहेबांनीं आपल्या वाड्यामध्यें व वालचंद नगरांत बसविली आहे. आतां लहानमोठ्या भट्ट्या सर्वत्र मिळतील अशी योजना करण्याच्या प्रयत्नांत हे आहेत.

**जोशी, पुरुषोत्तम बाळकृष्ण**—( जन्म स. १८५६–मृत्यु स. १९३० ) मराठी भाषेंतील कवि, इतिहाससंशोधक व सार्वजनिक कार्यकर्ते.

यांचा जन्म मुंबईस झाला. पुढील शिक्षण विल्सन कॉलेजांत झालें. मराठींत कविता करणें, ऐतिहासिक संशोधन करणें आणि मराठी व इंग्रजी भाषेंत लिहिण्याचा यांना नाद होता. सर जेम्स कँबेल यांना मुंबई इलाख्याचें गॅझेट तयार करण्याच्या कामीं यांची फार मदत झाली. तसेंच जॉर्ज फारेस्ट, मि. एडवर्डस्, मि. एन्थाव्हेन इत्यादि विद्वान् लेखकांना यांचें साहाय्य असे. यांच्या संशोधनात्मक कार्याबद्दल 'कॅम्बेल मेडल' देऊन मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीनें यांचा गौरव केला.

यांचें वाङ्मय–१ काव्यरत्न १ लें, २ पद्यसुधा, ३ मुक्तावली ( १८७४ ), ४ समाधिशतावलि ( १८८५ ), ५ शिवदुःखाश्रुमार्जन ( १८८६ ), ६ युवराजनिधन ( १९०९ ), ७ आधुनिक कविताप्राप्ति ( १९१२ ), ८ उत्तर कोंकणचा प्राचीन इतिहास.

**जोशी, पूरनचन्द्र**—( जन्म स. १९०७ फेब्रु. १४ ) समाजसत्तावादी कार्यकर्ते. पी. सी. जोशी या नांवानें हे सर्वत्र प्रसिद्ध आहेत. पिता-पं. हरनन्दन जोशी. माता-मालती. गांव-अल्मोडा.

हे एम्. ए. एलूएल्. बी. आहेत. मिरत केसमध्यें यांना पकडलें तेव्हांच यांचा एलूएल्. बी. चा निकाल यांच्या हातांत आला ( स. १९२९ ). तो सुप्रसिद्ध खटला स. १९३३ पर्यंत चालला व यांना भोगलेली शिक्षा पुरी समजून सोडण्यांत आलें. अल्पवयी परंतु हे येवढ्या अवधींत अनेक दृष्टींनीं प्रभावी व अनुभवी ठरून बाहेर आले. आल्यानंतर यांनीं आपलें कार्यक्षेत्र कानपूर ठरविलें. तेथें यांचें काम प्रभावी ठरून यांना पकडून दीड वर्षाची शिक्षा देण्यांत आली ( १९३५ फेब्रु. ). शिक्षा भोगून सुटतांच हे अन्तर्धान पावले ते

काँग्रेसप्रधानांनीं यांचेवरील वारंट रद्द केलें तेव्हां प्रगट झाले. स. १९३६ सालीं हे अखिल भारतीय कम्युनिस्ट पक्षाचे जनरल सेक्रेटरी निवडले गेले. तेव्हां पासून पक्षाच्या उत्कर्षांत यांचा फार मोठा हिस्सा आहे.

संघटनकर्ता, पथदर्शक आणि स्नेही या दृष्टींनीं यांची योग्यता मोठी मानली जाते. हिंदुस्थानांतल्या सर्व प्रान्तांतील स्थितीचें यांना सहज आकलन होतें व त्याप्रमाणें अचूक उपाययोजना करण्यांत हे मोठे कुशल आहेत. यांची पत्नी कल्पनादत्त.

**जोशी, महादेव मल्हार**—( जन्म स. १८७४-मृत्यु स. १९२८ ) संस्कृत भाषेचे, तत्त्वज्ञानाचे अभ्यासक व वक्ते.

हे लहानपणापासूनच हुषार आणि तरतरीत होते. प्राथमिक शिक्षण गोरेगांव येथें, नंतर इंग्रजी शिक्षण रोहें येथें व इंग्रजी पांचवीपासूनचें शिक्षण पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्यें झालें. हे रोह्याहून पळून पुण्यास आले व वार लावून शिकत असत. मॅट्रिकमध्यें पहिली जगन्नाथ शंकरशेट स्कॉलरशिप यांना मिळाली. याप्रमाणें एम्.ए. पर्यंत संस्कृतमधील सर्व बक्षिसें यांनीं मिळविलीं. सरकारी नोकरी मिळण्याचा संभव असतांहि यांनीं राष्ट्रीय वृत्तीमुळें खासगी नोकरी पत्करली व नगर सोसायटीच्या हायस्कुलांत हेडमास्तर म्हणून काम केलें ( १८९८-१९०२ ). तेथून हे जुनागडला गेले ( १९०२ ) व तेथील बहुद्दीन कॉलेजमध्यें संस्कृतचे प्रोफेसर म्हणून काम करूं लागले. तेथें यांनीं उत्तम लौकिक संपादन केला. पंचवीस वर्षे नोकरी केल्यानंतर यांनीं पेन्शन घेतली. पण तिचा उपभोग घेण्यास हे जगले नाहींत. यांची लेखक व वक्ते म्हणूनहि प्रसिद्धी होती.

यांना घरांत ‘ अण्णा ’ असें म्हणत. ‘ भव्य देहयष्टि, पोषाखाची जुनी पुणेरी पद्धत, किंचित् किंचाळणारा पण कानांत घुमणारा आवाज, साध्याहि बोलण्यांत दिसून येणारा आवेश, ओबडधोबड चेहऱ्यावरील भेदक दृष्टि,’ इत्यादि गोष्टी पाहणाऱ्याच्या मनावर कायमची छाप पाडीत. तरल बुद्धिमत्ता, गाढी विद्वत्ता, सखोल व मार्मिक अभ्यास, जुन्या परंपरेचा जाज्वल्य अभिमान, डोळस देशप्रेम, झळ सोसून केलेला त्याग, विचारांची तेजस्विता वगैरे गुण यांच्यांत होते.

यांचे ग्रंथ—१ आधुनिक सुशिक्षितांचा वेदान्त. वामन मल्हारांनीं आपल्या शंकांची व मतभेदाची पुस्ती याला जोडली आहे. तत्त्वज्ञानाची इतक्या उच्च भूमिकेवरून केलेली मनोरंजक चर्चा अन्यत्र क्वचितच पहावयास सांपडेल; असें काका कालेलकरांनीं या पुस्तकासंबंधी लिहिलें आहे. २ सच्चिदानंद बाबांचीं पत्रें.

**जोशी, सर मोरोपंत विश्वनाथ**—( जन्म स. १८६१ ) उमरावतीचे सुप्रसिद्ध वकील, मध्यप्रान्ताचे माजी गृहमंत्री व प्रागतिक पक्षाचे सार्वजनिक कार्यकर्ते.

यांचें शिक्षण पुण्याच्या डेक्कन कॉलेजांतून व मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजांतून झालें. बी. ए., एलएल्. बी. झाल्यावर वऱ्हाडांतील ज्युडिशिअल कमिशनरच्या कोर्टामध्यें ॲडव्होकेट म्हणून यांनीं वकीली केली ( १८८४-१९२० ). पुढें हे मध्यप्रान्त सरकारचे गृहमंत्री होते ( १९२०-१९२५ ). १९२५ सालीं अखिल भारतीय प्रागतिक परिषदेचें अध्यक्षस्थान देऊन यांच्या कार्याचा गौरव करण्यांत आला. हिंदुस्थान सरकारनें नेमलेल्या ‘ एज ऑफ कन्सेंट ’ कमेटीचे हे अध्यक्ष होते ( १९२८-२९ ). हे ज्युडिशिअल कमिशनर्स कोर्ट, मध्यप्रान्त यांचे ॲडव्होकेट व सांगली संस्थानचे कांहीं काळ सर्वाधिकारी दिवाण होते. हिंदुस्थान सरकारनें यांना अनेक पदव्या देऊन यांचा गौरव केला आहे.

**जोशी, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री बाळाजी**—( जन्म स. १९०२ ) धर्मकोशाचे संपादक, नवविचाराचे प्रचारक व सार्वजनिक कार्य करणारे पंडित.

वाईच्या प्राज्ञपाठशाळेंत नारायणशास्त्री मराठे यांचेपाशीं यांनीं संस्कृत साहित्य व तर्कवेदान्तादि दर्शनांचें अध्ययन केलें आणि कलकत्ता संस्कृत असोसिएशनचे ‘ तर्कतीर्थ ’ झाले. यांना ‘ न्यायमार्तंड ’ हीहि उपाधि आहे ( १९२४ ). प्राज्ञपाठशाळेचे हे आजीवसेवक असून त्या संस्थेचे हे अध्यक्ष आहेत. धर्मकोशाच्या संपादनाचें काम सध्यां यांच्या नेतृत्वाखालीं चालू आहे.

धार्मिक व सामाजिक बाबतींत नवेनवे विचार आत्मसात् करून तडफेनें मांडण्याची यांची वृत्ति आहे. हे धर्मदृष्ट्या जडवादी व राजकारणांत रॅयिस्ट आहेत. यांनीं राजकारणांत अनेक वेळां कारावास भोगला आहे.

यांचे ग्रंथ—संस्कृत : १ शुद्धिसर्वस्वम्, मराठी : १ आनंदमीमांसा, २ हिंदु धर्माची समीक्षा, ३ अनीश्वरवाद, इत्यादि.

**जोशी, वामन मल्हार**—( जन्म स. १८८२–मृत्यु स. १९४३ ) मराठी भाषेंतील पहिल्या दर्जाचे लेखक, समाजसुधारक आणि त्यागी पुरुष.

यांचे पूर्वज पुणें जिल्ह्यांतील रायरी गांवीं राहत असून तेथें भिक्षुकी करीत म्हणून यांचें घराणें रायरीकर-जोशी अशा जोडनांवानें ओळखलें जातें. यांचे खापर-पणजे कोंकणांतील गोरेगांवास आले व तेथें स्थायिक झाले. यांचे अजोबा बाळ (बल्लाळ) व वडील मल्हार (नथु) हे ज्योतिषांत निष्णात असत. यांचा जन्म तळें येथें अजोळीं झाला.

यांना सावत्र बंधु वासुदेव, सख्खे बंधु महादेव, नारायण हे होत. यांपैकीं दुसरे व तिसरे प्रसिद्ध असून त्यांचीं स्वतंत्र चरित्रें दिलीं आहेत.

यांचें मराठी पांच इयत्तांचें शिक्षण गोरेगांवीं, व इंग्रजी सात इयत्तांचें शिक्षण सदाशिव श्रीधर करंदीकर यांनीं काढलेल्या न्यू प्रिपरेटरी क्लासेसमध्यें झालें. तेथेंच शंकरराव लवाटे व लक्ष्मणराव पांगारकर वगैरेंचा शिक्षक म्हणून सहवास यांना लाभला. पुढें नगर हायस्कुलमधून हे मॅट्रिक झाले ( १९०० ). वर नंबर व शिष्यवृत्ति मिळाल्यानें बी. ए. ( १९०४ ) तर्कशास्त्र व तत्त्वज्ञान घेऊन एम्. ए. झाले ( १९०६ ).

खासगी संस्थांतील प्राध्यापक किंवा सरकारी नोकरी यांच्या लोभांत न पडतां, कलकत्ता काँग्रेसहून येतांच हे समर्थ विद्यालयास आजीवसेवक म्हणून मिळाले, व कोल्हापुरास जाऊन समर्थ विद्यालयांत व प्रो. विजापूर-करांच्या ‘ विश्ववृत्त ’ मासिकाच्या संपादनाचें काम करूं लागले. त्यांत पं. श्री. दा. सातवळेकर यांचा ‘ वैदिक धर्माची तेजस्विता ’ हा लेख छापण्यांत आला. तो लेख राजद्रोही म्हणून मुद्रक विनायकराव जोशीराव व जोडसंपादक म्हणून प्रो. वि. गो. विजापूरकर व हे यांना कैदेच्या शिक्षा देण्यांत आल्या. त्यांत यांना ३ वर्षांची सक्तमजूरी अशी कठोर शिक्षा झाली. स. १९११ च्या ऑक्टोबरांत यांची मुक्तता झाली.

हे सुटून आले तेव्हां समर्थ विद्यालय व विश्ववृत्त बंद पडल्याचें यांना आढळलें. तेव्हां उपजीविकेकरितां यांना जुळेल तेथें व मिळेल तो व्यवसाय करावा लागला. कांहीं दिवस आर्यभूषणमध्यें इंग्रजी-मराठी कोश, दोन वर्षे ‘ मराठा ’ या इंग्रजी साप्ताहिकाच्या संपादकीय कामांत व नंतर मुंबईस अच्युतराव कोल्हटकरांच्या ‘ मेसेज ’ या इंग्रजी दैनिकांत यांनीं काम केलें. पण या धंद्यांत आवश्यक असणारा पक्षाभिनिवेश यांच्यांत पुरेशा प्रमाणांत नसल्यानें तो धंदा यांना जुळण्यासारखा नव्हता. शिवाय पैशाची हलाखीहि कमी होईना. म्हणून शेवटीं आयुष्यांत स्थिर व्हावयाचें या इच्छेनें यांनीं हिंगणें येथील प्रो. कर्वे यांच्या अनाथबालिकाश्रम संस्थेस मिळण्याचें ठरविलें, व स. १९१८ च्या जूनमध्यें हे तेथील महिलापाठशाळेंत प्राध्यापक म्हणून रुजू झाले.

यांच्या आयुष्याचीं हीं सहासात वर्षे नोकरीच्या दृष्टीनें अस्थिरतेंत गेलीं असलीं तरी यांचें महत्त्वाचें लेखनकार्य याच काळांत झालें. नीतिशास्त्रप्रवेशाचीं कांहीं प्रकरणें, सॉक्रेटिसाचे संवाद, नवपुष्पकरंडक, विचार-विलास, रागिणी, आश्रमहरिणी, नलिनी वगैरे लहानमोठीं पुस्तकें यांनीं याच काळांत लिहिलीं.

नोकरीच्या शाश्वतीच्या दृष्टीनें हिंगणें येथील पुढचें आयुष्य एकंदरीनें स्थिरतेचें गेलें असलें तरी तें निर्भेळ सुखाचें मात्र जावयाचें नव्हतें. हिंगण्यास येऊन राहिल्यास थोडे दिवस झाले नाहींत तोंच यांची पत्नी निवर्तली आणि चारहि लहान मुलांच्या संगोपनाचा भार यांचेवर पडला. त्याच वर्षी हे संस्थेचे आजन्मसेवक झाले. महिलाश्रम हायस्कूलचे मुख्याध्यापक मोडक सोलापुरीं गेले, तेव्हां यांना ती जागा मिळाली ( स. १९२७ ). वडील बंधु महादेव मल्हारांच्या मृत्यूनें कौटुंबिक दुःखाचा आणखी एक तडाखा बसला ( १९२८ ).

यांनीं ‘ सुशीलेचा देव ’ ही कादंबरी लिहिली ( १९३० ), त्याच वर्षी मडगांवच्या महाराष्ट्र साहित्य-संमेलनाचें अध्यक्षपद यांना देण्यांत आलें व साहित्यिक म्हणून हे मान्यता पावले. पुढें ‘ इंदु काळे व सरला भोळे ’ ही पत्रात्मक कादंबरी यांनीं प्रसिद्ध केली व महिलाश्रम हायस्कूलच्या मुख्याध्यापकाच्या कामांतून हे मुक्त झाले. तेथें यांनीं सर्व आधुनिक साधनांचा उप-योग करून शाळेची उन्नति केली व विद्यार्थिनींची संख्या वाढविली ( १९३४ ).

नंतर हे डेक्कन जिमखान्यावर राहण्यास आले. घरगुती समाधान यांना फारच थोडें असे. तथापि हे आनंदी व समाधानी वृत्तीनें राहत. पुढें एरंडवणा महिलाविद्यालयाचे यांना प्रिन्सिपल नेमण्यांत आलें ( १९४१ ) व हे पुनः एरंडवण्यास राहण्यास गेले. पण संस्थेंतील अन्तर्गत लाथाळ्यानें या सत्त्वस्थ माणसास कधींच समाधान न लाभावें असा योग होता. यांचे एकसष्टीचे समारंभ मात्र मोठ्या थाटाचे होऊन लोकांनीं एकमुखानें यांचा

गौरव केला. पण मूळव्याध, रक्तक्षय व जन्मभर भोगलेल्या आधींव्याधींनीं जर्जर झालेलें यांचें शरीर फार दिवस तग धरूं शकलें नाहीं.

यांचें वाङ्मय—तत्त्वज्ञान–१ साक्रेटिसाचे संवाद, २ नीतिशास्त्रप्रवेश; लेखसंग्रह–३ विचारविहार, ४ विचारविलास, ५ विचारसौंदर्य; आत्मचरित्रपर–६ स्मृतिलहरी; नाटक–७ विस्तवाशीं खेळ; कादंबरी–८रागिणी, ९आश्रमहारिणी, १० नलिनी, ११ सुशीलेचा देव, १२ इंदू काळे व सरला भोळे; गोष्टी–१३ नवपुष्पकरंडक; शालेय–१४ वाङ्मयमाला ( ना. म. पटवर्धनांच्या सहकार्यानें ).

यांचें सर्व लेखन विचार-प्रधान आहे. विचार मांडतांना हे कोणाच्याहि आहारीं जात नसत. हे व्यवहारांत अत्यंत भिडस्त असले, तसेंच तुटकपणापेक्षां स्वतःच्या प्रामाणिक मतांना मुरड घालीत असतांना हे दिसत असले तरी लेखनांत किंवा विचार व्यक्त करतांना हे वाटणारें सत्य स्पष्टपणें केव्हांहि प्रगट केल्याशिवाय राहत नसत. मात्र स्पष्टपणाला फटकळपणाचें रूप देऊन हे इतरांच्या विचारांबद्दल तुच्छता कधींच दाखवीत नसत. आपण प्रदर्शित करीत असलेल्या मताला कदाचित् दुसरी सयुक्तिक बाजू असणें शक्य आहे, अशी जाणीव ठेवून हे संयमानें विरोधी पक्ष मांडीत. तेव्हां यांना ‘ मंत्रचळे ’ किंवा ‘ संशयात्मा ’ असें लोक हिणवीत. पण ‘मला एका प्रश्नाच्या अनेक बाजू दिसतात, त्यामुळें एकच तऱ्हेचा विचार आग्रहानें बोलतां येत नाहीं ’ असें यांनीं त्याचें उत्तर दिलें आहे. जुन्या आणि नव्या विचारांच्या मागील पार्श्वभूमि आकलन करण्याची आणि ते सहानुभूतिपूर्वक मांडण्याची यांच्यांत शक्ति होती. म्हणून यांना ‘घरचे तत्त्वज्ञानी’, ‘पुण्याचे प्लेटो’ अशा गौरवाच्या पदव्या बहाल करण्यांत आल्या. यांनीं करमणूक करण्यापेक्षां विचारावर उमें राहण्याची लोकांना सवय लावली.

**जोशी, वीर वामन गोपाळ**—(जन्म स. १८८१) उत्तम शिक्षक, आजन्म राष्ट्रसभा-सेवक, प्रभावी वक्ते व मराठींतील प्रभावी नाटककार.

हे वऱ्हाडांतील राष्ट्रसभा पक्षाचे पुढारी आहेत. १८९९ सालीं हे मॅट्रिक झाले. १९०८ सालीं नागपूर येथें यांच्यावर पहिला राजकीय खटला झाला. यानंतर मुंबईच्या ‘ राष्ट्रमत ’ या दैनिकांत दे. भ. गंगाधरराव देशपांडे यांचे ते प्रमुख सहकारी बनले ( १९०९ ). १९२१ सालीं अकोला येथें १२४ अ कलमाखालीं यांच्यावर राजद्रोहाचा खटला झाला व यांना सरकारकडून दीड वर्ष सक्तमजुरीची शिक्षा व लोकांकडून ‘ वीर ’ अशी पदवी मिळाली. उमरावतीच्या ‘ स्वतंत्र हिंदुस्थान ’ साप्ताहिकाचे हे संस्थापक व नंतर सात वर्षे संपादकहि होते. १९३० पासून वऱ्हाड प्रां. कॉं. कमिटीचे अध्यक्ष आहेत. त्याच सालीं मे महिन्यांत खटला झाला व यांना कायदेभंगाच्या धामधुमींत दोन वर्षांची शिक्षा झाली. पण दिल्लीकरारान्वयें नऊ महिन्यांत यांची मुक्तता झाली. यांनीं आतांपर्यंत, राक्षसी महत्त्वाकांक्षा, रणदुंदुभि, धर्मसिंहासन व झोटिंगपातशाई हीं नाटकें लिहिलीं आहेत. यांचीं नाटकें त्यांतील वीररस व तेजाळ भावना यांमुळें सर्वत्र लोकप्रिय ठरलीं आहेत.

**जोशी, वासुदेव गणेश तथा वासुकाका**—( जन्म १८५६–मृत्यु स. १९४४ जाने. १२ ) पुण्याच्या सुप्रसिद्ध चित्रशाळा छापखान्याचे मालक, लोकमान्य टिळकांचे निकटचे सहकारी व महाराष्ट्राच्या धकाधकीच्या सार्वजनिक जीवनांत ठळकपणें दृष्टीपुढें राहणारे कार्यकर्ते.

यांचा जन्म वाईनजीक कृष्णेच्या कांठीं असलेल्या धोम येथें झाला. तेथें यांचें घराणें जोसपण, सावकारी व शेती करून राही. हे चवदाव्या वर्षी पुणें येथें आले व इंग्रजी पांचसहा इयत्ता झाल्यावर एंजिनियरिंग कॉलेजांतील ॲग्रिकल्चरल क्लासांत यांनीं एक वर्ष काढलें. नंतर विष्णुशास्त्री चिपळूणकरांची व यांची ओळख होऊन हे त्यांच्या निबंधमालेचे व्यवस्थापक बनले. पुढें तर चित्रशाळा यांच्याकडे सोंपविण्यांत आली. आणि यांनीं आपल्या व्यापक योजकतेनें चित्रशाळेला भरभराट प्राप्त करून दिली.

विष्णुशास्त्री वारल्यानंतर हे लोकमान्य टिळकांचे सहकारी व जबाबदार सल्लागार बनले. पंचहौद चहा प्रकरणांत हे होते, पण यांनीं चहाच घेतला नाहीं. संमतिबिलाच्या क्रीडाभुवनांतील सभेंत यांना अटक झाली, पण हे पांच दिवसांनीं सुटले. टिळकांच्या सर्व प्रकरणांत हे प्रामुख्यानें असत.

चित्रशाळेचा प्रथम जम बसेना, पण भिवा सुताराच्या रामपंचायतनाला लोकप्रियता लाभली आणि चित्रशाळेचा बस बसला ( १८८२ ). पुढें मोडी पुस्तकांचा मक्ता यांस मिळाला. पुढें यांचे पुतणे शंकर नरहर जोशी (स. १८७५–१९४४ ) चित्रशाळेला येऊन मिळाले (१८९६ ) आणि चित्रशाळेची अनेक शाखांत वाढ

झाली. तीन भाषांत निघणारें चित्रमय जगत् ( सुरुवात १९१० ), शालापत्रक, स्फूर्ति, महाराष्ट्र कृषीवल व ध्रुव अशीं मासिकें निघून तीं चाललीं आहेत.

१९०३ सालीं ताईमहाराज प्रकरणांत लो. टिळकांना शिक्षा झाली तेव्हां हे सर्कसवाले विष्णुपंत छत्रे यांच्या निमंत्रणावरून सर्कशीबरोबर चीन-जपानकडे गेले. परक्या देशांत सर्कशीची आगाऊ व्यवस्था करण्याचें काम यांनीं आपणाकडे घेतलें होतें. तिकडे सर्कशीला खूप पैसा मिळाला. चीनची डॉवेजर राणी खुशी हिनें खूष होऊन सर्कशीला तीस हजार रुपये बक्षीस दिले. तेव्हां यांनीं सर्कशींतला एक हत्ती माहुतासह राणीला नजर केला.

जपानमध्यें सर्कस आली असतां यांची व स्वामी रामतीर्थांची गांठ पडली. यांची ओळख म्हणजे स्वामींना मोठा अनुग्रह वाटला व त्यांनीं यांना आपले गुरु मानावयास सुरुवात केली. स्वामी जपानांतून अमेरिकेस गेल्यावर तेथें त्यांचीं ठिकठिकाणीं व्याख्यानें झालीं. त्यांपैकीं सहा व्याख्यानें यांनीं पुस्तकरूपानें अमेरिकेंत प्रसिद्ध केलीं आहेत. अमेरिकेंत असतां यांनीं तेथील शेतीची पाहणी केली. त्याशिवाय हिन्दी तरुणांनीं अमेरिकन लष्करांत शिरावें अशीहि यांनीं खटपट केली. तेथून आल्यावर हे आणि कृ. प्र. खाडिलकर असे दोघे कांहीं दिवस नेपाळांत जाऊन राहिले होते. यांचा शेवटचा मोठा प्रवास म्हणजे लो. टिळकांच्याबरोबर केलेली इंग्लंडची सफर होय (१९१९). शिवाय राष्ट्रसभेच्या निमित्तानें हे हिंदुस्थानचा कोपरान् कोपरा हिंडले होते.

यांनीं राष्ट्रसभेच्या राजकारणांत मनःपूर्वक भाग घेतला. मुळशी-सत्याग्रहांत व १९३२ च्या कायदेभंगांत यांना १५ दिवस व सहा महिने शिक्षा झाल्या होत्या.

हे प्रथम दहशतवादी राजकारणी होते असें म्हणतात. पण हे नेहमीं अग्रेसर असणाऱ्या जहाल राजकारणांत भाग घेत. यांची सार्वजनिक चळवळींत पुढें होऊन भाग घेण्यापेक्षां अन्तस्थ हालचाली अचूकपणें करण्याविषयीं प्रसिद्धि होती. यांचा विश्वासूक म्हणून सर्व पक्षांत प्रवेश असे आणि जगांत व हिंदुस्थानांत यांचा सर्व प्रांतांत मित्रपरिवार असे.

पहांटे तीन वाजतां उठून लांब फिरावयास जाणें, दूध, भाज्या व फळें यांवर राहणें आणि कमालीचा प्रयत्नवाद यांमुळें यांच्या दीर्घायुष्याला नमुनेदारपणा आला होता.

**जोशी, शंकर पुरुषोत्तम**—( जन्म स. १८९२–मृत्यु स. १९४३ ) मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें उत्तर भारतांत शोधणारे संशोधक.

यांचा जन्म दे. ऋ. ब्राह्मणाच्या घरीं पाली येथें झाला. वडिलांकडून ऋग्वेद वगैरेचें शिक्षण घेतल्यावर हे मॅट्रिक झाले. यांना सप्लाय खात्यांत नोकरी मिळाल्यावर फ्रान्समध्यें मार्सेलस येथें पाठविण्यांत आलें. नंतर हे मेसापोटेमियांत काम करून आले. राजपुतान्यांत जयपूर वगैरे ठिकाणीं यांनीं नोकरी केली. तिकडच्या भाषांचें ज्ञान संपादन केल्यावर इतिहास-संशोधनाकडे यांचें लक्ष वेधलें ( १९३० ). उत्तर भारतांतील महाराष्ट्राच्या इतिहासाचे संशोधक म्हणून हे प्रथम लोकांच्यापुढें आले. मराठ्यांच्या इतिहासाबावत एक नवी दृष्टि स्वीकारून परप्रांतांतील राजस्थानी वगैरे भाषा शिकून यांनीं लोककथा प्रसिद्ध करण्याची खटपट केली.

यांचें वाङ्मयः—१ भाऊंच्या वीरकथा (१९३३), २ शिखांचा स्फूर्तिदायक इतिहास, ३ मराठ्यांच्या सत्तेचा उत्तरेकडील विस्तार, ४ पंजाबांतील नामदेव, ५ भक्त नामदेवजी, ६ राजस्थान संघर्ष.

**जोशी, श्रीधर सर्वोत्तम**—( जन्म स. १८९८ ) सुप्रसिद्ध संशोधक व रसायनशास्त्रज्ञ.

यांचे वडील यांच्या वयाच्या चवथ्या वर्षीच (१९०१) सालीं वारले. यांचें बालवयांतील संगोपन व संवर्धन यांचे मामा वा. ल. चिपळूणकर यांचे घरींच झालें. अकोला हायस्कुलांतून १९१७ सालीं मॅट्रिक झाल्यावर पुणें येथें फर्ग्युसन कॉलेजमध्ये १९२१ सालीं हे रसायनशास्त्र घेऊन बी. एस्सी. झाले. पुढें बनारस, हिंदु विश्वविद्यालयांत जाऊन हल्लींचे सुप्रसिद्ध शास्त्रज्ञ सर डॉ. शांतिस्वरूप भाटनागर यांचे हाताखालीं संशोधनकार्य करून यांनीं एम्.एस्सी. ही पदवी मिळविली. पुढें १९२४ सालीं विलायतेस जाऊन लंडन युनिव्हर्सिटीमधील डी. एस्सी. ही पदवी घेऊन १९२८ सालीं हे परत हिंदुस्थानांत आले. रसायनशास्त्रांत लंडन, डी. एस्सी. मिळविणारे हे पहिलेच गृहस्थ होत.

प्रो. डोनन यांच्या नेतृत्वाखालीं "स्तब्ध विद्युत निसर्गाचा रासायनिक प्रक्रियांवर परिणाम" या संबंधांत संशोधन करून हिंदुस्थानांत परत आल्यावर पं. म. मो. मालवीय यांनीं यांना हिंदुविश्वविद्यालयांत भौतिक

या आचार्योची जागा दिली. तेव्हांपासून यांचें रसायनांतील संशोधन अव्याहत चालू आहे. श्री. जोगाराव, टी. एम्. मेनन, के. एस. विश्वनाथन् इत्यादि विद्यार्थी यांस मदत करीत आहेत. यांनीं एक नवीन तऱ्हेची विद्युत्-भट्टी तयार केली असून ती प्रचलित भट्टयांच्यापेक्षां कमी खर्चाची व अधिक उष्णता देणारी आहे. यांनीं प्रकाशाचा पदार्थांच्या अणुमात्रावर होणाऱ्या क्रियेसंबंधीचा नवीन शोध ( न्यू लाइट इफेक्ट ) लावला ( १९४० ). यांच्या हाताखालीं शिष्यवृत्तीनें संशोधन करणारे कोल्हापूरचे श्री. सोळंकी यांचा प्रबंध यांनीं परीक्षणाकरितां अमेरिकेंतील न्यूयॉर्क युनिव्हर्सिटीकडे धाडला (१९४३). तो प्रबंध परीक्षकांना इतका आवडला कीं, ता तपासून श्री. सोळंकी यांना डी. एस्सी. ही पदवी तर मिळालीच, पण त्याबरोबरच आदर्श प्रबंध म्हणून तो प्रबंध युनिव्हर्सिटीनें आपल्याकडे ठेवून घेतला व त्याबद्दल यांना पारितोषिक म्हणून दर वर्षी यांनीं पुरस्कृत केलेल्या दोन विद्यार्थ्यांस फी-माफी व शिष्यवृत्ति देण्यास मान्यता दिली.

**ज़ौक़**—( जन्म स. १७८९–मृत्यु स. १८५३ ) सुप्रसिद्ध उर्दू कवि.

यांचें नांव शेख मुहम्मद इब्राहीम. बापाचें नांव शेख मुहम्मद रमजान. उपनाम खाकानि, स्थळ दिल्ली. यांचे वडील शिपाई होते. त्यांनीं यांना शिकण्याकरितां गुलाम रसूल शौक यांच्याकडे पाठविलें. ते कवि होते. त्यांनीं यांना धार्मिक शिक्षणाबरोबरच फारशी भाषा व साहित्य यांचें ज्ञान दिलें. त्यांच्या सहवासानें हेहि कविता करूं लागले. त्यांनीं यांना उत्तेजन दिलें. पुढें हे शहा नसीरचे शिष्य झाले. येथून पुढें हे ज़ौक़ नांवानें प्रसिद्ध झाले. हे गज्जले करून कविसंमेलनांत गाऊं लागले व यांची वाहवा पण होऊं लागली.

दिल्लीस बादशाहा अकबरशहाचे पुत्र बहादूदुरशहा हे कवितेचे शोकी होते. ते कविता करीत व 'जफर' या नांवानें त्या कविता म्हणत. पुढें त्यांच्या कविता दुरुस्त करणारे सर्व लोक कांहीं कारणांनीं दूर गेले. तेव्हां हे त्यांचे काव्यगुरु बनले. तसेंच दिल्लीचे नबाब इलाहि बख्श 'मारूफ' या जमीनदारांचेहि गुरु बनले. यांच्या उत्तम कवितांमुळें यांना 'खाकनि ए हिन्दी' ही अत्यंत बहुमानाची पदवी मिळाली. पांच रुपये मासिक वेतनापासून चढत हे शंभर रुपये दरमहा पगार मिळवूं लागले.

यांनीं पुष्कळ कविता लिहिली, पण त्यापैकीं चांगली कविता पाहिली कीं, बादशहा ती आपल्या नांवावर घेई. त्यामुळें बरीच उत्तम कविता यांनीं राखून बाजूला ठेविली होती; पण ती नष्ट झाली.

यांची कविता उच्च विचारांनीं भरलेली आहे. यांचें भाषाप्रभुत्वहि चांगलें असे. प्रेमरहस्याचें वर्णन, तसेंच वेदान्त व ईश्वरपरायणता यांचें वर्णनहि यांच्या कवितांत आढळतें.

यांच्या शिष्यांपैकीं प्रसिद्ध उर्दू–अरबी–फारसीचे विद्वान् शम्सुलउल्मा मौलवी मुहम्मद हुसेन 'आजाद', प्रोफेसर-गव्हर्नमेंट कॉलेज व दारा हे सुप्रसिद्ध कवि होत.

## झ

**झकीर हुसेन**—( जन्म स. १८९० सुमार ) सुप्रसिद्ध शिक्षणशास्त्रज्ञ, समाजशास्त्रज्ञ, जामिया मिलिया इस्लामिया, जामियानगर या शिक्षणसंस्थेचे प्रमुख व वर्धाशिक्षण-योजना कमेटीचे अध्यक्ष.

हे एम्. ए., पीएच. डी. आहेत. १९२० सालीं असहकारितेच्या काळांत मुसलमान विद्यार्थ्यांना राष्ट्रीय शिक्षण देण्याकरितां यांनीं न्यू दिल्ली येथें 'जामिया मिलिया इस्लामिया' ही संस्था काढली आणि शिक्षणाच्या अनेक अंगांची यांनीं तेथें पद्धतशीर वाढ केली. सुमारें वीस वर्षे या संस्थेचें काम न्यू दिल्ली येथें चाललें. पण त्यानंतर सुप्रसिद्ध डॉ. अन्सारी यांनीं दिलेल्या ओखला गांवानजीकच्या पन्नास एकर जमिनींत या संस्थेचा पसारा वाढला आणि त्या वसाहतीला 'जामियानगर' हें नांव देण्यांत आलें.

या संस्थेतर्फे प्राथमिक शाळा, दुय्यम शाळा, कॉलेज, तीन लाखांचा छापखाना व ५०० पुस्तकें प्रसिद्ध केलेलें प्रकाशनखातें हीं कार्यें मोठ्या प्रमाणांत चालू आहेत. १९३८ पासून बेसिक टीचर्स ट्रेनिंग कॉलेजहि तेथें सुरू करण्यांत आलें आहे.

राष्ट्रसभेनें नेमलेल्या हिंदुस्तानी तालिमी संघाचे हे अध्यक्ष आहेत. वर्धा शिक्षण-योजना यांच्याच नेतृत्वाखालीं तयार झाली. म. गांधींच्या सर्वांगीण तत्त्वज्ञानाचा यांच्यावर विशेष पगडा बसला आहे. हे अत्यंत संघटनाचतुर असून यांची राहणी अगदीं साधी आहे. गेल्या पंचवीस वर्षांत यांना एकहि सहकारी गमावण्याचा प्रसंग आला नाहीं.

ऑक्टो. २९ ते नवं. १. १९३९ या दिवशीं पुण्यास अखिल भारतीय वर्धा राष्ट्रीय शिक्षण परिषदेचें पहिलें अधिवेशन झालें. वर्धा शिक्षण-योजना या नांवानें सध्यां प्रसिद्ध असणारी योजना हरिजन पत्रांतून म. गांधीं यांनीं प्रथम राष्ट्रापुढें मांडली (जुलै १९३७). त्या वेळीं राष्ट्रसभेनें मंत्रिपदाचा स्वीकार केला होता. त्याच वर्षीच्या ऑक्टोबर महिन्यांत वर्धा येथें गांधीजींच्या अध्यक्षतेखालीं या योजनेचा विचार करण्याकरितां शिक्षणशास्त्री आणि शिक्षणमंत्री यांची परिषद भरून या योजनेचा सविस्तर अभ्यासक्रम तयार करण्यासाठीं यांच्या अध्यक्षतेखालीं कमिटी नेमली गेली. राष्ट्रसभेच्या १९३८ च्या हरिपुरा अधिवेशनांत या योजनेला मान्यता मिळाली आणि तिच्या ठरावाप्रमाणें एप्रिल १९३८ मध्यें 'हिंदुस्तानी तालिमी संघ' निर्माण झाला व वर्धा येथील विद्यामंदिर ट्रेनिंगस्कूलमध्यें नव्या योजनेच्या प्रयोगाला प्रारंभ झाला. आज दोन हजारांवर वर्धा-पद्धतीच्या शाळा हिंदुस्तानांत निर्माण करण्यांत आल्या असून कोणत्या तरी उत्पादक धंद्याच्या द्वारा बालकांना शिक्षण देण्याचा प्रयोग चालला आहे. या शाळांना शिक्षक पुरविण्यासाठीं एकूण १४ अध्यापककेन्द्रें देशांत काम करीत आहेत. मुंबई प्रान्तांतहि वर्धा-शाळा व अध्यापनकेन्द्रें चालू आहेत. हिंदुस्थान सरकारच्या मध्यवर्ति शिक्षण-समितीनें वर्धा-योजनेचा स्वीकार केला आहे.

हिंदुस्थानी तालिमी संघातर्फे पहिली परिषद् पुण्यास भरली. तेथें वेगवेगळ्या प्रान्तांतून ११० प्रतिनिधि आले होते. अध्यक्षस्थान काश्मीरचे शिक्षणाधिकारी आणि वरील संघाचे सभासद प्रो. ख्वाजा गुलाम सय्यदैन यांनीं स्वीकारलें होतें.

केवळ पुस्तकी ज्ञान किंवा केवळ उद्योगाचें शिक्षण न देतां एखादा उद्योग शिक्षणाचें द्वार म्हणून स्वीकारावयाचा आणि त्याद्वारा ज्ञान, उपजीविका आणि शिक्षणाचा खर्च हे तीनहि हेतु सिद्धीस न्यावयाचे, हा वर्धा शिक्षण-योजनेचा पाया आहे.

हे अनेक वेळां युरोपांत जाऊन आले. यांचीं पुस्तकें फार प्रसिद्ध आहेत.

**झळकीकर, महामहोपाध्याय भीमाचार्य**—(मृत्यु स. १९०६ मे १०) महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध संस्कृत पंडित.

हे पुण्याच्या डेक्कन कॉलेजांत व मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजांत संस्कृत शिकवीत. संमतिवयाच्या बिलाला यांनीं विरोध केला. पंचहौद चहा प्रकरणांतील ग्रामण्याच्या वेळीं ब्राह्मणेतरांच्या हातचें अन्नपाणी घेणारास लागू पडणारीं प्रायश्चित्ताचीं वचनें यांनीं केसरींत प्रसिद्ध केलीं. त्यांत पेज, दूध, चणे, चुरमुरे वगैरे भट्टींत भाजलेले पदार्थ शूद्राच्याहि हातचे चालतात, असें यांनीं स्पष्ट केलें होतें.

यांचे ग्रंथ—१ न्यायकोश: (संस्कृत), २ न्यायमुक्तावलीचें मराठी भाषान्तर.

**झंडुभट्ट शंकरप्रसाद**—(जन्म स. १८६२–मृत्यु स. १९४०) मुंबईतील देशी औषधांचे पहिल्या प्रतीचे कारखानदार व वैद्य.

मुंबईच्या एल्फिन्स्टनरोडवरील झंडु फार्म्यास्यूटिकल वर्क्स लि.चा प्रचंड कारखाना आणि जामनगरचा व्याप पाहिल्यानंतर यांच्या कर्तृत्वाची कल्पना येते. वडिलांच्या वेळीं कर्जांत असणारा व्यवसाय कर्जमुक्त करून पांचहि भावांना सारखे हिस्से देणाऱ्या या माणसांत कर्तृत्वाबरोबर औदार्याचाहि भाग स्पष्ट दिसतो. कारखान्याचे कामाव्यतिरिक्त यांनीं साठ वर्षें वैद्यकी केली; पण वैद्यकीच्या निमित्तानें कोणाकडून एक पैसाहि घेतला नाहीं हें विशेष आहे. पैसे न घेणाऱ्या यांना रात्रीं-अपरात्रीं बोलावण्यास संकोच मानणाऱ्या रोग्याकडे हे आपणहूनच जात आणि उपचार करीत.

**झा, डॉ. गंगानाथ**—(जन्म स. १८७१–मृत्यु स. १९४१) बिहार प्रांतांतील सुप्रसिद्ध प्राच्यविद्याशास्त्रज्ञ व अलाहाबाद युनिव्हर्सिटीचे माजी उपकुलगुरु.

बनारसच्या क्वीन्स कॉलेजमधून एम्. ए. झाल्यानंतर

दरभंगा संस्थानच्या लायब्ररीचे व्यवस्थापक म्हणून यांची नेमणूक झाली (१८९३). हिंदुस्थानांतील नामांकित ग्रंथसंग्रह अशी प्रसिद्धि त्या लायब्ररीला मिळवून दिल्यानंतर हे अलाहाबादच्या सेंट मूर कॉलेजमध्यें संस्कृतचे प्रोफेसर म्हणून दाखल झाले (१९०२). त्या कॉलेजचे त्या वेळचे प्रिन्सिपल डॉ. थिबो यांच्या प्रेरणेनें यांचा तेथें सारखा उत्कर्ष होत गेला व हे प्रॉव्हिन्शियल एज्युकेशनल सर्व्हिसमध्यें शिरले. याच सुमारास अलाहाबाद युनिव्हर्सिटीशीं यांचा संबंध आला व हे त्या संस्थेचे फेलो (१९०५), सिंडिकेटचे सभासद (१९१०) व शेवटीं व्हाइस-चॅन्सेलर (१९२३–३२) बनले. मध्यंतरीं कांहीं दिवस बनारसच्या संस्कृत कॉलेजचे प्रिन्सिपल म्हणून यांची नेमणूक झाली होती (१९१८).

संस्कृत भाषा, हिंदु कायदा व तत्त्वज्ञान यांचे पंडित म्हणून यांची सर्वत्र प्रसिद्धि असे. दरभंगा लायब्ररीचे व्यवस्थापक असतांनाच हिंदु कायदा व तत्त्वज्ञान यांचा खोल अभ्यास करण्याची संधि यांना मिळाली व त्या विषयांवरील कांहीं ग्रंथांचें इंग्रजी भाषांतरहि यांनीं केलें. परंतु यांचें ग्रंथकार म्हणून नांव 'Philosophical Discipline' या कलकत्त्याला दिलेल्या 'कमला लेक्चर्स'च्या प्रसिद्धीनें लोकांच्या डोळ्यांसमोर आलें (१९२६) व त्यानंतर यांच्या मीमांसासूत्रांच्या भाषांतराला तर मुंबई युनिव्हर्सिटीनें कॅम्बेल सुवर्णपदक दिलें. बडोद्याला Shankaracharya and His Work for the Uplift of the Country या विषयावर व दरभंग्याला 'Vedant Philosophy' वर यांनीं दिलेल्या व्याख्यानांचाहि असाच गौरव झाला असून तीं पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्यांत आलीं आहेत. याशिवाय Hindu Law in its Sources, Shankara Vedanta in its Sources व Purva-Mimamsa in its Sources हे यांचे ग्रंथहि असेच प्रसिद्ध आहेत.

या टीकात्मक वाङ्मयाबरोबरच यांचें भाषांतरित वाङ्मयहि असेंच प्रसिद्ध आहे. एस्. सीतारामशास्त्री यांच्या सहकार्यानें यांनीं अनुवादिलेल्या ईश, केन, कठ वगैरे आठ उपनिषदांचें व त्यावरील शांकरभाष्याचें भाषांतर पांच भागांत मद्रासच्या नटेसन कंपनीनें, प्रसिद्ध केलें आहे. यांच्या या भाषांतराइतकीच त्यांच्या छपाईतील सुबकपणाची त्या वेळीं प्रशंसा झाली होती.

वर उल्लेखलेलें भाषांतरित व टीकात्मक वाङ्मयच यांनीं इतक्या सफाईनें उत्पन्न केलें कीं, यांच्या स्वतंत्र वाङ्मयाचा अभाव लक्षांत न घेतां लोकांनीं व सरकारनें यांच्यावर पदव्यांचा वर्षाव केला. हे रॉयल एशियॅटिक सोसायटी लंडन व ब्रिटिश ॲकेडमीचे सभासद होते. सरकारनें यांना महामहोपाध्याय व सर (१९४१) या पदव्या देऊन गौरविलें होतें.

यांच्या षष्ठ्यब्दिपूर्तीनिमित्त यांचे शिष्य व चहाते यांनीं यांना एक गौरवग्रंथ सादर केला. प्राच्यविद्या-विषयक निबंधांचा हा संग्रह असून डॉ. कीथ, डॉ. विंटरनिट्झ, डॉ. नौ, डॉ. ऑटो स्ट्रॉस वगैरे अनेक पाश्चिमात्य अभ्यासकांनीं यांत लेख लिहिले होते.

यांच्या मृत्यूनंतर यांचें स्मारक म्हणून 'डॉ. गंगानाथ झा रिसर्च इन्स्टिट्यूट'चें उद्‌घाटन पंडित मदनमोहन मालवीय यांच्या हस्तें करण्यांत आलें. ५००० पुस्तकें असणारी एक मोठी लायब्ररी या संस्थेच्या मालकीची असून या संस्थेनें The Journal of the Ganganath Jha Research Institute सुरू केलें आहे (१९४३).

अलाहाबाद युनिव्हर्सिटीचे उपकुलगुरु व सुप्रसिद्ध शिक्षणशास्त्रज्ञ अमरनाथ झा हे यांचे चिरंजीव होत.

## ट

**टक्सन, प्रा. मोहनलाल**—(जन्म स. १८८५) हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध अर्थशास्त्रविशारद.

इंग्लंडहून बॅरिस्टर होऊन परत आल्यानंतर हे मुंबईच्या सिडनहॅम कॉलेजमध्यें प्रथम बँकिंगचे प्राध्यापक व नंतर त्या कॉलेजचे प्रिन्सिपल झाले (१९२०–३७). त्यानंतर कांहीं दिवस हे लाहोरच्या पंजाब नॅशनल बँकेचे व्यवस्थापक होते.

० इंडियन एज्युकेशनल सर्व्हिसमधील गृहस्थाची गव्हर्मेंट

कॉलेजमध्यें नेमणूक होणें ज्या काळीं अतिशय कठीण गोष्ट समजली जाई त्या काळीं हे सिडनहॅम कॉलेजचे प्रिन्सिपल नेमले गेले. अगदीं अलीकडेपर्यंत व्यापार व अर्थशास्त्राचें शिक्षण देणारें असें हिंदुस्थांतील तें एकमेव कॉलेज होतें. त्यामुळें हिंदुस्थानांतील व्यापारी शिक्षण-क्षेत्रांत त्या कॉलेजास व जवळजवळ दीड तप मुदतींपर्यंत यशस्वी रीतीनें तें चालविणाऱ्या यांना विशेष महत्त्व आहे.

इंडियन अकाउंटन्सी बोर्डाचे सेक्रेटरी व कॉमर्स डिपार्टमेंटचे अंडर-सेक्रेटरी या नात्यांनीं हे हिंदुस्थान-सरकारच्या व्यापारी खात्याचे शिष्टमंडळावर होते (१९३२–३५). हॅम्बुर्ग (जर्मनी) ला भरलेल्या इंटरनॅशनल को-ऑपरेटिव्ह कॉन्फरन्सलाहि हे हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून हजर होते.

या यांच्या अर्थशास्त्रांतील कामगिरीचा गौरव करण्यासाठीं कलकत्त्याला भरलेल्या इंडियन इकॉनमिक कॉन्फरन्सचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें (१९२७). इंडियन एक्श्चेंज अँड बँकिंग हा यांच्या अध्यक्षीय भाषणाचा विषय होता.

'Banking Law and Practice in India', 'Indian Currency and Banking Problems', 'Indian Currency and War', 'Banking Needs of India', 'Regulation of Banks in India', इत्यादि यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

**टर्नर, जॉर्ज**—(जन्म स. १७९९–मृत्यु स. १८४३) सिलोनमधील सुप्रसिद्ध प्राच्यविद्यासंशोधक व पाली भाषेचे पंडित.

यांचा जन्म जरी सिलोनमध्यें झाला असला तरी यांचें सर्व शिक्षण इंग्लंडमध्यें पार पडलें. यानंतर हे सिलोनमध्यें आले व यांनीं सिव्हिल सर्व्हिसमध्यें काम करण्यास सुरुवात केली. अधिकारी या नात्यानें जनतेशीं तादात्म्य पावावयाचें असेल तर त्यांच्या भाषेशीं आपण एकरूप झालें पाहिजे या श्रद्धेनें यांनीं सिंहली व नंतर पाली भाषा यांचें अध्ययन करण्यास सुरुवात केली व एका नव्या जगांत शिरल्याचा भास यांना होऊं लागला.

विशेषतः पाली भाषेंतील 'महावंश' या पद्यमय इतिहास ग्रंथाचें अध्ययन करीत असतां इसवी सनाच्या पूर्वीच्या सिलोनच्या व तदनुषंगिक हिंदुस्थानच्या इतिहासासंबंधीं त्या ग्रंथांतील उल्लेख पाहून इंग्रजींत त्याचा अनुवाद करण्याची कल्पना यांना सुचली. याच सुमारास यांना या ग्रंथावरील एक जुनी टीका मिळाल्यानें यांचें काम विशेष सुलभ झालें व १८३७ त पहिल्या सदतीस प्रकरणांचा (इ. स. पू. ५४३–इ. स. ३०४) अनुवाद यांनीं प्रसिद्ध केला.

यांच्या अपेक्षेप्रमाणें खरोखरच या ग्रंथाचे प्रसिद्धीनें सर्व पाश्चात्य अभ्यासकांत खळबळ उडवून दिली. चंद्रगुप्त मौर्य व महावंशांतील संद्रकोट्स यांमध्यें अतिशय साम्य असल्याचें पुढें उघडकीस आलें व चंद्रगुप्तासंबंधीं इतके दिवस बसवलेलीं प्रमेयें खोटीं ठरण्याची वेळ आली. त्याप्रमाणेच बौद्ध राजा अशोक हाच अशोकांच्या शिलालेखांचा उत्पादक आहे ही गोष्टहि या अनुवादानें सिद्ध करून दिली. पुढें पुढें तर या मूळ ग्रंथाबद्दलची अभ्यासकांची उत्सुकता इतकी पराकोटिला गेली कीं रोमन लिपींत तो ग्रंथ यांना प्रसिद्ध करणें भाग पडलें. तिबेट व नेपाळ येथें बौद्ध ग्रंथाचें संशोधन करणाऱ्या लोकांनीं या ग्रंथाची मदत घेतल्यानें तर यांच्या या संशोधनाचें महत्त्व फारच वाढलें.

परंतु याबरोबरच सिलोनच्या इतिहासांतील राजांच्या कारकीर्दी व महत्त्वाचे सन संशोधण्याची जरुरी यांना भासूं लागली व त्यासाठीं यांनीं आपला An Epitome of the History of Ceylon हा ग्रंथ प्रसिद्ध केला. आज शंभर वर्षांच्या कालावधीनंतरहि त्यांत प्रस्थापित केलेले सिद्धान्त कोणाला खोडून काढतां आले नाहींत ही एकच गोष्ट यांच्या बिनचूकपणाची साक्ष देण्यास समर्थ आहे. बौद्ध इतिहास व हिंदी कालगणना या विषयांवर जर्नल ऑफ दि बंगाल रॉयल एशियॅटिक सोसायटींत यांनीं केलेलें स्फुट लिखाणहि असेंच महत्त्वाचें आहे.

हिंदुस्थानचें सांस्कृतिक मूल्य कमी ठरविण्याचे हेतूनें संस्कृत व पाली भाषेंतील ग्रंथांना भाकडकथांपेक्षां अधिक किंमत नाहीं असें ठरविण्याचा घाट पाश्चात्य विद्वानांनीं एकोणिसाव्या शतकाच्या सुरवातीला घातला. अशा वेळीं अनेक दोषारोप पत्करूनहि या सिद्धान्ताचा फोलपणा पटवून देण्यांत यांनीं दाखविलेली ज्ञानाविषयींची कळकळ निश्चित स्पृहणीय आहे.

**टंडन, पुरुषोत्तमदास**—(जन्म स. १८८५ सुमार) राष्ट्रीय सभेचे संयुक्त प्रांतांतील सुप्रसिद्ध पुढारी, हिंदी भाषेचे एकनिष्ठ पुरस्कर्ते व स्वतंत्र बुद्धीचे कार्यकर्ते.

राष्ट्रसभेच्या प्रमुख कार्यकर्त्यांत अग्रभागीं राहूनहि ज्यांनीं आपलें व्यक्तित्व अबाधित राखलें आहे अशा पुढाऱ्यांत या वयोवृद्ध गृहस्थाची गणना होते. १९२१ सालापासून जातीय प्रश्नाच्या बाबत म. गांधींच्या नेतृत्वाखालीं राष्ट्रसभेनें स्वीकारलेलें शरणागतीचें धोरण पसंत नसल्याचें यांनीं व्यक्त केलें आहे. राजाजीकरार, भुलाभाई–लियाकत–योजना यांना पाठिंबा देण्यांत म. गांधींनीं मोठी चूक केल्याचें यांनीं जाहीर केलें. तसेंच 'वर्किंग कमेटी तुरुंगांत असतांना राष्ट्रसभेच्या नांवावर लीगशीं वाटाघाटी करण्यांत आल्याची आपल्याला शरम वाटते,' 'जिनांच्या घरीं जाऊन वाटाघाटी करण्यांत राष्ट्रसभेचा अपमान झाला आहे' असेहि यांनीं उद्गार काढले.

हिंदी भाषेचे ज्वलत् अभिमानी अशी यांची सुरुवातीपासूनच ख्याति आहे. १९२५ सालच्या कानपूरच्या राष्ट्रसभेंत यांनीं राष्ट्रसभेचें काम हिंदींत चालावें असा ठराव मान्य करून घेतला. तेव्हांपासून आजतागायत यांनीं या कार्यास आपलें तन, मन, धन, अर्पण केलें आहे. हिंदी ही राष्ट्रभाषा व देवनागरी ही राष्ट्रलिपि हा प्रचार हेंच यांच्या आयुष्याचें ध्येय बनलें आहे. या बाबतींत म. गांधींना विरोध करण्यांतहि हे मागें हटले नाहींत. हिंदी साहित्य संमेलनांत राष्ट्रभाषेच्या नांवावर उर्दुभाषा व फारसी लिपि याबाबत गांधीजींचा पक्षपात दिसून येतांच यांनीं त्यास कडक विरोध केला व म. गांधींना हिंदी साहित्यसंमेलनांतून बाहेर पडावें लागलें.

१९३० सालीं हे अलाहाबाद जिल्हा कॉंग्रेस कमेटीचे अध्यक्ष होते. त्या वेळीं दुःखानें गांजलेल्या शेतकऱ्यांना यांनीं सारा न देण्याचा सल्ला दिला. त्या वेळेपासून संयुक्त प्रांतांतील पुढारी म्हणून हे सर्वत्र प्रसिद्ध झाले व १९३९ च्या कॉंग्रेस मंत्रिमंडळाचे वेळीं तर यांना संयुक्त प्रांत असेंब्लीचे अध्यक्ष नेमण्यांत आलें.

अध्यक्ष पक्षातीत असावा असा संकेत असल्यामुळें यांनीं राष्ट्रीय सभेचा राजीनामा द्यावा किंवा अध्यक्षपदाचा तरी राजीनामा द्यावा असा प्रश्न उपस्थित झाला असतां यांनीं अध्यक्षपदाचा राजीनामा देण्याचें ठरविलें; पण राष्ट्रीय सभेकडून या नियमास यांचा अपवाद करण्यांत आला व यांना दोन्हींकडे राहण्याची परवानगी देण्यांत आली. यापूर्वी विठ्ठलभाई पटेल यांनीं दिल्ली कौन्सिलाच्या अध्यक्षपदाकरितां राष्ट्रीय सभेचा राजीनामा दिला होता.

**टागोर, अवनींद्रनाथ**— (जन्म स. १८७१) सुप्रसिद्ध बंगाली चित्रकार. जगप्रसिद्ध बंगाली कवि रवींद्रनाथ टागोर यांचे हे चुलते. त्यांच्याप्रमाणेंच हे अभिजात चित्रकार आहेत. यांनीं कॉलेजमध्यें वगैरे कोठेंहि चित्रकलेचें शिक्षण घेतलेलें नाहीं.

संगीत, लेखन आणि चित्रकला हे यांचे आवडीचे विषय. वयाच्या एकोणतिसाव्या वर्षापर्यंत यांनीं केवळ संगीताचें शिक्षण घेतलें. नंतर पाश्चिमात्य शिक्षणकलेच्या अभ्यासास यांनीं सुरुवात केली. तें शिक्षण घेत असतां यांनीं अन्तःस्फूर्तीनें आपल्या कल्पनेला जमेल अशा पौर्वात्य चित्रकलेकडे लक्ष देण्यास सुरुवात केली. याबाबत विचार व अभ्यास करण्यास यांना प्रि. हॅवेल यांचेंच विशेष साहाय्य झालें. तथापि हे मि. पामर व इटालियन चित्रकार सिनॉर गिलार्डी यांना आपल्या चित्रकलेचे गुरु मानतात. त्यांचेकडून यांनीं पाश्चिमात्य चित्रकलेचीं तत्त्वें समजून घेतलीं पण स्वत्व राखिलें. यांचें म्हणणें असें आहे कीं, जेवढें चर्मचक्षूंस दिसतें तेवढेंच चितरणें ही कला नसून त्यांतील रहस्य विशद करणें ही कला आहे. येवढ्याकरितां चितकाराला दिव्य दृष्टि असावी लागते.

प्रथम यांची दृष्टि मोंगल चित्रकलेकडे वळली. स. १९०१ सालीं दिल्लीच्या चित्रकला प्रदर्शनांत रौप्यपदक मिळालेलें यांचें चित्र 'ताजमहाल' हें सर्व जगांत वाखाणलें गेलें. तें चित्र पाहून प्रेक्षक शोकाकुल होतो, हें त्या चित्राचें वैशिष्ट्य आहे. पण पुढें यांनीं मोगली वळण सोडून स्वतंत्र रीतीनें अनेक चित्रें काढलीं. त्यांत बुद्ध चरित्रावरील कांहीं चित्रें फारच सुंदर वठलेली आहेत. 'महाभिनिष्क्रमण' व 'सागरकन्यका' हीं तेव्हांचीं यांचीं चित्रें फार प्रसिद्धी पावलीं.

यानंतर अजिण्ठा व रजपूत चित्रकलेची छाप यांच्यावर बसली. परंतु ओकाकुरांसारखे जपानी चित्रकार यांच्याकडे येऊन वारंवार पाहुणे म्हणून राहूं लागतांच यांच्या चित्रावर जपानी छाया पडूं लागली. 'चांदण्यांतील वाद्यवादन' व 'राणी' हीं यांचीं चित्रें या दृष्टीनें पाहण्यासारखीं आहेत. यांचे प्रसिद्ध शिष्य पुढील होत.

१ सुरेंद्रनाथ गांगुली, २ नंदलाल बोस, ३ असितकुमार हलधर, ४ समरेंद्रनाथ गुप्त, ५ के. वेंकटप्पा, ६ हकीम अहमदखान, ७ ईश्वरीप्रसाद वर्मा (साहाय्यक).

बनारस घाट, जगन्नाथपुरीच्या देवालयांत हीं व इतर अनेक सुंदर निसर्गरमणीय दृश्यें रेखाटणारे गगनेंद्रनाथ टागोर हे यांचे थोरले बंधु होत.

**टागोर, महर्षि देवेन्द्रनाथ**—(जन्म स. १८१७-मृत्यु स. १९०५) आदिब्राह्मो समाजांतील राममोहन राय यांचेनंतरचे एक प्रमुख आदर्श, सदाचारी, नीतिमत्तेचे पुरस्कर्ते, बंगाली भाषेंतील सुप्रसिद्ध कवि व लेखक. यांच्या पित्याचें नांव द्वारकानाथ.

या ब्राह्मण जातींतील कोट्यधिशाच्या मुलाचें बालपण आपल्या धार्मिक प्रवृत्तीच्या आजीच्या सहवासांत गेलें. सिद्धेश्वरी कालीमातेचें दर्शन घेण्याचा यांचा नेम तेव्हां कधींच चुकत नसे. यांचें शिक्षण हिंदु कॉलेजांत झालें. त्या ठिकाणीं अज्ञेयवादाचा पगडा यांच्यावर बसला. या सुमारास यांच्या आजीनें गंगेच्या किनारीं हरिस्मरण करीत देह ठेवला. तेव्हां तर यांच्या जिज्ञासेला चालनाच मिळाली. ज्ञानाशिवाय सर्व व्यर्थ आहे असें यांना वाटून हे अगदीं अस्वस्थ बनले. आणि आपले आश्रित पंडित श्यामचरण यांच्याकडून यांनीं उपनिषदादि संस्कृत ग्रंथांचें अध्ययन केलें. ब्राह्मधर्माचें विधिविधान व स्तोत्रपाठहि यांनीं याच वेळीं ठरवून घेतले.

यांनीं आपल्या इष्टमित्रांच्या सहकार्यानें 'तत्त्वरंजिनी सभा' स्थापन केली (१८३९). तिचेंच नांव पुढें तत्त्वबोधिनी असें करण्यांत आलें. उपनिषदांतील ज्ञानाचा प्रसार व धर्मजिज्ञासा वाढवावी अशा हेतूनें तेथें मासिक व साप्ताहिक सभा भरत. तेथें पंडित रामचंद्र विद्यावागीश यांचीं प्रवचनें होत. स्थापन झाल्यापासून दोन वर्षांच्या आंत त्या संस्थेकडे सर्वांचें लक्ष वेधून पांचशेंपेक्षां अधिक मोठमोठाले लोक तिचे सभासद झाले. याशिवाय यांनीं वेदपाठशाळा सुरू केली. पुढें यांनीं ब्राह्मो समाजाच्या कामांत लक्ष घालण्याचें ठरवून हे त्याचे सभासद झाले (स. १८४३).

या वेळीं ब्राह्मो समाजांत विशेष शिस्त नव्हती. अवतार मानणें, शूद्रांच्यासमोर वेदपाठ करण्यास ब्राह्ममंदिरांत मनाई असणें, मूर्तिपूजा वगैरे प्रकार चालत. यांनीं 'मी रोज भोजनापूर्वी गायत्री मंत्रानें ब्रह्मोपासना करीन, मूर्तिपूजा करणार नाहीं, समाजास वर्गणी देईन, आणि राजा राममोहन राय यांनीं उपदेशिलेल्या तत्त्वांप्रमाणें धर्माचरण करीन' अशा प्रतिज्ञालेखावर आचार्यांसमोर सही करून दीक्षा घेण्याचा विधि सुरू केला. या वेळीं तरी शिखासूत्राचा त्याग करावा लागे. गायत्रीमंत्राबद्दल पुढें दुसरे मंत्र घेण्यांत आले. प्रतिवर्षी घरांत होणाऱ्या दुर्गापूजेच्या वेळीं यांनीं बाहेर प्रवासाला जावयाचा परिपाठ ठेवला आणि घरच्या लोकांना न दुखवितां दुर्गापूजेंत भाग घेण्याचें टाळलें.

ब्राह्मसमाजाच्या शाखा काढण्याचा यांचेमुळें प्रयत्न होऊं लागला. नियमित ईश्वरोपासना, दीक्षाविधि व ब्राह्मधर्मग्रंथ या तीन महत्त्वाच्या सुधारणा राममोहनांच्या नंतर यांनीं घडवून आणल्या (१८५०).

स. १८४५ च्या उन्हाळ्यांत मिशनऱ्यांचे पुढारी अलेक्झांडर डफ यांनीं सुरू केलेल्या बाटवाबाटवीच्या प्रकाराची झळ यांच्या घराला लागली: डफना राममोहन राय यांनीं उत्तेजन देऊन मदत केली होती; पण त्यांनीं आपलें कार्य प्रत्यक्ष सुरू करतांच यांच्यासारख्या साधुवृत्तीच्या व उदार गृहस्थासहि त्वेष आला. ब्राह्म व सनातनी हे सर्वच एक होऊन असा प्रकार पुनः होऊं नये म्हणून खळबळ होऊन उपाय योजण्यांत आले. बरीच मोठी रक्कम गोळा करून हिंदुहितार्थिविद्यालय नांवाची संस्था स्थापण्यांत आली.

या वेळीं परस्परांवर जी टीकेची झोड उठली तींत मिशनरींकडून वेदांची निंदा होतांच वेदांची तरफदारी करण्याचें काम यांच्यातर्फे राजनारायण बोस हे तत्त्वबोधिनी पत्रिकेंतून करीत होते. पण वेदांच्या त्रिकालाबाधितत्वावर आपसांत यांच्यांतच मतभेद सुरू झाला. तेव्हां यांनीं चार विद्यार्थी काशीस वेद शिकण्यास पाठविले व स्वतःहि एकदां काशीस त्याच्या निर्णयार्थ गेले. पण वेद हे अपौरुषेय व प्रमादातीत असल्याचें ठरेना (१८४७). उपनिषदांतील अद्वैतवादहि यांच्या पूज्यपूजक भावास विरोधक ठरल्यानें हे आत्मप्रचीतीच्या शुद्ध बुद्धिवादी सिद्धान्तावर आले. तथापि यांचा ओढा वेदादि ग्रंथांकडेच असे.

यांचे वडील उदार व खर्चिक असल्यानें त्यांना एक कोट रुपये कर्ज होतें. त्या कर्जाचा त्रास मुलांना होऊं नये म्हणून त्यांनीं आपली मिळकत मुलांचे नांवें ट्रस्ट करून सावकाराच्या तगाद्यापासून निर्बंध करून ठेवली होती. पण सावकारास अशा प्रकारें बुडविणें यांना पसंत नव्हतें. यांनीं आपल्या मिळकतीची यादी करून तिचा लिलांव करून कर्जफेडीकरितां कोर्टांत दाखल केली. चुलता महाराजा रामनाथ व घरची मंडळी यांच्या विरोध व आकांतामुळें हे या निश्चयापासून ढळले नाहींत.

कोणाच्या धनाचा अपहार करूं नये या ईशोपनिषदांतील शिकवणीचा यांच्यावर इतका परिणाम झाला होता. शेवटीं सावकारांनींच या शीलसंपन्न घराण्याची मिळकत न विकतां हप्तेबंदीनें आपल्या रकमा परत घेतल्या. यांनीं मात्र आपल्या वडिलांचेंच कर्ज काय, पण धर्मार्थ कबूल केलेल्या देणग्याहि दिल्या. कांहीं देणग्यांची रक्कम देण्यास उशीर झाला तेव्हां यांनीं त्या व्याजासुद्धां दिल्या.

वडिलांचें वर्षश्राद्ध करतांना ब्राह्मधर्माविरुद्ध शालिग्रामाची पूजा वगैरे करावी लागेल म्हणून लोकांचा बहिष्कार पत्करून तें कृत्य करण्याचें काम यांनीं आपला धाकटा बंधु गिरीन्द्र यावर सोंपविलें. अशा प्रकारें प्रत्येक परीक्षेच्या वेळीं आपल्या निष्ठेला धक्का न लावतां हे उत्तीर्ण होत गेले आणि आपणाकडे अनुयायांचें व इतरांचें लक्ष यांनीं वेधून घेतलें.

ब्राह्मधर्माची व्यवस्थित मांडणी करण्याची कामगिरी यांच्याकडे आली. उपनिषदादि ग्रंथ यांच्या तत्त्वज्ञानाला पूर्णपणें पटण्यासारखे नव्हते म्हणून यांनीं ईश्वरी कृपेनें स्फुरलेलीं उपनिषदांतील कांहीं वाक्यें ब्राह्मधर्म म्हणून तीन तासांत सांगून लिहविलीं (१८४८). ही ईश्वरी प्रेरणा होती असें हे मानीत. अद्वैत, अवतार व माया यांना ब्राह्मधर्मांत स्थान नव्हतें. मनुस्मृति वगैरे ग्रंथांच्या आधारें यांनीं नीतिधर्माचाहि एक भाग त्यास जोडला. पण अशा प्रकारें तपशीलाच्या बाबतींत हे निश्चिती करूं लागतांच यांचें तत्त्वज्ञान व आचार अशा दोन्हीला विरोधहि भरपूर होऊं लागला. परधर्मीय व स्वकीय यांच्या जोरकस हल्ल्यास उत्तर देण्याच्या बाबत यांचें थोर व्यक्तिमत्त्वच यांना फार उपयोगी पडलें. यांच्यानंतर केशवचंद्र सेन हे उदयास आले.

यांच्या आयुष्याचा पूर्वार्ध उलटल्यावर वानप्रस्थाश्रमाकरितां हे जागा शोधीत असतां कलकत्त्याच्या उत्तरेस बोलपूर नांवाच्या खेड्याजवळच सप्तपर्णीचीं दोनच झाडें असलेला एक उंचवटा यांना आढळला. तेथें ध्यानस्थ बसले असतां यांना शांति लाभली, म्हणून त्या जागेला शांतिनिकेतन असें नांव यांनीं दिलें. तेथें यांनीं आपल्या आयुष्याचा उत्तरार्ध म्हणजे सुमारें चाळीस वर्षे काढलीं.

आज शांतिनिकेतनामध्यें यांचें स्वतंत्र स्मारक म्हणून कांहीं उभारलेलें नसलें तरी एक संगमरवरी चबुतरा बांधला असून त्याच्यामागें 'तिनि आमार प्राणेर आराम, मनेर आराम, आत्मार शान्ति' वगैरे यांचीं आवडत वचनें कोरलीं आहेत. तसेंच एका फांदीवर 'करतां नामगान' अशीं अक्षरें खोदलीं आहेत.

यांचे थोरले चिरंजीव द्विजेंद्रनाथ हे बंगाली भाषेंतील सुप्रसिद्ध कवि असून स्वप्नप्रयाण, ब्राह्मधर्म (यांच्या ग्रंथांचा पद्यमय अनुवाद), मेघदूत व गुम्फआक्रमण इत्यादि त्यांचे काव्यग्रंथ प्रसिद्ध आहेत. यांचे दुसरे चिरंजीव सत्येंद्रनाथ हे आय. सी. एस. असून त्यांनी बंगालीमध्यें तुकारामाचा गाथा, यांच्या आत्मचरित्राचें भाषांतर व ब्राह्मगीतें प्रसिद्ध केलीं आहेत. यांचे तृतीय चिरंजीव रवींद्रनाथ.

यांचें वाङ्मय—१ ब्राह्मधर्म (पूर्वार्ध-ईश्वरगुणवर्णन उत्तरार्ध–नैतिक तत्त्वें १८७०), २ ब्राह्मकरार, ३ आत्मचरित्र, ४ मासिक–तत्त्वबोधिनीपत्रिका.

**टागोर, रवींद्रनाथ**— (जन्म स. १८६१ मे ६-मृत्यु स. १९४१ ऑगस्ट ७) जगप्रसिद्ध हिंदी कवि आणि एका अभिनव तत्त्वज्ञानाचे पुरस्कर्ते. आधुनिक कालांत जागतिक प्रसिद्धि मिळविणाऱ्या भारतीय व्यक्तींत यांच्याबरोबर फक्त म. गांधींचें नांव सांगतां येईल प्राचीन ऋषींची उज्ज्वल परंपरा आणि आधुनिक जगांतील नावीन्य यांचा मनोहर संगम यांच्यांत आढळे.

यांचें घराणें मूळ वंद्योपाध्याय नांवानें प्रसिद्ध असणाऱ्या बंगाली ब्राह्मणाचें. हेंच नांव इंग्रजी उच्चारामुळें बानर्जी या नांवानें सध्यां प्रसिद्ध आहे. हे बंगाल्यांतील फार जुनें घराणें असून इसवी सनाच्या आठव्या शतकांत यांचें पश्चिम बंगाल्यांत वास्तव्य झालें. ठाकूर या नांवानें हें सतराव्या शतकांत ओळखलें जाऊं लागलें. ऐतिहासिक कालांत यांचें घराणें मुसलमानांबरोबर जेवलें म्हणून तें इतर ब्राह्मणांनीं बहिष्कृत केलें. तेव्हांपासून यांचें घराणें 'पिरिलिज' (Pirilis) या हीनतादर्शक नांवानें संबोधिलें जाऊं लागलें. यांचे अजोबा द्वारकानाथ यांनींहि समुद्रगमन करून जुन्या कर्मठपणाला धक्का दिला. पण ते सौम्य प्रवृत्तीचे व आदर्श चारित्र्याचे असल्यानें त्यांना महर्षि अशा शब्दानें गौरविलें जाई. यांचे वडील देवेन्द्रनाथ व बन्धु द्विजेन्द्रनाथ, ज्योतिरिन्द्र व सत्येन्द्रनाथ हे सर्वच विद्या, कला व आचार या दृष्टीनें विशेष प्रकारचे लोक होते. वडील आणि अजोबा हे राजा राममोहन राय यांनीं स्थापन केलेल्या ब्राह्मोसमाजाचे पुरस्कर्ते होते.

यांचा जन्म कलकत्त्याच्या जोडासाँको विभागांत झाला. आईचा वियोग लहानपणींच झाला आणि वडिलांचीहि यांच्यावर देखरेख नव्हती. यांचें बालपण नोकरांच्या व्यवस्थेंतच पार पडलें. शाळेविषयीं यांना पहिल्यापासून तिटकारा होता, त्यामुळें यांचें शिक्षण घरींच झालें.

यांच्या वडिलांना प्रवासाचा नाद होता. ते यांना प्रवासांत बरोबर घेत. त्यांच्याबरोबर १८७७ सालीं प्रथम हे इंग्लंडला गेले. तेथें ब्राइटन स्कूलमध्यें कांहीं दिवस व लंडनच्या युनिव्हर्सिटी कॉलेजमध्यें अभ्यास केल्यावर हे हिंदुस्थानांत परत आले. १८९० सालीं कायद्याचा अभ्यास करण्याकरितां हे इंग्लंडला गेले होते. पण कायद्यांत यांचें मन रमलें नाहीं.

हे चालूं आणि लिहूं बरोबरच लागले. वयाच्या पंध-राव्या वर्षापासून यांच्या कविता छापून प्रसिद्ध होऊं लागल्या. १७ व्या वर्षापर्यंत सात हजार ओळी कविता व तसेंच गद्यलेखन यांनीं प्रसिद्ध केलें.

यांना यांच्या २० व्या वर्षाच्या आंतच एका गूढ व दिव्य प्रकाशाचा साक्षात्कार झाल्याचें हे सांगत. असा साक्षात्कार यांना अनेक वेळां झाला. हे लिहितात– 'एका सकाळीं उगवत्या सूर्याकडे पाहत असतां माझ्या डोळ्यांवरून एक आच्छादन दूर झालें. एकावर एक येणाऱ्या प्रकाशकिरणांच्या लाटांनीं जग भरून गेलें. त्यामुळें माझ्या मनांतील उद्विग्नता व निराशा यांचा नाश झाला, आणि मला जग पूर्ववत् दिसूं लागलें.'

याच सुमारास यांचा व बंकिमचंद्र चतर्जींचा परिचय झाला; पण यांच्या सुधारक मतांमुळें तो टिकूं शकला नाहीं. यांच्या वडील बंधूंच्या पत्नीच्या मृत्यूमुळें यांच्या काव्यांत मरणविषयक कल्पना येऊं लागल्या. गाझी-पूरला 'मानसी' लिहून हे शिलिडला गेले व आपल्या जमिनदारीची व्यवस्था पाहूं लागले. तेथें यांचा निसर्गाशीं निकट संबंध येऊन यांच्या प्रतिभेचा विकास झाला. त्या वेळचें यांचें गद्य व पद्य 'साधना' या नियत-कालिकांत प्रसिद्ध होत असे (१८८७). १८९६ सालीं 'साधना' बरींच वर्षें चालून बंद पडली.

१९१२ सालीं हे इंग्लंडमध्यें पोंचले, तेव्हां यीट्स, स्टॅफोर्ड ब्रुक, नेव्हिन्सन यांच्यासारख्यांशीं यांचा परिचय झाला. यांच्या इंग्रजींत भाषान्तर केलेल्या बंगाली कविता वाचून यांच्या कवितांतील महान् सौंदर्याची त्यांना कल्पना आली. याच वेळीं यांच्या कवितांना इंग्लिश प्रकाशक भेटला. पूर्वीं बंगालींत 'गीताञ्जलि' प्रसिद्ध झाली होती. त्या वेळीं तिच्याकडे कोणाचें फारसें लक्ष वेधलें नव्हतें. पण आतां तिची एक सुधारलेली आवृत्ति इंग्रजी वाचकांकरितां मुद्दाम काढण्यांत आली. तिला सुप्रसिद्ध आयरिश महाकवि यीट्स यांची गुणग्रहणपर प्रस्तावना जोडण्यांत आली. बंगालींतील गीताञ्जलीस दुसऱ्या आवृत्तीचाहि योग आला नव्हता तेव्हां इंग्रजी प्रतीच्या डझनावारी आवृत्त्या निघाल्या. सदासर्वकाळ असमाधानाच्या आणि अपूर्ण-तेच्या मृगजलामागें धावणाऱ्या पाश्चात्यांना गीताञ्जलीं-तील समाधान आणि शान्ति यांच्या मधुर संदेशानें वेडें केलें. बसल्याजागीं समाधान आणि तृप्ति देणारा भक्तिमार्ग रणकुंडांत होरपळणाऱ्यांना ईश्वरी देणगी वाटला, आणि गीताञ्जलीवर पाश्चात्य वाचकांच्या उड्या पडल्या. फिट्झ्जिराल्डच्या उमर खय्यामनंतर पौर्वात्य कवींच्या ग्रंथाला इतकी प्रचंड मागणी पुनः याच वेळीं आली. तेथून अमेरिकाला जाऊन हे हिंदुस्थानांत पोंचले तेव्हां यांना वरील काव्याबद्दल १९१३ सालचें वाङ्मय विभागाचें 'नोबेल प्राइझ' दिल्याचें जाहीर झालें आणि यांच्याकडे जगप्रसिद्ध महाकवि म्हणून लोक पाहूं लागले. कलकत्ता विश्वविद्यालयानेंहि यांचा गौरव करण्याची संधि साधली. ब्रिटिश सरकारनें यांना 'सर' पदवी देऊन गौरविलें (१९१४). याच वेळीं यांची 'गार्डनर,' 'दि क्रेसेन्ट मून', 'दि सायकल ऑफ स्प्रिंग', 'दि होम ॲन्ड दि वर्ल्ड', 'बालक' हीं मोठमोठीं पुस्तकें प्रसिद्ध झालीं आणि यांचा कीर्तिसूर्य आपला प्रभाव जगभर गाजवूं लागला.

१९१६ सालीं अमेरिकेंत नॅशनॅलिझम (राष्ट्रवाद) व पर्सनॅलिटी (व्यक्तिमत्त्व) यांवर यांचीं व्याख्यानें झालीं. सगळ्या जगांतील विश्वविद्यालयांतून यांना निमंत्रणें येऊं लागलीं. १९२०–३० या काळांत युरोप, अमेरिका व आशियांतील देश यांत यांनीं सात दौरे काढले. या दौऱ्यांत नोबेल प्राइझ मिळाल्यापेक्षांहि यांचा अधिक गौरव झाला.

या प्रवासांत यांची भूमिका नवा संदेश देणाऱ्या प्रेषिताची होती. युरोप हा केवळ जगाला नव्या ज्ञानाचा संदेश देणारा नसून जगाकडूनहि युरोपला पुष्कळ शिकण्या-सारखें आहे. पूर्व आणि पश्चिम सांस्कृतिक दृष्ट्या एक झाल्यासच खऱ्या संस्कृतीचा उदय होईल, तोंपर्यंत युरोपीय संस्कृति अपूर्ण राहील अशा आत्मविश्वासपूर्ण प्रचारानें यांची युरोपयात्रा अत्यंत प्रभावशाली आणि नवा प्रकाश देणारी झाली. यांनीं आपल्या अनुकरणा-

पासून पूर्ण अलिप्त असणाऱ्या पोषाख, भाषा, तत्त्वज्ञान वगैरेंनीं सर्वांचें लक्ष आपणाकडे वेधून घेतलें. रशियांत 'मनुष्यधर्म' या विषयावर व्याख्यानें झाल्यावर हे हिंदुस्थानाकडे परत वळले.

यानंतर यांचा सत्तरावा वाढदिवस मोठ्या समारंभानें साजरा झाला. कलकत्त्याच्या टाउन हॉलमध्यें सर्व प्रतिष्ठित व्यक्ति एकत्र झाल्या. प्रथम यांना चांदीच्या पात्रांत अर्घ्य, नंतर गळ्यांत सोन्याची साखळी व हार अर्पण करण्यांत आला. तसेंच सोन्याच्या ताटांत एक मूल्यवान् सुवर्णकमल नि हत्तीच्या दांतावर लिहिलेलें अभिनंदनपत्र आणि जगांतील विख्यात लेखक आइन्स्टिन, हिन्रिच मॅन, बर्ट्रान्ड रसेल वगैरेंनीं लेख लिहिलेला Golden Book of Tagore हा ग्रंथ अर्पण करण्यांत आला.

बोलपूरपासून दोन मैलांवर असणारें 'शांतिनिकेतन' हा यांच्या कल्पनेचा यांच्या काव्यवाङ्मयापेक्षांहि मनोहर असा विलास आहे. या संस्थेचें हें नांव किंवा जागा जरी यांच्या वडिलांनीं शोधली (१८५५) असली तरी प्राचीन हिंदुस्थानांतील आश्रमांतील गांभीर्याच्या साहाय्यानें तत्रस्थ तरुणांची वृत्ति सौंदर्य व देव यांविषयीं जागृत करण्याची कल्पना यांची आहे (१९०१). म्हणूनच या संस्थेंत धर्मशिक्षणावर यांनीं जोर न देतां शुद्ध व उदात्त वातावरणावर विशेष भर दिला. प्रवेश परीक्षेपर्यंतच्या सर्वसाधारण अभ्यासक्रमाला सकाळ-संध्याकाळ प्रार्थना, गुरुवारीं प्रवचन व सुट्टीच्या दिवशीं मुकुट, वसंतोत्सव, फाल्गुनी यांसारख्या यांनींच लिहिलेल्या नाटिकांचा प्रयोग असा कार्यक्रम यांनीं आंखला व तो विद्यार्थी वर्गांत इतका लोकप्रिय झाला कीं केवळ पांच विद्यार्थ्यांपासून सुरुवात झालेल्या या आश्रमांत पुढें दोनशें विद्यार्थी शिकूं लागले. आश्रमांतील सुरुवातीचे शिक्षक ब्रह्मबांधव व रेवाचंद होते. परंतु त्यांचेबरोबरच यांचे परदेशी मित्र सी. एफ. अँड्र्यूज व डब्ल्यू. डब्ल्यू. पीअर्सन हेहि शिक्षकाचें काम करीत.

परंतु शांतिनिकेतनाची कल्पना कितीहि आकर्षक असली तरी तिची सर्व सिद्धता, तेथील सर्व खर्च चालविण्याची यांची तयारी, यांनीं दिलेल्या नोबेल प्राइझचे सव्वा लक्ष रुपये, यांची जागतिक प्रसिद्धि व विशेषतः गुरुदेव या यांच्या तेथील पदवीला साजेशा व्यक्तिमत्त्वामुळेंच होऊं शकली. साधेपणा, सौंदर्यदृष्टि व विशेषपणा यांच्या बोलण्याचालण्यांतच काय पण साध्या पोषाखांतहि दिसून येइ. लांब केश, विशाल पांढरी दाढी, कफनी, खडावा इत्यादि बाह्य गोष्टींबरोबरच एकान्तवास, सृष्टिसौंदर्याची आवड, ईश्वरनिष्ठा, सदाचार व गूढसंशोधन या यांच्या गुणांमुळेंच यांची आश्रमाची कल्पना यशस्वी होऊं शकली व विश्वभारती विश्वविद्यालयाच्या स्थापनेनें तर यांच्या यशस्वितेनें अत्युच्च शिखर गांठलें. शांतिनिकेतनाच्या आवारांतील 'उत्तरायण' या वसतिस्थानांत हे व वेणुकुंजांत सी. एफ. अँड्र्यूज हे राहत.

पहिल्या महायुद्धाच्या वेळीं भौगालिक अडथळे दूर करून मनुष्य प्राणी एकत्र आला तरी त्यांचे धार्मिक, सामाजिक व राजकीय भेद दूर न करतां आल्यानें वैरभाव कमी न होतां अधिकच वाढला. तो भेदभाव कमी करून मायभूमीचा उद्धार करावा म्हणून यांनीं या संस्थेची उभारणी केली. पौर्वात्य संस्कृतीच्या अध्ययनाचें केन्द्र निर्माण करावें आणि पूर्वीच्या कालीं भिन्न संस्कृतींच्या लोकांचा समन्वय करण्याचें काम जसें भारतीय संस्कृतीनें केलें तसें आजहि करावें, राजकीय उलाढालीपेक्षां समन्वयवादी नानक, कबीर वगैरेंना जन्म देणारी भारतभूच या कामाला अधिक योग्य असल्यानें पूर्व-पश्चिम-संयोग साधावा या हेतूनें यांनीं या विद्यापीठाची उभारणी केली (१९२१). याचे मुख्य उद्देश—१ सृष्टीच्या अवलोकनानें सत्याचा शोध करावा, २ जगांत विश्वबंधुत्वाची भावना वाढवावी, ३ पौर्वात्य व पाश्चात्य संस्कृतीचा सुंदर मिलाफ व्हावा, ४ जगांत शांतता राहील अशी समाजरचना करावी. या विद्यापीठाचें पथभवन, शिक्षाभवन, विद्याभवन व विश्वभारती संमीलनी अशा एकीपेक्षां एक श्रेष्ठ पांच शाखा आहेत. या संस्थेचे अध्यक्ष हे होते. येथें प्रत्येक धर्माच्या अनुयायांचा मठ स्थापण्यांत आला असून त्या त्या धर्माच्या वाङ्मयाचीं पुस्तकें मिळण्याचीहि सोय करण्यांत आली आहे. तेथें ग्रंथ मूळ भाषेंतून वाचण्यावर कटाक्ष असतो.

येथील अभ्यासक्रमांत— १ खेड्यांची पुनर्घटना, २ संस्कृत वाङ्मय, ३ बौद्ध तत्त्वज्ञान, ४ हिंदुस्थानांतील प्रमुख भाषा, ५ कला व संगीत, ६ आंग्ल वाङ्मय व युरोपिय संस्कृति अशा विषयांचा समावेश असून संशोधनकार्यासहि उत्तेजन मिळतें. या संस्थेंत नारीविभाग म्हणून स्त्रीशिक्षणाची स्वतंत्र शाखा व सुरूल येथें श्रीनिकेतन नामक शेतकीच्या प्रयोगाची व शिक्षणाची एक संस्था आहे. या सर्व संस्थांचा समावेश आतां

विश्वभारती या विराट संस्थेंत होतो व तेथें आतांपर्यंत या कार्यासाठीं लक्षावधि रुपये खर्च झाले आहेत.

या विद्यापीठाचा लाभ घेण्यासाठीं पाश्चात्य देशांतील अनेक विद्वान् लोक येत. प्राग विद्यापीठाचे संस्कृत पंडित विंटरनिट्झ, पॅरिसचे डॉ. सिल्वन लेव्ही, व्हिएन्ना विद्यापीठाचे डॉ. जीजर तसेंच चीन तिबेटमधील कांहीं पंडित येथें येऊन गेले व त्यांच्या विचार-विनिमयाचा फायदा येथील प्रौढ विद्यार्थ्यांना झाला.

सुमारें ३००० कविता, ५० कलात्मक वाङ्मयीन व धार्मिक निबंधसंग्रह, ३८ नाटकें, ३५ राजकीय पुस्तकें, १९ कथासंग्रह व कादंबऱ्या इतकें विपुल व विविध वाङ्मय यांनीं बंगाली भाषेंत निर्माण केलें आहे. यांपैकीं बहुतेक सर्व पुस्तकांचीं भाषांतरें इंग्लिश भाषेंत झालेलीं आहेत. यांच्या गीताञ्जलीचा तर इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, हिब्रु, स्वीडिश, डॅनिश, डच, इटालियन, झेक, स्पॅनिश, जुगोस्लाव्ह, लॅटव्हियन, इस्टोव्हियन, रशियन या पाश्चात्य व हिंदी, मराठी, तामीळ, कानडी इत्यादि देशी भाषांत अनुवाद झाला आहे. इतकी लोकप्रियता जगांतील कोणाहि ग्रंथकाराला सध्याच्या कालांत लाभलेली नाहीं.

यांच्या गीताञ्जलिप्रमाणेंच यांचीं शिशुगीतें व लघुकथा स्वभावांतील सूक्ष्म छटा व्यक्त करण्याच्या दृष्टीनें उत्कृष्ट समजण्यांत येतात. यांनीं बंगाली भाषेला सोपें व घरगुती वळण दिलें असलें तरी लौकिक घरगुती भाषा ग्रंथांत वापरण्याची यांची लकब नापसंत असणाराहि फार मोठा वर्ग आहे.

यांच्या या साहित्यिक पर्वतापुढें यांच्या इतर चळवळी रजःकणाप्रमाणें वाटण्याचा संभव आहे. परंतु गायक, अभिनयपटु, स्वररचनाकार, शिक्षक, वक्ते, सौंदर्योपासक व मुख्यतः चित्रकार हे यांच्या व्यक्तिमत्त्वाचे आणखी कांहीं महत्त्वाचे पैलू आहेत. चित्रकलेच्या बाबतींत तर यांनीं वयाच्या अडुसष्टाव्या वर्षी सुरुवात केली व मॉस्को, बर्लिन, म्युनिक, पॅरिस, बर्मिंगहॅम, न्यूयॉर्क यांसारख्या मोठमोठ्या शहरीं आपल्या चित्रांचीं प्रदर्शनें भरवून जगाच्या सर्व भागांतून वाहवा मिळवली.

यांचा भर मानसिक क्रान्तीवर होता तरी यांच्या चारित्र्यांत राजकारणालाहि महत्त्वाचें स्थान आहे. ज्या ज्या वेळीं देशांत राजकीय चळवळीला महत्त्व आलें तेव्हां तेव्हां यांना तींत भाग घेतल्याशिवाय दूर राहतां आलेलें नाहीं. बंगालच्या फाळणीमुळें उत्पन्न झालेल्या खळबळींत यांनीं महत्त्वाचा भाग घेतला, असंख्य लेख लिहिले, व्याख्यानें दिलीं, राष्ट्रीय शाळांना उत्तेजन दिलें व खेडेगांवांत समित्या स्थापन केल्या. यांनीं केलेलीं पद्यें त्या वेळीं सर्वत्र गायलीं जाऊं लागलीं. पण हे जों जों अशा चळवळींत गुरफटूं लागले तों तों यांना राजकारणी लोकांच्या क्षुल्लक भानगडींचा वीट येऊं लागला व यांनीं त्या चळवळींतून आपलें अंग काढून घेतलें आणि हे पुनः शान्तिनिकेतनांत येऊन आपलें एकान्तवासांतील आयुष्य कंठूं लागले. चळवळींत पडल्यानें तेथें यांच्यावर पोलिसांची देखरेख होतीच. शिवाय देशभक्तांच्या शिव्याशापांची लाखोली यांना सोसावी लागली ती निराळीच. १९११ सालीं ब्राह्मसमाजाच्या अनेक शाखांत एकीकरण करण्याचा यांनीं प्रयत्न केला तोहि असाच वाया गेला.

पण पुढें जालियनवाला बागेंत झालेल्या कत्तलीनें अस्वस्थ होऊन यांनीं आपली 'सर' ही पदवी परत केली. अशा तऱ्हेनें इच्छा नसतांना हे परत राजकारणाकडे ओढले गेले. त्या वेळच्या असहकाराच्या जमान्यांतील चरखा, खादी वगैरे गोष्टींविरुद्ध यांनीं मॉडर्न रिव्ह्यूंत लेख लिहिले. परंतु म. गांधींचें जीवित विभक्त मतदारसंघांमुळें धोक्यांत आलेलें पाहतांच हा वृद्ध महाकवि येरवड्याच्या तुरुंगांत दाखल झाला व यांनीं म्हटलेल्या गीतांजलीच्या प्रार्थनेंतच गांधीजींचा उपास सुटला.

यांच्या काव्यांत व्यावहारिक स्वरूपांतील वर्णन चालू असतां आध्यात्मिक किंवा रहस्ययुक्त अशा अज्ञात तत्त्वांकडे लक्ष खेचलें जातें. यांचा हेतु त्याच अज्ञात असणाऱ्या सौंदर्यमय व रहस्ययुक्त शक्तीकडे लक्ष खेचण्याचा असतो. फक्त त्याला साधन म्हणून हे व्यवहाराचा आश्रय करतात. सर्व सृष्टींत यांना एका विशिष्ट शक्तीच्या छायेचा आभास होत असतो आणि तो व्यक्त करण्याकरितां हे लिहिण्यास आरंभ करतात. त्या गूढ असणाऱ्या अज्ञात वस्तूला छाया, रहस्य किंवा अध्यात्म यांपैकीं कोणत्याहि शब्दानें संबोधितां येईल. तथापि या प्रत्येक वादांतील गूढतेंत अधिक स्पष्टता येत जाते. यांच्या काव्यांत तिन्ही प्रकार आढळतात. यांच्या काव्यांत सौंदर्यमय मधुर तत्त्वाचा आभास नेहमींच होतो, पण ईश्वरविषयक स्पष्ट भावनाहि पुष्कळ ठिकाणीं व्यक्त केली जाते. पूर्वीचे ज्ञानदास व कबीर हे दोन कवि अशा प्रकारचे होऊन गेले. त्यांपैकीं व्यावहारिक काव्य करून ईश्वराकडे संकेत करणाऱ्या

कबीरापासून आपणास स्फूर्ति मिळाल्याचें यांनीं कबूलच केलें आहे.

परंतु यापेक्षांहि श्रेष्ठ अशा एका नव्या जागतिक समाजरचनेचा पाया घालणारे म्हणून यांच्या कार्याकडे पाहिलें पाहिजे. यांना स्फूर्ति रामायण, महाभारत रचणारे वाल्मीकि, व्यास हे संस्कृत भाषेंतील महाकवि, मध्ययुगांतील वैष्णव साधुकवि, विश्वकुटुंबवादी नानक-कबीर वगैरे तत्त्वज्ञानी यांच्यापासून मिळाली. बहुजन-समाजाला भारून टाकणारी धार्मिक उत्कटता यांच्या-पाशीं आहे, तसेंच उपनिषदांतील साध्या व सुटसुटीत तत्त्वज्ञानाचा व जीवनाचा आदर्श यांच्यापुढें आहे. सध्यांच्या कालांतील महापुरुष होण्यापेक्षां भविष्य-कालाचे युगप्रवर्तक होण्याची महत्त्वाकांक्षा यांच्यांत स्पष्ट दिसते. यांचें तत्त्वज्ञानहि स्वतंत्र व नवें आहे.

यांच्या बंगाली भाषेंतील राष्ट्रगीताचीं कांहीं कडवीं पुढें नमुन्यादाखल दिलीं आहेत.

जन–गण–मन–अधिनायक
जय हे भारत भाग्यविधाता
पंजाब सिंध गुजरात
मराठा द्राविड उत्कल वंग
विन्ध्य हिमाचल यमुना गंगा
उच्छल जलधि तरंग
तव शुभनामे जागे
तव शुभ आशिष मागे
गाये तव जयगाथा
जनगण मंगलदायक जय हे
भारत भाग्यविधाता
जय हे, जय हे, जय हे,
जय जय जय जय हे ॥
पतन अभ्युदय बंधुर पंथा,
युग युग धावित यात्री,
हे चिरसारथी, तव रथचक्रे
मुखरित पथ दिन रात्री
दारुण विप्लव माझे
तव शंखध्वनि वाजे
भव संकट दुखत्राता
जनगण पथ–परिचायक
जय हे भारत भाग्यविधाता.

यांचें इंग्रजी भाषेंतील स्वतंत्र व अनुवादलेलें वाङ्मय–

काव्यें : ( 1 ) Morning Songs, ( 2 ) The Love of Rahu, in Pictures and Songs, (3) Manasi, ( 4 ) Sonar Tari, ( 5 ) Sharps and Flats, ( 6 ) Naivedya, ( 7 ) Balak, ( 8 ) Gitanjali, ( 9 ) Gardener (1913), ( 10 ) Fruit Gathering, ( 11 ) The Crescent Moon, ( 12 ) The Fugitive इत्यादि.

नाटकें : ( 1 ) Nature's Revenge, (2) Sācrifice, ( 3 ) Autumn Festival, ( 4 ) The King of the Dark Chamber, ( 5 ) The Post Office, (6) Red Oleanders, ( 7 ) Sannyasi, (8) Chitra (1913) इत्यादि.

व्याख्यानें : ( 1 ) Nationalism (जपान १९१६), ( 2 ) Personality (अमेरिका १९१६), ( 3 ) Talks in China (1924), ( 4 ) The Religion of Man ( हिबर्ट लेक्चर्स, रशिया १९३१ ) इत्यादि.

कादंबऱ्या : ( 1 ) The Home and the World, (१९१९), ( 2 ) The Wreck ( नौका डुबी १९२१), ( 3 ) Gora (1924) इत्यादि.

गोष्टी : (1) Hungry Stones and Other Stories (1915), ( 2 ) Mashi and Other Stories (1918), ( 3 ) Stories from Tagore (1918), ( 4 ) Glimpses of Bengal (1921) इत्यादि.

इतर : ( 1 ) My Reminiscenes (1917), ( 2 ) Creative Unity (1922), ( 3 ) Letters from Abroad (1923), (4) Letters to a Friend (1929), ( 5 ) Thoughts from Tagore (1929) इत्यादि.

**टाटा, जमशेदजी नसरवानजी**—( जन्म स. १८३९–मृत्यु स. १९०४ मे १०; नौहियम, जर्मनी ) जगप्रसिद्ध हिन्दी व्यापारी, कारखानदार, दानशूर व देशभक्त.

यांचा जन्म नवसरी येथें एका मध्यम स्थितीच्या पारशी कुलीन घराण्यांत झाला. तेथें शिक्षणाची विशेष सोय नसल्यानें यांना तेराव्या वर्षी मुंबईस पाठविण्यांत आलें. तेथें यांनीं १८५८ पर्यंत 'एल्फिन्स्टन इन्स्टि-ट्यूशन 'मध्यें शिक्षण घेतलें.

हिंदुस्थानांत ब्रिटिशांचा प्रथम विशेष संबंध पारशी

लोकांशीं आला. त्यांनीं त्याचा फायदा चांगला घेतला. यांच्या वडिलांची मुंबईस व्यापारी पेढी होती. तिच्याशीं प्रेमचंद रायचंद यांचा विशेष संबंध होता. त्यांनीं पर्शियन वॉरमध्यें बुशायरमधील सैन्यास मालाचा पुरवठा करून चांगला पैसा कमाविला.

यांचे वडील चीनशीं अफूचा व्यापार करीत होते. त्यांना त्यांत चांगला फायदा मिळून घरची सांपत्तिक स्थिति सुधारली. हे आपल्या बापाच्या धंद्यांत लक्ष घालून व्यापाराचें शिक्षण घेत होते. तेथून एकदां संधि येतांच हे शांघाय हाँगकाँगकडे गेले आणि चीनशीं व्यापार करण्याकरितां आवश्यक असणारें ज्ञान यांनीं संपादन केलें. तेथेंच यांनीं जमशेदजी अरदेसर अँड को. या व्यापारी संस्थेची स्थापना केली ( १८६१ ).

तेथून हे परत आले तेव्हां अमेरिकेंत लोकयुद्ध ( सिव्हिल वॉर ) सुरू झालें. या वेळीं हिंदुस्थानांतील कापसास अफाट भाव आला. लढाई संपतांच ही स्थिति पालटली आणि यांची आर्थिक स्थिति खालावली. इंग्लंडच्या जामिनकीच्या बाबतींत यांना अत्यंत वाईट अनुभव आले आणि सुस्थिर आर्थिक स्थितीचें महत्त्व यांच्या चांगलें ध्यानीं आलें.

नंतर झालेल्या ॲबिसिनियन वॉरमध्यें मालपुरवठा करण्याच्या काँट्रॅक्टमध्यें यांना पुनः चांगला पैसा मिळाला. तेव्हां हे यंत्रकलेचें ज्ञान मिळविण्याकरितां इंग्लंडांत मँचेस्टर येथें गेले ( १८६५ ) व परत हिंदुस्थानांत आले. येथें आल्यावर मुंबईस गिरणी न काढतां अनेक मित्रांचा विरोध पत्करूनहि नागपूर येथें यांनीं 'एम्प्रेस मिल' काढली (१८७७) आणि ती कल्पना इतकी यशस्वी झाली कीं, शंभर टक्के नफा वांटण्याच्या यांच्या स्वप्नानें शेंकडा ३२० पर्यंत नफा भागीदारांना देण्यापर्यंत मजल गांठली ( १९२० ). कुर्ला व अहमदाबाद येथील जुन्या गिरण्या नव्या करण्याचे नादानें यांचे पुष्कळ श्रम वायां गेले. जुन्या गिरण्यांचा जम बसविण्यापेक्षां नवीन गिरणी काढणें श्रेयस्कर असतें हें तत्त्व यांना पुढें अनुभवानें कळून आलें. पुढें 'स्वदेशी मिल' ही नवी गिरणी सुरू करून आणि 'धरमसी मिल' विकत घेऊन यांनीं या धंद्यांत सारखी प्रगति चालू ठेवली. कापूस कातण्याच्या व विणण्याच्या यंत्रांमधील नवीन नवीन शोधांकडे लक्ष ठेवून यांनीं आपल्या गिरण्यांत सतत सुधारणा केली. येथील कापसाच्या लागवडींत लक्ष घालून लांब धाग्याचा कापूस निर्माण करण्याचा प्रयत्न केला. बाजारपेठांत इतरांपेक्षां आपलें कापड स्वस्त कसें विकतां येईल इकडेहि यांचें लक्ष असे. १८९५ साल हें यांच्या वाढत्या उद्योगधंद्यांत व व्यापारांत अतिशय भरभराटीचें गेलें.

यांची खरी कर्तबगारी मुंबईला हल्लीचें रूप देण्यांत आहे. पूर्वी मुंबई ही अनेक बेटांत विभागली होती. शिवाय सर्वत्र दलदल असे. अशा वेळीं तेथील जमीन कोण विकत घेणार ? पण हे बिनधोकपणें पुढें येत आणि तेथील जमिनी खरेदी करून त्यांवर इमारती उठवीत. मुंबईच्या उज्वल भविष्यकाळाची यांना कल्पना आलेली असल्यानें यांनीं आजच्या भव्य मुंबईचा पाया घातला आणि कोट्यवधी रुपये कमाविले. मुंबईच्या प्रत्येक भागांत आज यांनीं बांधलेल्या इमारती यांच्या व्यापक दृष्टिकोनाची कल्पना देण्यास समर्थ आहेत.

परंतु या गोष्टी यांच्या चिरंजीवाच्या हातून पुढें घडून आलेल्या महान् उद्योगाचीं केवळ पूर्वचिन्हें होतीं. यांच्या योजकतेमुळें बंगलोरची संस्था, जमशेदपूर येथील लोखंडाचा कारखाना व इलेक्ट्रिक वर्क्स हे महान् उद्योग निर्माण झाले.

हिंदुस्थानांतील कारकुनी व नोकरी पेशाचें शिक्षण यांना प्रथमपासूनच नापसंत होतें. त्यांतच 'जर हिंदी विश्वविद्यालयें हीं केवळ परीक्षा घेणारीं यंत्रें बनतील तर उच्च शिक्षणाची वाढ हिंदुस्थानांत होणें अशक्य आहे' या लॉर्ड रे यांच्या कुत्सित उद्गारांची भर पडली व या आक्षेपाला उत्तर म्हणून यांनीं Indian Institute of Science काढण्याचें ठरविलें. यासाठीं संशोधनात्मक व शास्त्रीय दृष्टि यावी म्हणून प्रो. बी. जे. पादशहा यांना बाल्टिमोर येथील जॉन्स हॉपकिन्स इन्स्टिटयूटमध्यें यांनीं पाठविलें व हिंदुस्थानांतील शास्त्रीय शिक्षणाच्या उन्नतीसाठीं ३० लाख रुपये काढून ठेवले. परंतु हें कार्य यांच्या हयातींत सिद्धीस गेलें नाहीं. यांच्या मृत्यूनंतर यांच्या मुलानें ही रकम त्याच कार्याप्रीत्यर्थ देण्याचें ठरविलें. सरकारनें त्यांत भर घातली व म्हैसूरच्या महाराजांनीं त्यांत आणखी द्रव्याची भर घालून आपल्या संस्थानांत जागा दिली. सन १९११ मध्यें बंगलोर स्टेशनजवळ या कार्याच्या इमारतीचा पाया घालण्यांत आला व या संस्थेंत जनरल ॲन्ड अलाइड केमिस्ट्री, इलेक्ट्रो-टेक्नॉलजी व ऑरगॅनिक केमिस्ट्रीकरितां विद्यार्थी घेण्यांत येऊं लागले. Indian

Institute of Science ही संस्था आतां जगाच्या पूर्वभागांतील अग्रेसर संस्था ठरली आहे.

यांचा दुसरा उद्योग लोखंडी कारखान्याचा होय. अर्थशास्त्रीय चक्र चालू राहण्यांत या धंद्याची असणारी आवश्यकता यांच्या बरेच दिवसांपासून ध्यानांत आली होती. त्यामुळें या दृष्टीनें होणाऱ्या प्रत्येक हालचालीकडे यांचें लक्ष असे. यांच्या आधी बरेच दिवस कुलटीला लोखंड तयार होत असे. पण पोलाद करण्यांत कोणालाहि कधींच यश आलें नाहीं. त्याकरितां परदेशी वस्तु आणणें अपरिहार्य असें. याच सुमारास कोसिपूरच्या मेजर महोन नांवाच्या सरकारी अधिकाऱ्यानें एक रिपोर्ट प्रसिद्ध केला. त्यांत बंगालमध्यें लोखंड व पोलाद यांच्या निर्मितीकरितां मोठ्या प्रमाणावर व आधुनिक पद्धत्यनुसार कारखान्यांची शक्यता प्रतिपादिली. तदनुसार यांनीं शास्त्रीय ज्ञान संपादन करवून संशोधन करविलें व अखेर दोराब टाटा यांनीं आपले प्रस्तरशास्त्रज्ञ प्रमथनाथ बोस यांचे साहाय्यानें बंगालमध्यें लोखंडाच्या टेंकड्यांचा शोध लावला. यासाठीं यांनीं स्वतःचें व लोकांचें असें १,६३०,००० पौंड भांडवल त्यांत गुंतविलें. पुढें तें कमी पडूं लागतांच आणखी ४००,००० पौंड ग्वाल्हेरच्या महाराजांनीं दिले व या प्रचंड कामास सुरुवात झाली. एंजिनियर प्रथम प्रथम तेथें गेले तेव्हां तेथें काट्यांचीं व झुडपांचीं जंगलें होतीं. पण आज त्या ठिकाणीं टाटा आयर्न अँड स्टील वर्क्स लि. या कारखान्याचा अवाढव्य पसारा उभा आहे.

पूर्वीं साक्ची या नांवानें प्रसिद्ध असणारें खेडें आज जमशेदपूर हें दीड लक्ष वस्तीचें शहर बनलें आहे. येथें मजुरांकरितां यांनीं आठ हजार राहण्याच्या जागा बांधल्या आहेत आणि तीन कोटि सत्तावीस लक्ष रुपये हें शहर बसविण्यांत खर्च झाले आहेत. दर वर्षी बावन लक्ष रुपयांचा खर्च या शहराकरितां होतो. या कंपनीच्या मालकीच्या कोळशाच्या खाणी व कोळसे वाहणारी जहाजें आहेत.

या कारखान्यांत धातुशास्त्रांतील निरनिराळे शोध लावण्यासाठीं ‘ रिसर्च लॅबोरेटरी ’ असून जमशेदपूर येथें १०० मैल लांबीची यांनीं स्वतःची रेल्वे बांधली आहे.

आजसुद्धां टाटांच्या सर्वांत मोठ्या उद्योगांत या कारखान्याची गणना होते. अमेरिका व युरोप या देशांशिवाय इतका मोठा व स्वतंत्र कारखाना जगांत दुसरा नाहीं. अगदीं खनिज लोखंडापासून उत्तम पोलादापर्यंतचीं सर्व रूपान्तरें या कारखान्यांत पार पाडली जातात. पत्रे, गज, रेल्वेचे रूळ, स्लीपर्स, फिशप्लेटस्, शेतकामांचीं हत्यारें, रेल्वेचे आस इत्यादि वस्तु येथें निर्माण होतात. डांबर, अमोनियम सल्फेट, बेन्झाल, टो ल्यूल, झिंक ड्रॉस, रेड ऑक्साइड, फेरोसल्फेट हे पदार्थ यांबरोबरच तयार केले जातात. याशिवाय किरकोळ कितीतरी वस्तु येथें निर्माण होतात.

यांच्या सर्व उद्योगधंद्यांत व त्याबरोबरच हिंदुस्थानच्या इतर औद्योगिक क्षेत्रांत हा कारखाना अत्यंत फायदेशीर चालला आहे. याचें गमक म्हणजे या कारखान्याच्या ३० रुपयांच्या एका शेअरची किंमत युद्धकालांत २२०० रुपयांपर्यंत चढली. हिंदुस्थानांत सर्वत्र या धंद्यावर फार मोठ्या प्रमाणांत सट्टेबाजी चालू असते.

गेल्या महायुद्धांत उत्पन्न झालेल्या सरकारी अडचणी विचारांत घ्यावयाच्या यांच्या पद्धतीमुळें युद्धकालांत यांच्या या धंद्याला फारच मोठा उठाव मिळाला. युद्धापूर्वी या कारखान्यांत उत्पन्न होणाऱ्या मालाचें क्षेत्र घरगुती भांडींकुंडीं व रेल्वेचे रूळ यांना लागणाऱ्या साध्या पोलादापुरतीच मर्यादित असे. यंत्राला वापरण्याजोगें पोलाद उत्पन्न करण्यास हिंदुस्थानांतील कोणताच लोखंडी मालाचा कारखाना या वेळीं धजत नसे. हें क्षेत्र विस्तृत करण्याची पहिली संधि अलीकडेच बांधण्यांत आलेल्या हावरा पुलामुळें यांना मिळाली. पुलासारख्या कामाला लागणारें कमींत कमी भेसळ असलेलें चिवट पोलाद तयार करण्यांत यांच्या कारखान्याला यश लाभलें व या पुलाच्या कामासाठीं ‘ टिस्क्रोम ’ या नांवानें १७००० टन पोलाद यांनीं पुरविलें. याच संशोधनांतून पुढें ‘ टिस्कॉर ’ नांवाचें गंजण्याचे व टिकाऊपणाचे बाबतींत अधिक परिणामकारक ठरलेलें पोलाद निघालें. रेल्वेचीं एंजिन्स व डबे बांधण्यांत तें अतिशय उपयोगी असल्याचें प्रयोगान्तीं ठरलें.

अशा प्रकारच्या पोलादाच्या निरनिराळ्या स्वरूपांची उत्पत्ति मोठ्या प्रमाणावर करण्याची संधि ‘ आर्मर प्लेट्स ’ करण्याच्या सरकारी मागणीनें यांना मिळाली ( १९४० ).

तोफखान्यासाठीं लागणारें टिकाऊ पोलाद तयार

करण्याचा हा अनुभव यांचा पहिलाच असल्यानें आमूलाग्र संशोधन करून अखेर यांनीं 'बुलेट-प्रुफ' 'आर्मर प्लेट्स' करण्यांत यश मिळविलें. इतर देशांत तयार होणाऱ्या आर्मर प्लेट्सच्या दर्जाचा माल आतां कारखान्यांत तयार होत असून टाटा प्लेट्सनी संरक्षिलेल्या आठव्या फौजेंतील चिलखती गाड्यांनीं उत्तर आफ्रिकेंतील युद्धांत स्पृहणीय यश संपादन केलें आहे.

या लष्करी साहाय्याप्रमाणेंच देशांतल्या देशांत उत्पन्न होणाऱ्या सरकारी अडचणींतहि यांच्या कारखान्यानें साहाय्य केलें. युद्धकालांत चिल्लर नाण्यासाठीं लागणाऱ्या धातूंची कमतरता दिसून येतांच यांनीं ताबडतोब 'स्टील-डाइज' तयार करून सरकारची नड भागवली. त्याचप्रमाणें टेलिफोन व तारखातें यांना लागणारे लोहचुंबक परदेशांतून येण्याचें बंद होतांच यांच्या कारखान्यानें पोलादापासून लोहचुंबक तयार करून हीं बंद पडण्याच्या बेतांत आलेलीं खातीं यांनीं पुन्हां सुरू केलीं. वैद्यकीय उपकरणांना लागणारें स्टेनलेस स्टील व बंदुकांना लागणारें स्पीड स्टील तयार करण्यांतहि आतां यांच्या कारखान्यास यश मिळालें आहे.

परदेशांतून येणारी यंत्रसामुग्री बंद पडतांच सरकार व जनता हिंदी कारखान्यांकडे, विशेषतः यांच्या लोखंडी मालाचे कारखान्याकडे विशेष अपेक्षेनें पाहूं लागली. ती अपेक्षा यांनीं किती कसोशीनें पुरी केली आहे, तें यांच्या या हालचाली दाखविण्यास समर्थ आहेत. हिंदी उद्योगधंदे–विशेषतः यांचा हा कारखाना यांचा तेजस्वी भविष्यकाळ यांनीं निश्चित केला आहे.

मुंबईच्या यांच्या गिरण्यांत जसजशी वाढ होत चालली तसतसें यांना बाराशें मैल अंतर तोडून बंगालमधून कोळसा आणणें कठीण वाटूं लागलें. याच सुमारास सह्याद्रीच्या घाटांतील सतत तीनशें इंच पाऊस पडणारीं कांहीं ठिकाणें यांच्या ध्यानांत आलीं. आणि मुंबईपासून केवळ साठ मैलांचें अंतर तोडून हवी तितकी हायड्रो-इलेक्ट्रिक पॉवर उत्पन्न करण्याची कल्पना यांचे मनांत डेव्हिड गॉसलिंग यांनीं भरवून दिली (१८९७). ती मूर्त स्वरूपांत येण्याचा योग मात्र अलिकडेच आला (१९१०). 'टाटा हायड्रो-इलेक्ट्रिक वर्क्स' ही आतां टाटा उद्योगधंद्याची एक प्रमुख शाखा बनली आहे.

१ टाटा हायड्रो-इलेक्ट्रिक पॉवर सप्लाय कंपनी लि. (१९१०), २ दि आंध्र व्हॅली पॉवर सप्लाय कंपनी लि. (१९१६), ३ टाटा पॉवर कंपनी लि. (१९१९), ४ दि युनायटेड पॉवर लि. (१९३७) या चार संस्था वरील संस्थेमार्फत चालविण्यांत येतात. कांहीं अमेरिकन व्यापाऱ्यांच्या आर्थिक सहकार्यानें ही संस्था चालविण्यांत येते. लोणावळा, वळवण, शिरोटा, ठोकरवाडी आणि मुळशी या पांच ठिकाणच्या धरणांच्या पाण्याचा उपयोग करून खोपोली, भिवपुरी आणि भिरा या ठिकाणीं हिंदुस्थानांत उत्पन्न होणाऱ्या विजेपैकीं चाळीस टक्के वीज उत्पन्न होते. मुंबई शहरांतील दिवे, ट्राम, गिरण्या व रेल्वे (पुणें, इगतपुरी व बोरिवलीपर्यंत) या विजेवर चालतात. घरामध्यें एकापेक्षां जास्त दिवा न वापरूं शकणाऱ्या लहान लहान घरांतहि बॉम्बे इलेक्ट्रिकल अँड ट्रामवे कंपनीनें आपलें जाळें पसरलेलें आहे.

या संस्थेची काम करण्याची पद्धत मात्र जरा गुंतागुंतीची आहे. लोणावळा व वळवण येथें पावसाचें पाणी साठविण्याचे उथळ तलाव असून शिरोटा येथें असणाऱ्या तलावाचें पाणी एका कालव्याच्या साहाय्यानें वळवणच्या तलावांत आणून सोडलें जातें. पुढें आंध्र खोऱ्यांत व निरा-मुळा नदीवर प्रत्येकीं एकएक तळें बांधून टेंकडीच्या पायथ्याशीं असणाऱ्या पाणचक्क्यांपाशीं आणण्याची सोय करण्यांत आली आहे.

हिंदुस्थानांतील एका नव्या औद्योगिक परंपरेचें जनकत्व यांच्याकडे जातें. यांनीं उपयोगांत आणलेल्या यंत्रांमुळें, बंद पडलेल्या उद्योगधंद्यांनीं चिडलेल्या शेतकरी वर्गाचे शिव्याशाप खात यांना आपल्या सुरुवातीच्या कांहीं कारखान्यांची उभारणी करावी लागली. 'इतर पुढारलेल्या राष्ट्रांच्या बरोबरीनें जर हिंदुस्थानला जावयाचें असेल तर त्याचें औद्योगिक कार्यक्षेत्र विस्तृत झालें पाहिजे, हिंदुस्थानची भौतिक किंवा आधिभौतिक उन्नति होण्याचा शक्य कोटींत असणारा मार्ग हाच आहे' ही यांची श्रद्धाच लोकांचे हे आघात प्रत्याघात सहन करण्याच्या मुळाशीं होती.

व्यवहारी दृष्टीबरोबरच व्यापक कल्पना, क्षुल्लक संधीहि न सोडण्याच्या कटाक्षाबरोबरच जीवावरील धाडस करण्याची तयारी आणि कलादृष्टीबरोबरच व्यापारी नजर या यांच्या अजोड गुणसंमिश्रणामुळेंच बुद्धि, कल्पना किंवा धाडस या बाबतींत आपल्या तोडीचें सामर्थ्य असणाऱ्या आपल्या सहकाऱ्यांच्यापुढें हे गेले. मिळालेला बारीक सारीक अनुभवहि अत्यंत दक्षतेनें टिपून

घेऊन त्याचा विचार पुढील धोरणाच्या प्रत्येक पदक्षेपाबरोबर करावयाचा ही यांची कार्यपद्धति. याबरोबरच रूढ झालेल्या धंद्यापेक्षा नवें औद्योगिक क्षेत्र शोधण्यावरील यांच्या कटाक्षामुळें हे जेथें गेले तेथें यशस्वी झाले. जो धंदा करावयाचा तो नाविन्यपूर्ण, सफाईदार व पहिल्या दर्जाचा करण्याचा यांच्या 'टाटा टच'मुळें बाजारांत यांच्या नांवाला एक विशिष्ट किंमत उत्पन्न झाली. हलक्यांत हलकें सूत व कापड तयार करून तें चीनच्या गळ्यांत मारण्याबाबत ज्या वेळीं मुंबईच्या गिरणीवाल्यांत चढाओढ लागली होती त्याच वेळीं यांची एम्प्रेस मिल हिंदुस्थानांत पहिल्या दर्जाचें कापड तयार करण्याचा प्रयत्न करीत होती. तीच गोष्ट यांच्या बंगलोरच्या इंडियन इन्स्टिटयूट ऑफ सायन्सची सांगतां येईल. अभिजातपणा हा यांच्या या प्रत्येक कृतीचा आत्मा होता.

परंतु एकमार्गीपणानें आपला धंदा चालू ठेवतांना आपल्या देशाच्या गरजांचा यांनीं आपणास कधींच विसर पडूं दिला नाहीं. आपल्या स्वतःच्या हिताच्या बरोबरीनें देशाच्या आवश्यकतांचा हे विचार करीत, हें यांच्या लोखंडी मालाचा कारखाना किंवा हायड्रो-इलेक्ट्रिक वर्क्सच्या योजना पटवून देण्यास समर्थ आहेत.

या आपल्या सर्व कल्पना पुढें व्यवस्थित चालविल्या जाव्यात या हेतूनें यांनीं आपल्या सर्व संस्थांच्या कारभाराची जी योजना ठरवून दिली आहे तीहि अशीच महत्त्वाची आहे. टाटा सन्स लि. ही यांनीं स्थापन केलेली संस्था सर्व इतर टाटा संस्थांची व्यवस्थापक आहे. या संस्थेचें पंच्याऐंशीं टक्के भांडवल टाटा कुटुंबांतील मंडळींनीं उभारलेल्या धर्मादाय ट्रस्ट्सच्या मालकीचें असल्यानें या निरनिराळ्या संस्थांना होणारा फायदा ट्रस्ट्सकडे म्हणजे पर्यायानें जनतेकडे पोंचविला जातो. अशा तऱ्हेनें येणारा पैसा परत त्याच्या योग्य स्थानीं पोंचविण्याची ही योजना आहे. मात्र टाटा उद्योगधंद्यांपैकीं प्रत्येक ठिकाणच्या कार्यकारी मंडळांत तज्ज्ञ माणसाचेबरोबर टाटा कुटुंबांतील कांहीं प्रातिनिधिक माणसें असावींत अशी यांची योजना आहे.

टाटा सन्स लि.चें सध्यांचें कार्यकारी मंडळः—

जे. आर. डी. टाटा (चेअरमन), लेडी रतन टाटा, सर सोराब सकलातवाला, सर होमी मोदी, एन्. एच्. टाटा, ए. डी. श्रॉफ, डॉ. जॉन मॅथाय, जे. डी. चॉक्सी.

यांच्या अशा योजनाबद्ध वागणुकीमुळें व व्यापक दृष्टिकोनामुळें टाटा हें नांव आज हिंदी बाजारपेठांत हुकमी एक्क्याचें स्थान पटकावून बसलें आहे.

टाटा उद्योगधंद्याची रूपरेषाः—

कमर्शिअल प्रेस (स्थापना स.१८६३)—टाटा उद्योगधंद्याची छपाई.

टाटा सन्स लि. (स. १८८७)—२१ हजार रु. सुरुवातीचें भांडवल; ७२ कोटि सध्यांचें भांडवल; अकरा लक्ष कामगार व सत्तावीस कोट रु. चें उत्पादन. इतर सर्व टाटा उद्योगधंद्यांची व्यवस्था.

टाटा टेक्स्टाइल ग्रुपः—

सेंट्रल इंडिया स्पिनिंग, वीव्हिंग अँड मॅन्युफॅक्चरिंग कंपनी लि. (१८७४, नागपूर), दि स्वदेशी मिल्स कं. लि. (१८८६, मुंबई), दि अहमदाबाद ॲडव्हान्स मिल्स लि. (१९०३, अहमदाबाद), दि टाटा मिल्स लि. (१९१३, मुंबई)—साडे सहा कोटि भांडवल, एकोणतीस हजार कामगार व २८६,००० चात्या व ७१०० माग यांच्या साहाय्यानें सुमारें साडे अकरा कोट रु. चें उत्पादन.

टाटा हायड्रो-इलेक्ट्रिक कंपनीज (१८९७)—साडे पंधरा कोटि रु. भांडवल, अडीच लक्ष अश्वशक्तीची उत्पत्ति.

इंडियन हॉटेल्स कंपनी लि. (१९०४):—ताजमहाल हॉटेल (त्याला जोडून असणाऱ्या ग्रीन्स हॉटेल व रेस्टॉरंटसह)— ३० लक्ष रु. सुरुवातीचें भांडवल, हॉटेलची सुरुवातीची किंमत बेचाळीस लक्ष रु. व आतां एक कोटीपेक्षां जास्त.

टाटा आयर्न अँड स्टील वर्क्स लि. (१९११)—साडे दहा कोटि रु. भांडवल, ६७००० कामगार व ११ लक्ष टन पिग आयर्न, १० लक्ष टन पोलादी पत्रे व पावणे आठ लक्ष टन इतर पोलादी मालाची उत्पत्ती.

टाटा ऑइल मिल्स कंपनी लि. (१९१८), टाटापुरम् (कोचीन) व शिवरी (मुंबई)–पंचाहत्तर लक्ष रु. भांडवल, १९४३-४४ ची विक्री दोन कोटि रु.; कोकोजेम आणि ५०१ व हमाम या साबणांचें उत्पादन.

टाटा एअर लाइन्स (१९३२)—या संस्थेच्या विमानांनीं ८ कोटि ९५ लक्ष मैलांचा प्रवास करून दीड कोटि प्रवासी व वीस लक्ष पौंड

टपालांची ने-आण केली ( १९४४ ). १४ विमानें असून पांच हजार मैलांचे रूट आंखले आहेत.

टाटा केमिकल्स लि. ( १९३९, मिठापूर, बडोदें )— समुद्रापासून रासायनिक क्षार काढून हिंदुस्थानांतील कारखान्यांना ते पुरविणें. भांडवल पांच लक्ष रु.

टाटा ट्रस्टसः—

जे. एन्. टाटा एन्डौमेंट फॉर हायर एज्युकेशन ( १८९५ सुमार )— हिंदी विद्यार्थ्यांना इंग्लंडमधील परीक्षा–विशेषतः आय. सी. एस. होण्यासाठीं पाठविणें, हा या ट्रस्टचा प्राथमिक हेतु होता. परंतु सध्यां शास्त्रीय शिक्षणावर या ट्रस्टचा विशेष रोख आहे.

इंडियन इन्स्टिटयूट ऑफ सायन्स, बंगलोर, म्हैसूर ( १९११ )— सुरवातीच्या एकतीस लक्षांच्या व आतांच्या नव्वद लक्षांच्या किंमतीच्या या संस्थेंत यांचा वांटा फार मोठा आहे. ही संस्था प्रामुख्यानें रसायन व इलेक्ट्रो-टेक्नॉलजीमधील संशोधन करते.

सर रतन टाटा चॅरिटीज ( १९१९ )—बासष्ट लाख रु.चा दानधर्म. गरिबी, औषधोपचार, शिक्षण इत्यादि दयायोग्य गोष्टींस मदत.

लेडी टाटा मेमोरियल ट्रस्ट ( १९३२ )— यांपैकीं एक पंचमांश हिंदी विद्यार्थ्यांनीं केलेल्या संशो- धनास द्यावयाचा असून बाकीचा हिस्सा रक्ताच्या Leucaemia या रोगावरील संशोधनास.

सर दोराब टाटा ट्रस्ट ( १९३२ )— नैसर्गिक आपत्तींपासून बचाव, औषधी व शास्त्रीय शाखेंत संशोधन व शैक्षणिक संस्था व विद्यार्थी यांना जात, धर्म, प्रांतनिरपेक्ष मदत करणें. आठ लक्ष रु. चा दानधर्म. या ट्रस्टतर्फे चालविण्यांत येणाऱ्या कांहीं संस्थाः—

टाटा इन्स्टिटयूट ऑफ सोशल सायन्सेस (१९३२)— सामाजिक प्रश्नांचा उलगडा.

टाटा मेमोरियल हॉस्पिटल ( १९४१ )— कॅन्सर हॉस्पिटल.

टाटा इन्स्टिटयूट ऑफ फन्डमेंटल रिसर्च—विज्ञान, गणित इत्यादींत संशोधन.

स्वतः जमशेटजी टाटा व नंतर त्यांच्या पावलांवर पाऊल टाकून त्यांच्या मुलांनीं उभारलेल्या या ट्रस्टस- मध्यें एक ठरीव धोरण आहे. गरीब किंवा खालच्या दर्जाच्या लाखों लोकांपेक्षां साधारण सुशिक्षित व उच्च दर्जाच्या थोडया लोकांची सोय यांचे हे निधी करतात. थोडी हालचाल करणाऱ्या हिंदी घटकांना मदत करूनच हिंदुस्थानचें पुनरुज्जीवन करणें शक्य आहे, बाकीच्या लोकांनीं आपलें पाहून घ्यावें, हें अनेक वेळां प्रतिपादन केलेलें आपलें मत यांनीं या निधींच्या योजनांचे वेळीं उपयोगिलें आहे.

**टाटा, सर दोराबजी जमशेदजी**—( जन्म स. १८५९ ऑगष्ट २७–मृत्यु स. १९३२ जून ३ ) मुंबईचे जगप्रसिद्ध व्यापारी, कारखानदार व दानशूर गृहस्थ. हे जमशेदजी टाटा यांचे चिरंजीव.

वयाच्या १६ व्या वर्षीच शिक्षणाकरितां हे युरोपांत गेले. चार वर्षे तिकडे राहून परत आल्यावर मुंबईच्या सेंट झेवियर कॉलेजांतून बी. ए. झाले ( १८८२ ). लहानपणीं खेळाकडे यांचा विशेष ओढा होता. क्रिकटचें तर यांना फारच वेड होतें. यांच्या मर्दानी खेळाच्या आवडीमुळें मुंबईंत बऱ्याच व्यायामसंस्था जन्मास आल्या.

वडिलांनीं आरंभलेल्या कापसाच्या प्रचंड धंद्यांत तर यांनीं यश मिळविलेंच. शिवाय त्यांच्या उद्योग- धंद्यांतील प्रतिष्ठेमुळें यांचा अनेक कंपन्यांशीं निकटचा संबंध आला. हळुहळू यांच्या धंद्याचा पसारा इतका वाढला कीं, उभ्या हिंदुस्थानांत यांची पेढी मोठी ठरली. इतकेंच नव्हे तर तिच्या शाखा लंडन, पॅरिस, न्यूयॉर्क, शांघाय इत्यादि जगांतील प्रमुख ठिकाणीं काढणें आवश्यक झालें. पण यांचें नांव अखंडपणें लोकांच्या पुढें ठेवणाऱ्या संस्था व कारखाने निराळेच आहेत. टाटा आयर्न ॲन्ड स्टील वर्क्स लि., जयशेदपूर हा प्रचंड कारखाना व बंगलोरचें रिसर्च इन्स्टिटयूट यांनीं वडि- लांच्या पश्चात् दहा वर्षांच्या आंत काढलें. तिसरी एक प्रचंड संस्था 'टाटा हायड्रो-इलेक्ट्रिक कंपनीज, लोणावळा' ही होय.

व्यापारसंशोधन आणि भूतदया यांबाबत प्रचंड धडाडी दाखवून आणि द्रव्यसाहाय्य करून यांनीं आपली मार्मिकता व्यक्त केली आहे. स्त्रीशिक्षणाकरितांहि यांनीं द्रव्यसाहाय्य केलें आहे. फार काय यांच्याकडून साक्षात् किंवा परंपरेनें साहाय्य झालें नाहीं अशी उपयुक्त संस्था क्वचित्च आढळेल.

यांच्या यशाची गुरुकिल्ली पाहावयाची तर ती यांच्या एकमार्गी व एकनिष्ठ आचरणांतच सांपडेल. यांना राज-

कारणांत पडण्याचा मोह कधींच झाला नाहीं. कदाचित् त्यांत क्षणिक लोकप्रियता यांना अधिक लाभली असती. पण यांनीं आपलें पाऊल आपल्या उद्योगक्षेत्राच्या बाहेर कधींच टाकलें नाहीं. एकाच कार्यात आपलें प्रचंड कर्तृत्व यांनीं वडिलांच्या पाऊलावर पाऊल टाकून वेचल्यानें हे उद्योगसम्राट् बनले. १९१० सालीं हे सर या पदवीनें गौरविले गेले.

**टाटा, सर रतन जमशेदजी**—(जन्म स. १८७१-मृत्यु स. १९१८) जगप्रसिद्ध हिन्दी व्यापारी, कारखानदार व दानशूर. जमशेदजी टाटा यांचे हे पुत्र. त्यांची सर्व बाबतींत परंपरा यांनीं पुढें चालविली.

स. १९१२ सालीं साक्‌ची येथें 'टाटा आयर्न ॲन्ड स्टील वर्क्स लि., जमशेटपूर' हा कारखाना यांनीं काढला.

पश्चिम घाटांतील पाण्याच्या जोरावर वीज निर्माण करून तिच्या साहाय्यानें मुंबईस जी औद्योगिक उन्नति झाली तिचें सारें श्रेय यांनाच द्यावें लागेल.

स. १९१२ मध्यें लंडन स्कूल ऑफ इकॉनॉमिक्स-मध्यें समाजशास्त्र व आधिभौतिकशास्त्र यांच्या शिक्षणाची स्वतंत्र व्यवस्था यांनीं केली. त्या वेळीच गरिबांच्या स्थितींत सुधारणा करण्याकरितां यांनीं 'रतन टाटा फंड' उभारला.

स. १९१६ सालीं यांना सर ही पदवी मिळाली. पुढें कॉर्नवाल येथें यांचा शेवट झाला.

**टॉड, कर्नल जेम्स**—(जन्म स. १७८२-मृत्यु स. १८३५) सुप्रसिद्ध इतिहास लेखक व संशोधक.

वयाच्या सत्राव्या वर्षी हे हिंदुस्थानांत आले (स. १७९९). देशी पायदळ सेनेंत लेफ्टनंटच्या हुद्यावर हे प्रथम लागले व चार वर्षांत दौलतराव शिंद्यांच्या दरबारांतील रेसिडेंट ग्रीम मर्सरच्या जवळ असणाऱ्या सैनिक तुकडीचे मुख्य हे बनले. याच वेळीं प्रवासांत यांनीं आपलें संशोधनाचें काम सुरू केलें आणि राजपुतान्याचा पहिला नकाशा तयार केला. पुढें इंग्रजांचा राजपुतान्यांतील राजाशीं तह झाला त्या वेळीं यांना तेथील पोलिटिकल एजंट नेमण्यांत आलें (स. १८१८-१८२२). यानंतर हे स्वदेशीं परत गेले.

वीर जातीच्या इतिहासाची यांना फार आवड होती. म्हणून यांनीं उदेपूर, जोधपुर, कोटा, बुंदी व सिरोही राज्यांत हिंडून अनेक शिलालेख, दानपत्र, नाणीं वगैरेंचा फार मोठा संग्रह केला. इतर ठिकाणचीहि माहिती यांनीं हरप्रयत्नानें एकत्र केली. जातांनाहि हे अनेक स्थळें पाहत मुंबईहून इंग्लंडला गेले. हे राजपुतान्यांत असतांना सरकारी शिपायांचे मुख्य कॅप्टन वाघ उत्तम चित्रकार होते. त्यांनीं यांच्याबरोबर प्राचीन मंदिरें, मूर्ति वगैरेंची चित्रें यांच्याकरितां तयार केलीं. तसेंच आरंभापासून शेवटपर्यंत ज्ञानचंद्र यति यांच्याबरोबर होते. त्यांना हे गुरु मानीत. त्यांच्याकडून यांनीं पृथ्वीराज रासो वगैरे ग्रंथ समजावून घेतले. यांनीं संस्कृत व इतर भाषांतील अनेक ग्रंथ, वीस हजार प्राचीन नाणीं, कित्येक शिलालेख व इतर इतिहास सामग्री इंग्लंडला आपल्याबरोबर नेली. लंडनला गेल्यावर राजपुतान्याचा कीर्तिस्तंभरूप 'ॲनल्स ॲंड ॲंटिक्विटीज ऑफ राजस्थान' हा ग्रंथ प्रसिद्ध केला (पहिला भाग स. १८२९ व दुसरा भाग-स. १८३२). यांत प्रथमच युरोपियन लोकांना रजपुतांची माहिती मिळाली. नंतर उदेपूर ते मुंबईपर्यंतच्या आपल्या प्रवासाचें वृत्त यांनीं 'ट्रॅव्हल्स इन वेस्टर्न इंडिया' या ग्रंथांत केलें. तो ग्रंथ यांच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झाला (१८३९).

सध्यांच्या कालांतील राजपुतान्याचा इतिहास लिहिणारे हे पहिले गृहस्थ होत. यांनीं अनेक ग्रंथ, ख्यात व फरिश्ता वगैरेंच्या अनेक तवारिखा यांच्या आधारानें राजपुतान्याचा इतिहास लिहिला. यांच्या वेळीं राजपुतान्यांत रेल्वे, तार, सडक व पत्रव्यवहार इत्यादि सध्यांचीं साधनें नव्हतीं. यांनीं उंट, हत्ती व घोडे यांच्या साहाय्यानें हजारों मैलांचा प्रवास करून माहिती मिळवली व साधनें तपासलीं. सध्यांचीं उपलब्ध साधनें तेव्हां नसतांना यांनीं केलेले प्रयत्न यांच्या अचाट बुद्धीची व परिश्रमाची साक्ष देतात. यांचा ग्रंथ सध्यांच्या शोधांमुळें कांहीं ठिकाणीं संशोधनार्ह असला तरी त्यामुळें यांच्या प्रयत्नाचा व ग्रंथाचा थोरपणा मान्य केल्याशिवाय राहतां येणार नाहीं.

**टिकेकर, रामचन्द्र विनायक**—(जन्म स. १८६२-मृत्यु स. १९०७) मराठींतील सुप्रसिद्ध लेखक.

ह्यांचा जन्म धारवाड येथें झाला. यांचें मूळ गांव रत्नागिरी जिल्ह्यांतील टिकें हें होय. मराठी पांच व इंग्रजी सहा इयत्ता एवढें यांचें शिक्षण झालें होतें. धारवाडास शाळेंत असतांनाच भाषा व इतिहास या विषयांचें त्यांनीं विस्तृत वाचन केलें होतें.

परंतु घरच्या गरिबीमुळें मध्येंच शाळा सोडून व आपला आवडता लेखनव्यवसाय सुरू करण्यापूर्वीच यांना 'सदर्न मराठा रेल्वे'च्या धारवाडच्या अकाउंट ऑफिसांत नोकरी करावी लागली. पुढें कांहीं आकस्मिक कारणावरून यांनीं नोकरी सोडून आपल्या आवडत्या लेखनकलेचें चीज करावयाचें ठरविलें. प्रथम प्रथम 'किरात' या टोपण नांवानें हे लेख लिहीत असत. पण नंतर यांनीं केसरींतून 'धनुर्धारी' या नांवानें लेख लिहिण्यास आरंभ केला. आजसुद्धां मराठी वाचक यांना याच नांवानें ओळखतात.

'वाग्बाण' व 'तूर्णीर भारती' ह्या सदरांखालीं स. १८८९ त हे लेख प्रसिद्ध करीत असत. सामाजिक, औद्योगिक, राजकीय, नैतिक वगैरे अनेक विषयांवर ह्यांची लेखणी कुशलतेनें चालत असे. 'इन्दुप्रकाश', 'ज्ञानप्रकाश' व 'जगद्धितेच्छु' ह्या पत्रांतहि राजकारण, व्यापार, शेतकी, अर्थशास्त्र, वीणकाम वगैरेवर ह्यांचे लेख येत असत. 'शेत, शेतकी आणि शेतकरी' या नांवाचीं कानडी व मराठी पाक्षिकें व 'व्यापार-उदीम' हें मराठी मासिक हे काढीत असत. बडोद्याच्या 'सयाजी ज्ञानमंजूषा' मालेपैकीं 'हिंदुस्थानचा व्यापारी भूगोल' व 'इन्दूर प्रकरणाची दुसरी आणि खरी बाजू' हीं पुस्तकें यांनीं लिहिलीं. 'स्वधर्मज्ञानप्रसार पुस्तक-माले'चीं १८ व 'लहान मुलांचें चिमकुलें वाचनालय' याचीं १५ इतकीं पुस्तकें यांनीं प्रसिद्ध केली आहेत. ह्यांतील 'पिराजी पाटील' व 'पश्चात्तापग्यांचा पांजरपोळ' हीं विशेष महत्त्वाचीं होत. 'वाईकर भटजी' (गोल्डस्मिथच्या व्हिकार ऑफ वेकफील्डचें रूपांतर) ही कादंबरी उत्कृष्ट वाङ्मयांत गणली जाते. ह्यांची भाषा शुद्ध, अभिमानोत्तेजक व आपुलकी दाखवणारी असे.

**टिळक, रे. नारायण वामन**— (जन्म स. १८६२-मृत्यु स. १९१९) मराठींतील सुप्रसिद्ध कवि.

यांचा जन्म रत्नागिरी जि. ता. दापोलीमधील करजगांवीं झाला. यांचीं पहिलीं सात वर्षें त्याच गांवीं गेलीं. यांचे अजोबा विरक्त वृत्तीचे धार्मिक गृहस्थ होते. वडिलांची बदली मोरवाडयास झाल्यावर हे कल्याणला येऊन राहिले (१८६९-७३). आईची उत्तरक्रिया करण्यास हे त्र्यंबकेश्वरला गेले त तिकडेच नाशिकास राहिले व तेथें गणेशशास्त्री लेले यांच्यापाशीं चार वर्षेपर्यंत जुन्या शास्त्रीय पद्धतीनें यांनीं संस्कृतचें शिक्षण घेतलें. १८७७च्या सुमारास यांनीं इंग्रजी शिक्षणास सुरुवात करून दोन वर्षांत पांच इयत्तांचा अभ्यास केला. पण यांच्याकडे धाकटीं चार भावंडें शिक्षणास येऊन राहिल्यानें यांना शाळा सोडून नोकरी पत्करावी लागली.

यानंतर यांनीं अकरा वर्षें महाराष्ट्रभर भटकण्यांत घालविलीं. पुराणिक, कीर्तनकार, कंपॉझिटर, शिक्षक वगैरे अनेक व्यवसाय केले. देशाची कळकळ व ईश्वराचा ध्यास अशीं यांचीं दोन सूत्रें होतीं. धर्मसंस्थापक होण्याची ऊर्मिहि यांना वरचेवर येई. शेवटीं १८९१ सालीं श्री. अण्णासाहेब बुटी यांच्याकडे नागपूर येथें संस्कृत ग्रंथांचे संशोधन व भाषान्तर करण्याच्या कामावर हे राहिले. तेथें धर्मचर्चेला वाहिलेलें 'ऋषि' नांवाचें मासिक यांनीं काढलें. पण यांच्या मतामुळें लवकरच तेथील यांचें आसन ढळलें. तेथून हे राजनंदगांवीं नोकरी-वर गेले व तेथें १८९५ च्या फेब्रुवारींत यांनीं बाप्तिस्मा घेतला. १८९५-१९१७ पर्यंत अहमदनगर व १९१७-१९ पर्यंतचा अखेरचा काळ यांनीं सातान्यास काढला. नगरच्या मिशनमध्यें राहण्यास सुरुवात केल्यावर यांच्या मानसिक चलबिचलीचा काळ संपला. आणि शेवटपर्यंत हे ख्रिस्ताचे परमभक्त म्हणून राहिले. मात्र यांना आपल्या मराठी भाषेचा व संस्कृतीचा विसर कधीं पडला नाहीं हें यांचें वैशिष्ट्य आहे.

यांचें वाङ्मयः—१ टिळकांची कविता-संग्राहक व प्रकाशक-उजगरे, २ अभंगाञ्जलि, ३ ब्रिटानिया, ४ माझा ओसाड पडलेला गांव, ५ बापाचे अश्रु, ६ वनवासी फूल, ७ आनंदीबाई, ८ आमच्या विधवा, ९ ख्रिस्तजयंती, १० पवित्र क्रुसाचा राजमार्ग, ११ भजनसंग्रह, १२ बोध आणि रंजन, १३ शीलं परं भूषणम्-नाटिका, १४ यशवंतराव महाराजांचें वर्णन, १५ ख्रिस्तायन (अपूर्ण).

यांची कविता अनुकरणात्मक असली तरी साधी व प्रासादिक आहे. सरळ पण मधुर भाषा लिहिणारा यांच्यासारखा कवि विरळा. अलंकारांच्या उपयोगाच्या बाबत यांचें कौशल्य श्रेष्ठ प्रतीचें ठरेल. समर्पक व बेताचे अलंकार, प्रसाद, तळमळ व विस्तार यांमुळें यांचें स्थान मराठी कवींत अग्रभागीं आहे. यांच्या पत्नी लक्ष्मीबाई टिळक यांनीं लिहिलेल्या आत्मचरित्रानें यांच्या स्वभावविशेषाची चांगली कल्पना येते. यांच्या काव्यापेक्षांहि त्या आत्मचरित्रानें यांचा परिचय दीर्घकाळ स्मरणांत राहील.

**टिळक, लक्ष्मीबाई**—( जन्म स. १८७३-मृत्यु स. १९३६ ) कवयित्री व व्यक्तिस्मृति-लेखिका.

कवि नारायण वामन टिळक यांच्या या पत्नी. टिळकांच्या सहवासामुळें कांहीं फुटकळ काव्यरचना यांचेकडून घडली. पतीचें अपूर्ण राहिलेलें 'ख्रिस्तायन' नांवाचें दीर्घकाव्य अनेक वर्षें खर्चून ओघ बिघडूं न देतां यांनीं पूर्ण केलें. पण चार खंडात्मक असणारीं यांचीं 'स्मृति-चित्रें' मराठी वाङ्मयांत स्वतःप्रमाणें यांचें नांवहि अमर करणारा ग्रंथ होत. या स्मृति-चित्रांत भाषेचा साधेपणा आणि विचारांचा प्रांजलपणा हे अत्युत्कट गुण आहेत. हुबेहूब स्वभाववर्णनाला सत्याची उत्कृष्ट बैठक दिली आहे; लेखनकलेचा हा एक उत्कृष्ट नमुना आहे. या ग्रंथाच्या वाचनानें तत्कालीन लोकस्थितीच्या ज्ञानाबरोबर उत्कृष्ट करमणूकहि होते. हा ग्रंथ यांनीं १९३४ ते १९३६ पर्यंत पूर्ण केला.

**टिळक, लोकमान्य-बाळ गंगाधर**—( जन्म स. १८५६ जुलै २३-मृत्यु स. १९२० ऑगस्ट १ ) हिंदुस्थानांतील राजकीय असंतोषाचे जनक, थोर राजकारणी मुत्सद्दी, वृत्तपत्रकार, वेदादि प्राचीन वाङ्मयाचे अभ्यासक व संशोधक, आणि 'स्वराज्य माझा जन्मसिद्ध हक्क आहे' या मंत्राचे द्रष्टे.

यांचा जन्म रत्नागिरी जिल्ह्यांत चिखली गांवीं झाला. यांचे दुय्यम व उच्च शिक्षण पुणें येथें झालें. हे पुणें डेक्कन कॉलेजांतून बी. ए. ( १८७७ ) व पुढें एलूएल. बी. ( १८७९ ) झाले. यांनीं १८८० सालीं पदवी घेऊन सनदहि काढली होती. पण कॉलेजांत असल्यापासूनच कांहीं सार्वजनिक कार्य करण्याचा यांचा व गोपाळराव आगरकरांचा संकल्प ठरला होता. त्याप्रमाणें हे १ जाने. १८८० रोजीं विष्णुशास्त्री चिपळुणकरांच्या नेतृत्वानें सुरू झालेल्या न्यू इंग्लिश स्कूलमध्यें शिक्षक म्हणून दाखल झाले. शाळा सुरू झाल्यानंतर एक वर्षानें केसरी व मराठा हीं मराठी व इंग्रजी साप्ताहिकें सुरू करण्यांत आलीं. यांच्याकडे 'मराठ्या'चें संपादकत्व आलें. हे केसरींतहि मधूनमधून कायदा व धर्मशास्त्र यांसंबंधीं लिहीत असत.

कोल्हापूरच्या छत्रपति शिवाजीमहाराजांना अत्यंत वाईट रीतीनें वागविलें जातें म्हणून त्यांचे कारभारी रा. ब. महादेव वासुदेव बर्वे यांच्या विरुद्ध कडक आरोप करणारा पत्रव्यवहार यांनीं प्रसिद्ध केला. त्यामुळें यांच्यावर त्यांनीं बेअब्रूची फिर्याद केली. पण पत्र व्यवहारांतील आरोप सिद्ध न करतां आल्यानें यांनीं माफी मागितली; तरी यांना चार महिन्यांची साध्या कैदेची शिक्षा झाली. या यांच्या शिक्षेमुळें लोकांतच नव्हे तर राजामहाराजांत सुद्धां संकटकालीं उपयोगी पडणारे म्हणून यांचा सर्वत्र बोलबाला झाला आणि यांच्याकडे लोक अगदीं वेगळ्या दृष्टीनें पाहूं लागले ( १८८२ ).

यांच्या शाळेचें आकर्षण पहिल्या दिवसापासूनच लोकांत विशेष होतें. पुढें विष्णुशास्त्री वारले तरी तें काम इतर मंडळींनीं धडाडीनें पुढें चालविण्याचें ठरविलें. १८८४ सालीं 'डेक्कन एज्युकेशन सोसायटी' अस्तित्वांत आली व तिच्यातर्फे 'न्यू इंग्लिश स्कूल' चालविण्याचें व एक स्वतंत्र कॉलेज स्थापण्याचें निश्चित करण्यांत आलें. २ जाने. १८८५ रोजीं 'फर्ग्युसन कॉलेज' उघडण्यांत आलें. तेथें गणित व संस्कृत हे विषय हे शिकवीत. 'मेघदूत' व भर्तृहरीचें 'नीतिशतक' शिकविण्यांत यांचा हातखंडा असे. पण पुढें सोसायटीचें धोरण व कारभार यांबाबत मतभेद होऊन यांनीं तिचा राजीनामा दिला व केसरी व मराठा हीं पत्रें आपल्या ताब्यांत घेऊन स्वतंत्र आयुष्यक्रमास सुरुवात केली ( १८९० ). हीं पत्रें ताब्यांत घेतांना यांना त्यांवर असलेला सात हजारांचा कर्जाचा बोजाहि स्वीकारावा लागला. हें कर्ज फिटण्यास दहा वर्षें लागलीं. शिवाय हीं पत्रें चालवून उपजीविकेचा प्रश्न सुटत नव्हताच. उपजीविकेकरितां यांना कायदे-शिक्षणाचा वर्ग चालवावा लागला. त्यामुळें यांचें कायद्याचें ज्ञान उत्कृष्ट असे. विशेषतः हिंदु कायद्यावरील यांचीं व्याख्यानें फारच उत्कृष्ट होत. यासंबंधींच्या यांच्या अनेक योजनांना कच्च्या टाचणापलीकडे ग्रंथरूपानें परिणत होण्याचा योग आला नाहीं. हे कायद्याचे वर्ग प्लेगमुळें पुढें बंद पडले ( १८९७ ).

डेक्कन एज्युकेशन सोसायटींतून निवृत्त झाल्यावर, लोकांचें लक्ष आपल्याकडे ओढून घेणारी यांची पहिली कामगिरी 'क्रॉफर्ड प्रकरण' होय ( १८८८-८९ ). क्रॉफर्ड नांवाच्या गोऱ्या अधिकाऱ्यानें लोकांकडून पैशाचा अपहार केला. त्यांत मामलेदार वगैरे हाताखालच्या अधिकाऱ्यांमार्फतहि पुष्कळ व्यवहार झाले. त्यांत साहेबमजकूर दोषी असतां शिक्षेवांचून सुटले आणि बिचाऱ्या मामलेदारांना माफीचें आश्वासन असूनहि बडतर्फ होण्याची वेळ आली. हा अन्याय सहन न होऊन यांनीं मामलेदारांची बाजू घेतली. आणि अर्ज लिहून, सभा भरवून त्यांची बाजू पार्लमेंटपर्यंत मांडली व मुंबई सरकारकडून 'मामलेदार्स इंडेम्निटी' ॲक्ट पास करवून घेतला. त्यामुळें मामले-

दारांना न्यायाच्या कामीं सरकारला मदत केल्याबद्दल जन्मभर ठराविक पगार मिळाला व त्यांच्यावरील दोष दूर झाला. तेव्हां कोणतीहि बाजू धैर्यानें घेऊन सरकारशींसुद्धां कायदेशीर लढा देणारे म्हणून यांचें नांव सर्वतोमुखीं झालें.

यानंतरची यांची मोठी चळवळ संमति बिलाच्या वेळची होय ( १८९१ ). हा प्रश्न सामाजिक व धार्मिक असल्यानें समाजांतील नव्या जुन्या मतांच्या लोकांत या वेळीं मतभेद उत्पन्न झाला. परस्परांच्या संमतीचें वय वाढविण्यास तात्त्विकदृष्ट्या यांची मान्यता होती. पण हे व सुधारक यांच्यांतील वादाचा मुख्य मुद्दा सरकारनें धार्मिक विषयांत हात घालूं नये, सुधारणा इष्ट असली तरी ती लोकमतानें घडवून आणावी एवढाच होता. या वादामुळेंच यांचें नांव मुंबई प्रान्ताबाहेरहि प्रथम प्रसिद्धीस आलें. याच वेळीं यांच्या सर न्या. रानडे व डॉ. भांडारकरांच्यासारख्यांशीं वादाच्या चकमकी झडल्या. त्यांत यांची कुशाग्र बुद्धि, संस्कृत ग्रंथांचें नि धर्मशास्त्राचें परिशीलन आणि वाद-विवादाची उत्कृष्ट हातोटी निदर्शनास आली, आणि बहुजन समाजाला हे आपले प्रतिनिधि असा साक्षात्कार होऊं लागला.

१८९२-९४ सालीं हिंदु-मुसलमान लोकांमधील तंटे विकोपास गेले. अशा प्रसंगीं सरकारचें धोरण पक्षपाती असतें, ही गोष्ट यांनीं पुराव्यानें मांडण्याचा तडफदार प्रयत्न केला. हिंदूंचा स्वाभिमान जागृत करून त्यांच्यांत जूट निर्माण करण्याकरितां शिवाजी उत्सव सुरू करण्याची आणि गणेशोत्सवाला सार्वजनिक रूप देण्याची यांना आवश्यकता वाटली.

१८९४ सालीं बडोद्याचे वासुदेव सदाशिव बापट सेटलमेंट कमिशनरचे मदतनीस यांच्या चौकशीकरितां ब्रि. सरकारकडून कमिशन नेमण्यांत आलें. त्या वेळीं संकटांत पडलेले बापट व पर्यायानें बडोदेंसरकार यांच्यावरचा आरोप धुऊन टाकण्याकरितां यांनीं मित्र-कार्य म्हणून बापटांच्यातर्फे खटपट केली. या प्रकरणांत फारच मोठमोठीं माणसें होतीं. प्रथम बापटांना जरी सहा महिन्यांची शिक्षा व दहा हजार रुपये दंड झाला तरी पुढें महाराज विलायतेहून आल्यावर हें प्रकरण त्यांनीं शिक्षा माफ करून संपवून टाकलें.

याच सुमारास सर्व हिंदुस्थानांत पसरलेल्या दुष्काळामुळें व त्याचे पाठोपाठ महाराष्ट्रांत प्रवेश करणाऱ्या प्लेगमुळें सरकारविरुद्ध लोकांत जागृति करण्याची संधि यांना मिळाली. दुष्काळ कमी करण्याचे बाबतींत सरकार तर केव्हांच अपेशी ठरलें होतें. त्यांतच पुण्याच्या सार्वजनिक सभेशीं सहकार करण्यास नकार देऊन हिंदु प्लेग हॉस्पिटल सुरू केल्यानें लोकांना सरकारबद्दल अविश्वास वाटूं लागला आणि हॉस्पिटलमधील वागवणुकीनें लोक खडबडून जागे झाले. या वेळीं सरकारच्या या दुष्कृत्यांचा पाढा केसरींतून वाचण्याचें यांचें कार्य सतत चालू होतें. त्यामुळें सरकारविरुद्ध त्वेषाचें वातावरण सर्वत्र उत्पन्न झालें. त्याचा स्फोट गणेशखिंड रस्त्यावर मि. रँड व ले. आयर्स्ट यांना गोळी घालून ठार मारण्यानें झाला. त्याबद्दल दामोदर हरि चापेकर व त्याचा भाऊ बाळकृष्ण यांना फांशीं देण्यांत आलें व सरदार नातू बंधु यांना विनाचौकशी अटकेंत ठेवण्यांत आलें. जहालपक्षाचा जन्म येथूनच झाला असें डॉ. बेझंट यांचें म्हणणें होतें. पण या घटनेमुळें एका नव्या दृष्टिकोनांतून सरकार यांचेकडे पाहूं लागलें आणि शिवाजी उत्सवांत शिवाजी-महाराजांचा काल्पनिक संदेश म्हणून कांहीं कविता वाचून दाखविल्याबद्दल व उत्सवांतील भाषणाचा वृत्तान्त प्रसिद्ध केल्याबद्दल यांचेवर खटला होऊन यांना अठरा महिन्यांची शिक्षा देण्यांत आली ( १८९७ सप्टें. १४ ). पण प्रो. मॅक्समुलर, सर विल्यम हंटर, सर रिचर्ड गार्थ, मि. विल्यम केन वगैरेंनीं केलेल्या विनंतिअर्जावरून यांना बारा महिन्यांनीं सोडून देण्यांत आलें.

हिंदुस्थानांतील अशा स्वरूपाचा हा पहिला राजद्रोहाचा खटला होता. यामुळें यांच्याबद्दल हिंदुस्थानभर सहानुभूति उत्पन्न झाली. खर्चाकरितां परस्पर निधि जमा झाले, यांना व्यापारी जामीन राहिले, कलकत्त्यास जमलेल्या वर्गणीच्या मदतीनें कोर्टांत दाखल झालेल्या बॅरिस्टरानें कोर्टांत यांचा बचाव केला, सरकारला राजद्रोहाच्या कायद्याची भाषा दुरुस्त करावी लागली आणि सरकारबद्दल खरो-खरच लोकांत अनादर वाढून यांचें पुढारीपण अधिक प्रभावशाली होत चाललें.

१८९९ च्या राष्ट्रसभेंत मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड सँढर्स्ट यांच्या निषेधाचा ठराव मांडावयास हे निघतांच यांच्याविरुद्ध काहूर उठलें. नाताळच्या सुट्टींत अर्जे विनंत्यांचें राजकारण करणाऱ्यांना यांच्या या सरकार-विरोधाचा प्रकार अगदीं नवीन वाटला. सरकारी दुष्कृत्यांचा पाढा वाचून अतिशयोक्ति असल्यास दाखवा

अशी यांनीं पृच्छा करतांच रमेशचंद्र दत्त या सेवानिवृत्त अधिकाऱ्यानें अध्यक्षपद सोडण्याची धमकी दिली.

लॉर्ड सँढर्स्ट जाऊन त्यांचे जागीं लॉर्ड नॉर्थकोट हे गव्हर्नर म्हणून मुंबईस येण्याच्या वेळीं इंग्लंडमधल्या 'ग्लोब' पत्रानें त्यांना 'टिळकांच्या तंत्रानें चालणाऱ्या खुनाच्या मोहिमेवर नजर ठेवण्याचा' उपदेश केला (१८९९ ऑक्टो. २८). मुंबईच्या टाइम्सनें त्याचा उतारा घेतला. तेव्हां यांनीं बेअब्रूचे खटले भरून दोन्ही पत्रांच्या संपादकांना माफी मागण्यास भाग पाडलें (१९०० नवं. २४).

पुढें यांचे मित्र बाबा महाराजांच्या विधवा तरुण पत्नी ताईमहाराज यांनीं प्रथम जगन्नाथ महाराजांना दत्तक घेतलें आणि नंतर कोल्हापूरचे बाळा महाराज यांना दत्तक घेतलें. तेव्हां दोन पक्ष पडून यांच्यावर खोटी साक्ष देणें, बनावट कागद करणें वगैरे आरोप येऊन यांना अठरा महिने सक्तमजुरी व हजार रुपये दंड अशी शिक्षा झाली (१९०३ ऑगस्ट २४). पण पुढें हे अपिलांत निर्दोषी सुटले (३ मार्च १९०४). तथापि त्यासंबंधीं दिवाणी प्रकरण यांना मृत्यूपर्यंत पुरलें.

यांचें राजकारणांतील स्पष्ट व सडेतोड बोलण्याचें धोरण आणि बहुजन समाजाला प्रत्यक्ष कार्याभिमुख करण्याची वृत्ति सरकारला व जुन्या पुढाऱ्यांना रुचेनाशी झाली. यांनीं विधायक कार्यांत स्वदेशीचा समावेश केला आणि बंगालच्या फाळणीनंतर ब्रिटिश मालावर संपूर्ण बहिष्काराचें कलमहि यांनीं त्याला जोडलें. स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण व स्वराज्य या चतुःसूत्रीनें कलकत्त्याच्या राष्ट्रीयसभेंत यांच्या कार्यक्रमाची स्पष्टता झाली (१९०६). पण या ठरावामुळें मवाळजहालांतील तेढ विकोपास गेली. सुरतेस डॉ. राशबिहारी घोष यांचें नांव राष्ट्रसभेच्या अध्यक्षपदाकरितां सुचविलें असतां हे तहकुबीची सूचना मांडण्याकरितां पुढें आले तेव्हां सभेंत दंगल झाली आणि सभा मोडली. पुढें नेमस्तांनीं स्वतंत्र घटना करून यांच्या मताच्या लोकांना राष्ट्रसभेंत येतां येऊं नये अशी व्यवस्था केली. पण इकडे यांनीं राष्ट्रसभेनें कलकत्त्यास मान्य केलेल्या चतुःसूत्रीचा अत्यंत तडफेनें पुरस्कार करून राष्ट्रांत नवचैतन्य उत्पन्न केलें. पुढें स्वातंत्र्याभिमुख तरुणांकडून बंगाल्यांत अत्याचार घडले आणि यांना राजद्रोहाच्या आरोपावरून सहा वर्षांची शिक्षा देण्यांत येऊन मंडाल्याच्या किल्ल्यांत ठेवण्यांत आलें (१९०८).

तेथें यांनीं आपला 'गीतारहस्य' हा अमूल्य मराठी ग्रंथ लिहिला. १९१४ सालीं यांची सुटका झाली. सुटका होतांच यांनीं आपल्या पक्षाची पुनर्घटना केली. स्वराज्याची मागणी नेटानें करण्याकरितां 'होमरूल-लीग' ही स्वतंत्र संस्था काढली (१९१६ एप्रिल २३). यांच्या वयाला साठ वर्षें झालीं म्हणून उत्सव होऊन एक लाख रुपयांचा निधि यांना अर्पण करण्यांत आला, तो यांनीं राष्ट्रकार्यार्थ परत केला. राष्ट्रसभेंत पुनः प्रवेश करून महायुद्धामुळें उत्पन्न झालेल्या परिस्थितीचा फायदा घेण्याकरितां हिंदुमुसलमान ऐक्याचा लखनौ-करार यांनीं घडवून आणला (१९१६ डिसें. ).

१९१८ सालीं सर व्हॅलेन्टाइन चिरोल यांनीं लिहिलेल्या Unrest in India या ग्रंथांत यांना राजद्रोही म्हटलें म्हणून यांनीं त्यांच्यावर इंग्लंडमध्यें बेअब्रूची फिर्याद केली. पण ती अंगावर येऊन यांना खर्चाचा भूर्दंड भरावा लागला. त्या वेळीं इंग्लंडमध्यें असतां लेबरपार्टीला विश्वासांत घेऊन यांनीं तिला तीन हजार पौंड दिले. यांच्या पूर्वीच्या राजकीय पक्षाचा तेथील लिबरल पार्टीवर विश्वास होता.

याच सुमारास मॉंटफर्ड रिपोर्ट प्रसिद्ध झाला. तो निराशाजनक असल्याचा शेरा अमृतसर राष्ट्रसभेनें मारला (१९१९). यांनीं आपण प्रतियोगी सहकारितावादी असल्याचें जाहीर केलें. चालू असलेल्या असहकारितेच्या चर्चेत यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला नाहीं. उलट नवीन सुधारणांचा फायदा घेण्याच्या दृष्टीनें 'कॉंग्रेस डेमोक्रॅटिक पक्षा'ची स्थापना करून निवडणुकी लढविण्याचा कार्यक्रम आंखला (१९२०). पण थोड्या दिवसांच्या आजारानें हे मुंबईंत सरदारगृहांत दिवंगत झाले.

यांच्या बुद्धींत विलक्षण निर्णय असे. चलबिचल किंवा अर्धवटपणा यांना ठाऊक नव्हता. वादविवाद किंवा सरकारविरोध यांत यांच्या बुद्धीला तेज चढे. हे निर्भय लढाऊ वृत्तीचे होते.

त्याग व दुःख या दोन्ही बाबतींत हे पूर्ण बेफिकीर असत. गरीब नि हीनदीन यांच्या भावनांशीं हे समरस होत व त्यांशीं परिचय करून घेत. जनतेला परमप्रिय असणाऱ्या भावनांचें सुसंगत व सडेतोड समर्थन करण्याच्या यांच्या हातोटीमुळें लोकांना हे आपले प्रतिनिधि वाटत. हिंदुस्थानांतील राजकारणाला चढाईचें स्वरूप देऊन त्याला बहुजनापर्यंत पोचविण्याचें व त्याकरितां

आयुष्य वेचणारे कार्यकर्ते निर्माण करण्याचें कार्य यांनीच प्रथम केलें.

यांचे महत्त्वाचे ग्रंथ हे ऐन राजकारणाच्या दंगलींत किंवा तुरुंगांत असतां उत्पन्न झालेले आहेत, यावरूनहि यांच्या वृत्तीची कल्पना येईल. यांच्या राजकारणानें यांना कांहीं काल हिंदुस्थानांत अनभिषिक्त राजाचा मान प्राप्त झाला, आणि यांनीं लिहिलेल्या संशोधनात्मक शास्त्रीय ग्रंथानीं तर यांचें नांव जगांत अजरामर करून टाकलें.

आपल्या ओरायन ऊर्फ मृगशीर्ष या ग्रंथांत संपात बिंदु एक नक्षत्र मागें जाण्यास लागणारा ९६० वर्षे हा काल लक्षांत घेऊन उत्तरा-भाद्रपदा, रेवती, अश्विनी, भरणी, कृत्तिका, रोहिणी व मृग अशा क्रमानें तो मृगशीर्षावर सुमारें पांच हजार वर्षांपूर्वी असला पाहिजे; व ऋग्वेदांत मृगशीर्षावर संपात असल्याचें स्पष्ट विधान असल्यानें ऋग्वेदाचा तो काळ ठरतो असें यांनीं प्रथमच सिद्ध केलें आणि ऋग्वेदाच्या कालाचा प्रश्न सोडविला.

तसेंच मनुष्यांच्या उत्तर ध्रुवावरील मूळ स्थानाची कल्पना प्रथम डॉ. वॉरेन यांनीं 'पॅराडाइज फाउंड' या ग्रंथांत मांडली होती. ती आर्यांपुरती मर्यादित स्वरूपांत 'आर्क्टिक होम इन दि वेदाज्' या ग्रंथांत यांनीं वेद व अवेस्ता यांतील बलवत्तर प्रमाणांचे साहाय्यानें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला.

यांचा मराठींतील 'गीतारहस्य' हा ग्रंथ अनेक दृष्टींनीं अपूर्व आहे. त्यांतील लोकसंग्रहार्थ ज्ञानोत्तर कर्मच करीत राहण्याचा सिद्धान्त नवीन आहे. शंकराचार्यांचा मायावाद, अद्वैत वगैरे सर्व मान्य करून यांनीं हा सिद्धान्त मांडण्याचा प्रयत्न केला हें विशेष होय. मात्र यांत शास्त्रीय संशोधनाबरोबरच लोकांना कार्यप्रवृत्त करण्याचाहि हेतु स्पष्ट दिसतो.

यांनीं ईश्वरकृष्णाची लुप्त झालेली एक कारिका शोधून काढली ईश्वरकृष्णाच्या कारिकांवर गौडपादांचें भाष्य आहे. त्यांतील ६१ व्या कारिकेवरील भाष्य एका कारिकेवरील नसून दोन कारिकांवरील आहे असें त्यांतील प्रतीकावरून ठरतें. पण तशी कारिका मात्र मुळांत उपलब्ध नाहीं. यांनीं भाष्यांतील प्रतीक शब्द घेऊन पुढीलप्रमाणें आर्या तयार केली.

> कारणमीश्वरमेके ब्रुवते कालं परे स्वभावं वा ।
> प्रजाः कथं निर्गुणतो व्यक्तः कालः स्वभावश्च ।।

आणि ती कमी पडणाऱ्या कारिकेऐवजीं सुचविली. ईश्वरकृष्ण हा निरीश्वरवादी असल्यामुळें कोणा तरी ईश्वरवाद्यानें ही कारिका काढून टाकली असावी, पण त्या कारिकेवरचें भाष्य मात्र काढून टाकण्याचें राहून गेल्यामुळें ती कारिका आपणास बसवितां आली, असें यांनीं म्हटलें आहे.

यांचें मराठी वाङ्मयः—

१ वेदकालनिर्णय १९०८, २ आर्य लोकांचें मूलस्थान १९१०, ३ गीतारहस्य १९१५ जून, ४ केसरींतील लेख-खंड १-४, ५ मद्रास, सिलोन व ब्रह्मदेश येथील प्रवास १९००, ६ स्वराज्यावरील मोहीम-व्याख्यानें भाग १-४, ८ हिंदुधर्माचें स्वरूप-लक्षण.

यांपैकीं पहिले दोन ग्रंथ यांच्या इंग्रजी पुस्तकांची श्री. के. ल. ओगले यांनीं केलेलीं भाषान्तरें होत. याशिवाय यांच्या आठवणी व सूक्ति यांचे अनेक संग्रह श्री. स. वि. बापट यांनीं प्रसिद्ध केले आहेत.

इंग्रजीः—( 1 ) The Orion or Researches into the Antiquity of the Vedas ( 1893 ), ( 2 ) The Arctic Home in the Vedas (1903), ( 3 ) Chaldian Vedas ( 1918 ), (4) Missing Karika in Sankhyas, ( 5 ) Vedanga-Jyotish. इ.

**टेकाडे, आनंदराव कृष्णाजी**—(जन्म स.१८९०) सुप्रसिद्ध मराठी कवि.

हे नागपूरचे राहणारे. काण्व ब्राह्मण. यांचें शिक्षण बेताचें झालें असलें तरी यांना मराठींत कविता करण्याचा नाद लहानपणापासून आहे. 'आनंदगीत' नांवानें यांच्या कवितांचे अनेक संग्रह प्रसिद्ध झाले आहेत. प्रसाद हा यांच्या काव्याचा विशेष आहे. जिव्हाळा व साधी भाषा यांमुळें यांची कविता लोकांना फार आवडते. विश्वविद्यालयानें यांच्या कविता-संग्रहास परीक्षेकरितां नेमून यांचा गौरव केला. आपल्या कविता साध्या व रसाळ पद्धतीनें जाहीर प्रसंगीं म्हणून आधुनिक कविता-गायनाचा कार्यक्रम लोकप्रिय करण्याची प्रथा यांनींच प्रथम सुरू केली. मधुरमीलन व मथुरा हीं यांचीं दोन नाटकें प्रसिद्ध आहेत.

**टेसिटोरी, डॉक्टर**—( मृत्यु स. १९१८ ) राजस्थानी व डिंगल भाषांत गोडी वाटणारे इटालियन गृहस्थ.

बंगाल एशियाटिक सोसायटीनें यांना राजस्थानी व डिंगल भाषेंतील ग्रंथ शोधण्याकरितां नेमलें होतें. यांनीं जोधपुर व बिकानेर राज्यांत राहून डिंगल भाषेंतील ग्रंथांची तीन विभागांत सूचि तयार केली व ती बंगाल एशियाटिक सोसायटीनें प्रसिद्ध केली. याशिवाय डिंगल भाषेंतील खडिया जगाकृत 'रतनसिंह री वचनिका', बिकानेरचे राठोड पृथ्वीराजकृत 'वेलि क्रिसन रुक्मणि री' व बिठूसुजाकृत 'राव जयतसी रो छंद' हे तीन ग्रंथ यांनीं संपादित करून प्रसिद्ध केले. यांशिवाय आपल्या दौर्‍याचे वार्षिक वृत्तान्त, राजपुतान्यांतील कांहीं स्थलांचें वर्णन व शिलालेखहि यांनीं प्रकाशित केले.

**टेंबे, गोविंद सदाशिव**—(जन्म स. १८८१) महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध पेटीवादनपटु व अष्टपैलु रसिक.

महाराष्ट्राच्या कलाजीवनांत यांचा प्रथम प्रवेश पेटीवादनांतील कौशल्यामुळें झाला. कै. भास्करबुवा बखल्यांचें शिष्यत्व व बालगंधर्वांचा स्नेह यांचे साहाय्यानें नवेनवे स्वर (शास्त्रीय गायकी) प्रगट करून श्रोत्यांच्या मनाचा ठाव घेण्याची यांची कला रसिकांच्या निदर्शनास आली. पेटीवादनाच्या बाबत यांचे सुरुवातीचे आदर्श श्री. भाचुभाई भंडारे हे होत. कै. बखल्यांच्याप्रमाणें यांच्या सहवासामुळें बालगंधर्वांच्या गाण्याला आधुनिक नवें वळण मिळालें. मौजुद्दीनखांची ठुंबरीहि यांच्या पेटींतून बखलेबुवांनीं संग्रहित केली.

मानापमान नाटकानें मराठी रंगभूमीवर संगीताचें अगदीं नवें युग सुरू केलें. त्या नाटकाकरितां आपल्याजवळच्या उत्कृष्ट चाली यांनीं पुरविल्या होत्या. तें नाटक रंगभूमीवर आलें आणि त्यांतील धैर्यधराची भूमिका करणारे गायक नट नारायण दत्तात्रय जोगळेकर हे वारले (१५ नवं. १९११). त्यांचीं कामें करण्याकरितां किर्लोस्कर मंडळींत यांची योजना झाली. यांनींहि त्यांचीं सर्वच कामें नीटनेटकीं केलीं. रूप व बुद्धीबरोबरच नाटकांत कसें गावें हेंहि यांना समजत होतें. फक्त मधुर आवाजाची कमतरता होती. तथापि किर्लोस्करांतून गंधर्व मंडळी निघाली तेव्हां हे नट व मालक अशा दोन्ही नात्यांनीं तीमध्यें समाविष्ट झाले. पुढें यांनीं गंधर्व मंडळीचा संबंध सोडला.

पण हे कर्तबगार असल्यानें लौकरच यांनीं 'शिवराज मंडळी'ची उभारणी केली, आणि शंकरराव सरनाईकांसारख्यांचा त्या मंडळींत समावेश केला. त्याबाबत यांना इतकें यश लाभलें कीं, गंधर्वांचें 'स्वयंवर' ज्या वेळीं यशस्वी झालें, त्याच वेळीं शेजारच्या रंग मंदिरांत 'चित्रवंचना' नाटकाचे प्रयोग यांनीं यशस्वी केले. परंतु पुढें सरनाईक यांच्या संस्थेंतून फुटून होळकरांच्या यशवंत मंडळींत सामील झाल्यानंतरहि यांनीं मुंबईचे सुप्रसिद्ध गुर्जर कवि मणिशंकर त्रिवेदी (पागल) यांच्याकडून 'सिद्ध-संसार' हें हिन्दी नाटक महाराष्ट्रीय साच्यांत लिहून घेतलें, आणि त्याचे ओळीनें पाऊणशें प्रयोग इंदुरांत झाले. त्यांतील मच्छिंद्राची यांची भूमिका चांगली होत असे. पण तो गुर्जर कविसुद्धां यशवंत मंडळीला मिळाला आणि यांच्या नाटकी जीवनावर पडदा पडला.

यांचें 'पट-वर्धन' नाटक (१९२०) व गडकर्‍यांच्या कल्पनेवरील 'तुलसीदास' (१९२८) हीं नाटकें यशवंत कंपनीनें प्रथम रंगभूमीवर आणलीं. पुढें रघुवीर सावकारांनीं यांचें रूपान्तरित 'वरवंचना' बसविलें. नंतर 'गंभीर घटना' हें रूपान्तरित विनोदी नाटक समर्थ मंडळीनें पुढें आणलें (१९२१). सदरच्या कालांत यांनीं आपला बराच काल म्हैसूरच्या युवराजांच्या नोकरींत घालविला.

स. १९३५ मध्यें पुणें येथें झालेल्या नाट्यसंमेलनाचे हे अध्यक्ष होते. तेथील यांचें भाषण रंगभूमीच्या दृष्टीनें महत्त्वाचें झालें.

यांचें गद्यलेखन पुष्कळ आहे. त्यांत यांच्या सरस मांडणीचें चांगलें प्रत्यन्तर येतें. विषयाचा सर्व बाजूंनीं सखोल अभ्यास, प्रतिपाद्य विषयाची उत्कृष्ट तरफदारी आणि समर्पक भाषा यांमुळें यांचें लेखन नेहमीं आकर्षक आणि टिकाऊ वाटतें. यांचे टीकालेख नाट्य व संगीत यांच्या अभ्यासक्रमांत पाठ्य पुस्तकें म्हणून दाखल करण्यासारखे आहेत.

यांचीं नाटकेंहि चांगल्या दर्जाचीं असून त्यांत यांचा गुण व्यक्त होतो. व्यंग्योक्ति, संवाद, खटके आणि कथानकाला कलाटणी देण्याचा नाट्यानुकूल गुण त्यांत भरपूर आढळतो. विशेषतः यांचें पट-वर्धन नाटक उत्कृष्ट समजण्यांत येतें.

यांच्या गद्यलेखनापेक्षांहि यांची पद्यरचना अधिक सरस आहे. काव्यगुण, शब्दसौष्ठव, प्रासादिकपणा आणि नादमाधुरी या दृष्टीनें यांचीं पद्यें बिनखोड आहेत. जुन्या चिजांप्रमाणेंच यांनीं स्वतंत्र स्वररचनाहि पुष्कळ

केली आहे. मानापमान व अनेक चित्रपटांतील संगीत यांच्या स्वररचनेंतून बाहेर पडलें असून त्याचें वैशिष्ट्य सर्वतोमुखीं झालेलें आहे. म्हणूनच 'आधुनिक आकर्षक संगीताचे प्रणेते' असा सार्थ गौरव यांना प्राप्त झाला आहे.

ललित व शास्त्रीय असे यांनीं संगीताचे दोन प्रकार केले आहेत. ललित संगीताचा उपयोग नाटकांत करावयाचा असून शास्त्रीय संगीताचा नाटक हा प्रान्त नव्हे. ललित संगीत स्वरलेखनांत बसवितां येईल, पण शास्त्रीय संगीत त्या चौकटींत बसविण्याचा प्रयत्न केल्यास तें निःसत्त्व होईल असें यांचें म्हणणें आहे.

यांची 'प्रतिभा' चित्रपटांतील नृत्यांगना कविता—

कनक कमलावरी, मोतियांच्या सरी।
झरति रव तेवि करीं, चरणिं नृत्यांगना ॥ १ ॥

मलय वातें गमति, रंभोरु थरथरति।
परि अचल कटिवरती, राहि नृत्यांगना ॥ २ ॥

घुंगुरे छुमछमन, लय तोल सांवरून।
मंजुरव घुमघुमुन, सोडि नृत्यांगना ॥ ३ ॥

लव एक दूर उभी, क्षणिं निकट ये, न भी।
वीज चमके नभिं, तेवि नृत्यांगना ॥ ४ ॥

रुचिर बाहू हलति, संकेत चतुर अति।
कीं कुणा खुणवि ती, गमत नृत्यांगना ॥ ५ ॥

भ्रुकुटि धनु नाचवुनि, नयनशर सोडुनी।
रसिक जीवा हरुनि, नेई नृत्यांगना ॥ ६ ॥

जरि भाव सुविलास, वेधिती हृदयास।
परि दुरुनि नमनास, योग्य नृत्यांगना ॥ ७ ॥

यांचें वाङ्मयः—नाटकें-१ पटवर्धन (१९२४), २ तुलसीदास, ३ वत्सलाहरण, ४ ब्रह्मलिखित, ५ वरवंचना (शेरिडन डयूएनच्या इंग्रजी नाटकाचें रूपान्तर) व ६ गंभीर घटना (ऑस्कर वाइल्डच्या इंग्रजी नाटकाचें रूपान्तर). यांपैकीं तुलसीदास हें सुप्रसिद्ध मराठी नाटककार राम गणेश गडकरी यांच्या कल्पनेवर उभारलेलें आहे. तसेंच वत्सलाहरण हें मुलांच्याकरितां लिहिलेलें आहे.

टीकालेख—१ स्त्रिया व रंगभूमि, २ चांगले नट कसे निर्माण होतील?, ३ महाराष्ट्र रंगभूमीची सद्यःस्थिति, ४ संगीताचें मराठीकरण, ५ कै. भास्करबुवा बखले, ६ गोहरजान.

ग्रंथ—माझा संगीत व्यासंग (१९३९).

संगीत दिग्दर्शन व संवादलेखन—१ मायामच्छिंद्र, २ अग्निकंकण.

संगीत दिग्दर्शन—१ अयोध्येचा राजा (१९३१), २ उषा, ३ प्रतिभा, ४ सावकारी पाश, ५ राजमुकुट (१९३४) वगैरे.

**टेंबे, डॉ. भास्कर महादेव**—(जन्म स. १८७०-मृत्यु स. १९४४ जुलै) वऱ्हाडांतील सुप्रसिद्ध सार्वजनिक कार्यकर्ते व ग्रंथलेखक.

१८९७ सालीं मॅट्रिक झाल्यावर मुंबईच्या ग्रँट मेडिकल कॉलेजांत हे दाखल झाले. पण तेथें शेवटच्या परीक्षेंत अपयश आल्यानें हे कर्ज काढून इंग्लंडला गेले आणि तेथें यांनीं एडिंबरो विश्वविद्यालयाची एल्. आर. सी. पी. अँड एस्. ही पदवी संपादन केली. इंदूरच्या महाराजांचें यांच्यावर विद्यार्थिदशेपासून प्रेम असल्यानें त्यांनीं यांना एका मोठ्या हॉस्पिटलवर नेमिलें आणि नंतर आपल्या खासगी नोकरींत घेतलें.

पण १९२२ सालीं यांना इंदूर सोडून यवतमाळास येऊन राहावें लागलें. थोड्याच दिवसांत यांनीं लोकांचीं मनें आपणांकडे खेचून घेतलीं आणि तेथें बापूजी अणे यांचे हे उजवे हात समजले जाऊं लागले.

१९३० चा जंगल सत्याग्रह यांनीं आपल्या नेतृत्वाखालीं अत्यंत चातुर्यानें चालविला आणि तीन महिन्यांनंतर शेवटीं स्वतः कारावास पत्करिला. अकोल्याच्या तुरुंगांत वऱ्हाडच्या चारहि जिल्ह्यांतील पुढारी व कार्यकर्ते होते. या वेळेपासून हे वऱ्हाडचे पुढारी बनले आणि तुरुंगांतील सर्व सत्याग्रह्यांना यांच्याकडे औषधाकरितां पाठविण्यास सुरुवात झाली. तुरुंगांतून सुटतांच यांनीं 'नारिंगी स्वस्तिक' नांवाची संस्था काढून गोरगरिबांना मोफत औषधोपचार करण्यास सुरुवात केली आणि तें काम आमरण चालविलें. तेथील 'रायफल क्लब' काढण्यांत यांचाच पुढाकार होता.

डॉक्टरीचा व्यवसाय संभाळून यांनीं सार्वजनिक कामाचा आणि इतर व्याप बराच वाढविला होता. त्यांत यांच्या व्यासंगीपणाला पहिलें स्थान दिलें पाहिजे. प्रचलित विषयांचा सांगोपांग अभ्यास करून हे फळा व नकाशा यांच्या साहाय्यानें तपशीलवार व्याख्यानें देत आणि तीं लोकांना फार आवडत. अशीं विचारप्रवर्तक व्याख्यानें देण्याकरितां यांचें वाचन चांगलें

असे. त्याकरितां यांचा वेंचक व मूल्यवान् ग्रंथांचा संग्रहहि नमुनेदार असे.

यांच्या घरांतील राहणी अगदीं नमुनेदार असे. भारत, भागवत, हरिवंश, एकनाथी भागवत, ज्ञानेश्वरी वगैरे ग्रंथ यांच्या नित्य वाचनांत असत. ब्रह्मीभूत टेंबेस्वामींच्या कुलांतील असल्याबद्दल यांना भूषण वाटे. मारवाडी, कच्छी, भाटिये, मुसलमान वगैरे समाजांत यांच्याइतकी मान्यता इतरांना क्वचितच आढळते. आपल्या औदार्यपूर्ण व परोपकारी वागणुकीमुळें आपल्या मागें मुलाबाळांना आपला लौकिक व ग्रंथ यांशिवाय यांना कांहीं ठेवतां आलें नसलें, तरी आपलें चारित्र्य व त्याग यांमुळें समाजाला धडा घालून देणारे असे पुरुषच राष्ट्राची खरी संपत्ति होत.

यांचे ग्रंथः—

१ विद्यार्थ्यांचें आरोग्य, २ शिशुसंगोपन, ३ चाळीस वर्षे उलटल्यावर, ४ हिंदुस्थाना, तूं कोठें ? ५ हिंदुस्थानचें आरमारी सामर्थ्य.

**टेंबेस्वामी, वासुदेवानंद सरस्वती**—( जन्म स. १८५४–समाधि स. १९१४) एक महान् आचारनिष्ठ सत्पुरुष व ग्रंथकार.

सावंतवाडी संस्थानांत निर्मला नदीच्या तीरीं माणगांवीं यांचा जन्म झाला. व तेथून जवळच असलेल्या सिद्धपर्वतावरील गुहा यांची तपोभूमि बनली.

यांनीं बाळपणीं वेदाध्ययन केलें आणि शेवटपर्यंत यांचें वेदाचें नित्यपठण चालू होतें. यांचें नरसोबाच्या वाडीस नेहमीं जाणें असे व तेथेंच यांना श्रीदत्तदर्शन प्रथम झालें. यांनीं माणगांवीं एक सुंदर दत्तमंदिर बांधलें. तें बांधण्यापूर्वी एक वर्ष आश्विन मासांत यांनीं चांद्रायण व्रत केलें ( १८८२ ).

यांचे नरसोबाचीवाडी, नरसी, बढवाई, गरुडेश्वर इत्यादि ठिकाणचे चातुर्मास खूप गाजले. यांच्यासारखा महात्मा आपल्या आचारनिष्ठ वर्तनानें धर्मप्रसाराचें जेवढें काम करी तेवढें हजारों लेखकांस व वक्त्यांसहि करतां येणें अशक्य होतें.

यांचे ग्रंथः— १ श्रीगुरुचरित्र ( संस्कृत, सटीक ), २ श्रीदत्तलीलामृताब्धिसार ( प्राकृत ओंवीबद्ध ), ३ सप्तशती गुरुचरित्र ( प्राकृत ), ४ माघमाहात्म्य ( प्राकृत ) नर्मदास्तोत्रासह, ५ वेदवादस्तुति ( संस्कृत-सटीक ), ६ कुमार शिक्षा ( संस्कृत-सटीक ), ७ पद-समूह, ८ स्त्रीशिक्षा ( गद्य ) प्राकृत, ९ समश्लोकी-श्रीगुरुचरित्र, श्रीगुरुसंहितासचूर्णिक, १० श्रीदत्तमाहात्म्य ( प्राकृत ओंवीबद्ध ), ११ श्रीदत्तपुराण ( संस्कृत सटीक ), १२ दत्तचंपू सटीक ( संस्कृत ), १३ श्रीकृष्णा-लहरी सटीक, १४ षट्पंचाशिका ( संस्कृत ), १५ एकावन्न श्लोकी गुरुचरित्र, १६ करुणात्रिपदी-पंचपदी भजन, १७ नर्मदालहरी, १८ दत्तात्रेय आख्यान बोध श्लोक, १९ श्रीदत्तभावसुधारस, २० आत्मानात्म-विचार, २१ प्राकृत मननसार, २२ श्रीगुरुस्तुति संस्कृत-प्राकृत टीकेसह इत्यादि.

**टोपे, रघुनाथ पांडुरंग ऊर्फ तात्या**—( जन्म स. १८१४–फांशी स. १८५९ एप्रिल १८ ) सत्तावन सालच्या युद्धांतील मराठ्यांचे कुशल सेनापति.

हे मूळचे नाशिक जिल्ह्यांतील येवल्याचे राहणारे. यांचें देशस्थ ऋग्वेदी ब्राह्मणाचें घराणें येवलेकर या नांवानें प्रसिद्ध होतें. पण एकदा निफाडचे त्रिंबकजी डेंगळे यांच्या मध्यस्थीनें यांना दरबारांत पांच रत्नांची टोपी मिळाल्यानें हे टोपे नांवानें प्रसिद्ध झाले असें म्हणतात. पांडुरंगपंतांचा शेवटल्या बाजीराव पेशव्यांशीं संबंध आला व तेथें त्यांना धर्मादाय खात्याचे मुख्य नेमण्यांत आलें. बाजीराव आठ लक्षांचें पेन्शन घेऊन ब्रह्मावर्तास गेले, या वेळीं यांचेंहि कुटुंब त्यांचेबरोबर गेलें. त्या वेळीं यांचें वय चार वर्षांचे होतें.

डलहौसीच्या वेळेपासून असंतोष वाढत जाऊन गोसावी बैरागी व मुल्लामौलवी यांच्या मार्फत सैन्यांत बेदिली निर्माण करण्यांत आली. आणि तिचा स्फोट काडतुसाच्या निमित्तानें शिपायांच्या बंडांत झाला. शिपायांच्या पुढाऱ्यांनीं राजकीय वारसा असलेलीं पण इंग्रजांनीं दुखावलेलीं राजघराणीं आपल्यांत सामील करून घेण्याचा प्रयत्न केला. नानासाहेब पेशवे, लक्ष्मी-बाई झांशीवाली व दिल्लीचे बादशहा हे त्यांत त्यांच्या नेमणुका ब्रि. सरकारनें बंद केल्यामुळें सामील झाले. नानासाहेबांच्या दरबारांतील अजीमुल्ला वगैरे मुसलमान वकिलामुळें यांना या कटाचा सुगावा आधींच लागला होता.

१८५७ सालच्या बंडांत दिल्लीचें युद्ध ( १८५७ मे ११–१८५७ सप्टें. २० ), लखनौचें युद्ध ( १८५७ मे ३०–१८५८ मार्च २१ ), जगदीशपूरचें युद्ध ( १८५७ जुलै २७–१८५८ जुलै १३ ) व कानपूरचें युद्ध ( १८५७ जून ४–१८५९ एप्रिल ७ ) हे जे चार प्रमुख

उठाव झाले, त्यांत अत्यंत पद्धतशीरपणें चालविण्यांत आलेल्या कानपूरच्या दीर्घकालीन उठावणीचे प्रमुख हे होते.

४ जूनच्या मध्यरात्रीं कानपुरांत गडबड सुरू झाली. प्रथम घोडदळानें बंड पुकारलें. ते नानासाहेबांच्या गोटाकडे आले, तेथील खजिना ताब्यांत घेऊन नानासाहेबांस त्यांनीं आपले प्रमुख केलें व ६ जूनला कानपूरच्या वेढ्यास सुरुवात झाली.

शेवटीं २५ जूनला इंग्रजांनीं तहाचें निशाण उभारलें. शस्त्रें खालीं ठेवावींत व सर्वांना गंगापार प्रयागास सुखरूप पोंचवावें असें ठरलें. त्याप्रमाणें सकाळीं नऊ वाजतां इंग्रजांच्या नावा चालू झाल्या. पण अजीमुल्ला वगैरे लोक अधिकाऱ्यांच्या ताब्यांत न राहिल्यानें इंग्रजांची अमानुष कत्तल झाली. त्याची सर्व नैतिक जबाबदारी इंग्रजांनीं नानासाहेब व हे यांवर ठेवली. नंतर १ जुलैला विठुर येथें नानासाहेबांना राज्याभिषेक करण्यांत आला. यानंतरच्या दोनचार चकमकींत टीकासिंग, ज्वालाप्रसाद वगैरे सैनिकांचे पुढारी नामोहरम झाल्यावर बंडवाल्यांची पांगापांग झाली. नानासाहेबांवर अधिक जबाबदारी पडली व त्यांनीं यांना सेनापति नेमून सैन्य जमा करण्याचा हुकूम दिला (२५ जुलै १८५७).

बंडांत सामील झालेली ४२ वी पलटण यांनीं शिवराजपूरला जाऊन आपल्या ताब्यांत घेतली व लखनौला निघालेल्या सेनापति हॅवलॉकच्या सैन्याला सतावण्यास सुरुवात केली. काल्पी जिंकून तेथें लष्करी साहित्याचा व दारुगोळ्याचा कारखाना सुरू करून ग्वाल्हेरच्या शिंद्यांशीं आपला संबंध यांनीं अबाधित केला व कानपूरवर चालून जाऊन विंडहॅमचा पराजय करून कानपूर पुनः ताब्यांत घेतलें. या चढाईत यांना पुष्कळ लूट मिळाली. १७ जुलैला हातांतून गेलेलें कानपूर २७ नवंबरला पुनः यांच्या ताब्यांत आलें. या वेळीं यांच्या ताब्यांत एकंदर ५६ लक्षांचा मुलूख आला. यांच्या उत्कर्षाचा परमोच्च बिंदु हा होय.

पण ६ डिसेंबरला कॉलिन्सनें यांचा पराजय करून यांना कानपूर सोडावयास लावलें. तेव्हां हे काल्पीस येऊन राहिले. झांशी, बांदा, जगदीशपूर व लखनौ या सर्वांशीं संबंध ठेवण्यास हें केंद्र यांना वर्षभर उपयोगी पडलें. जाने. १८५८ ते जून १८५८ पर्यंत यांनीं काल्पी लढवली. व जून १८५८ ते एप्रिल १८५९ पर्यंत ग्वाल्हेरच्या आश्रयानें यांनीं आपली पराकाष्ठा केली.

हे वरचेवर दारुगोळा व खंडणी मिळवून युद्धाचा गाडा रेटण्याचा प्रयत्न करीत. पण बंडखोरांत शिस्त नसल्यानें जागोजाग यांच्या वांट्याला पराजयच येत. काल्पी सुटल्यावर ग्वाल्हेरच्या किल्ल्यांत यांनीं विजयोत्सवाचा सर्व समारंभ करून बाजू सावरण्याचा प्रयत्न केला. पण अशा गोष्टींनें सावरण्याची ती वेळ नव्हती. सर्व आगाऊ आश्वासनें फोल ठरलीं. नानासाहेब वगैरे मंडळी उत्तरेकडे व नर्मदेच्या बाजूला हे व रावसाहेब पेशवे वगैरे लोक राहिले. इंग्रजांनीं या दोघांचा संबंध तोडला. नर्मदा ओलांडून नानासाहेबांना मिळण्यासाठीं मोठ्या चपळाईनें जात असतां मानसिंहाच्या विश्वासघातानें हे रात्रीं घरोणच्या जंगलांत रिचर्ड मीडकडून पकडले गेले (७ एप्रिल १८५९).

या वेळीं यांचेजवळ एक तरवार, एक कुकरी व ११८ मोहोरा असलेली पिशवी सांपडली. यांना पकडलें तेव्हां यांचें वय सुमारें पंचेचाळीस होतें. पांच फूट उंची, धनुष्याकृति भुंवया, काळेभोर डोळे, रेखीव नजर व दाढी, मिशा व कल्ले असलेल्या चेहऱ्यामुळें यांची चर्या भव्य व रुबाबदार भासे. बुद्धिमत्तेची झांक व अंगांतील कर्तृत्वशक्ति यांचे तोंडावर उघड दिसण्याइतपत स्पष्ट असे. हे तुटक मोजकें पण स्पष्ट बोलत. जबानींत जास्त चौकस अगर फाजील प्रश्न विचारला म्हणजे 'मालूम नहि' अशा दोनच शब्दांनीं हे आपला नकार दर्शवीत.

शिप्री येथें झालेल्या आपल्या तीन दिवसांचे चौकशींत यांनीं आपली विस्तृत लेखी जबानी दिली. 'मी इंग्रजी राज्यांत जन्माला आलों नाहीं. तसेंच इंग्रजांचा केव्हांहि प्रजाजन नव्हतों. मग राजद्रोहाचा आरोप मजवर कसा लागू पडतो? हातीं उघडपणें शस्त्र घेऊन युद्धांत मीं हत्या केली असेल, पण खून, दरवडे, बायका मुलांची हत्या हे प्रकार मीं केले नाहींत.' अशी विचारसरणी यांनीं आपला बचाव करतांना मांडली. शेवटीं यांना फांशीं देण्यांत आलें. फांसांत मान यांनीं आपणहून घातली. पण कानपूरची किंवा बिबी घरांतील कत्तलीशीं यांचा संबंध असल्याचें चौकशींत सिद्ध झालें नाहीं, असें मॅलेसन या इतिहासकारानें म्हटलें आहे.

पारतंत्र्यापासून बचाव करण्यासाठीं हिंदुस्थानांतील लोकांनीं जे कांहीं शेवटचे प्रयत्न केले त्यांमध्यें १८५७ सालच्या बंडाला व त्यांतहि यांच्या कामगिरीला विशेष महत्त्व आहे. झांशीच्या लक्ष्मीबाई पडल्यामुळें या स्वातंत्र्य युद्धांतील यशाची आशा संपली आणि सर्व ठिकाणीं बंडवाल्यांविरुद्ध प्रतिकूल वारे वाहूं लागले. ज्या संस्थानिकांच्या हक्कांसाठीं हा सर्व उठाव योजण्यांत आला होता, त्यांनींच बंडवाल्यांना आश्रय देण्याचें नाकारलें, तेथें इतर लोकाश्रयाची आशा करणें व्यर्थ होतें. अशा परिस्थितींत मागें निराशा व पुढें मृत्यु स्पष्टपणें दिसत असतां यांनीं इंग्रजांच्या सहा फौजा अंगावर घेऊन सतत दहा महिनेपर्यंत जो गनिमी लढा खेळला, तो केवळ अविस्मरणीय आहे. युद्धशास्त्राच्या दृष्टीनेंसुद्धां त्याला महत्त्व देण्यांत येतें.

---

# ठ

**ठकार, शंकर विनायक**—(जन्म स. १८९३) भिल्लादि आदिवासी लोकांत राष्ट्रीय दृष्टीनें कार्य करणारे समाजसेवक.

यांचा जन्म धारवाड येथें झाला. मूळ गांव सिंहगडाच्या पायथ्याशीं असणारें कोंढणपूर. वडील सदर्न मराठा रेल्वेंत नोकर असल्यानें यांचें बाळपण धारवाड, मद्रास व हुबळी येथें गेलें.

लहानपणींच ग्रामसेवा करण्याची इच्छा होऊन हे कॉलेज सोडणार होते. पण कांहीं थोर लोकांच्या सल्लयामुळें कॉलेज न सोडतां हे बी. ए. झाले.

अहमदनगरच्या अनाथविद्यार्थिगृहांत व नूतन मराठी विद्यालयांत चार वर्षे काम केल्यावर असहकारितेची चळवळ सुरू झाली. सरकारी मदतीचा पैसा म्हणजे विटाळलेला पैसा अशी म. गांधींची विचारसरणी विद्यार्थ्यांना पटवून देतांना कोणत्याहि लोभास बळी न पडतां यांनीं नोकरीचा राजीनामा दिला. पुढें दोन वर्षे अमळनेरच्या राष्ट्रीय हायस्कुलांत घालविलीं. पण तेथील चालकांनीं पुनः सरकारी ग्रॅन्ट घेण्याचें ठरविलें तेव्हां यांनीं तेथेंहि राजीनामा दिला.

यानंतर यांना महाराष्ट्र प्रान्तिक खादी मंडळानें बोलावून चिटणीस केलें. हिशेबी काम करणारा या नात्यानें महाराष्ट्रांतील सर्व भागांत हिंडून तेथील परिस्थिति पाहण्याची व अनेक सुखदुःखाचे प्रसंग प्रत्यक्ष अनुभविण्याची संधि यांना मिळाली. पण प्रत्यक्ष लोकसेवेपुढें कारकुनी कामाचा यांना कंटाळा येऊन तीन वर्षांनीं यांनीं राजीनामा दिला.

पुढें 'पश्चिम खानदेश जिल्हा मंडळ' नांवाच्या संस्थेनें प्रत्यक्ष ग्रामसेवेची संधि यांना दिली. सर्व संसार बरोबर बाळगून जिल्ह्यांतल्या प्रत्येक गांवीं हिंडत हें काम यांनीं तीन चार वर्षें केलें. म. गांधींच्या सूचनेस अनुसरून अशा कामास आवश्यक असणारी व्यापक व मूलगामी दृष्टि येण्याकरितां यांनीं हिंदुस्थानभर प्रवास केला व 'सवाई मुकटी' या गांवीं कांहीं दिवस खास वास्तव्य केलें. तेथें ग्रामसुधारणेचें काम करीत असतां पश्चिम खानदेश जिल्हा कॉंग्रेस कमेटीचे अध्यक्ष व ऑ. ई. कॉं. क.चे सभासद होते. १९३०, ३२, ३४ व ४२ सालांतील तुरुंगवास ओघानेंच लाभला. पण १९३५च्या कायद्यानुसार देशावर लादलेल्या घटनेंत संपूर्ण वगळलेले व अंशतः वगळलेले असे देशाचे विभाग पाडण्यांत आले होते. देशाचें अखंडत्व व ऐक्य या दृष्टीनें यांना असें करणें राजकीय कावा वाटला आणि यांनीं आपल्या कार्याची दिशा लागलीच बदलून भिल्लसमाजाची सेवा करण्याचा निर्णय घेतला (१९३७). १९३८ सालीं यांनीं 'पश्चिम खानदेश भिल्लसेवा मंडळ, नंदुरबार' काढलें. पश्चिम खानदेशांत भिल्लादि आदिवासींची संख्या ३॥ लाख म्हणजे तेथील लोकसंख्येच्या एक-तृतीयांशापेक्षां अधिक आहे. जिल्ह्यांतील आठ तालुक्यांपैकीं चार तालुके 'अंशतः वगळलेल्या' विभागांपैकीं आहेत. मुंबई इलाख्यांतील अन्य कोणत्याहि जिल्ह्यांत आदिवासी लोकांची इतकी मोठी संख्या नाही. तेथें शाळा, छात्रालयें, धान्यकोठारें, दारूबंदी प्रचार, अन्याय परिमार्जन इत्यादि विविध प्रकारें कार्य करण्यांत यांचा सर्व वेळ जाऊं लागला. भिल्ल साधु गुलामहाराज यांच्या

प्रभावानें हे भारून गेले व यांनीं त्यांचें चरित्र लिहून प्रसिद्ध केलें.

सरकारकडून भिल्लांच्या उत्कर्षाकरितां प्रयत्न चालू आहेत. पण ते राष्ट्रीय वृत्तीच्या लोकांना पसंत पडण्यासारखे नाहींत. कायद्यानें त्यांना अलग करून संस्कृतीनेंहि त्यांना अलग करण्याचें सरकारी धोरण त्यांत दिसतें. "भिल्लादि लोक हे हिंदुसंस्कृतीचे लोक नसून ते अगदीं निराळ्या संस्कृतीचे लोक आहेत, त्यांना पूर्वस्थितींत ठेवूनच त्यांच्या चालीरीती, आचार, दारूपान वगैरेंचें संरक्षण केलें पाहिजे," असले कांहीं ग्रह उत्पन्न करण्यांत येत आहेत. याचाच पाठपुरावा मानववंशशास्त्राच्या अभ्यासाच्या निमित्तानें चालू आहे. भिल्लादिकांच्या नाक, कान, डोळे, वगैरेंच्या मापांवरून व त्यांच्या रक्तावरून त्यांचा वंश अलग ठरविण्याचेहि प्रयत्न चालू आहेत. वास्तविक हीं शास्त्रें अद्यापि अपूर्ण आहेत, व सिद्धान्त काढण्याइतपत विस्तृत अभ्यासहि त्यांचा झालेला नाहीं. अशा स्थितींत एका कुटुंबांतील माणसाप्रमाणें राहणी, शिक्षण, व्यवहार, पोषाख वगैरे बाबींत सर्व जग समान होत असतां यांनाच जगापासून अलग ठेवण्याचे असे प्रयत्न होणें अनिष्ट आहे असें यांचें मत आहे. या एका विशिष्ट दृष्टीनें काम करणारे यांच्यासारखे लोकच सध्यांच्या काळांतील खरे राष्ट्रीय मिशनरी होत.

**ठक्कर, अमृतलाल विठ्ठलदास**—( जन्म स. १८६९ ) रानटी लोक, अस्पृश्य व आपद्ग्रस्त यांचेसाठीं आत्मसमर्पण करणारे सुप्रसिद्ध भारतसेवक.

काठेवाडांतील भावनगर हें यांचें जन्मस्थान. यांची जात लोहाणा व यांच्या आईचें नांव मुळीबाई. पुण्याच्या एंजिनियरिंग कॉलेजमधून एल्. सी. ई. झाल्यानंतर ( १८९० ) यांनीं वढवाण व पोरबंदर संस्थान ( १८९१-९९ ), पूर्व आफ्रिकेंतील युगांडा रेल्वे (१८९९-१९०२), सांगली संस्थान ( १९०४-०५ ) इत्यादि ठिकाणीं कामें केलीं. यानंतर यांनीं मुंबई कार्पोरेशनमध्यें नोकरी पत्करली. तेथें यांची नेमणूक चेंबूर येथील कचरा पट्टीच्या लाइट रेल्वेवरील सुपरवायझरचे जागीं झाली. यांच्या हाताखालीं महारमांगांचें मोठें सैन्यच होतें. कंगाल, कर्जबाजारी आणि व्यसनी अशा त्या लोकांची हलाखीची स्थिति पाहून नोकरीशिवायच्या वेळांत हे त्यांच्या उद्धाराची खटपट करूं लागले. कर्मवीर विठ्ठल रामजी शिंदे यांच्याकडून योजनाबद्ध आणि पद्धतशीर कामाचा व गो. कृ. देवधरांकडून अविश्रांतपणें गाजावाजा न करितां काम करण्याचा धडा यांनीं या वेळीं उचलला. देवधरांच्या सहवासानें यांना भारतसेवक होण्याची इच्छा झाली. धों. के. कर्वे यांच्या विधवा व पतिता स्त्रियांच्या सेवाकार्याचाहि परिणाम यांच्यावर फार झाला. यांनीं आपणास समाजसेवेस वाहून घेण्याचा निश्चय केला. पण वडिलांच्या मृत्यूनंतरच यांना आपला हा हेतु पूर्ण करितां आला. १९१४ सालीं मुंबई कॉर्पोरेशनमधील नोकरी सोडून हे भारतसेवक समाजाचे आजीव सभासद झाले व त्याच सालच्या फेब्रुवारी महिन्यांत संयुक्त प्रांतांतील दुष्काळ निवारणाच्या कार्याकरितां रवाना झाले.

संयुक्त प्रांतांतून दुष्काळ निवारणाचें कार्य करून आल्यानंतर गुजराथेंत मोफत व सक्तीचें शिक्षण सुरू करण्याकरितां माहिती गोळा करण्याचें काम विठ्ठलभाई पटेलांनीं यांच्याकडे सोंपविलें. तें करून यांनीं निरलस कार्यकर्ता असा लौकिक मिळविला.

१९१८ सालीं जमशेदपूर येथील टाटांच्या कारखान्यांतील गरीब मजुरांसाठीं स्वस्त धान्याच्या दुकानाची व्यवस्था पाहण्याचें काम व पुढें ओरिसांतील दुष्काळनिवारणाचें कार्यहि यांच्याकडे आलें ( १९१९-२० ). हें काम करीत असतांच जलप्रलयानें होणाऱ्या रेल्वे व सडका यांच्या नासधुसीचा अभ्यास करून यांनीं सरकारकडे अहवाल पाठविला. शिवाय उडिया स्वयंसेवकांचीं पथकें उभारून गांवोगांवीं अन्न पोंचविण्याचें यांचें काम चालू होतेंच. असेंच दुष्काळनिवारणाचें कार्य करण्याकरितां हे पंचमहाल जिल्ह्यांत आले असतां यांचें भिल्लांच्या स्थितीकडे लक्ष गेलें. यांनीं त्यांच्या घरोघर जाऊन त्यांना अन्नवस्त्र, शिक्षण व वैद्यकीय मदत देण्यास सुरवात केली. पंचमहाल जिल्ह्यांत भिलसेवामंडळ व अन्त्यजसेवामंडळें स्थापिलीं ( १९२३-२५ ). अस्पृश्यांसाठीं विहिरी, झालोट म्युनिसिपल भंग्यांसाठीं धर्मशाळा वगैरे बांधण्याकडे यांनीं विशेष लक्ष पुरविलें. दारू दुकानावर निरोधन केल्यामुळें यांना सहा महिन्यांची शिक्षा झाली; पण दोन महिन्यांतच यांची सुटका करण्यांत आली ( १९३० ).

हे म. गांधींच्या सत्याग्रहांत नसतांनाहि यांना १९३० सालच्या चळवळींत अटक होऊन शिक्षा झाली. पुढें हे अपिलांत सुटले ( १९३० ). जातीय निवाड्यांतील अस्पृश्यांचे स्वतंत्र मतदारसंघ रद्द व्हावे म्हणून

म. गांधींनीं केलेल्या उपवासांत यांच्यावर सर्वांत अधिक भार पडला. अस्पृश्यांना द्यावयाच्या जागांसंबंधीं बाटाघाट करतांना यांनीं मिळविलेली आंकडेवार माहिता फार महत्त्वाची ठरली. हरिजनसेवासंघाची स्थापना होऊन त्याच्या मुख्य कार्यवाहाची जबाबदारी यांच्यावर टाकण्यांत आली. यांनीं दिल्ली येथें त्या संस्थेचें मुख्य केन्द्र स्थापून २६ प्रान्तिक केन्द्रें उभारलीं आणि २०० जिल्हा शाखा स्थापन केल्या. कोणतेंहि काम पद्धतशीर-पणें आणि मोठ्या प्रमाणांत करण्याची यांची या वेळीं कसोटी लागली. या कामाकरितां हिंदुस्थानाच्या काना-कोंपऱ्यांत मिळेल त्या वाहनांतून हिंडत असतां हिंदु-स्थानांतील अडीच कोटि आदिवासींची हीन स्थिति यांच्या नजरेस आली. त्या प्रश्नाचा अभ्यास करतां ख्रिस्ती मिशनऱ्यांशिवाय त्याकडे अद्याप कोणाचें लक्ष गेलें नाहीं, असें यांच्या ध्यानांत आलें. तेव्हां सरकार व हिंदुस्थानांतील उच्च वर्णीयांनीं उपेक्षिलेल्या आदिवासी लोकांच्या सेवेचें काम आदिवासी सेवामंडळ स्थापून यांनीं सुरू केलें.

आजपर्यंत आदिवासी लोकांसाठीं भिल्ल सेवासंघ दाहोद, नंदुरबार वगैरे कितीतरी संस्था अगदीं स्वतंत्र-पणें काम करीत होत्या. कांहींची तर नांवें एक असून सुद्धां त्यांच्यांत कांहीं संबंध नव्हता. आतां यांनीं अशा संस्थांना एकसूत्रांत आणून सर्वांची एक मध्यवर्ति संस्था स्थापन केली आहे.

थोड्याशा कामामुळेंहि भरपूर प्रसिद्धि मिळत अस-ल्यामुळें लोकसेवक आपल्या सामर्थ्याच्या भलत्याच भ्रामक कल्पना करतात. पण हे असल्या भ्रमाच्या आहारीं कधींहि गेलेले नाहींत. हे अत्यंत प्रसिद्धिविन्मुख असून ईश्वरावरील श्रद्धा व कार्यावरील निष्ठा या यांच्या प्रेरक शक्ति आहेत.

विलक्षण त्यागामुळें लोकांपेक्षां आपण निराळे आहोंत अशी भावना यांच्यांत उत्पन्न झालेली नाहीं. हे जितके कर्तव्यनिष्ठुर आहेत तितकेच दयापूर्ण आहेत. जेथें कोणीहि जाण्यास धजत नाहीं तेथें हे निर्भयपणें जातात व आपल्या अनुयायांना जाण्यास भाग पाडतात.

अंगावर गोणपाटासारखे जाड कपडे, कोठेंहि चार घास खाण्याची तयारी आणि सदोदित आनंदी असणारा हा पुरुष वयाला पंचाहत्तर वर्षे होऊन गेलीं तरी नवीं-नवीं कार्ये उत्पन्न करून तीं केवळ सेवावृत्तीनें पार पाड-ण्याची पराकाष्ठा करीत आहे.

**ठाकरसी, विठ्ठलदास दामोदर**—( जन्म स. १८७३ नवंबर ३०—मृत्यु स. १९२१ ऑगस्ट १२ ) मुंबईचे जगप्रसिद्ध व्यापारी, नाणकशास्त्रज्ञ, सनातन वैदिक धर्माचे अभिमानी आणि स्त्रियांच्या शिक्षणाकरितां अनेक लाखांची देणगी देणारे दानशूर गृहस्थ.

हे जातीनें मोढवाणी भाटिया वैश्य. काठेवाडांतील जामनगर संस्थानांत खंबाळया नांवाचें एक लहानसें गांव आहे, तें यांचें मूळ ठिकाण. ठाकरसी हें यांच्या आज्याचें नांव. प ण प्रथम त्यांनीं मुंबईस येऊन ८०० रुपयांच्या भांडवलावर सुरुवात करून व्यापारांत जम बसविला म्हणून ठाकरसी हें या घराण्याचें उपनांव झालें. आडत दयाल-मूळजी-ठाकरसी असा यांचा वंश आहे. आडत दयाळच्या पूर्वीचे पुरुष आपल्या गांवीं शेती करून राहत. ठाकरसींनीं मुंबईस आपला चांगला जम बसल्यावर आपल्या वडिलांच्या नांवें मुंबईंत 'मूळजी जेठा मार्केट' भागीत उघडलें ( १८८६ ). त्यांचे पुत्र दामोदर शेठ यांचाहि व्यापारांत चांगलाच जम बसून त्यांनीं 'हिंदुस्थान मिल' उघडली व बोलतां बोलतां चार गिरण्यांचे ते मालक झाले. वडील शेहेचाळिसाव्या वर्षीच वारल्यानंतर यांच्यावर त्यांच्या उद्योगधंद्याचा सर्व भार पडला.

यांचें प्राथमिक शिक्षण खंबाळया येथें व हायस्कूल शिक्षण मुंबईस झालें. हे कांहीं महिने कॉलेजांत गेले. पण पुढें कॉलेज सोडून व्यापारांत पडणें यांना व यांच्या वडिलांना इष्ट वाटलें.

व्यापारांत शिरतांच यांची सारखी भरभराटच होत गेली. त्याबरोबर अनेक मानाचीं व जबाबदारीचीं कामें यांच्याकडे येऊं लागलीं. हे मुंबई कॉर्पोरेशनच्या स्टँडिंग कमेटीचे चेअरमन व कॉर्पोरेशनचे अध्यक्ष झाले (१९०७). मुंबई कायदे मंडळाचे ( १९०५-१९०८ ) व इंपीरियल कौन्सिलचेहि ( १९१०-१२ ) हे सभासद होते. तसेंच हे मुंबईच्या औद्योगिक प्रदर्शनाचे कार्याध्यक्ष ( १९०४ ) व कलकत्ता औद्योगिक परिषदेचे अध्यक्ष ( १९०६ ) होते. अनेक जॉईंट स्टॉक कंपन्यांचे डायरेक्टर व बॉंबे इम्प्रुव्हमेंट ट्रस्टचे यांना ट्रस्टी नेमण्यांत आलें होतें. ना. लल्लुभाई सामळदास यांच्या साहाय्यानें यांनीं सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँक स्थापिली. स्पेसी बँकेचेहि हे

कार्याध्यक्ष होते. पुढें तर श्री. सयाजीराव गायकवाडांच्या देखरेखीखालीं बडोदा बँक यांनीं सुरू केली. क्राउन मिल, सरदार कारबॉनिक गॅस कंपनी, जामनगर द्वारका रेल्वे, द्वारका सिमेंट कंपनी व ॲग्रिकल्चरल इंप्लिमेंट कंपनी इत्यादि संस्थांच्या स्थापनेंतहि हे प्रमुख होते.

यांच्या मातोश्री नाथीबाई वयाच्या साठाव्या वर्षी महाबळेश्वर रस्त्यावर वडिलांच्या स्मरणार्थ त्यांनीं बांधलेल्या दामोदराश्रमांत परलोकवासी झाल्या ( १९०६ ). हे पृथ्वीपर्यटण करून आल्यावर, युरोप व जपान वगैरे देशांतील धर्तीवर इकडे स्त्रीशिक्षणसंस्था असाव्यात म्हणून प्रो. धों. कृ. कर्वे यांनीं सुरू केलेल्या स्त्रियांच्या विश्वविद्यालयास पंधरा लक्ष रुपये आपल्या मातेच्या स्मरणार्थ देऊन यांनीं त्याचें ' नाथीबाई युनिव्हर्सिटी ' असें नांव ठेवलें ( १९१९ ).

तसेंच पुणे सेवासदनास यांनीं निरनिराळ्या रूपांनीं सुमारें एक लक्ष रुपये दिले. त्यांतून नाथीबाई हॉल, ममुताई हॉस्टेल व लेडी ठाकरसी सेवासदन ब्रँच सातारा व बारामती हीं यांच्या आप्तांचीं स्मारकें उभारण्यांत आलीं. ममुताई ही यांच्या वडील बहिणीची मुलगी होय. मुंबईच्या वनिताविश्रामालाहि यांनीं एक लक्षाची देणगी दिली. समाजसेवासंघाच्या परळ येथील गृहास पंचवीस हजार रुपये देऊन त्याला ' दामोदर ठाकरसी मूळजी हॉल ' हें नांव देवविलें. तसेंच ' सर विठ्ठलदास दामोदर ठाकरसी फ्री पुस्तकालय, चांदोद ' हें यांच्या वीस हजार रुपयांच्या देणगीवर यांच्या मृत्यूनंतर उभारलें गेलें ( १९२३ ).

पहांटे पांच वाजतां उठून गीतेंतील ' कार्पण्यदोषोपहतस्वभावः ' ( गीता २·७ ) हा श्लोक, ' स्थाने हृषीकेष ' ( गीता. ११·३६-४६ ) इत्यादि दहा श्लोक व कांहीं ईशस्तुतिपर भूपाळ्या म्हणणें, घोड्यांवर पत्नीबरोबर फिरणें, स्नानपूजा, शंकरदर्शन, गीतादि ग्रंथांचें वाचन, गायनश्रवण व आपला मोठा व्यवसाय संभाळणें असा यांचा नित्य क्रम असे. यांनीं दोन वेळ जगाचा प्रवास केला होता.

उद्योगधंद्यांतील यांच्या कौशल्यानें यांना सर्व आयुष्यभर यश मिळून दिलें आणि यांनीं दिलेल्या देणग्यांमुळें यांच्या मृत्यूनंतरहि तें चिरंतन बनलें.

**ठाकुरदत्तशर्मा**—( जन्म स. १८८० सुमार ) हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध वैद्य व ' अमृतधारा ' या औषधाचे उत्पादक.

घरांतून पळून जाऊन यांनीं इंग्रजी शिक्षण घेतलें व कॉलेजपर्यंत मजल मारली. याच वेळीं शेजारीं राहत असलेल्या वैद्याकडून यांनीं वैद्यकीचें शिक्षण घेतलें. १९०० सालीं ५ रु. भाड्याची जागा घेऊन यांनीं आपलें ' देशोपकारक औषधालय ' उघडलें. दिवसभर १५ रु. द. म. ची रेल्वेंत नोकरी करावयाची व रात्रीं औषधें कुटण्या-घोटण्याचें काम स्वतःच पार पाडावयाचें असा यांचा व्यवसाय सुरू झाला. पुढें १९०४ सालीं ' देशोपकारक ' हें हिंदी व उर्दू या दोन्ही भाषांतील वर्तमानपत्र यांनीं सुरू केलें आणि तें १९३२ पर्यंत चालविलें.

यांनीं अत्यंत मेहेनतीनें प्रयोग करून अनेक रोगांवर चालणारें ' अमृतधारा ' नांवाचें औषध तयार केलें. त्याचा खप एवढा वाढला कीं याकरितां लाहोर येथें यांना स्वतंत्र कारखाना, अमृतधारा स्ट्रीट, अमृतधारा पोष्ट असे स्वतंत्र विभाग निर्माण करणें भाग पडलें. १९१० सालीं यांनीं चीफ जस्टिस सर अतुलचंद चतर्जींच्या हस्तें स्वतंत्र अमृतधारा-भवनाचा उद्घाटन समारंभ केला व १९१४ सालीं दुसरें भवन उघडलें. याबरोबर स्वतःचा मोठा छापखानाहि हे चालवीत ( १९१६ ), हे सिंध हैद्राबाद प्रान्तिक वैद्यक संमेलन ( १९२८ ), पंजाब प्रान्तीय वैद्यक संमेलन, रावळपिंडी ( १९२९ ) व दिल्ली अखिल भारतीय ब्राह्मण संमेलनाचे अध्यक्ष होते (१९४३).

**ठोंबरे, त्र्यंबक बापूजी**—( स. १८९०-१९१८ ) मराठींतील सुप्रसिद्ध कवि. हे बालकवि या नांवानें विशेष प्रसिद्ध आहेत.

यांचा जन्म खानदेशांत झाला. यांचं शालेय शिक्षण व्यवस्थित झालें नाहीं. वयाच्या सत्राव्या वर्षी जळगांवीं भरलेल्या कविसंमेलनांत अध्यक्ष कान्होबा रणछोडदास कीर्तिकर यांच्या हस्तें यांचा बालकवि म्हणून सन्मान झाला ( स. १९०७ ). पोटासाठीं यांनीं पंडितगिरी म्हणजे गोऱ्या मिशनऱ्यांची मराठी शिकवणी मधूनमधून केली. प्रपंचांत ओढाताण व गृहसौख्याचा अभाव सर्व आयुष्यभर यांच्या वांट्यास आला. कविवर्य केशव महादेव सोनाळकर, नारायण वामन टिळक व गोविंदाग्रज यांच्या सहवासांत यांना पुष्कळ स्नेहसौख्य मिळालें. यांचें एका स्त्रीवर अलोट प्रेम होतें. पण तीहि स्खलनशील मानवी व्यक्तीच होती हें ध्यानांत आल्यानें प्राणान्तिक व्यथा होण्याच्या पूर्वीच हे अपघातांत सांपडून मृत्यु पावले.

हे निसर्गाचें वर्णन करणारे कवि असून यांच्या, आनंदी आनंद गडे, अरुण व फुलराणी या कविता उत्कृष्ट वाङ्मयांत मोडतात.

यांचें काव्यवाङ्मयः बालकवींची कविता ( १९२३, ए. या. निफाडकर; १९२५, गो. गो. अधिकारी; १९३९, पाटणकर ).

---

# ड

**डफरिन, लॉर्ड**—( जन्म स. १८२६-मृत्यु स. १९०२-कारकीर्द स. १८८४-१८८८ ) हिंदुस्थानचे व्हाइसरॉय. लॉर्ड रिपननंतर हे व्हाइसरॉय म्हणून हिंदुस्थानांत आले.

यांचें शिक्षण ऑक्सफर्डला झालें. हे लॉर्ड झाल्यानंतर अमेरिका, व्हिएन्ना वगैरे ठिकाणीं कामें केल्यावर यांना हिंदुस्थानचे अंडर-सेक्रेटरी नेमण्यांत आलें (१८६४-६६). यानंतर इजिप्त वगैरे देशांत कामें केल्यानंतर यांना हिंदुस्थानचे गव्हर्नर जनरल व व्हाइसरॉय नेमण्यांत आलें. इल्बर्ट-बिलामुळें उत्पन्न झालेली वर्णभेदाची तेढ यांनीं आपल्या व्यक्तिमत्त्वानें नाहींशी करण्याचा प्रयत्न केला. रशिया व अफगाणिस्थान यांची तेढ टळली, तेव्हां यांनीं रावळपिंडी येथें अमीर अबदुल रहमान यांची भेट घेऊन सलोखा स्थापन गेला ( १८८५ ). ब्रह्मदेशचा राजा थिबा यानें इंग्रजांशीं विरोधाचें धोरण स्वीकारतांच यांनीं त्याला पराजित करून ब्रह्मदेश हिंदुस्थानला जोडून घेतला व राजा थिबा यास रत्नागिरी येथें कैदेंत ठेविलें. तेथेंच तो पुढें वारला ( १९२६ ). व्हिक्टोरिया राणीच्या राज्याचा पन्नास वर्षांचा सुवर्णमहोत्सव यांच्या वेळीं साजरा झाला ( १८८७ ). ग्वाल्हेरचा किल्ला यांनीं शिंद्यांना परत देवविला व मुदत संपल्यावर रेल्वे कंपन्यांकडून रेल्वेची मालकी सरकारकडे यावी असें ठरविलें. बंगाल, अयोध्या व पंजाब प्रान्तांत यांनीं कुळसंरक्षण कायदा केला.

इंडियन नॅशनल कांग्रेसनें सामाजिक प्रश्नांचा विचार करावा, राजकीय प्रश्नांचा विचार प्रांतांतल्या राजकीय संस्थांनीं करावा, प्रांतांनीं या कामीं भरविलेल्या परिषदेचें अध्यक्षस्थान त्यांच्या प्रांताच्या गव्हर्नरांना द्यावें आणि यायोगें अधिकारीवर्ग व बिनसरकारी राजकीय पुढारी यांच्यांत परस्पर आदर व प्रेम वाढवावें या कल्पनेनें भारून जाऊन मि. ह्यूम यांनीं स. १८८५ च्या प्रारंभीं सिमला येथें यांची मुलाखत घेतली. ही योजना यांना फारशी उपयुक्त वाटली नाहीं. इंग्लंडप्रमाणें सरकारविरोधी पक्ष येथें नाहीं, वर्तमानपत्राच्या टीकेवरहि विश्वास ठेवतां येत नसल्यानें लोकांचें मत सरकारला समजत नाहीं. म्हणून हिंदी राजकारणाचा विचार करणाऱ्या हिंदी गृहस्थांनीं वर्षांतून एकदां एकत्र जमावें व प्रचलित राजकारणांतील दोष दाखवून ते सुधारण्याचे उपाय सुचवावेत. मात्र गव्हर्नरच्यासमोर आपले विचार मोकळेपणानें लोकांना मांडतां येणार नाहींत म्हणून अध्यक्ष गव्हर्नर असूं नये. अशी योजना यांनीं ह्यूम यांना सुचविली. ही कल्पना आपण सुचविल्याचें कारकीर्द संपेतोंपर्यंत गुप्त राखण्याचें यांनीं सांगितलें होतें ( राष्ट्रीय सभेचा इतिहास, पा. १२). परंतु यांची ही योजना पुढें कल्पनेंतच राहून ती संस्था चळवळ करणारी होऊं लागली आणि तिच्यांत वजनदार पुढारी सामील होऊं लागले असें पाहतांच यांचें तीबद्दलचें धोरण बदलूं लागलें. यांनीं मुसलमानांना त्या संस्थेंतून वेगळे काढून तिला केवळ हिंदूंची सभा ठरविण्याचा घाट घातला. हिंदुस्थानांत हिंदु व मुसलमान अशीं दोन राष्ट्रें नांदत आहेत ही कल्पना प्रथम यांच्या डोक्यांतून निघालेली आहे.

धर्म, संस्कृति, समाजघटना, स्वभाव आणि इतिहासपरंपरा या सर्व दृष्टींनीं परस्परविरुद्ध असे हिंदु व मुसलमान लोक असल्यानें त्यांचें एक राष्ट्र कधीं होणार नाहीं असें यांनीं कॉंग्रेसच्या स्थापनेनंतर स्पष्टपणें बोलून दाखविलें. त्या द्विराष्ट्र वादाचा विषवृक्ष पुढें फोफावला आहे आणि त्याचीं फळेंहि पण पारतंत्र्याच्या रूपानें भारतास अनुभवण्यास मिळत आहेत.

यांचे ग्रंथः—(1) Letters from High Latitude, (2) Speeches in India (1890).

**डॉयसेन, पॉल**—( जन्म स. १८४५–मृत्यु स. ? ) हिंदी तत्त्वज्ञानाचे जर्मन अभ्यासक व अभिमानी.

कॉब्लेंझ जवळील ऑबेरड्रीस हें गांव यांचें जन्मस्थान. ॲडाम डॉयसन यांचे हे चिरंजीव. बॉन व बर्लिन युनिव्हर्सिटींत आपलें शिक्षण संपविल्यानंतर यांनीं प्रा. लासेन यांचेजवळ संस्कृतचें अध्ययन केलें. जिनेव्हा युनिव्हर्सिटींत संस्कृत व तत्त्वज्ञान या विषयांच्या अध्यापकाचें काम करीत असतांच यांनीं हिंदी तत्त्वज्ञानाचे अध्ययनार्थ आपलें आयुष्य व्यतीत करण्याचें ठरविलें ( १८७३ ) व त्याप्रमाणें आयुष्याच्या अखेरीपर्यंत यांचें सर्व लक्ष ज्ञानाच्या या शाखेवरच केंद्रित झालेलें होतें. यांनीं पन्नास उपनिषदांचें जर्मनमध्यें भाषान्तर करून त्यांची अनेक दृष्टींनीं चिकित्सा केली आहे.

हिंदुस्थानांतील यांच्या आगमनाच्या पूर्वीपासूनच प्लेटो, ॲरिस्टॉटल व कॅन्ट यांच्या तत्त्वज्ञानाशीं हे पूर्णपणें समरस झालेले होते. हिंदुस्थानांत आल्यानंतर हिंदी तत्त्वज्ञान–विशेषतः अद्वैत वेदान्ताचें अध्ययन केल्यानंतर कॅन्टचें तत्त्वज्ञान व अद्वैत वेदांत यांमध्यें असणारें साम्य यांच्या लक्षांत आलें. आणि थोड्याच दिवसांत उपनिषदांतील अध्यात्मवादाला कॅन्टचें तत्त्वज्ञान शास्त्रीय पार्श्वभूमि आहे असें यांचें मत बनूं लागलें. स्पायनोझाचें तत्त्वज्ञान व वेदान्त यांमध्यें असेंच साम्य आहे. परंतु दोन्ही तत्त्वज्ञानें गूढ असल्यानें शास्त्रीय जगांत त्यास विशेष किंमत नाहीं. परंतु कॅन्टची गोष्ट तशी नाहीं. गणिती व वैज्ञानिक शास्त्रांत लक्ष घालणाऱ्या कॅन्टचें तत्त्वज्ञान त्या शास्त्रांना अनुसरून लिहिलें असल्यानें अत्यंत महत्त्वाचें आहे. आणि अशा तत्त्वज्ञानाशीं वेदान्ताचें असणारें साम्य जर दाखवितां आलें तर इतके दिवस गूढ स्वप्न या नांवाखालीं झिडकारण्यांत आलेल्या उपनिषदांतील तत्त्वज्ञानाला एकदम उजाळा येईल असें यांना वाटलें व झालेंहि तसेंच.

श्रीशंकराचार्यांच्या अद्वैतवेदान्तानुसार दृश्य जग स्वप्नासारखें केवळ भासणारें आहे, त्यांत सत्यता नाहीं, दृश्याच्या पलीकडे असणारें ब्रह्म तेवढें सत्य आहे. प्रत्येक व्यक्तीला जगाचा अनुभव येतो याचें कारण अज्ञान किंवा माया. अज्ञानांत गुरफटलेला प्राणी आपल्या पूर्वकर्मानुसार जगाकडे पाहतो आणि त्याचा अनुभव घेतो. मृगजल, रज्जुसर्प व शुक्तिकारजत हीं त्याचीं उदाहरणें होत.

कॅन्ट या सुप्रसिद्ध जर्मन शास्त्रज्ञाचें म्हणणें असेंच आहे. वैज्ञानिक दृष्ट्या पाहतां जगाचें वास्तविक स्वरूप आपणास दिसतच नाहीं. जग पाहणाराला अनेक कारणांनीं तें विकृतच दिसतें. तें मूळ स्वरूपांत पाहावयाचें असल्यास आपल्या इंद्रियांचा कांहीं उपयोग नाहीं. रंगीत कांचेप्रमाणें असणारें आपलें मन, स्वभाव व इंद्रियें यांना मध्यें न घालतां आपण जगाकडे पाहिलें तर जगाच्या मुळाशीं असणारी एक शुद्ध वस्तु आपणास आढळेल.

व्यवहारदृष्ट्या दिसणारें जग जसें दिसतें तसें आहे असें मानून आपण व्यवहार करीत असलों, तरी जगाचें वास्तविक स्वरूप इंद्रियातीत एकजिनसी आहे असा दोघांच्याहि म्हणण्याचा निष्कर्ष आहे. एकजण युक्तिवाद व उपनिषदांतील वाक्यें यांवरून आपलें म्हणणें सिद्ध करण्याचा प्रयत्न करतो आणि दुसरा आधुनिक विज्ञानशास्त्रावरून आपलें म्हणणें मांडतो. त्यामुळें दोन्ही मार्ग एकाच ठिकाणीं पोंचल्यासारखे दिसतात.

कॅन्ट व शंकराचार्य यांच्या विचारसरणींतील साम्य यांनीं अचूक उचललें आणि अद्वैत वेदान्ताची आधिभौतिक विज्ञानशास्त्राशीं सांगड घातली.

हिंदी तत्त्वज्ञानाच्या यथार्थतेबद्दल ज्या वेळीं संभ्रम उत्पन्न झाला होता त्या वेळीं कॅन्टसारखा तत्त्वज्ञ उत्पन्न झाला आणि त्याच्या शोधपूर्वक ठरविलेल्या मताचें आणि शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाचें विलक्षण साम्य दाखविण्याचें कार्य यांच्यासारख्या अभ्यासकांनीं केलें. त्यामुळें आधुनिक शास्त्रामुळें डळमळीत झालेलें औपनिषद तत्त्वज्ञानाचें स्थान कांहीं काळ तरी स्थिर झालें यांत शंका नाहीं.

यांचे ग्रंथः—

( 1 ) Das System des Vedanta ( 1883 ), ( 2 ) Die Sutras des Vedanta ( 1887 ), ( 3 ) On the Philosophy of the Vedanta in its relations to Occidental Metaphysics ( 1893 ), ( 4 ) Sechzig Upanishads des Veda ( 1897 ), ( 5 ) Geschichte der Philosophie ( ५ भाग ), ( 6 ) Outlines of Indian Philosophy (1902).

**डार्लिंग, सर माल्कम लॉयल**—( जन्म स. १८८० ) सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ.

ईटन व केंब्रिजच्या क्वीन्स कॉलेजमध्यें आपलें शिक्षण संपवून हे इंडियन सिव्हिल सर्व्हिसमध्यें दाखल झाले ( १९०४ ). पंजाब सरकारचे 'अंडर-सेक्रेटरी' म्हणून कांहीं दिवस काम केल्यानंतर हे पंजाबचे इन्कम टॅक्स कमिशनर बनले. परंतु यानंतर थोड्याच दिवसांनीं यांची को-ऑपरेटिव्ह सोसायटीचे रजिस्ट्रार म्हणून नेमणूक झाली. यांचे कारकीर्दींत यांना पंजाबी शेतकरी वर्गाची, त्यांच्या अडचणींची व त्यांच्या-पुढें असणाऱ्या प्रश्नांची उत्कृष्ट व सूक्ष्म छाननी करण्याची संधि मिळाली. सहकारी पतपेढ्यांच्या स्थापनेची शक्याशक्यता हा आपला मूळ मुद्दा मात्र या अध्ययनांत यांनीं कधींच दूर होऊं दिला नाहीं. सरकारच्या आर्थिक विभागांतील अधिकारी व पंजाबचे फायनेन्शियल कमिशनर या नात्यानें यांनीं केलेली काम-गिरीहि बहुमोल आहे. इंडियन इकॉनमिक असोसिए-शनच्या कार्यास सक्रिय साहाय्य करणारे एक सनदी नोकर हा यांचा विशेष आहे.

पंजाब बँकिंग इन्कायरी कमिटी ( १९३० ) व पंजाब लँड रेव्हेन्यु असेसमेंट कमिटी ( १९३८ ) या दोन मोठ्या चौकशी मंडळांचें अध्यक्षस्थान यांनाच देण्यांत आलें होतें. पंजाब युनिव्हर्सिटीचे हे कांहीं दिवस उपकुलगुरु होते.

उत्कृष्ट शास्त्रीय ग्रंथांचे लेखन हा यांच्या आयुष्याचा आणखी एक विशेष आहे. Some Aspects of Co-Operation in Germany and Italy ( 1922 ), The Punjab Peasant in Prosperity and Debt ( 1925 ), Rusticus Loquitur Or the Old Light and the New in Punjab Village ( 1930 ), Wisdom and Waste in Punjab Village ( 1934 ) इत्यादि यांचे ग्रंथ विद्वन्मान्य आहेत.

इंडियन इकॉनमिक कॉन्फरन्सच्या लखनौ येथें भरलेल्या अकराव्या अधिवेशनाचे हे अध्यक्ष होते. Religion and Economics हा यांच्या अध्यक्षीय भाषणाचा विषय होता ( १९२८ ).

**डावरे, गोविंदराव नारायणराव**— ( जन्म स. १८३६–मृत्यु स. १८७९ ) अत्यंत धाडसी आणि क्रांतिकारक गृहस्थ.

हे शुक्ल यजुर्वेदी माध्यंदिन शाखेचे कौशिक गोत्री ब्राह्मण. मूळ घराणें नगर जिल्ह्यांतील. शामराव धोंडो नाईक डावरे हे प्रथम पेशवाईंत पुण्यास आले. केशव–धोंडो–शामराव–बल्लाळ–नारायण असा यांचा वंशवेल आहे. नारायणरावांना तीन पुत्रः गोविंदराव, माधवराव व बळवंतराव.

इंग्रजांच्या कारकीर्दींत यांचें शेटेपणाचें वतन गेलें व तें परत मिळेना तेव्हांपासून हें घराणें इंग्रजांचें द्वेष्टे बनलें. स. १८५७ च्या क्रान्तियुद्धानंतर महाराष्ट्रांत वासुदेव बळवंत फडके यांच्या नेतृत्वाखालीं बंडाची उठावणी झाली, त्यांत या डावरे बंधूंचा संबंध होता.

यांच्यावर वेगळाल्या आरोपांखालीं त्या वेळीं अनेक खटले भरण्यांत आले. त्यांपैकीं बहुतेक सर्व खटल्यांतून हे निर्दोषी म्हणून सुटले. यावरून यांच्या बुद्धिमत्तेची व कारस्थानीपणाची कल्पना येते.

स. १८६७ मध्यें यांच्यावर 'पूना बँक फोर्जरी केस' नांवानें गाजलेला खटला भरण्यांत आला. तो पुणें येथील से. जज्ज एफ्. लॉइड यांचे पुढें १६ सप्टें. ते २३ ऑक्टो. १८६७ पर्यंत चालला. त्यांत यांच्यासुद्धां चवदा आरोपी होते. याशिवाय पेस्तमजी फर्दुनजी व बाळा मांडे या दोन आरोपींस सरकारतर्फे माफीचे साक्षीदार करण्यांत आलें होतें.

आरोपींस ज्यूरर मिळाले होते. त्यांचे फोरमन पुण्यांतील प्रसिद्ध कृष्णशास्त्री चिपळुणकर होते. हा खटला चालू असतां पुणें शहरीं अत्यंत खळबळ उडाली होती.

आरोपीतर्फे प्रख्यात बॅरिस्टर ब्रॅन्सन हे काम पाहत होते. या खटल्याचें समग्र जजमेंट चार्लस बुइल्यम अलेन यांनीं डेक्कन हेरल्ड प्रेसमध्यें छापून प्रसिद्ध केलें.

या खटल्याच्या चौकशीकडे सर्व महाराष्ट्राचें लक्ष वेधलें होतें. ज्युरींनीं एकमतानें सर्व आरोपी निर्दोषी आहेत असा दिलेला निर्णय मान्य करून सेशन्स जज्ज यांनीं सर्व आरोपींना सोडून दिलें. शहरांत सर्वत्र पेढे वांटण्यांत व उधळण्यांत आले. हा खटला बहुधा यांच्यावरील चवथा असावा.

मध्यंतरीं अशाच कांहीं कारणांनीं यांच्या माधवराव व बळवंतराव या दोघा बंधूंना जन्मठेप काळे पाण्याची शिक्षा देण्यांत आली ( १८७३, १८७४ ). नंतर यांनाहि पकडून कच्च्या कैदेंत ठेवण्यांत आलें ( ८-११-७९ ).

तेथेंच यांना भाजण्यांत आलें व त्यामुळें हे मृत्यु पावले असें म्हणतात ( १३-१२-१८७९ ).

अशा प्रकारें यांचा कैदेंत हृदयद्रावक अंत झाला. यांना कशाकरितां पकडलें होतें हें समजण्यास साधन नाहीं. पण याच सालांत यापूर्वी सरकारी महत्त्वाचे कागदपत्र असलेले बुधवारवाडा व विश्रामबागवाडा हे जाळण्यांत आले होते. लोक त्याशीं यांच्या मृत्यूचा संबंध जोडीत.

मूळ तहनामे नाहींसे करून बनावट तहनामे तयार करून मूळ ठिकाणीं ठेवणें. नोटा करणें, बनावट कागद करणें, दुसऱ्याच्या सह्या करणें, चेक तयार करून कोणाच्याहि खात्यांतून पैसे काढणें, अशक्य वाटणारी गोष्ट हमखास घडवून आणणें वगैरे गोष्टींत हे अत्यंत निष्णात होते. याबाबतींत पुण्यांत यांच्यासंबंधीं अनेक आख्यायिका प्रसिद्ध होत्या. अशा कृत्यांविषयीं डावरे-गिरी हा शब्द तर पुण्यांत म्हणीसारखा रूढ आहे.

**डावरे, धर्मवीर-विश्वासराव बळवंतराव—** ( जन्म स. १८८८ नवं. ७, पोर्ट ब्लेअर-अंदमान ) सुप्रसिद्ध धाडसी, कायदेबाज व सरकारविरुद्ध चळवळ करणारे गृहस्थ.

यांच्या वडिलांना व चुलत्यांना काळेपाण्याच्या शिक्षा झाल्यानंतर दहा वर्षांनीं अंदमानांत हजेरी देऊन कुटुंबासह स्वतंत्र राहण्याची परवानगी मिळाली ( १८८४ ). तेव्हां यांची माता गीताबाई तिकडे गेल्या व तेथें यांचा जन्म झाला. शिक्षेची मुदत संपून ही सर्व मंडळी पुण्यास आली ( १८९३ ). पुढें बळवंतराव प्लेगनें वारले ( १९०२ ) आणि यांच्यावर लहानपणींच संसाराचा बोजा पडला. कांहीं वर्षे नोकरी केल्यावर यांनीं प्रत्यक्ष व्यापारांत लक्ष घातलें. पण यांना जॅक्सन खून प्रकरणांत पिस्तुल जवळ बाळगणारे म्हणून तीन वर्षांची शिक्षा झाली. सुटून परत आल्यावर यांनीं धंद्यांत चांगले पैसे कमावले. पण स्वभाव चळवळ्या असल्यानें प्रत्येक चळवळींत हे भाग घेत आणि वैशिष्ट्यानें बिनीवर चमकत. धाडसाबरोबर कायद्यांतील सूक्ष्मता यांच्या जलद ध्यानांत येते. १ तळेगांव येथील मशिदीपुढील वाद्यबंदी, २ नाशिक रामरथ, ३ सोन्या मारुति-पूजा वगैरे प्रकरणें यांनीं हायकोर्टापर्यंत लढवून यशस्वी करून दाखविलीं. महाराष्ट्र प्रान्तिक वर्णाश्रम स्वराज्य संघाचे हे अनेक वर्षे अध्यक्ष होते. पुण्यांतील अनेक संस्थांत कार्यवाह, अध्यक्ष व उत्पादक म्हणून यांनीं काम केलें आहे. यांच्या धाडसाच्या गोष्टी नमूद करण्याचा काळ मात्र अजून आलेला नाहीं.

**डांगे, श्रीपाद अमृत—**(जन्म स. १९०० सुमार) सुप्रसिद्ध कम्युनिस्ट तत्त्वप्रतिपादक, संघटक व निर्भय कार्यकर्ते.

यांचा जन्म नाशिक येथें डांगेआळींत झाला. यांचे वडील दलालीचा धंदा करीत. हे मुंबईच्या विल्सन कॉलेजांत शिक्षण घेत असतां बेझंटबाईंचीं व्याख्यानें होत. तेव्हां विद्यार्थी या नात्यानें प्रश्न विचारून लोकांच्या मनांत त्यांच्या विचारसरणीबद्दल संशय उत्पन्न करण्याचें काम हे करीत. इंटरच्या वर्गांत असतां बायबलचें शिक्षण सक्तीचें नको म्हणून यांनीं विद्यार्थी वर्गांत चळवळ करून त्या वेळीं संप घडवून आणला. त्या वेळेपासून इंग्रजी भाषेंत लिहिण्याचा, बोलण्याचा व कविता करण्याचाहि यांना नाद लागला. गडकऱ्यांच्या 'वाग्वैजयन्ती'चें यांनीं इंग्रजींत भाषान्तर केलें. त्या वेळीं 'यंग कॉलेजिएट' या नियतकालिकांत त्यांतील कांहीं उतारे प्रसिद्ध होत असत. ज्युनियर बी. ए. च्या वर्गांत असतां यांनीं असहकारितेच्या चळवळींत आपल्या शिक्षणाला कायमचा रामराम ठोकला. पण म. गांधींच्या राजकारणांत यांच्या तर्ककर्कश बुद्धीला योग्य विचारसरणीचा व कार्यक्रमाचा अभाव दिसून आला. तेव्हां त्यांच्याशीं वादविवादाचे दोन हात करून यांनीं गांधीवादाला सोडचिठ्ठी दिली.

१९२२ सालीं यांनीं 'सोशॅलिस्ट' नांवाचें इंग्रजी साप्ताहिक काढलें आणि त्यांतून समाजवादी विचारसरणी यांनीं लोकांसमोर मांडण्यास सुरवात केली. टाइम्सकारांनीं 'बोल्शेव्हिक पेपर ऑफ बाँबे' अशी यांच्या पत्राची बोळवण केली. त्या वेळीं रशियांत वास्तव्य करून असलेल्या मानवेन्द्रनाथ रॉय यांच्याशीं यांचा पत्रव्यवहार होता. यांचें धोरण अर्धवट नव्हतें. हे आपल्या लेखांत सोशॅलिझमचा पुरस्कार निःसंदिग्धपणें व निर्भयपणें करीत. कामगारांचें तात्पुरतें ध्येय पगारवाढ हें असलें तरी सर्व उत्पादनाचीं साधनें ताब्यांत घेऊन तीं पूर्णपणें सार्वजनिक मालकीचीं झाल्याशिवाय त्यांचें कार्य पूर्ण होणार नाहीं, हीं साधनें कामगारांच्याच श्रमांनीं उभारलीं गेलीं असल्यामुळें त्यांवर कामगारांचा हक्क आहे असा यांच्या प्रतिपादनाचा रोख असे.

१९२४ सालीं कानपुरास यांच्यावर खटला होऊन यांना चार वर्षांची शिक्षा झाली. त्यांत सरकारी

वकिलानें असें सांगितलें, 'कम्युनिझमचीं तत्त्वें प्रतिपादण्यास अगर त्यांचा प्रचार करण्यास आमचा विरोध नाहीं. पण हे लोक शेतकरी व कामगार यांना चिथावणी देऊन बेडाम प्रवृत्त करण्याचा प्रयत्न करतात. शिवाय यांना ब्रिटिश हुकमत नष्ट करावयाची आहे. म्हणून यांना कोर्टात खेचणें भाग पडतें.' कामगारांचा पुढारी म्हणून शिक्षा झालेला हा हिंदुस्थानांतील पहिला खटला होय.

सरकारची ही वृत्ति पाहून यांनीं आपल्या साह्यकर्त्या लोकांच्या मदतीनें कानपूर येथें कम्युनिस्ट पार्टीची रीतसर स्थापना केली (१९२५) व तिलाच पुढें भारतीय स्वरूप देऊन शेतकरी-कामकरी पक्ष निर्माण केला (१९२७). या वेळेपासून यांच्या प्रतिपादनाचा आणि संघटनेचा प्रभाव सरकारला व लोकांनाहि जाणवूं लागला. हिंदुस्थानची राज्यघटना ठरविण्याकरितां 'सायमन कमिशन' आलें. त्यावर यांनीं बहिष्काराची परिणामकारक मोहिम केली. तसेंच संपाची वावटळ उत्पन्न करून मजुरांची पगारकपात थांबविली. याच सालीं हिंदुमुसलमानांचा परळ येथें होऊं घातलेला दंगा केवळ यांनीं स्वतःचे वजनानें थांबविल्याची नोंद सरकारी दप्तरांत आहे. यामुळें सरकार अस्वस्थ झालें आणि सुप्रसिद्ध 'मीरतकेस' निर्माण करण्यांत येऊन त्यांत यांना गोंवण्यांत आलें (१९२९). हिंदुस्थानांतील सर्व प्रान्तांतील आरोपी या खटल्यांत असले तरी महाराष्ट्रांतील आरोपींची संख्या व प्रभाव विशेष होता. हा खटला चार वर्षे चालला. त्यांत यांनीं ७०० पानी जबाब दिला. यांना बारा वर्षांची शिक्षा झाली. पण ती अपिलांत तीन वर्षांची होऊन हे १९३५ सालीं सुटले. हा खटला, त्यांतील आरोपी, त्यांना मिळालेल्या सवलती व खटल्यांतून निघालेला निष्कर्ष हें सर्वच अगदीं अपूर्व असून एका नव्या राजकीय युगाचे निदर्शक होतें.

सुटल्यानंतर यांनीं 'क्रान्ति' हें मराठी व 'नॅशनल फ्रंट' हें इंग्रजी साप्ताहिक काढलें. याच वेळीं ७ महिने 'बिटिया' मिलचा संप चालवून यांनीं तो यशस्वी केला. राष्ट्रसभा-मंत्रिमंडळानें यांच्यावर भाषणबंदीचा हुकूम बजवल्यानें दुसरें महायुद्ध सुरू झाल्यावर यांचें तोंड बंद झालें. १९३९ सालीं मुंबईस महागाईभत्त्याचा ८० हजार कामगारांचा संप यांनीं सुरू केला. पण यांना अटक करून तुरुंगांत घालण्यांत आलें. कम्युनिस्टांच्या युद्धानुकूल धोरणामुळें यांची पुढें सुटका झाली. नंतर हे युरोपमध्यें गेले व दीड वर्षानें युद्ध संपल्याचें जाहीर झाल्यावर हिंदुस्थानांत परत आले (१२ डिसें. १९४५).

लंडन येथें जागतिक कामगारपरिषदेला हे हिन्दी ट्रेड युनियन काँग्रेसचे प्रतिनिधि म्हणून हजर होते. तेथें यांनीं हिन्दी कामगारांचा प्रश्न मांडला आणि त्यांच्यासंबंधीं ब्रिटिश जनतेंत असलेले गैरसमज दूर केले. यांनीं हिन्दी मजुरांच्या दैन्यावस्थेचें वर्णन स्पष्टपणें करून ब्लॅकपूल येथें भरलेल्या सत्तर लाख मजुरांचे प्रतिनिधि असलेल्या सभेंत हिन्दी स्वातंत्र्याचा ठराव निःसंदिग्ध भाषेंत पास करून घेतला. जागतिक कामगारसंघ स्थापन झाल्यावर पॅरिसच्या परिषदेंत हे सर्व वसाहतींचे पुढारी बनले, आणि वसाहतींच्या स्वातंत्र्याला यांनीं त्या संघटनची मान्यता मिळविली.

स्वातंत्र्ययुद्धाकरितां क्रान्तिकारक लढाऊ वर्ग तयार करणें, शेतकरी-कामकऱ्यांच्या बळकट संघटनेनें स्वातंत्र्ययुद्धाला तीव्रता आणणें, लढ्याचें नेतृत्व भांडवलदारांकडून काढून श्रमजीवी लोकांकडे आणणें, याकरितां कम्युनिझमच्या तत्त्वाचा प्रचार करणें, सत्तेचीं सर्व केन्द्रें श्रमजीवी लोकांनीं काबीज करण्याच्या दृष्टीनें व्यापणें आणि पिळवणुकीचा नाश करणें असा यांचा स्पष्ट कार्यक्रम आहे. दिवाणगिऱ्या व अधिकाराच्या जागा यांचा स्वीकार करणें म्हणजे फक्त जनताबळ व राष्ट्रीय भावना तीव्रतर करण्याचा मार्ग आहे, शेवटीं स्वातंत्र्य लढ्यानेंच मिळवावें लागेल, लढ्याला भांडवलवाले कधींच उपयोगी पडणार नाहीत, तो भार श्रमजीवी बहुजन समाजावरच पडावयाचा, अशा सिद्धान्तानुसार यांचें कार्य चालू असतें.

यांचा व्यासंग बहुविध व सूक्ष्म आहे. आपलें तत्त्वज्ञान निर्भयपणें मांडण्याची शक्ति यांच्यांत आहे. तसेंच तें व्यवहारांत उतरवून यांनीं लोकांना व सरकारला अनेक वेळां अस्वस्थ करून सोडलें आहे. त्यामुळें सर्व राजकीय कार्यकर्त्यांत यांच्या चळवळीला व यांना विशेष प्रकारचें स्थान आहे. यांच्या पुनर्विवाहित पत्नी उषाबाई यांच्या या कार्यांत नेहमीं सहभागी असतात. यांचें वाङ्मय—१ लेनिन व गांधी, २ हेल फाउंड, ३ वैदिक कालाचा इतिहास.

**डेव्हिड्स. टी. डब्ल्यू. व्हीस**—(जन्म स. १८४३- मृत्यु १९२२) पाली भाषेचे सुप्रसिद्ध अभ्यासक, संशोधक व पंडित.

ब्राइटन स्कूल व ब्रेसलौ युनिव्हर्सिटींत आपलें शिक्षण संपवून हे सिलोन सिव्हिल सर्व्हिसमध्यें शिरले (१८६६). सुरुवातीपासूनच संस्कृतचे पंडित म्हणून यांची सर्वत्र ख्याति असून सिलोनमध्यें आल्यानंतर थोड्याच दिवसांत यांनीं सिंहली व तामीळ भाषा आत्मसात् केल्या. पुढें एका ग्रामीण खटल्याची तपासणी करीत असतां पाली भाषेच्या ज्ञानाची आवश्यकता यांना भासली व थोड्याच दिवसांत सिलोनमधील बौद्धधर्मीय इतिहासांत हे रमूं लागले. पुढें इंग्लंडमध्यें बॅरिस्टर झाल्यानंतरहि यांनीं आपली ही ज्ञानोपासना तशीच पुढें चालू ठेवली.

'नॉन-ख्रिश्चन रिलिजन्स' या सुप्रसिद्ध ग्रंथमालेंत Buddhism हा ग्रंथ लिहून यांनीं आपल्या या नव्या आयुष्यास सुरुवात केली ( १८७८ ) आणि याचा हा ग्रंथ इतका लोकप्रिय झाला कीं अगदीं थोड्या अवधींत त्याच्या डझनावारी आवृत्त्या निघाल्या. 'निर्वाण' या शब्दांत त्या वेळीं सर्वत्र ध्वनित केला जाणारा 'पूर्ण नाश' हा त्याचा खरा अर्थ नाहीं, या जगांतच गांठणें शक्य असणारी उच्च अवस्था म्हणजे 'निर्वाण' हा सिद्धान्त यांनीं या ग्रंथांत प्रथम साधार सिद्ध केला व पुढें अनेक विद्वानांना त्याची री ओढणें भाग पडलें.

परंतु 'पाली टेक्स्ट सोसायटी'ची स्थापना हें यांचें प्रमुख जीवितकार्य होय. १८८१ सालीं दिलेल्या हिबर्ट लेक्चर्समध्यें यांनीं प्रथम Early English Text Society च्या धर्तीवर पाली भाषेंतील ग्रंथ प्रसिद्ध करणाऱ्या संस्थेची कल्पना मांडली व त्याच वर्षी त्या संस्थेची यांनीं स्थापना केली. विस्कळितपणें पसरलेले बौद्ध ग्रंथ एकत्र आणावयाचे, व्यवस्थितपणें संपादित करून ते रोमन लिपींत प्रसिद्ध करावयाचे, त्यांचीं भाषान्तरें करावयाचीं व शेवटीं त्यांवर स्वतंत्र ग्रंथ लिहावयाचे, अशा क्रमानें यांच्या या कार्याबद्दलच्या कल्पनांचा विकास होत गेला. 'धर्म, भाषा व कथा यांचा सुसंगत इतिहास या दृष्टीनें या ग्रंथांना विशेष महत्त्व आहे. यांतील बहुतेक ग्रंथ बुद्धकालीन असून केवळ लिहिण्याचे अज्ञानामुळें त्यांचें लेखन दोन शतकें पुढें ढकललें गेलें. कोणत्याहि प्रकारचा धक्का आजपर्यंत या ग्रंथांना लागला नसल्यानें आपल्या धर्माचा खात्रीलायक इतिहास आपणांस मिळून ख्रिश्चन धर्माच्या प्रारंभीच्या इतिहाससंबंधीं आपणांस कांहीं नवीं प्रमेयें बसवण्यास मदत होईल,' अशा हेतूंनीं यांनीं या कार्यास सुरुवात केली व ही कल्पना पुढें फारच यशस्वी झाली. वैदिक संस्कृत व संस्कृत वाङ्मय यांमधील अनुपलब्ध दुवा शोधून काढण्यास या ग्रंथांचे संशोधनानें मदत केल्यानें तर यांची सर्वत्र फारच वाहवा झाली व वेदांच्या संशोधनाइतकें महत्त्व लोक या संशोधनशाखेस देऊं लागले.

संस्थेच्या स्थापनेच्या वेळेपासून आपल्या आयुष्याच्या अखेरीपर्यंत सतत चाळीस वर्षे यांनीं हें कार्य तनमनधन अर्पून चालविलें. २६००० पृष्ठें असलेल्या ६४ मूळ पाली ग्रंथांच्या रोमन लिपींतील आवृत्त्या यांनीं ९४ खंडांत प्रसिद्ध केल्या. लंडनच्या युनिव्हर्सिटी कॉलेजमधील पालीचे प्राध्यापक व रॉयल एशियॅटिक सोसायटीचे सेक्रेटरी या जागा ( १८८५-१९०४ ) यांना देण्यांत आल्यामुळें तर यांचें हें कार्य अधिक सुलभ झालें.

यांचे ग्रंथ—( 1 ) Buddhism ( 1878 ), ( 2 ) Buddhism, its History and Literature (1899), ( 3 ) Buddhist India ( 1902 ), ( 4 ) Early Buddhism ( 1908 ), ( 5 ) An Early History of Buddhists ( Cambridge History of India-तील एक प्रकरण ), ( 6 ) पाली-इंग्लिश डिक्शनरी ( डब्ल्यू. स्टीड यांचे सहकार्यानें ) व इतर अनेक संपादित ग्रंथ.

**डेव्हिड्स, मिसेस् सी. ए. एफ. ऱ्हीस—** ( जन्म. स. १८५७–मृत्यु स. १९४२ ) पाली भाषेच्या सुप्रसिद्ध अभ्यासिका.

टी. डब्ल्यू. ऱ्हीस डेव्हिड्स यांच्या या पत्नी. प्रथम सहकारी म्हणून यांचा त्यांच्याशीं संबंध आला व १८९४ मध्यें या त्यांच्याशीं विवाहबद्ध झाल्या. पाली टेक्स्ट सोसायटीनें प्रसिद्ध केलेल्या बहुतेक सर्व ग्रंथांचें संपादन यांनीं केलें आहे. वास्तविक ऱ्हीस-डेव्हिड्स असें यांचें नांव आहे.

यांचे ग्रंथ—( 1 ) Goatama the Man, ( 2 ) Sakya or Buddhist Origins, ( 3 ) Buddhism, ( 4 ) Buddhist Psychology, ( 5 ) Old Creeds and New Creeds, ( 6 ) Wayfarer's Words इत्यादि.

**डोंगरे, अनंतपद्मनाभ परमेश्वर—**( मृत्यु स. १८७८ ) एक माध्व सांप्रदायी कर्मठ शास्त्री व स्त्रियांना संस्कृत शिक्षण देण्याचे पुरस्कर्ते.

हे दक्षिण कानडा जिल्ह्यांतील मल्हेरबी गांवाहून पुण्यास आले. पुण्यास दुसरे बाजीराव पेशवे यांची भार्या सौ. वाराणशीबाई यांना हे संस्कृत

शिकवीत. पुढें पेशवे ब्रह्मावर्तास गेल्यानें हे परत कानडा जिल्ह्यांत मंगळूरला गेले. कांहीं वर्षें म्हैसूर व नेपाळच्या महाराजांचे हे आश्रित होते. यांनीं आपल्या दुसऱ्या पत्नीस संस्कृत वगैरे शिकवून शास्त्रपारंगत केलें होतें. पण तशा शिक्षणास लोकमत विरुद्ध असल्यानें यांना शास्त्री-पंडितांशीं वादविवाद करावे लागले. त्यांत त्यांच्या पहिल्या मुलीचा विवाह अयशस्वी झाला म्हणून यांनीं आपल्या दुसऱ्या मुलीचा विवाह लांबणीवर टाकला. तरुण अविवाहित मुलगी रमाबाई बरोबर आणि धंदा पुराण सांगण्याचा. त्यामुळें लोक यांना आश्रय देईनात. त्यांतच मद्रासकडे दुष्काळांत सांपडले ( १८७६-७७ ). अशा स्थितींत अन्नान्नदशा होऊन यांनीं आतुरसंन्यास घेऊन अरण्यांत देह ठेवला.

**डोंगरे, पंडिता रमाबाई**—( जन्म स. १८५८ एप्रिल-मृत्यु स. १९२२ एप्रिल ) संस्कृत भाषेंतील पंडिता व ख्रिश्चन मिशनरी.

यांचा जन्म म्हैसूर जिल्ह्यांतील उत्तर घाटावरील एका गांवीं झाला. वयाच्या बाराव्या वर्षी संस्कृतमधील हजारों श्लोक यांना पाठ होते. याशिवाय कानडी, मराठी, बंगाली व हिंदी या भाषा यांना चांगल्या येत.

वडील वारल्यावर अत्यंत हाल सोशीत या कलकत्त्यास पोंचल्या ( १८७८ ). तेथें यांनीं बालविवाह व विधवांना होणारा त्रास या विषयांवर व्याख्यानें देण्यास सुरवात केली. यांचीं व्याख्यानें संस्कृत आधारांनीं भरलेलीं असल्यानें सर्वत्र खळबळ माजे. यांचा चहाता वर्गहि उत्पन्न झाला आणि यांना 'सरस्वती' पदवी बहाल करण्यांत आली. त्या वेळीं यांचें वय बावीस वर्षांचें होतें.

यानंतर यांनीं विपिनबिहारी मेधावी, सिल्चर ( आसाम ) या शूद्र जातीच्या पदवीधर वकिलाशीं विवाह केला. तेव्हां यांना 'मनोरमा' नांवाची मुलगी झाली. पण लग्न झाल्यापासून १९ महिन्यांनीं हे गृहस्थ कॉलऱ्याला बळी पडले आणि या पुनः एकदां पोरक्या झाल्या. तेव्हां या पुण्यास आल्या आणि रानडे-भांडारकरांना भेटून यांनीं आपल्या स्त्रीशिक्षणाच्या कार्यास त्यांचा पाठिंबा मिळविला. थोड्याच दिवसांत यांनीं 'आर्य महिलासमाज' नांवाची संस्था काढली आणि 'हंटर एज्युकेशन कमिशन' पुढें स्त्रीशिक्षणाची तरफदारी करणारी उत्कृष्ट साक्ष देऊन आपल्याकडे सर्वांचें लक्ष वेधून घेतलें.

लवकरच या इंग्लंडला गेल्या ( १८८३ ). तिकडे वॉंटेजच्या सेन्ट मेरी होममध्यें या राहिल्या व तेथेंच या ख्रिस्ती झाल्या. चेल्टनहॅमच्या लेडीज कॉलेजमध्यें दोन वर्षें संस्कृतच्या प्राध्यापकाचें काम केल्यावर या अमेरिकेस गेल्या. तेथें यांनीं किंडरगार्टन पद्धतीचें शिक्षण घेतलें. या पद्धतीवर यांनीं एक पुस्तकमाला मराठींत काढली आहे. याच वेळीं High Caste Hindu Woman हें पुस्तक यांनीं प्रसिद्ध केलें ( १८८७ ).

हिंदुस्थानांत विधवांकरितां स्त्रीशिक्षणसंस्था काढण्याच्या यांच्या कल्पनेस अमेरिकेंत चांगला पाठिंबा मिळाला. यांच्या संस्थेचीं दहा वर्षें आर्थिक जबाबदारी पत्करणारी 'रमाबाई असोसिएशन' नांवाची संस्था स्थापन झाली. या हिंदुस्थानांत परत आल्या आणि यांनीं मुंबई येथें 'शारदासदन' नांवाची संस्था काढली ( १८८९ मार्च ११ ). पण मुलींना बाटविण्यासंबंधीं याचा उद्देश असल्याबद्दल अधिकाधिक परिस्फोट झाला आणि आर्थिक मदतहि बाहेरची असल्यानें रानडे-भांडारकर वगैरेंनीं यांच्या संस्थेशीं असलेला संबंध सोडला आणि या केडगांवीं 'मुक्तिसदन' काढून आपलें ख्रिस्तीधर्मप्रसाराचें कार्य उघड रीतीनें करूं लागल्या. तेथें १८९७ च्या दुष्काळापासून यांनीं गांवोगांवीं हिंडून शेंकडों स्त्रिया व मुली यांना मृत्यूच्या दाढेंतून सोडवून आश्रय दिला. आणि त्यांच्याकरितां अनेक उद्योग सुरू केले. पहिलीं दहा वर्षें संपल्यावर या पुनः अमेरिकेस गेल्या आणि यांनीं तिकडून पुनः मदत आणली. अमेरिकेंतून आलेल्या तिघा मिशनऱ्यांच्या साहाय्यानें संकटग्रस्तांकरितां 'कृपासदन' नांवाचें अनाथालय यांनीं उघडलें. मुलगी मनोरमा अमेरिकेहून शिकून आल्यावर ती शारदासदन हायस्कुलची प्रिन्सिपल झाली. १९०३ मध्यें 'मुक्ति प्रेयर बेल' नांवाचें मासिक सुरू झालें. आणखीहि प्रचंड उद्योगाच्या योजना यांनीं आखल्या. त्यांत बायबलचें संस्कृत भाषान्तर करण्याचीहि एक योजना होती. पण यांची मुलगी मनोरमा वारल्यानें यांना धक्का बसला आणि नंतर लवकरच या वारल्या.

यांचें वाङ्मय-मराठी-१ स्वधर्मनीति, २ विलायत व अमेरिका प्रवासवर्णन, इंग्रजी-३ A Testimony, ४ High Caste Hindu Woman, संस्कृत-५ बायबलचें संस्कृत भाषान्तर ( अपूर्ण ).

## ढ

**ढेकणे, प्रि. बापुजी नारायण**—( जन्म स. १८६२–मृत्यु स. १९११ ) ग्वाहेर संस्थानांतील पाश्चात्य व स्त्रीशिक्षण, यांचे जनक व शिक्षणतज्ज्ञ.

यांचें जन्मस्थान पुणें. हे पुणें न्यू इंग्लिशस्कूलमधून मॅट्रिक ( १८८२ ), व क्रमानें अनेक शिष्यवृत्त्या मिळवून एम्. ए. झाले ( १८८६ ). सरकारी शाळाखात्यांत प्रवेश केल्यावर रत्नागिरी हायस्कूल, गुजराथ कॉलेज वगैरे ठिकाणीं काम केल्यावर उज्जयनीच्या माधव कॉलेजचे प्रिन्सिपल म्हणून यांची नेमणूक झाली. नवीन शिक्षणसंस्था व प्रतिकूल लोकमत असतां यांनीं तिकडे धोरणी स्वभावानें लोकमत अनुकूल करून घेतलें. कॉलेजच्या स्थैर्याबरोबरच यांनीं तेथें पहिली मुलींची शाळा उघडली ( १८९८ ). यांनीं रेव्हेन्यु खात्यासंबंधीं एक पुस्तक लिहिलें आहे. उज्जयनीच्या माधव कॉलेजांत यांचे तैलचित्राचे अनावरणाचे वेळीं महाराज माधवराव शिंदे यांनीं यांच्या शिक्षणविषयक कामगिरीचा अत्यंत गौरवपूर्वक उल्लेख केला.

---

## त

**तय्यबजी, बद्रुद्दिन**—( जन्म स. १८५४–मृत्यु स. १९०६ ) मुंबईचे नामांकित कायदेपंडित, हायकोर्टांतील न्यायमूर्ति व राष्ट्रसभेचे मुसलमान कार्यकर्ते.

सुप्रसिद्ध अरब व्यापारी तय्यबजीभाई मियासाहेब यांचे हे चिरंजीव. यांचे डोळे लहानपणासून अधू होते. त्यामुळें युनिव्हर्सिटींतील विशेष शिक्षण न घेतां हे इंग्लंडहून बॅरिस्टर होऊन परत आले आणि थोड्याच दिवसांत नामांकित कायदेपंडित म्हणून यांची प्रसिद्धि झाली. पुढें मुंबई हायकोर्टांत न्यायाधीश म्हणून यांची नेमणूक झाल्यावर निर्भय व स्वतंत्र वृत्तीबद्दल यांची ख्याति असे.

यापेक्षांहि सार्वजनिक आयुष्यांत यांनीं स्वीकारलेल्या व्यापक दृष्टीला आणि तिला अनुसरून मुसलमान व देश यांसाठीं यांनीं केलेल्या कामगिरीला विशेष महत्त्व आहे. अन्जुमान इ-इस्लामचे प्रथम सेक्रटरी व नंतर अध्यक्ष, मर्हॉमेडन एज्युकेशन कॉन्फरन्स, मुंबईचे अध्यक्ष ( १९०३ ) व अलीगड कॉलेज असोसिएशनचे सभासद यांसारख्या जबाबदारीच्या जागा यांनीं स्वीकारल्या. या सर्वांत मुसलमान समाजांतील सामाजिक, धार्मिक व शैक्षणिक अज्ञान दूर करण्याचें एकच ध्येय यांनीं आपल्या डोळ्यांपुढें ठेविलें. स्त्रीशिक्षण, पडद्याची अनवश्यकता व अलीगड कॉलेजचें युनिव्हर्सिटींत रूपान्तर यांसारख्या आवश्यक गोष्टींचा हे सतत पुरस्कार करीत.

आपल्या समाजाच्या उत्कर्षाबरोबर राष्ट्राचा उत्कर्ष झाला पाहिजे म्हणून यांनीं इंडियन नॅशनल कॉंग्रेसच्या स्थापनेंत व तिच्या कार्याच्या वाढींत मनापासून भाग घेतला. मद्रासच्या कॉंग्रेसचें अध्यक्षपद यांना देऊन यांच्या या कार्याचा गौरव करण्यांत आला ( १८८७ ). 'देशांतील बुद्धिमान् वर्गाचा विश्वास नष्ट करणारीं कृत्यें ब्रिटिश साम्राज्यशाहीनें केलीं आहेत. आपल्या इतर देशबांधवांच्या खांद्याला खांदा लावून लढण्यांतच मुसलमानांचें हित आहे' अशी विचारसणी यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत मांडली.

**तर्खडकर, दादोबा पांडुरंग**--(जन्म स. १८१४–मृत्यु स. १८८२ ) मराठी भाषेचे व्याकरणकार, कवि, ग्रंथलेखक, समाजसुधारक व लेखक.

यांचा जन्म मुंबईस झाला. जात वैश्य. मूळचें वसतिस्थान वसईजवळचें तर्खड. यांचे वडील भाविक वारकरी असल्यानें यांना मराठी काव्याची गोडी त्यांच्यामुळें लागली. यांचें इंग्रजी शिक्षण 'बॉंबे नेटिव्ह एज्युकेशन सोसायटी'च्या शाळेंत झालें.

शिक्षण संपल्यानंतर जावरा संस्थानचे नवाब यांचे व

एलिफन्स्टन इन्स्टिट्यूट या ठिकाणीं शिक्षक म्हणून काम केल्यावर डेप्युटी कलेक्टरच्या जागेवरून हे सेवानिवृत्त झाले (१८६२). हे नगर येथें डेप्युटी कलेक्टर असतां यांनीं १८५७ सालीं झालेले भिल्लांचें बंड मोडलें म्हणून यांना रावबहादूर करण्यांत आलें. पण पुढेंहि यांनीं एज्युकेशनल ट्रॅन्सलेटरच्या जागेवर काम केलें. हे कांहीं काळ बडोदें संस्थानच्या दिवाणाचे मदतनीस होते.

मराठींतील पद्धतशीर व्याकरण ग्रंथ लिहिण्याचा पहिला प्रयत्न यांचा होय. व्याकरणाखेरीज यांचें प्रसिद्ध पुस्तक 'केकावली'वरील स्वतःच्या आईबापांच्या नांवानें केलेली 'यशोदा-पांडुरंगी' ही गद्य टीका होय. अशा पद्धतीची टीका मराठीमध्यें अपूर्व आहे. हे कवितादि करीत. पुढें प्रार्थनासमाजांत परिणत झालेली परमहंस सभा काढणारांत हे होते. मराठींत एम्. ए. परीक्षेंत पहिला येणारास यांच्या नांवें तर्खडकर पारितोषिक ठेविलें आहे.

यांचें वाङ्मय—१ मराठी भाषेचें व्याकरण, २ लघुव्याकरण, ३ विधवाश्रुमार्जन १८५७, ४ इंग्लिश व्याकरणाची मूळ पीठिका १८६३, ५ केकावली-यशोदा-पांडुरंगी टीका १८६५, १९३१, ६ महाराष्ट्र भाषेच्या व्याकरणाची पूरणिका १८८१, ७ परमहंसिक ब्रह्मधर्म १८८१, ८ शिशुबोध १८८४, ९ धर्मविवेचन, १० आत्मचरित्र.

**तर्खडकर, द्वारकानाथ राघोबा**—(जन्म स. १८४६-मृत्यु स. १९०४) मराठी व इंग्रजी भाषान्तर पाठमालांचे कर्ते.

हे जातीनें वैश्य. जन्म मुंबईस व प्राथमिक शिक्षण पुण्यास झालें. कॉलेज शिक्षणानंतर यांची सरकारकडून लॅटिन शिक्षक म्हणून नेमणूक झाली. पुष्कळ ठिकाणीं हेडमास्तर म्हणून काम केल्यावर स. १८९९ मध्यें हे सेवानिवृत्त झाले. नाशिक येथें यांनीं गंगाबाई देवालय बांधलें. यांच्या भाषान्तरपाठमाला विशेष प्रसिद्ध आहेत.

**तळेकर, श्रीकृष्णशास्त्री रघुनाथशास्त्री**—(जन्म स. १८२६-मृत्यु स. १८८०) मराठींतील कोशकार व व्याकरणकार.

यांनीं पुण्याच्या संस्कृत पाठशाळेंत अलंकारशास्त्राचा अभ्यास करून 'दक्षिणा' मिळविली. पुढें इंग्रजीचा अभ्यास करीत असतां यांचे वडील वारले. त्यामुळें घरप्रपंचासाठीं यांना कारकुनी करावी लागली. ह्या वेळीं मोल्सवर्थ साहेबास मराठी-इंग्रजी कोश तयार करण्याच्या कामीं यांनीं चांगली मदत केली. पुढें कित्येक दिवस हे इंग्लिश लोकांना मराठी शिकवीत असत. नंतर बेळगांव हायस्कूलमध्यें संस्कृताध्यापकाचे जागीं यांची नेमणूक झाली. ह्याच वेळीं यांनीं संस्कृत भाषेचें व्याकरण मराठींत लिहिलें व त्याबद्दल यांना ५०० रु. बक्षीस मिळालें. बेळगांवहून यांची बदली कँडीसाहेबांच्या हाताखालीं ट्रान्सलेशन एक्झिबिशनरच्या जागीं झाली. ह्या जागेवर असतां मराठी क्रमिक पुस्तकें तयार करण्यांत यांनीं बरीच मदत केली. पुढें नागपुर प्रांतांत हे डे. एज्युकेशनल इन्स्पेक्टर झाले. ह्याच जागेवर अहमदनगर येथेंहि ह्यांनीं सुमारें ४॥ वर्षें काम केलें. कँडीसाहेबानंतर १८७७ सालीं हे मराठी ट्रान्सलेटर झाले.

यांचे ग्रंथ--१ इंग्लिश-मराठी कोश १८६१, २ संस्कृत भाषेचें व्याकरण १८६६.

**ताम्हणे, रावबहादुर-विनायक आत्माराम**—(जन्म स. १८८४) सुप्रसिद्ध रसायनशास्त्रीय कृषितज्ज्ञ.

हे १९०५ सालीं एल. एजी. ही परीक्षा उत्तीर्ण झाले व स. १९०६ सालीं शेतकी खात्यांत पूना ॲग्रिकल्चरल कॉलेजमध्यें रसायन खात्यांत दाखल झाले.

पुढें यांना मंगळदास नथुभाई स्कॉलरशिप मिळून हे इंग्लंडला गेले व रोथमस्टेड एक्सपेरिमेंटल स्टेशन येथें सर एडवर्ड रसेल व डॉ. कीन यांच्या मार्गदर्शनाखालीं यांनीं रसायनशास्त्राचा अभ्यास केला. १९२० सालीं हे हिंदुस्थानांत परत आले व यांना सॉइल फिजिसिस्ट टू गव्हर्नमेंट ऑफ बाँबे नेमण्यांत आलें. १९२१ सालीं यांना दुर्जलकर्षाविषयीं संशोधन करण्याच्या कामावर नेमण्यांत आलें. पुढें लगेच सिंधमध्यें सक्कर बराज धरणाखालीं भिजणाऱ्या जमिनींच्या व तींत होऊं शकणाऱ्या पिकांच्या अभ्यासाची योजना पार पाडण्याकरितां यांना सिंधमध्यें ॲग्रिकल्चरल केमिस्ट आणि सॉइल फिजिसिस्ट नेमण्यांत आलें आणि सक्कर येथील प्रयोगक्षेत्राचे हे मुख्य बनले. तेथें यांनीं केलेलें काम फार महत्त्वाचें असून त्यावर तदनन्तर सिंधमध्यें होत असलेल्या शास्त्रीय शोधाची इमारत उभारलेली आहे. सिंधमध्यें शेवटीं यांना चीफ ॲग्रिकल्चरल ऑफिसर नेमण्यांत आलें व मुंबई इलाख्यापासून सिंध वेगळा होईपर्यंत हे त्या हुद्यावर होते. १९३६ सालीं यांनीं केलेल्या कामाच्या गौरवार्थ यांना रा. ब. ही पदवी देण्यांत आली. सिंधहून परत आल्यानंतर यांना कांहीं काळ पुणें शेतकी कॉलेजचे प्रिन्सि-

पलचे जागेवर काम करण्याची संधि मिळाली. आणि अखेर मुंबईप्रान्त मध्यविभागाचे डे. डायरेक्टर या जागेवरून १९४० साली हे सेवानिवृत्त झाले.

वास्तविक पाहतां यांच्या उच्च बुद्धिमत्तेचा आणि संघटना-क्षमतेचा जितका फायदा मुंबई शेतकी खात्याला मिळावा तितका मिळाला नाहीं. याचें कारण सरकारी नोकरीचे विशेष प्रकारचे नियम होत.

सरकारी सेवेंतून निवृत्त झाल्यानंतर ह्यांना अजमीर येथें सरकारी ॲग्रिकल्चर खातें स्थापन करण्याकरतां गव्हर्मेंट ऑफ इंडियानें नेमलें. प्लॅन्ट इंडस्ट्री इन्स्टिट्यूट इंदोर या संस्थेचे डायरेक्टर या नात्यानें यांनीं काम केलें. यांनीं संशोधनात्मक अनेक निबंध लिहिले आहेत. दक्षिणेंतील खाऱ्या जमिनी, सिंधमधील भिजत्या जमिनी व दुर्जलकृषि यांसंबंधीं यांचे निबंध महत्वाचे आहेत.

**तांबे, बाळकृष्ण विष्णु ऊर्फ काका**—( जन्म स.१८९३ एप्रिल १२ ) बी. तांबे लि., मुंबई, या कंपनीचे चालक, कल्पक व सार्वजनिक कार्यकर्ते.

बी. एससी. पर्यंत शिक्षण झाल्यावर तळेगांवच्या नवीन समर्थ विद्यालयांत शिक्षक म्हणून काम केलें. नंतर साखरपें व रत्नागिरी येथें राष्ट्रीय शाळा चालविली. नंतर अंधेरीस साधकाश्रमांत काम केल्यावर, मुंबईस तांबे आरोग्य भुवन नावाचें उपाहारगृह चालविलें. चहापानाला आळा घालावा या हेतूनें यांनीं मुख्यतः ताक, तसेंच पन्हें, सरबत वगैरे घरगुती पदार्थ उपाहारगृहांत देण्याची व्यवस्था करून त्यांना सार्वजनिक केलें. पाकशास्त्राचें विद्यालय काढण्याचा यांचा प्रयत्न आहे.

**तांबे, भास्कर रामचंद्र**—( जन्म स. १८७४–मृत्यु स. १९४१ ) उत्तर हिंदुस्थानांतील देशी राज्यांत दिवाण वगैरे जबाबदारीचीं कामें केलेले गृहस्थ व मराठी भाषेंतील सुप्रसिद्ध रसाळ कवि.

अलाहाबाद विश्वविद्यालयाची प्रवेशपरीक्षा दिल्यानंतर ( १८९३ ) यांनीं इंदूरच्या होळकर कॉलेजांत कांहीं काळ शिक्षण घेतलें. तीन-चार महिने देवास, व्हिक्टोरिया हायस्कूलमध्यें यांनीं नोकरी केली. नंतर हे देवासच्या महाराजांचे शिक्षक होते (१८९३-१९०३). पुढें यांना इंदूर येथील देवास दरबारचे रेसिडेन्सी वकील नेमण्यांत आलें ( १९०३-१९०८ ). नंतर हे गुदरखडा इस्टेटीचे सुपरिंटेंडेंट बनले ( १९०८-११ ). यानंतर पिपलोदा संस्थानचे दिवाण ( १९११-१४ ), राजपुतान्यांतील प्रतापगड संस्थानचे पोलिस सुपरिंटेंडेंट व नंतर सदर कोर्ट जज्ज ( १९१४-१९२० ), मेयो कॉलेज अजमीर येथें ग्वाल्हेर संस्थानच्या सरदारांचे ट्यूटर व गार्डियन ( १९२१-२३ ), शोपूर-बडोद (ग्वाल्हेर रिसायत) संस्थानचे सुपरिंटेंडेंट (१९२३-२५), नंतर रजिस्ट्रार एक्झॅमिनेशन्स वगैरे निरनिराळ्या ठिकाणीं जबाबदारीचीं कामें यांनीं यशस्वी रीतीनें पार पाडलीं.

पण यापेक्षां यांची वाङ्मयात्मक कामगिरी अधिक महत्त्वाची आणि यांचें नांव दीर्घकाल टिकविणारी आहे. 'तांबे यांची कविता' भाग पहिला प्रो. मायदेव यांनीं १९२०, १९४४ सालीं व भाग २ रा दि. गं. केळकर यांनीं १९२७ सालीं प्रसिद्ध केला.

वरील दोन भागांत प्रसिद्ध झालेली यांची समग्र कविता व 'तांबे, व्यक्ति आणि कला' या दोन ग्रंथांतून तांबे संपूर्णतया आपणांपुढें आहेत. यांचीं साहित्यविषयक व काव्यकलेबद्दल सर्व तत्त्वें यांनीं स्पष्टपणें १९२५ सालीं मालव कवि-संमेलनांत व कोल्हापूर महाराष्ट्र साहित्य-संमेलनांत मांडलीं. यांनीं काव्य केलें व त्यावर टीकारूप व्याख्यानें दिलीं. अशा तऱ्हेनें यांचें गद्य व पद्य एकमेकांना पूरक आहे.

'कविता ही परमोत्कर्षास गेलेल्या भावनांचा उद्‌गार होय; केवळ संसारांतील चित्रें काढणें किंवा सृष्टीचा फोटोग्राफ उतरणें हें कांहीं खरें काव्य नव्हे. भावनांचा धुमाकूळ आणि खळबळ कवितेंत असल्यास हीं बाह्य वस्तूंचीं चित्रेंहि मोहक होतील; पण तीं चिरस्थायी व्हावयास त्यांत उच्च व उदात्त भावना असाव्या लागतात' ( गद्यलेख, खंड २, पान ३० ), ही यांची कवितेविषयींची कल्पना लक्षांत घेण्यासारखी आहे.

यांची कविता यांच्या जीवनाशीं संलग्न आहे. शरीर आणि मन यांची ती ती अवस्था यांच्या कवितेंत प्रतिबिंबित झाली. यांच्या कवितेचे शिशुगीतें, प्रणयगीतें, महाप्रस्थानगीतें व नाट्यगीतें असे चार भाग पडतात. तथापि यांनीं प्रेमगीतें पुष्कळ काळ लिहिलीं आणि त्यामुळेंच हे विशेष लोकप्रिय आहेत.

'डोळे हे जुलमी गडे रोखुनि मज पाहुं नका ॥ खळबळ किती होय मनीं । हंसतील मज सर्वजणां ॥ येतील त्या संधि बघुनि आग उगा लावुं नका' या स्वरूपाच्या प्रणयगीतांनीं यांची कविता घरोघर पोंचली.

हे सौंदर्यप्रधान दृष्टीचे गूढगुंजन करणारे पण उघड आस्तिक आहेत.

**तांबे, श्रीपाद बळवंत**— ( जन्म स. १८७५ ) नागपूरचे सुप्रसिद्ध वकील, कॉंग्रेसचे कार्यकर्ते व मध्यप्रान्ताचे माजी हंगामी गव्हर्नर.

यांचें शिक्षण जबलपूर, अमरावती, मुंबई या ठिकाणीं झालें. प्रथम अमरावती येथें हे वकिली करीत. तेथें हे म्युनिसिपालिटीचे उपाध्यक्ष व प्रान्तिक काँग्रेस कमेटीचे अध्यक्ष होते. मध्यप्रान्त कायदेमंडळाचे सभासद (१९१७-२०, १९२४) व त्या मंडळाचे अध्यक्षहि होते (१९२५). १९२९ सालीं यांना मध्यप्रान्ताचे हंगामी गव्हर्नर नेमण्यांत आलें. पुढें हे गोलमेज परिषदेचे सभासद म्हणून विलायतेस गेले होते.

**तिवारी, दुर्गाप्रसाद आसाराम**—(जन्म स. १८८७-मृत्यु स. १९३९) मराठी भाषेंतील सुप्रसिद्ध कवि.

हे जातीनें कान्यकुब्ज ब्राह्मण. यांचे आजे उत्तर हिंदुस्थानांतून इकडे आले. हे जळगांवास राहत. यांनीं इंग्लिश, गुजराथी, हिन्दी व मराठी भाषेचा अभ्यास केला. यांचीं 'मराठ्यांचीं संग्रामगर्गातें' अत्यंत लोकप्रिय असून शालेय पुस्तकांत व घरोघर पोंचलीं आहेत.

यांनीं लहानमोठीं अठरा पुस्तकें प्रसिद्ध केलीं. त्यांपैकीं प्रमुख—१ संग्रामगर्गातें (भाग १-२), २ मधुरा काव्य, ३ काव्यकुसुमाञ्जलि, ४ काव्यरत्नमाला इत्यादि.

**तेरसी, लक्ष्मीदास रावजी**—(जन्म स.१८७५-मृत्यु स. १९३९ ऑगस्ट ३१) अनेक चळवळींत धडाडीनें भाग घेणारे मुंबईचे सुप्रसिद्ध व्यापारी.

यांचा जन्म मुंबईस भाटिया जातींत झाला. तेथेंच सेंट झेवियर कॉलेजमधून हे बी. ए. झाले. एम्. ए.चा अभ्यास प्रकृतीकरितां सोडावा लागला आणि यांनीं व्यापारांत लक्ष घातलें. 'हिज मास्टर्स व्हॉइस'च्या रेकार्ड्सची सोल एजन्सी यांनीं घेतली होती.

बंगाल फाळणीनंतर स्वदेशी, होमरूल, कामगार वगैरे चळवळींत हे प्रामुख्यानें भाग घेत. कांहीं संपांत यांनीं पुढाकार घेऊन ते यशस्वी केले. मुंबई म्युनिसिपल कार्पोरेशनचे सभासद, हिन्दु पोर्ट ट्रस्टचे पंच, पी. जे. हिन्दु जिमखान्याचे, इन्डियन मर्चन्टस् चेम्बरचे अध्यक्ष, मुंबई विधिमंडळाचे सभासद वगैरे अनेक नात्यांनीं यांनीं जबाबदारीचीं कामें केलीं.

समाजोद्धाराच्या विविध अंगांशीं यांचा निकटचा संबंध येऊं लागला. तेव्हां यांच्यांतील स्पष्टवक्तेपणा व प्रतिस्पर्ध्यास भडकावयास लावण्याचा स्वभाव व्यक्त होऊं लागला आणि यांना अनेक शत्रु निर्माण झाले. धर्मभोळा भाटिया समाज व काँग्रेस यांमधील खटके या स्वरूपाचे होत. आपल्या कांहीं मित्रांच्या साहाय्यानें नवीन भाटिया समाज सुरू करून त्या समाजांतील कांहीं अप्रिय गोष्टी यांनीं चव्हाट्यावर आणल्या. मृत्यूपूर्वी १० वर्षे हे काँग्रेसचे एक कट्टर टीकाकार बनले होते. हे बहुजन समाजाच्या हिताच्या दृष्टीनें महत्त्वाचे वाटणाऱ्या कोणत्याहि कामांत हिरीरीनें पडत आणि शेवट कसाहि झाला तरी माघार घेत नसत. या यांच्या जबरदस्त लढाऊ वृत्तीनें यांचे मित्र शत्रु बनल्याचीं पुष्कळ उदाहरणें आहेत.

**तेलंग, काशीनाथ त्र्यंबक**—(जन्म स.१८५०-मृत्यु स. १८९३) हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध कायदेपंडित, मुंबई हायकोर्टांतील न्यायमूर्ति, प्राच्यविद्यापंडित व काँग्रेसचे संस्थापक.

एकोणिसाव्या शतकाच्या सुमारास जीं बारा सारस्वत ब्राह्मणांचीं घराणीं गोव्यांतून मुंबईस आलीं, त्यांत यांचें घराणें प्रमुख होतें. शाळा व कॉलेजमध्यें अत्यंत हुषार विद्यार्थी म्हणून यांची प्रसिद्धि होती. हे एम्.ए., एल्एल्. बी. झाले व यांनीं वकीली करण्यास सुरुवात केली. संस्कृत भाषेवरील प्रभुत्व व अस्खलित वक्तृत्व यांमुळें यशस्वी कायदेपंडित म्हणून यांची लवकर सर्वत्र ख्याति झाली. पुढें यांना हायकोर्ट जज्जाची जागा मिळाली आणि हिंदु कायद्यांत सुधारणा करण्याच्या यांच्या प्रयत्नांमुळें तर हे लोकांच्या विशेष लक्षांत आले.

मात्र सुरुवातीपासूनच यांचा स्वाभाविक कल वाङ्मय आणि संशोधन या विषयांकडे असे. वकीली करीत असतां यांचा लेखनव्यवसाय तर चालू होताच पण न्यायमूर्तीची जागा स्वीकारण्यांतहि लेखनादिकाला अधिक शांतता मिळावी अशी यांची योजना होती. यांनीं वाङ्मय, समाज, संशोधन व राजकारण या सर्व क्षेत्रांत महत्त्वाची कामगिरी केली.

हे इंडियन नॅशनल काँग्रेसच्या संस्थापकांपैकीं एक असून कांहीं दिवस हे तिचे सेक्रेटरीहि होते (१८८५-८९). तिच्या अन्तर्गत योजनेंत यांचा महत्त्वाचा हात असे. पहिल्या अधिवेशनापासून यांनीं महत्त्वाच्या ठरावांवर भाषणें केलीं. सर ऑकलं कॉल्विन व लॉर्ड डफरिन यांनीं काँग्रेसवर केलेल्या टीकेस यांनीं झणझणीत उत्तरें दिलीं.

'शास्त्र व रूढि यांच्या बलाबलांविषयीं विचार' (१८८६) व 'सामाजिक विषयांसंबंधीं तडजोड' हे यांचे मराठीतील दोन निबंध यांच्या प्रगमनशील विचारांचे द्योतक आहेत. 'कालमानानुसार धर्मांत बदल

करण्याची योजना आपल्या इतिहासानें आपणांस शिकविली आहे. तिला आपण सोडल्यास आपल्या धर्मांतील जिवंतपणा नाहीसा होईल' असे विचार यांनी पहिल्या निबंधांत मांडले असून दुसऱ्या निबंधांत विचारस्वातंत्र्याचें महत्त्व यांनी दाखविलें आहे.

अशा धडाडीनें यांनी राजेन्द्रलाल मित्र यांच्या इंडियन अँन्टीक्केरींतील लेखाला उत्तर दिलें. पूर्वीच्या काळीं हिंदुस्थानांतील लोक गोमांस भक्षण करीत असले तरी तें पुढें येथील लोकांनीं विचारपूर्वक सोडलें आहे, म्हणून त्याचा आतां विचार करण्याची आवश्यकता नाहीं, असा मुद्दा यांनी मित्रांचे विरुद्ध मांडला आहे.

पण यापेक्षांहि डॉ. वेबरच्या रामायणविषयक लेखाच्या रे. बॉइड यांनीं केलेल्या अनुवादाला यांनीं दिलेलें उत्तर विशेष गाजलें. हिंदुस्थानांतील प्राचीन समजल्या जाणाऱ्या ग्रंथांचा काल ख्रि. पू. तीनचार शतकांच्या मागें जात नाहीं व होमरच्या इलियडची दाट छाया रामायणावर पडली, असे वेबरचे दोन प्रमुख मुद्दे होते.

या लेखाला यांनीं Was Ramayan Copied from Homaer या शीर्षकाखालीं उत्तर दिलें. यांनीं त्या दोन ग्रंथांतील फरक व्यक्त करून वेबरनें ठरविलेल्या रामायणकालाचें खंडन करण्यासाठीं वेबरनें दिलेल्या आधारांचा फोलपणा स्पष्ट केला. आणि रामायणाचा काळ ख्रि. पू. अनेक शतकें असल्याचा सिद्धान्त लोकांपुढें मांडला. पुढील संशोधकांनीहि यांच्या या सिद्धान्ताला दुजोराच दिला आहे.

भगवद्गीता ही बायबलवरून केली आहे या लेरिंगेरच्या विधानालाहि यांनीं मुद्देसूद उत्तर दिलें. भगवद्गीता हा स्वतंत्र ग्रंथ असून ती बायबलवरून केलेला नाहीं हें यांनीं साधार सिद्ध करून दाखविलें.

शंकराचार्य हे पश्चिम मगधचा राजा पूर्णवर्मा राज्य करीत असतां उदयास आले हा यांचा स्वतःचा असा महत्त्वाचा सिद्धान्त यांनीं सिद्ध करून दाखविला. स. ५९० हा त्यांचा काळ यांनीं ठरविला.

हिंदुस्थानांतील महत्त्वाच्या गोष्टींसंबंधीं प्रतिपादन करतांना पाश्चात्यांकडून अनेक ठिकाणीं कळत न कळत अपसिद्धान्त प्रतिपादले जात. त्याला त्यांच्याच भाषेंत, त्यांच्याच पद्धतीनें आणि त्यांच्याइतका सखोल अभ्यास करून सडेतोडपणें उत्तर देणाऱ्या यांच्यासारख्या पंडितांची त्या वेळीं फार जरूर होती. यांनीं तें कार्य उत्कृष्टपणें पार पाडल्यानें जगभर अभ्यासकांत यांची ख्याति झाली.

यांचे ग्रंथ—संपादित–१ भर्तृहरीचें नीति व वैराग्यशतक, २ मुद्राराक्षस.

भाषान्तरित—इंग्रजी–१ भगवद्गीता-पद्यमय अनुवाद (डॉ. लेरिंगेरला दिलेल्या उत्तरासह), २ भगवद्गीता-गद्यमय-अनुवाद, ३ जर्नल ऑफ दि रॉयल एशियाटिक सोसायटी व इंडियन अँटिक्केरी या नियतकालिकांत लिहिलेले निबंध.

मराठी—१ शहाणा नाथन (Nathan the Wise चें भाषान्तर), २ स्थानिक स्वराज्य व्यवस्था (भाषान्तर इंग्रजांवरून मराठी १८८६), ३ शास्त्र व रूढि यांच्या बलाबलाचा विचार (व्याख्यान १८८६), ४ सामाजिक विषयांसंबंधीं तडजोड.

यांचे पुत्र पंढरीनाथ हे इतिहासाचे अभ्यासक व बक्षंटबाईंचे निःसीम चाहते होते.

**तेलंग, महामहोपाध्याय गंगाधरशास्त्री**—(मृत्यु स. १९१३) काशींतील विख्यात पंडित व संस्कृत कवि.

हे बालसरस्वती बाळशास्त्री रानडे या काशीमधील विख्यात पंडितांचे शिष्य. हे साहित्यशास्त्रांत विशेष निष्णात होते. यांची शिष्यपरंपरा फार मोठी आहे. यांना महामहोपाध्याय, सी. आय. ई. अशा पदव्या देऊन सरकारनें यांचा गौरव केला.

यांचे ग्रंथ—१ अलिविलाससंलापम्, २ शाश्वत धर्मदीपिका (मनु व महाभारत यांतील वेंचे).

**त्रिपाठी, विजयानन्द महादेवदत्त**—(जन्म स. १८५६–मृत्यु स. १९२६) हिन्दी भाषेंतील प्रसिद्ध लेखक व कवि.

जन्मस्थान-बेलौटी (जि. आरा). घरीं व काशीच्या क्वीन्स कॉलेजांत संस्कृतचें ज्ञान संपादन केल्यावर बडहरच्या महाराणींच्या काशी येथील दरबारांत दानाध्यक्षाच्या जागीं यांची नेमणूक झाली (१८७९). नंतर यांनीं बाबू रामकृष्ण वर्मा यांना 'भारतजीवन' हें साप्ताहिक हिन्दी पत्र व हिन्दी काव्यें प्रकाशित करण्यास प्रवृत्त केलें. हे अनेक नियतकालिकांत सतत लिहीत. पुढें हे बांकीपूरच्या कॉलेजांत प्राध्यापक व

स्कूलचे हेडमास्तर म्हणूनहि काम करीत. यांचें लेखन व वक्तृत्व परिणामकारक असे. यांचें कवितेंतील उपनांव 'श्रीकवि.'

यांचें वाङ्मयः—१ महामोहविद्रावण ( संस्कृतचें हिन्दी ), २ सच्चा सपना ( बंगालीचें हिन्दी ), ३ महा-अन्धेर नगरी ( प्रहसन ), ४ अन्योक्ति-मुक्तावलि (काव्य-संग्रह ), ५ रणधीर प्रेममोहिनी ( लाला श्रीनिवास-दासांच्या नाटकाचें संस्कृत भाषान्तर ), ६ भारतीय इतिहास पंजिका ( स्वतंत्र पुस्तक ), शिवाय अनेक संस्कृत नाटकें व काव्यें यांचीं भाषान्तरें.

**त्रिपाठी, सूर्यकान्त रामसहाय 'निराला'**— ( जन्म स. १८९९ ) हिन्दी भाषेंतील एका नव्या युगाचे प्रवर्तक कवि व लेखक.

यांचा जन्म महिषादल ( मेदिनीपूर-बंगाल ) राज्यांत झाला. यांचे वडील संयुक्तप्रान्तांतील उन्नाव जिल्ह्यांतील गढाकोला गांवाहून तिकडे नोकरीच्या निमित्तानें गेले. बंगालमध्यें राजाश्रयानें व राजाच्या सहवासांत यांचें शिक्षण झाल्यानें यांच्यांत प्रथमपासून स्वतंत्र वृत्ति उत्पन्न झाली. प्रथम हे बंगालींत कविता करीत. पण पुढें यांना हिन्दीची आवड उत्पन्न होऊन हे खडी बोलींत कविता करूं लागले.

कल्पनाप्रधान रहस्यवादी कवींत यांचें स्थान श्रेष्ठ आहे. यांनीं कांहीं छंद स्वतः निर्माण केले आहेत. यांना हिन्दींतील मुक्तक काव्याचे जनक मानण्यांत येतें. बंगालींतील मुक्तक कवितेप्रमाणें यांच्या मुक्तक काव्यांत ताल व लय यांकडे लक्ष दिलेलें असतें.

यांच्या मुक्तक काव्यांत ज्या एका विशेष आनंदाचा अनुभव येतो तसा दुसऱ्या हिन्दी कवींच्या काव्यांत क्वचितच येतो. यांनीं अनेक लहानमोठीं सरस काव्यें लिहिलीं आहेत. सांगोपांग रूपक व निसर्गाचें यथार्थ चित्रण हे यांच्या काव्यांतील आणखी विशेष होत. तसेंच भावमय उच्च कल्पना हाहि यांचा विशेष मानण्यांत येतो. सरस रहस्यवाद, मधुर प्रेम, ओजस्वी देशभक्ति व अदम्य उत्साह या गुणांनीं यांचें काव्य नटलेलें असतें.

यांचें गद्य लिखाणहि बरेंच असून तेंहि यांच्या स्वतंत्र वृत्तीचें द्योतक आहे. आचार, विचार, मांडणी वगैरे सर्वच बाबतींत हे अगदीं क्रान्तिकारक व स्वतंत्र वृत्तीचे असल्यानें यांनीं आपणास घेतलेलें 'निराला' हें टोपण नांव सार्थ आहे.

यांचें प्रसिद्ध वाङ्मयः—१ अनामिका ( निर्यमक, मुक्तक काव्य ), २ परिमल ( कविता-संग्रह ), ३ गीतिका ( गीतसंग्रह ), ४ तुलसीदास ( काव्य ), ५ बादल-राग.

**त्रिलोकेकर, सोकर बापूजी**— ( जन्म स. १८३६-मृत्यु १९०८ ऑक्टो. ३० ) मराठींतील पहिले संगीत नाटककार.

मुंबई येथें यांचा जन्म झाला. तत्कालीन परिस्थित्य-नुरूप थोडेंसें मराठी शिक्षण झाल्यावर हे एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटमध्यें इंग्रजी शिकूं लागले. तेथील परीक्षेंत उत्तम तऱ्हेनें पास होऊन हे तेथील नार्मल स्कॉलर झाले. त्यामुळें अर्थातच यांना थोडा पगार मिळून शिक्षकाचें काम शिकण्यास मिळूं लागलें. या अभ्यासांतहि यांनीं आपली चांगली प्रगति दाखविली. तदनंतर 'प्रभु सेमिनरी' व 'एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूट' ह्या शाळांतून यांनीं शिक्षकाचें काम केलें. स. १८५७ पासून १८६४ पर्यंत हे एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटमध्यें होते. परंतु पुढें यांना हायकोर्टांत ट्रान्सलेटरची जागा मिळाली. यांना मराठी, इंग्रजी, गुजराथी वगैरे भाषा चांगल्या येत. ही नोकरी १८९७ पर्यंत करून हे सेवानिवृत्त झाले.

यांना गाण्याची विशेष आवड असल्यामुळें गायन-शास्त्राचा शास्त्रोक्त अभ्यास करून यांनीं संगीत नाटकें तयार करण्यास सुरवात केली.

मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजच्या विद्यार्थ्यांनीं स. १८७१ त संस्कृत गद्यपद्यात्मक "शाकुंतल" नाटकाचा जो संगीत प्रयोग करून दाखविला तो पाहून मराठींतहि ही प्रथा सुरू करण्याचें यांनीं ठरविलें. त्याप्रमाणें यांनीं स. १८७९ त प्रसिद्ध केलेल्या 'नलदमयन्ती' या नाटकाचे प्रयोग उत्कृष्ट वठले. यावरून मराठीच्या आद्य संगीत नाटकाचार्याचा मान यांना द्यावा लागेल. नलदमयन्ती या नाटकाशिवाय 'हरिश्चन्द्र' (स. १८८०) व 'सावित्री' ( स. १८९२ ) इत्यादि गद्यपद्यात्मक नाटकें यांनीं लिहिलीं.

अण्णासाहेब किर्लोस्करांच्या पूर्वी यांनीं संगीत नाटक तयार केलें व पदें त्या त्या पात्रांकडून म्हणविण्याची पद्धत सुरू केली. यांच्या नाटकांत आर्या, दिंड्या, श्लोक व क्वचित् जुन्या चालींवर पदें आहेत. यांचीं नाटकें 'हिंदु सन्मार्ग बोधक मंडळी' नांवाची हौशी मंडळी करीत असे.

**त्रिवेदी, प्रो. जे. पी.**—( जन्म स. १८८६–मृत्यु स. १९४१ ) पाटबंधारा खात्यांतील सल्लागार व सार्वजनिक कार्यकर्ते.

हे गुर्जरप्रान्तीय गृहस्थ सुसंस्कृत कुळांत जन्मले. यांची विद्यार्थी-अवस्थेंतील प्रगति फार चांगली असे. हे एल्. सी. ई. होते. हे स. १८९९ सालीं पब्लिक वर्क्स डिपार्टमेंटमध्यें दाखल झाले. गोदा व निरा यांच्या पाटबंधाऱ्यांवर यांनीं १९१९ पर्यंत नौकरी केली. परंतु यांना नुसत्या नौकरींत राहून पैसा मिळविण्यापेक्षां विद्येची अभिरुचि विशेष असल्यामुळें यांनीं १९१९ सालीं आपली बदली शेतकीखात्यांत करून घेतली व शेतकी कॉलेजांत हे कृषिस्थापत्य या शास्त्राच्या प्राध्यापकाचें काम १९४० पर्यंत करीत होते. या अवधांत यांनीं बॉयस्काउट चळवळींत शिरून हे पुष्कळ वर्षेंपर्यंत मध्यविभागाचे स्काउट कमिशनरहि होते. यांनीं शेतकी कॉलेजामध्यें रोव्हर स्काउट ट्रुप्सची एक शाखा काढली होती.

स. १९४० सालीं गुजराथेंत आनंद येथें 'इन्स्टिट्यूट ऑफ ॲनिमल हस्बंड्री अँड ॲग्रिकल्चर ' या संस्थेचे यांना सेक्रेटरी नेमण्यांत आलें. गुजराथमध्यें ही संस्था तेथील शेतीविषयक संशोधनपूर्वक सुधारणा आणि विशेषतः तेथील दुभाळ जनावरांच्या सुधारणेसंबंधीं संशोधन करण्याच्या हेतूनें काढलेली आहे. अशा तऱ्हेची ही संस्था हिंदुस्थानांत पहिलीच व अद्याप अद्वितीयच आहे. या संस्थेपाशीं सुमारें एक हजार एकर जमीन आहे. आणि तेथील कार्याचा व्याप एखादें शेतकी कॉलेज येथें निघेल इतका सर्व दृष्टीनें व्यापक आहे. अशा प्रचंड संस्थेला नांवारूपास आणण्याकरितां यांनीं अत्यंत मेहनत केली. त्या कामाच्या बोजाचा यांच्या प्रकृतीवर ताण पडून यांना अकालीं मृत्यु आला.

**त्रिवेदी, सर चंदूलाल माधवलाल**--( जन्म स. १८९३ ) आय्. सी. एस्. अधिकारी व ओरिसाचे गव्हर्नर.

हे जातीनें गुजराथेंतील मोढ ब्राह्मण आहेत. मुंबई व ऑक्सफर्ड येथें शिक्षण घेऊन हे आय्. सी. एस. झाले ( १९१७ ). मध्यप्रान्तांत असिस्टंट कमिशनर ( १९२१ पर्यंत ), व्हाइसरॉयच्या होम डिपार्टमेंटचे डे. सेक्रेटरी ( १९३२–३५ ), वऱ्हाडचे कमिशनर ( १९३६ ), मध्यप्रान्त व वऱ्हाडच्या गव्हर्नरचे सेक्रेटरी ( १९३७ ), इत्यादि कामें केल्यावर ओरिसाचे हंगामी गव्हर्नर म्हणून यांची नेमणूक झाली ( १९४५ ऑक्टो ). यापूर्वी लॉर्ड सत्येन्द्रप्रसन्न सिंह, बिहार, ना. श्रीपाद बळवंत ताबे, मध्यप्रान्त, प. वा. सर सिकंदर हयातखान, पंजाब, राघवेन्द्र राव, मध्यप्रान्त, व सर महंमद उस्मान, मद्रास, या हिन्दी माणसांना गव्हर्नर नेमण्यांत आलें. यांपैकीं तांबे वगैरे हंगामी होते व सिंहांनीं राजीनामा दिला.

## थ

**थत्ते, मल्हार नारायणशास्त्री**—( जन्म स. १८४०–मृत्यु स. १९१५ ) ज्योतिषी व संशोधक.

यांचें वेदाध्ययन व शास्त्राध्ययन ग्वाल्हेरीस झालें. पुढें हे काशीस गेले. तेथें प्रसिद्ध बापुशास्त्री यांजपाशीं गणिताचा व थोडा इंग्रजीचा अभ्यास केला. स. १८६३ मध्यें ग्वाल्हेरीस नोकरी धरली. श्रीमंत जयाजीराव शिंदे यांची भेट होऊन मिलिटरी ऑफिसांत ६० रु. पगारावर नेमणूक झाली. यांना चांदमारीच्या कामांत ५० रु. इनाम मिळालें. सरदार बाबासाहेब आपटे यांच्या मदतीनें घोड्यावर बसण्यास शिकले. निशाणावर अचूक गोळी मारण्यसंबंधींचा ' गोलगतिप्रकाश ' नांवाचा स्वकृत हस्तलिखित ग्रंथ यांनीं मिलिटरी खात्याकडे दिला. यांच्या ' करणग्रंथाची ' हस्तलिखित प्रत बापुदेवशास्त्रींनीं पाहिली होती. ज्ञानप्रकाश ( ५–८–१८६७ ) व इंदुप्रकाश ( ३०–३–१८६८ ) या पत्रांत यांच्या ' ग्रहप्रकाश ' व 'नवीन पंचांग ' या ग्रंथांवर चर्चा झाली आहे. इंदुप्रकाश (४–९–१८७१) मध्यें पुण्याच्या विद्वत्-परिषदेनें या ग्रंथाचा गौरव केल्याचा मजकूर आहे. यानंतर शिंदे सरकारकडून यांना रु. ५०० इनाम मिळालें. युद्धविषयक हालचाली निशाणांनीं सूचित

करण्यासंबंधीचा 'फ्लॅग सिग्नल' नांवाचा ग्रंथ यांनीं लिहिला व त्याप्रमाणें काम करणारी शिपायांची पलटण तयार केली. या कामगिरीबद्दल श्रीमंतांकडून एक हजार रुपये यांना बक्षीस मिळाले. १८७८ मध्यें देवास व इंदूर येथील महाराजांनीं बहुमानाचीं वस्त्रें देऊन यांचा गौरव केला. पुष्कर-यात्रेहून परत येत असतां जयपुरास मुक्काम केला, तेव्हां तेथील महाराजांनीं यांचा बहुमान केला. स. १८८० मध्यें यांची विद्वत्ता पाहून शिंदे सरकारकडून यांना सालीना नऊशें रुपये उत्पन्नाची जमीन मिळाली व ५०० रुपये रोख मिळाले. यांनीं आरशांतून सूर्यप्रकाशाचे कवडासे पाडून विशिष्ट संकेत व्यक्त करणारें 'हेलिओग्राफ' यंत्र तयार केलें. दिसणारे दूरचे पदार्थ नक्की किती अंतरावर आहेत हें दाखविणारें 'वंडरफुल रेंजफाइंडर' यंत्र यांनीं तयार केलें. यासंबंधींचें पुस्तक व हें यंत्र शिंदेसरकारनीं कमांडर-इन्-चीफ यांस दाखविलें व त्यामध्यें दुरुस्त्या करून स. १९१० मध्यें शिंदेसरकारमार्फत बादशहा पंचम जॉर्ज यांस तें नजर केलें. ता. ४-११-१८९७ च्या चंद्रग्रहणासंबंधींच्या नॉटिकल अल्मनाकमधील चुका यांच्या म्हणण्याप्रमाणें दुरुस्त करण्यांत आल्या. स. १९१२ सालच्या ग्वाल्हेरच्या दरबारांत यांना 'विद्यासागर' ही बहुमानाची पदवी मिळाली. यांचा शेवटचा अप्रकाशित ग्रंथ 'दृग्ज्ञानानंद' होय. हे अत्यंत सात्त्विक, प्रेमळ व रामभक्त होते.

**थापा, सुभेदार लालबहादुर**—( जन्म स. १९२० सुमार ) दुसऱ्या महायुद्धांत व्हिक्टोरिया क्रॉस मिळवणारे शूर गुरखा सैनिक.

पूर्व आफ्रिकेंत रोमेलविरुद्ध चाललेल्या लढ्यांत यांनीं दाखविलेल्या शौर्याबद्दल खुद्द बादशहा सहावे जॉर्ज यांच्या हस्तें यांना 'व्हिक्टोरिया क्रॉस' बहाल करण्यांत आला.

फननासा टेंकडीवरील चढाईंत आपल्या इतर सहकाऱ्यांपासून एकाकी पडले असतां यांनीं आपल्या दोन सेक्शन्समधील शिपायांचे साहाय्यानें ती टेंकडी काबीज केली. त्या टेंकडीवरील संरक्षक चौकींतील शत्रुपक्षीय सैनिकांशीं यांनीं केवळ कुकरी व रिव्हाल्व्हर यांच्या साहाय्यानें सामना दिला. या लढ्यांतून स्वतः हे व यांचे दोन साहाय्यक हे तिघेजणच परत जिवंत येऊं शकले.

**थिबो, जॉर्ज फ्रेडरिक वुइल्यम**—( जन्म स. १८४८-मृत्यु स. ? ) संस्कृत पंडित, संशोधक व अभ्यासक.

जर्मनींतील हैडलबर्ग हें यांचें जन्मस्थान. जर्मनींत शिक्षण संपवून हे इंग्लंडमध्यें आले ( स. १८७१ ). तेथें बरींच वर्षें मॅक्स-मूलर यांचे सहकारी म्हणून यांनीं काम केलें. पुढें बनारसच्या संस्कृत कॉलेजचे प्रोफेसर म्हणून यांची नेमणूक झाली ( स. १८७५ ). हे इंग्लिश व संस्कृत विषयाचे प्रोफेसर होते. नंतर त्या कॉलेजचे हे प्रिन्सिपलहि झाले ( स. १८७९-८८ ). पुढें अलाहाबादच्या मूर सेन्ट्रल कॉलेजमध्यें प्रथम प्रोफेसर व नंतर प्रिन्सिपल म्हणून यांनीं काम केलें ( स. १८८८-९५ ).

यांचे बहुतेक ग्रंथ हिंदी तत्त्वज्ञान, ज्योतिष व गणित या विषयावर आहेत. यांचे महत्त्वाचे ग्रंथः—१ ऑन दि शुल्बसूत्राज ( १८७५ ). २ दि शुल्बसूत्र ऑफ बौधायन With translation ( १८७५ ). ३ अर्थसंग्रह, ( भाषान्तरासह मीमांसाशास्त्रावरील ग्रंथ १८८२ ). ४ पञ्चसिद्धान्तिका ( वराहमिहिरकृत ज्योतिःशास्त्रावरील ग्रंथ-पं. सुधाकर द्विवेदी यांच्या सत्कारार्थ प्रसिद्ध केलेला-इंग्रजी भाषान्तरासह स. १८८९). ५ वेदान्तसूत्रें ( श्रीशंकराचार्यांच्या भाष्यासह इंग्रजींत भाषान्तर करून सेक्रेड बुक्स् ऑफ दि ईस्ट या ग्रंथमालेच्या ३४ व ३८ या क्रमांकांत प्रसिद्ध झालेला ग्रंथ). ६ ज्योतिष, गणित आणि फलज्योति प्रकरणें ( बुल्हेरकृत एन्सायक्लोपीडिया ऑफ इंडियन रिसर्च या ग्रंथांत प्रसिद्ध झालेलीं प्रकरणें १८९९). ७ वेदान्तसूत्रें ( रामानुजाच्या भाष्याच्या इंग्रजी भाषान्तरासहित १९०४, सेक्रेड बुक्स् ऑफ दि ईस्टचें ४८ वें पुष्प ). आर. ग्रिफिथ यांच्या साहाय्यानें यांनीं बनारस संस्कृत सीरीज ही ग्रंथमाला चालविली होती. तींत शंभरावर पुस्तकें प्रसिद्ध झालीं आहेत.

# द

**दत्त, कन्हयालाल**—( फांशी स. १९०९ नवं. ) बंगाली क्रान्तिकारक.

हे माणिकतोळा बाग बाँबच्या म्हणजे अलीपूर कटांत पकडले जाऊन तुरुंगांत असतां यांनीं जेलच्या इस्पितळांत असलेला माफीचा साक्षीदार नरेन्द्र गोस्वामी याचा खून केला. त्याकरितां यांना फांशीची शिक्षा झाली.

**दत्त, कल्पना**—( जन्म स. १९१४ ) क्रान्तिकारक व समाजसत्तावादी कार्यकर्त्री.

पूर्व बंगाल्यांतील चटगांवजवळील श्रीपुर हें यांचें मूळ गांव. या मॅट्रिक झाल्यावर कलकत्त्याच्या सायन्स कॉलेजमध्यें गेल्या; पण हरताळ वगैरेंत भाग घेतल्यानें यांना परत यावें लागलें. चटगांव शस्त्रागारावरील हल्ल्याचा खटला तुरुंगांत चालू असतां इंडियन रिपब्लिक आर्मीचा अध्यक्ष सूर्यसेन यांनीं यांच्या साहाय्यानें डायनामाइटनें तुरुंग फोडण्याचें ठरविलें. पण पोलिसांना पत्ता लागून या पकडल्या गेल्या. पण जामीनावर सुटल्या. पुनः एकाला पुरुष वेषानें भेटण्यास जात असतां पकडल्या गेल्या; नंतर पुराव्याच्या अभावीं सुटल्या. पण घरावर असणाऱ्या पाहऱ्यांतून या कांहीं महत्त्वाच्या कामाकरितां बाहेर पडल्या, पण पाठलागांत गोळ्या संपल्यानें यांना पोलीसाच्या स्वाधीन व्हावें लागलें. तेव्हां यांना जन्मठेपेची शिक्षा झाली ( १९३३ ऑगस्ट ). पण म. गांधींच्या मध्यस्थीनें क्रान्तिवादावर विश्वास नाहीं असें सांगितल्यानें यांची सुटका झाली ( १९३९ ). पुढें या कम्युनिस्ट झाल्या आणि यांचा विवाह पूरणचंद जोशी यांच्याशीं झाला.

**दत्त, तोरु**—( जन्म स. १८५६–मृत्यु स. १८७७ ) इंग्रजी भाषेंतील लिहिणाऱ्या बंगाली कवयित्री.

ज्या काळीं इंग्रजी भाषेंत लिहिण्यास मोठमोठे लोकहि चाचरत त्या काळीं यांनीं आपलें काव्य वाङ्मय प्रसिद्ध केलें. यांचे वडील गोविंदचंद्र. त्यांच्याबरोबर यांनींहि बरींच वर्षे इंग्लंड व फ्रान्समध्यें घालविल्यानें इंग्रजी व फ्रेंच या दोन्ही भाषांवरील असाधारण प्रभुत्वाचा लाभ यांना लहानपणींच झाला.

हिंदुस्थानांत परत आल्याबरोबर यांनीं आपला A Sheaf Gleaned in French Fields हा काव्यग्रंथ प्रसिद्ध केला. फ्रेंच भाषेंतील कवितांचा अनुवाद इंग्रजी भाषेंत एकवीस वर्षांची एक हिंदी मुलगी करते, याबद्दल यांचें सर्वत्र कौतुक सुरू झालें.

याच वेळीं यांनीं सीता, सावित्रीसारख्या पौराणिक स्त्रियांचीं पद्यमय चरित्रें लिहिण्यास सुरुवात केली. परंतु यांच्या अकालीं निधनामुळें अपूर्ण राहिलेला तो ग्रंथ त्या स्वरूपातच यांच्या वडिलांनीं यांच्या मृत्यूनंतर पांच वर्षांनीं Ancient Ballads and Legends of Hindustan या नांवानें प्रसिद्ध केला.

**दत्त, मायकेल मधुसूदन**—( जन्म स. १८२७–मृत्यु स. १८७३ ) बंगाली भाषेंतील श्रेष्ठ कवि.

यांच्या पित्याचें नांव राजनारायण दत्त. हे मूळचे यशोहर जिल्ह्यांतील राहणारे. कलकत्त्यांत हिंदु कॉलेजमध्यें शिकत असतांच इंग्रजीशिवाय ग्रीक व लॅटिन या भाषांचाहि यांनीं अभ्यास केला. स. १८४३ मध्यें हिंदुधर्म सोडून ख्रिश्चन धर्म यांनीं स्वीकारला.

पुढें हे मद्रासला गेले आणि तेथें वर्तमानपत्रांत लिहूं लागले ( स. १८४८ ). यांनीं 'संयोगिता' कथेवर इंग्रजी काव्य लिहिलें त्यामुळें यांची अति प्रसिद्धि झाली. याच वेळीं मद्रास कॉलेजच्या प्रिंसिपलच्या मुलीशीं यांनीं लग्न केलें. परंतु तिला सोडून दुसऱ्या 'हेनरिए' नांवाच्या मुलीशीं यांनीं पुढें लग्न केलें. पुनः हे कलकत्त्यास आले आणि पोलीस कोर्टांत दुभाष्याचें काम करूं लागले. पुढें हे बॅरिस्टर होऊन आले. नंतर यांनीं रत्नावलीचें इंग्रजींत भाषान्तर केलें. येथून पुढें मात्र हे बंगालींत लिहूं लागले. यांचीं अनेक नाटकें व काव्यें प्रसिद्ध आहेत. बंगालीसाहित्यांतील अमर साहित्य सेवकांपैकीं हे एक आहेत. बंगाली भाषेंत वीररसात्मक काव्य करितां येतें हें यांनींच प्रथम सिद्ध केलें.

यांचें बंगाली वाङ्मय—नाटकें-( १ ) शर्मिष्ठा, ( २ ) पद्मावती, ( ३ ) कृष्णाकुमारी, ( ४ ) एकी एके बले सभ्यता, ( ५ ) बुरा सरीकेर घेरे रो.

काव्य-( १ ) मेघनादवध, ( २ ) वीराङ्गना, ( ३ ) व्रजाङ्गना, ( ४ ) चतुर्दशपदी, ( ५ ) तिलोत्तमा.

यांचें इंग्रजी वाङ्मय—काव्य-( 1 ) The Captive Ladie ( 1849 ), ( 2 ) Visions of the Past, ( 3 ) Meghanad wadh.

नाटक-Is This Called Civilization ?

**दत्त, रमेशचंद्र**—(जन्म स. १८४८ ऑगस्ट-मृत्यु स. १९०९ नवं. ३० ) बंगालमधील प्रारंभीचे आय्. सी. एस्. अधिकारी, थोर अभ्यासक, राष्ट्रसभेचे अध्यक्ष, बडोद्याचे दिवाण, हिंदुसंस्कृतीचे अभिमानी व ग्रंथकार.

जन्मस्थान कलकत्ता. यांच्या डेप्युटी कलेक्टर असणाऱ्या वडिलांचें नांव इसनचंद्र. ते बुडून वारले ( १८६१ ). तेव्हां हे कलकत्ता येथें हायस्कूलमध्यें शिकत होते. तेव्हां यांचें पालनपोषण सुशीचंद्र काकांनीं केलें. हे मॅट्रिक होऊन तीन वर्षें प्रेसिडेन्सी कॉलेजांत शिकले आणि आय्. सी. एस्. होण्याकरितां इंग्लंडला गेले ( १८६८ ). १८५४ पासून या वेळेपर्यंत या परीक्षेंत फक्त एकच हिंदी विद्यार्थी पास झाला होता. यांचेबरोबर यांचे मित्र सुरेन्द्रनाथ बानर्जी व बिहारीलाल गुप्त हे होते. तेथें हे त्या परीक्षेंत तिसरे आले ( १८६९ ). पुढें दोन वर्षें तिकडे हिंडून हे हिंदुस्थानांत आले ( १८७१ ). लागलीच 'Three Years in England ' हें इंग्रजी पुस्तक यांनीं प्रसिद्ध केलें.

प्रथम कांहीं दिवस अनुभव मिळावा म्हणून दुष्काळ व वादळांत झालेलें नुकसान यासंबंधीं काम करीत असतां ले. गव्हर्नरच्या जागेवरून निवृत्त होणाऱ्या सर ॲशले ईडन यांच्या कारकीर्दीचें चित्रण करणारा निर्भीड लेख स्टेट्समनमध्यें यांनीं लिहिला आणि शेतकरी-जीवन सुधारण्याकरितां उपाय सुचविणारें पुस्तकहि प्रसिद्ध केलें. त्याचेंच फळ बंगाल टेनन्सी ॲक्ट होय. यांच्यासारख्या निर्भीड व स्वतंत्र वृत्तीच्या अधिकाऱ्यांच्यामुळें गोऱ्या लोकांची चौकशी काळ्या लोकांपुढें होऊं नये असें प्रतिपादन करणारें ' इल्बर्ट बिल ' पुढें आलें ( १८८३ ). यांच्या टेनन्सी लेजिस्लेशन रिपोर्टांची सर्वत्र अत्यंत वाहवा झाली. मैमनसिंग, बरद्वान वगैरे जिल्ह्यांत मुख्य म्हणून यानीं काम करीत असतां लॉर्ड रिपनच्या वेळीं लोकांना थोडी तरी स्वायत्तता देणारी ग्रामपंचायतीची सूचना यांनीं मांडून मान्य करून घेतली व ती पुढें सर्व प्रान्तांत सुरू झाली. ओरिसाचे कमिशनर व पोलिटिकल एजंट वगैरे महत्त्वाचीं कामें केल्यावर हे मुदत संपण्यापूर्वीच राजीनामा देऊन सेवानिवृत्त झाले ( १८९७ ).

सनदी नोकरींतून सुटल्यावर जवळजवळ सात वर्षें लंडनच्या युनिव्हर्सिटी कॉलेजांत हे हिंदुस्थानच्या इतिहासाचे लेक्चरर होते. तेथें असतां रामायण व महाभारत या ग्रंथांतील निवडक भागाचा इंग्रजींत पद्यमय अनुवाद करण्याचें यांचें काम चालू होतें. शिवाय हिंदुस्थानची माहिती ब्रिटिश लोकांना करून देऊन त्यांची सहानुभूति मिळविण्याचें कार्यहि यांनीं केलें. शेतसारा, राजद्रोह, राज्यसुधारणा, नाणकव्यवहार वगैरे बाबतीतहि यांनीं कार्य केलें. अशा प्रकारच्या कळकळीच्या व मूलगामी कार्यांमुळेंच यांना लखनौ येथें भरलेल्या राष्ट्रसभेचें अध्यक्षस्थान देण्यांत आलें ( १८९९ ).

पुढें हे १९०४ सालीं हिंदुस्थानांत आले तेव्हां यांना बडोदा राज्यांत प्रथम शेतकीखात्याचे व नंतर मुख्य दिवाण नेमण्यांत आलें. आपल्या राज्यांत सुधारणा करण्याची सयाजीराव गायकवाडांची तीव्र इच्छा व जन्मभरच्या अनुभवांनीं ठरलेले ठोकताळे वापरण्याची यांची हौस या दोहोंचें व्यक्त स्वरूप म्हणजे यांच्या सुधारणा होत.

१९०७ मध्यें नेमलेल्या रॉयल कमिशनमध्यें हे एकटेच हिन्दी सभासद होते. तेथें १९०८ अखेर राहून आपल्या सूचना व मतें लॉर्ड मोर्ले यांच्या पुढें मांडून हे परत आले व लवकरच परलोकवासी झाले.

यांच्या वरील कार्यापेक्षांहि यांनीं इंग्रजी व बंगाली भाषेंत लिहिलेलें विपुल वाङ्मय अत्यंत चिरस्थायी स्वरूपाचें आहे. प्रथम हे इंग्रजींत लिहीत; पण बंकीमचंद्रांच्या सांगण्यावरून हे पुढें बंगालींत लिहूं लागले. यांनीं चार ऐतिहासिक व दोन सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या. ऐतिहासिक कादंबऱ्यांत यांची ' शिवाजी ' कादंबरी उत्कृष्ट समजली जाते. यांच्या सामाजिक कादंबऱ्यांत खेडेगांवांतील परिस्थितीचें चित्र यथार्थपणें उठविण्याचा यांचा प्रयत्न यशस्वी झाला आहे. यांच्या बहुतेक ग्रंथांचें इंग्रजींत व देशी भाषांत भाषान्तर झालें आहे. श्री. वि. सी. गुर्जर यांनीं यांच्या कांहीं कादंबऱ्या मराठींतहि आणल्या आहेत.

यांचे ग्रंथ:—इतिहास-( 1 ) A History of Civilization in Ancient India ( 1890 तीन खंड ), ( 2 ) Later Hindu Civilization ( 1890 ), ( 3 ) Economic History of British India ( 1902 ), ( 4 ) Indians in the Victorian Age

( 1904 ), ( 5 ) A History of the Literature of Bengal.

काव्यः—The Mahabharat and the Ramayana ( Everyman's Series ), ( 2 ) Lays of Ancient India ( 1894 ), ( 3 ) Great Epics of Ancient India.

कादंबऱ्याः—( 1 ) Shivaji (इंग्रजी व बंगाली), ( 2 ) The Lake of Palms ( 1902 ), ( 3 ) The Slave Girl of Agra ( 1909 ).

इतरः—( 1 ) Three Years in England (1871), ( 2 ) The Peasantry of Bengal ( 1875 ), ( 3 ) ऋग्वेदाचें बंगाली भाषांतर ( 1886 ), ( 4 ) England and India ( 1897 ) इत्यादि.

**दप्तरदार, विठोबा अण्णा**—( जन्म स. १८१३–मृत्यु स. १८७३ ) महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध कवि, प्रवचनकार व ग्रंथकार.

हे मोगलाईंतील गुलबर्ग्याजवळच्या बेदरचे राहणारे म्हणून हे आपलें उपनांव बेदरे लावीत. यांचे आजे बाळाजीपंत यांना दप्तरदारीची सनद मिळाली व मग यांचें आडनांव दप्तरदार झालें. गुंडाचार्य घळसासी व नारायणाचार्य गजेंद्रगडकर हे यांचे गुरु होत.

यांनीं मराठीपेक्षां संस्कृतमध्येंच जास्त ग्रन्थ केलेले आहेत. मोरोपंतांच्या नंतर जुन्या पद्धतीनें कविता करणाऱ्यांत यांचाच क्रमांक वर लागेल. यांच्या 'सुश्लोक लाघवा'तील श्लोकाच्या साहाय्यानें हरदास लोक कीर्तनाला कसा रंग आणतात हें सर्वश्रुत आहे. संस्कृताप्रमाणें मराठींत यांनीं जरी मोठें काव्य लिहिलें नाहीं तरी यांच्या उपलब्ध मराठी कवितांच्या अवलोकनावरून मराठी कवि या नात्यानें यांची योग्यता श्रेष्ठ आहे. यांच्या कवितेंत विद्वत्ता, रसिकता, प्रेम, भक्ति, कोटिबाजपणा वगैरे गुण असल्यामुळें ती वाचतांना रसिकाच्या चित्तवृत्ति आकर्षिल्याखेरीज राहत नाहींत.

'विधवाविवाह सशास्त्र की अशास्त्र' या स. १८६८ त शंकराचार्यांच्या पुढें झालेल्या वादांत यांनीं प्रामुख्यानें भाग घेऊन त्याकरितां श्रुतिस्मृतींतील वचनांनीं युक्त असा 'विवाहतत्त्व' नांवाचा ग्रन्थ तयार केला. 'पदसंग्रह' हाहि यांनीं प्रसिद्ध केलेल्या ग्रन्थांपैकींच एक ग्रन्थ आहे.

यांचे संस्कृत ग्रंथः—१ शिवस्तुति, २ गजेन्द्र चंपू, ३ सुश्लोकलाघव, ४ हेतुरामायण, ५ प्रबोधोत्सवलाघव, ६ प्रयोगलाघव, ७ नित्यक्रमलाघव, ८ संकल्प, ९ रामतापिनी, १० साधुपार्षदलाघवम्, ११ एकादशीविचार, १२ विवाहतत्त्व.

**दप्तरी, डॉ. केशव लक्ष्मण**—( जन्म स. १८८० नवं. २२ ) विख्यात गणितज्ञ, लेखक, संशोधक आणि बुद्धिप्रामाण्यवादी ग्रंथकार.

नागपूरचे हे त्यागी गृहस्थ बी. ए., एल्एल्. बी. आहेत. धंदा होमिओपाथी वैद्यकाचा करितात. ह्यांनीं संशोधनपूर्ण ज्ञानांत भर घालणारे पुष्कळ ग्रंथ लिहिले आहेत. ते "भारतीय युद्धकालनिर्णय" "वैदिक कालगणनापद्धति व रामचंद्रकालनिर्णय", "भारतीय ज्योतिःशास्त्रनिरीक्षण", "धर्मरहस्य", "धर्मविवादस्वरूप", "जैमिन्यर्थदीपिका", "तात्त्विकमीमांसापद्धति", "सचिकित्साप्रकाशिका", "कंसवधकालनिर्णय" "प्राचीन भारतीय इतिहासाचीं साधनें", "राजतरंगिणीनिरीक्षण", "भारतीयांचा मौर्यपूर्व इतिहास", "विक्रमादित्यांच्या घोंटाळ्यांचा उलगडा", "चिकित्सापरीक्षण", "The Astronomical Method and its Application to the Chronology of Ancient India", "The Bodily Reaction and Examination of the Systems of Medicine" आणि "The Social Institutions of Ancient India". हे आहेत. ह्यांशिवाय गांवांत उपनिषदांचा अभ्यास करून, यांनीं उपनिषदांवर आणि व्याससूत्रावर टीका लिहिली आहे व उपनिषदांवर एक निबंध लिहून त्याचें इंग्रजींत भाषांतर "The Rationalistic and Realistic Interpretation of the Upanishods" ह्या नांवाचें केलें आहे. ह्यापैकीं बरेच ग्रंथ अप्रकाशित आहेत व प्रकाशित झालेल्या कांहींच्या प्रति शिल्लक नाहींत. सूक्ष्म गणितांत यांची गति अकुंठित चालते आणि संशोधनात्मक लिहिण्यानें यांनीं आपल्याकडे सर्वांचें लक्ष खेंचून घेतलें आहे. यांचा 'भारतीय युद्धकालनिर्णय' हा प्रबंध स. १९१८ सालीं विविधज्ञानविस्तारांतून प्रसिद्ध झाला आणि यांच्याकडे लोकमान्य टिळक व श्री. कृ. कोल्हटकर यांच्या सारख्यांचें लक्ष वेधलें. लो. टिळकांना आपल्या शुद्ध पंचांगाकरितां 'करणकल्पलता' नांवाचा संस्कृत ग्रंथ करण्याकरितां यांच्याकडे जावें लागलें ( १९२० ). तो ग्रंथ पुढें दिवंगत

झालेल्या लो. टिळकांना यांनीं अर्पण केला आहे. तो ग्रंथ प्रसिद्ध झाल्यावर नागपूरच्या 'महाराष्ट्रा'नें यांचा 'अभिनव केशवदैवज्ञ' असा गौरव केला.

शं. बा. दीक्षित यांच्या 'भारतीय ज्योतिःशास्त्राचा इतिहास' या महत्त्वाच्या ग्रंथांत कालनिर्णयाच्या दृष्टीनें अनेक हस्तलिखित ग्रंथांची पाहणी केलली असली तरी त्यांतील ज्योतिर्गणिताचें सांगोपांग विवेचन त्यांत केलेलें नाहीं. तें काम 'भारतीय ज्योतिःशास्त्र निरीक्षण' या आपल्या ग्रंथांत यांनीं केलें. या ग्रंथांत भारतीय ज्योतिर्गणिताचा अभ्यास कसा करावा याचा नमुनाच यांनीं सोदाहरण अभ्यासकांपुढें ठेवला आहे. यांच्या ग्रंथांत दीक्षितांच्या ग्रंथांतील उणिवांचें व चुकांचें आविष्करण केलें असल्यामुळें त्या ग्रंथास परीक्षण असें नांव देणें योग्य झालें असतें असें प्रस्तावनाकार श्री. कृ. कोल्हटकर यांनीं म्हटलें आहे. स. १९२९ सालीं झालेल्या या निबंधांत यांनीं दीक्षितांनीं दिलेले कांहीं काळ चुकीचे ठरविले आहेत.

'भारतीयांनीं ज्योतिःशास्त्र ग्रीकांपासून घेतले कीं काय? या प्रश्नाचा निर्णय करणें, कलियुगारंभीं ग्रह एकत्र होते ही गोष्ट कल्पित नसून प्रत्यक्ष पाहिलेली आपल्या ज्योतिषांस परंपरेनें माहीत होती, आणि शुद्ध मध्यमगति, मंदशीघ्रपरिधि व उच्चे पाश्चात्यांची घेणें व स्पष्टगति प्रमेयांत युरोपिय ज्योतिषशास्त्रानुसार बदल करणें हीं भारतीय ज्योतिषांचीं कर्तव्यें आहेत' या मुद्यांचें विवेचन करणें हा यांच्या ग्रंथाचा हेतु आहे. म्हणजे एकीकडून युरोपियनांच्या आक्षेपास उत्तर देणें व दुसरीकडून आजचे पाश्चात्यांचे शुद्ध आंकडे व त्यांचीं प्रमेयें आमच्या लोकांनीं घेतलीं पाहिजेत हें सांगणें यापीत्यर्थ आमच्या ज्योतिष ग्रंथांतील मूलकांची तपासणी या यांच्या ग्रंथांत आहे. ह्यांचे इतर विषयांवरील ग्रंथहि असेच नावीन्यपूर्ण व बुद्धीस पटतील असे व लोकोपकारक आहेत.

हे पूर्ण बुद्धिवादी असल्यानें तडजोडवादी सुधारकांशीं यांचें जमण्यासारखें नाहीं. वेद, ईश्वर, धर्म वगैरेसंबंधीं यांचीं मतें क्षेपण्यासारखीं नसूनहि हे केवळ आपलीं मतें जुन्या वेदशास्त्रादि ग्रंथांतून सिद्ध करून देत असल्यामुळें ग्रंथप्रामाण्यवादी अर्धवट सुधारक यांना आपल्यापैकीं समजण्याचा प्रयत्न करितात.

यांच्या विद्वत्तेचा गौरव नागपूर युनिव्हर्सिटीनें यांना एलएल्. डी. पदवी देऊन केला ( १९४१ ).

यांचे ग्रंथ व त्यांतील विचारसरणीचा परिचय आमच्या प्राचीन-चरित्रकोशाच्या प्रस्तावनेंत दिला आहे. शिवाय यांनीं केलेले बहुतेक कालनिर्णय आम्ही त्याच ग्रंथाच्या कालनिर्णय परिशिष्टांत दिले आहेत.

**दबीर**—( जन्म स. १८०१–मृत्यु स. १८७४ ) सुप्रसिद्ध उर्दू कवि.

यांचें नांव मिर्झा सनामत अलीखान, पिता–मिर्जा गुलाम हुसेन. जन्मस्थान लखनौ. यांचें शिक्षण लखनौंत झालें. बाराव्या वर्षी हे कविता करूं लागले.

हे मीर जमीरचे शागीर्द. यांच्या कवितांची छाप लवकरच कविमंडळावर पडली. यांची विशेष ख्याति 'मरसिया' म्हणणारे म्हणून झाली. त्यामुळें यांचे अनेक मोठमोठे लोक शिष्य झाले. हे चाळीसीच्या सुमारास असतां लखनौला मीर अनीस हे फैजाबादेहून आले. तेव्हां तेथें कविमंडळांत दोघांच्या अनुयायांच्या दोन फळ्या पडल्या. पुढें यांचे डोळे गेले. लखनौचे इतिहासप्रसिद्ध नबाब वाजीदअलीशाह कलकत्त्यास नजरकैदेंत होते. त्यांनीं एका जर्मन डॉक्टरकडून आपले डोळे दुरुस्त करून घेतले तेव्हां त्यांनीं यांचेहि डोळे दुरुस्त करविले.

**दयानंद सरस्वती स्वामी**—( जन्म स. १८२४–समाधि स. १८८३ आश्विन वद्य ३० ) आर्यसमाजाचे सुप्रसिद्ध संस्थापक, आक्रमक नि निर्भय धर्मसुधारक, कुशल संघटक आणि हिन्दी भाषेचें राष्ट्रीय स्वरूप ओळखणारे महर्षि.

काठेवाडांतील मोरवी संस्थानांत अंबाशंकर नांवाच्या औदिच्य ब्राह्मणाचे हे पुत्र. यांचें मूळ नांव मूळशंकर. संन्यास घेतल्यावर दयानंदसरस्वती असें नांव यांनीं घेतलें. वडील जमीनदार. धंदा सावकारीचा. शिवाची कडक उपासना. आठव्या वर्षी मुंज झाल्यानंतर कुलाचाराप्रमाणें शैव पंथाची दीक्षा यांना देण्यांत आली. हे नित्य पार्थिव पूजाहि करूं लागले. यांचें घराणें सामवेदी होतें तरी यांच्याकडून शुक्ल यजुर्वेदसंहिता पाठ करून घेण्यांत आली.

शिवरात्रीचे दिवशीं मध्यरात्रीं मंदिरांत शिवपूजा चालू होती. सर्वत्र शांतता असल्यानें निःस्तब्ध होतें. हे मात्र निष्ठेनें देवाकडे टक लावून बसले होते. इतक्यांत भोंवतालच्या बिळांतून उंदीर बाहेर आला आणि तो देवावर बसून अक्षता वगैरे खाऊं लागला.

यांनीं तें दृश्य पाहिलें आणि यांच्या मनांतील मूर्तीवरील श्रद्धा नाहींशी झाली. ज्याला आपण सर्वशक्तिमान् मानतों त्याला आपल्या अंगावर बसलेला उंदीरसुद्धां हाकालतां येऊं नये, ही कल्पनासुद्धां यांना असह्य होऊन हे मूर्तिपूजेच्या पूर्ण विरुद्ध झाले. वडिलांना विचारतां तेहि रागावले. घरांतील बहीण व चुलता यांच्या मृत्यूनें उदासीनता वाढली. वेदाध्ययनाकडे लक्ष होतें; पण वडिलांनीं लग्नाची गोष्ट काढतांच यांनीं तेथून पलायन केलें आणि पायींच मार्ग आक्रमण करीत सोमाली गांवीं येऊन ब्रह्मचारी व्रताची दीक्षा घेतली, 'शुद्धचैतन्य' असें नांव स्वीकारलें आणि योगाभ्यासाला सुरुवात केली. वडील शोधास आले असतां त्यांना चुकवून अहमदाबादेहून बडोद्यास आले व तेथें ब्रह्मानंद नांवाच्या संन्याशाजवळ अद्वैत वेदान्ताच्या अभ्यासाला यांनीं सुरुवात केली. पुढें नर्मदातीरीं सच्चिदानंदस्वामींपाशीं अध्ययन केल्यावर महाराष्ट्रीय स्वामी पूर्णानंदांपासून संन्यासदीक्षा घेऊन 'दयानंद सरस्वती' या नांवानें फिरत राहून शक्य असेल तेथें ज्ञानाचा संग्रह हे करीत राहिले. योगानंदांपासून व कृष्णशास्त्र्यांपासून व्याकरण शिकत असतां, शाक्तादि पंथ व सामुद्रिकादि शास्त्रांचें मिथ्यात्व यांच्या ध्यानांत आलें. आपलें वैराग्य व जिज्ञासा यांच्या जोरावर हिंवाळ्यांत हिंडत असतां अनेक मोहांतून बचावून मथुरेस जन्मांध व अत्यंत कडक स्वभावाच्या स्वामी विरजानंदांकडे येऊन पोंचले. हेच बहुतांशीं यांच्या भावी कार्याचे मार्गदर्शक होत. त्यांनीं प्रथमच सत्यासत्याची खरी चिकित्सा करण्याकरितां महाभारतापूर्वीच्या ऋषिमुनींच्या वाङ्मयाचा अभ्यास करण्याचा आदेश यांना दिला. यांनीं त्यांच्यापाशीं अडीच वर्षेंपर्यंत अध्ययन केलें व शेवटीं गुरुदक्षिणा म्हणून सत्यज्ञान जगाला देण्याचा आदेश घेऊन तें सत्यज्ञान वेदांत असल्यानें वैदिक धर्माचा प्रसार करण्याकरितां हे बाहेर पडले आणि त्याकरितां आर्य समाजाची स्थापना केली ( स. १८७५ एप्रिल १०, मुंबई ).

वेदांतील तत्त्वज्ञानाचें यथार्थ ज्ञान व्हावें म्हणून यांनीं 'सत्यार्थप्रकाश' नांवाचा ग्रंथ संस्कृत व हिन्दी भाषेत लिहिला. सत्यार्थप्रकाशांत वैदिक धर्माचें यथार्थ स्वरूप प्रतिपादन करतांना इतर मतपंथांचें खंडनहि यांना करावें लागलें. त्यांतील चढाईच्या, सडेतोड, फटकळ, बिनतोड आणि घणाघाती कोटिक्रमानें या ग्रंथाकडे सर्वांचें लक्ष वेधलें आणि अनेक भाषांत त्याचें भाषान्तर करण्यांत आलें. त्यांतील इस्लाम् धर्माचें खंडन करणारा अकरावा भाग जप्त करावा, अशी मागणी मुसलमानांनीं केली आणि सिंधप्रांतांत त्या भागाच्या मुद्रणास व प्रकाशनास बंदी करण्यांत आली. या प्रचारात्मक ग्रंथानंतर वेदाचा यथार्थ अर्थ समजण्याकरितां, यांनीं 'वेदभाष्य' लिहिण्यास सुरुवात केली; पण तो ग्रंथ अपुराच राहिला. यानंतर 'संस्कारविधि' हा ग्रंथ लिहून सोळा संस्कारांचें वर्णन व प्रयोग यांनीं दिले. 'पंचमहायज्ञविधि' या लहानशा ग्रंथांत नित्य करावयाच्या यज्ञाचें यांनीं विवेचन केलें. 'गोकरुणानिधि' या ग्रंथांत यांच्या अन्तःकरणाचें प्रतिबिंब पाहावयास मिळतें. यांत शाकाहाराचें समर्थन, मांसाहाराचें खंडन, प्राण्यांच्या प्राणरक्षणार्थ शास्त्रीय माहिती वगैरे विषय आहेत.

प्रथम आर्यसमाजाच्या तत्त्वांचा प्रचार अहमदाबाद, बडोदें, पुणें, मुंबई या ठिकाणीं केल्यावर हे दिल्ली येथें भरणाऱ्या दरबारासाठीं गेले. तेथून चंदापूर येथें भरलेल्या मेळ्यांत गेले. तेथें सर्व धर्मांचे प्रतिनिधि बोलाविलेले होते व चर्चेसाठीं पांच प्रश्न ठेविले होते. यांनीं त्या प्रश्नांची यथायोग्य उत्तरें दिल्यामुळें उत्तर हिंदुस्थानांत व विशेषतः पंजाबांत यांच्या मताचा चांगलाच बोलबाला झाला. शैक्षणिक संस्था, गुरुकुलें व अनाथालयें निघून होमहवनादि वैदिक पद्धतींचे कार्यक्रम तिकडे होऊं लागले.

अलीकडच्या काळांत अनेक धर्मसुधारक व संस्थासंस्थापक निर्माण झाले, पण यांच्या आर्यसमाजाइतका संघटित, कार्यक्षम, लढाऊ व आक्रमक असा समाज एकहि दाखवितां येणार नाहीं. यांच्याइतपत मतप्रतिपादनांतील कणखरपणा आणि तडफ इतरत्र आढळत नाहीं. शिवाय यांनीं हिंदुधर्माला प्राणभूत असणारे वेद प्रमाण मानून पूर्व परंपरेचा धागा तुटूं दिला नाहीं आणि बुद्धिप्रामाण्य वाद्यांच्या लहरीला आपला समाज बळि न पडेल अशी व्यवस्था केली.

यांचें शारीरिक, मानसिक व वाचिक सामर्थ्य अलौकिक होतें. दोन घोड्यांची भरधांव गाडी हे एक हातानें सहज थांबवून धरीत. एकदां तलवार घेऊन अंगावर धांवण्याऱ्याची तलवार हिसकावून घेऊन तिचे यांनीं तुकडे केले. अत्यंत विरुद्ध वातावरणांत यांनीं आपलीं मतें मांडण्यास कधींहि माघार घेतली नाहीं. खुद्द काशीसारख्या क्षेत्रांत जाऊन 'मूर्तिपूजा सिद्ध करा, नाहीं तर काशीविश्वेश्वर फोडून टाका' असें आव्हान देऊन हे वादास उभे राहत. अभेद्य छाती, दणकट मनगट आणि खणखणीत आवाज यामुळें यांच्याबद्दल सर्वत्र आदर उत्पन्न होत असे. बोल-

ण्यांत चतुर, वादांत हजरजबाबी आणि शास्त्राधार देण्यांत हे कुशल होते. बिनतोड व फटकळ कोटिक्रमानें हे सहज सभा जिंकीत आणि आपल्या निस्वार्थ कळकळीच्या उपदेशानें लोकांना आपल्या भजनीं लावीत. अवघ्या पांच वर्षांत यांनीं उत्तर हिंदुस्थानचा धार्मिक बाबतींत कायापालट केला. सत्यार्थप्रकाशासारखे प्रचाराला उपयुक्त असणारे ग्रंथ तयार करून शेंकडो निर्भय अनुयायी तयार केले. अशा उग्र प्रचाराला प्राणघातक हल्ले व विषप्रयोग वगैरेंनीं उत्तर देण्याचा प्रयत्न झाला. पण यांचा प्रभाव वाढतच गेला. १८५९ नवंबरांत काशीस तीनशें पंडितांशीं झालेल्या वादानें यांची कीर्ति दिगंत झाली. हे नुसते उत्तर हिंदुस्थानांत प्रचार करून थांबले नाहींत तर यांनीं नियमबद्ध संस्था निर्माण करून अनुयायांना निश्चित आचार व विचार यांचा पुरवठा केला. आणि आपल्या त्यागाच्या खंबीर अधिष्ठानावर ध्येयवादी संस्थेची उभारणी केली. आणि हिंदुधर्माला लढाऊ धर्माचें स्वरूप देण्याचा प्रयत्न केला.

शेवटीं जोधपूर येथें यांना विषप्रयोग होऊन यांचा अन्त झाला (शके १८०५ अश्विन अमावास्या, स. १८८३).

हे उदेपूर येथें असतां तेथील राजा राणा सज्जनसिंह यांच्या सहानुभूतीनें यांनीं 'परोपकारिणी सभा' स्थापिली. तिला न्या. म. गो. रानडे उपस्थित होते. यांनीं आपल्या मृत्युपत्रांत सभेकडे पुढील तीन महत्त्वाचीं कामें सोंपविलीं–१ वेद व वैदिक वाङ्मय छापून तें अल्प किंमतींत प्रसृत करणें, २ जगाच्या वेगळाल्या भागांत वैदिक धर्मप्रचारक पाठवून आर्य-धर्माचा प्रसार करणें. ३ भारतीय अनाथांचें पालन-पोषण करून त्यांना विद्यादान देणें. या यांच्या इच्छे-प्रमाणें आर्यसमाजाकडून हें काम अव्याहत चालू आहे.

**दयाराम**— (जन्म स. १७६७-मृत्यु स. १८५२) सुप्रसिद्ध गुजराथी सन्त कवि.

जन्मस्थान कंदोद (नर्मदातीर), जात साठोदर नागर ब्राह्मण. लहानपणीं आई वारल्यानें यांचा संभाळ यांच्या चुलतीनें केला. हे एकदां घरांतून पळून गेले आणि तेथें केशवानंदांचे शिष्य झाले. यांनीं सर्व हिंदु-स्थानभर प्रवास केला. यांना हिन्दी, व्रज व संस्कृत या भाषा चांगल्या येऊं लागल्या. यांचें मन वैष्णव होण्याकडे झुकूं लागलें आणि यांनीं आपलें नांव दया-शंकर होतें, तें बदलून दयाराम असें घेतलें. नंतर यांनीं वैष्णवांचें दैवत नाथाजीचें दर्शन घेतलें.

यांची भजनें गाण्याची पद्धति भावनापूर्ण असल्यानें लोकप्रिय असे. यांची अमर्याद विष्णुभक्ति पाहून लोक यांना भक्त मानूं लागले व यांची शिष्यशाखा वाढूं लागली. कृष्ण व गोपी यांच्यावर यांनीं केलेली पद्य-रचना अत्यंत सरस आहे.

यांचें रतनबाई नांवाच्या सोनार जातीच्या विधवा स्त्रीवर प्रेम होतें. तिच्याबरोबर यांनीं ३० वर्षें संसार केला. हे आपण गतजन्मीं पतिपत्नी होतों असें सांगत.

**दवे, नर्मदाशंकर लालशंकर**— (जन्म स. १८३३-मृत्यु स. १८८९) गुजराथी भाषेंतील गद्याला आपल्या शैलीनें नवें आकर्षक रूप देणारे सुप्रसिद्ध लेखक व कवि.

जन्मस्थान सुरत. जात वडनगरा नागर ब्राह्मण. पित्याचें नांव लालशंकर पुरुषोत्तम. धंदा कारकुनीचा. सुरत येथें प्राथमिक व मुंबई येथें एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूट-मध्यें माध्यमिक शिक्षण झालें. शिक्षक म्हणून कांहीं दिवस काम केल्यावर हे पुनः मुंबईला आले आणि यांनीं 'बुद्धिवर्धक सभा' स्थापिली. तेथील यांच्या विविध विषयांवरील प्रोत्साहक भाषणांनीं यांच्याकडे सर्वांचें लक्ष गेलें. शेवटीं पंचविसाव्या वर्षीं यांनीं ग्रंथकार होण्याचें निश्चित केलें. 'नर्म कविता' नांवानें यांचे कवितासंग्रह प्रसिद्ध होऊं लागले. त्यामुळें उत्कृष्ट कवि म्हणून यांचें नांव सर्वत्र झालें. तसेंच 'नर्म गद्य' या यांच्या लेखसंग्रहानें यांच्या गद्याचेंहि आकर्षण लोकांवर पडलें.

त्यानंतर 'नर्मकोश' या ग्रंथानें यांची कीर्ति अमर झाली. सरस्वतीनें यांच्यावर कृपा केली पण लक्ष्मी दूरच राहिली. पैशांकरितां यांनीं नाट्यलेखनहि केलें पण त्याचाहि उपयोग झाला नाहीं. शेवटीं 'गोकुळदास तेजपाळ दानखाता'मध्यें यांनीं नोकरी पत्करिली. पुढें यांच्या विचारांत क्रांति झाल्याचा सूचक असा यांचा 'धर्मविचार' हा ग्रंथ प्रसिद्ध झाला.

यांना गुजराथी वाङ्मयांतील युगप्रवर्तक लेखक मानतात. यांची लेखणी सफाईदारपणें अनेक विषयांत वावरे. आधुनिक गुजराथी गद्याचे जनक असा यांचा

सर्वत्र गौरव केला जातो. 'ग्रंथ अने ग्रंथकार' मालेंत ( भाग ५ पान २१५ ) यांच्या नांवावर पंचाहत्तर कृति दिल्या आहेत. त्यावरून यांच्या प्रचंड लेखनाची कल्पना येईल. गुजराथींत भावगीतें लिहिण्यास यांनींच प्रथम सुरुवात केली असें म्हणतात. नर्मद या नांवानेंहि यांची कविता प्रसिद्ध आहे.

**दलाल, सर अर्देसर**—( जन्म स. १८८४ ) मुंबईचे सुप्रसिद्ध व्यापारी व 'टाटा सन्स लि.'चे माजी डायरेक्टर.

यांचें शिक्षण मुंबई व केम्ब्रिज येथें झालें. हे एम्. ए., आय्. सी. एस्. आहेत. हे सेवानिवृत्त असून मुंबई व हिंदुस्थान सरकारच्या बऱ्याच जबाबदारीच्या जागांवर यांनीं कामें केलीं आहेत.

हे व्हाइसरॉयच्या एक्झिक्युटिक कौन्सिलमध्यें युद्धोत्तर योजनेच्या कार्यावर होते. पण यांनीं १९४६ च्या जानेवारींत राजीनामा दिला व नंतर यांचें काम रामस्वामी मुदलियार हे पाहूं लागले. यांच्या हातांतील खात्यांत वरिष्ठ अधिकारी ढवळाढवळ करूं लागले असें राजीनाम्याचें कारण बोलतात.

**दाग**—( जन्म स. १८३१ - मृत्यु स. १९०५ ) सुप्रसिद्ध उर्दू महाकवि.

यांचें नांव नबाब मिर्ज़ाखाँ; स्थळ दिल्ली. यांचें घराणें दिल्लींत अत्यंत प्रतिष्ठित समजलें जाई. सात वर्षांचे असतां यांचें शिक्षण सुरू झालें. गयासुल्लोगातचे कर्ते मौलवी गयासुद्दीन यांच्यापासून यांनीं प्रथम फारशी शिकण्यास सुरुवात केली. नंतर मीर कवीचे शिष्य मौलवी सैयद अहमद हुसेन हे यांचे शिक्षक झाले. नंतर किल्ल्यांत बादशहाच्या परिवारांत यांना जाण्याची संधि मिळाली. तेथें यांना घोड्यावर बसणें, बंदूक व तीर मारणें वगैरेंचें शिक्षण मिळालें. तेथें प्रसिद्ध जौक़ कवि राजगुरु होते. त्यांचे हे शिष्य बनले. यांचे गज्जल सुधारतांना जौक़ कवीची यांच्या कवित्वशक्तीबद्दल खात्री पटली. बादशहाच्या कविसभेंत यांच्या गज्जलांनीं यांची उत्तम छाप बसली. कवि म्हणून हे सर्वांच्या नजरेंत भरले असतांच सत्तावन सालच्या बंडामुळें हे रामपूरला पळाले आणि तेथें नबाब युसुफ अलीखाँचे आश्रित बनले. तेथें यांच्याकडे आलेली नोकरी यांनीं चोवीस वर्षे बजावली. तेथें कवींचा चांगलाच संच असून त्यांत यांचा जम उत्तम असे. नबाबाच्याबरोबर यांनीं हाजची यात्रा केली. त्याबद्दल कृतज्ञता प्रगट करण्याकरितां यांनीं एक कविता लिहिली आहे. पण तेथील नबाब व त्यांचे पुत्र कलबे अलीखाँ परलोकवासी झाल्यानें यांना पुनः दिल्ली गांठावी लागली. पुढें हे प्रमुख शहरीं फिरले. तेथें यांचें उत्तम स्वागत झालें. कारण हे जाण्यापूर्वीच तेथें यांचीं गझलें पोंचलीं होतीं व तीं अत्यंत लोकप्रिय झालीं होतीं. त्यामुळें अशीं गझलें करणाराला पाहण्याविषयीं लोकांत उत्कंठा होती. हे फिरत हैदराबादला आले. त्या वेळीं निजामसाहेबांची व यांची भेट झाली नाहीं. पण यांनीं एक कविता लिहून त्यांच्याकडे पाठविली व हे दिल्लीला निघून गेले. निजामसाहेबांनीं यांना बोलावून घेतलें आणि द. म. पंधराशें रुपयांवर काव्यगुरु म्हणून यांची नेमणूक केली. शिवाय यांची गाडी, घर, नोकर वगैरे उत्तम सरबराई असे. वेळोवेळीं यांना मिळालेल्या भेटी सव्वीस हजारांच्या होत्या. यांच्यावर पदव्यांचा तर नुसता पाऊस पडला. याच वेळीं रामपुरमध्यें यांचे प्रतिस्पर्धी असलेले 'अमीर' कवि हैदराबादेस आले. तेथें यांनीं त्यांचा उत्तम सत्कार केला. पुढें 'अमीर'च्या अकस्मात मृत्यूनें यांना फार खेद झाला. अमीरच्या मृत्यूनंतर पांच वर्षांनीं यांचा देहान्त झाला. दोघे एका वेळचे; अमीर लखनौचे तर हे दिल्लीचे महाकवि होते. शेवटलीं अठरा वर्षे यांनीं हैदराबादेंत आनंदांत काढलीं. हैदराबादेंत शरीफसाहेबांच्या दरग्यांत यांचें दफन झालें. तेथेंच अमीर कवींचेंहि दफन झालें.

यांच्या कवितासंग्रहाचीं पुष्कळ पुस्तकें छापलेलीं आहेत. एक मसनवी पण आहे. मसनवींतील कथानक यांचें स्वतःचें आहे. मनीबाई नामक वेश्येवर यांचें मन जडल्याचें कथानक त्यांत मोठें सरस आहे.

यांचें वैशिष्ट्य साध्या, सफाईदार व चटकदार भाषेंत आहे. अशी भाषा उर्दू कवींत क्वचित् आढळते. थोडी अश्लीलताहि पण यांच्या काव्यांत आहे.

यांची शिष्यशाखा दीड हजारपेक्षां जास्त आहे. त्यांतील प्रमुख–इकबाल, बेखुद, सायल, आगा, हसन, बेबाक, हैरत, आजाद, रसा वगैरे ( क. कौ. ४.४७१ ).

**दातार, गंगाधरशास्त्री**—( जन्म स. १८२२ - मृत्यु स. १८८८ ) पुण्यांतील प्रसिद्ध शास्त्री व संस्कृत ग्रंथकार.

हे पांचवडच्या मणिरामभटांचे ज्येष्ठ चिरंजीव. वेदाध्ययन वडिलांच्यापाशीं व शास्त्राध्ययन पंडित

त्र्यंबकशास्त्री शाळिग्राम यांचेपाशीं केलें. शिवाय श्रौती म्हणून यांची प्रसिद्धि होती. यांच्याकडे धर्मशास्त्रविषयक पृच्छा अनेक ठिकाणांवरून होई. धार्मिक कृत्यें सूत्रोक्त करण्याकडे यांचा कल असे. यांनीं संशोधून प्रस्तावना लिहिलेले अनेक ग्रंथ रावजी श्रीधर गोंधळेकर यांनीं छापून प्रसिद्ध केले. यांचा 'मुहूर्तसिंधु' हा संस्कृत-मराठी ग्रंथ ( शके १८०५ ) प्रसिद्ध आहे. यांचा 'निबंध-सार' नांवाचा धर्मशास्त्रविषयक संस्कृत ग्रंथ अद्यापि अप्रकाशित आहे. यांनीं शेवटीं आतुरसंन्यास घेतला.

**दाते, यशवंत रामकृष्ण**—( जन्म स. १८९१ एप्रिल १७ ) महाराष्ट्र शब्दकोशाचे संपादक, साहित्य, शिक्षण व समाजविषयक कार्य करणारे गृहस्थ.

यांचें मूळ गांव किन्हळ ( जि. रत्नागिरी ). यांचें शिक्षण धुळें, पुणें व नागपूर येथें झालें. हे बी. ए. एलएल्. बी. आहेत. नंतर डॉ. श्री. व्यं. केतकर यांनीं काढलेल्या ज्ञानकोशमंडळांत कामास लागले व त्या कामाकरितांच पुण्यास आले ( १९१९ ). १९२३ सालीं ज्ञानकोशमंडळाच्या विद्यासेवक मासिकाचे संपादक झाले. १९२८ सालीं ज्ञानकोशमंडळाचें काम संपल्यावर यांनीं श्री. चिं. ग. कर्वे, आबा चांदोरकर व चिंतामण-शास्त्री दातार या जुन्या सहकाऱ्यांसह महाराष्ट्रकोश-मंडळ लि. या संस्थेची स्थापना केली व 'महाराष्ट्र-शब्दकोश' हा ग्रंथ पुरा केला. त्यानंतर महाराष्ट्र वाक्संप्रदायकोश व शास्त्रीयपरिभाषाकोश यांचीं कामें यांनीं चिं. ग. कर्वे यांच्या सहकार्यानें केलीं.

याशिवाय ज्ञानकोशांतील सहकाऱ्यांच्यासह सरस्वती-मंदिर संस्थेची स्थापना करून पूना नाइट हायस्कूल वगैरे संस्था चालविल्या. वैदिकसंशोधन मंडळ, मॉडेल व हरिजन हाउसिंग सोसायटीची स्थापना करून अनेक साहित्य व सहकारी सोसायट्यांत अधिकाराचीं कामें केलीं. सामाजिक सुधारणांचा पुरस्कार करून अनेक विवाहांत पौरोहित्य केलें. हे सोलापूरच्या मुद्रकसंमेलनाचे अध्यक्ष ( १९४१ ) होते. वरील ग्रंथांशिवाय पितापुत्रसंबंध वगैरे पुस्तकें यांनीं लिहिलीं आहेत.

**दाते, शंकर गणेश**—( जन्म स. १९०५ ) मराठींतील लोककथासंग्राहक, मराठी-ग्रंथ-सूचिकार व संशोधक.

यांचें जन्मस्थान रत्नागिरी. शिक्षण मुंबई येथें बी. ए. पर्यंत. मराठींत लोककथा, लोकगीतें, लोकभ्रम, म्हणी, बाळखेळ इत्यादि लोकवाङ्मय शास्त्रीय पद्धतीनें संपादून पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्यास यांनींच प्रथम सुरुवात केली व त्याचे दोन स्वतंत्र भाग प्रसिद्ध केले ( १९२९-३० ).

यानंतर यांनीं मराठी ग्रंथ-सूचि तयार करण्यास सुरुवात केली. यांच्यापूर्वी 'महाराष्ट्रीय वाङ्मयसूचि' य. रा. दाते व रा. त्र्यं. देशमुख यांच्याकडून करवून डॉ. श्री. व्यं. केतकर यांनीं महाराष्ट्रीय ज्ञानकोशमंडळ लि. तर्फे प्रसिद्ध केली होती ( १९१९ ). त्यानंतर १९४४ सालीं यांचा ग्रंथ प्रसिद्ध झाला. यांच्या ग्रंथांत स. १८००-१९३७ मध्यें प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांचा समावेश आहे. या सूचीच्या प्रथम खंडांत दशांश वर्गी-करण पद्धतीनें ग्रंथ विषयवार लावून प्रत्येक पुस्तकाची माहिती, ग्रंथकार, ग्रंथनाम, आवृत्ति, प्रकाशनस्थल, प्रकाशक, मुद्रणालय, मुद्रणस्थळ, प्रकाशनकाल, पृष्ठें, आकार, चित्रें, मालाक्रमाङ्क, मूल्य व टिप्पणी या क्रमानें दिली आहे. द्वितीय खंडांत ग्रंथकार, ग्रंथनामें, विषय, अप्रत्यक्ष संदर्भ हे सर्व वर्णानुक्रमानें दिले असून ग्रंथ-कारांच्या नांवापुढें जन्म-मृत्यूचें सालहि नोंदण्याचा प्रयत्न केला असून त्यांच्यासंबंधीचें एकंदर मुद्रित वाङ्मय एकत्र दिसेल असें दर्शित केलें आहे.

यांच्या या ग्रंथानें मराठी वाङ्मयाचा अभ्यास कर-णाऱ्यांची उत्कृष्ट सोय झाली आहे. १९३७ सालापर्यंत मराठींत कोणत्याहि विषयावर काय वाङ्मय प्रसिद्ध झालें आहे याची यांच्या ग्रंथावरून तपशीलवार माहिती मिळते. आणि अभ्यासकाला झालेलें कार्य लक्षांत घेऊन त्यापुढें कार्य करण्याची सूचना मिळते. यांच्यांत संशो-धनाची दृष्टि उपजत असून रेखीव काम करण्याकडे यांचा कल आहे.

**दाते, शंकर रामचंद्र**—( जन्म स. १८९८ ) मोनोटाइप यंत्रापर देवनागरी लिपि बसविणारे, मराठी टाइपांत सुधारणा करणारे, सार्वजनिक कार्यकर्ते व दैनिक काळचे संपादक.

जन्मस्थान अश्वी ( जि. अहमदनगर ). बी.ए. झाल्या-वर लोकसंग्रह छापखाना चालविला. तो अनाथ विद्यार्थि-गृह पुणें या संस्थेस विकून हे त्या संस्थेचे आजीव सभासद झाले. हे मोनोटाइप यंत्रावर देवनागरी लिपी बसविण्या-करितां इंग्लंडला गेले आणि ती गोष्ट यांनीं सिद्ध केली. त्या यंत्राचें पेटन्ट मोनोटाइप कॉर्पोरेशन, लंडन या कंपनी-

कडे असून तीं यंत्रें मुंबई, कलकत्ता, दिल्ली, अलाहाबाद, बनारस, पुणें वगैरे ठिकाणीं चालू आहेत.

मराठी टाइप सुधारण्याच्या बाबतीत राणू रावजी आरू, लो. टिळक, कृ. के. गोखले, श्री. विजापुरे व हे यांचे आजपर्यंत विशेष प्रयत्न झाले आहेत.

याशिवाय पुणें, महाराष्ट्र हिंदुसभेंत यांनीं अधिकाराच्या जागेवर अनेक वर्षे कामें केलीं.

**दादाभाई नवरोजी**—(जन्म स. १८२५–मृत्यु स. १९१७ जून ३०) राष्ट्रसभेच्या आद्य संस्थापकांपैकीं प्रमुख, तिचे तीन वेळचे अध्यक्ष, स्वराज्य या राजकीय ध्येयाचे जनक आणि अर्थशास्त्राच्या साहाय्यानें सरकारविरुद्ध लढणारे पहिले जहाल टीकाकार.

यांच्या वडिलांचें समग्र नांव नवरोजी पालनजी दोर्दी. जन्मस्थान मुंबई. शिक्षण एल्फिन्स्टन इन्स्टिटयूशन मध्यें होऊन तेथें शिक्षक व प्राध्यापक म्हणून यांनीं काम केलें. यांनीं मुंबईत स्टूडन्टस् लिटररी ॲन्ड सायन्टिफिक सोसायटी स्थापून तिच्या गुजराथी व मराठी शाखा काढल्या. मराठी व पारशी मुलींच्या शाळा मुंबईत प्रथम यांनींच काढल्या. १८५१ मध्यें यांनीं 'रास्त गोफ्तार' (खरें सांगणारा) हें गुजराथी साप्ताहिक काढलें.

१८५५ सालीं यांनीं लंडनच्या कामा ॲन्ड कंपनींत मॅनेजरची नोकरी पत्करिली आणि तेथें जाऊन यांनीं कंपनीच्या कामाबरोबर आपल्या राजकीय कार्यासहि सुरुवात केली. यांनीं ईस्ट इंडियन असोसिएशन स्थापन करून (१८६७) तिच्यातर्फे हिंदुस्थानविषयक निबंध वाचणें व व्याख्यानें देणें वगैरे कामें सुरू केलीं. याबरोबरच लंडनच्या युनिव्हर्सिटी कॉलेजमध्यें हे गुजराथीचें प्राध्यापन करीत. स. १८६९ सालीं हे हिंदुस्थानांत आले असतां यांच्या इंग्लंडमधील कार्याबद्दल मानपत्र व तीस हजार रुपयांची थैली देऊन यांचा गौरव करण्यांत आला. यांनीं इंग्लंडमध्यें असतां फॉसेट कमेटीपुढें साक्ष देऊन हिंदुस्थानांत माणशीं वार्षिक उत्पन्न वीस रुपये पडतें असें सिद्ध करून दाखविलें होतें. तीच साक्ष यांनीं 'पॉव्हर्टी इन इंडिया' या नांवानें पुस्तकरूपानें प्रसिद्ध केली (१८७३). नंतर सात वर्षांनीं यांनीं त्याच पुस्तकाची 'कन्डिशन ऑफ इंडिया' या नांवानें सुधारलेली आवृत्ति काढली.

बडोद्याचे महाराज मल्हारराव यांच्या कारभारांत गोंधळ असल्यानें यांची तेथें दिवाण म्हणून नेमणूक झाली (१८७४). यांनीं तेथील कारभाराची व्यवस्था लावून दिवाणपदाचा राजीनामा दिला. नंतर मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड रे यांच्या कायदेकौन्सिलांत सभासद म्हणून काम करून हे इंग्लंडला गेले. तेथें पार्लमेन्टच्या निवडणुकीस हे चार वेळ उभे राहिले, पण यांना एकदां यश आलें (१८९२). आय्. सी. एस्. ची परीक्षा दोन्ही देशांत एकच वेळीं घेण्यांत यावी हा ठराव यांच्या प्रयत्नानें तेथें मान्य झाला. पुढें हे रॉयल कमिशनचे सभासद होते (१८९६). हिंदुस्थानांतून प्रतिवर्षी ३ कोट पौंड इंग्लंडला जात असल्यानें हिंदुस्थान दिवसेंदिवस दरिद्री होत आहे हें दाखविण्यासाठीं यांनीं 'पॉव्हर्टी ॲन्ड अन्–ब्रिटिश रूल इन इंडिया' (१९०२) हें पुस्तक प्रसिद्ध केलें. ॲमस्टरडॅम येथील सोशल डेमोक्रॅटांच्या इंटरनॅशनल कॉंग्रेसमध्येंहि यांनीं येथील ब्रिटिश राज्यपद्धतीचा निषेध केला.

राज्यकारभारांतील दोष मांडण्यापासून तें स्वराज्य हें ध्येय जाहीर करून त्याकरितां प्रयत्न करणारी प्रमुख संस्था असें स्वरूप देण्यापर्यंतच्या कॉंग्रेसमधील प्रत्येक स्थित्यन्तरांत यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला. १८८६ कलकत्ता, १८९३ लाहोर व १९०६ कलकत्ता या तीन अधिवेशनांचे यांना अध्यक्ष निवडण्यांत आलें. १८८५ पासून लोकसंख्या फक्त शें. १८ नीं वाढली असतां राज्यकारभाराचा खर्च मात्र शें. ७० नीं वाढला; केवळ लष्करी खर्चांतच १७ कोटींपासून ३९ कोटींपर्यंत वाढ झाली; यांपैकीं ७ कोटी तर केवळ इंग्लंडमध्येंच खर्च होतात; हें यांनीं आपल्या तिसऱ्या अध्यक्षीय भाषणांत दाखविलें. राष्ट्राच्या जीवनांत इतर कोणत्याहि गोष्टीपेक्षां आर्थिक व शैक्षणिक बाबींना अत्यंत महत्त्व असतें, ही गोष्ट यांनीं लोकांपुढें प्रथम स्पष्टपणें मांडली. १९०५ सालीं ना. गोखले यांनीं स्वदेशी, बहिष्कार, राष्ट्रीय शिक्षण व स्वराज्य या चतुःसूत्रीचा आपल्या भाषणांत प्रथम निर्देश केला. स्वदेशी वगैरेंचा पुरस्कार करण्यांतील मुख्य हेतु आर्थिक शोषण थांबवून शिक्षणानें राष्ट्र समर्थ बनवावयाचें आहे आणि त्याकरितां आम्हांला स्वराज्य पाहिजे आहे, ही यांनीं तिच्या अर्थाची मूलगामी पद्धतीनें केलेली स्पष्टता सर्वांना अगदीं नवीन वाटली.

'पॉव्हर्टी ॲन्ड अन-ब्रिटिश रूल् इन इंडिया' हा यांचा सर्वांत महत्त्वाचा अर्थशास्त्रीय ग्रंथ होय. सध्यांची ब्रिटिश राज्यपद्धति 'जेवढें उकळतां येईल तेवढें उकळून

ध्या ' अशा लुटारू स्वरूपाची आहे, हिंदुस्थानाप्रमाणें इंग्लंडलाहि ती घातक आहे, सध्यांच्या हिंदुस्थानच्या विपन्न स्थितींत एक पैचाहि फायदा हिंदुस्थानच्या पदरांत पडूं न देतां लक्षावधि रुपयांचे मालाच्या रूपानें शोषण चाललेलें आहे हें यांनीं आंकड्यांनीं मांडून दाखविलें आणि त्यावर परिणामकारक उपाययोजना सुचवून मालक-गुलाम या नात्यापेक्षां सहकार्याच्या भावनेनें हिंदुस्थानकडे पाहण्याची यांनीं सरकारला विनंति केली आहे.

यांचे ग्रंथ—( 1 ) Poverty and Un-British Rule in India (1901), ( 2 ) England's Duties to India, ( 3 ) Financial Administration of India, इत्यादि.

**दामले, मोरो केशव**—( जन्म स. १८६८–मृत्यु स. १९१३ ) मराठीचे व्याकरणकार.

हे कवि केशवसुतांचे बंधु. स. १८९३ सालीं इतिहास व तत्त्वज्ञान हे विषय घेऊन मुंबई विद्यापीठाचे एम्. ए. झाले. पुढें १८९४ ते १९०७ पर्यंत उज्जैनच्या माधव कॉलेजांत लॉजिक व फिलॉसफी या विषयांचे हे प्राध्यापक होते. पुढें तें कॉलेज बंद पडल्यामुळें नागपूरच्या सरकारी सिटी हायस्कूलवर यांची नेमणूक झाली. परंतु स. १९१३ च्या मे महिन्यांत नागपूरहून पुण्यास येत असतां रेल्वेअपघातानें यांचा अन्त झाला.

यांनीं ' शास्त्रीय मराठी व्याकरण ' हा अत्यंत महत्त्वपूर्ण ग्रंथ स. १९११ त लिहिला. हा ग्रन्थ ९९० पानांचा असून मराठी व्याकरणाची शास्त्रीय पद्धतीनें रचना होण्याच्या उद्देशानें लिहिला आहे. पूर्ववैय्याकरणांच्या कृतींचें यांत परीक्षण केलेलें आहे. इतिहाससंशोधक वि. का. राजवाडे यांनीं या पुस्तकावर परीक्षणात्मक, सूचनात्मक व संशोधनात्मक असा एक निबंध लिहिला आहे.

' बर्ककृत आधुनिक असंतोष ', ' विचारपरिभ्रमण ', ' शुद्धलेखन व सुधारणा ' हे यांचे तीन निबंध ग्रन्थमाला मासिकांतून प्रसिद्ध झाले. न्यायशास्त्रावरहि यांनीं एक पुस्तक लिहिलें असून तें गायकवाड सरकारनें दोन भागांत प्रसिद्ध केलें.

**दामले, सीताराम केशव**—( जन्म स. १८७८–मृत्यु स. १९२७ ) मराठींतील वृत्तपत्रकार व चतुरस्र लेखक.

कवि केशवसुत व मोरो केशव दामले यांचे हे बंधू. जन्मस्थान रत्नागिरी जिल्ह्यांतील खेड हें गांव. मुंबईच्या विल्सन कॉलेजांतून बी. ए. झाल्यावर तेथील फेलोशिप संभाळून हे एलएल्. बी. झाले. कांहीं काळपर्यंत पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजांत प्राध्यापक होते. ज्ञानप्रकाशच्या संपादक वर्गांतहि हे कांहीं दिवस राहिले. परंतु पुढें लवकरच हे राष्ट्रीय पक्षास मिळाले व यांची लिहिण्याची हौस व उत्साह वगैरे गुणांमुळें त्या वेळच्या राष्ट्रीय जागृतीस कायम राखण्यासाठीं लो. टिळकांनीं मुंबईस जें स. १९०८ मध्यें ' राष्ट्रमत ' हें दैनिक सुरू केलें त्याची जबाबदारी यांचेवर सोंपवली. दुर्दैवानें सरकारी दडपशाहीमुळें तें दैनिक दोन वर्षांतच बंद झालें. तरी या अल्पकाळांतहि यांनीं आपली कामगिरी योग्य तऱ्हेनें बजावून आपल्यावर टाकलेल्या राष्ट्रीय पक्षाच्या विश्वासाचें चीज करून दाखविलें. ' राष्ट्रमत ' बंद झाल्यावर हे पुण्यास वकिली करूं लागले. हे कांहीं दिवस ' राष्ट्रोदय ' नांवाचें मासिकहि काढीत असत. यांचें बरेंचसें वाङ्मय ' चित्रमय जगत् ' मासिकमधून प्रसिद्ध होत असे. " महायुद्धाचीं स्थित्यंतरें " ह्या सदरामध्यें चित्रमयजगतमध्यें येणारे यांचे माहितीपूर्ण लेख त्या वेळीं फारच लोकप्रिय झाले होते. ' जग हें त्रिविध आहे ' व ' न्याय कीं अन्याय ' ह्या दोन सामाजिक आणि ' वसईचा रणसंग्राम ' व ' दोनशें वर्षांपूर्वी ' ह्या दोन ऐतिहासिक अशा चार कादंबऱ्या यांनीं लिहिल्या आहेत. राजकारण आणि वाङ्मय हे दोन यांचे आवडते विषय होते. तथापि काव्यदेवीची यांची उपासनाहि कौतुकास्पद आहे. ' वाचाळरावांचे विचित्र अनुभव ' या पुस्तकांत यांची विनोदी वृत्ति दृष्टीस पडते. स. १९१८ त ' राजकारण ' हें साप्ताहिक यांनीं पुण्यास सुरू केलें. ह्या साप्ताहिकानें असहकारितेच्या चळवळींत चांगलीच कामगिरी बजाविली. पुढें मुळशी सत्याग्रहांत यांना तुरुंगवास भोगावा लागून हें साप्ताहिक बंद पडलें. त्यानंतर पंडुरोगानें पुण्यास हे निवर्तले.

**दालमिया, रामकृष्णशेट**–पाहा **रामकृष्णशेट दालमिया**.

**दास गणू**—(जन्म स. १८६३ ?) मराठी भाषेंतील रसाळ संतकवि, ग्रंथकार व निरूपणकर्ते.

यांचें समग्र नांव गणेश दत्तात्रेय सहस्रबुद्धे. हे शांडिल्य-गोत्री चित्पावन ब्राह्मण. पंढरपुरीं विठ्ठलचरणीं देह अर्पण केल्यापासून हे आपणास दास गणू किंवा गणू

असें म्हणवून घेतात. पंढपूरजवळील करकंब हें यांचें मूळ गांव. हे वामनशास्त्री इस्लामपूरकरांना गुरु मानतात. यांचे पारमार्थिक गुरु साईनाथ शिर्डीकर होत. जन्मस्थल–अकोळनेर ( जि. नगर ). यांचे विशेष शिक्षण न झाल्यानें प्रथम हे पोलिसखात्यांत १३ रु. दरमहावर नोकरीस लागले. नानासाहेब चांदोरकर या वरिष्ठ अंमलदाराच्या संगतीनें यांना लावण्या करण्याचा नाद लागला. यांच्या लावण्यांच्या नादानें एका शाळा मास्तरास दंड झाल्याचें ऐकल्यावर यांना उपरति झाली व यांनीं आपलें लावणी-वाङ्मय फाडून टाकलें. पुढें शिर्डीच्या साईनाथांच्यावर यांची श्रद्धा बसली. त्यांच्या आज्ञेनें यांनीं नोकरी सोडली. तसेंच लावण्या, पोवाडे वगैरे तऱ्हेचें कवित्व करण्याचें सोडून यांनीं कीर्तन व भक्तिपर वाङ्मय करण्यास सुरुवात केली. यांच्या अंगीं सरस कवित्वशक्ति असल्यानें यांचीं कीर्तनें प्रेमळ व नावीन्यपूर्ण होतात. खेड्यांतून यांच्या बालबोध विचारसरणीनें व लावणीच्या थाटावर केलेल्या कवनांनीं हे लोकप्रिय होतात, तर शहरांतून यांच्या प्रतिभेवर लोक खूष असतात. कीर्तनाची बिदागी हे कधींहि घेत नाहींत. संतचरित्रें लिहिण्याच्या हौसेमुळें यांना लोक आधुनिक महीपति म्हणतात. महीपतींच्या नंतर झालेल्या संतांचीं चरित्रें यांनीं लिहिलीं आहेत. यांचें वाङ्मय लिहिण्याचें व यांचें कवित्व कीर्तनांत म्हणण्याचें काम दामोदर वामन आठवले हे मोठ्या ठसक्यानें करीत. पण ते शके १८४६ ( स. १९२४ ) त वारल्यानें यांचा उजवा हातच गळून पडला. यांच्या कवितांची संख्या लाखापेक्षां अधिक आहे. अजूनहि ग्रंथरचना चालू आहे. इतकी प्रचंड रचना करणारा कवि अलीकडच्या काळांत क्वचित्‌च असेल. अलीकडच्या काळांतील साधुसंतांचा इतिहास स्वतः मिळवून व ग्रंथ वगैरे वाचून यांनीं संतचरित्रें लिहिलीं असल्यामुळें यांच्या संतचरित्राला ऐतिहासिक महत्त्व आहे. तसेंच यांचें वाङ्मयहि समाजाचें सूक्ष्म अवलोकन करून लिहिलें असल्यानें महत्त्वाचें आहे.

यांचें वाङ्मय—१ भक्तलीलामृत, २ संतकथामृत, ३ भक्तिसारामृत, ४ अमृतानुभव, ५ भावार्थमंजिरी, ६ गोदामाहात्म्य, ७ विष्णुसहस्रनामबोधिनी, ८ पासष्टी-भावार्थदीपिका, ९ मनाचे श्लोक, १० सुभाषितशतक, ११ ईशावास्यभावार्थबोधिनी, १२ शिष्यबोध, १३ स्फुट-पदें, १४ पोवाडे–टिळक ( जप्त ), रंगपंचमी, मीठ, ऊंस वगैरे, १५ स्तोत्रें सात, १६ अष्टकें अठरा, १७ कीर्तनो-पयोगी ४६ आख्यानें, १८ एकनाथचरित्र इत्यादि.

**दास, चित्तरंजन**—( जन्म स. १८७०–मृत्यु स. १९२५ जून ६ ) बंगाल्यांतील सुप्रसिद्ध वकील, कवि, वर्तमानपत्रकार व राजकारणी पुढारी.

यांचा जन्म कलकत्ता येथें वैद्य नांवाच्या ज्ञातींत झाला. यांच्या पित्याचें नांव भुवनमोहन व मातेचें नांव विस्तारिणी. यांचे वडील धंद्यानें सॉलिसिटर होते व त्यांना बंगालींत कविता करण्याचा नाद होता. हें कुटुंब मोठें सुसंस्कृत व ब्राह्मसमाजी होतें.

हे कलकत्ता येथें शिक्षण घेऊन बी. ए. झाले (१८९०). नंतर आय्. सी. एस्. होण्याकरितां इंग्लंडला गेले आणि बॅरिस्टर होऊन परत आले ( १८९२ ). तेथील यांच्या वास्तव्यांत दादाभाई नवरोजी यांच्या हाउस ऑफ कॉमन्समधील उमेदवारीस पाठिंबा देण्याकरितां यांनीं अनेक राजकीय व्याख्यानें दिलीं.

परत आल्यावर यांनीं कलकत्ता हायकोर्टांत बॅरिस्टरी करण्याला आरंभ केला ( १८९३ ), प्रथम यांचा धंदा जमला नाहीं. वडलांची प्रकृतिहि बरी नव्हती. अशा स्थितींत यांना नादार होण्याचा प्रसंग आला. पण पुढें चांगली स्थिति येतांच मुदतीबाहेर गेलेलेंहि सावकाराचें कर्ज यांनीं फेडून टाकलें.

हे राजकारणी म्हणून हिंदुस्थानांत विख्यात असले तरी बंगालमध्यें बंगाली भाषेंतील उत्कृष्ट कवि म्हणूनच लोक यांना विशेष ओळखतात. बंगालमधील वाङ्मयीन चळवळींत यांचा प्रमुख भाग असे. हे विलायतेस निघाले तेव्हां समुद्रावर असतां मनांत आलेले विचार 'सागर संगीत' या नांवानें कविताबद्ध करून यांनीं प्रसिद्ध केले. त्यांचेंच पुढें हे व अरविंद घोष या दोघांनीं इंग्रजी भाषान्तर करून 'सॉंग्ज् ऑफ दि सी' या नांवानें प्रसिद्ध केलें. तेव्हांपासून 'किशोर-किशोरी' 'अन्तर्यामी' हे यांचे कवितासंग्रह प्रसिद्ध झाले. शिवाय 'नारायण' नांवाचें बंगाली मासिक किती तरी वर्षे हे सतत चाल-वीत. त्यांत साहित्य व वैष्णव वाङ्मय यांसंबंधीं विशेष चर्चा असे. अशा विशेष प्रकारच्या कामगिरीमुळें १९१५ च्या बंगाली साहित्यसंमेलनाचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें होतें. त्या वेळीं यांच्या भाषणाचा विषय 'बंगाली गेय काव्य' हा होता. यांची कविताहि बंगाली भाषेंत विशेष प्रकारची समजली जाते.

यांचें वर्तमानपत्रांकडेहि सतत लक्ष असे. १९०६ सालीं सुरू झालेल्या 'वंदे मातरम्' या इंग्रजी पत्राचे

एक संस्थापक व संपादक मंडळांपैकीं हे एक होते. पण ' फॉर्वर्ड '. हें बंगाल स्वराज्यपक्षाचें पत्र तर सर्वस्वीं यांच्याच जबाबदारीवर निघालें व चाललें.

' वंदे मातरम्'चे संपादक बाबू अरविंद घोष यांच्यावरील राजद्रोहाच्या खटल्यांत यांच्या वकिली कौशल्याचा लोकांना प्रथम प्रत्यय आला. माणिकतोळा बाग कटाच्या खटल्यांत तर यांच्या काम करण्याच्या धडाडीच्या पद्धतीनें हे राष्ट्रीय वकील म्हणून हिंदुस्थानभर प्रसिद्ध झाले. अशा खटल्यांत हे अविश्रांत खटपट करीत आणि पैसाहि घेत नसत. पुढें पुढें यांची वकिलीची प्राप्ति वार्षिक साडेसात लाखांपर्यंत चढली होती. यांचें कौशल्य फौजदारी खटल्यांत आणि विशेषतः उलटतपासणींत दिसे. अनेक दिवाणी दावेहि यांनीं कौशल्यानें चालविले.

हे प्रथम राष्ट्रसभेंत १९०६ सालीं आले तरी १९१७ सालीं बंगाल प्रांतिक राजकीय परिषदेचे अध्यक्ष होण्यापूर्वी हे राजकारणांत फारसे पडत नसत. पण हे एकदां राजकारणांत पडल्यावर तेथेंहि यांची धडाडी आणि आवेश व्यक्त होऊं लागला. त्याच सालच्या कलकत्ता काँग्रेसच्या अध्यक्षपदीं ॲनी बेझंट यांना अध्यक्षस्थान देण्यांत यांनीं पुढाकार घेतला. त्या वेळीं यांचें तडफदार धोरण न पेलणारे सुरेन्द्रनाथ बानर्जी प्रभृति लोक राष्ट्रसभेंतून बाहेर पडले आणि त्यांनीं आपली प्रागतिक परिषद स्वतंत्र भरविण्यास सुरुवात केली. १९१८ च्या दिल्ली काँग्रेसमध्यें ॲनी बेझंट यांच्या विरोधास न जुमानतां ताबडतोब प्रान्तिक स्वायत्ततेचा ठराव यांनीं मान्य करून घेतला आणि होणाऱ्या रौलट कायद्याला यांनीं प्रचंड प्रमाणांत विरोध केला. पंजाब प्रकरणाच्या चौकशीकरितां नेमलेल्या कमेटींतहि यांनीं महत्त्वाची कामगिरी केली. म. गांधींच्या सत्याग्रहाला पाठिंबा दिला आणि स्वराज्याकरितां अडवणुकीचा मार्ग सुचविला. कलकत्त्याच्या जादा अधिवेशनांत म. गांधींच्या असहकारितेच्या ठरावास यांनीं मर्यादित विरोध केला पण नागपूरच्या अधिवेशनांत यांनीं ३६००० रु. खर्चून २५० प्रतिनिधींची तुकडी विरोधाकरितां आणली,पण शेवटीं असहकारितेचा ठरावच यांनीं मांडला. असहकारितेच्या जाहीरनाम्याप्रमाणें आपल्या मोठ्या प्राप्तीच्या वकिलीचा त्याग केला आणि आपली सर्व संपत्ति मेडिकल कॉलेज व स्त्रियांचा दवाखाना यांकरितां देऊन टाकिली. याच वेळीं लोक यांना ' देशबंधु ' या गौरवदर्शक नांवानें संबोधूं लागले.

शाळा-कॉलेजें सोडलेल्या विद्यार्थ्यांकरितां यांनीं डाका येथें ' राष्ट्रीय विद्यापीठ ' स्थापन केलें. आसाममधील चहाच्या मळ्यांतील मजुरांच्या तक्रारींनें यांचें लक्ष कांहीं काल वेधून घेतलें होतें. १९२१ सालीं असहकारितेच्या चळवळीकरितां राष्ट्रसभेनें दहा लक्ष व्हालंटियर्स मागितले होते, त्याप्रमाणें यांनीं लोक जमा करून राष्ट्रसभेचा खादीविक्री वगैरे कार्यक्रम पार पाडण्यास सुरुवात केली. पण चळवळीची ही वाढ सरकारनें बेकायदेशीर ठरविली. शेवटीं यांना सहकुटुंब पकडण्यांत येऊन सहा महिन्यांची शिक्षा देण्यांत आली. अहमदाबाद राष्ट्रसभेचें अध्यक्षपद यांना देण्यांत आलें पण हे तुरुंगांत असल्यानें यांच्याकरितां हकीम अजमलखान यांनीं अध्यक्षाचें काम केलें ( १९२१ ). सरोजिनी नायडू यांनीं यांचें अध्यक्षीय भाषण वाचून दाखविलें. हे सुटून आले तेव्हां चळवळ संपुष्टांत आली होती. तेव्हां यांनीं कौन्सिलांत शिरून अडवणूक करण्याची व तेथील काम बंद करण्याची घोषणा केली. गयेच्या राष्ट्रसभेंत हें अध्यक्ष असतांहि यांच्या कौन्सिलप्रवेशास मान्यता मिळेना तेव्हां यांनीं अध्यक्षपदाचा राजीनामा देऊन स्वराज्यपक्षाची स्थापना करून आपलें धोरण राष्ट्रसभेला मान्य करण्यास भाग पाडलें आणि दिल्लीच्या जादा अधिवेशनांत तसा ठराव झाला ( १९२३ सप्टें. ).

यांनीं आपला पक्ष बंगाल कौन्सिलमध्यें बिनविरोध निवडून आणला, मंत्रिमंडळ स्थापण्यास नकार दिला आणि मंत्र्यांच्या पगारांना मान्यता देण्याचें नाकारून मॉंटफर्ड सुधारणांचा बोजवारा उडविला.

याच वेळीं यांनीं कलकत्ता कार्पोरेशनमध्यें आपल्या पक्षाचे बहुसंख्य लोक निवडून आणले. हे स्वतः तेथें मेयर झाले ( १९२४-२५ ), तसेंच तारकेश्वर देवस्थानांतील सदोष कारभार नष्ट करण्याकरितां यांनीं तेथें मोर्चा नेला ( १९२४ ).

या वेळीं यांचा स्वराज्यपक्षच काँग्रेस बनला होता आणि हे त्याचे सर्वाधिकारी होते. पाटणाच्या अधिवेशनांत तर खादीचें महत्त्व कमी करण्यांत आलेंव सूतसभासदत्वाची अटहि वैकल्पिक करण्यांत आली. पण याच सुमारास गोपीनाथ साहू नांवाच्या एका बंगाली माणसानें एका इंग्लिश गृहस्थाचा खून केला आणि सरकार व यांचा पक्ष यांच्यांत झगडा सुरू झाला. सरकारनें एक

जाहीरनामा काढला व ८० लोकांना संशयावरून पकडलें. कलकत्ता कार्पोरेशननेंहि सरकारच्या या धोरणाचा निषेध केला.

१९२४ च्या दिनाजपूरच्या बंगाल प्रान्तिक परिषदेनें गोपीनाथ साहच्या त्यागाबद्दल अभिनंदनाचा ठराव पास केला व यांनीं त्याला मान्यता दिली. मात्र यांच्या या धोरणाचा येथें व इंग्लंडांत विपर्यास करण्यांत आला.

१९२५ मध्यें त्या जाहीरनाम्यांतील प्रमुख कलमें बंगाल क्रिमिनल लॉ अमेन्डमेंट बिलाला जोडण्यांत आलीं. स्वराज्यपक्षानें तें बिल नापास केलें, पण सरकारनें तें खास अधिकारांत पास करून घेतलें.

तेव्हां यांनीं राजकीय शस्त्र या नात्यानें हिंसा करण्यावर कडक टीका करणारीं दोन पत्रकें प्रसिद्ध केलीं. याच वेळीं यांनीं सरकारकडेहि आपलें म्हणणें कळविणारें पत्रक धाडलें. ही सरकारला सहकार्याची पहिलीं पायरी वाटली. १९२५ च्या मे महिन्यांत बंगाल प्रान्तिक परिषदेच्या वेळीं यांनीं योग्य मुद्दयावर सरकारशीं तह करण्याची आपली इच्छा प्रगट केली. पण उभयपक्षांत बोलणीं होण्यापूर्वीच ६ जूनला हे मृत्यु पावले.

राजकीय पुढाऱ्यांत आवश्यक असणारी लढाऊ वृत्ति यांच्यांत भरपूर होती. यांच्याइतका परमावधीचा त्याग आणि असाधारण लोकप्रियता इतरत्र क्वचितच आढळते. कवीचें हृदय आणि सत्पुरुषांची उदारता यांच्यांत एकवटली होती. हे एखाद्या राजासारखा दानधर्म करीत. शत्रुपक्षाचीं मर्मस्थानें शोधून काढण्याची अचूक बुद्धि यांच्यांत होती. एकदां एखादी योजना निश्चित केल्यानंतर तिचा चिकाटीनें पाठपुरावा करण्याचा यांचा स्वभाव होता. यांच्या मृत्यूनें शत्रुपक्षसुद्धां हळहळला. म. गांधींनीं यांच्या स्मारकाकरितां दहा लक्ष रुपये जमविले आणि बेळगांव राष्ट्रसभेचे वेळीं व्यक्त केलेल्या यांच्या इच्छेप्रमाणें कलकत्ता येथील १४८ रूसा रोडवरील यांच्या वाड्याचें स्त्रिया व मुलें यांच्याकरितां हॉस्पिटलमध्यें रूपान्तर केलें. यांच्या पत्नी वासन्तीदेवी व पुत्र चित्तरंजन.

**दास जतींद्रनाथ**—( जन्म स. १९०४–मृत्यु स. १९२९ सप्टेंबर १३ ) सुप्रसिद्ध अन्नसत्याग्रही.

यांच्या वडिलांचें नांव बंकीमबिहारी दास. १९२० मध्यें मॅट्रिकची परीक्षा पास झाल्यानंतर यांनीं देशभक्तीनें प्रेरित होऊन कॉलेज सोडलें. कॉंग्रेसचे सभासद वाढवणें हें यांचें प्राथमिक कार्य होतें. १९२२ मध्यें हे तीन महिन्यांची शिक्षा होऊन तुरुंगांत गेले. तुरुंगांतील अधिकाऱ्यांस त्यानें केलेल्या जाचाबद्दल थप्पड मारून यांनीं त्यास क्षमा मागण्यास भाग पाडलें होतें.

१९२४ सालीं ' साउथ कलकत्ता डिस्ट्रिक्ट कॉंग्रेस कमेटी 'चे हे दुय्यम मंत्री बनले. याच वर्षी यांनीं " साऊथ कलकत्ता तरुण कमेटी "ची स्थापना केली. अनाथ लोकांना, भिक्षा मागून साहाय्य करणें हा या संस्थेचा उद्देश होता.

१९२५ मध्यें बंगाल ऑर्डिनन्सखालीं संशयामुळें यांना अटक झाली. मैमनसिंग येथील तुरुंगांतील कैद्यांस अधिकारी नीट वागवीत नाहींत म्हणून यांनीं २३ दिवस उपास केला होता. पुढें बहिणीच्या आजारीपणाकरितां यांची पंजाबच्या एका दूरच्या तुरुंगांतून मुक्तता करण्यांत आली.

पुढें हे लाहोरच्या तुरुंगांत असतां युरोपीय व हिंदी लोकांना देण्यांत येणाऱ्या भिन्न वागणुकीचा निषेध करण्याकरितां यांनीं अन्न-सत्याग्रह सुरू केला व चौसष्टाव्या दिवशीं लखनौ येथील पंजाब तुरुंगांत यांचा अंत झाला. यांच्या मृत्यूनें स्वदेशांतच काय परंतु परदेशांतहि खळबळ उडाली. अशाच प्रकारानें देह ठेवणाऱ्या आयरिश पुढाऱ्याच्या-टेरेन्स मॅक्स्विनीच्या पत्नीनें यांस संदेश पाठविला होता.

देशाच्या साठीं सतीचें वाण घेऊन प्राणावर पाणी सोडण्यास सज्ज असणाऱ्या राजकीय पुढाऱ्यांना खुनी दरवडेखोरांप्रमाणें न वागवतां सन्मानानें वागविलें पाहिजे, या तत्त्वासाठीं जो आमरण झगडा भगतसिंग व बटुकेश्वर दत्त यांनीं सुरू केला होता त्याची अत्यंत उज्वल परंपरा पुढें चालविण्याचें काम यांनीं केलें.

**दिनकर, गणेश बळवंत**—( जन्म स. १८८३–मृत्यु स. १९४४ ) महाराष्ट्रांतील माध्यंदिन शाखेच्या शुक्लयजुर्वेदी ब्राह्मणांची संघटना करणारे कार्यकर्ते व वकील.

हे बी. ए., एलएल्. बी. होते. पहिलीं सात वर्षें कुरुंदवाड व रामदुर्ग संस्थानांत मामलेदार, न्यायाधीश

व कारभारी अशीं कामें केल्यावर शेवटपर्यंत पुणें येथें हे वकिली करीत. 'श्रीशुक्ल यजुःशाखीय माध्यंदिन महाराष्ट्र ब्राह्मणसभा' इत्यादि संस्था व वरील संस्थेची 'याज्ञवल्क्याश्रम पुणें' ही इमारत उभारून स्वशाखेची यांनीं संघटना केली.

व्यापक स्वरूपाचें समाजकार्य करणारांप्रमाणेंच पोट-जातीला शिक्षण व विचार द्वारा उच्च पातळीवर आणण्याचा प्रयत्न करणारे यांच्या सारख्यांचें विधायक कार्यहि महत्त्वाचें असतें.

**दिवाकर, रंगराव रामराव**—( जन्म स. १८९४ ) कर्नाटकांतील राजकीय, सांस्कृतिक व भाषिक चळवळीचे सूत्रधार नि कानडींतील उत्कृष्ट लेखक.

हे हुबळीचे माध्व वैष्णव ब्राह्मण. बी. ए. झाल्यावर कांहीं दिवस हे हुबळीच्या कर्नाटक एज्युकेशन सोसायटीच्या हायस्कूलमध्यें शिक्षक होते. एम्.ए. झाल्यानंतर हे कोल्हापूरच्या राजराम कॉलेजांत व नंतर क. ए. सो. च्या कॉलेजांत इंग्रजीचे प्राध्यापक झाले. एल्एल्. बी. होते तरी यांनीं वकिली कधींच केली नाहीं. असहकारितेच्या चळवळींत तर हे सुरुवातीपासूनच पुढें असत. यासाठीं १९२१ सालीं यांना पहिली शिक्षा झाली. त्यानंतरहि या कार्यासाठीं अनेक वेळां तुरुंगांत गेले. यांची अत्यंत साधी राहणी, संग्राहक वृत्ति आणि कष्टाळु स्वभाव यांमुळें यांना 'कर्नाटक गांधी' असें लोक म्हणतात.

कानडी, इंग्रजी, हिंदी व मराठी या भाषा यांना चांगल्या येतात. तथापि आपल्या कानडी भाषेचे हे सेवक आहेत. 'संयुक्त कर्नाटक' या दैनिक पत्राच्या संस्थेची संस्थापना करून आतां तिचे हे विश्वस्त झाले आहेत. त्या संस्थेतर्फे 'कर्मवीर' हें कानडी साप्ताहिकहि निघत असतें. यांचें कानडी भाषेंतील लेखन अत्यंत लोकप्रिय आहे. राष्ट्रीय वृत्ति आणि भक्तिमार्गी आध्यात्मिकता या गोष्टींच्या यांच्या ग्रंथांतील सुंदर मिलाफामुळें सर्व समाजाला हे आपलेसे वाटतात. छोटीं वाक्यें आणि ठसठसीत प्रतिपादन हा यांच्या लेखनाचा मुख्य धर्म आहे. कानडी भाषेच्या विशेष सेवेमुळें यांना बल्लारी कर्नाटक साहित्य परिषदेचें अध्यक्षस्थान देण्यांत आलें होतें. हे कर्नाटक-एकीकरण चळवळीचेहि फार मोठे पुरस्कर्ते आहेत.

यांचे कानडी ग्रंथ—१ हरिभक्तिसुधे, २ उपनिषद्रहस्य, ३ कर्मयोग, ४ उपनिषद्कथावली, ५ उपनिषद् प्रकाश, ६ अन्तरात्मनिगे, ७ गीतेय गुट्टु ( गीतेचें मर्म ), ८ भक्तिसूत्रगलु ( नारद व शांडिल्य या सूत्रांवरील टीका ), ९ सत्याग्रह ( इतिहास मत्तु तंत्र ), १० राष्ट्रीय शिक्षण ( वर्धायोजना मत्तु प्रौढर शिक्षण), ११ वचनशास्त्र ( लिंगायत धर्मग्रंथावर ).

**दिवेकरशास्त्री, महादेव वासुदेव**—( जन्म स. १८८८ ) मराठींतील प्रसिद्ध लेखक, प्रवचनकार व सामाजिक कार्यकर्ते.

यांचा जन्म उगारखुर्द येथें झाला. शालेय शिक्षण संपविल्यानंतर विष्णुबुवा जोगांच्याकडे ज्ञानेश्वरीचें व नारायणशास्त्री मराठे यांचेकडे संस्कृतचें शिक्षण यांनीं घेतलें.

सार्वजनिक कामाची आवड असल्यानें प्राज्ञपाठशाळेचा प्रचार करून यांनीं पाऊण लाख रुपये मिळवून दिले. महाराष्ट्र हिंदुधर्म परिषद्, ब्राह्मण्यसंरक्षक परिषद्, हिंदु-सभा वगैरेंत भाग घेऊन सामाजिक प्रश्नांना चालना दिली. धर्मनिर्णयमंडळाचे संस्थापनेंत भाग घेतला. ब्राह्मणांतील पोटजातींच्या एकीकरणाचा प्रयत्न केला व बुवाशाही-विध्वंसक संघ काढला.

यांचें वाङ्मय—१ हिंदुसमाज समर्थ कसा होईल ? २ आर्यसंस्कृति, ३ ब्राह्मणांतील भिन्नशाखीय विवाह, ४ धर्मशास्त्रमंथन, ५ नवा हिंदुधर्म, ६ विद्यार्थी धर्म, ७ गीताप्रदीप, इत्यादि.

**दीपनारायणसिंग**—( जन्म स. १८७५–मृत्यु स. १९३५ ) बिहारमधील राजकीय कार्यकर्ते व धनिक.

यांचें जन्मस्थान भागलपूर. पिता–तेजनारायणसिंग. हे इंग्लंडला जाऊन बॅरिस्टर होऊन आले पण यांनीं वकिली कधींच केली नाहीं. बंगाल कायदेमंडळांत हे निवडून आले होते ( १९१० ). असहकारितेच्या चळवळींत यांनीं प्रामुख्यानें भाग घेतला. हे नाफेरवादी होते. १९३० च्या बिहारमधील चळवळीचे हे प्रमुख बनले व यांना चार महिन्यांची शिक्षा झाली. यांच्या वडिलांनीं स्थापलेलें भागलपूर कॉलेज यांनीं पुनरुज्जीवित केलें आणि आपली अनेक लक्षांची मिळकत औद्योगिक कार्याकरितां प्रान्ताला देऊन टाकिली. हे त्या वेळच्या उत्तम पोषाख करण्याऱ्या पांच गृहस्थांपैकीं एक होते. असहकारितेपूर्वी यांचे कपडे लंडनमधील पहिल्या दर्जाच्या शिंप्याकडून शिवून येत.

७ **दीक्षित, शंकर बाळकृष्ण**—( जन्म स. १८५३ जुलै २४–मृत्यु स. १८९८ एप्रिल २७ ) पाश्चिमात्य व पौर्वात्य गणितज्योतिषाचे सुप्रसिद्ध अभ्यासक व ग्रंथलेखक.

यांचा जन्म दापोली तालुक्यांतील मुरुड गांवीं झाला व तेथेंच प्राथमिक मराठी शिक्षण झालें. त्या वेळीं संस्कृत व वेद यांचेंहि बेताचें शिक्षण यांनीं घेतलें. पुढें दोन वर्षें दापोली कोर्टांत उमेदवारी करण्यांत व इंग्रजी शिकण्यांत गेलीं. स. १८७० पासून तीन वर्षें हे पुणें ट्रेनिंग कॉलेजांत होते. पुढें हे मॅट्रिक झाले ( १८७४ ). नंतर रेवदंडा, ठाणें, बार्शी, धुळें येथें शाळेंत व ट्रेनिंग कॉलेजमध्यें काम केल्यावर शेवटचीं चार वर्षें यांनीं पुण्याच्या ट्रेनिंग कॉलेजमध्यें काढलीं.

यांना गणित विषयाचा नाद पहिल्यापासून होता. परंतु ज्योतिषाचा नाद लागण्यास वर्तमानपत्रांतील लेखांचें वाचन कारणीभूत झालें. रेवदंड्यास असतां कै. विसाजी कृष्ण लेले यांचे ' स्फुट वक्ता अभियोगी ' या सहीनें सायनवादावर वर्तमानपत्रांत लेख येत असत. ते वाचून यांचें लक्ष ज्योतिषाकडे वेधलें. पुढें ठाण्यास जनार्दन बाळाजी मोडक यांच्याशीं स्नेह झाल्यानें यांचा ज्योतिषाचा अभ्यास वाढला. शेवटीं तर मोडक यांना हे आपले गुरु मानूं लागले. लेल्यांप्रमाणें हे सायनवादी बनून या तिघांनीं सायनपंचांग प्रसिद्ध करण्याचा उपक्रम केला तो यांनीं १०।१२ वर्षे चालविला; पण तो यांच्या मागें बंद पडला.

डॉ. फ्लीट यांनीं आपल्या ' गुप्तइनस्क्रिप्शन्स् ' या ग्रंथांत ' यांची मदत नसती तर मला गुप्तांचा शककाल निश्चित करतां आलाच नसता ' अशी स्पष्ट कबुली दिली आहे. त्याचप्रमाणें ' इंडियन कॅलेंडर ' या ग्रंथाची योजना ठरवून त्याचें गणित देखील पुरें करण्यापर्यंत सुएलनें मजल गाठली असतां त्यांची व यांची भेट झाली. त्याबरोबर मेष संक्रांतीचे व इतर कांहीं आंकडे देऊन सदर ग्रंथाची उपयुक्तता पुष्कळच वाढविण्याची युक्ति यांनीं दाखविली व ती सुएललाहि इतकी महत्त्वाची वाटली कीं ' तो भाग दीक्षितांनीं तयार करावा व ग्रंथ दोघांच्याहि नांवानें प्रकाशित व्हावा ' असें ठरलें. तथापि या ग्रंथाच्या प्रास्ताविक भागांत बहुतेक टीपा S. B. D. या यांच्या सहीच्या आहेत. त्यांतील कांहीं माहिती अगदीं नवी व प्रचलित विचारांना धक्का देणारी होती. तशी ती माहिती यांनीं निर्भयपणें नमूद केली आहे.

' भारतीय ज्योतिषशास्त्र ' या ग्रंथाच्या प्रस्तावनेंत हे लिहितात— ' आमच्यांतील कांहीं कांहीं विद्वानांस देखील युरोपियनांचें वाक्य म्हटलें कीं, तें कसेंहि असलें तरी वेदवाक्य वाटतें. ही गोष्ट स्वतःचे योग्यतेचा भरंवसा व विद्वत्तेची खात्री नाहीं, असें दाखविणारी आहे. '

' भारतीय ज्योतिषशास्त्र ' हा यांचा ग्रंथ मराठी भाषेंत अत्यंत उच्च दर्जाचा ग्रंथ आहे वैदिक कालापासून यांच्या वेळेपर्यंतच्या अनेक भारतीय ग्रंथांतून आढळणारी ज्योतिषविषयक माहिती एकत्र करून तिच्यावरून निघणारीं अनुमानें ऐतिहासिक पद्धतीनें अत्यंत थोडक्यांत या ग्रंथांत मांडलेलीं आढळतात. याकरितां यांनीं पांचशेंपेक्षां अधिक संस्कृत ग्रंथांचें बारकाईनें वाचन केलें. शेकडों दुर्बोध स्थळें सुबोध केलीं. आर्यभट्ट, वराहमिहिर, ब्रह्मगुप्त, भास्कराचार्य वगैरे ग्रंथकारांचा परिचय करून घेण्याचें सुलभ साधन मराठींत निर्माण केलें. पंचांगशोधनविषयक माहिती व पक्षोपपक्षांचे मुद्दे या ग्रंथांत संग्रहित केले. तसें करतांना १ सायन पंचांगाची ग्राह्यता, २ वेदांचें प्राचीनत्व, ३ ज्योतिषशास्त्रांतील गणित भागाचें भारतीयत्व इत्यादि आपलीं मतेंहि नमूद केलीं. यांपैकीं दुसऱ्या व तिसऱ्या विषयांचें प्रतिपादन करतांना याना युरोपियनांचे सिद्धान्तवत् मानलेले अभिप्राय कसे चुकीचे आहेत हें दाखवावें लागलें आणि ' कृत्तिका पूर्व दिशेस उगवतात, तेथून त्या चळत नाहींत' या अर्थाच्या शतपथ ब्राह्मणांतील उताऱ्यावरून इ. स. पूर्वी दोन हजार वर्षें हा जो त्या ग्रंथाचा काल यांनीं ठरविला तो कसा खोडावा हें युरोपियनांना कोडें पडलें. तसेंच ' ग्रीक ज्योतिषांचीं मूळतत्त्वें हिंदुस्थानांत आलीं ' या थिबोच्या मताचें, त्यांत कोठेंहि साम्य नसल्याचें दाखवून यांनीं खंडन केलें ( भा. ज्यो. पा. ५१३ ). ' टॉलेमीपासून हिंदूंस ज्योतिषाचें सर्वस्व मिळालें ' या बर्जेसच्या प्रतिपादनाचें ' टॉलेमीपूर्वीच्या वासिष्ठ सिद्धान्तांत अंशांचे साठ भाग ' सांपडतात हें दाखवून दिवसाचे ६० विभाग ही कल्पना टॉलेमीनें आमच्यापासून घेतल्याचें यांनीं दाखवून दिलें.

ज्योतिषविषयक प्रश्नांच्या वादांत हे अधिकारयुक्त वाणीनें बोलूं शकत. कारण यांनीं पाश्चात्य व पौर्वात्य दोन्ही ग्रंथांचें परिशीलन व मनन करून तो अधिकार

संपादन केला होता. हें सव्यसाचित्व यांच्या विद्वत्तेचें विशेष अंग होतें.

सायन–निरयन वादावरून यांचें लक्ष ज्योतिषाकडे गेल्यावर ज्योतिषाचा प्राचीन काळापासून शोध करण्यास यांनीं आरंभ केला. इतक्यांत ज्योतिषाच्या इतिहासावर ग्रंथ लिहिण्यास बक्षिस ठेवून 'दक्षिणा प्राइज कमेटी'नें जाहिरात दिली. त्यामुळें यांनीं ग्रंथ लिहिण्यास सुरवात केली. याच सुमारास अशाच प्रकारच्या ग्रंथास गायकवाड सरकारनें बक्षिस लावलें. गायकवाड सरकारास हिंदु पंचांगवर्णनाचें पुस्तक पाहिजे होतें. यासंबंधींची माहितीहि या पुस्तकांत समाविष्ट केली असल्यामुळें यांना हीं दोन्ही बक्षिसें मिळालीं.

यांच्या या ग्रंथाची योग्यता फार मोठी आहे. ज्याच्या वाचनाकरितां अन्य देशांतील लोकांस देखील मराठी भाषेचें ज्ञान मिळविण्याची स्फूर्ति उत्पन्न व्हावी अशा योग्यतेचा यांचा हा ग्रंथ आहे. वैदिक वाङ्मयाच्या समालोचनाची परिपूर्णता, वेदाङ्गकालीन ज्योतिषाचें विवेचन व अर्थनिष्कासन व इतर विद्वानांना कुंठित करणाऱ्या अनेक गोष्टींचा उलगडा, यांमुळें यांच्या या ग्रंथास कायमची मान्यता मिळाली आहे. परिपूर्णता आणि निश्चितता हा यांच्या ग्रंथांचा विशेष आहे.

पाश्चात्य व पौर्वात्य या ज्ञानाचे दोन्ही शाखांत यांनीं मिळवलेल्या प्रावीण्यामुळें यांच्या बारीकसारीक मतालाहि एक प्रकारचें वजन प्राप्त होई.

यांचे ग्रंथ—ज्योतिषशास्त्र–१ ज्योतिर्विलास अथवा रात्रीच्या दोन घटका मौज; २ हिंदुपंचांग ( रॉबर्टसुएल व दीक्षित ), ३ भारतीय ज्योतिःशास्त्र अथवा भारतीय ज्योतिषाचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास (पहिली आवृत्ति स. १८९६, दुसरी आवृत्ति स.१९३१). धर्म–४ धर्ममीमांसा (१–२ भाग, १८९५ मॅक्स मूलरच्या पुस्तकाचें भाषान्तर ). भूगोल–५ भारतभूवर्णन ( भाषान्तर १८९९ ), ६ विद्यार्थिबुद्धिवर्धिनी (शालेय), ७ सृष्टचमत्कार ( शालेय ), ८ सोपपत्तिक अंकगणित ( शालेय ).

**देव, बाळकृष्ण नारायण**—( जन्म स. १८५८–मृत्यु स. १९३० ) मराठींती सुप्रसिद्ध टीकाकार, निबंधलेखक व चरित्रकार.

यांचा जन्म धुळें येथें व शिक्षण इन्दुरास झालें. विनायकराव कीर्तने यांच्या सहवासाचा आणि ग्रंथसंग्रहाचा यांनीं चांगला फायदा घेतला. विद्यार्थिदशेंत असतां यांना लेखनाची स्फूर्ति निबंधमालाकार विष्णुशास्त्री चिपळुणकरांच्या लेखांनीं मिळाली. यांनीं डॉ. जॉन्सनच्या चरित्रासंबंधीं कांहीं विधायक सूचना पाठविल्या, त्या निबंधमालेच्या ७५ व्या अंकांत प्रसिद्ध झाल्या आहेत. यांचे निबंध प्रायः विविधज्ञानविस्तार व ग्रन्थमाला या मासिकांत प्रसिद्ध होत. विष्णुशास्त्री चिपळुणकर यांच्या चरित्रावरील ग्रंथमालेंत आलेला यांचा निबंध बराच गाजला. यांचे सडेतोड विचार न पटल्यानें वासुदेवराव मुंडले यांनीं त्याला उत्तर देण्याचा प्रयत्न केला. त्याप्रमाणें यांच्या नाना फडणिसांवरील निबंधाची स्थिति आहे. नाना फडणिसाचा उत्सव करण्याची प्रथा १९०० सालीं सुरू झाली आणि यांचा निबंध १९०३ सालीं विविधज्ञानविस्तारांत प्रसिद्ध झाला. यांनीं नानांच्या चरित्राची ऐतिहासिक साधनांच्या आधारें चिकित्सा करून नाना हा असामान्य कोटींत बसण्यासारखा नव्हता, हें दाखवून दिलें. त्यामुळें वादाची बरीच रणधुमाळी माजली. यांच्या लेखनांत अभ्यास, चिकित्सक दृष्टि आणि मांडणी यांचा सुंदर संयोग आढळतो.

यांचे ग्रंथ—१ बाळ गंगाधरशास्त्री जांभेकर यांचें चरित्र ( १८९२ ), २ रामशास्त्री प्रभुणे, १८९२, ३ चिपळुणकर यांचे चरित्रावर टीका, १९०१, ४ नाना फडणीस १९०४, ५ रा. ब. वि. ज. कीर्तने यांचें चरित्र १९०९, ७ काव्यकोश, ८ देवांचे स्वभाव व सामर्थ्य. याशिवाय यांनीं अनेक ग्रंथांचीं परीक्षणें व २४ निबंध लिहिले.

**देव, शंकर दत्तात्रेय**—( जन्म १८९४ जाने. ४ ) महात्मा गांधींचे अनुयायी, राष्ट्रसभेचे ध्येयवादी निष्ठावन्त कार्यकर्ते व परिणामकारक वक्ते.

हे बी. ए. झाल्यानंतर यांनीं राष्ट्रीय कार्यांत भाग घेण्यास सुरवात केली. प्रथम बिहारमधील चंपारण्यांत म. गांधींना मदत करण्याकरितां स्वयंसेवक म्हणून हे गेले. तेव्हांपासून म. गांधींच्या प्रतिपादनाचा पुरस्कार करण्याचें काम यांनीं अखंड चालविलें आहे. महाराष्ट्रांत म. गांधींच्या असहकारितेच्या कार्यक्रमाला जुन्या पुढाऱ्यांचा सर्वस्वीं विरोध असतांना आणि नवी पिढी त्या कार्यक्रमाबद्दल साशंक असतांना यांनीं त्याचा मोठ्या तडफदारपणें आणि युक्तिवादपूर्वक पुरस्कार केला.

यांना संघटित आणि समर्थ विरोधांतून मार्ग काढावा लागला. सत्याग्रहाचे १९३० व १९३२ चे लढे झाल्यानंतर १९३४ सालीं महाराष्ट्र प्रांतिक काँग्रेस कमेटीच्या अध्यक्षपदावर यांची निवडणूक झाली. पूर्ण त्याग, कमालीची निष्ठा आणि संघटना-सामर्थ्य यांच्या जोरावर यांनीं पक्षसंघटना करून खानदेशांत फैजपूर येथें राष्ट्रसभेचें पहिलें ग्रामीण अधिवेशन यशस्वीपणें भरविलें. तेथें हे स्वागताध्यक्ष होते ( १९३६ ). हे तेव्हांपासून राष्ट्रसभेच्या कार्यकरिणीच्या पंधरा सभासदांपैकीं एक आहेत. यांनीं अनेक वेळां तुरुंगवास भोगला असून मुळशी सत्याग्रहाचे तुरुंगवासांत फटक्यांची शिक्षाहि भोगिली आहे.

हे देव, वासुदेव विनायक दास्ताने, भुसावळ, देवकीनंदन नारायण, जळगांव, गोपाळ अबाजी ऊर्फ तात्या देशपांडे, पुणें व यांच्यांत मागाहून दाखल झालेले त्र्यंबक रघुनाथ देवगिरीकर, या पंच'द'कारांच्या कार्यात्मक चरित्राचा महत्त्वाचा भाग कु. प्रेमाबाई कंटक यांनीं आपल्या 'सत्याग्रही महाराष्ट्र ' या ग्रंथांत रेखाटला आहे.

यांचीं पुस्तकें:—१ उपनिषदांतील दहा गोष्टी ( तृतीय आवृत्ति १९४४ ). या पुस्तकाचें हिन्दींत भाषान्तर झालें आहे. २ असहकारयोग. स्वराज्य व सत्याग्रही या साप्ताहिकाचे हे संपादक होते.

**देव, शंकर श्रीकृष्ण**— ( जन्म स. १८७१ ) रामदासी वाङ्मयाचे महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध अभ्यासक, संशोधक व संग्राहक वृत्तीनें सतत काम करणारे गृहस्थ.

हे बी. ए., एल्‌एल्. बी. आहेत. परंतु बी. ए. झाल्यानंतर ताबडतोब यांनीं सत्कार्योत्तेजक सभेची स्थापना केली ( १८९३ ). एकवीस हजार पृष्ठांच्या ७५ ग्रंथांचें व ' इतिहास व ऐतिहासिक ' आणि ' रामदास व रामदासी ' या मासिकांचें प्रकाशन, इतकें कार्य करून या संस्थेच्या सुवर्ण–महोत्सवाचे वेळीं यांनीं तिला विश्वस्तांचे ताब्यांत दिली ( १९४३ ).

संशोधन आणि प्रकाशन या कार्यांबरोबरच जांब, चाफळ, सज्जनगड, मसूर, शहापूर, शिवतर इत्यादि ठिकाणीं जीर्णोद्धाराचीं कामें यांनीं केलीं. पण सगळ्यांत महत्त्वाचें जीर्णोद्धाराचें कार्य म्हणजे जांबेचें श्रीसमर्थमंदिर होय. निजाम इलाख्यांत जांब येथें श्रीसमर्थांच्या जन्मस्थानीं स. १९३२ सालीं सभेनें एक टोलेजंग आणि सुंदर श्रीसमर्थमंदिर बांधलें. श्रीसमर्थांच्या नयनमनोहर मूर्तींची प्राणप्रतिष्ठा या मंदिरांत शके १८५४ चैत्र शु. ९ स करण्यांत आली. या मंदिराच्या बांधकामाकरितां ४०।५० हजार रुपये लागले. हा सारा पैसा रामेश्वर ते क्वेटा व कलकत्ता ते अहमदाबाद असे दौरे काढून व स्वयंसेवकांमार्फत यांनीं जमा केला. आतांपर्यंत मंदिराच्या योगक्षेमासाठीं १५।२० हजार रुपये खर्च झाले आहेत. या ६०-७० हजारांशिवाय १००।२०० बिघे शेतीहि मंदिरास इनाम मिळाली आहे. ५०००० रु. चा कायम निधि जमा होत आहे. आतां नोंदलेल्या विश्वस्तपत्रानें या मंदिराचा ताबा व सर्व व्यवस्था सभेनें विश्वस्तमंडळाकडे सोंपविली आहे. या विश्वस्तांत निजाम इलाख्यांतील ४० आणि महाराष्ट्रांतील १५ असे ५५ सभासद आहेत. हैद्राबादचे बॅ. श्रीधरपंत नाईक, अध्यक्ष व औरंगाबादचे वकील श्री हनुमंतराव वैष्णव हे विश्वस्तमंडळाचे कार्यवाह आहेत.

सत्कार्योत्तेजक सभेच्या संशोधनाचें फळ म्हणजे यांनीं केलेल्या सुमारें तीन हजार हस्तलिखित बाडांचा आणि तितक्याच ऐतिहासिक कागदपत्रांचा संग्रह होय. अशा या अमोल संग्रहाचें संरक्षण व्हावें आणि तो पूर्णपणें जनतेच्या मालकीचा व्हावा म्हणून स. १९३५ सालीं ' श्रीसमर्थवाग्देवता मंदिर ' म्हणून धुळें येथें जनतेनें दिलेल्या १५ हजारांची एक अदाह्य इमारत बांधून ती इमारत व वरील संग्रह विश्वस्तपत्रानें विश्वस्तांच्या हवालीं करण्यांत आला. जात-धर्म-पंथनिरपेक्ष कोणालाहि या संग्रहाचा उपयोग करितां येतो. मात्र कोणतेंहि हस्तलिखित कोणालाहि मंदिराच्या बाहेर नेतां येत नाहीं. मंदिराचा वार्षिक खर्च देणग्यांनीं व मुंबई सरकारच्या मदतींतून चालतो. मंदिरांतील संग्रहाची वर्णनात्मक यादी देणारे अकराशें पानांचे दोन खंड प्रसिद्ध झाले आहेत.

यांनीं श्रीसमर्थांच्या तत्त्वाचा विचार, आचार आणि प्रचार करण्याच्या उद्देशानें ' श्रीसमर्थसंघ ' नांवाची संस्था काढली ( शक १८६१ ज्येष्ठ शु. १४ ). तिची मुख्य शाखा धुळें येथें असून तंजावरपासून काशीपर्यंत ४८ शाखा आहेत. मुख्य शाखेचे अध्यक्ष अहमदाबादचे नामदार मावळणकर व चिटणीस हे आहेत.

हा सर्व संस्थांचा व्याप संभाळतांना देशांत होणाऱ्या राजकीय चळवळींत भाग घेण्याचें यांचें काम अव्याहत चालू असतें आणि प्रत्येक चळवळींत हे आपल्या वैशिष्ट्यानें चमकल्याशिवाय राहत नाहींत. टिळक व गांधी युगांत यांचें स्थान अग्रभागींच आहे.

आस्थेवाईक व चिरस्थायी वाङ्मयेतिहास-संशोधकांत यांचें नांव कोणालाहि नमूद करावें लागेल. यांची त्यागी वृत्ति आणि जन्मभर एका दिशेनें परिश्रम करून मिळविलेलें साहित्य लोकांपुढें व्यवस्थितपणानें ठेवण्यांतील यांची योजकता ध्यानांत घेण्यासारखी आहे. सार्वजनिक कार्यांतील यांची सचोटी, व्यवस्थितपणा आणि प्राञ्जळपणा यांमुळें यांनीं मागतांच लोकांनीं यांना हजारों रुपये आणि आपल्या संग्रहांतील अमूल्य बाडें व हस्तलिखित ग्रंथ दिले. ती सर्व ठेव समजून यांनीं अधिक व्यवस्थेनें लोकांना पुनः परत दिली आहे. असें करतांना यांना कितीतरी प्रकारची झीज सोसावी लागली. पण कर्तव्यबुद्धीनें हें सर्व केलें असल्यानें त्याचें मूल्य करणें अशक्य आहे. अशा निष्ठा, चिकाटी, परिश्रम, कर्तृत्व, उरक, तडफ व निर्व्यसनीपणा वगैरेंना इतरत्र तोड सांपडणें अशक्य आहे.

रुंद, पसरट चेहरा, गौरवर्ण, मकस व उंच शरीरयष्टि, जुन्या थाटाचा खादीचा अंगरखा, पांढरा लहानसा रुमाल वगैरे यांच्या बाह्य गोष्टींचा अनुकूल परिणाम पाहणारावर होतो आणि यांच्या अकृत्रिम वक्तृत्वानें तर मनुष्य भारला जातो. रामदासी व इतर कार्यासाठीं चाललेल्या तपश्चर्येमुळेंहि कित्येक गुण यांच्यांत उतरले आहेत.

यांचें वाङ्मय—१ रामदास आणि रामदासी मासिक पहिला अंक १८३७ (स. १९१५), २ इतिहास व ऐतिहासिक मासिक, पहिला अंक १८३८ ( १९१० ).

स्वतंत्र ग्रंथ—३ जपानची मर्दुमकी, ४ श्रीसमर्थहृदय ( समर्थ चरित्राचा दुसरा खंड ), ५ श्रीसमर्थ संप्रदाय ( समर्थ चरित्राचा तिसरा खंड ) इत्यादि.

**देवधर, गोपाळ कृष्ण**—( जन्म स. १८४९–मृत्यु स. १९३५ ) पुण्यांतील स्त्रियांची सेवासदन संस्था आणि सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटी या दोन प्रमुख संस्थांचे उत्पादक आणि मिशनरी पद्धतीनें कार्य करणारे समाजसेवक.

यांचा जन्म गरीब घराण्यांत झाला. वडील संन्यास घेऊन काशीस जाऊन राहिले होते. त्यामुळें दुय्यम शिक्षणापासून यांना स्वावलंबी वृत्ति पत्करावी लागली. हे कांहीं दिवस मधुकरीहि मागत.

न्यू इंग्लिश स्कूल पुणें येथें नादारी मिळवून प्रिंसिपल वामन शिवराम आपटे यांच्या देखरेखीखालीं अभ्यास करून संस्कृतची जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्ति मिळविण्याचा यांचा प्रयत्न दीड मार्कानें फसला.

हे स्वावलंबनानें एम्. ए. झाले (१९०४). मुंबई विद्यापीठांत मराठी घेऊन एम्. ए. झालेले हे पहिलेच विद्यार्थी होत. पुढें तर हे एम्. ए.ला मराठीचे परीक्षकहि असत.

बी. ए. झाल्यावर आलेल्या चांगल्या पगाराच्या नोकऱ्या सोडून यांनीं मुंबईच्या आर्यन एज्युकेशन सोसायटींत अध्यापनाचें कार्य पत्करलें, पुढें तेथें हे मुख्याध्यापकहि झाले.

ना. गोखले यांनीं संन्याशी वृत्तीनें काम करणाऱ्या भारतसेवक समाजाची कल्पना यांच्यापुढें मांडतांच हे ताबडतोब आकर्षिले गेले आणि आरंभींच्या सभासदांत दाखल झाले ( १९०५ ). पाश्चात्य मिशनऱ्यांवर दुःखनिवारणार्थ हिंदी जनतेनें अवलंबून राहणें यांना पसंत नसल्यानें यांनीं विशेषतः स्त्रियांच्याकरितां सेवासदन नांवाची संस्था प. वा. रमाबाई रानडे यांच्या नेतृत्वानें सुरू केली. तेथें समाजसेवेच्या अनेक योजना मूर्त स्वरूपांत आणल्या आणि स्त्रीविषय व्यापक कार्याचा नमुना समाजापुढें ठेवला. प्रथम १०-१२ स्त्रियांच्या सहकार्यानें सुरू केलेली ही संस्था आतां हजारों स्त्रियांनीं, विविध शाखांनीं आणि वेगळाल्या कल्पनांनीं कार्य करीत आहे. स्त्रीशिक्षणास विरोध होता अशा वेळीं यांनीं ही कामगिरी केलेली आहे. सामाजिक सुधारणेचें कार्य समाजसेवेची जोड देऊन केलें असतां विरोधक कसे हतप्रभ होतात हे यांच्या कार्यावरून दिसून येतें. उक्तीला कृतीची जोड देण्यावर यांचा कटाक्ष असे.

होलिकासंमेलनें भरवून लोकजागृति करणें वगैरे अनेक कार्ये यांनीं सतत चालू असत. मुंबईच्या समाजसंघाचा जन्म यांच्या या अशा कार्यांतूनच झाला. कार्य करण्याच्या तळमळीबरोबरच सर्वांत मिसळून प्रत्यक्ष काम करण्यावर यांचा कटाक्ष असे. कोठेंहि दुष्काळ, पूर, आग, भूकंप वगैरे आपत्ति आली कीं हे तेथें हजर राहून कामाला लागल्याशिवाय कधींहि राहावयाचे नाहींत. जात, धर्म, किंवा प्रान्त या सर्वांच्या पलीकडे राहून केवळ सेवावृत्तीनें काम करण्याची यांची वृत्ति सर्वत्र आढळून येई.

अशा व्यापक व सतत केलेल्या समाजसेवेमुळें १९२७ च्या जूनमध्यें यांना एकमतानें सर्व्हंट्स ऑफ इंडिया सोसायटीचे अध्यक्ष निवडण्यांत आलें. यांच्यापूर्वी ना. श्रीनिवासशास्त्री हे अध्यक्ष होते. यांच्यानंतर पं. हृदयनाथ कुंझरू हे अध्यक्ष झाले.

**देवधर, प्रो. दिनकर बळवंत**—( जन्म स. १८९१ ) सुप्रसिद्ध क्रिकेटपटु.

जन्मस्थान पुणें. एम्. ए. झाल्यावर हे पुण्याच्या सर परशुराम भाऊ कॉलेजमध्यें संस्कृतचे प्राध्यापक बनले ( १९१७ ).

क्रिकेटसारख्या लहरी खेळांतहि ज्यांचें बॅटिंग हटकून रंगतें अशा थोड्या हिंदी क्रिकेटपटूंत यांचा समावेश होतो. महाराष्ट्र क्रिकेट असोसिएशनला सर्व हिंदुस्थानांत सतत दोन वर्षे अजिंक्यपद मिळवून देण्यांत यांनीं लावलेल्या हातभारामुळें हे प्रथम लोकांचे डोळ्यांसमोर आले. व एम्. सी. सी. विरुद्ध झालेल्या मॅचमध्यें निसटून चाललेली विजयश्री हिंदी लोकांना मिळवून देऊन हे सर्वत्र परिचित बनले. तेव्हांपासून क्रिकेटमध्यें यांनीं स्वतःचे असे अनेक विक्रम प्रास्थापित केले आहेत.

रणजी ट्रॉफींतील यांचीं प्रसिद्ध शतकें: १५७ ( १९३९-४० ), २४६ ( १९४०-४१ ), १६४ ( १९४०-४१ ), १९६ ( १९४०--४१ ).

पंचरंगी सामन्यांतील यांचा १९४५ पर्यंतचा खेळ: ५१ इनिंग्ज, १५३६ धावा, १३५ जास्तींतजास्त धांवा.

**देवधर, बाळंभटदादा जनार्दनबाबा**—( जन्म १७८० सुमार–मृत्यु स. १८५२ सुमार ) सुप्रसिद्ध मल्लविद्याविशारद, कुस्तीगीर व मल्लखांबाच्या व्यायामाचे उत्पादक.

यांचें घराणें नाशिक जिल्ह्यांतील निफाड तालुक्यांतील कोठुरें गांवीं बरव्यांच्या आश्रयानें असे. बरवे हे पेशव्यांचे आप्त असल्यानें हे पेशवाईच्या अखेरच्या कालांत वडिलांच्या बरोबर पुण्यास आले ( १७९६ सुमार ). त्या वेळीं यांचें वेदाध्ययन झालेलें होतें. पुण्यास हे राघोबा वस्तादाच्या तालमींत जात. पेशव्यांच्या आश्रित बावन पहिलवानांत राघोबा वस्ताद प्रमुख होता. त्याचा चेला सदू तेली यानें दुसऱ्या पक्षास मिळून राघोबासच कुस्तीस आव्हान दिलें. राघोबा थकलेला असल्यानें त्यानें यांना त्याच्याशीं कुस्ती खेळण्यास तयार केलें. आणि यांनीं ती कुस्ती जिंकली. तेव्हां यांचें नांव विख्यात झालें आणि यांना पहिलवान म्हणून राजाश्रय मिळाला.

पुढें अली व गुलाब नांवांचे निजामाचा आश्रय असणारे दोघे पहिलवान अजिंक्यपत्रें घेत पुण्यास आले. त्यांनीं पेशव्यांच्या दरबारांत कुस्ती किंवा अजिंक्यपत्र मागितलें. तेव्हां पेशव्यांनीं यांना सहा महिन्यांची मुदत देऊन कुस्तीकरितां तयार करविलें. यांनाहि सप्तशृंगीचा व मारुतीरायाचा अनुग्रह मिळाला आणि यांनीं कुस्तीच्या वेळीं गळखोड्याचा डाव करून अलीस चीत केलें. अलीची स्थिति पाहून गुलाबनें कुस्ती खेळण्याचेंच नाकारलें. या अजिंक्य ठरलेल्या पहिलवानाशीं झालेल्या यशस्वी कुस्तीनें यांचें नांव सर्वत्र विख्यात झालें.

हिंदु-मुसलमान अशा दोन्ही जातींच्या यांच्या शिष्यशाखा आजहि सर्वत्र वावरत आहेत. त्यांत काशीचे कोंडभट गोडबोले, अच्युतानंद स्वामी व त्यांचे चिरंजीव नारायण गुरु ही व टक्के जमाल व त्यांचे शिष्य जुम्मादादा ही परंपरा प्रमुख आहे.

सुप्रसिद्ध मल्लविद्याविशारद व प्रचारक नारायणगुरु देवधर हे यांचे चिरंजीव होत.

**देवराज लाला**—( जन्म स. १८६० मार्च ३–मृत्यु स. १९३५ एप्रिल १७ ) पंजाबांतील स्त्रीशिक्षणाचे थोर पुरस्कर्ते, सुधारक, समाजसेवक, शिक्षणशास्त्री व देशभक्त.

यांनीं जालंदर येथें आपल्या सहकाऱ्यांच्या मदतीनें कन्या महाविद्यालय स्थापन केलें ( १८८६ ). याकरितां यांनीं आपलें सर्व सामर्थ्य खर्चीं घातलें आणि त्या विद्यालयाचा उत्कर्ष साधला. यांनीं पंचविसांपेक्षा अधिक पाठ्य पुस्तकें हिन्दींत या विद्यालयाकरितां लिहिलीं. हे अत्यंत चारित्र्यशील म्हणून यांची पंजाबमध्यें ख्याति होती.

**देवल, गोविंद बल्लाळ**—( जन्म स. १८५४–मृत्यु स. १९१६ ) मराठींतील सुप्रसिद्ध नाटककार व नाट्यशिक्षक.

यांचा जन्म कोंकणांत, बाळपण सांगलीनजीक हरिपुर येथें आणि दुय्यम शिक्षण बेळगांवच्या सरदार हायस्कूलमध्यें झालें. तेथें कांहीं दिवस नोकरी केल्यावर यांनीं पुण्याच्या शेतकी शाळेंत दाखल होऊन तेथील परीक्षा दिली ( १८८४ ).

शाळेंत असल्यापासून यांना कविता व नाटकें यांचा नाद होता. तेथें अण्णासाहेब किर्लोस्कर यांचे शिक्षक होतें. पुण्यास यांनीं श्री. भि. सरदेसाई यांच्या सहकार्यानें 'कादम्बरीकलाप' नांवाचें मासिक काढलें (१८८५).

यांनीं लिहिलेलीं मराठी नाटकें-संस्कृतवरून-१ मृच्छकटिक, २ विक्रमोर्वशीय, ३ शापसंभ्रम (बाणभट्टाच्या कादम्बरीवरून)· इंग्रजीवरून-४ दुर्गा (१८८०), ५ झुंझारराव (अथेल्लो), ६ गद्य-फाल्गुनराव, पद्य--संशयकल्लोळ, (१९१६) स्वतंत्र-७ शारदा (१८९९).

लोकांना सहज समजेल अशी घरगुती सुंदर भाषा लिहिणारा यांच्यासारखा मराठी नाटककार अद्यापि झाला नाहीं. यांची पद्यरचनासुद्धां गद्याप्रमाणें सुबोध असते. भाषेप्रमाणेंच लोकव्यवहाराचें यथार्थ चित्रण आणि जिवन्त स्वभावरेखन यांमुळें यांची नाटकें सदोदित टवटवीत फुलांसारखीं आकर्षक वाटतात. यांना विनोदाकरितां स्वतंत्र पात्रें निर्माण करावीं लागलीं नाहींत. यांचें संशयकल्लोळ हें नाटक स्वभाविक भाषा व विनोद यांमुळें मराठींतील उत्कृष्ट यशस्वी नाटकांत मोडतें. यांच्या शारदा नाटकानेंहि मराठी रंगभूमि दीर्घकाल गाजविली.

चतुर अभिनयशिक्षक म्हणूनहि यांची विशेष ख्याति होती. रंगभूमीवर करावयाचा अभिनय नटाच्या हाडींमांसीं खिळला पाहिजे यावर यांचा कटाक्ष असे. स्त्रीभूमिका व पुरुष-भूमिका शिकविण्यांत हे सारखेच तरबेज असत. बारीकसारीक गोष्टींतसुद्धां अभिनय कसा करावा इकडे यांचें लक्ष असे. नमस्कार करतांना बायका गुडघ्यांत वांकत नाहींत ही गोष्ट यांनीं आपल्याला शिकविल्याचें बालगंधर्व सांगतात.

**देवल, व्यंकटराव तथा बाबासाहेब**—( मृत्यु स. १९२१ आगस्ट ८ ) ग्रेट इंडियन सर्कसचे सुप्रसिद्ध चालक.

हे मूळ विष्णुपंत छत्रे यांच्या सर्कशींत होते. १८९५ सालीं दसऱ्याच्या मुहूर्तावर यांनीं आपली स्वतंत्र सर्कस काढली व चारहि खंडांत प्रवास करून पैसा व कीर्ति संपादन केली. यांच्या मागें मुलांनीं यांची सर्कस उत्तम प्रकारें चालवून तिला पन्नास वर्षें पूर्ण झाल्याचा समारंभ हुबळी येथें साजरा केला. शारीरिक कामाप्रमाणेंच पशुवशीकरणाबद्दल यांची ख्याति होती.

**देशपांडे, अबाजी श्रीपत**—( जन्म स. १८६४ मार्च २३ ) यशस्वी शिक्षक व संशोधक.

जन्मस्थान-मायणी, ता. खटाव, जि. सातारा. हे अत्यंत गरीबींतून स्वकष्टानें मार्ग काढीत 'थर्ड इयर ट्रेंड' झाले. शिक्षकाच्या व्यवसायांत यांनीं दक्ष, प्रेमळ, अभ्यासी व चारित्र्यसंपन्न म्हणून नांव कमाविलें. नोकरीच्या अखेरीस असिस्टंट डेप्युटी होते. इंग्रजीचा व मोठ्या प्रयोगशाळेचाहि अभाव असतांना यांनीं ग्रहांच्या गति दाखविणाऱ्या व ज्योतिषशास्त्राचे कांहीं सिद्धान्त सुलभतेनें समजावून देणाऱ्या 'ग्रहभ्रमण' यंत्राचा शोध लावला. त्याचबरोबर मुलांना बाराखड्या शिकविण्यासाठीं बाराखड्यापेटी तयार केली. सेवानिवृत्त झाल्यानंतर 'एरंडावरील रेशमाचा' फार मोठा प्रयोग धडाडीनें व चिकटीनें केला. रेशीम कातण्याचें एक यंत्र यांनीं तयार केलें. या रेशमाच्या कार्याला अनेक प्रदर्शनांतून पदकें मिळालीं आहेत. सतत उद्योग, साधी राहणी व उदात्त विचार हा यांचा स्वभावविशेष होय. महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध कॉंग्रेस कार्यकर्ते गो. अ. देशपांडे हे यांचे द्वितीय चिरंजीव होत.

**देशपांडे, आत्माराम रावजी 'अनिल'**—(जन्म स. १९०१) मराठी भाषेंतील सुप्रसिद्ध कवि, मुक्तछंद काव्याचे प्रवर्तक व अभ्यासक.

यांचा जन्म वऱ्हाडांत मूर्तिजापूर येथें झाला. उमरावतीस कांहीं दिवस वकिली केल्यानंतर (१९२५-२९) हे सबजज्ज झाले. हे अनिल नांवानें प्रसिद्ध आहेत.

मुक्तछंद हा शब्द व हा छंदःप्रकार प्रवर्तन करणारा पहिला लेख यांनीं नागपूरच्या वागीश्वरी मासिकांत लिहिला (१९३१). तेव्हांपासून त्यासंबंधीं चर्चा होऊन आतां तो काव्यप्रकार सर्वमान्य झाला आहे. आज प्रचलित असलेला ५ व ६ अक्षरी चरणकांचा मुक्तछंद पहिल्यानें 'प्रेम आणि जीवन' हें १९३५ सालीं प्रसिद्ध झालेलें खंडकाव्य लिहीत असतांना यांना सुचला. हें काव्य 'प्रतिभा' या पाक्षिकांत प्रसिद्ध झालें.

याशिवाय परंपरा व प्रयोग (सहविचार १९३८), काव्य आणि क्रांति (१९४४) इत्यादि यांचे लेख प्रसिद्ध आहेत.

यांचे काव्यग्रंथः—( १ ) फुलवात ( १९३२ ), ( २ ) भग्नमूर्ति ( १९४० ), ( ३ ) निर्वासित चिनी मुलांस ( १९४२ ), ( ४ ) पेर्तेव्हा ( १९४६ ) इत्यादि.

मराठींतील सुप्रसिद्ध कवयित्री प्रा. कुसुमावती देशपांडे या यांच्या पत्नी होत.

**देशपांडे, केशवराव गणेश**—( जन्म स. १८६९ जाने.–मृत्यु स. १९३९ एप्रिल ) बडोदा येथील सुप्रसिद्ध सार्वजनिक कार्यकर्ते व बॅरिस्टर.

कोल्हापूर येथें शिक्षण झाल्यावर मुंबईस बी. ए. परीक्षेंत सरकारी शिष्यवृत्ति मिळवून हे इंग्लंडला गेले आणि तेथें पुनः बी. ए. होऊन बॅरिस्टर झाले. तेथें यांचा बाबू अरविंद घोष यांच्याशीं संबंध आला व तो बडोद्याच्या नोकरींत दृढ झाला. १८९३ सालानंतर कांहीं दिवस हे इंदुप्रकाश दैनिकाच्या इंग्रजी विभागाचे संपादक होते. यांचा जहालपक्षाशीं निकटचा संबंध होता. यांच्या 'काली मठ' वगैरे संस्था प्रत्यक्षांत आल्या नाहींत, तरी यांचें बडोदें येथील 'गंगानाथ' भारतीय विद्यालय लोकांना राष्ट्रीय शिक्षण देऊन स्वावलंबी बनविण्याचा प्रयत्न करत असे. तेथें काका कालेलकर व चिंतामणशास्त्री जोशी वगैरे निःस्वार्थी माणसें होतीं. हे त्या संस्थेचा बराच खर्च स्वतः चालवीत. पण १९१२ सालीं दिल्ली दरबारच्या प्रसंगानंतर महाराज सयाजीराव गायकवाडांवर आलेल्या प्रसंगांत यांना संस्था बंद करून बडोदें सोडावें लागलें. प्रत्यक्ष खेड्यांतील जनतेच्या मनोवृत्तींत आमूलाग्र बदल झाल्याशिवाय राष्ट्रीय चळवळ प्रभावी होणार नाहीं हे ओळखून यांनीं कामास सुरवात केली. अंधेरीचा 'साधकाश्रम' अशा कामाकरितां निर्माण करून त्याचे हे प्रमुख झाले. म. गांधींच्या चळवळींतहि हे मनोभावें भाग घेत.

**देशपांडे, गंगाधरराव बाळकृष्ण**—( जन्म स. १८७० एप्रिल १२ ) बेळगांवचे सुप्रसिद्ध राजकीय कार्यकर्ते आणि वक्ते.

हे बी. ए. एलएल. बी. आहेत. हे लोकमान्य टिळकांच्या बरोबर काम करणाऱ्या सार्वजनिक कार्यकर्त्यांपैकीं एक होत. मुंबईस राष्ट्रमत नांवाचें मराठी दैनिक काढण्यांत आलें ( १९०७ ), त्याच्या संपादक मंडळांत हे होते. हे लिहितात थोडेंच पण तें फार परिणामकारक असतें. वक्तृत्वाबद्दल यांची विशेष प्रसिद्धि आहे. श्रोत्यांना थरारून सोडण्याबरोबरच हे त्यांस विचार करण्यास भाग पाडतात. यांची माहिती व आठवण अचूक असते. भाषा व विचाराची मांडणी सुंदर असते. बेळगांवच्या राष्ट्रसभेचे हे स्वागताध्यक्ष होते ( १९२४ ) व त्या वेळेपासून अनेक वर्षे हे राष्ट्रसभेच्या कार्यकारिणीचे सभासद होते. असहकाराच्या चळवळींत कांहीं काळ काँग्रेसचे हे हंगामी अध्यक्ष होते ( १९३२ मे–ऑगस्ट ). यांनीं अनेक वेळां तुरुंगवास सोसला आहे. राष्ट्राच्या वंगभंग, दहशतवाद, होमरूल लीग व गांधीवाद या प्रत्येक स्थित्यन्तराच्या वेळीं हे आघाडीचे वीर होते.

यांच्या धडाडीच्या कार्यपद्धतीमुळें व तडफदार वक्तृत्वामुळें हे 'कर्नाटकचे सिंह' म्हणून सर्वत्र प्रसिद्ध आहेत.

**देशपांडे, रावसाहेब-गंगाधर केशव उर्फ बाबासाहेब**—( जन्म स. १८६९ जुलै ८ ) कर्डे पोलिस अधिकारी व सार्वजनिक कार्यकर्ते.

हे पुणें, न्यू इंग्लिश स्कूलमधून मॅट्रिक झाले आणि यांनीं मराठा लाइट इन्फन्ट्रीमध्यें नोकरी पत्करिली ( १८८७ ). क्रमानें फौजदार, इन्स्पेक्टर व डेप्युटी सुपरिंटेंडेंट होऊन सेवानिवृत्त झाले ( १९२१ ). नंतर पुण्यांतील विविध संस्थांतून यांनीं सार्वजनिक कार्य केलें. हिंदु संस्कृति व मराठ्यांचा इतिहास यांबद्दल यांना अभिमान असून त्याबद्दलचा यांचा अभ्यास चांगला आहे. शेवटीं यांनीं आपलें आयुष्य समर्थ रामदासांच्या सेवेला अर्पण करण्याचें ठरविलें आहे. कोणतेंहि हातीं घेतलेलें काम मनःपूर्वक करण्याचा यांचा स्वभाव आहे.

यांचे इंग्रजी ग्रंथः—1 The Deliverance or the Escape of Shivaji from Agra. इत्यादि.

**देशपांडे, गुणवन्त हणमन्त**—( जन्म स. १८९७ ) मराठींतील सुप्रसिद्ध कवि.

वाटखेड, जि. यवतमाळ ( वऱ्हाड ) येथील हे वतनदार देशपांडे. व्यवसाय शेतीचा.

गूढगुंजनात्मक लिहिण्याकडे यांची विशेष प्रवृत्ति आहे. 'गोंधळ' आणि 'कोणता मानूं चंद्रमा' या यांच्या कविता रेकार्डस्‌मुळें घरोघर पोंचून अत्यंत लोकप्रिय झाल्या आहेत. यांच्या कवितेला जी माधुरी आणि उदात्तता आली आहे ती तींतील आध्यात्मिक गूढगुंजनामुळेंच मुख्यतः होय. त्याचा उत्कृष्ट नमुना यांच्या 'वाऱ्याचे भारे' या कवितेंत पाहावयास

मिळतो. ' वायूच्या वाड्यामध्यें, लाविल्या लक्ष वाती। विझणाऱ्या उजेडांत, अंधारा आली भरती।।। निर्वात आवारांत, एकला दिवा जळे। नित्याच्या प्रकाशांत, आंधारें केलें काळें।।

यांतील गूढतेपेक्षां नर्मशृंगाराची पार्श्वभूमी असलेले पुढील चरण लोकांस विशेष आवडल्यास आश्चर्य नाहीं.

कोणता मानूं चंद्रमा? —भूवरीचा कीं नभींचा?। एक फुलवितो कमलविशेषा, दुजा फुलवी मम मानस-कोशा। एक करितसे कीं तमनाशा, नाशी दुसरा मम विरहतमा॥

यांचा 'निवेदन' नांवाचा कवितासंग्रह नागपूर व बनारस विश्वविद्यालयानें बी. ए. च्या परीक्षेला नेमला आहे. तसेंच यांना त्याबद्दल अनेक पारितोषिकें मिळालीं आहेत.

यांचे काव्यसंग्रहः—१ निवेदन, २ तिलांजलि, ३ घटप्रभा.

**देशपांडे, पुरुषोत्तम यशवंत**—( जन्म स. १८९९ ) सुप्रसिद्ध पुरोगामी लेखक, साम्यवादी नि गांधीवादी तत्त्वज्ञानाचे पुरस्कर्ते, भाष्यकार व वक्ते.

हे वऱ्हाडांतील अंजनसिंगी येथील वतनदार देशपांडे घराण्यांपैकीं असून एम्. ए., एल्एल्. बी. आहेत. कांहीं दिवस सबजज्ज व नंतर नागपूरच्या लॉ कॉलेजांत प्राध्यापक होते. पुढें १९३२-४४ च्या चळवळींत सामील होऊन यांनीं तुरुंगवास पत्करला व नंतर 'भवितव्य' नांवाचें साप्ताहिक चालू केलें ( १९४१ ). शिवाय नागपूर येथें वकिलीचाहि व्यवसाय हे करतात.

बडोदा, उज्जयिनी, हैदराबाद, मुंबई वगैरे ठिकाणचीं वाङ्मयमंडळें व साहित्यसंमेलनें यांनीं यांना अध्यक्षस्थान देऊन यांच्या लेखन व प्रतिपादनाचा गौरव केला आहे.

यांचें वाङ्मयः—कादंबऱ्या—१ बंधनाच्या पलीकडे, २ सुकलेलें फूल, ३ सदाफुली, ४ विशालजीवन, ५ नवें जग, ६ काळी राणी; कवितासंग्रह—७ निर्माल्यमाला-टीकालेख, ८ नवीं मूल्यें, ९ सोव्हिएट रशिया, १० गांधीजीच कां? इत्यादि.

**देशपांडे, डॉ. यशवंत खुशाल**—( जन्म स. १८८४ जुलै १४ ) वऱ्हाडांतील सुप्रसिद्ध इतिहास-संशोधक, अभ्यासक, लेखक आणि सार्वजनिक कार्यकर्ते.

जन्मस्थान—पापळ, जि. उमरावती, वऱ्हाड. यांचें शिक्षण उमरावती, मुंबई वगैरे ठिकाणीं झालें. हे एम्. ए., एल्एल्. बी., डी. लिट्., एम्. आर. ए. एस्. आहेत. यांनीं १९०८-१९४० पर्यंत यवतमाळ येथें वकिलीचा धंदा केला.

हे कॉलेजमध्यें असतांनाच कै. वि. का. राजवाडे यांचे लेख वाचून यांना इतिहास-संशोधनाची आवड उत्पन्न झाली. १९४३ सालीं विदर्भ साहित्यसंघाची स्थापना झाल्यावर यांचें या कार्याकडे विशेष लक्ष वेधलें. महानुभावपंथाचें वाङ्मय शोधण्याकरितां यांनीं त्यांच्या लिपींचा अभ्यास केला व ग्रंथसंशोधनार्थ पंथाचा प्रचार असलेल्या पंजाबांतील शहरीं प्रवास केला. मिळविलेल्या साधनां-वरून यांनीं तयार केलेले व संशोधिलेले ग्रंथ विश्वविद्यालयांत नेमले गेले. यवतमाळ येथें शारदाश्रम ही संस्था काढून संशोधन, संग्रह, अभ्यास व प्रकाशन वगैरेची व्यवस्था यांनीं केली ( १९२५ ). यांच्या वयाला साठ वर्षें झालीं तेव्हां न्या. नियोगी यांच्या अध्यक्षतेखालीं यांचा सत्कार करण्यांत आला व यांना एक ग्रंथ अर्पण करण्यांत आला.

इंडियन हिस्टॉरिकल रेकार्डस् कमिशन, रॉयल एशियाटिक सोसायटी लंडन, जागतिक इतिहास परिषद् झुरिक, प्राच्यविद्या परिषद ब्रुसेल्स ( बेल्जम ) वगैरे ठिकाणीं सभासदत्व, विदर्भ साहित्य संघ, अकोट, महाविदर्भ इतिहास परिषद, दारव्हा वगैरे ठिकाणीं अध्यक्षस्थान वगैरे मान यांना मिळाले आहेत. नागपूर विद्यापीठाशीं यांचा अनेक नात्यांनीं संबंध आहे. तेथें अभ्यासाकरितां हस्तलिखित ग्रंथसंग्रहालय यांच्या प्रयत्नानें निर्माण झालें. यांना त्या विद्यापीठानें डॉक्टर ऑफ लेटर्स ही पदवी दिली असून ऑल इंडिया हिस्टरी कॉंग्रेसनें आपल्या हिंदुस्थानच्या इतिहासांत नागपूरकर भोसल्यांचा इंग्रजांशीं संबंध दाखविणारा भाग लिहि-ण्याचें काम यांच्याकडे सोंपविलें आहे. यांचें मराठी व इंग्रजी लेखन अनेक नियतकालिकांत विखुरलेलें आहे.

यांचे ग्रंथः—१ महानुभावीय मराठी वाङ्मय इ.

**देशपांडे, रघुनाथ श्रीपाद**—( जन्म स. १८८९ फेब्रु. २८ ) सुप्रसिद्ध स्थापत्यविशारद व मराठींतील ग्रंथलेखक.

हे बी. ई. झाल्यानंतर यांनीं आपली नोकरी संभाळून अनेक उपयुक्त पुस्तकें मराठींत लिहिलीं आहेत. त्यामुळें

मराठी भाषेचा तर फायदा झाला आहेच, शिवाय वास्तुविषयक ज्ञानाबाबत परावलंबीपणा नष्ट होऊन आधुनिक सुधारणांचा प्रत्यक्ष परिचय करून घेण्याची शक्यता उत्पन्न झाली. प्रत्येक शास्त्रांत नव्या शोधानें क्रान्ति होत आहे. तीच स्थिति गृहरचनेच्या बाबतहि आहे. त्यांतील बारीक सारीक गोष्टींची अद्ययावत् माहिती देणारीं यांचीं पुस्तकें मोठीं उपकारक आहेत.

यांचें मराठी वाङ्मय १–कॉंक्रीट–साधें व रिइन्फोर्स्ड, २ मैला व मैलापाणी यांची व्यवस्था, ३ सुलभ वास्तुशास्त्र अर्थात् आधुनिक पद्धतीनें घरें कशीं बांधावीं ? ४ मोटार कशी हांकावी. ६ मोटार कशी चालते.

**देशपांडे, वाग्भट नारायण**—( जन्म स. १८९२ –मृत्यु स. १९३६ ) मराठींतील कथालेखक व कादंबरीसमीक्षक.

हे शिरवळकर देशपांड्यांपैकीं होत. यांचे दत्तक वडील सांगलीस ॲड्मिनिस्ट्रेटर होते. तसेंच जनक वडील कुशाभाऊ सातान्यास डॉक्टर होते. हे बी. ए., एलएल्. बी. होते. सातान्यास हे वकिली करीत. हे प्रागतिक होते, पण असहकारितेच्या चळवळीपासून यांच्या मतांत चलबिचल झाली. सातान्यास 'ऐक्यमंडळ' काढून यांनीं ' ऐक्य ' नियतकालिक सुरू केलें. पुण्याच्या वसंतव्याख्यानमालेंत यांनीं हिन्दी संस्थानांत द्विदल राज्यपद्धति या विषयावर व्याख्यान दिलें व यांची औंध संस्थानच्या दिवाणपदावर नेमणूक झाली. विधिमंडळांतील लोकनियुक्त सभासदाला राखीव खात्याचे दिवाण नेमल्याचें हें पहिलेंच उदाहरण आहे. पण यानंतर सहा महिन्यांतच यांचा मोटारच्या अपघातानें मृत्यु झाला.

यांचें टीकावाङ्मय मान्यता पावलें असून मुंबई विद्यापीठानें उच्च परीक्षांच्या अभ्यासक्रमांत त्यास स्थान दिलें आहे.

यांचें वाङ्मय–कथासंग्रह–१ सुखस्वप्नें, २ दीपावली, टीका–३ हरिभाऊ आपटे यांच्या आठवणी व सामाजिक कादंबऱ्या इत्यादि.

**देशपांडे, वामन नारायण**—( जन्म स. १९०३ जून १७ ) मराठी भाषेंतील कवि, टीकाकार, संशोधक व पत्रपंडित.

यांचा जन्म यवतमाळचा. इंटरपर्यंत शिक्षण झाल्यावर प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें यांना शिक्षण सोडावें लागलें. हे यवतमाळच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्यें मिडलस्कूलचे मुख्य आहेत.

नाट्यकाव्य, संवादकाव्य व मुक्तछंद काव्य हीं यांचीं वैशिष्ट्यें होत. यांपैकीं नाट्यकाव्याची प्रथा तर सर्वस्वीं यांचींच आहे. मराठींत लघुतमकथेचें दिग्दर्शन प्रथम यांनींच केलें. टीकाक्षेत्रांत अतिशय निःस्पृह टीकाकार म्हणून प्रसिद्धी मिळवून ' रामशास्त्री ' हें आपलें टोपण नांव यांनीं सार्थ केलें आहे. नागपूर विद्यापीठानें यांच्या ' आराधना ' काव्यसंग्रहास सुवर्णपदक व १०१ रु.चें कमला नारायण बेहेरे पारितोषिक दिलें. यांचीं बहुतेक पुस्तकें नागपूर, आग्रा व मुंबई विद्यापीठाकडून अभ्यासक्रमांत लाविलीं आहेत.

यांचें वाङ्मय–१ आराधना ( कवितासंग्रह ), २ आद्य मराठी कवयित्री ( संशोधित ), ३ स्मृतिस्थळ ( संशोधित ), ४ विचारसमीक्षा ( टीकालेख ), ५ रामशास्त्री ( टीकालेख ) इत्यादि.

**देशपांडे, सर्वोत्तम वासुदेव**—( मृत्यु स. १९२५ ) महाराष्ट्रीय ज्ञानकोशाचे एक संपादक, अभ्यासी व त्यागी गृहस्थ.

हे बी. ए. होते. ज्ञानकोशांतील हिन्दुइतिहासावरील बरेच लेख, ज्योतिःशास्त्राच्या इतिहासांतील बराच भाग, रसायनशास्त्रांतील पुष्कळशा संज्ञांची मांडणी वगैरे लिखाण यांनीं केलें. हे अत्यंत निष्ठावान् , निरलस आणि कर्तव्य बुद्धीनें काम करणारे गृहस्थ होते. कोणतेंहि काम मन लावून सुबक करण्याबद्दल यांची प्रसिद्धि होती. कोणत्याहि संस्थेंत अशीं कांहीं माणसें असतात कीं, त्यांच्यामुळें कार्यांत विशेष प्रकारचे गुण उत्पन्न होतात, पण त्यांची माहिती मात्र कोणास नसते. अशांपैकीं हे एक होते. हे अकाली क्षयानें वारले. डॉ. केतकरांना यांच्या मृत्यूनें न भरून येणारी हानि झाली असें वाटलें.

**देशपांडे, सूर्याजी आनंदराव**—( जन्म स. १८२८–मृत्यु स. १८८८ ) सुप्रसिद्ध मराठी–पोर्तुगीज कोशकार व व्याकरणकार.

गोमान्तकांत मंगेशक्षेत्रीं यांचे अजोबा राहत. वडील १० व्या वर्षी वारल्यानें सरकारी दुभाषे सखारामपंत वाघ यांचेकडे हे राहिले व त्यांच्यापाशीं यांना अनेक भाषा शिकतां आल्या. यांनीं लिसेवांत मराठी भाषेचे शिक्षक म्हणून काम केलें ( १८४७-१८५४ ). या काळांत यांनीं

मराठी दोन शालोपयोगी क्रमिक पुस्तकें लिहिलीं व तीं गोवासरकारनें प्रसिद्ध केलीं. वाघांच्या मृत्यूनंतर हे मराठीचे मुख्य शिक्षक व सरकारी दुभाषे नेमले गेले. नंतर यांनीं मराठी-पोर्तुगीज भाषा सुलभतेनें यावयात म्हणून एक व्याकरण ग्रंथ व मराठी-पोर्तुगीज कोश तयार केला. त्यामुळें विद्वान् लोकांत व सरकारांत यांची अत्यंत वाहवा झाली आणि यांना लिसेवाचे मुख्याध्यापक नेमण्यांत आलें.

**देशमुख, सरदार-गोपाळ हरि-लोकहितवादी**—( जन्म स. १८२३ फेब्रु. १८–मृत्यु स. १८९२ आक्टो. ) महाराष्ट्रांतील सर्वांगीण सुधारणांचे आद्य प्रवर्तक, नव्या मूलग्राही विचारांचे प्रतिपादक, ज्ञानसंग्राहक, लोकसेवक आणि जबरे लेखक.

यांचे वडील हरिपंत पेशव्यांचे धारतीर्थी देह ठेवणारे सेनापति बापु गोखले यांचे फडणीस होते आणि त्यांना एल्फिन्स्टनसाहेबांनीं बोलावलें असतां भेटीस गेले नाहींत म्हणून त्यांची जहागीर जप्त झाली होती. त्यांच्या मृत्यूनंतर बऱ्याच खटपटीनें यांना नोकरी लागेपर्यंत दोनशें रुपयांची वार्षिक तैनात मिळाली ( १८३६ ). कोर्टांत उमेदवारी करून इंग्रजी शिक्षण घेतल्यावर सरदार एजंट कचेरींत यांना नोकरी मिळाली ( १८४४ ). काम संभाळून यांनीं मुन्सफीची परीक्षा दिली. १८५२ मध्यें मुन्सफ म्हणून वाई येथें प्रथम यांची नेमणूक झाली.

१८५६-६१ पर्यंत हे इनाम कमिशनरांपैकीं दुय्यम कमिशनर म्हणून काम करीत. १८६२ मध्ये असिस्टंट जज्ज म्हणून यांची अहमदाबादला नेमणूक झाली; पण मुंबई सरकारची गुणग्राहकता इतर गोऱ्या अधिकाऱ्यांच्या तक्रारीमुळें स्टेट सेक्रेटरीला मंजूर करितां आली नाहीं. तेव्हां यांची नाशिक व पुढें अहमदाबाद येथें स्मॉल कॉज जज्ज म्हणून नेमणूक झाली. अहमदाबाद येथें यांचा दहा वर्षे मुक्काम होता ( १८६७-७६ ). १८७६ च्या दिल्ली दरबारांत यांना रावबहाद्दूर ही पदवी मिळाली. पुढें नाशिक येथें काम केल्यावर जे. पी. व मुंबई विश्वविद्यालयाचे फेलो झाले आणि हे सेवानिवृत्त झाले ( १८७८ ). १८८० मध्यें यांना गव्हर्नरच्या कौन्सिलचे सभासद निवडण्यांत आलें आणि त्याच्या पुढच्या वर्षी यांना फर्स्ट क्लास सरदार करण्यांत आलें. १८८४ मध्यें हे एक वर्ष रतलाम संस्थानचे दिवाण होते. १८८५ मध्यें यांची पत्नी वारली. वयाच्या सातव्या वर्षी यांचा विवाह झाला होता, तेव्हां यांच्या पत्नीचें वय चार वर्षांचें होतें.

यांना लेखनाचा अत्यंत हव्यास होता. यांच्या लेखनांत ज्ञानसंग्रह आणि लोकांना उपदेश करण्याची तळमळ स्पष्ट दिसते. हे जुन्या ब्राह्मणी परंपरेंत वाढले होते, तरी नवे सहज न पटणारे विचार पुढें मांडण्यांत आणि तत्कालीन ब्राह्मणी संस्कृतीचें सदोष अंतरंग सडेतोडपणें स्पष्ट करण्यांत हे निर्भीडपणें पुढें येत.

सामाजिक सुधारणेसंबंधीं यांनीं अत्यंत तळमळीनें लिहिलें आहे. स्वातंत्र्य, उच्चनीचता, लोकसत्तावाद, दारिद्र्यनाश, गरिबांचा कैवार यांबद्दलचे यांचे विचार आजहि पुरोगामी वाटतात. यांनीं अनेक संस्था सुरू केल्या. दयानंदसरस्वतींनीं आपल्या आर्य समाजाच्या विश्वस्तमंडळांत यांस घेतलें होतें. थिऑसॉफिकल सोसायटीशींहि यांचा संबंध होता. अहमदाबादच्या प्रार्थनासमाजांत यांचीं नेहमीं व्याख्यानें होत. तथापि यांच्या तिखट विचारसरणीस विधायकतेची, सहानुभूतीची व कृतीची जोड नसल्यानें यांची समाजावर छाप पडूं शकली नाहीं. पुनर्विवाहाच्या निमंत्रणपत्रिकेवर सही करून हे प्रत्यक्ष समारंभास हजर राहिले नाहींत. तसेंच विलायतेंत पार्लमेंटरी फायनॅन्स कमेटीपुढें साक्षीस बोलावलें असतां ' धर्माच्या अडचणीमुळें मला विलायतेस जातां येत नाहीं ' असें यांनीं उत्तर दिलें.

यांचें वाङ्मय—राजकारण व अर्थशास्त्र–१ लक्ष्मीज्ञान ( भाषान्तर, १८४९ ), २ हिंदुस्थानास दारिद्र्य येण्याचीं कारणें आणि त्याचा परिहार व व्यापाराविषयीं विचार ( दादाभाई नवरोजी यांच्या ' पॉव्हर्टी इन इंडिया ' या ग्रंथाधारें १८७६ ), ३ स्थानिक स्वराज्य व्यवस्था ( १८८३ ), ४ ग्रामरचना, त्यांतील व्यवस्था व त्यांची हल्लींची स्थिति ( १८८३ ), ५ स्वदेशीय राज्यें व संस्थानें. इतिहास–६ भरतखंडपर्व-हिंदुस्थानचा इतिहास ( १८५१ ), ७ पानिपतची लढाई ( काशीराज पंडिताच्या फारशी ग्रंथाच्या इंग्रजी भाषान्तराचा तर्जुमा, १८७७ ), ८ ऐतिहासिक गोष्टी ( भाग १–३ ), ९ हिंदुस्थानचा इतिहास ( ग्लीगचें भाषान्तर १८७८ ), १० गुजराथ देशाचा इतिहास ( १८८५ ), ११ लंकेचा इतिहास ( १८८८ ), १२ सुराष्ट्र देशाचा ससाक्ष इतिहास ( भाषान्तर १८९१ ), १३ उदेपूरचा इतिहास ( भाषान्तर, १८९२ ), चरित्रें–१४ पृथ्वीराज चौहानाचा इतिहास ( १८८३ ), १५ स्वामी श्रीमदयानन्द, धर्म व

नीति–१६ खोटी साक्ष व खोटी शपथ यांचा निषेध (१८५१), १७ गीतातत्त्व (वामनाच्या समश्लोकींतील सारभूतश्लोक मूळ वचनांसह–१८७८), १८ सुभाषित व सुबोधवचनें (१८७८), १९ स्वाध्याय, २० आश्वलायन गृह्यसूत्र (भाषान्तर), २१ आगम–प्रकाश, (१८८४). समाजकारण–२२ जातिभेद, २३ भिक्षुक (१८७७), २४ प्राचीन आर्यविद्या व रीति (१८७७), २५ महाराष्ट्रांतील कामगारांशीं संभाषण (१८४८), २६ यंत्रज्ञान (१८५०), २७ शतपत्रें (१८६६, १९४०), २८ निबंधसंग्रह, नियतकालिकें–लोकहितवादी (मासिक १८८२ त्रैमासिक १८८३) इत्यादि.

**देशमुख, चिंतामण द्वारकानाथ**—(जन्म स. १८९६) 'रिझर्व बँक ऑफ इंडिया'चे पहिले हिंदी गव्हर्नर व सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ.

यांचा जन्म रायगडाजवळ नातें या गांवीं कायस्थ प्रभु घराण्यांत झाला. मॅट्रिकच्या परीक्षेंत यांचा क्रमांक पहिला येऊन यांना संस्कृतची पहिली जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ति व इतर अनेक शिष्यवृत्त्या मिळाल्या (१९१२). इंटरची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर हे इंग्लंडला गेले. तिकडे गेल्यावर हे प्रथम बी. ए. व नंतर आय्. सी. एस्. च्या परीक्षेंत उत्तीर्ण झाले (१९१८). याच वेळीं मिस् रोझिना सिलकॉक्स या आंग्ल स्त्रीशीं यांचा विवाह झाला. यांना प्रिमरोझ नांवाची एक मुलगी असून ती इंग्लंडमध्यें असते.

प्रथम मध्यप्रान्तांत यांची नेमणूक झाली. नंतर हिंदुस्थान सरकारनें यांना आपणाकडे घेतलें. प्रथम रिझर्व बँकेचे सेक्रेटरी, नंतर डेप्युटी गव्हर्नर व नंतर गव्हर्नर म्हणून यांनीं काम केलें.

नोकरीवर असतांच संस्कृत, मराठी, हिन्दी व बंगाली भाषांचा यांचा व्यासंग सतत चालू असतो; यांनीं मेघदूताचें श्लोकबद्ध मराठी भाषान्तरहि केलेलें आहे.

**देशमुख, बॅ. रामराव माधवराव**—(जन्म स. १८९२) वऱ्हाडांतील सुप्रसिद्ध सार्वजनिक कार्यकर्ते, मध्यप्रान्ताचे माजी दिवाण व आफ्रिकेचे हायकमिशनर.

हे बी. ए., एलएल्. बी., बार–ॲट–लॉ आहेत. यांनीं उमरावती व नागपूर येथें वकिली केली. हे ऑल इंडिया काँग्रेस कमेटीचे सभासद होते. १९२१ मध्यें मध्यप्रान्ताच्या कायदेमंडळाचे सभासद होते. महाराष्ट्र कॉन्फरन्स, सातारा येथें अध्यक्ष व उमरावती जिल्हा कौन्सिलचे कार्याध्यक्ष होते (१९२५). १९२७ पासून मध्यप्रान्त सरकारचे हे मंत्री होते. १९२९ सालीं यांनीं त्या जागेचा राजीनामा दिला तरी यांची पुनः नेमणूक झाली. १९३० सालीं यांनीं त्या जागेचा पुनः राजीनामा दिला. बेळगांव येथें ऑल-इंडिया मराठा कॉन्फरन्सचे हे अध्यक्ष होते.

हे मध्यन्तरीं ग्वाल्हेरदरबारचे आर्थिक सल्लागार होते. त्यानंतर आफ्रिकेचे हायकमिशनर म्हणून यांची नेमणूक झाली.

**देशमुख, व्यंकटराव हनुमन्तराव ऊर्फ बाबासाहेब**—(जन्म. स. १८६९—मृत्यु स. १९३१) वऱ्हाडांतील सुप्रसिद्ध यशस्वी कारखानदार.

यांचा जन्म वऱ्हाडांतील वधोना गांवच्या सुखवस्तु जहागिरदार घराण्यांत झाला. मॅट्रिक होण्यापूर्वींच हे घरचा व्यवहार पाहूं लागले. यांचे आतेबंधु यशवंत गोविंद देशपांडे अंजनसिंगीकर यांच्या राष्ट्रीय शिक्षणाकरितां काढलेल्या दौऱ्यांत यांनीं केलेल्या मदतीचे वेळीं यांच्या घराची एकदां झडती झाली व यांना ऑनररी मॅजिस्ट्रेटचें काम सोडावें लागलें. तेव्हां यांची वृत्ति व्यापाराकडे वळली.

स. १९०० सालीं यांनीं एलिचपूर येथें पहिली जिनिंग व प्रेसिंग फॅक्टरी काढली. वऱ्हाड हा कापूस पिकविणारा प्रान्त, पण तेथें एकहि कापडाची गिरणी नाहीं असें पाहून यांनीं कापडाची गिरणी १९ मार्च १९२३ रोजीं काढली. तिचेंच परिणत स्वरूप 'दि विदर्भ मिल्स, बेरार लि.' या प्रचंड स्वरूपांत आज आपणास दिसत आहे.

एकदीड वर्षांत अठरा लक्षांचे भाग खपून या गिरणीचें काम सुरू झालें. प्रथम सूत व नंतर वीणकाम सुरू करण्यांत आलें. आरंभीं १०६८४ चात्या व २७२ माग होते. त्यांत सारखी वाढ होत आहे. मजूर व कारकून यांच्याकरितां स्वतंत्र चाळी यांनीं बांधल्या आहेत. आतां मॅनेजिंग डायरेक्टर नानासाहेब देशमुख व मॅनेजर रामभाऊ देशमूख या गिरणीची सर्व व्यवस्था पाहतात. मिलमधील ऑफिसच्या समोर यांचा अर्धपुतळा लो. बापूजी अणे यांच्या हस्तें अनावृत करण्यांत आला (२३ एप्रिल १९४४).

**देसाई, कनु हकुमतराय**—( जन्म स. १९०७ मार्च १२ ) गुजराथमधील नामांकित चित्रकार व कलाप्रवीण.

यांचें जन्मस्थान अहमदाबाद. अहमदाबादचे प्रसिद्ध वकील जयंतिलाल नरभेराम ठाकोर हे यांचे मामा. गुजराथ विद्यापीठांत तीन वर्षे व कुमार कार्यालयांत दोन वर्षे चित्रकलेचें शिक्षण घेतल्यानंतर हे गुजराथ विद्यापीठाची शिष्यवृत्ती घेऊन रवींद्रनाथांच्या शांतिनिकेतनांत चित्रकलेचा अधिक अभ्यास करण्यासाठीं गेले. तेथील कलाभवनांत नंदलाल बोस यांच्या हाताखालीं शिक्षण घेतल्यानंतर यांनीं स्वतंत्रपणें चित्रें काढण्यास सुरवात केली नृत्यकलेचाहि यांनीं अभ्यास केला आहे.

हिंदुस्थानांतील प्रमुख चित्रकारांत या तरुण कलावंताची गणना होते. म. गांधींच्या जीवनावरील वॉटरकलरमध्यें किंवा पेन्सिलनें काढलेलीं यांचीं चित्रें उत्कृष्ट समजण्यांत येतात. या संग्रहाची प्रस्तावना फादर एल्विन यांनीं लिहिली असून त्याची परदेशी आवृत्तीहि इंग्लंडमधील एका प्रकाशन संस्थेनें काढली आहे. या चित्रांचें मुद्रण मात्र अहमदाबादच्या कुमार प्रिन्टिंग प्रेसमध्यें झालें आहे. यांच्या बुद्ध का प्रत्यागमनसारख्या चित्रांना अशीच आंतरराष्ट्रीय प्रसिद्धी मिळाली असून त्यांतील भव्यता व कलात्मकतेबद्दल तीं जेथें गेलीं तेथें त्यांची वाहवाच झाली आहे.

मुंबईच्या प्रकाश कंपनीनें तयार केलेल्या भरतभेट, रामराज्य, विक्रमादित्य वगैरे चित्रपटांचें कलादिग्दर्शन यांनीं केलें. रामराज्य चित्रपटांतील यांच्या 'विचारक्रांत राम' या सेटिंगची त्या वेळीं सर्वत्र वाहवा झाली.

यांचे चित्रसंग्रहः—( १ ) सत्तर छायाचित्रें, ( २ ) भारतपुण्य प्रवास, ( ३ ) म. गांधी, ( ४ ) नृत्यलेखा, ( ५ ) मंगलशतक, ( ६ ) लग्नोत्सव, ( ७ ) रूपरेखा, ( ८ ) श्रीरेखा, ( ९ ) मिराबाई, ( १० ) इंडियन लॅन्डस्केप्स, ( ११ ) पेन्टिंग्ज इन वॉटर कलर्स इत्यादि.

**देसाई, भुलाभाई जीवनजी**—( जन्म स. १८७७ ऑक्टो. १३ ) हिंदुस्थानांतील नामांकित कायदेपंडित, वादविवादपटु मुत्सद्दी व राष्ट्रसभा-कार्यकर्ते.

सुरत जिल्ह्यांतील बलसर हें गांव यांचें जन्मस्थान. हे जातीनें अनाविल ब्राह्मण असून यांचे वडील सरकारी वकील होते. मुंबईच्या एल्फिन्स्टन व गव्हर्नमेंट लॉ कॉलेजमध्यें आपलें शिक्षण संपविल्यानंतर मुंबई हायकोर्टाच्या 'ओरिजिनल साइड'ला यांनीं वकील म्हणून नांव दाखल केलें. याचे आधीं कांहीं दिवस अहमदाबादच्या गुजराथ कॉलेजमध्यें इतिहास व अर्थशास्त्र यांचे प्राध्यापक म्हणूनहि यांनीं काम केलें होतें.

अशा तऱ्हेनें वकिलीच्या यशांतील यांचें पाऊल पुढें पडत असतांनाच यांनीं राजकारणांत भाग घेण्यास सुरवात केली. प्रथम प्रागतिक, नंतर होमरूल लीगचे कार्यकर्ते अशीं अनेक स्थित्यंतरें पावत हे अखेर गांधीवादी बनले व त्यांच्याच प्रेरणेनें गुजराथी शेतकऱ्यांच्या प्रश्नांना वकिली साहाय्य देण्यास यांनीं सुरवात केली. बार्डोलीच्या शेतकऱ्यांच्या प्रश्नांना तोंड फोडून त्यांच्या अडचणी मिटवण्यास कारणीभूत झालेला सुप्रसिद्ध ब्रुमफील्ड रिपोर्ट हा यांच्या या कार्याचें दृश्य फळ होय. यासाठीं बार्डोलीच्या शेतकऱ्यांच्या वतीनें यांनीं दोन स्पेशल कमिशनसपुढें साक्षीहि दिल्या होत्या ( १९२८, २९ ).

१९३० सालच्या असत्याचाराच्या चळवळींत यांना एक वर्षाची शिक्षा व १०००० रु. दंड झाला. तेव्हांपासून कॉंग्रेसच्या प्रत्येक चळवळीशीं यांचा कोणत्या ना कोणत्या तरी नात्यानें संबंध आलेला आहे. परंतु यापेक्षांहि मध्यवर्ति असेंब्लींतील कॉंग्रेसपक्षाचे पुढारी या नात्यानें यांनीं बजावलेली कामगिरी अधिक महत्त्वाची आहे. पं. मोतीलाल नेहरू यांच्यानंतर असेंब्लींत यांच्याइतकीं उठावदार व परिणामकारक भाषणें करणें आतांपर्यंत कोणासहि शक्य झालें नाहीं. महत्त्वाच्या बिलांच्या वेळीं प्रसंगीं लीगशींहि सहकार्य करून सरकारचा पराभव करण्यांत यांनीं दाखविलेल्या धोरणीपणाची आजपर्यंत अनेक वेळां तारीफ झालेली आहे. अलंकार व विवाद यांचा अत्यंत संयमानें उपयोग करण्याच्या यांच्या शैलीमुळें हे वादविवादपटु म्हणून यशस्वी होऊं शकले.

असेंब्लींतील यांच्या यशस्वीपणाच्या मुळाशीं यांच्या इतर सर्व गुणांत यांच्या वकिलीकौशल्याला सर्वांत मोठें स्थान आहे. रासबिहारी घोष किंवा सर दिनशा मुल्ला यांच्या तोडीची विद्वत्ता, धडाडी किंवा लढाऊपणा नसूनहि पक्षसमर्थनाच्या आपल्या स्वतंत्र धाटणीमुळें हे यशस्वी झाले. उपलब्ध पुरावा योग्य ठिकाणीं मांडावयाचा, ज्या ठिकाणी जोर देणें आवश्यक असेल तेथेंच

जोर द्यावयाचा आणि त्याला अनुरूप अशा कायदेशीर आधारांत तो झटदिशीं बसवून टाकावयचा, हें यांचें नेहमींचें वकिली तंत्र आहे. आरडाओरडा, पुनरुक्ति या सामान्य वकिलांकडून वापरल्या जाणाऱ्या अस्त्रांचा उपयोग करण्याची जरूरीच त्यामुळें यांना कधीं वाटत नाहीं. सर्व काम करण्याची यांची शैलीच इतकी गंभीर व दबाबदार असते कीं, कांहीं पोरकट प्रश्न उपस्थित करण्याचें धाडस प्रतिपक्षाला करवतच नाहीं. आणि जर तें त्यानें केलें, तर यांच्या वक्तव्यांत कोणत्याहि प्रकारें अडथळा आणणें अशक्य होऊन बसतें.

देसाई-लियाकत कराराला काँग्रेस व मुस्लिम लीग यांमधील एकीचा शेवटचा प्रयत्न या दृष्टीनें विशेष महत्त्व आहे. सरसेनापति, अल्पसंख्याक, काँग्रेस व मुस्लिम लीग यांनीं एक संयुक्त मध्यवर्ति सरकार स्थापावें, त्यांत स्पृश्य हिंदु व मुसलमान यांना समान जागा असाव्यात व यासाठीं व्हाइसरॉयला जिना व हे यांना बोलावणें भाग पाडावें, असा या कराराचा आशय होता. परंतु पुढें जिनांच्या सर्व मुसलमान प्रतिनिधि, आपण म्हणजे लीगनें निवडण्याच्या आग्रहामुळें यांचा हा करार वाऱ्यां गेला.

अझाद हिंद सेनेचे सेनापति शहानवाझ, धीलन व सैगल यांचेवर राजद्रोहाचे आरोपाखालीं हिंदुस्थान सरकारच्या वरिष्ट कोर्टानें खटला भरला असतां यांनीं आरोपींतर्फे 'स्वातंत्र्याकरितां युद्ध करणारे किंवा दुसऱ्या राष्ट्राची मदत मागणारे गुन्हेगार ठरूं लागले तर परतंत्र राष्ट्रांना स्वातंत्र्याची केव्हांच आशा नको' असा बचाव केला. देशप्रेमाचे भावनेनें आरोपींनीं 'गुन्हा' केला असें जरी कोर्टानें ठरविलें तरी सरसेनापति अचिन्लेक यांनीं त्यांना स्वतःचे अधिकारांत सोडून दिलें (१९४६).

ग्रंथः—Speeches (जी. ए. नटेसन अँड कों., १९३८).

**देसाई, महादेव हरिभाई**—(जन्म स. १८९२-मृत्यु स. १९४३) महात्मा गांधींचे सुप्रसिद्ध मदतनीस व गुजराथी लेखक.

हे जातीनें अनाविल ब्राह्मण; गांव दिहण, ता. ओलपाड. यांच्या वडिलांचें पूर्ण नांव हरिभाई सुरभाई देसाई; आईचें नांव जमनाबहेन. वडील महालक्ष्मी येथील स्त्रियांच्या ट्रेनिंग कॉलेजचे हेडमास्तर होते.

माध्यमिक शिक्षण सुरत व कॉलेज-शिक्षण एल्फिन्स्टन कॉलेज, मुंबई, येथें संपवून हे बी. ए. एलएल्. बी. झाले व अहमदाबादेस वकिली करूं लागले. पण पुढें सहकारी खात्यांत नोकरीस असतां यांची वृत्ति साहित्याकडे वळली. यांनीं रवीन्द्रनाथ टागोरांच्या 'चित्रांगदा' या बंगाली नाटकाचें गुजराथी भाषान्तर केलें. यांना बंगाली भाषा सुद्धां गुजराथीप्रमाणें उत्तम येत असे.

यांच्या भाषेंत रस आणि माधुर्य यांचा उत्तम संगम आढळे. अर्थवाहक शब्दयोजना करून हे वाचकांच्या मनावर आपल्या प्रतिपादनाचा ठसा उमटवीत. 'नवजीवन' या गुजराथी पत्रांतील यांचें लिखाण याबाबत प्रमाण म्हणून दाखवितां येईल. यांचें लेखन जीवनांत नवचैतन्य उत्पन्न करणारें असल्यामुळेंच यांचा व म. गांधींचा अत्यंत लोभ जडला. हे त्यांचे अनन्य शिष्य होते. म. गांधींचेंहि यांच्यावर असाधारण प्रेम होतें. हे दोघे परस्परांना पूरक होते. यांनीं देशाकरितां सर्वस्वाचा त्याग केला होता. ८ ऑगस्ट १९४२ च्या चळवळींत हे अटकेंत असतां पुणें येथील आगाखान बंगल्यांत यांचा एकाएकी देहान्त झाला. म. गांधींनीं यांच्याकरितां २५ लाखांचा निधि उभारण्याचा संकल्प केला. आतां तर आगाखान यांनीं दहा हजार रुपये खर्च करून यांच्या व कस्तुरबांच्या समाध्या आपल्या पॅलेसमध्यें बांधल्या आहेत.

यांचें गुजराथी वाङ्मय—१ चित्रांगदा नाटक (नरहरी परीखांच्या सहकार्यानें १९१४, १९२५), २ विदाय अभिशाप (१९१४), ३ प्राचीन साहित्य (१९१४), ४ अर्जुनवाणी (संग्रहकार म. दे.), ५ गोखलेना व्याख्यानों (१९१९), ६ एक धर्मयुद्ध (१९१७), ७ सत्याग्रहनी मर्यादा, लॉर्ड मोर्लेच्या ऑन कांप्रमाइजचें भाषांतर (१९२४) ८ विराजबहु, शरच्चंद्र चतर्जीचें भाषान्तर १९२३, ९ त्रण वार्ताओं (१९१४, १९२३), १० गांधीजीनी आत्म कथानों इंग्रजी अनुवाद (दि स्टोरी ऑफ माय एक्स्पेरिमेंटस् वुइथ ट्रुथ १९२५), ११ वुइथ गांधीजी इन् इंडियन व्हिलेज १९२५, १२ वुइथ गांधीजी इन् सिलोन १९२७, १३ दि स्टोरी ऑफ बारडोली १९२९, १४ बारडोली सत्यग्रहनों इतिहास १९२९, १५ वीर वल्लभभाई १९२९, १६ संत फ्रँसिस १९३३.

**देसाई, रमणलाल वसंतलाल**—(जन्म स. १८९२) गुजराथी भाषेंतील सुप्रसिद्ध ललित-लेखक.

हे एम्. ए. झाल्यानंतर बडोदें संस्थानांत नोकरीस लागले. विद्यार्थिदशेंत लिहिण्यास सुरुवात केली असली तरी नोकरीच्या कालांतच यांचें बहुतेक सर्व लेखन झालेलें आहे.

यांनीं संयुक्ता व शंकितहृदय हीं नाटकें प्रथम लिहिलीं असलीं तरी 'दिव्यचक्षु' या कायदेभंगावरील कादंबरीनें यांचें नांव सर्वश्रुत झालें ( १९३१ ). तिचें मराठी भाषान्तर रत्नप्रभा रणदिवे यांनीं केलें आहे. यांनीं सत्तावन सालच्या बंडावर 'भारेलो अग्नि' ही कादंबरी लिहिली. ही यांची अत्यंत आवडती कादंबरी होय. यांचें लेखन ठराविक ठशाचें नसतें. मध्यमवर्गीय गुजराथी समाजाचें चित्र रेखाटण्यांत हे सिद्धहस्त आहेत. यांच्या लेखनांत विविधता असून प्रगतिशील तरुण पिढीशीं समरस होण्याचा गुण आहे.

यांचें वाङ्मय—कादंबऱ्या–१ जयंत ( १९२५ ), २ शिरीष ( १९२७ ), ३ कोकिला ( १९२८ ), ४ हृदयनाथ ( १९३० ), ५ दिव्यचक्षु ( १९३१ ), ६ स्नेहयज्ञ ( १९३१ ), ७ बंसरी ( १९३२ ), ८ ग्रामलक्ष्मी, ९ पूर्णिमा, १० पत्रलालसा, ११ भारेलो अग्नि.' नाटकें—१ संयुक्त ( १९२० ), २ शंकितहृदय ( १९२५ ), काव्यसंग्रह–निहारिका. लेखसंग्रह–जीवनसाहित्य. चित्रपट–कोकिला; पौर्णिमा.

**देसाई, डॉ. वामन गणेश**—(जन्म स. १८७४–मृत्यु स. १९२७ ) महाराष्ट्रांतील आयुर्वेदीय संशोधक व ग्रंथलेखक.

यांचा जन्म व शिक्षण पुणें येथें झालें. नंतर मुंबई ग्रँट मेडिकल कॉलेजमधून हे एल. एम्. अँड एस्. मध्यें पहिले आले ( १८९९ ). यांच्या या परीक्षेंतील गुणांची बेरीज यांच्या वेळेपर्यंत उत्तीर्ण झालेल्या सर्व विद्यार्थ्यांपेक्षां जास्त होती. तेव्हां यांना तीन शिष्यवृत्त्या व अनेक पारितोषिकें मिळालीं. हे पुढें पहिल्या-प्रतीचे सूतिका व स्त्रीरोग यांत तज्ज्ञ म्हणून विख्यात झाले. कांहीं वर्षे वांद्र्यास धंदा केल्यावर हे इंग्लंडला गेले आणि लंडन विश्वविद्यालयाचे बी. एस्सी. व एम्. बी. बी. एस. होऊन स्वदेशीं परत आले ( १९०९ ).

यानंतर यांनीं केवळ गरिबांकरितां स्वतंत्र शुश्रूषालय काढून गरीब स्त्रियांना विनामूल्य औषध देण्याची व्यवस्था केली. पण १९१५ मध्यें औषधांच्या किंमती वाढून यांना तें बंद करावें लागलें. पण याचा परिणाम असा झाला कीं, यांचें लक्ष आयुर्वेदीय व युनानी औषधांकडे वळलें. त्या दोहोंचा गाढ अभ्यास करून यांनीं वनस्पतिशास्त्र व रसायनशास्त्र हे दोन ग्रंथ तयार केले. वनस्पतिशास्त्राच्या प्रयोगासाठीं यांनीं आपल्या बंगल्याच्या आवारांत वनस्पतींची बाग तयार केली होती.

**देसाई, शान्ताराम अनंत**—(जन्म स. १८६७–मृत्यु स. १९१४ ) मराठी व इंग्रजी भाषेंतील लेखक.

यांचा जन्म कुंभवडें ( रत्नागिरी जिल्हा ) येथें झाला. मुंबई विद्यालयाचे हे एम्. ए. असून कायद्याची परीक्षा उत्तीर्ण झाले होते. युरोपियन व हिन्दी तत्त्वज्ञानाशीं यांचा गाढ परिचय होता. इंदूरच्या 'होळकर कॉलेजांत हे २० वर्षे प्राध्यापक होते.

( १ ) युरोपीय नीतिमीमांसेचा इतिहास, भाग १–यांत ग्रीक नीतिमीमांसा; ( २ ) 'गहन विषयावर अल्प विचार,' भाग १–यांत प्राच्य व पाश्चात्य ज्ञानमार्ग, पदार्थविज्ञान विरुद्ध ख्रिस्तीधर्म हे दोन विषय आहेत; ( ३ ) तुकारामाच्या अभंगरत्नांचे हार–यांत तुकाराम व इंग्रजी तत्त्वज्ञ कवि ब्राउनिंग यांच्या कृतींची तुलना करून त्यांतील विशेष व्यक्त केले आहेत व समर्थनपर उतारे दिले आहेत; ( ४ ) वैदिक तत्त्व-मीमांसा; ( ५ ) सृष्टीची यान्त्रिक उत्पत्ति; ( ६ ) वैदिक धर्माचें परम रहस्य; ( ७ ) उपनिषदांतील वचनांचा संग्रह वगैरे ग्रंथ यांनीं लिहिलेले आहेत. यांशिवाय 'A Study of Indian Philosophy' व 'Vedant of Shankaracharya Expounded and Vindicated' हे दोन इंग्रजी ग्रंथहि यांनीं लिहिले आहेत. स. १९०७ सालीं धर्म व तत्त्वज्ञान या विषयासाठीं यांनीं 'विद्यार्थी' हें त्रैमासिक सुरू करून तें ६-७ वर्षे चालविलें. यांचे बरेच निबंध 'विविध-ज्ञानविस्तारांत' प्रसिद्ध होत असत.

**देहलवी, सर-अलीखान**—( जन्म स. १८७५ ) सिंध प्रांतांतील सुप्रसिद्ध सार्वजनिक कार्यकर्ते व शैक्षणिक सुधारक.

मुंबई व लंडन येथें शिक्षण घेऊन हे बॅरिस्टर होऊन हिंदुस्थानला परत आले. प्रथम गुजराथमध्यें कांहीं दिवस वकिली केल्यानंतर हे सिंधमध्यें स्थिर झाले. सिंध प्रांतांतील जमिनदारांच्या हक्कांचें संरक्षण करणारें

'अल्-हक्' हें पहिलें अँग्लो-सिंधी पत्रहि यांनीं सुरू केलें.

परंतु पुढें हिंदुस्थानांतील मुसलमानांच्या मुख्य अडचणी शैक्षणिक असल्याचें यांचे ध्यानांत आलें. इतर सुधारणा पचविण्याची ताकद येण्यासाठीं प्रथम प्रत्येकानें सुशिक्षित व्हावयास पाहिजे अशा कल्पनेनें यांनीं सिंध हैदराबाद येथें मुस्लिम एज्युकेशनल कॉन्फरन्सचें पहिलें अधिवेशन भरविलें ( १९०२ ) व पुढें कराचीच्या अधिवेशनाचे हे सेक्रेटरी होते. याचेच पुढें पुणें येथें भरलेल्या प्रेसिडेन्सी मुस्लिम एज्युकेशनल कॉन्फरन्सच्या दहाव्या अधिवेशनाचें व रत्नागिरी येथें भरलेल्या पहिल्या मॉहमेडन एज्युकेशनल कॉन्फरन्स ( १९२६ )चें अध्यक्ष-स्थान यांना देण्यांत आलें. त्याचप्रमाणें सिंध प्रांतांतील शिक्षणासंबंधीं पहिला अनधिकृत रिपोर्ट लिहिण्याचा मान यांनीं मिळविला.

मुंबई लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे हे कित्येक दिवस अध्यक्ष व मुंबई प्रांतांतील शेतकी खात्याचे हे प्रधान ( १९२४-२७ ) होते.

यांचे ग्रंथ—History and Origin of Polo (पुस्तिका), (2) Mendicancy in India इत्यादि.

**द्रविड बंधु**—(खून ८ फेब्रु.१८९९) रँड व आयर्स्ट-साहेबांचा खून करणाऱ्या चापेकरबंधूंना पकडून देणारे.

चापेकरबंधूंनीं यांना तुम्हांला ब्रुइनसाहेब बोलावीत आहेत म्हणून घराच्या बाहेर काढलें व पुणें येथें खुन्या मुरलीधराच्या कोंपऱ्यावर ठार केलें. खुनाचा मारेकरी पकडून देणारास वीस हजारांचें बक्षीस सरकारनें ठेविलें होतें, त्यापैकीं दहा हजार यांना देण्यांत आलें.

**द्रविड, रा. ब. भिकाजी व्यंकटेश**—( जन्म स. १८५०–मृत्यु स. १९४० ) सुप्रसिद्ध कॉंट्रॅक्टर व दानशूर गृहस्थ.

यांचें घराणें मद्रासकडून येऊन वाईस स्थायिक झालें. यांचे बंधु गणपतराव रेल्वेंत टाइमकीपरच्या जागेवरून असि. एंजिनियरच्या जागेपर्यंत चढले व हेहि कंत्राटें घेऊन संपन्न बनले. यांच्या देणगीमुळें वाईस द्रविड हायस्कूल व त्याची इमारत झाली व तें डेक्कन एज्युकेशन सोसायटीनें चालविण्यास घेतलें. १८९९ सालीं यांनीं कंत्राटांचा धंदा सोडला व पुण्याहून यवतमाळला जाऊन जिनिंग फॅक्टऱ्या काढल्या. तेथें यांना यांचे जांवई नटेश अप्पाजी द्रविड हे कांहीं काळ व्यवस्थापक लाभले होते. ते पुढें फर्ग्युसन कॉलेजांत व सर्व्हंटस् ऑफ इंडिया सोसायटींत दाखल झाले.

**द्रविड, लक्ष्मणशास्त्री**—( मृत्यु स. १९३१ ) भारतवर्षीय कीर्तीचे काशी येथें राहणारे सुप्रसिद्ध संस्कृत पंडित.

यांनीं कलकत्त्यास विश्वविद्यालयांत नोकरी केल्यावर शेवटीं हे काशीस राहिले. अलीकडच्या काळांत सनातनी विचारसरणीचा पुरस्कार करून धर्मसुधारकांशीं दोन हात करण्याचें काम यांनीं अत्यंत यशस्वीपणें केलें. अखिल भारतीय वर्णाश्रम स्वराज्यसंघाची स्थापना करून यांनीं सनातनी पक्षाला संघटित केलें, आणि अखिल भारतीय ब्राह्मण संमेलन काशीस भरवून सनातनी विचारसरणीवर हल्ला करणारांस आव्हानपूर्वक अंगावर घेऊन सनातनी विचारसरणी कशी कणखर पायावर उभारलेली आहे हें लोकांच्या निदर्शनास आणलें. विवाह-वयोमर्यादनियंत्रण कायद्याच्या निषेधार्थ यांनीं नोकरी व पदवी यांचा त्याग केला होता. यांचे चिरंजीव राजेश्वरशास्त्री.

**द्रविड, राजेश्वरशास्त्री**—( जन्म स. १९०० ) भारतवर्षीय कीर्तीचे सुप्रसिद्ध काशीकर पंडित.

यांनीं आपले वडील लक्ष्मणशास्त्री द्रविड यांचें कार्य पुढें चालविलें आहे. न्यायवेदान्तादि शास्त्रांचें अध्ययन करून यांनीं काशींतील विख्यात पंडित अशी कीर्ति मिळविली आहे. तेथील साङ्गवेद विद्यालयाचे हे प्रमुख आहेत. वादविवादांत हे अत्यंत निष्णात आहेत. सनातनी विचारसरणी कशी खंबीर व तर्कशुद्ध पायावर उभारली आहे हें प्रतिपादण्यांत यांचा हातखंडा आहे. हिंदुस्थानच्या सर्व प्रान्तांत भरलेल्या विद्वत्परिषदांत यांना सखोल ज्ञानानें, तर्कशुद्ध प्रतिपादनानें आणि शुद्ध आचरणानें अग्रमान मिळालेला आहे. सनातनी विचार-सरणी सध्यांच्या लोकशाहीच्या व समतेच्या काळांत टिकत नाहीं असें वाटत असलें तरी ती भरभक्कम पायावर उभारलेली आहे याबद्दल यांच्या सारख्यांच्या प्रतिपादनानें खात्री पटल्याशिवाय राहत नाहीं. कारण कोणतीहि समाजरचना किंवा धर्मशास्त्र विचाराच्या भर-भक्कमपणापेक्षां राजसत्तेच्या पाठिंब्यावर अवलंबून असते. यांनीं त्या दृष्टीनें ग्रंथलेखनहि केलें आहे.

**द्विवेदी, मन्नन मातादीन**—( जन्म स. १८८५–मृत्यु स. १९२१ ) सुप्रसिद्ध हिन्दी कवि.

गजपुर ( जि. गोरखपूर ) येथील प्रसिद्ध कवि मातादीन यांचे हे ज्येष्ठ पुत्र. हे बनारस गव्हर्नमेंट कॉलेजमधून बी. ए. झाले. हे बाल्यावस्थेपासून हिन्दींत गद्य व पद्य लिहीत.

यांचे ग्रंथ—१ बन्धुविनय (पद्य), २ धनुषभंग (पद्य), ३ रणजितसिंहका जीवनचरित, ४ आर्य ललना, ५ गोरखपुर विभागके कवि, ६ भारतवर्षके प्रसिद्ध पुरुष, ७ प्रेम, ८ रामलाल (कादंबरी), ९ मुसलमानी राजका इतिहास ( २ भाग ).

**द्विवेदी, महावीरप्रसाद**—( जन्म स. १८६४–मृत्यु स. १९३८ ) सुप्रसिद्ध हिन्दी संपादक, कवि व हिन्दी भाषेला नवें भारदस्त रूप देणारे लेखक.

यांचा जन्म अवध प्रान्तांत दौलतपूर गांवीं ( जि. रायबरेली ) कान्यकुब्ज ब्राह्मणाच्या कुलांत झाला. घरच्या गरिबीमुळें हायस्कूलमधील शिक्षण पुरें न करितांच यांना रेल्वेंत नोकरी पत्करावी लागली. तारेचें काम हे शिकले व टेलिग्राफ इन्स्पेक्टरहि झाले होते. पण वरच्या अधिकाऱ्याशीं न जमल्यानें यांना ती नोकरी सोडावी लागली.

यांनीं स्वतःच्या परिश्रमानें चांगली विद्वता संपादन केली होती. गद्य व पद्य हे सफाईदार लिहीत. भाषान्तर, रूपान्तर व स्वतंत्र अशीं यांनीं पुस्तकें लिहिलीं. हिंदीच्या खडी बोलींत साफ लिहिण्याकडे लोकांचें लक्ष वेधणें आणि नवशिक्षितांमध्यें हिन्दी भाषेंत लिहिण्याविषयीं आदर उत्पन्न करणें हें यांचें महत्त्वाचें जीवितकार्य होय.

यांनीं २० वर्षेपर्यंत सरस्वती मासिकाचें संपादन करून हिन्दी प्रान्तांत नवें द्विवेदीयुग निर्माण केलें. या यांच्या सेवेचा गौरव करण्याकरितां बनारसच्या नागरी प्रचारिणीसभेनें द्विवेदी गौरव ग्रंथ प्रसिद्ध करून यांना अर्पण केला ( १९३२ ).

यांचे ग्रंथ—गद्य अनुवाद–१ कुमारसंभवसार (पहिले पांच सर्ग), २ रघुवंश, ३ किरातार्जुनीय, ४ मेघदूत, ५ हिन्दीमहाभारत (बंगालीवरून), ६ बेकन विचाररत्नावली, ७ स्पेन्सरची ज्ञेय व अज्ञेयमीमांसा, ८ स्वाधीनता, ९ संपत्तिशास्त्र; काव्य–१० कविताकलाप, काव्यमञ्जूषा, सुमन; समालोचना–११ हिन्दी भाषाकी उत्पत्ति, १२ कालिदासकी निरंकुशता, १३ मिश्रबंधुका हिन्दी नवरत्न, १४ लो. तिलकका गीताभाष्य इत्यादि.

**द्विवेदी, महामहोपाध्याय–सुधाकर कृपालदत्त**—( जन्म स. १८६०–मृत्यु स. १९१० नवं. २८ ) सुप्रसिद्ध गणित-ज्योतिषी व हिन्दी भाषेंतील कवि.

जात–शरयुपारीण ब्राह्मण. यांचे पूर्वज काशीस आले. तेथेंच यांचा जन्म, बाळपण व शिक्षण झालें. बापुदेवशास्त्री सेवानिवृत्त झाल्यावर यांची बनारस संस्कृत कॉलेजांत गणित व ज्योतिष विषयाचे प्राध्यापक म्हणून नेमणूक झाली. पूर्वी हे तेथें पुस्तकालयाचे अध्यक्ष होते.

हे गणितज्योतिषाप्रमाणें हिन्दी भाषेचे व्यासंगी होते. तुलसीदास, सूरदास, कबीर व अन्य हिंदी कवींच्या काव्यांत यांची चांगली प्रगति असे. यामुळें काशी नागरी प्रचारिणी सभेचे हे अनेक वर्षे अध्यक्ष होते. यांनीं हिन्दी भाषेंत सतरा पुस्तकें लिहिलीं आहेत. ‘मैं समझता हूं संस्कृत काव्यसे बढकर हिंदी काव्यमें आनंद मिलता है’ हें यांचें हिन्दी काव्यासंबंधीं मत आहे. भारतेन्दु हरिश्चन्द्रांचे हे मित्र होते.

यांनीं केलेले संस्कृत ग्रंथः—( १ ) दीर्घवृत्तलक्षण, स. १८७८, यांत दीर्घवर्तुलाचे धर्म सविस्तर व सोपपत्तिक सांगितले आहेत. ( २ ) विचित्रप्रश्न, सभंग, स. १८७९, यांत गणिताचे कठीण २० प्रश्न सोत्तर आहेत. ( ३ ) वास्तव चंद्रशृंगोन्नति साधन , स. १८८० यांत लल्ल, भास्कर, ज्ञानराज, गणेश, कमळाकर, बापुदेव यांच्या शृंगोन्नतिसाधनांतले दोष दाखवून युरोपीय ज्योतिःशास्त्रास अनुसरून वास्तव शृंगोन्नति साधन सूक्ष्म सांगितलें आहे. याचीं ९२ पद्यें आहेत. ( ४ ) द्युचरचार, स. १८८२, यांत ग्रहकथामार्गाचें विवेचन युरोपीय आधुनिक ज्योतिःशास्त्रास अनुसरून आहे. ( ५ ) पिंड प्रभाकर, स. १८८५, हा ग्रंथ वास्तुप्रकरणीं आहे. ( ६ ) भाभ्रमरेखानिरूपण, यांत छायेस अनुसरून सूचीछेदविचार आहे. ( ७ ) धराभ्रम, यांत पृथ्वीच्या दैनंदिन भ्रमणाचा विचार आहे. ( ८ ) ग्रहणकरण, यांत ग्रहणाचें गणित करण्याची रीति आहे. ( ९ ) गोलीय रेखागणित. ( १० ) युक्लिडच्या ६, ११, १२ ह्या पुस्तकांचा संस्कृत श्लोकबद्ध अनुवाद. ( ११ ) गणकतरंगिणी स. १८९०, यांत भारतीय गणकांचा इतिहास आहे. प्रथम तो पंडित नामक काशींतील मासिकांत छापला होता, नंतर तो निराळा छापला.

यांचे संस्कृत टीकाग्रंथ–( १२ ) यंत्रराज ग्रंथावर प्रतिमाबोधक, ( १३ ) करणकुतूहलावर वासनाविभूषण.

( १४ ) वराहमिहिराच्या पंचसिद्धान्तिकेवर 'पंचसिद्धान्तिका प्रकाश' नांवाची टीका, इत्यादि.

यांशिवाय यांनीं कृष्णकृत छादकनिर्णय, कमलाकरकृत सिद्धान्ततत्त्वविवेक, लल्लकृत धीवृद्धितंत्र, उत्पलटीकेसह बृहत्संहिता छापविली आहे. यांनीं भाषाबोधक नांवाचा संस्कृत ग्रंथ भाषेविषयीं केला आहे. हिंदी भाषेंत गणिताचीच चलनवलन नांवाचीं दोन पुस्तकें केलीं आहेत आणि हिंदीचें व्याकरण रचलें आहे. यांचा गणकतरंगिणी ग्रंथ एकंदरींत उपयुक्त आहे. त्यावरून यांचें देशीपरदेशी गणितज्योतिषज्ञान उत्कृष्ट दिसून येतें. तरी गणकतरंगिणींत 'आर्यभटानें कोणा परदेशीय यवनपंडितास देवता मानून त्याच्या कृपालवानें संपादलेल्या भगणादिकांच्या संख्या गुप्त ठेवाव्या अशा बुद्धीनें नवीन संकेतानें सांगितल्या' ( गणकतरंगिणी पृ. ३५ ), 'भास्कराचार्यानें ग्रंथसमाप्तीनंतर ज्योत्पत्ति उपपत्तीवांचून वर्णिली. यावरून परदेशांतून आलेल्या कोणा यवनापासून तो त्यासंबंधीं रीति मात्र शिकला, उपपत्ति शिकला नाहीं असें अनुमान होतें' ( गणकतरंग. ३७ ), अशा तऱ्हेचे निराधार कल्पनातरंग कोठें कोठें आढळतात ( भा. ज्यो. इ. पा. ३०७-९ ).

## ध

**धनवटे, दत्ताजी रामजी ऊर्फ दादासाहेब**—( जन्म स. १८८७ ) नागपूरच्या शिवराज फाइन आर्ट लिथो वर्क्स छापखान्याचे मालक व चित्रकार.

यांचा जन्म क्षत्रिय घराण्यांत झाला. जे. जे. स्कूल ऑफ आर्ट्समध्यें चित्रकला व माझगांवच्या रात्रीच्या शाळेंत इंग्रजी असा अभ्यास करीत दोन वर्षे गेलीं. नंतर पुण्याच्या चित्रशाळेंत तेरा रुपयांवर नोकरीस राहून नंतर मुंबईस 'बोल्टन फाइन आर्टस्'मध्यें नऊ वर्षे काम केलें. या अवधींत लिथोग्राफीचीं शेंकडो कामें यांच्या हातांतून गेलीं.

टाटा गिरणीचें 'दरजी छाप' ट्रेडमार्कचें चित्र यांच्या हातचें असून तें चढाओढींत पसंत करण्यांत आलें. १९२० च्या सुमारास यांनीं भागींत लिथोप्रेस काढला. पुढें मतभेद झाल्यावर यांनींच सर्व जबाबदारी घेतली. १९३७ सालीं नवीन भव्य इमारत बांधली. आणि आवश्यक असणारीं अनेक खातीं उघडलीं.

**धर, नीलरतन**—( जन्म स. १८९६ ) सुप्रसिद्ध रसायनशास्त्रज्ञ आणि संशोधक.

यांचा जन्म बंगाल्यांतला. त्याचप्रमाणें यांचें शिक्षणहि प्रफुल्लचंद्र रे व सर जगदीशचंद्र बोस यांच्या देखरेखीखालीं कलकत्याच्या प्रेसिडेन्सी कॉलेजमध्यें झालें. तेथें एम्. एस्सी.ची परीक्षा पहिल्या वर्गांत उत्तीर्ण झाल्यावर प्रफुल्लचंद रे यांच्याबरोबर यांनीं अमोनियम नत्रिताच्या बाष्पघनत्वावर संशोधन केलें ( १९१२ ). पुढें सरकारी शिष्यवृत्ति मिळाल्यामुळें हे विलायतेस गेले. स. १९१६ सालीं पॅरिस येथील सारबोन विश्वविद्यालयांतून व लंडन येथील विश्वविद्यालयांतून आचार्याची पदवी मिळाल्यावर यांची अलाहाबाद येथील मूर सेंट्रल कॉलेजांत प्रोफेसराच्या जागीं नेमणूक झाली. तेव्हांपासून हे तेथेंच असून यांनीं आजपर्यंत तीनशेंच्यावर संशोधनलेख लिहिले आहेत. स. १९३३-३४ सालीं हे 'इंडियन केमिकल सोसायटी'चे अध्यक्ष होते.

'प्रकाशाचा रासायनिक परिणाम' हा यांच्या आवडीचा विषय होय. प्रकाश-रासायनिक क्रियांचा तापगुणक कमी असतो हें यांनींच प्रथम दाखविलें. प्रकाशाची तीव्रता व रासायनिक क्रियेची गति यांचा परस्परसंबंध स्थिर नाहीं, हें यांनीं सिद्ध केलें. हें संशोधन यांनीं डॉ. बी. के. मुकर्जी, डॉ. ए. के. भट्टाचार्य, वा. वि. भागवत इत्यादिकांबरोबर केलें. प्रकाश-संश्लेषण कार्यांत आत्माराम हे यांचे सहकारी होते. यांनीं सूर्यप्रकाशामुळें क्लोरोफिलच्या अस्तित्वांत व त्याशिवाय पाणी व अर्वद्विउर्वपासून फार्मलडिहाइड बनतें असें दाखविलें. तसेंच प्रकाशाची तीव्रता वाढल्यास फार्मलडिहाइडचें विघटन होतें असें यांस आढळलें. जमिनींत तयार होणाऱ्या नत्रितांचा बराच अंश सूक्ष्म जंतूंशिवाय सूर्यप्रकाशानें तयार होतो असा अनुभव यांस आला.

सूर्यप्रकाशामुळें शेतकऱ्यास किती फायदा होतो याची जाणीव या शोधामुळें होते. सूर्यप्रकाश व ओजोद्रव्य यासंबंधींचे प्रयोगहि यांनीं कबूतरावर केले. व सूर्यप्रकाशामुळें खाद्य पदार्थांचें उर्वीकरण सुलभतेनें होतें हें यांनीं पालितबरोबर कार्य करून दाखविलें.

कलिलरसायनांतील यांचें संशोधनहि महत्त्वाचें आहे. कलिलांच्या गुणधर्मांचा अभ्यास यांनीं डॉ. के. सी. सेन, डॉ. एस्. घोष व चक्रवर्ती यांजबरोबर केला. 'जेली'वरील कार्यांत यांस डॉ. सत्यप्रकाशांनीं मदत केली. लिसिगँग चक्रावरील यांचें संशोधन, विशेषतः या चक्राच्या अस्तित्वाचें स्पष्टीकरण एक वेळ सर्वमान्य होतें; पण आतां ह्यासंबंधींचें संपूर्ण स्पष्टीकरण कोणत्याहि एका सिद्धान्तानें करितां येणें शक्य नाहीं असें सिद्ध झालें आहे. या शास्त्रज्ञांच्या गेल्या तेवीस वर्षांच्या सतत कार्यामुळें वास्तव रसायनांत बरीच भर पडली असून हिंदुस्थानाचा शास्त्रीय दर्जा जगांत बराच वाढला आहे.

हिंदुस्थानांतील वास्तव रसायनाच्या व प्रकाशरसायनाच्या जनकत्वाचा मान यांचा आहे. प्रफुल्लचंद्र रे यांच्याप्रमाणें यांनींसुद्धां आपली शिष्यपरंपरा निर्माण केली असून केवळ यांच्यामुळेंच आज अलाहाबाद हें वास्तवरसायनाचें प्रमुख केंद्र मानलें जातें.

**धर्मपाल, देवमित्र**—( जन्म स. १८६४-मृत्यु स. १९३३ ) बिहार प्रान्तांतील सिलोनी बुद्धधर्मप्रचारक.

यांचें मूळ नांव डॉन डेव्हीड. हे ज्या वेळीं सिलोनमध्यें कोलंबो येथें जन्मले, त्या वेळीं ख्रिस्ती धर्माचा पगडा तेथें किती होता हें यांच्या नांवावरून दिसून येतें. हे धर्मानें सिंहली बौद्ध असतांनासुद्धां यांचें नांव डॉन डेव्हिड असें ठेवलें. यांच्या वडिलांचें फर्निचरचें दुकान होतें व ते चांगले श्रीमंत होते. तरी अगदीं तरुण वयांतच बौद्ध भिक्षु होण्याकरितां यांनीं घर सोडलें व सुमारें ५० वर्षे हिंदुस्थान, युरोप व अमेरिका यांत पर्यटन केलें. हिंदुस्थानांत बौद्धधर्माचें पुनरुज्जीवन करणें हें यांचें मुख्य उद्दिष्ट होतें. हे 'अनगारिक धर्मपाल' या नांवानेंहि ओळखले जात.

सव्विसावे वर्षी हे हिंदुस्थानांत आले. तेव्हांच यांची बौद्धधर्मप्रचारक व समाजसुधारक म्हणून ख्याति सिलोनमध्यें झालेली होती. या वेळींच लौकिक ध्येयांचा यांनीं त्याग केला होता. बुद्धगयेचें मंदिर हिंदु महन्ताच्या ताब्यांत असून त्याची अत्यन्त निकृष्ट स्थिति असल्याचें यांच्या ध्यानांत आलें. वास्तविक तें मंदिर बौद्ध लोकांच्या ताब्यांत असावयास पाहिजे. तसें व्हावें म्हणून यांनी महाबोधि सोसायटीची स्थापना केली ( १८९१ ). महन्त आणि हे यांच्यांत अनेक दिवाणी व फौजदारी दावे झाले. पण शेवटीं देवळाचा ताबा यांना केव्हांच मिळाला नाहीं. तें देऊळ आजहि हिंदु महन्ताच्या ताब्यांत असून गौतम बुद्धाच्या पुतळ्याची विष्णु म्हणून तेथें पूजा चालू आहे.

यांनीं स. १८९३ सालीं जागतिक बौद्ध सभा गयेला भरविली होती. आधींच चिकागो येथें भरलेल्या पहिल्या जागतिक धर्मपरिषदेंत यांनीं बौद्धधर्मावर दिलेल्या व्याख्यानामुळें यांना आन्तरराष्ट्रीय प्रसिद्धी मिळाली ( १८९३ ). यानंतर यांनीं सर्व युरोपांत प्रवास केला आणि सर्वत्र यांच्या वक्तृत्वाची आणि व्यक्तिमत्त्वाची छाप पडली. हे हिंदुस्थानांत आल्यावर यांच्यावर सरकारची अवकृपा होऊन हे कांहीं वर्षे कलकत्त्यांत स्थानबद्ध होते ( १९१४-२० ). तेथून सुटतांच यांचें काम पुनः जोरानें सुरू झालें. यांनीं पांचसहा वर्तमानपत्रें सुरू केलीं, औद्योगिक शिक्षण अवश्य असल्याचें प्रतिपादन केलें आणि किती तरी तरुण धंदेशिक्षण घेण्याकरितां जपानला धाडले.

याच वेळीं सिलोनमधील यांचें कार्य चालूच होतें. तेथें विशेषतः ख्रिस्ती धर्माचें वर्चस्व नांवें, पोषाख व वागणूक यांवर व भाषेवर पडलें होतें. तें दूर करण्याचा यांनीं अत्यंत कसोशीनें प्रयत्न केला व सिंहली लोकांस स्वाभिमानानें राहण्यास शिकविलें. बायका झगे घालीत त्याऐवजीं यांनीं त्यांनीं साड्या नेसण्याबद्दल चळवळ केली. अशा प्रकारें सिंहली लोकांतील जुने आचारविचार, भाषा, पोषाख, खाणें वगैरेबद्दल जागृति करून यांनीं लोकांत स्वाभिमानाची नवी दृष्टि उत्पन्न केली.

याकरितां यांनीं पुष्कळ संस्था स्थापन केल्या. त्यांत कोलंबो येथें कॉलेज व हॉस्पिटल प्रमुख आहे. सर्व सिलोनभर यांनीं शाळा स्थापन केल्या. विणकरांची संस्था काढली. आणि शिष्यवृत्त्या देऊन अनेक सिंहली विद्यार्थी जपानला धाडले.

बनारसजवळच्या सारनाथची दुःस्थिति यांच्या ध्यानांत येतांच यांनीं त्या स्थानास पूर्वीचें वैभव प्राप्त करून देण्याची खटपट केली. तेथें 'मूलगन्धकूटी-

विहार' बांधला (१९३१). आणि तेथील भिंतीवर मि. बी. एल्. ब्राउटन यांच्या देणगीनें जपानी चित्रकार कोझेत्सु नोसु यांच्याकडून बुद्धचरित्रावर चित्रें काढवून घेण्यांत आलीं.

गयेला यांनीं एक बौद्धांकरितां वसतिगृह बांधलें. कलकत्त्याला यांनीं धर्मराजिक चैत्यविहार बांधला. सारनाथला बौद्धधर्माची दीक्षा देण्याची संस्था काढली. या संस्थेंत दीक्षा देण्याकरितां सिलोनी व जपानी लोक आले होते.

यांनीं महाबोधि सोसायटीची शाखा लंडनला उघडली. मृत्यूपूर्वी हे एकच वर्ष सर्वसंगपरित्यागी भिक्षु झाले व यांनीं सर्व चळवळी सोडल्या होत्या.

स. १८९३ सालीं चिकागो परिषदेहून परत येत असतांना हवाईच्या मिसेस् मेरी फोस्टर या उदार-हृदयी अमेरिकन स्त्रीची व यांची गांठ पडली. हिनें महाबोधि सोसायटीस आठ लाख रुपये दिले. यांच्या सर्व कार्यांत यांना युरोपियन व अमेरिकन लोकांकडून पुष्कळ मदत झाली.

कलकत्त्याच्या महाबोधि सोसायटीतर्फे 'महाबोधि' नांवाचें इंग्रजी मासिक अद्यापहि चालविलें जातें.

हिंदुस्थानांत महाबोधि सोसायटीच्या द्वारां केलेल्या बौद्धधर्माच्या पुनरुज्जीवनाचें व प्रचलित बौद्धधर्मविषयक जागृतीचें सर्व श्रेय यांच्या कार्यालाच आहे. सिंहली लोकांत व सिलोनमध्यें बौद्ध संस्कृति पुनरपि खेंचून आणण्याचें काम यांच्या एकट्याच्या अर्धशतकभर चाललेल्या प्रयत्नाचें निःसंशय फळ होय.

हिंदुस्थानांतील हिंदु व बाहेरच्या प्रान्तांतील बौद्ध हे धर्मतत्त्वाच्या व संस्कृतीच्या दृष्टीनें एकच आहेत असें यांचें सारखें प्रतिपादन असे. त्याचा परिणाम म्हणून कानपूर येथें भरलेल्या अखिल-भारतीय हिंदुमहासभेचें अध्यक्षस्थान ब्रह्मदेशांतील बौद्धसंन्यासी रेव्हरंड उत्तम यांस देण्यांत आलें.

**धामणस्कर, दिवाणबहादुर रामचंद्रराव विठोबा**—(जन्म स. १८४८–मृत्यु स. १९०३ सुमार) बडोदें संस्थानचे दिवाण व दानशूर मराठा गृहस्थ.

यांचें जन्मस्थान–मालवली (जि. रत्नागिरी). मूळगांव धामणसें (जि. रत्नागिरी). पांडोबा--बळवंत-विठोबा असा यांचा वंश. यांचे वडील कर्डे येथें मुन्सफ असतांना वारले (१८६०). आईचे दागिने मोडून हे मॅट्रिक झाले (१८६६) व प्रथम शिक्षक व पुढें कलेक्टर कचेरींत कारकून व मामलेदार झाले. पुढें बडोदें सरकारकडून यांना सरसुभे म्हणून बडोदें राज्यांत नोकरीस घेण्यांत आलें व तेथें अनेक महत्त्वाचीं कामें करण्याची संधि यांना मिळाली. सयाजीराव महाराजांच्या बरोबर हे इंग्लंडलाहि जाऊन आले (१८८८). शेवटीं कांहीं वर्षं यांनीं तेथें मुख्य प्रधान म्हणूनहि काम केलें.

मराठ्यांची संघटना करण्याचा पहिला प्रयत्न यांनीं केला. १८९१ सालापासून दरमहा पन्नास व १९०१ पासून दरमहा तीनशें रुपये विद्यार्थ्यांसाठीं हे खर्च करीत. आपल्या द्वितीय पत्नी गंगाबाई यांच्या स्मरणार्थ मॅट्रिकमध्यें मराठा वगैरे विद्यार्थ्यांस देण्याकरितां मुंबई विश्वविद्यालयास सहा हजार रुपये यांनीं दिले. त्यांच्या मृत्यूनंतर मृत्युपत्रान्वयें यांची सत्तर हजारांची मिळकत बडोद्याच्या विद्याखात्याकडे देण्यांत आली. त्याचें व्याज २३०० रुपये दरसाल उच्च शिक्षण घेणाऱ्या मराठा विद्यार्थ्यास 'धामणस्कर–शिष्यवृत्ति' म्हणून देण्यांत येतें.

**धार, पंडित बिशन नारायण**—(जन्म स. १८६४–मृत्यु स. १९१६) बंगालमधील सुप्रसिद्ध कायदेपंडित, राष्ट्रसभाकार्यकर्ते व वक्ते.

इंग्लंडहून बॅरिस्टर होऊन आल्यावर यांनीं कलकत्त्यास वकिली करण्यास सुरुवात केली (१८८७) आणि तेव्हांपासून हे राष्ट्रसभेमध्यें भाग घेऊं लागले. १९११ सालच्या कलकत्ता राष्ट्रसभेचें अध्यक्षपद रॅम्से मॅक्डोनॉल्ड यांस देण्यांत आलें होतें. पण ते ऐन वेळीं उपस्थित राहूं न शकल्यानें ती जबाबदारी यांच्यावर पडली.

**धारुरकर, विठ्ठलशास्त्री दाजीशास्त्री**—(मृत्यु स. १९१०) पंढरपूरचे सुप्रसिद्ध संस्कृत पंडित.

यांनीं व्याकरण, धर्म वगैरे शास्त्रांचें अध्ययन साताराचे सुप्रसिद्ध पंडित रामशास्त्री गोडबोले यांचेपाशीं केलें. हे शुक्लयजुर्वेदी माध्यंदिन शाखेचे होत.

पंढरपूर येथें यांनीं चार वेद व शास्त्रें यांची पाठशाळा स्थापन केली (शके १८२०). ती पाठशाळा अद्यापि

चालू असून 'धाडरकर वेदशास्त्रशाळा' या नांवानें प्रसिद्ध आहे.

सुप्रसिद्ध पंडित भगवान्‌शास्त्री धाडरकर हे यांचे चिरंजीव होत.

यांचे ग्रंथ—१ उपयुक्त धर्मशास्त्रसंग्रह (संस्कृत व मराठी), २ प्रायश्चित्तव्यवहारप्रकाश (संस्कृत व मराठी), ३ श्रीपंढरीमाहात्म्य (संस्कृत, मराठी, गुजराथी), ४ पंढरीतत्त्वविवेकः (संस्कृत), ५ बाळ-शिक्षक (मराठी), ६ ज्योतिष रत्नभांडार (अप्रसिद्ध), ७ पंढरपूर येथें सर्वकाल विवाह करण्याचा निर्णय (संस्कृत व मराठी).

**धिंग्रा, मदनलाल**—(जन्म स. १८८४ सुमार. फांशीं स. १९०९ ऑगस्ट १७) हिंदुस्थानातील प्रसिद्ध क्रांतिकारक.

यांचें हिंदुक्षत्रिय असणारें घराणें मूळ पंजाबांतील. यांचे वडील अमृतसरला सिव्हिल सर्जन होते. १९०६ सालीं वडिलांनीं परवानगी दिली नाहीं म्हणून बोटी-वरील आगवाल्याचे मदतनीस म्हणून हे इंग्लंडला आले. इंग्लंडमध्यें आल्यानंतर सावरकरांचे सहवासानें यांचें मन क्रांतिवादाकडे झुकूं लागलें आणि त्याची परिणती इंडिया ऑफिसचे राजकीय ए. डी. सी. सर विल्यम कर्झन वायली यांच्या खुनांत झालें. 'नॅशनल इंडियन असोसिएशन' या संस्थेच्या वार्षिक समारंभाचे वेळीं हा प्रकार घडला. रात्रीं अकराचे सुमारास समारंभास आलेल्या पाहुण्यांची गर्दी पांगलेली पाहून हे कर्झन वायलींच्या जवळ कांहीं गुप्त बोलण्याच्या मिषानें आले व आपल्याजवळील पिस्तुलानें यांनीं त्यांना ठार मारलें. या प्रकरणांत मध्यें पडलेल्या डॉ. कांवस लालकाका यांनाहि यांनीं ठार मारलें. मात्र आत्महत्त्या करण्यासाठीं स्वतःवर रोखलेलें पिस्तूल सर लेस्लि प्रोबिन यांच्या प्रयत्नामुळें हे झाडूं शकले नाहींत. 'परतंत्र राष्ट्र हें नेहमीं युध्यमानच असतें, निःशस्त्र राष्ट्राला उघडपणें शत्रूवर हल्ला करतां येत नसल्यानें गुप्तपणें हल्ला करण्यात दोष नाहीं,' असा यांनीं आपला बचाव केला.

**धुरंधर, रा. ब. महादेव विश्वनाथ**—(जन्म स. १८७१-मृत्यु स. १९४४) मुंबईचे सुप्रसिद्ध चित्रकार.

यांचें जन्मस्थान मुंबई असलें तरी यांचें शिक्षण कोल्हापुरास झालें. जगप्रसिद्ध चित्रकार आबालाल रहिमान हे यांचे चित्रकलेंतील आद्य गुरु होत. १८९० मध्यें यांनीं कोल्हापूरच्या 'स्कूल ऑफ आर्टस्'मध्यें प्रवेश केला. अल्पावकाशांतच यांनीं आपल्या कला-नैपुण्यानें मेजर ग्रिफिथ व मेजर ग्रीनवुड या प्रिन्सिपल-द्वयांची मर्जी संपादन केली. इतकेंच नव्हे तर कलानिपुण विद्यार्थ्यालाच मिळणारें मेयोपदकहि यांना मिळालें. विद्यार्थिदशेंत असतांनाच बॉम्बे आर्ट सोसायटीचे प्रदर्श-नांत यांच्या एका चित्राला सुवर्णपदक मिळालें. अध्यापक, इन्स्पेक्टर, व्हा. प्रिंसिपल अशा अनेक नात्यांनीं यांनीं स्कूल ऑफ आर्टस्‌मध्यें आपली सेवा बजावली.

सेवानिवृत्तीनंतर हिंदी मनुष्याला क्वचितच मिळणारा ऑफीशिएटिंग डायरेक्टरचा मान यांना मिळाला. पिक्चर कांपोझिशन या चित्रकलेंतील विभागावर यांचें विशेष प्रभुत्व होतें. या शाखेंतील प्रभुत्वाबद्दल यांची सर्वत्र ख्याति असे. नव्या दिल्लींतील इंपिरियल सेक्रेटरी-एटच्या इमारतींतील चित्रें रंगविण्याचें बहुमानाचें काम यांना मिळालें. १९३२ सालीं लंडन येथें यांनीं आपल्या चित्रांचें प्रदर्शन भरविलें. त्यांतील एक चित्र महाराणी मेरी यांना अत्यंत पसंत पडलें. तें चित्र आज बकिंगहॅम राजवाड्यांत लटकत आहे. धार्मिक, ऐतिहासिक व सामाजिक यांपैकीं कोणत्याहि प्रसंगांतील चित्रांत यांचें स्त्री-व्यक्तिरेखन अत्यंत सुंदर असतें.

१९०३ सालीं यांना मुंबईच्या प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियमचे ट्रस्टी व १९३४ सालीं नागपूर आर्ट सोसायटीच्या परीक्षकांचे प्रमुख नेमण्यात आलें होतें. यांनीं सहकुटुंब जगांत प्रवास करून अनेक चित्रसंग्रह पाहिले होते. वेम्बले प्रदर्शनांत यांच्या चित्रांची प्रशंसा झाली होती.

यांनीं प्रकाशक व लेखक या नात्यानेंहि आपला परिचय लोकांना दिलेला आहे. किंकेडचें 'डेक्कन नर्सरी टेल्स', आटो रॉथफील्डचें 'वुमेन ऑफ इंडिया', एस्. एस्. एडवर्डचे 'बायवेज् ऑफ बॉम्बे' वगैरे पुस्तकें यांनीं प्रसिद्ध केलीं. शिवाय मराठी, गुजराथी व हिन्दी भाषांतूनहि यांनीं पुस्तके प्रसिद्ध केलीं आहेत.

जुन्या पिढींतील एक यशस्वी चित्रकार व नव्या पिढीकडे सहानुभूतीनें पाहून उत्तेजित करणारा कलावंत अशी यांची भूमिका असे.

**धुलिपसिंह, के. एस्.**—(जन्म स. १९०५) जगप्रसिद्ध हिंदवी क्रिकेटपटु.

जगप्रसिद्ध क्रिकेटपटु नवानगरचे जामसाहेब रणजितसिंह यांचे हे पुतणे. राजकुमार कॉलेजमधील आपलें शिक्षण संपविल्यानंतर हे केम्ब्रिजला गेले. त्या ठिकाणीं सी. बी. फ्राय, जी. ए. फॉल्कनर वगैरेंच्या अध्यापनानें हे उत्कृष्ट क्रिकेटपटु बनले.

ए. एच्. गिलिगन, ससेक्स टीममधून निवृत्त झाल्यानंतर त्या टीमचें नेतृत्व ओघानेंच यांच्याकडे आलें. ससेक्स टीमच्या नेतृत्वाचा लाभ पटकविणारे हे दुसरे हिंदी गृहस्थ होत.

आपल्या काकांच्याप्रमाणेंच ऑस्ट्रेलियाविरुद्ध खेळलेल्या आपल्या पहिल्याच टेस्ट मॅचमध्यें यांनीं शतक काढलें. तेव्हांपासून अचूक दृष्टि व मनगटाचा लवचिकपणा यांमुळें बॅट्समन म्हणून यांची कीर्ति सारखी वाढतच गेली. नॉर्दम्पशायर परगण्याविरुद्ध एका दिवसांत यांनीं काढलेल्या ३३३ धांवा (१९३०) हा त्या वेळीं यांचा सर्वश्रेष्ठ विक्रम समजला जाई. १९२९, ३० व ३१ या काळांत हे दर वर्षी सरासरी ५१ इनिंग्ज खेळले, साडेपंचवीसशें धांवा काढल्या, त्यांतील जास्तींत जास्त आंकडा तीनशेंचा होता व त्यांत यांनीं एकुणपन्नास शतकें काढलीं. यांच्या आतांपर्यंतच्या धावांची संख्या साडे पंधरा हजारांपेक्षां जास्त आहे.

**धूमकेतु**—(जन्म स. १८९२ डिसें. १२) गुजराथी भाषेंतील श्रेष्ठ कादंबरीकार.

हे काठेवाडांतील गोंडल गांवचे खेडावल ब्राह्मण. यांचें समग्र नांव गौरीशंकर गोवर्धनराम जोशी. आईचें नांव गंगाबेहेन. हे जुनागड कॉलेजांतून बी. ए. झाले (१९२०). हे शिक्षक असून साहित्य व इतिहास हा यांचा आवडता विषय आहे.

लघुकथा व कादंबऱ्या लिहिण्यांत यांनीं चांगलें नांव कमावलें आहे. तणखा या यांच्या लघुकथात्मक पुस्तकानें गुजराथी वाङ्मयांत यांचें नांव स्थिर झालें. यांनीं एकांकी बाल नाटकेंहि गुजराथींत लिहिलीं आहेत.

यांची लेखणी खेड्यांतील प्रसंग रंगविण्यांत विशेष रंगते. खेड्यांतील प्रसंगावर हे करुणरसाचा शिडकावा करून ते प्रसंग वाचकांना सादर करतात. तथापि यांच्या सौंदर्यदृष्टीचा खरा आविष्कार यांच्या लघुकथांत पाहावयास मिळतो.

यांना बडोदें येथें भरलेल्या गुजराथी साहित्य-संमेलन प्रसंगीं साहित्यशाखेचें अध्यक्षपद देऊन यांच्या साहित्यसेवेचा गौरव करण्यांत आला (१९४३).

कथासंग्रहः—१ तणखा (भाग १, २, ३. १९२८-३१), २ अवशेष (१९३२), ३ पडछाया.

कादंबऱ्याः—१ राजमुकुट (१९२४), २ पृथ्वीश (१९२५), ३ राजकन्या, ४ कर्णावती, ५ मशहूर गवयिआ, ६ भय्यादादा इत्यादि.

**ध्यानचंद्**—(जन्म स. १९०५) हॉकीचा जादुगार. पंजाब राइफल्स नांवाच्या पलटणींत नाईक कार्पोरलचा हुद्देदार.

हे वयाच्या पंधराव्या वर्षापासून हॉकी खेळूं लागले. स. १९२६ सालीं हिंदुस्थानांतल्या सैन्यातर्फे एक संघ न्यूझीलंड व ऑस्ट्रेलिया येथें पाठविण्यात आला होता, त्यांत यांस सेंटर फार्वर्ड म्हणून निवडण्यांत आलें. त्या वेळीं यांनीं अप्रतिम कामगिरी करून १२५ वर गोल केले. त्यामुळें यांस 'हॉकीचा जादुगार' अशी पदवी मिळून जगांत प्रसिद्धी मिळाली. पुढें स. १९२८ सालीं ॲम्स्टरडॅम येथें झालेल्या आन्तरराष्ट्रीय सामन्याचे वेळीं यांची हिंदुस्थानतर्फे निवड झाली. त्या वेळींहि यांनीं शंभरवर गोल्स केले. पुनः स. १९३२ सालीं लॉस ॲंजेलिस येथेंहि अशीच कामगिरी करून हिंदुस्थानला हॉकींतील अजिंक्यपद मिळवून देण्यास यांनीं मदत केली. या वेळींहि यांनीं शंभरवर गोल्स केले. १९३५ मध्यें न्यूझीलंडला गेलेल्या हॉकी टीमचे यांना कॅप्टन निवडण्यांत आलें. हे ग्वालेर संस्थानच्या लष्करांत असत.

**ध्रुव, आनंदशंकर बापुभाई**—(जन्म स. १८६९) हिंदुविश्वविद्यालय बनारसचे माजी कुलगुरु, विख्यात अभ्यासक व सुप्रसिद्ध गुजराथी लेखक.

जन्मस्थान अहमदाबाद. जात वडनगरा नागर ब्राह्मण. यांचे वडील दप्तरदार, बडोदा रेसिडेन्सींत वकील वगैरे कामें करणारे धार्मिक गृहस्थ होते. हे एम्. ए., एल्एल्. बी. झाले. यांचा क्रमांक नेहमींच वर असे व यांना अनेक पारितोषिकें मिळत. यांची संस्कृत भाषा आणि शास्त्रें यांत विशेष प्रगति असे. अहमदाबादेस राहणारे प्रसिद्ध बिहारी पंडित बबा झा यांचा यांनीं चांगला फायदा घेतला.

स. १८९३ सालीं प्रो. काथवटे यांची बदली झाली आणि त्यांचेजागीं यांना अहमदाबाद कॉलेजमध्यें संस्कृतचे प्राध्यापक नेमण्यांत आलें. तेथून हे एल्फिन्स्टन कॉलेज मुंबई येथें गेले. नंतर यांना बनारस हिंदु विश्वविद्यालयांत प्रिन्सिपल व व्हाइस चॅन्सेलर या जागीं काम करण्याची संधि मिळाली. तेंव्हांपासून यांचें नांव भारतभर विख्यात झालें.

हिंदुधर्म, नीतिशास्त्र व प्राचीन वाङ्मय इत्यादींचे हे सखोल अभ्यासक आहेत. गुजराथींत यांनीं 'वसन्त' नांवाचें मासिक उत्कृष्टपणें चालविलें (१९०२). त्याचा रजतमहोत्सवहि मोठ्या थाटानें साजरा झाला (१९२७). त्यांतील यांचीं स्फुटें, लेख व व्याख्यानें नवीन काळाकडे पाहण्याची यांची समतोल दृष्टि दर्शविणारीं असतात. यांच्या विशेष योग्यतेमुळें यांना गुजराथी साहित्य परिषदेचें व मद्रास येथें भरलेल्या चवथ्या तत्त्वज्ञान-परिषदेचेंहि अध्यक्षस्थान देण्यांत आलें होतें (१९२८). हिंदुस्थानांतील इंटर-युनिव्हर्सिटी बोर्डाचे हे अध्यक्ष होते.

यांचे ग्रंथः—१ श्रीभाष्य (१-२), २ धर्मवर्णन, ३ नीतिशिक्षण, ४ आपणो धर्म, ५ हिंदुधर्मनी बाळ पोथी, ६ हिंदुवेदधर्म इत्यादि.

**ध्रुव, दिवाणबहादुर केशवलाल हर्षदराय**—(जन्म स. १८५९ ऑक्टो. १७) गुजराथी वाङ्मयाचे अभ्यासक व लेखक.

जन्मस्थान बहियल (गायकवाड राज्य दहेगांव परगणा), जात साठोदरा नागर ब्राह्मण. ऋग्वेदी शांख्यायन शाखा. यांच्या घराण्यांत नागजीभाई नांवाचे एक वैष्णव साधु झाले होते.

हे बी. ए. झाले (१८८२) आणि अहमदाबादच्या मेल ट्रेनिंग कॉलेजमध्यें शिक्षक म्हणून लागले. तेथें असतांना यांनीं इंग्रजी व गुजराथी या दोन्ही भाषांत लिहिण्यास सुरवात केली. नंतर भुज येथें हेडमास्तर, कच्छच्या महाराज कुमाराचे शिक्षक इत्यादि कामें करीत अहमदाबाद हायस्कूलच्या हेडमास्तरच्या जागेवरून सेवानिवृत्त झाले (१९१५). नोकरींत असल्यापासूनच यांचें गुजराथी व संस्कृत साहित्याकडे लेखक व अभ्यासक म्हणून लक्ष होतें. गुजराथी भाषेंत होत गेलेला फेरबदल, प्राचीन गुजराथी काव्यांचें शुद्ध व शास्त्रीय पद्धतीनें संशोधन करून मुद्रित करणें वगैरे कामामुळें यांना मुंबईच्या कविपरिषदेचे प्रमुख निवडण्यांत आलें (१९२९). यांचे निबंध व ग्रंथ पुष्कळच आहेत. त्यांपैकीं कांहींचीं नांवें पुढें दिलीं आहेत.

१ मेलनी मुद्रिका, २ विंध्यवननी कन्यका, ३ प्राचीन गुर्जर काव्य, ४ दयाराम विषे कंइक, ५ जुनी गुजराथीना नमुना, ६ प्रेमानंद वगैरे.

## न

**नटराजन् कामाक्षी**—(जन्म स. १८६८) मुंबईच्या 'इंडियन सोशल रिफॉर्मर'चे सुप्रसिद्ध संपादक व नवमतांचे नमुनेदार पुरस्कर्ते.

यांचा जन्म तंजावर जिल्ह्यांत झाला. मद्रासच्या प्रेसिडेन्सी व लॉ कॉलेजांतून आपलें शिक्षण संपविल्या-नंतर यांनीं मद्रासच्या 'हिंदू'चे संपादक गणपति सुब्रह्मण्य अय्यर यांच्या हाताखालीं काम करण्यास सुरवात केली आणि १८९० सालीं यांच्या 'रिफॉर्मर'चा पहिला अंक बाहेर पडला.

१८९० पासून १८९८ पर्यंत यांनीं आपलें हें पत्र मद्रास येथें चालविलें. पुढें मलबारी शेठच्या गैरहजेरींत सहा महिन्यांसाठीं 'स्पेक्टेटर' चालविण्यासाठीं हे जे मुंबईला आले तें मुंबईलाच स्थायिक झाले. मूलग्राही पण सभ्य व संयमानें लिहिण्याच्या यांच्या एका नव्या शैलीनें हे व यांचें पत्र यांना लवकरच मुंबईंत चिरस्थायी स्वरूप प्राप्त झालें. मुंबईच्या 'टाइम्स ऑफ इंडिया'-मध्येंहि जवळ जवळ वीस वर्षें हे लिहीत असत.

समाजसुधारणा ही राष्ट्राच्या स्वातंत्र्य-प्रयत्नाचाच एक भाग आहे अशा श्रद्धेनें यांनीं आपण स्वतः व आपलें पत्र यांना त्या कार्यासाठीं वाहून घेतलें. राजकीय सुधा-रकांना सहज साध्य असणारी लोकप्रियता मिळविण्याच्या लोभास बळी न पडतां त्या कालांत सामाजिक सुधार-

णेच्या अप्रिय कामास यांनीं वाहून आपलें वैशिष्ट्य व्यक्त केलें. कोणत्याहि राजकीय पक्षाचीं मतें व शिस्त स्वतःवर लादून न घेतां मूलग्राही पद्धतीनें स्वतंत्र विचार प्रगट करण्याची यांची भूमिका मोठी प्रभावी ठरली. यांचा सुधारणावाद न्या. म. गो. रानडे यांच्याप्रमाणें पूर्व इतिहासाचा व संस्कृतीचा धागा शक्य तों टिकवून चालणारा आहे. मनुष्यास मनांस बळकटी आणण्यास पूर्व इतिहास व पूर्व संस्कृति यांचा उपयोग होत असल्याचें यांनीं कबूल केलें आहे. यांच्या सुधारणा शब्दाचा अर्थ फक्त स्त्रीशिक्षण, विधवाविवाह किंवा सहभोजन इत्यादींच्या भोंवतीं घोटाळणारा नव्हता. समाजधारणेस आवश्यक असणाऱ्या प्रत्येक मूलभूत गोष्टींचें संरक्षण करणें हें सुधारकांचें कर्तव्य असल्याचें हे प्रतिपादीत व त्याप्रमाणें हे वर्तनहि करीत. अशा धोरणामुळें यांच्या पत्राचा खप दोन हजारांपेक्षां केव्हांहि जास्त नसला तरी त्याला विचारी लोकांत एक असामान्य स्थान प्राप्त झालें होतें.

'West of Suez' व 'Lallubhai Samaldas' या ग्रंथांचे लेखक श्री. एस्. नटराजन् हे यांचे चिरंजीव होत. यांच्या निवृत्तीनंतर 'रिफॉर्मर'चीं सूत्रें त्यांच्या ताब्यांत आहेत.

**नटेसन्, जी. ए.**—(जन्म स. १८७३) 'जी. ए. नटेसन् ॲन्ड को.' या मद्रासच्या सुप्रसिद्ध प्रकाशन-संस्थेचे चालक.

कुंभकोण, त्रिचनापल्ली व मद्रास येथें शिक्षण संपवून हे बी. ए. झाले, आणि यांनीं काँग्रेसच्या राजकारणांत भाग घेण्यास सुरुवात केली. काँग्रेसमधील सुरवातीपासूनची यांची भूमिका मवाळाची होती. त्याप्रमाणें यांनीं मॉडरेट कॉन्फरन्स (१९१९), मद्रास लिबरल लीग, नॅशनल लिबरल फेडरेशन वगैरे ठिकाणीं मनापासून भाग घेतला. यांच्या या कार्यामुळें यांना कौन्सिल ऑफ स्टेट व टॅरिफ बोर्डाचे सभासद निवडण्यांत आलें.

परंतु यापेक्षांहि धंद्याबरोबरच राष्ट्रीय दृष्टि जागृत ठेवणारी जी. ए. नटेसन ॲन्ड को. ही प्रकाशनसंस्था व तिला संलग्न असणाऱ्या इंडियन रिव्ह्यू (१९०२) या मासिकाची स्थापना हें यांचें प्रमुख कार्य होय. हिंदुस्थानांतील प्रमुख राजकीय कार्यकर्त्यांचीं चरित्रें व व्याख्यानें यांचें फार मोठ्या प्रमाणावर प्रसिद्धीकरण करण्याचें कार्य यांच्या या संस्थेनें केलें आहे.

२४ ऑगस्ट १९३३ ला यांचा षष्ठ्यब्दपूर्तिसमारंभ साजरा करण्यांत येऊन यांना एक सत्कार-ग्रंथ अर्पण करण्यांत आला.

यांचे ग्रंथ—(1) What India Wants, (2) Autonomy Within the Empire.

**नबाब, सर मुहम्मद अहमद सय्यदखान, छत्तारी**—(जन्म स. १८८८) छत्तारीचे नबाब, पंजाब व संयुक्त प्रान्त यांचे माजी गव्हर्नर, हैदराबाद राज्याच्या कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष व सुप्रसिद्ध राजकारणी मुत्सद्दी.

बुलंद शहर जिल्ह्यांतील लालखासनीस या सुप्रसिद्ध मुसलमान झालेल्या रजपूत घराण्यांत पंजाबांतील रोहटक जिल्ह्यांतील एका खेड्यांत यांचा जन्म झाला. अलीगडच्या एम्. ए. ओ. कॉलेजमध्यें शिक्षण घेतल्यावर यांनीं सार्वजनिक कामांत भाग घेण्यास सुरुवात केली (१९१०). यांचा कुराणाचा व्यासंग गाढा असून उर्दू व फारशी भाषा यांना चांगल्या परिचित आहेत.

समाज, शिक्षण व राजकारण अशा विविध क्षेत्रांत हे मनापासून भाग घेतात. पंजाबांत कालनौर येथें भरलेल्या रजपूत रिफॉर्म कॉन्फरन्सचे हे अध्यक्ष होते. बुलंद शहर मुस्लीम हायस्कूल तर केवळ यांच्या देणगीमुळें स्थापन झालें.

मॉंटफोर्ड सुधारणांमुळें अस्तित्वांत आलेल्या कायदेमंडळांत हे निवडून आले आणि मंत्रिपदावर असतांना सर अलेक्झांडर मुडिमन यांचे मृत्यूनंतर यांना पंजाब प्रान्ताचे हंगामी गव्हर्नर नेमण्यांत आलें (१९२८). व्हाइसरॉयच्या एक्झिक्युटिव्ह कौन्सिलचेहि हे कांहीं दिवस सभासद होते. गोलमेजपरिषदेच्या पहिल्या दोन अधिवेशनांस हे हजर होते. यांना १९३३ सालीं सर माल्कम हेले यांचे जागीं संयुक्त प्रान्ताचे गव्हर्नर नेमण्यांत आलें. तेथून निवृत्त झाल्यावर यांना ऑल इंडिया मुस्लीम लीगचे अध्यक्ष निवडण्यांत आलें. त्या वेळच्या भाषणानें हिंदु-मुसलमानएकीचे पुरस्कर्ते असा यांचा लौकिक झाला. पुढें हैदराबाद राज्याच्या कार्यकारी मंडळाचें अध्यक्षपद व राजकारण, घटना व रेल्वे हीं खातीं यांच्याकडे देण्यांत आलीं. त्या राज्यांतील ग्रामपंचायतींची सुधारणा व युद्धकालीन कार्याचें श्रेय यांना आहे.

१९१५ सालीं यांना नबाब करण्यांत आलें व

१९१९ सालीं ती पदवी यांना वंशपरंपरेनें बहाल करण्यांत आली.

हैदराबाद संस्थानच्या राज्यकारभाराप्रमाणेंच हिंदुस्थानच्या राज्यकारभाराबाबत उत्पन्न होणाऱ्या महत्त्वाच्या प्रश्नांतहि हे लक्ष घालीत असतात. हैदराबाद राज्याची सर्व बाजूंनीं प्रगति व्हावी व त्याला आन्तरराष्ट्रीय स्वतंत्र स्थान प्राप्त व्हावें अशी महत्त्वाकांक्षा व त्या दृष्टीनें कार्य करण्याची ध्येयनिष्ठा यांना असावी असें यांच्या व्यापक दृष्टिकोनावरून अजमावतां येतें.

**नबाब, मुहम्मद् हमिदुल्लाखान, भोपाळ**—(कारकीर्द सुरुवात स. १९२६) भोपाळ संस्थानचे अधिपति, पोलोचे जगप्रसिद्ध खिलाडू, नरेन्द्रमंडळाचे चान्सेलर आणि प्रसिद्ध राजकारणी पुरुष.

यांची आई सुलताना जहान बेगम यांच्या मृत्यूनंतर हे गादीवर आले. त्यापूर्वी आपल्या आईचे चीफ सेक्रेटरी व भोपाळराज्याचे अर्थ, न्याय व कायदा या खात्यांचे मंत्री म्हणून यांनीं काम केलें होतें.

सात हजार चौ. मैल क्षेत्रफळ, आठ लक्ष लोकवस्ती व सुमार सात लक्ष वार्षिक उत्पन्न असलेलें यांचें राज्य आहे. तथापि कर्तृत्वामुळें यांनीं आपल्या राज्याला व स्वतःला महत्त्व प्राप्त करून घेतलें आहे. हे चेम्बर ऑफ प्रिन्सेसचे दोनदां चॅन्सेलर होते.

यांनीं आपल्या राज्यांत कायदेमंडळाप्रमाणेंच शेतकऱ्यांच्या हितसंबंधाकडे लक्ष देणारी पटेल्स असेंब्ली नांवाची संस्था स्थापन केली आहे. यांनीं कायदा व अंमलबजावणी खात्यांची फारकत केली आहे; तसेंच कायद्याची अंमलबजावणी स्वतःपासून सुरू करण्याचा क्रम सुरू केला आहे.

दुसऱ्या महायुद्धांत संस्थानच्या जमाबंदीपैकीं चाळीस टक्के यांनीं युद्धकार्याकरितां खर्च केले. शिवाय सात हजार पौंडांच्या अमेरिकन सिक्युरिटीज यांनीं सरकारला दिल्या, आणि त्याचा उपयोग भोपाळ, स्काउन्सेससाठीं करण्याची यांनीं तरतूद केली. विसावी, भोपाळ फील्ड अम्ब्युलन्स, सुलताना इन्फन्ट्री, मेकॅनिकल ट्रॅन्सपोर्ट युनिट, भोपाळ, आर्मी सर्व्हिस कोअर, लेबर बटेलियन् यांसारख्या अगदीं आघाडीवर उपयोगी पडणाऱ्या साधनांनीं यांनीं युद्धकार्यास मदत केली. युद्धाच्या ऐन दंगलींत मध्यपूर्व आघाडी व वायव्य सरहद्द प्रान्त येथें यांनीं पाहणी केली. खैबर घाटांत तर यांचे हस्तें खैबर कनिंगहॅम एज्युकेशन हॉलचें उद्घाटन झालें. यांच्या राज्यांतील एक लाख तरुणांनीं या युद्धांत भाग घेतला.

निसर्गतःच भरपूर खनिज संपत्ति असलेल्या आपल्या राज्यांत यांनीं टेक्स्टाइल मिल्स, स्ट्रॉबोर्ड फॅक्टरी, शुगर फॅक्टरी, नर्मदा व्हॅली रिफ्रिजरेटरी प्रॉडक्ट्स् कं., सेंट्रल इंडिया केमिकल्स लि. इत्यादि संस्था निर्माण करून उद्योगधंद्यास उत्तेजन दिलें.

स. १९४६ सालीं यांच्या राज्याच्या कार्यकारी मंडळाचे अध्यक्ष सर मदरुल महेमान व स्टेट कॅबिनेटच्या अध्यक्ष यांची कन्या अबिदा सुलतान होत्या.

हिंदुस्थानांतील प्रमुख राजकारणी व मुत्सद्दी लोकांत यांची गणना होते. कोणत्याहि महत्त्वाच्या राजकीय घडामोडींत यांचा संबंध असतो.

**नबाब, सय्यद् मुहम्मद् बहादूर**—(जन्म स. १८६९–मृत्यु स. १९१९) हिंदु-मुसलमान ऐक्याचा पुरस्कार करणारे मद्रासचे राष्ट्रसभा-कार्यकर्ते.

मद्रास प्रांतांतील सुप्रसिद्ध जहागिरदार पीर असदुल्लाखान यांचे हे नातु. मद्रास लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत निवडून येऊन आपल्या सार्वजनिक जीवनास यांनीं सुरवात केली. ऑफिशियल सीक्रेट्स बिल, युनिव्हर्सिटी बिल वगैरे असेंब्लींत अत्यंत विवाद्य म्हणून गाजलेल्या चर्चांमध्यें यांनीं हिरीरीनें भाग घेतला. यांच्या या कार्यामुळें यांना पुढें इंपिरियल लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत निवडून देण्यांत आलें.

परंतु यापेक्षांहि कॉंग्रेसमध्यें यांनीं केलेली कामगिरी विशेष गाजली. १८९४ मध्यें हे प्रथमच कॉंग्रेसला हजर राहिले आणि हिंदु-मुसलमान ऐक्याचा पुरस्कार करण्याच्या यांच्या विशेष धोरणानें हे ताबडतोब कॉंग्रेसमध्यें लोकप्रिय झाले. १९०३ च्या मद्रास कॉंग्रेसचे स्वागताध्यक्ष, कॉंग्रेसची घटना ठरविणाऱ्या कमेटीचे सभासद, १९१३ च्या कराची कॉंग्रेसचे अध्यक्ष व १९१५-१६ च्या कॉंग्रेसचे चिटणीस अशा अनेक मानाच्या व जबाबदारीच्या जागांवर यांनीं कार्य केलें.

हिंदुस्थानांतील निरनिराळ्या जातींनीं स्वतंत्रपणें प्रगति करण्यापेक्षां एकजुटीनें प्रगति करणें चांगलें, असा यांच्या मतप्रतिपादनाचा रोख असे. त्यासाठीं 'मी प्रथम कॉंग्रेसभक्त व नंतर मुसलमान' असल्याची कबुली हे सर्वत्र देत.

पुढें १९१७ मध्यें झालेल्या सुप्रसिद्ध लखनौ कराराचें श्रेय यांनीं कराची काँग्रेसच्या ( १९१३ ) अध्यक्षपदावरून केलेल्या भाषणाला देण्यांत आल्यास आश्चर्य नाहीं.

**नरगुंदकर भावे, भास्करराव ऊर्फ बाबासाहेब**—( जन्म स. १८०५–फांशीं स. १८५८ जून १२ ) १८५७ सालच्या बंडांत सामील झालेले दक्षिणेंतील एक संस्थानिक.

नरगुंद व रामदुर्ग अशीं भावे घराण्याचीं दोन संस्थानें. १८४२ सालीं यांच्याकडे नरगुंद संस्थानचा कारभार आला. संतति होण्याची आशा खुंटली आणि ईस्ट इंडिया कंपनीच्या अधिकाऱ्यांकडून दत्तकाची परवानगीहि मिळेना, तेव्हां हे बंडांत सामील झाले. दक्षिणी संस्थानचा रेसिडेंट कर्नल जेम्स मॅन्शन यांना सोरबिन ( संस्थान रामदुर्ग ) येथें मारुतीच्या देवळांत छापा घालून ठार करण्यांत आलें ( २९ मे १८५८ ). त्या हल्ल्यांत भीमराव मुंडरगी हे प्रमुख होते. २ जून रोजीं माल्कम यानें नरगुंदाच्या किल्ल्यावर हल्ला करून तो सर केला; पण राजघराण्यांतील मंडळी तेथून निसटली होती. हे तोरगलच्या जंगलांत पकडले गेले व एका दिवसांत झटपट चौकशी होऊन यांना बेळगांवीं फांशीं देण्यांत आलें.

यांच्या पत्नी आणि माता या दोघी सासूसुना रात्रीं लपतछपत नरगुंदपासून बारा मैलांवरील खेड्यांत एका कुळकर्ण्याच्या घरीं उतरण्यास गेल्या. पण तेथें एका म्हातारीकडून ‘ आपल्या घरावर निखारे ठेवून आतां आमच्या घराला आग लावण्यास आलां होय ! ’ असे उद्गार ऐकावयास मिळाले. तेव्हां या दोघी नदीच्या दिशेनें निघाल्या. वाटेंत एका ब्राह्मणास अंगावरील दागिने देऊन आपल्या प्रेताची व्यवस्था करण्याची विनंति केली. त्याप्रमाणें ओच्यांत दगड बांधून या दोघी नदींत शिरल्या. प्रेतें तरंगूं लागतांच ब्राह्मणांनीं त्यांना अग्नि देऊन त्यांची शेवटची व्यवस्था लावली. सरकारी हेरांचा तपास सुरू होताच, पण त्यांना यांच्या राखेशिवाय कांहीं मिळालें नाहीं.

या बंडाची झळ जमखिंडी संस्थानच्या अधिपतींना थोडी लागली. पण कांहीं दिवस अटक व राज्यांतील छोटुसिंग नांवाच्या इसमास दारूगोळा करण्याच्या आरोपावरून फांशीं एवढ्यावरच ही दक्षिणेंतील बंडाची झळ संपली.

**नरसिंहाचार्य आर.**—( जन्म स. ? मृत्यु स. १९३५ सुमार ) कानडी भाषेंतील ग्रंथांचे सूक्ष्म अभ्यासक व ग्रंथलेखक.

यांचा ‘ कर्नाटक कविचरितें ’ हा अनेक भागांतील ग्रंथ अत्यंत प्रसिद्ध आहे. त्यांत चिकित्सक पद्धतीनें कानडी भाषेंतील कवींची प्राचीन कालापासून आतांच्या कालापर्यंत सविस्तर माहिती दिली आहे. त्यांत आजपर्यंत उपलब्ध असलेली सर्व माहिती विचारांत घेऊन व ग्रंथान्तर्गत पुराव्याची छाननी करून अनेक महत्त्वाचे निर्णय करण्यांत आले आहेत. कानडी कवींच्यासंबंधीं कानडींत हा ग्रंथ जसा झालेला आहे तसा ग्रंथ अद्यापि मराठी कवींसंबंधीं मराठींत झालेला नाहीं.

**नरिमन, खुर्शेद एफ्.**—( जन्म स. १८८५ ) मुंबई हायकोर्टांतील नामांकित कायदे पंडित, धाडसी वादविवादपटु व सार्वजनिक कार्यकर्ते.

मुंबई कॉर्पोरेशन, मुंबई लेजिस्लेटिव्ह असेंब्ली व काँग्रेस अशा मोक्याच्या जागी यांनीं केलेल्या धडाडीच्या कार्यामुळें मुंबई प्रांतांतील सुपरिचित माणसांत हे मोडतात. वकिली कौशल्य व बिनतोड कोटिक्रम यांच्या साहाय्यानें हे जेथें तेथें यशस्वी होतात.

१९२४ सालापासून मुंबई कॉर्पोरेशनमध्ये निवडून यावयाचें व तेंहि पहिल्या नंबरच्या मतांनीं, हा आपला क्रम यांनीं कित्येक वर्षेपर्यंत चालविला. पुढें मुंबई लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत प्रवेश करून घेतल्यानंतर तेथेंहि यांनीं आपला हा खाक्या सोडला नाहीं. असेंब्लींतहि स्वराज्य पक्षाचे नेते, विरुद्ध पक्षाचे पुढारी व मुंबई शहराच्या वाढीबाबत खुद्द असेंब्लींत व तिच्या बाहेर चालणाऱ्या खटपटी लटपटी उघडकीस आणण्यांत यांनीं दाखविलेलें कौशल्य अशा अनेक कारणांनीं हे सतत लोकप्रियतेच्या शिखरावर असत. शेवटच्या प्रसंगीं डेव्हलपमेंट ऑफिसर मि. हार्वे यांनीं भरलेल्या अब्रुनुकसानीच्या फिर्यादींत यांना प्राप्त झालेल्या विजयानंतर तर यांच्या लोकप्रियतेनें उच्चांक गांठला.

काँग्रेस व त्यांतहि तिच्याशीं संलग्न चालणाऱ्या तरुणांच्या चळवळींत यांनीं सुरवातीपासून भाग घेतला. १९३० च्या कायदेभंगाच्या जमान्यांत मीठाचा कायदा मोडण्याचा पहिला मान यांनीं वरळी, मुंबई येथें मिळविला. पुढें मुंबईत सुरू झालेल्या इंडिपेन्डन्स ऑफ इंडिया लीगमध्येंहि हे प्रमुख होते.

'Whither Congress' हा यांचा ग्रंथ यांनीं कायदेभंगाच्या चळवळींतील तुरुंगवासांतून बाहेर पडतांच लिहिला. कॉंग्रेसचें मुख्य ध्येय स्वराज्य आहे, धार्मिक किंवा सांस्कृतिक मुद्यांशी त्याची गल्लत करूं नका असा सल्ला यांनीं आपल्या या पुस्तकांत दिला आहे. मुंबईच्या राष्ट्रसभेच्या अधिवेशनाचे हे स्वागताध्यक्ष होते (१९३४). पुढें निवडणुकांच्या बाबत यांच्यावर शिस्तभंगाचा आरोप येऊन यांना कॉंग्रेसमधील अधिकारावरून खालीं यावें लागलें (१९३७). तेव्हांपासून हा धडाडीचा कर्तबगार गृहस्थ निर्माल्यासारखा झाला आहे.

तरी देखील आझाद-सैनिकांच्या बचावाकरितां गेलेल्या हिंदी वकिलांचे प्रमुख म्हणून हे मलायांत गेले होते.

**नरेन्द्रनाथ, राजा**—( जन्म स. १८६४-मृत्यु स. १९४५ मार्च १० ) पंजाबचे सुप्रसिद्ध हिंदु पुढारी व हिंदु महासभेचे अध्यक्ष.

हे एम्. ए. पर्यंत शिकले होते. उर्दू व फारशी भाषांचे हे व्यासंगी असून लिबर्टी या पुस्तकाचें यांनीं उर्दूंत भाषान्तर केलें होतें.

याचे वडील असिस्टंट कमिशनर होते. आणि हेहि १९११ मध्यें लाहोर विभागाचे कमिशनर होते. गृहमंत्री क्रॅडॉक यांनीं कमिशनराच्या जागेवर हिन्दी मनुष्य असतां उपयोगी नाहीं असें फर्मान काढलें. या अन्यायाच्या विरुद्ध तक्रार करण्याकरितां हे इंग्लंडला गेले व शेवटीं यांनीं निषेधार्थ आपल्या जागेचा राजीनामा दिला. तथापि सरकारनें 'राजा' पदवी देऊन यांचा गौरव केला. दिवाणबहादुरी तर पूर्वीच मिळाली होती.

१९२१ सालीं हे पंजाबच्या कायदेमंडळांत निवडले गेले. तेथें हे १९३८ पर्यंत होते. यांना तीनदां मंत्रिपद देण्यांत आलें पण तीनहि वेळ यांनीं तें नाकारलें. विरोधी पक्षाचे प्रमुख म्हणून यांनीं सहा वर्षे काम केलें. पहिल्या व दुसऱ्या गोलमेज परिषदेस हे गेले होते, पण तेथें हिंदुहिताला विरोधी धोरण ब्रिटिश पंतप्रधानांनीं आखलेलें पाहून यांनीं तिसऱ्या परिषदेवर बहिष्कार घातला. पंजाब प्रान्तिक हिंदुसभेचे व दिल्ली, अखिल भारतीय हिंदुमहासभेचे ( १९२६ ) हे अध्यक्ष होते.

यांचा पंजाबमधील अनेक संस्थांशीं निकटचा संबंध होता. काश्मीरचे अकाउंटंट जनरल ब्रिजलाल नेहरू यांच्या पत्नी रामेश्वरी नेहरू या यांच्या कन्या होत. यांची स्मशानयात्रा गायत्रीमंत्र म्हणत चालली होती.

**नवाथे, विष्णु गोपाळ**—( जन्म स. १८६७-मृत्यु स. १९३१ ) सायन मताचे सुप्रसिद्ध फलज्योतिषी व ग्रंथलेखक.

जन्मस्थान—थळ ( जिल्हा कुलाबा ). प्राथमिक शिक्षक. यांनीं पाश्चात्य व पौर्वात्य ज्योतिषाचा अभ्यास केला होता. यांनीं लोणावळा येथें श्रीमहालक्ष्मी-ज्योतिर्विद्याश्रम नांवाची संस्था काढली होती ( १९२५ ).

यांनीं कुंडलीविज्ञान मासिक ( १९००-१९१३, १९२५-१९३१ ), योगमाला व जातकसंग्रह हीं नियतकालिकें चालविलीं.

यांची जातकशिरोमणि, सुलभ-जातक वगैरे अनेक पुस्तकें प्रसिद्ध आहेत.

**नसीम**—( जन्म स. १८११-मृत्यु स. १८४३ ) सुप्रसिद्ध उर्दू कवि.

यांचें नांव दयाशंकर कौल. पित्याचें नांव गंगाप्रसाद. स्थान लखनौ. यांना फारसीचें शिक्षण मिळालें व हे सरकारी सैन्यांत नोकर झाले. नोकरी करीत असतां यांनीं जुन्या कवींच्या काव्याचा चांगला अभ्यास केला. हे कविताहि उत्तम करूं लागले. हे आतिश कवीचे शिष्य. यांनीं पंचविसाव्या वर्षी 'गुलजार नसीम' नांवाची मसनवी लिहिली. गुरूला दाखवितां ते म्हणाले, 'इतकी मोठी पोथी कोण वाचणार ? छोटी कर.' यांनीं छोटी करून गुरूला दाखविली, पण यांना गुरूचा सल्ला पसंत पडला नाहीं. यांनीं मूळचाच ग्रंथ कायम ठेवला. यांच्या पूर्वी मीर हसनच्या 'सहरुलबयान' नांवाच्या मसनवीचा बोलबाला होता. पण यांचा हा ग्रंथ त्यापेक्षांहि सरस आहे असें तज्ज्ञांचें मत आहे. यांना कमालीची लोकप्रियता मिळाली होती.

**नाईक, वामन रामचंद्र**—( जन्म स. १८७८-मृत्यु स. १९३६ ) दक्षिण हैदराबाद येथील एक जहागिरदार, उदार धनिक आणि सार्वजनिक कार्यकर्ते.

विजापूरहून यांचे पूर्वज दीडशें वर्षांपूर्वी हैदराबाद ( द. ) राज्यांत आले. नारायणपेठ, गदवाल, वनपर्ति व व्यापरला वगैरे ठिकाणीं यांचे पूर्वज सावकारी पेढी, दिवाण वगैरे नात्यानें वावरत. बापूजी–उमाकान्त-व्यंकोबा दुसरा–व्यंकोबा-गोविंद ( मृत्यु स. १८८३ जून )–रामचंद्र मृत्यु १८८३ )-वामन-श्रीधर नाईक असा यांचा वंश आहे. गदवाल, वनपर्ति व जटपोलच्या राजेसाहेबांकडून यांच्या पूर्वजांना अनेक गावें जहागीर म्हणून

मिळालेलीं आहेत. तसेंच खुद्द निजामसाहेबांकडूनहि यांना उत्पन्न मिळालेलें आहे. यांच्या पूर्वजांनीं अनेक देवळें बांधून आणि दुष्काळ वगैरे प्रसंगीं आपल्या सर्वस्वाचा त्याग करून लोकांचे प्राण वांचविले. अशा कामांमुळे निजामसाहेबांनीं यांच्या घराण्याला तीनशें रुपये दरमहाची नेमणूक करून दिली आहे. त्या भागांत उत्तम व्यवस्थापक म्हणून राजेमहाराजांत आणि उदार दाते म्हणून सर्वसामान्य लोकांत यांच्या घराण्याचें नांव महशूर आहे.

यांचें शिक्षण मराठी, तेलगू, उर्दु व इंग्रजी कॉलेजपर्यंत झाल्यावर यांनीं आपलें लक्ष उद्योगधंद्यांत घातलें. कापसाच्या जिनिंग व प्रेसिंग फॅक्टरी, तांदूळ सडण्याच्या गिरण्या, रेल्वेचीं व अबकारी कंत्राटें वगैरे व्यवसाय हे मोठ्या प्रमाणावर करीत. निजाम राज्यांतील 1/3 दारूचे गुत्ते व त्यांकरितां लागणाऱ्या दारू गाळण्याच्या भट्ट्याहि यांच्या होत्या.

हैदराबादच्या विवेकवर्धिनी नांवाच्या मुलांमुलींच्या शाळेस यांनीं सुमारें एक लाख रुपयांची देणगी दिली. शेजारीं एक पन्नास हजार रुपये खर्चून सिनेमा थिएटर बांधलें, त्याचें दरमहा पंधराशेंचें उत्पन्न संस्थेस दिलें. प्रथम तेथें १०।१५ विद्यार्थी होते. तेथें आतां तीन हजार विद्यार्थी शिक्षणाचा लाभ घेत आहेत. त्यांत पांचशें विद्यार्थिनी आहेत. या संस्थेचा आयव्यय वार्षिक सत्तर हजारांपर्यंत गेला आहे. हैदराबाद प्रजाशिक्षण-परिषदेचे हे अध्यक्ष व म्युनिसिपालिटींत उपाध्यक्ष होते. हे ऑल-इंडिया काँग्रेस कमेटीचे सभासद असून म. गांधींच्या चरखासंघ, खादी-भांडार वगैरे कार्यांत लक्ष घालीत.

वाईचा धर्मकोश, चरित्रकोश, श्रुतिबोध वगैरे ग्रंथ, जांब येथील रामदासमंदिर, संस्थानाबाहेरील भारत-इतिहास-संशोधक मंडळ वगैरे संस्थांना यांनीं मदत केली. याशिवाय स्वतःच्या खासगी मोटारीनें हिंदुस्थान-भर प्रवास करून यांनीं डोळसपणें तीर्थयात्रा केली व काश्मीरांतील श्रीशंकराचार्यांच्या मठाचा जीर्णोद्धार केला. यांचे पुत्र बॅ. श्रीधरपंत.

**नाईक, प्रा. विश्वनाथ बळवंत**—( जन्म स. १८८० फेब्रु. २७–मृत्यु स. १९३६ फेब्रु. २७ ) सुप्रसिद्ध गणित ज्योतिषज्ञ, शिक्षणतज्ज्ञ, फर्ग्युसन कॉलेजमधील गणिताचे प्रोफेसर व शास्त्रीय विषय सुलभ करून सांगणारे वक्ते.

शिक्षण पुणें येथेंच पुणें हायस्कूल, महाराष्ट्र कॉलेज व फर्ग्युसन कॉलेज यांत झालें. नवीन मराठी शाळा, न्यू इंग्लिश स्कूल यांचे सुपरिंटेंडेंट, वाडिया लायब्ररीचे लायब्रेरियन व डेक्कन ए. सो.चे सेक्रेटरी म्हणूनहि यांनीं काम केलें (१९०९-१९३३). सार्वजनिक कामांतहि पडत. वेदशास्त्रोत्तेजक सभेचे चिटणीस व उपाध्यक्ष, पंचांग-प्रवर्तन कमिटीचे अध्यक्ष, मुंबई युनिव्हर्सिटीच्या सिनेटचे सभासद व यांशिवाय अनेक संस्थांचे सभासद असत. हे शिक्षाविचार-मंडळाचे संस्थापक व अध्यक्ष, मुंबई इलाखा शिक्षण-परिषदेचे स्वागताध्यक्ष, प्रोग्रेस ऑफ एज्युकेशन नांवाच्या इंग्रजी नियतकालिकाचे संस्थापक व संपादक, सिमल्यास भरलेल्या शिक्षण-तज्ज्ञांच्या सरकारी परिषदेचे मुंबई इलाख्याचे प्रतिनिधि ( १९१९ ) व पुणें ज्योतिष संमेलनाचे स्वागताध्यक्ष ( १९१७ ) होते.

यांनीं सर्वत्र बोधभाषा मराठी असावी, याचा जोरानें पुरस्कार केला. महाराष्ट्र युनिव्हर्सिटी ऑफिशिएटिंग पद्धतीची तावडतोब पाहिजे या मताचे व शास्त्रीय परिभाषा मराठींत करण्याचे हे पुरस्कर्ते होते.

यांचे ग्रंथ—१ पंचांगशुद्धिरहस्य, २ सॉलिड जॉमेट्री ( इंटरचे विद्यार्थ्यांकरितां ), ३ आल्जिब्रा ( फर्स्ट इयरच्या विद्यार्थ्यांसाठीं ). यांशिवाय ना. गोखले यांचीं शालोपयोगी अंकगणितें यांनीं सुधारलीं.

**नागेश्वरराव, के. पंतलु गारु**—( जन्म स. १८६७–मृत्यु स. १९३८ ) आंध्र प्रांतांतील सुप्रसिद्ध काँग्रेस कार्यकर्ते व अमृतांजन या जगप्रसिद्ध औषधाचे जनक.

आंध्र प्रांतांतील एलकुरा हें गांव यांचें जन्मस्थान. गुंटुरचें ए. इ. एल्. एम्. कॉलेज व मद्रासचें ख्रिश्चन कॉलेज येथें आपलें शिक्षण संपवून हे मुंबईस आले. तेथें सुरवातीपासूनच यांचा उत्तम जम बसला व यांनीं लवकरच अमृतांजन डेपो उघडला ( १८९३ ). तेव्हांपासून पन्नास वर्षांपेक्षां अधिक कालांत अमृतांजनच्या सार्वत्रिक व सतत यशाचें श्रेय सर्वस्वी यांच्या धंद्यांतील कौशल्याला दिलें पाहिजे. अनेक पेन-बाम आले आणि गेले, पण यांचें अमृतांजन मात्र आपलें व त्याबरोबरच यांचें यश चिरस्थायी करून बसलें आहे.

परंतु एक यशस्वी धंदेवाला हें यांच्या कर्तबगारीचें क्षेत्र केवळ यांच्या राजकीय कार्याच्या पार्श्वभूमीसारखें

आहे. आंध्र प्रांतिक कॉंग्रेस कमेटी, ऑल इंडिया कॉंग्रेस कमेटी, आंध्र महासभा यांसारख्या संस्थांत जबाबदारीनें काम करून व आंध्र-पत्रिका ( प्रथम साप्ताहिक १९०८, नंतर दैनिक १९१४ ), भारती यांसारख्या पहिल्या दर्जाच्या तेलगु पत्रांचें संपादन करून आंध्र प्रांतांतील राजकीय चळवळींच्या जनकत्वाचा मान यांनीं प्राप्त करून घेतला होता. 'देशोद्धारक', 'विश्वदाता' या यांना लोकांनीं अर्पण केलेल्या पदव्या यांच्या निःसीम लोकप्रियतेचें प्रतीक आहेत. मध्यवर्ति कायदेमंडळांत हे निवडून आले होते.

**नातू, बाळाजीपंत नारायण**—( मृत्यु स. १८५० ) पुण्याची पेशवाई व साताऱ्याच्या छत्रपतींची गादी केवळ स्वार्थास्तव घालवावयास कारण झालेले राजकारणी गृहस्थ.

हे वाईजवळील पांचवडचे राहणारे. प्रथम साने यांचेकडे नोकरीस होते. साने कामानिमित्त यांना खंडेराव रास्ते यांच्याकडे पाठवीत. पुढें रास्ते यांनीं यांना आपल्याकडे नोकरीस घेतलें. शेवटीं त्यांचा यांच्यावर इतका विश्वास बसला कीं, मरतेसमयीं त्यांनीं यांना सर्व मुखत्यार नेमलें. यांनीं पण क. क्लोजच्या मार्फत रास्त्यांची थोडीबहुत व्यवस्था लावून दिली. स. १८०९ सालीं हे क. क्लोजबरोबर नोकर म्हणून माळव्यांत गेले. परत आल्यावर एल्फिन्स्टनची व यांची गांठ पडली व दोघांच्या सहवासाचें मैत्रींत रूपान्तर झालें. पेशव्यांचे आप्त थत्ते यांच्या मुलास यांनीं आपली मुलगी दिली होती. हे बाजीरावाच्या कडील इत्थंभूत बातमी काढून रेसिडेन्ड एल्फिन्स्टन यांजकडे पोंचवीत असत. या कामगिरीबद्दल त्यांनीं गव्हर्नर होण्यापूर्वी यांना वतन इनाम करून दिलें होतें.

सातारा येथील रेसिडेन्सीवर ग्रँट डफची नेमणूक झाली. त्यांचे हाताखालीं द. म. पांचशें रुपयांवर यांची नेमणूक झाली ( १८१८ ).

बाजीरावाच्या कारकीर्दीचा व विशेषतः शेवटचा तपशीलवार वृत्तान्त मुद्दाम ग्रँट डफच्या विनंतीवरून यांनीं लिहून दिला. त्याचा इंग्रजी तर्जुमा रिचर्ड मॉरिसनें करून डफ यास दिला. मूळ मराठी लेख यांनीं परत घेतला ( मराठी रियासत-अखेर पा. ४८१ ).

शेवटीं बाजीरावानें यांना आपल्याकडे ओढण्याचा प्रयत्न केला, इंग्रजांनीं यांना नोकर ठेवूं नये असाहि प्रयत्न केला. हेहि एकंदर प्रसंग पाहून देशत्याग करून काशीस जाण्याच्या तयारींत होते. पण एल्फिन्स्टनसाहेबांनीं यांना जमीन वगैरे देऊन येथें ठेवून घेतलें. १६ नवं. १८१७ रोजीं बाजीरावसाहेब पुण्याहून पळाले तेव्हां शनवारवाड्यावर इंग्रजांचें निशाण लावण्याचें काम कांहीं सैनिक बरोबर घेऊन जाऊन यांनीं पार पाडलें. तेव्हां पुढें शहराचा बंदोबस्त यांना सांगण्यांत आला.

साताऱ्याच्या राज्याचाहि त्वरित अधःपात होण्यास हे पुष्कळ अंशीं कारण झाले. केवळ स्वार्थासाठीं पेशव्यांचीं छिद्रें इंग्रजांस दाखवून यांनीं पेशवाईचें मरण जवळ आणलें. तसेंच पेशवाई संपल्यावर साताऱ्याच्या कारभारांत यांचा प्रवेश होऊन साताऱ्याची गादी त्वरित बुडविण्याचें श्रेयहि यांनीं घेतलें. मोठ्या खुबीनें वागून व अकल्प्य खटपटी करून यांनीं मोठमोठ्या अंमलदारांस आपल्या तंत्रानें वागविलें. खऱ्याखोट्याचा विधिनिषेध यांनीं कधींच बाळगला नाहीं. यांच्यावर लांचांचे व अपहाराचे असंख्य आरोप छापलेले आढळतात. तेव्हांहि वेदाचा अधिकार, जातिविषयक उच्चनीचतेचे बखेडे उत्पन्न करून पक्षोपपक्ष निर्माण करण्याचें यांचें काम तेथें चालू होतेंच. ब्राह्मण-ब्राह्मणेतरांचे वादाचा उगम शोधूं लागल्यास अव्वल इंग्रजींतील यांच्यासारख्या व्यक्ती मनांत आल्याशिवाय राहत नाहींत. यांचीं कृष्णकृत्यें जाहीर होऊन पेशवाई व साताऱ्याच्या छत्रपतींची गादी नष्ट करण्याचा दोष यांचे माथीं आल्यानें यांना बाहेर तोंड दाखविणेंसुद्धां पुढें अशक्य झालें. इंग्रजांनाहि यांचा विसर पडला. अशा दुःसह स्थितींत हे काशीयात्रेस निघून गेले. यांच्या पूर्वचारित्र्यामुळें यांना तेथें चतुर्थाश्रमसुद्धां कोणी देईना, असें म्हणतात. शेवटीं पश्चात्तप्त स्थितींत पापक्षालनार्थ चतुर्थाश्रम घेऊन यांनीं तेथें देह ठेवला.

यांच्या या स्वराज्यद्रोहामुळें यांच्या घराण्यांतील लोकांच्या पंक्तीला भोजनहि कांहीं स्वाभिमानी लोक करीत नसत, असें कै. अण्णासाहेब पटवर्धन यांच्या 'अप्रबुद्ध' यांनीं लिहिलेल्या चरित्रावरून दिसतें. मात्र यांनीं या कृत्यानें पैसा मात्र अगणित मिळविला असें यांच्या प्रचंड सावकारीवरून दिसून येतें.

**नाथमाधव**—( जन्म स. १८८२ एप्रिल ३–मृत्यु स. १९२८ ) मराठींतील सुप्रसिद्ध कादंबरीकार व लेखक.

यांचें नांव द्वारकानाथ माधव पितळे.जात–दैवज्ञ ब्राह्मण.

जन्मस्थान मुंबई. शिक्षण मॅट्रिकपर्यंत. यांनीं लष्करी खात्यांत नोकरी पत्करून हिंदुस्थानभर प्रवास केला. १९०५ च्या मे महिन्यांत सिंहगडावर वाघाची शिकार करण्याकरितां टेहळणीवर असतां शंभर फूट अणकुचीदार कड्यावरून घसरत हे खालीं पडले व त्या अपघातानें कमरेखालचा भाग लुला पडून हे कायमचे पंगू झाले. पण यांच्या या पंगूपणामुळें यांचें इंग्रजी-मराठी वाचन वाढलें आणि यांना लेखनाचा नाद लागला. मनोरंजन, वाग्विलास व केरळकोकिळ या मासिकांत हे प्रथम लिहीत. 'सायंकाळची करमणूक' हें यांचें पहिलें पुस्तक होय (१९०५). 'सावळ्या तांडेल' या कादंबरीनें यांच्याकडे सर्वांचें लक्ष वेधलें. सर डॉ. रामकृष्ण भांडारकर यांना एकदां आपल्या पुस्तकावर यांनीं अभिप्राय मागितला असतां त्यांनीं 'हें पुस्तक तूं कोणतें ध्येय पुढें ठेवून लिहिलें आहेस ?' असा प्रश्न केला. तेव्हां यांना उत्तर देतां येईना. तेव्हांपासून हें ध्येयपूर्वक लिहूं लागले. यांच्या विहंगवृन्द, विमलेची ग्रहदशा व डॉक्टर या कादंबऱ्यांत सामाजिक प्रश्नांची चर्चा केलेली आढळते. 'हिन्द एजन्सी'च्या एक आणा मालेतून यांचीं पुष्कळ पुस्तकें प्रसिद्ध झालीं. त्या मालेची कल्पना यांचीच असून यांच्या लेखनामुळें ती अत्यंत लोकप्रिय झाली होती. पुढें 'केरळकोकिळ' व 'नवें मन्वन्तर' अशा संयुक्त नांवाचें मासिक हे व आठल्ये यांच्या संपादकत्वाखालीं निघे. त्यांत हे सन्तचरित्रमाला व स्वामिशिष्यसंवाद हीं प्रकरणें लिहीत.

यांच्या ऐतिहासिक कादंबऱ्या अत्यंत लोकप्रिय झाल्या. त्याकरितां हे तज्ज्ञांशीं चर्चा करीत व ऐतिहासिक स्थळांचीं टिपणें उपयोगांत आणीत. मराठ्यांच्या इतिहासावर ३५ कादंबऱ्या लिहिण्याचा यांचा विचार होता, पण सात प्रसिद्ध झाल्यावर हे कालवश झाले. एक वर्षाच्या आंत या कादंबऱ्यांना द्वितीय आवृत्तीचा योग आला. यांनीं लिहिलेल्या नाटकांपैकीं कांहीं रंगभूमीवर लोकप्रिय झालीं. यांची लेखनशैली साधी, सुटसुटीत, प्रेमळ व किंचित् करुण आहे. यांच्या इतपत वैचित्र्य मराठींतील इतर लेखकांत क्वचित् आढळतें. यांचें लेखन परिणामकारक असून वाचकांच्यावर पकड बसविणारें बहुजन समाजाचें लक्ष वेधून घेणारें असे.

यांनीं ऐतिहासिक १२, सामाजिक २५ अशा ३७ कादंबऱ्या, ७ नाटकें, ३ प्रहसनें व ४ इतर पुस्तकें इतकें वाङ्मय लिहिलें.

**नाथूराम, शंकर शर्मा**—(जन्म स. १८५९–मृत्यु स. १९३२) उर्दू व हिंदी भाषेंतील सुप्रसिद्ध कवि व लेखक.

यांचा जन्म हरदुआगंज अलीगढ येथें झाला. यांच्या पित्याचें नांव रूपरामजी शर्मा. हे गौड ब्राह्मण आर्यसमाजी होते. यांनीं कानपूर येथें कांहीं वर्षे नोकरी केली व पुनः आपल्या जन्मस्थानीं येऊन वैद्यकी करण्यास सुरुवात केली. वैद्य म्हणून यांची उत्तम कीर्ति होती. यांना 'पीयूषपाणि' वैद्य समजत.

उत्कृष्ट समस्यापूर्ति करणारे कवि म्हणून यांची प्रथम प्रसिद्धि झाली. त्याकरितां यांना अनेक मूल्यवान् पारितोषिकें मिळालीं. हे समस्यापूर्ति व्रजभाषेंत करीत. पण पुढें हे 'खडी बोली' हिन्दींत कविता करूं लागले. आधुनिक विषय घेऊन हे उत्तम कविता करीत. यांची कविता अत्यंत सरस मानली जाते. मात्रिक छंदांतहि हे अक्षरसंख्या सारखी राखीत. यांनीं हिंदी भाषेंतील अनेक निनावी छन्दांचीं केलेलीं मिलिन्दपाद, शंकरछंद, राजगीत हीं नामकरणें आतां सर्वमान्य झालीं आहेत. 'कविराज,' 'कविशिरोमणि' वगैरे अनेक पदव्या यांना मिळाल्या. यांनीं अनेक पुस्तकें लिहिलीं. त्यांपैकीं पुढील प्रसिद्ध आहेत. १ शंकरसरोज, २ अनुरागरत्न, ३ गर्भरण्डारहस्य, ४ वायसविजय. यांचें फुटकळ गद्यलेखनहि पुष्कळ आहे.

**नानल, आयुर्वेदाचार्य पुरुषोत्तमशास्त्री गणेशशास्त्री**—(जन्म स. १८९४–मृत्यु स. १९४४) पुण्याचे सुप्रसिद्ध वैद्य व आयुर्वेदाच्या सृष्टींत नवयुग निर्माण करणारे कार्यकर्ते.

वडील व बाळशास्त्री लागवणकर यांचे जवळ संस्कृत व आयुर्वेद यांचें अध्ययन करून यांनीं वैद्यभूषण व आयुर्वेदाचार्य अशा पदव्या संपादन केल्या. १९१८ सालीं इन्फ्लुएन्झाच्या साथींत आयुर्वेदाच्या पद्धतीनें रुग्णालय चालवून हे लोकांच्या पुढें आले. १९२० च्या राष्ट्रीय शिक्षणाच्या लाटेंत निघालेल्या टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचें आयुर्वेद महाविद्यालय व्यवस्थित चालवून त्याला ताराचंद रामनाथ रुग्णालय व आयुर्वेद रसशाळा यांची जोड देण्यांत यांची योजकता चांगली दिसून आली. त्या संस्थांची प्रचंड वाढ होण्यांत यांच्या अनेक गुणांचा उपयोग झालेला आहे. यांचा खासगी धंदा मोठा असून राजेरजवाड्यांत यांची मान्यता चांगली असे. आयुर्वेदाला पाश्चात्य शल्यतंत्र व शारीर यांची

जोड द्यावी अशा मताचे हे असल्यानें शुद्ध आयुर्वेदाभिमान्यांशीं यांचा मतभेद झाला. सरकारनें इंडियन मेडिकल रेजिस्ट्रेशन ॲक्ट पसार केला, नोंदणी करून वैद्यांची प्रतिष्ठा वाढविली व यांना त्या कायद्याप्रमाणें नेमलेल्या प्रान्तिक बोर्डावर सभासद म्हणून घेतलें, त्यामुळें यांचें कार्य फोंफावलें. यांनीं 'भावप्रकाशाचें मराठी भाषान्तर,' 'विषतंत्र' वगैरे पुस्तकें प्रसिद्ध केलीं.

यांनीं वैद्यसंमेलनपत्रिकेचें दोन वर्षे संपादन केलें. यांच्या स्मरणार्थ तीन लाख रुपये जमवून आयुर्वेद पद्धतीनें चालणारें 'क्षयरोग रुग्णालय' चालविण्याचें यांच्या स्मारक मंडळानें ठरविलें आहे.

**नानालाल दलपतराम**—(जन्म स. १८७७–मृत्यु स. १९४६ जाने. १०) आधुनिक गुजराथी वाङ्मयांतील थोर कवि.

यांचे वडील दलपतराम डाह्याभाई हेहि गुजराथी कवि होते. त्यांचे हे चवथे पुत्र. जात–श्रीमाली ब्राह्मण. यांचा जन्म अहमदाबाद येथें झाला. हे लहानपणीं अत्यंत उनाड असल्यानें यांना स्व. प्रा. काशीराम दवे यांच्याजवळ मोर्वीस ठेवण्यांत आलें होतें. हे १९०१ सालीं एम्. ए. झाले. यांनीं मुख्याध्यापक, प्राध्यापक, मुख्य न्यायाधीश, दिवाण, व्हा. प्रिन्सिपल, शिक्षणाधिकारी वगैरे कामें केलीं. या अवधींत राजकोटचे सरकार स्व. सर लाखाजी राजे यांची यांजवर अत्यंत कृपा असे. पण १९२१ च्या नवंबरांत यांनीं कलकत्त्यांतील सरकारच्या अत्याचारांना विरोध म्हणून नोकरीचा राजीनामा दिला.

यांची लेखणी सर्वगामी असली तरी हे विशेषतः कवि म्हणून ओळखले जातात. भगवद्गीतेचा अनुवाद यांनीं आपल्या वडिलांना व आपल्या काव्यांचा दुसरा भाग प्रा. दवे यांना अर्पण केला. त्या दोन्ही अर्पणपत्रिका यांच्या विशिष्ट लेखनशैलीमुळें गुजराथी वाङ्मयांत चिरंजीव झाल्या आहेत. यांचें 'वसंतोत्सव' काव्य प्रथम ज्ञानसुधेंत १८९९ सालीं प्रसिद्ध झालें. त्याचा गुजराथी साहित्यावर आश्चर्यकारक परिणाम झाला. सर्व नवे लेखक यांच्या शैलीचें अनुकरण करूं लागले. येथून पुढला काळ गुजराथी वाङ्मयांत 'नानालाल युग' या नांवानें संबोधला जाऊं लागला इतका यांच्या शैलीचा जनतेवर प्रभाव पडला. यांचीं नाटकें व गद्यलेखनहि यांच्या काव्याप्रमाणेंच यांच्या स्वतंत्र प्रतिभेचीं द्योतक आहेत. गुजराथेंत यांच्या वाङ्मयाचा थोडा तरी परिचय नाहीं असा मनुष्य क्वचितच सांपडेल. यांना कविसम्राट असें गौरवानें म्हणत.

यांच्या सुवर्ण व हीरक-महोत्सवाच्या वेळीं सबंध गुजराथमध्यें जो उत्साह दिसून आला तो यांच्या निःसीम लोकप्रियतेचा द्योतक होता. 'कुरुक्षेत्र' या यांच्या अलीकडील महाकाव्याला तर भावनगरच्या महाराजांनीं ५०० रु. बक्षिस दिलें.

यांचें वाङ्मयः—

१. कविताः—गर्बे (१-२ भाग), गज्जल, गाणीं व इतर कविता (१-२ भाग), वसंतोत्सव (१९०५), चित्रदर्शनो (१९२१), गीतमंजरी (१९२८), औजा अने आगार (१९३३). २. महाकाव्यः—१ कुरुक्षेत्र (७ भाग १९२६), २ प्रेमकुंज. ३. नाटकेंः—१ इंदुकुमार (भाग १-३), २ जयाजयंत (१९१४), ३ राजर्षि भरत (१९२२), ४ विश्वगीता (१९२७), ५ जहांगीर नूरजहान (१९२८), ६ शेहानशहा अकबर (१९३०), ७ संघमित्रा (१९३१), ४. कादंबरीः—१ उषा (१९१८). ५. निबंध व व्याख्यानेंः—१ साहित्यमंथन (१९२४), २ उद्बोधन (१९२७), ३ संसारमंथन (१९२७), ४ अर्धशताब्दिना बे बोलो (१९२७). ५. कवीश्वर दलपतरामचरित्र, (१९३३) इत्यादि.

**नामजोशी, महादेव बल्लाळ**—(जन्म स. १८५३–मृत्यु स. १८९६) महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध सार्वजनिक कार्यकर्ते व चतुरस्र पुरुष.

हे दोनदां मॅट्रिकच्या परीक्षेस बसले पण दोन्ही वेळां यांचें नांव उत्तीर्ण म्हणून प्रसिद्ध झालें नाहीं. पण पुढें यांना वाण्याचे दुकानीं रद्दींत मॅट्रिक परीक्षेचे तपासलेले यांचे पेपर मिळाले. त्यावरून तक्रार करितां यांचें नांव उत्तीर्ण म्हणून प्रसिद्ध करण्यांत आलें (१८७५).

यांचें सार्वजनिक कार्य 'किरण' नांवाच्या इंग्रजी-मराठी पत्रानें सुरू झालें (पहिला अंक १८७७, ऑगस्ट २६). त्या वेळीं रशिया-तुर्कस्थानची लढाई चालू होती. शिंदे-होळकर हे रशियाशीं कारस्थान करीत आहेत अशा प्रसिद्ध झालेल्या बातमीस यांनीं सडेतोड उत्तर दिलें. त्याशीं संबंध सोडल्यावर यांनीं 'डेक्कन स्टार' नांवाचें इंग्रजी पत्र काढलें. तें पुढें निघालेल्या 'मराठा' पत्रांत समाविष्ट करण्यांत आलें.

विष्णुशास्त्री चिपळुणकर यांनीं मोरोबादादाच्या वाड्यांत सुरू केलेल्या न्यू इंग्लिश स्कूलमध्यें पहिल्या दिवसापासून हे होते. हे पदवीधर नसल्यानें यांच्याकडे शिक्षणाशिवाय जागा, द्रव्य वगैरे मिळवण्याचीं इतर बाहेरचीं कामें येत.

टिळकांप्रमाणें हे डे. ए. सोसायटींतून बाहेर पडले नाहींत तरी पुढें हे तेथें राहून बाहेरच्या चळवळींत अधिक लक्ष देत. यांनीं टिळकांशीं केलेल्या सहकार्यानें लोकांत त्या वेळीं टिळक-नामजोशी हें जोड-नांव रूढ झालें होतें.

औद्योगिक चळवळीकडे यांचें प्रथमपासून लक्ष असे. ' शिल्पकलाविज्ञान ' हें मासिक सुरू करून ( १८८७ ) यांनीं आमरण चालविलें. यांनीं औद्योगिक परिषद सुरू केली. मुंढव्याची डेक्कन पेपर मिल, पुणें म्युनिसिपालिटीचें व्हिक्टोरिया ज्युबिली टेक्निकल स्कूल, रे इंडस्ट्रिअल म्युझियम, भांडीं, तार, रेशीम वगैरेच्या गिरण्या यांपैकीं यांनीं सुरू केलेले कांहीं उद्योग अद्यापहि टिकून आहेत.

१८८९ मध्यें कॉंग्रेसचें अधिवेशन पुण्यास कॉलरा असल्यानें मुंबईस भरलें. टिळक व हे यांनीं त्याकरितां दहा हजार रुपये मिळवून दिले. शेअर काढून भांडवल उभारण्याची पद्धत यांनीं पुष्कळ उपयोगांत आणली. हुन्नरविषयक, वाचनपाठमाला, कोश वगैरे पुस्तकें करण्याकडेहि यांचें लक्ष असे. सार्वजनिक दृष्टि व हिकमती स्वभाव यांचा यांच्यांत चांगला मेळ असे.

**नायडू, कोट्टारी कनकय्या**—(जन्म स. १८९५) जगप्रसिद्ध क्रिकेटपटु.

यांचें शिक्षण हिस्लॉप कॉलेज, नागपूर येथें इंटरपर्यंत झालें. यांचें क्रिकेटचें शिक्षण श्री. राजलिंगम् व श्री. भाऊसाहेब भिडे यांच्या हाताखालीं झालें. कॉलेजमध्यें असल्यापासून क्रिकेट व हॉकी यांमध्यें यांचें विशेष नैपुण्य दिसून आलें. १९०५ सालीं मुंबई येथील क्रीडांगणावर हे प्रथम वाय्. एम्. सी. ए. स्पोर्टस् चँपियन आले. १९१६ सालीं मुंबईच्या चौरंगी सामन्यांत यांचा प्रवेश झाला. हिंदुस्थानांत आलेल्या एम्. सी. सी. टीमविरुद्ध हे खेळले व एका मॅचमध्यें ११ ओव्हर बाउंडरीज ( सिक्सर्स ) व १३ बाउंडरीज ( फोर्स ) मारून यांनीं १५३ धांवा काढल्या. त्या वेळीं यांच्या १ तास १३ मिनिटांमध्यें १०० धांवा पडल्या. विलायतेस गेलेल्या हिंदी टीमचे हे कप्तान होते. तिकडे यांना गौरवानें ' काळा ब्रॅडमन ' म्हणत. १९१६-१९३५ पर्यंत यांनीं अगदीं तुफानी खेळ खेळून हिंदी क्रिकेटचें स्वरूप अगदीं बदलून टाकलें. यांच्या बॅटिंगची गणती–डाव ४४, नाबाद ४, जास्तींतजास्त धांवा १५५, एकूण धांवा १९३४, सरासरी ४८·३५ अशी पडते. विजय मर्चंट पहिले व हे दुसरे येत असले तरी एकूण धांवा यांच्याच अधिक आहेत.

१९३६ मधल्या युरोपांतील दौऱ्यांतहि यांनीं अकराशें दोन धांवा काढल्या. रणजी आणि धुलीपसिंग यांनंतर क्रिकेटमध्यें आन्तरराष्ट्रीय कीर्ति मिळविणारे हेच होत. हे तुफानी आक्रमक खेळ खेळतात; तसेंच संरक्षक खेळ खेळण्यांतहि हे कुशल आहेत. इंदूरच्या परदेशी संघाविरुद्ध खेळत असतां यांनीं पांच तासांत फक्त दहा धांवा काढल्या. फिल्डर्सची मांडणी व खेळाडूंच्या गुणाचें ज्ञान हे कप्तानांत अवश्य असणारे गुणहि यांच्यांत आहेत.

इंदूर संस्थानांत ए. डी. सी. व आर्मी-सेक्रेटरी म्हणून यांनीं केलेल्या कामाबद्दल इंदूर सरकारनें यांना मुन्तझीम बहाद्दुर ( १९३९ ), दिलेरजंग ( १९४० ) व वफदान-इ-दौलत इत्यादि पदव्या दिल्या आहेत.

**नायडू, सरोजिनी**—(जन्म स. १८७९ फेब्रु. १३) हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध राजकारणी, इंग्रजी भाषेंतील जगप्रसिद्ध कवयित्री व जगांतील पांच वक्त्यांपैकीं एक.

यांच्या पित्याचें नांव अघोरनाथ चतर्जी. १२ व्या वर्षी या मद्रास युनिव्हर्सिटीच्या मॅट्रिक झाल्या व सोळाव्या वर्षी या इंग्लंडला गेल्या ( १८९५ ). लंडन व केम्ब्रिज येथें शिक्षण घेतल्यावर प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें या इटलींत जाऊन परत आल्या ( १८९८ ). इकडे आल्यानंतर यांनीं डॉ. गोविंद राजुलू नायडू यांचेबरोबर विवाह केला. हा विवाह बंगाल व मद्रास असा आन्तरप्रान्तीय व ब्राह्मणब्राह्मणेतर असा आन्तरजातीय होता.

यांच्यांत काव्यशक्ति लहानपणापासून आहे. वडिलांच्या प्रेरणेनें काव्य करण्यास यांना उत्तेजन मिळालें. यांच्या कविता इंग्लंडमध्यें अतिशय लोकप्रिय झाल्या आहेत. यांच्या पुष्कळ कवितांचें युरोपीय व देशी भाषांत भाषान्तर झालें आहे. यांच्या कवितेंत राष्ट्रीय दृष्टिकोन, स्वरमाधुर्य, क्षोभकारक विचारप्रवाह, मांडणीचा

विशेषपणा व कल्पनासौंदर्य असल्याबद्दल डब्ल्यु. बी. यीट्स, आर्थर सिमन्स वगैरेंनीं लिहिलें आहे. शुद्ध हिंदी वातावरण व भाषाप्रभुत्व यांबद्दलहि यांची प्रशंसा आहे.

जगप्रसिद्ध वक्त्यांत ज्यांची गणना होते अशांपैकीं या एक होत. इंग्रजीप्रमाणेंच यांना पुष्कळ भाषा येतात. वक्तृत्वाच्या बाबतींत यांना जादूगार समजण्यांत येतें. कल्पनेचा प्रक्षोभकपणा, स्वरमाधुर्य व भाषाप्रभुत्व यांमुळें यांचीं भाषणें अत्यंत परिणामकारक होतात. यांच्या काव्याप्रमाणेंच यांच्या वक्तृत्वाच्या सफरींनीं या युरोपभर प्रसिद्ध आहेत. या हिंदी स्त्रियांना बौद्धिक ध्येयरूप असून यांना पूर्व-पश्चिम ऐक्याची शान्तिदूती मानण्यांत येतें.

हिंदुस्थानाच्या सर्व प्रकारच्या उत्कर्षाची यांना अत्यंत उत्कंठा असून त्याकरितां या कोणताहि त्याग करण्यास तयार आहेत. या अनेक वेळां तुरुंगांत गेल्या असून पुष्कळ काळपर्यंत या कांग्रेस वर्किंग कमेटीच्या सभासद आहेत. यांना राष्ट्रसभेचें अध्यक्षस्थान देऊन यांच्या कार्याचा गौरव करण्यांत आला ( १९२५ कानपूर ). १९३२ सालींहि तुरुंगांत असणाऱ्या पं. मालवीयांसाठीं यांनीं दिल्लीस अध्यक्षाचें काम केलें. राउंड टेबल कॉन्फरन्सलाहि या निमंत्रित म्हणून म. गांधींबरोबर गेल्या होत्या ( १९३१ ). हिंदुस्थान सरकारतर्फे आफ्रिकेला गेलेल्या शिष्टमंडळांत या होत्या.

समाजसुधारक म्हणून जशी यांची ख्याति आहे तसेंच स्त्रियांनीं पुरुषांच्या बरोबरीनें सर्व व्यवहारांत भाग घ्यावयास पाहिजे असेंहि यांचें म्हणणें आहे. रवीन्द्रनाथ टागोरांच्या खालोखाल जगांत प्रसिद्ध असणारी ही स्त्री हिंदु-मुसलमानांच्या ऐक्याप्रमाणेंच पूर्व-पश्चिम ऐक्याचीहि आवश्यकता प्रतिपादणारी आहे. स्फूर्तिदानाच्या यांच्या विशेष शक्तीनें या तरुणांना तेव्हांच भारून टाकतात.

यांचें इंग्रजी काव्यवाङ्मय—( 1 ) The Golden Threshold ( 1905 ), ( 2 ) The Broken Wing ( 1912 ), ( 3 ) The Bird of Time ( 1617 ).

यांच्या व्याख्यानांचा संग्रह मद्रासच्या नटेसन कंपनीनें प्रसिद्ध केला आहे.

**नायर, सर सी. शंकरन्**—( जन्म स. १८५७–मृत्यु स. १९३४ ) मद्रास हायकोर्टांतील न्यायमूर्ति, राष्ट्रसभेचे अध्यक्ष, हिंदुस्थान सरकारचे एक्झिक्युटिव कौन्सिलर व स्वाभिमानी गृहस्थ.

हे मद्रास युनिव्हर्सिटीच्या मॅट्रिकच्या परीक्षेस बसले आणि नापास झाले. लागलीच परीक्षेचा नाद सोडून यांनीं पोस्ट खात्यांत कारकुनीच्या जागेकरितां अर्ज केला. त्या वेळीं मद्रासचे पोस्टमास्तर मि. पिटर यांनीं यांची समजूत घालून यांना पुनः मॅट्रिकच्या परीक्षेस बसण्यास भाग पाडलें. त्यामुळें हे पुनः परीक्षेला बसले आणि यांचा पहिला नंबर येऊन यांना अनेक पारितोषिकें मिळालीं. वकिली करावयास लागतां वकील म्हणूनहि यांची अत्यंत ख्याति झाली. हे मद्रासला हायकोर्ट वकील, सरकारी वकील, पब्लिक प्रॉसिक्यूटर, ॲडव्होकेट जनरल, हायकोर्टांतील न्यायमूर्ति व कायदेमंडळांतील सभासद, व्हाइसरॉयचे एक्झिक्युटिव कौन्सिलर (१९१५-१९१९ ), लंडन स्टेट सेक्रेटरीच्या इंडिया कौन्सिलचे सभासद ( १९१९-२१ ), कौन्सिल ऑफ स्टेटचे लोकनियुक्त सभासद ( १९२५ ) व सायमन कमिशनबरोबरच्या सेंट्रल लेजिस्लेचर कमेटीचे चेअरमन होते ( १९२८ ).

स. १८९७ सालीं अमरावती राष्ट्रसभेचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें. यांनीं पंजाब प्रकरणाच्या निषेधार्थ व्हाइसरॉयच्या एक्झिक्युटिव कौन्सिलवरच्या जागेचा राजीनामा देऊन लोकप्रियतेचें शिखर गांठलें. यांनीं 'गांधी व अराजकता' नांवाचें पुस्तक लिहिलें. त्यांत म. गांधींवर हे तुटून पडले. पंजाबचे ले. गव्हर्नर सर मायकेल ओडवायर यांनीं यांच्यावर या पुस्तकाबाबत फिर्याद केली. तेव्हां यांना खर्चाबद्दल व अब्रुनुकसानीबद्दल तीन लाख रुपये भरावे लागले. हे कोणावर केव्हां तुटून पडतील याचा नेम नसे. वरीलप्रमाणें त्याचा परिणाम यांना कांहीं वेळां भोगावा लागे. हे मद्रास रिव्ह्यू, मद्रास लॉ जर्नल, मद्रास स्टँडर्ड यांचे जनक व कांहीं काळ संपादकहि होते.

स्वाभिमान संरक्षणाचा प्रश्न आला म्हणजे हे कोणाचाहि मुलाहिजा ठेवीत नसत. एकदां मद्रासच्या गव्हर्नरकडे खाना होता. भोजनसमयीं गप्पा मारतांना गव्हर्नर म्हणाले, " आतां हेंच पहाना, हिंदी लोकांना आमच्याकडे खाण्यासाठीं बोलावण्यांत आम्हांला कमीपणा वाटत नाहीं. हें कशाचें लक्षण ? बदलत्या परिस्थितीचेंच ना ?" यांना ही अपमानकारक भाषा सहन झाली नाहीं. हे तात्काळ म्हणाले, 'तुम्हाला काय

वाटतें, हिंदी लोकांना खान्याला बोलावून तुम्ही त्यांचा सन्मान करतां म्हणून ? नाहीं. तुमचा तो भ्रम आहे. तुमच्या पंक्तीला बसणें आम्हांला आवडत नाहीं. मी गव्हर्नरच्या पंक्तीला बसून जेवलों ही बातमी जर माझ्या आईला समजली तर एका म्लेंछाच्या पंक्तीला भोजन करून पतित झाल्याबद्दल मला गंगोदकानें प्रायश्चित्त घ्यावें लागेल.' या उत्तरानें खाना कसा तरी संपवून सर्वांना बाहेर पडावें लागलें.

पहिल्या युद्धाच्या वेळीं द्रव्यसाहाय्य मिळविण्याकरितां मद्रासच्या नागरिकांची जाहीर सभा भरविण्यांत आली. व्यासपीठाकडे जाण्यास हिंदी व युरोपियन वक्त्यांकरितां निरनिराळे रस्ते ठेविले होते. हे बोलण्याकरितां व्यासपीठाकडे जाण्यास निघतांच सार्जंटानें यांना अडविलें व हिंदी लोकांकरितां राखून ठेवलेल्या रस्त्यानें जाण्यास सांगितलें. तेव्हां हे This is disgraceful असें म्हणून व्यासपीठाकडे न जातां हे तडक बाहेर निघून गेले. गव्हर्नरसाहेबांच्या ए. डी. सी. नें यांची समजूत घालण्याचा प्रयत्न केला, पण व्यर्थ.

सायमन कमिशन हिंदुस्थानात आलें असतां असाच प्रसंग पुणें स्टेशनवर घडला. कमिशनच्या निषेधाकरितां जमलेल्या काळेनिशाणवाल्यांच्या बंदोबस्ताकरितां पोलिसांनीं कडक बंदोबस्त ठेवला होता. इंडियन सेंट्रल कमेटीचे अध्यक्ष म्हणून हे कमिशनच्या स्वागताकरितां जात असतां मोटारसह पोर्चमध्यें यांना जाऊं दिलें नाहीं. तेव्हां हे तडक परत फिरले आणि यांच्याशिवाय स्वागत पार पडलें. दुसरे दिवशीं वृत्तपत्र वाचीत असतां ही माहिती सर जॉन सायमन यांना मिळाली.

यांचे ग्रंथ:—Gandhi and Anarchy (1922).

**नारळीकर, रँग्लर विष्णु वामन**—(जन्म स. १९०८) सुप्रसिद्ध गणितशास्त्रज्ञ व जगप्रसिद्ध अभ्यासक.

हे कोल्हापूरचे राहणारे. १९२८ सालीं बी. एससी. परीक्षेंत हे पहिले आले. मंगळदास, टाटा व कोल्हापूर राज्य अशा तीन शिष्यवृत्त्या मिळवून हे विलायतेस गेले व हे बी-स्टार-रँग्लर झाले (१९३०). त्या वेळीं यांना टायसन-पदक व आकाश-ज्योतिष विषयाबद्दल बक्षिस मिळालें. शिवाय यांस जादा न्यूटन–शिष्यवृत्ति मिळून जोसेफ लार्मर यांच्या हाताखालीं विश्वरचनेचा अभ्यास करण्याकरितां देण्यांत आलें. त्याच्या पुढल्याच वर्षी न्यूटन-शिष्यवृत्ति देऊन आर्थर एडिंगटन यांचेकडे संशोधनकार्याकडे यांना घेण्यांत आलें. त्याच कालांत ग्रीनिच वेधशाळेंतहि यांना कांहीं महिने काम करण्याची संधि मिळाली. १९३२ मध्यें यांना केम्ब्रिज युनिव्हर्सिटी रेले प्राइझ देण्यांत आलें. तें यांस विश्वरचनेवरील कांहीं विचार, गणितज्योतिषांतील गतींच्या समीकरणाची विशिष्ट मांडणी व सापेक्षताशास्त्र या तीन विषयांवर उत्कृष्ट निबंध लिहिल्याबद्दल मिळालेलें आहे. हिंदुस्थानांत परत आल्यावर पं. मालवीयांनीं यांना बनारस हिंदुविश्वविद्यालयांत बोलाविलें. तेथें क्रमानें यांच्यावर सर्व गणित विषयाची जबाबदारी सोंपविण्यांत आली.

यांनीं केलेल्या संशोधनाची माहिती द्यावयाची म्हणजे किती तरी गोष्टींचा उल्लेख करावा लागेल. विशेषतः यांचें संशोधन विश्वकल्पना, विश्वरचना, सापेक्षतासिद्धान्त व गणितज्योतिषांतील गतिविषय, ताऱ्यांच्या उत्क्रान्तीचें गणित, अभ्रिका (Nebulæ)च्या गति, गुरुत्वाकर्षण व तत्संबंधीं निरनिराळे विचार, दिङ्निष्ठ संख्यागणित इत्यादि विषयांत असून यांनीं लिहिलेल्या निबंधांची संख्याच साठ आहे (१९३०-४५).

हे निबंध करंट सायन्स, नेचर, रॉयल अस्ट्रॉनॉमिकल सोसायटी, फिलॉसॉफिकल मॅगॅझिन, इत्यादि प्रसिद्ध नियतकालिकांतून प्रसिद्ध झाले असून त्यांबद्दल यांची फारच स्तुति झाली आहे व पुढेंहि पुष्कळदां आधारार्थ उल्लेखिले जाण्याची पात्रता त्यांत आहे.

मुंबई युनिव्हर्सिटीनें १९३२ सालीं सापेक्षतासिद्धान्त व विश्वरचना, पुनः १९३८ सालीं गुरुत्वाकर्षणावर व पाटणा युनिव्हर्सिटीनें लहरींचें गतितंत्र (Wave Mechanics) या विषयांवर यांचीं व्याख्यानें करविलीं.

गेल्या २५-३० वर्षांत गणितशास्त्रांत यांच्या इतकें दूरगामी व व्यापक संशोधन भारतांत क्वचितच झालें असेल. यांनीं केलेल्या या निरनिराळ्या क्षेत्रांतील संशोधनामुळें रॉयल अस्ट्रॉनॉमिकल सोसायटी, नॅशनल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्सेस, नॅशनल अकॅडमी ऑफ सायन्सेस, इंडियन अकॅडमी ऑफ सायन्सेस इत्यादि सर्वमान्य संस्थांचें सभासदत्व यांना देण्यांत आलें आहे. असला हा सन्मान फारच थोड्यांना देण्यांत येतो. यांचें खाजगी आयुष्य सरळ आणि निगर्वी आहे. प्रत्येकानें आपल्या योग्यतेनुसार कार्य करीत राहावें, असें यांचें साधें तत्त्वज्ञान आहे.

**नारंग, सर गोकुळचंद**—( जन्म स. १८७८ ) पंजाबांतील सार्वजनिक कार्यकर्ते व लेखक.

यांचें शिक्षण पंजाब, कलकत्ता, बर्न इत्यादि विद्यापीठांतून झालें. हे एम्. ए., पीएच. डी., बार-ॲट-लॉ आहेत. कांहीं दिवस हे बॅरिस्टर म्हणून काम करीत. हे पंजाब सरकारचे मंत्री होते.

यांचे ग्रंथ—( 1 ) The Message of the Vedas, ( 2 ) Tranformation of Sikhism.

**नॉर्थब्रुक, थॉमस जॉर्ज बरिंग, फर्स्ट अर्ल ऑफ**—( जन्म स. १८२६–मृत्यु स. १९०४, कारकीर्द १८७२ मे–१८७६ एप्रिल ) हिंदुस्थानचे गव्हर्नर जनरल व व्हाइसरॉय.

यांचें शिक्षण ख्रिस्त चर्चमध्यें झालें. अनेक ठिकाणीं कामें केल्यावर हिंदुस्थानचे अंडर-सेक्रेटरी म्हणून यांची नेमणूक झाली ( १८५७-५८ ). तेव्हांपासून हिंदुस्थानशीं यांचा संबंध आला. हे लॉर्ड मेयोनंतर गव्हर्नर-जनरल व व्हाइसरॉय म्हणून हिंदुस्थानांत आले. आर्थिक व्यवहाराकडे यांचें लक्ष असे व तो अत्यंत चोख ठेवण्याचा हे प्रयत्न करीत. १८६९ सालीं फर्डिनंड डी लेसेप्स या फ्रेंच एंजिनियरनें खोदलेला सुवेझचा कालवा खुला झाला, तेव्हां इंग्लंड-हिंदुस्थान यांचा व्यापार वाढला. मँचेस्टरवरील जकात रद्द करण्याची सूचना हिंदुस्थानच्या हिताच्या दृष्टीनें यांनीं नाकारली. प्राप्तीवरील जकात रद्द केली. फक्त मिठावरील कर ठेवला. १८७४ च्या दुष्काळांत लोकांस मदत केली. मल्हारराव गायकवाड पदच्युत होऊन सयाजीराव गायकवाड गादीवर आले. अफगाणिस्थानचे अमीर शेरअल्लीनें रशियाविरुद्ध मदत मागतां यांनीं नाकारली, पण त्यांना सहा हजार बंदुका नजर केल्या. कापसावर बसविण्याच्या करासंबंधीं स्टेट सेक्रेटरीशीं मतभेद झाल्यानें यांनीं राजीनामा दिला.

**नासिरउद्दीन, हैदर**—( कारकीर्द स. १८२७–१८३७ ) अयोध्येचे नवाब.

गाझीउद्दीन हैदर मृत्यु पावल्यावर त्याचा मुलगा सुलेमानशहा वरील नांव धारण करून गादीवर बसला. याच्या हातांत बापाचा दहा कोटींचा खजिना आला. बापाचा आगा मीर नांवाचा मंत्री कमी करून मेहेंदी अल्लीखान ऊर्फ हकीम मेहेंदी या जुन्या प्रधानास यांनीं पुनः कामावर घेतलें. मिस् वाल्टर्स नामक युरोपियन स्त्रीशीं यांनीं विवाह केला व तिचें नांव 'मुकंदरा औलिया' असें ठेवलें. दिल्लीच्या बादशाहजादीशीं यांनीं लग्न लाविलें व तिचें नांव 'ताजमहाल' असें ठेवण्यांत आलें. ह्यांशिवाय अनेक स्त्रिया यांच्या रंगमहालांत अग्रगण्य होत्या. त्यांच्या खर्चाकरितां यांनीं बासष्ट लाख रुपये पांच टक्के व्याजानें ईस्ट इंडिया कंपनीकडे ठेवले होते.

यांनीं तीन लक्ष रुपये चार टक्के व्याजानें ब्रिटिश रेसिडेंटाच्या ताब्यांत देऊन त्याच्या व्याजाचा खर्च अनाथ, अंध पंगु लोकांना दानधर्म करण्याकडे करावा अशी तजवीज केली होती. तसेंच दरमहा तीन हजार रुपये लखनौच्या पाठशाळेकडे नेमून दिले होते. याशिवाय यांनीं जागोजाग दवाखाने व अन्नछत्रें उघडलीं होतीं. यांचें खासगी चरित्र वुइल्यम नाइटन नांवाच्या यांच्या पदरच्या चित्रकारानें 'प्रायव्हेट लाइफ ऑफ ईस्टर्न किंग' या नांवानें लिहिलें आहे. त्यांत अनेक मौजेच्या गोष्टी आहेत.

यांनीं एक युरोपियन न्हावी सर्फराजखान पदवी देऊन आपल्या पदरीं बाळगला होता. न्हाव्याविरुद्ध 'आग्रा अखबार'मध्यें विरुद्ध टीकापर लेख येत त्याला उत्तर देण्याकरितां शंभर रुपये पगाराचा इसम ठेवला होता. न्हाव्यानें यांना खूष ठेवून चोवीस लक्षांची संपत्ति मिळविली. अशा लोकांच्या संगतीनें यांनीं आपला पुत्र मुन्नाजान याचा गादीवरचा हक्क नष्ट केला. हकीम मेहेंदी दिवाण होता तोंपर्यंत कसें तरी निभलें. पण त्याला कमी करून रोशनउद्दौला यास दिवाण करतांच ब्रिटिश सरकार राज्य ताब्यांत घेणार अशी सर्वत्र वार्ता पसरतांच हे विषप्रयोगानें मृत्यु पावलें.

**निजामुल्मुल्क, महबूबअलीखान**—( जन्म स. १८६६–मृत्यु स. १९११, कारकीर्द स. १८६९–१९११ ) हैदराबादचे निजामसाहेब.

हे गादीवर आले तेव्हां तीन वर्षांचे होते. प्रथम रीजन्सीमार्फत काम चालून १८८४ त यांना अधिकार मिळाले. १९०१ सालीं यांनीं महाराज सर किशनप्रसाद यांस दिवाण नेमिलें.

हिंदुस्थानांतील सर्वांत विस्तारानें, संपन्नतेनें व दर्जानें श्रेष्ठ असणाऱ्या राज्याचे हे अधिपति आचारविचारानेंहि तसेच उदार होते. हे अत्यंत साधे, धर्मभीरु व हिंदु-मुसलमान लोकांच्या अत्यंत आदरास पात्र झाले होते. हे संकटग्रस्त प्रजेच्या मदतीकरितां जातीनें धांवून जात. यांच्यावर लोकांची इतकी श्रद्धा होती कीं लोक यांना नवस करीत असें म्हणतात.

**निजामुल्मुल्क, सर उस्मानअलीखान**— (जन्म स. १८८६, राज्यारोहण स. १९११ आगस्ट २९) हैदराबाद राज्याचे अधिपति.

या घराण्यांतील लोक हैदराबादची गादी स्थापन करणाऱ्या पुरुषास दिल्लीच्या बादशहानें दिलेली निजामुल्मुल्क ही पदवी धारण करून गादीवर बसतात. इंग्रजी राज्य झाल्यावर ५ निजामअली (१७५१-१८०३), ६ मिर्झा सिकंदरजाह (१८०३-१८२९), ७ नासिरुद्दौला (१८२९-१८५७), ८ अफझुद्दौला (१८५७-१८६९) व ९ महबूबअलीखान (१८६९-१९११) हे पुरुष गादीवर आले. त्यानंतर निजामुल्मुल्क ही पदवी धारण करून हे दहावे पुरुष गादीवर बसले.

यांचें शिक्षण खासगी रीतीनें झालें. हे गादीवर येतांच यांनीं अलीगड विद्यापीठाचे संस्थापक सर सय्यद अहमद यांचे नातू डॉ. रास मसूद यांना आणून त्यांना शिक्षण खात्याचे मुख्याधिकारी नेमिलें. तेव्हांपासून यांच्या राज्यांत जुनें समानतेचें धोरण जाऊन नवें मुसलमानी संस्कृतीच्या वर्चस्वाचें युग सुरू झालें.

एक लक्ष मैल क्षेत्रफळ, पावणेदोन कोट प्रजा, साडेसोळा कोट उत्पन्न असें विस्तारानें, लोकसंख्येनें, संपन्नतेनें आणि दर्जानेंसुद्धां यांचें राज्य हिंदुस्थानांत पहिल्या प्रतीचें आहे. याचा कारभार वीस लोकांच्या कायदेमंडळाकडून चालविला जातो. प्रत्यक्ष कार्यकारी मंडळ सात-आठ लोकांचें असतें व त्याचा अध्यक्ष मुख्य प्रधान समजला जातो.

या राज्यांत स्वतंत्र चलन, पोष्ट, रेल्वे व सैन्य आहे. इतिहास व पुराणवस्तु-संशोधनाचीं खातीं आहेत. अजिंठा व वेरूळ हीं जगप्रसिद्ध कोरीव लेणीं आणि कल्याणी, मालखेड, पैठण, देवगिरी, गुलबर्गा, बिदर, वरंगळ वगैरे प्रसिद्ध ऐतिहासिक स्थळें आहेत. हैदराबादेसारखें हिंदुस्थानांत चवथ्या क्रमाचें शहर यांची राजधानी आहे.

हे गादीवर आले तेव्हां यांनीं तिसरे सर सालरजंगयांना मुख्य प्रधान नेमिलें (११ जुलै १९१४–१ डिसें. १९१४). पण पुढें यांनीं मुख्य प्रधानाचें काम स्वतःकडे घेतलें. पुढें पांच वर्षांनंतर बहुतेक सर्व कारभार एका कार्यकारी मंडळाकडे सोंपविला (१७ नवं. १९१९) आणि अधिकाराची विभागणी केली. त्या मंडळाचे अध्यक्षस्थानीं सर अली इमाम यांची नेमणूक करण्यांत आली. त्यांनीं कर्जाच्या पोटीं स. १८५३ त गेलेला वऱ्हाड प्रान्त ब्रिटिश सरकारकडून परत मिळविण्याची खटपट केली. पण त्यांना तेव्हां त्या कामीं अपेश आलें व त्यांनीं अध्यक्षपदाचा राजीनामा दिला. पण पुढें यांच्या चिकाटीच्या प्रयत्नानें वऱ्हाडवरील यांचें स्वामित्व नाममात्र कां होईना पण ब्रिटिश सरकारनें मान्य केलें.

सर अली इमाम यांनीं राजीनामा दिल्यानंतर त्यांचे जागीं सर फरीदुनमुल्क बहादुदुर अध्यक्ष झाले. त्याच वेळीं मि. ग्लॅन्सी यांच्या जागीं मि॰ अकबर हैदरी हे फडणीस नेमिले गेले. ते पुढें अध्यक्ष झाले. नंतर छत्तारीचे नबाबसाहेब अध्यक्ष झाले.

यांनीं राज्यावर येतांच क्रमानें इंग्रजी व मराठी वगैरे प्रान्तिक भाषांचें महत्त्व कमी करून सरकारी कामकाजाची उर्दू ही भाषा ठरविली. राजभाषा व बोधभाषा म्हणून सर्वत्र उर्दूला स्थान देण्यांत आलें. सर अकबर हैदरी यांच्या साहाय्यानें १९१८ सालीं यांच्या नांवें उस्मानिया युनिव्हर्सिटी स्थापण्यांत आली. तिला व्यापक व भव्य रूप देण्याकरितां कोट्यवधि रुपये खर्च करण्यांत आले. तेथें उच्च शिक्षणाकरितांहि उर्दू ही भाषा माध्यम म्हणून मान्य करण्यांत आली व पांचशेंवर ग्रंथ उर्दूंत तयार करण्यांत आले. परिभाषा वगैरे ठरवून ग्रंथ तयार करवून त्यांचा अभ्यासक्रमांत समावेश करण्याची आणि हा सर्व प्रयोग यशस्वी करून दाखविण्याची खटपट यांच्या या विश्वविद्यालयानें चालविली आहे.

यांनीं १९३९ सालीं नवीन सुधारणा जाहीर केल्या. त्यांत कायदेमंडळाचा विस्तार, संयुक्त मतदारांतर्फे निवडणूक, ग्रामपंचायतींची स्थापना, जिल्हापरिषद् व हिंदु-मुसलमानांना समान पन्नास टक्के प्रतिनिधित्व इत्यादि गोष्टी महत्त्वाच्या आहेत.

दुसऱ्या महायुद्धांत यांनीं युद्ध सुरू होतांच आपले मुंबई व दिल्ली येथील राजवाडे ब्रि. सरकारला दिले, शिवाय खाजगींतून सोळा लाख, संस्थानचे बावन्न लाख देणगी म्हणून व साडे पन्नास कोटि रुपये बॉन्डच्या खरेदी रूपानें दिले. यांचा युद्धकालीन युद्धखर्च साडे-पांच कोटींपर्यंत चढला. शिवाय यांच्या सैन्याचे दोन युनिट्स् आघाडीवर लढले. इंडियन आर्मी व हवाईदल यांच्या शिक्षणाकरितां यांचें एक स्वतंत्र केन्द्र असून एलिमेन्टरी फ्लाईंग ट्रेनिंग स्कूल बांधण्यासाठीं पावणे-दोन लाख

रुपये खर्च करण्यांत आले. तसेंच आपले कारखाने रात्रंदिवस चालवून मालाचा पुरवठा केला व आपली 'फेथफुल अलाय ऑफ ब्रिटिश गव्हर्नमेंट' ही पदवी सार्थ केली.

यांचें १९४५ चें कार्यकारी मंडळ—१ छतारीचे नवाब (अध्यक्ष, राजकारण, राज्यघटना व रेल्वे), २ नवाब सर महर्दी (उपाध्यक्ष व एक्स्ट्राऑर्डिनरी सभासद), ३ नबाब आलम (कायदा व सुधारणा), ४ नबाब झैन (पी. डब्ल्यु. डी., व्यापार व कारखाने), ५ नबाब झैर (पोस्ट व मजूर), ६ नबाब लियाकत (अर्थ), ७ सय्यद मुहम्मद अझाम (शिक्षण), ८ सी. ए. जी. सॅविद्रे (जमीन महसूल व पोलीस), ९ दि. ब. एस्. अर्वमुडु आयंगार (वैद्यक व आरोग्य).

यांच्या घराण्याचा संबंध बापाच्या बाजूनें पहिल्या खलीपाशीं व आईकडून खुद्द मुहम्मद पैगंबराशीं लागतो. मधल्या काळांतहि अनेक धार्मिक व शूर पुरुष यांच्या घराण्यांत झाले आहेत. त्यामुळें यांच्या घराण्याला आन्तरराष्ट्रीय धार्मिक महत्त्व आहे. हें महत्त्व तुर्कस्थानांतील खलिपाच्या मुलीशीं आपल्या युवराजाचें लग्न करून यांनीं पुनः वाढविलें आहे. आपला व आपल्या राज्याचा आन्तरराष्ट्रीय राजकीय दर्जा यांच्या ध्यानांत असून तो वाढविण्याचा यांचा सतत प्रयत्न असतो. हे मुसलमानी धर्माचे विशेष अभिमानी असून कर्मठ आहेत. हे राज्यकारभारांत जातीनें लक्ष घालतात व सरकारी आवश्यक कागदपत्रांवर उर्दूंत स्वतःच्या हस्ताक्षरांत हुकूम देतात. यांच्या राज्यांत शेंकडा श्यांहशी टक्के प्रजा हिंदु आहे. मराठी (४५ लक्ष), कानडी (३० लक्ष) व तेलगू (६५ लक्ष) या राज्यांतील लोकांच्या भाषा आहेत. मुसलमानांची संख्या राज्यांत शेंकडा फक्त दहा आहे.

पण राज्यांतील लोकांच्या भावना, भाषा, संख्या वगैरेकडे लक्ष देण्यांत येत नाहीं. नोकर वर्गांत मुसलमानांची प्रमाणाबाहेर भरती करण्यांत येते, त्यांतहि बाहेरच्या लोकांचा विशेष भरणा असतो, भाषा व धर्म यांबाबतहि अन्याय होतो अशा तक्रारी असून आर्यसमाज, हिंदुसभा व स्टेट कॉंग्रेस यांना त्याबाबत सत्याग्रह करावे लागल्याचें प्रसिद्ध आहे. यांच्या उर्दूपक्षपाताविरुद्ध मराठी वगैरे भाषा बोलणारांच्या फार तक्रारी आहेत.

यांना उर्दू भाषेंत कविता करण्याचा नाद असून यांचा एक संग्रह प्रसिद्ध झाला आहे. यांना अनेक महत्त्वाच्या पदव्या असल्या तरी 'सुलतानुन्शुरा' (कवीन्द्र) ही वाङ्मयात्मक कार्याबद्दल मिळालेली पदवी विशेष प्रिय आहे.

हे अत्यंत काटकसरी, मातृभक्त, साधे, किडकिडीत, बिनबोलके, प्रसिद्धिविन्मुख पण महत्त्वाकांक्षी, ध्येयवादी व चिकाटीचे आहेत. केवळ राजसत्तेच्या जोरावर एरवीं अशक्य असणाऱ्या गोष्टीहि अमलांत आणण्याचा कसा प्रयत्न होतो याचें यांचें राज्य हें एक उदाहरण आहे.

हे जगांतील पहिल्या प्रतीचे संपन्न असून यांच्या संग्रहांत असणाऱ्या जडजवाहिराची किंमत ३० कोटि पौंड आहे. त्याखेरीज यांच्याजवळ सोन्याचा संग्रहहि फार मोठा आहे. दीडशें माणसांची भोजनाची व्यवस्था हे एका वेळीं सुवर्णपात्रांतून करूं शकतात. संपन्नतेंत बडोद्याच्या गायकवाडांचा जगांत आठवा क्रम लागतो. टाटा वगैरेचा क्रम त्यानंतरचा आहे.

**निरंजन, रघुनाथ**—(जलसमाधि स. १८५५) सुप्रसिद्ध सिद्ध पुरुष.

यांचें मूळ नांव अवधूत श्रीधर श्रोत्री. गांव कळंब (ता. धारूर). कौशिकगोत्री आश्वलायनशाखेचे दे. ब्राह्मण. यांचे गुरु नाशिकचे रघुनाथ भटजी. त्यांनीं यांचें निरंजन असें नांव ठेवलें व यांनीं रघुनाथ हें गुरूचें नांव जोडून हे निरंजन रघुनाथ या नांवानें प्रसिद्ध झाले. यांना गिरनार पर्वतावर सगुण साक्षात्कार झाला होता. हे गृहस्थाश्रमी होते. शेवटीं यांनीं चतुर्थाश्रम घेतला व कृष्णेंत जलसमाधि घेतली. यांचे सर्व ग्रंथ कै. य. र्‍यं. कोल्हटकर सांगली यांनीं संशोधून प्रसिद्ध केले.

यांचे ग्रंथ—१ अनुभवामृतबोधिनी (ज्ञानेश्वरमहाराजांच्या अनुभवामृतावरील गद्य टीका), २ स्वात्मप्रचीति (आत्मचरित्रपर), ३ साक्षात्कार (आत्मचरित्रपर), ४ श्रीरघुनाथचरित्र, ५ आत्मबोध प्रकाशिनी (श्रीशंकराचार्यांच्या आत्मबोधावरील टीका), ६ केनोपनिषद् टीका (गद्य), ७ महावाक्य, ८ केशवचैतन्यकथातरु, यांत तुकाराममहाराजांचे गुरु केशवचैतन्य यांचें चरित्र ओंवी छंदांत आहे. ग्रंथांत 'श्रीचैतन्य विजय कल्पतरु' असें नांव आहे. कृष्णदास बैरागी यांनीं केशवचैतन्यचरित्र शके १५९६ (स. १६७४) मध्यें वर्णिलें त्याच्या आधारें यांनीं १७०९ (स. १७८७) मध्यें हें लिहिलें.

**निवेदिता, भगिनी**—( जन्म स. १८६७–मृत्यु स. १९११ ) हिंदी संस्कृतीच्या पाश्चिमात्य अभ्यासक व अभिमानी.

यांचें खरें नांव मिस् मार्गारेट नोबल. यांचे वडील रेव्ह. एस्. आर्. नोबल हे आयर्लंडमधील धर्मगुरु होते. हिंदुस्थानांत येण्याचे पूर्वीपासूनच पेस्टॉलिझ व फ्रोबेल यांच्या तत्त्वांच्या अभ्यासक म्हणून यांची लंडनमध्यें प्रसिद्धि होती. विवेकानंदांची यांच्याशीं गांठ होण्याचे वेळीं लंडनमधील आपल्या शाळेंत या मुख्याध्यापिकेचें काम करीत होत्या.

इंग्लंडमधील आपल्या स्नेह्यांच्या निमंत्रणावरून स्वामी विवेकानंद इंग्लंडमध्यें आले. त्या वेळीं यांची त्यांच्याशीं पहिली भेट झाली ( १८९५ सप्टें. ). स्वामीजींच्या धार्मिक ज्ञानाच्या खोलीचा व त्यांच्या विचारांच्या ताजेपणाचा यांचेवर इतका परिणाम झाला कीं स्वामींच्या इंग्लंडच्या दुसऱ्या सफरींत 'हिंदुस्थानांतील आपल्या कार्याकरितां यांच्यासारख्या स्त्रियांची आवश्यकता' त्यांनीं सूचक शब्दांत बोलून दाखवितांच, या हिंदुस्थानला निघाल्या ( १८९८ ).

यानंतर सबंध एक वर्ष, यांनीं विवेकानंदांबरोबर सर्व हिंदुस्थानचा प्रवास करण्यांत घालविलें. अशा तऱ्हेनें विवेकानंदांच्या कल्पनांशीं, भावनांशीं व विचारांशीं संपूर्णतया तादात्म्य पावल्यानंतर यांना श्री रामकृष्ण परमहंसांच्या शिष्यवर्गांत औपचारिक रीतीनें दाखल करण्यांत आलें.

हिंदी संस्कृतीशीं संपूर्णपणें तादात्म्य होण्याच्या दृष्टीनें कलकत्त्याच्या बोस पारा लेन या कर्मठ हिंदूंच्या वस्तींत यांनीं आपलें आसन ठोकलें व थोड्याच दिवसांत आपल्या सालस वागणुकीनें या लोकप्रिय झाल्या.

'आपला देश', 'आपले बंधु' अशी हिंदुस्थानसंबंधीं बोलावयाची यांची पद्धति, कोठेंहि दुष्काळ, रोगाच्या साथी येतांच धांवून जावयाची यांची वृत्ति व गोड स्वभाव यांमुळें या सर्वत्र लोकप्रिय असत.

स. १९०० त प्रसिद्ध झालेल्या 'Kali the Mother' या लहानशा पुस्तकानें यांनीं हिंदुस्थानांतील आपल्या वाङ्मयीन कार्यास सुरुवात केली. रानटी लोकांचेकडून पूजिली जाणारी रक्तपिपासू देवता ही पाश्चिमात्यांत कालीविषयीं रूढ असलेली कल्पना चुकीची आहे; देवतेला फक्त प्रेममय स्वरूपांतच पाहणें म्हणजे तिचें दुसरें भयानक स्वरूप विसरण्यासारखें आहे अशी विचारसरणी या पुस्तकांत मांडण्यांत आली आहे.

परंतु 'The Webs of Indian Life' ( 1904 ) ह्या पुस्तकांत यांचें सर्व जीवितसर्वस्व सांठविलें आहे. इंग्रजी वाङ्मयांतील 'हिंदुस्थानवरील सर्वश्रेष्ठ पुस्तक' हें त्याचें वैशिष्ट्य आज अनेक वर्षे तसेंच टिकून राहिलें आहे. 'प्रवासात्मक किंवा वर्णनात्मक सुंदर पुस्तक' असें म्हणण्यांतच या पुस्तकाचें वैशिष्ट्य संपत नाहीं. हिंदी भावनांचें सुबोध आविष्करण ही त्याच्या यशाची गुरुकिल्ली आहे. हिंदुस्थानसंबंधीं जिज्ञासा असणाऱ्या कोणत्याहि मनुष्याला एकदम हिंदुस्थानच्या हृदयाजवळ खडें करण्याचें अजोड सामर्थ्य या पुस्तकांत सांठविलें आहे.

हिंदी-विशेषतः बंगाली गृह व स्त्रीजीवन यांची या पुस्तकांत रेखाटण्यांत आलेलीं चित्रें यथार्थता व सौंदर्य या दोन्ही दृष्टींनीं सारखींच निर्दोष आहेत. कवीची ध्येयदृष्टि व कलावंताची सहृदयता यांचे साहाय्यानें हिंदी स्त्रीहृदयांत शिरून पौर्वात्य परंपरेचीं सजीव स्मारकें असा निष्कर्ष यांनीं हिंदी स्त्रियांबद्दल काढला आहे. गीता, हिंदी शेतकरी वगैरे प्रकरणेंहि अशींच सुंदर आहेत.

यापुढें सरकारशीं करावा लागणारा लढासुद्धां आपल्या पूर्वपरंपरेला साजेसा–जागतिक संस्कृतींत कांहीं तरी भर टाकण्याजोगा–करण्याचा संदेश शेवटीं या पुस्तकांत देण्यांत आलेला आहे.

Cradle-Tales of Hinduism ( 1907 ), An Indian Sludy of Love and Death (1909) व The Master as I Saw Him ( विवेकानंदांचें व्यक्तिपरीक्षण ) हे यांचे ग्रंथहि असेच महत्त्वाचे आहेत. याशिवाय निरनिराळ्या मासिकांत चालू असणाऱ्या यांच्या लेखनांत Modern Review मधील यांचीं चित्रपरीक्षणें महत्त्वाचीं आहेत.

हिंदी संस्कृतीचें श्रेष्ठत्व सर्व जगाला पटवून देणाऱ्या हिंदुस्थानच्या परदेशी मित्रांतील यांचें स्थान वैशिष्ट्यपूर्ण आहे. भाषा, व्याकरण, इतिहास शिकून हिंदी संस्कृतीच्या नजीक येण्याचा प्रयत्न करणाऱ्या प्राच्यविद्यापंडितांपेक्षां हिंदी विचारांशीं व भावनांशीं समरस होऊन हिंदी तत्त्वज्ञान समजून घेण्याचा यांचा मार्ग निःसंशय उच्च दर्जाचा ठरतो.

निवेदिता या शब्दांत ध्वनित होणारा आत्मसमर्पणपूर्वक सेवामार्गाचा आदर्श पाळण्यांत यांच्या व्यक्तिमत्त्वाची आणखी एक महत्त्वाची बाजू प्रकाशांत येते. हिंदु धर्माचा स्वीकार करूनहि धार्मिक पुढारीपणाचा टेंभा मिरवण्याचा आग्रह यांनीं कधींच धरला नाहीं. कारण शिकवण्यापेक्षां सेवेंतच यांना जास्त गोडी वाटे. आणि म्हणूनच कार्याच्या स्वरूपापेक्षां त्यांतील भावनेकडे लक्ष देणाऱ्या प्रत्येक मनुष्याला यांचें नांव एक स्फूर्तिस्थल होऊन राहिलें आहे.

**नियोगी, न्यायमूर्ति मच्छीराज भवानीशंकर**—( जन्म स. १८८६ ) नागपूर हायकोर्टांतील न्यायमूर्ति.

यांचें मूळ गांव मच्छलीपट्टण. पण हें आंध्रब्राह्मणाचें घराणें नागपूर येथें चार पिढ्यांपासून स्थायिक झालें असून आतां पूर्ण महाराष्ट्रीय बनलें आहे. यांच्या दुसऱ्या पत्नी इंदिराबाई या एम्. बी. बी. एस्. असून प्रसिद्ध समाजसुधारक वामनराव कोल्हटकर यांच्या कन्या होत. यांचें शिक्षण काका दुर्गाशंकर यांनीं केलें. हे एम्.ए., एलएल.एम्. आहेत. कांहीं दिवस पटवर्धन हायस्कूलमध्यें शिक्षकाचें काम केल्यावर यांनीं वकिली करण्यास सुरुवात केली ( १९१६ ). असहकारितेच्या चळवळींत यांनीं वकिली सोडली होती, पण पुनः करण्यास सुरुवात केली ( १९२२ ).

प्रिव्हि कौन्सिलपर्यंत गेलेला आमगांव जमिनदारी खटला चालविण्याकरितां हे इंग्लंडला गेले होते (१९२७). ॲडिशनल ज्युडिशिअल कमिशनर ( १९३०–३६ ) व जज्ज ( १९३६ ) या नात्यानें यांनीं काम केलें. तसेंच नागपूर युनिव्हर्सिटीचे हे दोनदां उपकुलगुरु होते ( १९३२ ३४ ).

नागपूर विद्यापीठास भूषणभूत झालेल्या 'रा. ब. डी. लक्ष्मीनारायण टेक्नॉलॉजिकल इन्स्टिट्यूट'ची नमुनेदार योजना यांच्याच हस्तें तयार झाली आहे.

यांना सार्वजनिक कार्य करण्याची हौस पहिल्यापासूनच आहे. अच्युतराव कोल्हटकरांच्या संदेशचें इंग्रजी भावंड 'मेसेज'चे संपादक म्हणून हे मुंबईस येऊन राहिले होते. असहकारितेच्या काळांत वकिली सोडून नागपूर कॉंग्रेसची दुय्यम चिटणीशी, राष्ट्रीय विद्यालयाचें मुख्याध्यापक वगैरे कामेंहि यांनीं केलीं. १९२५ सालीं हे नागपूर नगरपालिकेचे अध्यक्ष झाले. त्या वेळीं शुक्रवार तलावावर यांनीं लोकमान्यांचा पुतळा उभारण्याचें महत्त्वाचें काम केलें.

**निंबाळकर, मेजर राजाबहाद्दुर श्रीमंत सर मालोजीराव मुधोजीराव उर्फ नानासाहेब नाईक** के. सी. आय्. ई.—( जन्म स. १८९६ ११ सप्टें. ) फलटणचे राजेसाहेब.

जात–मराठा क्षत्रिय. शिक्षण राजकोट येथील राजकुमार कॉलेजचा डिप्लोमा. विवाह डेक्कनमधील फर्स्ट क्लास सरदार व माळेगाव बुद्रुकचे सरंजामदार कै. श्रीमंत राजे शंभुसिंहराव अमरसिंहराव जाधवराव यांच्या कन्या आबईसाहेब ( आतां श्रीमंत स. सौ. लक्ष्मीदेवी ) यांजबरोबर ता. १८ डिसें. १९४१ रोजीं. युवराज श्रीमंत प्रतापसिंह उर्फ बापूसाहेब ( जन्म १३ जुलै १९२३ ). संस्थानचें क्षेत्र ३९७ चौरस मैल. लोकसंख्या ७१,४७३ ( १९४१ ) उत्पन्न २०,३८०००/–.

परमार घराण्यांतील पहिले निंबराज यांनीं स. १२७० सालीं फलटण संस्थानची स्थापना केली. दक्षिण महाराष्ट्रांतील हें सर्वांत जुनें व ऐतिहासिकदृष्ट्या अत्यंत महत्त्वाचें असें संस्थान आहे. या घराण्यांत आतांपर्यंत एकंदर २४ राज्यकर्ते झाले असून श्रीशिवछत्रपतींचे पितामह श्री. मालोजीराजे यांचेपासून आजवर श्रीशिवछत्रपतींच्या भोसले घराण्याशीं या घराण्याचे अनेकवार विवाह संबंध झाले आहेत. हे स. १९१६ ऑक्टो. १६ रोजीं गादीवर आले.

हे अत्यंत प्रगमनशील असून प्रजेची कोणत्याहि रीतीनें मागणी नसतांना स. १९२९ पासून राजकीय सुधारणा प्रजेस देण्याचा उपक्रम यांनीं सुरू ठेवला व स. १९४२ सालीं श्रीमंतांनीं जवळ जवळ संपूर्ण जबाबदारीची राज्यव्यवस्था प्रजेस दिली. या यांच्या अत्यंत स्तुत्य व अनुकरणीय उपक्रमाबद्दल भारतांतील अनेक महनीय व्यक्तींनीं यांना धन्यवाद दिले आहेत. या राज्यघटनेअन्वयें लोकनियुक्त सभासदांचें निर्विवाद बहुमत असलेलें १८ ( १२ लोकनियुक्त व ६ सरकारनियुक्त ) सभासदांचें एक विधिमंडळ ( Legislative Council ) असावयाचें आहे. लोकनियुक्त सभासदांतून कमींत कमी दोन मंत्र्यांची मंत्रिमंडळावर श्रीमंत राजेसाहेब यांनीं निवड करण्याची असून त्यांचेकडे अन्तर्गत राज्यव्यवस्थेसंबंधींचीं बहुतेक सर्व खातीं राहावयाचीं आहेत.

प्रजेची आर्थिक व सामाजिक उन्नति करणाऱ्या प्रत्येक बाबींकडे यांचें प्रथमपासून विशेष लक्ष आहे. शिक्षणाकडे दरसाल बजेटांत फार मोठी रक्कम खर्च होत आहे.

दुय्यम शिक्षणाचा शक्य तितका अधिक प्रसार व्हावा म्हणून हायस्कूलमधील फी ब्रिटिश हद्दींतील फीच्या मानानें फार कमी ठेवली आहे. शिवाय मुलींना तसेंच हरिजनांना हायस्कुलांतील शिक्षण मोफत देण्यांत येतें. इतकें असून शिवाय हरिजन व इतर मागासलेल्या वर्गांत पुष्कळ प्रमाणांत नादाऱ्या व शिष्यवृत्त्या देऊन दुय्यम शिक्षणाच्या प्रसारास फार मोठी मदत केली आहे. प्राथमिक शिक्षण तर येथें सर्वांस मोफत आहे.

यांचे जमीनसाऱ्याबाबत व शेती बाबतहि उदार धोरण आहे. यांनीं १९३७ सालीं तशी आवश्यकता नसताहि रुपयाला तीन आणे याप्रमाणें सारा-सूट दिली आहे. ठिकठिकाणीं पाणी झिरपणारे बंधारे बांधून बागायती शेतीस मदत केली आहे. सांघिक व फड पद्धतीने शेतीस पाणी देण्याचे प्रयोग सुरू करून शेती किफायतशीर करण्यास शेतकऱ्यांना उत्तेजन देण्यांत येत आहे. यांनीं स्वतःस गादीवर येऊन पंचवीस वर्षें झालीं, त्या प्रसंगीं औद्योगिक शिक्षणासाठीं एक लाख रुपयांचा निधि राखून ठेवण्याची घोषणा केली व वैद्यकीय मदतीसाठींहि तितकाच दुसरा निधि ठेवण्यांत आला आहे. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे फलटण संस्थानच्या सर्वांगीण उन्नतीला पोषक अशा प्रत्येक बाबीकडे यांच्याकडून अत्यंत काळजीपूर्वक लक्ष दिलें जात आहे. संस्थानाप्रमाणेंच बाहेरीलहि अनेक सार्वजनिक संस्थांना यांच्या औदार्याचा फायदा मिळत आलेला आहे. डेक्कन एज्युकेशन सोसायटी, भारत इतिहास-संशोधन मंडळ, पुणें सेवासदन सोसायटी, भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिट्यूट, डेक्कन व्हर्न्याक्युलर ट्रान्सलेशन सोसायटी वगैरे संस्थांच्या कारभारात श्रीमंतांचा विशेष निकटचा संबंध आलेला आहे.

यांनीं फलटण शुगर वर्क्स लि., नांवाचा साखरेचा कारखाना संस्थान हद्दींत निघण्यास व चालण्यास उत्तेजन देऊन संस्थानच्या औद्योगिक प्रगतीस विशेष चालना दिली. शेतकऱ्यांस उत्तम गूळ तयार करण्यास यांत्रिक चरक वगैरे रीतींनेंहि फार मदत केली आहे.

यांच्या कार्याचा व्याप त्यांच्या संस्थानपुरताच मर्यादित नाहीं. दक्षिणी संस्थान एजन्सीमध्यें अन्तर्भूत होणाऱ्या सर्व संस्थानांचा व तेथील राज्यकर्त्यांचा दर्जा वाढावा म्हणून यांनीं गेलीं १५ वर्षे अत्यंत झटून परिश्रम केले आहेत. स. १९३१-३२ सालीं भरलेल्या दुसऱ्या व तिसऱ्या गोलमेज परिषदेला यांनीं आपले दिवाण रा. ब. के. वि. गोडबोले, बी. ए., एल्एल्. बी., यांना पाठविलें. त्यांनीं दक्षिणेंतील दहा संस्थानांचे प्रतिनिधि म्हणून १९३३ सालीं जें कार्य केलें व जॉइंट पार्लमेंटरी सिलेक्ट कमिटीपुढें जी साक्ष दिली. त्यामुळें दक्षिणेंतील संस्थानांच्या दर्जाबाबत तिकडे विशेष जाणीव उत्पन्न झाली. या वेळीं म्हणजे १९३३ सालीं यांची स्वारीहि जातीनें याच कार्याला पाठिंबा देण्यासाठीं लंडनला गेली व त्याचा साहजिकच विशेष उपयोग झाला.

प्रजेस निःपक्षपातीपणानें न्याय मिळावा म्हणून कोल्हापूरसहित सर्व दक्षिणी संस्थानचें एक संयुक्त हायकोर्ट असावें या मताचा यांनीं फार परिणामकारक रीतीनें पुरस्कार केला आहे व ती गोष्ट आतां सिद्धीसहि गेली आहे. या प्रकारें विविध क्षेत्रांत अत्यंत भरीव कामगिरी केल्यामुळें यांना दक्षिणी संस्थानांत एक विशिष्ट व महत्त्वाचें असें स्थान प्राप्त झालें असल्यास त्यांत आश्चर्य नाहीं.

## नीळकंठ, लेडी विद्यागौरी रमणभाई—

( जन्म स. १८७६ ) गुजराथमधील सार्वजनिक कार्यकर्त्या, शिक्षणाच्या पुरस्कर्त्या व लेखिका.

यांचें जन्मस्थान अहमदाबाद. पिता गोपीलाल मणिलाल ध्रुव. यांचे आजोबा सरदार भोलानाथ साराभाई. यांचा विवाह स. १८८९ सालीं रमणभाई महिपतराम नीळकंठ यांच्याशीं झाला. लग्नानंतर या मॅट्रिक (१८९१) व बी. ए. ( १९०१ ) झाल्या. गुजराथी समाजांतील या पहिल्या स्त्री पदवीधर होत. यांनीं अनेक शिक्षणविषयक संस्थांत शिक्षक वगैरे नात्यांनीं कामें केलीं. तसेंच या गुजराथी भाषेंत लिहीत असल्यानें बडोदा-गुजराथी साहित्यसंमेलनाचें अध्यक्षपद यांना देण्यांत आलें. यांना साठाव्या वर्षी एक गौरवपर लेखसंग्रह अर्पण करण्यांत आला.

## नून, ऑनरेबल मलिक सर फिरोझखान—

( जन्म स. १८९३ ) पंजाब प्रांतांतील सुप्रसिद्ध लीगपक्षीय पुढारी व कार्यकर्ते.

लाहोरचें चीफ्स कॉलेज व ऑक्सफर्डच्या वॅड्हॅम कॉलेजमध्यें शिक्षण घेतल्यानंतर हे बॅरिस्टर होऊन हिंदुस्थानांत परत आले. आल्यानंतर लाहोर हायकोर्टामध्यें यांनीं वकिली करण्यास सुरुवात केली. याच सुमारास हे पंजाब लेजिस्लेटिव्ह कौन्सिलमध्यें निवडून

आले (१९२१). तेव्हांपासून आजतागायत त्या मंडळांत हे सतत निवडून येत असून लोकल सेल्फ गव्हर्नमेंट (१९२७), शिक्षण (१९३०) वगैरे खात्यांचे हे प्रधानहि होते.

यानंतर यांनीं इंग्लंडमधील हिंदुस्थानचे हायकमिशनर (१९३६-४१), व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळांतील मजूर व संरक्षण खात्याचे मंत्री (१९४१-४५), इंपिरीयल वॉर कॅबिनेट व पॅसिफिक वॉर कौन्सिलमधील हिंदुस्थान सरकारचे प्रतिनिधि, सॅनफ्रॅन्सिस्को येथें भरलेल्या सर्वराष्ट्रीय परिषदेचे हिंदी प्रतिनिधी (१९४५) अशीं अनेक जबाबदारीचीं कामें केलीं.

परंतु इतकें कार्य करूनहि, 'हिंदुस्थानला स्वराज्य देण्याची जरूर नाहीं, तें त्याला कधींच मिळालें आहे'; 'आम्हांला पाकिस्तान मिळालें नाहीं तर चेंगीझखानालाहि लाजविणारीं अत्याचारी कृत्यें आम्ही करूं'; 'रशियाच्या मदतीनेंहि पाकिस्तान मिळविल्याशिवाय आम्ही राहणार नाहीं' अशा यांच्या असंबद्ध वक्तव्यांनीं यांना खऱ्या जनमताची पकड घेणें कधींच जमलें नाहीं.

यांचे ग्रंथ—Canada and India, Wisdom from Fools, India Illustrated, Scented Dust इत्यादि.

**नूलकर, रा. ब. कृष्णाजी लक्ष्मण**—(जन्म स. १८३० मे-मृत्यु स. १८९३ मार्च २८) भुज येथील कच्छच्या रावांचे दिवाण व सार्वजनिक कार्यकर्ते.

जन्मस्थान हळ्याळ. यांची मुंज झाल्यानंतर वडील सावंतवाडी येथें वारले. वडील वारले तेव्हां आई अस्पृश्य होती. तेव्हां तीन दिवस वडलांचें प्रेत ब्राह्मणांच्या पाहऱ्यांत रानांत ठेवलें. नंतर माता समारंभानें सती गेली. सतीबंदीचा कायदा १८२९ सालीं झाला, पण पुढें दहाबारा वर्षे संस्थानांत लागूं झाला नव्हता.

मराठी व इंग्रजी यांचा थोडा अभ्यास झाल्यावर हे पोलिटिकल एजंट जनरल ली ग्यांड जेकब यांचे खासगी कारकून म्हणून कच्छभुजेस गेले (१८५२). क्रमानें हेडक्लार्क, कॉन्फिडेन्शिअल क्लार्क, कराची, सेक्रेटरीएटवरील सुपरिंटेंडेंट, मुंबई, काठेवाडांतील असिस्टंट पोलिटिकल एजन्ट, स्मॉलकाज जज, मुंबई, भुज येथें कच्छच्या रावाचे दिवाण अशीं कामें करून हे पुण्यास येऊन राहिले (१८७६ जाने.).

पुण्याच्या सार्वजनिक सभेचे हे कार्याध्यक्ष होते (१८७८-८७), फॉरेस्ट कमिशन (१८८४-८५), पब्लिक सर्व्हिस कमिशन (१८८६-८७) व मुंबई सरकारनें यांना आपले कौन्सिलर (मंत्री) नेमिलें होतें.

**नेहरु, पंडित मोतीलाल**—(जन्म स. १८६१ मे ६-मृत्यु स. १९३१) हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध राज्यघटनाशास्त्रज्ञ, कायदेपंडित, राजकारणी मुत्सद्दी व वादविवादपटु.

यांचें काश्मीरी ब्राह्मणाचें घराणें अनेक पिढ्यांपूर्वी अलहाबादेस येऊन स्थायिक झालें आहे. हे तीन महिन्यांचे असतां यांचे वडील वारले व यांचें संगोपन यांच्या वडील भावानें केलें. तेहि वकील होते. यांनीं हायकोर्ट वकिलीची परीक्षा देऊन सुवर्णपदकहि मिळविलें. हे वकिली करूं लागल्यानंतर यांचा चहूंकडे बोलबाला झाला.

खूप पैसा मिळवावा, अत्यंत ऐषआरामांत राहावें आणि प्रसंगीं प्रागतिकांच्या राजकारणांत भाग घ्यावा असा यांचा तेव्हां कार्यक्रम असे. पण म. गांधींच्या राजकारणानें हे भारले गेले आणि चढाईच्या राजकारणांत दाखल झाले. पंजाब प्रकरणाबाबत चौकशी करण्याकरितां राष्ट्रसभेनें नेमलेल्या कमेटीवर काम केल्यानंतर यांची अमृतसर राष्ट्रसभेचे अध्यक्ष म्हणून निवडणूक झाली (१९१९).

नंतर पुढें तर हे असहकारितेच्या चळवळींतहि सामील झाले. यांच्या घरांत प्रथम दुमत असलें तरी पुढें मात्र सर्व कुटुंबच असहकारी बनलें. पुढें असहकारितेचा पहिला पूर ओसरतांच या कायदेपंडितानें स्वराज्यपक्ष काढून कायदेमंडळाकडे तोंड फिरविलें. आयरिश पुढारी पार्नेल यांनीं तिकडे अमलांत आणलेलें अन्तर्गत अडवणुकीचें धोरण यांनीं दिल्लींत अमलांत आणण्यास सुरवात केली. तत्त्वतः म. गांधींशीं यांचा विरोध आला तरी यांच्या प्रभावामुळें राष्ट्रसभेनें यांच्या स्वराज्यपक्षाला स्वतःच्या तत्त्वांना मुरड घालूनहि भरपूर वाव दिला.

चित्तरंजन दास व हे या दोघांनीं निवडणुकी लढवून आपल्या पक्षाचे प्रतिनिधि मध्यप्रान्त व बंगालमध्यें बहुसंख्येनें निवडून आणले आणि तेथील कारभार गव्हर्नरला हातांत घेणें भाग पाडलें. दिल्लीच्या मध्यवर्ती

कायदेमंडळांत हे पक्षाचे पुढारी म्हणून निवडले जाऊन यांच्या बुद्धिमत्तेला व ज्ञानाला योग्य स्थान मिळालें, आणि तेथें यांनीं आपल्या वादविवादकौशल्यानें सरकारला अगदीं हादरून सोडलें. यांच्या आयुष्यांतील अत्यंत उत्कर्षाचा हाच काळ होय. 'यांनीं पायांनीं घातलेली गांठ सरकारला हातानेंहि उकलूं नये.' असें केसरीनें यांच्या त्या वेळच्या कामगिरीचें वर्णन केलें. बाहेर तळमळणारा मासा पुनः पाण्यांत यावा तसें यांचें झालें व सरकारला यांनीं हैराण करून सोडलें. यांनीं बिल नापास करावें व व्हॉइसरायनें तें जादा अधिकारांत पास करून घ्यावें, असा सतत क्रम सुरू झाला. परंतु पुढें यांच्या पक्षाच्या लोकांनीं सरकारी कमेट्यांवर जागा स्वीकारण्यास सुरुवात केली आणि यांच्या पक्षाची शक्ति कमी होत गेली.

साम्राज्यान्तर्गत स्वराज्याची यांची राष्ट्रसभेनें मान्य केलेली योजना 'नेहरु रिपोर्ट' या नांवानें प्रसिद्ध आहे. पण ती १९२९ ची मुदत घातल्यानें आणि मुसलमानांनीं अमान्य केल्यानें वायां गेली आणि पुनः असहकारितेशिवाय मार्ग न राहिल्यानें हे तुरुंगांत गेले. तेथें दमा वाढून यांची सुटका झाली. पण थुंकींतून रक्त यावयास लागल्यानें हे आपला कलकत्त्याकडे जाण्याचा बेत तहकूब करून अलाहाबादेस आले आणि तेथें हे कालवश झाले.

म. गांधी आणि हे अगदीं भिन्न प्रकृतीचे लोक होत. हे त्यांना एक थोर मनुष्य म्हणून मान देत, पण महात्मा म्हणून त्यांची टरच उडवीत. ते संन्यासी संस्कृति निर्माण करणारे, तर हे विलासी प्रकृतीचे. तथापि मूलतः भेद असूनहि परस्परांचा एकमेकांवर पूर्ण विश्वास आणि दृढ प्रेम होतें. त्यामुळें म. गांधींच्या त्यागाचा व व्यक्तिमत्त्वाचा गौरवहि हे आपल्या उमद्या स्वभावानुसार मोकळेपणानें करीत. दोघांच्याहि स्वभावांतील एकमेकाला पूरक असणारा भाग दोघांनीं ओळखला होता आणि त्याचा राष्ट्राला फायदा देण्याची संग्राहक वृत्तीहि दोघांत दिसे.

'यांच्यांत एक प्रकारचें व्यक्तिमत्त्व व राजबिंडेपणा होता. कोठेंहि जातांच हे तेथील भव्य व प्रमुख व्यक्ति बनत. सौम्यता व पडतें घेणें यांच्या स्वभावांतच नव्हतें. म्युझियममध्यें दिसून येणाऱ्या रोमन बादशहाच्या पुतळयाप्रमाणें यांच्या चेहऱ्यावर एक प्रकारचा बादशाही करारीपणा दिसे.'

जाहीर व्याख्यानांपेक्षां कायद्याच्या चौकटींत बसणाऱ्या वादविवादांत यांच्या वक्तृत्वाला विशेष तेज चढे. विनोद, वक्रोक्ति, कल्पना, विचार, स्वाभिमान व देशप्रेम या मालमसाल्याबरोबर यांच्या हजरजबाबीपणानें हे आपलें वक्तृत्व अत्यंत परिणामकारक करीत. बॅ. जिनासारख्यांशीं उत्तरप्रत्युत्तराची वेळ असल्यास असेंब्लीचें रणांगण बने आणि तेथील गंभीर वातावरण अधिकच गंभीर व उत्कंठित बने. पब्लिक सेफ्टी बिल व सायमनकमिशन बहिष्कार या वेळीं यांनीं केलेले वादविवाद अविस्मरणीय आहेत.

**नेहरु, पंडित जवाहरलाल**—(जन्म स. १८८९ नवं. १४) हिंदुस्थानचे जगप्रसिद्ध क्रान्तिवादी पुढारी, आन्तरराष्ट्रीय राजकारणाचे सूक्ष्म अभ्यासक व इंग्रजी लेखक.

यांचा जन्म अलाहाबाद येथें झाला. हे मोतीलाल नेहरूंचे एकुलते एक पुत्र. राजेमहाराजांना हेवा वाटावा अशा ऐश्वर्यात यांचें बालपण गेलें. अभ्यासापेक्षां यांच्या प्रकृतीकडेच लक्ष अधिक देण्याची आवश्यकता होती. तथापि यांच्या अभ्यासाची कधींच आबाळ होऊं दिली जात नव्हती. यांना घरीं शिकविण्याकरितां ठेवलेल्या इंग्रज शिक्षकांत मि. एफ्. टी. ब्रुक्स हे प्रमुख होते. १९०५ सालीं इंग्लंडमधील हॅरो या प्रसिद्ध शाळेंत यांना घातलें. तेथील शिक्षणानंतर केंब्रिजच्या ट्रिनिटी कॉलेजमध्यें यांनीं प्रवेश केला. १९१२ सालीं हे इनर टेंपलच्या बॅरिस्टरीच्या परीक्षेत उत्तीर्ण झाले. आणि त्याच सालीं केंब्रिज विश्वविद्यालयाच्या सृष्टिशास्त्र, रसायनशास्त्र, प्राणिशास्त्र व वनस्पतिशास्त्र या विषयांत दुसऱ्या वर्गातील पदवी यांनीं मिळविली. पुढें लवकरच त्याच विश्वविद्यालयाचे हे एम्.ए. झाले.

इंग्लंडहून परत आल्यानंतर १९१३–२० पर्यंत यांनीं अलहाबादच्या हायकोर्टात वकिली केली. त्यानंतर असहकारितेच्या चळवळींत यांनीं वकिली सोडली, ती कायमचीच.

१९१२ च्या बांकीपूरच्या राष्ट्रसभेस हे हजर होते. १९१४ सालीं यांनीं ना. गोखले यांना ४० हजार रुपये निधि जमवून दिला. होमरूललीगच्या चळवळींतहि हे असत. १९१९ सालीं मोतीलाल नेहरूंनीं काढलेल्या 'इंडिपेन्डन्ट' दैनिकाचे हे एक डायरेक्टर व लेखक होते. अयोध्याप्रान्तांतील शेतकऱ्यांची स्थिति सुधारण्याबाबत केलेली यांची चळवळ महत्त्वाची आहे. त्यामुळें

टेनन्सी कायद्यांत शेतकऱ्यांना फायदेशीर अशा पुष्कळ सुधारणा झाल्या. १९२० सालीं अफगाणिस्तानचे वकील तहाकरितां इकडे आले, त्यांची गांठ न घेण्याची हमी सरकारनें यांच्याकडे मागितली. आणि ती नाकरतांच यांना मसुरी येथें स्थानबद्ध करण्यांत आलें.

पण असहकारितेच्या चळवळीपासून यांचें खरें राजकीय आयुष्य सुरू झालें (१९२०) आणि यांना अनेक वेळां शिक्षा झाल्या.

१९२३ सालीं यांना राष्ट्रसभेचें चिटणीस निवडण्यांत आलें आणि तेथील यांच्या तडफदार व सतत केलेल्या कार्यानें त्या संस्थेला एक विशेष प्रकारचें वळण प्राप्त झालें. राष्ट्रसभेला आज जें विशेष प्रकारचें सतत राजकीय काम करणारी संस्था म्हणून स्वरूप प्राप्त झालें आहे त्याचें पुष्कळसें श्रेय यांच्या कर्तबगारीला दिलें पाहिजे.

येथील अनेक कामगारांच्या संस्थांचें नेतृत्वहि यांनीं पत्करून काम केलें. पुढें हे युरोपांत गेले आणि संधि घेऊन हिंदी राजकारणाचा प्रश्न तेथील जनतेपुढें मांडण्याचा यांनीं प्रयत्न केला. या प्रवासांत यांनीं अनेक देश पाहिले व शेवटीं हे रशियांत गेले. तेथील नवीन समाजरचना व राज्यघटना पाहून यांना नवी दृष्टि प्राप्त झाली ती यांनीं आपल्या 'सोव्हिएट रशिया' या ग्रंथांत मांडली आहे. तिकडून परत आल्यावर यांना लाहोरच्या राष्ट्रसभेचें अध्यक्षस्थान देण्यांत आलें (१९२९). असहकारिता आणि कौन्सिलांतील स्वराज्यपक्षाचें कार्य या दोहींमुळें उत्पन्न झालेल्या निराशाजनक परिस्थितींत या अधिवेशनांत पूर्ण स्वातंत्र्याचा ठराव करण्यांत आला, आणि हिंदुस्थानानें स्वराज्य हा शब्द सोडून पूर्ण स्वातंत्र्याकडे आपली दृष्टि निश्चित केली.

यांचा समाजसत्तावादाकडे स्पष्ट ओढा आहे. त्यावरील यांचीं व्याख्यानें ऐकून हे एक बोलघेवडे व निष्क्रिय पुढारी आहेत असा समज होतो. पण हा गैरसमज यांनीं लहानमोठीं कार्यें अंगावर घेऊन आणि तीं पार पाडून धुऊन टाकला आहे. कोणतेंहि हातीं घेतलेलें कार्य विशिष्ट दर्जानें चालविणें आणि पार पाडणें यांत यांचा हातखंडा आहे.

बोलावें आणि त्याचा परिणाम भोगण्यास तयार असावें हा यांचा बाणा उथळपणाचा वाटला तरी परिणामीं यांच्याबद्दल आदर वाढविणारा ठरतो. परराष्ट्रीय राजकारणी लोकांशी संबंध ठेवणें आणि जागतिक राजकारणाच्या दृष्टीनें हिंदुस्थानाकडे पाहणें हे यांचे दोन विशेष गुण आहेत. लोकप्रियतेंत हे म. गांधींच्या खालोखाल असून संयुक्त प्रान्तांतील शेतकऱ्यांचे हे राजे आहेत असें म्हणण्यांत अतिशयोक्ति नाहीं. समतावाद हा यांच्या प्रतिपादनाचा आत्मा असून नवीन समाजरचनेशिवाय तरणोपाय नाहीं असा यांचा विश्वास आहे. मात्र हिंदुस्थानांतील समाजसत्ता युरोपांतील समाजसत्तेची केवळ नक्कल असणार नाहीं असें हे मानतात. यांनीं आपलें आत्मचरित्र १९३६ च्या एप्रिलमध्यें लंडन येथें प्रसिद्ध केलें, आणि चार महिन्यांत त्याच्या आठ आवृत्त्या खपल्या. प्रथम हें पुस्तक इंग्लंडांतच फस्त होई. नंतर तितकाच त्याचा खप हिंदुस्थानांत झाला. त्यानंतरहि त्याच्या अनेक आवृत्त्या निघाल्या. यांच्या या आत्मचरित्रांची जगांतील उत्कृष्ट पुस्तकांत गणना होते. जें असेल तें स्पष्ट व समजेल असें बोलावें हें या ग्रंथाच्या भाषेचें वैशिष्ट्य आहे. हिन्दी लोक हे केवळ अध्यात्मवादी किंवा गूढवादी नसून ते आपल्यासारखेच स्वातंत्र्यप्रिय व विचारवान् आहेत, हें या यांच्या ग्रंथांवरून जगांतील राजकारणी लोकांच्या लक्षांत आलें.

म. गांधींच्याशीं मिळतें घेऊन हे वागत असले तरी दोघांच्या स्वभावांत मूलतः फरक आहे. उपास, अहिंसा, तपस्वी वृत्ति इत्यादि गोष्टींवर श्रद्धा ठेवण्यासारखी यांची वृत्ति नाहीं. तथापि त्यांचें चळवळीला प्रभावी स्वरूप देण्याचें कौशल्य यांना नाकारतां येत नाहीं. हिंदुस्थानांतल्या गरीबांतल्या गरीबाशीं राहणीनें तादात्म्य पावणें म्हणजेच खरी लोकशाही हा गांधींचा सिद्धान्त मात्र यांना बरोबर वाटतो.

सध्यांच्या शिक्षणानें स्वतःच्या देशांत व परदेशांतहि मनुष्य कसा तिऱ्हाइत बनतो याचें हें नमुनेदार उदाहरण आहे.

म. गांधींचा हृदयपालट होण्यावर भर, तर यांचा सामुदायिक सत्तेवर भर आहे. म. गांधींचा तडजोडीवर भर, तर यांचा विरोधावर भर. अशा या परस्पर विरुद्ध स्वभावाच्या दोन पुढाऱ्यांवर सध्यां हिंदुस्थानचें राजकारण चालू आहे. यांनीं कितीहि भराऱ्या मारल्या; प्रसंगीं राजकारण तुटेतोंपर्यंत ताणलें तरी म. गांधींचे नेतृत्वावर विश्वास ठेवून जुळतें घेण्याच्या यांच्या वृत्तीनें आतांपर्यंत अनेक प्रसंग निभावून गेले आहेत. म. गांधींनीं यांना आपलें राजकीय वारस म्हणून उद्घोषित करतांच यांनीं त्यांच्या तशा भाषेचा निषेध केला आणि राजकारणांत कोणी कोणाचा वारस नसतो असें जाहीर केलें.

१९२९ लाहोर, १९३५ लखनौ व १९३६ फैजपूर अशा तीन ठिकाणीं झालेल्या व १९४६ च्या राष्ट्रसभेचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें. कॉंग्रेसनें नेमलेल्या 'नॅशनल प्लॅनिंग कमिटी'चे हे अध्यक्ष आहेत.

हिंदुस्थान हा देश जगाचा एक भाग असल्यानें जगांतील घडामोडीचा त्यावर परिणाम झाल्याशिवाय केव्हांहि राहणार नाहीं अशा दृष्टीनें हे हिंदुस्थानसंबंधीं विचार प्रदर्शित करतात. त्यामुळें वक्तृत्वाचा अभाव असूनहि यांचीं भाषणें महत्त्वाचीं व लोकप्रिय होतात. पण यांचें इंग्रजी वाङ्मय लोकप्रिय होण्याचें कारण यापेक्षां निराळें आहे. उत्कृष्ट इंग्रजी व सफाईदार मांडणीबरोबरच हिंदुस्थानांतील विचारांचे अन्तःप्रवाह समजून घेण्याचें उत्कृष्ट साधन म्हणून यांच्या लेखनाकडे पाश्चिमात्यांचें लक्ष असतें.

यांचे इंग्रजी ग्रंथ—(1) Soviet Russia, (2) Letters from a father to his Daughter, (3) Glimpses of World History, (4) Autobiography, (5) Unity of India, (6) Discovery of India, इत्यादि.

**नेहरु, पंडित श्रीधर**—(जन्म स. १८८८) शेतीकरितां विजेचा उपयोग सप्रयोग प्रतिपादणारे शास्त्रज्ञ व ग्रंथकार.

यांचें शिक्षण आग्रा, लंडन व पॅरिस इत्यादि विश्व-विद्यालयांत झालें. पहिल्या महायुद्धाच्या वेळीं यांनीं अलहाबादेच्या एम्. सी. कॉलेजांत फिजिक्सचे प्राध्यापक व प्रयोगशाळेचे डायरेक्टर म्हणून काम केलें. तेव्हांच यांनीं वैमानिक प्रश्नांचें संशोधन केलें आणि इंग्लंड व फ्रान्सला भेट दिली. शेतीचे उद्योगधंदे व शिक्षण खात्याचे चिटणीस म्हणून यांनीं संयुक्त प्रान्तांत काम केलें. 'इंपिरियल कौन्सिल ऑफ अग्रिकल्चरल रीसर्च'चे हे सभासद होते. १९३४ सालीं मुंबईस भरलेल्या 'इंडियन सायन्स कॉंग्रेस'च्या शेती खात्याचे हे अध्यक्ष होते. लंडनच्या 'रॉयल सोसायटी ऑफ आर्टस्'चे हे फेलो निवडले गेले.

यांनीं विजेच्या मदतीनें शेती करण्याच्या बाबतींत निरनिराळे प्रयोग केले. आणि त्या विषयावर पुस्तकेंहि लिहिलीं. विजेच्या साहाय्यानें फळें वाढविणें व पिकविणें, या गोष्टी यांनीं व्यावहारिक दृष्ट्या सिद्ध केल्या. प्रयोग करून जांभळाचें झाड व फळ हें विजेच्या साहाय्यानें कसें वाढतें हें यांनीं दाखवून दिलें. फळ लागण्यापूर्वी फूल गळूं लागतें तें थांबण्यास उपाय सुचविणारें एक पुस्तक यांनीं लिहिलेलें आहे. पिकांवर कीड पडते ती थांबविण्याकरितां विजेचा उपयोग कसा करावा हें यांनीं एका पुस्तकांत दाखवून दिलें आहे. जनावरें, फळें व पाणी यांवरहि विजेचा उपयोग यांनीं आपल्या ग्रंथांत प्रतिपादला आहे.

यांनीं आपल्या आयुष्यांत केवळ शास्त्रज्ञ म्हणूनच ख्याति मिळविली आहे असें नव्हे, तर कायदा, साहित्य, खेड्यांची सुधारणा, खेड्यांतील शिक्षण इत्यादि बाबीं-वरहि अधिकारवाणीनें यांनीं पुस्तकें लिहिलीं आहेत. यांनीं हिंदी भाषेंतहि 'सच्चा ग्रामसुधार' व इतर अनेक पुस्तकें लिहून प्रसिद्ध केलीं आहेत.

# प

**पटवर्धन, भाई अच्युत सीताराम**—(जन्म स. १९०५ फेब्रु. ५) कॉंग्रेस सोशालिस्ट पक्षाचे सुप्रसिद्ध पुढारी व धाडसी कार्यकर्ते.

यांचे वडील हरि केशव पटवर्धन हे नगर येथें सुप्रसिद्ध वकील होते. हे दत्तक दिल्यानें अच्युत हरीचे अच्युत सीताराम झाले. यांचे बंधु पुरुषोत्तम हरि उर्फ रावसाहेब पटवर्धन होत. या बंधूंना म. गांधींच्या कायदे-भंगाच्या चळवळीनें राजकारणांत ओढलें. कॉंग्रेसच्या प्रत्येक चळवळींत यांनीं धडाडीनें भाग घेतला. हे अनेक वेळा तुरुंगांत गेले. कॉंग्रेसमधील सोशालिस्ट पक्षांत पुढें हे सामील झाले. त्या नात्यानें कॉंग्रेसच्या वर्किंग कमेटींतहि हे कांहीं काळ होते. ८ ऑगष्टच्या चले जाव चळवळींत हे गुप्त झाले. पुनः मुंबई इलाख्याचीं सूत्रें खेर मंत्रिमंडळाचे ताब्यांत आल्यावर त्यांनीं यांचेवरील वारंट रद्द केल्यावर ह्यांनीं मोठ्या थाटांत मुंबईत प्रवेश केला (६ एप्रिल १९४६).

हे व भाई एस्. एम्. जोशी, ना. ग. गोरे, यांच्या तेजस्वी कार्यानें काँग्रेस सोशॅलिस्टांची एक स्वतंत्र संघटना महाराष्ट्रांत स्थापन झाली आहे. आचार्य नरेंद्रदेव, जयप्रकाश नारायण, अरुणा असफअली यांच्या पावलावर पाऊल टाकून क्रांतिकारक लोकांची ही नवी पिढी काँग्रेसच्या झेंड्याखालीं खडी झाली आहे. यांच्या कार्यातील प्रखरपणाच इतका जबर आहे कीं, कोणीहि त्यानें सहज दिपून जावा. आठ ऑगस्ट १९४२ च्या चळवळींत झालेला हिंसात्मक कार्यक्रम राष्ट्रसभेचा असल्याबद्दल कांहींनीं मतभेद व्यक्त केलेला असला तरी यांनीं तो सर्व कार्यक्रम राष्ट्रसभेचाच असल्याबद्दल सांगितलें आणि राष्ट्रसभा बलिष्ठ करण्याविषयीं आदेश दिला.

**पटवर्धन, सर परशुरामपन्त उर्फ भाऊसाहेब**—(जन्म स. १८८३–मृत्यु स. १९२४ फेब्रु. २५) जमखिंडीचे राजेसाहेब.

हे चिंचणी घराण्यांतील कृष्णराव गोविंदरावांचे पुत्र. १५ डिसें. १८९६ रोजीं यांना अप्पासाहेबांनीं दत्तक घेतलें. यांचें शिक्षण राजकोटच्या राजकुमार कॉलेजांत झालें. स.१९०३ जून ४ रोजीं यांना संस्थानची मुखत्यारी मिळाली. १९१४ च्या पहिल्या महायुद्धांत हे फ्रान्सच्या रणांगणावर गेले होते. त्या वेळीं कॅप्टनचा हुद्दा व ९ तोफांच्या सलामीचा मान यांना मिळाला. यांनीं आपल्या संस्थानांत अनेक सुधारणा घडवून आणल्या. यांना मर्दानी खेळाचा अतिशय नाद होता. हे एकदां हत्तीस शिकवीत असतां त्यानें यांना ठार मारलें. यांचे चिरंजीव शंकरराव यांनीं पुण्याच्या शिक्षण-प्रसारक-मंडळीस मोठी देणगी देऊन न्यू पुना कॉलेजास, 'सर परशुरामभाऊ कॉलेज' असें यांचें नांव देऊन यांचें स्मारक केलें.

**पटवर्धन, पांडुरंग नरसिंह**—(जन्म स.१८८६–मृत्यु स. १९२१) इतिहाससंशोधक व सार्वजनिक कार्यकर्ते.

हे जानशीकर पटवर्धन घराण्यांतील. नगरच्या हायस्कुलांतून मॅट्रिक झाल्यावर सरकारी नोकरींत शिरले. पण वरिष्ठाशीं खटका उडून यांनीं नोकरीचा राजीनामा दिला. हे मराठी वर्तमानपत्रांना बातमी धाडणें, इतिहास-संशोधनाची आवड असल्यानें गांवोगांव हिंडून तपशीलवार माहिती व कागदपत्र मिळविणें व इतर राष्ट्रीय कामें करीत. राष्ट्रहितैषी नांवाचें भारदस्त मासिक कांहीं महिने यांनीं चालविलें होतें. राष्ट्रकूटाचा पुण्याचा ताम्रपट, चिंचवडकर देव, चांबळीकर सरनाईक, वाघालीचे रामेश्वरभट वगैरे अनेक घराण्यांतील कागदपत्रें शोधून, टाचणें लिहून यांनीं नवी माहिती उजेडांत आणली. भारत-इतिहास-संशोधकमंडळाचे हे आस्थेवायिक व मेहनती सभासद होते.

**पटवर्धन, डॉ. माधव त्रिंबक**—(जन्म स.१८९४ जाने. २१–मृत्यु स. १९३९ नवं. २९) मराठी भाषेंतील सुप्रसिद्ध कवि, अभ्यासक, चिकित्सक व ग्रंथकार.

यांचा जन्म बडोदें येथें आजोळीं सहस्रबुद्धे यांच्या घरीं झाला. हे वडिलांच्या इच्छेवरून फारसी भाषा घेऊन बडोदे हायस्कूलमधून मॅट्रिक (१९०९), बी. ए. (१९१६) व मुंबईच्या एलफिन्स्टन कॉलेजांतून एम्. ए. होऊन (१९१८) डेक्कन एज्युकेशन सोसायटींत फारसीचे प्राध्यापक झाले (१९१८-२५). तेथून राजीनामा देऊन निघाल्यावर १९२८ पासून हे कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजांत फारसी व इंग्रजी या भाषांचे अखेरपर्यंत प्राध्यापक होते.

'माधव जुलियन' या नांवानें हे आपल्या कविता प्रसिद्ध करीत. प्रथम यांनीं आपल्या कवितेंत फारसी शब्दांचा सढळपणें उपयोग केला आणि नांवाप्रमाणें गंगाजमनी कविता करून आपल्याकडे सर्वांचें लक्ष वेधून घेतलें. पुढें मात्र हे भाषाशुद्धीचे कट्टे पुरस्कर्ते बनले. अशींच सामाजिक बाबतींतहि यांचीं मतान्तरें झालीं. जी गोष्ट मनांत येईल ती खुल्या दिलानें व आग्रहानें प्रतिपादावी असा यांचा स्वभाव असे. लेखन, व्याख्यान व खासगी बैठक या सर्वच ठिकाणीं यांचा हा स्वभाव प्रकर्षानें प्रगट होई. विशेषतः खासगी बैठक रंगविणारा यांच्यासारखा मनुष्य विरळा!

फारसी-मराठी-कोश व छन्दोरचना हे यांचे अत्यंत महत्त्वाचे ग्रंथ होत. छन्दोरचना या ग्रंथामुळें यांना मुंबई युनिव्हर्सिटीनें 'डॉक्टर ऑफ लेटर्स' ही पदवी दिली (१९३९). या ग्रंथांत अगदीं नवी दृष्टि स्वीकारून यांनीं पद्यांच्या चालींचें पृथक्करण करून त्यांचे वर्ग पाडले आणि त्यांना नवीं नांवें दिलीं. तीं आतां मराठींत रूढ झालीं आहेत. यांच्या या ग्रंथानें मराठी साहित्यांत यांचें नांव अमर राहील. यांना जळगांव मराठी साहित्य-संमेलनाचें अध्यक्षपद देऊन लोकांनीं यांचा गौरव केला (१९३६).

यांच्या मृत्यूनंतर यांचे मित्र, सुप्रसिद्ध मराठी लेखक व कवि विठ्ठल दत्तात्रय घाटे व रावसाहेब रघुवीर लूकस जोशी यांच्या प्रयत्नानें वीस हजारांच्यावर रुपये वर्गणी जमून 'डॉ. माधवराव पटवर्धन स्मृतिमंदिर' हें यांचें स्मारक पुण्यास उभारण्यांत आलें. यांच्या पत्नी लीलाबाई यांनीं 'आमचीं अकरा वर्षे' हा यांच्या कौटुंबिक व वाङ्मयविषयक अन्तर्मुख चरित्राचा भाग प्रसिद्ध करून यांच्या मृत्यूनंतरहि यांच्या परिचयाची व्यवस्था करून ठेविली आहे.

यांचे ग्रंथ—काव्यें–१ शलाका (१९२५), २ विरह-तरंग (१९२६), ३ प्रभा (१९२७), ४ सुधारक (१९२८), ५ उमरखय्यामकृत रुबाया (१९२९), ६ द्राक्षकन्या (रुबाया १९३१), ७ गज्जलांजली, ८ मधुलहरी (१९३३), ९ स्वप्नरंजन (१९३४), १० तुटलेले दुवे (१९३८), ११ नकुलालंकार (१९३९), छंदोविषयक–१२ छंदोरचना (१९२७), भाषाशुद्धि-विवेक, १४ मुलांच्याकरितां पद्यप्रकाश (१९३८).

यांच्या मायबोली कवितेंतील कांहीं चरण—

'मराठी असे आमुची मायबोली,
जरी आज ती राजभाषा नसे।
नसो आज ऐश्वर्य या माउलीला,
यशाची पुढें थोर आशा असे॥

हिचे पुत्र आम्ही हिचे पांग फेडूं,
वसे आमुच्या मात्र हृन्मन्दिरीं।
जगन्मान्यता हीस अर्पूं प्रतापें,
हिला बैसवूं वैभवाच्या शिरीं॥'

**पटवर्धन, वासुदेव बळवन्त**—(जन्म स.१८७०–मृत्यु १९२१) सुप्रसिद्ध कवि व प्राध्यापक.

यांचा जन्म सातारा जिल्ह्यांत झाला. कलकत्ता विश्वविद्यालयांतून बी. ए. झाल्यानंतर प्रथम पुण्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्यें शिक्षक (१८९३), पुढें दोन वर्षांनीं हे डे. ए. सोसायटीचे आजीव सभासद झाले. त्यानंतर यांची फर्ग्युसन कॉलेजांत इंग्रजीच्या प्राध्या-पकाचे जागेवर नेमणूक झाली. शेक्सपीअर, वर्डस्वर्थ, ब्राउनिंग वगैरे कवींचीं काव्यें शिकविण्यांत हे निष्णात असत. जुन्या मराठी कवितांचा यांचा व्यासंगहि दांडगा होता. हे बुद्धिवादाचे कट्टे पुरस्कर्ते असून आगरकरांचे अनुयायी होते. आगरकरांच्या पश्चात् यांनीं कांहीं वर्षे 'सुधारक' पत्र चालविलें.

यांच्या कविता 'वसंत' या नांवानें प्रसिद्ध झालेल्या आहेत. 'केशवसुतां'चा व यांचा अत्यंत लोभ होता. यांचें 'काव्य व काव्योदय' हें काव्यचर्चात्मक पुस्तक बरेंच प्रसिद्ध आहे. वाङ्मयाभ्यासांत व तत्त्वचिन्तनांत यांनीं आपलें बहुतेक आयुष्य वेंचलें. वाङ्मयचर्चेची यांनीं दाखवून दिलेली नवीन पद्धति हीच त्यांची वाङ्मयविषयक भरीव कामगिरी होय. इंग्रजी वाङ्मयाचा यांनीं सतत ३०-३५ वर्षे अभ्यास केला होता. मराठी संतकवींत तुकाराम व नामदेव हे यांच्या आवडीचे कवि होत. डॉ. भांडारकरांच्या अध्यक्षतेखालीं जें 'तुकाराम मंडळ' स्थापन झालें होतें त्यातर्फे तुका-रामाच्या प्रत्येक अभंगावर चर्चात्मक टीका होत असे व अवघड मुद्यांचा उलगडा होत असे. ह्या मंडळांत अभंगासंबंधींचीं सर्व टिपणें हे करीत असत. मनास वाटेल, पटेल तेंच तंतोतंत शब्दचित्रांत तेजस्वी भाषेंत प्रकट करावयाचें हा यांच्या भाषेचा विशेष होता. हृदयांतून उगम पावून व वाचकांच्या हृदयांत एकदम प्रवेश करून तेथेंच विलीन होणारी अशी हृदयस्पर्शी भाषा यांची असे.

यांचें वाङ्मय—१ राजनीतीचीं मूलतत्त्वें, भाग १ (१८९६), २ शिक्षण, शिक्षक व हल्लींचा अभ्यासक्रम (१९०६), ३ काव्य आणि काव्योदय (१९२१), ४ ना. गो. कृ. गोखले यांचें चरित्र (१९२५), ५ तुकारामाच्या अभंगाची चर्चा, खंड १-२ (१९२७). ६ Lectures on the Maratha Poets,

**पटवर्धन, विनायक नारायण**—(जन्म स. १८९८) महाराष्ट्रांतील गायनाला प्रतिष्ठित स्वरूप देणारे सुप्रसिद्ध गवई.

यांचें घराणें मिरजेचें. यांनीं लाहोरास प. वि. दि. पलुस्कर यांचेपाशीं सात वर्षे गायनकलेचें शिक्षण घेतलें. मुंबई, लाहोर, नागपूर वगैरे ठिकाणीं गांधर्वमहाविद्या-लयांत प्राध्यापकाचें काम केल्यावर हे गंधर्व मंडळींत नट म्हणून समाविष्ट झाले (१३ ऑगस्ट १९२२) पण पं. वि. दि. पलुस्कर यांच्या अखेरच्या इच्छेला अनुसरून यांनीं तो व्यवसाय सोडला आणि गायन-शास्त्राच्या सेवेला आपणांस वाहून घेऊन (१९३२). पुणें येथें गांधर्वमहाविद्यालय स्थापिलें. तेथें संगीत-विशारद, अलंकार व प्रवीण या परीक्षांचा अभ्यासक्रम आंखला असून तेथें शेंकडों विद्यार्थी शिकत आहेत. यांनीं संगीतविषयक बालसंगीत (३ भाग) व रागविज्ञान

( ५ भाग ) इत्यादि पुस्तकें लिहिलीं असून तीं अनेक ठिकाणीं अभ्यासक्रमांत दाखल झालीं आहेत. हे संगीताच्या मराठीकरणाचे पुरस्कर्ते आहेत. गोड व खणखणीत आवाज, स्पष्ट शब्दोच्चार, दाणेदार तान, सारेगम इत्यादि यांचे विशेष आहेत. तराणा म्हणण्याबद्दल यांची प्रसिद्धि आहे. प्रमुख शहरीं भरलेल्या संगीत परिषदांत यांनीं आपल्या गायनकलेच्या जोरावर चांगली कीर्ति संपादन केली.

अलिकडे गांधर्व महाविद्यालयाची सर्व व्यवस्था यांनी भारतीय संगीत प्रसारक मंडळीच्या ताब्यात दिली असून हे तिचे विश्वस्त बनले आहेत.

**पटवर्धन, ब्रह्मर्षि-विनायक रामचंद्र तथा अण्णासाहेब**—( जन्म स. १८४७ मे ४–मृत्यु स. १९१७ फेब्रु. २ ) पुण्यांतील राजकारणी वृत्तीचे सुप्रसिद्ध साधु पुरुष.

यांचें घराणें मूळचें कोंकणांतील आरमाराधिपति धुळप यांचे आश्रित. यांचे वडील प्रथम पुण्यास आले. ते कांहीं दिवस मुंबईस वकिली करीत. पुण्यास गुंडाच्या गणपतीच्या कृपेनें वैशाख वद्य चतुर्थीस यांचा जन्म झाला म्हणून यांचें नांव विनायक असें ठेवण्यांत आलें.

हे मॅट्रिक ( १८६४ ) व बी. ए. झाल्यावर पुढील शिक्षणाकरितां मुंबईस गेले. तेथें हे मेडिकल कॉलेज व लॉ क्लास या दोन्ही ठिकाणीं जात व अभ्यास करीत. शिवाय एल्. सी. ई.च्या टर्महि हे भरीत. हे एल्‌एल्. बी. झाले, पण एकाच वेळीं एक मनुष्य दोन परीक्षांस बसणें योग्य नाहीं अशा अर्थाच्या सिंडिकेटच्या ठरावामुळें यांना डॉक्टरीची एल. एम्. अँड एस्. ही पदवी मिळाली नाहीं. आयुर्वेदाचें यांचें ज्ञान उत्तम असे; पण वैद्यकावर मिळालेला पैसा निषिद्ध अशी यांच्या वडिलांची समजूत असल्यानें हे त्याकरितां मिळालेलें फळसुद्धां घेत नसत.

या मुंबईतल्या बारा वर्षांच्या मुक्कामांत यांनीं कांचकारखाना वगैरे अनेक औद्योगिक कामांत लक्ष घातलें. मल्हारराव गायकवाडांच्या प्रकरणांत हे विशेष लक्ष घालीत. खुद्द चौकशीच्या वेळीं हे इंदुप्रकाशचे बातमीदार म्हणून बडोद्यास हजर होते. ' किरण ' व ' डेक्कन स्टार ' हीं मराठी व इंग्रजी पत्रें महादेवराव नामजोशांना काढावयास लावण्यांत यांचा हात प्रमुख होता. पुढें, त्यांना अनेक उद्योगांत तीं पत्रें चालविणें निभेना. तेव्हां त्यांचें रूपान्तर केसरी व मराठा पत्रांत यांनीं केलें.

पण औद्योगिक व राजकीय उलाढाली मोठ्या प्रमाणांत करण्यास यांना सुस्थिर आर्थिक साहाय्याची आवश्यकता वाटूं लागली. त्याकरितां निजामच्या ताब्यांतून गेलेला वऱ्हाड हा प्रान्त फ्रेंच बँकेंतून मोठी रक्कम काढून हैदराबादचे दिवाण सर सालरजंग यांच्या सहकार्यानें विकत घेण्याचें यांनीं ठरविलें. प्रथम दोन कोट रुपये काढले, पण पुढील व्यवहार होण्याच्या पूर्वी सर सालरजंग दिवंगत झाले आणि यांना त्या रकमेचें व्याज भरावें लागून हे गोत्यांत आले. तेव्हांपासून यांच्या आयुष्याला कलाटणी मिळाली आणि आळंदीच्या नरसिंहसरस्वती स्वामींचे शिष्य होऊन हे प्रायः उदासीन स्थितींत आयुष्य कंठूं लागले.

हे नगरपालिकेंत निवडून येत, सार्वजनिक कामांत भाग घेत, कायदेशीर सल्लामसलत व फिर्यादी लिहून देत व मोफत औषधोपचारहि करीत. पण यांपैकीं कोणत्याहि कामांत यांचें लक्ष दिसत नसे. कोठल्याहि सभेला यांना वेळेवर हजर राहणें जमत नसे. लो. टिळकांच्या शब्दाकरितां हे सार्वजनिक कार्यांत दिसत. यांच्यावर विशेष प्रकारची श्रद्धा असल्यानें, यांच्या निरपेक्ष वृत्तीमुळें आणि हे कोणालाहि तोडून टाकीत नसल्यानें कायदा व वैद्यकसंबंधीं कामें यांच्या मागें लागत. कोणतेंहि काम मनापासून करण्याचा यांचा स्वभाव असे. मग त्याकरितां किती वेळ खर्ची पडतो इकडे यांचें लक्ष नसे. त्यामुळें यांचा दैनंदिन कार्यक्रम तिऱ्हाइताला दीर्घसूत्रीपणाचा वाटे. हे पक्के धार्मिक, आदर्श आचारशील आणि राजकीय दृष्ट्या स्वातंत्र्यवादी होते.

मुंबईच्या ग्रँट मेडिकल कॉलेजच्या मासिकाचे व नंतर वैद्यसुधा मासिकाचे हे संपादक होते.

सुप्रसिद्ध गणिती व श्रुतिबोधांत ऋग्वेदाचें मराठी भाषान्तर करणारे रामचंद्र विनायक पटवर्धन बी. ए. एल्‌एल्. बी. हे यांचे चिरंजीव होत.

**पटेल, सरदार-वल्लभभाई जव्हेरभाई**—( जन्म स. १८७५ ऑक्टो. ३१ ) सुप्रसिद्ध राजकारणी मुत्सद्दी, राष्ट्रसभेंतील कार्यकर्ते आणि बार्डोलीचे सरदार.

यांचें जन्मस्थान करमसद (जि. खेडा). जात पाटीदार क्षत्रिय. यांचें शिक्षण नडियाद व बडोदा येथें होऊन हे मॅट्रिक झाले. नंतर मुखत्यार वकिलीची परीक्षा देऊन हे

गुजराथेंतील गोध्रा या जिल्ह्याच्या ठिकाणीं वकिली करूं लागले. विलायतेस जाऊन बॅरिस्टर होण्याची यांची महत्त्वाकांक्षा होती. परंतु नांवाचीं V. J. P. हीं इंग्रजी आद्याक्षरें एक असल्यानें यांच्या पासपोर्टवर प्रथम यांचे वडील बंधु विठ्ठलभाई व नंतर हे इंग्लंडला जाऊन बॅरिस्टर झाले. त्या परीक्षेंत यांनीं आपल्या हुषारीनें ५० पौंडांची शिष्यवृत्ति, चार टर्म्सचा माफी आणि न्याय खात्यांत मोठी जागा मिळविण्याची शिफारस मिळविली. परत आल्यावर अहमदाबादेस आपली बॅरिस्टरी सुरू करून हे राजकारणांत लो. टिळकांच्या जहालपक्षांत सामील झाले.

१९१९ च्या अहमदाबादच्या लष्करी कायद्यांत सांपडलेल्या आरोपींचा बचाव करण्याच्या यांच्या कामगिरीमुळें हे प्रसिद्ध झाले. म. गांधी व हे यांची गुजराथ क्लबांत प्रथम भेट झाली आणि हे म. गांधींचे अनुयायी बनले. यांनीं वकिली सोडली आणि हे असहकारितेच्या चळवळींत सामील झाले.

असहकारितेचा प्रचार करीत असतां यांनीं गुजराथ विद्यापीठाकरितां दहा लाख रुपये मिळविले. जनता व धनिक यांच्यावर असणारी यांची छाप म. गांधींच्या तेव्हांच ध्यानांत आली आणि हे त्यांचे उजवे हात बनले. कायदेभंगाच्या ठरावाकरितां भरलेल्या अहमदाबाद राष्ट्रसभेचे हे स्वागताध्यक्ष होते (१९२१). तेथें झालेल्या कायदेभंगाच्या ठरावानुसार यांच्यावर विसंबून म. गांधींनीं बार्डोलीची करबंदीची चळवळ पुकारली, पण अत्याचारामुळें त्यांना ती तहकूब करावी लागली. पण तयार केलेल्या संघटनेचा उपयोग यांनीं दरवडेखोर बाबरदेवाच्या विरुद्ध सरकारनें केलेल्या दडपशाहीबाबत व १९२३ च्या नागपूर झेंडासत्याग्रहाबाबत करून यश मिळविलें.

यानंतरच्या राजकारणांत यांचे बंधु विठ्ठलभाई स्वराज्यपक्षांत गेले आणि हे गांधीपक्षांत राहिले. पुढें हे अहमदाबाद नगरपालिकेचे अध्यक्ष झाले आणि तेथें यांनीं शहर सुधारणा व व्यवस्था यांबाबत आपलें कर्तृत्व व्यक्त केलें. १९२७ च्या जुलैच्या शेवटल्या आठवड्यांत जलप्रलयांत चार हजार खेड्यांतील लाखों लोक निराश्रित झाले. तेव्हां हे गुजराथ प्रान्तिक कमेटीचेहि अध्यक्ष होते. एका रात्रींत यांनीं दोन हजार स्वयंसेवकांचें पथक उभारलें, संकटग्रस्तांना मदत करण्यास सुरवात केली व सरकारी अधिकाऱ्यांचीसुद्धां जलमय प्रदेशांतून सुटका केली. लोकांकडून तीस लक्ष रुपये व सरकारकडून दीड कोट रुपये मिळवून संकटग्रस्तांकरितां सर्व प्रकारच्या सोयींची यांनीं लयलूट करून सोडली. स्वतःचे प्राण धोक्यांत घालून स्वतःकरितां प्राण देतील इतका यांनीं त्यांचा विश्वास संपादन केला. त्याची कसोटी १९२८ सालीं बार्डोलीस झालेल्या सारावाढीच्या लढ्याच्या वेळीं लागली.

बार्डोलीच्या तालुका रयतसभेनें सारा न देण्याचा प्रस्ताव करून यांच्याकडे त्या लढ्याचें नेतृत्व दिलें. यांनीं सारा न देण्याचा शेतकऱ्यांना सल्ला दिला आणि येईल त्या संकटांना तोंड देण्यास शेतकरी सज्ज झाले. सरकारनें हातीं असलेले सर्व उपाय योजण्याची कौन्सिलांत धमकी दिली. शेतकऱ्यांचीं गुरेंढोरें व जमिनी जप्त होऊं लागल्या. हे मोजक्या व खोचक शब्दांनीं शेतकऱ्यांचा निश्चय अढळ ठेवण्याचा प्रयत्न करीत. 'जमीन तो चालीने तमारे घेर आवशे' (जमिनी चालत तुमच्या घरीं परत येतील) असें हे छातीठोकपणें त्यांना आश्वासन देत हिंडत. सहा महिने झाले तरी चळवळ थांबेना, राज्ययंत्र मात्र बंद पडूं लागलें. तेव्हां वाढलेल्या साऱ्याची रक्कम अनामत ठेवल्यास चौकशीचें आश्वासन सरकारनें दिलें. कै. रा. म. भट यांनीं ती रक्कम दिली. ज. ब्रूमफील्ड व मॅक्सवेल यांच्या कमेटीनें ६% पेक्षां जास्त करवाढ करूं नये असें सुचविलें आणि बहुतेक मागणी मान्य झाल्याने नरिमन यांच्या हस्तें यांना 'सरदार' ही पदवी बहाल करण्यांत आली. त्या वेळीं लिलांव केलेल्या जमिनी १९३७ सालीं राष्ट्रसभेच्या मंत्रिमंडळानें शेतकऱ्यांना परत देवविल्या. या वेळीं सरकारला तोंड देतांना वैध व अवैध अशा दोन्ही भागांत काम करण्याचें यांचें सव्यसाचित्व चांगलें प्रगट झालें.

१९३० सालीं कायदेभंगांत यांना रास गांवीं पकडण्यांत आलें, तेव्हां पाऊण लाख लोकांनीं साबरमतीच्या वाळवंटांत जमून यांच्या बरोबरीनें कायदेभंगांत भाग घेण्याची शपथ घेतली. यानंतर १९३१ च्या कराची राष्ट्रसभेचे हे अध्यक्ष झाले.

राष्ट्रसभेनें कायदेमंडळांत शिरून मंत्रिमंडळें राबविण्याचें ठरविलें तेव्हां त्या कामाकरितां यांना कॉंग्रेस पार्लमेंटरी बोर्डाचे अध्यक्ष निवडण्यांत आलें. यांनीं आपल्या कर्तृत्वाची चुणूक दाखवून हिंदुस्थानाच्या अकरा प्रांतांपैकीं सात प्रान्तांत बहुमत मिळवून मंत्रिमंडळें

स्थापन केलीं, शत्रूंनींसुद्धां वाहवा करावी असा राज्यकारभार हांकला आणि राष्ट्रसभेचा बोज वाढविला. दुसऱ्या महायुद्धानंतर झालेल्या निवडणुकींतहि मागील काम ओघानेंच यांच्याकडे आलें. यांनींहि पण सर्व प्रतिपक्षांवर मात करून मध्यवर्ति कायदेमंडळांत निर्विवाद बहुमत मिळविलें आणि प्रान्तिक कायदेमंडळेंहि काबीज करून आठ प्रान्तांत राष्ट्रसभेचीं मंत्रिमंडळें स्थापिलीं.

स्वतःच्या इच्छेप्रमाणें सर्व गोष्टी घडवून आणणारी पाताळयंत्री बुद्धि, कठोर शिस्त आणि परिस्थितीचें विलक्षण आकलन हे राजकारणी माणसाला आवश्यक असणारे गुण यांच्यांत भरपूर आहेत. व्यक्तिगत स्वार्थाचा आरोप यांच्यावर कोणींहि करीत नाहीं. भावना किंवा अहिंसा वगैरेंच्या आहारीं न जातां बुद्धिवादी, राजकारणी मुत्सद्दी म्हणून राष्ट्रसभेंत यांचें स्थान अद्वितीय आहे. यांना म. गांधींचे अनुयायी म्हणून लोक ओळखत असले तरी सर्वच बाबतींत हे लो. टिळकांचे वारस शोभतात. जिना वगैरे राष्ट्रसभाविरोधकांच्या राजकारणांना जबरदस्त टक्कर देण्याचें श्रेय यांनाच द्यावें लागेल.

**पटेल, विठ्ठलभाई जव्हेरभाई**—(जन्म स. १८७१-मृत्यु स. १९३३) गुजराथमधील सुप्रसिद्ध राष्ट्रसभा-कार्यकर्ते व वादविवादपटु मुत्सद्दी.

वल्लभभाई पटेल यांचे हे थोरले बंधु. गुजराथमधील खेडा जिल्ह्यांतील करमसद हें गांव यांचें जन्मस्थान. करमसद व नाडियाद येथें आपलें शालेय शिक्षण संपविल्यानंतर हे इंग्लंडहून बॅरिस्टर होऊन आले व यांनीं वकिली करण्यास सुरवात केली. परंतु यानंतर थोड्याच दिवसांनीं यांची पत्नी वारली व यांनीं मनाच्या त्या उदास स्थितींतच सार्वजनिक कार्यांत भाग घेण्यास सुरवात केली.

मुंबई कार्पोरेशन, मुंबई लेजिस्लेटिव्ह असेंब्ली व कॉंग्रेस अशा अनेक ठिकाणीं जरी यांनीं कामें केलीं तरी स्पीकर म्हणूनच हे सर्वत्र प्रसिद्ध असत. या दृष्टीनें २४ ऑगस्ट १९२५ हा दिवस यांच्या आयुष्यांत क्रांतिकारक ठरला. या दिवशीं यांना पहिल्यांदा मध्यवर्ति कायदेमंडळाचे पहिले लोकनियुक्त स्पीकर-अध्यक्ष निवडण्यांत आलें व सरोजिनी नायडूंच्या पातळाचा मुद्दाम तयार केलेला काळा झगा परिधान करून हे त्या खुर्चीवर बसले. यांच्या स्वभावांतहि येथून क्रांति सुरू झाली. 'अति बडबड्या माणूस' अशी पदवी मॉंटेग्यूंच्या हस्तें मिळवणारे हे गृहस्थ एकदम मुके बनून असेंब्लीचें काम पाहूं लागले.

आपल्या निःपक्ष व स्वतंत्र विचारसरणीनें जुन्या स्पीकर या शब्दांत यांनीं एक नवा धाक उत्पन्न केला. असेंब्लीची इभ्रत व देशाचें वैभव यांपुढें साऱ्या जगाचें राज्य तृणवत् मानणाऱ्या अध्यक्षाचा यांनीं ठेवलेला आदर्श खरोखरच स्पृहणीय आहे.

स्वराज्य पक्षानें पं. मोतीलाल नेहरु यांच्या नेतृत्वाखालीं असेंब्लींतून केलेल्या 'वॉक आऊटच्या' वेळीं यांची विशेष शक्ति प्रथम लोकांचे निदर्शनास आली. 'असेंब्लींतील बहुमतवाला पक्ष गैरहजर असल्यानें सभेचें प्रातिनिधिक स्वरूप आतां नष्ट झालें आहे, तेव्हां कोणताहि विवादात्मक कायदा सरकारनें सभेपुढें ठेवूं नये, तसें झाल्यास माझ्या जादा अधिकारांत ही सभा मला बरखास्त करावी लागेल,' अशी सूचना यांनीं ताबडतोब सभेला दिली. अशाच कौशल्यानें यांनीं आपले हे शब्द दुसऱ्या दिवशीं परत घेतले. या यांच्या कार्याचा गौरव करण्यासाठीं यांना पुढच्या वर्षी मध्यवर्ति कायदेमंडळाचे पुनः बिनविरोध अध्यक्ष निवडण्यांत आलें.

'पब्लिक सेफ्टि बिला'चे वेळीं यांनीं सरकारला मार्गदर्शन करण्याचा जो प्रयत्न केला, तोहि असाच अभिनंदनीय होता. मीरत केसमुळें तापलेल्या वातावरणांत या बिलाची चर्चा असेंब्लींत शांतपणें पार पाडणें अशक्य आहे, तेव्हां 'एकतर हें बिल पुढें ढकला किंवा मीरत केस रद्द करा,' असा सल्ला यांनीं सरकारला दिला. सरकारनें यांच्या या सूचनेची हेटाळणी करतांच यांनीं तें बिल मांडलें व यांच्या व्यक्तिगत विरुद्ध मतानें तें बिल फेटाळलें गेलें.

१९३० सालीं कॉंग्रेसनें असेंब्लीवर बहिष्कार टाकावयाचें ठरवितांच यांनींहि सरकारच्या 'होयबांच्या' सभेचें स्वरूप आलेल्या असेंब्लीच्या अध्यक्षपदाचा राजीनामा दिला. 'स्वातंत्र्याच्या या लढ्यांत माझें योग्य स्थान असेंब्लीच्या खुर्चीत नाहीं, लोकांच्या खांद्याला खांदा लावून लढण्यांत आहे,' असें आपल्या या कृतीचें समर्थन यांनीं केलें.

१९३० सालीं पटेल कमेटीच्या रिपोर्टाचा विचार करण्यासाठीं दिल्ली येथें वर्किंग कमेटीची बैठक भरली असतांच कॉंग्रेस नियमबाह्य ठरविण्यांत आली व यांच्यासकट वर्किंग कमेटीच्या सर्व सभासदांना अटक करण्यांत आली. यांना सहा महिने सश्रम कारावासाची शिक्षा

ठोठाविण्यांत आली. परंतु प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें यांना मध्येंच सोडण्यांत आलें.

परंतु यानंतर अमेरिकेंतील दौऱ्यांत यांनीं केलेल्या अतिपरिश्रमांचा परिणाम यांच्या आधींच खंगलेल्या प्रकृतीवर झाला व जिनेव्हामधील एका रुग्णालयांत यांचा अंत झाला. मृत्यूपूर्वीच कांहीं दिवस यांनीं असहकाराच्या त्या वेळच्या दुबळ्या कार्यपद्धतीनें गांधींना आलेल्या अपयशाकडे बोट दाखवून असहकाराला जरा जास्त लढाऊ स्वरूप देण्याची विनंति केली होती.

साध्या शेतकऱ्यापासून असेंब्लीच्या अध्यक्षपदापर्यंत यांनीं चढलेल्या यशाच्या पायऱ्या यांच्या तेजस्वी व्यक्तिमत्त्वाच्या द्योतक आहेत. आवाजाच्या नुसत्या हुंकारानें असेंब्लींत माजलेलीं वादळें शांत करण्याबद्दल यांची ख्याति असे.

नियमांच्या सूक्ष्म ज्ञानानें सरकारला पेंचांत आणण्याच्या बाबतींत यांचें कौशल्य अनेकवार व्यक्त झालें. कायद्याला धरून सरकारला पेंचांत आणण्याची यांची कला लो. टिळकांच्या परंपरेंतील होती.

असेंब्लींतील पगारापैकीं द. म. १६५६ रु. म. गांधींना देऊन दोन हजार रुपये स्वतःच्या खर्चासाठीं ठेवण्याचा यांचा क्रम असे. या ट्रस्टच्या सांठलेल्या चाळीस हजार रुपयांच्या साहाय्यानें रास (गुजराथ) येथें मुलींच्या शाळेचें उद्घाटन करण्याचा समारंभ म. गांधींच्या हस्तें साजरा करण्यांत आला ( १९३५, मे ३१ ).

**पट्टणी, सर प्रभाशंकर दलपतराम**—( जन्म स. १८६२–मृत्यु स. १९३५ ) सुप्रसिद्ध राजकारणी, मुत्सद्दी व सार्वजनिक कार्यकर्ते.

यांचें शिक्षण मोरवी, राजकोट, मुंबई वगैरे ठिकाणीं झालें. हे मुंबई सरकारच्या कार्यकारी मंडळाचे सभासद ( १९१२-१५ ), कायदेमंडळाचे सभासद ( १९१६ ), इम्पिरियल लेजिस्लेटिव्ह कौन्सिलचे सभासद (१९१७), इंडिया कौन्सिलचे सभासद ( १९१७-१९१९ ), नंतर भावनगर संस्थानच्या कारभारी मंडळाचे अध्यक्ष झाले ( १९२० ). गोलमेजपरिषदेचे हे सभासद होते.

**पट्टाभिसीतारामय्या, डॉ. बी.**—( जन्म स. १८८० सुमार ) आंध्र प्रांतांतील सुप्रसिद्ध राष्ट्रसभा कार्यकर्ते व गांधीवादाचे प्रामाणिक भाष्यकार.

बी. ए. झाल्यावर यांनीं एम्. बी. सी. एम्. होऊन मच्छलीपट्टण येथें डॉक्टरी करण्यास सुरुवात केली ( १९०६ ). १९२० च्या असहकाराच्या चळवळींत यांनीं ती सोडून दिली व यांनीं ‘ जन्मभूमि ’ हे इंग्रजी साप्ताहिक सुरू केलें. १९३० सालच्या कायदेभंगाच्या मोहिमेंत यांना साडेतीन वर्षांची शिक्षा होईपर्यंत यांनीं तें अव्याहतपणें चालविलें होतें.

१९२१ ची असहकाराची चळवळ सुरू होतांच यांनीं तींत मनापासून भाग घेतला. या वेळचें यांचें कार्य इतकें प्रभावी ठरलें कीं, पुढें १९३०-३२ च्या कायदेभंगाच्या आंध्र प्रांतांतील चळवळीचीं सूत्रें आपोआपच यांचेकडे आलीं. याच सुमारास यांना प्रथम ए. आय. सी. सी.चे व नंतर वर्किंग कमेटीचें सभासद निवडण्यांत आलें. १९४२ च्या चळवळींतहि वर्किंग कमेटीच्या इतर सभासदांबरोबरच यांना अटक व नंतर यांची सुटका झाली.

यानंतर कांहीं दिवस आंध्र प्रांताच्या को-ऑपरेटिव्ह चळवळींत कार्य केल्यावर यांनीं आपल्या आवडत्या विमाव्यवसायांत भाग घेण्यास सुरवात केली. कलकत्त्याच्या युनिक इन्शुअरन्स कंपनींत कांहीं दिवस लोकल डायरेक्टरचें काम केल्यानंतर यांनीं आंध्र इन्शुअरन्स कंपनीची स्थापना केली ( १९२५ ऑगस्ट ). प्रथम डायरेक्टर बोर्डाचे चेअरमन म्हणून कांहीं दिवस काम केल्यानंतर यांना या कंपनीचे मॅनेजिंग डायरेक्टर नेमण्यांत येऊन तिचीं सर्व सूत्रें यांच्याकडे सोंपविण्यांत आलीं (१९३३). याशिवाय आंध्र बँक, भारत लक्ष्मी इन्शुअरन्स कं., हिंदुस्थान म्युच्युअल इन्शुअरन्स कं. इत्यादि विमासंस्थाची यांनीं स्थापना केली.

कॉंग्रेसच्या सुवर्ण महोत्सवाचे वेळीं यांनीं कॉंग्रेसच्या पन्नास वर्षांतील कार्याचा आढावा घेणारा Indian National Congress हा ग्रंथ लिहिला. इतिहासलेखकाला आवश्यक असणारी समतोल विचारसरणी व बिनचूक माहिती यांमुळें यांचा हा ग्रंथ अति महत्त्वाचा झाला आहे. हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भाषांत याचा अनुवाद झाला असून हा ग्रंथ मराठींत आणण्याचें काम महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध समाजवादी कार्यकर्ते भाई नारायण गणेश गोरे यांनीं केलें.

गांधीवादावरील यांची श्रद्धाहि तितकीच अनन्य असून म. गांधींचा पूर्ण विश्वास संपादन करण्याचें भाग्य यांना लाभलें. १९३८ च्या कॉंग्रेसच्या अध्यक्षाचे

निवडणुकीत तर श्री. सुभाषचंद्र बोसांचे विरुद्ध यांना गांधीजींनीं पाठिंबा दिला.

यांचे ग्रंथ—( 1 ) On Khaddar, ( 2 ) Indian National Congress, ( 3 ) Sixty Years of Congress, ( 4 ) Feathers and Stones, ( 5 ) National Education, ( 6 ) Indian Nationalism, ( 7 ) Redistribution of Indian Provinces on a Language Basis, (8) Gandhi and Gandhism ( दोन खंड ).

**पतियाळाचे महाराज, भूपेन्द्रसिंह**—( जन्म स. १८९१–मृत्यु स. १९३८ ) सुप्रसिद्ध क्रिकेटपटु.

यांचें नांव भूपेंद्रसिंह. हे पतियाळाचे महाराज असले तरी उत्कृष्ट क्रिकेटपटु व हिंदी क्रिकेटचे अभिमानी या नात्यानें हे सर्वत्र प्रसिद्ध असत.

१९११ सालीं इंग्लंडला गेलेल्या हिंदी टीमचें कप्तानपद यांना जागतिक बहुमतानें देण्यांत आलें. या टीमच्या इंग्लंडच्या प्रवासांत यांनीं दाखवलेलें क्रीडानैपुण्य, विशेषतः लिचसस्टर परगण्यांवरील या टीमनें मिळवलेल्या विजयाबद्दल यांचें सर्वत्र कौतुक झालें. चार व सहाचे फटकारे मारण्याबद्दल यांची विशेष प्रसिद्धी असे.

हिंदुस्थानांत आल्यावर हे सुप्रसिद्ध एम्. सी. सी.चें सभासद झाले व त्या संस्थेतर्फे हे १९२६ व १९३४ च्या मॅचमध्यें खेळले. १९३२ सालीं इंग्लंडला गेलेल्या हिंदी टीममध्यें यांना घेण्यांत आलें. परंतु प्रकृती अस्वास्थ्यामुळें हे जाऊं शकले नाहींत. बोर्ड ऑफ कंट्रोल फॉर क्रिकेट इन इंडिया या संस्थेच्या संस्थापकांपैकीं हे एक असून मृत्यूपूर्वी क्रिकेट क्लब ऑफ इंडियाचें अध्यक्ष होते.

इंग्लंडमधून खेळून आल्यापासून हिंदी क्रिकेटचें जगाच्या क्रीडाक्षेत्रांतील वैभव वाढविण्याची तळमळ यांना लागली होती. फ्रँक टॅरन्ट, विल्फ्रेड ऱ्होड्स, जॉर्ज हर्स्ट यांसारख्या पहिल्या दर्जाच्या क्रिकेटपटूंचा यांनीं स्वखर्चानें हिंदी खेळाडूंना परिचय करून दिला.

यांच्या राज्याचा परिचय यांचे चिरंजिवांचे चरित्रांत देण्यांत आला आहे.

**पतियाळाचे महाराज, यादवेन्द्रसिंह**—(जन्म स. १९१३ ) यांचे नांव यादवेंद्रसिंहजी. आपले वडील भूपेंद्रसिंह यांचेनंतर हे १९३८ सालीं पतियाळचें गादीवर बसले.

हिंदुस्थानांतील प्रमुख शीख संस्थान या दृष्टीनें पंजाबमधील यांच्या संस्थानाला विशेष महत्त्व आहे. यांच्या एकोणीस लक्ष लोकवस्तीपैकीं निम्म्यापेक्षां अधिक लोक शीख असल्यानें सर्व हिंदुस्थानांतील शीख लोकांना या संस्थानाबद्दल जिव्हाळा वाटतो. साहजिकच शीख लोकांच्या धार्मिक व सांस्कृतिक चळवळीचें पुढारीपण यांचेकडे ओघानेंच येतें.

हायकोर्टाच्या निकालावरील अपिलें ऐकण्यासाठीं इजलाम-इ-खास या न्यायमंडळाची स्थापना, जहागिर व नझूल कायद्यांचे उचाटण व उद्योगखात्याची स्थापना या यांनीं गादीवर आल्यानंतर केलेल्या प्रमुख सुधारणा होत. यांच्या संस्थानांत असलेल्या सिमेंट, बिस्किटें व स्टार्चच्या कारखान्याइतके मोठें कारखानें हिंदुस्थानात इतरत्र कोठेंहि नाहींत.

युद्ध सुरू होतांच शीख सैनिकीकरणाला उत्तेजन देण्यासाठीं यांनीं खालसा डिफेन्स ऑफ इंडियाची स्थापना केली. सुरवातीलाच तिला ५१००० रु.ची देणगी दिली व दरवर्षी १००० रु. देण्याची व्यवस्था केली. या संस्थेनें आतांपर्यंत दोन लाख शीखांची लष्करांत भरती केली. यांपैकीं ६५००० सैनिक यांच्या संस्थानांतीलच असून फर्स्ट राजेंद्र शीख, सेकन्ड यादवेंद्र इन्फन्ट्री, फर्स्ट राजेंद्र लान्सर्स व ५६ ए. टी. कंपनी या यांच्या सैन्य-तुकड्या लढाईत आघाडीवर होत्या. यांपैकीं तीन सैनिकांनीं या युद्धांत व्हिक्टोरिया क्रॉस मिळविला. याशिवाय ७ लक्ष रु.चे व्याजरहित कर्जरोखे व ८ लक्ष रु. व्हाइसरॉय फंडाला या संस्थाननें दिले.

अशा महत्त्वपूर्ण कार्यानेंच ६ हजार मैल क्षेत्रफळ व अडीच कोटी उत्पन्न असणाऱ्या या लहानशा संस्थानाचें नांव सर्व हिंदुस्थानांत दुमदुमत आहे. १९ तोफांची यांना असणारी सलामी हिंदुस्थानांतील फारच थोड्या संस्थानिकांना लाभली आहे.

**पदे, शंकर दाजीशास्त्री**—( जन्म स. १८६७–मृत्यु स. १९१० ) अखिल-भारतीय आयुर्वेद-महामंडळ, वैद्यक-महासंमेलन, आयुर्वेदविद्यापीठ या संस्थांचे संस्थापक व मराठी कादंबरीकार.

यांचे वडील मुंबईचे सुप्रसिद्ध ज्योतिषी होते. त्यामुळें यांना ज्योतिषविद्येचा लाभ घरींच झाला. पं. गट्टूलालजी-

पाशीं यांनीं अनेक शास्त्रांचें अध्ययन केलें, पण शेजारीं राहणारे भानु कुलकर्णी यांच्यामुळें हे वैद्य बनले. त्यापूर्वींच यांनीं 'बालमित्र' नांवाचें मासिक काढलें आणि तें फ्रुफकरेक्टिंगच्या मोबदल्यांत हे 'जगदीश्वर' प्रेसमधून छापून घेत. शिवाय विद्याप्रकाश, सयाजीविजय, नेटिव्ह ओपिनियन या मराठी नियतकालिकांतून शंकर, पिनाकी, भ्रमर इत्यादि टोपण नांवानें यांचें लेखन चालू असे. आयुर्वेदाच्या खास प्रचारासाठीं यांनीं सोळावे वर्षी 'राजवैद्य' नांवाचें मासिक काढलें ( १८८३ ).

या मासिकांत आयुर्वेदाच्या हीनावस्थेबद्दल हे निर्भीड चर्चा करून उपाय सुचवीत. सुमारें ८०० आयुर्वेदीय ग्रंथांची यादी प्रसिद्ध करून त्यांतील कोणते छापले गेले आणि कोणते छापले जाणें जरूर आहे हें यांनीं प्रसिद्ध केलें. सहा वर्षानंतर 'राजवैद्य' बंद करून 'आर्यभिषक्' मासिक यांनीं सुरू केलें ( १८८८ ). तें यांनीं आपल्या अंतापर्यंत चालविलें. यांच्या मृत्यूनंतर गोविंदराव पदे यांनीं तें चालविलें; पण त्यांच्या मृत्यूनें तें कायमचें बंद पडलें. हे गुजराथींतहि 'आर्यभिषक्' मासिक चालवीत. गुजराथ व महाराष्ट्र यांच्यानंतर यांचें लक्ष हिंदुस्थानीकडे वळलें. आणि यांनीं हिंदींत 'सद्वैद्यकौस्तुभ' हें पत्र काढलें. मराठींत चरक, वाग्भट, बृहन्निघंटु व निघंटुशिरोमणि या ग्रंथांची यांचीं भाषान्तरें व वनौषधि गुणादर्शाचे सात भाग हीं यांचीं पुस्तकें लोकप्रिय आहेत. अशीच लोकप्रियता यांच्या गुजराथी व हिंदी पुस्तकांनाहि लाभली.

लेखनाबरोबर सभासंमेलनादिकांच्या द्वारांहि यांनीं कार्यास सुरुवात केली. मुंबई वैद्यक-सभा स्थापून प्रभुराम जीवराम यांच्या सहकार्यानें आयुर्वेदविद्यालय स्थापन केलें. त्यालाच पुढें 'प्रभुराम आयुर्वेद कॉलेज' असें रूप देण्यांत आलें. त्याला पाश्चात्य वैद्यकाची जोड दिल्यामुळें यांनीं त्यांतून अंग काढून घेतलें. मुंबईची हवा मानवेना म्हणून हे नाशिक येथें जाऊन राहिले. तेथें यांनीं सनातनसभेचें धुरीणत्व पत्करून कार्यास सुरुवात केली. शारदापीठाच्या शंकराचार्यांनीं यांना 'आयुर्वेदमहोपाध्याय' अशी पदवी दिली.

स. १९०६ सालीं यांनीं आयुर्वेदमहामंडळाची स्थापना करून नाशिक येथें पहिलें निखिल भारतीय आयुर्वेद-संमेलन भरविलें ( १९०७ ). तेव्हांपासून महामंडळ व संमेलन यांचा व्याप सारखा वाढत चालला आहे. हिंदुस्थानभर त्यांचा प्रसार झाला असून या संस्थांचे हजारों पदवीधर देशभर कार्य करीत असून सरकारनेंहि यांच्या परीक्षांना मान्यता दिली आहे. संमेलनाच्या अध्यक्षस्थानीं वेगळाल्या प्रान्तांतील अध्यक्ष निवडून येतात व त्यांचा आसेतुहिमाचल प्रचार चालू असतो. पण या सर्व व्यापाचे मूळ संस्थापक हे होत. दुसरें पनवेल येथें व तिसरें संमेलन काशीस भरविण्याच्या खटपटींत असतां हे मृत्यु पावले.

यांचीं पुस्तकें—कादंबरी-१ सुंदराबाई, नाटिका-२ प्रेमपरीक्षण ( १८९३ ), आयुर्वेद-ग्रंथ—३ अश्वरोगपरिज्ञान ( १८९१ ), ४ रसवैद्य ( १८९१, १८९८ ), ५ वैद्यविजय अर्थात् ज्वरपराजय ( १८९३ ), ६ हारीतसंहिता सार्थ भाग १ ला ( १८९५ ), ७ बृहन्निघंटु ( १८९७ ), ८ योगशतक सार्थ ( १८९६ ), ९ निघंटशिरोमणि ( १८९८ ) वगैरे.

**पद्मसिंह शर्मा**—( मृत्यु स. १९३० ) हिंदी भाषेच्या प्राचीन साहित्याचे अभ्यासक व समालोचक.

यांनीं 'सतसई संहार' नांवानें पं. ज्वालाप्रसादमिश्र यांच्या सतसई टीकेची समालोचना लिहून संस्कृत, उर्दू, फारसी व हिंदी कवींची व त्यांच्या काव्याची तुलना करून जी समालोचना लिहिली ती हिन्दी भाषेंत अपूर्व आहे. यामुळें हिन्दी साहित्यांत यांचें नांव अमर झालें आहे.

**परमानंद भाई**—( जन्म स. १८७४ ) पंजाबमधील सुप्रसिद्ध हिंदुसभा कार्यकर्ते व पुढारी.

पंजाब युनिव्हर्सिटींतून एम्. ए. झाल्यावर आर्यसमाजांत सामील होऊन यांनीं लाहोरच्या डी. ए. व्ही. कॉलेजांत प्राध्यापकाचें काम करण्यास सुरुवात केली. याच सुमारास उत्तर व दक्षिण आफ्रिकेंतील हिंदी लोकांच्या विनंतीवरून म. हंसराज यांनीं यांना वैदिक धर्म व संस्कार यांच्या प्रचाराकरितां आफ्रिकेंत जावयाची आज्ञा दिली व यांच्या सार्वजनिक आयुष्यास सुरुवात झाली. भाई हें यांच्या ऐतिहासिक शीख घराण्याचें गौरवदर्शक उपपद आहे.

हे आफ्रिकेंत असतां यांच्या घरांत एस. अजितसिंग, सुफी अंबाप्रसाद यांसारखे क्रांतिकारक लोक वास्तव्य करून होते. त्यांच्या कटाचा सुगावा पोलिसांना लागल्याचें कळतांच ते तेथून निसटले व गैरमाहितीनें तेथें येऊन राहिलेले हे मात्र पोलिसांच्या कचाट्यात सांपडले.

पोलीस लोकांच्या काळ्या यादींत यांचा येथूनच समावेश झाला.

तीन वर्षांच्या चांगल्या वर्तणुकीच्या वचनाच्या पूर्तीसाठीं हे दक्षिण अमेरिकेंत जाऊन राहिले. तेथील मॅर्तनिक या फ्रेंच वसाहतींत यांची लाला हरदयाळ यांच्याशीं गांठ पडली व देशांत क्रांति करण्याच्या हेतूनें हिंदुस्थानांत पाठविण्यांत येणाऱ्या शीख व इतर लोकांत यांचा समावेश करण्यांत आला. याच कारणानें हिंदुस्थानांत आल्यानंतर गदर पार्टीच्या इतर सभासदांबरोबर यांना अटक करण्यांत आली. यांना राजाविरुद्ध बंड करण्याच्या आरोपावरून फांशीची शिक्षा झाली; परंतु नंतर तिचें रूपान्तर जन्मठेपींत करण्यांत येऊन यांना अंदमानला रवाना करण्यांत आलें (१९१५). १९२९ पर्यंत अंदमानमध्यें शिक्षा भोगल्यानंतर तेथील जीवन असह्य होऊन यांनीं आमरण अन्नत्यागाचा आपला निश्चय जाहीर केला. परंतु सी. एफ्. ॲन्ड्र्यूज यांचे रदबदलीनें वीस दिवसांच्या उपवासानंतर यांना मुक्त करण्यांत आलें.

हे तुरुंगांतून बाहेर आले तों यांना सर्वच वातावरण बदलल्याचें दिसून आलें. असहकाराच्या त्या जमान्यांत यांनीं कौमी विद्यापीठाच्या कुलगुरूचें कामहि पांच वर्षेपर्यंत केलें. परंतु या सर्व काळांत राष्ट्रीयत्त्वाच्या नांवाखालीं हिंदूंची चाललेली गळचेपी यांना पाहवेना. हिंदु-मुस्लिम ऐक्याचे घोषणेंत हिंदूंच्या हक्कांनाच झळ पोंचते असें यांच्या ध्यानांत आलें व यांनीं तसा प्रचार करण्यास सुरवात केली. यांच्या या 'धाडसी' कृत्याबद्दल यांची सर्वत्र अक्षरशः छिःथूः झाली, यांचेबद्दल लोकांनीं अनेक कंड्या उठविल्या, यांना वेडे ठरविण्याचासुद्धां घाट घातला. परंतु हे एकनिष्ठपणें कार्य करीत राहिले; पं. मालवीय, लाला लजपतराय, स्वामी श्रद्धानंद यांसारख्या लोकांचें सहकार्य यांना मिळालें व हिंदुसभेचें कार्य जोमानें सुरू झालें.

हिंदु-मुस्लिम प्रश्नाची भयानकता दिवसेंदिवस ब्रि. सरकारच्या व मुसलमानांच्या विशेष धोरणामुळें वाढत आहे. प्रत्येक बाबतींत झळ हिंदूंना, फायदा मुसलमानांना असा एकतर्फी व्यवहार चालला आहे. मुसलमानांनीं जातिनिष्ठ संघटना करावयाची पण हिंदूंनीं ती करूं लागतांच त्यावर बुद्धिहीनतेचा आरोप ठेवायचा. हिंदूंवर झालेले सर्व अत्याचार त्यांनीं सहन करावयाचे पण मुसलमानांच्या केंसाला धक्का लागला कीं त्यानें सुरा बाहेर काढावयाचा अशी कांहीं चमत्कारिक अवस्था हिंदुस्थानच्या जातीय प्रश्नाची झाली आहे. कॉंग्रेसच्या उदार जातीय धोरणाचा जरी हा परिणाम असला तरी प्रत्यक्ष कॉंग्रेसलाच हें सहन करणें अशक्य होण्यापर्यंत ही परिस्थिति वाढत चालली आहे. अशा स्थितींत केवळ परिणामावर लक्ष ठेवून यांच्यासारख्या कणखर माणसानें केलेलें कार्य केव्हांहि महत्त्वाचेंच राहील. हे अ. भा. हिं. महासभेचे अध्यक्ष होते (१९३३, अजमेर).

यांचे ग्रंथ—(1) History of India, (2) My Life Story. पत्र—Hindu Outlook.

**परांजपे, तपस्वी-नरहर शिवराम उर्फ बाबासाहेब**—(जन्म स. १८७२) देशकार्याला सतत वाहिलेले व कोणतेंहि काम चिकाटीनें सतत करणारे देशभक्त.

यांचें मराठी व इंग्रजी शिक्षण यवतमाळ येथें झालें. पुढें हे उमरावती हायस्कूलमधून हैदराबादच्या मेडिकलस्कूलमध्यें सरकारी शिष्यवृत्ति घेऊन गेले. तेथें १८९५-९७ व पुढें १९०२ पर्यंत यांनीं वऱ्हाडांत नोकरी केली. १९०९ पर्यंत यांनीं यवतमाळ येथें वैद्यकीचा स्वतंत्र धंदा व विद्यागृह नांवाची राष्ट्रीय शाळा तीन वर्षे चालविली. १९१० हें वर्ष यांनीं मुंबई येथील दैनिक राष्ट्रमत पत्रांत काम करण्यांत घालविलें. नंतर पुणें येथें 'मराठी वैद्यकवर्ग' ही संस्था तीन वर्षे चालविली. नंतर टिळक स्वराज्यसंघाचे चिटणीस म्हणून यांनीं काम केलें. पुढें वऱ्हाडांत बिगार-बलुत्याची चळवळ पांच वर्षे चालविली. त्यांत यांना सव्वा वर्ष कारागृहवास भोगावा लागला (१९२१). १९२५ पासून ग्रामपंचायतीच्या प्रचाराकरितां मुंबई, मद्रास, बंगाल, आसाम वगैरे प्रान्तांत हिंडून १९३० सालीं नागपूर येथें यांनीं 'ग्रामणी' संस्था स्थापन केली. प्रथम आठ महिने ग्रामणी मासिक इंग्रजींत चालवून १९३२ पासून ते मराठींत काढण्यास सुरवात केली. कांहीं वर्षे यांनीं आपलें जीवन ग्रामणी कार्याला वाहून घेतलें होतें.

आयुर्वेदांतील शारीर व त्रिदोष यांचा विशेष अभ्यास करून त्रिदोष म्हणजे आंतड्यांत उत्पन्न होणारे तीन रस-तीन विपाक होत व तीं प्रत्यक्ष द्रव्यें आहेत असें यांचें मत झालें. त्या दृष्टीनें यांनीं नाशिकसंमेलनांत त्रिदोषावरच्या निबंधाची मागणी केली. पनवेल व काशी येथें त्रिदोषचर्चापरिषदा भरविल्या. संस्कृत व इंग्रजी

भाषांतून तशी ग्रंथरचना करविण्याचाहि यांचा प्रयत्न चालू आहे. .

पूर्वी हे मिश्र वैद्यकाचे पुरस्कर्ते होते; पण आतां हे शुद्ध आयुर्वेदाचे पुरस्कर्ते झाले आहेत. कोणत्याहि मताचा पुरस्कार केल्यावर हे त्याबद्दल आग्रही होतात आसन्न स्थितींतहि आयुर्वेदाशिवाय इतर पद्धतीचें औषध घेण्याचें यांनीं टाळलें असल्यास तें अगदीं स्वाभाविक आहे. यांच्या निरपेक्ष व एकनिष्ठ कार्यपद्धतीनें यांना लोक तपस्वी असें गौरवितात.

**परांजपे, महादेव रामचंद्र**—( जन्म स.१८८२–मृत्यु स. १९४२ ) शिक्षणक्षेत्रांतील सुप्रसिद्ध पुढारी व प्रोग्रेस ऑफ एज्युकेशन या नियतकालिकाचे एक संस्थापक.

हे एम्. ए. झाल्यावर पुणें डेक्कन एज्युकेशन सोसायटीचे आजीव सभासद झाले व फर्ग्युसन कॉलेजांत प्राध्यापन करूं लागले. पण यांना ती सोसायटी राजकीय कारणामुळें सोडावी लागली व पुढें शिक्षणप्रसारक मंडळींत हे दाखल झाले. तेथें असतां हे पाटणा येथें भरलेल्या एज्युकेशन कॉन्फरन्सचे अध्यक्ष होते. यांचा शिक्षणविषयाचा व्यासंग चांगला होता.

मुंबई, विश्वविद्यालय व ऑल इंडिया टीचर्स फेडरेशन द्वारा अभ्यासक्रमांत प्रगति करण्याचें व परदेशांतील लोकांना इंग्रजींत लेख लिहून माहिती करून देण्याचें यांचें कार्य सतत चालू असे.

प्रत्येक गोष्ट नीटनेटकी, बिनचूक आणि जलद करण्याकरितां शिक्षणाची जरूर आहे. शाळेंतील शिक्षण उद्देशपूर्वक घेतलें जात नाहीं. कोणत्याहि व्यवसायांत पडल्यानंतर त्यांतील विशेष ज्ञान मिळविण्याकरितां शिक्षणाची आवश्यकता उत्पन्न होते. तसें शिक्षण लोकशाळा काढून लोकांना दिल्याशिवाय देशांत त्या त्या विषयांतील अद्ययावत् ज्ञान संपादन करून अधिक प्रगति करणारे लोक निर्माण होणार नाहींत. यांकरितां प्रौढ धंदेवाइकांना शिक्षण देणाऱ्या लोकशाळा सर्वत्र निघाल्या पाहिजेत. शिक्षक, कारकून, दलाल व व्याजबट्टा यांशिवाय राष्ट्रांत अनेक उद्योग चालू असतात. त्याकरितां देशी भाषांतून सुलभपणें सर्वांना कोणत्याहि विषयाचें ज्ञान मिळवितां आलें पाहिजे-वगैरे शिक्षणासंबंधीं महत्त्वाचे विचार यांनीं वेळोवेळीं मांडले.

मुंबईच्या रॉयल इन्स्टिटयूट ऑफ सायन्सचे सुप्रसिद्ध प्रि. गो. रा. परांजपे आय्. इ. एस्. हे यांचे बंधु होत.

यांचे इंग्रजी ग्रंथ—( 1 ) Some Experiments on the Cathode fall ( 1918 ), ( 2 ) Report on the use of Mother-tongue ( 1932 ), ( 3 ) Reliability of Examinations ( 1937 ), ( 4 ) A Source book of modern Indian Education ( 1938 ).

**परांजपे, रँगलर-रघुनाथ पुरुषोत्तम**—( जन्म स. १८७६ फेब्रु. १६ ) पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजचे माजी प्रिन्सिपल व ऑस्ट्रेलियाचे एजंट जनरल.

दापोली तालुक्यांतील मुर्डी गांवीं यांचा जन्म झाला. यांचे वडील दशग्रंथी वैदिक होते. यांचें शिक्षण मुंबई, पुणें, केम्ब्रिज, पॅरिस व गटिंगेन इत्यादि ठिकाणीं झालें. हिंदुस्थानांतील विश्वविद्यालयीन परीक्षांतून हे पहिले आले आणि सरकारी शिष्यवृत्तीनें हे इंग्लंडला गेले. १८९९ सालीं केम्ब्रिजला पहिल्या आलेल्या दोन सिनियर रँगलरपैकीं हे एक होत. त्या परीक्षेंत यांना व जॉर्ज बर्टव्हिसल यांना सारखेच गुण मिळाले व दोघेहि पहिले आल्याचें जाहीर झालें.

१९०२-२४ पर्यंत यांनीं फर्ग्युसन कॉलेजचे प्रिंसिपल व गणिताचे प्राध्यापक म्हणून काम केलें.

१९१६-२३ व १९२६ सालीं मुंबई विश्वविद्यालयातर्फे कायदेमंडळांत सभासद म्हणून हे निवडून आले. याचे आधीं १९१३ सालीं हे मुंबई, कायदेमंडळांत सरकारनियुक्त सभासद होते. त्या वेळीं हे तेथील शिक्षणमंत्री झाले ( १९२१-२३, १९२६ ). १९२७ सालीं यांची भारतमंत्र्याच्या इंडिया कौन्सिलचे सभासद म्हणून लंडन येथें नेमणूक झाल्यानें यांनीं मंत्रिपदाचा राजीनामा दिला. १९३५ च्या फेब्रुवारींत हे हिंदुस्थानांत परत आले व पुनः फर्ग्युसन कॉलेजांत प्राध्यापनाचें काम करूं लागले. पुढें हे लखनौ युनिव्हर्सिटीचे व्हाइस चान्सेलर झाले ( १९३५ ). आतां यांची आस्ट्रेलियामध्यें हायकमिशनर म्हणून नेमणूक झाली आहे ( १९४४ ).

याशिवाय यांनीं रिफार्म्स इन्कायरी ( १९२४ ), इंडि. टॅक्सेशन इन्कायरी वगैरे अनेक कमिट्यांवर कामें केलीं आहेत.

हे राजकारणांत प्रागतिक पक्षाचे असून यांना लिबरल फेडरेशनच्या अध्यक्षपदाचा मान प्राप्त झालेला आहे.

हे बुद्धिवादी समाजसुधारक असून निर्भयपणें आपल्या मताच्या प्रतिपादनाबद्दल आणि तीं मतें व्यवहारांत आणण्याबद्दल प्रसिद्ध आहेत.

यांचे ग्रंथ—( 1 ) Gopal Krishna Gokhale ( 1915 ), ( 2 ) The Crux of the Indian Problem ( 1931 ), ( 3 ) Religion and the Indian Problem, ( 4 ) Selected Writings and Speeches ( संपादक-भा. म. गोरे ), ( 5 ) Rationalism is Practice.

**परांजपे, प्रा. शिवराम महादेव**—( जन्म स. १८६४–मृत्यु स. १९२९ ) मराठींतील प्रतिभाशाली साहित्यिक-लेखक, वक्ते, वृत्तपत्रकार व ध्येयवादी राजकारणी.

यांचा जन्म महाड येथें झाला. शिक्षण महाड, रत्नागिरी व पुणें येथें झालें. मॅट्रिकच्या परीक्षेंत यांना पहिली जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ति मिळाली (१८८४). डेक्कन कॉलेजांतून एम्. ए. झाले त्या वेळीं यांना 'भगवानदास पारितोषिक' व 'झाला वेदान्त प्राइझ' मिळालें ( १८९२ ). नंतर पुण्याच्या भावे स्कूलच्या महाराष्ट्र कॉलेजांत हे संस्कृतचे प्राध्यापक झाले. पण १८९७ च्या प्रक्षुब्ध वातावरणांत तें कॉलेज सरकारनें बंद केलें. १८९८ सालीं 'काळ' नांवाचें साप्ताहिक वर्तमानपत्र काढून यांनीं राजकीय कार्यांत पदार्पण केलें, तथापि लोक यांना जन्मभर प्रोफेसर म्हणूनच ओळखत असत. काळांतील लेखांबद्दल राजद्रोही म्हणून यांना १९ महिन्यांची स. म. शिक्षा झाली. हे सुटून येईपर्यंत 'काळ' पत्र चालू होतें ( १९१० ). पण पुढें तें प्रेस ॲक्टला बळी पडलें. तसेंच यांच्या 'काळांतील निवडक निबंधां'चे दहा भागहि जप्त झाले. फक्त दहावा भाग प्रथम राष्ट्रसभामंत्रिमंडळानें ( १९३७ ), व बाकीचे भाग १९४६ एप्रिलमध्यें मुक्त करण्यांत आले.

१९२० सालीं यांनीं 'स्वराज्य' साप्ताहिक काढलें व म. गांधींच्या असहकारितेचे एकनिष्ठ पुरस्कर्ते बनले. पण तेव्हां यांचें तेज विशेष पडलें नाहीं. यांचें विविध प्रकारचें लेखनकार्य आजन्म चालू होतें. पण यांच्या लेखनाचा आणि वक्तृत्वाचा परम लोकप्रियतेचा काळ म्हणजे १८९८-१९०८ हा सांगतां येईल. यांच्या वाङ्मयसेवेच्या गौरवार्थ यांना बेळगांवच्या मराठी-साहित्य-संमेलनाचें अध्यक्षस्थान देण्यांत आलें होतें ( १९२८ ). शेवटीं यांनीं राजकारण सोडलें होतें. हे मधुमेहानें वारले.

संस्कृत भाषेंतील ललित वाङ्मय, न्याय, मीमांसा वगैरे विषयांप्रमाणेंच काव्य, कादंबरी, कथा, इतिहास-संशोधन, मराठ्यांच्या लढाया, शब्दांच्या व्युत्पत्त्या वगैरे अनेक विषयांवर यांनीं आपली लेखणी चालविली. तथापि निबंधलेखनांत यांचें अन्तरंग व्यक्त झालेलें दिसतें. असें निबंधलेखन करतांना हे नाना प्रकार उपयोगांत आणीत. संभाषण, स्वप्न, आत्मगत भाषण, कथा, रूपक इत्यादि मार्गांनीं आपलें मनोगत व्यक्त करण्याची यांची हातोटी आश्चर्यकारक सफाईदार असे. यांचा ओढा पूर्ण स्वातंत्र्याकडे असे, आणि त्याशिवाय इतर सर्व गोष्टींकडे तुच्छतेनें व उपहासानें पाहण्याची यांची वृत्ति होती. 'वंदे मातरम्' हे साधे शब्द उच्चारण्याबद्दलहि जेव्हां फटके खावे लागत त्या कालांत सडेतोड लिहिण्याची पद्धत सोडून उपरोधिक लिहिण्या-कडे यांच्यासारख्यांचा कल होणें स्वाभाविक होतें. पण यांच्या उपरोधिक लिहिण्यानें सडेतोड लिहिण्यापेक्षां अधिक परिणाम होई आणि वाचक भारला जाई. यांची लेखणी एकदां सफाईदारपणें सुरू झाली कीं ती वाच-काला आपल्याबरोबर लीलेनें घेऊन जाई. यामुळेंच यांना मराठीचे गद्य कवि म्हणणें योग्य होईल. यांच्या या सर्व लेखनशक्तीची उत्कृष्ट मिळवणी 'भासाची भवि-तव्यता' या निबंधांत पाहावयास मिळते.

तशीच यांच्या वक्तृत्वाची स्थिति होई. यांच्या ओघवती व ओजस्वी वाणीचा प्रवाह सुरू झाला कीं तासन् तास श्रोते मंत्रमुग्ध नागाप्रमाणें बेभान होऊन डोलूं लागत आणि खरें वक्तृत्व म्हणजे काय याचा त्यांना प्रत्यय येई. यांच्यासारखा वक्ता व मराठ्यांच्या इतिहासासारखा विषय असला कीं अंगांत वीरश्रीचा संचार होऊन श्रोत्याला आपण दोन तलवारींचे हात खेळावेत असें वाटावयास लागे.

यांचें वाङ्मय—निबंध–१ काळांतील निबंध-भाग १-१०; २ साहित्यसंग्रह भाग १-२, १९२२, १९२५; ३ स्वराज्यांतील निवडक निबंध. नाटकें–४ संगीत कादंबरी १८९७; ५ मानाजीराव १८९८,१९२८; ६ रामदेवराव, १९०६; ७ भीमराव, १९०७; ८ पहिला पांडव, १९३१; ९ मीराबाई ( अपूर्ण ). कादंबऱ्या–१० गोविंदाची गोष्ट १९१८, १९२५; ११ विंध्याचळ १९२४. संकीर्ण–१२ तर्कसंग्रहदीपिका १८९९, १९१०;

१३ तर्कभाषा १९०४; १४ तर्कसंग्रह १९२२; १५ रामायणाविषयीं कांहीं विचार; १६ अर्थशास्त्र; १७ सूर्याच्या गैरसोई १९२०. १८ अहल्याजारकाव्य १९२४; १९ कालिदासानें न लिहिलेलें नाटक १९२५; २० अर्थसंग्रह १९२७; २१ मराठ्यांच्या लढायांचा इतिहास १९२८, २२ शाकुन्तल नाटकांतील चौथा अंक, लोकशिक्षण, अंक ३-४, १९२९.

**पलुस्कर, पंडित विष्णु दिगंबर**—( जन्म स. १८७२–मृत्यु स. १९३१ ) सुप्रसिद्ध गायक, शास्त्रोक्त गायनाचे प्रचारक, गांधर्वमहाविद्यालयाचे संस्थापक आणि कुशल संघटक.

यांनीं बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर यांचेपाशीं गायनशास्त्राचें अध्ययन केलें. प्रथम यांना आवाजाची तितकीशी अनुकूलता नव्हती, पण यांनीं अत्यंत मेहनतीनें आवाज कमावला. नैसर्गिक देणगी असलेल्या गायकांमध्यें सुद्धां क्वचितच आढळणारे गुण मेहनतीच्या जोरावर यांनीं संपादन केले. एक प्रकारची ज्योत यांच्या आवाजांत तेवत असल्याचा भास यांचें गाणें ऐकतांना होई. आधींच जोरदार असलेल्या यांच्या आवाजांत मेहनतीनें एक नवीनच तेज निर्माण झालें. मेघगर्जनेसारखा धीरगंभीर व कणखर असा आवाज यांच्याइतका इतरत्र क्वचितच ऐकावयास मिळे.

बराच अभ्यास झाल्यावर स्वतःच्या महत्त्वाकांक्षी स्वभावास अनुसरून यांनीं उत्तर हिंदुस्थानांत प्रयाण केलें ( १२ ऑगस्ट १८९६ ). दिग्विजयास निघालेल्या वीराप्रमाणें हे अनेक सभा जिंकीत पुढें चालले. एका साधूच्या आदेशावरून यांनीं प्रथम लाहोर येथें गांधर्वमहाविद्यालयाची स्थापना करून आपल्या जीवितकार्यास सुरुवात केली.

यांनीं गायन व गायक यांचा समाजांतील दर्जा वाढविला, गायनाला व्यसनी व हलक्या लोकांच्यांतून काढून तें सभ्य स्त्री-पुरुषांच्या सात्त्विक करमणुकीचें उत्कृष्ट साधन असल्याचें लोकांच्या निदर्शनास आणलें. ध्येयवादी, निर्व्यसनी व शुद्ध आचाराची नमुनेदार शिष्यपरंपरा निर्माण करून समाजांत संगीताचा प्रचार केला आणि या शास्त्राची अमोल सेवा केली. यांची शिष्यशाखा फार मोठी असून हिंदुस्थानांतील प्रत्येक प्रमुख शहरीं यांची शिष्यमंडळी संगीताचें कार्य चालवीत आहेत. कै. ना. मो. खरे, प्रा. कशाळकर, प्रा. नारायणराव व्यास, पं. वामनराव पाध्ये, पं. ओंकारनाथ ठाकूर, पं. विनायकबुवा पटवर्धन इ. अनेक नामवंत लोक यांच्या शिष्यशाखेंत मोडतात.

अश्लील अर्थाचीं पद्यें न गातां सार्थ व भक्तिपूर्ण रसाळ पद्यें भावनापूर्णतेनें गाण्यांत तर यांचा हातखंडा असे, आणि आपल्या शिष्यांनींहि गायनाचें भारदस्त व अर्थबोधक शास्त्रीय स्वरूप टिकवावें असा यांचा आदेश असे. शेवटीं हे तुळशीदास रामायणावर संगीत प्रवचनें करीत हिंदुस्थानभर हिंडत.

यांनीं संगीताचें स्वरलेखन निर्माण करून तें यशस्वी करून दाखविलें. यांनीं साठसत्तर पुस्तकें लिहिलीं आहेत.

**पवार, शिवराम गणपतराव**—( जन्म स. १८६६–मृत्यु स. १९३९ ) महाराष्ट्रांतील प्रसिद्ध ज्योतिर्गणिततज्ज्ञ.

हे राहणार सडें, ता. राहुरी, जि. नगर येथील होत. हे पुणें ट्रेनिंग कॉलेजांतून तिसऱ्या वर्षाची परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर यांनीं शाळा खात्यांत नोकरी धरली. तेथें हे असि. डे. एज्यु. इन्स्पेक्टरच्या जागेपर्यंत चढले. पुढें पेन्शन घेतल्यावर मूळ गांवीं खेड्यावर राहत व ज्योतिषविषयाचें चिंतन व ग्रंथलेखन करीत.

यांचें संस्कृत व इंग्रजी भाषेचें ज्ञान मर्यादित होतें तरी यांनीं स्वयंशिक्षणपद्धतीनें भारतीय व युरोपियन ज्योतिषाचें ज्ञान चांगल्या प्रकारें संपादन केलें. एवढेंच नव्हे, मराठींत अशा कठीण विषयाची माहिती यांनीं आपल्या ग्रंथांत अत्यंत सुबोध रीतीनें दिली.

यांचे कौमुदी, रेवतीयोगतारेचा शोध, लग्नसाधन, सारण्या व सूर्येन्दुस्थानमान हे ज्योतिषविषयक ग्रंथ प्रसिद्ध आहेत. पैकीं सूर्येन्दुस्थानमान या ग्रंथाच्या प्रकाशनाला कै. सयाजीराव गायकवाड यांनीं चांगलें साहाय्य केलें आहे.

याशिवाय ग्रहगतिसिद्धान्त, ग्रहस्थविज्ञानपंचांगकल्पतरु व उपरागविज्ञान हे ग्रंथ यांनीं लिहिलेले असून व अप्रकाशित आहेत. यांपैकीं ग्रहगतिसिद्धान्त हा ग्रंथ केसरी-मराठा ट्रस्टनें छापावयास हातीं घेतला व हे वारले. रेवतीयोगतारा आरंभस्थानीं मानला पाहिजे असें यांचें मत असून टिळक पंचांगाचे हे कट्टे पुरस्कर्ते होते. इंदूरच्या संमेलनांत सूर्यसिद्धान्ताच्या आधारावरून यांनीं चित्रापक्ष खोडला.

**पंडित, शंकर पांडुरंग**—( जन्म स. १८४०—मृत्यु स. १८९४ मार्च १८ ) सुप्रसिद्ध संशोधक, अभ्यासक व लेखक.

जन्मस्थान—बांबुळी गांव ( संस्थान सावंतवाडी ). जात-सारस्वत ब्राह्मण. लहानपणीं तात्पुरता अभ्यास करून हे कुळकर्णीपणा करूं लागले. पण पुढें इंग्रजी शिकून हे एम्. ए. झाले ( १८६५ ). हे एल्फिन्स्टन कॉलेजांत फेलो, दक्षिणा प्राइज कमेटीचे सेक्रेटरी व डेक्कन कॉलेजांत प्राध्यापक झाले (१८६८). नंतर डे. कलेक्टर, इन्कमटॅक्स कलेक्टर, ओरिएन्टल ट्रान्स्लेटर वगैरे कामें केल्यावर पोरबंदर संस्थानचे ॲडमिनिस्ट्रेटर होते.

सरकारनें यांना इंटर-नॅशनल कॉंग्रेसमध्यें प्रतिनिधि म्हणून पाठविलें होतें ( १८७४ ). ऋग्वेदाचें इंग्रजी व मराठी चिकित्सक भाषान्तर करण्याचा वेदार्थयत्न नांवाचा यांचा प्रयत्न यांच्या गाढ व्यासंगाची आणि दीर्घोद्योगाची साक्ष देतो. तो प्रयत्न चार मंडळें व दोन सूक्तें झाल्यानंतर अपूर्ण राहिला. तुकारामाच्या अभंगांची गाथा व अथर्ववेदाची सभाष्य आवृत्ति हें यांच्या प्रयत्नाचें फळ होय.

**पंडित, सीताराम नारायण**—( जन्म स. १८४८—मृत्यु स. १९१८ ) प्रसिद्ध बॅरिस्टर व उदार दाते.

कुडाळ, वेंगुर्ले, रत्नागिरी वगैरे ठिकाणीं शिकून हे मॅट्रिक झाले. कॉलेजमध्यें एक वर्ष काढून हे इंग्लंडला जाऊन बॅरिस्टर होऊन आले ( १८७० ). हे राजकोट येथें वकिली करीत. यांनीं विपुल संपत्ति मिळविली व दानधर्मांत खर्च केली. प्रो. धों. के. कर्वे यांच्या हिंगण्याच्या संस्थेस यांनीं तेरा हजार व बनारस सेंट्रल हिंदु कॉलेजास सोळा हजार रुपये दिले. अलीगड इस्लामी कॉलेजास साडेचार हजार रुपये दिले. वाडी संस्थानांत कुडाळ गांवीं यांनीं धर्मार्थ व्हिक्टोरिया हॉस्पिटल बांधलें. शिवाय आपल्या सारस्वत ब्राह्मण ज्ञातीच्या संस्थांनाहि यांनीं मदत केली आहे ( श्री. ना. कर्नाटकी—शं. पां. पंडित चरित्र-परिशिष्ट ). यांचे पुत्र रणजित पंडित होत.

**पंडित, बॅ. रणजित सीताराम**—( जन्म स. १८८९—मृत्यु स. १९४४ ) सुप्रसिद्ध कायदेपंडित व अभ्यासक.

जन्मस्थान—राजकोट. यांचें घराणें महाराष्ट्रीय सारस्वत ब्राह्मण. यांचे वडील सीताराम नारायण पंडित, हे बॅरिस्टर होते.

गुजराथेंत जन्म आणि घरांत इंग्रजी पद्धतीची वागणूक, संभाळण्याकरितां ठेवलेली दाईसुद्धां इंग्रज, यामुळें महाराष्ट्रीय असूनहि यांना मराठी बोलतां येत नसे. राजकोट व मुंबई येथें शिक्षण झाल्यावर हे इंग्लंडला गेले. अनेक वर्षे तिकडे राहून हे परत आले. प्रथम राजकोटला व नंतर कलकत्ता येथें हे वकिली करीत. शेवटीं मात्र हे अलाहाबादेस स्थिर झाले. कलकत्त्यास लॉर्ड सिंह व हिंदुस्थान सरकारचे लॉ मेंबर सर बी. एल. मित्र यांच्या हाताखालीं हे प्रॅक्टिस करीत. तेथें पं. मोतीलाल नेहरु यांची कन्या विजयालक्ष्मी यांच्याशीं यांचा विवाह झाला.

१९४२ च्या 'चलेजाव'च्या चळवळींत हे तुरुंगांत असतां यांनीं कालिदासाच्या ऋतुसंहाराचें इंग्रजी भाषान्तर 'ए पेजन्ट ऑफ दि सिझन्स' या नांवानें केलें असून सरोजिनी नायडूंची त्याला प्रस्तावना आहे. तसेंच कल्हणाच्या राजतरंगिणीचें यांनीं इंग्रजी भाषान्तर केलें आहे. त्याला जवाहरलाल नेहरूंची प्रस्तावना आहे.

**पंडित, विजयालक्ष्मी**—( जन्म स. १९०० ) राष्ट्रसभेचा परदेशांत प्रचार करणाऱ्या व हिंदुस्थानांतील पहिल्या स्त्रीमंत्री.

या पंडित जवाहरलाल नेहरूंच्या धाकट्या भगिनी होत. यांचें मूळ नांव स्वरूपकुमारी नेहरु. यांचें सर्व शिक्षण घरींच शिक्षकाकडून झालेलें आहे.

यांचें लग्न बॅ. रणजित सीताराम पंडित या महाराष्ट्रीयाबरोबर झालें ( १९२१ ). यांना चंद्रलेखा, नयनतारा व ऋतुविलासा नांवांच्या तीन कन्या आहेत.

मोतीलाल नेहरूंची कन्या असल्यामुळें यांचा कॉंग्रेसशीं लहानपणापासून संबंध आला. यांना स. १९३२ च्या चळवळींत एक वर्षाची व ५०० रु. दंडाची शिक्षा झाली. स. १९३५ मध्यें या अलाहाबादच्या म्यु. बोर्डांत कॉंग्रेसच्या प्रतिनिधी म्हणून निवडून आल्यानंतर या तेथें शैक्षणिक समितीच्या दोन वर्षे अध्यक्ष होत्या. ८ ऑगस्ट १९४२ च्या चळवळींत या तुरुंगांत होत्या. त्यांतून या सुटल्या आणि अमेरिकेंत गेल्या. अमेरिकेंत असतां यांनीं हिंदुस्थानच्या स्वातंत्र्य चळवळीची वकिली तडफदार भाषेंत उत्कृष्ट केली.

सरकारला कांहीं वेळा खुलासे करावे लागले इतकी ती परिणामकारक झाली. पुनः हिंदुस्थानांत आल्यानंतर यांनीं आपलें राजकीय काम चालू ठेवलें (१९४६ जाने.). लेखन, भाषण, मुलाखती आणि ठळक प्रसिद्धीकरण यांचें चक्र सतत चालू ठेवण्याचें तंत्र यांना जवाहरलाल नेहरूंप्रमाणें उत्कृष्ट साधलें आहे.

या संयुक्त प्रान्तांतील कायदेमंडळांत १९३७ व १९४६ सालीं निवडून आल्या व पं. गोविंद वल्लभ पंत यांच्या नेतृत्वाखालीं स्थापन झालेल्या राष्ट्रसभा मंत्रिमंडळांत यांचा पुनः समावेश झाला आहे.

यांचे ग्रंथ—(1) So I became a Minister, (2) Prison Days.

**पंडित, विष्णु परशुरामशास्त्री**—(जन्म स. १८२७–मृत्यु स. १८७६) प्रसिद्ध वर्तमानपत्रकार व पुनर्विवाहाचे प्रचारक.

यांचें गांव वाईजवळचें बावधन. वडील सातारकर छत्रपतींचे आश्रित. यांचें शिक्षण राघवाचार्य व वडील यांचेपाशीं झालें. १८४५ च्या सुमारास पुणें, विश्रामबाग पाठशाळेंत हे इंग्रजी शिकले. पुढें ट्रान्स्लेशन एक्झिबिशनर, शिक्षक वगैरे कामें करून हे सेवानिवृत्त झाले. नोकरीवर असतांनाच मुंबईच्या इंदुप्रकाशांत हे लिहीत (१८६४). यांनीं पुनर्विवाहोत्तेजक मंडळी काढली (१८६५). तिचे अध्यक्षादि श्रीमंत जमखिंडीकर, विंचुरकर वगैरे व हे चिटणीस असत. वेणुबाई परांजपे वय १६ यांचा पांडुरंग विनायक करमरकर यांच्याशीं पुनर्विवाह झाला. तेव्हां यांच्यावर श्रीशंकराचार्यांकडून बहिष्कार जाहीर झाला. वादाचें आव्हान सुधारकांनीं स्वीकारलें व पुढीलप्रमाणें पंच निवडले गेले.

पुनर्विवाहवादी पंच–१ कृष्णशास्त्री चिपळुणकर, २ व्यंकटशास्त्री माटे, ३ रावजीशास्त्री आगाशे, ४ रघुनाथशास्त्री शेंडे, ५ केशवशास्त्री गाडगीळ. निषेधक पंच–१ दिनकरशास्त्री खांबेटे, २ गणेशशास्त्री कोल्हटकर, ३ भिकुशास्त्री गोडबोले, ४ अप्पाशास्त्री खाडिलकर, ५ भिकाचार्य खांबेटे. सरपंच–गोपाळाचार्य कऱ्हाडकर (ग्वाल्हेरकर). वादी–विष्णुशास्त्री पंडित. प्रतिवादी–नारायणाचार्य गजेन्द्रगडकर.

कृष्णशास्त्री चिपळुणकर हे एका मिश्र उपाहारप्रसंगीं हजर होते म्हणून त्यांना पांचशें रुपये दंड व सक्षौर प्रायश्चित्त देऊन पंचांत समाविष्ट करण्यांत आलें. वादाचीं कलमें ठरून वाद कसबा पेठेंतील दीक्षितांच्या (आतां मोत्यांच्या) वाड्यांत झाला. फाल्गुन वद्य ११ शके १७९१ ते चैत्र शु. ३ शके १७९२ पर्यंत नऊ दिवस वाद झाला. यांना वादप्रसंगीं संदर्भ ग्रंथ हाताशीं देण्यास व इतर साहाय्य करण्यास ज. वि. गाडगीळ, न्या. म. गो. रानडे, (डॉ. सर) रा. गो. भांडारकर आणि वि. रा. पटवर्धन वगैरे मंडळी होती.

कलिधर्माधिकरणान्तर्गत कलियुगास अद्यापि आरंभ झाला नसल्यानें कलियुगांत निषिद्ध मानलेला पुनर्विवाह आज निषिद्ध मानण्याचें कारण नाहीं या मुद्यास निषेधपक्षाकडून उत्तर मिळालें नाहीं म्हणून हा वाद अपूर्ण झाला, असें पुनर्विवाहवाद्यांचें म्हणणें होतें.

असेच परदेशगमन, वपननिषेध, अनाथप्रेतदहन, शूद्रान्नसेवन, वगैरे अनेक बाबतींत यांनीं प्रचार केला. धर्मशास्त्राचा संबंध असलेल्या विषयाप्रमाणें स्वदेशी, व्यापार, ईस्ट इंडिया असोसिएशनची स्थापना वगैरे विषयांतहि हे भाग घेत. प्रथम पत्नी वारल्यावर यांनीं वामनराव आगाशे यांची विधवा कन्या कुशाबाई इच्याशीं पुनर्विवाह केला (१८७४). पण पुढें उन्मादवायूनें महाबळेश्वरीं यांनीं देह ठेवला. यांच्या मृत्यूबद्दल दुःखप्रदर्शनार्थ व स्मारक करण्याकरितां अनेक सभा झाल्या. यांच्या स्मारकार्थ जमलेले एक हजार रुपये पुढें विडो मॅरेज असोसिएशनला देण्यांत आले. लोकांचा अत्यंत विरोध असणाऱ्या कालांत यांनीं पुनर्विवाहाचा प्रचार केला.

'बृहत्पराशरस्मृति' हा ग्रंथ कृष्णशास्त्री साठे यांनीं छापविला त्यांतील चित्पावन ब्राह्मणांची प्रशंसा असलेले तीन श्लोक खोटे असल्याचें यांनीं उघडकीस आणलें (सरस्वतीमंडळ–रा. भि. गुंजीकर).

यांचे मराठी ग्रंथ—१ हिंदुस्थानचा इतिहास (मरे–तिसरा भाग), २ विधवाविवाह, ३ विधवोद्वाहविवेक, ४ ब्राह्मणकन्याविवाहविचार, ५ पुष्पमाला–काव्य, ६ स्मृतिशास्त्र, ७ शूद्रधर्म, ८ स्त्रीगायनसंग्रह, ९ स्त्रियांचे अधिकार, १० इंग्रजी मराठी कोश, ११ वेदांतील सूर्यासावित्रीविवाह, १२ मृतदिनश्राद्धविचार.

**पंत, पं. गोविंद वल्लभ**—(जन्म स. १८८७) संयुक्त प्रांतांतील सुप्रसिद्ध काँग्रेस पुढारी व हिंदी भाषेंतील प्रसिद्ध नाटककार.

अलमोरा जिल्ह्यांतील एका लहान गांवीं यांचा जन्म

झाला. यांचें घराणें मूळ महाराष्ट्र ब्राह्मण असून आतां पूर्णपणें संयुक्त प्रान्तीय बनलें आहे. यांचे वडील जमीन-महसूल खात्यांत नोकर होते. कुमाउ प्रांतांतील सुप्रसिद्ध सार्वजनिक कार्यकर्ते रायबहाद्दुर बद्रीदत्त जोशी हे यांचे अजोबा होत. अलमोरा व अलाहाबाद येथें शिक्षण संपवून हे बी. ए. व एल्‌एल्. बी. झाले. वकिलीच्या परीक्षेंत यांचा नंबर पहिला येऊन यांना ल्युमस्‌डेन सुवर्णपदक मिळालें ( १९०९ ).

यानंतर यांनीं नैनिताल येथें वकिली करण्यास व कुमाउच्या सार्वजनिक चळवळींत भाग घेण्यास सुरुवात केली. १९१६ सालीं यांनीं पं. हरगोविंद पंत व पं. बद्रिदत्त पांडे यांच्या सहकार्यानें कुमाउ परिषदेची स्थापना केली. भिकाऱ्यांची व्यवस्था, मजुरांची जबरीनें भरती, जंगलांतील अत्याचार असे अनेक प्रश्न या संस्थेपुढें होते. त्यांतील मजुरांच्या भरतीचा प्रश्न तर केवळ यांच्या टोंचणीमुळें सरकारला हातीं घेणें भाग पडलें.

मॉंटफर्ड सुधारणांच्या वेळींहि ह्यांनीं कुमाउची बाजू लढविली. मॉंटफर्ड सुधारणांतून कुमाउ प्रांताला वगळतांच यांनीं त्याबद्दल साउथबरो कमिशनपुढें साक्ष दिली व इतर मागासलेल्या जातींच्या प्रांतांतून त्या प्रांताला वेगळें करण्यास यांनीं सरकारला भाग पाडलें.

१९०५ सालच्या बनारस कांग्रेसला हे प्रथम हजर राहिले. तेव्हांपासून संयुक्त प्रांतांतील प्रमुख कांग्रेस कार्यकर्त्यांत यांची गणना होत असून ए. आय. सी. सी.चे सभासद ( १९१६ ), यू. पी. लेजिस्लेटिव्ह कौंन्सिल-मधील कॉंग्रेस पक्षाचे पुढारी ( १९२४ ), सेंट्रल लेजि-स्लेटिव्ह असेंब्लींतील कॉंग्रेस पक्षाचे उपनेते ( १९३४ ). ऑल इंडिया पार्लमेंटरी बोर्डाचे सेक्रेटरी अशा अनेक पायऱ्या चढत चढत हे कांग्रेस वर्किंग कमेटीचे सभासद बनले. असेंब्लींत पं. मोतीलाल नेहरू यांचे स्वराज्यपक्षाचे स्थापनेंत हे प्रमुख साहाय्यक होते. सायमन कमिशनविरुद्ध निघालेल्या मिरवणुकींत यांना व पंडित जवाहरलाल नेहरू यांना पोलिसांच्या लाठी-हल्ल्यांत देहदंड सोसावा लागला.

१९३७ व १९४६ सालीं कॉंग्रेसनें संयुक्त प्रांतांत निवडणुकी लढविल्या त्या वेळीं दोन्ही वेळीं यांना त्या प्रांतांतील कॉंग्रेसपक्षाचे नेते म्हणून एकमतानें निवड-ण्यांत येऊन यांना मुख्य प्रधान करण्यांत आलें. १९३७ सालीं यांनीं अर्थ, गृह व जंगलखातें आपणां-कडे घेतलें होतें.

हिंदी भाषेंतील सुप्रसिद्ध नाटककारांत यांची गणना करण्यांत येते. वरमाला ( मार्कण्डेय पुराणाधारें ), राजमुगुट, अंगूर की बेटी इत्यादि यांचीं नाटकें प्रसिद्ध आहेत.

**पंत, सुमित्रानन्दन गङ्गादत्त**—( जन्म स. १९०० मे २४ ) हिन्दींतील नवयुगप्रवर्तक अर्वाचीन कवि.

जन्मस्थान–कौसानी, अल्मोडा जिल्हा. यांचे वडील कौसानी संस्थानचे खजिनदार व जमिनदार होते. १९१९ सालीं बनारसच्या जयनारायण हायस्कूलमधून हे स्कूल लीव्हिंग परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर यांनीं अलाहा-बादच्या मूर कॉलेजांत दोन वर्षे काढलीं. नंतर यांनीं शिक्षण सोडलें. यांना हिन्दी व इंग्रजीशिवाय संस्कृत व बंगाली भाषाहि चांगल्या येतात. यांना हिन्दी कविता करण्याची आवड स्वाभाविक आहे.

प्रथम रवीन्द्रनाथ टागोरांचें अनुकरण करून छाया-वादी कवि म्हणून हे पुढें आले. पण पुढें यांच्या कवितेचा विकास स्वतंत्र झालेला आहे. कोमल भावना व मधुर भाषा यांबद्दल यांची विशेष प्रसिद्धि आहे. हिन्दी भाषेंत यांच्या कविता अगदीं नवीन तऱ्हेच्या मानल्या जातात.

यांचें वाङ्मय—काव्यसंग्रह–१ वीणा, २ उच्छ्वास, ३ पल्लव, ४ ग्रंथि, ५ गुंजन, ६ युगान्त, ७ युगवाणी. कादंबरी–हार ( १९१५ ).

**पंतलु, सुब्बाराव**—( जन्म स. १८५६–मृत्यु स. १९४१ ) आंध्र प्रांताचे जुने पुढारी व राष्ट्रीय सभेचे १९१३-१७ सालचे चिटणीस.

नामांकित वकील म्हणून यांचा लौकिक होता. राजमहेंद्रीच्या स्थानिक स्वराज्य संस्थेपासून स. १८९२ सालच्या कायद्याप्रमाणें अस्तित्वांत आलेलें मद्रास कौंसिल व स. १९०९ च्या कायद्याप्रमाणें अस्तित्वांत आलेलें इंपीरियल कौंसिल या दोन्ही कायदेमंडळांत यांनीं लोकप्रतिनिधि म्हणून जनसेवा केली. पब्लिक सर्विस कमिशन व डीसेंट्रलायझेशन कमिशन या दोन कमिशनांबाबत यांनीं प्रशंसनीय कामगिरी बजावली. पहिलें कमिशन नेमून घेण्यांत यांनीं फार परिश्रम घेतले. त्या वेळचें यांचें वरिष्ठ कौंसिलांतील भाषण

अद्यापिहि अधिकारयुक्त भाषण म्हणून वाचलें जातें. स. १८८५ सालीं काँग्रेस सुरू झाल्यापासून हे तिच्या कार्यास जुंपले गेले. स. १८९८ सालच्या मद्रास काँग्रेसचे हे स्वागताध्यक्ष होतें, व चार वर्षे तर हे काँग्रेसचे कार्यकर्ते मंत्रि होते. मंडालेहून लो. टिळक सुटून आल्यावर त्यांना काँग्रेसमध्यें येऊं द्यावें किंवा नाहीं याची चर्चा तेव्हांच्या काँग्रेसच्या सूत्रचालकांत म्हणजे नेमस्त पुढाऱ्यांत चालली होती. तेव्हां हे टिळकांना अनुकूल पक्षांत होते. हिंदु धर्माचा पुनरुद्धार व्हावा असें यांना मनापासून वाटे. एकदां यांनीं मद्रास विद्यापीठाच्या पदवीधरांस गीतेच्या प्रती वांटल्या. गीताच आपणांस सर्व संकटांतून तारील अशी यांची खात्री होती. आपल्या दीर्घकालीन लोकसेवेनें यांनीं 'आंध्रभीष्म' ही पदवी प्राप्त करून घेतली होती. मद्रासच्या हिंदु पत्राचे हे एक प्रस्थापक होते. निष्ठा, सेवातत्परता, व्यासंग व व्यवहाराचा सरळपणा हे यांचे गुण वाखाणण्यासारखे होते.

**पंतसचीव, शंकरराव चिमणाजी ऊर्फ रावसाहेब**—( कारकीर्द सुरू स. १८७४-मृत्यु स. १९२२ जुलै १७ ) भोर संस्थानचे अधिपति.

यांचे वडील वारले तेव्हां हे सतरा वर्षांचे होते. तेव्हां यांच्या मातोश्री माईसाहेब कारभार पाहत. त्या निवर्तल्यानंतर यांना मुकत्यारी मिळाली (१८७४ जुलै ६).

यांनीं राज्याची खातेवार मांडणी करून शाळा, दवाखाने, सडका वगैरेंची नवी उभारणी केली. तेव्हां यांना अकरा तोफांच्या सलामीचा मान, हिज हायनेस ही पदवी व फांशीं देण्याचा अधिकार मिळाला.

यांनीं कुलदैवत श्रीरामाच्या उत्सवाकरितां बारा हजार वसुलाचीं गांवें इनाम म्हणून दिलीं. तसेंच अंबवडें येथील श्रीशंकराजी नारायण यांच्या समाधीच्या व्यवस्थेकरितां अठरा हजार उत्पन्नाचीं गांवें इनाम दिलीं. काशीस शिवालय बांधून राहण्याकरितां इमारत बांधली. यांच्या पत्नी जीजीसाहेब या विंचुरकर घराण्यांतील होत्या. यांनीं दक्षतेनें कारभार करून राज्याची प्रगति केली व लौकिक मिळविला.

**पंतसचीव, राजा सर रघुनाथराव शंकरराव ऊर्फ बाबासाहेब**—( जन्म स. १८७८ सप्टें. २० ) भोर संस्थानचे अधिपति.

यांचें शिक्षण इंग्रजी दुसरीपर्यंत भोरास व इंटरपर्यंत डेक्कन कॉलेज पुणें येथें झालें. नंतर शिरवळ वगैरे ठिकाणीं अधिकाराचीं कामें केल्यावर वडिलांच्या पश्चात् यांना राज्याधिकार मिळाले (१९२२जुलै१८). प्रथम दक्षिणेंतील कांहीं संस्थानांच्या गटाचे प्रतिनिधि म्हणून हे दोनदां नरेन्द्रमंडळांत गेले ( १९२४-२७ ). पुढें १९४० मध्यें तेथें भोर संस्थानाला स्वतंत्र स्थान मिळालें. ९ तोफांच्या सलामीचा मान ( १९२७ ), राजा ही पदवी (१९३५) व के. सी. आय. ई. ( १९४१ ) हे बहुमान यांना प्राप्त झाले. युवराज असतां हिंदुस्थानच्या केलेल्या सफरींचीं दोन पुस्तकें आणि १९३० व १९३७ अशा दोन विलायतच्या सफरींचीं पुस्तकेंहि यांनीं प्रसिद्ध केलीं आहेत.

यांनीं राज्यांत कायदेमंडळ स्थापून ( १९२८ ), त्यांत तेवीसांपैकीं तेरा लोकनियुक्त प्रतिनिधि घेऊन ( १९४२ ) आणि लोकनियुक्तांपैकीं एक मंत्रि नेमून (१९४३ डिसें.) त्याकडे सोपीव खात्यांचा कारभार दिला आहे. तसेंच नगरपालिका वगैरे संस्था लोकांच्या ताब्यांत देऊन अस्पृश्य व स्त्रिया यांना सर्वत्र प्रतिनिधि दिले आहेत. यांनीं आपल्या खासगी खर्चाची रक्कम मंजुरीनें घेण्याचें ठरविलें आहे.

यांनीं राज्यांत प्राथमिक शिक्षण मोफत, राजा रघुनाथराव हायस्कूल व त्याला ब्याण्णव हजारांची इमारत, हर हायनेस जीजीसाहेब मराठी शाळेला एकोणीस हजारांची इमारत, हिज हायनेस शंकरराव मॅन्शन गेस्ट हाउसची चाळीस हजारांची इमारत, एक लक्ष शेहेचाळीस हजारांचा राणी लक्ष्मीबाई ब्रिज, श्रीमंत सौ. गंगूताईसाहेब वाचनालयाची पंचवीस हजारांची इमारत व संस्थानचे मूळ पुरुष शंकराजी नारायणांच्या समाधीची अठ्ठावीस हजारांची दगडी मेघडंबरी इत्यादि महत्त्वाचीं कामें केलीं.

याशिवाय अनेक गिरण्या व कारखाने राज्यांत काढण्यास उत्तेजन देण्यांत आलें असून मराठी साम्राज्याचा त्रिशत सांवत्सरिक उत्सव, नसरापुराजवळ चेलाडी येथें विजयस्तंभाचा पाया घालून यांच्या हस्तें करण्यांत आला.

यांच्या पहिल्या पत्नी श्रीमंत विंचुरकर घराण्यांतील होत्या. त्यांचे पुत्र युवराज श्रीमंत सदाशिवराव ऊर्फ भाऊसाहेब हे बी. ए. असून धार्मिक आहेत.

**पागनीस, विष्णु दत्तात्रेय**—( जन्म स.१८९२–मृत्यु स. १९४३ ) सुप्रसिद्ध सिनेमानट व तुकारामाच्या अभंगाचे गायक.

यांचें जन्मस्थान निपाणी. दे. ऋ. ब्राह्मण. यांना मराठी लिहितां-वाचतां येण्यापलीकडे शिक्षण मिळालें नव्हतें. यांचा वयाच्या दहाव्या वर्षी कोल्हापूर येथें स्वदेशहितचिंतक-मंडळींत दरमहा तीन रुपयांवर प्रवेश झाला (१९०३). बनारसच्या राष्ट्रसभेच्या वेळीं झालेल्या संस्कृत शाकुन्तल नाटकाच्या प्रयोगांत केलेल्या अनुसूयेच्या भूमिकेबद्दल यांची विशेष वाहवा झाली (१९०५). कुंजविहारींतील राधेच्या कामामुळें हे अत्यंत लोकप्रिय झाले. १९०७ सालीं केशवराव भोसल्यांनीं ती मंडळी सोडली व त्यांचीं सर्व नायिकेचीं कामें यांच्याकडे आलीं. यांनीं जगच्चित्रदर्शन नांवाची स्वतःची नाटक मंडळी काढली होती (१९१३). पण ती चालली नाहीं. पुढें हे अनेक मंडळ्यांत हिंडले. १९१९ नंतर यांनीं रंगभूमीला कायमचा रामराम ठोकला. श्री. कुशाभाऊ पेठकर यांच्या भागींत पागनीस, पेठकर आणि मंडळी नांवाचें सोन्याचांदीचें दुकान काढलें. मुंबई म्युनिसिपालिटीच्या प्राथमिक शाळांत संगीत शिक्षकाची नोकरीहि यांनीं पुष्कळ वर्षे केली (१९२२-१९४१). परंतु हे उद्योग चालू असतां सिनेमासृष्टीशीं यांचा संबंध आला. महाराष्ट्र फिल्म कंपनीच्या वत्सलाहरण व वरेरकरांच्या पुण्यावर हल्ला या चित्रपटांत काम केल्यावर यांना प्रभातच्या तुकाराम चित्रपटांत काम करण्याची संधि मिळाली. तुकारामाचें काम करण्यांत गणपतराव जोशी, शुक्ल वगैरेंनीं आजपर्यंत नांव कमावलें होतें. पण याच्या सहज अभिनयानें व अभंग म्हणण्याच्या विशेष पद्धतीनें तुकारामाच्या चारित्र्याबरोबरच अभंगांतील गांभीर्य व आर्तता लोकांना नवीन लक्षांत आल्यासारखें वाटूं लागलें. यांनीं अभंग म्हणण्याची अगदीं नवी अर्थबोधक व स्पष्ट पद्धत उत्पन्न केली. या तुकारामाच्या कामामुळें या चित्रपटाचा जगांत तिसरा क्रमांक लागला. त्या कामाबद्दल म्हैसूरच्या महाराजांनीं यांना खास आमंत्रण देऊन यांचा सत्कार केला. कोणताहि संतपट काढतांना यांना नायक संताची भूमिका करण्याचें पाचारण येऊं लागलें. फार काय पण यांच्या दुकानाची विक्रीसुद्धां त्यामुळें वाढली.

**पाटकर, सर सीताराम सुंदरराव**—(जन्म स. १८७३–मृत्यु स. १९४६) महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध समाजसेवक व निष्णात कायदेपंडित.

मुंबईच्या एलिफन्स्टन व लॉ कॉलेजांत आपलें शिक्षण संपवून यांनीं मुंबई हायकोर्टांत वकिलीला सुरवात केली (१८९७) व सर नारायण चंदावरकर यांच्या मार्गदर्शनाखालीं हे सरकारी वकील (१९१३), हायकोर्ट जज्ज (१९२३) व हंगामी चीफ जस्टिस अशा पायऱ्या क्रमानें चढत गेले.

महाराष्ट्रांतील सुधारकांच्या नव्या परंपरेचे अग्रणी या नात्यानें यांनीं केलेली कामगिरीहि बरीच महत्त्वाची आहे. १९३१ सालीं यांना धों. के. कर्वे यांच्या इंडियन वुइमेन्स युनिव्हर्सिटीचे व्हाइस चॅन्सेलर व त्याच्या पुढच्याच वर्षी चॅन्सेलर नेमण्यांत आलें. विठ्ठलदास ठाकरसी यांच्या पत्नीनें देणगीची पंधरा लक्ष रु.ची रक्कम कांहीं कायदेशीर मुद्द्यावरून नाकारल्याच्या प्रसंगीं केवळ यांच्या धीरगंभीर व धोरणी वागण्याच्या पद्धतीमुळें त्या युनिव्हर्सिटीचा कारभार पुन्हा मार्गावर आला. यांना बॉम्बे प्रेसिडेन्सी सोशल रिफॉर्म्स् असोसिएशनचेंहि अध्यक्ष निवडण्यांत आलें होतें.

सरकारी नोकरींत असूनहि स्वत्व राखण्याचें यांचें धोरण असे. अफगाणिस्तानचे राजे अमानुल्ला यांच्या सत्काराचे प्रसंगीं साहेबी शिरस्त्राणाऐवजी पगडी घालण्याच्या यांच्या आग्रहामुळें यांची नाइटहुड १९३९ पर्यंत लांबली, ही गोष्ट सर्वविश्रुत आहे.

**पाटणकर, परशुराम नारायण**—(जन्म स. १८६०–मृत्यु स. १९२९) मराठी, इंग्रजी व संस्कृत लेखक व अभ्यासक.

जन्मस्थान चास कमान, जि. पुणें. हे बी. ए. (१८८५) व एम. ए. (१९०५) झाले. यांनीं न्यू इंग्लिश स्कूल, पुणें; होळकर कॉलेज, इंदूर; माधव कॉलेज, उज्जयनी; सेन्ट्रल हिंदु कॉलेज व हिंदु विश्वविद्यालय बनारस वगैरे ठिकाणीं काम केलें. यांचें संस्कृत, मराठी व इंग्रजी भाषांवर चांगलें प्रभुत्व असे. यांनीं धर्मसंगति नांवाचें संस्कृत मासिक कांहीं वर्षे चालविलें. यांनीं जयद्रथवधावर वीरधर्मदर्पणम् नांवाचें संस्कृत नाटक लिहिलें तें अजमेर बोर्डानें इंटरच्या परीक्षेस लावलें होतें. इंग्रजींत यांनीं हिंदुधर्मविषयक सातआठ पुस्तकें लिहिलीं. शिवाय मराठी भाषेच्या माहेराचें समालोचन, भारतीय नाट्यशास्त्रासंबंधीचे विचार, समवृत्त गीतगोविंद, ब्रह्मोद्धार गाथा इत्यादि यांचें लिखाण प्रसिद्ध आहे.

**पाटणकर, माधवराव नारायण**—(जन्म स. १८६२–मृत्यु स. १९१६) नट व नाटककार.

यांचा जन्म विटें ( सातारा जि. ) येथें झाला. इंग्रजी चवथीपर्यंतचें शिक्षण व थोडेंसें वेदाध्ययन झाल्यावर हे मुंबईस मामाकडे राहूं लागले. परंतु तेथें यांना गाणें व नाटकें यांचा नाद लागून यांनी एक क्लबहि सुरू केला. स. १८८४ सालीं या क्लबाचें नाटक मंडळींत रूपान्तर होऊन गांवोंगांवीं खेळ होऊं लागले. परंतु स. १८९० सालीं मंडळीचा मुक्काम बेळगांवीं असतांना यांच्या एका नाटककारास योग्य वेळीं पैसे न मिळाल्यामुळें त्यानें यांना सरकारी हुकुमावरून नाटक बंद करावयास लावलें. त्यामुळें इतःपर स्वतः नाटकें लिहून तीं करण्याचें यांनीं ठरविलें. यांनीं एकूण २४ नाटकें लिहिलीं. त्यांपैकीं ' विक्रम-शशिकला ' या नाटकानें लोकांच्या अभिरुचीस नवीन वळण लागल्यानें यांना पुष्कळसा पैसा मिळून यांच्या मंडळीची दिवसेंदिवस प्रगति होऊं लागली. यांच्या नाटकांत मराठी–' सैरन्ध्री ', ' द्रौपदीवस्त्रहरण ', ' रणछोडराय ' ' सत्यविजय, ' हिन्दी व गुजराथी– ' मानसन्मान ', 'तुकाराम', 'संत तुलसीदास', हिन्दी– ' कनक-कान्ता ' वगैरे नाटकें प्रमुख होत.

नाटकांतील स्वतः यांचें काम स्वाभाविक अभिनयानें होत असे. विशेषतः यांची रागाची भूमिका बहारीची असे. प्रसिद्ध चित्रकार राजा रविवर्मा यांनीं आपलीं चित्रें प्रसिद्ध करतांना यांच्याकडून मुद्दाम पोझिशन्स घेतल्या आहेत. त्यांपैकीं ' गंगावतरण ' या चित्रांतील शङ्कराचें चित्र यांचें आहे. यांना ग्वाल्हेराधिपति माधवराव शिंदे यांनीं बरीच आर्थिक मदत दिली.

किर्लोस्करांनंतर संगीत नाटकांत यांनीं आमूलाग्र स्थित्यन्तर केलें. नाटकांतील पदें, भाषा, कथानक व चाली यांना अगदीं साधें रूप देऊन तीं अगदीं तमाशाच्या उथळ दर्जाला आणून पोंचविलीं. तीं सामान्य लोकांना कळण्याइतपत उथळ झालीं आणि त्यांतील काव्य किंवा गायन नष्ट झालें. यांचीं नाटकें संगीत नाटकाचें विडंबन होय. मात्र यांच्यासारखे अभिनयकुशल लोक त्यावर कांहीं काल जगले. पण घटकाभर करमणुकीखेरीज मनावर स्थायी परिणाम व वाङ्मयांत भर हे दोन्ही उच्च वाङ्मयाचे परिणाम यांना साधतां आले नाहींत.

**पाटील, नाना**—( जन्म स. १९०० ) सातारा जिल्ह्यांतील प्रतिसरकार किंवा ' पत्रीसरकार ' या संघराज्याचे जनक व सुप्रसिद्ध कॉंग्रेस कार्यकर्ते.

सातारा जिल्ह्यांतील सादेमविंद्रे जवळील येडेमविंद्र हें गांव यांचें जन्मस्थान. यांचें घराणें वारकरी असून वडिलांचा पेशा पाटिलकीचा असे. यांच्या वडिलांचें नांव रामचंद्र. मुलकी परीक्षा पास होतांच हे तलाटी बनले. याच सुमारास ( १९३० ) सुरू झालेल्या कॉंग्रेसच्या चळवळींत हे सहजच खेंचले गेले व महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमेटींत निवडून जाऊन हे प्रत्यक्ष कॉंग्रेस कार्य करूं लागले.

१९४२ च्या ' चले जाव ' चळवळींत स्थानबद्ध होण्यापेक्षां बाहेर ' भूमिगत ' म्हणून राहण्याचा मार्ग यांनीं व यांच्या सहकाऱ्यांनीं स्वीकारला. सातारा जिल्ह्यांतील ' पत्रीसरकार ' ही यांच्या भूमिगत जीवनाची फलश्रुति असून त्या सर्व कार्यांत यांनीं दाखवलेलें संघटनाकौशल्य स्पृहणीय आहे.

१९४२ च्या ' चले जाव ' चळवळींत संयुक्त प्रान्त, बंगाल व बिहार या प्रान्तांत अनुक्रमें बरिया, गाझीपूर, मिदनापूर-महिषदल व वटीपेरा या जिल्ह्यांत संघराज्यें स्थापन झालीं होतीं. महाराष्ट्राच्या कर्जत खोऱ्यांतील भाई कोतवाल यांच्या नेतृत्वानें स्थापन झालेलें संघराज्यहि प्रसिद्ध आहे. या सर्वांमध्यें यांच्या नेतृत्वाखालीं झालेली साताराची उठावणी दीर्घकाल टिकली.

रूढ सरकारी राजवट बंद पाडण्यासाठीं आक्रमक चळवळी आखाव्यात, सरकारी हेरगिरी करणारास शिक्षा द्यावी व खेड्यांतील पाटीलतलाठ्यांस जबरीनें सारा वसूल न करण्याची सूचना द्यावी अशा प्रकारचा यांचा सुरवातीचा कार्यक्रम होता. यापैकीं पहिला कार्यभाग तर इतका सुव्यवस्थितपणें पार पाडला गेला कीं कोणत्याहि खेड्यांत पोस्ट ऑफिसें व पोलिस स्टेशनें टिकून राहणें मुष्कील झालें. तालुक्याच्या गांवींसुद्धां बंदुकीशिवाय कोणताहि व्यवहार करणें सरकारला अशक्य झालें.

परंतु यापेक्षांहि हेरांना शिक्षा देण्याचा यांनीं शोधून काढलेला मार्ग अभिनव होता. तळपायाला काठीचे फटके मारण्याची यांनीं सुचवलेली कल्पना व त्यास ' पत्री ठोकणें ' हें यांनीं दिलेलें नांव इतकें प्रसिद्ध झालें कीं यांच्या संघराज्यालाहि ' पत्रीसरकार ' असेंच नांव मिळालें. बापुराव देशमुख दुधारे यांचे तर त्यांच्या दुष्कृत्याबद्दल पाय तोडण्यांत आले. मात्र या सर्व व्यवहारांत गुन्हेगाराला शिक्षा देणें यापेक्षां दुसरी भावना यांनीं कधींच ठेवली नाहीं.

परंतु ग्रामराज्याची स्थापना हें यानंतर यांनीं केलेलें

कार्य अधिक महत्त्वाचें आहे. खेड्यांतील परकी सत्ता नामशेष करून त्यांना स्वयंपूर्ण बनवावें व त्यांचा सर्व कारभार नागरिकांच्या हातीं द्यावा ही यांची ग्रामराज्याची स्थूल कल्पना होती. लोकांनीं निवडून दिलेल्या पंचांनीं त्या त्या खेड्याचा कारभार पाहावयाचा व अगदींच नडलें तर भूमिगत लोकांनीं त्यांना मदत करावयाची अशी कार्यपद्धति यांनीं सुरू केली. कऱ्हाड, वाळवें, कान्हापूर, तासगांव इत्यादि महत्त्वाच्या ठिकाणीं अशा पंचसभा स्थापन झाल्या. कोरेगांव, पाटण व सातारा येथें गेलीं पंधरा वर्षे बेकायदेशीरपणें गाळली जाणारी दारू फक्त चार महिन्यांत यांनीं कायमची बंद केली.

क्रांतिवादाचें अगदीं आधुनिक स्वरूप या दृष्टीनें आपणांस यांच्या या कार्याकडे पाहिलें पाहिजे. कांहींतरी करावयाची तळमळ व लोकांची सहानुभूति यांचे जोरावर यांच्यासारख्या पैसे, विद्या, अनुभव या सर्वच दृष्टींनीं अपूर्ण असणाऱ्या माणसानें केलेलें कार्य नवी दिशा दाखवून देणारें आहे. डोक्यावर पोलिसाची टांगती तलवार व छातीवर घरभेद्याचें पिस्तुल सदा रोखलेलें असतां केवळ सहकाऱ्यांचा विश्वास व लोकांचें प्रेम यांचे बळावर हे कार्य करूं शकले.

काँग्रेस मंत्रिमंडळें अधिकाररूढ झाल्यावर (१९४६) ताबडतोब यांच्यावरील वॉरंट रद्द करण्यांत आलें. परंतु आपल्या सर्व सहकाऱ्यांवरील वॉरंटें रद्द होईपर्यंत हे भूमिगत अवस्थेंतच राहिले व तो हुकूम रद्द होतांच आपल्या १४७ भूमिगत व २७ बंदिस्त सहकाऱ्यांसह मोठ्या समारंभानें कोरेगांवला प्रगट झाले.

**पाटील, भाऊराव पायगोंडा**—(जन्म स. १८८७) साताऱ्याच्या रयतशिक्षण संस्थेचे संस्थापक, सामाजिक समतेचे सक्रिय पुरस्कर्ते व बहुजन समाजांत आत्मविश्वास उत्पन्न करणारे महापुरुष.

यांचा जन्म कोल्हापूर संस्थानांतील कुंभोज गांवीं झाला असला तरी यांचें गांव सातारा जिल्ह्यांतील ऐतवडें बुद्रुक होय. यांचें घराणें धर्मानें जैन. कोल्हापुरच्या जैन वसतिगृहांत राहून यांनीं इंग्रजी सहावीपर्यंत शिक्षण घेतलें (१९०२-१९०८). तेथें असतां छत्रपति शाहू महाराजांशीं यांचा परिचय झाला आणि महाराजांचे मेहुणे मामासाहेब खानविलकरांचे जोडीदार म्हणून राजवाड्यांत दोन वर्षे राहण्याचा यांना योग आला. शिक्षण बंद झाल्यावर प्रथम ओगले व नंतर किर्लोस्कर यांच्या कारखान्याचे विकेते म्हणून यांनीं काम करण्याकरितां हिंदुस्थानभर प्रवास केला (१९१४-१९२२).

त्याच कालांत प्रथम सत्यशोधक व नंतर ब्राह्मणेतर चळवळींत पुढाकार घेऊन हे सर्वत्र परिचित झाले (१९१३-१९२३). भव्य शरीर, खणखणीत आवाज आणि निकोप युक्तिवाद यांमुळें यांचें वक्तृत्व परिणामकारक असे. पण केवळ वक्तृत्वानें खऱ्या कार्यकर्त्याचें समाधान होत नाहीं. शिक्षण हें सर्व सुधारणांचें मूळ आहे; जोंपर्यंत आपल्या देशांतील शेंकडा ९० पेक्षां अधिक लोक खेड्यापाड्यांतून अज्ञानांत पिचत आहेत तोंपर्यंत आपल्या देशाचा खरा उद्धार होण्याची आशा नाहीं, अशी मनाची खात्री होतांच यांनीं बहुजन समाजाला शिक्षित करण्याचे प्रयत्न आरंभिले. प्रथम आपले इतर व्यवसाय संभाळून यांनीं दुधगांव शिक्षण-प्रसारक संस्था काढली (१९०९). कारखान्याशीं सहकार्य करून मदतीचा प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न केला. पण शेवटीं यांनीं या कार्यास सर्वस्वीं वाहून घ्यावयाचें ठरविलें. यांनीं स. १९१९ सालीं काले (कऱ्हाड) येथें 'रयत-शिक्षण-संस्था' स्थापन करून त्या संस्थेमार्फत सातारा येथून यांनीं आपल्या कार्यास जोरानें सुरुवात केली. एका विद्यार्थ्यापासून सुरुवात केलेल्या वसतिगृहास (१९२४) यांनीं म. गांधींच्या हस्तें 'श्रीछत्रपति शाहू बोर्डिंग हाउस' असें नांव दिलें (१९२७). यांत १९४५ च्या अखेरीस सर्व जातींचे मिळून ४२८ विद्यार्थी होते. यांतून आजपर्यंत २०० विद्यार्थी मॅट्रिक व ४४ पदवीधर झाले व त्यांपैकीं १९ या संस्थेचे आजीव सभासद होऊन या संस्थेचें काम चालवीत आहेत. येथून मॅट्रिक झालेले विद्यार्थी कॉलेज शिक्षणाकरितां पुणें येथें राहतात. त्याकरितां 'युनियन बोर्डिंग हाउस' स्थापन झालें आहे (१९३२). यानंतर प्राथमिक शिक्षक तयार करण्याकरितां 'सिल्व्हर ज्युबिली रूरल ट्रेनिंग कॉलेज' सुरू करण्यांत आलें (१९३५). त्यांत १९४५ अखेर एक हजार शिक्षक तयार करण्यांत आले. याला जोडून 'रा. ब. काळे स्मारक प्रॅक्टिसिंग स्कूल' नांवाची मोफत शिक्षण देणारी मराठी शाळा सुरू केली (१९३६). याला शेतकी शिक्षणाचीहि जोड देण्यांत आली आहे. अशा प्रकारें पाहिजे तसे शिक्षक तयार होऊं लागतांच जेथें शाळा नव्हत्या अशा खेड्यांत यांनीं प्राथमिक शाळा काढण्यास सुरुवात केली (१९३८). १९४५ अखेर अशा चारशें शाळा असून त्यांत पंधरा हजार मुलेंमुली

शिक्षण घेत आहेत. नंतर यांनीं 'सयाजीराव फ्री अँड रेसिडेन्सियल हायस्कूल' सुरू केलें (१९४०). स्टोअर, ग्रंथालय, सहकारी संस्था वगैरे आवश्यक गोष्टींची जोड देऊन मुलींच्या करितां 'जिजामाता अध्यापिका विद्यालय' व 'लक्ष्मीबाई पाटील वसतिगृह' (१९४२). उघडण्यांत आलें आणि सातारा येथें 'छत्रपति शिवाजी कॉलेज' काढण्याची परवानगी मिळवली. हें कॉलेज सायन्स शिकविणारें, मोफत व तेथें राहणाऱ्या विद्यार्थ्यांना शिकविणारें आहे.

यांच्या संस्थांचें वार्षिक अंदाजपत्रक तीस रुपयां-पासून तीन लक्षांपर्यंत गेलें आहे. संस्थेंत तयार झालेले लोकांनीं मिळेल तें वेतन व पडेल तें काम या धोरणावर संस्थेचे आजीव सभासद होऊन संस्थेचा भार स्वतःवर घेतला आहे. संस्थेंत जातिभेद, धर्मभेद वगैरे बिलकूल मानण्यांत येत नसून खानपानादि सर्व व्यवहार समान-तेनें करण्यावर कटाक्ष आहे. हिंदु-मुसलमान, स्पृश्य-अस्पृश्य व श्रेष्ठ-कनिष्ठ या भेदांचा संस्थेनें नायनाट केला असून पांढरपेशांपेक्षां शेतकरी, कामकरी वर्गांतील लोकांचा भरणा संस्थेंत विशेष आहे. त्यामुळें ही संस्था बहुजन समाजांत शिक्षणप्रसाराबरोबर सर्व तऱ्हेचा आत्मविश्वास उत्पन्न करण्याचें काम उत्कृष्टपणें करीत आहे. केवळ शिक्षणप्रसारापेक्षां शिक्षण नसलेल्यांना शिक्षण देणें व तेंहि राष्ट्राची गरज लक्षांत घेऊन आव-श्यक असें देण्यावर संस्थेचा कटाक्ष आहे. तसेंच केवळ शिक्षणापेक्षां वसतिगृहांची योजना करून सर्व जातींचे शिक्षक व विद्यार्थी यांना चोवीस तास एकत्र राहून सर्व व्यवहार समानतेनें करण्याची व्यवस्था केलेली आहे. त्यामुळें आपल्या कल्पना व्यवहारांत आणण्याची संधि मिळते व अनेक सामाजिक प्रश्नांचा आपोआप उलगडा होतो.

**पाठक, काशीनाथ बापूजी**—(जन्म स.१८५०–मृत्यु स. १९३२) जैन वाङ्मयाचे सुप्रसिद्ध संशोधक व शिलालेखज्ञ.

१८७७ त बी. ए. झाल्यानंतर हे बेळगांवच्या सरदार हायस्कुलांत शिक्षकाचें काम करूं लागले. याच सुमारास फ्लीट यांचे हिंदी शिलालेखांवरील इंडियन ॲन्टिक्करीं-तील लेख यांच्या वाचनांत आले व त्यांतील दोषस्थलें दाखवण्याच्या निमित्तानें हे संशोधनकार्यांत शिरले. इंडियन ॲन्टिक्करींतील यांचे सुरवातीचे लेख वाचूनच फ्लीट यांनीं यांना आपल्या सहकाऱ्याची जागा देऊं केली. परंतु यांनीं ती नाकारली व आपला शिक्षकाचा पेशा चालू ठेवला.

पुढें मिरजेच्या राजेसाहेबांच्या शिक्षकांची जागा यांना देण्यांत आली (१८८४) व त्या निमित्तानें कोल्हापूरच्या सरस्वती भांडारांतील जैन वाङ्मयाचें अध्ययन करण्याची संधि यांना मिळाली. यांचें हें अध्ययन पुढें इतकें वाढलें कीं यांना या विषयांतील तज्ज्ञ मानण्यांत येऊं लागलें.

यानंतर म्हैसूर सरकारच्या अर्किऑलॉजिकल डिपार्ट-मेन्टमध्यें कांहीं दिवस काम केल्यानंतर यांची पुण्याच्या डेक्कन कॉलेजांत संस्कृतचे प्राध्यापक म्हणून नेमणूक झाली. या जागेवरून पुढें हे कार्यनिवृत्त झाले (१९०८).

जैन वाङ्मयांतील जुने ग्रंथ व शिलालेख यांचा यांनीं अतिशय सूक्ष्म अभ्यास केला होता. याच कारणानें या विषयावर यांनीं लिहिलेल्या ग्रंथांना व निबंधांना जगाच्या संशोधन-क्षेत्रांत मान मिळे. १८९३ सालीं लंडन येथें भरलेल्या इंटरनॅशनल कॉन्फरन्स ऑफ ओरिएन्टॅलिस्ट्सच्या नवव्या अधिवेशनांत यांनीं Position of Kumarila in Digambar Jain Literature हा निबंध पाठविला. या निबंधांतील मूलग्राही संशोधनाचे अध्यक्ष मॅक्स मूलर व फ्लीट, ल्यूमन इत्यादि पंडितांनीं मनापासून स्वागत केलें. शंकराचार्यांच्या काळासंबंधींचें यांचें संशोधनहि असेंच महत्त्वाचें आहे.

परंतु यापेक्षांहि फ्लीट यांच्या ३१९-२० या गुप्त कालाच्या संशोधनाला यांनीं जैन वाङ्मयांतील संशोधनानें पुरविलेले आधार विशेष महत्त्वाचे आहेत. स्वतः फ्लीट ह्यांनीं यांच्या या मदतीचा उल्लेख पुढें अनेक वेळां केला.

यांनीं संशोधून प्रसिद्ध केलेल्या शिलालेखांची संख्या वीस असून लिहिलेल्या निबंधांची संख्या पन्नासांपेक्षां अधिक आहे. Inscriptions in the Kanarese Districts of Bombay Presidency या विषयावर व्याख्यान देण्यासाठीं यांना मुंबई युनिव्हर्सिटीनें भगवान-लाल इंद्रजी लेक्चरर निवडलें होतें (१९०८).

यांचे उणादि सूत्रें पाणिनीची असल्याबद्दलचा निबंध व तसेंच कीलहार्नच्या महाभाष्यांतील त्रुटित भागाचें संशोधन करणारे निबंधहि यांच्या सूक्ष्म बुद्धीचे द्योतक आहेत.

पुण्याच्या भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिटयूटनें

यांच्या ८१ व्या वाढदिवसानिमित्त एक सत्कार ग्रंथ यांना अर्पण केला ( १९३४ ).

यांचे ग्रंथ—( १ ) कालिदासाचें मेघदूत ( जिनसेनाच्या परस्वाभ्युदयावरून संशोधित ), ( २ ) नृपतुंगाचा ' कविराजमार्ग ' ( १८९८ ).

**पाठक, श्रीधर**—( जन्म स. १८६० जाने. ११–मृत्यु स. १९२८ ) हिन्दी भाषेंतील उत्कृष्ट कवि.

जन्मस्थान जोन्धरी, आग्रा जिल्हा. हे मूळचे पंजाबांतील सारस्वत ब्राह्मण. यांचें घराणें शास्त्रीपंडितांचें असल्यानें हे प्रथम थोडे संस्कृत शिकले. नंतर फारसी शिकले. नंतर एंट्रन्सची परीक्षा उत्तीर्ण होऊन कलकत्ता येथ सेन्सस कचेरींत कामास लागले ( १८८० ). शेवटीं हिंदुस्थान सरकारच्या दप्तरांत सुपरिंटेंडेंटच्या जागेवरून सेवानिवृत्त झाले. इंग्रजी उत्तम लिहिण्याबद्दल यांची प्रसिद्धि होती. नंतर प्रयाग येथें ' पद्मकोट ' नांवाचा सुंदर बंगला बांधून राहत. यांना कविता करण्याचें व्यसन होतें. व्रजभाषा व खडीबोली या हिन्दीच्या दोन्ही प्रकारांत हे कविता लिहीत. भाषेची अत्यंत सफाई व स्वतंत्रता हे याचे विशेष गुण होत. यांना आधुनिक जयदेव म्हणत. यांनीं कांहीं नवीन छंद ( वृत्त ) प्रचारांत आणले. यांचे एकान्तवासी योगी हें काव्य तर लावणीच्या चालीवर आहे.

यांचे ग्रंथ—१ आराध्य शोकाञ्जलि ( पितृशोक ), २ श्रीगोखलेप्रशस्ति, ३ एकान्तवासी योगी, ४ ऊजडग्राम, ५ श्रान्त पथिक, ६ जगतसचाईसार, ७ काश्मीरसुषमा, ८ मनोविनोद, ९ श्रीगोखलेगुणाष्टक, १० देहरादून, ११ तिलिस्माती सुंदरी, १२ गोपिकागीत, १३ भारतगीत.

**पाठक, महामहोपाध्याय-श्रीधरशास्त्री त्र्यंबक**—( जन्म स. १८७७ ) सुप्रसिद्ध संस्कृत पंडित, लेखक व वक्ते.

हे पूर्व खानदेशांतील पारोळ्याचे राहणारे. यांचें शिक्षण इंदूर व काशी येथें झालें. हे शुक्ल यजुर्वेदी माध्यंदिन शाखेचे आहेत. यांचा व्याकरण, वेदान्त, धर्मशास्त्र वगैरेंचा चांगला व्यासंग आहे. हे शास्त्री म्हणून सरकारी हायस्कुलांत व कॉलेजांत काम करून सेवानिवृत्त झाले. नंतर हे धुळें येथें राहतात. यांनीं संन्यास घेऊन शंकरानंद असें नांव धारण केलें आहे.

हे धर्मपरिवर्तनवादी असून अस्पृश्यतेला शास्त्रांत आधार नाहीं म्हणून म. गांधींनीं येरवडा तुरुंगांतून काढविलेल्या पत्रकाला यांची मान्यता होती.

यांनीं वेदशास्त्रोत्तेजक सभा व भांडारकर ओरि. रिसर्च इन्स्टिटयूट तर्फे व्याख्यानें दिलीं व १९२४ सालीं प्रयाग येथें भरलेल्या व सोनगीर येथें भरलेल्या भारतीय पंडित परिषदेस हे उपस्थित होते.

यांचे ग्रंथ—संस्कृत–१ ईश, २ केन, ३ कठ, ४ मुण्डक, यांवर बालबोधिनी टीका, ५ महाभाष्यशब्दकोशः ( सहकार्यानें ). मराठी–६ शुक्ल यजुर्वेदाचें मराठी भाषान्तर, ७ नित्यविधि, ८ अस्पृश्यतानिवारणाचा शास्त्रार्थ. याशिवाय यांनीं अनेक निबंध व भाषान्तरें केलीं आहेत.

**पाठारे, आत्माराम मोरेश्वर**—( जन्म स.१८६८ १० ऑक्टोबर–मृत्यु स. १९३१ ) मराठी कवि व नाटककार.

यांचा जन्म ठाण्यास झाला. यांचे आजोबा महाड येथें सब्-जज होते व चुलते जगन्नाथपंतहि ठाण्यास जी. आय. पी. रेल्वे आल्यावर तेथील पहिलेच स्टेशनमास्तर झाले होते. लहानपणींच वडील व चुलते वारल्यामुळें यांची स्थिति अत्यंत हालाकीची झाली. परंतु तींतहि मामाच्या आधारामुळें यांचें थोडेंफार मराठी व इंग्रजी शिक्षण झालें. त्यानंतर चित्रकलेच्या अभ्यासासाठीं हे ' स्कूल ऑफ आर्ट 'मध्यें जाऊं लागले. पण पुढें कौटुंबिक परिस्थितीमुळें हा अभ्यास अर्धवट सोडून देऊन यांना मुंबईच्या शिवाजी स्कूलमध्यें शिक्षकाची नोकरी धरावी लागली. यानंतर यांनीं नाटकेंहि लिहिण्यास प्रारंभ करून प्रथम ' मार्कंडेय ' हें पौराणिक नाटक व नंतर स. १८८८ त 'सं. वसंतइंदिरा' हें अशीं दोन नाटकें लिहिलीं. यांशिवाय 'भिल्लीणी', ' महानन्दा ' व ' मद्यपाननिषेध ' ( मुंबई मद्यपाननिषेध मण्डळानें १९०८ सालीं बक्षीस दिलेलें ) अशीं तीन काव्येंहि यांनीं लिहिलीं. त्यानंतर स. १९२० मध्यें ' संगीत संभाजी ' हें नाटक लिहून यांनीं फार प्रसिद्धि मिळविली. यांतील वीररस, तेजस्वी भाषा व प्रभावी विचारसरणी यांचा श्रोतृवृन्दावर बराच परिणाम होई. पण स. १९१२ त तें सरकारी रोषास पात्र होऊन जप्त झालें. या नाटकाप्रमाणेंच यांच्या ' रणसिंह बाजी ' याहि प्रसिद्ध नाटकास सरकारनें मनाई केली. ' भक्त

नरहरी ' या यांच्या नाटकास आगाऊ जाहीर करण्यांत आलेलें २०० रु.चें बक्षिस मिळालें होतें. तसेंच किर्लोस्कर नाटक मंडळीनें उत्तम नाटकें मागविलीं त्या वेळीं यांच्या ' नीतिसंहति ' या नाटकाचा क्रमांक दुसरा लागला.

**पादशहा, बी. जे.**—( जन्म स. १८६४–मृत्यु स. १९४१ ) सुप्रसिद्ध औद्योगिक द्रष्टे व टाटा उद्योगधंद्याच्या निर्मात्यांपैकीं एक.

एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें आपलें शिक्षण संपवून हे उच्च शिक्षणासाठीं इंग्लंडला गेले. तेथून परत आल्यानंतर यांची कराचीच्या सिंध कॉलेजमध्यें प्रथम प्राध्यापक व नंतर व्हाइस प्रिन्सिपल म्हणून नेमणूक झाली. याच वेळीं यांचा जमशेटजी नसरवानजी टाटांशीं संबंध आला. यांच्या सूचनेवरून टाटांना एक रिसर्च इन्स्टिट्यूट काढण्याची कल्पना सुचली व त्यांच्या सूचनेवरून हे या कल्पनेची शक्याशक्यता अजमावण्याच्या हेतूनें परदेशांत पाहणी करून आले. नंतर ' इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स ' ही टाटा साहसांतील महत्त्वाची संस्था उभारली गेली.

टाटा आयर्न ॲन्ड स्टील वर्क्सची संपूर्ण आंखणीहि यांचीच आहे. टाटांच्या सूचनेवरून हे बंगालमध्यें गेले, प्रमथनाथ बोस यांनीं सुचविलेल्या खाणींच्या संभाव्य जागा यांनीं तपासल्या व सर्व दृष्टींनीं सोयिस्कर वाटणारी कारखान्याची सध्यांची जागा सर दोराब टाटा यांच्या सहकार्यानें यांनीं कायम केली. टाटांच्या हायड्रो-इलेक्ट्रिक वर्क्स व ऑइल मिल्सचें प्राथमिक कार्यहि यांच्याच हस्तें पार पडलें. टाटांच्या न्यू इंडिया इन्शुअरन्स कं.चे तर हे प्रमुख संस्थापकच होते.

परंतु यापेक्षांहि टाटांच्या कापडाच्या गिरण्यांच्या देवघेवीच्या काळांत यांची टाटांना बहुमोल मदत झाली. गिरण्या चालविणें, त्यांची खरेदी-विक्री करणें, नव्या गिरण्यांची आंखणी करणें यांतील हे दर्दी समजले जात. या विषयावर यांनीं कांहीं पुस्तिकाहि लिहिल्या आहेत.

यांना ' टाटांचे उजवे हात ' असा लोक मान देत. सुशिक्षित, चार लोकांत सफाईनें व्यवहार करणाऱ्या माणसांची प्रत्येक कारखानदाराला नेहमींच जरूरी असते. टाटांच्या ' आउट-डोअर ' कार्याला मिळालेल्या यांच्यासारख्या लोकांचा टाटांच्या उज्वल यशांतील वांटा निःसंशय मोठा आहे.

**पारख, बळवंत खंडूजी**—( जन्म स. १८५१–मृत्यु स. १९०४ ) मराठींतील शीघ्रकवि व ग्रंथसंग्राहक.

यांचें जन्मस्थान ओझर ( जि. नाशिक ). यांचें मराठी सहावीपर्यंत शिक्षण झाल्यावर यांनीं शिक्षण व पोलीसखात्यांत नोकरी केली व अधिकाऱ्यांशीं बेबनाव झाल्यानें यांनीं राजीनामा दिला. सुभाषितें व ग्रंथ यांचा संग्रह करण्याचा यांना नाद असे. यांचा ग्रंथसंग्रह अपूर्व होता. तसेंच यांना जुन्या मराठी कवींच्या कविता प्रकरणेंच्या प्रकरणें ओळीनें म्हणण्याइतक्या पाठ येत. यांच्या व्याख्यानासहि त्यामुळें रंग चढे. हे तत्कालीन प्रचलित विषयावर कटाव, फटके, फार काय श्लोक व आर्यासुद्धां तात्काळ करीत. यांनीं आपल्या या गुणानें अनेक संस्था व राजेमहाराजे यांच्याकडून पोषाख व बक्षिसें मिळविलीं. यांचें मुद्रित वाङ्मयहि पुष्कळ आहे. ज्ञानेश्वरचरित्र, विष्णुसहस्रनाममंजिरी, जयवर्णन, वज्रेश्वरीचरित्र, दादाभाई नवरोजी, वेरुळच्या लेण्यांचें वर्णन वगैरे त्यांत प्रमुख होत.

**पारसनीस, रा. ब. दत्तात्रय बळवंत**—( जन्म स. १८७० नवं. २७–मृत्यु स. १९२६ ) प्रसिद्ध इतिहाससंशोधक, संग्राहक, लेखक व चतुरस्त्र कार्यकर्ते.

यांचा जन्म व मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण सातारा येथें झालें. शाळेंत असल्यापासूनच यांना लेखनवाचनाचा नाद होता व वादविवादसभेंतहि हे भाग घेत. शिक्षण सुटल्यानंतर यांचें इतिहाससंशोधनाकडे लक्ष वेधलें. १८८७ सालीं यांनीं सुरू केलेलें ' महाराष्ट्र कोकीळ ' मासिक बरेंच लोकप्रिय होतें. त्यांतील लेखांवरून यांना तेव्हांपासून ऐतिहासिक माहिती व अस्सल कागदपत्रें गोळा करण्याचा नाद होता असें दिसतें. झांशीच्या महाराणी लक्ष्मीबाई यांचे दत्तक पुत्र दामोदरपंत यांचा यांना प्रत्यक्ष सहवास लाभला. यांनीं त्यांच्याकडून माहिती मिळवून सरकारी व बिनसरकारी देशीपरदेशी माहिती एकत्र करून आपल्या इतिहाससंशोधन व लेखन या कार्यास सुरवात केली. यांनीं लिहिलेलें लक्ष्मीबाईचें चरित्र मराठींत अनेक दृष्टींनीं वैशिष्ट्यपूर्ण आहे. तेव्हांपासून यांनीं अस्सल कागदपत्र, वस्तु, चित्रें वगैरेंच्या संग्रहापासून संपादन, लेखन, प्रसिद्धीकरण, संकलन वगैरे अनेक दृष्टींनीं अत्यंत महत्त्वाची कामगिरी केली.

१९०२ सालीं हे कोल्हापूरकर छत्रपतींबरोबर इंग्लंडला जाऊन आले. तिकडील अनेक संग्रहालयें व संस्था यांनीं पाहिल्या. यांच्या जवळ जमत चाललेला संग्रह अभ्यासकांच्या उपयोगाला यावा अशी यांची इच्छा होती. यांनीं त्या दृष्टीनें चांगलें ग्रंथालय व वस्तुसंग्रहालय काढण्याची खटपट सुरू केली. २९ आगस्ट १९१४ रोजीं असें संग्रहालय स्थापण्याचा मुंबई सरकारचा ठराव प्रसिद्ध झाला. पण इमारत बांधणें वगैरे काम पहिल्या महायुद्धामुळें तहकूब झालें. ३ नवं. १९२५ रोजीं मुंबईचे गव्हर्नर सर लेस्ली विल्सन यांच्या हस्तें सातारा येथें मुद्दाम बांधलेल्या नव्या इमारतींत यांच्या कागदपत्रांच्या विभागाचें उद्घाटन झालें. या पारसनीस म्युझियममध्यें तीस हजार मराठी, चार हजार इंग्रजी कागदपत्रें व तीन हजार इंग्रजी ग्रंथ होते. त्याचा मोबदला म्हणून यांना २०० रु. दरमहा नेमणूक वंशपरंपरेनें देण्यांत आली. पुढें हे लवकरच वारले आणि तो संग्रह आतां पुणें येथें डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट रिसर्च इन्स्टिटयूटच्या ताब्यांत देण्यांत आला आहे.

पेशवे दप्तरांतील निवडकपत्रें अलीकडे ४५ भागांत प्रसिद्ध झालीं. त्यांपैकीं पुष्कळ पत्रें आधींच यांनीं तेथें जाऊन निवडून व नकलून ठेवलेलीं होतीं. त्या वेळीं यांना तीं सर्व प्रसिद्ध करणे शक्य झालें नाहीं.

यांच्या इतिहासक्षेत्रांतील कार्यास खरे व राजवाडे यांच्यापूर्वी सुरवात झाली. त्या क्षेत्रांतील यांची कामगिरी विविध आणि प्रचंड स्वरूपाची आहे. त्या कामीं यांचा प्रथम डेक्कन व्ह. ट्रा. सोसायटीशीं घनिष्ठ संबंध होता. मुंबईचे पुरुषोत्तम विश्राम मावजीशेठ, राजेमहाराजे व मुंबई सरकार यांचेंमुद्दां साहाय्य यांनीं संशोधन, संग्रह व प्रकाशन या कामीं मिळविलें. यांची राहणी खानदानी, बुद्धि मूलगामी, काम करण्याची पद्धत सुबक व भाषाशैली चित्तवेधक नि मनोहारी असे. इतकें प्रचंड काम करतांना उपयुक्तता व व्यावहारिक दृष्टि यांनी कायम ठेवली. निष्कारण बडेजाव कधीं मिरवला नाहीं. संयम राखून तन्मयतेनें हातीं घेतलेलें काम पार पाडण्याचा यांचा गुण वाखाणण्यासारखा होता.

यांचें वाङ्मय—मराठी—१ कीर्तिमंदिर १८९०, २ झांशीच्या महाराणी लक्ष्मीबाईसाहेब यांचें चरित्र १८९४, ३ मराठ्यांचे पराक्रम-बुंदेलखंड-प्रकरण १८९५, ४ अयोध्येचे नबाब १८९९, ५ मुसलमानी अमदानींतील मराठे सरदार १९००, ६ महापुरुष ब्रह्मेन्द्रस्वामी धावडशीकर यांचें चरित्र व पत्रव्यवहार १९००, ७ बायजाबाई शिंदे यांचें चरित्र १९०२, ८ दिल्ली अथवा इन्द्रप्रस्थ १९०२, ९ मराठ्यांचें आरमार १९०४, १० सवाई माधवराव पेशव्यांचा दरबार १९०५, ११ स्वल्पमूल्यचरित्रमाला; (अ) परशुरामपंत प्रतिनिधि; (आ) नाभाजी; (इ) मुधोळ संस्थानचे घोरपडे. चरित्रें—१२ पं. अयोध्यानाथ १८९२, १३ वामन शिवराम आपटे, १४ ए. ओ. ह्यूम १८९३. कविता—१५ वाक्पुष्पांजली १८८९, १६ भारतभाग्योदय. ऐतिहासिक कागदपत्रें—१७ महेश्वर दरबारचीं बातमीपत्रें भाग १-२, कारकीर्द—अहिल्याबाई होळकर १९१०, १९११, १८ पेशवे दप्तरांतील निवडक उतारे, खंड १-२, शिवाय दिल्लीचें राजकारण वगैरे अनेक अस्सल पत्रव्यवहार यांनी इतिहाससंग्रहांतून प्रसिद्ध केले. १९ बाळाजी बाजीराव पेशवे यांची रोजनिशी, भा. १-२, २० कैफियत यादी ( दक्षिणेंतील सरदारांच्या ) १९०८, २१ वतनपत्रें, निवाडपत्रें १९०९, २२ सनदापत्रें१९१३, २३ तह करारमदार १९१४, ( हा सर्व पेशवे दप्तरांतील भाग सरकारी नोकर रा. ब. गणेश चिमणाजी वाड यांच्या साहाय्यानें निवडून मावजी वगैरेंच्या साहाय्यानें यांनीं प्रसिद्ध करवला ). ग्वाल्हेर दरबारपत्रें—२४ महादजी शिंदे यांचा अस्सल पत्रव्यवहार व राजकारण खंड १-५, ( यांपैकीं पहिल्या खंडावर १९१५ हें साल असून पांचव्या खंडावर प्रायव्हेट ( खासगी ) असें छापलें आहे ).

मासिकें—१ सुभाष्यचंद्रिका ( हस्तलिखित १८८७ ), २ महाराष्ट्र कोकीळ ( ऑक्टो. १८८७-१८९२ ), ३ भारतवर्ष (स. १८९६ पासून २४ अंक), ४ इतिहाससंग्रह ( आगस्ट १९०८-ऑक्टोबर १९१६ ).

इंग्रजी ग्रंथ—1 Notes on Satara, 2 Mahabaleshwar, 3 Sangli State, 4 Panhala, 5 Poona in bygone days, 6 History of the Maharastras ( किंकेड व पारसनीस, दुसरा खंड १९२२ ).

**पाल, ख्रिस्तोदास**—( जन्म स. १८३८-मृत्यु स. १८८४ ) बंगालमधील आरंभींचे वृत्तपत्रकार व सार्वजनिक कार्यकर्ते.

यांच्या वडिलांचें नांव ईश्वरचंद्र. जात तेली. ओरिएंटल सेमिनरी व कलकत्त्याच्या मेट्रोपॉलिटन कॉलेजमध्ये कांहीं दिवस शिक्षण घेतल्यानंतर यांची कलकत्त्याच्या ब्रिटिश इंडिया असोसिएशनचे सेक्रेटरी म्हणून

नेमणूक झाली ( १८५८ ). थोड्याच दिवसांत यांना 'हिंदु पेट्रियट' या त्या वेळच्या प्रमुख पत्राचे संपादक करण्यांत आलें ( १८६१ ). अनेक वर्षे हिंदु पेट्रियटची सर्व जबाबदारी यांचेकडेच असे. अभ्यासपूर्ण लेखन-पद्धतीमुळें हे जें लिहीत त्यांत नावीन्य उत्पन्न होई.

यांना बंगाल लेजिस्लेटिव्ह कौन्सिल ( १८७२ ) व बंगाल टेनन्सी बिलावरील चर्चेसाठीं बंगाल जमिनदारांचे प्रतिनिधी म्हणून गव्हर्नर जनरलच्या कौन्सिलमध्यें घेण्यांत आलें ( १८८३ ).

सरकार व जनता यांमधील दुवा या नात्यानें काम करण्याच्या अजोड कसबामुळें यांनीं बंगालमधील लोकांचा अनेक दृष्टींनीं फायदा करून दिला. यांच्या मृत्यूनंतर कलकत्त्याला यांचें स्मारक म्हणून एक पुतळा उभारण्यांत आला आहे.

**पाल, बिपिनचंद्र**—( जन्म स. १८५८–मृत्यु स. १९३२ मे २० ) बंगालमधील सुप्रसिद्ध राजकारणी पुरुष व प्रक्षोभक वक्ते.

यांचा जन्म बंगाल्यांत सिल्हट गांवीं झाला. यांचे वडील बंगाल्यांतील नामांकित वकील असून ते आपल्या हुषारीनें डिस्ट्रिक्ट मुनसफीच्या जागेपर्यंत चढले होते. हे त्यांचे एकुलते एक पुत्र.

मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण झाल्यावर पुढील शिक्षणा-करितां हे कलकत्त्यास आले. तेथें केशवचंद्र सेनांच्या वक्तृत्वाचा परिणाम होऊन घरच्या विरोधास न जुमा-नतां यांनीं ब्राह्मोसमाजाचा स्वीकार केला. त्या काळीं पुराणमताभिमानी लोकांना ब्राह्मो बनणें म्हणजे ख्रिस्ती बनण्याइतकें 'अब्रह्मण्य' वाटे. वडलांनीं यांचें मुखाव-लोकन न करण्याचा निश्चय करून आपल्या संपत्तींतील कपर्दिकहि यांना मिळूं नये अशी मृत्युपत्रानें व्यवस्था केली. तथापि शेवटीं त्यांचें मत पालटून अन्तकालीं त्यांनीं यांना पंचवीस हजार रुपये दिले.

कलकत्त्याच्या नगरमंदिरांत कालीचरण बानर्जींनीं ब्राह्मोसमाजाच्या मतावर हल्ला केला. तेव्हां यांनीं सहा व्याख्यानांची एक माला गुंफून त्यांना उत्तर दिलें. तसेंच पहिली पत्नी निवर्तल्यावर यांनीं सुरेन्द्रनाथ बानर्जींच्या विधवा पुतणीशीं पुनर्विवाह करून आपलें नांव कर्त्या सुधारकांत दाखल केलें.

विद्यार्जन झाल्यावर यांचीं पहिलीं दहा वर्षे शिक्ष-काच्या व्यवसायांत गेलीं. कटकच्या शाळेंत हे तीन वर्षे हेडमास्तर होते. नंतर यांनीं आपल्या सिल्हट गांवीं एक विद्यालय स्थापून ५।६ वर्षे चालविलें. त्यानंतर बंगलोरच्या शाळेचे मुख्याध्यापक व कलकत्त्याच्या ग्रंथालयाचे व्यवस्थापक म्हणूनहि यांनीं काम केलें. यानंतर मात्र यांनीं राजकारणांत प्रवेश केला. यांचें पहिलें सुप्रसिद्ध भाषण न्या. बद्रुद्दीन तय्यबजी यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या मद्रासच्या राष्ट्रसभेंत हत्याराच्या कायद्यावरील होय ( १८८७ ). यांची आवेशयुक्त व क्षोभकारक वक्तृत्वकला या देशांत व परदेशांत चांगली गाजली. १९०० सालीं हे तौलनिक तत्त्वज्ञानाचा व्यासंग करण्यासाठीं इंग्लंडला गेले. तेथील दोन वर्षांचा अभ्यासक्रम यांनीं एक वर्षांतच पुरा केला. तिकडे व्याख्यानें, लेख वगैरे द्वारा हिंदी राजकारणाचें चित्र लोकांपुढें ठेवून यांनीं स्वतःची उपजीविकाहि केली.

इंग्लंडांत यांनीं 'स्वराज्य' नांवाचें मासिक व हिंदुस्थानांत असतां 'न्यू इंडिया' नांवाचें स्वतःचें इंग्रजी साप्ताहिक चालविलें. शिवाय अरविंदांच्या 'वंदे मातरम्'शीं यांचा निकट संबंध होता. इंग्लंडमध्यें असतां 'हिंदु रिव्ह्यू' नांवाच्या स्वतःच्या मासिकांत बॉबच्या मीमांसेबद्दल लिहिलेल्या लेखाबद्दल यांना माफी मागावी लागली. अरविंद घोषांवर दुसरा खटला झाला तेव्हां त्यांच्याविरुद्ध साक्ष देण्यास सरकारतर्फे यांना बोलावण्यांत आलें. यांनीं कोर्टाचा हुकूम अमान्य करून साक्ष देण्याचें नाकारून सहा महिन्यांची शिक्षा पत्करली. त्या वेळीं यांचा हा बाणेदारपणा लोकांना इतका आवडला कीं सुरेन्द्रनाथ बानर्जी यांच्या अध्यक्षतेखालीं सभा भरून एक हजार रुपये जमा करून ते यांच्या पत्नीकडे पोंचते करण्यांत आले. १९११ सालीं यांना राजद्रोहाच्या आरोपाखालीं दुसरी शिक्षा झाली. येथून पुढें राजकारणी लोकांना आपत्तीचा काळ सुरू झाला. तथापि होमरूलच्या चळवळींत हे पुनः सामील झाले व शिष्टमंडळाबरोबर विलायतेसहि गेले होते. १९२८ च्या लखनौच्या सर्वपक्षीय परिषदेसहि हे हजर होते. तथापि यांच्या आयुष्यांतील माध्यान्हकाल म्हणजे लाल, पाल, बाल या त्रयीनें वंगभंग व स्वदेशी बहिष्काराच्या प्रचंड आंदोलनाच्या वेळीं केलेल्या प्रचंड कामगिरीचा काल होय. पहाडी आवाजाचे दणदणीत वक्ते अशी यांची त्या वेळीं प्रसिद्धि होती. यांनीं आपलें आत्मचरित्र लिहिलें आहे.

यांचे ग्रंथ—Indian Nationalism ( 1918 ).

**पांगारकर, लक्ष्मण रामचंद्र**—( जन्म स. १८७२–मृत्यु स. १९४१ ) मराठी भाषेतील प्राचीन वाङ्मयाचे सुप्रसिद्ध अभ्यासक, रसाळ लेखक, वक्ते व ग्रंथकार.

यांचें घराणें पुण्याजवळील मुळशी पेठ्यांतील पौडचें राहणारें. यांचें शिक्षण पुणें येथें होऊन हे बी. ए. झाले. यांनीं पुणें येथें व वऱ्हाडांत शिक्षकाची नोकरी केली. यांना मोरोपंत, एकनाथ वगैरे जुन्या काव्याची गोडी प्रथमपासूनच असे. यांना पाठान्तर विपुल असून तें साध्या पण मधुर आवाजांत म्हणून दाखविण्याची यांना हौस असे. यांचा सहवास, प्रवचन, व्याख्यान आणि लेखन यांत सर्वत्र समर्पक अवतरणाची रेलचेल आढळे. पुढें तर यांनीं शिक्षकाचा व्यवसाय सोडला आणि प्रवचन व लेखन हाच यांचा मुख्य व्यवसाय झाला. प्रथम यांनीं ' मुमुक्षु ' नांवाचें साप्ताहिक वर्तमानपत्र काढलें आणि तेंच पुढें मासिक करून दीर्घकालपर्यंत चालविलें. प्रथम हे राजकारणाकडे लक्ष देत, पण पुढें हे पूर्ण भक्तिमार्गी सन्त बनले. गळ्यांत तुळशीची माळ, पंढरीची वारी आणि साधुसन्तांचा सहवास हा यांचा नित्यव्यवसाय बनला. हे सर्व कार्यक्रम चालू असतां यांची लेखणी आणि व्यासंग अखंड चालू असे. यांच्या भाषणानें भाविक वेडे होत आणि रसिक डोलूं लागत. यांच्या लेखणींतहि चिकित्सा आणि भावना यांचा संगम असे. त्यामुळें तुकारामाचें चरित्र ऐकून यांना हजारों रुपये देणारे श्रोते लाभले आणि ग्रंथ प्रकाशनहि यांना लाभदायक झालें. शिवाय यांनीं महाराष्ट्रांतील सुशिक्षितांच्या घरांत मराठी जुन्या कवींचें काव्य पोंचविलें आणि तरुण पिढीचें जुन्या कवींच्या अभ्यासाकडे लक्ष वेधलें.

मोरोपंताचें चरित्र व काव्यविवेचन या ग्रंथानें यांनीं आपल्याकडे सर्वांचें लक्ष ओढून घेतलें आणि शेवटीं मराठी वाङ्मयाच्या इतिहासाचे तीन खंड महाराष्ट्राला अर्पण केले. ' चरित्रचंद्र ' लिहून आपलें अन्तर्बाह्य प्रेमळ आणि रसाळ जीवन लोकांपुढें उघड केलें ( १९३८ ). यांनीं आपलें हें आत्मचरित्र असें मोकळेपणानें लिहिलें आहे कीं तो तो प्रसंग वाचकाच्या डोळ्यांपुढें प्रत्यक्ष उभा राहतो.

यांनीं मराठींतील बहुतेक प्रसिद्ध कवींचीं चरित्रें व काव्यविवेचन लिहिलें आहे. तसेंच मराठी वाङ्मयाचा इतिहास लिहिण्यास सुरुवात करून १ ज्ञानेश्वर-नामदेवकाळ, २ एकनाथकाळ व ३ तुकाराम-रामदासकाळ असे तीन खंड प्रसिद्ध केले. उतारे व छोटे निबंध यांनीं कितीतरी लिहिलेले आहेत. यांच्या भक्तिमार्गप्रदीप या ग्रंथाच्या जितक्या आवृत्त्या निघाल्या तितक्या आवृत्त्या निघण्याचें भाग्य अलीकडच्या कोणत्याहि पुस्तकास लाभलेलें नाहीं.

**पांडेय, रूपनारायण शिवराम**—( जन्म स. १८८४ ) हिन्दी भाषेंतील प्रमुख साहित्यसेवक, कवि व संपादक.

यांचा जन्म लखनौ येथें झाला. जात कान्यकुब्ज ब्राह्मण. यांचा विद्याभ्यास घरींच जुन्या पद्धतीनें झाला. पण सतत परिश्रमानें यांनीं बंगाली व इंग्रजी भाषा आत्मसात् केल्या. मराठी, गुजराथी व उर्दू भाषांचेहि यांनीं ज्ञान संपादन केलें. यांना लिहिण्याचा नाद लहानपणापासून आहे. यांनीं प्रथम बंगाली कृत्तिवास रामायणाचा पद्यानुवाद केला. नागरीप्रचारक मासिक पत्र ( सात वर्षें ), भारतधर्ममहामंडलाची निगमागमचन्द्रिका ( तीन वर्षें ), इन्दु मासिक ( दोन वर्षें ), कान्यकुब्ज मासिक ( दोन वर्षें ) इत्यादि ठिकाणीं यांनीं संपादन कार्य केलें. माधुरी या सुप्रसिद्ध मासिकाचेहि हे संपादक होते. यांची लिखित व अनुवादित ग्रंथांची संख्या मोठी आहे. त्यांत यांनीं बंगाली नाटकाचा हिन्दींत केलेला अनुवाद महत्त्वाचा मानतात.

**पांडेय, लोचनप्रसाद चिंतामणि**—( जन्म स. १८८६ ) उडिया व हिन्दी भाषेंतील सुप्रसिद्ध कवि व लेखक नि इतिहाससंशोधक.

यांचा जन्म विलासपूर जिल्ह्यांतील बालपूर गांवीं झाला. जात सरयूपारीण. यांचें घराणें मोठें प्रतिष्ठित व सच्चरित्र म्हणून प्रसिद्ध आहे. हे १९०५ सालीं मॅट्रिक झाले. पुढें यांना कॉलेज शिक्षण पुरें करितां आलें नाहीं, तथापि यांनीं उडिया, बंगाली व थोडा संस्कृत भाषेचा अभ्यास केला.

हिन्दींत गद्य व पद्य अशीं यांनीं कितीतरी पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. त्यांपैकीं खालील प्रमुख आहेत—१ दो मित्र, २ बालविनोद, ३ नीतिकविता, ४ बालिकाविनोद, ५ माधवमञ्जरी, ६ मेवाडगाथा, ७ चरितमाला, ८ रघुवंशसार, ९ पद्यपुष्पाञ्जलि, १० आनन्द की टोकनी, ११ कविताकुसुममाला इत्यादि यांचीं पुस्तकें

लोकप्रिय असून त्यांच्या अनेक आवृत्त्या निघाल्या आहेत.

उडिया भाषेंतीलहि हे उत्कृष्ट कवि आहेत. त्या भाषेंत यांनीं पुढील काव्य ग्रंथ लिहिले आहेत—१ कविताकुसुम, २ महानदी, ३ रोगी-रोदन इत्यादि. ओरिसा प्रान्तांतील बामण्डा येथील राजांनीं यांना काव्यविनोद ही पदवी दिली आहे. यांच्या कविताकुसुम या ग्रंथाचें समालोचन करतांना सुप्रसिद्ध उत्कल साहित्य-विशारद पं. नीलमणि शर्मा यांनीं लिहिलें कीं, यांच्या नांवांतील पांडेय हें प्रान्तदर्शक नांव काढून टाकलें तर हे कवि ओरिसा प्रान्ताच्या बाहेरील आहेत हें यांच्या काव्यावरून कोणासहि कळणार नाहीं इतकें यांचें उडिया भाषेवर प्रभुत्व आहे. ग्रियर्सन या भाषाभ्यासकानेंहि यांच्या भाषाप्रभुत्वाबद्दल यांची प्रशंसा केलेली आहे.

यांना इतिहास-संशोधनाचाहि नाद आहे. यांनीं आपल्या प्रान्तांतील संस्कृत शिलालेख व ताम्रपट यांचा संग्रह कोसल-प्रशस्ति-रत्नावलि या नांवानें प्रसिद्ध केला असून त्याचे तीन भाग आहेत. त्यांत महाकोसलचे सोम, हैहय व नाग वंशांतील राजांचे शिलालेख विशेष आहेत.

तसेंच महाराज पृथ्वीदेव, रत्नदेव, प्रतापमल्लदेव ( हैहय ), चोडगंगदेव व योधेयगण यांच्या ताम्र व सुवर्ण मुद्रिकांचा संग्रहहि यांनीं मोठ्या परिश्रमानें केला आहे. या मुद्रिका यांना बालपूरासच मिळाल्या. त्यांपैकीं चौकोनी मुद्रा बौद्धकालीन आहेत.

हे १९२१ सालीं जबलपुर येथें भरलेल्या चतुर्थ हिन्दी साहित्य-संमेलनाचे अध्यक्ष होते.

यांना आपल्या छत्तीसगढ प्रान्ताच्या प्राचीन साहित्य व प्राचीन गौरवगाथा शोधण्यांत फार परिश्रम केले. या प्रान्तांत पुष्कळ हिन्दी कवि होऊन गेले ही गोष्ट यांच्या शोधांनीं प्रगट झाली. मध्यप्रान्त सरकारनें ग्रियर्सन यांच्याकडून केलेल्या 'छत्तीसगढी व्याकरणा'चें संशोधन व वर्धन करण्याचें काम यांच्या-कडून करून घेतलें.

यांचीं इंग्रजी पुस्तकें--( 1 ) Well known Men, ( 2 ) Letters to my Brothers, ( 3 ) The Way to the Happy and Gay, ( 4 ) Folk Tales of Chatistgarh, ( 5 ) The National Poet of Orissa.

**पिले, ना. दि. ब. लुई डॉमिनिक स्वामी-कन्नु**—( जन्म स. १८६५ फेब्रु. ४–मृत्यु स. १९२५ सप्टें. १० ) दोन हजार वर्षांच्या पंचांगाचे कर्ते, संशोधक वृत्तीचे अभ्यासक व तामील वाङ्मयांतील पंडित.

आईबाप कॅथॉलिक ख्रिस्ती. जन्मस्थान कोइमतूर-नजीक सोमानूर. हे वयाच्या तेराव्या वर्षी मॅट्रिक झाले. हे एम्. ए. एलएल. बी. ( लंडन ), आय्. एस्. ओ., सी. आय्. ई. होते. इंग्लिशचे प्राध्यापक म्हणून सेंट जोसेफ कॉलेज, त्रिचनापल्ली येथें प्रथम नोकरीस लागले ( १८८३-८७ ). पुढें मद्रास प्रेसिडेन्सी कॉलेज-मध्यें गेले. तेथून प्राव्हिन्शियल सर्व्हिसमध्यें शिरून यांनी डेप्युटी कलेक्टर, कर्नल, सहकारी खात्याचे रजिस्ट्रार, कलेक्टर व डि. मॅजिस्ट्रेट नेलोर, १९१९ सालीं नव्या सुधारणांचे वेळीं रिफॉर्म्स कमिशनर, सरकारचे सेक्रेटरी व शेतकी खात्याचे डायरेक्टर वगैरे महत्त्वाचीं कामें केलीं. नंतर मद्रास कायदेमंडळाचे सेक्रेटरी ( १९२०-२३ ), त्या अवधींत पार्लमेंटरी पद्धतीचा अभ्यास करण्याकरितां सरकारतर्फे विलायतेस गमन, १९२५ सालीं तर मद्रास कायदेमंडळाचे पहिले लोकनियुक्त अध्यक्ष होण्याचा मानहि यांना मिळाला. तेथें मृत्यूनंतर सत्यमूर्तीसारख्या पुढाऱ्यांकडून प्रशंसा झाली.

दरमहा ५० रु.च्या नोकरीपासून कायदेमंडळांतील लोकनियुक्त अध्यक्ष होण्यापर्यंतचा मान, अनेक पदव्या, यापेक्षांहि यांनीं अत्यंत परिश्रमानें नोकरींत असतांना तयार केलेलें दोन हजार वर्षांचें भारतीय पंचांग यांचें नांव दीर्घकाल टिकवणारें आहे ( १९११-२२ ). यांतील बहुतेक भाग सरकारनें अनेक खंडांत प्रसिद्ध केला आहे. बाकीचा यांनीं प्रसिद्ध करवला. या जंत्रीमुळें दोन हजार वर्षांतील सौर व चांद्र वर्ष, तिथि, ग्रहणें व ग्रहांचे उदयास्त अगदीं थोड्या श्रमांत काढण्याची सोय झाली आहे.

याशिवाय पिटमनच्या लघुलेखन पद्धतीस सुलभता आणून ती हुषार विद्यार्थ्यास आठ दिवसांत हस्तगत करतां येईल अशी व्यवस्था यांनीं केली व खुद्द पिटमन्-कडून शाबासकी मिळविली. याशिवाय यांचा स्मरण-शक्तीवरील ग्रंथहि महत्त्वाचा आहे.

तामीळ वाङ्मयांत 'संगमकाल' हें सुवर्णयुग समजलें जातें. पण त्या काळाचा निश्चय होत नव्हता. हे व यांची माता तामीळ वाङ्मयांतील पंडित होती. प्राचीन

तामीळ वाङ्मयांतील 'परिपाडल'मधील एका पत्रिकेवरून १७ जून ६३४ ही तारीख यांनीं निश्चित केली. तसेंच दुसरा विख्यात तामीळ ग्रंथ 'शिलप्पधिकारम्'-मधील दोन तिथि अनुक्रमें १७ मे व २३ जुलै ७५६ या यांनीं निश्चित केल्या.

ख्रिस्ताचें स्वीकृत जन्मवर्ष ख्रि. पू. १ हे चूक असून ख्रि. पू. ४ असें यांनीं ठरविलें. बुद्धाच्या जन्मतिथीवरहि यांचा निबंध आहे.

यांचे ग्रंथ—पंचांग-१ इंडियन क्रॉनॉलजी, पहिली आवृत्ति १९११, दुसरी आवृत्ति १९२२; २ इंडियन एफिमेरीज स. १८००-२०००, पहिली आवृत्ति १९१५, दु. आ. १९२२; ३ इंडियन एफिमेरिज स. ७००-१८००, सहा खंड, मद्रास सरकारकडून प्रकाशित १९२२; ४ मॅक्झिमम् एज ऑफ ध्रुवनाडी १९२३; ५ कॉम्प्रिहेन्सिव्ह टेबल्स फॉर इंडियन क्रॉनॉलजी १९२४; ६ पंचांगाज् ॲंड हॉरॉस्कोप किंवा इंडियन कॅलेन्डर ॲंड इंडियन अस्ट्रॉलजी १९२५; फलज्योतिष—७ क्रेडिबिलिटी ऑफ इंडियन अस्ट्रॉलॉजी १९२२, या ग्रंथांत फलज्योतिषाची अविश्वसनीयता प्रतिपादिली आहे; लघुलेखन—८ फोनल, शॉर्ट हंड, १९०९; स्मरणशक्ति—९ सीक्रेट ऑफ मेमरी १९०९; टिप्पणी—१० नोटस् ऑन हिंदु अस्ट्रॉलॉजी, सर टी. माधवराव यांच्या ग्रंथावर टिप्पणी, १९२२ (द. वा. पोतदार).

**पिंगळे, विष्णु गणेश**—(जन्म स. १८९०—फांशी स. १९१५) लाहोर कटांत भाग घेणारे सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय क्रांतिकारक.

हे मूळचे पुणें जिल्ह्यांतील तळेगांव ढमढेरे येथील राहणारे. हे गदर पार्टीच्या इतर सभासदांबरोबर अमेरिकेहून परत आले ते बंगालमध्यें उतरले. लाला हरदयाळ यांच्या गदर पार्टीचा मुख्य उद्देश शीख लोकांना हिंदुस्थानांत क्रांतीच्या हेतूनें पाठविणें हा असे. अशा स्थितींत यांनी पंजाबमध्यें जाऊन बंगाली लोक बॉम्ब तयार करून देण्यास तयार असल्याची माहिती त्या लोकांना पुरविली. पंजाबी लोकांना यांची ही योजना पसंत पडली व अभावितपणेंच या उठावणीचें पुढारीपण यांचेकडे आलें.

ताबडतोब बॉम्बसाठीं साहित्य जमा करण्यास सुरुवात झाली व राशबिहारी बोस यांच्या नेतृत्वाखालीं अमृतसर येथें या कार्यासाठींच घेतलेल्या घरांत त्या दृष्टीनें प्रयत्न सुरू झाले. सर्वानुमतें २१ फेब्रु. १९१५ ही तारीख उठावणीसाठीं मुक्रर करण्यांत आली. या सर्व उठावणीचें मुख्य ठिकाण लाहोर राहणार असून आगगाड्या उडविणें, सरकारी तिजोऱ्यांवर हल्ला करणें, राजबंद्यांची सुटका हे प्रमुख कार्यक्रम ठरविण्यांत आले. ठिकठिकाणच्या सैन्यांच्या उठावण्या, बॉम्ब व बंदुका यांचा संग्रह, खेडुतांची संघटना असे अनेक प्रयत्न यासाठीं योजण्यांत आले.

परंतु या उठावणीसाठीं पैशाची तरतूद करण्यासाठीं पंजाबी तरुणांनीं घातलेल्या कांहीं दरोड्यांनीं हा बार वायां गेला. दरोड्यांचा तपास चालू असतांच यांच्या या कटाचा सुगावा लागला व राशबिहारी बोस यांच्या निवासस्थानावर छापा घालून पोलिसांनीं सात सशस्त्र माणसांना अटक केली (१९ फेब्रु.). पुढें ही संख्या तेरा लोकांपर्यंत गेली. पांच बॉम्बहि पकडण्यांत आले. हे व राशबिहारी बोस मात्र निसटले.

परंतु एकच महिन्यानें मिरतच्या १२ व्या पलटणीच्या क्वार्टर्समध्यें यांना सशस्त्र स्थितींत पकडण्यांत आलें. लाहोर, फिरोझपूर, रावळपिंडी, बनारस, जबलपूर, डाक्का व सिंगापूर अशा ठिकाणच्या कटांशीं यांचा संबंध असल्यानें यांना व यांच्या सहकाऱ्यांना फांशीची सजा फरमावण्यांत आली. त्यांत फांशीची शिक्षा होऊन जन्मठेपेवर सुटणारांत भाई परमानंद हे प्रमुख होते.

**पीटर्सन, प्रो. पीटर**—(जन्म स. १८४७—मृत्यु स. १८९९) संस्कृतचे प्रोफेसर व संशोधक.

एडिम्बरो व ऑक्सफर्ड येथें यांनीं इंग्रजीबरोबर संस्कृतचें अध्ययन केलें. यांची मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें संस्कृतचे प्रोफेसर म्हणून नेमणूक झाली (स. १८७३). मुंबईसरकारतर्फे संस्कृत व प्राकृत ग्रंथ शोधण्याकरितां यांनीं गुजराथ व राजपुतान्यामध्यें अनेक दौरे काढले. राजपुतान्यांत हिंडत असतां यांना इतिहासाला उपयुक्त अशीं पुष्कळ संस्कृत काव्यें सांपडलीं. कर्नल टॉडला न लागलेला कोटाच्या जवळील कणस्वाच्या मन्दिरावरील शिलालेख यांनीं बरोबर लावून शुद्धतापूर्वक संपादन केला. यांनीं पुस्तकाच्या शोधासंबंधीं सहा रिपोर्ट प्रसिद्ध केले आहेत. त्यांत अनेक महत्त्वाचे ग्रंथ आहेत. शिवाय अलवार राज्यांतील पुस्तकभांडाराचें महत्त्वपूर्ण सूचीपत्र यांनीं प्रसिद्ध केलें आहे (स. १८९२).

**पुणतांबेकर, अंबादास गोपाळ ऊर्फ नथुकाका**—( जन्म स. १८७० ) मुंबईचा मराठी ग्रंथसंग्रहालय, महाराष्ट्र ब्राह्मण सभा वगैरे अनेक संस्थांच्या संस्थापकांपैकीं एक प्रमुख व मिशनरी पद्धतीनें सतत सार्वजनिक कार्य करणारे कार्यकर्ते.

यांचें उपनांव पुणतांबेकर असलें तरी यांचा जन्म नाशकास झाला आणि आठव्या वर्षापासून हे मुंबईस वडलांच्या बरोबर राहण्यास आले. मॅट्रिकपर्यंत शिक्षण झाल्यावर १८९५ सालीं यांनीं दरमहा वीस रुपयांत रेल्वेंत नोकरी पत्करली. नंतर मुंबई म्युनिसिपालिटींत काम करून १९३१ सालीं हे सेवानिवृत्त झाले.

यापूर्वीच बालसभा स्थापून ' ज्ञानोदय ' या ख्रिश्चन साप्ताहिकांत आलेल्या कृष्णनिंदेचा निषेध, भारतसेवक समूह स्थापून ' हिंदु प्लेग हॉस्पिटल 'ला प्रत्यक्ष सेवा व निधि जमा करून देणें, अशा भूतदयेच्या कामाबरोबरच मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाची स्थापना करून ( १ ऑगस्ट १८९८ ), छत्तीस वर्षे त्या संस्थेच्या कार्यवाहाचें काम करून व संस्था भरभराटीस आणून हे निवृत्त झाले. तेव्हां यांचा नेक ना. मु. रा. जयकर यांच्या अध्यक्षतेखालीं सत्कार होऊन यांना थैली अर्पण करण्यांत आली.

यांनीं १९१८ सालीं मुंबईची ब्राह्मणसभा काढली व तीमध्यें ब्राह्मण विद्यार्थी साहाय्यक फंड (१९०७), शंकरवाडी फंड ( १९१३ ) व ब्राह्मण हितवर्धिनी सभा (१९१५) या यांनीं पूर्वी काढलेल्या संस्था विलीन केल्या.

प्लेग दुःखनिवारणार्थ १५-२० हजार, मराठी ग्रंथसंग्रहालय आणि ब्राह्मणसभेकरितां प्रत्येकीं ५०-६० हजार इतक्या रकमा यांनीं गोळा केल्या. याशिवाय कितीतरी लहानमोठे फंड यांनीं जमा केले. घरची स्थिति असमाधानकारक असतांहि मराठी ग्रंथसंग्रहालय आणि ब्राह्मणसभा यांच्या कार्याबद्दल यांना पांचशें व दोन हजार रुपयांच्या थैल्या अर्पण केल्या असतां यांनीं त्यांत स्वतःची भर घालून त्या परत केल्या.

या संस्थांचीं कामें करतांना सौजन्य व विनय यांबरोबर भव्य दृष्टि नि महत्त्वाकांक्षा या गुणांचाहि यांनीं आपल्या सहकाऱ्यांना परिचय आणून दिला. शंकरवाडीकरितां हमरस्त्यावर पाऊण लाखाची इमारत घ्यावयाची पण संस्थेजवळ तर फक्त अठरा हजार रुपयेच शिल्लक, अशा वेळीं सोयीस्कर व्याजानें रक्कम देणारा सावकार उभा करून यांनीं ती जागा जाऊं दिली नाहीं, आणि हिशेबी कार्यकारी मंडळास तो व्यवहार करण्यास भाग पाडलें. अगदीं हिशेबी पद्धतीनें कोणताच व्यवहार पार पडत नाहीं. संस्था निर्माण होतांना किंवा झाल्यावर मानाच्या जागा भूषित करणारांप्रमाणें संस्था निर्माण करून त्यांची अपत्यनिर्विशेष जोपासना करणारे आणि मानाच्या जागीं कधींच न दिसणारे यांच्यासारखे कार्यकर्ते पायांतील दगडांप्रमाणें संस्थांचे खरे आधारस्तंभ होत.

**पुराणिक, न्या. वासुदेव रामचंद्र ऊर्फ काकासाहेब**—( जन्म स.१८८६ ) नागपूर हायकोर्टांतील सुप्रसिद्ध न्यायमूर्ति, युनिव्हर्सिटीचे उपकुलगुरु व सार्वजनिक कार्यकर्ते.

यांचे पूर्वज निमाड जिल्ह्यांतील बऱ्हाणपूर तहसिलींतील होत. यांचे आजोबा ग्वाल्हेर राज्याचे नायबसुभे होते. निमाड जिल्हा ग्वाल्हेर सरकारकडून इंग्रजांकडे आला तेव्हां यांच्या आजोबास पोलिटिकल पेन्शनहि मिळे. पण पुढें दिवस बदलून यांनीं वडील बंधूंच्या मदतीनें कसें तरी बी. ए. पर्यंत शिक्षण घेतलें. नंतर नोकरी करून हे वकील झाले. १९१० सालीं यांनीं वकिलीला सुरुवात केली आणि थोड्याच कालांत नागपुरांतील नामांकित वकील म्हणून हे प्रसिद्धीस आले.

प्रथम ॲडव्होकेट ( १९२४ ), नंतर सरकारी वकील ( १९३५ ), ॲडव्होकेट जनरल व पुढें नागपूर हायकोर्टांतील न्यायमूर्ति म्हणून यांची कायमची नेमणूक झाली. नागपूर युनिव्हर्सिटीच्या उपकुलगुरूच्या जागीं यांची निवड झाली. शिक्षण, अर्थ, वृत्तपत्र वगैरे अनेक व्यवसायांतील संस्थांशीं यांचा अत्यंत निकटचा संबंध आहे.

**पुराणिक, विष्णु कृष्णशास्त्री**—( जन्म स. १८६४–मृत्यु स. १९१४ ) पनवेलच्या धूतपापेश्वर आर्योषधी कारखान्याचे उत्पादक व मालक.

यापूर्वी कांहीं वर्षे पनवेलचा वरील कारखाना यांचे वडील चालवीत होते; पण स. १८९३ सालीं यांनीं आपल्या जबाबदारीवर हा कारखाना चालविण्यास सुरुवात केली आणि सर्व कारखाना धूतपापेश्वराच्या नांवें करून आपण त्याचे प्रतिनिधि म्हणून काम करण्याची योजना वडिलांकडून मान्य करून घेतली. नंतर कारखान्याची आयुर्वेदशाळा उघडण्याचा समारंभ मुंबईचे डॉ. नानासाहेब देशमुख यांच्या हस्तें झाला

(स. १८९६ ऍप्रिल २२). यांच्याकडील औषधें अत्यंत गुणकारी व विश्वासर्ह समजलीं जातात.

धूतपापेश्वर आर्यौषधि कारखान्याचे सध्याचे चालक वै. पं. नानासाहेब पुराणिक हे यांचे चिरंजीव होत.

**पुरंदरे, कृष्णाजी वासुदेव**—(जन्म स.१८८८) सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक, मराठ्यांच्या इतिहासांतील ऐतिहासिक पुरुषांच्या हस्ताक्षरांचे तज्ज्ञ व अभ्यासक.

यांची मराठी सातवी पास झाल्यानंतर यांनीं नोकरी करून ट्रेनिंगच्या दुसऱ्या वर्षाची परीक्षा दिली (१९०६). मराठी शाळाखात्यांत शिरून स. १९३२ सालीं हे सेवानिवृत्त झाले. यांना इतिहाससंशोधनाचा नाद स्वाभाविक आहे. ऐतिहासिक मोडी पत्रें वाचण्यांत यांची अत्यंत प्रगति झाली व हे हस्ताक्षरावरून कोणाचें पत्र आहे हें हमखास सांगू शकतात. पत्र कोणींहि लिहिलें तरी पत्राचा उपसंहार पत्र ज्याच्या नांवानें सुटतें त्यांनीं स्वतःच्या हस्ताक्षरांनीं करण्याची तेव्हां पद्धत असे, आणि सही न करितां तीच त्या माणसाची सही समजण्यांत येत असे. त्यामुळें ऐतिहासिक पत्रें लेखकाच्या हस्ताक्षराची ओळख असल्याशिवाय कोणाचीं हे ओळखणे कठीण असतें. या हस्ताक्षराच्या ओळखीच्या बाबतींत यांचा हातखंडा आहे. त्यामुळें पेशवे दप्तराच्या संशोधनाच्या वेळीं रा. ब. गो. स. सरदेसाई रियासतकार यांनीं यांना शाळाखात्यांतून मुद्दाम त्या कामाकरितां मागवून घेतलें.

यांचें ऐतिहासिक वाङ्मय—१ पुरंदरे दप्तर (खंड १-४), २ शिवचरित्र साहित्य (खंड १ व त्याच पुस्तकाच्या इतर खंडांत अनेक शिवकालीन पत्रें), ३ किल्ले पुरंदर.

यांचे नवे शोध—१ उलट्या 'न'च्या अर्थाचा शोध. (ऐतिहासिक पत्रांच्या शिक्क्यांत कांहीं ठिकाणीं 'प्रधान' शब्दांतील 'न' अक्षर उलटें असतें. ही गोष्ट राजवाडे यांनीं नोंदली होती, पण त्याचें कारण त्यांच्या ध्यानांत आलें नव्हतें. पेशव्यांचे खास व मुतालकी असे शिक्के चालू असत. त्यांपैकीं खास शिक्क्यांत प्रधान शब्दांतील न अक्षर उलटें असावयाचेंच हा शोध प्रथम यांनीं लावला, पुरंदरे दप्तर, भाग ३, ले. २०२). २ अंताजी माणकेश्वराचें घराणें. ३ शिवकालीन व पेशवेकालीन अत्रेघराणें. ४ पेशवाईतील पुरंदरे घराण्याचें राजकारणांतील स्थान. ५ सखाराम बापू बोकीलांचें राजकीय स्थान. ६ पुरंदरे रोजनिशीचें कर्तृत्व धडफळे घराण्यांतील नारो अनंत, लक्ष्मण अनंत व जगन्नाथ चिंतामण धडफळे यांच्याकडे आहे. राजवाडे खंड ६ मधील पुरंदरे रोजनिशी, पेशवे व पुरंदरे दप्तरांतील स्मरणें हीं रोजनिशीचीं टिपणें यांचें कर्तृत्व सुप्रसिद्ध धडफळे घराण्यांतील नारो अनंत, लक्ष्मण चिंतामण व जगन्नाथ अनंत यांचेकडे आहे. ही गोष्ट पुरंदरे दप्तर, पेशवे दप्तर व चिंचवड दप्तर यांच्या सूक्ष्मावलोकनानें यांच्याच प्रथम ध्यानांत आली.

**पुरंदरे, डॉ. नीळकंठ अनंत**—(जन्म स. १८७८) स्त्री व बाल रोगांचे चिकित्सक, परीक्षक, संशोधक, उपायसंशोधक व रुग्णालय चालक.

हे मॅट्रिक झाले (१८९६) व १९०८ सालीं यांनी डॉक्टर ऑफ मेडिसिन म्हणजे एम्. डी. ही पदवी मिळविली. १९२६ सालीं मुंबई शहर म्युनिसिपालिटीनें किंग एडवर्ड मेमोरियल हॉस्पिटल व त्यालाच जोडून गोवर्धनदास सुंदरदास मेडिकल कॉलेज काढण्याचें ठरविलें, तेव्हां स्त्री-बालरोगांचे शिक्षक म्हणून यांना नेमण्यांत आलें. यांचें खासगी प्रॅक्टिस व बाळंतपणाचें इस्पितळ असून इतरत्रहि यांचा जेथें जेथें संबंध येतो तेथें तेथें स्त्री-बाल रोग्यांची हटकून गर्दी असावयाचीच.

बाळंतपणाच्या सर्व विभागाचें संशोधन हाच यांच्या आवडीचा एकमेव विषय आहे. यासाठींच यांनीं सोसायटी ऑफ गायनेकॉलाजी ॲन्ड ऑब्स्टेट्रिक्स ही संस्था इतर कांहीं डॉक्टरांच्या सहकार्यानें काढली व जोमानें चालविली. याचे चिरंजीव डॉ. बी. एन्. पुरंदरे हेहि यांच्या कार्यांत मनापासून लक्ष घालतात. त्यासाठीं मुंबई विद्यापीठ व हिंदुस्थानसरकार यांच्याकडून यांना आजपर्यंत मदत झाली आहे. गर्भावस्थेंत असणाऱ्या जिवाच्या हृदयाचे ठोके या विषयावर यांनीं केलेलें संशोधन हिंदुस्थानांत व परदेशींहि विद्वन्मान्य झालेलें आहे.

यांच्या संशोधनाची रूपरेषाः—पहिल्यानें अग्रस्कंध कोठें लागतो तें काळजीनें हातांनीं पोटावर चाचपून शोधून काढावयाचें. मग त्याची पोटावरील उंची व पोटाच्या मध्यरेषेपासूनचें अंतर हें मोजावयाचें. या निरनिराळ्या मापांवरून मुलाचें डोकें नीट प्रसवमार्गांत आहे किंवा मार्गांत न उतरतां प्रवेशद्वाराच्याहि वर

हेलेलें आहे, हें केवळ पोटावरील परीक्षेनें कळून येतें. च पुढें प्रत्यक्ष प्रसव चालू असतां या मापांनीं गर्भ-ाक कोठपर्यंत व कसें प्रसवमार्गांत उतरलें आहे तें ज कळून येतें. या अग्रस्कंधाच्या मापाच्याद्वारें चिमटा ण्याच्या शस्त्रप्रयोगाच्या वेळीं फारच महत्त्वाची हेती मिळते. अशा रीतीनें या मापांवरून प्रसूति भ होईल किंवा कष्टतर बनेल; व कष्टप्रसव झाला तां केव्हां मदत देण्याचा काळ आला आहे तें सर्व न येतें. ही सर्व माहिती पोटावरून मिळविण्याचा य हेतु हा आहे कीं याच्यायोगें योनिपरीक्षा करण्याचें य तितकें टाळतां येतें; कारण योनिपरीक्षा तांना बोटांवरून बाहेरील विषजंतु योनींत शिरविले ात व त्यायोगें बाळंतिणीला विषजंतुदोष प्सिस ) होण्याचा संभव उद्भवतो. असें मोठें ट होण्याच्या कारणाला फक्त पोटावरच परीक्षा न प्रतिबंध करितां येतो. आणखी मस्तक-कटीर ध ठरविण्याची दुसरी एक नवीन रीत यांनीं ढिली आहे.

यांचे ग्रंथ—प्रसूतिशास्त्र.

**पुरुषोत्तमदास ठाकूरदास, सर**—( जन्म १८७९ ) मुंबईचे सुप्रसिद्ध कापसाचे व्यापारी व शास्त्रज्ञ.

मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें कांहीं दिवस शिक्षण ल्यानंतर यांनीं कापसाच्या व्यापारांत भाग घेण्यास वात केली. ईस्ट इंडिया कॉटन असोसिएशनचे हे यक्ष आहेत.

परंतु यापेक्षांहि नामांकित अर्थशास्त्रज्ञ व अनुभवी वहारतज्ज्ञ अशा दुहेरी नात्यानें हिंदुस्थानांत सुरू गाच्या कोणत्याहि नव्या व्यापारी साहसांत यांची वश्यकता उत्पन्न होते. रिझर्व बँक ऑफ इंडिया, रिएंटल लाइफ इन्शुरन्स कं. लि., इंडियन रेडिओ ड केबल कम्युनिकेशन्स कं. लि., असोशियेटेड सिमेंट नीज लि., इत्यादि संस्थांशीं यांचा जिव्हाळ्याचा ध आहे.

इंडियन रिट्रेन्चमेंट कमेटी, रॉयल कमिशन ऑन ड्यन करन्सी ॲन्ड फिनान्स ( १९२६ ), ईपीरियल ड्यन सिटिझनशिप असोसिएशन इत्यादि जबाब-रीच्या सरकारी कमेट्यांवरहि यांनीं कामें केलीं हेत.

**पेटिट, सर-दिनशा माणेकजी**—( जन्म स. १८२३–मृत्यु स. १९०१ ) एकोणिसाव्या शतकांतील मुंबईचे सुप्रसिद्ध सार्वजनिक कार्यकर्ते व कारखानदार.

यांचें घराणें प्रथम सुरत येथें राहणारें. पूर्वज नसरवानजी कांवसजी हे एकोणिसाव्या शतकाचे सुरुवातीला मुंबईत येऊन स्थायिक झाले. फ्रेंच व इंग्लिश मालाच्या एजंटाचें काम ते करीत, म्हणून यांच्या घराण्याला पेटिट हें फ्रेंच भाषेंतील 'व्यापारी' या अर्थाचें नांव मिळालें. यांच्या वडिलांचें नांव माणेकजी नसरवानजी पेटिट. मुंबईच्या साइक्स स्कूलमध्यें कांहीं दिवस शिक्षण घेतल्यानंतर यांनीं वडिलांच्या उद्योगधंद्यांत लक्ष घालण्यास सुरुवात केली.

सुरुवातीपासूनच यांचा धंदा जरी सर्वत्र परदेशी कंपन्यांच्या दलालाचा असला तरी १८६४ च्या अमेरिकन युद्धाच्या क्रांतिकारक वेळीं यांनीं अतोनात पैसा मिळविला. त्याचेच जोरावर यांनीं माणेकजी पेटिट स्पिनिंग ॲन्ड वीव्हिंग मिल्सची स्थापना करून पुढें या संस्थेची व्यवस्था पाहण्यासाठीं माणेकजी पेटिट मॅन्यु-फॅक्चरिंग कं.ची स्थापना केली. अशा तऱ्हेनें यांचा पसारा वाढत वाढत शेवटीं दिनशा पेटिट मिल, माझगांव मिल, फ्रेमजी पेटिट मिल, व्हिक्टोरिया मिल व गॉर्डन मिल इतक्या गिरण्या यांच्या ताब्यांत आल्या. यानंतर कांहीं दिवसांनीं यांनीं जे. ऑल्स्टन व नवरोजी एन्. वाडिया यांचे सहकार्यानें यार्न डायिंग फॅक्टरीची स्थापना केली. कापडांना निरनिराळ्या तऱ्हेचे रंग देणारी ही मुंबईमधील पहिलीच संस्था होय.

याचबरोबर यांना बँक ऑफ बॉम्बेसारख्या संस्थांचे डायरेक्टर, बॉम्बे रॉयल एशियॅटिक सोसायटी व कॉर्पो-रेशनचे सभासद करण्यांत आलें. हे कांहीं दिवस मुंबईचे शेरीफहि होते. १८८६ सालीं यांना मध्यवर्ति असेंब्लीचे सभासद निवडण्यांत आले.

परंतु एक फार मोठे उदार धनिक अशी यांची अजूनहि ख्याति आहे. पारशांच्या टॉवर्स ऑफ सायलेन्स व फायर टेंपल-यांना व जनावरांचें इस्पितळ, स्त्रियांचें कॉलेज, पेटिट हॉस्पिटल इत्यादि संस्थांना यांनीं दिलेल्या लहानमोठ्या देणग्यांचा एकूण आंकडा वीस लक्ष रुपयांच्या वर जातो. सध्यांच्या व्हिक्टोरिया ज्युबिली टेक्निकल इन्स्टिटयूटचा पसारा यांनीं सरकारला त्यासाठीं देणगी म्हणून दिलेल्या जागेंत वाढला आहे.

मुंबईच्या नव्या कापडधंद्याचे जनक ही यांच्या

कार्याची ढोबळ रूपरेखा आहे. कावसजी नानाभाई दावरसारख्या लोकांनीं जरी कापडाच्या गिरण्या यांचे आधीं उत्पन्न केल्या असल्या तरी सहकारी भांडवला-बाबतची यांनीं आपल्या गिरण्यांतून स्वीकारलेली दृष्टि अगदीं नवी होती. सध्यां अतिपरिचयामुळें या कार्य-पद्धतींत आपणांस कांहीं विशेष वाटत नसलें तरी सहकार्यानें केलेले धंदे यशस्वी होतात हें यांनी आपल्या कापड गिरण्यांतून गोंवलेले तत्त्व पुढें सर्वांना मार्गदर्शक ठरलें. यांचें हें अनुकरण इतर लोकांना इतकें फायदेशीर वाटलें कीं यांच्या देखतच गिरण्यांची संख्या ४३ वरून ८२ गेली. आपल्या गिरण्यांतील मजुरांसाठीं क्वार्टर्स बांधण्याचा त्या वेळीं नवा वाटणारा विक्रम यांनीं केला होता.

व्हिक्टोरिया टर्मिनसच्या समोर खडा असलेला यांचा भव्य पुतळा कापड गिरण्यांतील व्यावसायिकांना मार्ग-दर्शन करण्यासाठीं कायमचा सज्ज आहे.

**पेशवे, धुंडिराज बाजीराव ऊर्फ नाना-साहेब**—( जन्म स. १८२४–मृत्यु स. १८५८ ऑक्टो. १० ) १८५७ सालच्या बंडामागील प्रमुख सूत्रधार व कार्यकुशल सेनापति.

यांचें मूळ नांव धोंडोपंत. दुसरे बाजीराव पेशवे यांनीं यांना दत्तक घेतलें व यांचें नांव नानासाहेब ठेवण्यांत आलें. बाजीरावांचे मृत्यूनंतर ( १८५२ ) ब्रि. सरकारनें त्यांना देण्यांत येणारें आठ लक्षांचें पेन्शन यांना देण्याचें नाकारलें व त्यांच्याशीं यांचा पहिला खटका उडाला. नंतर यांचे बंधु चिमाजी अप्पा यांच्या मुलाचा मुलगा चिमणाराम थत्ते या सतरा वर्षाच्या अज्ञान मुलाच्यातर्फे यांच्यावर वांटणीकरितां दिवाणी दावा लावला. परंतु बंडाच्या उघड सुरवातीपर्यंत ब्रि. सर-कारशीं यांचे संबंध मैत्रीचे असत.

बंडाच्या सुरवातीला बहादुरशहा वगैरे लोकांप्रमाणेच हेहि त्यापासून अलिप्त होते. परंतु पुढें त्याची व्याप्तीच इतकी वाढली कीं यांना त्यापासून दूर राहणें अशक्य होऊन बसलें आणि यांनी उघडपणें बंडाचें पुढारीपण स्वीकारलें.

कानपूरच्या सर ह्यूज व्हिलरच्या सैन्यावर विजय मिळवून यांनीं आपली छाप आपल्या सहकाऱ्यांवर बसविली. २७ जून व १५ जुलै या दोन दिवशीं कान-पूरच्या आसपास झालेल्या इंग्रज लोकांच्या कत्तलीची नैतिक जबाबदारी इंग्रजांनीं हे व तात्या टोपे यांच्यावर टाकून यांना कायमचे बदनाम करण्याचा प्रयत्न केला; परंतु सैन्यावरील यांचें प्रभुत्व शेवटपर्यंत कायम असे.

परंतु या सर्व हालचालींना बिठूरच्या लढाईत हॅव-लॉकनें यांना दिलेल्या धक्क्यानें फार मोठा खो बसला; यांनीं उत्तर हिंदुस्थानांत जाऊन पुनः सैन्य वगैरे जम-विण्याचें केलेले प्रयत्न निष्फळ ठरले आणि सर कॉलिन कॅम्पबेलच्या सैन्यानें यांना कायमचें नेपाळांत ढकललें ( १८५८ ). सरकारनें यांना पकडण्यासाठीं एक लाख रुपयांचें बक्षिस लावूनहि हे कोणाला सांपडूं शकले नाहींत. नेपाळच्या जंगलांतच यांचा अंत झाला.

**पेंटर, बाबुराव**—( जन्म स. १८९२ ) हिंदी चित्रपटसृष्टींत कलापूर्ण क्रांति करणारे चित्रकार.

यांचे वडील कोल्हापूरला चित्रकार होते. मुंबईच्या अमेरिका इंडिया थिएटरमध्यें हे व यांचे आतेभाऊ आनंदराव यांनी एक चित्रपट पाहिला. आणि यांच्या चित्रपट तयार करण्याच्या महत्त्वाकांक्षेबरोबर हिंदी चित्रपटसृष्टि एकएक पाऊल पुढें टाकूं लागली.

चित्रपट तयार करण्यासाठीं कॅमेरा तयार करावयाचा, भांडवलासाठीं चित्रपटगृह चालवावयाचें अशा अनेक प्रसंगांना तोंड देत यांनीं आनंदरावांचे सहकार्यानें महाराष्ट्र फिल्म कंपनीची स्थापना केली आणि या संस्थेच्या ' सैरन्ध्री ' या पहिल्या चित्रानेंच यांना प्रचंड यश मिळवून दिलें. लो. टिळकांनीं यांना पदक देऊन यांचा गौरव केला व नव्या जोमानें यांचा धंदा सुरू झाला.

सरदार नेसरेकरांनीं दिलेल्या पंचवीस हजार रुपये भांडवलावर यांनीं बारा हजार रु.चा नवा कॅमेरा विकत आणला व वत्सलाहरण, प्रल्हाद, दामाजी वगैरे मूक चित्रपटांनीं हे यशाच्या पायऱ्या चढत गेले. मध्यन्तरीं स्टुडिओला आग लागून कॅमेऱ्याशिवाय सर्व गोष्टी आगीच्या भक्ष्यस्थानीं पडूनहि यांचा जोर कायमच राहिला व सिंहगड, कल्याण खजिना, नेताजी पालकर अशीं यशस्वी चित्रें यांनीं काढलीं. युरोपांत वेम्ब्ले येथें भरलेल्या चित्रपट प्रदर्शनांत कल्याण खजिना, पद्मिनी व सिंहगड यांच्या चित्रांना सुवर्णपदक व यांच्या दिग्दर्श-नांतील जिव्हाळ्याबद्दल प्रशस्तिपत्रक मिळालें. परंतु पुढें आपसांतील बेबनावामुळें लंकादहन या यांच्या सतराव्या

ात्रपटानें महाराष्ट्र फिल्म कं.ची इतिश्री झाली १९३० ).

पुढें बोलपटाचे जमान्यांत यांनीं कोल्हापूरच्या लिनी सिनेटोनसाठीं सावकारी पाश, उषा व प्रतिभा तीन चित्रपट तयार केले. यांपैकीं सावकारी पाश-ील कलात्मक प्रचाराबद्दल त्या वेळीं यांची सर्वत्र हवा झाली. अगदीं अलीकडे 'रुक्मिणी स्वयंवर' व ामजोशी' या दोन चित्रांचें दिग्दर्शन यांनीं केलें.

दादासाहेब फाळक्यांनीं हिंदी चित्रपटसृष्टीचा पाया तला व त्याला कलात्मक वळण देण्याचें काम यांनीं लें. यांचें सर्व घराणें चित्रकारांचें, यांची स्वतःची तर लात्मक तैलचित्रें काढण्याबद्दल विशेष ख्याति. नावि-ाची नवलाई संपल्यावर हिंदी चित्रपटांना यांचें लापूर्ण मार्गदर्शन महत्त्वाचें ठरलें. विजेच्या प्रकाशांत ायाचित्रण करण्याच्या व जाहिरातीसाठीं बाहेर पोस्टर्स ावण्याच्या यांच्या कल्पना पुढें सर्वमान्य झाल्या. ़दी चित्रपटधंद्यांत अगदीं सुरवातीपासून ते थेट ाजतागायत महाराष्ट्राला मिळालेलें नेतृत्व तर हे व ांच्या हाताखालीं तयार झालेले व्ही. शांताराम, ्. फत्तेलाल, विष्णुपंत दामले, बाबुराव पेंढारकर, ्नायक, दादा तोरणे, सरपोतदार, केशवराव धायबर ा लोकांच्या तेजस्वी कार्याची फलश्रुति आहे.

**पोतदार, प्रा. दत्तो वामन**—( जन्म स. १८९० ॉगस्ट ५ ) मराठी इतिहास संशोधन, नवविचारप्रवर्तन सार्वजनिक कार्य यांचे प्रसिद्ध पुरस्कर्ते.

यांचा जन्म बिरवाडी ( जि. कुलाबा ) येथें व शिक्षण णें येथें होऊन हे बी. ए. झाले ( १९१० ). नंतर नूतन मराठी हायस्कूल, पुणें या संस्थेंत शिक्षक म्हणून ागल्यावर तेथें आजीव सभासद होऊन मुख्य शिक्षक सर परशुरामभाऊ कॉलेजांत प्राध्यापक म्हणून काम ल्यावर हे सेवानिवृत्त झाले ( १९३५ ).

कै. वि. का. राजवाडे यांच्यापासून प्रेरणा घेऊन तिहाससंशोधन व सार्वजनिक कार्य करण्याचें व्रत ातलेल्यांपैकीं हे एक होत. तें व्रत यांनीं अविवाहित ाहून मोठ्या निष्ठेनें यशस्वीपणें चालविलें आहे. मरा-ठ्यांच्या इतिहासाचें संशोधन, शिक्षण आणि मराठी ाहित्य या ह्यांच्या कार्याच्या मुख्य शाखा आहेत. ्थापि त्या विषयांखेरीज इतरहि अनेक प्रकारच्या ंस्थांशीं यांचा निकटचा संबंध असतो.

पुण्याच्या भारत इ. सं. मंडळाचे पंचवीस वर्षे चिटणीस, अनेक वर्षे कार्याध्यक्ष, ऑल इंडिया ओरिए-न्टल कॉन्फरन्स हैदराबाद व इंडियन हिस्टॉरिकल कॉंग्रेस, अलाहाबाद ( १९३८ ) या ठिकाणीं मराठी विभागाचे व मराठी साहित्य संमेलन, अहमदनगर ( १९३९ ) येथें हे अध्यक्ष होते.

देशाच्या उत्कर्षाला आवश्यक असणाऱ्या विविध कार्यांचें महत्त्व ओळखून त्यांत भाग घेणारा यांच्या-सारखा गृहस्थ अलीकडच्या काळांत विरळा. यांच्यांत कार्यकर्त्यांना प्रेरणा देण्याचा विलक्षण गुण आहे. 'पोतदारजी सबके साथ सहयोग रखते है, लेकिन सहमत किसकेभी साथ नहीं है' या यांच्या काकासाहेब कालेल-करांनीं केलेल्या वर्णनांत यांच्या स्वभाववैशिष्ट्याचा चांगला परिचय मिळतो. यांचें मराठी वक्तृत्व परिणाम-कारक असतें.

यांचे ग्रंथ—१ मराठी गद्याचा इंग्रजी अवतार ( १९२२ ), २ विविधदर्शन-लेखसंग्रह ( १९३९ ), ३ महाराष्ट्र साहित्य परिषदेचा इतिहास ( १९४३ ) इत्यादि.

**पोद्दार, कन्हैयालाल जयनारायण**—( जन्म स. १८७० ) सुप्रसिद्ध व्यापारी व हिन्दी भाषेंतील लेखक नि कवि.

यांचें जन्मस्थान मथुरा. हे रामगढ ( सीकर-जयपुर )चे प्रसिद्ध मारवाडी शेठ गुरुसहायमलजींचे पणतु आणि मथुरेच्या दानशूर जयनारायणजींचे पुत्र. यांचा मुख्य व्यवसाय व्यापार असून केवळ हौसेनें हे हिन्दी भाषेंत लिखाण करतात. यांचा अलंकारप्रकाश हा ग्रंथ विद्वानांच्या प्रशंसेस पात्र झाला असून त्यांत केवळ अलंकारांचें विवेचन होतें. पण दुसऱ्या आवृत्तीचे वेळीं त्यांत काव्यविषयक इतर अंगांची माहिती घालून त्याचें नांव काव्यकल्पद्रुम असें ठेवण्यांत आलें. तसाच हिन्दी मेघदूतविमर्श हा यांचा ग्रंथ विद्वन्मान्य आहे.

यांचे ग्रंथ—१ भर्तृहरिशतक ( अनुवाद ), २ अलं-कारप्रकाश, ३ काव्यकल्पद्रुम, ४ पद्मगीत (भागवतांतील कांहीं अध्यायांचा समश्लोकी अनुवाद ), ५ गंगालहरी ( समश्लोकी ), ६ हिन्दी मेघदूतविमर्श.

**पोपटराम प्रभुराम**—( जन्म स. १८६५-मृत्यु स. १९४४ जाने. ९ ) मुंबईच्या पोपट प्रभुराम आयुर्वेद

.ाचे संस्थापक, सुप्रसिद्ध डॉक्टर आणि
'.

, जन्म पोरबंदर (सुदामपुरी) येथें झाला. .डील प्रभुराम जीवनराय हे आयुर्वेदांतील निष्णात प।.। होते. त्यांच्यापाशीं यांनीं आयुर्वेदाचें शिक्षण घेतलें. मुंबई विश्वविद्यालयांतून हे एल्. एम्. अँड एस्. झाले (१८९३). तेव्हां यांना पोरबंदर राज्याचे मुख्य आरोग्याधिकारी नेमण्यांत आलें. यांनीं तेथें आयुर्वेदाच्या पद्धतीनें उपचार करणारें एक मोठें रुग्णालय स्थापन केलें.

स. १८९५ मध्यें हे मुंबईस येऊन राहिले. यांनीं मुंबईस आल्यावर वडलांच्या देखरेखीखालीं आयुर्वेदीय औषधें बनवणारा 'प्रभुराम अनंत औषधालय' नांवाचा कारखाना सुरू केला. यानंतर आयुर्वेदाचें शिक्षण देणारें 'आयुर्वेद विद्यालय' न्या. म. गो. रानडे यांच्या अध्यक्षतेखालीं समारंभपूर्वक स्थापन केलें. तेथें शिक्षण घेतलेल्या वैद्यांना 'भिषग्वर' अशी पदवी दिली जाते.

स. १८९६ सालीं मुंबईत प्लेग सुरू झाला. त्या वेळीं यांनीं लोकांची अत्यंत सेवा केली. त्यामुळें यांना सरकारनें जे. पी. केलें आणि ऑनररी मॅजिस्ट्रेटचा हुद्दा दिला. १९०२ सालीं यांचे पिताजी निवर्तले व विद्यालयाचा सर्व भार यांच्यावर येऊन पडला. यांनीं मोठ्या चिकाटीनें आणि कुशलतेनें आयुर्वेद विद्यालयाला दि प्रभुराम आयुर्वेदिक कॉलेजचें रूप दिलें. तेथें शस्त्रवैद्यक, नेत्रवैद्यक व सूतिकारोग इत्यादींचें विशेष शिक्षण देण्याची व्यवस्था केली.

आयुर्वेदाच्या उत्कर्षाकरितां यानीं अत्यंत मेहनत घेतली. आयुर्वेदावर घेतल्या जाणाऱ्या आक्षेपांचें खंडन केलें. यांचे पुत्र डॉ. प्रताप हेहि आयुर्वेदाचे पक्षपाती आहेत.

**प्रकाशम् टी.**— (जन्म स. १८७३) आंध्र प्रांतांतील सुप्रसिद्ध कॉंग्रेस कार्यकर्ते व पुढारी.

१९२० च्या कायदेभंगाच्या चळवळींत आपले ऐन जोमांतील धंदे सोडणारांत आंध्र प्रांतांतील हे तरुण बॅरिस्टर प्रमुख होते. हातीं घेतलेलें कोणतेंहि काम तडफेनें करण्याच्या यांच्या कार्यपद्धतीमुळें हे त्या प्रांतांतील प्रमुख कार्यकर्ते बनले. कायदेभंगाच्या त्या मोहिमेंत प्रथम तुरुंगांत जाण्याचा मान यांना मिळाला.

हे तुरुंगांतून सुटून आले व यांनीं 'स्वराज्य' हें आपलें सुप्रसिद्ध पत्र सुरू केलें. हे व आंध्र प्रांत यांत एक नवें दालन या पत्रानें खुलें केलें. देशाच्या चळवळींत तरुणांना .अघाडीवर येण्याच्या संदेशाचा हे पाठपुरावा करीत. देशांतील जहाल राजकारणाला पाठिंबा देण्याच्या या पत्राच्या धोरणामुळें पुढें यांना हें पत्र बंद करावें लागलें.

पुढें मिठाचा सत्याग्रह आंध्रप्रांतांत सुरू करण्याचा मान यांनीं मिळविला. आंध्र प्रांतातर्फे हे मध्यवर्ति असेंब्लींतहि निवडून आले. आंध्र प्रांतिक कॉंग्रेस कमेटीचे हे अध्यक्ष असून १९३८ सालच्या कॉंग्रेस अमदानींत हे जमीनमहसूल खात्याचे प्रधान होते.

१९४६ च्या प्रांतिक निवडणुकीनंतर श्री. राजगोपालाचारींसारख्या म. गांधी व कॉंग्रेस पार्लमेंटरी बोर्ड यांनीं पुरस्कृत केलेल्या पुढाऱ्याला डावलून लोकांनीं यांना मुख्य प्रधान निवडलें, ही एकच गोष्ट यांच्या प्रभावी लोकप्रियतेची द्योतक आहे.

**प्रतापशेट तथा मोतीलाल माणिकचंद**— (जन्म स. १८७९) महाराष्ट्रांतील प्रसिद्ध व्यापारी व दानशूर गृहस्थ.

यांचा जन्म मूनपुरा (सं. जयपूर) मारवाडमध्यें झाला. गुरांना चारणें व उंट फिरवून आणणें इत्यादि कामांत यांचीं पहिलीं नऊ वर्षे गेलीं. पुढें चोपडें (खानदेश) येथील शेट माणिकचंद यांचे मांडीवर हे दत्तक गेले. वयाच्या चवदाव्या वर्षापर्यंत यांचें सरासरी मराठी पांच इयत्ता शिक्षण झालें. सावळारामपंत नाईक यांच्या हाताखालीं पंधरा वर्षे शिक्षण घेऊन यानीं मराठी भाषेचें अध्ययन व तत्त्वज्ञानविषयक चर्चा केली. तत्त्वज्ञान हा यांचा जिव्हाळ्याचा विषय आहे. या विषयावर यांचे तत्त्वज्ञानमंदिरांत लेख प्रसिद्ध झाले आहेत. स. १९०५ सालीं यांनीं स्वदेशी चळवळींत चोपडें येथें स्वदेशी कापडाचें दुकान उघडलें. स. १९०६ सालीं 'प्रताप मिल्स लि.' अमळनेर येथें सुरू केली. सहासात वर्षानंतर तेथेंच एक दुसरी गिरणी उभारली. नंतर १९२३–२४ ला धुळें येथें 'न्यू प्रताप मिल्स लि.' नांवाची आणखी एक गिरणी सुरू केली. या तीनहि गिरण्यांची व्यवस्था हे स्वतः पाहतात. यांच्याच खटपटीनें व एक लाखाच्या देणगीनें अंमळनेरचें तत्त्वज्ञानमंदिर (इंडियन इंस्टिट्यूट ऑफ फिलॉसफी) स्थापन झालें. तसेंच भोसला मिलिटरी ट्रेनिंग स्कूल, नाशिक या संस्थेलाहि एक लाख रुपये देऊन यांनीं स्थैर्य आणलें.

याशिवाय यांनीं अनेक मोठाल्या देणग्या देऊन दानशूरत्व प्रगट केलें आहे. यांना सरकारकडून कैसर-इ-हिंद पदक व सुवर्णपदक मिळालें आहे.

**प्रफुल्ल घोष**—( जन्म स. १८९१ ) बंगालमधील सुप्रसिद्ध कॉंग्रेस कार्यकर्ते व ग्रामसेवक.

डाका येथें यांचा जन्म झाला. जगन्नाथ कॉलेजमधून हे शास्त्रविषय घेऊन पहिल्या वर्गात एम्. ए. झाले. नंतर दोन वर्षे डाका कॉलेजमध्यें केमिस्ट्रीचे रिचर्स स्कॉलर म्हणून काम केल्यानंतर यांनीं कांहीं दिवस कलकत्त्याच्या प्रेसिडेंसी कॉलेजांत प्राध्यापकाचें काम केलें. त्यानंतर हे कांहीं दिवस कलकत्ता टांकसाळींत असि. ॲसे मास्टर होते, सिंटेटिक व नॅचरल डाइजवरील यांच्या संशोधनाबद्दल कलकत्ता युनिव्हर्सिटीनें यांना डॉक्टरेट दिली. याचे आधीं बरेच दिवस हे सुरेंद्रनाथ बानर्जींच्या अंतर्वर्तुलांत होते. यांना पुढें म. गांधींनीं असहकारांत भाग घेण्याचा सल्ला देतांच यांनीं टांकसाळींतील आपली नोकरी सोडली व 'अभय आश्रमा'ची स्थापना केली ( १९२० ). खादीप्रचार, खेड्यांची पुनर्घटना, शेतकी सुधारणा, वैद्यकीय मदत देणें इत्यादि अनेक हेतु या संस्थेचे असून यांच्या शिस्तीच्या कार्यपद्धतीमुळें या क्षेत्रांत यांच्याबरोबरीनें काम करणें इतर कोणत्याहि संस्थेला अशक्य होऊन बसलें. १९३२ च्या असहकाराच्या जमान्यांत यांची ही संस्था बेकायदा ठरविण्यांत आली.

१९२१ सालच्या कायदेभंगाच्या चळवळींत यांनीं स्वयंसेवक पथक उभारलें. १९३० सालच्या चळवळींत तर यांना सिव्हिल डिसओबीडियन्स कौन्सिलचे सेक्रेटरी नेमण्यांत आलें. यांनीं मिठाचा कायदा मोडला व यांना दोन वर्षांची शिक्षा झाली. यांना कलकत्ता कॉंग्रेसचे स्वागताध्यक्ष नेमण्यांत आलें. परंतु तें अधिवेशन बेकायदा ठरल्यावर यांना तुरुंगांत जावें लागलें.

१९३४ पासून पुढें मात्र यांनीं आपणांस सर्वस्वी ग्रामसेवेला वाहून घेतलें. पूर्व बंगालमधील पुराचे वेळीं यांनीं आपल्या आश्रमवासी सहकाऱ्यांचे साहाय्यानें अतोनात कष्ट केले. या कार्यासाठीं यांनीं या वेळीं ३५००० रु. जमविले.

हिंदुस्थानांतील ग्रामसुधारणेचे सर्वश्रेष्ठ कार्यकर्ते अशी प्रसिद्धि यांना यांच्या या कार्यामुळें मिळाली आहे.

**प्रज्ञानंदस्वामी, ऊर्फ कृष्ण**—( जन्म स.१८५९–समाधि स. १९०४ ) अध्यात्मदृष्ट्या थोर अधिकाराचे पुरुष.

हे मूळ परांजपे घराण्यांतील. यांनीं वेदाध्ययन व काव्यव्याकरणादिकांचें अध्ययन करून भागवतावर परिश्रम केले. पत्नी बाल्यावस्थेंत निवर्तल्यावर हे वेदान्तशास्त्राचा अभ्यास करूं लागले. गीता व उपनिषदें मुखोद्गत करून श्रीभूमानंदस्वामींजवळ यांनीं प्रस्थानत्रयीचा अभ्यास केला. श्रीब्रह्मानंदस्वामींनीं यांना वयाचे २९ वे वर्षीं दीक्षा ( संन्यास ) दिली. तेव्हांपासून प्रज्ञानंदस्वामी हें नांव आलें. हे मुमुक्षूंना प्रस्थानत्रयीचे पाठ सांगत. यांचे १७ वर्षे प्रस्थानत्रयीचे पाठ चालले होते. यांचीं प्रवचनें ऐकून सामान्य व्युत्पन्न माणसाचाहि आचार्यभाष्यांत चांगला प्रवेश होई. कै. भाऊशास्त्री लेले, काशीनाथशास्त्री पारकर, भास्करशास्त्री पावगी, विष्णुशास्त्री बापट इत्यादि मंडळी श्रवणास येत. हे वाईस प्लेगनें वारले. शेवटीं नारायणशास्त्री मराठे व नारायणबुवा द्रवीड या शिष्यांनीं उत्तम सेवा केली. शंभुराव करंदीकर यांनीं यांच्या समाधिस्थळीं उत्तम इमारत बांधून शिवलिंगाची स्थापना केली. त्या जागेला प्राज्ञमठ म्हणतात. या मठाचें रूपान्तर व स्थलान्तर होऊन सध्यांची प्राज्ञपाठशाळा उदयास आली. शारीरकभाष्य यांनींच सांगावें अशी त्या वेळीं काशीपर्यंत यांची प्रसिद्धी होती.

**प्रेमचंद**—( जन्म स. १८८० जुलै ३१–मृत्यु स. १९३६ ऑगस्ट २५) हिन्दी भाषेंतील विसाव्या शतकाच्या पूर्वार्धातील सर्वश्रेष्ठ कादंबरीकार व लघुकथालेखक.

जन्मस्थान बनारसजवळ लमही गांव. जात कायस्थ 'दुसरे श्रीवास्तव.' पिता अजायबराय. माता आनन्दीदेवी. यांचें नांव (मुन्शी) धनपतराय. प्रथम हे या नांवानेंच लिहीत. पुढें यांना सरकारी अवकृपेमुळें 'प्रेमचंद' हें टोपण नांव घ्यावें लागलें. त्या टोपण नांवानेंच आतां यांची सर्वत्र प्रसिद्धि झालेली आहे.

यांचें शिक्षण गोरखपूर, बनारस, अलाहाबाद वगैरे ठिकाणीं झालें. यांनीं एम्. ए. पर्यंत अभ्यास केला होता. शाळा खात्यांत शिक्षक, मुख्याध्यापक, डे. इन्स्पेक्टर वगैरे कामें करून असहकारितेच्या कालांत यांनीं सरकारी नोकरी सोडली ( १९२० ). त्यापूर्वी हे लेखक म्हणून विख्यात झाले होते.

१९०५ सालीं यांची कृष्णा ही पहिली कादंबरी प्रसिद्ध

झाली. तिचेच पाठोपाठ प्रेमा प्रसिद्ध झाली. तिचेंच नांव पुढें 'विभव' ठेवलें. याच सालीं शिवरानी या विधवा स्त्रीशीं यांचा पुनर्विवाह झाला. एक वर्षानंतर 'सोजे वतन' प्रसिद्ध होऊन जप्त झालें आणि हे प्रेमचंद नांवानें लिहूं लागले. प्रथम हे उर्दूंत लिहीत पण पुढें हे हिन्दींतच लिहूं लागले.

१२ कादंबऱ्या, ३१ लघुकथासंग्रह, ३ नाटकें, ३ चरित्रें, २ चर्चात्मक व ११ संपादित अशीं बासष्ट पुस्तकें यांच्या नांवावर हिन्दींत प्रसिद्ध आहेत. यांच्या कादंबऱ्या लोकप्रिय असल्या तरी त्यापेक्षांहि यांच्या लघुकथा अधिक लोकप्रिय आहेत. यांच्या लिहिण्यांतील अत्यंत मोठा गुण हा आहे कीं त्या वाचकांच्या अन्तः-करणाचा ठाव घेऊन त्याला विचाराची नवी दिशा दाखवतात. प्रचलित प्रश्न लघुकथेच्या द्वारा मांडून त्यावर नवा प्रकाश टाकण्याची यांच्या लिहिण्यांत शक्ति आहे. जीवनांत नित्य अनुभवाला येणाऱ्या सुखदुःखादि द्वंद्वाचें यथार्थ चित्रण करणारा यांच्यासारखा लेखक विरळा. हिंदुमुसलमानांच्या झगड्याचें चित्रण करतांना यांनीं दोन्ही समाज अहिंसा, सत्य वगैरे धर्मापासून कसे च्युत होत आहेत याचें उत्कृष्ट दिग्दर्शन केलें आहे. तसेंच यांच्या अत्यंत लोकप्रिय गोदान नांवाच्या कादंबरींत यांनीं हिंदु शेतकऱ्याची गाईबैलांसंबंधीं वृत्ति आणि खालावत चाललेलें ग्रामीण जीवन मोठ्या हळु-वारपणें पण यथार्थ रंगविलें आहे. यांच्या कथांचें भाषांतर हिंदुस्थानांतील अनेक देशी भाषांत तर झालें आहेच; शिवाय जपानी, इंग्रजी वगैरे भाषांत भाषांत-रित होण्याचा मान त्यांना लाभला आहे. यांच्या इतक्या भाषांतरित होण्याचा मान विसाव्या शतकाच्या पूर्वा-र्धांतील हिंदी लेखकांपैकीं इतरांना अद्यापि लाभलेला नाहीं.

यांचें घरगुती जीवन परिचित करून देणारा ग्रंथ यांच्या पुनर्विवाहित पत्नी शिवरानीदेवी यांनीं 'प्रेमचंदः घरमें' नांवानें यांच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध केला आहे (१९४४). त्यावरून यांचें घरगुती जीवन कळून येतें आणि यांच्या लेखनाची पार्श्वभूमि ध्यानांत येते. सर्व-साधारण लोकांसारखें यांचें जीवन असलें तरी जीवनाचा मूलगामी पद्धतीनें विचार करण्याचा यांचा स्वभाव, तळमळ आणि निर्भयपणा मनांत भरतो आणि वाचकाच्या मनांत हे आपलेपणा कां उत्पन्न करतात याचें कारण ध्यानांत येतें.

## फ

**फडके, नारायण सीताराम**—(जन्म स.१८९४) मराठींतील नामांकित ललित-लेखक व वक्ते.

पुण्याचें नूतन मराठी विद्यालय व फर्ग्युसन कॉलेज-मध्यें आपलें शिक्षण संपवून हे एम्. ए. झाले आणि यांची न्यू पूना कॉलेजांत प्राध्यापक म्हणून नेमणूक झाली. परंतु असहकारितेच्या चळवळींत यांनीं कॉलेज सोडलें व केसरीमराठ्याच्या सहसंपादनाचें काम पत्करिलें. याच वेळीं टिळक महाविद्यालयांत शिक-वण्याचें कामहि हे करीत. परंतु पुढें हे दिल्ली, हैदराबाद (सिंध), नागपूर इत्यादि ठिकाणीं हिंडून कोल्हा-पूरच्या राजाराम कॉलेजांत तत्त्वज्ञान व तर्कशास्त्र यांचे प्राध्यापक म्हणून स्थिर झाले (१९२६).

ललितलेखन हा यांचा प्रमुख प्रांत असला तरी यांचे सुरवातीचे बरेच ग्रंथ शास्त्रीय या सदरांत मोडणारे आहेत. त्यांत मुंबई युनिव्हर्सिटीकडून बक्षिस मिळालेला 'दादाभाई नौरोजी' हा चरित्र ग्रंथ व शास्त्रीय तत्त्वें सुलभ करून सांगण्याच्या शैलीमुळें लोकप्रिय झालेली Sex Problem in India, मानसोपचार इत्यादि यांचीं पुस्तकें प्रमुख होत. 'प्रतिभासाधन' हा यांचा मराठींतील ग्रंथहि अनेक दृष्टींनीं नामांकित आहे.

परंतु लालित्य व सातत्य या दोन्ही दृष्टींनीं परदेशी लेखकांच्या तोडीचें वाङ्मय निर्माण करणारा यांच्या सारखा लेखक मराठी भाषेंत क्वचित्‌च आढळेल. एकदां यांची कादंबरी वाचावयास सुरवात केली कीं परि-स्थितीशीं तिचा कोणताहि संबंध नाहीं, वर्णन केलेल्या प्रसंगांत नाविन्य नाहीं, पात्रांच्या हालचाली ठोकीव आहेत, अशा टीकाकारांच्या अनेक आक्षेपांना विसरा-वयास लावून यांची भाषा वाचकाला तिच्या शेवटपर्यंत

नेऊन पोंचविते. खरोखरच कथानक, पात्रें, प्रसंग यांमधील कलात्मक रेखीवपणा यांच्याइतका इतरत्र क्वचित् आढळतो.

प्रमुख ललित वाङ्मय:—दौलत, जादूगार, अखेरचें बंड, वादळ (अनुवादित) फडके यांच्या गोष्टी (दोन भाग), गुजगोष्टी इत्यादि. 'झंकार' हें मराठी साप्ताहिक यांच्या 'दिग्दर्शनाखालीं' चालतें. रत्नाकर मासिकाचे हे कांहीं वर्षे संपादक होते.

**फडके, वासुदेव बळवंत**—(जन्म स. १८४५ नवं. ४–मृत्यु स. १८८३ फेब्रु. १७) सुप्रसिद्ध बंडखोर.

हे पुणें येथें जजाच्या कचेरींत कारकून होते. १८७६–७७ च्या दुष्काळामुळें लोकांचे अत्यंत हाल झालें. त्यामुळें यांच्या मनांत बंडाची कल्पना आली. तेव्हां सत्तावन सालच्या बंडांतील पुष्कळच लोक इतस्ततः पांगलेले होते. लोकांतहि याच विषयाच्या गप्पा चालत. यांनीं आसपासचे धाडसी लोक एकत्र करण्यास सुरुवात केली आणि लोकांना दांडपट्टा, घोड्यावर बसणें, तलवार चालविणें, बंदूक मारणें वगैरे शिक्षण देण्यास सुरुवात केली. बऱ्याच सुशिक्षित व अशिक्षित धाडसी तरुणांचा मेळा यांच्या भोंवतीं जमा झाला होता.

योग्य संधि येतांच कांहीं मोठ्या लोकांनींहि यांच्यांत सामील होण्याचें ठरविलें होतें. हत्यारें, अन्नखर्च वगैरेकरितां यांनीं दरोडे घालून रक्कम उभारण्यास सुरवात केली. स. १८७९ मध्यें यांच्या बंडाच्या धामधुमीनें महाराष्ट्राचा बराच भाग विशेषतः पुण्याकडील भाग—दुमदुमून गेला होता.

शेवटीं फितुरी, आजारीपण वगैरेंमुळें यांना पकडण्यांत आलें व यांना जन्मठेपेची शिक्षा देण्यांत आली. तेथून हे पळून जाण्याचा प्रयत्न करीत असतां एडन येथें हे मृत्यु पावले.

'दधीचि ऋषींनीं आपल्या अस्थींहि देवासाठीं दिल्या मग, हे हिंदवासीयांनो, मी आपला प्राण तुमच्यासाठीं कां देऊं नये,' हे यांचे उद्गार यांच्या वृत्तीवर प्रकाश पाडणारे आहेत.

यांची द्वितीय पत्नी गोपिकाबाई यांनाहि वीरोचित दांडपट्टा, तलवार, बंदूक, घोड्यावर बसण्याचें शिक्षण देण्यांत आलें होतें. (त्यांचा जन्म स. १८६२ (विजापूर), विवाह स. १८७४ (शिरढोण) व मृत्यु स. १९४० (पनवेल).) त्यांच्या आयुष्यांत फक्त लग्न झाल्यानंतर पांच वर्षें पतिसहवासाचीं लाभलीं होतीं.

'फडके जन्मशताब्दि मंडळ' स्थापून महाराष्ट्रांत यांच्या जन्मशताब्दीचा उत्सव साजरा करण्यांत आला.

**फरुख्**—(जन्म स. १९१६) पंजाबांतील जगप्रसिद्ध हिंदी मल्ल व स्थापत्यविशारद.

यांना खुशीमुहम्मद यांनीं कुस्तीचें शिक्षण दिलें. यांनीं आव्हानपूर्वक पंजाबांत कुस्त्यांत जय मिळवून हे पुढील शिक्षणाकरितां इंग्लंडला गेले (१९३३). तेथें ग्लासगो विश्वविद्यालयांत सिव्हिल एंजिनियरिंगचें शिक्षण घेत असतां तेथील एल्. एम्. एस्. रोव्हर्स क्लब या संस्थेंत नांव दाखल करून पाश्चात्य कुस्तींतील वैशिष्ट्यपूर्ण डावपेचांचें प्रायोगिक शिक्षण घेण्यास यांनीं सुरवात केली. स्कॉटलंडमधील कुस्तींतील अजिंक्यपद मिळविलेले गिब्सन यांच्याशीं एडिंबरो येथें सामना होऊन यांनीं जय मिळविला. इंग्लंडचे अद्वितीय मल्ल हरमान व मेलरोज यांनाहि यांनीं चीत केलें. नंतर हे तिकडचे बी. एससी. झाले. हे सुप्रसिद्ध थोरल्या गामानंतर जगांतील अद्वितीय मल्ल होण्याचा संभव आहे.

**फलटणकर, नारायणबुवा रावजी गोगटे**—(जन्म स. ? मृत्यु स. ?) सुप्रसिद्ध हरिदास व गवई.

यांच्या तोडीचा हरदास त्या वेळीं महाराष्ट्रांतच काय पण महाराष्ट्राच्या बाहेरहि दुसरा कोणी नव्हता. यांच्या कीर्तनानें त्या वेळीं आबालवृद्धांना वेड लावलें होतें. यांनींच सुभद्राहरणाचें आख्यान लावून किर्लोस्कर कंपनीचें 'सौभद्र' नाटक बंद पाडलें अशी आख्यायिका आहे. यांचे वडील रावजीबुवा उत्तम गायक असल्यानें त्यांचीं मुलें बाबुराव, नारायण, केशव व बचाका हीं सर्वच उत्तम गायक होतीं. इंदूरला जाण्यापूर्वी बाळकृष्णबुवा इचलकरंजीकर यांच्याकडे शिकण्यास येत. या मुलांच्या बरोबर ते तालसुरांत बरोबर चालेनात. तेव्हां हे चिडून म्हणाले 'श्राद्धान्न झोडणाऱ्या भटाचीं पोरें गवई होऊं लागलीं तर गाढवालाहि सुरेल गंधर्व समजून त्याला मान्यस्थांच्या पंक्तीला बसवावें लागेल.' असली विषारी अपमानकारक भाषा ऐकतांच ते उत्तरले, 'येईन तर बाहेर जाऊन, विद्या शिकून गोगटे घराण्याला जिंकणारा गवई होऊनच पुनः इचलकरंजीस येईन, नाहीं तर या भूमीला आजच शेवटचा रामराम ठोकून हें काळें झालेलें तोंड लपविण्याकरितां कायमचा नाहींसा

होईन.' दोघांच्याहि स्वभावांवर प्रकाश पाडणारी ही आख्यायिका आहे.

**फाजल-इ-हुसन**— ( जन्म स. १८७७–मृत्यु स. १९३६ ) पंजाब प्रांतांतील सुप्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ व सुधारक.

प्रथम पंजाब व नंतर केम्ब्रिज युनिव्हर्सिटीचे ग्रॅज्युएट झाल्यानंतर हे बॅरिस्टर झाले व यांनीं पंजाबमध्यें वकिली करण्यास सुरवात केली.

पंजाब युनिव्हर्सिटीच्या सिनेटचे व सिंडिकेटचे सभासद म्हणून हे काम करीत असतांच मॉन्टफर्ड सुधारणा जाहीर झाल्या. या सुधारणांवर सर्वत्र निराशाजनक म्हणून टीका होत असतांच त्या सुधारणांना यांनीं मनापासून पाठिंबा दिला. पंजाब युनिव्हर्सिटीतर्फे पंजाब लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत हे निवडून गेले व पंजाबचे शिक्षणमंत्री, रेव्हेन्यु मेंबर व शेवटीं हिंदुस्थान सरकारचे शिक्षणमंत्री म्हणून नव्या धर्तीची कामगिरी करून आपलें म्हणणें यांनीं खरें करून दाखविलें.

हिंदुस्थान व त्यांतहि पंजाब प्रांत शिक्षण व संस्कृति या दृष्टीनें मागासलेला आहे. अशा स्थितींत हिंदुस्थानचा उद्धार करावयाचा तर प्रथम खेड्यांतील लोकांना शिक्षण देऊन त्यांना जगाच्या पायरीवर आणून बसविलें पाहिजे अशी यांची सुधारणेची मूलभूत कल्पना होती. स्वतःचें हिताहितच ज्यांना समजत नाहीं त्यांना स्वराज्याचा अर्थ पटविण्याचा प्रयत्न करणें मुष्कील आहे, तेव्हां त्यांना प्रथम ' योग्य ' शिक्षण दिलें पाहिजे, अशी मॉन्टफर्ड सुधारणांचें स्वागत करण्याचे मुळाशीं यांची कल्पना होती.

अर्थातच ' योग्य ' शिक्षणाचा मुख्य रोख पुढील पिढीच्या आपसांतील शत्रुत्वापेक्षां मित्रत्वावर असला पाहिजे, फक्त अशीच विद्या विद्यार्थ्यांना स्वातंत्र्याप्रत नेऊं शकेल अशी यांची खात्री होती. म्हणून यांनीं शिक्षणमंत्री होतांच त्या दृष्टीनें काम करण्यास सुरवात केली.

यांना सर्वांत जास्त कष्ट खेड्यांत घ्यावे लागले. खेड्यांतील खाजगी शाळांतूनच जातीयतेचें बीज पेरलें जातें अशी यांची खात्री झाली. या जातीय मगरमिठींतून विद्यार्थ्यांना सोडविण्यासाठीं यांनीं सर्व जातींच्या विद्यार्थ्यांना खुल्या असणाऱ्या सरकारी शाळा सुरू केल्या व यांच्या या कल्पनेला अपेक्षेबाहेर यश लाभलें. इतर कोणत्याहि जातीपेक्षां मुसलमान लोकांनींच या योजनेचा फायदा घेतला.

प्राथमिक शिक्षणाचा खेड्यापाड्यांतून प्रसार करण्यासाठीं यांनीं त्या वेळीं प्रत्येक गांवीं रूढ असणाऱ्या ग्रामपंचायतीच्या ताब्यांतच त्याच्या गांवच्या शाळांची व्यवस्था देऊन टाकली. पुढें यांनीं त्या ग्रामपंचायतींची पुनर्घटना करण्याचें अवघड कामहि पार पाडलें.

अँग्लो व व्हर्नाक्युलर शिक्षणक्रमांतील घोटाळे टाळण्यासाठीं यांनीं ते दोन्ही शिक्षणक्रम एक केले. या कारणानें खेड्यांची आर्थिक स्थिति सुधारून तेथील शाळांचें महत्त्व वाढेल ही यांची कल्पनाहि अनुभवान्तीं यशस्वी झाली. खेड्यांतील व्ह. फा. शाळांचा अभ्यासक्रम यासाठीं बदलण्यांत आला. शेतकाम, बागकाम अशा देशाच्या परिस्थितीशीं अनुरूप अशा विषयांची त्यांत भर घालून यांनीं त्या शिक्षणक्रमाला पूर्ण व्यवहारी बनविलें.

याशिवाय एक उत्कृष्ट पक्षसंघटक अशी यांची प्रसिद्धि असे. पक्षसंघटनेच्या कामांत हे लांबलचक व्याख्यानांच्या भरीस कधींच पडले नाहींत. प्रत्येक सभासदाची व्यक्तिशः गांठ घ्यावयाची व त्याला समजेल अशा भाषेंत आपलें म्हणणें त्यास पटवून द्यावयाचें अशा क्रमानें यांनीं आपल्या पक्षांतील लोक वाढविले. हो ला हो ठोकणाऱ्या नाममात्र सभासदांचें आपल्या हक्काबद्दल जागरूक राहणाऱ्या मतदारांत झालेल्या रूपान्तराचें श्रेय सर्वस्वीं यांना द्यावें लागेल. सर छोटूराम, सर सिकंदर हयातखान, सर फिरोझखान नून, शहाबुद्दीन ही पुढें प्रसिद्धीस आलेली सर्व मंडळी यांच्या तालमींत तयार झालेली आहेत.

मॉटफर्ड सुधारणांनंतर उत्पन्न झालेल्या महत्त्वाच्या काळांत यांनीं केलेली कामगिरी पंजाबच्या दृष्टीनें विशेष महत्त्वाची आहे. लोकांना उपदेश न करतां त्यांना विश्वासांत घेऊन काम करीत राहण्याची यांची कार्यपद्धति परिणामीं यशस्वी ठरली. शाळा या विद्यार्थ्यांसाठीं आहेत, विद्यार्थी शाळेसाठीं नाहींत ही आतां साधी वाटणारी गोष्ट ध्यानांत घेऊन यांनीं आपला शिक्षणक्रम आंखला व विचार नि ववतृत्व या सर्व बाबतींत तत्कालीन पुढाऱ्यांपेक्षां कमी असून हे नव्या पिढीचे द्रष्टे ठरले. खरोखरच पंजाबच्या सध्याच्या सार्वत्रिक उन्नतीचें श्रेय स्वतः विचार करण्यास शिकविणाऱ्या या महात्म्याला द्यावें लागेल.

**फाळके, धुंडिराज गोविंद ऊर्फ दादासाहेब**—( जन्म स. १८७०–मृत्यु स. १९४४ ) हिंदी चित्रपटसृष्टीचे जनक.

त्र्यंबक हें तीर्थक्षेत्र यांचें जन्मस्थान. मुंबई येथील मराठा हायस्कूलमध्यें आपलें प्राथमिक शिक्षण संपवून यांनीं जे. जे. स्कूल ऑफ आर्टस्, मुंबई व कलाभवन बडोदा येथील अभ्यासक्रम पुरा केला.

यानंतर फोटो-लिथोग्राफी, फोटो-एन्ग्रेव्हिंग व ट्रायक्रोमेटिक प्रोसेस इत्यादि विषयांचें अध्ययन करण्यासाठीं हे जर्मनीला गेले व त्या धंद्याची सामग्री घेऊन हे हिंदुस्थानला परतले. आल्यानंतर ताबडतोब यांनीं सर डॉ. रा. गों. भांडारकर यांचे आर्थिक सहकार्यानें ' फाळकेज आर्ट प्रिंटिंग वर्क्स'ची स्थापना केली. या संस्थेचेंच रूपांतर पुढें ' लक्ष्मी आर्ट प्रिंटिंग वर्क्स'मध्यें करण्यांत आलें. १९१२ त यांनीं या संस्थेशीं असणारा आपला संबंध तोडला.

मध्यंतरींच मुंबईस आलेल्या ख्रिस्त चरित्रावरील चित्रपट पाहून यांना आपल्याकडेहि पौराणिक विषयावर चित्रपट तयार करण्याची कल्पना सुचली. त्याप्रमाणें हे पुन्हां जर्मनीला गेले व तेथें चित्रपट तयार करण्यास आवश्यक असणाऱ्या ज्ञानाची व यंत्रसामग्रीची प्राप्ति करून घेऊन हे हिंदुस्थानला परत आले. आल्यानंतर यांनीं सॉलिसिटर चिटणीस यांच्या अर्थसाहाय्यानें फाळकेज फिल्मस्‌ची स्थापना केली व त्या संस्थेच्या ' राजा हरिश्चंद्र ' या पहिल्या चित्राचें प्रदर्शन मुंबई व पुणें येथें उत्साहानें पार पडलें ( १९१३ ).

या यशानें उत्तेजित होऊन यांनीं ' मोहिनी-भस्मासुर' व ' सावित्री ' हे दोन चित्रपट तयार केले व आपले तीन चित्रपट बरोबर घेऊन हे युरोपला गेले ( १९१५ ). महायुद्धामुळें यांना आपल्या चित्रांचें प्रदर्शन तेथें करणें जरी अशक्य झालें तरी अनेक तज्ज्ञांनीं त्या तीनहि चित्रांची मनापासून स्तुति केली.

याच सुमारास श्री. वा. श्री. आपटे, मायाशंकर भट व लक्ष्मणराव फाटक यांचे भांडवलावर यांनीं आपल्या फाळकेज फिल्मस्‌चें रूपांतर हिंदुस्थान फिल्म कंपनींत केलें. लंकादहन, कालियामर्दन व श्रीकृष्णजन्म हे तीन अति प्रसिद्धी पावलेले चित्रपट तयार करून हे त्या कंपनींतून निवृत्त झाले.

१९३७ सालीं कोल्हापूरचे छत्रपति राजाराममहाराज यांचे सांगण्यावरुन यांनीं तयार केलेला गंगावतरण हा यांचा पहिला व शेवटचा बोलपट होय. त्यामधील ट्रिक फोटोग्राफीबद्दल त्या वेळीं सर्वत्र यांचें कौतुक झालें.

हिंदी चित्रपटसृष्टीच्या जनकत्वाचा मान यांचेकडे जातो. खरोखरच कृतकृत्यता वाटावी इतकी प्रगति हिंदी चित्रपटांनीं यांच्यासमोर व यांच्या पश्चात् केली. अमेरिकेच्या खालोखाल कच्च्या फिल्मचा विनियोग सध्यां हिंदुस्थानांत केला जातो ही एकच गोष्ट चित्रपटाच्या दूरगामी व्यापाची कल्पना आणून देईल.

आज हिंदुस्थानांत चित्रपट हा एक मोठा धंदा समजण्यांत येत असून मोठेपणाच्या दृष्टीनें त्याचा आठवा नंबर लागतो. जवळ जवळ ९,३०,००,००० फूट फिल्मची या धंद्यासाठीं आयात करण्यांत येत असून दर वर्षी सरासरी दीडशें चित्रपट तयार करण्यांत येतात. हे चित्रपट सर्व प्रांतांत पसरलेल्या सताराशें सिनेमागृहांतून दाखविले जातात. साडे आठ कोटी रु. पेक्षां जास्त भांडवल या धंद्यांत गुंतविण्यांत आलें आहे. मुंबई हें या सर्व धंद्याचें मुख्य केंद्र असून दोन तृतियांशापेक्षां जास्त चित्रपट मुंबईला तयार केले जातात.

यांच्या या महत्कार्याबद्दल १९३८ सालीं मुंबई येथें झालेल्या हिंदी चित्रपटाच्या रौप्यसमारंभाचे वेळीं यांचा जाहीर सत्कार करण्यांत आला. तसेंच हिंदुस्थानांत सर्वांत अधिक चित्रपट स्टुडिओ असणाऱ्या दादरमधील मेनरोडला ' फाळके रोड ' नांव देण्याचा ठराव मुंबई कॉर्पोरेशननें केला.

**फॉर्ब्स, अलेक्झांडर किलोक**—( जन्म स. १८२१–मृत्यु स. १८६४ ) गुजराथचे इतिहासलेखक.

राजपुतान्याचा टॉड, मराठ्यांचा डफ, त्याप्रमाणें गुजराथचा इतिहास प्रथम व्यवस्थित लिहिणारे हे होत. पाटण वगैरे ठिकाणीं गुजराथच्या इतिहासासंबंधीं प्राचीन संस्कृत ग्रंथ मिळाले तेव्हां यांनीं शोधपूर्वक ' रासमाला ' नांवानें गुजराथचा मोठा विस्तृत इतिहास लिहिला. त्याकरितां हे आबूला गेले व तेथील शिलालेख व देलवाड्याच्या दोन्ही जैन मन्दिरांच्या कारागिरीच्या उत्कृष्टतेबद्दल यांनीं विस्तृत लिहिलें आहे.

**फुले, महात्मा-जोतिबा गोविंद**—( जन्म स. १८२७–मृत्यु स. १८९० ) महाराष्ट्रांतील आद्य समाजसुधारक व स्वयंस्फूर्तीनें समतावाद प्रतिपादणारा महात्मा.

यांचें मूळ गांव सातारा जिल्ह्यांतील कटगुण. तेथून यांचे पणजे पुरंदर तालुक्यांतील खानवडीस येऊन राहिले. तेथून यांचे अजोबा शेटीबा उदरनिर्वाहास पुण्यास आले. तेथें त्यांनीं आपलीं तीनहि मुलें शेळ्या राखण्यास ठेवलीं. पुढें त्या मुलांनीं माळी कामांत कौशल्य दाखविल्यानें मूळचें गोऱ्हे नांव मागें पडून यांना फुले हें उपनांव प्राप्त झालें. हे माळी जातींतील फुलमाळी होत. यांचा पिता गोविंदराव आणि माता चिमाबाई. हे एक वर्षाचे असतांना आई वारल्यानें यांचें पालनपोषण बापानें केलें.

हे वयाच्या सातव्या वर्षी शाळेंत जाऊं लागले. मध्यें कांहीं दिवस बागकाम करीत. पुढें इंग्रजी शाळेंत नांव घालून पांचसहा वर्षे शिक्षण घेतलें. बंडखोर वा. ब. फडके यांचे मांग जातीचे गुरु लहूजीबुवा यांचे-पाशीं दांडपट्टा व नेमबाजी यांचें शिक्षण यांनीं घेतलें. पण ख्रिस्ती धर्मोपदेशकांच्या कार्यपद्धतीचा यांच्यावर अत्यंत परिणाम झाला. त्यांची कार्यनिष्ठा व सेवावृत्ति यांनीं हे भारले गेले. बहुजन समाजाला साक्षर करून त्यांतील गुलामी वृत्तीचा नायनाट करून समतेचा प्रचार करण्याचें काम यांनीं मोठ्या तडफेनें करण्यास सुरवात केली.

प्रथम यांनीं अनेक ब्राह्मण मित्रांच्या साहाय्यानें बुधवारांत चिपळुणकरांच्या वाड्यांत मुलींची शाळा सुरू केली ( १८५१ ). त्या कामीं यांना समाज व समाजाच्या विरुद्ध जाण्यास भिणारा अधिकारी वर्ग यांचा तीव्र विरोध सहन करावा लागला. यांच्या पत्नी सावित्रीबाई यांनीं लोकांनीं केलेली विटंबना व माहेराला कायमची सोडचिठ्ठी देऊनहि यांना या कामीं अत्यंत साहाय्य केलें. लवकरच या शाळेच्या रास्ता व वेताळ पेठेंत शाखा निघून विद्यार्थिनींची संख्या दोनशें सदतीस-पर्यंत गेली ( १८५३ ). संस्थेच्या दुसऱ्या वार्षिक समारंभास तीन हजार लोक जमले होते. यांच्या या अभिनव कार्याबद्दल यांचा जाहीर सत्कार होऊन सरकार-तर्फे यांना दोनशें रुपयांची शालजोडी अर्पण करण्यांत आली ( १८५२ ).

याच सुमाराम अस्पृश्यांकरितां यांनीं वेताळ पेठेंत दोन शाळा स्वखर्चानें चालविल्या ( १८५२ ). 'महार-मांग इत्यादि लोकांस विद्या शिकविण्याकरितां मंडळी' स्थापन केली ( १८५३ सप्टें. ). या शाळेची जागेची अडचण म्हणून रा. ब. सदाशिव बल्लाळ गोवंडे यांनीं आपली स्वतःची जागा शाळेकरितां वापरण्यास दिली. हिच्या स. १८५८ मध्यें दोनशें अठ्ठावन मुलें व तीन शाखा झाल्या. मुलांना पाणी पिण्याकरितां यांनीं तेथें स्वतंत्र हौद बांधला व आपल्या घराशेजारील हौद अस्पृश्यांना खुला केला.

ब्राह्मणादि उच्चवर्णीयांतील विधवा स्त्रियांचे हाल पाहून यांनीं विधवापुनर्विवाहाचा प्रचार केला व तसा एक विवाह घडवून आणला ( १८६४ ). तसेंच वांकडें पाऊल पडून भ्रूणहत्येचा प्रसंग येऊं नये म्हणून यांनीं आपल्या घराशेजारीं 'बालहत्याप्रतिबंधकगृह' उघडलें ( १८६४ ). तेथें गुप्तपणें प्रसूत होऊन जाण्याची व्यवस्था असे. तसेंच अशा स्त्रियांच्या प्रसूतीची व्यवस्था आपल्या घरीं असल्याचा यांचा जाहीरनामा होता. पंढरपूरचें बालहत्याप्रतिबंधकगृहसुद्धां यांच्या प्रचाराचें फळच होय ( १८६३ ).

अशा प्रकारें लोकविरोधाला तोंड देत समाजसेवेचें यांचें काम सतत चालू होतें. या कार्याला तात्त्विक पायावर उभें करण्याकरितां यांनीं सत्यशोधक समाजाची स्थापना केली ( १८७३ सप्टें. २४ ). ब्राह्मणादि लोकांच्या दास्यापासून व त्यांच्या बनावट व कार्यसाधक ग्रंथांपासून समाजाची मुक्तता करण्याकरितां हा समाज स्थापन करण्यांत आला. 'सर्वसाक्ष जगत्पती। त्याला नकोच मध्यस्ती।' हें या समाजाचें ब्रीदवाक्य होतें. तेथें दर रविवारीं प्रार्थना व महिन्यांतून दोन व्याख्यानें होत. पुरोहिताशिवाय लग्नें लावणें व मराठींत मंगलाष्टकें म्हणण्याचा उपदेश होई. लवकरच कांहीं शाखा निघून तीनशेंवर सभासद झाले. स. १८८५ सालीं या समाजाच्या झेंड्याची मोठ्या थाटानें मिरवणूक निघाली. तींमध्यें न्या. रानडे प्रभृति लोक होते.

यांच्याभोंवतीं पुढील नवे कार्यकर्ते निर्माण झाले. १ कृष्णराव पांडुरंग भालेकर, २ ग्यानोबा कृष्णाजी ससाणे, ३ नारायण मेघाजी लोखंडे, ४ गणपत सखाराम पाटील. यांपैकीं भालेकर यांनीं स्वतःच्या हिंमतीवर 'दीनबंधु' साप्ताहिक काढलें ( स. १८७१ ). हेहि त्यांत लिहीत.

कोल्हापूर प्रकरणांत टिळक-आगरकरांवर अब्रू-नुकसानीची फिर्याद झाली, त्या वेळीं यांनीं त्यांना उचलून धरलें. रामशेट उरवणे यांच्याकडून दहा हजा-रांचा जामीन देवविला आणि ते सुटून आल्यावर त्यांचा पुणें-मुंबई येथें जाहीर सत्कार करवला.

सार्वत्रिक सक्तीचें शिक्षण झाल्याशिवाय बहुजनसमाजाची स्थिति सुधारणार नाहीं असा यांनीं प्रचार केला व हंटरकमेटीपुढें या अर्थाची साक्ष दिली. रायगडावरील शिवाजी महाराजांच्या मोडकळीस आलेल्या समाधीचा जीर्णोद्धार करण्याचा प्रश्न यांनीं उपस्थित केला व त्याकरितां मेहनत घेतली. ड्यूक ऑफ यॉर्क पुण्यास आले तेव्हां, हिंदुस्थानांतील शेतकऱ्यांची यथार्थ स्थिति दर्शविण्याकरितां घोंगडी व पंचा या गरीब शेतकऱ्यांच्या पोषाखांत तेथें हे उपस्थित राहिले.

समाजशास्त्रज्ञांनीं अभ्यासपूर्वक जे सिद्धान्त शोधून काढले ते यांनीं स्वयंस्फूर्तीनें प्रतिपादिले. इतर सुधारकांप्रमाणें तात्त्विक प्रतिपादन व मर्यादित सुधारणांचा पुरस्कार करूनच हे थांबले नाहींत. मूळ समाजरचना बदलण्याकरितां जुन्या समाजाचा सर्वस्वीं आधार असणाऱ्या ब्राह्मण व वेदपुराणादि धर्मग्रंथांवर यांनीं अत्यंत प्रखर हल्ला केला. यांनीं खळबळ उडवणारी व मनाची सहज पकड घेणारी भाषा व प्रतिपादनशैली स्वीकारून समाजाला आमूलाग्र खवळून सोडण्याचें कार्य केलें आणि प्रत्येक सुधारणा व्यवहारांत आणण्यावर कटाक्ष ठेवला. यांनीं प्रचाराचें एक नवें तंत्र उपयोगांत आणलें. अशा माणसांची परंपरा चालविण्याची शक्ति क्वचितच आढळते. तथापि काल मात्र यांच्या प्रतिपादनाला सर्वस्वी पाठिंबा देतांना आढळतो.

यांचें वाङ्मय—१ ब्राह्मणांचें कसब ( १८६९ पद्यात्मक ), २ शिवाजीचा पवाडा ( १८६९, ८ भाग ), ३ गुलामगिरी ( १८७३, दोन आवृत्त्या ), ४ शेतकऱ्याचा आसूड ( १८७७, भाग १-४ ), ५ जातिभेदविवेकसार ( १८८१, एक हिंदु या टोपण नांवानें ), ६ सत्कार ( १८८५, अंक १-२; १ शूद्रांचीं गाऱ्हाणीं, स्त्रीजातीची उपेक्षा ), ७ इशारा ( १८८५, जातिभेदविरोध ), ८ सार्वजनिक सत्यधर्मप्रकाश ( १८९१, अखेरचे धर्मविषयक विचार ), ९ एक नाटक (अप्रसिद्ध).

**फ्लीट, डॉ. जॉन फेथफुल**—(जन्म स.१८४७–मृत्यु स. १९१७ ) सुप्रसिद्ध शिलालेखज्ञ, ताम्रपटवाचक व संशोधक.

लंडनच्या मर्चन्ट्स टेलर स्कूल व युनिव्हर्सिटी कॉलेजमध्यें आपलें शिक्षण संपवून हे इंडियन सिव्हिल सर्व्हिसमध्यें शिरले. हिंदुस्थानांत येणाऱ्या माणसास त्या वेळीं आवश्यक समजल्या जाणाऱ्या संस्कृत भाषेचें जुजबी शिक्षण घेऊन हे हिंदुस्थानांत आले ( १८६७ ).

मुंबई प्रांतांत आल्यावर यांनीं असि. कलेक्टर, एज्युकेशनल इन्स्पेक्टर, हिंदुस्थानसरकारच्या एपिग्राफिकल डिपार्टमेंटचे पहिले प्रमुख, कस्टम्स कमिशनर अशीं अनेक कामें केलीं. कार्यनिवृत्तीनंतर ( १८९७ ) हे एलिंग येथील आपल्या निवासस्थानांत कार्यमग्न झाले. रॉयल एशियॅटिक सोसायटीचे हे कित्येक वर्षे सेक्रेटरी असून यांच्या संशोधनकार्याबद्दल त्या संस्थेनें यांना सुवर्णपदक दिलें ( १९१२ ).

Pali, Sanskrit and Old Kanarese Inscriptions हा यांच्या शिलालेखसंग्रहांतील पहिला महत्त्वाचा ग्रंथ होय. दक्षिण हिंदुस्थानाचा सहाव्या शतकापासून ते सोळाव्या शतकापर्यंतचा सुसंगत इतिहास सादर करणाऱ्या शिलालेखांचा संग्रह आजपर्यंत अनेकांनीं केला होता. परंतु अद्ययावत् माहितीचा उपयोग करण्याच्या यांच्या कार्यपद्धतीमुळे यांचें हें संपादन विशेष यशस्वी ठरलें. सरकारी मदतीच्या अपूर्णतेमुळें या ग्रंथाच्या फक्त नऊच प्रति छापण्यांत आल्या.

Inscriptions of the Early Gupta Kings and their Successors ह्या आपल्या ग्रंथांत यांनीं ८१ गुप्तकालीन शिलालेख त्यांच्या इंग्रजी अनुवादासह प्रसिद्ध केले. राजपुतान्यापैकीं गंगधार ( झालवाड राज्य ) येथें मिळालेला ( स. ४३२ ) व विजयगड येथें मिळालेला यौधेयांचा व विष्णुवर्धनाचे ( ३७० ) या ग्रंथांत देण्यांत आलेले शिलालेख विशेष महत्त्वाचे आहेत. परंतु यापेक्षांहि गुप्तराजांची कालनिश्चिति हा या ग्रंथाचा प्रमुख विशेष होय. हिंदी व परदेशी कालगणनापद्धतींतील फरकामुळें जुन्या इतिहासांतील कालक्रम ठरविणें मुष्कील होई. त्यांतहि गुप्त घराण्यांचे इतिहासांत वीसापेक्षां अधिक कालपद्धतीच्या झालेल्या गल्लतीमुळें ते काम विशेष कठीण झालें. अशा स्थितींत, यांनीं प्रथम मन्दोसर शिलालेखावरून व नंतर केरो लक्ष्मण छत्रे यांनीं प्रसिद्ध केलेल्या दोन कालगणनापद्धतींची सांगड घालणाऱ्या टेबल्सवरून गुप्त राजांची सुरुवात ३१९-२० ठरविली. पुढें का. बा. पाठक यांनीं जैन ग्रंथांचे साहाय्यानें काढलेल्या निष्कर्षानें यांच्या या सिद्धान्ताला पुष्टिच दिली.

The Dynasties of Kanarese Districts हा यांचा आणखी एक महत्त्वाचा ग्रंथ होय. कॅम्बेलनें प्रसिद्ध केलेल्या मुंबई गॅझेटियरच्या पहिल्या खंडांतील दुसरा भाग म्हणून हा ग्रंथ प्रसिद्ध करण्यांत आला.

हिंदुस्थानच्या पश्चिम भागांतील जातीपोटजातींची इतकी संगतवार माहिती पुरविणारा ग्रंथ अजून झाला नाहीं.

परंतु यापेक्षांहि इंडियन ॲन्टिक्वेरी, आर्किऑलॉजिकल रिपोर्ट्स ऑफ वेस्टर्न इंडिया व एपिग्राफिया इंडिका यांतून यांनीं केलेलें स्फुट लिखाण विशेष महत्त्वाचें आहे. १९६ पेक्षां जास्त शिलालेखांचे अनुवाद यांनीं प्रसिद्ध केले. इंडियन ॲन्टिक्वेरीमध्यें यांनी प्रसिद्ध केलेली शिलालेखाविषयींची लेखमाला विशेष महत्त्वाची आहे. शिलालेखावरील रंग पुसण्यापासून तें थेट त्यांचा अनुवाद करीपर्यंतची सर्व माहिती त्यांत देण्यांत आली आहे. इंडियन ॲन्टिक्वेरीचे हे सहा वर्षे संपादक होते (१८८५-९१).

दिल्ली व अलाहाबाद येथील अशोकाच्या स्तंभलेखांच्या मूळ प्रति व त्यांच्या अनुवादाचें प्रकाशन हें यांचें आणखी एक महत्त्वाचें कार्य होय. हिंदुस्थानांतील गांवांची नांवें व त्यांचीं पूर्वठिकाणें ही संशोधनशाखा आयुष्याचे शेवटीं यांचा विचारविषय झाली होती.

देशी व परदेशी भाषेवरील अजोड प्रभुत्व व केवळ अभ्यासकाची दृष्टि ठेवून काम करण्याची यांची पद्धत यांमुळें हिंदी शिलालेखांच्या ज्ञात्यांतील प्रमुख स्थानास हे पोचले. आयुष्याच्या अगदीं शेवटच्या कालखंडांतहि आपल्या ग्रंथांतील चुका दुरुस्त करण्यासाठीं त्यांच्या नव्या आवृत्त्या काढण्याची तळमळ यांना लागली होती.

# ब

**बखले, भास्करबुवा रघुनाथ**—(जन्म स. १८७०–मृत्यु स. १९२२ एप्रिल ८) महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध शास्त्रोक्त गायक.

हे प्रथम किर्लोस्कर नाटक मंडळींत अण्णासाहेबांच्या वेळीं स्त्रियांचीं कामें करीत. नंतर यांनीं बडोद्याचे फैज मुहंमद, कोल्हापूरचे अलादिया खां व नथ्थन खां इत्यादींपाशीं गायनाचा उत्तम अभ्यास केला. यांचें गाणें जयपूर घराण्यापैकीं मुख्यतः असलें तरी वरील घराण्यांचें मधुरमिश्रण त्यांत आढळे. फैज मुहम्मदखांचें स्वरकाम, नथ्थनखांची लयकारी व अलादियाखांची मुष्कील रागदारी मोठ्या परिश्रमानें यांनीं संपादन केली होती आणि मेहनतीनें ती विद्या राखल्यामुळें समृद्ध गायकांत यांची गणना होई. तसेंच हे शिकविण्यांतहि निरलस असत.

हे प्रथम धारवाडच्या ट्रेनिंग कॉलेजांत, नंतर मुंबईस कांहीं वर्षे काढून पुण्यास आले. यांनीं पुण्याची भारत गायन समाज ही संस्था काढली. यांच्या शिष्यांत मास्टर कृष्णराव, बापुराव केतकर, गोविंदराव टेंबे, बालगंधर्व वगैरे मंडळी प्रमुख होत.

यांच्या आधींच्या काळांत महाराष्ट्रीय संगीतज्ञांना उत्तर हिंदुस्थानांत जवळजवळ स्थान नसेच. महाराष्ट्रांतील 'पंडित' लोक मुसलमानांचें गाणें गाऊंच शकणार नाहींत असा त्या वेळीं सर्वत्र रूढ समज असे. परंतु स्वतः हे व पलुस्कर, वझे वगैरे संगीतज्ञांनीं आपल्या तपश्चर्येनें तो समज खोटा ठरविला. पुढें तर नारायणराव व्यास, विनायकबुवा पटवर्धन वगैरे लोकांनीं उत्तर हिंदुस्थानांतच राजासारखा सन्मान मिळविला.

**बजाज, जमनालाल**—(जन्म स. १८८९–मृत्यु स. १९४२) राष्ट्रसभेचे सुप्रसिद्ध कार्यकर्ते व खजिनदार.

जयपूर संस्थानांत यांचा जन्म झाला. १८९४ त वर्ध्याच्या शेठ बच्छराजांना दत्तक जाऊन हे वर्ध्याचे सुप्रसिद्ध व्यापारी बनले. मुख्यतः बँकर व उद्योगतज्ज्ञ म्हणून यांची प्रसिद्धि असे.

सुरवातीसुरवातीला मारवाडी शिक्षा मंडळ, ऑल इंडिया मारवाडी आगरवाल सभा वगैरे संस्थांची स्थापना करून आपल्या ज्ञातीची यांनीं सेवा केली असली तरी खऱ्या अर्थाच्या यांच्या राष्ट्रीय जीवनास आरंभ १९१९ सालीं झाला. त्या वेळच्या असहकाराच्या चळवळींत यांनीं आपली रायबहाद्दुर ही सरकारी पदवी व ऑनररी मॅजिस्ट्रेटची जागा सोडली व हे गांधींचे निःसीम भक्त बनले. यानंतर कॉंग्रेसच्या चळ-

वळींत यांनीं अनेकवार तुरुंगवास सोसला. नागपूरच्या झेंडा सत्याग्रहाचे तर हे प्रमुख होते.

१९२० पासून अखेरपर्यंत हे काँग्रेसच्या वर्किंग कमेटीचे सभासद असत. १९२१ च्या नागपूर काँग्रेसचे हे स्वागताध्यक्ष व १९३४ च्या काँग्रेसचे 'बदली' अध्यक्ष होते. याशिवाय मराठी सी. पी. प्रांतिक काँग्रेस कमेटीचेहि हे अध्यक्ष होते.

परंतु यापेक्षाहि गांधीजींचे एक विश्वासु सहकारी म्हणूनच यांची प्रसिद्धि असे. गांधीजींच्या नेतृत्वाखाली निघालेल्या गांधी सेवा संघ, ऑल इंडिया व्हिलेज इंडस्ट्रीज असोसिएशन इत्यादि संस्थांचे हे व्यवस्थापक व अर्थसाहाय्यक असत. 'खजिनदाराचें काम नुसतें आलेले पैसे गोळा करण्याचें नाहीं, संस्थेला पैशाची तूट पडतांच जो स्वतःचे पैसे काढून देईल तो खरा खजिनदार' या महात्माजींच्या 'खजिनदारा'च्या व्याख्येंत पूर्णपणें बसणारे हे असल्यानें ऑल इंडिया काँग्रेस कमेटी व ए. आय्. एस्. ए.चे हे दीर्घकालीन खजिनदार होते.

काँग्रेस व्यतिरिक्त यांनीं इतर संस्थांना दिलेल्या देणग्याहि महत्त्वाच्या आहेत. वर्ध्याचें कॉमर्स कॉलेज हें त्यांतून स्थापन झालें असून तसेंच एक एंजिनियरिंग कॉलेज काढण्याची यांची कल्पना होती.

यांच्या मृत्यूनंतर यांच्या पत्नी जानकीदेवी यांनीं यांच्या नांवाचा अडीच लक्ष रु.चा ट्रस्ट उभारून त्याचा विनियोग यांच्या अंतिम इच्छेप्रमाणें आदर्श गोशाला बांधण्याकडे केला. तिचा उद्घाटन समारंभ महात्माजींच्या हस्तें करण्यांत आला.

**बडोदेकर, सौ. हिराबाई**—( जन्म स. १९०५ ) महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध गायिका.

यांचे गायनाचे गुरु वहिदखां. ते अबदुल करीमखां या सुप्रसिद्ध गायकांचे भाचे. तथापि यांचें गायनाचें सर्व पूर्वशिक्षण यांचे थोरले बंधु प्रो. सुरेशबाबू यांचेजवळ झालें. यांचा महाराष्ट्रांत प्रथम परिचय हिज मास्टर्स व्हॉइसनें करून दिला ( १९२२ ). पुण्यामुंबईपेक्षां यांच्या जलशांना वऱ्हाड, नागपूराकडे अत्यंत लोकप्रियता प्राप्त झाली ( १९२३-२८ ). नंतर नूतन संगीत विद्यालय, नाट्यशाखा सुरू करून केवळ संशयकल्लोळ, सौभद्र व साध्वी मिराबाई या तीन नाटकांवर यांनीं मुंबईस सहा महिने मुक्काम केला. या त्यांत नायिकेचीं कामें करीत. यांशिवाय यांच्या भगिनी कमलाबाई, सरस्वतीबाई, बंधु सुरेशबाबू आणि सवाई गंधर्व असा संच असे. पुढें ही शाखा बंद पडली ( १९३३ ). सुवर्णमंदिर बोलपटांत यांनीं काम केलें होतें.

मोहक स्वरविलास करून श्रोत्यांना मुग्ध करण्याची यांची कला अजब आहे. यांच्या स्वरविलासाप्रमाणें शालीनतेचीहि छाप प्रेक्षकांवर विशेष पडते, असें या बंगाल्यांत गेल्या असतां अमृतबझारपत्रिकेनें नमूद केलें.

ऐकलेल्या तानेची अगर हरकतीची सरगम या चटदिशीं करतात. गुणी लोकांच्या मैफली या आपल्या घरीं करवितात व त्यांतून आपल्यास पाहिजे व झेपेल तो भाग नेमका उचलतात. दुसऱ्याची केवळ नक्कल न करितां स्वतःच्या गोड जागांची भर घालून कोणतेंहि पद या स्वतंत्र रीतीनें गातात. या कारणानें शास्त्रीय व ललित या दोन्ही संगीतांत या प्रवीण झाल्या आहेत. भजन गातांना तर या विशेष तल्लीन होतात व श्रोत्यांना गहिंवर आणतात. 'या गाण्यानें आजारी माणससुद्धां बरा होईल' हें यांच्या गाण्याचें वर्णन यांच्या गाननैपुण्याची साक्ष देण्यास पुरेसें आहे.

**बर्जेस, जेम्स**—( जन्म स. १८३२–मृत्यु स. १९१६ आक्टो. ३ ) सुप्रसिद्ध शिलालेखज्ञ.

ग्लासगो व एडिंबरो येथें आपलें शिक्षण संपवून हे हिंदुस्थानला आले व यांनीं पश्चिम हिंदुस्थानचें आर्किऑलॉजिकल सर्व्हेअर म्हणून काम करण्यास सुरवात केली. कार्यनिवृत्तीपूर्वी हे त्या खात्याचे डायरेक्टर जनरल होते ( १८८९ ).

१८९४ सालीं जिनेव्हा येथें भरलेल्या ओरिएंटल कॉंग्रेसला हे हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून हजर होते. १८८९-९४ या काळांत 'एपिग्राफिका इंडिका', 'आर्किऑलॉजिकल सर्व्हे रिपोर्ट्स', 'फिलॉसफिकल मॅगझीन' इत्यादींत यांचे शास्त्रीय लेख प्रसिद्ध होत असत.

हिंदुस्थानच्या इतिहासावरील पंडितांचें संशोधन प्रसिद्ध करण्यासाठीं यांनींच प्रथम इंडियन ॲन्टिक्वेरी हें मासिक सुरू केलें ( १८७२ ). यानंतर बरींच वर्षे हे त्या पत्राचे संपादक होते ( १८७२-८४ ).

यांचे ग्रंथ—( 1 ) The Rock Temples of Elephanta (1871), ( 2 ) Temples of Somnath,

Junaghar and Girnar, (3) The Rock Temples of Ajanta, (4) The Rock Temples of India (जेम्स फर्ग्युसन यांचे सहकार्यानें), (5) Buddhist Art in India (1901),

**बसू, भूपेन्द्रनाथ**—(जन्म स. १८६९-मृत्यु स. १९२४) राष्ट्रसभेचे अध्यक्ष, वक्ते व सार्वजनिक कार्यकर्ते.

हे सॉलिसिटरचा धंदा करणारे संपन्न गृहस्थ राष्ट्रसभेच्या कार्यांत आरंभापासून भाग घेत. हे कलकत्ता राष्ट्रसभेच्या स्वयंसेवकपथकाचे प्रमुख (१८८६), स्वागताध्यक्ष (१९११) व मद्रासच्या अधिवेशनाचे अध्यक्ष होते (१९१४). हे अनेक वर्षे भारतमंत्र्याच्या सल्लागार मंडळाचे सभासद व कलकत्ता विश्वविद्यालयाचे उपकुलगुरु होते. म. गांधींच्या उदयानंतर हे राष्ट्रसभा सोडून लिबरल फेडरेशनमध्ये सामील झाले. यांची वक्तृत्वाबद्दल विशेष ख्याति होती. डोळ्यांत हुकमी अश्रु आणून हे एकदां बोलूं लागले कीं श्रोत्यांची मंत्रमुग्ध नागाप्रमाणें स्थिति होई. 'संपूर्ण स्वातंत्र्य व इंग्लंडपासून अलग होणें ही गोष्ट अव्वल देशभक्तीच्या तरुणांना आकर्षित करते. हें धोरण योग्य वाटलें तर कायद्याची भीति न बाळगतां निधड्या छातीनें मी त्याचा स्वीकार करीन. पण राष्ट्रसभेचें ध्येय संयुक्त भागीदारीचें आहे' असे उद्गार यांनीं मद्रासला काढले.

**बहादुरशहा**—(कारकीर्द स. १८३७-१८५८-मृत्यु स. १८६२ नवं. ४ रंगून) दिल्लीचे शेवटचे मोगल बादशाह, सत्तावन सालच्या बंडांतील एक प्रमुख व प्रसिद्ध उर्दू कवि.

हे मोगलवंशांतील दुसरे बहादुरशहा होत. यांचें नांव मुहम्मद बहादुरशहा. हे शहाअलमचे पुत्र व अकबरचे भाऊ. अकबर मेल्यानंतर हे गादीवर आले. मराठ्यांच्या वेळेपासूनच बादशहाकडे दिल्लीच्या भोंवतालचा अगदीं थोडा मुलूख व खर्चासाठीं दरमहा नव्वद हजार रुपयांची नेमणूक अशी व्यवस्था चालू होती. तीच लॉर्ड लेक यांनीं मराठ्यांच्या पराभवानंतर दिल्ली व बादशाही ताब्यांत घेऊन पुढें चालू ठेवली. ज़फर या नांवानें हे उर्दूत कविता करीत. यांचे कवितागुरु ज़ौक.

१८५७ च्या बंडाची उठावणी झाली तेव्हां यांना त्यांत सामील करून घेण्यांत आलें. हे देशभक्त असले आणि आपल्या स्थानाच्या मोठेपणाची यांना कल्पना असली तरी आपणहून बंडांत सामील होण्याचें वय व धमक यांच्यांत नव्हती. बंडवाल्यांनीं यांच्या नांवाचा व यांच्याकडून घेतलेल्या फर्मानांचा दुरुपयोग केला. शेवटीं ठार मारूं नये या अटीवर यांना इंग्रजांच्या स्वाधीन व्हावें लागलें. कर्नल डॉवेझ या लष्करी अधिकाऱ्याच्या अध्यक्षतेखालीं पांच माणसांची चौकशी कमेटी नेमण्यांत आली. ब्रिटिश बादशाहाविरुद्ध मोगल बादशहानें बंड केलें असा यांचेवर आरोप होता. हे खुद्द साक्षीदारांची तपासणी करीत व गुलाम आबास हे यांना मदत करीत. यांचेवर पुढील चार आरोप होते—(१) हे ब्रिटिश सरकारचे पेन्शनर असून यांनीं १० मे १८५७-१ ऑक्टो. १८५७ च्या दरम्यान तोफखान्यावरील अधिकाऱ्यांस व शिपायांस ब्रिटिश सरकारविरुद्ध बंड करण्यास चिथावलें व मदत केली. (२) तसेंच आपल्या मिर्झा मोगल या पुत्रास बंडास प्रवृत्त केलें, (३) मे ११ रोजीं बादशाह म्हणून स्वतःच्या नांवाची द्वाही फिरवली, (४) १८५७ मे १६ रोजीं दिल्ली येथील राजवाड्यांत ४९ युरोपियन बायकामुलें वगैरेंची कत्तल केली. या आरोपांची चौकशी होऊन हे गुन्हेगार ठरले.

बंडवाल्या शिपायांचें सामर्थ्य मोठें असल्यानें आपणास हुकमावर सह्या करणें भाग पडत होतें. कत्तल झालेल्यांना आपण खासगी रीत्या अन्न पाठवीत होतों वगैरे यांनीं आपल्या जबानींत सांगितलें. यांना गुरवातीला फांशीची शिक्षा फरमावण्यांत आली. पण पुढें आगाऊ दिलेल्या आश्वासनांप्रमाणें यांना फांशी न देतां रंगून येथें नजरकैदेंत ठेवण्यांत आलें. तेथेंच यांचा मृत्यु झाला. बंडांत सामील झालेल्या यांच्या मुलांना व नातवाला मात्र फांशी देण्यांत आलें. आझाद हिंद सेनेचे नेताजी सुभाषचंद्र बोस यांनीं यांच्या कबरीला लष्करी सलामी देऊन यांचेंच कार्य आपण पुढें चालवींत असल्याची घोषणा केली होती.

**बंगाली, सोराबजी शापूरजी**—(जन्म स. १८३१-मृत्यु स. १८९३) एकोणिसाव्या शतकांतील सुप्रसिद्ध लेखक व सुधारक.

ग्रॅहॅम ॲन्ड को. या परदेशी व्यापारी संस्थेचे दलाल असा यांचा मुख्य धंदा असला तरी आपल्या समाजाच्या सुधारणेकडे यांचें विशेष लक्ष असे. पारसी लॉ असोसिएशन ही यांची प्रमुख कार्यसंस्था होय. पारशी सक्सेशन ॲक्ट वगैरे कायदे या संस्थेनें पास करून घेतले.

याशिवाय मुंबई प्रांतांतील पहिलें कामा हॉस्पिटल हें स्त्रियांचें हॉस्पिटल व जमशेटजी जीजीभाई मदरसा या पारशी धर्मशिक्षक संस्थेचें जनकत्व यांचेकडे जातें. स्त्रीशिक्षणाचेहि हे मोठे पुरस्कर्ते होते.

यांचीं पत्रें—जगत्प्रेमी, जगन्मित्र, रास्तगोफ्तार.

यांचे ग्रंथ—Religion of Zoraster, Parsi Acts, Books and Languages of the Religion of Zoraster इत्यादि.

**बानर्जी, प्रमथनाथ**—( जन्म स. १८७७ ) सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ.

कलकत्ता युनिव्हर्सिटीचे एम्. ए. झाल्यानंतर हे अर्थशास्त्र हा विषय घेऊन लंडन युनिव्हर्सिटीचे डी. एस्सी. झाले. यानंतर बॅरिस्टर होऊन हे हिंदुस्थानला परत आले व यांची कलकत्ता युनिव्हर्सिटींत मिन्टो प्रोफेसर ऑफ इकॉनमिक्स म्हणून निवड झाली ( १९२०-३५ ). याशिवाय कलकत्ता युनिव्हर्सिटींत इतरहि अनेक मानाच्या जागा यांना देण्यांत आल्या. बंगाल व इंडियन लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचेहि हे अनेक वर्षे सभासद होते.

अर्थशास्त्राइतकेंच शिक्षण व राजकारण यांमध्यें लक्ष घालणाऱ्या थोड्या हिंदी अर्थशास्त्रज्ञांत यांची गणना होते. म्हणूनच अर्थशास्त्राबरोबरच यांनीं इतर क्षेत्रांत लिहिलेले ग्रंथ प्रमाण मानण्यांत येतात.

लाहोर येथें भरलेल्या इंडियन इकॉनमिक कॉन्फरन्सच्या चवदाव्या अधिवेशनाचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें. The Future of Indian Finance हा यांच्या अध्यक्षीय भाषणाचा विषय होता (१९३१), इंडियन पोलिटिकल सायन्स काँग्रेसचेहि हे अध्यक्ष होते ( लाहोर, अधिवेशन दुसरें ).

यांचे ग्रंथ—( 1 ) A Study of Indian Economics, ( 2 ) Public Administration in Ancient India, ( 3 ) Fiscal Policy in India, ( 4 ) The Future of Indian Finance, ( 5 ) Indian Finance in the Days of the Company, ( 6 ) Provincial Finance in India, ( 7 ) A History of Indian Taxation इत्यादि.

**बानर्जी, राखलदास**—( जन्म स. १८८२- मृत्यु स. १९३० ) सुप्रसिद्ध शिलालेखज्ञ.

आर्किऑलॉजिकल डिपार्टमेंटमध्यें प्रवेश केल्यानंतर ह्यांनीं बंगाल व ओरिसा प्रांतांत काम करण्यास सुरुवात केली. परंतु यानंतर थोड्याच दिवसांत त्या खात्याच्या वेस्टर्न सर्कलचे यांना सुपरिंटेंडन्ट निवडण्यांत आलें व अजमीर, उदेपूर, बिकानेर, भरतपूर, इन्दूर इत्यादि प्रांतांत हिंडून तेथील शिलालेखांचें अध्ययन करण्याची संधि यांना मिळाली.

इंग्रजी भाषेशिवाय संस्कृत, फारसी, हिंदी, उर्दू, मराठी, गुजराथी, अरबी अशा अनेक भाषा येत असल्यानें कोणत्याहि शिलालेखाचें वाचन हे सुलभतेनें करूं शकत. तीन हजार वर्षांपूर्वीच्या हिंदी संस्कृतीचा परिचय करून देणाऱ्या सिंधुतीरांवरील मोहनजदारोचें पूर्व संशोधन व उत्खनन यांचें सर्व श्रेय यांना द्यावयास पाहिजे. हिंदुस्थानच्या इतिहासांतील कितीतरी रूढ कल्पनांना या संशोधनानें धक्का दिला आहे.

आर्किऑलॉजिकल डिपार्टमेंट सोडल्यानंतर बनारस हिंदु विश्वविद्यालयांत भारतीय संस्कृति व इतिहास विभागाचें अध्यक्षस्थान व कलकत्त्याच्या इंडियन म्युझियमच्या पुरातत्त्वविभागाचें प्रमुखपद यांना देण्यांत आलें.

बंगाली भाषेंत लिहिलेला बंगालचा इतिहास व यांच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झालेला ओरिसाचा इतिहास हे यांचे प्रमुख ग्रंथ होत. याशिवाय 'प्राचीनमुद्रा' ह्या यांच्या बंगाली ग्रंथाचें हिंदींत भाषांतर झालें असून यांनीं बंगाली भाषेंत कांहीं कादंबऱ्याहि लिहिल्या आहेत.

**बानर्जी, सर-सुरेंद्रनाथ**—( जन्म स. १८४८- मृत्यु स. १९२५ ऑगस्ट ६ ) बंगालमधील सुप्रसिद्ध राजकारणी पुढारी व वक्ते.

हे बी. ए. होऊन आय. सी. एस. झाल्यानंतर हिंदुस्थानांत परत आले व सिल्हटचे मॅजिस्ट्रेट व कलेक्टर म्हणून यांची नेमणूक झाली ( १८७१ ). परंतु थोड्याच दिवसांनीं वरिष्ठ अधिकाऱ्याशीं खटका उडून यांना अल्प निवृत्तिवेतन देऊन सरकारी नोकरींतून कमी करण्यांत आलें. त्यावर उपाय करण्यासाठीं हे इंग्लंडला गेले व तें पुढें न जमल्यानें यांनीं बॅरिस्टरीच्या टर्म्स भरण्यास सुरुवात केली. परंतु तेथेंहि सनदी नोकरींतून बाहेर निघालेले म्हणून यांना बॅरिस्टरीची पदवी नाकारण्यांत आली व अशा व्यग्र मनःस्थितींतच हे हिंदुस्थानाला परत आले.

जें मनाला वाटतें तें उघडपणें बोलतां येत नाहीं; अन्यायाचा प्रतिकार तर राहोच, पण त्याविरुद्ध ब्र काढण्याचेंहि धाडस होत नाहीं अशा आपल्या देशाच्या चमत्कारिक स्थितीचें यांना वैषम्य वाटूं लागलें. कलकत्त्याच्या मेट्रोलिटन इन्स्टिटयूटमध्यें इंग्लिशचे प्राध्यापक म्हणून नेमणूक होतांच यांनीं तेथील विद्यार्थ्यांसमोर आपले हे विचार मांडण्यास सुरवात केली. याच सुमारास सर्व देशांतील लोकांना राजकीय लक्ष्यासाठीं एका झेंडयाखालीं आणण्याच्या हेतूनें स्थापन झालेल्या स्टूडन्ट्स असोसिएशनचे हे एक प्रमुख सभासद बनले व त्या संस्थेमार्फत यांनीं सर्व हिंदुस्थानभर एक दौरा काढला. हिंदुस्थानांतील सर्व विद्यार्थ्यांनीं आजपर्यंत राजकारणावर टाकलेला बहिष्कार टाकून देऊन त्यांत मनापासून भाग घ्यावा ही यांची सांगी सर्वत्र लोकप्रिय झाली व यांच्या म्हणण्याप्रमाणें प्रान्तोप्रान्तीं राजकीय कार्य करणाऱ्या संस्था उत्पन्न झाल्या. यानंतर लवकरच निघालेल्या राष्ट्रसभेच्या कार्याची ही प्राथमिक अवस्था होती. पुढें १८९५ च्या पुण्याच्या व १९०२ च्या अहमदाबादच्या राष्ट्रसभेचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें.

गव्हर्नरजनरलच्या एक्झिक्युटिव्ह कौन्सिलमध्यें प्रातिनिधिक लोक घेतले जावेत या मुद्द्यावर व इल्बर्ट बिल, युनिव्हर्सिटीज बिल, कलकत्ता कॉर्पोरेशन बिल इत्यादि प्रसंगीं यांनीं केलेल्या प्रभावी विरोधामुळें यांची लोकप्रियता वाढतच चालली. यांच्या या लोकप्रियतेचा कळस बंगालच्या फाळणीच्या वेळीं झाला व बंगालच्या किंबहुना हिंदुस्थानच्या तरुणांचे पुढारी अशी यांची सर्वत्र प्रसिद्धि होऊं लागली. याच सुमारास हे बंगाल कायदेमंडळाचे व कलकत्ता कॉर्पोरेशनचे सभासद झाले. परंतु पुढें लॉर्ड कर्झन यांच्याशीं मतभेद होऊन यांनीं कॉर्पोरेशनमध्यें बसण्याचें नाकारलें.

परंतु हें फार दिवस टिकणें शक्य नव्हतें. बंगालमधील तरुणांचीं वाढत्या प्रमाणावरील अत्याचारी कृत्यें पाहून तरुणांची मनें राजकारणाकडे वळविण्यांत आपली कांहीं तरी चूक झाली आहे, असें यांना वाटूं लागलें. पिस्तूल, खून, बॉम्ब यांचा पोरखेळाप्रमाणें चाललेला सर्रास उपयोग थांबविण्यासाठीं हे नरम भाषा वापरूं लागले व शेवटीं १९०७ च्या सुरतच्या काँग्रेसमध्यें हे टिळकांच्या विरोधकांत सामील झाले.

त्या वेळीं राष्ट्रसभा मवाळांच्या ताब्यांत गेली खरी, पण टिळक सुटून आल्यावर जहालपक्षानें पुनः राष्ट्रसभेंत प्रवेश केला. मॉंटफोर्ड सुधारणांना आगाऊच मान्यता दिल्यानें नेमस्त लोक अत्यंत अप्रिय झाले व त्यांना राष्ट्रसभा व सार्वजनिक कार्यांतून बाहेर पडावें लागलें. व्हाइसरॉयच्या कायदेमंडळांत यांनीं सुधारणांना पाठिंबा देणारा ठराव पास करून घेतला तरी बाहेर म. गांधींच्या असहकारितेला सुरवात झाली. हे १९१९ च्या गव्हर्नमेंट ऑफ इंडिया ॲक्टच्या जॉईंट पार्लमेन्टरी कमेटीकरितां चार महिने इंग्लंडला जाऊन आले व 'असहकारितेचा झाला एवढा पुकारा पुरे झाला', असें यांनीं आपलें मत जाहीर केलें, पण त्याचा उपयोग झाला नाहीं. तेव्हां हे असहकाराचे घोर विरोधी बनले. सरकारनें यांना सर ही पदवी दिली ( १ जाने. १९२१ ) व हे स्थानिक स्वराज्य व वैद्यक खात्यानें दिवाण झाले. कलकत्ता कार्पोरेशनमध्यें निवडलेल्या लोकांचें बहुमत असण्याचा यांनीं कायदा करून लॉर्ड कर्झनच्या कृत्याचा सूड उगवला. पण ती संस्था स्वराज्यपक्षाच्या ताब्यांत जाऊन यांचे तीव्र विरोधी तेथें मेयर झाले. १९२३ च्या इलेक्शनमध्यें यांचा पराजय होऊन यांच्या सार्वजनिक आयुष्याची इतिश्री झाली. याच सुमारास यांनीं आपलें आत्मचरित्र लिहून पुरें केलें.

डब्ल्यू. सी. बानर्जी यांचेनंतर त्यांचें 'बंगाली' साप्ताहिक ताब्यांत घेऊन यांनीं त्याला सतरा वर्षांनंतर दैनिक स्वरूप दिलें.

यांचें वक्तृत्व इतकें परिणामकारक व भावनामय असे कीं, एखाद्या बंडाची उठावणी किंवा उपशम करणें हा यांच्या हातचा मळ असे. 'सॅरेंडर नॉट' (अपराजित) या नांवानें हे आपल्या मित्रमंडळींत प्रसिद्ध असत.

यांच्या तेजस्वी भाषणाचे पडसाद सर्व जगांत उमटत. भाषेवरील प्रभुत्व, सुंदर भाषाशैली, उच्च भावनेनें युक्त असणारें कल्पनावैपुल्य व मर्दानी आवेश इत्यादि बाबींत यांची कोणीहि बरोबरी करूं शकणार नाहीं. राजनिष्ठेचें प्रतिपादन हा यांच्या भाषणांतील खमंगपणा असे. लॉर्ड मिंटो यांच्या कारकीर्दींत सभा उधळून लावतांना बारिसाल येथें यांना पोलिसांच्या लाठीचा प्रसाद मिळाला होता. एकदां लोकांनीं यांना राज्याभिषेकहि केला होता. पण पुढें जहाल क्रान्तिकारकांचें राजकारण यांना झेपेना म्हणून हे लोकांत अप्रिय होत गेले.

यांचे ग्रंथ—A Nation in the Making (1927).

**बापट, श्रौताचार्य-धुंडिराज गणेश**—( जन्म स. १८८२ ) सुप्रसिद्ध श्रौतविद्याविशारद, शुक्लयजुर्वेद-

संहिता नि ऐतरेय ब्राह्मण यांचे मराठी भाषान्तरकार व मराठी लेखक.

यांचें शिक्षण आजोबांच्यापाशीं झालें. यांच्या घराण्यांत अनेक पिढ्या अग्निहोत्र व श्रौत विधेची परंपरा आहे. ज्ञानकोश प्रस्तावना द्वितीय खंड यांत श्रौतविषयक माहिती यांनीं लिहिली. स्वाध्यायमंदिर ही संस्था काढून त्रैवर्णिकांत वैदिक संस्कारांचा प्रचार केला. 'स्वाध्याय' मासिक कांहीं दिवस चालविलें. यांचें वक्तृत्वहि परिणामकारक आहे. यांनीं अग्निष्टोम वगैरे यज्ञ केले.

यांचे ग्रंथ—१ ऐतरेय ब्राह्मण मराठी भाषान्तर, २ शुक्लयजुर्वेद, वाजसनेयसंहिता मराठी भाषान्तर, ३ आर्यांचे संस्कार, ४ श्रौतकोश इत्यादि.

**बापट, सेनापति-पांडुरंग महादेव**—( जन्म स. १८८० नवं. १२ ) महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध क्रांतिकारक.

नगर जिल्ह्यांतील पारनेर हें गांव यांचें जन्मस्थान. १९०३ सालीं डेक्कन कॉलेजमध्यें बी. ए. झाल्यानंतर मंगळदास परदेश शिष्यवृत्ति व हिंदु एज्युकेशन फंडांतून कांहीं रक्कम मिळवून हे इंग्लंडला गेले ( १९०४ ) व यांनीं एडिंबरो येथील मेकॅनिकल एंजिनियरिंग कॉलेजांत आपलें नांव दाखल केलें. परंतु याच सुमारास 'ब्रिटिश रूल इन् इंडिया' या यांच्या व्याख्यानाबद्दल मुंबई युनिव्हर्सिटीनें यांची शिष्यवृत्ति बंद केली व श्यामजी कृष्णवर्मा वगैरे क्रांतिकारक लोकांशीं यांचा संबंध येऊन यांच्या आयुष्यास एक नवें क्रांतिकारक वळण लागलें. बॉम्ब बनविण्याच्या कृति शिकून व नांव बदलून हे गुप्तपणें हिंदुस्थानांत आले व माणिकतोळा बॉम्ब कटानें यांचें क्रांतिमय स्वरूप प्रथम लोकांच्या लक्षांत आलें. त्या कटाच्या मुळाशीं यांनीं पॅरिसहून पाठविलेल्या बॉम्ब कृतींचे कागद असल्याचें साक्षींत प्रगट होतांच हे अन्तर्धान पावले.

या अज्ञातवासांत आचारी, शेतकरी, मॅट्रिकचा विद्यार्थी अशा अनेक भूमिका यांना पार पाडाव्या लागल्या. सदोदित स्थलान्तर व वेषान्तर करण्याची तयारी ठेवून यांनीं साडेचार वर्षे काढलीं, परंतु पुढें हे विश्वासघातानें पकडले गेले व चौकशीनंतर एक महिन्यानें यांची सुटका झाली.

सुटल्यानंतर चित्रशाळा, केसरी व ज्ञानकोश या ठिकाणीं यांनीं नोकरी केली; तरी यांच्यामधील क्रांतिकारक विचाराची ज्योत अशी सहज विझणारी नव्हती. १९२० सालच्या मुळशी सत्याग्रहाचें सेनापतिपद यांनीं स्वीकारलें. गांधींच्या तत्त्वज्ञानाप्रमाणें प्रथम अनेक वेळीं अहिंसात्मक सत्याग्रह करूनहि परिणाम दिसेना तेव्हां यांनीं आपल्या कल्पनेप्रमाणें दुर्जनांना अल्पदंड करणारा सशस्त्र सत्याग्रह सुरू केला. टाटा कंपनीच्या नोकरांवर सशस्त्र हल्ला केल्याबद्दल यांना साडे सात वर्षांची शिक्षा फरमावण्यांत आली.

बाहेर पडल्यानंतर ( १९३१ ) राष्ट्रांत शक्ति व आत्मप्रतिकारसामर्थ्य वाढविण्यासाठीं यांनीं कांहीं दिवस अहिंसात्मक मार्गानें जाण्याचें ठरविलें. अहिंसात्मक युद्धाची यशस्विता, आत्मक्लेश व आत्महिंसा यांवर अवलंबून असते हें जाणून यांनीं प्राण देण्यास सदोदित तयार असणाऱ्या 'प्राणयज्ञदलाची' स्थापना केली. परंतु त्यासाठीं काढलेल्या दौऱ्यांतील एका भाषणावर खुनाच्या उत्तेजनाचा आरोप ठेवण्यांत येऊन यांना सात वर्षांची शिक्षा झाली.

१९३७ सालीं सुटून आल्यानंतर यांनीं आपलें जुनें कार्यच चालू ठेवलें. संघटना नाहीं तर स्वतः तरी प्राणाहुति देऊन राष्ट्रकार्यास चेतवणी द्यावी अशा हेतूनें प्राणत्यागाचा दिवस २३ जुलै १९३९ व स्थळ संगम, पुणें ठरविलें. पण पुढें यांनीं हा बेत स्थगित केला. पुनः अकोल्याच्या भाषणावरून यांना मिळालेली १ वर्षाची शिक्षा झाली.

क्रांतिवादाच्या खऱ्या स्वरूपाचा साक्षात्कार यांच्या या सर्व जीवनक्रमावरून मिळतो. क्रांतिवादाचे बाबतींत महाराष्ट्रानें विचाराचा धागा पुरवायचा व सर्व देशभर त्याचें अनुकरण व्हावयाचें अशी परंपरा यांच्या कार्यामुळें सुरू झाली. सर्वस्वीं प्रतिकूल परिस्थितींत आपलें अंगीकृत कार्य आजन्म निष्ठेनें चालविणारे यांच्यासारखे त्यागी विरळ असतात. यांचें इंग्रजी व मराठी वाङ्मयहि यांच्या वृत्तीवर प्रकाश पाडणारें आहे.

यांचे ग्रंथ—( १ ) चैतन्य गाथा, ( २ ) सेनापति बापट वाङ्मय-समग्र ग्रंथ, ( ३ ) पद्यमय आत्मचरित्र, ( ४ ) Holy Song ( उपनिषदें व भगवद्गीता यांचें इंग्रजी पद्यमय सार ).

**बापट, डॉ. पुरुषोत्तम विश्वनाथ**—( जन्म स. १८९४ ) आन्तरराष्ट्रीय कीर्तीचे संशोधक व पाली भाषेचे अभ्यासक.

हे अमेरिकेंतील हारवर्ड विश्वविद्यालयाच्या निमंत्रणावरून अमेरिकेस गेले ( १९२९ ). तेथें 'विसुद्धीमग्ग' या पाली ग्रंथाचें इंग्रजींत भाषान्तर करण्याचें काम यांच्याकडे सोंपविलें होतें. तो ग्रंथ सनाच्या पांचव्या शतकांत तयार झाला असून प्राचीन काळच्या बौद्ध धर्माचें स्वरूप त्यावरून कळून येतें. त्याकरितां हे तेथें तीन वर्षे राहत होते. तेवढ्या अवधींत यांनीं चिनी भाषेचा अभ्यास केला, आणि पी. एच्डी. ही पदवी संपादन केली. मूळ बौद्ध ग्रंथाचें ज्ञान व अध्ययन करावयाचें असल्यास चिनी भाषेचें ज्ञान आवश्यक असतें, तें मिळवून हे हिंदुस्थानांत परत आले ( १९३२ ), बनारस येथें भरलेल्या ओरिएन्टल कॉन्फरन्सचे वेळीं हे पाली व बौद्ध विभागाचे अध्यक्ष होते ( १९४३ ).

पुरातन पाली ग्रंथांचीं इंग्रजी व मराठी भाषेंत भाषान्तरें यांनीं बरींच केलीं आहेत. त्यांत 'विमुत्ति-मग्ग, विसुद्धि-मग्ग, सुत्तनिपातो, धम्मसंगणि व अट्ठसालिनी' हीं पुस्तकें प्रसिद्ध आहेत. पैकीं शेवटचीं दोन पुस्तकें प्रो. र. द. वाडेकर यांच्या मदतीनें यांनीं भाषान्तरित केलीं आहेत.

मातृभाषा व इंग्रजीशिवाय संस्कृत, पाली, चिनी व तिबेटी या भाषांचें यांस चांगलें ज्ञान आहे. आवश्यक जर्मन व फ्रेंच भाषांचें ज्ञानहि यांनीं संपादन केलें.

आतां यांची शान्तिनिकेतनांत संशोधनकार्य करण्याकरितां नेमणूक झाली आहे. चिनी-बौद्ध वाङ्मयासंबंधीं संशोधन करून ग्रंथप्रकाशन करणें हें यांचें तेथील मुख्य काम आहे. हिंदुस्थानांतून नेलेले हजारों ग्रंथ ऐतिहासिक कालांत ( ४-११ वें शतक ) चिनींत भाषान्तरित झाले. त्यापैकीं सुमारें दोन हजार ग्रंथ १९४६ पर्यंत संशोधून प्रसिद्ध झाले आहेत.

'संघभद्र' नांवाच्या चिनी पंडितानें स. ४७० मध्यें 'समंतपासादिका' नांवाचा ग्रंथ पालींतून चिनींत भाषान्तरित केला. तो पाली ग्रंथ आतां उपलब्ध नाही. म्हणून त्या ग्रंथाचें पाली किंवा इंग्रजी भाषान्तर करण्याचें काम आतां यांच्याकडे देण्यांत आलें आहे. तें काम हे शान्तिनिकेतनांत राहून तेथील चीनभवनांतील मुख्य प्रो. तान्-यून-शान यांच्या देखरेखीखालीं करीत आहेत.

**बापटशास्त्री, विष्णु वामन**—( जन्म स.१८७१–मृत्यु स. १९३२ ) शंकराचार्यभक्त, उपनिषदादिकांचे भाषान्तरकार व गीतारहस्याचे खंडनकार.

यांचें गांव धालवल (ता. राजापूर). वडील वारल्यामुळें यांनीं रामदुर्ग व शिरोळ येथें मराठी व इंग्रजी शिक्षण घेतलें. तारेचा अभ्यास करून सदर्न मराठा रेल्वेंत नोकरीस लागले. निबंधमाला वाचून प्रेरणा मिळाली आणि संस्कृत व उपनिषदादि ग्रंथांचें वाईस प्रज्ञानंद सरस्वतीकडे अध्ययन केलें. सिंध हैदराबादेस गिडुमल पाठशाळेंत मुख्य शिक्षक म्हणून काम केलें ( १९०३-१९१२ ). पुढें यांनीं पुण्यास येऊन ग्रंथप्रकाशनास सुरुवात करून 'आचार्य' पाक्षिक सुरू केलें. प्रकाशनाचा उद्योग अंगाशीं आला, पण सर विठ्ठलदास ठाकरसी यांच्या आश्रयामुळें सावरले. १९१६ सालीं कोल्हापूरच्या शंकराचार्यांकडेहि हे गेले होते. पण यांना रातोरात परत यावें लागलें. आचार्यकुल काढून यांनीं कांहीं विद्यार्थ्यांची स्वतःच्या खर्चानें तेथें राहण्याची व्यवस्था केली व तें सतत चालेल अशी योजना केली.

यांचे ग्रंथ—दशोपनिषदें भाष्याच्या अर्थासह. गीताभाष्यार्थ, शारीरकभाष्यार्थ, आत्मपुराण, अनुभूतिप्रकाश, शतश्लोकी, शांकरभाष्यानुसार गीतारहस्य, वेदान्तशब्दकोश, वेदान्तपरिभाषा इत्यादि.

**बापना, सर-सिरायमल**—( जन्म स. १८८२ ) हिंदी संस्थानांतील सुप्रसिद्ध कार्यकर्ते.

उदेपूरचें महाराजा हायस्कूल, अजमेरचें गव्हर्नमेन्ट कॉलेज व अलाहाबादचें मूर सेन्ट्रल कॉलेजामध्यें आपलें शिक्षण संपवून हे बी. ए., एलएल. बी. झाले.

यानंतर इंदूर संस्थानांत यांची डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज म्हणून नेमणूक झाली ( १९०७ ) व महाराजांचे कायदा-शिक्षक, महाराजांचे सेक्रेटरी, होम मेंबर ( १९१५ ), सल्लागारमंडळाच्या अपील कमेटीचे अध्यक्ष, असे चढत चढत शेवटीं हे त्या संस्थानचे मुख्य प्रधान झाले ( १९२६ ). यानंतर एक तपापेक्षां जास्त झालेली यांची तेजस्वी कारकीर्द यांच्या सतत कार्याचें फळ आहे ( १९२६-३९ ).

इंदूर संस्थानांतील आपल्या कारकीर्दीनंतर यांनीं बिकानेर ( १९३९-४१ ), रतलाम इत्यादि संस्थानांत मुख्य प्रधानाचीं कामें केलीं. हे अलवार संस्थानचे मुख्य प्रधान म्हणूनहि यशस्वी झाले आहेत.

**बापुदेवशास्त्री, ऊर्फ नृसिंह-महामहोपाध्याय**—( जन्म स. १८२१-मृत्यु स. १८९० ) सुप्रसिद्ध गणितज्ञ, ज्योतिषी व ग्रंथकार.

ऋग्वेदी चित्पावन ब्राह्मण. अहमदनगर जिल्ह्यांतील टोके येथील राहणारे. पिता सीताराम. माता सत्यभामा. नागपूर येथें प्राथमिक शिक्षण घेऊन धुंडिराज नांवाच्या कान्यकुब्ज ब्राह्मणापाशीं भास्कराचार्यांच्या लीलावतीचें व बीजगणिताचें अध्ययन केलें. सिहूर येथें संस्कृत-पाठशाळेवर नेमणूक झाली असतां सेवाराम यांच्यापाशीं रेखागणिताचें अध्ययन केलें. पुढें काशींतील संस्कृत-पाठशाळेंत रेखागणित शिकविण्याकरितां यांची नेमणूक झाली (१८४१). तेव्हांपासून शेवटपर्यंत हे काशी येथें होते व यांची मानमान्यता व हुद्दा सारखा वाढत गेला. हे रॉयल एशियाटिक सोसायटी, ग्रेटब्रिटन व बंगालचे सन्मान्य सभासद, कलकत्ता व अलाहाबाद विश्वविद्यालयाचे फेलो, महामहोपाध्याय, सी. आय. ई. इत्यादि पदव्यांनीं विभूषित होते. एकदां चंद्रग्रहण बरोबर वर्तविल्याबद्दल जम्मूच्या राजानें यांना एक हजार रुपये बक्षीस दिलें.

यांनीं आपल्या विषयावर संस्कृत, हिंदी व इंग्रजीमध्यें अनेक ग्रंथ केले आहेत.

**बाबा पदमनजी**—(जन्म स. १८३१-मृत्यु स. १९०६) मराठींतील सुप्रसिद्ध लेखक, कोशकार व खिस्ती धर्म-प्रसारक.

जन्मस्थान बेळगांव. जात कासार. यांचे मूळ उपनाम मुळे. पित्याचें नांव पदमनजी माणिकजी. ते सबअसि-स्टंट सर्वेयर होते. यांचें मराठी शिक्षण बेळगांवीं व इंग्रजी शिक्षण मुंबई येथें फ्री चर्च स्कूलमध्यें झालें. यांची प्रवृत्ति खिस्ती धर्माकडे होण्यास 'प्रभाकर'कर्ते भाऊ महाजन व लोकहितवादी यांचे लेखन विशेष कारण झालें. 'ब्राह्मणधर्म व ब्राह्मणांचे श्रेष्ठत्व याजवरील माझा विश्वास व पूज्यबुद्धि हीं नष्ट होण्यास लोकहित-वादींची प्रभाकरांतील पत्रमालिकाच कारण झाली' असें यांनीं अरुणोदय नांवाच्या आत्मचरित्रांत म्हटलें आहे. शेवटीं १८५४ मध्यें हे खिस्ती झाले. त्यानंतर सोळा वर्षें पुण्याच्या 'फ्री चर्च मिशन'च्या शाळेंत शिक्षक होते. १८६० मध्यें यांनीं टामस कँडीच्या इंग्रजी-मराठी कोशाचा संक्षेप शब्दरत्नावलींत केला. त्यापूर्वी १८५७ सालीं पुण्याच्या मिशनमध्यें यांना 'पालक' दीक्षा मिळाली होती. १८७३ सालीं यांनीं त्या कामाचा राजीनामा देऊन लेखनकार्य आरंभिलें. 'बायबल सोसायटी', 'ट्रॅक्ट सोसायटी' यांचें संपादकत्व यांच्याकडे आलें. वयाच्या ७१ व्या वर्षी हे सेवानिवृत्त झाले.

यांनीं लिहिलेलें मराठी वाङ्मय सोडल्यास मराठी खिस्ती वाङ्मय असून नसल्यासारखें होईल. यांनीं शंभराचे वर लहानमोठीं पुस्तकें लिहिलेलीं आहेत. शिवाय वर्तमानपत्रांतील लिखाण वेगळेंच. यावरून यांच्या प्रचंड लेखनाची कल्पना येईल. यांचें वाङ्मय प्रतिभासंपन्न, भाषा साधी, चटकदार, शब्दयोजना वेंचक, लिखाण गंभीर व प्रौढ असे. भक्तीचा जिव्हाळा व समाजसुधारणेची तळमळ वगैरे गुण यांच्या वाङ्मयांत भरपूर आढळतात.

यांचें वाङ्मय—कोश-१ इंग्रजी-मराठी, २ मराठी-इंग्रजी, ३ संस्कृत-मराठी, आत्मचरित्र-४ अरुणोदय (स्वतःचा खिस्ती धर्म स्वीकारापर्यंतची माहिती), धार्मिक-५ सटीक मराठी नवा करार, इत्यादि.

**बाबा राघवदास**—(जन्म स. १८९६ डिसें.१२) सुप्रसिद्ध धर्मप्रसारक, समाजसेवक व आन्तरराष्ट्रीय कीर्तीचे राष्ट्रीय कार्यकर्ते.

यांचा जन्म पुणें येथें झाला. यांचें समग्र नांव राघवेंद्र शेषो पाच्छापूरकर असून हे दे. ऋ. ब्राह्मण आहेत. शिक्षण मुंबई व कऱ्हाड येथें झालें. स्वामी रामकृष्ण परमहंस व स्वामी विवेकानंद यांच्यामुळें यांना त्याग व सेवा करून राहण्याची स्फूर्ति झाली व यांनीं आजन्म ब्रह्मचर्यानें राहण्याचा निश्चय केला. नंतर योगाभ्यासा-करितां हे हिमालयांत गेले (१९१३). नंतर काशी, ज्वालापूर व गोरखपूर येथें संस्कृत व इंग्रजी यांचें अध्ययन करून १९१६ पासून गोरखपूर येथें यांनीं वास्तव्य केलें. १९२० पासून राजकारणांत पडले व अनेक वेळा तुरुंगवास घडला. भारतीय संस्कृतीचें ज्ञान लोकांत पसरावें म्हणून गीतेबरोबर यांनीं तुळसीदास रामायणाच्या प्रचारकार्यास आरंभ केला. ठिकठिकाणीं शाळा वगैरे संस्था काढून त्या उत्तम चालविल्या.

यांनीं गोरखपूर येथें गीताप्रेस (१९२३), गीता-प्रचारसमिति (१९२६), रामायणप्रचारसमिति (१९२८), आर्यधर्मप्रचारसमिति वगैरे संस्था काढण्यांत पुढाकार घेऊन गीतेच्या अनेक प्रकारच्या स्वस्त किंमतींत देता येणाऱ्या आवृत्त्या, कल्याण मासिकासारखें आबाल-वृद्धांना प्रिय असणारें सुबक हिन्दी मासिक, गीतेच्या, तुळसीदास रामायणाच्या व जैन, बौद्ध व शीख वगैरेंच्या ग्रंथांच्या परीक्षा सुरू केल्या. त्यांचीं केन्द्रें हिंदुस्थानांत

व हिंदुस्थानच्या बाहेरच्या देशांतहि निर्माण करून दरवर्षी हजारों विद्यार्थी बसतील इतक्या त्या लोकप्रिय केल्या. याशिवाय वेदविद्यालय, संस्कृत कॉलेज, पाठशाळा व खेड्यांतून सतरापेक्षां अधिक माध्यमिक विद्यालयें स्थापन केलीं.

पण यांपेक्षांहि बौद्ध राष्ट्रांशीं घनिष्ठ संबंध उत्पन्न करणारी यांची कामगिरी अत्यंत महत्त्वाची आहे. गोरखपूरजवळ कुशीनगर हें गांव गौतमबुद्धाचें निर्वाणस्थान आहे. तेथें अनेक बौद्ध यात्रेकरू येतात. त्यांच्याशीं येथील हिंदूंचें गैरसमजुतीनें अत्यंत तुटक वर्तन असे. यांनीं तो तुटकपणा नाहींसा करून प्रेमाचे संबंध निर्माण करण्याचा प्रयत्न केला. त्यांच्याकरितां धर्मशाळा बांधल्या ( बिर्ला, जुगल किशोर पाहा ). जन्म-ज्ञान-निर्वाण-दिन वैशाखी पौर्णिमा जिल्हाभर सुट्टीचा दिवस ठरवून यात्रा सुरू केली. यांच्या प्रयत्नानें चीन, सिलोन वगैरे देशांतून तेथें धर्मशाळा वगैरे सोयी करण्याकरितां लक्षावधि रुपये मंजूर झाले आहेत. बुद्धदेव हायस्कूल उघडलें असून तेथें शेंकडों परदेशी विद्यार्थी हिन्दींतून शिक्षण घेत आहेत. चिनी धर्माध्यक्ष रे. तोसू व शिक्षाध्यक्ष मा. ताऊ यांच्या पाठिंब्यानें आशियांतील निम्यापेक्षां अधिक भाग व्यापणाऱ्या बौद्ध राष्ट्रांशीं हिंदुस्थानचें दळणवळण सुरू होऊन आपलेपणाचे संबंध स्थापित होत आहेत.

दुष्काळ, पूर वगैरेमध्यें लोकांची सेवा करून, खादी, हिन्दीप्रचार, ग्रामोद्योग वगैरेमध्यें सक्रिय भाग घेऊन, जिल्हा कॉंग्रेस कमेटीचे अध्यक्ष होऊन, संस्कृतिप्रसाराचें काम अखंड चालवून आणि आशियाटिक राष्ट्रांचा संघ निर्माण करण्याच्या दृष्टीनें बौद्ध राष्ट्रांत दळणवळण उत्पन्न करून या त्यागी संन्यस्त वृत्तीच्या माणसानें कार्याची नवी दिशा दाखवून आपल्याबद्दल लोकांत विलक्षण आदर उत्पन्न केला आहे.

**बारींद्रकुमार**—( जन्म स. १८८०-फांशी स. १९०९ ) बंगालमधील क्रांतिकारक चळवळीचे जनक व पुढारी.

अरविंद घोष यांचे हे धाकटे बंधु. यांचा जन्म जरी इंग्लंडमध्यें झाला तरी यांचें सर्व बालपण अरविंद घोष यांच्या देखरेखीखालीं बडोद्याला पार पडलें. १९०२ सालीं हे बडोद्याहून कलकत्त्याला गेले व यांच्या जीवनाचें नवें पर्व सुरू झालें.

बंगालमध्यें भद्रलोक या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या सुशिक्षित लोकांत क्रांतीची उठावणी करावयाची व त्या मार्गानें हिंदुस्थानला स्वराज्याची प्राप्ति करून द्यावयाची अशी यांची सुरवातीची कल्पना होती. परंतु केवळ राजकारणाच्या नांवावर लोकांचा पाठिंबा मिळत नाहीं असें यांच्या ध्यानांत आलें व यांनीं त्याला धार्मिक बैठक मिळवून देण्याचा प्रयत्न सुरू केला. यासाठीं यांनीं आपल्या या कल्पनेप्रमाणें विद्यार्थी तयार करण्यास सुरुवात केली व १९०८ अखेर अविनाश भट्टाचार्य व भूपेंद्रनाथ दत्त यांचे सहकार्यानें हे पंधरा कट्टे अनुयायी करण्यांत यशस्वी झाले. उल्हासकर दत्त व हेमचंद्र दास हे यांचे बॉम्ब करण्यांतील सहकारी असून अकरा पिस्तुलें, चार लहान बंदुका व एक मोठी बंदुक येवढें प्रचंड ( ? ) साहित्य यांनीं जमा केलें.

देशांत अस्वस्थता उत्पन्न करा, लोकांच्या मनांतील अस्वस्थतेचें पर्यवसान स्वराज्याच्या इच्छेंत सहजच होईल अशी यांची सुरवातीपासूनची सांगी असे. या अस्वस्थतेचें केवळ एक साधन म्हणून बॉम्बला आपण हाताशीं धरल्याचें पुढें यांनीं आपल्या जबानींत कबूल केलें.

‘ युगांतर ’ हें बंगाली व ‘ संध्या ’ हें इंग्रजी पत्रहि यांनीं आपल्या मतप्रसारासाठीं काढलें ( १९०६ ). युगांतर व त्यामध्यें प्रगट केले जाणारे विचार तर इतके लोकप्रिय ठरले कीं, पुढच्याच वर्षी त्याचा खप सात हजारांवर गेला. पुढें हें पत्र न्यूज पेपर्स ॲक्टनें बंद पडलें.

परंतु यामुळें यांच्या मतप्रचारांत बिलकुल खंड पडला नाहीं. भगवद्गीतेंतील ‘ कार्य कुरु ’चा यांनीं लावलेला नवा अर्थ, विवेकानंदांचीं व्याख्यानें व मॅझिनी गॅरिबाल्डींचीं चरित्रें तरुणपिढी श्रद्धेनें पठण करूं लागली. याशिवाय भवानीमंदिर, वर्तमान रणनीति व मुक्ती कोन पथे ( युगांतरमधील लेखांचें पुनर्मुद्रण ) हीं स्वतंत्र पुस्तकें यांच्या या तत्त्वज्ञानाचा प्रसार करण्यासाठीं लिहिलीं गेलीं.

यांच्या या सर्व प्रचाराचा परिणाम अपेक्षित तोच झाला. सर्व हिंदुस्थान-विशेषतः बंगाल यांच्या या मतप्रणालीनें अक्षरशः वेडा झाला. कलकत्ता व डाक्का येथें स्थापन झालेल्या अनुशीलनसमितीच्या शाखा व सभासद झपाट्यानें वाढूं लागले. डाक्का शहरानें तर

आपल्या भोंवतालच्या खेड्यांत पांचशेंपेक्षां जास्त शाखा स्थापन केल्या.

यांच्या या सर्व हालचालींचा स्फोट मिसेस् व मिस् केनेडी यांच्या मृत्यूंत झाला. मुझफरपूर येथील चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट मि. किंग्जफोर्ड यांच्यासाठीं योजलेला बॉम्ब चुकून या दोन स्त्रियांवर पडला. यांचेनंतर किंग्जफोर्ड यांना पुस्तकाच्या पोकळींतून पाठविलेला बॉम्बहि पुस्तकाचें पार्सल न फोडतां तसेंच ठेवल्यानें वायां गेला. ' अलिपूर कॉन्स्पिरसी केस ' या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या या खटल्यांत हे व हेमचंद्र दास यांसकट पंधरा लोकांना फांशीं देऊन या कार्यास सुरवातीलाच दडपून टाकण्याचा सरकारनें प्रयत्न केला.

पण तसें झालें नाहीं. लवकरच या खटल्यांत माफीचा साक्षीदार नरेन्द्रनाथ गोस्वामी यास ठार करण्यांत आलें. त्याचेच पाठोपाठ या खटल्याचें काम चालविणारे पब्लिक प्रॉसिक्युटर व पोलीस सुपरिन्टेन्डेंट यांनाहि पिस्तुलानें ठार करण्यांत आलें.

आणि यानंतर बंगालमध्यें असें कांहीं क्रांतीचें नवें चक्र सुरू झालें कीं, त्यानें सरकार व सर्व हिंदुस्थान अक्षरशः घाबरून गेलें.

अशा तऱ्हेनें सकृद्दर्शनीं यांच्या या चळवळींना अपयश प्राप्त झालें तरी यांच्या तेजस्वी मतप्रचारामुळें बंगालमध्यें उत्पन्न झालेली क्रांतीची ज्योत अशी सहजासहजीं विझणारी नव्हती. दडपशाही, गोडीगुलाबी, दमदाटी अशा कोणत्याच साधनानें सरकारला ती नष्ट करतां आली नाहीं. हिंदुस्थानांतील ब्रि. सत्ता अनीति व अत्याचार यांच्या पायावर उभारली गेली आहे, तिचा नाश हें धर्मकृत्य आहे, धर्म, इतिहास व संस्कृति यांचा दुवा मिळवण्याचें क्रान्ति हें एक हुकमी साधन आहे, ही यांची शिकवण बंगाली लोक कधींच विसरले नाहींत.

**बारुआ, आनंदराम**—( जन्म स. १८५०–मृत्यु स. १८८९ ) आसाम प्रांतांतील सुप्रसिद्ध संस्कृत पंडित व संशोधक.

आसाम प्रांतांतील कामरूप जिल्ह्यामधील उत्तर गौहत्ती या गांवीं यांचा जन्म झाला. कलकत्त्याच्या प्रेसिडेन्सी कॉलेजांतून एफ. वाय.ची परीक्षा पास झाल्यानंतर कलकत्ता युनिव्हर्सिटीच्या शिष्यवृत्तीवर हे इंग्लंडला गेले व आय. सी. एस., बॅरिस्टर व बी. एस्सी. होऊन हे हिंदुस्थानला परत आले ( १८७२ ).

हिंदुस्थानांत आल्यानंतर आसाम प्रांतांतील शिवसागर व बंगालमधील इतर जिल्ह्यांत मॅजिस्ट्रेटचीं कामें करीत असतांच यांचें ग्रंथलेखन सतत चालू असे. संस्कृत, इंग्लिश डिक्शनरी वगैरे पुस्तकांशिवाय Ancient Geography in India, Bhavbhuti and his Place in Sanskrit Literature हे यांचे स्वतंत्र ग्रंथ महत्त्वाचे आहेत.

परंतु यापेक्षांहि संस्कृत भाषेच्या व्याकरणाचें ऐतिहासिक, भाषिक वगैरे सर्व दृष्टींनीं अध्ययन करण्याच्या हेतूनें यांनीं सुरू केलेली A Comprehensive Grammar of the Sanskrit Language-Critical, Analytical and Historical, ही यांची अपुरी ग्रंथमाला विशेष महत्त्वाची आहे. प्रत्येकीं हजार पानांचे बारा भाग काढण्याची यांची कल्पना होती. परंतु यांपैकीं संस्कृत काव्यांच्या छन्दःशास्त्रावरील दहावा व नानार्थ संग्रहावरील तिसरा खंड येवढेच ग्रंथ हे प्रसिद्ध करूं शकले.

**बार्डोलाय, गोपीनाथ**—( जन्म स. १८९१ ) आसाम प्रांतांतील सुप्रसिद्ध कॉंग्रेस पुढारी व कार्यकर्ते.

कलकत्त्याच्या स्कॉटिश चर्च कॉलेजमधून एम्. ए. झाल्यानंतर हे इंग्लंडहून बॅरिस्टर होऊन परत आले ( १९१६ ). आल्यानंतर लवकरच यांनीं वकिली करण्यास सुरवात केली; परंतु पंजाब प्रकरणापासून ब्रिटिश राज्यावरील यांची श्रद्धा उडाली व आपली वकिली सोडून यांनीं कॉंग्रेसच्या राजकारणांत भाग घेण्यास सुरवात केली ( १९२१ ).

लवकरच आसाम प्रांतांतील कॉंग्रेसच्या राजकारणाला यांनीं इतकें शिस्तशीर स्वरूप आणून दिलें कीं, इतर प्रांतांच्या बरोबरीनें तो प्रांत कॉंग्रेसच्या चळवळींत भाग घेण्यास सज्ज झाला. थोड्याच दिवसांत यांना ए. आय. सी. सी.चे सभासद करण्यांत आलें. गोहत्ती कॉंग्रेसचे हे दुय्यम सेक्रेटरी होते.

गांधीवादावरील अनन्य श्रद्धेबद्दल यांची विशेष प्रसिद्धि आहे. कायदेभंगाला पूरक म्हणूनच असेंब्लींतील कार्य स्वातंत्र्याच्या चळवळींत उपयोगी पडेल या श्रद्धेनें हे दक्षिण कामरूप जिल्ह्यातर्फे आसामच्या असेंब्लींत निवडून गेले व त्या प्रांताचे मुख्य प्रधान झाले.

मुख्य प्रधानकीचीं वस्त्रें घेतल्यानंतर थोड्याच दिव-

यांनीं त्रिमंत्री योजनेनें आसाम प्रांतांत उत्पन्न झालेल्या एका नव्या प्रश्नाला यांना तोंड द्यावें लागलें. आसाम प्रांतांत हिंदु बहुसंख्य असतांना त्या प्रांताला या योजनेनें मुसलमान बहुसंख्य असणाऱ्या बंगाल प्रांताच्या 'ब' गटांत ढकललें. ताबडतोब यांनीं आपल्या प्रांतांतील मुसलमानांच्या हकालपट्टीस आरंभ केला. हे लोक मूळचे आसाम प्रांतांतील नाहींतच, आम्हांस त्रास देण्यासाठीं ते येथें आले आहेत असें यांनीं आपल्या कृतींचें समर्थन केलें ( १९४६ ).

**बालगंधर्व**—( जन्म स. १८८८ ) महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध अभिनयनिपुण गायक नट.

यांचें जन्मस्थान पुणें. यांचें नांव नारायण श्रीपाद राजहंस. यजुर्वेदी माध्यंदिन ब्राह्मण. यांना १८९८ सालीं बालगंधर्व ही पदवी लो. टिळकांनीं दिली. १९०५ सालीं किर्लोस्कर नाटक मंडळींत यांचा प्रवेश झाला. पुढें यांनीं ती मंडळी सोडली ( १९१३ मे ) आणि गोविंदराव टेंबे व गणपतराव बोडस यांच्या भागींत गंधर्व नाटक मंडळी काढली ( १९१३ जुलै ). त्या मंडळीचे हे पुढें पूर्ण मालक झाले ( १९१९ ). यांना नाट्य संमेलनाच्या अध्यक्षाचाहि मान देण्यांत आला ( १९२९ ).

हे नाटकांत स्त्रियांच्या भूमिका करण्याबद्दल विख्यात आहेत. अभिनय व गायन यांबद्दल यांची ख्याति आहे. आवाज, रूप व शरीराची ठेवण या नैसर्गिक गुणांबरोबर निरलसपणें मेहनत करण्याचाहि यांच्याजवळ गुण आहे. लोकांनीं 'वन्स मोअर' देऊन यांना पुनः काम करणें भाग पाडलें तर कंटाळून न जातां हे अधिक तत्परतेनें काम करून रसिकांकडून शाबासकी मिळवीत. यांच्या शारदा, सुभद्रा, भामिनी, रुक्मिणी, द्रौपदी, सिंधु वगैरे प्रमुख भूमिका होत. यांनीं दोन तपें महाराष्ट्र रंगभूमीवर पूर्ण स्वामित्व गाजविलें. यांचीं स्त्रीवेषांतील चित्रें सौंदर्याचा आदर्श म्हणून घरोघर लावलीं गेलीं. महाराष्ट्रांतील स्त्रियांना लुगडें नेसणें, नथ घालणें व प्रसाधनें वापरण्याचा नवा प्रकार यांनीं दाखविला. अभिनय व गायकी यांबाबतमुद्धां यांनीं नवें गंधर्वयुग सुरू केलें. यांच्या अभिनयांत एक प्रकारचा लाडिकपणा व आवाजांत एक प्रकारची झार आहे. त्यामुळें यांचें गद्य भाषण सुद्धां विशेष प्रकारचें होई. आरडाओरडा किंवा कृत्रिमपणापासून हे नेहमीं दूर असत.

यांचें गायन हें अलीकडील कालांत अलौकिक मानलें जातें. असा सुरेलपणा, असा लाडिकपणा व अशा तानेचा सरळ स्वच्छपणा यांच्याशिवाय इतरत्र सांपडूं शकत नाहीं. शिवाय यांच्या आवाजांत अवर्णनीय आनंद देणारें माधुर्य ओतप्रोत आढळतें. शास्त्रशुद्धतेचा अभाव व रागाची सरभेसळ असूनसुद्धां यांच्या गायनाची रसिकांवर मोहिनी पडते. शिक्षणापेक्षां ईश्वरी देणगीच शेवटीं यांचे बाबतींत श्रेष्ठ ठरते.

चांगली वेषभूषा आणि गुणी माणसांचा संग्रह करण्याचा यांना कमालीचा हव्यास असे. या लहरी व स्वतंत्र वृत्तीच्या कलावंताची जोपासना करणारे दुर्गा खोटे यांचे वडील कै. पांडुरंग शामराव लाड सॉलिसिटर-सारखीं माणसेंहि यांना आर्थिक साहाय्य करीत.

यांच्याइतपत नाटकावर पैसा कोणींहि कमावला नसेल. यांनीं दिलेल्या खेळांच्या उत्पन्नांतून लक्षाधिक रुपये महाराष्ट्रांतील संस्थांना मिळाले आहेत. यांनीं व केशवराव भोसले यांनीं केलेल्या संयुक्त मानापमान या एका खेळास पंधरा हजार तीनशें रुपये उत्पन्न झालें होतें. यांच्यावर महाराष्ट्रानें पैशाची धार धरली असतांहि हा खर्चिक भोळसर स्वभावाचा कलावंत आपल्या लहरी स्वभावानें शेवटीं अकिंचन स्थितींत कर्नाटकी गोहरच्या तंत्रानें वागून काळ कंठीत असावा यापरतें आश्चर्य कोणतें ?

**बाळकृष्ण, डॉ.**—( जन्म स. १८८२–मृत्यु स. १९४० ) कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजचे माजी प्रिन्सिपल व सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक.

मुलतानच्या गव्हर्नमेंट हायस्कूल व लाहोरच्या डी. ए. व्ही. व गव्हर्नमेंट कॉलेजमध्यें आपलें शिक्षण संपविल्यानतर हे उच्च शिक्षणासाठीं इंग्लंडला गेले. लंडनच्या स्कूल ऑफ इकॉनमिक्स ॲन्ड पॉलिटिक्समध्यें कांहीं दिवस शिक्षण घेऊन हे हिंदुस्थानला परत आले. हे एम्. ए., पीएच्. डी., एफ. आर. इ. एस. होते.

हिंदुस्थानांत आल्यावर हे हरिद्वारच्या गुरुकुल युनिव्हर्सिटींत इतिहास व अर्थशास्त्र यांचे प्राध्यापक म्हणून काम करूं लागले. तेथें प्राध्यापक म्हणून अकरा वर्षे, व्हाइस प्रिन्सिपल म्हणून सहा वर्षे व प्रिन्सिपल व गव्हर्नर म्हणून एक वर्ष काम केल्यानंतर हे कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजचे प्रिन्सिपल झाले ( १९२२ ). अखेरपर्यंत हे तेथेंच होते. कोल्हापूर राज्यांतील अनेक लहान-

मोठ्या संस्थांशीं यांचा संबंध असून हॉलंड, जर्मनी, स्वित्झरलंड, इटाली इत्यादि देशांतून तेथील शिक्षणक्रम अभ्यासण्याच्या हेतूनें हे जाऊन आले होते.

याशिवाय एक अभ्यासी इतिहाससंशोधक म्हणून यांची प्रसिद्धि असून 'शिवाजी व शिवकाल' या विषयावरील यांना तज्ज्ञ मानण्यांत येई.

यांचे ग्रंथ—(1) Commercial Relations between India and England (1924), (2) The Industrial Decline in India, (3) Demands of Democracy, (4) Hindu Philosophers on Evolution, (5) Shivaji the Great, (6) Indian Constitution.

याशिवाय इतिहास, राजकारण, धर्मशास्त्र इत्यादि विषयांवर यांनीं हिंदींत ग्रंथ लिहिले असून हिंदुस्थानच्या इतिहासावरील यांचा मराठी ग्रंथ प्रसिद्ध आहे.

**बिकानेरचे महाराज, गंगासिंहजी**—(जन्म स. १८८०–मृत्यु स. १९४३) बिकानेर या राजपुतान्यांतील संस्थानचे सुप्रसिद्ध अधिपति व ब्रि.चे परममित्र.

राष्ट्रकूटाशीं संबंध जोडणाऱ्या यांच्या घराण्यांतील हे एकविसावे पुरुष होत. राव भिकाजी या घराण्याच्या मूळ पुरुषाच्या नावावरून यांच्या संस्थानाला बिकानेर हें नांव मिळालें. वयाच्या अठराव्या वर्षी यांनीं राज्यकारभाराचीं सूत्रें ताब्यांत घेतलीं.

क्षेत्रफळाच्या दृष्टीनें हिंदुस्थानांतील संस्थानांत यांचा सातवा नंबर लागत असूनहि ब्रिटिश सरकारला यांनीं वेळोवेळीं केलेल्या लष्करी मदतीमुळें यांचें नांव हिंदुस्थानच्या पहिल्या दर्जाच्या संस्थानिकांत जाऊन बसलें. आपल्या शार्दूल लाइट इन्फन्ट्री, डुंगर लान्सर्स इत्यादि लढाऊ पथकांबरोबर यांनीं गंगा रिसाला या ४६५ उंटांच्या पथकांचे प्रमुख म्हणून यांनीं चीन युद्ध (१९००-०१), इजिप्त व पॅलेस्टाईन नि फ्रान्स (पहिलें महायुद्ध) इत्यादि आघाड्यांवर जे पराक्रम गाजविले त्यामुळें यांना आंतरराष्ट्रीय कीर्तीचा लाभ झाला.

याच कारणानें युद्धानंतर यांची इंपीरियल वॉर कॅबिनेट कॉन्फरन्सला व व्हर्सायच्या पीस कॉन्फरन्सला हिंदुस्थानांतील संस्थानिकांचे प्रतिनिधि म्हणून नेमणूक झाली. याचप्रमाणें लीग ऑफ नेशन्सच्या जिन्हेवाच्या अकराव्या अधिवेशनाला गेलेल्या हिंदी शिष्टमंडळाचें प्रमुखत्व यांचेकडे देण्यांत आलें. चेम्बर ऑफ प्रिन्सेसचेहि हे बरींच वर्षं अध्यक्ष होते (१९२०-२५).

गंगा कॅनॉल ही संस्थानांतील वीस लाखांपेक्षां जास्त किंमतीची कालव्याची योजना हें यांचें संस्थानी कारभारांतील सर्वांत मोठें धाडस होय. संस्थानच्या दक्षिण भागातून वाहणाऱ्या सतलज नदीचें पाणी कालव्याच्या साहाय्यानें संस्थानच्या उत्तर भागात खेळविण्यांत आलें असून त्यायोगें सहा लक्ष वीस हजारांपेक्षां जास्त एकर जमीन पेरणीच्या दृष्टीनें उपयोगण्यांत आणणें शक्य झालें आहे. यामुळें संस्थानच्या या भागांतील लोकसंख्याहि तीस हजारांवरून दीड लक्षापर्यंत गेली आहे. अशा तऱ्हेनें पांच हजार एकरांवरून पावणेचार लक्ष एकरांपर्यंत यांच्या राज्याचा पाणीपुरवठा गेला. १९३७ सालीं यांनीं आपला सुवर्ण-महोत्सव साजरा केला.

**बिर्ला, जुगलकिशोर बलदेवदास**—(जन्म स. १८८५) हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध व्यापारी व हिंदुसंस्कृतिप्रसारक.

यांचें जयपूर राज्यांतील पिलानी हें मूळ गांव. हे जातीनें माहेश्वरी वैश्य. बिर्ला बंधूंपैकीं हे सर्वांत वडील होत. मातृपितृभक्ति व बंधुप्रेम यांबद्दल बिर्ला बंधूंची प्रसिद्धि आहे. हे व्यापक हिंदुसंस्कृतीचे सक्रिय पुरस्कर्ते आहेत. यांनीं आपल्या मारवाडांतील पिलानी गांवीं बिर्ला कॉलेज काढलें असून तेथें यांनीं अनेक शिष्यवृत्त्या ठेविल्या आहेत. दिल्लीचें लक्ष्मीनारायणमंदिर यांनीं पांच लक्ष रुपये खर्च करून बांधलें. तेथें तें बिर्लामंदिर या नांवानें ओळखलें जातें. बौद्ध यात्रेकरूंकरितां कुशीनगर, सारनाथ, मुंबई, कलकत्ता व दार्जिलिंग या ठिकाणीं यांनीं धर्मशाळा व बुद्धदेवमंदिरें, बांधिलीं आहेत. परमहंसाश्रम, बरहज (जि. गोरखपूर) येथें १९२६-१९४० पर्यंत कंबोडिया, इंडो चायना सयाम, आराकान, ब्रह्मदेश व सिलोन येथील जे बौद्ध भिक्षु हिंदी शिकत होते त्यांचा खर्च हे चालवीत. बुद्धदेव हायस्कूल, कुशीनगर याला यांनीं पंचवीस हजारांची मदत केली. दर वर्षी अशा कामांत हे वीस लक्ष रुपयेपर्यंत दान करतात असें म्हणतात.

**बिर्ला, घनश्यामदास बलदेवदास**—(जन्म स. १८९४) हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध कारखानदार व व्यापारी.

बिर्ला ब्रदर्स लि. या हिंदुस्थानांतील मोठ्या व्यापारी संस्थेचा आज उभा असलेला पसारा हे व यांचे बंधु रामेश्वरदास व ब्रजमोहन वगैरेंच्या योजकतेचें फळ आहे. या संस्थेचे हे बंधु मॅनेजिंग डायरेक्टर असून एक ज्यूट मिल; कलकत्ता, दिल्ली, ग्वाल्हेर, ओकारा व भिवानी येथें कापडाच्या गिरण्या, पांच साखरेच्या गिरण्या इतक्या मोठ्या प्रमाणावर या संस्थेचा व्यवहार चालविला जातो. इन्शुअरन्स कंपन्या, टेक्स्टाइल मिल्स व कलकत्ता आणि मुंबई या दोन महत्त्वाच्या ठिकाणच्या मालाची आवक-जावक ह्या गोष्टी यांच्या या धंद्याला पूरक म्हणून केल्या जातात. अलिकडे मुंबईस यांनीं स्थापन केलेला हिंद सायकल्स लि. हा हिंदुस्थानांतील पहिला सायकलींचा कारखाना होय.

हिंदुस्थानच्या व्यापारी जगांत एक वजनदार व्यापारी अशी यांची स्वतःची ख्याति असून इंडियन चेंबर ऑफ कॉमर्स, कलकत्ता ( १९२४ ), फेडरेशन ऑफ इंडियन चेंबर्स ऑफ कॉमर्स ॲन्ड इन्डस्ट्री ( १९२९ ) इत्यादि ठिकाणच्या यांना देण्यांत आलेल्या अध्यक्षस्थानां-वरून ती स्पष्ट होते. इंडियन फिस्कल कमिशन, रॉयल कमिशन ऑन् लेबर वगैरेंचेहि यांना सभासद निवडण्यांत आलें होतें. १९२७ सालीं जिन्हेवा येथें भरलेल्या लेबर कॉन्फरन्सला हे हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून हजर राहिले असून हिंदी-इंग्रजी व्यापारीसंबंधाबाबतचे यांना कांहीं काळ सरकारी सल्लागार नेमण्यात आलें होतें ( १९३६-३७ ).

म. गांधींच्या अतिविश्वासांतील माणसांत यांची गणना होते. दिल्ली, मुंबईसारख्या कोणत्याहि मोठ्या शहरीं महात्माजी जावोत. त्यांचा मुक्काम 'बिर्ला-हाउस'-मध्यें असावयाचा ही गोष्ट प्रसिद्ध समजली जाते. अर्थातच अलिकडे गांधीजींनीं त्या त्या गांवच्या अस्पृश्य वस्तींत जाऊन राहावयाचें धोरण स्वीकारल्यानें या परिपाठांत खंड पडला आहे.

म. गांधींच्या व्यक्तिमत्त्वाच्या छटा स्पष्ट करणारे आपले अनुभव यांनीं ' बापू ' या नांवानें हिंदी भाषेंत प्रसिद्ध केले. कै. महादेव देसाई यांनीं या ग्रंथाला प्रस्तावना लिहिली असून निकटच्या मनुष्याचे अनुभव या दृष्टीनें या ग्रंथास महत्त्व असल्याचें त्यांनीं त्यांत म्हटलें आहे. या ग्रंथाचा मराठी अनुवाद बा. म. तारकुंडे व ना. ग. जोशी यांनीं केला आहे.

यांचे इतर ग्रंथ—Indian Currency in Retrospect.

**बिलग्रामी, डॉ. सय्यद हुसन**—( जन्म स. १८४२–मृत्यु स. १९२६ सुमार ) हैदराबाद संस्थानांतील सुप्रसिद्ध सार्वजनिक कार्यकर्ते व अनेक-भाषा-पंडित.

मेसापोटिमियांतून मुहंमद घोरीबरोबर हिंदुस्थानांत आलेल्या बिलग्रामच्या सय्यद घराण्यांत यांचा जन्म झाला. लखनौच्या कॅनिंग कॉलेज व रुर्कीच्या टॉमस सिव्हिल एंजिनियर कॉलेजमध्यें आपलें शिक्षण संपवून हे उच्च शिक्षणासाठीं इंग्लंडला रवाना झाले व तेथील रॉयल स्कूल ऑफ माइन्समध्यें शिक्षण घेऊन यांनीं प्रस्तरशास्त्रांतील मुर्चिसन सुवर्णपदक मिळविलें.

हिंदुस्थानांत आल्यानंतर हे सालरजंग यांच्या सल्ल्यावरून हैदराबाद संस्थानच्या पब्लिक वर्क्स, रेल्वे व खाणींचे मुख्य अधिकारी बनले. यानंतर कांहीं दिवस त्या संस्थानच्या शिक्षणखात्याचे प्रमुख म्हणून काम केल्यानंतर हे कार्यनिवृत्त झाले ( १९०१ ). यांची संस्थानमधील सर्वच कारकीर्द यांच्या सुधारणाप्रिय वृत्तीमुळें गाजली.

यांना अनेक भाषा येत. मद्रास युनिव्हर्सिटीचे हे कित्येक वर्षे ( १८९०-२ ) संस्कृतचे परीक्षक, केम्ब्रिज युनिव्हर्सिटींत मराठीचे लेक्चरर अशा अनेक ठिकाणीं कामें करून आपलें बहुभाषित्व यांनीं व्यक्त केलें. अरबी भाषेंतील यांच्या प्राविण्याबद्दल यांना शम्स-अल-उल्मा अशी पदवी देण्यांत आली.

इंग्लंडमध्यें असतां दिल्ली मॅन्युस्क्रिप्ट्स या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या अरबी व पर्शियन हस्तलिखितांच्या सूचीचें काम इंडिया ऑफिसनें यांचेकडे सोंपविलें.

यांचे ग्रंथ—( 1 ) Civilization of Arabs ( डॉ. गुस्टाव ली बॉन यांच्या फ्रेंच ग्रंथाधारें ), ( 2 ) A Guide to Cave Temples of Ellora, ( 3 ) The Geology and Economic Minerals of Hyderabad इत्यादि.

**बीडकर, नरहर रावजी**—( जन्म स. १८५८–मृत्यु स. १९३३ जुलै १४ ) एक दानशूर व धार्मिक गृहस्थ.

यांचे वडील पुणें येथें बेलबागेंत गवई होते. साधारण

शिक्षण झाल्यावर यांनीं रेल्वेंत मालधक्क्यावर नोकरी पत्करिली. चाळीस वर्षे नोकरी करून हे सेवानिवृत्त झाले. तेव्हां हे 'चीफ ट्रफिक कॅन्व्हासर' म्हणून काम करीत होते. यांच्या अनुभवाचा फायदा मिळावा म्हणून रेल्वेचे फाटे कोणत्या टापूंतून गेले असतां रेल्वे कंपनीस व लोकांस फायदा होईल याची तपासणी रेल्वे कंपनीनें यांच्याकडून करून घेतली. यांचा ओढा स्वधर्म व विद्यावृद्धि यांकडे असे. यांनीं पुढीलप्रमाणें देणग्या दिल्या. मुंबई विद्यापीठ, बीडकर शिष्यवृत्ति व पारितोषिक देण्याकरितां–दहा हजार; पुणें शिक्षणप्रसारक मंडळ, मीमांसाविद्यालय–सहा हजार; डेक्कन एज्युकेशन सोसायटी, पुणें वेदशास्त्रोत्तेजक सभा-प्रत्येकीं पांच हजार; केडगांव नारायणमहाराज–दोन हजार. या देणग्यांच्या व्याजांतून यांच्या नांवें शिष्यवृत्त्या वगैरे देण्याची व्यवस्था यांनीं केली आहे.

**बूलर, डॉ. जोहान जॉर्ज**—( जन्म स. १८३७–मृत्यु स. १८९८ ) सुप्रसिद्ध जर्मन प्राच्यविद्यापंडित व संशोधक.

हॅनोव्हरमधील बोर्स्टेल हें गांव यांचें जन्मस्थान. हॅनोव्हर व गोटिंगेन येथें आपलें शिक्षण संपवून हे प्राच्यविद्या व इतिहास यांचे पदवीधर झाले. यानंतर पॅरिस, लंडन व ऑक्सफर्ड येथें संस्कृत भाषेचें विशेष अध्ययन केल्यानंतर हे हिंदुस्थानला आले. हिंदुस्थानांत आल्यानंतर मुंबई सरकारच्या शिक्षणखात्यांत एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें संस्कृतचे प्राध्यापक, एज्युकेशनल इन्स्पेक्टर व पुण्याच्या संस्कृत अभ्यासक्रम कमेटीचे प्रमुख म्हणून काम केल्यानंतर हे कार्यनिवृत्त झाले ( १८८० ).

परदेशीं गेल्यानंतर व्हिएन्ना युनिव्हर्सिटींत यांना प्राच्यविद्या व हिंदुस्थानचा इतिहास खात्याचे प्रमुख नेमण्यांत आलें. याच सुमारास यांनीं Encyclopeadia of Indo-Aryan Philology या आपल्या आयुष्यांतील महत्त्वाच्या कार्यास सुरवात केली. परंतु तें कार्य अपूर्ण स्थितींत असतांनाच लिन्डॉ येथील लेक कॉन्स्टन्स्-( तलावा )मध्यें बुडून हे मरण पावले.

संस्कृत भाषा व हिंदी संस्कृति यांच्या अत्यंत मेहनती अभ्यासकांत यांची गणना होते. मॅक्स मूलर यांच्या सूचनेवरून यांनीं संस्कृत भाषेंत लक्ष घातलें. यांचें या भाषेवरील प्रेम इतकें वाढलें कीं, हिंदुस्थानांतील संस्कृत भाषेच्या पंडितांना भेटण्यासाठीं हे खास हिंदुस्थानला आले. संस्कृत भाषेचा जुन्या परंपरेनें वारसा मिळालेले महाराष्ट्रांतील शास्त्री लोकांचें ज्ञान व युरोपियन लोकांची नवी संशोधक दृष्टि एकत्र करून कार्य करण्याची यांची कल्पना होती व ती अनुभवान्तीं इतकी यशस्वी ठरली कीं, सर्व हिंदुस्थानांत तिचें अनुकरण होऊं लागलें.

मुंबई प्रांतांतील नवशिक्षित पंडितांना संशोधनाची पाश्चात्य पद्धत शिकवण्याच्या हेतूनें यांनीं प्रा. कीलहॉर्न यांचे सहकार्यानें बॉम्बे संस्कृत सीरीज सुरू केली. या मालेसाठीं यांनीं स्वतः पंचतंत्रम्, दशकुमारचरितम् व विक्रमाङ्कदेवचरितम् संपादून कार्याची दिशा दाखवून दिली, व पुढें यांच्या प्रेरणेनें संशोधनक्षेत्रांत शिरलेल्या सर डॉ. रा. गो. भांडारकर, का. त्रिं. तेलंग, शं. पां. पंडित, वामन शिवराम आपटे वगैरे पहिल्या दर्जाच्या संशोधकांची एक नवीच पिढी महाराष्ट्रांत तयार झाली.

महाराष्ट्रांतील या विशिष्ट वर्गांत यांनीं मिळवलेल्या मान्यतेमुळें पुढें यांना हस्तलिखित ग्रंथ मिळवणें अतिसुलभ झालें. केवळ पहिल्या तीन वर्षांत ( १८६३-६६ ) यांनीं दोनशें हस्तलिखितें जमविलीं. पुढें मुंबई सरकारनें यांच्या या कार्यासाठीं एक स्वतंत्र खातें उघडलें व यांना त्याचे प्रमुख करून हिंदुस्थानांतील ऐतिहासिक महत्त्व असणाऱ्या जवळजवळ सर्व ठिकाणीं यांची सोय केली. यांनींहि उपलब्ध साधनांचा जास्तींत जास्त उपयोग करण्याची शिकस्त केली. राजपुतान्यांतील जैसलमेरच्या जैन ग्रंथभांडारांतील ग्रंथ मिळविण्यासाठीं त्या रखरखीत प्रदेशांतून यांनीं उंटावरून केलेला प्रवास या दृष्टीनें नमुनेदार आहे. काश्मीरमधील 'पृथ्वीराजमहाकाव्य' या शारदा लिपींत भूर्जपत्रांवर लिहिलेल्या ग्रंथाच्या प्राप्तीसाठीं यांना असेच श्रम पडले. वेद व इतर ग्रंथांतील काश्मिरी पाठभेद व श्वेतांबर जैनांच्या प्राकृत व संस्कृत ग्रंथांचें संशोधन ही यांच्या या सर्व संशोधनाची रूपरेखा आहे.

यांपैकीं जैनधर्मासंबंधीच्या यांच्या संशोधनाला एक नव्या अध्ययनक्षेत्राच्या जनकत्वाचा मान पुढें मिळाला. जैन धर्मासंबंधीं हिंदुस्थानांत सांपडलेले पांचशें हस्तलिखित ग्रंथ यांनीं बर्लिन युनिव्हर्सिटीकडे पाठविले व तेच पुढें वेबर, ल्युमन, जॅकोबी यांच्या महत्त्वपूर्ण संशोधनास कारणीभूत झाले. यांपैकीं प्रो. जॅकोबी यांनीं तर यांच्याबरोबर जैनविहारांत प्रवास केला व नंतर आचाराङ्गसूत्रें व कल्पसूत्रें यांच्या संशोधित आवृत्त्या व अनुवाद प्रसिद्ध केला. याशिवाय यांनीं स्वतः Indian Sect of the Jainas ही मथुरा व खारवेल शिला-

लेखावर आधारलेली जर्मन पुस्तिका प्रसिद्ध केली. जैन धर्माचा काल बुद्धापूर्वी ठरविण्याचा साधार प्रयत्न यांत केला आहे.

यांच्या शिलालेखाच्या अध्ययनाला प्राचीन लिपिज्ञानाची जोड असल्यानें यांचें कार्य अधिक सुलभ होई. On Indian Brahma Alphabet व Indische Palāogrophie (1896) हे यांचे या विषयावरील प्रमुख जर्मन ग्रंथ होत. यांपैकीं दुसऱ्या ग्रंथांत प्राचीन लिपींचे नऊ नकाशे असून त्याचा इंग्रजी अनुवाद डॉ. फ्लीट यांनीं केला. परदेशी संशोधकांना हिंदी प्राचीन लिप्यांची इतकी सुबोध माहिती देणारा दुसरा ग्रंथ अजून तयार झाला नाहीं.

या सर्व संशोधनांत हिंदुस्थानची सर्व दृष्टींनीं माहिती देणाऱ्या ज्ञानकोशाची यांनीं अध्याहृत धरलेली कल्पना विशेष महत्त्वाची आहे. हिंदुस्थानचा धार्मिक, राजकीय व तात्त्विक इतिहास सादर करणारे शिलालेख, ताम्रपत्रें, भूर्जपत्रें, हस्तलिखितें यांचें यांनीं या विशिष्ट दृष्टीनें परीक्षण केलें व पुरेशी सामुग्री जमतांच यांनीं व्हिएन्ना येथें Encyclopædia of Indo Aryan Philology ही प्रचंड जर्मन ग्रंथमाला सुरू केली. जगाच्या निरनिराळ्या भागांतील तीस विद्वानांच्या सहकार्यानें हें कार्य सुरू झालें. यांच्या हयातींत प्रसिद्ध होऊं शकलेले या ग्रंथाचे नऊ भागच यांच्या संकल्पित कार्याची कल्पना आणून देण्यास समर्थ आहेत. या ग्रंथाच्या पहिल्या खंडांतील Indian Paleography हा भाग यांनीं लिहिला आहे.

हिंदुस्थानचा इतिहास व संस्कृति यांच्या सतत सहवासामुळें हिंदुस्थानबद्दल एक स्वतंत्रच जिव्हाळा यांचे मनांत उत्पन्न झाला होता. जगाच्या पाठीवरील कोणत्याहि संशोधकपरिषदेच्या हिंदुस्थानशाखेचें प्रमुखपद हे मोठ्या उत्साहानें स्वीकारीत. हिंदुस्थानच्या इभ्रतीबद्दल तर हे सदाच जागरूक असत. मॅक्स मूलर यांच्याशीं संस्कृत काव्य-वाङ्मयासंबंधीं यांनीं केलेला वाद या दृष्टीनें नमुनेदार आहे. वेद व बुद्ध याशिवाय बाकीच्या संस्कृत काव्यवाङ्मयावर शकवाङ्मयाची स्पष्ट छाया आहे असें विधान एकदां मॅक्स मूलरनें केलें. ताबडतोब यांनीं Indian Inscriptions and Kavya Literature हा निबंध लिहून त्यांचें म्हणणें खोडून टाकलें. गुप्तपूर्व शिलालेखांतील संस्कृत काव्यांचे उतारे काढून दाखवून यांनीं आपलें हें म्हणणें मॅक्स मूलरना मान्य करण्यास भाग पाडलें.

यांचें इतर वाङ्मय—( 1 ) Digest of the Hindu Law of Inheritance, Partition and Adoption; ( 2 ) Aphorisms of the Sacred Laws of the Hindus by Apastambha, ( 3 ) Glossary of the oldest Prakrit Dictionary, ( 4 ) Sacred Books of the East मधील दुसरा व चवदावा खंड, ( 5 ) Indian Antiquary मधील ८५ लेख इत्यादि.

**बेझंट, डॉ. ॲनी**—( जन्म स. १८४७–मृत्यु स. १९३३ सप्टें. २० ) जगांतील सुप्रसिद्ध तत्त्ववेत्त्या, वक्त्या व थिऑसॉफिकल सोसायटीच्या अध्यक्ष ( १९०७–३३ ).

यांच्या वडिलांचें नांव वुइल्यम पेजवुड. आईचें नांव एमिली. यांचें शिक्षण खासगी रीतीनें इंग्लंड, जर्मनी व फ्रान्समध्यें झालें. स. १८६६ सालीं रे. फ्रँक बेझंट यांच्याशीं यांचा विवाह झाला. एका प्रसंगीं यांचीं दोन मुलें–मुलगा व मुलगी अत्यवस्थ झालीं. तेव्हां यांचा देवावरील व प्रार्थनेवरील विश्वास उडाला आणि या पतीपासून विभक्त होऊन आपल्या मातेकडे येऊन राहिल्या. यांच्या सहवासानें मुलें नास्तिक होतील म्हणून मुलांचा ताबाहि यांना मिळाला नाहीं. तेव्हांपासून यांनीं आपल्या लेखनवाचनाच्या कार्याला सुरुवात केली ( १८७३ ).

१८७३ ते १८९३ पर्यंत यांनीं इंग्लंडांत प्रसिद्ध अज्ञेयवादी व राजकारणपटु चार्लस ब्रॅडला यांच्या साहचर्यानें काम केलें. त्यांच्या नॅशनल रिफॉर्मरच्या या सहसंपादक झाल्या. अज्ञेयवाद, राजकारण, संततिनियमन वगैरे गोष्टींचा यांनीं मोठ्या धडाडीनें प्रचार केला. अनेक विषयांचा अभ्यास करून या १८८५ सालीं समाजसत्तावादी झाल्या. त्या वेळीं फेबियन सोसायटी व मजूरपक्षाची स्थापना झाली, त्यांत यांचा भाग प्रमुख होता.

या सुमारास यांची व मॅडम ब्लॅव्हॅट्स्की यांची गांठ पडली. त्यांच्या 'सीक्रेट डॉक्ट्रिन' या ग्रंथाचें पर्यालोचन करून यांनीं आपल्या अध्ययनास अध्यात्माची जोड दिली. त्यांतील प्रमेयें वाचीत असतां यांना पूर्वस्मृती जागृत होत आहेत असें वाटूं लागलें व या थिऑसॉफिस्ट झाल्या व यांना गुरुदेवांचे साक्षात्कार होऊं लागले. यांनीं त्या ज्ञानाचा प्रचार जगभर करण्याचें ठरविलें आणि या १८९३ अखेर हिंदुस्थानांत येऊन दाखल झाल्या. पुढील वीस वर्षांत यांनीं जगांत या

कार्याकरितां सतत संचार केला. बनारस येथें सेंट्रल हिंदु कॉलेज स्थापून धर्मशिक्षणाचा प्रत्यक्ष अभ्यासक्रमांत समावेश करून तो यशस्वी करून दाखविला. गीता, उपनिषदें, रामायण, महाभारत वगैरेंवर व्याख्यानें देऊन तीं ग्रंथरूपानें प्रसिद्ध केलीं. सेंट्रल हिंदु कॉलेज मॅगेझीन मासिक चालविलें. ब्रह्मचर्याश्रमाचें पुनरुज्जीवन करून आपल्या लेखन-व्याख्यानाच्या उत्पन्नांतून पंचाहत्तर हजार रुपये वरील संस्थेस देणगी म्हणून दिले. याप्रमाणें दहा लाख रुपये किंमतीची, एक हजार विद्यार्थी असलेली ती संस्था पं. मदनमोहन मालवीय यांस त्यांच्या भावी हिंदु विश्वविद्यालयाचा पहिला घटक म्हणून त्यांना १९१५ सालीं यांनीं अर्पण केली.

१९०७ सालीं कर्नल आल्कॉट दिवंगत झाल्यावर थिऑसॉफिकल सोसायटीच्या या अध्यक्ष झाल्या. सोसायटीचें आद्यपीठ अड्यार-आश्रमाचें संवर्धनास सुरुवात करून अडीचशें एकर आश्रमाचा व्याप यांनीं वाढविला. तेथें छापखाना, ग्रंथविक्रीचें दुकान, विद्युद्दीप, वसतिगृहें वगैरेंची व्यवस्था केली. या स्थानास या गुरुदेवांचा आश्रम म्हणत. यांनीं १९०९ सालीं पृथ्वीपर्यटणास निघून जगद्गुरूंच्या आगमनाची घोषणा केली. जे. कृष्णमूर्ती व यांची भेट झाली, तेव्हां ते चवदा वर्षांचे होते.

१९१३ सालीं यांनीं हिंदी राजकारणांत प्रवेश केला. Wake up India या विषयावर मद्रास येथें व्याख्यानमाला गुंफून कॉमनवील नांवाचें एक साप्ताहिक काढलें. इंग्लंडला जाऊन हिंदी स्वराज्यावर व्याख्यानें दिलीं. १९१४ सालीं या हिंदुस्थानांत परत आल्या. मद्रास स्टँडर्ड हें दैनिक खरेदी करून त्याला न्यू इंडिया हें नवीन नामाभिधान दिलें. हिंदी स्वराज्याची घोषणा करून मवाळ-जहालांचा समेट घडवून आणला. ४ ऑगस्ट १९१४ ला पहिलें महायुद्ध सुरू झालें. युद्धकालांत काँग्रेस भरवावी किंवा नाहीं असा प्रश्न उपस्थित झाला असतां इतर वसाहतींप्रमाणें स्वराज्याची मागणी करण्याची हीच वेळ आहे असें प्रतिपादून यांनीं मद्रास काँग्रेसमध्यें होमरूलचा ठराव मान्य करून घेतला. सर्व हिंदुस्थानभर प्रचार करून १९१६ सालीं होमरूललीग स्थापन केली. लखनौ राष्ट्रसभेंत हिंदु-मुसलमान पुढाऱ्यांची एकमुखी मागणी करण्यांत यश मिळविलें. भारतमंत्री मॉंटेग्यु हिंदुस्थानांत आले तेव्हां त्यांना स्वराज्य शिष्टमंडळें भेटविलीं. मद्रास पार्लमेंट संस्था काढून पार्लमेंटरी पद्धतीचा लोकांना परिचय करून दिला. या यांच्या कामगिरीमुळें १९१७ च्या कलकत्ता राष्ट्रसभेचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें. येथून पुढें मात्र हिंदुस्थानानें इंग्लंडपासून अलग होण्याची भाषासुद्धां बोलूं नये असें यांचें धोरण झाल्यानें या लोकांना अप्रिय होत चालल्या. असहकारितेची व कायदेभंगाची चळवळच यांना अनिष्ट वाटली. 'कॉमनवेल्थ ऑफ इंडिया' कायदा पार्लमेंट-कडून मान्य करून घेण्याचा यांनीं प्रयत्न केला. पण राष्ट्रसभेंत त्याला अनुमोदकसुद्धां मिळाला नाहीं (१९२५).

अड्यार येथें यांचें देहावसान झाल्यावर यांच्या देहाला अग्निसंस्कार देण्यांत आला. यांच्या अस्थि द्वारकानाथपंत तेलंग यांनीं काशीस नेल्या. तेथें त्यांची मिरवणूक काढून बाबू भगवानदास यांच्या हस्तें गंगेच्या मध्यांत विसर्जन करण्यांत आल्या. अड्यार आश्रमांत यांची रक्षा समुद्रकांठाजवळ 'गार्डन ऑफ रिमेम्ब्रन्स' या सप्तदलांकित पद्माकृति उद्यानांत पात्रांत भूमिगत ठेविली आहे. याच ठिकाणीं लेड्बीटर यांचीहि रक्षा ठेविली आहे. ब्लॅव्हॅट्स्की बाईच्या पश्चात् थिऑसफीच्या अन्तःशाखेच्या या अखेरपर्यंत प्रमुख होत्या. ब्रिटिश म्युझियम लायब्ररींत यांनीं केलेल्या ३३० पुस्तकांची नोंद आहे. याशिवाय यांनीं कितीतरी नियतकालिकें चालविलीं. प्रचार आणि संघटना कशी करावी हें यांच्यापासून शिकावें.

यांनीं धर्म, समाज व तत्त्वज्ञान यांकडे पाहण्याची अगदीं नवी दृष्टि उत्पन्न केली. यांच्या आस्तिक्यबुद्धींत मूळसंशोधनाची दृष्टि असे आणि या आधुनिक शास्त्रांच्या साहाय्यानें जुन्या आचारविचारांचा जो उलगडा करीत त्यामुळें यांच्याबद्दल आधुनिक लोकांत विलक्षण आदर उत्पन्न होई. यांच्यांत विलक्षण संघटनाशक्ति होती आणि यांच्या लेखनभाषणांतील आकर्षकपणाला तोड नसे. चिकित्सा आणि भाविकता यांचा चमत्कारिक मेळ यांच्यांत आढळे. त्यामुळें यांच्या अनुयायांत जगाच्या सर्व भागांतून लोक ओढले गेले.

कार्याचा प्रचंडपणा, अलौकिकता, संघटनाचातुर्य व निग्रह वगैरेंमुळें जगांतील अद्वितीय माणसांत यांची गणना होते.

**बेलवलकर, रा. ब. डॉ. श्रीपाद कृष्ण—** (जन्म स. १८८०) सुप्रसिद्ध संस्कृत पंडित, प्राच्यविद्यासंशोधक व महाभारताच्या चिकित्सक आवृत्तीचे मुख्य संपादक.

यांचें शिक्षण राजाराम हायस्कूल व कॉलेज, कोल्हापूर आणि डेक्कन कॉलेज, पुणें येथें झालें. बी. ए. ( १९०२ ); दक्षिणा फेलो १९०२ ते १९०४; एम्. ए. ( १९०४; १९०५; १९१० )—भाषा, इतिहास व अर्थशास्त्र आणि तत्त्वज्ञान अशा भिन्न विषयांत मुंबई युनिव्हर्सिटीच्या एम्. ए. परीक्षेंत उत्तीर्ण होण्याचा मान यांनींच प्रथम मिळविला. अमेरिकेच्या हार्वर्ड विश्वविद्यालयांत सुप्रसिद्ध डॉ. लॅन्मन यांचेजवळ ( १९१२-१४ ) यांनीं उच्च संशोधनाचें अध्ययन करून आपल्या उत्तररामचरितावरील प्रबंधाबद्दल पीएच्. डी. ही पदवी संपादन केली. अमेरिकेस जाण्यापूर्वी कांहीं वर्षे ( १९०७-१९१२ ) डेक्कन कॉलेजांतील हस्तलिखितसंग्रहावर क्यूरेटर म्हणून यांनीं काम केलें, व त्याच वेळीं या संग्रहाच्या कॅटलॉगाचा प्रथम भाग यांनीं छापण्यास दिला व संस्कृत भाषेच्या निरनिराळ्या व्याकरणांवर ( Systems of Sanskrit Grammar ) एक निबंध लिहून मंडलिक सुवर्णपदक मिळविलें. अमेरिकेंतून परत आल्यावर डेक्कन कॉलेजांतच यांची संस्कृत प्राध्यापक म्हणून नेमणूक झाली ( १९१५ ), व तेव्हांपासून डेक्कन कॉलेज कांहीं सरकारी अधिकाऱ्यांच्या कारवाईनें बंद पडेपावेतों तेथेंच काम केलें. पुढें डेक्कन कॉलेजच्या माजी विद्यार्थ्यांची संघटना करून नेक नामदार बॅरिस्टर मुकुंदराव जयकर यांच्या कायदेपटुत्वाच्या जोरावर सुसरीनें गिळलेलें हें डेक्कन कॉलेजरूपी माणिक परत मिळविण्याचा विक्रम मुख्यतः यांच्याच प्रयत्नानें सिद्धीस गेला. सेवानिवृत्त होण्यापूर्वी कांहीं महिने यांना अहमदाबादच्या गुजराथ कॉलेजमध्यें प्राध्यापकाचें काम करावें लागलें आणि सेवानिवृत्तीनंतर ३ वर्षे हिंदु विश्वविद्यालय, बनारस येथेंहि यांनीं संस्कृत प्राध्यापकाचें काम केलें.

अमेरिकेहून परत आल्यावर ज्या एका महत्त्वाच्या कामाचा इतर सहव्यवसायांसमवेत यांनीं उपक्रम केला तें म्हणजे भांडारकर प्राच्य विद्यासंशोधनमंदिराची स्थापना. या संस्थेचा उद्घाटनसमारंभ ६ जुलै १९१७ रोजी गुरुवर्य डॉ. रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांच्या ८१ व्या वाढदिवशीं झाला. तत्पूर्वी २ वर्षे व नंतर ६ वर्षे यांनीं सदर संस्थेच्या ऑनररी सेक्रेटरीचें काम केलें होतें, व संस्थेच्या कार्यकारिणीवर यांची सतत नेमणूक होत आली आहे. किंबहुना या प्राच्यविद्यासंशोधनमंदिराचे हे बहिश्चर प्राण होत असें म्हणणें मुळींच अतिशयोक्तीचें होणार नाहीं. भांडारकर इन्स्टिट्यूट प्रसिद्ध करीत असलेल्या महाभारताच्या चिकित्सक आवृत्तीशीं यांचा आरंभापासून निकट संबंध होताच, व एप्रिल १९४३ पासून त्या आवृत्तीच्या मुख्य संपादकाचें कामहि यांच्यावर पडलें आहे. पुण्यांतील–'पुणें संस्कृत कॉलेज'च्या स्थापनेशीं व कार्याशींहि यांचा घनिष्ट संबंध आहे.

ऑल-इंडिया ओरिएंटल कॉन्फरन्सचें पहिलें अधिवेशन पुणें येथें १९१९ च्या डिसेंबरांत झालें. तेव्हांपासून कॉन्फरन्सच्या प्रत्येक अधिवेशनांत यांनीं भाग घेतला आहे. बरींच वर्षे हे या कॉन्फरन्सचे सेक्रेटरी होते व १९४३ सालच्या बनारस येथें भरलेल्या कॉन्फरन्सच्या जनरल प्रेसिडेंटचा बहुमान यांना मिळाला.

संशोधन व लेखन हाच यांचा प्रधान व्यवसाय असल्यानें यांनीं संशोधन करून इंग्रजी भाषांतर व टिप्पणींसह प्रसिद्ध केलेलें उत्तररामचरित, काव्यादर्श, वेदान्तसूत्रभाष्य, भगवद्गीता इत्यादि ग्रंथ व शाकुन्तल, मृच्छकटिक, उपनिषदें, वेद, सांख्य, भगवद्गीता इत्यादि ग्रंथांवर लिहिलेले ४०।५० निबंध यांमुळें यांचें नांव हिंदुस्थानाबाहेरील प्राच्यविद्याविशारदांमध्यें परिचित झालेलें आहे. प्रा. रामचंद्र दत्तात्रेय रानडे यांच्या सहकार्यानें 'हिस्टरी ऑफ इंडियन फिलॉसफी' ही ८ भागांत पुरी होणारी ग्रंथश्रेणी यांनीं प्रसिद्ध करण्याचा संकल्प केला असून आजवर त्यांपैकीं २ भाग प्रसिद्ध झाले आहेत. महाभारताच्या चिकित्सक आवृत्तींतील भीष्मपर्व ( पृष्ठसंख्या ८०० वर ) हा भाग प्रसिद्ध झाला असून त्यानंतर यांनीं तीन भागांत पुऱ्या होणाऱ्या शांतिपर्वाचें संशोधन कार्य यांनीं हातीं घेतलें.

**बेवूर, सर–गुरुनाथ व्यंकटेश**—( जन्म स. १८८८ ) हिंदुस्थान सरकारच्या पोस्ट ॲन्ड टेलिग्राफ खात्याचे ( माजी ) प्रमुख.

हे मूळचे विजापूर जिल्ह्यांतील बागलकोटचे. पुण्याच्या डेक्कन कॉलेजांतून बी. ए. झाल्यानंतर हे उच्च शिक्षणासाठीं इंग्लंडला रवाना झाले व केम्ब्रिजच्या सिडने ससेक्स कॉलेजांत आपलें पुढील अध्ययन पुरें करून हे बी. ए., आय. सी. एस. झाले.

हिंदुस्थानांत परत आल्यानंतर यांनीं कांहीं दिवस मध्यप्रांत सरकारचे अंडर सेक्रेटरी म्हणून काम केलें.

यानंतर कांहीं दिवस चांदा व नागपूर येथें डे. कमिशनरचें काम केल्यानंतर यांची सरकारच्या पोस्ट खात्याकडे बदली झाली. प्रथम बिहार, ओरिसा, मध्यप्रांत व मुंबई या प्रांतांचे पोस्टमास्तर जनरल म्हणून काम करण्यास सुरुवात करून पोस्ट खात्याचे डायरेक्टर जनरल वगैरे अनेक जागीं यांनीं कामें केली. निवृत्तीच्या वेळीं हे हिंदुस्थान सरकारच्या पोस्ट व तारखात्याचे प्रमुख होते ( १९४२-४६ ). सरकारी नोकरींतील आपल्या कार्यनिवृत्तीनंतर टाटा सन्स लि.नें यांना आपल्या उद्योगधंद्यांतील साहाय्यक म्हणून यांची नेमणूक केली आहे ( १९४६ ).

हिंदुस्थानसरकारच्या पोस्ट खात्याचे प्रतिनिधि म्हणून हे एअर मेल कॉंग्रेस ( १९२७, हेग ); युनिव्हर्सल पोस्टल कॉंग्रेस ( १९२९, लंडन ) व ईंपीरियल टेलिग्राफ कॉन्फरन्स( १९३७, लंडन; १९४२ कॅनबेरा )ला हजर राहिले होते.

मध्यंतरीं कांहीं दिवस संरक्षण खात्याचे ॲडिशनल सेक्रेटरी म्हणूनहि यांची नेमणूक झाली होती ( १९४१-४२ ).

**बेंडॉल, सेसिल**—( जन्म स. १८५६ ) सुप्रसिद्ध संशोधक.

यांचें शिक्षण लंडन व केम्ब्रिज येथें झालें. संस्कृतभाषेचे ज्ञाते व ब्रिटिश म्युझियमच्या प्राच्य विभागाचे हे अध्यक्ष होते. यांनीं बौद्ध धर्माच्या प्राचीन ग्रंथांच्या शोधार्थ नेपाळमध्यें प्रवास केला व तेथें अनेक अज्ञात ग्रंथांचा शोध लावला. राजपुतान्यांत जयपूर, उदेपूर, चितोड वगैरे ठिकाणीं याच उद्देशानें यांनीं प्रवास केला. यांनीं आंबेरच्या सूर्यमंदिरावरील प्राचीन शिलालेख ( वि. सं. १०११ ) व आहाडचा शक्तिकुमारचा शिलालेख यांचा शोध लावला. शिवाय ‘ Journey of Literary and Archæological Research in Nepal and Northern India ’ ( 1918 ) हें पुस्तक चित्रासहित प्रसिद्ध केलें.

**बेन्द्रे, दत्तात्रेय रामचंद्र**—( जन्म स. १८९६ जाने. ३१ ) कानडी भाषेंतील सुप्रसिद्ध कवि व अभ्यासक.

जात चित्पावन ब्राह्मण. यांचें मूळ ठिकाण सांगली संस्थानांतील शिरहट्टी असलें तरी यांचें जन्मस्थान धारवाड. तेथें यांचें माध्यमिक शिक्षण होऊन हे पुणें येथें बी. ए. झाल्यावर धारवाडच्या व्हिक्टोरिया हायस्कुलांत आजीव शिक्षक झाले. पण असहकारितेच्या चळवळींत यांनीं राष्ट्रीय शाळा काढून तेथें शिक्षक म्हणून हे काम करूं लागले. एम्. ए. झाल्यावर प्रथम पुणें व पुढें सोलापूरला हे कानडीचे प्राध्यापक झाले.

यांनीं विसाव्या वर्षापासून कानडींत कविता करण्यास सुरुवात केली. यांचें कानडी, मराठी, संस्कृत व इंग्रजी ग्रंथांचें वाचन चांगलें आहे. यांची भाषा लालित्यपूर्ण व नादवती आहे. हे कांहीं काल ‘स्वधर्म’ व ‘जय कर्नाटक’ यांचे संपादक होते. कन्नड साहित्य-संमेलन, शिमोगा ( १९४३ ) व कन्नड कविसंमेलन, म्हैसूर यांचे हे अध्यक्ष होते. यांच्या जीवनाचें सार–‘ रसवे जनन विरस मरण । समरसवे जीवन ( दिव्य रसीं विरणें जीव। जीवन हें त्याचें नांव ) हें आहे. यांचा गुणगौरव म्हणजे कविता देवीचा गौरव व यांचा जन्मदिनोत्सव म्हणजे नव कर्नाटकाचा जन्मदिनोत्सव होय. इतकी अनन्यश्रद्धा यांनीं आपल्या वाचकवर्गात संपादन केली आहे.

यांच्या मनाचा कल तत्त्वज्ञानाकडे असून हे बाबू अरविंद घोष यांना गुरुमाऊली मानतात.

यांचें वाङ्मय—काव्यसंग्रह–१ कृष्णाकुमारी, २ गरी, ३ मूर्ति, ४ उय्याले, ५ सखीगीत, ६ मेघदूत, ७ गंगावतरण यांपैकीं सखीगीत तरुणांना अत्यंत प्रिय आहे. नाट्यग्रंथ–८ नगेय होगे, ९ उद्धार, १० हुच्चाट गळु, टीका–११ साहित्य मत्तु विमर्श, १२ साहित्यसंशोधन, १३ कन्नड साहित्य विराट स्वरूप, १४ विचारमंजरी, अनुवाद–१५ उपनिषद्रहस्य ( रंगराव दिवाकर व शं. वा. जोशी सहकार्य ), १६ भारतीय नवजन्म.

| यांची कानडी कविता | ( अनुवादक–पु. मं. लाड ) |
|---|---|
| भृंगद बन्नेरी बंतु | भृंगपृष्ठि बसुनि येत |
| कल्पना विलासा । | कल्पनाविलास |
| मसेद गाळि पक्क | पवन पंख आदळतां |
| पडेयुतित्तु सहजप्रासा | उठे सहज प्रास |
| मिंचि मायवागु तित्तु | झळकोनी झांकोळे |
| ओदु मंदहासा ॥ | एक मन्दहास |
| एनु एनु ? जेनु जेनु ? | काय वदूं ? हाच मधु ? |
| एने गुं गुं गाना | स्फुरे गुं गुं गान |
| ओंकारद शंखनादकिंत | शंखनादि ओंकारा– |
| किंचिदूना | हून किंचिदून |
| कविय एकतानकवन | एकतान कवनीं कीं |
| दंते नादलीना | कवी नादलीन |

ओडल नूलिर्निद नेयुर्वते कोळी कीं उदरीचे
जेड जाला रची दोन जाळी
तन्नदैवरेषे बरे युवंने दैवाच्या रेषानीं
ताने भाला लिही विधी भाळीं

**बैरामजी, जीजीभाई**—( जन्म स. १८२२–मृत्यु स. १८९० ) मुंबई प्रांतांतील सुप्रसिद्ध धनिक व दाते.

बॉम्बे स्टीम नॅव्हिगेशन कंपनीचे जीजीभाई दादाभाई यांचे हे चिरंजीव. लहानपणींच हे वडिलांच्या धंद्यांत पडले व लवकरच हे मुंबई इलाख्यांतील 'मर्चन्ट्स प्रिन्स' म्हणून ओळखले जाऊं लागले. मुंबईच्या पहिल्या फायर इन्शुअरन्स कंपनीच्या स्थापनेत जे. ए. फोर्ब्स यांचे हे सहकारी होते.

मुंबई लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत टॉल्स फीज ॲक्ट, कास्ट फेस्टिबल टॅक्स ॲक्टविरुद्ध यांनीं धडाडीनें प्रचार केला. जर पैसे पाहिजे असतील तर ते लोकांच्या अन्नांतून घेऊं नका, दारूवर टॅक्स बसवून मिळवा, या यांच्या रोखठोक सवालामुळें हे सर्वत्र लोकप्रिय झाले.

अहमदाबादच्या व पुण्याच्या सरकारी मेडिकल स्कूलना यांनीं दिलेल्या देणग्यांमुळें यांचें नांव त्या संस्थांना देण्यांत आलें. आतां पुण्याच्या मेडिकल स्कूलचें कॉलेजांत रूपांतर करण्यांत आल्यानंतरहि यांचेंच नांव कायम ठेवण्यांत आलें. मृत्यूपूर्वी यांनीं करून ठेवलेल्या साडेतीन लक्ष रु.च्या ट्रस्टमधून प्रथम एक हायस्कूल व नंतर कॉमर्स कॉलेज ( हिंदुस्थानांत पहिलें ) काढण्यांत आलें.

**बोकील, विष्णु विनायक**—( जन्म स. १९०० सुमार ) मराठींतील सुप्रसिद्ध लघुकथालेखक व कादंबरीकार.

हे मूळचे सासवडचे राहणारे. मुंबई युनिव्हर्सिटीचे बी. ए., बी. टी. झाल्यानंतर यांनीं पुण्याच्या नूतन मराठी विद्यालयांत शिक्षकाची नोकरी पत्करली.

यशवंत मासिकांत प्रसिद्ध झालेल्या 'बेबी' या दीर्घकथेनें हे प्रथम वाचकांच्या डोळ्यांसमोर आले व वळवाचे पाऊस, बोकिलांच्या गोष्टी यांसारख्या लघुकथासंग्रहांनीं व झंझावात, मंगळागौरीच्या रात्री यांसारख्या कादंबऱ्यांनीं यांनीं आपलें नांव लेखक म्हणून पक्कें केलें.

मराठी भाषेंतील अगदीं नव्या पिढींतील लेखकांत यांची गणना होते. महाराष्ट्रांतील मध्यमवर्गाच्या भावनांचें सूक्ष्म विश्लेषण करण्याबद्दल यांची विशेष प्रसिद्धी आहे. याच कारणानें सूक्ष्म दृष्टि व व्यवहार्यतेपासून दूर न ढळणारी लेखणी ह्याच गोष्टी यांच्या वैशिष्ट्य झाल्या आहेत.

मुख्यतः गंभीर लेखक अशी यांची प्रसिद्धी असली तरी अलिकडे यांनीं केलेल्या लिखाणामुळें विनोद या नव्या क्षेत्राचा लाभ यांना झाला आहे. रिचमल क्रॉम्प्टनच्या 'विल्यम'वर आधारलेली यांची 'वसंत' ग्रंथमालेची उभारणी तर संपूर्णतया विनोदावर केली आहे.

समाजांतील विशिष्ट थराचें यथार्थतेनें चित्रण करण्याच्या बाबतींत हे किंवा य. गो. जोशी, ग. ल. ठोकळ, द. र. कवठेकर, र. वा. दिघे वगैरे लोकांकडे मराठी वाचकांचें लक्ष विशेष अपेक्षेनें केंद्रित झालें आहे.

**बोस, आनंदमोहन**—( जन्म स. १८४६–मृत्यु स. १९०६ ऑगस्ट ) राष्ट्रसभेचे अध्यक्ष व ब्राह्मसमाजांतील एक थोर पुरुष.

हे अतिशय बुद्धिमान् असल्यानें प्रेमचंद रायचंद स्कॉलर, म्हणून इंग्लंडला गेले व हिंदुस्थानांतील पहिले रँग्लर व नामांकित कायदेपंडित होऊन परत आले. यांची उत्कट देशभक्ति यांच्या व्याख्यानापेक्षां रोजनिशींत दिसून येते. सात्विक वृत्ति आणि राजकारणी वृत्ति यांचा उत्कृष्ट मेळ यांच्यांत आढळे. यांस बंगालचे म. गो. रानडे असें म्हणत. हे कलकत्त्याच्या बंगाल असोसिएशनचे पहिले सेक्रेटरी ( १८७६ ) व मद्रासच्या राष्ट्रसभेचे अध्यक्ष होते ( १८९८ ).

भारतवर्षीय ब्राह्मसमाजांतून साधारण ब्राह्मसमाज निघाला. तेव्हां आरंभीं हे या फुटीच्या विरुद्ध होते पण ही गोष्ट अपरिहार्य झाल्यावर हे त्याचे शेवटपर्यंत अध्यक्ष होते.

बंगालच्या फाळणीविरुद्ध असणारी बंगाली भावना व्यक्त करण्यासाठीं उभारण्यांत आलेल्या फेडरेशन हॉलचा कोनशिला समारंभ यांच्या हस्तें झाला त्या वेळीं प्रकृति अस्वास्थ्यामुळें यांना स्ट्रेचरवरून आणण्यांत आलें व त्याच ठिकाणीं अत्यवस्थ होऊन हे मृत्यूमुखीं पडले.

**बोस, काली**—( जन्म स. १९११ ) नृत्यकलाविशारद.

यांचे वडील के. एन्. बोस बंगालमध्यें मोठ्या हुद्यावर होते. कॉलेजमध्यें एक वर्ष शिक्षण घेतल्यावर बंगाल, दिल्ली व पंजाबमधील अनेकांकडून यांनीं नृत्यशिक्षण घेतलें. बंगाली जानपद व उत्तरेकडील विदग्ध ( कथ्थक ) हें यांचें वैशिष्ट्य आहे. त्यांत यांनीं स्वतःचें वैशिष्ट्य निर्माण केलें आहे. त्यांत अनुक्रमें यांच्या पुतणी व शिष्या निरा व हिरा बोस यांचें यांना साहाय्य असतें. महाराष्ट्रांतील औंधच्या राजकन्यांना यांनीं सहा महिने नृत्यशिक्षण दिलें. प्रभातच्या 'शेजारी' चित्रपटांतील नृत्यें यांनीं बसविलीं आहेत.

यांनीं नृत्यकलेवरील अनेक पुस्तकांचा बारकाईनें अभ्यास केलेला आहे. मद्रासला प्रसिद्ध झालेलें 'ताण्डवलक्षणम्' हें इंग्रजी भाषान्तरासह प्रसिद्ध झालेलें पुस्तक या विषयावरील पुस्तकांत सर्वोत्कृष्ट आहे असें यांचें मत आहे. यांची पूजा, बगीचा, पुष्पवाटिका वगैरे नृत्यें वस्तूंचें यथातथ्य चित्र उभें करण्याच्या दृष्टीनें उत्कृष्ट आहेत.

**बोस, खुदीराम**—( जन्म स. १८९० सुमार–फांशी स. १९०८ ऑगस्ट ) बंगाल्यांतील बाँब फेकून अत्याचार करणारे पहिले क्रान्तिकारक.

१९०८ एप्रिल ३० रोजीं रात्रीं ८ वाजतां यांनीं मुझफरपूरचे डि. जज्ज मि. किंग्जफोर्ड यांचे घरासमोर बाँब फेकला. मि. किंग्जफोर्ड यांच्यावर हल्ला करण्याचा मूळचा बेत. पण चुकीच्या समजुतीनें बाँब केनेडीबाईच्या गाडीवर फेकला गेला आणि त्या बाई मुलीसह मेल्या.

याच कटाच्या खटल्यांतील पब्लिक प्रॉसिक्युटर ( १९०९ फेब्रु. ) व डेप्युटी सुपरिं. ऑफ पोलीस ( १९१० जाने. ) यांचाहि खून करण्यांत आला.

हे स्वतःच पोलिसच्या स्वाधीन झाले. पण त्याच वेळीं आणखीहि कांहीं ठिकाणीं बाँब उडाले. त्यावरून माणिकतोळा बाग बाँब व अलीपूर कटाचा सुगावा लागला. या कटाचे पुढारी अरविन्द घोषांचे बंधु बारीन्द्रकुमार होते. या कटांत नरेन्द्रनाथ गोस्वामी, सत्येन्द्रनाथ बोस, कन्हय्यालाल दत्त, नगेन्द्रनाथ सेनगुप्त, अशोक नंदी, विजयराम सेन, मोतीलाल घोष, उल्हासकर दत्त, प्रफुल्लचंद्र चक्रवर्ति वगैरे लोक होते. हेमचंद्र दास हे यांच्यापैकीं बाँब तयार करणारे होते.

**बोस, सर जगदीशचंद्र**—( जन्म स. १८५८ मे ३०–मृत्यु स. १९३७ नवं. २३ ) आंतरराष्ट्रीय कीर्तीचे हिंदी वनस्पतिशास्त्रज्ञ व जगप्रसिद्ध संशोधक.

विक्रमपूर जिल्ह्यांतील राणीखल हें गांव यांचें जन्मस्थान. यांच्या वडिलांचें नांव भगवानचंद्र. कलकत्ता सेंट झेवियर स्कूल व सेंट झेवियर कॉलेजमध्यें आपलें शिक्षण संपवून हे उच्च शिक्षणासाठीं परदेशीं रवाना झाले. हिंदुस्थानांत असतांनाच यांना फादर ई. लिफॉन्ट यांच्या प्रेरणेने संशोधनांत गोडी लागली होती. इंग्लंडमध्यें गेल्यानंतरहि यांनीं आपली तीच अध्ययनशाखा पुढें चालू ठेवली.

इंग्लंडमध्ये प्रथम यांचा विचार डॉक्टर होण्याचा होता. परंतु मलेरियानें आधींच क्षीण झालेल्या यांच्या प्रकृतीला तो अभ्यास झेपेना. तेव्हां हे लंडनच्या खाइस्ट चर्च कॉलेजांतून विज्ञान, रसायन व वनस्पतिशास्त्र यांची पदवी मिळवून हिंदुस्थानला परतले. हिंदुस्थानांत आल्यानंतर लॉर्ड रिपन यांच्या शिफारशीवरून यांना कलकत्त्याच्या प्रेसिडेन्सी कॉलेजांत फिजिकल सायन्सच्या प्राध्यापकाची जागा देण्यांत आली ( १८८५-१९१५ ). पुढें इंडियन एज्युकेशनल सर्व्हिसमध्यें कांहीं दिवस काम केल्यानंतर हे कार्यनिवृत्त झाले.

यांच्या उत्तर आयुष्यांत मुख्यतः वनस्पतिशास्त्रज्ञ म्हणून यांची प्रसिद्धि झाली असली तरी यांचें सुरवातीचें संशोधन इलेक्ट्रिसिटीमधील आहे. इलेक्ट्रो मॅग्नेटिक वेव्हजचा यांनीं शोधून काढलेला संचायक सुटसुटीतपणाबद्दल प्रसिद्ध असून पॉइंकेरच्या पाठ्य पुस्तकांत व एनसायक्लोपीडिया ब्रिटानिकांतील जे. जे. थॉम्पसनच्या लेखांत त्याचा उल्लेख करण्यांत आला आहे. नेमॅलाइटच्या मदतीनें बिनतारी संदेश पाठविण्याची यांची पद्धति व त्यावरूनच यांनीं पुढें संशोधिलेली Molecular Stress and Strain Theory हि अतीव महत्त्वाची आहे.

परंतु इंग्लंडमधील रॉयल सोसायटीच्या असहकारामुळें ही महत्त्वाची संशोधनशाखा यांना सोडावी लागली व हे वनस्पतिशास्त्राकडे वळले. रेडिओंतील ध्वनिग्राहक भांड्यांनासुद्धां दीर्घकाल वापरल्यानंतर शीण येतो व थोड्या विश्रान्तीनंतर तो जातो असें लक्षांत आल्यानंतर यांनीं अचेतन व प्राणी यांमधील साम्याचे अध्ययनास सुरवात केली. सचेतन व अचेतन अशा पदार्थांच्या जीवनांतील मूलभूत तत्त्वें एकच आहेत, या कल्पनेपासून सुरवात करून वनस्पतिजीवनांत प्राण्यामधील स्नायु, मज्जातंतु इत्यादींच्या जागीं काम करणाऱ्या पद्धती यांनीं शोधून काढल्या व पुढें आपल्या नव्यानव्या उपकरणांनीं जगाला थक्क केलें. अति-

सूक्ष्मता व अचूकता हा यांच्या या सर्व उपकरणांचा विशेष आहे.

थंडी, प्रकाश, विद्युत्, उष्णता या सर्वांचा प्राणी व वनस्पति यांवर होणारा परिणाम सारखाच असतो हें यांचें प्रमुख संशोधन आहे. यासाठीं यांनीं डायमेट्रिकल कॉन्ट्रॅक्शन ॲपॅरेटस व रेझोनन्ट रेकॉर्डर हीं दोन उपकरणें तयार केलीं. यांपैकीं रेझोनन्ट रेकॉर्डर तर विशेष महत्त्वाचा असून सेकंदाच्या हजाराव्या भागाचेंसुद्धां अचूक मापन त्यामुळें शक्य होतें.

यानंतर यांनीं वनस्पतिजीवन व प्राणिजीवन यांमधील 'नाडी' व्यवस्थेंतील साम्य दाखविलें. प्राण्यांमध्यें नाडी हृदयाच्या अनुरोधानें चालते तर वनस्पतींमध्यें ती प्रकाशाच्या रोखानें चालते; प्रकाश कमीअधिक झाला तर नाडीची गतिहि कमीजास्त होते हें यांनीं ऑसिलेटिंग रेकॉर्डरच्या साहाय्यानें सिद्ध केलें.

परंतु यापेक्षांहि वनस्पतिजीवनांत रुधिराभिसरणाचे धर्तीवरच ही नाडीसंस्था कार्य करिते, अन्नाची नेआण व निरुपयोगी वस्तूंचा निचरा हीं सर्व कार्यें वनस्पति-जीवनांतील ही कार्यपद्धति पार पाडते हे यांचें महत्त्वाचें संशोधन होय.

आपल्या या संशोधनाचें कार्य आपल्या कल्पनेप्रमाणें पुढें चालविण्याच्या हेतूनें सरकारी नोकरींतील आपल्या कार्यनिवृत्तीनंतर यांनीं कलकत्त्याच्या अप्पर सर्क्युलर रोडवर 'बोस रिसर्च इन्स्टिट्यूट'ची स्थापना केली (१९१७ नवं. ३०) व त्याच्या पुढच्याच वर्षी 'ट्रॅन्सॅक्शन्स ऑफ बोस इन्स्टिट्यूट' हें पत्र सुरू करून या संस्थेच्या संशोधित कार्याला कायमपणा आणून देण्याचा प्रयत्न केला.

या संस्थेचें सभागृह, आंगण व सभोंवतालची प्रयोग-शाळा यांची मांडणी प्राचीन भारतीय वास्तुशास्त्राला अनुसरून करण्यांत आली आहे. संस्थेच्या मुख्य दर-वाजावर हिंदु पद्धतीचें कोरीव काम करण्यांत आलें असून दोन दारांवर दोन लता कोरण्यांत आल्या आहेत. प्रवेशद्वारांच्या वरच्या बाजूला अशोककालीन आमलक-फल कोरण्यांत आले आहे. सभागृहाच्या तक्तपोशीवर अजिंठा लेण्यांतील पूर्णविकसित कमलाची आकृति असून भिंतीवरील चित्रें श्री. नंदलाल बोस यांनीं काढलेलीं आहेत. सभागृहाच्या मुख्य भिंतीवर खालील शब्दांत यांनीं आपली संस्था परमेश्वरचरणीं अर्पण केली आहे:—

भारत गौरव ए जगतेर
कल्याण कामनार
देवचरणे निवेदन करिलाम
श्री जगदीश बसु

ता. ३०-११-१७, १४ आग्रहायण १३२४.

दार्जिलिंग व गंगा काठावरील सेजबारिया येथेंहि वनस्पतींवर संशोधन करण्यासाठीं यांनीं या संस्थेच्या शाखा उघडल्या. यांपैकीं दार्जिलिंगची मायापुरी संशोधन शाळा व बच्छराज प्रयोगशाळा विशेष प्रसिद्ध आहेत.

नव्या संशोधनाला आवश्यक असणारें वातावरण देशी किंवा विदेशी युनिव्हर्सिटींत सध्यां असत नाहीं; ज्ञानाच्या उपासनेपेक्षां पदवीच्या उपासनेकडे सर्व ठिकाणीं लक्ष पुरविलें जातें; अशा स्थितींत नालन्दा, तक्षशीला, कान्जीवरम् इत्यादि प्राचीन विद्यापीठांचे धर्तीवर फक्त ज्ञानाची उपासना करण्याचे हेतूने ही संस्था आपण काढली असे उद्गार यांनीं संस्थेच्या सुर-वातीला काढले. त्या दृष्टीनें नव्या संशोधनाची बाह्य जगाला कल्पना आणून देण्याच्या दृष्टीनें हे व यांचे विद्यार्थी वेळोवेळीं व्याख्यानें देत.

काव्य व शास्त्र यांचा कांहीं विशेष संगम यांच्यांत आढळे. हिंदुस्थानांत वनस्पतींसंबंधीं रूढ असणाऱ्या प्राचीन कल्पना व आपली शास्त्रदृष्टि यांचा सुंदर मेळ घालून यांनीं आपल्या संशोधनाचा पसारा मांडला व कवीलाहि अतर्क्य वाटणाऱ्या कल्पना व्यवहारांत उतरवून साऱ्या जगाला थक्क केलें. रात्रीं बारा वाजतां झोपीं जाऊन सकाळीं उठल्यानंतर इतर प्राण्यांप्रमाणें व्यवहार करणारें, वायुमय अन्न पचविणारें व दारू प्याल्यानंतर झिंगणारें झाड यांनीं प्रथमच जगासमोर उभें केलें व प्रा. म्युलिस्क, हॉरेस ब्राउन अशा शास्त्रज्ञां-बरोबरच बर्नार्ड शॉ, गॅल्सवर्दी, रोमॉरोलॉ अशा सरस प्रतिभावंतांकडून वाहवा मिळविली. इंडियन सायन्स काँग्रेस (१९२७) व बंगाल साहित्य परिषद, मैमन-सिंगचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें (१९११).

यांच्या या संशोधनाचे हिंदी संशोधकांवरील परि-णामहि असेच दूरगामी ठरले. यांच्यापासून स्फूर्ति घेतलेल्या तरुण संशोधकांची एक नवीनच पिढी हिंदु-स्थानांत तयार झाली व तिनें यांनीं ठोठावून उघडावयास भाग पाडलेल्या आंतरराष्ट्रीय दरवाजांतून आपल्या संशोधनास जागतिक मान्यतेचा शिक्का प्राप्त करून घेतला.

या सर्व कार्यांत यांनीं दाखवलेली राष्ट्रीय वृत्ति तर विशेष अभिनंदनीय असे. हीं सर्व यंत्रें 'हिंदुस्थानांत' तयार झाल्याचें हे परदेशांत मोठ्या अभिमानानें सांगत. आपले महत्त्वाचे ग्रंथहि यांनीं 'आपल्या देशबांधवांना' अर्पण केले, इतकेंच काय पण आपल्या मूल्यवान यंत्रांचीं पेटंट्स् न घेतां तीं व आपलें बोस इन्स्टिटयूट यांनीं राष्ट्रार्पण केलें. आपल्या इन्स्टिटयूटवर दधीचि ऋषींच्या हाडांचें वज्र कोरण्यांतहि दधीचीप्रमाणें यांनीं अंगीकृत कार्यासाठीं सर्वस्वाचा त्याग करण्याचाच संदेश आपल्या विद्यार्थ्यांना दिला आहे.

यांचे ग्रंथ—( 1 ) Response in the Living and the Non-living, ( 2 ) Plant Response (1906), ( 3 ) Electro-physiology of Plants (1907), ( 4 ) Irritability of Plants, ( 5 ) Life Movements of Plants (भाग १ व २), ( 6 ) Life Movements of Plants ( भाग ३ व ४ ), ( 7 ) The Ascent of Sap, ( 8 ) The Physiology of Photosynthesis, ( 9 ) The Nervous Mechanism of Plants, ( 10 ) The Motor Mechanisms of Plants, ( 11 ) Plant Autographs and their Revelations, ( 12 ) Tropic Movement and Growth of Plants इत्यादि.

वनस्पती जीवनावरील यांचीं प्रमुख संशोधित उपकरणेः—( 1 ) Resonant Recorder (1911), ( 2 ) Oscillating Recorder (1914), ( 3 ) Compound Lever Crescograph (1917), (4) Magnetic Crescograph, ( 5 ) Balancing Apparatus, ( 6 ) Bubbler or Photosynthetic Recorder (1922), ( 7 ) Dimetric Contraction Apparatus (1927).

**बोस, नन्दलाल**—( जन्म स. १८८३ डिसें. ३ ) जगप्रसिद्ध बंगाली चित्रकार.

हे अवनींद्रनाथ टागोरांचे शिष्य. हे १९१९ सालापासून रवीन्द्रनाथ टागोरांच्या विश्वभारतीच्या कलाभुवनावरील मुख्य असून नूतन कलकत्ता चित्रसंप्रदायाचे एक प्रमुख पुरस्कर्ते मानले जातात. तसेंच जगांतील उत्कृष्ट चित्रकारांत यांची गणना होते.

हे रवीन्द्रनाथ टागोरांच्या बरोबर जपानला गेले तेव्हां तेथील चित्रकलेचा यांच्यावर परिणाम झाला आहे. पण तिचा उपयोग हे क्वचित् करतात.

यांची चित्रकला ही निर्मळ भारतीय असून यांचे ठिकाणीं प्राचीन चित्रकारांचें बुद्धिवैभव, कल्पनाचातुर्य, धर्मभावना व कलमावरील प्रभुत्व हीं पूर्णपणें दिसून येतात.

यांची शिवचरित्रावरील शिवताण्डव, शिवविलाप, शिवविषप्राशन ही चित्रें अप्रतिम असून फार प्रसिद्ध आहेत. शिवविलाप हें चित्र तज्ज्ञांच्या मतानें जगांतील अत्युत्तम चित्रांपैकीं एक असून या तोडीचीं चित्रें जगांत फारच थोडीं आहेत.

यांचें कलम अजिंठापद्धतीचें आहे. यांच्या चित्राच्या बाह्यरेषेत जोमदारपणा असतो. यांचा फटकारा काटेतोल व बरोबरच असणार अशी खात्री देतां येते.

**बोस, प्रमथनाथ**—( जन्म स. १८५५-मृत्यु स. १९३४ ) बिहार प्रान्तांतील भूगर्भशास्त्रज्ञ.

सायन्समध्यें अनेक पदव्या मिळविल्यावर यांनीं जिऑलाजिकल खात्यांत नोकरी पत्करली. तेव्हां यांनीं रेकार्ड ऑफ जिऑलाजिकल डिपार्टमेंट ऑफ इंडियामध्यें अतिशय मोलाची भर घातली. यांचा 'हिस्टरी ऑफ हिंदु सिविलायझेशन अंडर ब्रिटिश रूल' हा महत्त्वाचा ग्रंथ तरुण वयांतच यांनीं लिहिला. हिन्दी म्हणून कर्झनशाहीत ( १९०३ ) बढती न मिळाल्यानें यांनीं सरकारी नोकरीचा राजिनामा दिला व रांची येथें वसति केली. म्हणून लोक यांना रांचीचे भूगर्भशास्त्रज्ञ अशा नांवानें ओळखीत. यांचें फुटकळ व अपूर्ण लिखाण बरेंच आहे.

यांच्या खऱ्या कामाला सुरुवात ओरिसांतील मयूरभंज संस्थानांत भूगर्भशास्त्रज्ञ म्हणून काम करण्यास यांनीं सुरुवात केली तेव्हां झाली. स. १९०४ मध्यें गोरुमहिसानी या ठिकाणीं यांना लोखंडाच्या खाणीचा पत्ता लागला व तसा उल्लेख यांनीं 'रेकार्ड ऑफ जिऑलाजिकल सर्व्हे' या लिखाणांत केला ( १९०४ ). तेथेंच टाटांनीं जमशेटपूरची स्थापना करून टाटा आयर्न वर्क्स सुरू केलें. प्रथम तो कारखाना रायपूर जिल्ह्यांत संयुक्त प्रान्तांत काढण्याचा विचार होता. पण कोळसा दूर असल्यानें तें स्थान अयोग्य ठरवून यांनीं दाखविलेलें स्थान योग्य ठरविण्यांत आलें.

कलकत्त्याची 'बेंगाल टेक्निकल इन्स्टिटयूट' स्थापण्यास यांनीं फार मदत केली होती. तिचे हे पुष्कळ दिवस रेक्टर होते. बंगालच्या रॉयल एशियाटिक सोसायटीचे हे तहाहयात सभासद होते व स. १८८४ मध्यें त्या

सोसायटीच्या शंभराव्या वाढदिवसानिमित्त प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांतील शास्त्रीय विभागाचे हे संपादक होते.

**बोस, राशबिहारी**—(जन्म स. १८८४–मृत्यु स. १९४५) हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध क्रान्तिकारक आणि पहिल्या स्वतंत्र हिंद सरकारचे व सैन्याचे प्रमुख.

हे डेहराडून येथें सरकारी नोकर असतां पंजाबमध्यें यांनीं क्रांतिकारकांची संघटना तयार केली. या कार्यात यांना स्वामी रामतीर्थांचे एक प्रमुख शिष्य श्री. अमीरचंद यांचें साहाय्य झालें. अमीरचंदाना स. १९१२ सालीं सरकारनें अटक केली. त्यांच्या भेटीकरितां हे दिल्लीस गेले असतां यांनाहि अटक व्हावयाची. पण अमीरचंदांच्या एका धूर्त सेवकानें यांना सूचना केली, तेव्हां हे निसटले.

तेव्हांपासून यांच्या अज्ञातवासास सुरुवात झाली. हे प्रवास करीत व काशीसारख्या शहरीं महिनेच्यामहिने राहत. पण पोलिसांना यांचा पत्ता लागला नाहीं. स. १९१२ च्या डिसेंबरांत व्हाइसरॉय लॉर्ड हार्डिंज यांच्यावर बॉंब पडला. त्या प्रकरणांत यांचेवर आरोप होता. क्लीवलंडसारखे कर्तबगार अधिकारी यांच्या शोधांत होते. यांचा त्यांना शोध करितां आला नाहीं. एवढेच नव्हे तर यांचें कार्यहि थांबवितां आलें नाहीं. त्या वेळीं सर्व वर्तमानपत्रांत यांचे फोटो प्रसिद्ध करून यांना पकडून देणारास बारा हजार रुपयांचें बक्षिस लावलें होतें.

यांनीं तळेगांवचे विष्णु गणेश पिंगळे यांच्या साहाय्यानें शीख सैन्यांत प्रवेश करून घेऊन हिंदुस्थानभर बंड घडवून आणण्याचा प्रयत्न केला. या बनारस कटाचे धागे सिंगापुरापर्यंत पसरले होते. २१ फेब्रु. १९१५ ही बंड सुरू करण्याची तारीख निश्चित झाली होती. त्या दिवशीं ठरल्याप्रमाणें सिंगापूर येथें बंड झालें. पण पंजाबांत कांहीं घोटाळा झाल्यानें बंडाचा काल चार दिवस मागे बदलला. या अवधीत कटाची सर्व वार्ता पंजाबचे गव्हर्नर सर मायकेल ओडवायर यांना लागली. त्यांनीं अकस्मात् कटवाल्यांची सार्वत्रिक धरपकड केली. या धरपकडींत हे सरकारच्या हातीं लागले नाहींत. या वेळीं सर मायकेल यांचे शरीररक्षकहि यांनीं आपल्या कटांत सामील करून घेतले होते, ही गोष्ट येथें विशेष नमूद करण्यासारखी आहे.

बंडाचा प्रयत्न फसल्यानंतरहि यांनीं मिरतच्या छावणींत पिंगळ्यांना पाठवून सैनिकांशीं संबंध जोडण्याचा पुनश्च प्रयत्न केला. पण त्या दिवशीं पिंगळ्यांचा विश्वासघात होऊन त्यांना त्यांच्या अतिभयंकर बॉंबसकट अटक झाली. पिंगळ्यांना त्याबद्दल फांशीची शिक्षा झाली. याबद्दल यांना पुढें कितीतरी दिवस अत्यंत खेद वाटत असे.

पिंगळ्यांच्या अटकेनंतर यांनीं हिंदुस्थान सोडण्याचा विचार केला आणि हे येथून निसटून जपानला गेले (१९१५). तेथून यांनीं क्रांतिकारकांना शस्त्रें पुरविलीं. त्या वेळीं जपान जर्मनीच्या विरुद्ध इंग्रजांच्या बाजूनें लढत असल्यानें हे टोकियोला पोंचल्याची वार्ता ब्रिटिशांना लागतांच त्यांनीं जपान सरकारकडे यांना आपल्या स्वाधीन करण्याची मागणी केली आणि जपानसरकारलाहि ती मान्य करावी लागली. पण जपानांतील अतिशय वजनदार अशा ब्लॅक ड्रेगन संस्थेचे प्रमुख टोयामा यांनीं आपल्या घरीं यांना आश्रय दिला आणि यांचें संरक्षण केलें. टोयामा यांच्या घरातून यांना काढून नेण्याचें सामर्थ्य कोणाहि जपानी अधिकाऱ्यांत नसल्यानें हे तेथें सुरक्षित राहिले. तेव्हां हे आठ वर्षे अज्ञातवासात राहिले. 'रौलट कमेटी'च्या इतिवृत्तांत बनारस कटांतील यांना जपानकडून मागवून घेऊन यांच्यावर फौजदारी खटला भरला गेला पाहिजे असें आग्रहानें लिहिलें आहे (पान २०९, १९१८).

पुढें एका जपानी स्त्रीशीं विवाह करून हे जपानांतच कायम राहिले. तेथील भारतीय स्वातंत्र्यसंघाचे हे संस्थापक आणि अध्यक्ष होते. हिंदुमहासभेच्या तत्त्वज्ञानाचे हे केंद्र पुरस्कर्ते होते.

हे चांगल्यापैकीं लेखक होते. चंद्रनगरच्या 'प्रवर्तक' मासिकांत यांनीं आपली आत्मकथा लिहिली आहे. कलकत्त्याच्या स्टेट्समनसारख्या अँग्लो इंडियन पत्रांत यांनीं केलेलें जपानांतील भीषण भूकंपाचें वर्णन अगत्यपूर्वक छापलें होतें.

जपानी सरकार तर 'स्वतंत्र हिंदुस्थानच्या तात्पुरत्या सरकारा'चे सल्लागार म्हणून यांना संबोधीत असे, असें लंडन टाइम्सनें यांच्या मृत्युलेखांत म्हटलें आहे.

हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यासंबंधीं यांनीं जपानी भाषेंत पांच पुस्तकें लिहिलीं आहेत. अमेरिकेंतील डॉ. संडरलंड यांनीं लिहिलेल्या 'इंडिया इन बॉन्डेज' या इंग्रजी पुस्तकाचें जपानी भाषान्तर यांनीं केलें आहे. टोकिओंत शंकराचें मंदिर बांधण्याची यांची कल्पना असून हे त्याकरितां निधि जमवीत होते.

हे पहिल्या आझाद हिंद सेनेचे संस्थापक होत. यांनी मोहनसिंग यांना चीफ ऑफ स्टाफ नेमून तें काम सुरू केलें. पण त्यांचें धोरण जपानविरुद्ध दिसतांच ते पकडले गेले आणि कर्नल जगन्नाथराव भोसले यांना चीफ ऑफ स्टाफ नेमलें. पुढें सुभाषचंद्र बोसांनीं आझाद सैन्याचें नेतृत्व पत्करिल्यानें तर त्याला विशेष महत्त्व आलें.

**बोस, शरच्चंद्र**—(जन्म स. १८८९) बंगालमधील सुप्रसिद्ध पुढारी व पहिल्या दर्जाचे कायदेपंडित.

श्री. सुभाषचंद्र यांचे हे थोरले बंधु. यांना सुभाषचंद्र, सतीशचंद्र वगैरे सहा भाऊ आहेत. यांच्या आईचें नांव प्रभावती. कलकत्त्याच्या रॅव्हेनशॉ व प्रेसिडेन्सी कॉलेजमधून हे एम्. ए., बी. एल्. (१९११) झाले. त्यानंतर हे इंग्लंडला गेले व बॅरिस्टर होऊन परत आले.

हिंदुस्थानांत आल्यानंतर यांनी कलकत्ता येथें वकिली करण्यास सुरवात केली व थोड्याच दिवसांत कलकत्ता बारचे हे पुढारी बनले. भरभक्कम वादविवाद कौशल्यानें यांनीं भरपूर पैसे मिळविले. यांच्या आर्थिक सहकार्यानेंच आपण इतकें सार्वजनिक कार्य करूं शकत असल्याची कबुली श्री. सुभाषचंद्र बोस यांनीं दिली आहे. जवळ जवळ दहा वर्षेपर्यंत हे फॉरवर्ड पब्लिशिंग कंपनीचे व दि लिबर्टी न्यूज पेपर्स लि.चे मॅनेजिंग डायरेक्टर होते.

असेंब्लींतसुद्धां उत्कृष्ट वादविवादपटु म्हणून यांची ख्याति आहे. इंडियन लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे सभासद म्हणून यांची १९३३ सालीं प्रथम निवड झाली. त्यानंतर बंगाल लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत कांग्रेस पक्षाचे नेते म्हणून काम केल्यावर (१९३७) सुभाष बोस हिंदुस्थानांतून अन्तर्धान पावल्यावर याना स्थानबद्ध करून ठेवण्यांत आलें होतें. त्यानंतर याची सेंट्रल लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत कांग्रेस पक्षाचे नेते म्हणून निवड झाली (१९४५). कॉंग्रेस वर्किंग कमेटींत बंगालचे प्रतिनिधि म्हणून हे काम करतात.

**बोस, 'नेताजी' सुभाषचंद्र**—(जन्म स. १८९७ जाने.२७-मृत्यु स.१९४५ ऑगस्ट १८?) हिंदुस्थानच्या पूर्ण स्वातंत्र्याचे सुप्रसिद्ध उपासक, दुसऱ्या आझाद हिंद सेनेचे प्रमुख व कुशल संघटक.

यांचें जन्मस्थान कटक (उडीसा). पिता—जानकीनाथ. माता—प्रभावतीदेवी. उपनाम बसू. इंग्रजीवरून बोस असा उच्चार बंगालबाहेर लोकांत प्रसिद्ध आहे. जात बंगाली ब्राह्मण. यांचे वडील कटक येथें सुप्रसिद्ध वकील होते व यांची माता अत्यंत धार्मिक वृत्तीच्या होत्या. यांना सहा बंधु आहेत. ते डॉक्टर, आय्. सी. एस्. वगैरे आहेत. यांचे थोरले बंधु शरच्चंद्र हे तर प्रसिद्ध कायदेपंडित व राष्ट्रसभेचे कार्यकर्ते आहेत.

हे शाळेंत शिकत असतांना श्री. रामकृष्ण परमहंस व स्वामी विवेकानंद यांच्या शिकवणीचा मनावर अत्यंत परिणाम होऊन हे गंगायमुनांच्या कांठचीं पवित्र स्थानें व हिमालयाचीं गिरिकंदरें गुरूच्या शोधार्थ हिंडून आले. मॅट्रिकमध्ये यांचा दुसरा क्रमांक आला. कलकत्त्याच्या प्रेसिडेन्सी कॉलेजात एका इंग्रज प्राध्यापकाच्या अपमानकारक वागणुकीनें यांनीं संप घडवून आणला आणि प्रिंसिपालवर हल्लासुद्धां केला. तेव्हां यांचे नांव कॉलेजमधून कमी करण्यांत आलें. तेव्हां हे इंग्लंडला जाऊन बी.ए. व आय. सी. एस.हि झाले. पण सरकारी नोकरीचा राजीनामा देऊन यांनीं देशकार्याला आपणास वाहून घेतलें.

हिंदुस्थानांत आल्यावर यांनीं प्रथम म. गांधी यांची भेट घेतली (१९२१ जुलै). नंतर कलकत्त्यास जाऊन चित्तरंजन दासांच्या नेतृत्वाखालीं यांनीं सार्वजनिक कार्यास सुरवात केली. त्यांनीं यांची नेमणूक नॅशनल कॉलेजच्या प्राध्यापकाच्या जागीं केली. युवराजाच्या वरील बहिष्कारांत यांना प्रथम सहा महिन्यांची शिक्षा झाली. सुटून आल्यावर फॉरवर्ड पत्राची संपादकी यांच्याकडे आली (१९२२-२४). स्वराज्यपक्षाची उत्कृष्ट संघटना करून यांनीं कायदेमंडळ व कार्पोरेशन बहुमतानें काबीज केलें. तेव्हां यांना कलकत्ता कार्पोरेशनकडून १५०० दरमहाचे मुख्याधिकारी नेमण्यांत आलें. पण क्रान्तिकारकांचा हे संघटना करतात या आरोपावरून यांना मंडाले येथें विनाचौकशी अटकेंत ठेवलें (१९२५ जाने. २५). तेथून यांनीं सशर्त मुक्तता करून घेण्याचें नाकारलें, तेव्हां यांना मरणोन्मुख अवस्थेंत मुक्त करण्यांत आलें (१९२७ मे २६).

दास दिवंगत झाले आणि मद्रास राष्ट्रसभेपासून (१९२७) यांनीं संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव पास करण्याची खटपट सुरू केली, ती १९२९ सालां लाहोरच्या सभेंत यशस्वी झाली. मात्र यांचा प्रतिसरकार स्थापण्याचा ठराव नापास झाला. १९३३ सालीं प्रकृतीकरितां हे युरोपांत गेले. व्हिएन्नाच्या दवाखान्यांत हे व विठ्ठलभाई पटेल

या दोघांवर उपचार चालू होते. दोघांचाहि गांधींच्या कार्यक्रमावर विश्वास नव्हता. या वेळीं यांनीं ब्रिटिशांकडून होणाऱ्या हिंदविरोधी प्रचारास आळा घालण्याकरितां 'सेंट्रल इंडो-युरोपियन सोसायटी' काढली. तेथें मरणसमयीं विठ्ठलभाई पटेलांनीं एक लाख रुपयांचा निधि मनाप्रमाणें कार्य करण्याकरितां यांना दिला. पण कायदेशीर अडचणीमुळें तो यांना लाभला नाहीं. आजारी असणाऱ्या पित्याला भेटण्याकरितां हिंदुस्थानांत येण्यास सरकार यांना परवानगी देईना, तेव्हां हे परवानगीशिवाय विमानानें कराचीस येऊन उतरले.

पुनः १९३७ सालीं हे युरोपांत गेले; तेव्हां मोठमोठ्या राजकारणी लोकांशीं यांचा परिचय होऊन यांचा देशोदेशीं सत्कार झाला. यांनींहि तेथील राजकारणाचा चांगला अभ्यास केला आणि १९३८ च्या हरिपुरा कॉंग्रेसचे अध्यक्ष म्हणून निवड झाल्यामुळें हे हिंदुस्थानांत आले. पुनश्च १९३९ सालीं त्रिपुरी कांग्रेसच्या अध्यक्षपदासाठीं हे उभे राहिले आणि म. गांधींनीं पाठिंबा दिलेल्या पट्टाभिसीतारामय्यांपेक्षां अधिक मतें पडून हे निवडून आले. तेव्हां 'हा पट्टाभींचा पराजय नसून माझा पराजय आहे' असे म. गांधींनीं उद्गार काढले. तेथें गांधी गटाच्या असहकाराला व विरोधाला यांना तोंड द्यावें लागलें. स्वतःच्या मताचें कार्यकारीमंडळ निवडतां न आल्यानें यांना राष्ट्रसभेच्या अध्यक्षपदाचा राजीनामा द्यावा लागला. नंतर राष्ट्रसभेच्या गांधीवादी कार्यकारीमंडळानें यांना बंगाल प्रान्तिक काग्रेस कमेटीचे अध्यक्षपदास व १९३९ पासून तीन वर्षे कॉंग्रेस कमेटीचा सभासद होण्यास अपात्र ठरविलें. तसेंच यांचा क्रान्तिकारक चळवळीशीं संबंध आहे कीं काय हे पाहण्याकरितां म. गांधींनीं कृष्णदास नांवाच्या एका माणसाची नेमणूक केली.

यानंतर यांनीं आपल्या 'फॉर्वर्ड ब्लॉक' या सुप्रसिद्ध संस्थेची स्थापना केली. १९४० सालीं तुरुंगांत असतांच सेन्ट्रल असेंब्लींत हे निवडून गेले. यानंतर प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें यांची सुटका होऊन यांना कलकत्त्याच्या यांच्या राहत्या घरांत स्थानबद्ध करून ठेवण्यांत आलें.

दुसरें महायुद्ध चालू असतां या अपूर्व संधीचा फायदा हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याकरितां घेण्याचें यांनीं ठरविलें. कलकत्त्याच्या आपल्या घरांतून २६ जाने. १९४१ रोजीं हे अदृश्य झाल्याचा पुकारा देशभर झाला. हे १८ जाने.ला घरांतून बहिऱ्या व मुक्या असणाऱ्या झियाउद्दिन पठाणाच्या वेषानें निघाले व पेशावर मार्गें काबूल येथें गेले. तेथून हे बर्लिनला गेले आणि बर्लिनहून दुसऱ्या आझाद हिंद सेनेचें नेतृत्व स्वीकारण्यास सिंगापुरास दाखल झाले. यांचें हें प्रवासवृत्त लाल उत्तमचंद मिलोतरा यांनीं 'When Bose was Ziauddin' या नांवानें प्रसिद्ध केलें.

१९४१ च्या डिसेंबरमध्यें जपाननें ब्रिटन व अमेरिका यांच्या विरुद्ध युद्ध पुकारलें. सिंगापूर येथील ब्रिटिशांचें हिंदी सैन्य जपानला शरण गेलें (१५ फेब्रु. १९४२). या हिंदी सैन्याला कैदेंत ठेवण्यापेक्षां आझाद हिंद सेनेंत दाखल होऊन ब्रिटिशांविरुद्ध लढण्यास जपाननें मान्यता दिली. पहिली आझाद हिंदसेना सप्टें. १९४२ मध्यें बनविण्यांत आली व तिचें विसर्जन डिसेंबर १९४३ मध्यें करण्यांत आलें. नंतर कांहीं दिवसांनीं यांनीं दुसऱ्या आझाद हिंदसेनेचें नेतृत्व पत्करिलें. आशियांतील निरनिराळ्या देशांतील हिंदी लोकांच्या प्रतिनिधींची एक परिषद भरून स्वतंत्र हिंदुस्थानचें तात्पुरतें सरकार स्थापन करण्याचें ठरलें. २१ ऑक्टो. १९४३ रोजीं स्वतंत्र हिंदुस्थानच्या तात्पुरत्या सरकारची घोषणा करण्यांत आली आणि यांच्या नेतृत्वाखालीं वेगवेगळ्या खात्यांच्या मंत्र्यांचा शपथविधि झाला. या सरकारनें ब्रिटन व अमेरिका यांच्याविरुद्ध युद्ध जाहीर केलें आणि दुसरी आझाद हिंदसेना या सरकारच्या आदेशानुसार काम करूं लागली. हें कार्य राष्ट्रसभेच्या तिरंगी निशाणाखालीं टिळक, गांधी, नेहरू, आझाद वगैरे नांवें पथकांना देऊन चालू होतें.

यांना अंदमान व निकोबार बेटांचा प्रदेश जपानकडून या कामाकरितां मिळाला. आसामांतील मणिपूर व विष्णुपूर यांच्या आसपासचा सुमारें दीड हजार चौरस मैलाचा प्रदेश सहा महिने या सरकारच्या ताब्यांत आला होता.

यांना वीस कोटींच्या देणग्या मिळाल्या होत्या. त्यांतून मुलकी सरकारचा व फौजेचा निर्वाह होत असे. इम्फाल येथें पाऊण व अर्धा आण्याची तिकिटें यांनीं काढलीं होतीं. त्यावर दिल्लीच्या मोगल किल्ल्याचें चित्र असून चलो दिल्ली व अर्झी हुकमत-ई-हिंद हीं अक्षरें होतीं. शिवाय यांनीं रंगून येथें बँक व नोटा वगैरे काढल्या होत्या. यांचें हें सरकार एक मुलकी व लष्करी गॅझेट काढीत असे. यांच्या सरकारला अकरा स्वतंत्र राष्ट्रांनीं मान्यता दिलेली होती.

जपानला शरणागति पत्करावी लागली तरी यांनीं शरणागति पत्करण्याचें नाकारून लढाई चालू ठेवली. पुढें सिंगापूर ब्रिटिशांच्या हातीं जाण्याची वेळ येतांच हे सिंगापुराहून १६ ऑगस्ट १९४५ रोजीं विमानानें निघाले. प्रवासांत विमानाला अपघात झाला आणि जखमी झालेल्या यांना उपचाराकरितां रुग्णालयांत नेण्यांत आलें. तेथें यांना मृत्यु आला अशी बातमी टोकियो वृत्त संस्थेनें प्रसिद्ध केली. या बातमीबद्दल अनेक जबाबदार माणसांनीं उलटसुलट मतें प्रदर्शित केलेलीं आहेत.

कोणत्याहि राष्ट्रास पूर्ण स्वातंत्र्य मिळवण्यास अन्तर्गत उठावणीप्रमाणें बाह्य राजकीय सत्तेचा आश्रय आवश्यक असतो. ब्रिटिश साम्राज्याचा इतिहास पाहतां त्यांच्याकडून पूर्ण स्वातंत्र्याची अपेक्षा करणें व्यर्थ आहे. आयर्लंड, इजिप्त वगैरेकडे पाहतां तेथें देशविच्छेद, अल्पसंख्यांक, ब्रिटिश सैन्य वगैरेंचे प्रश्न कायम ठेवण्याचें धोरण दिसतें. हिंदुस्थानांत मुसलमान, अस्पृश्य, संस्थानिक वगैरेंच्या आश्रयानें ब्रिटिश सत्ता कायम ठेवण्याचा सतत प्रयत्न चालू आहे. अशा स्थितींत पूर्ण स्वातंत्र्याकरितां ८ ऑगस्ट १९४२ च्या काँग्रेस उठावणीस पोषक असें बाहेरून दडपण आणण्याचा प्रयत्न यांनीं केला. ८ ऑगस्टची उठावणी कांहीं न करितां तुरुंगभरती करणारी आणि ९ ऑगस्टची काँग्रेस सोशालिस्टांची उठावणी निर्नायक व असंघटित असल्यानें वाया गेली. आंतील उठावणी कच्ची असल्यानें यांच्या बाहेरच्या उठावणीचा विशेष उपयोग झाला नाहीं.

शहानवाझ, धीलन, सहगल वगैरे आझाद सैनिकांवर बंडखोर म्हणून ब्रिटिश सरकारनें खटले भरले. त्या खटल्याच्या चौकशींत यांचे जाहीरनामे, हुकूम, भाषणें, व्यवस्था वगैरेंची माहिती पुढें आली. त्यावरून यांच्या एकंदर शिस्तीवर व रचनेवर चांगला प्रकाश पडला. यांच्या सैन्यांत हिंदु-मुसलमान वगैरे जाती एकदिलानें काम करीत असून त्यांच्यांत संगतवार कायदेशीर घटना होती. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या भावनेनें सर्व सैनिक भारलेले असून त्यांचा 'नेताजी सुभाषचंद्र बोस' यांच्यावर कमालीचा विश्वास होता. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याच्या दृष्टीनें परिपूर्ण ऐक्यसाधक अशा 'जय हिंद', 'चलो दिल्ली' वगैरे घोषणा व अनेक उत्साहवर्धक नवीन युद्धगीतें आझाद सेनेंत प्रचारांत आलीं. १८५७ सालच्या स्वातंत्र्य युद्धापेक्षां बाहेरच्या अनेक राष्ट्रांचा पाठिंबा ही गोष्ट या उठावांत विशेष होती.

कलकत्ता येथील बोस बंधूंच्या वडिलोपार्जित निवासस्थानापैकीं पाऊण हिस्सा श्री. शरच्चंद्र बोस व त्यांचे कांहीं मित्र यांनीं सुमारें दोन लाख रुपयांला खरेदी केला असून ती इमारत राष्ट्रकार्यासाठीं अर्पण करण्यांत आली आहे. या इमारतीचें 'नेताजी भवन' असें नवें नामकरण करण्यांत आलें असून त्याचा 'ट्रस्ट' झाल्यानंतर त्या ठिकाणीं नेताजी सुभाषबाबू यांना प्रिय असलेलीं देशसेवेचीं कार्यं सुरू होणार आहेत. दरम्यान या इमारतींत आझाद फौजेंतील सैनिकांसाठीं विश्रांतिस्थान स्थापन करण्यांत आलें आहे. यापूर्वी बोस-बंधूंनीं कटक येथील आपलें वडिलोपार्जित घर उत्कल काँग्रेस कमिटीला देणगी म्हणून दिलें होतें.

यांचे ग्रंथ--( 1 ) The Indian Struggle (1935 जप्त), ( 2 ) Through Congress Eyes (1918), ( 3 ) An Indian Pilgrim.

**ब्रह्मचारी, सर-उपेंद्रनाथ**—( जन्म स. १८७५–मृत्यु स. १९४६ ) बंगालमधील सुप्रसिद्ध डॉक्टर व संशोधक.

मोंघीर जिल्ह्यांतील जमालपूर हें गांव यांचें जन्मस्थान. यांच्या वडिलांचें नांव नीलमणी ब्रह्मचारी. हे एम्. डी. झाल्यानंतर 'Hāemolysis' वरील यांच्या संशोधनाबद्दल यांना पीएच्. डी.ची पदवी मिळाली होती ( १९०४ ).

डाक्का मेडिकल स्कूलमध्यें कांहीं दिवस अध्यापकाचें काम केल्यानंतर हे कलकत्त्याच्या कॅम्बेल मेडिकल स्कूलमध्यें अध्यापकाचे जागीं स्थिर झाले. १९२७ सालीं कार्यनिवृत्तीच्या वेळीं बंगालच्या मेडिकल कॉलेज हॉस्पिटलचे हे फिजिशियन होते.

परंतु मुख्यतः संशोधक म्हणूनच यांची आंतरराष्ट्रीय प्रसिद्धि असे. कार्टन फीवर या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या बंगालमधील तापाच्या साथीवर यांनीं सुचविलेल्या उपाययोजनेनें हे प्रथम जनतेसमोर आले. 'काळा आजार' या बंगालमध्यें प्रामुख्यानें आढळणाऱ्या रोगावरील उपाययोजनेचा विचार करतांना कलोडल अँटिमनीचा शोध यांनीं लावला व त्याचा कार्टन फीवरवरील परिणाम जनतेच्या नजरेस आणून दिला. त्यावर अँटिमनी व सोडियम अँटिमनीचा उपयोग सुचविणारे हे पहिले संशोधक होत. यांच्याच पुढें जाऊन यांनीं युरिआ-स्टिबॅमिन या नांवानें प्रसिद्ध झालेलें युरिआ-अँटिमनी कांपाउंड शोधून काढलें. हें औषध

व त्यानंतर यांनीं शोधलेल्या अटिमनील कांपाउंड्सनीं काळ्या आजाराचे उपाययोजनेंत अक्षरशः क्रांति केली आहे. पूर्वीच्या काळीं असाध्य समजला जाणारा हा रोग आतां या औषधानें सहजसाध्य झाला असून बंगाल वगैरे प्रांतांतून तो कायमचा नाहींसा होण्याचे मार्गावर आहे. आसाम सरकारनें तर या औषधाचा उपयोग सार्वत्रिक केला व या औषधाचे संशोधनकालापासून-१९३३ अखेर ३,२८,५९१ लोकांना या औषधाचा फायदा देण्यांत आला.

सालव्हरसन या उपदंशावरील जगप्रसिद्ध औषधाचा थायोसारमिन नांवाचा देशी पाठ करणारांपैकीं हे प्रमुख होत.

कलकत्त्याची ब्रह्मचारी रिसर्च लेबॉरटरीज ही संस्था यांच्या मुलांनीं यांच्या पश्चात् चालविली.

इंग्रजी ग्रंथ—(1) Studies on Haemolysis, (2) Treatise on Kala Azar, (3) Kala Azar (डॉ. कार्ल मेन्सच्या Handbuch der Tropen-krankheiten मधील एक प्रकरण).

**ब्लॅव्हॅट्स्की, मॅडम हेलेना पेट्रोव्हना**—(जन्म स. १८६१–मृत्यु स. १८९१ मे ८) थिऑसाफिकल सोसायटीच्या संस्थापक व परलोक विद्येच्या जगप्रसिद्ध अभ्यासक.

पिता—कर्नल पीटर हॅन. माता—हेलन फॅडिक. वडील रशियांत तोफखान्यावरील अधिकारी होते. यांनीं त्यांच्याबरोबर लंडन येथें राहून गायनवादनाचा अभ्यास केला होता. या शरीरानें स्थूल व कुरूप होत्या. वयांतील जनरल ब्लॅव्हॅट्स्कीबरोबर यांचें लग्न झालें. पण या वरातींतूनच पळाल्या, त्या सातआठ वर्षे परत आल्या नाहींत असें म्हणतात.

यांनीं इजिप्त, लॅबानॉन येथें गूढविद्येचा अभ्यास केला व या इटलींत गॅरिबाल्डीच्या स्वयंसेवकांत दाखल होऊन जखमीहि झाल्या होत्या. यांना १८५१ मध्यें लंडनच्या रस्त्यांत नेपाळांतील सिद्ध पुरुष आढळले. त्यांच्या आदेशावरून या हिंदुस्थानांत येऊन दंग्याच्या परिस्थिती-मुळें परत गेल्या आणि पुनः येऊन हिमालयांत गुरु-देवाच्या सान्निध्यांत योगाभ्यास केला (१८६७-७०). १८७१ मध्यें इजिप्तांत व १८७३ सालीं या न्यू यॉर्कमध्यें फुलें करून एका यहुदी दुकानदाराजवळ राहून उदर-निर्वाह करीत.

१८७४ सालीं कर्नल ऑल्कॉट यांची गांठ पडून दोघांनीं थिऑसाफिकल सोसायटी स्थापिली. या चमत्कारहि करीत. मि. सिनेट व ए. ओ. ह्यूम यांच्या विनंतीवरून यांनीं एका सिद्धाशीं अनेक गूढ प्रश्नांबद्दल पत्रव्यवहार केला. त्या पत्रव्यवहाराचे आधारें सिनेट यांनीं आपले अनेक ग्रंथ लिहिले व त्या माहितीनें आकर्षित होऊन बेझंटबाई व लेटबीटर हे थिऑसाफीकडे वळले. तो पत्रव्यवहार मिसेस बार्कर यांनीं प्रसिद्ध केला व मूळ पत्रें ब्रि. म्युझियम लायब्ररींत ठेवलीं आहेत. तशीं सिद्धांचीं कांहीं पत्रें अड्यार येथें आहेत.

या चमत्कारांच्या खुलाशासाठीं इंग्लंडमधील 'सायकिकल रिसर्च सोसायटी'पुढें कर्नल आल्कॉट यांनीं साक्ष दिली. त्या संस्थेनें प्रत्यक्ष चौकशीकरितां डॉ. हाग्सन यांना अड्यार येथें पाठविलें. तेव्हां या व आल्कॉट हे युरोपांत होते. तथापि त्यांनीं माहिती मिळवून रिपोर्ट केला आणि त्यावरून त्या सोसायटीचे अध्यक्ष प्रसिद्ध नीतिशास्त्रज्ञ प्रो. सिज्विक यांनीं विरुद्ध निर्णय दिला आणि 'एकोणिसाव्या शतकांतील ब्लॅव्हॅट्स्कीबाई या अत्यंत लबाड व्यक्ति आहे' असा शेरा मारला.

यामुळें सोसायटींत अत्यंत खळबळ उडून अनेक सभासदांनीं राजीनामे दिले. पण मि. सिनेट व सुब्रह्मण्य अय्यर यांनीं वरील निर्णय चुकीचा असल्याचा अहवाल प्रसिद्ध केला. तरी यांना उद्विग्नता येऊन यांनीं हिंदुस्थान सोडून या जर्मनींत जाऊन राहिल्या. तेथें यांनीं आपला दुसरा सीक्रेट डॉक्ट्रिन हा प्रचंड ग्रंथ लिहिण्यास सुरवात केली. तो इंग्लंडमध्यें बर्ट्राम व आर्चिनाल्ड कीटले यांच्याकडून तपासून घेऊन प्रसिद्ध करण्यांत आला (१८८८). या ग्रंथामुळें बेझंटबाईसारखीं माणसें सोसायटीला मिळालीं.

यांचें देहावसान झालें तो दिवस व्हाइट लोटस डे-श्वेतपद्माष्टमी म्हणून सभासद पाळतात व त्या दिवशीं लाइट ऑफ एशिया व भगवद्गीता वाचतात.

# भ

**भगत, प्रेमेन्द्रसिंग**—(जन्म स. १९१८) दुसऱ्या महायुद्धांत व्हिक्टोरिया क्रॉस मिळवणारे पहिले हिंदी सैनिक.

यांचे वडील संयुक्त प्रांतांत एक्झिक्युटिव्ह एंजिनियर होते. प्रथम हे शिकाऊ सैनिक म्हणून सैन्यांत शिरले (१९३९) व शेवटीं हिंदी मनुष्याला लष्करांत मिळूं शकणारा सर्वश्रेष्ठ मान यांनीं मिळविला.

ॲबिसिनियाच्या युद्धांत भुईसुरुंग काढण्यांत यांनीं दाखविलेल्या धडाडीबद्दल हा मान यांना देण्यांत आला. मेतोम्माच्या पाडावानंतर गोंडर रस्त्यावर इटालियन लोकांनीं पुरून ठेवलेले भुईसुरुंग काढण्याचें काम त्या वेळीं सेकंड लेफ्टनंट असणाऱ्या यांचेवर सोपविण्यांत आलें (१९४१). यांनींहि तडफेनें सुरवात करून अठ्ठेचाळीस तासांत सर्व सुरुंग काढून रस्ता निर्भय केला. पंचावन मैलांच्या रस्त्यावरील पंधरा सुरुंग काढण्यांत हे यशस्वी झाले. तेथील धडाक्यानें यांचे कानांचे पडदे मात्र निकामी झाले व हे बेशुद्ध पडले.

वज्रासारखें कणखर धैर्य व आत्मविश्वास असा यांच्या या बहादुरीचा उल्लेख करून दिल्ली येथें लॉर्ड लिनलिथगो यांच्या हस्तें यांना व्हिक्टोरिया क्रॉस देण्यांत आला. यांना कॅम्बर्ले येथें स्टाफ कॉलेजमध्यें आपला शिक्षणक्रम आटोपण्याची सवलतहि देण्यांत आली (१९४४).

**भगतसिंग**—(फांशी स. १९३१ मार्च २३ लाहोर) सुप्रसिद्ध क्रांतिकारक व क्रांतिवाद-प्रतिपादक.

असेंब्लीवर बॉम्ब टाकण्याच्या आरोपावरून हे व बटुकेश्वर दत्त यांना पकडण्यांत आलें (४ एप्रिल १९२९). पुढें राजगुरु व हे यांना सॉन्डर्सच्या खुनाबाबत उभारलेल्या लाहोरकटांत गोंवण्यांत आलें. असेंब्लींत बॉंब टाकल्यावर यांना पकडलें तेव्हां यांच्याजवळ असलेल्या पिस्तुलाशीं लाहोर येथें सॅन्डर्सला मारलेली गोळी जुळली व 'सॅन्डर्स मेला, लालाजींचा सूड उगवला' या हस्तपत्रकाशीं यांचें हस्ताक्षर जमलें. लाला लजपतराय यांच्या मृत्यूला कारण झालेल्या मि. स्कॉट यांना मारण्याऐवजी शिवराम हरि राजगुरु व हे यांच्या गोळीला चुकीनें सॅन्डर्स बळी पडला व पाठलाग करणाऱ्या चरणसिंगालाहि ठार करण्यांत आलें. यांनीं या खटल्याचे वेळीं खटला चालविण्यांत व अन्नसत्याग्रह वगैरे प्रकारांनीं चालविलेल्या कायदेशीर अडचणीस तोंड देण्याकरितां 'लाहोर कान्स्पिरसी ट्रायल आर्डिनन्स' पास करून घेणें भाग पडलें.

खटल्याचे वेळीं यांनीं दिलेली सर्वच जबानी अति तेजस्वी होती. 'आम्ही करूं तो जुलूम प्रजा सोसते म्हणून कांहीं कर्झनछाप अधिकारी राष्ट्राचीं छकलें करण्यासाठीं पुढें धांवतात. तशा मदांध अधिकाऱ्यांच्या कानीं त्रस्त प्रजेच्या आर्त किंकाळ्या पोंचूंच शकत नाहींत. अशा बेगुमान अधिकाऱ्यांचे कान खोलण्यासाठीं व डोळे उघडण्यासाठीं आम्हाला बॉम्बचे आवाज काढावे लागतात'–हे यांचे उद्गार यांच्या वृत्तीवर प्रकाश टाकणारे आहेत.

७ आक्टो. १९३० ला हे, राजगुरु व सुखदेव यांना फांशीची शिक्षा सांगण्यांत आली. गांधी-आयर्विन-करार झाला आणि राष्ट्रानें एकमुखानें मागणी केली तरी या तिघांना लाहोर तुरुंगांत सायंकाळीं साडेसात वाजतां फांशी देण्यांत आलें व आप्तांनासुद्धां न कळवतां यांचीं प्रेतें नष्ट करण्यांत आलीं. कराचीच्या राष्ट्रसभेंत या तिघांचे शौर्य व त्याग यांबद्दल अभिनंदन करण्यांत येऊन यांना फांशी देण्यांत सरकारनें अवास्तव सुडाचें कृत्य केल्याचें नमूद करण्यांत आलें.

**भगवानदास, डॉ.**—(जन्म स. १८६९) संयुक्त प्रांतांतील सुप्रसिद्ध काँग्रेस कार्यकर्ते व थिऑसफिस्ट.

क्वीन्स स्कूल व बनारस कॉलेज येथें आपलें शिक्षण संपवून हे तत्त्वज्ञानाचे एम्. ए. होऊन सरकारी नोकरींत शिरले (१८९०) व थोड्याच दिवसांत हे डेप्युटी कलेक्टर झाले.

पुढें बेझंटबाईनीं सेंट्रल हिंदु कॉलेज काढल्यानंतर यांनीं सरकारी नोकरीचा त्याग केला व हे त्या संस्थेच्या मॅनेजिंग कमेटीचे कार्यवाह असतांच त्या कॉलेजचें हिंदु युनिव्हर्सिटींत रूपांतर झालें. पुढें १९२१ सालीं काशीच्या बाबु शिवप्रसाद गुप्त यांच्या दहा लाख रु.च्या देणगीनें सुरू झालेल्या काशी विद्यापीठाच्या विश्वस्त मंडळाचे यांना अध्यक्ष व कुलपति नेमण्यांत आलें.

१८८४ पासून थिऑसफिकल सोसायटीचे कार्यकर्ते असून १९१२ सालीं हे त्या संस्थेचे कार्यवाहहि होते. १९२१ सालच्या असहकाराच्या चळवळींतहि यांनीं मनापासून भाग घेतला व यांना एक वर्षाची सजा झाली. तेव्हांपासून हे संयुक्त प्रांतांतील काँग्रेस चळवळीचे प्रमुख कार्यकर्ते बनले आहेत. यू. पी. सोशल कॉन्फरन्स, यू. पी. पोलिटिकल कॉन्फरन्स, यू. पी. प्रांतिक काँग्रेस कमेटी इत्यादि संस्थांचे हे वेळोवेळीं अध्यक्ष होते.

यांचा जुनी हिंदी संस्कृति व इतिहास यांचा अभ्यास गाढा असून सध्यांच्या आर्थिक विषमतेवर समाजवादापेक्षां निराळा मार्ग यांनीं 'सोशल रिकन्स्ट्रक्शन' या ग्रंथांत सुचविला आहे. मनूचीच चातुर्वर्ण्याची योजना परंतु बुद्धिमान, अधिकारी, पैशाचा व्यवहार पाहणारे व कामगार असे समाजाचे चार वर्ग पाडण्याच्या स्वरूपांत यांनीं मांडली आहे. या सर्व समाजाला उच्च पातळींत ठेवण्याची पात्रता असणाऱ्या लोकांसाठीं योगविद्यालयें काढण्याची कल्पना यांनीं सुचविली असून थिऑसफिकल सोसायटी किंवा तिच्या पौर्वात्य विद्यालयांत अशीं योगविद्यालयें काढण्याची यांची कल्पना आहे.

मुख्य आर्थिक प्रश्नांच्या दृष्टीनें ही योजना हीणकस ठरते. सध्यांच्या काळांत ब्रह्मविद्येच्या प्रचारकांची कमतरता आहे म्हणून अव्यवस्था माजली हें यांचें म्हणणें चुकीचें असून समाजाची घडणच अशी बसली आहे कीं, त्यांतून ब्रह्मवेत्ते निर्माण होऊंच शकत नाहींत. शिवाय समाजवादाचें तत्त्वज्ञानहि अद्यापि स्थिर झालेलें नाहीं.

यांचे ग्रंथ—(1) Social Reconstruction, (2) The Purpose and Use of Philosophy, (3) Ancient Versus Modern Scientific Socialism, (4) Communalism and its Cure, (5) The Science of Emotions, (6) The Essential Unity of all Religions इत्यादि.

**भगवानदीन**—(जन्म स. १८६६–मृत्यु स. १९३०) हिन्दी शब्दसागर या कोशाचे एक संपादक, हिन्दी भाषेंतील लेखक, कवि व टीकाकार.

जन्मस्थान बरवड (फतहपुर जिल्हा). जात श्रीवास्तव 'दुसरे कायस्थ.' उर्दू व फारसी भाषांचें शिक्षण घेतल्यावर पित्याबरोबर हे बुन्देलखंडांत आले. प्रयाग येथें मूर सेन्ट्रल कॉलेजांत थोडे दिवस काढल्यावर यांनीं शिक्षकाचा पेशा पत्करला. छत्रपुर, काशी वगैरे ठिकाणीं शिक्षक असतांनाच यांचें लेखन कार्य चालत असे. हे हिन्दी भाषेचे मर्मज्ञ असून जुन्या कवींच्या काव्याचा यांचा अभ्यास चांगला असे. हे व्रजभाषा व खडी बोली या दोहोंत कविता करीत. खडी बोलींतील कवितांकरितां हे उर्दू छन्द विशेष पसंत करीत. हे लक्ष्मी व उपदेश लहरी यांचे संपादक होते. यांनीं कविसमाज, काव्यलता या नांवाच्या सभा व भारतीभवन नांवाचें पुस्तकालय उघडलें होतें.

यांचे ग्रंथ—कवितासंग्रह–१ नवीन बीन, २ नदीमे दीन; काव्य–३ वीर क्षत्राणी, ४ वीर बालक, ५ वीर पंचरत्न; टीका–६ रामचंद्रिका, ७ कविप्रिया, ८ दोहावली, ९ कवितावली, १० बिहारी सतसई; अलंकार–अलंकारमंजूषा इ.

**भटनागर, सर शांतिस्वरूप**—(जन्म स. १८९५) आंतरराष्ट्रीय कीर्तीचे रसायनशास्त्रज्ञ.

यांच्या वडिलांचें नांव बाबू परमेश्वरीसाहाय्य. लहानपणींच वडील वारल्यानें यांचें पालन यांच्या अजोबांनीं केलें. १९११ सालीं प्रवेशपरीक्षा पास झाल्यानंतर यांनीं शिकवण्या करून व बी. एस्सी. झाल्यावर लाहोरच्या दयाळसिंग कॉलेजांत डेमॉन्स्ट्रेटरचें काम करून आपलें शिक्षण पुरें केलें. एम्. एस्सी. झाल्यानंतर हे कर्ज काढून इंग्लंडला गेले व यांनीं आपला पुढील अभ्यासक्रम चालू ठेवला. पुढें एक वर्षानंतर यांना प्रिव्ही कौन्सिलची दोनशें पन्नास पौंडांची शिष्यवृत्ति मिळाली व हे लंडन विश्वविद्यालयाची डी. एस्सी. ची पदवी मिळवून हिंदुस्थानला परत आले (१९२०).

हिंदुस्थानांत आल्यानंतर कांहीं दिवस बनारस हिंदु युनिव्हर्सिटींत रसायनशास्त्राच्या प्राध्यापकाचें काम केल्यानंतर यांची लाहोर युनिव्हर्सिटींत रसायनाचे प्राध्यापक म्हणून नेमणूक झाली. याचबरोबर युनिव्हर्सिटीच्या लेबॉरेटरीची व्यवस्थाहि यांचेकडेच सोंपविण्यांत आली. येथील दीर्घकालीन (१९२४-१९४०) कार्यानंतर हे निवृत्त झाले.

परंतु याच काळांत कलिल रसायन, प्रकाश रसायन व चुंबक रसायन विषयक यांनीं केलेल्या संशोधनानें यांना आंतरराष्ट्रीय कीर्तीचा लाभ झाला. चुंबक रसायनाचे साहाय्यानें अणूंची रचना ठरविण्यांत हे यशस्वी झाले असून Principles and Applications of Magneto-Chemistry हा यांचा या विषयावरील ग्रंथ रसायनशास्त्रांतील नवी ज्ञानशाखा उघडण्याइतका

महत्त्वाचा ठरला. कलिल रसायनांतील यांचें इमल्शन्स-संबंधींचें व प्रकाशरसायनांतील प्रकाशाच्या जंतूंवरील परिणामांचें यांचें संशोधन असेंच महत्त्वाचें आहे. कर्नल सोहनलाल भाटिया, डॉ. माताप्रसाद, डॉ. के. एन्. माथुर इत्यादि लोक यांच्या या संशोधनांतील सहकारी होते. यांच्या या संशोधनाबद्दल यांना एफ. आर. एस्. (फेलो ऑफ दि रॉयल सोसायटी) करण्यांत आलें.

परंतु हे येथेंच स्वस्थ बसले नाहींत. आपल्या संशोधनानें मिळालेल्या आपल्या आंतरराष्ट्रीय प्रसिद्धीचा उपयोग शास्त्रीय अघाडीवरील हिंदुस्थानच्या अडचणी जगाच्या नजरेस आणण्याचे कामांत हे अतियशस्वी झाले आहेत. केमिकल सोसायटी, लंडन; ब्रि. असोसिएशन फॉर दि ॲडव्हान्समेंट ऑफ सायन्स, लिव्हरपूल; एम्पायर युनिव्हर्सिटीज कॉंग्रेस ( १९३१-३६ ); इत्यादि परदेशी संस्थांतून यांनीं हिंदुस्थानची बाजू अति तडफदारपणे मांडली.

परंतु यापेक्षांहि अमेरिका व कॅनडांत इंडियन सायन्टिफिक मिशनचे सभासद या नात्यानें यांनीं केलेला प्रचार जास्त प्रभावी होता. 'औद्योगिक क्षेत्रांतील हिंदी लोकांच्या पिछेहाटीचें मूळ हिंदी लोकांचे कार्यक्षमतेच्या अभावांत नाहीं; ब्रिटिशांच्या विशिष्ट धोरणांत आहे. एक सहा महिने हिंदुस्थानांतील सर्व कारखाने आमच्या ताब्यांत द्या व मग आमच्या कार्यपद्धतीचें मोल ठरवा' असा रोखठोक सवाल यांनीं अमेरिकन लोकांना टाकला ( १९४५ ).

यांच्या मदत करण्याच्या वृत्तीमुळें रसायनाशीं संबंध येणारी कोणतीहि सरकारी व बिनसरकारी योजना यांच्या साहाय्याशिवाय पूर्णता पावत नाहीं. पंजाब युनिव्हर्सिटी, ईंडियन इन्स्टिटयूट ऑफ सायन्स व इंडियन सायन्स कॉंग्रेसशीं यांचे विशेष घनिष्ठ संबंध आहेत. इंडियन सायन्स कॉंग्रेसच्या रसायनशाखेचे ( १९२८, ३८ ) व कॉंग्रेसचे हे अध्यक्ष होते ( १९४५ ).

यांचे इतर ग्रंथ—इल्मुलबर्क ( इलेक्ट्रिसिटीवरील उर्दू ग्रंथ ).

**भट्ट, मणिशंकर रतनजी**—( जन्म स. १८६७–मृत्यु स. १९२३ ) सुप्रसिद्ध गुजराथी कवि.

हे कान्त या टोपण नांवानें लिहीत. यांच्या बहुतेक कविता 'पूर्वालाप' या नांवानें प्रसिद्ध झाल्या आहेत. यांनीं नाटकें वगैरे पुष्कळ लिखाण केलें असलें तरी यांची कविता उत्कृष्ट समजली जाते.

यांचें गुजराथी वाङ्मय—काव्य-१ वसंतविजय, २ चक्रवाकमिथुन (खंडकाव्य); कवितासंग्रह-३ पूर्वालाप; नाटकें-४ एका देवेनुन वृत्तान्त ( भाषान्तर ), ५ गुरु गोविंदसिंग, ६ रोमनस्वराज्य.

**भडकमकर, डॉ. रामकृष्ण हरि**—( जन्म स. १८८४ फेब्रु. ८ ) महाराष्ट्रांतील विख्यात निदानकुशल डॉक्टर व सार्वजनिक कार्यकर्ते.

यांचे वडील संस्कृतचे प्राध्यापक असल्यानें लहानपणापासूनच यांना संस्कृतभाषाध्ययनाची गोडी लागली. त्यालाच पुढें सूक्ष्म शास्त्रीय दृष्टीची जोड मिळाल्यानें हे एम्. ए., एम्. डी. झाले व यांनीं प्रॅक्टिस करण्यास सुरवात केली. प्रथम मुंबई व नंतर पुणें हें यांच्या दवाखान्याचें मुख्य केंद्र होतें. फलटणच्या व मिरजच्या राजेसाहेबांची यांचेवर विशेष श्रद्धा आहे.

काव्य व शास्त्र यांच्या विशेष प्रकारच्या मेळामुळें यांना इतक्या असामान्य लोकप्रियतेचा लाभ झाला. प्रथम अगदीं रोग्याच्या बारीकसारीक तक्रारीसुद्धां लक्षांत घ्यावयाच्या व साध्यांतसाध्या औषधयोजनेपासून सुरवात करावयाची अशी यांची कार्यपद्धति आहे. ज्ञानाचा बडेजाव नाहीं, गरीब श्रीमंत हा भेद नाहीं, अशा थाटांत हे काम करूं लागले म्हणजे औषध घेण्याच्या आधींच रोग्याला निम्मे बरें वाटतें.

याशिवाय महाराष्ट्रांतील अनेक औद्योगिक घटनांशीं यांचा अत्यंत निकटचा संबंध आहे. आयुर्वेदाचे हे अत्यंत पुरस्कर्ते आहेत.

**भागवत, राजारामशास्त्री रामकृष्ण**—( जन्म स. १८५१–मृत्यु स. १९०८ ) महाराष्ट्रांतील सुधारक व नवविचार प्रवर्तक.

जात कऱ्हाडे ब्राह्मण. जन्मस्थान कशेळी ( ता. राजापूर ). १८६७ सालीं यांची प्रवेशपरीक्षा उत्तीर्ण झाली. तीन वर्षे मेडिकल कॉलेजांत शिक्षण घेऊन यांनीं तें सोडलें आणि हे जुन्या शास्त्र्याजवळ पांचसहा वर्षे संस्कृतचें अध्ययन केलें. नंतर मनीस्कुलांत कांहीं महिने व पुढें सेंट झेवियर कॉलेजमध्यें हे संस्कृत शिकवूं लागले ( १८७७-१९०८ ). तेथें काम करीत असतां बॉबे हायस्कूल व पुढें मराठा हायस्कूल काढून

तेथें बावीस वर्षें अध्यापन केलें. हे जातिभेद व खाण्यापिण्याच्या निर्बंधाविरुद्ध होते. वेदोक्त धर्माकडे यांचा ओढा होता व त्यांत वरील निर्बंध नाहींत असें हे प्रतिपादीत. यांचे विचार मूलगामी व स्वतंत्र असत. ते समाजाला झेपत व कळत नसल्यानें हे विक्षिप्त ठरत. शब्दांच्या व्युत्पत्त्या व भाषाशास्त्रावरून नवे सिद्धान्त प्रतिपादण्यास मराठींत यांनीं प्रथम सुरवात केली.

वाङ्मय—१ विधवाविवाह शास्त्र कीं अशास्त्र ?, २ मराठ्यांसंबंधीं चार उद्गार, ३ शिवछत्रपतींचें चरित्र, ४ ब्राह्मण व ब्राह्मणधर्म, ५ व्रात्यस्तोम, ६ केसरकडून सुलतानाकडे, ७ ऐतरेय व श्वेताश्वतर ( मूळासह इंग्रजी व मराठी भाषान्तरें ). यांशिवाय विविध विषयांवर यांचें पुष्कळ मराठी व इंग्रजी वाङ्मय प्रसिद्ध आहे.

**भाटिया, कर्नल, सोहनलाल**—( जन्म स. १८९१ ) मुंबईच्या ग्रॅन्ट मेडिकल कॉलेजचे सुप्रसिद्ध प्रिन्सिपल व संशोधक.

केम्ब्रिज युनिव्हर्सिटी व लंडनच्या सेंट टॉमस हॉस्पिटलमध्ये आपले शिक्षण संपवून हे एम्. डी., एफ. आर. सी. पी. झाले व सेंट टॉमस हॉस्पिटलमध्यें क्लिनिकल असिस्टंट, हाउस सर्जन, ऑफथॅल्मिक हाउस सर्जन अशीं अनेक कामें केल्यानंतर हे इंडियन मेडिकल सर्व्हिसमध्यें शिरले ( १९१७ ).

पहिल्या महायुद्धांत इजिप्शियन एक्सपिडिशनरी फोर्समध्यें ( १०५ वी मराठा लाइट इन्फन्ट्री ) काम केल्यानंतर हे हिंदुस्थानांत आले व प्रथम फिजिऑलजीचे प्राध्यापक, नंतर डीन असे चढत चढत हे मुंबईच्या ग्रॅन्ट मेडिकल कॉलेजचे प्रिन्सिपल बनले ( १९३७ ). तें व जे. जे. हॉस्पिटलसच्या सुपरिंटेडेन्टचें काम केल्यानंतर हे सरकारी नोकरींतून निवृत्त झाले ( १९४१ ). त्यानंतर इंडियन मेडिकल सर्व्हिसचे डायरेक्टर जनरल म्हणून यांची नेमणूक झाली.

इंडियन जर्नल ऑफ मेडिकल रिसर्च व इंडियन मेडिकल गॅझेटमधून याचे अनेक संशोधक निबंध प्रसिद्ध झाले आहेत.

**भाटे, गोविंद चिमणाजी**—( जन्म स. १८७० सप्टें. १९–मृत्यु स. १९४६ एप्रिल २६ ) सांगलीच्या विलिंग्डन कॉलेजचे पहिले प्रिंसिपल, प्रमुख समाजसुधारक व मराठींतील प्रसिद्ध लेखक.

यांचा जन्म महाडला झाला. एम्. ए. झाल्यावर हे पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजांत इंग्रजी व तत्त्वज्ञान या विषयांचे प्राध्यापक म्हणून काम करूं लागले. सांगलीच्या विलिंग्डन कॉलेजच्या स्थापनेंत विशेष पुढाकार घेऊन सेवानिवृत्त होईपर्यंत हे तेथें प्रिंसिपल होते. महाराष्ट्रांतील आरंभींच्या कर्तृत्ववान् समाजसुधारकांत यांची गणना असे. विधवाविवाहास प्रोत्साहन मिळावें व जातिभेदाचें निर्मूलन व्हावें म्हणून यांनीं पुनर्विवाह व मिश्रविवाह केला. ऐतिहासिक दप्तरें तपासण्याकरितां यांनीं वर्षभर इंग्लंडमध्यें मुक्काम केला होता. यांचीं प्रवासावरचीं पुस्तकें तेव्हां चांगलींच लोकप्रिय होतीं. याशिवाय यांनीं अनेक विषयांवर मराठी व इंग्रजी पुस्तकें लिहिलीं आहेत.

समाजाच्या घटनेचा मूलगामी विचार न करितां एखाद्या सुधारणेनें सर्व समाजाचा उद्धार साधण्याच्या कालांत यांच्यासारखे तळमळीचे कार्यकर्ते धडाडीनें पुढें सरसावले. यांनीं पत्करलेल्या मार्गाबद्दल मतभेद झाला तरी यांची धडाडी व तळमळ यांबद्दल कोणालाहि आदरच व्यक्त करावा लागेल.

यांचे ग्रंथ—१ अर्थशास्त्राचीं मूलतत्त्वें, २ कार्लाइल, ३ हिंदु चालीरीती, ४ तीन तत्त्ववेत्ते, ५ कलाविषयक तत्त्वज्ञान, ६ प्रेम कीं लौकिक (आत्मचरित्रपर कादंबरी), ७ कँट व शंकराचार्य, ८ भाषणें व निबंध ( इंग्रजी ), ९ मराठी वाङ्मयाचा इतिहास ( इंग्रजी ) इत्यादि.

**भातखंडे, विष्णु नारायण**—( जन्म स. १८७५–मृत्यु स. १९३६ सप्टें. ) भारतीय संगीताचे सुप्रसिद्ध अभ्यासक व संकलनकार.

जात चित्पावन ब्राह्मण. १८९० सालीं हे एल्एल्. बी. झाल्यावर मुंबईस वकिली करूं लागले. यांना लहानपणापासून गायनाचा नाद असे. यांनीं गायनाचा प्रत्यक्ष अभ्यास रावजीबुवा बेलबागकर, बेलबाग पुणें येथील गवई, व जयपूरचे मुहम्मद अलीखाँ यांजपाशीं केला. यांनीं मुहम्मद अलीखांच्या तीनशें चिजांचें रेकार्ड घेऊन ठेवलें आहे. यांनीं आपल्या हिंदुस्थान संगीत पद्धतीच्या संवादात्मक चार भागांत सुमारें दोनशें चिजांचें उत्कृष्ट विवरण केलें आहे. त्यांत रागांची माहिती व चिजांचें नोटेशन आढळतें. यांच्या क्रमिक पुस्तकांच्या एक ते सहा भागांत कांहीं अप्रसिद्ध रागांचा संग्रह आहे. यांनीं चतुर पंडित असें नांव घेऊन आधुनिक संगीत उदाहरण व

लक्षण अशा स्वरूपांत संस्कृतांत लक्ष्यसंगीत या ग्रंथांत ग्रथित केलें आहे ( १९१० ).

याशिवाय यांचा अभिनवरागमंजरी नांवाचा ग्रंथ आहे. हे सर्व ग्रंथ म्हणजे नव्याजुन्या संगीताचा ज्ञानकोशच होय. यांनीं ग्वाल्हेर व लखनौ येथें संगीत कॉलेजें काढलीं व पांच भारतीय स्वरूपाच्या संगीतपरिषदा भरविल्या.

**भानू, प्रा. चिंतामण गंगाधर**—( जन्म स. १८५६–मृत्यु स. १९३० ) मराठींतील सुप्रसिद्ध लेखक व वक्ते.

नाना फडणीसाच्या मेणवली गांवीं यांचा जन्म झाला. सातारा येथें माध्यमिक शिक्षण संपवून व ओव्हरसीयरची परीक्षा देऊन १८८४ त हे बी. ए. झाले व फर्ग्युसन कॉलेजांत इतिहासाचे प्राध्यापक झाले. इतिहास विषय हौसेनें व मनोरंजक तऱ्हेनें शिकवण्याबद्दल यांची प्रसिद्धि असे. पुण्याचे न्यू इंग्लिश स्कूलचेहि हे कित्येक दिवस प्रमुख होते.

मराठ्यांचा इतिहास मराठ्यांनींच लिहिला पाहिजे असें यांचें ठाम मत होतें आणि त्या दृष्टीनें यांनीं साधनांचा अभ्यासहि सुरू केला होता. नानासाहेब पेशवे आळशी व विलासी होते हें ग्रँट डफचें म्हणणें यांनीं खोडून काढलें ( १८९३ ). शिवाजीनें अफजलखानाचा वध विश्वासघातानें केला नसून त्याच्या विश्वासघाताचा प्रतिकार करून आत्मसंरक्षण करण्यासाठीं शिवाजीला त्याचा वध करावा लागला हें यांनीं आपलें मत प्रथम डेक्कन कॉलेजांत प्रो. बेन यांच्या अध्यक्षतेखालीं व्याख्यान देऊन सांगितलें. याच मताचा अनुवाद पुढें शिवाजीचे उत्सवांतील व्याख्यानांत यांनीं केला आणि त्या वेळचे अध्यक्ष लो. टिळक यांनीं जें भाष्य केलें तें निमित्त. मात्र घेऊन टिळकांवर पहिला राजद्रोहाचा खटला भरण्यांत आला. यांना सुद्धां आपलें प्राध्यापकाचें काम दोन वर्षेपर्यंत त्यामुळें सोडावें लागलें.

याच दोन वर्षांच्या सक्तीच्या विश्रान्तीच्या वेळीं यांनीं वेदान्ताचा अभ्यास करून ' भगवद्गीता ' मासिक रूपानें वाचकांपुढें मांडण्यास सुरुवात केली आणि त्या गीतेच्या उपसंहाराचें काम यांनीं १९१० सालीं पुरें केलें. वेदान्ताबरोबर यांनीं कीर्तनकलेचाहि अभ्यास केला. न्यू इंग्लिशकरितां नानावाडा इमारत बांधण्यास निधि जमविण्याचे बाबतींत यांना व्याख्यानापेक्षां कीर्तनकलेचाच अधिक उपयोग झाला. सेवानिवृत्तीनंतर हे अमळनेरच्या तत्त्वज्ञानमंदिरांतहि पांच वर्षे होते.

इतिहास, तत्त्वज्ञान इत्यादि विषयांप्रमाणे यांना नाट्यशास्त्राचीहि आवड होती. नाट्यशास्त्रावर यांनीं अनेक लेख लिहिले, नाट्यसंमेलनाचें अध्यक्षस्थान भूषित केलें व महाराष्ट्र नाटक मंडळींतील नटास अभिनयाचें शिक्षणहि हे देत. तसेंच यांनीं दोन कादंबऱ्याहि लिहिल्या आहेत. असे हे सर्वगामी बुद्धीचे प्रचंड उद्योग करणारे स्वाभिमानी गृहस्थ होते.

**भाभा, होमी जहांगिर**—( जन्म स. १९०९ ) सुप्रसिद्ध पारशी गणितज्ञ व शास्त्रज्ञ.

कॅथेड्रल व जॉन कॅनन स्कूलमध्यें आपलें माध्यमिक व मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेज व रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्स येथें आपलें विश्वविद्यालयीन शिक्षण संपविल्यानंतर हे गणित व विज्ञान यांचे उच्च शिक्षणाकरितां इंग्लंडला रवाना झाले. केंब्रिजच्या गॉनव्हिल व कॉयस कॉलेजमध्यें अध्ययन करून हे बी. ए. व गणिताची रौस बॉल ट्रॅव्हलिंग शिष्यवृत्ति मिळवून पीएच्. डी. झाले ( १९३४ ). यानंतर यांना विज्ञानाचे विशेष अभ्यासासाठीं ऐझॅक न्यूटन शिष्यवृत्तिहि मिळत असे. १८५१ सालच्या पुरातन प्रदर्शनाचेहि हे कांहीं दिवस अभ्यासक होते ( १९३६ ).

हिंदुस्थानांत आल्यानंतर यांची बंगलोरच्या इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ सायन्समध्यें थिऑरिटिकल फिजिक्सचे स्पेशल रीडर म्हणून नेमणूक झाली ( १९४० ). यानंतर यांनीं इन्स्टिट्यूटमध्यें कॉसमिक रे रिसर्च युनिटचे प्राध्यापक म्हणून काम करण्यास सुरुवात केली. परंतु पुढें मुंबईला टाटांनीं टाटा इन्स्टिट्यूट ऑफ फंडॅमेंटल रिसर्च स्थापना करतांच यांची तेथें प्रमुख डायरेक्टर म्हणून नेमणूक झाली ( १९४५ ). तेथें हे थिऑरिटिकल फिजिक्सच्या प्राध्यापकांचे कामहि करतात.

हिंदुस्थानच्या शास्त्रीय अघाडीवरील अगदीं तरुण लोकांत हे प्रमुख आहेत. शास्त्रांच्या विज्ञान शाखेंतील क्वॉन्टम थिअरी, प्राथमिक वैज्ञानिक परिमाणूंचा सिद्धान्त व कॉस्मिक रेडिएशनचे यांना सर्व हिंदुस्थानांत दर्दी मानण्यांत येतें. या विषयांवर यांनीं लिहिलेल्या लेखांची सर्वत्र वाहवा झाली आहे.

पाटणा युनिव्हर्सिटीनें यांना बाहुमानिक डी. एस्सी. केलें असून इंग्लंडमधील रॉयल सोसायटीचे फेलो होण्याचा मानहि यांना मिळाला आहे.

**भारती, सुब्रह्मण्य**—( जन्म स. १८८२–मृत्यु स. १९२१ सप्टें. ) तामीळ भाषेंतील सुप्रसिद्ध राष्ट्रीय कवि, वक्ते, लेखक, वृत्तपत्रचालक, तत्त्वज्ञ व क्रान्तिकारक.

यांचे वडील एट्टायपुरम् ( जि. तिनिवेल्ली ) संस्थानांत नोकरीस होते. ते तामीळ पंडित असून त्यांच्यामुळें यांना तामीळमध्यें कविता करण्याचा नाद लागला आणि भारती हें गौरवदर्शक उपपद प्राप्त झालें. वडील वारल्यावर हे बनारसला गेले व तेथें यांचें प्रवेश परीक्षेपर्यंत शिक्षण झालें. मात्र पुढें यांनीं देशी व परदेशी अनेक भाषांचें ज्ञान संपादन केलें.

वयाच्या एकोणिसाव्या वर्षापासून यांना उपजीविकेकरितां नोकरी करावी लागली. प्रथम मदुरेच्या सेतुपति हायस्कूलमध्यें शिक्षक व नंतर श्री. सुब्रह्मण्य अय्यर यांच्या स्वदेशमित्रम् या पत्राचे उपसंपादक म्हणून काम केलें. पुढें यांनीं इंडिया नांवाचें तामीळ साप्ताहिक स्वतःच्या जबाबदारीवर सुरू केलें. तेव्हां यांच्या लेखणींतील राष्ट्रीय वृत्ति, प्रखरता, सूक्ष्म विनोद, मर्मच्छेद, टवाळी व व्यंगचित्रण वगैरे गुणांचा तामीळ जनतेला परिचय होऊन यांच्याकडे तरुणांचें पुढारीपण आलें. ओघानें सरकारच्या अवकृपेस पात्र होऊन यांना फ्रेंचांच्या पांदेचेरीस आश्रय घ्यावा लागला. तेथील एकान्तवास यांना यमयातनेपेक्षां कष्टप्रद झाला. कालिदास व शक्तिदास या नांवांनीं हे लिहीत. पण यांना आर्थिक हलाखीनें अक्षरशः अर्धपोटी राहून दिवस कंठावे लागले. मात्र अरविंद घोषांच्या सहवासाने यांचें लक्ष तत्त्वज्ञानाकडे वेधिलें आणि जाज्वल्य राष्ट्रभावनेबरोबरच उदात्त तत्त्वज्ञानहि यांच्या काव्यादिकांतून प्रगट होऊं लागलें. या हलाखीच्या स्थितींतच यांच्या हातून यांचें नांव अमर करणाऱ्या वाङ्मय कृति निर्माण झाल्या. सुमारें दहा वर्षे तिकडे राहून हे पुनः मद्रास प्रान्तांत परत झाले ( १९१८ ) आणि अनेक आपत्तींतून मार्ग काढीत हे पुनः 'स्वदेशमित्रम्'चे उपसंपादक झाले ( १९२० ). पण या क्रान्तिकारक महाकवीचा जर्जर देह लवकरच कालाधीन झाला.

यांचें लेखन सूक्ष्म, समृद्ध व तेजस्वी असून त्याचे गद्य व पद्य असे दोन विभाग आहेत. पद्यांत देश, देव व तत्त्वज्ञान असे व गद्यांत चिकित्सा, भाषान्तर, टिप्पण व सूक्ति असे भाग पडतात. त्यांत ऋग्वेदान्तर्गत कथाविषयापासून गीता, पातञ्जलसूत्रें, स्त्रीजीवन व अस्पृश्यता वगैरे अनेक विषय आले आहेत. हें सर्व लेखन तामीळ जनतेचा उत्कर्ष करण्याच्या तळमळीनें लिहिलें असल्यानें त्यांत कमालीचा जिव्हाळा आहे.

यांचा स्मृतिसप्ताह १९४६ सालीं आठवडाभर साजरा करण्यांत आला. त्याचें उद्घाटन मद्रासचे नगराध्यक्ष राधाकृष्ण पिल्ले यांनीं केलें. यांच्या स्मारकार्थ चक्रवर्ति राजगोपालाचारी प्रभृति तामीळ पुढाऱ्यांनीं निधि जमा केला. यांच्या कविता क्रमिक पुस्तकांत घालण्यास व म्हणण्यास बंदी उठविण्यासंबंधीं सर्वत्र ठराव झाले. यांच्या स्मारकाचा आराखडा मद्रासचे महाराष्ट्रीय शिल्पज्ञ चितळे यांनीं केला.

यांच्या कवितांची तुलना ॲटमबॉंबशीं करण्यांत येते. नमुन्याकरितां यांच्या सुप्रसिद्ध 'वंदे मातरं एनपों एंगळा मानिन तायै वणङ्गुतु एनपों' या तामीळ गीताचे बार्शीचे ज. गं. करंदीकरकृत भाषान्तर पुढें दिलें आहे.

तुला वंदुं माते ! तुझें गीत गाऊं,
जगीं तूं अम्हां मायभू देवता ।
अहा ! जातिपंथांचिया पार जाऊं,
निनादूं तुझी भूतलीं दिव्यता ।
असो विप्र वा अन्यवर्णीय कोणी,
तुझ्या वैभवा वानिती सर्वथा,
कधींहि न त्या अंत्यजा हीन मानूं
न साहे अता भिन्नता ही वृथा ॥१॥

जरी जन्मलों भिन्नवर्णीय आम्ही,
तरी नांदतों एकठायीं सुखें ।
कसे अंत्यजांना स्वयें दूर लोटूं ?
अम्हांला कधींहि न ते पारखे ।
नको ही परंतू पराची गुलामी
बहू जाहली जी अता तापदा ।
त्वरें एक होऊनियां सर्व वंदूं
मुदें मायभूमीचिया सत्पदा ॥२॥

किती एक ते राहुं द्या धर्म येथे,
तसे पंथ सारे सहस्रावधी ।
परी या विदेशीय सत्ताधिपांना,
रिता ठाव येथें न देऊं कधीं ।
असे हिंदभू आमची एक माता,
तिचीं सर्व आहों अम्ही लेकरें ।

किती आमुचे वाद होवोत येथें,
तरी बंधु भाईच आम्ही खरे ॥३॥
अहा ! जोंवरी ऐक्य राहील देशीं,
असे आमुच्या जीवना धन्यता ।
परी दुर्गतीच्या दरीमाजिं जाती,
मनीं भेद जे ठेविताती वृथा ।
सदा मानसीं सत्य हें जागवीतां,
अरे काय विश्वांत आम्हां उणें ?
त्वरें इष्ट तें साध्य होईल सारें,
करूं आमुचें सार्थ लोकीं जिणें ॥४॥

**भालेराव, श्रीधर गणेश ऊर्फ 'भारद्वाज'**—( जन्म स. १८९० मे ४ ) तत्त्वज्ञानी, नवविचारप्रवर्तक व अभ्यासी.

जन्मस्थान वीर ( जि. पुणें ). हे तेथें प्राथमिक शिक्षण घेऊन पुणें येथें आले. नंतर मॅट्रिक व बी. एजी. होऊन कांहीं ठिकाणीं खासगी नोकऱ्या केल्यावर शेतकीखात्यांत नोकरी करून सेवानिवृत्त झाले (१९१९-१९४५). नोकरींत असतां यांनीं भात, बाजरी, एरंडी, तंबाखू वगैरेंच्या महत्त्वाच्या जाती शोधून काढल्या. हे विडींच्या व सिगारेटच्या तंबाखूपिकाचे तज्ज्ञ समजले जातात. या पिकांबाबत यांचें कांहीं ग्रंथलेखनहि आहे.

यापेक्षां यांचा तत्त्वज्ञानाचा अभ्यास विशेष असून यांनीं त्या दृष्टीनें केलेलें ग्रंथलेखनहि महत्त्वाचें आहे. भगवद्गीतेची मांडणी दिली आहे असें गीतारहस्याच्या वाचनानें लक्षांत येतांच यांनीं श्रीमद्भगवद्गीतेचें रचनान्तर करून त्या नांवाचा ग्रंथ प्रसिद्ध केला. व्यक्तीला पुनर्जन्म नसून पुनर्जनन असतें असें प्रतिपादणारा 'पुनर्जन्म विरुद्ध पुनर्जनन' हा ग्रंथ लिहिला. तात्त्विक दृष्टीनें स्थलकालाच्या स्वरूपाचा अभ्यास करण्याकरितां यांनीं आइन्स्टाइनच्या सापेक्षतासिद्धान्ताचें परिशीलन करून मराठींत 'आइन्स्टाइनप्रणीत सापेक्षदर्शन' हा अत्यंत गहन पण अद्ययावत् शास्त्रीय दृष्टीचा ग्रंथ प्रसिद्ध केला. यांनीं आजवर ४६ निबंध व ३ ग्रंथ प्रसिद्ध केले असून यांचे अशाच महत्त्वाच्या तात्विक विषयांवर ११ ग्रंथ लिहून तयार आहेत. यांच्या विचारांत नेहमीं कांहीं तरी नवीनपणा असतो. यांच्या तत्त्वज्ञानांतहि असाच नवीनपणा आहे. 'जग हें केवळ निर्गुण ब्रह्मरूप नसून तें तसें असतांहि ब्रह्माचें तत्कृत तदन्तर्बाह्यव्यास सुकृत ब्रह्मरूप आहे व वस्तु, व्यक्ति, विभूति, अवतार, ईश्वर हीं ब्रह्माचीं उत्तरोत्तर श्रेष्ठ सुकृत रूपें असून या विकासाबाबतहि ब्रह्म अनन्त व पुनश्च अव्यय आहे' असा यांचा प्रमुख सिद्धान्त असून त्याला हे आपला श्रौत मुक्ताद्वैत वेदान्तवाद म्हणतात ( तस्मात् तत् सुकृतं उच्यते ).

ही यांनीं आपल्या तत्त्वज्ञानाची मूलभूत कल्पना अनेक निबंध व सूत्रबद्ध ग्रंथांच्या द्वारां मांडली असून ते ग्रंथ प्रसिद्धीच्या मार्गावर आहेत. शास्त्रीय परिभाषा, शास्त्रीय ग्रंथनिर्मिति, सुप्रजाजनन विचार, तत्त्वज्ञान, तत्त्वाभ्यास, चरित्रकोश वगैरे अनेक मंडळें काढण्यांत यांचा प्रमुख भाग आहे व बहुतेकांत हे अधिकारी आहेत. पुणें व नडियाद येथें सप्ताहभर चर्चा करून 'वैयक्तिक अमरत्व' व 'युद्धें कां होतात व ती कशीं थांबवावींत' यांवर यांनीं अनुक्रमें एक पुस्तक व एक निबंध प्रसिद्ध केला आहे.

**भावे, विनायक लक्ष्मण**—( जन्म स. १८७१–मृत्यु स. १९२६ ) जुन्या मराठी काव्याचे अभ्यासक, इतिहाससंशोधक, ग्रंथलेखक आणि सार्वजनिक कार्यकर्ते.

यांचे वडील ठाण्यास वकिली करीत म्हणून पळस्पेहून लहानपणींच ठाण्यास आले. बी. एस्सी. झाल्यानंतर एलएल. बी.चा अभ्यास सोडून यांना वडिलांनीं सुरू केलेल्या पण कर्जांत असलेल्या मिठागराच्या धंद्यांत पडावें लागलें. हळुहळू जम बसत चालला व सामान्य स्थितींतून हे त्या धंद्यावर लक्षाधीश बनले.

यांना शाळेत असल्यापासून मराठींतील प्राचीन कवि व त्यांची कविता यांच्या अभ्यासाचा नाद असे. हेडमास्तर जनार्दन बाळाजी मोडक यांच्या सहवासानें तो नाद वाढीस लागला. कॉलेजांत असतांच 'महाराष्ट्र सारस्वत' या ग्रंथाची पहिली आवृत्ति यांनीं तयार केली आणि प्रा. वि. गो. विजापूरकर यांच्या ग्रंथमालेंत ती प्रसिद्ध केली ( १८९५ ). यांच्या हयातींतच यांनीं उपलब्ध नव्या माहितीची भर घालून त्या ग्रंथाची दुसरी आवृत्ति व तिसऱ्या आवृत्तीचा पूर्वार्ध काढला व यांच्या टिपणांवरून उत्तरार्ध यांच्या मुलांनीं प्रसिद्ध केला. यांचें 'चक्रवर्ति नेपोलियन'चें चरित्रहि अगदीं नव्या पद्धतीनें लिहिलेलें असून शिवाजीशीं केलेल्या तुलनेमुळें मराठींत त्या ग्रंथाला एक विशेष स्थान आहे ( १९१७ ). मराठ्यांच्या इतिहासाची अस्सल पत्रें प्रसिद्ध करण्याकरितां यांनीं मराठी दप्तराचे रुमाल प्रसिद्ध करण्यास सुरवात केली. त्याच्या प्रस्तावनेंत प्रसिद्ध केलेल्या पत्रामुळें नवी माहिती कोणती उजेडांत

आली हें दाखविल्यानें त्या दप्तरांना महत्त्व आलें आहे. मराठी ग्रंथालय ठाणें येथें स्थापून ( १८९३ ) यांनी मराठी ग्रंथालयें काढण्याची नवी पद्धत सुरू केली. त्यातर्फे 'महाराष्ट्र कवि' हें मासिक चालविलें ( १९०३-०८ ). यांतून अनेक प्रकरणें स्वतंत्र पुस्तकरूपानें काढण्यासारखीं यांनीं प्रसिद्ध केलीं. यांनीं पुण्याच्या महिलाविद्यालयास पन्नास हजारांचे बाँड देऊं केले व चिरोलकेसच्या वेळीं लो. टिळकांना एक लाख रुपये उसने दिले होते. मराठी वाङ्मय व इतिहास हा यांचा छंद होता.

**भावे, विनोबा नरहर**—( जन्म स. १८९४ ) वर्ध्याच्या ग्रामसेवा मंडळाचे प्रमुख, गांधीवादाचे सुप्रसिद्ध अनुयायी, मराठींतील उत्कृष्ट लेखक व नवमार्ग-प्रदर्शक.

कोंकणांतील गागोदे हें खेडें यांचें जन्मस्थान. यांचें सर्व बालपण तेथेंच गेलें. पुढें बडोद्याहून इंटरच्या परीक्षेसाठीं हे घराबाहेर पडले व यांनीं काशी गांठली. तेथें संस्कृतचें अध्ययन करीत. म. गांधींशीं पत्रव्यवहार करून व त्यांनीं दिलेलें 'विनोबा' हे नांव स्वीकारून यांनीं साबर-मतीच्या आश्रमांत प्रवेश केला. यानंतर वाईला येऊन श्री. नारायणशास्त्री मराठे यांचे जवळ ब्रह्मसूत्रा-वर विचारविनिमय केल्यानंतर यांनीं वर्धा येथें सत्याग्रहश्रमाचें प्रमुख म्हणून काम करण्यास सुरुवात केली.

चरखा, सत्याग्रह, ग्रामोद्योग अशा गांधीजींच्या सूत्रांचा यांनीं मोठ्या निष्ठेनें पाठपुरावा केला असून १९४० च्या वैयक्तिक सत्याग्रहांतील पहिले आदर्श सैनिक म्हणून गांधींनीं यांची निवड केली. हे झकीर हुसेन कमेटीचे सदस्य असून यांनीं वर्धाशिक्षण योजनेला पुष्कळ मदत केली. यांना अनेक भाषा येतात. यांनीं अरबींतून कुराणाचा अभ्यास केला.

वर्ध्याचा यांचा आश्रमहि गांधींजीच्या आश्रमाच्या आदर्श व्याख्येबरहुकुम चालविला जातो. यांच्या मार्ग-दर्शकत्वानें महारोग्यांचें रुग्णालय, चर्मालय, प्रकाशनसंस्था वगैरे चालविण्यात येतात. या आश्रमांतून ग्रामसेवा-वृत्त हें मासिकहि कित्येक वर्षे चालविलें जातें. महारोग, धर्मपद, वस्त्रपूर्णा, ओटना व धुनना इत्यादि ग्रंथ या आश्रमातर्फे प्रसिद्ध झाले.

गीता, उपनिषदें, जुने अभंग यांचे भाविक अभ्यासी व मार्मिक परीक्षणकार अशी यांची प्रसिद्धि आहे. महाराष्ट्र धर्म हें मासिक यांनीं सुरू केलें व पुढें त्याचें साप्ताहिकांत रूपान्तर केलें. या साप्ताहिकांत 'तुकारामाचे अभंग' या नांवाखालीं तुकारामाचे निवडक अभंग, त्यांवरील भाष्य व ज्ञानेश्वरींतील त्यांशीं समानार्थक ओव्या हे देत असत.

याशिवाय धुळ्याच्या तुरुंगांत असतां भगवद्गीतेचें 'गीताई' या नांवाचें समश्लोकी भाषांतर यांनीं केले. गांभीर्य, प्रसाद या गुणांबरोबरच सोपेपणामुळें हें पुस्तक सर्वत्र अतिलोकप्रिय झालें. यांचे बंधु शिवाजी यांनीं सर्वत्र या ग्रंथाचा प्रसार केला असून आतांपर्यंत त्याच्या लक्षावधी प्रति महाराष्ट्रांत खपल्या. याशिवाय धुळ्याच्या तुरुंगांत यांनीं गीतेवर दिलेल्या प्रवचनांचा सारांश श्री. सानेगुरुजी यांनीं 'गीताहृदय' या नांवानें प्रसिद्ध केला.

न बोलतां जगाच्या कल्याणांत निमग्न असणाऱ्या प्राचीन ऋषीमुनींचा आदर्श यांचे डोळ्यांसमोर आहे. आपल्या आश्रमांतहि प्राचीन आश्रमांचें पावित्र्य व शिस्त राखण्यावर यांचा कटाक्ष असतो.

नवे विचार अत्यंत थोडक्यांत व सोप्या भाषेंत मांडण्याबद्दल यांची प्रसिद्धि आहे. कांहीं नवें सांगा-वयाचें असल्याशिवाय हे लिहीतच नाहींत.

यांच्या खालील काव्यपंक्ति गांधीवादाच्या प्रमुख अधिष्ठान बनल्या आहेतः—

'अहिंसा, सत्य, आस्तेय, ब्रह्मचर्य, असंग्रह,
शरीरश्रम, अ-स्वाद, सर्वत्र भयवर्जन,
सर्वधर्मी समानत्व, स्वदेशी, स्पर्शभावना
हीं एकादश सेवावीं नम्रत्वें व्रतनिश्चयें'

हिंदींतील विख्यात कवि वियोगी हरी यांनीं यांच्या हिंदी लेखांचा संग्रह 'विनोबा और उनके विचार' या नांवानें प्रसिद्ध केला.

यांचे ग्रंथ—( १ ) चार अंक ( महाराष्ट्र धर्म मासिकाचे ), ( २ ) मधुकर, ( ३ ) मूळ उद्योग-कातणें, ( ४ ) स्वराज्यशास्त्र, ( ५ ) विचारपोथी, ( ६ ) गीताई, ( ७ ) गीताप्रवचनें, ( ८ ) जीवनदृष्टि, ( ९ ) अभंगव्रतें, ( १० ) विचारपोथी, ( ११ ) संतांचा प्रसाद. यांशिवाय एकनाथाचीं भजनें, ज्ञानदेवाचीं भजनें, नामदेवाचीं भजनें इत्यादि संपादित ग्रंथ.

**भावे, विष्णु अमृत ऊर्फ विष्णुदास**—( जन्म स. १८१८–मृत्यु स. १९०१ ) महाराष्ट्रांतील पौराणिक नाटकाचे आद्यप्रवर्तक.

हे सांगली संस्थानचे अधिपति श्रीमंत चिंतामणराव आप्पासाहेब पटवर्धन यांचे आश्रित होते. स. १८४२ सालीं सांगली येथें उत्तर कानडा प्रान्तांतील भागवत नाटक मंडळीनें कानडी खेळ करून दाखविले. त्याप्रमाणें खेळ करण्याविषयीं यांना श्रीमंतांनीं सांगतांच यांनीं स. १८४३ मध्यें मराठी पौराणिक नाटकाचा प्रयोग श्रीमंतांपुढें करून दाखविला. हे स्वभावतःच हरहुन्नरी व गुणग्राहक असल्यानें श्रीमंतांच्या साहाय्यानें स्वतः कवनें करून यांनीं नाटकाची स्वतःच्या कल्पनेनें अभिनव मांडणी केली. किरीटकुंडलें वगैरे यांनीं स्वतः तयार केलीं. सीतास्वयंवर नाटकानंतर यांनीं रामायणांतील कथाप्रसंगावर दहा नाटकें बसविलीं. तीं नाटकें पाहून श्रीमंत खूष झाले व सोंगें घेणाऱ्या लोकांस त्यांनीं बक्षिसें वांटलीं.

प्रथमतः सूत्रधारानें पडद्याबाहेर एका बाजूस उभें राहून मंगलाचरण करावयाचें, नंतर वनचराचा वेष घेऊन विदूषकानें प्रवेश करावयाचा, त्याचा नाच व विनोदपर संवाद झाल्यावर नाटक कोणतें करावयाचें हें सूत्रधारानें सांगून पात्रांची सिद्धता करावयास सांगावयाचें, नंतर गजानन व सरस्वती यांची प्रार्थना करून त्यांचा आशीर्वाद घ्यावयाचा, सूत्रधारानें प्रसंग सांगून देव, राक्षस व त्यांच्या स्त्रिया यांच्या अनुक्रमें कचेऱ्या (प्रवेश) घडवून त्यांत उलट पक्षाच्या पाडावाच्या व जय मिळविण्याच्या गोष्टी—अशा क्रमानें यांच्या नाटकाची रचना असे.

सर्व कवनें सूत्रधार म्हणे. कथाभागाला अनुसरून होणारीं भाषणें आगाऊ लिहून काढून पाठ केलेलीं नसत; प्रायः प्रासंगिक स्वयंस्फूर्तीवर भर असे. विदूषक व सूत्रधार हीं दोन पात्रें मुख्य असून त्यांना कोणत्याहि कामाकरितां आरंभापासून शेवटपर्यंत सज्ज राहावें लागे. प्रथम रामायणांतील कथाभाग घेऊनच यांनीं खेळ केल्यामुळें पुढें भारतांतील कथाभाग घेऊन यांनीं खेळ केले, तरी यांच्या खेळाला ' रामावताराचे खेळ ' असेंच लोक म्हणत. स. १८५१ सालीं श्रीमंत चिंतामणराव सांगलीकर वारले. तेव्हां यांचा आश्रय तुटून यांनीं कोल्हापूर, पुणें, मुंबई वगैरे ठिकाणीं हिंडून प्रयोग करून दाखविले. चोहोंकडे यांच्या या उपक्रमाची प्रशंसा झाली. गोपाळराव मनोळीकर ( सूत्रधार ), रघुपति फडके ( स्त्रीपात्र ), बापू ताके ( राक्षस ) वगैरे नट यांच्या मंडळींत चांगले होते. १८६१ पर्यंत यांनीं हा धंदा केला. हरिश्चंद्र, रास वगैरे यांचे खेळ प्रेमळ होत. यांची मंडळी सांगलीकर नाटक मंडळी या नांवानें प्रसिद्ध होती.

नाटक मंडळी मोडल्यावर यांनीं कळसूत्री बाहुल्यांचा नाटकाप्रमाणें खेळ तयार केला. यांनीं लांकडी पण सुबक चित्रें सुंदर वेषासह स्वतः हातानें तयार केलीं. या चित्रांकरवीं हे रासांत गोफ विणणें, अभिनयासहित नृत्य करणें, पैलवानांकडून जोडीच्या तऱ्हेतऱ्हेच्या फेंका करविणें इत्यादि बिकट कामेंहि करवीत ( १८८० ). यापुढें यांनीं सांगली येथें इंजिनियर खात्यांत नोकरी पत्करिली. बांधकाम, सुतारकाम, लोहारकाम, मातकाम यांतहि हे आपला विशेषपणा व्यक्त करीत.

**भांडारकर, डॉ. सर-रामकृष्ण गोपाळ—** ( जन्म स. १८३७-मृत्यु स. १९२५ जून १४ ) आंतरराष्ट्रीय कीर्तीचे महाराष्ट्रीय संस्कृत पंडित व प्राच्यविद्या-संशोधक.

यांचें सारस्वत ब्राह्मणाचें घराणें मालवणकडे पत्की या नांवानें प्रसिद्ध आहे. यांचे वडील गोपाळ लाडको भांडारकर हे मामलेदार कचेरींत कारकून होते. मालवण, राजापूर व रत्नागिरी येथें आपलें माध्यमिक शिक्षण संपवून हे मुंबईच्या एल्फिन्स्टन हायस्कुलांतून मॅट्रिक व दक्षिणा फेलो झाले. या वेळीं गोविंदशास्त्री लेले, अप्पाशास्त्री खाडिलकर व अनंतशास्त्री पेंढारकर यांचेजवळ यांनीं संस्कृत भाषेचें सूक्ष्म अध्ययत केलें. पुढें मुंबई युनिव्हर्सिटीच्या स्थापनेनंतर पुन्हां मॅट्रिक एफ. वाय., बी. ए. होऊन हे एम्. ए. झाले.

१८६४ सालीं फेलोशिपचा राजीनामा देऊन हे हैदराबाद( सिंध )च्या हायस्कूलचे हेडमास्तर असतां यांनीं आपलीं संस्कृतचीं दोन पुस्तकें प्रसिद्ध केलीं. यानंतर मुंबईच्या एल्फिन्स्टन कॉलेजांत यांना संस्कृत भाषेच्या असि. प्रोफेसरची जागा देण्यांत आली. पुढें कॉलेजमधील संस्कृतच्या मुख्य प्राध्यापकाची जागा यांना न देतां यांचे मागाहून आलेल्या पीटर्सनला देण्यांत आली. परंतु यानंतर पुण्याच्या डेक्कन कॉलेजांत कीलहॉर्ननंतर संस्कृतचे प्राध्यापक म्हणून यांची नेमणूक झाली व शेवटपर्यंत हे तेथेंच असत. विद्यार्थ्यांत अतिलोकप्रिय प्राध्यापक म्हणून यांची प्रसिद्धि असे.

पतंजलीच्या कालासंबंधीं इंडियन ॲन्टिक्वेरींतून यांनीं वेबरशीं केलेला वाद हें यांचें सुरुवातीचें संशोधन होय. ख्रिस्तपूर्व दुसरें शतक हा पतंजली व त्याच्या महा-

भाष्याचा काळ इतर संशोधकांना मान्य करावयास लावून यांनीं पुढें महाभाष्यांतील सात उताऱ्यांचे साहाय्यानें कृष्ण व भगवद्गीता यांचें प्राचीनत्व सिद्ध केलें. कृष्ण ही खिस्ताची भ्रष्ट नक्कल आहे, भगवद्गीतेचा उगम बायबलमध्यें आहे, या परदेशी पंडितांच्या मुद्यांचें यांनी पातंजलमहाभाष्यांतील कृष्ण व गीता यासंबंधीचे अतिपरिचित भावना स्पष्ट करणारे उतारे दाखवून खंडन केलें.

मुंबई सरकारच्या हस्तलिखितांच्या खात्याचे संपादक या नात्यानें यांनीं केलेली कामगिरीहि अशीच महत्त्वाची आहे. बूलर यांचेनंतर त्या खात्याचे प्रमुख म्हणून कीलहॉर्न व त्यांचे सहकारी म्हणून यांची नेमणूक झाली. कीलहॉर्न यांचे निवृत्तीनंतर मात्र हे व पीटर्सन हेच त्या खात्याचे प्रमुख बनले. यांच्या स्वतःच्या संशोधनांपैकीं जैन विहारांत स्वतः जाऊन जैन वाङ्मयाच्या यांनीं केलेल्या संशोधनामुळें ही एक नवीनच अध्ययनशाखा हिंदुस्थानांत उत्पन्न झाली. याचबरोबर प्राचीन वैष्णवपंथ, चालुक्य घराणें, काश्मीरांतील शैव सांप्रदाय व रामानुजांचें तत्त्वज्ञान यासंबंधींचे यांचें विस्तृत संशोधन विशेष महत्त्वाचें मानलें जातें.

Early History of the Deccan (मुंबई गॅझेटियर १८८४) व Outlines of Vaishnavism, Shaivism and Minor Religious Sects (बूलर यांच्या एनसायक्लोपिडीया ऑफ इन्डोआर्यन रिसर्चमधील एक भाग १९१३) हे यांचे ग्रंथहि या हस्तलिखित ग्रंथांच्या यांच्या व्यासंगांतूनच उत्पन्न झाले. यांपैकीं पहिल्या ग्रंथानें यांना अखिल भारतीय व दुसऱ्यानें आंतरराष्ट्रीय कीर्तीचा लाभ करून दिला. मुंबईच्या विल्सन फायलॉलॉजिकल लेक्चर्सची पहिली व्याख्यानमाला गुंफण्याचा मानहि यांना देण्यांत आला.

शैव, वैष्णव पंथांसंबंधींच्या आपल्या ग्रंथांत यांनीं त्या त्या पंथांचे सुसंगत इतिहास देण्याचा प्रयत्न केला आहे. यांपैकीं वैष्णवपंथाचा इतिहास तर यांनीं खिस्तपूर्व पांचव्या शतकापर्यंत नेऊन भिडवला आहे. 'शैव व वैष्णव या भक्तिमार्गाच्याच दोन शाखा असून दोहोंचीहि उभारणी उपनिषदांवर झाली आहे. खिस्तपूर्व पांचव्या शतकांत वैष्णवपंथाचें नांव एकनाथधर्म असून त्याची उभारणी संपूर्णतया भगवद्गीतेवर करण्यांत आली होती. खि. पू. चवथ्या शतकांत सात्वत क्षत्रियांनी या पंथाचा स्वीकार केला व खिस्त शकाच्या सुरवातीला हिंदुस्थानांत आलेल्या आभीर या परजातींत हा पंथ विलीन होऊन त्यांत कृष्णोपासना शिरली. पुढें आठव्या शतकाच्या सुरवातीला शंकराचार्यांचें सुप्रसिद्ध तत्त्वज्ञान पुढें आलें व हिंदुस्थानांतील निरनिराळ्या वैष्णवगोटांतून शंकराचार्यांचे विरोधी पंथ सुरू झाले. याला सुरवात रामानुजाचार्यांनीं केली व निंबार्क, आनंदतीर्थ, रामानंद, कबीर, वल्लभ, चैतन्य अशा परंपरेनें या पंथाचा कळस नामदेव व तुकारामाच्या काळीं झाला. आधीं कबीर व नंतर नामदेव, तुकाराम यांनीं वैष्णव पंथाच्या भक्तिमार्गाला अंतरंगाच्या पावित्र्याची व नैतिक उन्नतीची जोड दिली व त्यांच्या प्रेमळ अभंगानीं व त्यांतील या तत्त्वज्ञानानें सर्व हिंदुस्थान अक्षरशः भारला गेला' अशी यांच्या संशोधनाची रूपरेखा आहे.

यांच्या नांवानें स्थापन झालेल्या पुण्याच्या भांडारकर ओरिएंटल रिसर्च इन्स्टिट्यूटचा उद्घाटनसमारंभ मुंबईचे त्या वेळचे गव्हर्नर लॉर्ड विलिंग्डन यांचे हस्तें ६ जुलै १९१७ ला पार पाडण्यांत आला. त्या संस्थेतर्फे सुरू करण्यांत आलेल्या ऑल-इंडिया ओरिएंटल कॉन्फरन्सनें व डॉ. सुखटणकर यांच्या नेतृत्वाखालीं सुरू झालेल्या महाभारताच्या क्रिटिकल एडिशननें त्या संस्थेचें व त्याबरोबरच यांचें नांवहि आंतरराष्ट्रीय अभ्यासवर्तुळांत पक्कें केलें. ओरिएंटल कॉन्फरन्सच्या पहिल्या अधिवेशनाचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें होतें.

हिंदी संस्कृत पंडितांना पाश्चात्य संशोधनपद्धति शिकवली तर सध्यापेक्षांहि जास्त भरीव संशोधन हिंदुस्थानांतच निर्माण होईल या कल्पनेनें बूलरनीं सुरू केलेल्या बॉम्बे संस्कृत सीरीजचा फायदा घेणारे हे पहिले हिंदी गृहस्थ होत. हिंदुस्थानसंबंधींचे परदेशांत वसत असणारे गैरसमज दूर करण्याचे कामासाठीं आजपर्यंत हिंदुस्थानला पाश्चात्य पंडितांच्या सद्बुद्धीवर हवाला ठेवावा लागत असे. त्याची उणीव हे व यांच्या तालमींत तयार झालेल्या शिष्यशाखेनें भरून काढली. याच दृष्टीनें एका नव्या युगाच्या प्रवर्तनाचा मान यांना दिला जातो.

यांचे प्रमुख निबंध—(1) Age of Mahabharata, (2) Allusions to Krishna in Patanjali's Mahabhashya, (3) The Nasik Inscriptions (इंटरनॅशनल कॉन्फरन्स ऑफ ओरिएँटॅलिस्ट्स लंडन, १८७४), (4) Principal Results of My last two years' studies in Sanskrit Mss. with Particular Reference to Sacrificial, Ritual

and the Pancharatra System ( कॉंग्रेस ऑफ ओरिएन्टॅलिस्ट्स्, व्हिएन्ना १८८६ ) इत्यादि.

यांचे समग्र ग्रंथ व निबंध श्री. नारायण बापूजी उटगीकर यांनीं Collected Works of Prof. Bhandarkar या नांवानें चार भागांत प्रसिद्ध केले आहेत.

**भांडारकर, देवदत्त रामकृष्ण**—( जन्म स. १८७५ ) बंगालमध्यें स्थायिक झालेले सुप्रसिद्ध महाराष्ट्रीय प्राच्यविद्यापंडित व लेखक.

सुप्रसिद्ध संशोधक रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांचे हे चिरंजीव. पुण्याच्या न्यू पूना हायस्कूल व डेक्कन कॉलेजांत आपलें माध्यमिक व विश्वविद्यालयीन शिक्षण संपवून हे एम्. ए. झाले. या वेळीं यांना भगवानदास पुरुषोत्तमदास संस्कृत शिष्यवृत्तीचा लाभ झाला होता.

सुरुवातीपासूनच यांना संस्कृत भाषा व प्राचीन इतिहास यांच्या संशोधनाचा नाद असल्यानें यांनीं एम्. ए. होतांच आर्किऑलॉजिकल सर्व्हेच्या वेस्ट सर्कलच्या सुपरिंटेंडेंटचें काम पत्करलें ( १९११ ). परंतु यानंतर कलकत्त्याच्या इंडियन म्युझियममधील प्राच्यविद्याखात्यानें यांना प्रमुख नेमण्यांत आलें व हे महाराष्ट्रांतून निघून कायमचे कलकत्त्याला स्थायिक झाले. कलकत्ता युनिव्हर्सिटीनेंहि यांना प्राचीन हिंदी इतिहास व संस्कृति यांचे प्राध्यापक नेमलें ( १९१७ ) व यांना आपल्या संशोधनकार्यांत निमग्न होऊन राहण्याची दीर्घकालीन संधि मिळाली. कलकत्ता युनिव्हर्सिटींतील आपल्या या नोकरींतून हे १९३५ सालीं निवृत्त झाले व हे ' पूर्ण ' संशोधक बनले.

यांच्या दीर्घकालीन व्यासंगाचा फायदा आपल्या विद्यार्थ्यांना देण्यासाठीं हिंदुस्थानांतील जवळजवळ सर्व विद्यापीठांनीं यांना केव्हांना केव्हां तरी निरनिराळ्या विषयांवर व्याख्यान देण्यासाठीं बोलाविलें. त्यांत यांनीं दिलेलीं मुंबई युनिव्हर्सिटींतील भगवानलाल इंद्रजी व्याख्यानें ( १९०३, १७ ), बनारस युनिव्हर्सिटींतील महेंद्रचंद्र नंदी व्याख्यानें ( १९२५ ) व मद्रास युनिव्हर्सिटींतील सर विल्यम मेयर व्याख्यानें (१९३८-३९) विशेष महत्त्वाचीं आहेत.

हिंदुस्थान सरकारच्या प्राच्यविद्याखात्याचे व इंडियन हिस्टॉरिकल रेकॉर्ड्स कमिशनचे हे आज बरेच दिवस पत्रव्यवहार-प्रमुख आहेत. इंडियन म्युझियम, कलकत्ता, बंगाल रॉयल एशियॅटिक सोसायटी, कलकत्ता, हिस्टॉरिकल सोसायटी, इंडियन रिसर्च इन्स्टिटयूट इत्यादि संशोधक संस्थांशीहि यांचा घनिष्ठ संबंध आहे. १९३८ सालीं अलाहाबाद येथें भरलेल्या इंडियन हिस्टॉरिकल कॉंग्रेसचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें.

इंडियन अँटीक्वेरीचे हे १९११-२० व १९२८-३० पर्यंत सहसंपादक असून इंडियन कल्चर या प्राच्यविद्यासंशोधनाला वाहिलेल्या इंग्रजी त्रैमासिकाचे हे संस्थापक व संपादक आहेत.

अलिकडे हे Corpus Inscriptionum Indicarum या ग्रंथाच्या तिसऱ्या भागाची (गुप्त शिलालेख) द्वितीयावृत्ति काढण्यात गुंतले होते.

कलकत्ता युनिव्हर्सिटीनें यांना बाहुमानिक डॉक्टरेट दिली असून मुंबईच्या एशियॅटिक सोसायटीनें यांच्या ग्रंथकर्तृत्वाबद्दल कॅम्बेल सुवर्णपदक यांना अर्पण केलें.

यांचे ग्रंथ—( 1 ) Reports of Archæological Survey, West Circle, ( 2 ) Carmaichael Lectures (1918, 21), ( 3 ) Ashok, ( 4 ) Some Aspects of Ancient Hindu Polity, ( 5 ) Some Aspects of Ancient Hindu Culture, ( 6 ) Origin of Saka Era, ( 7 ) Gurjaras, ( 8 ) Lakuliśa, ( 9 ) Guhilots, ( 10 ) Foreign Elements in the Hindu Population, ( 11 ) Annals of the American Academy च्या हिंदुस्थानवरील ग्रंथाचें संपादन.

**भिडे, बाळकृष्ण अनंत**—( जन्म स. १८७४–मृत्यु स. १९२९ ) मराठी भाषेंतील सुप्रसिद्ध लेखक, कवि व व्यासंगी गृहस्थ.

आपल्या वयाच्या चोविसाव्या वर्षी हे मुंबईच्या विल्सन कॉलेजांतून बी. ए. परीक्षा उत्तीर्ण झाले आणि मुरुड जंजिरा हायस्कूलचे हेडमास्तर बनले.

यांचे परीक्षणात्मक लेख अत्यंत परिश्रम व अभ्यास करून लिहिलेले असत. मार्मिकपणा व विधायकपणा हे दोन्ही गुण यांच्या लेखनांत भरपूर असत. यांचें मोरोपंताच्या काव्याचें परिशीलन विशेष वाखाणण्यासारखें असे. अशा व्यासंगीपणामुळें यांच्या काव्यांत गांभीर्य व अभिजातपणा हे गुण विशेष आढळत. जुन्या कवींचें मर्म जाणणारा यांच्यासारखा व्यासंगी विरळा. मराठी भाषेंतील व्यासंगी लेखक म्हणून यांना कोणताहि

सन्मान प्राप्त झालेला नसला तरी यांच्या लेखनामुळें मात्र मराठी भाषेचा गौरव वाढावा इतक्या योग्यतेचें तें आहे.

यांचें वाङ्मय—काव्यें-१ फुलांचे झेले, २ पद्मिनी काव्य, ३ अन्योक्तिविलास, ४ शोकक्षोभ, ५ ऋतुवर्णनें, ६ सासूची जबानी, ७ चार वीर मुत्सद्दी (चरित्रें), ८ सार्थ ज्ञानेश्वरी, ९ मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास (महानुभावअखेर).

**भिडे, माधव गोविंद**—(जन्म स. १८८६-मृत्यु स. १९३८) सुप्रसिद्ध विवेकी व मराठींतील लेखक.

यांचा जन्म पुण्यास झाला. मॅट्रिक झाल्यावर यांनीं वेदान्ताचा अभ्यास केला. स. १९१५-१८ पर्यंत हे 'मुमुक्षु'चे संपादक होते.

यांची प्रकाशित व अप्रकाशित मिळून एकंदर कविता सुमारें एक लक्ष चरण भरेल. यांचा 'मननामोद' (३ खंड) हा ग्रंथ यांच्या सूक्ष्म मननसामर्थ्याच्या व दृष्टान्तानें विषय समजून देण्याच्या पद्धतीचा उत्कृष्ट नमुना आहे. तो ग्रंथ मराठी भाषेकरितां एम्. ए. परीक्षेस नेमिला होता.

१९२० नंतरचें आयुष्य यांनीं प्रथम तीव्र साधना व नंतर परिणतप्रज्ञ अशा अवस्थेंत घालविलें.

यांचें वाङ्मय—१ अनुक्तानुवाद, २ घुणाक्षरन्याय, ३ 'साधुश्रेष्ठ श्रीतुकाराम महाराज यांचे श्लोक-चरित्र व निवडक अभंग', ४ श्रीनारायण महाराज जालवण-करांचे 'आनंदसागर' व 'शांतिसागर' नांवाचे ग्रंथ यांच्या प्रस्तावनेसह.

**भिडेशास्त्री, गीतावाचस्पति-सदाशिव गोपाळ**—(जन्म स. १८७५-मृत्यु स. १९३९) सुप्रसिद्ध गीताप्रवचनकार व उपनिषदांचे मराठी भाषान्तरकार.

यांचा जन्म सांगली येथें झाला. आठव्या वर्षी देवीनें दृष्टि गेली. हरीपूर व इचलकरंजी येथें न्याय व वेदान्त यांचें शिक्षण झालें. तासगांव संस्कृत पाठशाळेवर बारा वर्षे काम केल्यावर लो. टिळकांच्या कर्मयोगाचा प्रवचनादिद्वारा यांनीं प्रचार आरंभिला व त्याकरितां गीताधर्ममंडळ ही संस्था काढली. लो. टिळक कर्म-योगाचा पुरस्कार करतांना शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाचा सर्व सांगाडा स्वीकारून फक्त संन्यासापुरतें विरुद्ध बोलत; पण हे मायावादाविरुद्धहि प्रतिपादन करीत.

यांचे ग्रंथ—१ रहस्यदीपिका, २ उपनिषद्रत्नप्रकाश (दशोपनिषदांचें मराठी विवरण).

**भिसे, डॉ. शंकर आबाजी**—(जन्म स. १८६७ एप्रिल २९-मृत्यु स. १९३५) आंतरराष्ट्रीय कीर्तीचे हिंदी संशोधक.

मुंबईला प्रभु जातींत यांचा जन्म झाला. यांचे वडील कोल्हापूर संस्थानांत डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट होते. धुळें हायस्कुलांत कांहीं दिवस शिक्षण घेतल्यानंतर यांनीं बॉम्बे पेपर मिलचे व्यवस्थापक म्हणून काम करण्यास सुरवात केली. आग्रा लेदर फॅक्टरीचे प्रमुख डायरेक्टर म्हणून कांहीं दिवस काम केल्यानंतर हे इंग्लंडला गेले (१८९७). हिंदुस्थानांत असते वेळेपासूनच यांना लहान लहान यंत्रें करण्याची आवड असून त्यासाठीं यांनीं 'विविधकलासंग्रह' या नांवाचें एक मासिकहि सुरू केलें होतें.

लंडन सोसायटी ऑफ सायन्स, लेटर्स ॲन्ड आर्ट्सच्या 'Automatic Weighing Machine'च्या चढाओढींत यांनीं मिळवलेल्या यशानें हे प्रथम इंग्लंड-मध्यें प्रसिद्धीस आले. साखर, पीठ वगैरे जिन्नस आपणांस हवें तितकें वजन करून काढून देणाऱ्या या यंत्राशिवाय यांनीं पुष्कळ जाहिरातींचें एकदम प्रदर्शन करणारा दिवा, आपोआप पाण्याचा मोठा प्रवाह सोडणारें यंत्र, समुद्राच्या तळाशीं प्रकाश देणारा दिवा, सायकल थांबतांच तिला जागच्याजागीं उभी करणारें यंत्र, इत्यादि नवनवीन संशोधनांनीं साऱ्या जगाला थक्क केलें. एकाच वेळीं अनेक टाईप पाडणाऱ्या यंत्राचें संशोधनहि यांनीं केलें (१९०८). यांचे नांवावर चाळीसपेक्षां अधिक पेटन्ट्स आहेत.

परंतु ॲटोमिडीन (ॲटॉमिक आयोडाईन) ह्या यांच्या संशोधनामुळें यांची शास्त्रीय जगांतील प्रतिष्ठा विशेष वाढली. १९१० सालीं रतन टाटा यांच्या आर्थिक सहकार्यानें हे इंग्लंडला गेले व यांनीं हा शोध लावला. आयोडाईन पोटांत घेतां आल्यास त्यामुळें अनेक असाध्य रोग बरे करतां येतील हें सर्वांस माहित होतें, परंतु पाण्यांत विरघळूं शकणारे, सुरक्षितपणें पोटांत घेतां येणारें, रंग, वासरहित आयोडिनचें औषध तयार करण्यांत प्रथम हे यशस्वी झाले. याचे आधीं 'बेसलीन'चा शोध यांनीं लावला होता.

या यांच्या संशोधनानें देशीं व परदेशीं यांचेवर अभिनंदनाचा वर्षाव झाला; लंडनच्या रॉयल सोसायटीनें यांना आपले फेलो निवडले व यांच्या साठाव्या वाढदिवसाच्या समयीं न्यूयॉर्क युनिव्हर्सिटीनें यांना डी.एस्सी. ही पदवी दिली.

**भोपटकर, लक्ष्मण बळवंत**—(जन्म स. १८८०) पुण्याचे सुप्रसिद्ध वकील, व्यायामविशारद व सार्वजनिक कार्यकर्ते.

हे एम्. ए., एलएल. बी. झाले ( १९०७ ) व यांनीं वकिली करण्यास सुरवात केली. यानंतर भाला, लोकसंग्रह, लोकमान्य इत्यादि पत्रांचें संपादन, पुण्याच्या लॉ कॉलेजचे प्रथम व्हा. प्रिन्सिपल, महाराष्ट्र हिंदुसभा, महाराष्ट्रीय-व्यायाम-मंडळ, केसरी मराठा संस्था इत्यादि अनेक संस्थांशीं अध्यक्ष, विश्वस्त वगैरे नात्यांनीं यांचा संबंध आला.

मुळशी व मिठाच्या कॉंग्रेसच्या व भागानगरच्या हिंदुसभेच्या सत्याग्रहांतहि यांनीं भाग घेतला होता. यांना अ. भा. हिंदुमहासभेच्या हंगामी अध्यक्षपदाचा मान शामाप्रसाद मुकर्जींच्या आजारीपणांत प्राप्त झाला.

यांच्या षष्ठ्यब्दपूर्तीनिमित्त यांच्या चहात्यांनीं यांना पंचवीस हजार रुपये व ' फुलदाणी ' हा सत्कार-ग्रंथ अर्पण केला, परंतु यांनीं ते पैसे सार्वजनिक कार्याला व महाराष्ट्र व्यायाममंडळानें जमविलेले त्या मंडळाला दिले. सरळ वृत्तीनें त्यागपूर्वक काम करीत राहाण्याबद्दल यांची प्रसिद्धि आहे.

यांचे ग्रंथ—माझी व्यायाम पद्धति, कुस्ती, दांडपट्टा, मृत्युच्या मांडीवर, स्वराज्याची मीमांसा इत्यादि.

**भोसले, केशव विठ्ठल**—( जन्म स. १८९० आगस्ट ९-मृत्यु स. १९२२ ) मराठी रंगभूमीवरील सुप्रसिद्ध संगीत नट.

जन्मस्थान कोल्हापूर. जात मराठा. वडील वैद्यकी करीत. ते वारल्यावर वयाच्या आठव्या वर्षी यांना स्वदेशहितचिंतक मंडळींत घालण्यांत आलें. तेथें हे प्रथम बिनपगारी काम करीत. एक वर्षाचे आंत बाजीराव मस्तानी नाटकांत यांना समशेरबहाद्दराचें काम मिळालें. बालवय, अस्खलित व स्पष्ट वाणी, तडफदार अभिनय, ठाकठीक व गोड आवाज यांमुळें लवकरच यांचें नांव संगीत नट म्हणून सर्वतोमुखीं झालें. पुढें ती मंडळी सोडून यांनीं स्वतःच्या मालकीची ललितकलादर्श संगीत नाटक मंडळी काढली ( १९०८ ). तिलाहि यांनीं परिश्रमानें नांवारूपास आणली. यांचें गाणें गवईथाटाचें असे.

**भोसले, कर्नल-जगन्नाथराव कृष्णराव**—( जन्म स. १९०६ ) आझाद हिंदसेनेंतील मुख्य सेनापति.

यांचा जन्म सांवतवाडीपासून १५ मैलांवर असलेल्या तिरोडे गांवीं झाला. सांवतवाडी येथें यांचें घराणें 'बंडखोर भोसले' म्हणूनच प्रसिद्ध आहे. सांवतवाडीच्या हायस्कुलांत यांचें इंग्रजी शिक्षण झालें आणि डेहराडून येथील प्रिन्स ऑफ वेल्स मिलिटरी कॉलेजकरितां यांची निवड झाली. तेथील शिक्षणानंतर १९२६ सालीं इंग्लंडमधील उच्च लष्करी शिक्षणासाठीं हे सँडर्स्ट कॉलेजांत गेले. तेथेंहि यांनीं सर्वांकडून वाहवा मिळविली. १९२८ सालीं क्वेटा येथें लँकेशायर रेजिमेंटमध्यें यांनीं एक वर्ष कामगिरी केली आणि तेथें रॉयल मराठा इन्फन्ट्रीवर यांची नेमणूक झाली.

१९३० मध्यें हे कन्नूर येथें ले. ॲडज्यूटंट असतां समुद्रांत बुडणाऱ्या दोघां युरोपियनांस स्वतःचा जीव धोक्यांत घालून यांनीं वांचविलें म्हणून यांचा बादशहांच्या हस्तें गौरव करण्यांत आला. नंतर हे कॅप्टन झाले व बादशहांच्या राज्यारोहणाच्या दरबारास उपस्थित होण्याची संधि यांना मिळाली.

तिकडून परत आल्यावर 'जनरल स्टाफ'च्या शिक्षणासाठीं यांची निवड झाली. हा शिक्षणक्रम संपल्यावर यांनीं बरेली येथें जनरल स्टाफमध्यें काम केलें व तेथून हे लेफ्टनंट कर्नल म्हणून सिंगापूरच्या जनरल स्टाफवर नेमले गेले. सिंगापूरच्या पाडावानंतर हे आझाद हिंद सैन्याचे चीफ ऑफ स्टाफ झाले. यांनीं त्या सेनेसाठीं हजारों हिंदी लष्करी अधिकारी शिकवून तयार केले. १९४५ च्या सप्टेंबरांत बँकॉक येथें यांना पकडण्यांत आलें. दिल्लीच्या लाल किल्ल्यांत कांहीं दिवस काढल्यानंतर यांची सुटका झाली.

**भोंडे, गोपाळ विनायक**—( जन्म स. १८८३ ) सुप्रसिद्ध अभिनयकुशल नकलाकार.

पुणें येथें शिक्षण घेऊन स्कूलफायनल झाल्यावर सरकारी नोकरी करून हे सेवानिवृत्त झाले ( १९०३-१९३२ ). विद्यार्थिदशेपासून यांच्यांत दुसऱ्याचें हुबेहुब अनुकरण करण्याची लकब होती. त्याचा विकास होता

होतां शिक्षक, उपाध्ये, हरिदास, गवई, अधिकारी व मोठमोठे पुढारी इत्यादींची आवाज, भाषण, लकब, पोषाख, चाल व चर्यासुद्धां हुबेहूब करून दाखवूं लागले. लो. टिळक, शिवरामपंत व रँ. परांपे, पांगारकर, भोपटकरबंधु, सावरकर वगैरेंच्या नकला करून दाखवून हे रसिकांना आश्चर्यचकित करतात. यांचे तसे फोटो व प्लेटीसुद्धां घेतलेल्या आहेत. एखाद्या भागाची नक्कल करणारे पुष्कळ लोक सांपडतात, पण सर्व बाजूंनी पूर्ण नक्कल करण्याच्या यांच्या गुणाला जगांत तोड नाहीं असें तज्ज्ञांचें मत आहे.

---

# म

**मॅक्डोनेल, डॉ. आर्थर ॲन्थनी**—( जन्म स. १८५४–मृत्यु स. ? ) वैदिक वाङ्मयाचे जगप्रसिद्ध अभ्यासक व लेखक.

जन्मस्थान मुझफरपूर. यांचे वडील चार्लस अलेक्झांडर मॅक्डोनेल हे इंडियन आर्मीत होते. यांचें शिक्षण गोटिंगेन व ऑक्सफर्ड येथें झालें. एम्. ए. झाल्यानंतर लिपझिक युनिव्हर्सिटीकडून यांना ऋग्वेदावरील कात्यायनाच्या सर्वानुक्रमणीची शुद्ध प्रत व त्यावर लिहिलेल्या लेखाबद्दल पीएच्. डी. ही पदवी मिळाली.

ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटींतील बोडन प्राध्यापक म्हणून काम करीत असतां यांनीं इंडियन इन्स्टिटयूटचें संवर्धन केलें आणि आपले वैदिक वाङ्मयावरील बहुमोल ग्रंथ लिहिले. यांचें वाङ्मय वेदांचें परीक्षण करणारें नसून परिचय करून देणारें आहे; त्यामुळें यांच्या ग्रंथांचा अधिक प्रचार आहे. वैदिक ग्रामर हा महत्त्वाचा ग्रंथ लिहून संस्कृत वाङ्मयापेक्षां वेद हा एक निराळा भाग असल्याचें यांनीं निदर्शनास आणलें. 'वैदिक ग्रामर फॉर स्टूडन्टस्' अशी छोटी आवृत्तीहि यांनीं प्रसिद्ध केली आहे ( १९१६ ). यांच्या बहुतेक ग्रंथांचें अवतरण मराठींत ज्ञानकोश प्रस्तावना खंड २-३ व प्राचीन चरित्रकोश यांत झालें आहे.

यांचे ग्रंथ—वैदिक-( 1 ) Vedic Mythology (1897), ( 2 ) Vedic Grammar ( बूलरच्या इंडो-आर्यन सीरीजमध्यें प्रसिद्धि, १९१० ), ( 3 ) Vedic Index of Names and Subjects (दोन भाग, ए. बी. कीथ यांचे सहकार्यानें, १९१२ ), ( 4 ) A Vedic Grammar for Students (1916), ( 5 ) A Vedic Reader for Students (1917).

संस्कृत वाङ्मयावरील—( 1 ) Sarvanukramani of the Rig-Veda (1886), ( 2 ) Sanskrit Grammar for Students (1886), (3) Sanskrit Dictionary ( वैदिक शब्दांसह १८९२ ), ( 4 ) A History of Sanskrit Literature ( मराठी भाषान्तर-सां. वा. पेंडसे, सयाजीसाहित्यमाला १९०० ), ( 5 ) Brihaddevata ( दोन भाग हार्वर्ड सिरीज, १९०४ ), ( 6 ) Encyclopaedia Britannica, Journal of the Royal Asiatic Society तील लेख.

**मॅथाय, डॉ. जॉन**—(जन्म स. १८८६ जाने. १०) मद्रास प्रांतांतील नामांकित अर्थशास्त्रज्ञ व टाटा केमिकल्स लि.चे प्रमुख.

मद्रास ख्रिश्चन कॉलेज, लंडन स्कूल ऑफ इकॉनमिक्स व बॅलीओल कॉलेज ( ऑक्सफर्ड ) येथें आपलें शिक्षण संपवून हे बी. एल्., डी. लिट्, डी. एस्सी. झाले. यानंतर मद्रास हायकोर्टमध्यें कांहीं दिवस वकिली केल्यानंतर यांनीं मद्रास को-ऑपरेटिव्ह डिपार्टमेंटमध्यें व नंतर मद्रासच्या प्रेसिडेन्सी कॉलेजांत व मद्रास युनिव्हर्सिटींत अर्थशास्त्राच्या प्राध्यापकाचें काम केलें ( १९२०-२५ ).

इंडियन टॅरिफ बोर्डाचे हे प्रथम कांहीं दिवस सभासद व नंतर अध्यक्ष होते ( १९२५-३१ ). परंतु पुढें हिंदुस्थानसरकारच्या कमर्शियल इंटिलीजन्स व स्टॅटिस्टिक्सच्या डायरेक्टर जनरलचें काम यांनीं केलें ( १९३५-४० ). पुढें हे हिंदुस्थानसरकारच्या नोकरींतून निवृत्त झाले व यांना टाटा सन्स लि.मध्यें सामील करून घेण्यांत आलें. १९३७ त आग्रा येथें भरलेल्या इंडियन इकॉनमिक कॉन्फरन्सच्या विसाव्या अधिवेशनाचें अध्यक्षस्थान

यांना देण्यांत आलें. 'Study of Economics' हा यांच्या अध्यक्षीय भाषणाचा विषय होता.

यांचे ग्रंथ—(1) Village Government in British India, (2) Agricultural Co-operation in India, (3) Excise and Liquor Control, (4) टॅरिफ बोर्डाच्या निरनिराळ्या चौकशांचे वृत्तांत.

त्रिमंत्री योजनेनें तयार झालेल्या व्हाइसरॉयच्या हंगामी कार्यकारी मंडळांत हिंदुस्थानांतील व्यापाऱ्यांचे प्रतिनिधि म्हणून यांची निवड झाली होती.

**मॅन, हॅरोल्ड हार्ट**—(जन्म स. १८७२) सुप्रसिद्ध रसायनशास्त्रज्ञ, चहातज्ज्ञ व लोकोपयुक्त कार्यकर्ते.

इंग्लंडमध्यें यॉर्क शहरीं जन्मून अनेक शिष्यवृत्त्या मिळवीत यांनीं आपलें शिक्षण पुरें केलें. पॅरिस येथें पाश्चूर यांचे हाताखालीं यांनीं जन्तुशास्त्राचाहि अभ्यास केला होता. १९०० सालीं टी असोसिएशननें यांना हिंदुस्थानांत आणलें. यांनीं चहाला जिवंत पाल्याचें खत देण्याविषयीं महत्त्वाचें संशोधन करून लीडस् विश्वविद्यालयाकडून डॉक्टर ही पदवी मिळविली. १९०७ सालीं हे, पुणें शेतकी कॉलेजचे पहिले प्रिन्सिपल झाले. कोंकणांतील भातशेतीच्या राब भाजण्याच्या पद्धतीबाबत यांनीं कांहीं कायमचे सिद्धान्त बसविले. यांनीं हिंदुस्थानांत येतांच मद्यपाननिषेधाच्या चळवळींत भाग घेण्यास सुरवात केली. कलकत्ता, टेंपरन्स फेडरेशन काढून मद्याचें संशोधन केलें. त्यांत ओल्ड स्कॉच व्हिस्कींत खऱ्या व्हिस्कीचे कांहीं थेंब व बाकी साधें स्पिरिट आढळलें. हे दि सोसायटी ऑफ चिल्ड्रनचे सेक्रेटरी, डिप्रेस क्लासेस मिशन पुणें शाखा व यंगमेन ख्रिश्चन असोसिएशन यांचे अध्यक्ष होते. यांनीं पुण्यास स्थापलेली डेक्कन अॅग्रिकल्चर असोसिएशन काम करीत आहे. १९२३ सालीं हे मुंबई शेतकीखात्याचे डायरेक्टर झाले व १९२७ सालीं हे सेवानिवृत्त झाले. यांचें लेखन विपुल आहे. कमेट्यांत झालेला वादविवाद थोडक्यांत सुबक लिहून काढण्यांत हे कुशल होते.

पुण्याजवळच्या पिंपळे सौदागरच्या शेतकऱ्यांची आर्थिक पाहणी करून वैयक्तिक आयव्ययावरून यांनीं ठरविलेले निर्णय मुंबई, विश्वविद्यालयातर्फे दोन ग्रंथांत प्रसिद्ध केले आहेत. यांनीं या ग्रंथांनीं शेतकऱ्यांच्या स्थितीचा अर्थशास्त्राच्या दृष्टीनें अभ्यास करण्याचा पाया घातला. सेवानिवृत्तीनंतर निजाम राज्यांत व नंतर तुर्कस्थानांत रासायनिक वगैरे खल्लागाराच्या कामगिरीवर यांची नेमणूक झाली होती.

**मनोहरलाल, सर**—(जन्म स. १८७० डिसें. ३१) सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ, ग्रंथकार व पंजाब प्रान्तांचे अर्थमंत्री.

हे केम्ब्रिज येथें तत्त्वज्ञान व अर्थशास्त्र हा विषय घेऊन एम्. ए. झाले व बॅरिस्टर होऊन परत आले. कपुरथळ्याच्या रणधीर कॉलेजचे प्रिन्सिपल, कलकत्ता, विश्वविद्यालयांतील 'मिंटो प्रोफेसर ऑफ इकॉनमिक्स' (१९०९), पंजाब युनिव्हर्सिटीचे फेलो, सिनेटर, कायदेमंडळाचे सभासद, शिक्षणमंत्री (१९२७-३०), अर्थमंत्री (१९३७ पासून) वगैरे कामें करून यांनीं अर्थशास्त्रावर अत्यंत महत्त्वाचे प्रबंध लिहिले. पंजाब युनिव्हर्सिटींतील अर्थशास्त्रीय अध्यापन व संशोधनाशीं यांचा अत्यंत जिव्हाळ्याचा संबंध आहे. यांना ऑल-इंडिया इकॉनॉमिक कॉन्फरन्स, डाक्का अधिवेशनाचे अध्यक्ष निवडण्यांत आलें होतें. तेथील यांच्या भाषणाचा विषय 'दि टास्क ऑफ इकॉनमिस्ट इन् इंडिया' हा होता (१९३५).

**मलबारी, बेहेरामजी**—(जन्म स. १८४३–मृत्यु स. १९१२ जुलै ) हिंदी समाजसुधारक, वृत्तपत्रकार, गुजराथी वाङ्मयाचे अभ्यासक व लेखक.

या पारशी गृहस्थांचे वडील बडोदें राज्यांत नोकरीस होते. हे 'इंडियन स्पेक्टेटर' या इंग्रजी पत्राचे वीस वर्षे व 'ईस्ट अॅन्ड वेस्ट' या मासिकाचे संपादक होते (१९०६). आपलीं सामाजिक मतें हे निर्भीडपणें मांडीत आणि त्याला कायदेशीर रूप देण्याचा प्रयत्न करीत. महाराष्ट्रांतील संमतिवयाच्या बिलाची चळवळ यांनीं इंग्लंडमध्यें असतां पार्लमेंटमध्यें आणविलेल्या बिलामुळें उत्पन्न झाली होती.

यांचे ग्रंथ—गुजराथी–१ काव्यसंग्रह (१८७५), इंग्रजी–२ दि इंडियन म्यूज इन् इंग्लिश गार्ब (१८७७), ३ इंडियन आय ऑन इंग्लिश लाइफ, ४ गुजराथ अॅन्ड गुजराथीज्.

**मशरुवाला, किशोरलाल घनश्यामलाल**—(जन्म स. १८९०) जीवनाचे तात्त्विक अभ्यासक व लेखक.

जन्मस्थान मुंबई. यांचें घराणें मूळचें सुरतेचें. जात वैश्य. यांच्या पित्याचें नांव इच्छाराम रंगीलदास. हे मुंबईच्या विल्सन कॉलेजांतून बी. ए. व नंतर एल्एल्. बी. झाले. १९१७ सालापासून यांनीं वकिलीचा धंदा सोडला आणि हे म. गांधींचे अनुयायी बनले. गुजराथ विद्यापीठाचे हे पहिले महामात्र ( चान्सेलर ) होते.

यांच्या जीवनावर स्वामीनारायण पंथाचा आणि म. गांधींचा विशेष प्रभाव पडला. यांचें ज्ञान पांडित्यपूर्ण नाहीं पण तें चैतन्ययुक्त व विशेष प्रकारचें सुसंस्कृत आहे यांत शंका नाहीं. यांनीं शोधक व मुमुक्षु दृष्टीनें आपल्या तत्त्वज्ञानाचें अवलोकन केलें आहे. यांचे लेखनांत यांची उच्च व स्वतंत्र वृत्ति स्पष्टपणें प्रतीत होते. तसेंच हे तात्त्विक प्रश्नांचा तटस्थपणानें अभ्यास करूं शकतात. या दृष्टीनें यांचें लेखन अत्यंत महत्त्वाचें आहे.

यांचें गुजराथी वाङ्मय—१ राम अने कृष्ण ( पहिली आवृत्ति १९३३, दुसरी आवृत्ति १९३० ), २ बुद्ध अने महावीर ( दोन आवृत्त्या ), ३ ईशु ख्रिस्त, ४ सहजानंदस्वामी, ५ केलवणीना पाया ( स्वतंत्र ), ६ जीवनशोधन ( भाग १-२ ), ७ गांधीविचारदोहन.

**मसानी, मिनु रुस्तुम**—( जन्म स. १९०५ ) मुंबईचे सुप्रसिद्ध काँग्रेस कार्यकर्ते व अर्थशास्त्रीय लेखक.

मुंबईच्या न्यू हायस्कूल, एल्फिन्स्टन कॉलेज, लंडनच्या लंडन स्कूल ऑफ इकॉनमिक्स व लिंकन्स इनमध्यें आपलें शिक्षण संपविल्यानंतर हे बॅरिस्टर होऊन हिंदुस्थानला परत आले. १९२९ मध्यें मुंबईच्या हायकोर्टांत यांनीं वकिली करण्यास सुरवात केली. १९३३ व १९४३ च्या काँग्रेस चळवळींत यांना तुरुंगांत जावें लागलें. काँग्रेस सोशॅलिस्ट पक्षाच्या संस्थापकांपैकीं हे एक असून त्या संस्थेचे हे कांहीं दिवस सेक्रेटरीहि होते. मुंबईच्या कॉर्पोरेशनचेंहि हें एक वर्ष मेयर होते ( १९४३-४४ ). १९४५ सालीं झालेल्या मध्यवर्ति असेंब्लीच्या निवडणुकींत हे व डॉ. गोपाळराव देशमुख मुंबईतर्फे निवडून गेले. शिवाय हे टाटा सन्स लि.मध्यें महत्त्वाच्या हुद्द्यावर आहेत.

अर्थशास्त्रीय माहिती सामान्य माणसालाहि समजेल इतक्या सोप्या पद्धतीनें समजावून देण्याची यांची शैली यांच्या Our India या पुस्तकानें प्रथम लोकांचे दृष्टोत्पत्तीस आली. सर्व हिंदुस्थानांत हें पुस्तक इतकें लोकप्रिय झालें कीं, हिंदुस्थानांतील जवळ जवळ सर्व भाषांत त्याचें भाषांतर करण्यांत आलें. याच धर्तीवर यांनीं प्रसिद्ध केलेलें Your Food हि असेंच लोकप्रिय झालें. our India चा मराठी अनुवाद भाई ना. ग. गोरे यांनीं व your food च्या अनुवादाचें काम चं. वि. बावडेकर यांनीं केलें.

यांचे ग्रंथ—( 1 ) India's Constitution at Work ( सी. वाय. चिंतामणी यांचे सहकार्यानें ), ( 2 ) Our India, ( 3 ) Why this starvation, ( 4 ) Socialism Reconsidered, ( 5 ) Your Food, ( 6 ) Picture of the Plan.

**मसानी, सर-रुस्तुम पेस्तनजी**—( जन्म स. १८७६ ) मुंबईचे सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ व लेखक.

मुंबईच्या अनेक सरकारी व सार्वजनिक कार्यांत भाग घेतल्यामुळें यांचें नांव मुंबई प्रांतांत सर्वपरिचित झालें. मुंबई युनिव्हर्सिटी, एल्फिन्स्टन कॉलेज अशा शैक्षणिक, इन्स्टिटयूट ऑफ बँकर्स, सेंट्रल बँक ऑफ इंडिया, इंडियन सेंट्रल बँकिंग इन्कायरी कमेटी, रिझर्व बँक ऑफ इंडिया अशा आर्थिक व बॉम्बे फूड प्राईसेस कमेटी, नॅशनल डिफेन्स कौन्सिल, बॉम्बे फूड कौन्सिल अशा सार्वजनिक कार्यांत यांनीं दाखविलेल्या अष्टपैलू तेजस्वीपणानें सरकार व जनता या दोन्हो ठिकाणीं हे लोकप्रिय झाले. पुढें तर मुंबईच्या नॅशनल वॉरफ्रंटचे यांना प्रमुख नेमण्यांत आलें.

परंतु यापेक्षांहि इंग्रजी व गुजराथी भाषांतील उत्कृष्ट लेखक या नात्यानें यांची योग्यता विशेष मानली जाते. दादाभाई नौरोजीवरील यांचा चरित्रग्रंथ तर हिंदुस्थानांतील कांहीं उत्कृष्ट चरित्रांत सामावला जातो.

यांचे इंग्रजी ग्रंथ—( 1 ) Child Protection, ( 2 ) Folklore of Wells, ( 3 ) The Law and Procedure of Municipal Corporation Bombay, ( 4 ) The Conference of Birds, ( 5 ) Suffi Allegory, ( 6 ) Evolution of Local Self-Government in Bombay, ( 7 ) The Religion of the good Life, (8) Zorastrianism, ( 9 ) Court-poets of Iran and India, ( 10 ) Dadabhai Naoroji.

गुजराथी—१ दौलतनो उपयोग, २ घरनी तथा

शालनी केळवनी, ३ तनसुखमाला व चंद्रचल, अभ्यासिनियानो होब्शी, बोधलु इत्यादि कादंबऱ्या.

कैसर-इ-हिंद व इंडियन स्पेक्टटर या पत्रांचे हे कांहीं दिवस संपादक होते.

**महाजन, गोविंद विठ्ठल ऊर्फ भाऊ**—( जन्म स. १८१५–मृत्यु स. १८९० ) मराठींतील प्रसिद्ध लेखक व वर्तमानपत्रकार,

सदाशिव काशीनाथ ऊर्फ बापू छत्रे यांचे हे मेहुणे. उपनाम कुंटे. मुंबईस आठ वर्षांचे असतां हे आले व तेथें यांनीं आपलें शिक्षण घेतलें. यांना इंग्रजी, संस्कृत व फारशी या भाषा येत. यांनीं जांभेकरांना दर्पण पाक्षिक व दिग्दर्शन चालविण्यास मदत केल्यानंतर स्वतःच्या जबाबदारीवर प्रभाकर साप्ताहिक काढलें ( १८४१ ). तें चांगलें लोकप्रिय झालें होतें. हे विष्णुबुवा ब्रह्मचाऱ्यांच्या विक्षिप्तपणावर टीका करीत. तेव्हां त्यांच्या अनुयायांनीं भ. वि. कानविंदे यांच्या संपादकत्वाखालीं वर्तमानदीपिका पत्र काढलें. त्याला तोड म्हणून यांनीं ‘ धूमकेतु ’ काढलें ( १८५३ ). यांचा वाद त्या वेळीं रंगे. केवळ शास्त्रीय विषयाकरितां यांनीं ‘ ज्ञानदर्शन ’ त्रैमासिक काढलें होतें ( १८५४ ). ज्ञानदर्शनानें कुशल भाषान्तरकार म्हणून यांची ख्याति झाली. १८६० नंतर यांची कोणतीहि वाङ्मयकृति उपलब्ध नाहीं. हे गृहस्थ विद्वान् असून पहिल्या प्रतीचे मराठी लेखक होते, असें बाबा पदमनजी अरुणोदयांत म्हणतात ( पान ८८ ).

**महाजनि, गणेश सखाराम**—( जन्म स. १८९८ ) पुण्याच्या फार्ग्युसन कॉलेजचे प्रिन्सिपल व सार्वजनिक कार्यकर्ते.

सातारा हायस्कूल, फर्ग्युसन कॉलेज पुणें व केम्ब्रिजच्या सेंट जॉन कॉलेजमध्यें यांचें शिक्षण झालें. कॉलेजमध्यें असतांनाच अति हुशार विद्यार्थी म्हणून यांची प्रसिद्धि असे. त्यामुळेंच यांना गव्हर्नमेंट ऑफ इंडिया स्कॉलर म्हणून इंग्लंडला पाठविण्यांत आलें होतें. अणूंची विशिष्ट रचना गृहीत धरून त्याभोंवतीं विद्युत्प्रवाह फिरत आहेत अशी कल्पना केल्यास त्याच्या परिणामाचें गणित मांडण्याच्या व तो परिणाम प्रायोगिक रीतीनें निघणाऱ्या परिणामाइतकाच असल्याचे यांचे संशोधनाबद्दल यांना केम्ब्रिज युनिव्हर्सिटीनें स्मिथ प्राईझ दिलें. हे हिंदुस्थानला एम्. ए., पीएच्. डी. स्टार रँगलर होऊन आले व यांना पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजचे प्रिन्सिपल नेमण्यांत आलें ( १९२९ ). तेथील आपल्या दीर्घकालीन व उज्ज्वल कारकीर्दीनंतर हे आपल्या जागेवरून निवृत्त झाले ( १९४६ ).

बंगलोरच्या इंडियन अॅकॅडमी ऑफ सायन्सचे व कलकत्त्याच्या नॅशनल इन्स्टिटयूट ऑफ सायन्सचे यांना फाउंडेशन फेलो निवडण्यांत आलें. कॉलेजच्या यू. टी. सी.चे हे कॅप्टन होते.

यांचे ग्रंथ—गणित-(1) Lessons in Elementary Analysis, ( 2 ) The Application of Moving Axes Methods to the Geometry of Curves and Surfaces, ( 3 ) An Introduction to Pure Solid Geometry, ( 4 ) Contribution to Theory of Ferromagnetic Crystals ( Transactions of Royal Society, London मध्यें प्रकाशन ).

राजकीय—( 1 ) The Liberal outlook, ( 2 ) Liberals and the Congress, ( 3 ) The problem of the Minorities and Constitutional Democracy as its Solution, ( 4 ) Education and Democracy.

**महाराष्ट्रिय, नारायण रामचंद्र पाटणकर**—( जन्म स. १८८८ ) मराठींतील सुप्रसिद्ध ग्रंथकार व अभ्यासक.

राजापूर येथें इंग्रजी पांच इयत्तेपर्यंत शिक्षण घेतल्यावर चुलते रघुनाथशास्त्री कृष्ण पाटणकर यांचेपाशीं घरीं संस्कृत, व्याकरणशास्त्र, वेदान्त वगैरेंचा अभ्यास केला. मुख्य व्यवसाय व्यापार, परंतु सूक्ष्म अभ्यास करण्याचा नाद असल्यानें लेखनवाचन नित्य चालू असतें. यांचें लेखन विवेचक, पायाशुद्ध आणि टिकाऊ स्वरूपाचें आहे.

यांचे ग्रंथ—१ रामायण समालोचना, २ तुल्यं तु दर्शनम्, ३ आग्रहायणी, ४ चित्रावसु इत्यादि निबंध; संस्कृत–५ व्याकरणकारिका; काव्य–६ उषसूक्तावली इत्यादि.

**महेन्द्रप्रताप, राजा**—(जन्म स. १८८६ डिसें. १) सुप्रसिद्ध हिन्दी क्रान्तिकारक.

यांच्या पित्याचें नांव राजा घनश्यामसिंह. हे संयुक्त

प्रान्तांतील अलिगड जिल्ह्यांतील मुरसान या लहानशा संस्थानचे राजे. हाथरसचे राजे श्री. हरनामसिंह यांनीं यास अल्पवयांतच दत्तक घेतलें. बी. ए. च्या वर्गांत असतांनाच यांचे दत्तक पिताजी वारल्यानें यांना संस्थानचा राज्यकारभार पहावा लागला. पुढें झिंद संस्थानचे राजे रणवीरसिंह यांच्या भगिनीशीं यांचें लग्न झालें. १९०७ सालीं हे जगांतील निरनिराळीं राष्ट्रें पाहण्याच्या उद्देशानें पृथ्वीपर्यटणास निघाले.

प्रवासांत असतां शिक्षणाचें महत्त्व यांना पटून स्वतःच्या व स्वतःच्या कुटुंबापुरती मिळकत शिल्लक ठेवून कायद्याच्या अडचणींतूनहि मार्ग काढून यांनीं आपल्या मिळकतीचें दानपत्र केलें व त्यांतून वृंदावन येथें असलेल्या प्रेम-महाविद्यालयाचा जन्म झाला. या विद्यालयास नमुनेदार करण्यासाठीं युरोपांतील निरनिराळ्या शिक्षणसंस्थांचा अभ्यास करण्याकरितां हे पुनः युरोपला गेले. त्या वेळीं सुरू झालेल्या बाल्कन युद्धांत तुर्कस्थानला यांनीं साहाय्य केलें व युद्ध संपल्यावर हे हिंदुस्थानांत परत आले.

तेव्हां यांनीं प्रेम-महाविद्यालयाच्या कार्याबरोबर एक हिन्दी व एक उर्दू पत्र सुरू केलें. पहिलें महायुद्ध सुरू होतांच ( १९१४ ), युद्धपरिस्थितीचा अभ्यास करण्याकरितां हे युरोपला गेले. तेथें यांच्यांत क्रान्तिकारक बदल झाला आणि हे जर्मनपक्षांत सामील झाले. १९१५ सालीं हे तुर्कस्थान व जर्मनी यांच्या वतीनें युद्धांत सामील करून घेण्याकरितां अफगाणिस्थानाकडे शिष्टमंडळ घेऊन गेले. युद्धपरिस्थितीमुळें १९१८ पर्यंत यांना अफगाणिस्थानांतच राहावें लागलें. नंतर हे बर्लिनला परत जात असतां लेनिन-सरकारकडून यांचें भव्य स्वागत झालें. १९१९ सालीं यांनीं रशियाचा संपूर्ण प्रवास केला. याच काळांत सोव्हिएट शिष्टमंडळाबरोबर हे पुनः अफगाणिस्थानांत आले. नंतर चीनला रवाना झाले. १९२२ सालीं मेक्सिकोहून पॅसिफिकमधून हे जपानला आले. जपानसरकारनें जपान-अफगाणिस्थानचे राजकीय संबंध जोडण्याचें कार्य यांच्यावर सोंपविलें. पेकिंग, मंगोलिया, सैबेरिया, मास्को या भागांत प्रवास करीत हे अफगाणिस्थानांत आले. नंतर हे अमेरिकेस गेले. १९२५ च्या मे महिन्याच्या न्यूयॉर्क येथील 'एशिया' पत्रांत यांचें त्या वेळपर्यंतचें चरित्र प्रसिद्ध करण्यांत आलें.

अमेरिकेंतील हिन्दी नागरिकांकडून सुमारें बारा हजार डॉलर्स जमवून एका शिष्टमंडळासह हे चीन सरकारच्या परवानगीनें तिबेटांत आले व पुनः पृथ्वीपर्यटणास निघाले. १९२९ सालीं हे कित्येक महिने रशियांत होते. तेथून सप्टेंबरांत बर्लिन येथें जाऊन पुढें हे टोकिओस घर बांधून स्थायिक झाले. 'प्रेम, न्याय, सेवा व आत्मसमर्पण' या चार तत्त्वांवर सुखी जगाची स्थापना करतां येईल अशी यांची कल्पना आहे. हिंदुस्थानसरकारच्या दृष्टीनें शत्रु-राष्ट्राशीं संबंध ठेवणारे हे गुन्हेगार आहेत.

**मंडलिक, विश्वनाथ नारायण**—( जन्म स. १८३३ मार्च ८–मृत्यु स. १८८९ मे ९ ) सुप्रसिद्ध वकील व सार्वजनिक कार्यकर्ते.

जन्मस्थान मुरूड. जात चित्पावन ब्राह्मण. मुंबईच्या एल्फिन्स्टन इन्स्टिट्यूटमध्यें चार वर्षें शिक्षण घेतल्यावर कांहीं वर्षें ( १८५२-१८६३ ) सरकारी नोकरी करून राजीनामा दिला व पुढें वकिली करूं लागले. नेटिव्ह ओपिनियन नांवाचें इंग्रजी-मराठी साप्ताहिक सुरू करून त्याचे हे सात वर्षें संपादक होते ( १८६४-१८७० ).

हे अध्यक्ष, मुंबई कॉर्पोरेशन, उपाध्यक्ष रॉयल एशि. सो. मुंबई, फेलो, सिन्डिक व डीन मुंबई, युनिव्हर्सिटी, सभासद मुंबई व कलकत्ता कायदे कौन्सिल इत्यादि होते. यांचा ग्रंथसंग्रह यांच्या मृत्यूनंतर पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजला देण्यांत आला ( १९०७ ). तो मंडलिक ग्रंथसंग्रह या नांवानें तेथें ठेवला आहे.

१ बोधसार (१८५७ जुन्या कवींचे उतारे), २ सिंधी भाषेचें लघुव्याकरण, ३ यंगसाहेबांच्या बीजगणिताचें भाषान्तर, ४ लक्ष्मीशास्त्र ( मार्सेरबाईच्या ग्रंथाचें भाषान्तर ), ५ हिंदुस्थानचा इतिहास ( भाषान्तर ), ६ मराठी हिंदुधर्मशास्त्र ( १८६५, १८८२ ), ७ तुकारामाची गाथा. यांचे व्यवहारमयूख, याज्ञवल्क्यस्मृति मिताक्षरेसहित व नऊ टीकांसह छापलेली मनुस्मृति हे ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहेत.

**माडखोलकर, गजानन त्र्यंबक**—( जन्म स. १८९९ ) मराठींतील सुप्रसिद्ध टीकाकार, ललितलेखक व वृत्तपत्रव्यवसायी.

यांचा जन्म मुंबईला झाला. हायस्कूलमधील आपलें शिक्षण अपुरें टाकूनच यांना पुण्याच्या केसरी साप्ताहिकांत नोकरी धरावी लागली. त्यानंतर ज्ञानप्रकाश, पुणें, महाराष्ट्र, नागपूर इत्यादि पत्रांत कामें केल्यानंतर नरकेसरी ( अभ्यंकर ) स्मारक मंडळातर्फे चालविण्यांत

येणाऱ्या नागपूरच्या ' तरुण भारत ' या दैनिकाचे प्रमुख संपादक म्हणून यांची नेमणूक झाली ( १९४३ ).

मुख्यतः टीकाकार–वाङ्मयीन व राजकीय–म्हणून यांची प्रसिद्धि आहे. पुण्याच्या ज्ञानप्रकाशमध्यें यांनीं सुरू केलेलें ' काव्य-शास्त्र-विनोद ' हें सदर त्या काळीं अतिलोकप्रिय झालें होतें.

यांचे इतर टीकालेख–परामर्ष, आधुनिक कविपंचक, माझे आवडते लेखक, इत्यादि नांवांखालीं प्रसिद्ध झाले. विष्णुशास्त्री चिपळूणकरांचें श्री. ना. बनहट्टी यांचे सहकार्यानें यांनीं लिहिलेलें चरित्रहि असेंच प्रसिद्ध आहे.

मराठींतील राजकीय कादंबऱ्यांची सुरुवात यांनीं केली असें मानण्यांत येतें. स्थल, काल, व्यक्ति यांचीं अचूक वर्णनें आपल्या कादंबऱ्यांतून करण्यास यांनीं सुरुवात केली. खरे प्रकरणावर यांनीं लिहिलेली 'मुखवटे' किंवा नऊ ऑगस्ट चळवळीवर यांची ' प्रमद्वरा ' कादंबरी या दृष्टीनें नमुनेदार आहे.

१९४६ च्या बेळगांव येथील महाराष्ट्र साहित्य-संमेलन तिसाव्या अधिवेशनाच्या ललित विभागाचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें.

' पैशाच्या दृष्टीनें वाङ्मयव्यवसायांतील माझा अनुभव अतिनिराशाजनक आहे; माणसानें इतर कोणताहि धंदा करावा, परंतु स्वतःच्या महत्त्वाविषयीं भलत्याच कल्पना उत्पन्न करणारा हा प्रतिष्ठित पण वांझोटा धंदा करू नये ' हा यांचा अनुभव सर्वच मराठी लेखकांच्या वृत्तीवर प्रकाश टाकणारा आहे.

आपल्या म्हणण्याच्या पुष्ट्यर्थ यांनीं भारतसेवक समाजांत यांना मिळणारे चाळीस रु., तरुणभारतमध्यें मिळणारे द. म. शंभर रु. व कादंबरीच्या दर पानी मिळणारे साडे तीन रु. हे आंकडे पुढें केले आहेत.

**माणिकप्रभु**—( जन्म स. १८२१–समाधि स. १८६५ ) सुप्रसिद्ध सत्पुरुष.

पिता मनोहर नायक. माता बयादेवी. उपनाम हरकुडे. श्रीवत्सगोत्री दे. ऋ. ब्राह्मण. जन्मस्थान लाडवंती. यांचे पूर्वज कल्याणीस सावकारी करीत. वडील वेद-वेदान्तांत निष्णात व योगाभ्यासी होते. त्यांनीं देह ठेवल्यावर यांची मुंज झाली.

लहानपणापासून यांच्या सिद्धाईच्या गोष्टी चहूंकडे पसरू लागल्या. हे नवसास पावत. अतिथिअभ्यागतांना यांचें घर म्हणजे स्वतःचें घर वाटे. हे भिक्षेला निघत तेव्हां यांच्या राजैश्वर्यानें भाविक दिपून जात. यांनीं अनेक चमत्कार केले. यांना हिंदु व मुसलमान सारखेच भजत. यांनीं शेवटीं हुमणाबादेजवळ मणिगिरि म्हणून निर्जन स्थान आहे तेथें वस्ती केली. त्यालाच माणिकनगर हें नांव मिळून सध्यांचें वैभव प्राप्त झालें. यांनीं आपले धाकटे बंधु नृसिंहराव यांस ब्रह्मज्ञानाचा उपदेश केला. तो आपल्या 'कल्पतरु' या ग्रंथांत दिला आहे. शिवाय यांचीं अनेक पदें व आरत्या वगैरे आहेत. त्या पद्यमाला नांवानें माणिकप्रभुसंस्थाननें प्रसिद्ध केल्या आहेत.

**माणिकराव**—( जन्म स. १८७८ डिसें. २१ ) सुप्रसिद्ध मल्लविद्याविशारद, मल्लविद्याप्रचारक व अस्थिसंधाननिष्णात.

यांचें समग्र नांव गजानन यशवंत ताम्हणे. जात प्रभु. हे आजन्म ब्रह्मचारी असून सुप्रसिद्ध हबशी मल्ल जुम्मामियांचे शिष्य. हे कांहीं काल हिंदुस्थानभर मल्लविद्या व निशाणबाजी यांचे प्रयोग करीत हिंडत. कलकत्ता येथील जागतिक सामन्यांत यांनीं अनेक खेळांत पहिला क्रमांक पटकावला. याबद्दल कलकत्त्यास यांचा जाहीर सत्कार झाला. यांनीं १९२१ सालीं बडोदें येथें व्यायाममंदिराची नवी उभारणी केली. सांघिक व्यायामपद्धति, देशी खेळास आधुनिक वळण देणें व हिन्दी कवायत हे सर्व प्रकार प्रथमतः यांनीं सुरू केले. कन्या आरोग्यमंदिर ( १९२५ ), शिवाजी मंदिर ( १९२७ ) व अस्थिसंधानालय ( १९३० ) यांच्या स्वतंत्र इमारती उभारल्या. बडोद्यांतील महापुराच्या वेळीं लोकांचे जीव वांचविण्याकरितां अतिशय खटपट केली म्हणून बडोदेंसरकारनें यांना राजरत्न पदवी दिली. यांना प्राचीन शस्त्रांच्या संशोधनाचा आणि संग्रहाचा नाद आहे. त्यांत अकबर, औरंगजेब, राणा प्रताप, शिवाजीमहाराज, टिपु वगैरेंच्या तलवारी आहेत. यांच्या या संग्रहाची किंमत कित्येक लक्ष रुपये होईल.

यांनीं व्यायामावर हिन्दी, मराठी व गुजराथी भाषेंत अनेक पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत.

**माधवराव, व्ही. पी.**—( जन्म स. १८५० फेब्रु. १०–मृत्यु स. १९३५ ) म्हैसूर, त्रावणकोर व बडोदे राज्याचे सुप्रसिद्ध दिवाण.

हे मूळ महाराष्ट्रांतील दे. ऋ. ब्राह्मण. यांचा जन्म कुंभकोणम् येथें झाला. हे एकोणिसाव्या वर्षी बी. ए. झाल्यावर बंगलोरच्या मिशन स्कूलमध्यें शिक्षक म्हणून काम करूं लागले आणि उत्तम शिक्षक म्हणून म्हैसूरच्या महाराजांचे यांना शिक्षक नेमण्यांत आलें. पुढें म्हैसूर राज्यांत न्याय, वसूल, उद्योगधंदे, शेती, ग्रामसुधारणा, पोलीस वगैरे खात्यांशीं यांचा संबंध आला. यांनीं प्रत्येक ठिकाणीं आपल्या मूलगामी व लोकोपकारक कर्तृत्वानें आपली छाप बसविली आणि चहूंकडून वाहवा मिळविली. मुंबई इलाख्याची जमाबंदीची पद्धत पाहण्याकरितां दरबारनें यांना मुद्दाम धाडलें आणि यांना 'मेंबर ऑफ कौन्सिल'चे सभासद नेमून पुनः फर्स्ट रेव्हेन्यु कमिशनरची जागा दिली.

१९०४ सालीं यांना त्रावणकोर संस्थाननें आपले मुख्य प्रधान नेमलें. तेथें यांनीं दोन वर्षात खात्यांची पुनर्घटना, दैनिक हिशेबतपासणी, सारा धान्यरूपांत न घेतां नाण्याच्या रूपानें घेणें व श्रीमूलंजनसभा स्थापून लोकप्रतिनिधींमार्फत राज्यकारभार चालविणें या महत्त्वाच्या सुधारणा केल्या.

१९०६ सालीं यांना पुनः म्हैसूरचे दिवाण नेमण्यांत आलें. तेव्हां यांनीं आरोग्य, नगररचना, गुरांचें आरोग्य, सहकारी संस्था, मोफत शिक्षण, धार्मिक शिक्षण, धंदेशिक्षण, परदेश शिष्यवृत्त्या या महत्त्वाच्या गोष्टी केल्या. तेथून हे १९०९ सालीं सेवानिवृत्त झाले.

१९१४ सालीं यांना मुद्दाम बोलावून श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांनीं यांना बडोदे राज्याचे दिवाण केलें.

१९१९ सालीं जॉईंट पार्लमेंटरी कमेटीपुढें यांनीं राष्ट्रसभेतर्फे शिष्टमंडळांत इंग्लंडला जाऊन साक्ष दिली. धारवाड येथें भरलेल्या पहिल्या कर्नाटक परिषदेचे हे अध्यक्ष होते (१९२०). हे हिंदुमहासभेच्या एका अधिवेशनाचेहि अध्यक्ष होते. यांनीं आपला बराच काळ सामाजिक, आर्थिक व राजकीय सुधारणांत घालविला. हे पूर्ण राष्ट्रीय बाण्याचे, स्वतंत्र वृत्तीचे व तडफदार गृहस्थ होते. १९२९ सालीं त्रावणकोर संस्थानांत यांनींच सुरू केलेल्या श्रीमूलंजनसभेच्या रौप्यमहोत्सवप्रसंगीं अध्यक्ष होण्याचा अपूर्व मान यांना देण्यांत आला. हिंदुस्थानांतील अत्यंत कर्तबगार माणसांत यांची गणना होत असे.

**माधवराव, राजा सर टी.**—(जन्म स. १८२८–मृत्यु स. १८९१) सुप्रसिद्ध राजकारणी मुत्सद्दी व त्रावणकोर, बडोदे नि इंदोर राज्याचे मुख्य प्रधान.

यांचा जन्म कुंभकोणम् येथें महाराष्ट्रीय दे. ऋ. ब्राह्मणाच्या घराण्यांत झाला. यांचे आजे गुंडोपंत. वडील रंगराव व चुलते व्यंकटराव. हे त्रावणकोरचे दिवाण होते. यांचें घराणें पूर्वीपासून राजकारणांत मोठाल्या हुद्यावर वावरणारें होतें. यांनीं आपले थोरले बंधु वासुदेवराव यांच्याकडे मद्रास येथें राहून आपला इंग्रजी शिक्षणाचा सहा वर्षांचा अभ्यास पुरा केला (१८४६). कारकून, राजपुत्रांचे शिक्षक अशा क्रमानें चढत हे त्रावणकोर राज्याचे मुख्य प्रधान झाले (१८५८). तें काम यांनीं इतकें यशस्वी करून दाखविलें कीं, संस्थानांत सर्वत्र नवा मनु सुरू झाला, आर्थिक स्थिति सुधारली व सुव्यवस्था नांदूं लागली. १८६० सालीं गादीवर आलेल्या मार्तंडवर्मा यांना महाराजा ही पदवी व यांना सर ही पदवी ब्रि. सरकारकडून देण्यांत आली (१८६६). यांच्या चवदा वर्षांच्या यशस्वी कारकीर्दीच्या स्मरणार्थ त्रिवेंद्रम येथें लोकांनीं वर्गणी करून यांचा पुतळा उभारला आहे.

स. १८७३ सालीं हिंदुस्थान सरकारच्या सूचनेवरून इंदूर राज्याचे यांना दिवाण नेमण्यांत आलें. तेथें दोन वर्षे होतांच यांना बडोद्यास महाराज मल्हारराव गायकवाड यांच्या पदच्युतीनंतर दिवाण व रीजंट अशा दोन्ही अधिकारावर जावें लागलें. तेथील अंदाधुंदी नाहींशी करून यांनीं सात वर्षात उत्तम व्यवस्था लावली आणि महाराज सयाजीराव गायकवाडांच्यासारखा राजा शिक्षण देऊन तयार केला. या यांच्या कार्याबद्दल ब्रिटिश सरकारनें यांना राजा ही पदवी दिली (१ जाने. १८७७).

शेवटीं मद्रासला राहत असतां हे आपला वेळ मराठी वाङ्मयाचा अभ्यास करण्यांत घालवीत. यांनीं मराठी कविता केल्या आहेत व त्या तिकडे लोकप्रिय आहेत. हे पक्क्या राष्ट्रीय वृत्तीचे होते. राष्ट्रसभेच्या अगदीं आरंभीच्या पुरस्कर्त्यांत यांचें नांव प्रमुख आहे. हे मद्रास येथें भरलेल्या तिसऱ्या राष्ट्रसभेचे स्वागताध्यक्ष होते. यांनीं लिहिलेल्या लष्करी शिस्तीच्या नियमांचें जर्मन भाषेंत भाषान्तर झालें आहे.

**मार्शल, सर-जॉन ह्यूबर्ट**—( जन्म स. १८७६ मार्च १९ ) हिंदुस्थानांतील पुराणसंशोधनखात्याचे व्यवस्थापक व सुप्रसिद्ध संशोधक.

इंग्लंडमधील चेस्टर हे यांचें जन्मस्थान. केम्ब्रिजच्या डुलविक व क्वीन्स कॉलेजमध्यें कांहीं दिवस शिक्षण घेतल्यानंतर ग्रीसमध्यें यांनीं पुरातनवस्तुसंशोधनाचे कार्यास सुरुवात केली. यानंतर हिंदुस्थानचे त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड कर्झन यांच्या शिफारशीनें हे हिंदुस्थानला आले व दोन तपांपेक्षां अधिक काळ हिंदुस्थानांतील पुरातत्त्वखात्याच्या प्रमुखाचें काम केलें ( १९०२-३१ ). १९०६ सालीं तें खातें यांनीं मध्यवर्ति सरकारला जोडून घेण्याची व्यवस्था केली व त्याची पुनर्रचना करून नवी दिशा दाखवून दिली.

प्राचीन इमारतींच्या संरक्षणासंबंधीचे 'Conservation Manual' प्रसिद्ध करून सर्व जुन्या इमारतींची त्या पद्धतीनें व्यवस्था ठेवण्याची पद्धति यांनीं सुरू केली. सांची येथील स्तूपाचें यांनीं केलेलें संरक्षण या दृष्टीनें नमुनेदार आहे. यानंतर चारसदा ( जुनी पुष्कलावती ) राजगृह, सारनाथ, कासीया वैशाली ( हल्लीचे बसान्ह ), भिटा व तक्षशिला यांसारख्या प्राचीन बौद्ध तीर्थस्थानीं उत्खनन करून ह्यूएन्संग वगैरे चिनी प्रवाशांनीं वर्णन केलेलीं बौद्धधर्मीय क्षेत्रें व त्यांचा प्रवासमार्ग यांवर प्रकाश टाकण्याचा प्रयत्न केला. यांपैकीं तक्षशिलेचें उत्खनन तर सतत वीस वर्षे चाललें व पश्चिम सीमा प्रांतांतून झालेल्या परकीय आक्रमणासंबंधीं एक नवा विचारप्रवाह त्यांतून उत्पन्न झाला. विदिशा येथील सुप्रसिद्ध ग्रीक होलिओडोरस यांच्या गरुडस्तंभाचा शोध यांनीं लावला.

परंतु यांपैकीं सिंधमधील मोहेन-जो-दडो येथील प्राचीन हिंदी संस्कृतीचें संशोधन हें यांचें सर्वांत प्रमुख कार्य होय. १९२१ सालीं श्री. राखलदास बानर्जी यांनीं त्या ठिकाणाचा प्रथम शोध लावला. या ठिकाणचें पुष्कळसें उत्खनन सर जॉन यांनीं केलें व ते मॅके या संशोधकानें पुढें चालविलें ( १९२७-३१ ). हिंदुस्थानचें प्राचीनत्व व जगांतील इतर पुरातन संस्कृतींशीं संबंध या दोन्ही दृष्टीनें हें संशोधन महत्त्वाचें आहे.

याशिवाय भोपाळ, काश्मीर, म्हैसूर, हैदराबाद इत्यादि ठिकाणीं पुरातत्त्वखात्यांची स्थापना व सर ऑरेल स्टाइन यांच्या मध्य आशियांतील संशोधन कार्यास उत्तेजन, हीं यांचीं इतर महत्त्वाचीं कार्यें होत.

यांचे ग्रंथ—( 1 ) Mohenjo-Daro and the Indus Civilization (३ खंड), ( 2 ) Monuments of Sanchi ( ३ खंड ), ( 3 ) Guides to Sanchi, Taxila, ( 4 ) Monuments of Ancient India ( केम्ब्रिज हिस्टरी ऑफ इंडियाचे पहिल्या खंडांत ), ( 5 ) Excavations at Taxila, ( 6 ) याशिवाय १९०९-३१ या काळांतील आर्किऑलॉजिकल रिपोर्ट्सचे संपादन ( डॉ. मो. गं. दीक्षित ).

**मालवीय, पं. मदनमोहन ब्रजनाथ**—( जन्म स. १८६१ डिसें. २५ ) आंतरराष्ट्रीय कीर्तीचे हिंदी पुढारी, बनारसच्या हिंदु विश्वविद्यालयाचे जनक व नमुनेदार सार्वजनिक कार्यकर्ते.

अलाहाबाद हें यांचें जन्मस्थान. जुन्या कर्मठ आचारविचाराच्या ब्राह्मण घराण्यांत यांचा जन्म झाला. अलाहाबादच्या धर्मज्ञानोपदेश पाठशाळा, गव्हर्नमेंट हायस्कूल व मूर सेंट्रल कॉलेजमध्यें आपलें शिक्षण संपवून हे बी. ए. झाले. यानंतर गव्हर्नमेंट हायस्कूलमध्यें कांहीं दिवस शिक्षकाचें काम केल्यानंतर यांनीं 'हिंदुस्थान' पत्राच्या संपादनास सुरुवात केली. यानंतरहि यांनीं वेळोवेळीं इंडियन युनियन, अभ्युदय ( हिंदी ), लीडर, हिंदुस्थान टाईम्स इत्यादि पत्रांच्या संपादकाचीं कामें केलीं.

मध्यंतरीं मि. ह्यूम यांच्या सूचनेवरून हे वकिलीची परीक्षा पास झाले व १८८६ च्या कलकत्ता काँग्रेसमध्यें यांनीं आपलें पहिलें राजकीय भाषण केलें. यानंतर यांनीं ह्यूम यांचे सूचनेवरून काँग्रेसचा प्रचार करण्यासाठीं सरहद्द प्रांतांत दौरा काढला. काँग्रेसच्या अलाहाबाद ( १८८८ ) अधिवेशनाचें सेक्रेटरीपद व लाहोर ( १९०९ ), दिल्ली ( १९१८-३२ ), कलकत्ता (१९३३) अधिवेशनांचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें. यांपैकीं १९३२-३३ चीं अधिवेशनें बेकायदा ठरविण्यांत येऊन यांना तेथें हजर राहण्यापूर्वीच अटक करण्यांत आली. १९३३ च्या अधिवेशनाचे वेळीं नेली सेनगुप्ता यांनीं यांचेसाठीं अध्यक्षाचें काम केलें.

१९०२ सालीं हे प्रथम प्रांतिक असेंब्लींत व १९१० सालीं हे प्रथम मध्यवर्ति असेंब्लींत निवडून गेले. आधीं अभ्यास करून विचारपूर्वक व्याख्यानें देण्याची प्रथा असेंब्लींत यांनीं सुरू केली व 'असेंब्लीडिबेट्स'चा दर्जा वाढविला. जालियनवाला बाग प्रकरणासंबंधीं हे स्वतः पंजाबांत गेले व स्वतः 'चक्षुर्वैसत्यं' पाहिलेल्या हकीगती यांनीं असेंब्लीच्या सभासदांना सादर केल्या.

'Punjab Disturbances' या नावानें यांनीं दिलेलें हें व्याख्यान किंवा Abolition of Indentured Labour' हें व्याख्यान त्या वेळीं अति गाजलें. आपल्या या मध्यवर्ति असेंब्लीच्या सभासदत्वाचा त्याग यांनीं रौलट कायद्याच्या निषेधार्थ केला ( १९१९ ). पुन्हां १९२४ सालीं हे तेथें निवडून गेले व इंपिरीयन प्रेफरन्स पॉलिसीचा निषेध करण्यासाठीं यांनीं पुनः राजीनामा दिला ( १९३० ).

सार्वजनिक आयुष्याच्या सुरवातीच्या क्षणापासून हिंदुस्थानचें व हिंदूंचे पुढारी ही यांची भूमिका असे. असहकाराचे हे सुरवातीपासूनच विरोधक होते. त्याच दृष्टीनें हे स्वराज्य पक्षांत गेले व पुढें केवळ कॉंग्रेसच्या जातिनिर्णयविषयक धोरणाला विरोध करण्याकरितां कॉंग्रेस पार्लमेंटरी बोर्डाच्या अध्यक्षपदाचा राजीनामा देऊन यांनीं आपल्या 'नॅशनलिस्ट' पक्षाची स्थापना केली ( १९३४ ). सरकारविरुद्ध बोलतांना यांचा हा पक्ष स्वराज्यपार्टीशीं सहकार्य करीत असला तरी हिंदु हिताचा प्रश्न येतांच हे कोणाचाहि मिंधेपणा स्वीकारीत नसत. विवाहवयोमर्यादा निश्चित करणाऱ्या हरविलास सारडा यांच्या 'सारडा बिलास' यांनीं धर्मांत ढवळाढवळ करणारें म्हणून विरोध केला. हिंदुमहासभेच्या संस्थापकांपैकीं हे एक असून त्या संस्थेच्या (१९२३), प्रयाग ( १९२४ ), पुणें ( १९३५ ) अधिवेशनांचे हे अध्यक्ष होते.

जुन्या श्रुतिस्मृतिप्रणीत विचारसरणींतून अस्पृश्यतानिवारण, शुद्धि, आचारपरिवर्तन यांना आधार काढण्यासाठीं यांनीं प्रयाग वगैरे ठिकाणीं भारतीय निवडक पंडितांच्या पंडित परिषदा भरविल्या. शेवटीं स्वतःच अस्पृश्यांना 'ॐनमः शिवाय' या मंत्रानें शैव धर्माची दीक्षा देऊन शुद्ध करून घेण्याचा शास्त्रार्थ लिहिला व तो व्यवहारांत आणण्याचा प्रयत्न केला. तसेंच राउंड टेबल कॉन्फरन्ससारखा महत्त्वाचा प्रसंग येतांच आपली समुद्रागमन निषेधाची कल्पना बाजूस सारून हे म. गांधींबरोबर इंग्लंडला गेले. मात्र परत येतांच यांनीं समुद्रगमनाबद्दल प्रायश्चित्त घेतलें. तसेंच असहकाराच्या जमान्यांत असहकाराचे हे तात्त्विक विरोधक असूनहि सरकारच्या दडपशाहीचा निषेध करण्यासाठीं वर्किंग कमेटीच्या इतर सभासदांवर हे मुंबईच्या रस्त्यावर रात्रीन् रात्री तिष्ठत राहिले व नंतरहि यांनीं लागोपाठ दोनदां तुरुंगवास स्वीकारला.

यांच्या या सर्व कार्यांतून यांच्या मनांतील दोन स्वतंत्र विचारप्रवाहांचें होणारें दर्शन जुन्या गोष्टींचें महत्त्व जाणणाऱ्या परंतु भविष्यकालीन घटनांचें प्राबल्य ओळखणाऱ्या द्रष्ट्याच्या स्वरूपाची आठवण करून देतें. केवळ याच कारणासाठीं धर्माच्या बाबतींत आग्रहाची कमाल मर्यादा गाठणारे हे गृहस्थ राजकारणाचा प्रश्न येतांच सुधारकांतील सुधारक बनतात.

यांच्या या नव्याजुन्या विचारप्रवाहांचें उत्कृष्ट मीलन यांच्या हिंदु विश्वविद्यालयाच्या योजनेंत दृष्टीस पडतें. हिंदु शास्त्रें, धर्म व संस्कृत भाषांचें शिक्षण देण्याच्या प्राचीन विद्यापीठाच्या कल्पनेला देशी उद्योगधंद्यांच्या वाढीसाठीं शास्त्रीय ज्ञानाच्या अध्ययनाची यांनीं जोड दिली व आपल्या काशी येथील हिंदुविश्वविद्यालयाचा अवाढव्य पसारा उभा केला ( पायाचा मुहूर्त वसंतपंचमी १९१६ फेब्रु. ४ ). तेथें प्रत्यक्ष काम १९१७ च्या जुलैंत सुरू झालें. त्यासाठीं यांनीं सुरवातीच्या केवळ चारपांच वर्षांत एक कोटीपेक्षां जास्त निधि जमविला व तेराशें एकरांच्या जागेंत निरनिराळ्या कार्यांसाठीं उपयोगिल्या जाणाऱ्या दीडशेंपेक्षां अधिक इमारतींतून विद्यापीठाचें काम सुरू केलें. विद्येच्या निरनिराळ्या तीस शाखांच्या अध्ययनाची येथें सोय असून इंडस्ट्रियल केमेस्ट्री, मायनिंग मेटॅलर्जी, मेकॅनिकल इलेक्ट्रिकल एंजिनियरिंग इत्यादींच्या विशेष शिक्षणाची सोय येथें करण्यांत आली. पुढें हिन्दीभाषेंत सर्व शिक्षण देण्यावर यांचा कटाक्ष असून त्या दृष्टीनें विश्वविद्यालयीन शिक्षणाला आवश्यक असणारे ग्रंथ हिंदींत तयार करण्याचें काम घनश्यामदास बिर्ला यांनीं त्याच कामाकरितां दिलेल्या पन्नास हजाराच्या निधींतून चालू आहे. हिंदु असल्याचा अभिमान कोणाहि हिंदु माणसाच्या मनांत उत्पन्न करण्याइतपत भव्यता व पावित्र्य यांच्या या कार्यांत आहे.

या संस्थेंत हिंदुस्थानांतील पहिल्या दर्जाचे पंडित गोळा करण्याच्या दृष्टीनें यांची कारकीर्द अति यशस्वी ठरली. मध्यंतरीं एस्. राधाकृष्णन् यांना लढाईमुळें इंग्लंडला जाणे अशक्य होतांच यांनीं उपकुलगुरु म्हणून त्यांची नेमणूक केली.

स्नानसंध्या, गीताभागवतादिकांचा नित्य व्यासंग, पापभीरु व शुचिर्भूत वृत्ति, कपाळीचा चंदनाचा ठसठशीत तिलक, पांढरा स्वच्छ पोषाख आणि देश नि धर्म यांबद्दल काम करण्याची तत्परता यांमुळें यांच्याबद्दल सर्वांना विलक्षण आदर वाटतो.

यांनीं स्वतंत्र ग्रंथ केला नसला तरी यांचीं त्या त्या

वेळचीं भाषणें हीं त्या त्या विषयांतील ग्रंथाच्या तोडीचीं आहेत. थोडासा पाल्हाळ पत्करूनहि त्या त्या विषयाची पूर्वपीठिका देऊन आपला विषय अद्ययावत् आधारांनीं सजवावयाचा आणि मोठ्या गोड भाषेंत भावनेलाहि आवाहन करावयाचें अशी यांच्या वक्तृत्वाची घडण असते. यांनीं आपल्या चारित्र्याला दिलेल्या नैतिक अधिष्ठानामुळें विरोधी पक्षालासुद्धां यांच्याबद्दल आदर दाखवावाच लागतो. तसेंच विरोध करीत असतांहि नवे विचार आत्मसात् करण्याची यांची शक्तिहि शाबूत आहे. कॉंग्रेस, हिंदुसभा वगैरेंत यांनीं आपल्या या शक्तीचा प्रत्यय दाखविला आहे. हृदयाचे मृदु, तत्त्वाचे खंबीर, धार्मिकतेची मूर्ति अशा यांच्या व्यक्तित्वामुळें म. गांधीपेक्षांहि यांच्याबद्दल लोकांत विशेष पूज्यभाव आढळतो.

यांनीं थकलेलें शरीर समर्थ करण्याकरितां आयुर्वेदांतील 'कायाकल्प' नांवाचा प्रयोग केला, त्यामुळें यांचे केस काळे झाले, पाठीचा पोक नाहींसा झाला व शरीर लालबुंद झालें; पण तो परिणाम अल्पकालीन ठरला.

**मावजी, पुरुषोत्तम विश्राम**—(जन्म स. १८७८—मृत्यु स. १९२९) इतिहास व कलाविषयक वस्तूंचे संग्राहक व अभ्यासक.

यांचा जन्म काठेवाडांत द्वारकेजवळ वरवाला गांवीं सधन भाटिया जातींत झाला. यांनीं मॅट्रिक झाल्यावर मि. जेम्स मॅकडोनल्ड या इंग्रज गृहस्थाजवळ घरींच अभ्यास केला आणि त्याचा परिणाम म्हणून इतिहास-संशोधन, कलाप्रेम आणि प्राचीन वस्तुसंग्रहाचा यांना नाद लागला. यांच्यावर स्व. गोवर्धनराम माधवराम त्रिपाठी व स्व. सर विठ्ठलदास दामोदर ठाकरसी या यांच्या जिवलग मित्रांचा विशेष परिणाम असे. यांचा पेशा व्यापाऱ्याचा. कापडाच्या गिरण्यांशीं यांचा विशेष संबंध असे. द्वारका सिमेंट फॅक्टरीचे हे मूळ संयोजक व संस्थापक. परदेशाशींहि व्यापारविषयक यांचा मोठा संबंध होता.

इतिहास, राजकारण, साहित्य, कला, पुराणवस्तु (Antiquities) व शिल्प हे यांचे आवडते विषय होते. त्यांत यांचें ज्ञानहि असाधारण असे. मुंबई रॉयल एशियाटिक सोसायटीचे हे एक प्रमुख सभासद होते. महाराष्ट्राच्या इतिहासाचे हे विशेष ज्ञाते होते. ऐतिहासिक लेख, वस्तुचित्रें वगैरे साहित्याचा यांचा संग्रह विपुल खर्च करून जमविलेला होता. अशा प्रकारचा संग्रह करणाऱ्या व्यक्तींत यांच्याइतपत भव्य, विपुल आणि गुणग्राहक दृष्टीनें संग्रह करणारा क्वचित्‌च आढळेल. त्यामुळें तो पाहण्यासहि पुष्कळच देशीपरदेशी लोक येत असत. या संग्रहाचा एक महत्त्वाचा भाग मुंबई, प्रिन्स ऑफ वेल्स म्युझियममध्यें ठेवला आहे व दुसरा भाग यांच्या मुलापाशीं आहे. याच कलाप्रेमामुळें मुंबईस यांनीं 'लक्ष्मी आर्ट प्रिंटिंग प्रेस' काढला आणि त्याद्वारा चित्रकलेच्या प्रसाराची व्यवस्था केली. या इलाख्यांत 'सुवर्णमाला' नांवाचें चित्रांचें नियतकालिक यांनींच काढलें व सचित्र पुस्तकें काढण्याची प्रथाहि यांच्यामुळेंच सुरू झाली. गुजराथी साहित्यपरिषदेंत यांनीं अनेक ऐतिहासिक साहित्याच्या स्वरूपाविषयीं लेख वाचले. अहमदाबादच्या सहाव्या गुजराथी साहित्य संमेलनाच्या वेळीं कलाप्रदर्शनाचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें होतें. यांच्या या औदार्यपूर्ण सेवेबद्दल बडोदेसरकारनें यांना 'राजरत्न' ही पदवी दिली होती.

यांचे ग्रंथ—१ रजपुतानांना देशी राज्यो, २ रणवीरसिंह, ३ प्रबोधभारत, १-२ भाग, ४ सुरसागरनी सुंदरी, ५ शिवाजीनो वाघनख, ६ मानवधर्ममाला, ७ संध्या अने मराठाराज्यनो सूर्यास्त, ८ रणयज्ञ याने पचीस वर्षनुं युद्ध, ९ नीतिवचन, १० वज्राघात अने विजयनगरनो विनाशकाल, ११ चार संन्यासी, १२ वतनपत्रें, निवाडपत्रें (मराठी), १३ कैफियत यादी, १४ नेटिव्ह अडमिनिस्ट्रेटिव जीनियस ऑफ नाईन्टीथ सेन्चरी (इंग्रजी), १५ व्हॉट लिटरेचर टू बुइ वॉन्ट (इंग्रजी), १६ शिवाजीनुं स्वराज्य, १७ धी इंडियन स्ट्रे थॉट्स सीरीज १, २, ३ (इंग्रजी).

**मावळंकर, गणेश वासुदेव**—(जन्म स. १८७७ नवं. २६) राष्ट्रसभेचे सुप्रसिद्ध कार्यकर्ते व मध्यवर्ति कायदेमंडळाचे अध्यक्ष.

यांचें घराणें सुमारें दोनशें वर्षांपूर्वी गुजराथेंत आलें. मूळचे हे रत्नागिरी जिल्ह्यांतील मावळंगे येथील. यांचा जन्म बडोद्यास अजोळीं झाला. यांचे वडील मुन्सफ म्हणून कोंकणांत असल्यानें यांचें इंग्रजी पांच इयत्तेपर्यंत शिक्षण तिकडेच झालें. पुढें यांनीं बी. ए., एलएल्. बी. होऊन अहमदाबाद येथें वकिलीस आरंभ केला (१९१३). मध्यंतरीं असहकाराचे चळवळींत १९२२-२३ मध्यें व १९२७ चे अतिवृष्टीचे वेळीं यांनीं वकिली सोडली

असली तरी १९३० पासून कमी करीत १९३७ साली यांनीं ती पूर्ण सोडली.

वकिलीबरोबरच सार्वजनिक संस्थांतहि यांनीं प्रवेश केला. अहमदाबादेंत अशी संस्था अगर चळवळ नाहीं कीं जिच्याशीं यांचा संबंध आलेला नाहीं. १९२१ च्या अहमदाबाद राष्ट्रसभेच्या मुख्य कार्यवाहाचें काम तर यांनीं चोख केलेंच, पण बैठक संपल्यावर चोवीस तासांचे आंत खजिनदारास हिशेबाचा ताळेबंद देऊन व सर्व हिशेब लवकरच प्रसिद्ध करून यांनीं मोठेंच उदाहरण घालून दिलें. अशा तत्पर व चोख व्यवहारामुळें अनेक संस्थांचे निधि यांच्याकडे सोंपविले जातात. अहमदाबादची नगरपालिका, मुंबई (१९३७) व दिल्ली कायदेमंडळ (१९४६) यांचें अध्यक्षपदहि बिनविरोध यांच्याकडे येण्याचें कारणसुद्धां यांचा चोख पण सर्वसंग्राहक व्यवहारच होय.

यांना राजकीय कारणांकरितां अनेक वेळां तुरुंगवास भोगावा लागला. यांनीं हिंदुस्थानांत व युरोपांत प्रवास केला आहे.

चारित्र्य हा सर्वांचा पाया आहे अशी यांची समजूत असून महाराष्ट्र व मराठी भाषा यांचा यांना अभिमान आहे. गुजराथी भाषेसंबंधीं अनेक संस्थांचे हे अध्यक्ष आहेत. त्याप्रमाणें धुळें सत्कार्योत्तेजक सभा, जांब समर्थ मंदिर वगैरेचे हे विश्वस्त आहेत. बृहन्महाराष्ट्रविषयक चळवळीचे हे पुरस्कर्ते आहेत.

ग्रंथ—गुजराथी–१ अहमदाबाद नगरपालिकेचें राष्ट्रीय जीवनांतील कार्य.

**मास्ति, वेंकटेश आयंगार**—( जन्म स. १८९२ सुमार ) कानडी भाषेचे सुप्रसिद्ध लेखक, कानडी भाषेंतील लघुकथालेखनाचे प्रवर्तक आणि कर्नाटक संस्कृतीचे जबरदस्त पुरस्कर्ते.

मास्ति हें यांच्या गावाचें नांव आहे. तेंच यांचें उपनांव बनलें. हे रामानुजपंथाचे वैष्णव आहेत, हें आयंगार या उपपदावरून ध्यानांत येतें. एम्. ए. झाल्यानंतर म्हैसूर सिव्हिल सर्व्हिसमध्यें हे शिरले. आपल्या कर्तबगारीनें हे एक्साइज कमिशनरच्या हुद्यापर्यंत चढले आणि सेवानिवृत्त झाले.

कर्नाटकांतील संस्कृति, भाषा, आचार व साहित्य यांचे हे कळकळीचे पुरस्कर्ते आहेत. ज्या वेळीं देशी भाषांत बोलणें व लिहिणें कमीपणाचें समजत होतें तेव्हां यांनीं कानडींत लिहिण्याविषयीं लोकांत अभिमान व विश्वास उत्पन्न केला. यांनीं विविध प्रकारचें लेखन केलें आहे. कानडींत लघुकथा लिहिण्याची प्रथा यांनीं सुरू केली असें मानतात. अनेक कानडी लेखकांना यांनीं आर्थिक साहाय्य केलें आहे. हिंदुस्थानाचा उत्कर्ष व्हावयाचा असल्यास हिंदुस्थानांतील प्रत्येक भाषेला पुढें आलें पाहिजे अशी यांची व्यापक दृष्टि आहे. श्रीकंठय्यांच्या नंतर कर्नाटक साहित्यपरिषदेचे हे उपाध्यक्ष आहेत.

यांचे कानडी ग्रंथ—१ लघुकथा १-६ भाग. त्यांत यांची सुब्बण्णा ही गोष्ट फारच लोकप्रिय व नमुनेदार समजण्यांत येते. नाटकें–२ शान्ता, ३ शिवछत्रपति वगैरे, टीकात्मक–४ विमर्श १-४ भाग, चरित्रें–५ वाल्मीकि, ६ रामकृष्ण परमहंस; सांस्कृतिक–७ कर्नाटकद जनतेय संस्कृति, इंग्रजी ग्रंथ–८ पाप्युलर कल्चर इन कर्नाटक, ९ रामायणावर समालोचनात्मक सुंदर निबंध ( सु. त. १९५ु ).

**मित्र, डॉ. राजेंद्रलाल जनमेजय**—( जन्म स. १८२४–मृत्यु स. १८९१ ) आंतरराष्ट्रीय कीर्तीचे बंगाली प्राच्यविद्यापंडित व संशोधक.

बंगालमधील सूर हें गांव यांचें जन्मस्थान. यांची जात कायस्थ. प्रथम वैद्यकी व नंतर वकिली शिक्षणाबाबत केलेले प्रयत्न अनेक कारणांनीं फिसकटल्यानंतर बंगालच्या रॉयल एशियॅटिक सोसायटीनें आपले लायब्रेरियम व असि. सेक्रेटरी म्हणून यांची नेमणूक केली (१८४६-५६). यानंतर 'वार्ड्स इन्स्टिट्यूट' या मुलांच्या वसतीगृहाचे यांना डायरेक्टर नेमण्यांत आलें. पुढें ती संस्था बंद झाल्यानंतर हे सेवानिवृत्त झाले (१८८०). 'हिंदु पेट्रियट' हें पत्र चालविण्यांत सोसाव्या लागणाऱ्या आर्थिक झळीमुळें अत्यंत निकृष्ट अवस्थेंत हे मरण पावले.

Antiquities of Orissa ( दोन खंड ) हा यांचा सर्वांत महत्त्वाचा ग्रंथ होय. रॉयल सोसायटी ऑफ आर्ट्सनें हिंदी कलाकौशल्याचे नमुने जमविण्यासाठीं दिलेल्या पैशांतून बंगाल सरकारनें ओरिसांतील भुवनेश्वराला यांच्या नेतृत्त्वाखालीं एक संशोधकांचें पथक पाठविलें व त्यांतून निष्पन्न झालेला इतिहास यांनीं या ग्रंथांत सादर केला. नकाशे, मोजमापें, फोटो, शिलालेखाच्या मूळ प्रति वगैरेंच्या साहाय्यानें यांनीं जितकी तंतोतंत माहिती मिळेल तितकी गोळा करण्याचा प्रयत्न केला आहे. ओरिसामधील विशेष महत्त्वाच्या ठिकाणीं

उपलब्ध झालेल्या ऐतिहासिक साधनांवरून यांनीं त्या प्रांताचा सुसंगत कलात्मक, धार्मिक व सामाजिक इतिहास सादर केला आहे. त्यांतहि त्या वेळीं रूढ असणाऱ्या निरनिराळ्या धार्मिक मतप्रणालींचे ओरिसा प्रांतांतील कलेवर झालेले यांनीं शोधून काढलेले परिणाम विशेष महत्त्वाचे आहेत.

यांच्या एकशें चवदा निबंधांच्या प्रसिद्ध झालेल्या संग्रहापैकीं 'The Representation of Foreigners in Ajantha Frescoes' हा निबंध विशेष महत्त्वाचा मानला जातो. अठराशें ते दोन हजार वर्षांपूर्वीच्या हिंदी जीवनाचें प्रतिबिंब अजिंठा लेण्यावर पडलें असून ग्रीक-कलेशीं त्याचा कोणत्याहि प्रकारचा संबंध नाहीं, असा सिद्धान्त यांनीं या निबंधांत मांडला. आपल्या 'रॉक-कट टेम्पल्स इन इंडिया' (१८४३) या ग्रंथांत अजिंठा लेण्यांतील ग्रीक परभृतत्वाची तरफदारी करणाऱ्या जेम्स फर्ग्युसन व हे यांमध्यें याबाबत फार जोराचा वादविवाद झाला.

Archeology in India, History of Indian and Eastern Architecture या आपल्या ग्रंथांत व इंडियन ॲन्टिक्वेरीमध्यें अनेक वेळां जेम्स फर्ग्युसन यांनीं यांच्या या म्हणण्याला विरोध करूनहि यांनीं आपलें म्हणणें मागें घेतलें नाहीं. 'ग्रीक लोकांचेकडून हिंदी लोक प्रथम दगड कोरण्याची कला शिकले.' या फर्ग्युसन यांचे म्हणण्याला यांनीं Indian Architecture या लेखांत व Buddha Gaya या आपल्या ग्रंथांत यांनीं नव्यानव्या मुद्द्यांनिशीं विरोध केला व Antiquities of Orissa या आपल्या पुस्तकांत त्याच लेखाचें पुनर्मुद्रण करून आपलें म्हणणें यांनीं इतर संशोधकांस मान्य करावयास लावलें. या वादविवादांत जेम्स फर्ग्युसन यांची यांना शिव्या देण्यापर्यंत मजल आली असतां यांनीं दाखवलेली शांत वृत्ति विशेष उल्लेखनीय आहे.

'Buddha-Gaya, the Hermitage of Sakyamuni' या ग्रंथासाठीं हे नेपाळ वगैरे प्रांतांत फिरले व नंतर यांनीं अनेक जुने बौद्ध ग्रंथ संपादून प्रसिद्ध केले. त्यांपैकीं 'ललित-विस्तार' हा ग्रंथ विशेष महत्त्वाचा असून 'प्राज्ञ-परनिथ' हा यांचा अपूर्ण ग्रंथहि असाच महत्त्वाचा आहे.

यांचे महत्त्वाचे ग्रंथ—( 1 ) Indo-Aryans ( दोन खंड, एकवीस संशोधनपर निबंधांचा संग्रह), ( 2 ) The Sanskrit Buddhist Literature of Nepal, ( 3 ) Antiquities of Orissa (1869, दोन खंड), ( 4 ) Buddha-Gaya, the Hermitage of Sakyamuni, ( 5 ) The Parsees of Bombay.

याशिवाय भांडारकरांच्या हस्तलिखितांच्या मालेंत व बंगाल रॉयल एशियाटिक सोसायटीच्या बिब्लिओथिका इंडिकासाठीं संपादलेले अनेक ग्रंथ.

यांचे महत्त्वाचे निबंध—( 1 ) Spirituous Drinks in Ancient India, ( 2 ) The Greek Art and Leprosy in India, ( 3 ) On some Græco-Bactrian-Relics from Rawalpindi (1862) इत्यादि.

यांचीं पत्रें—( १ ) विविधार्थसंग्रह (बंगाली मासिक १८५०-'५७), ( २ ) The Hindu Patriot.

**मिनेजीस, ब्रागांस सि. लुईजद्**—( जन्म स. १८७८–मृत्यु स. १९३८ जुलै १० ) पोर्तुगीज भाषेंतील निष्णात लेखक, वर्तमानपत्रकार व निर्भय पुढारी.

यांचा जन्म गोवा प्रान्तांत चांदर गांवीं ख्रिस्ती क्षत्रिय कुळांत झाला. हे गर्भश्रीमंत असल्यानें यांची राहणी भारदस्त व डौलदार असे. राजवाड्यासारखें घर, सुसज्ज ग्रंथालय आणि अद्ययावत् वाचन यांमुळें यांना आन्तरराष्ट्रीय प्रसिद्धि मिळाली होती. हे ख्रिस्ती धर्म पाळीत नसत. शिवाय आपल्या तिखट लेखणीनें त्यांतील अनेक दोष नि पोरकटपणा हे जाहीर करीत. हे 'उ एव्हाल्द'चे संस्थापक होते. नंतर यांनीं 'देबात' नांवाचें वर्तमानपत्र काढलें. गावड्यांच्या शुद्धीच्या वेळीं निघालेल्या 'प्रकाश' पत्रांत हे लिहीत. यांच्या क्रान्तिकारक लेखांमुळें तें प्रकाश पत्र सरकारला बंद करावें लागलें. सरकारशीं सहकार्य करणारे हे गृहस्थ पुढें सरकारविरोधी बनले. कोणताच विधि न करितां आपलें प्रेत गरिबांच्या जागेंत पुरण्यांत यावें अशी यांनीं इच्छा व्यक्त केली होती त्याप्रमाणें यांचें प्रेत पुरण्यांत आलें.

**मिर्झा, मुहम्मद इस्माइल**—( जन्म स. १८८३ आक्टो. २३ ) सुप्रसिद्ध राजकारणी मुत्सद्दी व म्हैसूर, जयपूर नि हैदराबाद राज्यांचे विख्यात दिवाण.

म्हैसूरच्या राजेसाहेबांबरोबर बंगलोरच्या वसलाइन मिशन हायस्कूल व सेंट्रल कॉलेजमध्यें कांहीं दिवस शिक्षण घेतल्यानंतर हे म्हैसूर संस्थानच्या नोकरींत दाखल झाले (१९०५). प्रथम यांचा हुद्दा जरी सुपरिंटेंडेन्ट ऑफ पोलीसचा असला तरी आपल्या कर्तबगारीनें हे

राजेसाहेबांचे असि. सेक्रेटरी, हुजुर सेक्रेटरी, प्रायव्हेट सेक्रेटरी ( १९२२ ), अशा पायऱ्या चढत जाऊन अखेर त्या संस्थानाचे दिवाण बनले ( १९२६-४१ ). द. हिंदुस्थानांत प्रमुख गणल्या जाणाऱ्या म्हैसूरसारख्या संस्थानांतील यांची ही दीर्घकालीन कारकीर्द यांच्या राजकारणी योजकतेची द्योतक आहे. एम्. विश्वेश्वरय्या, टी. माधवराव यांच्यासारख्या पहिल्या दर्जाच्या राजकारणतज्ज्ञांची परंपरा यांनीं व्यवस्थितपणें चालविली हें यांच्या या कार्याचें मुख्य स्वरूप आहे.

१९३० च्या राउंड टेबल कॉन्फरन्सला हे दक्षिण हिंदुस्थानांतील संस्थानचे प्रतिनिधि म्हणून तर दुसऱ्या राउंड टेबल कॉन्फरन्सला म्हैसूर, जोधपूर व जयपूर संस्थानचे प्रतिनिधि म्हणून हजर होते. या सभेच्या तिसऱ्या अधिवेशनच्या जॉइंट सिलेक्ट कमेटीलाहि हे हजर होते. या सभांतील कन्सल्टेटिव्ह कमेट्यांमधूनहि यांची नेमणूक झाली होती.

जावामधील बंदोएंग येथें भरलेल्या इंटर गव्हर्नमेंटल कॉन्फरन्स फार ईस्टर्न कंट्रीजला गेलेल्या हिंदी प्रतिनिधि मंडळाचे हे प्रमुख होते ( १९३७ ). अन्नामलाई, मद्रास, कलकत्ता, पाटणा व डाक्का येथील युनिव्हर्सिट्यांच्या पदवीदान समारंभाच्या अध्यक्षपदाचा लाभ यांना झाला आहे.

१९४२ सालापासून यांनीं आपल्या म्हैसूर संस्थानांतील नोकरीचा त्याग केला असून जयपूर संस्थानच्या मुख्य दिवाणाच्या जागीं काम केल्यावर यांना हैदराबाद संस्थानचें दिवाणपद प्राप्त झालें.

**मिश्र, प्रतापनारायण संकटाप्रसाद**—( जन्म स. १८५५–मृत्यु स. १८९४ ) हिन्दी भाषेंतील प्रसिद्ध लेखक व कवि.

जन्मस्थान कानपूर. कान्यकुब्ज ब्राह्मण. उर्दू, फारसी व संस्कृत या भाषा यांना चांगल्या येत. कविता व विशेषतः लावण्या करण्याचा व ऐकण्याचा यांना फार नाद असे. प्रख्यात लावणीबाज 'बनारसी' त्या वेळीं कानपुरांतच राहत असे. यांनीं ब्राह्मण मासिक स. १८८३ पासून दहा वर्षे चालविलें. १८८९ मध्यें हे कालाकंकरच्या हिन्दोस्थान पत्राचे सहसंपादक झाले. परंतु आपल्या स्वच्छंदी स्वभावानें हे तेथें फार दिवस राहूं शकले नाहीत. प्रेम एव परो धर्मः हा यांचा सिद्धान्त असे. हे नाटकांत आपलें काम फार खुबीनें व सुंदर करीत. हे राष्ट्रसभाभक्त होते. यांनीं भाषान्तरें व स्वतंत्र वीस अशीं बत्तीस पुस्तकें लिहिलीं.

नाटकें—१ कलिप्रभाव, २ हठी हमीर, ३ गोसङ्कट, ४ जुआरी-खुआरी, इतर—५ प्रेमपुष्पावली, ६ शृङ्गारविलास, ७ तृप्यन्ताम्, ८ भारतदुर्दशा, ९ प्रतापसंग्रह, १० मानसविनोद, ११ शिशुविज्ञान, १२ स्वास्थ्यरक्षा, १३ लोकोक्तिशतक इ.

**मिश्रबंधु-गणेशबिहारी**—( जन्म स. १८६५ ), **श्यामबिहारी**—( जन्म स. १८७४ ) व **शुकदेव**—( जन्म स. १८७९ ) मिश्रबंधु या नांवानें हिन्दी साहित्याची सेवा करणारे तिघे बंधु.

जात कान्यकुब्ज ब्राह्मण. यांचें घराणें पूर्वी पत्योजाचे द्विवेदी म्हणून ओळखलें जाई. पण यांचे पूर्वज पंडित राममिश्र यांच्या विद्वत्तेमुळें हे घराणें मिश्र या अधिक विद्वत्तादर्शक नांवानें ओळखलें जाऊं लागलें. यांचा बाल्यकाळ इटौंजा येथें गेला. हे बंधु अनेक खेळांत व धनुर्विद्या व अचूक नेम मारण्यांत कुशल आहेत. पहिले अनेक भाषाभिज्ञ व मोठे विद्यारसिक, दुसरे एम्. ए. होऊन को-ऑपरेटिव्ह सोसायट्यांचे डे. रजिस्ट्रार वगैरे हुद्यांचीं कामें करून सेवानिवृत्त झाले. तिसरे बी. ए. होऊन छत्रपूरचे दिवाण होते. हिन्दी नवरत्न या ग्रंथांत तुळशीदास, सूरदास, देव, बिहारी, भूषण वगैरे नऊ प्रसिद्ध कवींच्या काव्यांची समालोचना यांनीं केली आहे. अशा पद्धतीचा ग्रंथ हिन्दींत हा पहिलाच आहे.

मिश्र बंधुविनोदमध्यें चार हजार कवि व १२ हजारपेक्षां जास्त पुस्तकांचा उल्लेख आहे. या परिश्रमपूर्वक लिहिलेल्या ग्रंथानें यांचें नांव श्रेष्ठ ग्रंथकारांत मोडतें.

यांचें वाङ्मय विपुल असून कोणता भाग कोणीं लिहिला हें सांगतां येत नाहीं.

यांचें वाङ्मय—१ लवकुशचरित्र, २ हिन्दी नवरत्न, ३ मिश्रबंधुविनोद, ४ नेत्रोन्मीलन ( नाटक ), ५ पूर्वभारत ( नाटक ), ६ वीरमणि ( कादंबरी ), ७ हिन्दुइझम ( इंग्रजी ), ८ भारतवर्षका इतिहास, भारतविजय ( पद्य ) वगैरे.

**मिराबेन**—( जन्म स. १९०० सुमार ) गांधीवादाच्या परदेशी उपासक.

यांचें नांव मॅडेलाइन स्लेड. या एका ब्रिटिश ॲड्मिरलच्या कन्या. यांनीं इंग्लंडमधील आपलें ऐश्वर्याचें

जीवन सोडलें व मिराबेन हें नांव धारण करून म. गांधींच्या या अनन्य उपासक बनल्या. म. गांधींच्या अतिविश्वासांतील सहकाऱ्यांत यांची गणना होत असून गांधीजी तुरुंगांत गेले असतां त्यांच्या 'यंग इंडिया'चें संपादन या करीत (१९३०). राउंड टेबल कॉन्फरन्सच्या वेळींहि या गांधीजींच्या बरोबर इंग्लंडला गेल्या. मध्यंतरीं 'हिंदी प्रश्ना'ची पाश्चात्य जगाला ओळख करून देण्यासाठीं यांनीं इंग्लंड-अमेरिकेंत एक दौराहि काढला होता (१९३४-३५).

**मिंटो, लॉर्ड गिलबर्ट जॉन**—(जन्म स. १८४५-कारकीर्द स. १९०५ आगस्ट-१९१०) हिंदुस्थानचे व्हाइसरॉय.

केंब्रिज येथें शिक्षण घेऊन हे बी. ए. झाले. लॉर्ड कर्झननंतर हे व्हाइसरॉय म्हणून हिंदुस्थानांत आले. त्यापूर्वी कॅनडांत यांनीं तें काम केलें होतें.

बंगालच्या फाळणीमुळें देशांत अराजक चळवळ वाढली. त्याला तोंड देण्याकरितां यांनीं मुद्रणनियंत्रणाचा कायदा केला. लो. टिळकांसारखे लोक तुरुंगांत गेले. यांनीं मोर्लेमिंटो सुधारणा जाहीर करून कायदेमंडळाची वाढ, प्रातिनिधिकत्व, शिफारसवजा ठराव करण्याचा व उपप्रश्न विचारण्याचा अधिकार, कार्यकारी मंडळांत बिनसरकारी माणसांचा प्रवेश वगैरे गोष्टी केल्या. मात्र अल्पसंख्याकांना वेगळे प्रतिनिधि देऊन जातवारीच्या अराष्ट्रीय वृत्तीला उत्तेजन दिलें.

**मीर, अमीरअली सय्यद**—(जन्म स. १८७३-मृत्यु स. ? ) सुप्रसिद्ध हिन्दी कवि, लेखक व सार्वजनिक कार्यकर्ते.

जन्मस्थान सागर, मध्यप्रान्त. हे व्ह. फा. व ट्रेंड शिक्षक होऊन अंजुमेन इस्लामिया हायस्कूलमध्यें ड्राईंग शिक्षक म्हणून काम करीत. पुढें डोळयाच्या आजारामुळें देवरी गांवीं चुलत्याच्या दुकानाची व्यवस्था पाहूं लागले. तेथें समस्यापूर्ति करण्याकरितां कविता करीत. यांच्या कविता उत्तम होऊं लागल्या व यांच्या शिष्यपरंपरेंत उत्कृष्ट कवि निर्माण झाले. लक्ष्मी मासिक व जैनमित्र पत्राचे हे संपादक होते. प्लेगांत लोकांची सेवा व गोरक्षण हे यांचें आवडते विषय आहेत. हिन्दी राष्ट्रभाषा व्हावी असें यांचे मत असून तुळशीदासाचें रामायण हा ग्रंथ हे गृहजीवनाचा आदर्श मानतात. मध्यप्रान्तांतील उदयपूर संस्थानांत यांना मॅजिस्ट्रेट नेमण्यांत आलें. हिन्दी लेखनाबद्दल पदव्या व पारितोषिकें मिळून यांचा अनेकदां बहुमान झाला आहे. बूढे का ब्याह, नीतिदर्पणकी भाषाटीका, सदाचारी बालक वगैरे यांचीं पुस्तकें प्रसिद्ध आहेत.

**मुकर्जी, सर आशुतोष**—(जन्म स. १८६४ जून २९-मृत्यु स. १९२४ मे २५) कलकत्ता विश्वविद्यालयाचे निर्माते व बंगालमधील सुप्रसिद्ध कार्यकर्ते.

जन्मस्थान कलकत्ता. यांचें शिक्षण पूर्ण झाल्यावर गणितांतील संशोधनाचें कार्य यांनीं हातीं घेतलें. पण प्रतिकूल परिस्थितीमुळें यांना वकिलीचा धंदा करणें भाग पडलें. वयाच्या तिसाव्या वर्षी यांना डॉक्टर ऑफ लॉ पदवी मिळाली आणि चाळिसाव्या वर्षी हे कलकत्ता हायकोर्टाचे न्यायाधीश झाले. त्या जागेवर यांनीं वीस वर्षें काम केलें. त्याशिवाय कलकत्ता कार्पोरेशन, प्रान्तिक व मध्यवर्ति कायदेमंडळ यांतहि सभासद म्हणून यांनीं कामगिरी केली.

तथापि कलकत्ता विश्वविद्यालयांत यांनीं सतत तीस वर्षें केलेलें कार्य अत्यंत महत्त्वाचें आहे. यांच्या कर्तृत्वानें तिचें केवळ परीक्षा घेण्याचें रूप नाहींसें होऊन ती पूर्व हिंदुस्थानांतील प्रचंड शिक्षणसंस्था बनली. तिचें चालकत्वहि हिन्दी लोकांच्या हातांत राहिलें. पुस्तकी ज्ञानापेक्षां संशोधनाला महत्त्व देणें, ग्रंथालय, प्रयोगशाळा व इमारती तयार करणें, त्यांत उपकरणें व साहित्य आणून अभ्यासक, शिक्षक व शोधक निवडून त्यांना हाताशीं धरणें वगैरे सतत श्रमाचीं व हुषारीचीं कामें यांनीं मोठ्या यशस्वीपणें पार पाडलीं. सर्व हिंदुस्थानला भूषणभूत असणारी 'युनिव्हर्सिटी कॉलेज ऑफ सायन्स ॲन्ड टेक्नालजी' ही संस्था यांच्या या खटपटींतून निघाली. त्याकरितां यांनीं हिन्दी तरुण परदेशीं पाठविले आणि तिकडचे तज्ज्ञ इकडे आणून हुषार हिन्दी शिक्षक व विद्यार्थी यांशीं परिचय घडवून आणला.

१९२० मध्यें यांनीं आपल्या कलकत्ता युनिव्हर्सिटीमध्यें Anthropology Department उघडलें. हा विषय अभ्यासक्रमांत नेमून त्याचें अध्ययन व संशोधन करण्याकरतां अधिकृत चालना देण्याचें काम हिंदुस्थानांत यांनीं प्रथम केलें.

यांनीं बंगाली भाषेला माध्यम म्हणून माध्यमिक अभ्यासक्रमांत स्थान मिळवून दिलें व उच्च अभ्यासक्रमांत स्थान उत्पन्न होईल अशी व्यवस्था केली. सर्व

देश स्वतंत्र व वरचढ बुद्धीचा व्हावा आणि शिक्षण सार्वत्रिक व्हावें असा यांचा प्रयत्न असे. स्वतंत्र नव्या संस्था निर्माण करून चालविण्याची आणि यांच्याजवळ जाणाऱ्या माणसांतील कर्तृत्वशक्ति जागृत करण्याची यांच्यांत विलक्षण शक्ति होती.

**मुकर्जी, श्यामाप्रसाद**—( जन्म स. १९०१ जुलै ) बंगालमधील सुप्रसिद्ध हिंदुसभा कार्यकर्ते व शिक्षणतज्ज्ञ.

कलकत्ता युनिव्हर्सिटीचे संवर्धक आशुतोष मुकर्जी यांचे हे चिरंजीव. कलकत्त्याच्या प्रेसिडेन्सी कॉलेजांतून एम्. ए. झाल्यानंतर हे इंग्लंडहून बॅरिस्टर होऊन परत आले ( १९२७ ). बंगालमधील प्रमुख कायदेपंडितांत यांची गणना होते.

बंगाल लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत निवडून येऊन यांनीं सार्वजनिक कार्यांत भाग घेण्यास सुरुवात केली व कलकत्ता युनिव्हर्सिटीचे व्हा. चॅन्सेलर ( १९३४-३८ ), अर्थमंत्री ( १९४१-४२ ) इत्यादि ठिकाणीं यांनीं केलेल्या कार्यांनीं सार्वजनिक पुढारीपणाची माळ यांच्या सहजच गळ्यांत पडली. १९४६ च्या असेंब्लीच्या निवडणुकींत तर हे बिनविरोध निवडून आले. हिंदी घटना-समितीवर यांची राष्ट्रसभेतर्फे निवडणूक झाली.

अशा तऱ्हेनें कॉंग्रेसच्या राजकारणांत सहज सामावूं शकणाऱ्या या माणसानें हिंदुसभेचें कार्य स्वीकारण्यांत फार मोठा त्याग केला आहे. समाजांतील मान, मान्यता, पुढारीपण प्रत्यक्ष डोळ्यांसमोर दिसत असतांना हिंदु-हिताकडे लक्ष देऊन हिंदुसभेच्या पुढारीपणाचें यांनीं स्वीकारलेलें असिधाराव्रत निःसंशय अभिनंदनीय आहे. १९४३ मध्यें भरलेल्या हिंदुसभेच्या बंगालच्या अधिवेशनाचें व रॉयल एशियॅटिक सोसायटीचें अध्यक्षस्थानहि यांना देण्यांत आलें.

**मुकर्जी, सर राजेन्द्रनाथ**—( जन्म स. १८५४-मृत्यु स. १९३६ मे १५ ) बंगाल्यांतील औद्योगिक क्षेत्रांतील प्रसिद्ध गृहस्थ.

याना कलकत्त्याच्या प्रेसिडेन्सी कॉलेजांतील एंजिनियरिंग क्लासमधून शिक्षण सोडावें लागलें. एक वर्ष शिक्षकाची नोकरी केल्यावर यांनीं कलकत्ता कार्पोरेशन-मधील वॉटरवर्क्सचें कॉंट्रॅक्ट घेतलें आणि यशस्वी होत 'मेसर्स मुकर्जी ॲन्ड को' या नांवानें बंगालच्या बाहेर संयुक्त प्रान्तांत यांनीं कामें घेतलीं. नंतर यांनीं सर ॲक्विन मार्टिन हे कलकत्त्यास आले असतां त्यांच्या सहकार्यानें धंदा सुरू केला. हिंदुस्थानच्या बहुतेक भागांत यांच्या धंद्याचा पसारा वाढला असून सर मार्टिनच्या मृत्यूनंतर हे कंपनीचे मुख्य झाले. पुढें बर्न कंपनी यांनीं आपल्यांत मिळवून घेतल्यानंतर पूर्वभागांतील मोठ्या लोकांत यांचा समावेश झाला. सरकारनें यांना सर ही पदवी दिली, व अनेक महत्त्वाच्या कमेट्यांवर यांना नेमलें. हिन्दी चलन व जमाबंदीवरील रॉयल कमिशनचे हे सभासद होते. भारतीय एंजिनियर्स असोसिएशनच्या व इंडियन सायन्स कॉंग्रेसच्या अध्यक्षपदाचा मान यांना देण्यांत आला होता ( १९२२ ). अगदीं अकिंचन स्थितींतून जागतिक महत्त्व मिळविणारे हे गृहस्थ होत.

**मुकर्जी, डॉ. राधाकुमुद गोपालचंद्र**—( जन्म स. १८८९ नवं. ) हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास व संस्कृति यांचे सुप्रसिद्ध अभ्यासक, लेखक व वक्ते.

ब्रह्मपूर ( बंगाल ) येथें आपलें प्राथमिक शिक्षण संपवून हे उच्च शिक्षणाकरितां कलकत्त्याच्या प्रेसिडेन्सी कॉलेजमध्यें दाखल झाले. अत्यंत उज्वल तऱ्हेनें कॉलेज-मधील सर्व अभ्यासक्रम संपवून हे एम्. ए., पीएच्. डी. झाले ( १९०१-१५ ). मध्यंतरीं परीक्षा देऊन कलकत्ता युनिव्हर्सिटीची ७००० रु. किंमतीची 'प्रेमचंद रायचंद' शिष्यवृत्ति मिळवण्याचा विक्रमहि यांनीं केला (१९०५).

प्राचीन इतिहासाच्या यांच्या गाढ्या अध्ययनामुळें रिपन कॉलेज व बिशप कॉलेज कलकत्ता ( १९०३ ), नॅशनल कौन्सिल ऑफ एज्युकेशन व बंगाल नॅशनल कॉलेज ( १९०६ ), बनारस हिंदु युनिव्हर्सिटी (१९१६) व लखनौ युनिव्हर्सिटींत यांना प्राध्यापक होण्याचा मान मिळाला. बंगाल लेजिस्लेटिव्ह असेंब्लींतहि हे अनेक वर्षे सभासद होते.

यांच्या या विद्वत्तेच्या सन्मानार्थ बडोदा सरकारनें यांना ७००० रुपयांचें सयाजीराव गायकवाड पारितोषिक इतिहासशिरोमणि या पदवीनिशीं बहाल केलें.

यांचे ग्रंथ—( 1 ) A History of Indian Shipping and Maritime Activity from the Earliest Times ( १९१२, ब्रिजेंद्रनाथ सील यांचे प्रस्तावनेसह ), ( 2 ) The Fundamental Unity of India ( From Hindu Sources, 1914 ), ( 3 ) Local Government in Ancient India, ( 4 ) Nationalism in Hindu Culture ( Asian Library Series ), ( 5 ) Men and Thought in

Ancient India, ( 6 ) Harsha ( कलकत्ता युनिव्हर्सिटीमधील व्याख्यानें ), ( 7 ) Ashok ( गायकवाड व्याख्यानें ), ( 8 ) Hindu Civilization, ( 9 ) Ancient Indian Education, ( 10 ) Early Indian Art, ( 11 ) Asokan Inscriptions, ( 12 ) Chandragupta Maurya and His Time ( मद्रास युनिव्हर्सिटींतील सर विल्यम मेयर व्याख्यानें ), ( 13 ) India's Land System : Ancient, Mediæval and Modern ( बंगाल सरकार व बंगाल लँड रेव्हेन्यु फ्लौड कमिशनच्या रिपोर्टचा दुसरा भाग म्हणून प्रसिद्ध ), ( 14 ) A New Approach to the Communal Problem, ( 15 ) Gupta Empire.

यांचे चहाते व विद्यार्थी यांनीं Bharat Kaumudi या नांवाचा एक ऐतिहासिक लेखसंग्रह यांना अर्पण केला ( १९४५ ).

**मुकर्जी, ज्ञानेन्द्रनाथ**—( जन्म स. १८९५ सुमार ) सुप्रसिद्ध रसायनशास्त्रज्ञ व संशोधक.

यांचे डॉ. जे. सी. घोष वगैरे सहाध्यायी होत. यांचें संशोधनसुद्धां आचार्य प्रफुल्लचंद्र रे यांच्या देखरेखीखालींच सुरू झालें. स. १९१९ मध्यें यांनीं इंग्लंडास प्रयाण केलें व पदवी मिळविली. तेथून आल्यावर यांनीं कलकत्ता विश्वविद्यालयांत कलिलाचार्याची जागा स्वीकारली. 'इंडियन केमिकल सोसायटी' स्थापण्याच्या कल्पनेचे हेच प्रवर्तक होत. कलकत्त्याला आल्यापासून यांचें कलिलरसायनांतील संशोधन चालू असून सत्यप्रसाद रायचौधरी, सरोजकुमार दासगुप्त, आशुतोष चतर्जी इत्यादि विद्यार्थी यांचेबरोबर सहकार्य करीत आहेत.

हिंदुस्थानांत कलिलरसायनांत संशोधन करण्याचा उपक्रम अगदीं प्रथम स. १९१५ मध्यें यांनीं केला. तेव्हांपासून आजपर्यंत यांनीं याच एका विषयास आपणांस वाहून घेतलें आहे. कलिलाचें विद्युत्संश्लेषण हा यांचा पहिला लेख. त्यानंतर डॉ. पाया कान्स्टनटीनो यांबरोबर यांनीं स्मोलुहास्कीच्या सिद्धान्ताची प्रायोगिक सत्यता आजमावून पाहिली. या विषयांतील अत्यंत महत्त्वाचें यांचें कार्य म्हणजे कलिलाणूचा संभार मोजण्याच्या पद्धतींत यांनीं केलेली सुधारणा हें होय.

**मुजुमदार, अंबिकाचरण**—( जन्म स. १८५१–मृत्यु स. १९२२ ) सुप्रसिद्ध वक्ते व राष्ट्रसभेचे अध्यक्ष.

हे एम्. ए., एलएल्. बी. होते. स. १९१६ सालीं लखनौ काँग्रेसचे हे अध्यक्ष होते. यांची वक्तृत्वाची भरारी असामान्य होती. इंडियन नॅशनल इव्होल्यूशन या सुंदर व सुप्रसिद्ध पुस्तकाचे हे कर्ते होत. पट्टाभी व अॅनी बेझंट यांच्या पुस्तकांपूर्वी प्रसिद्ध झालेल्या यांच्या या पुस्तकाचें विशेष महत्त्व आहे.

**मुजुमदार, सरदार-गंगाधरराव नारायणराव ऊर्फ आबासाहेब**—(जन्म स. १८८६ फेब्रु. १) पुण्यांतील सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक, संगीतशास्त्रज्ञ व सार्वजनिक कार्यकर्ते.

यांच्या घराण्याचें मूळ उपनाम प्रभुणे. पण श्रीशाहू महाराजांच्या वेळेपासून यांच्या घराण्याकडे मजमू म्हणजे जमाबंदीचें काम असल्यानें हें घराणें मुजुमदार या नांवानें प्रसिद्ध आहे. यांचें मूळ नांव श्रीधर पांडुरंग प्रभुणे, पण दत्तक आल्यानें यांना वरील नांव प्राप्त झालें. रामशास्त्री प्रभुणे यांचें घराणें वासिष्ठगोत्री होतें. यांचें घराणें अगस्त्य ( प्रवर अगस्ति, दार्ढच्युत, इध्मवाह ) गोत्री आहे. मात्र दोन्ही घराणीं दे. ऋ. आश्वलायनच. डेक्कन कॉलेजांतून यांचें शिक्षण सुटल्यावर निरनिराळ्या क्षेत्रांतील सुमारें १०८ सार्वजनिक संस्थांशीं यांचा अध्यक्ष, उपाध्यक्ष, विश्वस्त, कार्यवाह वगैरे नात्यांनीं संबंध आला. डेक्कन सरदार व इनामदार मतदार संघातर्फे मुंबई कायदेमंडळांत हे दोनदां निवडून आले ( १९२३ व १९२६ ). तसेंच दिल्लीच्या कायदेमंडळांतहि याच वर्गातर्फे हे बिनविरोध निवडून गेले ( १९३१-३४ ). तेथील अनुभवामुळें आणि सूक्ष्म अभ्यास करण्याच्या संवयीमुळें वतन, इनाम, सरंजाम वगैरे जमीनसत्ता-प्रकाराच्या बाबतींत हे तज्ज्ञ समजले जातात.

हे प्रथम दक्षिणेंतील दुसऱ्या वर्गाचे सरदार होते. पण पुढें यांना पहिल्या वर्गाचे करण्यांत आलें (१९२८) व अत्यंत बहुमानाची सी. आय. ई. ही पदवीहि प्राप्त झाली ( १९३५ ).

पुण्याच्या भारत-इतिहास-संशोधक मंडळाचे हे १९४६ पर्यंत २४ वर्षे सतत चिटणीस म्हणून काम करीत आहेत. त्या संस्थेच्या सर्वांगीण वाढींत यांच्या सारख्या सर्वांच्या विश्वासास पात्र असणाऱ्या व्यक्तीच फार मोठा वांटा आहे. त्याकरितां यांनीं फारसी भाषेचाहि व्यासंग केला.

तंतु वाद्यवादनादि कला व संगीतशास्त्राचाहि यांचा व्यासंग चौरस असून गवई लोकांच्या घराण्यांतील जुन्या हिंदी चीजा संग्रहीत करण्याचें प्रचंड काम यांनीं केलें आहे. यांच्या या कामाला चीजांचा सटीप ज्ञानकोश म्हणणें यथार्थ होईल. यांच्यासारखा निरपेक्षपणें लोकसेवेचें व्रत अखंड चालविणारा गृहस्थ विरळा.

**मुजुमदार, दत्तात्रेय चिंतामण**—( जन्म स. १८८२ आक्टो. १३ ) व्यायामाचे सुप्रसिद्ध प्रवारक व व्यायामकोशाचे कर्ते.

यांचा जन्म पुणें येथें झाला. हे बडोदें येथील दरखदार घराण्यांतील होत. चित्पावन ब्राह्मण. मूळ उपनांव करंदीकर. पुण्याचे प्रसिद्ध लोकहितवादी यांचे मातामह होत. हे बडोदें कॉलेजांतून बी. ए. एलएल्. बी. झाले. कॉलेजांत असतांच हे नारायणगुरु देवधर यांचे मल्लविद्येंतील शिष्य बनले आणि त्यांच्या नांवची तालीम व चिंतामण हौद बांधून यांनीं तो लोकांच्या उपयोगाकरितां दिला.

१९०८ सालीं हे बडोदें राज्यांत मुन्सफ म्हणून दाखल झाले. १९१३ सालीं यांना सहा महिने बडोदेसरकारनें युरोपांतील लोकस्थिति पाहण्याकरितां धाडलें. १९१५ सालीं यांनीं मराठी व गुजराथी व्यायाम मासिक सुरू केलें. १९२७ सालीं हिन्दी व इंग्रजी भाषांतून त्याची सुरुवात केली; पण इंग्रजी मासिक आश्रयाभावीं बंद करावें लागलें. व्यायाममाला, व्यायामचरित्रसंग्रह वगैरेसारखीं ५० पेक्षां अधिक पुस्तकें यांनीं प्रसिद्ध केलीं आहेत. १९३१ सालीं असिस्टंट अकाउंटन्ट जनरलच्या जागेवरून हे सेवानिवृत्त झाले.

१९३५ सालीं यांनीं व्यायामज्ञानकोश प्रसिद्ध करण्याची प्रचंड योजना हातीं घेतली आणि त्याप्रमाणें प्रत्येकीं चारशें-पांचशें पृष्ठांचे व आठशें-नऊशें चित्रांचे आठ खंड यांनीं प्रसिद्ध केले. शिवाय विदेशी शर्यती व मेहनती दोन खंड प्रसिद्ध करण्याचा यांचा संकल्प आहे. मराठीप्रमाणें गुजराथी व हिन्दी खंड काढावयाचें यांनीं ठरविलें असून गुजराथीचे दोन व हिन्दीचा एक खंड प्रसिद्ध झाला आहे. इंग्रजींत देशी व्यायामाचा एक खंड काढावयाचा आहे.

या यांच्या प्रचंड कार्यामुळें यांना अखिल महाराष्ट्र शारीरिक शिक्षण परिषद पुणें ( १९२५ ) व उज्जयनी ( १९३६ ) अशा दोन ठिकाणीं अध्यक्षपद देण्यांत आलें. यांच्या वयाला साठ वर्षें झालीं तेव्हां यांचा महाराष्ट्रांत सर्वत्र हीरकमहोत्सव साजरा करण्यांत आला. व्यायामप्रसाराच्या कार्याकरितां श्रीरामविजय छापखाना, व श्रीराम प्रोसेस वर्क्स यांनीं सुरू केला. यांचे श्वशुर प्रसिद्ध मल्लविद्याविशारद कै. सर गंगाधरराव पटवर्धन राजे संस्थान मिरज यांचें यांना या कामीं चांगलें साहाय्य होतें. तसेंच यांचे दत्तक पुत्र नारायणराव व पत्नी सौ. लक्ष्मीबाई यांचेंहि यांना सहकार्य असतें.

**मुजुमदार, नानी गोपाळ**—( जन्म स. १८९७– मृत्यु स. १९३५ ) सुप्रसिद्ध पुरातत्त्वसंशोधक व शिल्पकलाभिज्ञ.

प्रथम शिलालेखांचे अभ्यासक म्हणून हे पुढें आले व मोहेन-जो-दडो संस्कृतीच्या शोधानंतर शेंकडो मैल प्रवास करून यांनीं त्या संस्कृतीशीं संलग्न असणारीं अनेक स्थळें शोधून काढलीं. अमरी येथील उत्खननांत यांना मोहेन-जो-दडोच्याहि पूर्वीचे ( ३५०० ख्रिस्तपूर्व सुमार ) कांहीं अवशेष सांपडले. यांनीं केलेलें मातीच्या भांड्यांचें वर्गीकरण प्रमाणभूत मानलें जातें. दादू येथें उत्खनन करीत असतां हूरांच्या टोळीकडून हे मारले गेले.

कलकत्त्याच्या इंडियन म्यूझियमचे क्युरेटर असतां प्राचीन शिल्पकलांचें अध्ययन करून यांनीं त्यांच्या अनेक मार्गदर्शिका लिहिल्या. पुरातत्त्व खात्याचे हे अनेक वर्षे सुपरिंटेंडेंटहि होते.

यांचे ग्रंथ—( 1 ) Inscriptions from Bengal ( ३ खंड ), ( 2 ) Guides to Early Inscriptions in the Indian Museum ( २ खंड ), ( 3 ) Explorations in Sind.

**मुजुमदार, शंकर बापूजी**—( जन्म स. १८६२– मृत्यु स. १९३८ नवं. २८ ) किर्लोस्कर नाटक मंडळींतील प्रारंभीचे प्रसिद्ध नट, त्या मंडळाचे दीर्घकाल व्यवस्थापक व मराठी लेखक.

यांचा जन्म पुणें येथें झाला. जात दे. ऋ. ब्राह्मण. यांचें शिक्षण पुणें न्यू इंग्लिश स्कूलमध्यें झालें. हे अण्णासाहेब किर्लोस्करांच्या वेळीं अगदीं पहिल्या खेळापासून त्या मंडळींत स्त्रीभूमिका करणारे म्हणून दाखल झाले. पुण्यांतील पहिल्या शाकुन्तलाच्या प्रयोगांत यांनीं शकुन्तलेची भूमिका केली होती. सौभद्रांतील रुक्मिणीची भूमिका हे उत्कृष्ट करीत. यांना गायन येत नसे.

पुढें हे त्या मंडळींचे व्यवस्थापक म्हणून अखेरपर्यंत (१८९३-१९२४) काम करीत होते. यांनीं अण्णासाहेबांच्या स्मरणार्थ पुण्याचें किर्लोस्कर नाटक गृह बांधलें. यांनीं मंडळींत भारदस्त व खानदानी स्वरूप कायम ठेवून नव्यानव्या गुणी लोकांचा संग्रह करण्याचा प्रयत्न शेवटपर्यंत केला. बालगंधर्व वगैरेंनीं मंडळी सोडल्यावर हिन्दी व उर्दू नाटकें बसवून किर्लोस्कर मंडळीला यांनीं हिंदुस्थानभर हिंडवून आणलें. पण शेवटीं यांच्या हयातींतच ती मंडळी बंद झाली. यांनीं रेनाल्ड्सच्या कांहीं कादंबऱ्यांचें मराठींत भाषान्तर केलें. अण्णासाहेब किर्लोस्कर, ग्यारिक व भाऊराव कोल्हटकर यांचीं स्वतंत्र चरित्रें लिहिलीं. रंगभूमि हें मासिक बारा वर्षं चालविलें (१९०५-१७) व नट, नाटककार व नाट्य यांसंबंधीं विपुल वाङ्मय प्रसिद्ध केलें.

**मुदलियार, सर ए. रामस्वामी**—(जन्म स. १८८७) व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळाचे उपाध्यक्ष.

मद्रास ख्रिश्चन कॉलेज व लॉ कॉलेजांत आपलें शिक्षण संपवून यांनीं मद्रास हायकोर्टांत ॲडव्होकेट म्हणून नांव दाखल केलें. याच सुमारास हे मद्रासच्या लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत निवडून आले (१९२०-२६) आणि कौन्सिल ऑफ स्टेट (१९३०), इंडियन लेजिस्लेटिव्ह असेंब्ली (१९३१-३४), राउंड टेबल कॉन्फरन्स येथें यांनीं केलेल्या कार्यांनीं हिंदुस्थान सरकारच्या पूर्ण विश्वासाचा लाभ यांना झाला. यानंतर कोणत्याहि जबाबदारीच्या जागेवर हिंदी माणसाची नेमणूक करावयाची सरकारवर पाळी येतांच यांची नेमणूक होऊं लागली.

राउंड टेबल कॉन्फरन्सच्या फेडरल स्ट्रक्चर कमेटी, इंडियन फ्रॅन्चाइज़ कमेटी, इंडियन रिझर्व बँक कमेटी, स्पेशल टेक्स्टाइल टॅरिफ बोर्ड, इंडिया कौन्सिल, इकॉनमिक कमेटी, लीग ऑफ नेशन्स, इंपीरियल इकॉनमिक कमेटी अशा असंख्य ठिकाणीं यांनीं सभासदाचीं कामें केली. टोरंटो येथें भरलेल्या ब्रि. कॉमनवेल्थ रिलेशन्स कॉन्फरन्सला गेलेल्या हिंदी शिष्टमंडळाचे यांना पुढारी व ब्रुसेल्स नाइन पॉवर कॉन्फरन्सचे यांना हिंदी प्रतिनिधि निवडण्यांत आलें. इंपीरियल वॉर कबिनेट व पॅसिफिक वॉर कौन्सिलमध्यें हिंदुस्थानसरकारचे प्रतिनिधि म्हणून यांची युद्धकालांत नेमणूक झाली.

१९३९ सालीं यांना प्रथमच व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळाच्या व्यापारखात्याचे मंत्रि नेमण्यांत आलें. त्यानंतर १९४३ सालीं पुरवठा मंत्रि व नंतर त्या मंडळाचे उपाध्यक्ष म्हणूनहि यांची नेमणूक झाली. यु. एन्. ओ.च्या प्रिपरेटरी कमिशनवरहि यांची हिंदी प्रतिनिधि म्हणून नेमणूक झाली आहे.

सान्फ्रान्सिस्को परिषदेंत हिंदुस्थानसरकारचे प्रतिनिधि म्हणून यांची नेमणूक झाली होती. तेथें यांनीं अनेक कमिट्यांवर सभासद व अध्यक्ष म्हणून उत्कृष्ट कामगिरी केली.

युद्धकालांत यांनीं केलेल्या कामगिरीबद्दल ऑक्सफर्ड विश्वविद्यालयानें 'डॉक्टर ऑफ सिव्हिल लॉ' ही पदवी देऊन यांचा गौरव केला. हिंदुस्थानांत आल्यानंतर यांनीं व्हाइसरॉयच्या एक्झिक्युटिव कौन्सिलमध्यें काम करण्यास सुरुवात केली. सर अर्देसर दलाल यांनीं युद्धोत्तर पुनर्घटना खात्याचा राजीनामा दिल्यानंतर तें काम यांच्याकडे आलें (जाने. १९४६).

**मुधोळकर, रंगनाथ नरसिंह**—(जन्म स. १८५७–मृत्यु स. १९२१) वऱ्हाडमधील सुप्रसिद्ध पुढारी व राष्ट्रसभेचे अध्यक्ष.

यांचें शिक्षण मुंबईस झालें आणि हे वकिली उमरावतीस करीत. त्या वेळच्या अत्यंत कष्टाळु राष्ट्रसभाभक्तांत यांची बरोबरी कोणीच करूं शकणार नाहीं. अलाहाबादच्या (१८८८) अधिवेशनांत यांनीं पोलीस खात्याच्या सुधारणासंबंधीच्या ठरावावर भाषण केलें होतें. मधल्या काळांत शेतकऱ्याची कर्जमुक्तता व विशेषतः औद्योगिक शिक्षण या विषयांचा यांचा विशेष अभ्यास असे. १९१२ च्या बांकीपूर राष्ट्रसभेचे हे अध्यक्ष होते. त्या वेळीं हे नेमस्तांपैकीं प्रमुख समजले जात. यांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत 'सामाजिक प्रगतीशिवाय राजकीयच काय पण नैतिक व आध्यात्मिक पुनरुज्जीवनहि होणार नाहीं' असा संदेश दिला.

**मुनशी, कन्हैय्यालाल माणेकलाल**—(जन्म स. १८८७ डिसें. २९) गुजराथी भाषेंतील सुप्रसिद्ध साहित्तिक व सार्वजनिक कार्यकर्ते.

जन्मस्थान भडोच. जात भार्गव ब्राह्मण. यांचें घराणें सरकारी नोकरींत मोठ्या हुद्यावर कामें केलेलें हुषार व मुत्सद्दी म्हणून प्रसिद्ध आहे. यांनींहि बी. ए. एलएल. बी. ॲडव्होकेट होऊन वकिलीबरोबर इतरहि अनेक कार्यांत भाग घेण्यास सुरुवात केली. 'पाटणनी प्रभुता' ही ऐतिहासिक कादंबरी लिहून यांनीं गुजराथच्या गौरवाबद्दल लोकांत एक विशेष प्रकारची भावना निर्माण

केली. यांतील व विशेषतः यानंतरच्या 'गुजरातनो नाथ' मधील मुंजालचें पात्र रंगविण्यांत यांनीं अत्यंत कुशलता प्रगट केली आहे. तेव्हांपासून गुजराथींमधील उत्कृष्ट कादंबरीकार असा लौकिक यांना लाभला. यानंतर यांनीं कितीतरी कादंबऱ्या, कथा व नाटकें लिहिलीं आणि तीं सरस वठलीं आहेत. गुजरातच्या अस्मितेचे हे जबरदस्त पुरस्कर्ते आहेत.

याशिवाय 'नवजीवन अने सत्य' मासिक, 'यंग इंडिया' साप्ताहिक, ज्ञाति वार्षिक 'गुजराथी' पत्र, 'वीसमी सदी' मासिक वगैरेमुळें यांची विशेष प्रसिद्धि झाली असून गुजराथी साहित्यांत यांना अढळ पद प्राप्त झालें आहे. गुजराथी साहित्य परिषदेंत यांना प्रमुख स्थान प्राप्त झालें. त्याप्रमाणें जुने रिवाज तोडून जैन ज्ञातीच्या लीलावतीबाईच्या बरोबर पुनर्विवाह करून कर्त्या सुधारकांत यांनीं आपलें नांव दाखल केलें. लीलावतीबाईचा पहिला विवाह वयाच्या चौदाव्या वर्षी एका अतिप्रौढ लालभाई भिकमलाल नांवाच्या विधुराबरोबर झाला होता. त्याहि गुजराथी लेखक आहेत.

बारडोलीच्या व सत्याग्रहाच्या चळवळींत भाग घेऊन यांनीं अनेक वेळां तुरुंगवास पत्करला. १९३७ सालीं हे निवडून येऊन मुंबई प्रान्तांतील गृहमंत्रि होते. १९४२ च्या लढ्यांत मात्र यांनीं भाग घेतला नाहीं. बाहेर राहून यांनीं अखंड हिंदुस्थानविषयक कामगिरी केली. मुंबईचे भारतीभवन यांच्याच परिश्रमानें उदयास येत आहे. यांचें वक्तृत्व परिणामकारक असतें. यांचा 'गुजरात अॅण्ड इटस् लिटरेचर' हा ग्रंथ गुजराथी वाङ्मयाचा इंग्रजींतून परिचय करून घेण्याचें उत्तम साधन होय.

यांचें गुजराथी वाङ्मय—कादंबऱ्या-( १ ) पृथ्वीवल्लभ, ( २ ) पाटणनी प्रभुता, ( ३ ) गुजरातनो नाथ, ( ४ ) राजाधिराज, ( ५ ) भगवान् कौटिल्य, ( ६ ) वेरनी वसुलात, ( ७ ) स्वप्नद्रष्टा, ( ८ ) कोनो वांक, ( ९ ) मारी कमला, ( १० ) अने बीजी वातो, ( ११ ) लोपामुद्रा ( ४ भाग ).

पौराणिक नाटकें—( १ ) पुरंदरपराजय, ( २ ) अविभक्त आत्मा, ( ३ ) काकानी शशी, ( ४ ) ध्रुवस्वामिनी देवी.

सामाजिक नाटकें—( १ ) वव शेंठनु स्वातंत्र्य, ( २ ) बे खराब जान, ( ३ ) अग्नांकित, ( ४ ) ब्रह्मचर्याश्रम, ( ५ ) आदिवचनो.

इंग्रजी ग्रंथ—( 1 ) Gujeratha and its Literature, (2) I Follow the Mahatma, (3) Akhand Bharat, ( 4 ) Glory that was Gurjer Desh, ( 5 ) Imperial Gurjeras, ( 6 ) Indian Deadlock इत्यादि.

**मुल्ला, नेक ना. सर दिनशा फारदुनजी—** ( जन्म स. १८६८ एप्रिल ) जगप्रसिद्ध कायदेपंडित व ग्रंथकार.

यांचा जन्म व शिक्षण मुंबई येथें झालें. मुंबई विश्वविद्यालयाचे माजी फेलो, ट्रायब्युनल ऑफ अपील बाँबे या संस्थेचे अध्यक्ष, मुंबई हायकोर्टाचे न्यायमूर्ति (१९१९-१९२१ ), व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळांतील कायदेमंत्रि, प्रिव्ही कौन्सिलांतील न्यायमूर्ति वगैरे महत्त्वाच्या जागा यांनीं भूषित केल्या. अनेक कायद्यांवर यांनीं महत्त्वाचे ग्रंथ लिहिले आहेत. यांचे कायद्याचे ग्रंथ वाचल्याशिवाय कायद्याचें ज्ञान कधींहि सांगोपांग होऊं शकणार नाहीं. १९३१ सालीं मुंबई विद्यापीठानें यांना एल्एल्. डी. ही पदवी दिली.

**मुहम्मद, डॉ. सय्यद—**( जन्म स. १८८९ ) बिहारमधील सुप्रसिद्ध कॉंग्रेस कार्यकर्ते.

अलिगड, केम्ब्रिज व जर्मनी येथें आपलें शिक्षण संपवून हे बॅरिस्टर व पीएच्. डी. ( जर्मनी ) झाले. यानंतर यांनीं कॉंग्रेसच्या राजकारणांत भाग घेण्यास सुरुवात केली व यांना ऑल इंडिया कॉंग्रेस कमेटीचे सेक्रेटरी नेमण्यांत आलें ( १९२३, १९३०-३६ ). वर्किंग कमेटीचेहि हे अनेक वर्षे सभासद होते.

परंतु यापेक्षांहि सार्वत्रिक शिक्षणाचा प्रचार करणारे एक शिक्षणतज्ज्ञ या नात्यानें यांची योग्यता विशेष मानण्यांत येते. कॉंग्रेसच्या अधिकारस्वीकारानंतर यांनीं शिक्षणमंत्रि या नात्यानें बिहारमध्यें सुरू केलेली प्राथमिक शिक्षण योजना सुप्रसिद्ध आहे ( १९३७-३९, ४६ ).

यांचे ग्रंथ--( 1 ) Khilafat and England, ( 2 ) A Plan of Provincial Reconstruction.

**मुहम्मदअली—**(जन्म स.१८७१–मृत्यु स.१९३१) प्रसिद्ध मुसलमान पुढारी, इंग्रजी भाषेंतील वक्ते आणि राजकारणी मुत्सद्दी.

हे मूळचे मुरादाबादचे राहणारे. यांचे वडील अबदुल-

अलीखान हे दोन वर्षांचे असतांच वारले. यांचे बंधु शौकतअली. हे बंधु एकमतानें वागत व अलीबंधु या नांवानें प्रसिद्ध असत. हे अलीगढ युनिव्हर्सिटीच्या परीक्षा देऊन इंग्लंडला गेले आणि आय्. सी. एस.मध्यें अनुत्तीर्ण होऊन परत आले (१९०२). बडोदें सरकारांत नोकरी पत्करिली. तेथून कलकत्त्यास जाऊन यांनीं कॉम्रेड नांवाचें इंग्रजी साप्ताहिक सुरू केलें. हिंदुस्थान सरकारची राजधानी कलकत्त्याहून दिल्लीस जातांच यांनीं आपली संपादकीय कचेरी दिल्लीस हलविली. तेथें पुढें 'हमदर्द' हें उर्दू पत्र सुरू केलें.

१९०६ मध्यें स्थापन झालेल्या मुस्लीमलीगच्या प्रमुख संस्थापकांत यांची गणना होते. हक्कसंरक्षण हा जरी प्रथम उद्देश होता तरी १९१३ सालीं त्यांत स्वराज्य दाखल करण्यांत आलें.

कानपूर म्युनिसिपालिटीनें तेथील मशिदीचा रस्त्यांत येणारा भाग पाडण्याचें ठरवितांच यांनीं अशी खळबळ उडवून दिली कीं तेथें प्रत्यक्ष व्हाइसरॉयला यावें लागलें व यांना अनुकूल निकाल द्यावा लागला. लोकांशीं समरस होण्याची आणि सरकारशीं तंडत बसण्याच्या वृत्तीनें यांना विलक्षण लोकप्रियता प्राप्त होई. बाल्कन युद्धाच्या वेळीं यांनीं तुर्कांना प्रत्यक्ष मदत केली होती. पहिल्या महायुद्धाच्या वेळीं तुर्कस्थान व इंग्लंड यांचें युद्ध सुरू होतांच लंडन टाइम्सनें तुर्कस्थानची बदनामी सुरू करतांच यांनीं आपल्या कॉम्रेडमधून तुर्कांचेवर झालेल्या अन्यायांची लांबलचक यादी प्रसिद्ध करून सणसणीत उत्तरें सुरू करतांच प्रथम जामीन मागून नंतर यांना स्थानबद्ध करण्यांत आलें. १९१७ मध्यें माफी मागण्याची सूचना यांनीं नाकारली. पुढें १९१९ मध्यें यांची सुटका झाली.

महायुद्धांत मुख्य प्रधान लॉइड जॉर्ज यांच्या आश्वासनावरून हिंदी मुसलमानांनीं आपल्या जातभाईविरुद्ध हत्यार चालविलें. पण युद्ध संपतांच मेसापोटेमिया, अरबस्थान, सिरिया व पॅलेस्टाइन हे प्रदेश मुसलमानी पवित्र क्षेत्रांसह खलिफाच्या ताब्यांत देण्याऐवजीं दोस्तांनीं आपसांत वांटून घेतले. या वचनभंगामुळें अमृतसर येथें जमून खिलाफत चळवळ सुरू करण्यांत आली.

पण त्याचा कांहीं उपयोग न होतां शिष्टमंडळास तिकडे जाण्यास पासपोर्ट नाकारण्यांत आला. तेव्हां हे इंग्लंडला गेले. तिकडे मुस्लीम आउटलुक हें इंग्रजी व एको-डी-इस्लाम हें फ्रेंच पत्र पॅरिसमध्यें यांनीं सुरू केलें. पण सर्वत्र निराशा पदरांत आली. हिंदुस्थानांत आल्यावर यांनीं हिंदुमुसलमानांच्या ऐक्यावर जोर देऊन त्यामुळें सर्व प्रश्न सुटतील असें हे प्रतिपादन करूं लागले व यांनीं म. गांधींशीं सहकार्य करून असहकारांत पुढाकार घेतला. अलीगढ युनिव्हर्सिटी नॅशनल मुस्लीम युनिव्हर्सिटी करण्याचा प्रयत्न करून तिचे हे प्रिंसिपल झाले. पण चळवळीचें क्षेत्र विस्तृत होत चाललें. यांचे भाषणावर अत्याचारप्रवर्तक असा शेरा बसून म. गांधींनीं यांच्याकडून माफी मागविली. पण लवकरच राजद्रोह व सैन्य फितवणें या आरोपांवरून यांना कराचीं येथें दोन वर्षांची शिक्षा झाली. १९२३ सालीं सुटून आल्यावर दिल्लीच्या विशेष अधिवेशनाचे प्रसंगीं यांनीं कौन्सिल प्रवेशावर जोर दिला. कोकोनाडा राष्ट्रसभेचे यांना अध्यक्ष करण्यांत आलें (१९२३). या वेळेपासून हे जातिवादाकडे झुकले.

भरसभेंत अतुलनीय धैर्यानें उत्तर देण्याची यांची हातोटी हिंदवी इतिहासांत केव्हांहि चिरस्मरणीय राहील. "Are you going to murder them" (English people) या ॲनी बेझंट यांनीं विचारलेल्या प्रश्नाला "No, madam, I am going to kill them in the open streets of Calcutta," हें आज आपणांस नुसतें वाचावयास भयप्रद वाटणारें उत्तर अर्ध्या शतकापूर्वी देणें ही सामान्य धैर्याची गोष्ट आहे काय ?

हे पहिल्या गोलमेज परिषदेला लंडन येथें हजर होते. तेथेंच यांचें देहावसान झालें. शेवटीं यांच्या इच्छेप्रमाणें यांचें दफन जेरुसलेम येथें करण्यांत आलें.

**मुळे, कृष्णराव गणेश**—(जन्म स. १८६३–मृत्यु स. १९४४) प्रसिद्ध बीनकार व संगीतसंशोधक.

यांचे गुरु ग्वाल्हेरचे कै. गणपतराव कृष्ण आपटे हे होत. त्यांच्याजवळ सुमारें अठरा वर्षे यांनीं गायन व बीन यांचें अध्ययन केलें. त्यांच्याशिवाय बंदेअलीचा बीन व चुन्ना व रहिमतखा इत्यादींचीं भरपूर गाणीं ऐकिलीं. त्यामुळें प्रतिपादनाप्रमाणें हे गाऊंहि शकत.

३२ वर्षेपर्यंत यांनीं माधवजी धरमसी मिलमध्यें सुपरिंटेंडेंटची नोकरी केली. कै. देवल, क्लेमेंट, बर्वे, आचरेकर यांच्यासारख्या विद्वान् पुरुषांच्या सहवासानें यांच्या अभ्यासाला उत्तेजन मिळालें व संशोधनाकडे यांचें लक्ष वेधलें. एकट्या भरताच्या नाट्यशास्त्रांतील संगीतावरील अध्यायांचें (२८, २९, ३०) यांनीं वीस

वर्षे अध्ययन केलें. वैदिक सामगायनाचाहि अभ्यास करून त्यांचा आतांच्या गायनाशीं कसा संबंध पोंचतो हें यांनीं निश्चित केलें व अनेक गूढ गोष्टींवर नवा प्रकाश उत्पन्न केला. ही सर्व माहिती यांनीं आपल्या ' भारतीय संगीत ' या ग्रंथांत मांडली आहे.

**मुंजे, डॉ. बाळकृष्ण शिवराम**—( जन्म स. १८७२ एप्रिल ) सुप्रसिद्ध राजकारणी मुत्सद्दी व हिंदुमहासभेचे कार्यकर्ते.

यांचें शिक्षण विलासपूर, रायपूर, नागपूर व मुंबई येथें होऊन हे एल्. एम्. ॲन्ड एस्. झाले. यांनीं मुंबई, कार्पोरेशनमध्यें प्लेग अधिकारी म्हणून कांहीं दिवस नोकरी केल्यावर हे बोअर युद्धाच्या वेळीं डॉक्टर म्हणून दक्षिण आफ्रिकेंत गेले. तिकडे दरबान येथें हे म. गांधी यांचे कांहीं दिवस पाहुणे होते. तिकडची कामगिरी यांनीं चांगल्या प्रकारें संपविली आणि हे नागपूर येथें डॉक्टरी करूं लागले ( १९०१ जाने. ). तेथें डोळ्यांवर शस्त्रक्रिया करणारे कुशल डॉक्टर म्हणून यांची ख्याति असे. स्मिथ ऑपरेशन या नांवानें प्रसिद्ध असणारी मोती बिन्दूच्या ऑपरेशनची नवी रीत यांनीं शोधून काढली.

सुरत राष्ट्रसभेच्या वेळेपासून हे राजकारणांत भाग घेऊं लागले आणि लो. टिळकांच्या पक्षांत सामील झाले. असहकारितेची चळवळ सुरू झाल्यानंतर स्वराज्यपक्षातर्फे नागपूर कायदेमंडळांत हे निवडून गेले. नागपूर कायदेमंडळांतील स्वराज्यपक्षानें केलेल्या यशस्वी अडवणुकीत यांच्या कर्तृत्वाचा व मुत्सद्दीपणाचा फार मोठा भाग होता. पुढें हे मध्यवर्ति कायदेमंडळांत निवडून गेले ( १९२६ ) आणि तेथें सरकारच्या लष्करी खात्याचे टीकाकार म्हणून यांनीं नांव कमाविलें. म. गांधींच्या दांडीयात्रेच्या वेळीं यांनीं मध्यवर्ति कायदेमंडळाचा राजीनामा दिला ( १९३० ) आणि हे वऱ्हाडांतील जंगल सत्याग्रहांत सामील झाले. तेव्हां यांना दोनदां शिक्षा झाल्या. नंतर हिंदुमहासभेचे प्रतिनिधि म्हणून गोलमेज परिषदेवर यांची नेमणूक झाली. येथें डॉ. आंबेडकर यांनीं मुसलमानांप्रमाणें स्वतंत्र मतदारसंघाचा हट्ट धरला असतां यांनीं रा. ब. एम्. सी. राजा यांच्याबरोबर थोडे अधिक प्रतिनिधि देऊं करून संयुक्त मतदारसंघाच्या पायावर राजा-मुंजे करार घडवून आणला. तीच गोष्ट पुढें म. गांधींना येरवडा तुरुंगांत उपवास करून घडवून आणावी लागली.

हे हिंदुमहासभेतर्फे डेप्युटेशन घेऊन जॉइंट पार्लमेंटरी कमेटीपुढें साक्ष देण्यास इंग्लंडला गेले ( १९३३ ).

हे लष्करी शिक्षणाचे पुरस्कर्ते असून त्याशिवाय देशाला तरणोपाय नाहीं अशी यांची खात्री आहे. त्या दृष्टीनें यांनीं नागपूर येथें प्रान्तिक रायफल असोसिएशन काढली आणि सेंट्रल हिंदु मिलिटरी सोसायटी काढून तिच्यातर्फे नाशिक भोसला मिलिटरी स्कूल सुरू केलें.

**मूलर, फ्रेडरिक मॅक्स**—( जन्म स. १८२३ डिसें. ६-मृत्यु स. १९०० ऑक्टो. २८ ) जगप्रसिद्ध वेदाभ्यासक, सायणभाष्ययुक्त ऋग्वेदाच्या चिकित्सक प्रतीचे संपादक व भाषाशास्त्रज्ञ.

जर्मन भाषेंतील सुप्रसिद्ध कवि विल्हेम मूलर यांचे हे पुत्र. लिपझिक युनिव्हर्सिटीचे बी. ए. झाल्यानंतर यांनीं बर्लिननंतर पॅरिस युनिव्हर्सिटींत बर्नाफ, बॉप, स्केलिंग इत्यादि विख्यात पंडितांजवळ संस्कृत भाषेचा विशेष अभ्यास केला व हे ऑक्सफर्डला आले (१८४८). तेथें प्रथम युरोपीय भाषांचे व नंतर तौलनिक भाषाशास्त्राचे प्राध्यापक म्हणून काम केल्यावर हे सेवानिवृत्त झाले. ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटींत संस्कृत भाषेचे प्राध्यापक होण्याची यांची इच्छा मात्र अपूर्णच राहिली.

तौलनिक भाषाशास्त्राचें अध्ययन करीत असतां संस्कृत भाषेचें विशेष महत्त्व यांच्या ध्यानीं आलें. अनेक प्रकारच्या क्रान्त्यांत संस्कृतचें भारतीय महत्त्व कायमच राहिलें याचें यांना कौतुक वाटलें व वेदांच्या अध्ययनानंतर तर हे संस्कृतचे अभिमानी बनले.

तौलनिक धर्मशास्त्राच्या अध्ययनांतहि वैदिक धर्माचें श्रेष्ठत्व यांच्या ध्यानांत आलें. निरनिराळ्या धर्मांचा अभ्यास करीत असतां राष्ट्राच्या जीवनांत एकरूप झालेला दुसरा धर्म यांना आढळला नाहीं. विवाहापासून प्रत्येक गोष्ट वेदाला धरून करण्याची पद्धत यांना अगदीं नवी वाटली. भक्त, पंडित व भिकारी या सर्वांच्या जीवनावर सारख्याच प्रकारें दिसणारी वैदिक धर्माची छाप यांना नमुनेदार आढळली. देव न्यायाधीश आणि मनुष्य गुन्हेगार या ख्रिस्ती कल्पनेपेक्षां प्रत्येकाला कर्मानुसार गति मिळते, ईश्वरालासुद्धां त्यांत बदल करितां येत नाहीं हा वैदिक सिद्धान्त यांना नमुनेदार वाटला.

यामुळें हिंदुस्थान, तेथील लोक व संस्कृति यांबद्दल यांच्या मनांत अत्यंत आपलेपणा उत्पन्न झाला. तिकडे भेटणाऱ्या हिन्दी लोकांची हे मनापासून वास्तपूस्त करीत. इतकेंच नव्हे तर हिंदुस्थानांत पुनर्जन्म घेण्याची कल्पनाहि हे अनेक वेळेला बोलून दाखवीत. लो. टिळकांसारख्या वैदिक पंडिताला राजद्रोहाच्या आरोपावरून शिक्षा झाली तेव्हां यांनीं त्यांच्या शिक्षेची मुदत भरण्यापूर्वी त्यांना सोडविण्याच्या कामांत पुढाकार घेतला. स्वामी विवेकानंदांनीं यांच्या हिंदुस्थानच्या प्रेमाबद्दलच्या आठवणी लिहिल्या असून प्राचीन ऋषिमुनींची आठवण करून देणारें यांचें व्यक्तित्व असल्याची कबूली दिली आहे. त्यांनींच पुरविलेल्या माहितीचा उपयोग करून यांनीं Ramakrishna, his Life and Sayings हा आपला सुप्रसिद्ध ग्रंथ लिहिला.

यांचें कामहि मोठें पद्धतशीर असे. ऋग्वेदाची आवृत्ति काढण्यापूर्वी यांनीं ऋक्प्रातिशाख्याचा सूक्ष्म अभ्यास करून त्याचें जर्मन भाषेंत भाषान्तर केलें आणि त्याची भरपूर चिकित्सा केली. ऋग्वेदाची सायणभाष्यासह चिकित्सक आवृत्ति काढण्याकरितां यांनीं अत्यंत मेहनत घेतली व त्या प्रतीवर 'ऋग्वेदसंहिता-शार्मण्यदेशोत्पन्नेनेग्लण्ड देश निवासिना मोक्षमूलरभट्टेन संशोधिता गोतीर्थाभिधाने नगरे' असें संस्कृतमध्यें लिहिलें. यांतील शार्मण्य = जर्मन, स्वतःच्या नांवाला लावलेलें भट्ट व ऑक्सफर्ड = गोतीर्थ हें ध्यानांत घेण्यासारखें आहे.

ऋग्वेद प्रकाशनाकरितां यांनीं ईस्ट इंडिया कंपनी व विजयनगरचे महाराज यांच्याकडून आर्थिक साहाय्य मिळविलें होतें. यांच्या वेळेपर्यंत जर्मनींत जर्मन भाषेंत वेदादि वाङ्मयाचा पुष्कळ पद्धतशीर अभ्यास झाला होता. त्यामुळें आणि यांच्या लोकप्रिय इंग्रजी भाषेमुळें यांच्याकडे जगाचें लक्ष वेधलें व वेदादि वाङ्मयाची जगाला गोडी लावण्याचा मान यांना मिळाला.

यांचे ग्रंथ—भाषाशास्त्र-( 1 ) The Science of Language, ( 2 ) Last Essays ( पहिला खंड ), ( 3 ) The Silesian Horseherd ( भाषा व विचार यांचे संबंध ) इत्यादि.

धर्मशास्त्र-( 1 ) Origin and Growth of Religion, ( 2 ) Introduction to the Science of Religion, ( 3 ) Natural Religion, ( 4 ) Physical Religion, ( 5 ) Anthropological Religion, ( 6 ) Psychological Religion इत्यादि.

हिंदुस्थानसंबंधीं-( 1 ) History of Ancient Sanskrit Literature, ( 2 ) India, What can she teach us, ( 3 ) Three Lectures on Vedanta, ( 4 ) The Six Systems of Indian Philosophy इत्यादि.

इतर-( 1 ) My Autobiography, (2) Deutsche Liebe ( जर्मन प्रेम, आत्मचरित्रपर ), ( 3 ) Chips from a German Workshop, ( 4 ) Auld Lang Syne ( तीन खंड ), (5) The Science of Thought, ( 6 ) The Science of Mythology इत्यादि.

संपादन-Sacred Books of the East (५१ खंड).

**मेघाणी, झवेरचंद कालीदास**—( जन्म स. १८९७ ) गुजराथेंतील लोकप्रिय साहित्यसेवक, कवि व लोक वाङ्मयाचे उद्धारक.

हे जातीनें दशा श्रीमाली वाणी असून धर्मानें जैन आहेत. हे बी. ए. झाल्यावर कलकत्त्यास अल्युमिनियमच्या कारखान्यांत कामास लागले. पण स्वभावाला प्रतिकूल असणारें तें काम सोडून हे काठेवाडांत पुनः परत आले. तेथें अमृतलालशेठनीं यांना सौराष्ट्र कार्यालयांत कामास घेऊन यांना साहित्यक्षेत्रांत दाखल केलें. यांनीं आपल्या लेखनकौशल्यानें तेथें आपलें स्वतंत्र स्थान उत्पन्न केलें. गुजराथेंतील लोकसाहित्य, लोकगीतें व लोकवार्ता संकलित करून प्रसिद्ध करण्याच्या बाबतींत यांनीं फार मोलाची कामगिरी केली आहे. यांनीं हें साहित्य केवळ प्रसिद्ध केलें नाहीं तर तें लोकप्रियहि केलें. त्याबद्दल रणजीतरामस्मारक समितीनें यांना सुवर्णपदक अर्पण केलें. याशिवाय यांचें गद्य व पद्य लेखन अत्यंत स्फूर्तिपद असतें. यांच्या 'सिंधुडा' ग्रंथानें तर अनेकांना स्फूर्ति दिली. हे आपल्या कविता अत्यंत लोकप्रिय पद्धतीनें म्हणतात. यांचें लेखन विपुल असून यांच्या वाङ्मयावर जुन्या चारणी वाङ्मयाची छाप आहे. यांची सोहिनी मेहेर ही प्रेमकथा उत्कृष्ट मानिली जाते. ती अत्यंत लोकप्रिय आहे. त्यामुळें तिच्या अनेक आवृत्त्या निघाल्या.

**मेनका**—( जन्म स. ? ) सुप्रसिद्ध नृत्यविशारद.

यांचें नांव लीला सोखे. मुंबईच्या हॉफ्कीन्स इन्स्टिट्यूटचे डायरेक्टर कर्नल एस्. एम्. सोखे, आय्. एम्. एस्. यांच्या या पत्नी. यांचा पिता बंगाल्यांतील

ब्राह्मण जमिनदार पी. एल्. राय. यांचें शिक्षण इंग्लंड-मध्यें झालें. तेथें या फिडलवादक म्हणून प्रसिद्ध होत्या. उत्तर हिंदुस्थानांतील दासी आतम व दक्षिणेंतील कथाकली या दोनहि प्रकारच्या नृत्यांचा यांनीं सूक्ष्म अभ्यास केला आहे. हिन्दी नृत्यांतील ताल, शरीराची हालचाल व चेहऱ्यावरील भाव व्यक्त करण्याचें महत्त्व या पूर्णपणें ओळखतात. यांनीं पुष्कळ नृत्यांतील हावभाव अमरावती वगैरे ठिकाणच्या शिल्पांतून घेतले आहेत. यांचें 'उषा' नृत्य बर्लिनच्या आन्तरराष्ट्रीय चढाओढींत पहिल्या प्रतीचें ठरलें (१९३६). त्याबद्दल यांना जगांतील पहिल्या क्रमाचें पारितोषिक मिळालें. जगांतील सतरा देशांतील लोकांत यांना व यांच्यापैकीं रामनारायण व गौरीशंकर यांना पहिलीं तीन बक्षिसें मिळालीं.

यांच्या मंडळींत सुमारें अठरा लोक असत. प्रवासांत यांचा खर्च वीस हजार रुपये व एरवीं चार हजार रुपये दरमहा असे. युरोपांत नृत्यमंडळी घेऊन जाणारी ही पहिली हिन्दी स्त्री होय. १९३६ सालीं या दोन वर्षें युरोपभर हिंडल्या.

विश्वामित्रमेनका, कृष्णलीला, लक्ष्मीजन्म, विरह-विलाप, उषादेवविजय, अजिंठादर्शन, नागकन्या, भक्ति-भाव, देवविजय वगैरे यांचीं नृत्यें प्रमुख होत.

मुंबईची 'नृत्यालयम्' ही संस्था यांच्या नेतृत्वा-खालीं चालते.

**मेहेता, नंदशंकर तुळजाशंकर**—(जन्म स. १८३५–मृत्यु स. १९०५) गुजराथी भाषेंतील कादंबरी वाङ्मयाचे जनक.

जन्मस्थान सुरत. जात नागर ब्राह्मण. यांचें गुजराथी व इंग्रजी शिक्षण झाल्यावर हे कारकून, शिक्षक, मुख्य शिक्षक, ट्रेनिंग कॉलेजचे प्रिंसिपल अशा क्रमानें चढत गेले. पुढें यांची मुल्की खात्यांत बदली झाली (१८६७). तेथेंहि असिस्टंट पोलिटिकल एजन्ट, अडमिनिस्ट्रेटर व शेवटीं कच्छचे हे दिवाण झाले. तथापि हे मास्तरसाहेब या नांवानें साहित्यिकांत प्रसिद्ध होते.

यांनीं गुजराथी भाषेंत 'करण घेलो' ही एकच कादंबरी लिहिली. पण ती अत्यंत लोकप्रिय झाली. घटना व रसपरिपोष या दृष्टीनें ती चांगली साधली आहे. शिवाय गुजराथींतील ही पहिलीच कादंबरी होय. तिच्या गुजराथींत अनेक आवृत्त्या निघाल्या व मराठी वगैरे भाषांत तिचीं भाषान्तरेंहि झालीं.

बडोदा व बिकानेर येथील सुप्रसिद्ध दिवाण सर मनुभाई मेहेता व युक्तप्रान्ताचे शिक्षणमंत्री, माजी विनायकराय मेहेता, आय. सी. एस., हे यांचे पुत्र होत.

**मेहेता, सर मनुभाई नन्दशंकर**—(जन्म स. १८६८ जुलै २२) सुप्रसिद्ध राजकारणी मुत्सद्दी व दिवाण.

यांचें शिक्षण मुंबईस झालें. हे एम्. ए. एलएल्. बी. आहेत. जात नागर ब्राह्मण. बडोदें कॉलेजांत प्रथम प्राध्यापकाचें काम केलें. नंतर बडोदें सरकारच्या नोकरींत शिरून शेवटीं मुख्य प्रधान झाले (१९१६-२७). तिन्ही गोलमेजपरिषदांचे हे सभासद होते (१९३०, १९३१, १९३२). नंतर हे जयपूर व बिकानेर राज्यांचे मुख्य प्रधान झाले.

यांचे ग्रंथ—इंग्रजी–ॲनल्स ऑफ नेटिव्ह स्टेटस् ऑफ इंडिया.

गुजराथी–प्रिंसिपल्स ऑफ दि लॉ ऑफ एव्हिडन्स.

**मेहेता, सर फेरोजशहा मेरबानजी**—(जन्म स. १८४५ आगस्ट ४–मृत्यु स. १९१५ नवं. ५) मुंबईचे सिंह या नांवानें प्रसिद्ध असणारे, बाणेदार हिन्दी पुढारी व राष्ट्रसभेचे अध्यक्ष.

यांचा जन्म व शिक्षण श्रीमंतींत झालें. हे एम्. ए. झाले (१८६४) आणि बॅरिस्टर होण्याकरितां इंग्लंडला गेले. तेथें जमशेदजी टाटा, बद्रुद्दिन तय्यबजी, उमेशचंद्र बानर्जी वगैरे यांचे सहचर होते. तेथील दादाभाई नवरोजींच्या सहवासाचा यांना फार उपयोग झाला. तेथें असतां यांनीं 'दि एज्युकेशन सिस्टिम ऑफ बॉम्बे' हा निबंध ईस्ट इंडिया असोसिएशनपुढें वाचून चांगला लौकिक मिळविला. १८६८ मध्यें हे बॅरिस्टर होऊन परत आले. या वेळीं मुंबईस बॅरिस्टरी करणाऱ्या युरो-पियन लोकांशीं यांना तोंड द्यावें लागलें. पण लवकरच यांचा चांगला जम बसला. पारसी टावर्स ऑफ सायलेन्स केस, सुरत रायट केस वगैरेमुळें यांना कीर्ति व पैसा यांचा भरपूर लाभ झाला. हायकोर्टांत काळागोरा हा भेद फारच बोकाळला होता तो यांनीं वर्तमानपत्रांत लेख लिहून उघड केला. यांच्या जहाल मतांना विचा-राची बैठक असल्यानें त्यांचें सर्वत्र कौतुक होई.

यांचें नांव सर्वतोमुखीं होण्यास मुंबई कार्पोरेशनमधील यांची चाळीस वर्षांची कामगिरी कारण झाली. तेथें हे करतील ती पूर्वदिशा व सांगतील तो निर्णय मान्य केला जाई. सध्यांची लोकतंत्र असणारी कार्पोरेशनची घटना हें यांच्याच प्रयत्नाचें फल होय. तेथें यांना चार वेळां मेयर पदाचा मान देण्यांत आला ( १८८४, १८८५, १९०५, १९११ ).

१८७४ सालीं मुंबईंत पारशी-मुसलमान दंगा झाला असतां हे निर्भयपणें दंग्याच्या भागांत फिरले. गव्हर्नर सर फिलिप वुडहाउस यांच्या बेजबाबदारपणाविरुद्ध यांनीं चळवळ करून सरकारास चौकशी करण्यास भाग पाडलें. त्यामुळें यांची लोकप्रियता कळसास पोंचली. रशियन परचक्राच्या भीतीनें युरोपियनांचें स्वयंसेवक-पथक उभारण्यास मुंबईचे नागरिक म्हणून यांनीं केलेला विरोध, प्रेस ॲक्ट विरोध, खुल्या व्यापाराचे मिषानें लँकेशायरला दिलेल्या दोन लक्षांच्या सुटीला विरोध, सर रिचर्ड टेंपल या गव्हर्नरचा पुतळा उभारण्यास विरोध, इल्बर्ट बिलाला विरोध वगैरे लोकमत स्पष्ट करणारीं कार्यें करून हे लोकांचे पुढारी झाले.

अशा चळवळी करण्याकरितां यांनीं बाँबे प्रेसिडेन्सी असोसिएशन काढली. त्याबाबत यांना तेलंग व तय्यबजी यांचा पूर्ण पाठिंबा असे. १८८८ मध्यें यांनीं अडव्होकेट ऑफ इंडिया हें पत्र जहांगीर मर्झबान यांच्या भागीनें विकत घेतलें. तें व गुजराथी पत्र यांच्या साहाय्यानें यांनीं मतप्रचाराचें काम सुरू केलें. १८९२ त झालेल्या कायद्याप्रमाणें हे कार्पोरेशनचे प्रतिनिधि म्हणून कायदे-मंडळांत व पुढल्या वर्षी इंपीरियल कौन्सिलमध्यें प्रविष्ट झाले ( १८९३ ). या दोन्ही ठिकाणीं अखेरपर्यंत हे आपलें कठोर टीकाकाराचें काम करीत असत. तथापि सरकारनें यांना सी. आय. इ., के. सी. आय. इ. व सर या पदव्या देऊन गौरविलें.

हे राष्ट्रसभेंत अगदीं प्रारंभापासून होते. कलकत्याच्या पांचव्या अधिवेशनाचे यांना अध्यक्ष निवडण्यांत आलें ( १८९० ). १९०७ सालीं सुरत येथील राष्ट्रसभेंत दुफळी झाली व फेंकलेला जोडा यांना चाटून गेला. १९०९ च्या लाहोरच्या राष्ट्रसभेचे यांना पुनः अध्यक्ष निवडण्यांत आलें होतें; पण त्यापूर्वीं सहाच दिवस यांनीं तो मान नाकारला. जातवार मतदारसंघाशिवाय मोर्लेमिंटो सुधारणांवर यांच्या मताची छाप होती. १९१० सालीं विलायतला जाऊन आल्यावर हे मुंबई विश्वविद्यालयाचे व्हा. चान्सलर झाले. यांना डॉक्टर ऑफ लॉज ही पदवी देण्यांत आली. १९१३ मार्च २ रोजीं यांनीं बाँबे क्रानिकल हें दैनिक काढलें, तेव्हां बेंझामिन गाय हार्निमन हे संपादक होते. यापूर्वी दोन वर्षें यांनीं सेंट्रल बँक ऑफ इंडिया ही बँक काढली.

मुंबई कार्पोरेशनपुढें ऐंशी हजार रुपये खर्चून यांचा पुतळा उभारला आहे. सर एच. पी. मोदी यांनीं यांचें चरित्र दोन भागांत इंग्रजींत लिहिलें आहे.

मुंबई कार्पोरेशन, काँग्रेस व कायदेमंडळ या सर्व ठिकाणीं विलक्षण दरारा ठेवून हे काम करीत. यांच्या दणकेबाज वक्तृत्वानें व मनांत येईल ती गोष्ट पार पाडण्याच्या धडाडीनें यांना लोक व सरकार वचकत असत. लार्ड कर्झन यांच्या स्वागताला विरोध करून आणि मुंबई टाइम्स बदलण्यास मध्यवर्ति सरकारास विरोध करून यांनीं आपली मुंबईची सिंह पदवी सार्थ केली होती. यांच्या या स्वभावामुळें यांना कार्पोरेशनच्या निवडणुकींत पराजित करण्याकरितां कांहीं युरोपियन्स लोकांनीं कॉकस-कट केला व खुद्द कॉंग्रेसमध्येंहि दुफळी झाली. तथापि हे स्वाभिमानी व कर्तव्यनिष्ठ वृत्तीपासून कधीं ढळले नाहींत. सरकार वचनभंग करीत असतां ना. गोखले यांनीं प्रेस ॲक्टला संमति दिल्याबद्दल हे त्यांच्यावर नाराज झाले.

**मेहेता, सर लल्लुभाई सामळदास**—( जन्म स. १८६३ आक्टो.–मृत्यु स. १९३६ ) मुंबई प्रांतांतील सुप्रसिद्ध अर्थशास्त्रविशारद व उद्योगतज्ज्ञ.

भावनगर हायस्कूल व एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें कांहीं दिवस शिक्षण घेतल्यानंतर यांनीं भावनगर संस्थानांत नोकरी पत्करली. प्रथम महाराजांचे अंडर सेक्रेटरी व नंतर रेव्हेन्यु कमिशनर अशीं कामें करीत असतांच यांना लॅन्ड रेव्हेन्यु सिस्टीम, रेल्वे कंपनीची व्यवस्था व राज-कीय किंवा कायद्याचे प्रश्न कोणालाहि न दुखवतां सोडवण्यासंबंधींचे विविध क्षेत्रांतील अनुभव मिळाले. अशा तऱ्हेनें सतत अठरा वर्षें संस्थानांत नोकरी केल्या-नंतर यांनीं आपलें तेथील बस्तान हलविलें व हे मुंबईस आले ( १९०० ).

मुंबईला आल्याबरोबर यांनीं आपल्या नवीन धोरणा-प्रमाणें मुंबईच्या सर्व व्यापारी हालचालींत भाग घेण्यास सुरुवात केली आणि आपल्या नव्या शैलीनें हे जेथें गेले तेथें यशस्वी झाले. बॉम्बे सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँक,

बँक ऑफ बरोडा, इंडियन सीमेंट कंपनी, सिंदिया स्टीम नेव्हिगेशन कंपनी लि. यांसारख्या बहुविध क्षेत्रांतील औद्योगिक धाडसांत, कोठें उत्पादक तर कोठें सुधारक अशा अनेक नात्यांनीं कार्य केल्यानें यांच्या नांवाला हिंदी बाजारपेठांत एक विशिष्ट किंमत उत्पन्न झाली. लल्लुभाई सामळदास म्हणजे दूरदृष्टि व धाडस अशी सांगड लोक घालूं लागले व देशांतील कोणताहि नवा धंदा यांच्या सहकार्यावांचून उभारणें अशक्य होऊन बसलें.

याबरोबरच मुंबईतील को-ऑपरेटिव्ह चळवळीचे जनक, मॅक्-क्लगन कमेटीचे सभासद व म्हैसूर सरकारनें सहकारी पेढ्यांसंबंधीं नेमलेल्या कमेटीचे अध्यक्ष या नात्यांनीं कामें करून यांनीं कार्याच्या आखणींतील आपलें चातुर्य प्रगट केलें.

इंडियन मर्चन्ट्स चेंबरच्या स्थापनेंत यांनीं केलेल्या कार्याचा गौरव करण्यासाठीं यांना १९१८ सालीं त्या संस्थेचें अध्यक्षस्थान देण्यांत आलें होतें. त्याप्रमाणेंच ऑल इंडिया इन्डस्ट्रियल कॉन्फरन्स ( कराची, १९१३ ) व इंडियन इकॉनमिक कॉन्फरन्स ( बनारस, १९२५ )चें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें. इकॉनमिक कॉन्फरन्सच्या अध्यक्षस्थानावरून यांनीं 'Observation of Indian Economic Problems' या विषयावर दिलेल्या व्याख्यानाची त्या वेळीं सर्वत्र तारीफ झाली होती.

युनिव्हर्सिटीची पदवी वगैरे मानमान्यता मिळवण्याचें कोणतेंहि हुकमी साधन जवळ नसतां केवळ अंतर्मुख दृष्टि व साफ विचारपद्धति यांमुळें हे इतकें कार्य करूं शकले. सर्वसाधारण जगसुद्धां एक मोठी शाळा असल्याचा दाखला यांच्यासारख्या कार्यकर्त्यांचें जीवन पाहून खरा वाटतो.

यांचे ग्रंथ—My Impressions of Japan.

**मेहता, वैकुंठलाल लल्लुभाई**—( जन्म स. १८९१ ) मुंबई इलाख्यांतील को-ऑपरेटिव्ह चळवळीचे पुढारी व कार्यकर्ते.

मुंबईच्या न्यू हायस्कूल व एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें आपलें शिक्षण संपवून हे बी. ए. झाले. त्या परीक्षेंत यांना एलिस स्कॉलरशिप मिळाली होती. लवकरच बॉम्बे सेंट्रल को-ऑपरेटिव्ह बँकेच्या मॅनेजरच्या जागीं यांनीं काम करण्यास सुरवात केली व १९२२ सालीं त्या संस्थेचे हे मॅनेजिंग डायरेक्टर झाले.

मुंबईतील को-ऑपरेटिव्ह चळवळीचे हे सुरवातीपासूनच अध्वर्यु आहेत. बॉम्बे प्रॉव्हिन्शियल को-ऑपरेटिव्ह इन्स्टिट्यूट, बॉम्बे प्रॉव्हिन्शियल बँकिंग इन्कायरी कमेटी ( १९२९ ), टेक्स्टाइल लेबर इन्कायरी कमेटी ( १९३७-४० ), बॉम्बे प्रॉव्हिन्शियल बोर्ड इत्यादि ठिकाणीं कामें करून यांनीं आपलें हें व्रत सतत चालविलें आहे. ऑल इंडिया व्हिलेज इंडस्ट्रीज असोसिएशन व हरिजनसेवक संघांतीलहि हे प्रमुख कार्यकर्ते आहेत.

यांच्या या निरलस कार्यपद्धतीमुळें १९४६ सालीं स्थापन झालेल्या मुंबईच्या खेर मंत्रि मंडळांतील अर्थमंत्र्याची जागा यांना देण्यांत आली.

सोशल सर्व्हिस क्वार्टर्ली व बॉम्बे को-ऑपरेटिव्ह क्वार्टर्लीच्या संपादकमंडळांत हे आहेत.

यांचे ग्रंथ—( 1 ) The Co-operative Movement (1915), ( 2 ) The Co-operative Movement in India (1918), ( 3 ) Studies in Co-operative Finance (1927) इत्यादि.

**मेहता, सर होरमसजी माणेकजी**—( जन्म स. १८७१ एप्रिल १ ) मुंबईचे सुप्रसिद्ध कारखानदार व धनिक.

मुंबईस कांहीं दिवस शिक्षण घेतल्यानंतर यांनीं मुंबईच्या टांकसाळींत नोकरी करण्यास सुरवात केली ( १८८८ ). परंतु १८९६ त यांनीं ही नोकरी सोडली व स्वतंत्रपणें धंदा करण्यास सुरवात केली. १९०४ मध्यें यांची व्हिक्टोरिया मिल्स सुरू झाली व ज्युबिली मिल्स ( १९१४ ), गायकवाड मिल्स ( १९२९ ), नवसरी कॉटन ॲन्ड सिल्क मिल्स इत्यादि गिरण्यांची स्थापना करून यांनीं स्वतःचा असा मोठा कापडाचा व्यापार करण्यास सुरवात केली. झेनिथ लाइफ इन्शुअरन्स कं. लि., ब्रिटिश इंडिया लाइफ इन्शुअरन्स कं. लि., ध्रान्गध्रा केमिकल वर्क्स ( १९३९ ), ग्वाल्हेर शुगर वर्क्स या यांनीं स्थापलेल्या इतर व्यापारी संस्था होत.

परंतु यापेक्षांहि इलेक्ट्रिसिटीचा पद्धतशीरपणें पुरवठा करणाऱ्या इलेक्ट्रिक सप्लाय कंपन्यांची स्थापना हें यांचें महत्त्वाचें कार्य आहे. अशा प्रकारें यांनीं स्थापन केलेल्या पुणें ( १९१६ ), नवसरी ( १९२२ ), नाशिक देवळाली ( १९३० ) येथील संस्था अत्यंत भरभराटीस आलेल्या यांच्या उद्योगधंद्यांत प्रमुख आहेत.

कौन्सिल ऑफ स्टेटचे हे कांहीं दिवस सभासद होते (१९३०-३४).

बिहार ओरिसाच्या फाळणीसंबंधीं नेमलेल्या कमेटी-चेहि हे सभासद असून १९३६ मध्यें भरलेल्या इंटर-नॅशनल लेबर कॉन्फरन्सला हे हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून हजर राहिले होते. रिझर्व बँकेचेहि हे कित्येक दिवस डायरेक्टर आहेत.

अलीकडे हे बडोदा संस्थानच्या युद्धोत्तर योजना-मंडळाचे अध्यक्ष होते.

**मेहेरअली, युसुफ जे.**—(जन्म स. १९०६ सप्टें. २३) मुंबईतील तरुणांच्या चळवळींचे सुप्रसिद्ध संघटक व लेखक.

मुंबईच्या एलफिन्स्टन कॉलेज व गव्हर्नमेंट लॉ कॉलेज-मध्यें आपलें शिक्षण संपवून हे बी. ए., एलएल्. बी. झाले. यानंतर लवकरच यांनीं काँग्रेसच्या व त्यांतहि विशेषेकरून तरुणांच्या चळवळींत भाग घेण्यास सुरवात केली. बाँबे यूथ लीग (१९२८), इंडियन नॅशनल मिलिटिया (१९३०), काँग्रेस सोशॅलिस्ट पक्ष यांसारख्या संस्थांच्या स्थापनेंत महत्त्वाचा भाग घेऊन यांनीं तरुणांची चळवळ सारखी प्रगतिपथावर ठेवली. १९३८ सालीं न्यूयॉर्क येथें भरलेल्या वर्ल्ड यूथ काँग्रे-सला गेलेल्या हिंदी तरुणांच्या शिष्टमंडळाचे हे पुढारी होते. १९४१ सालीं भरलेल्या ऑल इंडिया स्टुडंट्स् कॉन्फरन्सचे यांना अध्यक्ष निवडण्यांत आलें. काँग्रेस चळवळीकरितां तर हे कित्येक वेळां तुरुंगांत गेले. मुंबईच्या व्हॅनगार्ड या पत्राचे हे कांहीं दिवस संपा-दक होते.

यांचे ग्रंथ—(1) Youth Movement in Bombay Presidency, (2) What to read-a study Syllabus, (3) Leaders of India, (4) Trip to Pakistan, (5) मुंबईच्या पद्मा प्रकाशनच्या Men and Letters Series इत्यादि ग्रंथमालांचें संपादन.

**मोडक, अच्युतराय-रावजी बिश्वनाथ**—(जन्म स. १७७८-समाधि स. १८३३) संस्कृत भाषेंतील सुप्रसिद्ध कवि व ग्रंथकार.

हे रघुनाथभटाचे शिष्य. हे नाशिक येथें राहत. यांनीं तरुण वयांत असतांना संन्यास घेतला. यांनीं काव्यें, नाटकें, चंपू, भाण व तत्त्वज्ञानात्मक अनेक प्रबंध व अनेक ग्रंथांवर संस्कृतमध्यें टीका लिहिल्या. नाशिक येथें कपालेश्वराच्या मंदिरांत यांची समाधि आहे. यांचा वेदान्तावरील टीका ग्रंथ आनंदाश्रमांत मुद्रित आहे. साहित्यसार हा ग्रंथ निर्णयसागर छापखान्यांत छापला असून शिक्षणक्रमांत आला आहे.

**मोडक, कॅप्टन गणेश वासुदेव**—(जन्म स. १८८७ ऑगस्ट २७-मृत्यु स. १९४१ डिसें. १७) हिंदुस्थानांतील लष्करी शिक्षणाचे पुरस्कर्ते व प्रसारक.

जन्मस्थान पुणें. डेक्कन कॉलेजांत शिकत असतां अचानक पलायन करून हे ग्वाल्हेर आर्मीत दाखल झाले. तेथून पहिल्या महायुद्धांत आघाडीवर दाखल होऊन यांनीं किंग्ज कमिशन मिळविलें.

यांचें 'इंडियन डिफेन्स प्रॉब्लेम' हें इंग्रजी पुस्तक अत्यंत महत्त्वाचें आहे. 'हिंदुस्थान ब्रिटिश सैन्याच्या मदतीशिवाय आत्मसंरक्षण करूं शकेल, हिंदुस्थानांत लढाऊ बिनलढाऊ असे वर्ग राज्यकर्त्यांच्या आपलपोट्या स्वार्थामुळें पाडले जातात, राष्ट्रीय सैन्याकरितां हिन्दी अधिकारी पाहिजेत, राष्ट्रीय सैन्य निर्माण झाल्यानें कोट्यवधि रुपयांची बचत होईल' इत्यादि सिद्धान्त त्यांत प्रमाणासह मांडले आहेत. इतरहि अनेक राष्ट्रीय प्रश्नांचें समर्थन त्यांत पुराव्यानें केलें आहे.

यांनीं आपल्याकडील विद्यापीठांनीं पदवी परीक्षे-करितां युद्धशास्त्र हा विषय मान्य करावा म्हणून चिकाटीनें प्रयत्न केला. त्यांत यांना आग्रा, बनारस, पंजाब व बहार या विद्यापीठांत अत्यल्प यश प्राप्त झालें.

यांचें 'प्रतापगडचें युद्ध' हें हिंदुस्थानाच्या इतिहास-वाङ्मयांतील युद्धशास्त्रावर लिहिलेलें पहिलेंच पुस्तक होय. अशीं अनेक महत्त्वाच्या लढायांचीं पुस्तकें प्रकाशित करून हिंदुस्थानचा लष्करी म्हणजे युद्धशास्त्राचा इतिहास रचण्याचा व त्या द्वारें हिंदी लष्करी डावपेचाच्या श्रेष्ठतेचें सप्रमाण दिग्दर्शन करण्याचा यांचा उद्देश होता. हें पुस्तक इंग्लंड-अमेरिकेंतील प्रकाशकांच्या तोडीचें प्रसिद्ध व्हावें म्हणून यांनीं त्यावर शक्तीबाहेर खर्च केला.

यांच्या लष्करी पात्रतेमुळेंच यांना इंडियन सँढर्स्ट कमेटी अथवा स्कीन कमेटी (१९२५-२७) पुढें साक्ष देण्याचा मान मिळाला. यांची ती साक्ष अत्यंत माहित-

गारीची व म्हणूनच खळबळ उडवणारी झाली. यांच्या सडेतोडपणामुळेंच यांना मुदतीच्या पूर्वीच पेन्शन घेणें भाग पडलें ( १९३२ ). यांचें अलीकडील लोकांच्या नजरेसमोरील काम म्हणजे मुंबई इलाख्यांतील राष्ट्रसभा-मंत्रिमंडळानें नेमलेल्या शारीरिक शिक्षणसमितीवरील सभासद म्हणून झालेलें काम.

यांचें वाङ्मय—१ मस्केट्री लेक्चर्स ( हिन्दी ), २ प्रतापगडचें युद्ध मिलिटरी हिस्टरी, ३ Indian Defence Problem ( इंग्रजी ); पत्रकें–सैन्याची संघटना व कारभार, ऑफिसर्स ट्रेनिंग कोअर ( मराठी ), व्हिज्युअल ट्रेनिंग ( हिंदी ).

**मोडक, नारायण विनायक**—( जन्म स. १८८० डिसें. १३ ) मुंबई कार्पोरेशनचे म्युनिसिपल कमिशनर व सुप्रसिद्ध स्थापत्यविशारद.

पुण्याच्या एंजिनियरिंग कॉलेजमधून बी.ई. (सिव्हिल) झाल्यानंतर यांनी मुंबई सरकारच्या सॅनिटरी एंजिनियरचे सब-डिव्हिजनल ऑफिसर म्हणून काम करण्यास सुरवात केली ( १९१२-१८ ). परंतु यानंतर सॅनिटरी व म्युनिसिपल एंजिनियरिंगचें विशेष अध्ययन करण्यासाठीं यांना स्टेट टेक्निकल स्कॉलरशिप देण्यांत आली. त्याप्रमाणें एक वर्षपर्यंत हिंदुस्थानांत काम केल्यानंतर यांना इंग्लंडला पाठविण्यांत आलें. त्या ठिकाणीं हेस्टिंग्जच्या कार्पोरेशनमध्यें असि. एंजिनियरचें काम करून हे हिंदुस्थानला परत आले ( १९१९-२२ ). आल्यानंतर यांची इंडियन सर्व्हिस ऑफ रेल्वे एंजिनियर्सचे एक्झिक्युटिव्ह एंजिनियर या नात्यानें जी. आय. पी. रेल्वेचे सॅनिटरी एंजिनियर म्हणून नेमणूक झाली ( १९२२-३० ). हे काम करीत असतांच यांनीं बी. बी. सी. आय. रेल्वेच्या दोहद स्टेशनसाठीं मैला वाहतुकीची योजना तयार करण्यांत मदत केली.

रेल्वेवरील या दीर्घकालीन कार्यानंतर यांनीं मुंबईच्या म्युनिसिपालिटींत काम करण्यास सुरवात केली. प्रथम डे. सिटी एंजिनियर, हायड्रॉलिक एंजिनियर, सिटी एंजिनियर अशी कामें करीत करीत यू. एम्. मिरचंदानी यांचे जागीं म्युनिसिपल कमिशनरच्या जागीं यांची नेमणूक झाली ( १९४६ ).

मुंबई बेटाच्या उत्तरभागांत ॲक्टिव्हेटेड स्लज प्रोसेसनें तयार केलेल्या स्युएज प्युरिफिकेशन वर्क्सची आंखणी व उभारणी यांनीं केलेली असून हिंदुस्थानांतील मोठ्यांतमोठ्या स्युएज वर्क्समध्यें त्याची गणना केली जाते. ह्या योजनेंतून उत्पन्न होणाऱ्या गॅस व खत यांच्या उत्पन्नांतून हें सर्व चालविलें जात असून मुंबईच्या नागरिकांना त्याबद्दल कोणत्याहि प्रकारचा कर द्यावा लागत नाहीं.

बॉंबे एंजिनियरिंग कॉंग्रेस ( १९३८ ), इन्स्टिटयूशन ऑफ एंजिनियर्स इंडिया ( १९४१-४२ ), इंडियन सायन्स कॉंग्रेस असोसिएशनचें स्थापत्यखातें ( १९४२ ) इत्यादि संस्थांचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें. इंडियन रोड्स कॉंग्रेसचें स्वागताध्यक्षपदहि यांना देण्यांत आलें होतें. मुंबई युनिव्हर्सिटीच्या फॅकल्टी ऑफ टेक्नॉलजीचे डीन, पुण्याच्या एंजिनियरिंग कॉलेजचे सल्लागार व मुंबईच्या व्ही. जे. टी. इन्स्टिटयूटच्या कार्यकारी मंडळाचे सदस्य या नात्यानें यांनीं केलेलें कार्यहि असेंच महत्त्वाचें आहे.

१९३८ सालीं जगांतील नगररचनेचे नवे प्रकार अभ्यासण्यासाठीं यांना मुंबई कार्पोरेशननें आपले प्रतिनिधि म्हणून परदेशला पाठविलें. या वेळीं यांनीं सादर केलेल्या तीन रिपोर्टस्पैकीं मैला वाहतुकीवरील रिपोर्ट आतां प्रकाशित झाला आहे.

**मोडक, बाळाजी प्रभाकर**—(जन्म स. १८४७–मृत्यु स. १९०६ ) शास्त्रीय विषयावरील मराठींतील पहिले ग्रंथकार, जंत्रीकार व राजाराम कॉलेजमधील रसायनशास्त्राचे प्राध्यापक.

यांचा जन्म आचरें ( ता. मालवण, जि. रत्नागिरी ) येथें झाला. हे सांगलीकरांच्या शिष्यवृत्तीमुळें बेळगांव हायस्कूलमधून मॅट्रिक झाले ( १८६५ ). बी. ए.च्या वर्गांत असतां अत्यंत आजारी पडले तेव्हां राजाराम हायस्कूल कोल्हापूर येथें नोकरी पत्करली ( १८६९ ).

कोल्हापुरास आल्यापासून तीन चार वर्षांतच यांनीं रसायनशास्त्रावर एक सार्वजनिक सप्रयोग व्याख्यानमाला सुरू केली. त्याकरितां केलेलीं टिपणें एकत्र करून तीं शिळाप्रेसवर छापून काढलीं ( १८७५ ). पुढें चार महिन्यांची रजा घेऊन मुद्दाम पुण्याच्या प्रयोगशाळेंत राहून डॉ. कुक यांच्या सहवासांत सृष्टिशास्त्र व रसायनशास्त्र वगैरेंचे अनेक प्रयोग करून यांनीं ‘ निरिंद्रिय रसायनशास्त्र, अधातुरूप तत्त्वें ’ हा ग्रंथ प्रसिद्ध केला ( १८७६ ). हा मराठींतील या विषयावरील पहिलाच ग्रंथ होय. वेळोवेळीं नवेनवे प्रयोग करणें, ते प्रदर्शना-

दिकांमध्यें लोकांना दाखविणें आणि सप्रयोग झालेलें ज्ञान लिहून काढून ग्रंथरूपानें प्रसिद्ध करणें हा यांचा नित्यक्रमच होऊन बसला. निबंधमालाकारांनीं यांची सुबोध भाषा, विषयाची मांडणी व यांचें सखोल ज्ञान यांची प्रशंसा केली आहे.

राजाराम कॉलेजांतील प्रयोगशाळा १८७०-१९०० पर्यंत याचेच ताब्यांत होती. पुढें पेन्शन घेतल्यावर प्रयोगशाळेंत काम करण्याची परवानगी दरबारकडून यांनीं घेतली होती. मराठी भाषेंतून शिक्षणाची व्यवस्था न झाल्यानें यांच्या पुस्तकांचा व्हावा तसा उपयोग झाला नाहीं. शास्त्रीय प्रयोग व उपकरणें या बाबतींत श्रीमंत आबासाहेब कागलकर व श्रीमंत बाळासाहेब ( गं. ग. ) मिरजकर यांचें यांना फार साहाय्य होत असे. बहुतेक सरदारांच्या मुलांशीं यांचा संबंध येई. दक्षिणेंतील सरदारांच्या वर्गाला हे इतिहास शिकवीत व त्यांचे सुपरिंटेंडेंट हे असत. त्यामुळें इतिहासाचे ग्रंथहि यांच्या हातून तयार झाले.

मुंबई मराठी ग्रंथालयाच्या १९०४ च्या वार्षिकोत्सव-प्रसंगीं हे अध्यक्ष होते. तेव्हां मराठीच्या द्वारा उच्च शिक्षण देण्याची आवश्यकता यांनीं प्रतिपादिली.

**मोडक, महादेव हरि**—( जन्म स. १८६३–मृत्यु स. १९०४ ) मराठींतील सुप्रसिद्ध लेखक व विद्याव्यासंगी गृहस्थ.

प्राथमिक शिक्षण रोहें येथें व पुढील शिक्षण पुणें येथें होऊन हे बी. ए. झाले ( १८८७ ). कायद्याचा अभ्यासहि केला. पुढें अनेक ठिकाणीं शिक्षकाचें काम केलें. हे अहमदनगर येथील सोसायटीच्या हायस्कुलांत सुमारें दहा वर्षे शिक्षक व कांहीं दिवस मुख्य शिक्षकहि होते. पण शिवाजीवरील व्याख्यानामुळें यांना शाळा सोडावी लागली ( १८९८ ). यांचे कांहीं ग्रंथ विश्वविद्यालयानें पदवी परीक्षेला नेमले होते.

यांचे ग्रंथ—१ दि. ब. लक्ष्मण रामचंद्र वैद्य, एम्. ए., एल्एल्. बी. यांनीं गोपाळ नारायण कंपनीसाठीं केलेल्या संस्कृत-इंग्लिशकोशाचा तिसरा भाग, २ महाभारताच्या कांहीं पर्वांचें व हरिवंशाचें भाषान्तर ( प्रकाशक–ग. वि. चिपळुणकर ), ३ खडे तात्त्विक बोल ( १-४ भाग ), ४ सुख आणि शान्ति ( लार्ड ॲव्हबरी– पीस ॲंड हॅपिनेस ), ५ नाट्यमकरंद ( लॅंब्ज् टेल्सचें भाषान्तर ), ६ अध्यात्मपर व्याकरण ( अप्रसिद्ध ).

**मोडक, वामन आबाजी**—( जन्म स. १८३६ सप्टें. २१–मृत्यु स. १८९७ आगस्ट २८ ) प्रार्थनासमाजाचे सुप्रसिद्ध अनुयायी व समाजसुधारक.

यांचें प्राथमिक शिक्षण आडें व दुर्गें येथें झालें. विश्रामबाग हायस्कूलांत शिक्षक म्हणून नेमले गेल्यावर हे एम्. ए. झाले ( १८६४ ). अनेक ठिकाणीं मुख्याध्यापक म्हणून काम केल्यावर हे सेवानिवृत्त झाले ( १८९७ ). त्यानंतर यांना सी. आय. ई. ही पदवी मिळाली ( १८९६ ). मुंबई विश्वविद्यालयाचे सदस्य, सिंडिक व जे. पी. वगैरे मानहि यांना मिळाले.

यांचा जुन्या मराठी कवींचा व्यासंग चांगला असे. हे स्वतःहि मराठी कविता करीत व आख्यानें रचून कीर्तनें करीत. यांचीं व्याख्यानें वक्तृत्व व विचार या दृष्टीनें महत्त्वाचीं असत. हे विधवापुनर्विवाहाचे कट्टे पुरस्कर्ते होते. देशभाषांना विश्वविद्यालयाच्या शिक्षणांत स्थान मिळावें म्हणून यांनीं केलेले प्रयत्न अपेशी ठरले.

यांचें वाङ्मय—१ उत्तरनैषधचरित नाटक, २ व्याख्यानें-धर्मपर व नीतिपर लेख ( १९०८ ).

**मोनियर विल्यम्स, मोनियर**—( जन्म स. १८१९-मृत्यु स. १८९९ ) हिंदी धर्म व संस्कृति यांचे सुप्रसिद्ध अभ्यासक व संशोधक.

यांचा जन्म जरी मुंबईला झाला तरी यांचें सर्व शिक्षण लंडनच्या क्रान्स कॉलेज व ऑक्सफर्डच्या बॅलिओल कॉलेजमध्यें पार पाडण्यांत आलें. यानंतर ऑक्सफर्डच्या युनिव्हर्सिटी कॉलेजमध्यें कांहीं दिवस ' बोडन संस्कृत स्कॉलर ' म्हणून काम केल्यानंतर यांची हेलबरी येथें संस्कृत, फारशी व हिंदुस्थानी भाषांचे प्राध्यापक म्हणून नेमणूक झाली ( १८४४-५८ ). यानंतर ऑक्सफर्डला कांहीं दिवस बोडन प्रोफेसर म्हणून काम केल्यानंतर हे सेवानिवृत्त झाले.

Buddhism हा यांचा विशेष महत्त्वाचा ग्रंथ होय. बुद्धाचें चरित्र, त्याची मतप्रणाली, हिंदुधर्मावर कांहीं काळ त्या धर्मानें मिळवलेला विजय व त्याचीं कारणें व शेवटीं त्या धर्माच्या अस्ताचीं कारणें असा बुद्ध धर्माचा सुसंगत इतिहास या ग्रंथांत दिला आहे. प्रचार करावयाचा कडक ब्रह्मचर्याचा, पण स्वतः भिक्षूंनाच मुलें झालेलीं असावयाचीं, दैवी शक्तींचा इन्कार करावयाचा पण धर्म व बुद्ध यांची उपासना मात्र देवाप्रमाणें करावयाची, मूर्तिपूजा नको असें म्हणावयाचें व हातानें

मात्र बुद्धाची मूर्ति व त्याची कवनें यांची पूजा करावयाची अशा असंबद्ध वागणुकीनें बौद्ध धर्म वैष्णव व शैव पंथांत विलीन झाल्याचें यांनीं लिहिलें.

Indian Wisdom हा यांचा सर्वात महत्त्वाचा ग्रंथ होय. वेदांपासून सुरुवात करून उपनिषदें, सहा सूत्रें, स्मृति, वेदांगें व रामायण, महाभारतासारखीं काव्यें यांचा परिचय या ग्रंथांत करून देण्यांत आला आहे.

हिंदी संस्कृति, इतिहास किंवा भाषांचा परिचय घ्यावयाचा असेल तर प्रथम संस्कृत भाषेचें अध्ययन करावयास पाहिजे, ही गोष्ट लक्षांत आलेले हे पहिले पाश्चात्य संशोधक होत. पाश्चात्य देशांत जें महत्त्व ग्रीक भाषेला, तें महत्त्व संस्कृत भाषेला पौर्वात्य देशांत आहे. म्हणूनच जगाच्या एका महत्त्वाच्या संशोधनक्षेत्राचा परिचय करून घेण्यासाठीं संस्कृत भाषेकडे पाश्चात्य पंडितांनीं लक्ष दिलेच पाहिजे, या कल्पनेनें भारून जाऊन यांनीं आपल्या ग्रंथाच्या द्वारा त्या भाषेचे निरनिराळे पैलु पाश्चात्यांच्या नजरेस आणण्याचा प्रयत्न केला. ऑक्सफर्डला यांनीं स्थापन केलेल्या इंडियन इन्स्टिटयूटचा प्रमुख हेतुहि हाच होता.

परंतु ज्या काळांत यांनीं हें कार्य केलें त्याची छाया यांच्या विचारसरणीवर पडल्याशिवाय राहिली नाहीं. बौद्धधर्म व ख्रिस्तीधर्म, हिंदु तत्त्वज्ञान व पाश्चात्य तत्त्वप्रणाली यांच्या तुलनेंत यांनीं अकारण हिंदुस्थानच्या तत्त्वज्ञानावर तोंडसुख घेतलें आहे. 'गूढ भाषेचें आवरण, अवास्तव कल्पना, ओढूनताणून केलेले अलंकार यांमुळें उपनिषदांच्या वाचकांचा विरस होतो; उपनिषदें किंवा त्यांचेवर आधारलेले इतर ग्रंथ यांचा मुख्य हेतु सत्यशोधन नव्हता, तर मागच्या, चालू व पुढच्या जन्मांत आपल्या हातून होणाऱ्या कृत्यांचे परिमार्जनाकडे त्यांचे लक्ष लागलें होत.' हीं यांचीं मतप्रदर्शनें विचार व सहानुभूति यांचे अभावांतून उत्पन्न झालेलीं आहेत.

यांचे महत्त्वाचे ग्रंथ– ( 1 ) Sanskrit-English Dictionary, ( 2 ) Hinduism, ( 3 ) Modern India, ( 4 ) Religious Thought in India, ( 5 ) Indian Wisdom आणि शाकुंतल व नलोपाख्यान यांचे अनुवाद.

**मोमिन**—( जन्म स. १७९९–मृत्यु स. १८५० ) सुप्रसिद्ध उर्दू कवि.

यांचे नांव मोमिनखाँ. पित्याचें नांव हकीम गुलाम नबीखाँ. स्थान दिल्ली.

मोगल राज्यांत यांचे पूर्वज काश्मीराकडून येऊन राहिले. शाहअलमच्या वेळीं यांच्या पूर्वजांना नारनोल परगण्यांत जहागीर मिळाली होती. पण इंग्रजी अमलांत ती जहागीर गेली, तेव्हां यांना पेन्शन मिळत असे. यांचें साधारण शिक्षण झाल्यावर यांनीं अरबीचा अभ्यास सुरू केला. त्यानंतर यांनीं आपले वडील व चुलते यांच्यापाशीं वैद्यकीचा अभ्यास केला व त्यांच्याच दवाखान्यांत हे काम करूं लागले. वैद्यक, ज्योतिष, बुद्धिबळें वगैरे खेळ व कविता करणें वगैरे नाद यांना होते. प्रथम शाह नसीरला आपल्या कविता हे दाखवीत. पण पुढें तेंहि बंद झालें. स्वभाव व राहणी अत्यंत रंगेल व हौशी होती. यांचा रंगेलपणा कवितेंत चांगला उतरला आहे. यांची कविता म्हणण्याची ऐटहि कांहीं निराळीच होती.

यांच्या कवितांचा संग्रह मिळतो. त्यांत गझल, कसीदें, मसनवी व पहेलि वगैरेंचा संग्रह उत्तम आहे.

**मोरमकर, रा. सा. रामकृष्ण रघुनाथ**—( मृत्यु स. १९२३ आक्टो. ) 'विविधज्ञानविस्तार' या मराठींतील विख्यात मासिकाचे चालक व मराठी साहित्याचे एकनिष्ठ उपासक.

स. १८९८ सालीं गुंजीकर वारले, तेव्हां यांचे मामा पुरुषोत्तमपंत नाडकर्णी यांनीं विस्ताराची व्यवस्था आपल्याकडे घेतली. तेव्हांपासून यांचा संबंध विस्ताराशीं आला. तेव्हांपासून विस्ताराला आलेल्या व्यापक अभ्यासूपणाचें श्रेय यांच्याकडे आहे. यांनीं सतत पंचवीस वर्षे वार्षिक आठशें रुपयांचें नुकसान सोसून विस्तार सारखें मासिक उच्च पातळीवरून चालविलें व मराठी वाङ्मयाला वळण लावण्याचा प्रयत्न केला. स्वतः अभिप्राय लिहिण्यापेक्षां हे विशेष लेखन करीत नसले तरी लेखकांना उत्तेजन देऊन नवे विचार व अभ्यासूपणा यांची कदर राखण्याचें काम यांनीं केलें. मराठींत निबंधमालेनंतर पण निबंधमालेपेक्षां व्यापक धोरणावर मासिक चालविण्याचें श्रेय यांना दिलें पाहिजे.

**मोरे, गणपत विठोबाशेट**—( जन्म स. १८८१ सप्टें. ४–मृत्यु स. १९३३ जाने. १० ) राष्ट्रीय वृत्तीनें ज्ञातिकार्य करणारे त्यागी गृहस्थ.

यांचा जन्म व इंग्रजी पांच इयत्तांपर्यंतचें शिक्षण मुंबईस झालें. हे जातीनें संगमेश्वरी वैश्य समाजांतील

होते. या समाजांतील सर्व संस्कार वैदिक पद्धतीनें व्हावेत यावर यांचा कटाक्ष असे. याच दृष्टीनें हे ज्ञाति-कार्याकडे लक्ष घालूं लागले आणि यांनीं समाजांतील कुमारांचीं सार्वजनिक रीत्या उपनयनें लावण्याचा उपक्रम केला. 'दर दुकानास दररोज एक पैसा' या पद्धतीने निधि गोळा करून समाजाकरितां महाजनवाडी बांधली (१९१७) आणि स. १८८७ सालीं स्थापन झालेल्या कोंकणस्थ वैश्यज्ञाति फंड मुंबई या संस्थेच्या कार्यात हे लक्ष घालूं लागले. समाजकार्य करीत असता शिक्षणाचें महत्त्व यांच्या ध्यानीं आलें. पण त्याबरोबरच प्रचलित सरकारी शिक्षणानें वैश्यसमाजाचा व्यापारी पेशा व धर्मनिष्ठा टिकणार नाहीं अशी यांची खात्री झाली. कै. अण्णासाहेब विजापूरकर यांचे विचार ऐकून यांचें हें मत ठाम झालें आणि यांनीं वैश्यविद्याश्रम, सामवनें या राष्ट्रीय शिक्षण संस्थेची योजना समाजापुढें मांडली आणि तें प्रत्यक्ष सुरू केलें (१९२१). या संस्थेच्या वाढीकरितां यांनीं पन्नास हजार रुपये दिले. या देणगीप्रमाणें आपलीं व आपल्या आप्तेष्टांचीं मुलें सरकारी शाळांतून काढून या संस्थेंत घातलीं. हे या संस्थांचे कार्यवाह, विश्वस्त वगैरे होते.

**मोहनसिंग, कॅप्टन**—(जन्म स. ? ) सिंगापूर येथें स्थापन झालेल्या पहिल्या 'आझाद हिंद सेने'चे (इंडियन नॅशनल आर्मी) सेनापति.

जपान्यांचे हस्तक म्हणून आझाद हिंद सेनेचा उपयोग होऊं नये असा यांनीं प्रयत्न करतांच जपान्यांनीं यांना अटक केली (डिसें. १९४३). नंतर सुभाष बोस यांच्या नेतृत्वाखालीं दुसरी आझाद हिंद सेना उभारण्यांत आली. तिचें नेतृत्व कर्नल जगन्नाथराव भोसले यांनीं स्वीकारलें. लढाई संपल्यावर सुटका होऊन हे इकडे आले आणि स्वातंत्र्याकरितां सर्वांत अधिक प्रयत्न करतो असें स्वतःला वाटणाऱ्या कॉंग्रेस सोशालिस्ट पक्षांत शिरले.

**म्हस्के, गंगारामभाऊ**—(जन्म स. १८३१-मृत्यु स. १९०१) मराठा समाजाचे पुढारी व प्रसिद्ध सार्वजनिक कार्यकर्ते.

यांचें जन्मस्थान रंगरावचें ओढें (जि. नाशिक). यांचें शिक्षण 'मिशन स्कूल'मध्यें झालें. १८५५ पर्यंत हे नोकरींत होते. वयाच्या पंचेचाळिसाव्या वर्षी यांनीं वकिलीची परीक्षा दिली. यांनीं पुढील महत्त्वाचीं कार्यें केलीं. १ पुणें लष्करांत-प्राथमिक शिक्षणाची सोय, २ सार्वजनिक बाग, ३ आल्बर्ट एडवर्ड वाचनालय (१८७५), ४ स. १८७७ सालीं सत्तावीस हजार दुष्काळ फंड, ५ डेक्कन मराठा एज्युकेशन असोसिएशनची स्थापना व निधि सुरू (१८८५), ६ टाउन हॉल कमेटीतर्फे हिराबाग खरेदी, ७ कप एज्युकेशन सोसायटीची स्थापना, ८ बादशाह पंचम जॉर्ज यांचे बंधु प्रिन्स आल्बर्ट व्हिक्टर पुण्यास आले तेव्हां त्यांचे स्वागत सेक्रेटरी, ९ सर कावसजी दिनशा एडनवाला हॉल (वाचनालयाशेजारीं), १० लष्कर स्मशान धर्मशाळा. या बहुतेक कार्यांत यांनीं सेक्रेटरी म्हणून काम करून या सर्व कार्यांना विधायक रूप देऊन संस्था-स्वरूपांत परिणत केलें. त्यामुळें यांनीं सुरू केलेलीं कार्यें आजहि चालू असलेलीं दिसतात. डे. म. ए. असोसिएशनचा सुवर्णमहोत्सव होऊन त्या वेळीं प्रसिद्ध झालेल्या ग्रंथांत त्या संस्थेनें दोन हजार विद्यार्थ्यांकरितां दोन लक्षांपेक्षां अधिक रक्कम खर्च केल्याचें लिहिलें आहे.

**म्हैसूरचे महाराज सर-कृष्णराज वोडियार**—(जन्म स. १८८४ जून ४-मृत्यु स. १९४० ऑगस्ट ३) म्हैसूर राज्याचे सुप्रसिद्ध प्रगतिप्रिय अधिपति.

म्हैसूरचें मूळ राजघराणें नामशेष करून हैदरअली व टिपू सुलतान यांनीं त्या संस्थानचा कारभार आपल्या हातीं घेतला. पुढें श्रीरंगपट्टणच्या लढाईत टिपू मारला गेल्यानंतर इंग्रजांनीं यांच्या घराण्यांतील तिसऱ्या श्रीकृष्णराजांना गादीवर बसविलें. परंतु पुढें त्यांच्या प्रमादामुळें लॉर्ड बेंटिंक यांनीं तें राज्य खालसा केलें व १८३१-८१ पर्यंत तेथील कारभार ब्रि. सरकारतर्फे चालून पन्नास वर्षांनंतर श्री. चामराजेंद्र वोडियार यांना गादीवर बसविण्यांत आलें. म्हैसूर संस्थानातील नव्या युगाची सुरुवात चामराजेंद्र वोडियार यांनीं आपले दिवाण सर के. शेषाद्री अय्यर यांचे सहकार्यानें केली व त्याची परिपूर्णता यांनीं आपल्या कारकीर्दीत केली. देशी राज्यांत लोकसंख्या, क्षेत्रफळ इत्यादि दृष्टींनीं या राज्याचा क्रम दुसरा लागत असला तरी औद्योगिक प्रगतीच्या बाबतींत या संस्थाननें इंग्रजी राज्यासहि मागें टाकलें आहे.

सर स्टुअर्ट फ्रेझर यांच्या हाताखालीं शिक्षण घेत असतांच वयाच्या अकराव्या वर्षी हे गादीवर आले (१८९५ फेब्रु. १) व १८९५-१९०२ पर्यंत यांच्या

मातोश्रींनीं रीजन्ट म्हणून कारभार पाहिल्यानंतर यांनीं राज्याचीं सर्व सूत्रें आपल्या ताब्यांत घेतलीं. सर व्ही. पी. माधवराव, सर एम्. विश्वेश्वरय्या, सर अल्बियन बानर्जी, सर मिर्झा मुहम्मद इस्माईल यांसारख्या पहिल्या दर्जाच्या राजकारणतज्ज्ञांच्या सहकार्यानें हे म्हैसूर संस्थानची औद्योगिक पुनर्घटना करण्यांत यशस्वी झाले.

१९१३ सालीं यांनीं आपल्या संस्थानांत प्रथमच औद्योगिक खात्याची स्थापना केली. लोकांच्या खाजगी धंद्यांना व व्यावसायिक साहसांना सरकारी तज्ज्ञांचें साहाय्य देण्याची प्रथा यांनीं सुरू केली व ती परिणामीं अति यशस्वी ठरली. गव्हर्नमेंट सोप फॅक्टरी, गव्हर्नमेंट पोर्सेलिन फॅक्टरी, गव्हर्नमेंट सिल्क वीव्हिंग फॅक्टरी, गव्हर्नमेंट इलेक्ट्रिक फॅक्टरी, इम्प्लेमेंट फॅक्टरी, गव्हर्नमेंट लॅक ॲन्ड पेन्ट वर्क्स, सेन्ट्रल इंडस्ट्रियल वर्कशॉप, गव्हर्नमेंट इंडस्ट्रियल ॲन्ड टेस्टिंग लेबॉरटरी इत्यादि सरकारी संस्थांशिवाय श्रीराम सिल्क मिल्स, किर्लोस्कर इत्यादि अनेक संस्था यांच्या साहाय्यानें भरभराटीस आल्या. चंदनाच्या तेलाच्या यांनीं प्रायोगिक म्हणून स्थापन केलेल्या कारखान्यानें आतां धंदेवाईक रूप धारण केलें आहे.

परंतु यापेक्षांहि संस्थानांत उत्पन्न होणाऱ्या रेशमाच्या प्रचंड उत्पादनाचा यांनीं डिपार्टमेंट ऑफ सेरिकल्चर स्थापन करून योग्य विनियोग केला. निर्दोष बी पुरविण्याची सोय या खात्यानें केली असून रेशमाचें आदर्श कापड तयार करण्यासाठीं संस्थाननें एक सिल्क वीव्हिंग फॅक्टरी व डायिंग ॲन्ड फिनिशिंग वर्क्स सुरू केलें. भद्रावती येथील लोखंडाचा कारखानाहि अशाच मोठ्या प्रमाणावर चालविला जातो.

कोलार येथील सोन्याच्या खाणी व म्हैसूर शहर यांना इलेक्ट्रिसिटी पुरविण्याच्या दृष्टीनें यांनीं शिवसमुद्रम् येथील नैसर्गिक धबधब्याचा प्रथमच उपयोग केला ( १९०२ ). पुढें ही मागणी वाढतांच यांनीं जास्त इलेक्ट्रिसिटी तयार करण्याच्या दृष्टीनें ' कृष्णराज रिझर्वायर ' या प्रचंड योजनेची आंखणी केली. शेचाळीस हजार हॉर्सपॉवर्सपेक्षां जास्त इलेक्ट्रिसिटीचा लाभ तर या योजनेनें करून दिलाच, परंतु त्याबरोबरच सव्वा लक्ष एकरांपेक्षां अधिक जमीन भिजवण्याचें श्रेय यांना मिळालें. सध्यां संस्थानांत कालव्यांचें एकच जाळें झालें असून ' आयर्विन कॅनॉल ' हा या सर्वांचा मुख्य आहे.

म्हैसूर युनिव्हर्सिटीची स्थापना १ जुलै १९१६ ला करण्यांत आली. मेडिकल, कॉमर्स, एंजिनियरिंग अशा सर्व ज्ञानशाखांच्या अध्ययनाची येथें सोय असून उस्मानिया युनिव्हर्सिटीशिवाय इतकी प्रगत युनिव्हर्सिटी हिंदुस्थानांतील कोणत्याहि संस्थानांत नाहीं.

यांच्या या नव्या सुधारणांनीं यांचें संस्थान सर्वत्र आदर्शभूत होऊन राहिलें. एम्. विश्वेश्वरय्यांचे सहकार्यानें यांनीं औद्योगिक व स्थापत्य दृष्ट्या प्रगति केली तर मिर्झा मुहम्मद इस्माईल यांचे सहकार्यानें राज्याच्या घटनेंत सुधारणा केल्या.

यांपैकीं सर एम्. विश्वेश्वरय्या यांनीं तर योजनापूर्वक आराखडा तयार करून वेळापत्रकाप्रमाणें तो पार पाडला. वीज, कारखाने, पाटबंधारे व धरणें यांच्या प्रचंड योजना त्यांच्या होत. शिक्षणसंस्थांची वाढहि त्यांच्याच वेळीं झाली. सर मिर्झा इस्माईल १९२६ सालीं दिवाणपदावर आले. त्यांनीं साम्राज्य सरकारशीं वाटाघाटी करून लॉर्ड आयर्विन यांच्या वेळीं चवतीस लक्षांची खंडणी साडेदहा लक्षांवर आणून तीहि माफ होण्याचा संभव उत्पन्न केला. विधिमंडळ व लोक प्रतिनिधिमंडळ यांची वाढ केली.

गांधीजींनीं यांच्या संस्थानला दिलेली ' रामराज्य ' ही पदवी हें सर्व पाहिल्यानंतर सार्थ वाटूं लागते. प्रभातचा तुकाराम हा चित्रपट आणि त्यांतील तुकारामाची भूमिका यांना अत्यंत आवडली. ती भूमिका करणारे पागनीस यांना बोलावून यांनीं त्यांचा मुद्दाम सत्कार केला.

## य

**यंदे, दामोदर सावळाराम**—( जन्म स. १८६१– मृत्यु स. १९४४ नवं. २७ ) महाराष्ट्रांतील प्रसिद्ध छापखानदार व प्रकाशक.

स. १८७८ च्या सुमारास मुंबईत ट्राम्वे कंपनी सुरू झाली. तीमध्यें दरमहा २५ रु.वर यांनीं नोकरी पत्करली. कै. जोतिराव फुले वगैरेंचीं व्याख्यानें ऐकून यांचें वर्तमानपत्र काढण्याकडे लक्ष वेधलें. आवटे यांच्या सहकार्यानें हे कामें करीत. पुढें आवटे बडोद्यास गेले व त्यांनीं यांनाहि बडोद्यास नेलें ( १८८३ सुमार ). पुढें दोघांचा बेबनाव होऊन यांनीं सयाजीविजय पत्र सुरू केलें. तें एके काळीं केसरीच्या खालोखाल लोकप्रिय होतें. पण १८९९ मध्यें यांना बडोदें सोडून मुंबईस यावें लागलें व इंदुप्रकाश पत्राची जबाबदारी घ्यावी लागली. पण इंदुप्रकाशची मालकी बदलत गेली व तें पत्र व सयाजीविजय बंद पडलें. यांनीं दामोदर सावळाराम आणि मंडळी व आर्यधर्मग्रंथमाला काढून अनेक महत्त्वाचे ग्रंथ प्रसिद्ध केले.

यांचीं वर्तमानपत्रें—१ सृष्टिदर्पण ( साप्ताहिक ), २ शेतकऱ्यांचा कैवारी ( आवटे यांच्या सहकार्यानें ), ३ बडोदावत्सल ( आवटे यांच्या सहकार्यानें, मराठी-गुजराथी ), ४ सयाजीविजय (मराठी, इंग्रजी व गुजराथी प्रथम साप्ताहिक नंतर अर्धसाप्ताहिक ), ५ इंदुप्रकाश दैनिक, ( १८९९ ) नंतर ६ श्रीशिवाजी ( साप्ताहिक ).

कादंबरी– वीरमती ( ४ आवृत्त्या-शिवाय गुजराथी व हिंदी भाषान्तर ). या कादंबरीच्या कथानकावर नेपाळकरांनीं एक नाटकहि लिहिलें होतें.

**येडुरकर, वेदाचार्य सखारामभट्ट बाळकृष्ण-भट्ट**—( जन्म स. १८८७ सप्टें. २३ ) सुप्रसिद्ध दशग्रंथी वैदिक व विलक्षण स्मरणशक्तीचे गृहस्थ.

जन्मस्थान येडूर ( ता. चिकोडी ). हे कुरुंदवाडास राहत. यांचे अजोबा सखारामशास्त्री व मामा नारायणशास्त्री एकसंबेकर नामांकित वैदिक होते. हे ऋग्वेद-संहिता वडिलांच्यापाशीं शिकले. पण पुढें दशग्रंथ नरसोबाच्या वाडीचे बाळंभट दत्तंभट दामले यांच्यापाशीं शिकले. शके १८४३ सालीं पुणें वेदशास्त्रोत्तेजक सभेंत दशग्रंथाची परीक्षा दिली. त्या वेळीं यांना दोनशें-पैकीं एकशेंएक्याण्णव गुण मिळाले.

यांची स्मरणशक्ति विलक्षण आहे. हे ऋग्वेदसंहिता सरळ तर बिनचूक म्हणतातच, पण उलट, एकान्तरित, वेगळाल्या अष्टकांतील सूक्तें एकाच वेळीं पहिला, दुसरा, तिसरा अशा मंत्रक्रमानें, आंकड्यांवरून मंत्र, मंत्रावरून आंकडे वगैरे प्रकारें सहज म्हणतात. या यांच्या स्मरण-शक्तीमुळें यांना महाराष्ट्रांतील अनेक शहरांतून मानपत्रें मिळालीं असून श्रीजगद्गुरु शंकराचार्य मठ संकेश्वर यांनीं यांस वेदाचार्य अशी पदवी दिली आहे.

जटाघनाचीं पारायणें यांनीं अनेक केलीं आहेत. औंधचें स्वाध्यायमंडळ व पुण्याचे वैदिकसंशोधनमंडलास ऋग्वेदाची शुद्ध प्रत छापण्यास यांचा फार उपयोग झाला

## र

**रणजीतसिंहजी, विभासिंहजी**—( जन्म स. १८७७ सप्टें. १०–मृत्यु स. १९३३ एप्रिल २ ) 'रणजी' या नांवानें सर्वपरिचित असणारे जगप्रसिद्ध हिंदी क्रिकेट-पटु व नव्या हिंदी क्रिकेटचे जनक.

नवानगर संस्थानांतील सरोदर हें गांव यांचें जन्म-स्थान. यांच्या वडिलांचें नांव जीवनसिंहजी. नवानगरचे जामसाहेब विभासिंहजी यांना हे दत्तक गेले. १९ मार्च १९०७ ला हे नवानगरच्या गादीवर बसले. यांच्या मागून यांचे पुतणे दिग्विजयसिंहजी गादीवर आले.

राजकोटच्या राजकुमार कॉलेजांत कांहीं दिवस शिक्षण घेतल्यानंतर हे उच्च शिक्षणासाठीं केम्ब्रिजला गेले ( १८८९ ). हिंदुस्थानांत असते वेळेपासूनच यांना

क्रिकेटचा नाद असे. परंतु एक नव्या वळणाचें क्रिकेट खेळण्याची सुरुवात मात्र यांनीं इंग्लंडमध्यें गेल्यानंतरच केली. दिवसेंदिवस यांची लोकप्रियता वाढत गेली व पुढें रणजीतसिंहजी हें लांबलचक नांव लुप्त होऊन हे ' रणजी ' या नांवानें सर्वपरिचित झाले.

ससेक्स कंट्री टीमचे सुरुवातीला स्किपर व नंतर आधारस्तंभ या नात्यानें यांनीं अनेक विक्रम केले. १८९९-१९०४ या सहा वर्षांत यांनी तेरा हजार सातशें नव्याण्णव धांवा व त्रेचाळीस शतकें काढलीं. या काळांत धांवांच्या दृष्टीनें यांचा इंग्लंडमध्यें पहिला नंबर दोनदां, दुसरा दोनदां व तिसरा दोनदां लागला. याशिवाय एका महिन्यांत हजार धांवा काढण्याचा विक्रमहि यांनीं तीनदां केला.

ससेक्स टीमची मुख्य भिस्तहि यांचेवरच असे. पंचवीस तीस धांवांत इतक्या नांवाजलेल्या टीमचे दोन गडी बाद केल्याच्या खुशींत ससेक्स टीमचे विरोधक येतात तों हे मैदानांत प्रवेश करीत व मग चारशें धांवा झाल्यानंतरहि बाद झालेल्या गड्यांची मूळ संख्या कायम पाहून त्या टीमच्या बळाचें खरें गमक सर्वांच्या ध्यानांत येई.

चेंडूच्या निरीक्षणाबाबतचा यांचा जलदपणा अतुल असे. मात्र चेंडू अगदीं पायाला भिडेपर्यंत हे मारीत नसत. आउट झाले अशा अपेक्षेनें प्रेक्षक माना उंच करून पाहूं लागतात तों अगदीं शेवटच्या क्षणीं यांचें शरीर पुढच्या पायावर वांकें, बॅट प्रकाशांत चमकल्यासारखी वाटे व अक्षरशः वाऱ्याच्या वेगानें यांचा चेंडु षटकारावर धडक खाई.

नव्या वळणाच्या इंग्लिश व हिंदी क्रिकेटचें जनकत्व यांचेकडे दिलें जातें. चेंडू टाकणारानें चेंडू टाकावयाचा व तो मारणारानें तितक्याच सरळपणानें मारावयाचा असें ' चेंडुफळी 'च्या खेळाचें स्वरूप असलेल्या क्रिकेटला यांनीं आधुनिक स्वरूप प्राप्त करून दिलें. सरळ आलेल्या चेंडूला मनगटाच्या लहानशा झटक्यानें यांनीं षटकाराची जागा दाखविण्यास सुरुवात केली. यांची Leg-Theory व Body Line Bowling अजूनहि अतुल समजण्यांत येते.

नरेंद्रमंडळाचे व्हाइस चॅन्सेलर असतां ( १९३२ ) नरेंद्रमंडळाचा वृत्तान्त वाचण्याच्या वेळीं यांच्या फेडरेशन विरोधाबद्दल खुद्द व्हाइसरॉय लॉर्ड विलिंग्डन यांनीं हरकत घेऊन यांच्या भाषणाला अडथळा आणला. तेव्हां आपलें वृत्तान्त वाचनाचें काम तेथेंच थांबवून हे दिल्लीहून निघून आले. ही गोष्ट यांच्या मनाला पुढें अनेक दिवस लागून राहिली होती. नंतर लवकरच हे मृत्यु पावले.

पतियाळाचे महाराजांनीं यांच्या नांवानें सुरू केलेली ' रणजी ट्रॉफी ' हें यांचें क्रीडाक्षेत्रांतील अत्युच्च स्मारक होय ( १९३४ ). त्यासाठीं दरवर्षी हिंदुस्थानांतील निरनिराळ्या प्रांतांत मोठ्या हिरीरीनें होणारे सामने यांची नव्यानें आठवण करून देतात.

यांचे ग्रंथ—The Jubilee Book of Cricket ( 1897 ).

**रविवर्मा, राजा**—( जन्म स. १८४८ एप्रिल २९– मृत्यु स. १९०६ ऑक्टो. २ ) पौर्वात्य चित्रें पाश्चात्य पद्धतीनें काढणारे जगप्रसिद्ध चित्रकार.

जन्मस्थान विलिमनूर ( त्रावणकोर संस्थान ). जात मल्याळी क्षत्रिय. हें गांव यांच्या घराण्याला लष्करी पेशांतील कामगिरीबद्दल इनाम मिळालें होतें. यांचें घराणें सुसंस्कृत व संस्कृतज्ञ असे. यांनाहि संस्कृत चांगलें येई. यांच्या चौदाव्या वर्षीच त्रावणकोरच्या महाराजांची भेट होऊन त्यांनीं यांच्या चित्रकलेच्या नादाला उत्तेजन दिलें. पुढें तर त्यांच्या थोरल्या बहिणीशीं यांचें लग्न झालें ( १८६६ ). त्रावणकोरचे महाराज केरळवर्मा यांच्याकडे थिओडॉर जॉन्सन हा चित्रकार आला. त्याचें अनुकरण करण्याचा यांनीं प्रयत्न केला. प्रथम कित्येक वर्षे हे जलरंग चित्रलेखनाचा अभ्यास करीत. नंतर हे तैलचित्रांनीं विख्यात झाले. मद्रासच्या चित्रकला प्रदर्शनांत एका नायर स्त्रीच्या चित्राबद्दल सुवर्णपदक मिळून यांची सर्वत्र वाहवा झाली ( १८७३ ). यांचें छत्तीस रंगांतील शकुंतलापत्रलेखन हें चित्र ड्यूक ऑफ बकिंगहॅम यांनीं विकत घेऊन स्वतःचें चित्रहि यांच्याकडून काढून घेतलें ( १८७८ ).

नंतर बडोदें, भावनगर, म्हैसूर वगैरे सरकारांनीं यांच्याकडून चित्रें काढून घेतलीं. जुन्या संस्कृत काव्यांचा अभ्यास यांचा होताच. आतां जुन्या पोषाख वगैरेचा अभ्यास करण्याकरितां यांनीं प्रमुख ठिकाणीं प्रवास केला आणि बडोदें सरकारच्या नव्या राजवाड्यांत रामायण महाभारतांतील चित्रें काढलीं. या चित्रांच्या मुद्रणाकरितां यांना रविवर्मा प्रेस मुंबईस काढणें भाग पडलें. तो आतां मळवली स्टेशनजवळ आहे. यांचीं चित्रें

घरोघर पोंचण्यास यांच्या या रंगचित्रमुद्रणालयाचा अत्यंत उपयोग झाला.

हिंदुस्थानच्या प्रत्येक राजवाड्यांत व हिंदुस्थानांतल्या प्रत्येक घरांत यांचें चित्र पोंचलें आहे असें म्हणण्यांत अतिशयोक्ति नाहीं. यांच्या एका नग्न स्त्रीच्या चित्रावरून यांच्यावर खटला झाला होता. पण तें चित्र मनावर नीतिविघातक परिणाम करीत नाहीं असें ठरलें.

हे स्वतः मल्याळी असूनहि यांच्या सर्व चित्राला महाराष्ट्रांतील पोषाख असतो. 'चित्रास इतका योग्य पोषाख दुसऱ्या प्रान्तांत नाहीं. या लोकांच्या लुगडें नेसण्याच्या विशेष पद्धतींमुळें स्त्रियांचें सौंदर्य विशेष खुलून दिसतें. शिवाय त्यांत सुटसुटीतपणा आहे' असें हे त्याचें कारण देत.

यांच्या चित्रांत स्त्रियांचीं चित्रें इंग्लिश वळणावर धिप्पाड व अधिक प्रौढ वाटतात. मात्र चेहऱ्यावरील भावनिदर्शनांत यांचा हातखंडा असे. तसेंच स्मृतिचित्रेंहि हे उत्कृष्ट काढीत.

वैचित्र्य, समप्रमाणत्व, साधेपणा, व्यवस्थितपणा, आकृतींची मृदुता, पावित्र्य, उज्वलता, आकर्षकपणा इत्यादि चित्रांत आवश्यक असणारे गुण यांच्यांत भरपूर आढळत. यांच्या चित्रांत अनेक सूक्ष्म भावना हळुवारपणें ग्रथित करण्याचा प्रयत्न आढळतो.

लहानशाच चित्रामध्यें मानवी स्वभावाच्या विविध भावना प्रकट करणारीं अनेक व्यक्तिचित्रें रेखाटण्यांत यांचा हातखंडा आहे. 'कृष्णशिष्टाई' हें यांचें चित्र या दृष्टीनें नमुनेदार आहे. एक तसूभरहि जमीन देणार नाहीं अशा अभिनिवेशानें हातांत तलवार घेऊन ताठ उभा राहिलेला दुर्योधन, हाताची जुडी करून असहाय बसलेला धृतराष्ट्र, नाइलाज होऊन मान खालीं घालून बसलेले भीष्माचार्य, बावरून जाऊन एकमेकांच्या कानांत कुजबुजणारा नोकर वर्ग व या सर्व निकराच्या पार्श्वभूमीवर आत्मविश्वासानें व शांतपणें बसलेला कृष्ण ही सजावट निश्चितपणें कौशल्यपूर्ण आहे.

**रहिमतखाँ**—( मृत्यु स. १९२२ जून ) विख्यात गवई.

ग्वाल्हेरच्या मिया हद्दूखांचे हे कनिष्ठ पुत्र. वडिलांच्या पाशीं यांनीं गायनाचा अभ्यास केला. निसारहुसेन व विष्णुपंत छत्रे यांचे हे सहाध्यायी. वडिलांच्यामागें यांना अफूचें व्यसन लागलें. काशीमध्यें अगदीं हीन स्थितींत भीक मागतांना विष्णुपंत छत्रे यांना हे आढळले. त्यांनीं गुरुबंधु म्हणून यांचें शेवटपर्यंत योग्य संगोपन केलें. यांच्या बहिणीचा नवरा इनायतखां हा नेपाळच्या दरबारांत गवई होता. तेथें झालेल्या भारतीय गवयांच्या जलशांत यांना पहिल्या प्रतीचें बक्षीस मिळालें (१९००). यांचा आवाज मधुर, गोड, खणखणीत, सुरेल, सहज आणि विलक्षण तयारीचा होता. हे शेवटीं कुरुंदवाड येथें वारले. हे गातांना अगदीं सहज गात. यांना गायनाचे बादशाह म्हणत.

**राजगोपालाचारी, चक्रवर्ति**—( जन्म स. १८७९ ) कांग्रेसमधील सुप्रसिद्ध राजकारणी मुत्सद्दी व तामीळ भाषेतील सुप्रसिद्ध लेखक.

यांचा जन्म मद्रास प्रान्तांतील होसुर गांवीं तामीळ ब्राह्मणाच्या घराण्यांत झाला. यांचें घराणें धर्मभोळेपणा व विद्याव्यासंग यांबद्दल प्रसिद्ध आहे. बंगलोर व मद्रास येथें शिक्षण संपवून हे बी. ए., एलएल. बी. झाले. कुशाग्र बुद्धीचे वकील म्हणून यांची सर्वत्र ख्याति असे. १९१७ सालीं हे सालेम म्युनिसिपालिटीचे अध्यक्ष झाले आणि दोन वर्षांच्या कारकीर्दींत यांच्या कर्तृत्वाची कल्पना लोकांना आली. म. गांधींच्या असहकार चळवळींत शिरून यांनीं आपली वकिली सोडली व तेव्हांपासून हे बहुतेक चळवळींत तुरुंगांत गेले.

अखिल भारतीय कॉंग्रेस कमेटीचे मुख्य सेक्रेटरी असतां ( १९२१-१९२२ ) व यंग इंडियाचे संपादक असतां गांधीवादाचा पुरस्कार करून व गया राष्ट्रसभेंत कौन्सिल प्रवेशाला विरोध करून यांनीं आपल्या बुद्धिवादाची व गांधीनिष्ठेची चुणूक दाखविली.

यांनीं सूत काढणें वगैरे लहान उद्योग व अज्ञान जनतेला अस्पृश्यता, दारू पिणें वगैरेंचे दुष्परिणाम पटवून देण्याकरितां सालेमपासून जवळच असणाऱ्या त्रिचेनगोडी या गांवीं गांधीआश्रम नांवाची संस्था स्थापन केली आणि लोकांचा विश्वास संपादन केला. तामीळनाड प्रॉव्हिन्शियल कॉंग्रेस कमेटीचे अध्यक्ष असताच दक्षिण भारत हिन्दी प्रचार संघ वगैरे संस्थांच्या अधिकारपदांवरून यांनीं फार महत्त्वाची कामगिरी केली.

पुढें राष्ट्रसभेंत असतांना राष्ट्रसभेचा कायदेमंडळावर बहिष्कार होता तरी यांची कायदेशीर दृष्टि अस्पृश्यतानिवारणाकरितां कायद्याच्या सामर्थ्यावर केन्द्रित झाली होती. मध्यवर्ति कायदेमंडळांत तसा कायदा घडविण्याचा

यांनीं प्रयत्न केला ( १९३३ ) आणि इतर प्रान्तांत न झालेला अस्पृश्यतानिवारणाचा कायदा स्वतः मुख्य प्रधान असतां पास करून घेतला आणि मदुरेच्या मीनाक्षीची पूजा अस्पृश्यांकडून करविली.

गांधीवादाचा पुरस्कार करून खुद्द म. गांधींनाहि त्यांच्या तत्त्वज्ञानाबद्दल चार शब्द सुनावणारे हे गृहस्थ शेवटीं गांधीवाद व राष्ट्रसभा यांच्यांतून बाहेर पडले आणि यांनीं आपणास राष्ट्रकल्याणाच्या दृष्टीनें योग्य वाटेल तें बोलण्याचा अधिकार प्राप्त करून घेतला.

मंत्रिमंडळाचा स्वीकार करावा, राजीनामे देऊं नयेत आणि मुसलमानांशीं पाकिस्तान मान्य करूनहि तडजोड करावी वगैरे अनेक योजनांचा पुरस्कार करण्याचें १९३७ पासून यांचें धोरण आहे. १९३७ सालीं मंत्रिमंडळें स्वीकारतांना ब्रि. गव्हर्नमेंटकडून आश्वासन मागून कांहीं महिने राष्ट्रसभेनें मंत्रिमंडळें लोंबत ठेविलीं. तसेंच युद्धनिमित्तानें मंत्रिपदें सोडलीं, क्रिप्स योजना नाकारली, १९४२ आगस्ट ८ ला 'चले जाव' चळवळ सुरू केली वगैरे सर्व गोष्टी आपल्याला अमान्य असल्याचा यांनीं उघडच प्रचार केला. त्यामुळें सरकारनें यांना पकडलें नाहीं. बाहेर राहून यांनीं जिना व सरकार यांशीं जुळतें धोरण कसें स्वीकारतां येईल याचाच पाठपुरावा केला. जिनांशीं तडजोड करण्याचा व ४२च्या चळवळीला नवीन वळण देण्याचा यांनीं प्रयत्न केला. त्यामुळें म. गांधी सुटल्यानंतर प्रथम जिनांना भेटले.

अशा प्रकारें बाहेर राहून राजकारण करणारे हे गृहस्थ राष्ट्रसभेचे चार आणे सभासदहि नव्हते. तथापि यांना वर्किंग कमेटींत घेण्यांत आलें व पुनः मुख्य प्रधान करण्याचाहि म. गांधी वगैरेंनीं प्रयत्न केला; तेव्हां मद्रास प्रान्तांतून त्याला सक्त विरोध झाला व टी. प्रकाशम् यांना मुख्य प्रधान निवडण्यांत आलें.

युद्धानंतर होणाऱ्या नव्या घटनांत हिंदुस्थानचें भाग्य दुसऱ्याच्या हातीं देऊन १९१९किंवा १९३० प्रमाणें केवळ लढ्यांत राष्ट्राचें सामर्थ्य खर्ची घालणें यांना पसंत नाहीं. सदोष कां असेना, पण लाभेल त्या राज्यघटनेंत भाग घेऊन ती राबविण्यानें राष्ट्राचें सामर्थ्य वाढवितां येईल, अशा दृष्टीनें १९३५ नंतरच्या यांच्या हालचाली चालू आहेत. उद्योगधंदे, शेती वगैरे क्रान्तिकारक व सामर्थ्यवर्धक कार्ये करण्यांत इतर राष्ट्रें गुंतलीं असतां आपण मात्र केवळ लढ्यांत राष्ट्राचें महत्त्वाचें सामर्थ्य खर्ची घालण्यापासून फायद्यापेक्षां तोटेच अधिक आहेत अशी यांची खात्री आहे. म्हणून या सडेतोड व सूक्ष्म बुद्धीच्या आशावादी गृहस्थानें लोकनिन्दा सहन करूनहि निर्भयपणें घटनात्मक राजकारण करण्याच्या धोरणानें मुलाखती, वाटाघाटी, चर्चा वगैरेंचें चक्र सतत चालू ठेवले आहे.

यांचे ग्रंथ—इंग्रजी-( 1 ) The Way Out (1943), ( 2 ) Jail Diary, ( 3 ) Fatal Cart and other Stories, ( 4 ) Reconciliation Why and How, ( 5 ) Nation's Voice ( गांधीजींचीं व्याख्यानें ).

तामीळ वाङ्मयाचे हे सूक्ष्म अभ्यासक असून यांचें लघुकथा वगैरे ललित वाङ्मय अत्यंत लोकप्रिय आहे. यांच्या कांहीं लघुकथांचें इंग्रजी भाषान्तर यांचे चिरंजीव डॉ. सी. रामस्वामी यांनी करून तें पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलें आहे.

यांची मुलगी म. गांधी यांची सून–श्री. देवीदास गांधी यांची पत्नी होय.

**राजवाडे, कृष्णशास्त्री केशवराव**—( जन्म स. १८१५–मृत्यु स. १९०१ ) संस्कृत पंडित व मराठी ग्रंथकार.

यांचें शिक्षण पुणें विश्रामबाग पाठशाळेंत झालें. तेथेंच यांची उपगुरु म्हणून नेमणूक झाली. ती पाठशाळा बंद झाल्यावर हे गुजराथी संस्कृत पाठशाळेंत मुख्य शिक्षक होते. पुण्यांत अधिक मासांतील भागवत सप्ताह सुरू करणारांपैकीं हे एक होत. हे अनेक वेळा वेदशास्त्रोत्तेजकसभेचे परीक्षक व समारंभाचे अध्यक्ष होते. शेवटीं यांनीं संन्यास घेतला होता.

यांचीं पुस्तकें—संस्कृतचीं मराठी–१ मुद्राराक्षस, २ मालतीमाधव, ३ शाकुन्तल, ४ हरिमीडेस्तोत्र; स्वतंत्र पद्यात्मक–५ उत्सवप्रकाश, ६ ऋतुवर्णन.

**राजवाडे, रावराजे सर दिनकरराव रघुनाथ**—( जन्म स. १८१९–मृत्यु स. १८९६ ) ग्वाल्हेरचे सुप्रसिद्ध दिवाण व राजकारणी पुरुष.

यांचें मूळ गांव रत्नागिरी जिल्ह्यांतील निवें. गोत्र शांडिल्य. ऋग्वेदी चित्पावन ब्राह्मण. यांच्या पूर्वजांना ऐतिहासिक काळीं जोशी या उपनांवाऐवजीं राजवाडे हें नांव प्राप्त झालें. यांचे वडील विंचुरकरांच्या आश्रयानें ग्वाल्हेरास आले. यांच्या वडिलांच्या मागें तवरघारच्या सुभ्याचें काम यांच्याकडे आलें. तें काम यांनीं उत्तम बजावल्यामुळें देवराव जाधवांच्या नंतर ग्वाल्हेर

राज्याची दिवाणगिरी यांच्याकडे आली ( १८५२ ). महाराज जयाजीराव शिंदे अल्पवयी असल्यानें कौन्सिल-मार्फत कारभार चाले. यांनीं जमाखर्चाचा मेळ बस-विण्याकरितां पांच हजारांऐवजीं दोन हजार पगार घेण्यास सुरवात करून स्वतःपासून काटकसरीला सुरवात केली. सर्वत्र सुधारणा, कायद्याची लिपिबद्धता, खात्यांची विभागणी वगैरे करून आपल्या कारभाराकडे सर्वांचें लक्ष वेधून घेतलें.

सत्तावन सालच्या बंडाचा परिणाम ग्वाल्हेरपासून तीन कोसांवर असणाऱ्या मुरारच्या छावणींत बेदिलीच्या रूपानें दिसला. निमचचें बंड मोडण्याकरितां पाठ-विलेल्या सैन्यानें लढण्याचें नाकारल्यानें त्याला परत आणावें लागलें ( १० जून १८५७ ). ग्वाल्हेरचा राजवाडा सुरक्षित वाटेना म्हणून युरोपियन लोक आग्र्याकडे गेले. काल्पीवरून बंडवाले ग्वाल्हेरवर चालून आले. सैन्य फितूर असल्यानें हे महाराजांसह आग्र्यास निघून गेले. सर ह्यू रोजच्या नेतृत्वानें बंडवाल्यांचा मोड करून महाराज जयाजीरावांना पुनः गादीवर बसविण्यांत आलें ( जून १८५७ ). यांनीं पुढें दिवाणगिरी सोडली ( १८५९ ).

१८६१ च्या कायद्याप्रमाणें अस्तित्वांत आलेल्या कायदेमंडळांत हे सभासद होते. धोलपूर, रीवा आणि देवास येथील राजांनीं यांच्याकडून आपल्या राज्याची व्यवस्था लावून घेतली. महाराज मल्हारराव गायकवाड, बडोदा यांच्यावरील विषप्रयोग केल्याच्या आरोपाची चवकशी करण्याकरितां नेमलेल्या हाय कमिशनमध्यें हे होते.

हे नेहमीं गंगेचें पाणी पीत. व्हाइसरॉयना भेटून परत गाडींत बसतांना हे गंगेच्या पाण्यानें हात धूत. लॉर्ड लिटन यांनीं त्याबद्दल विचारलें असतां यांनीं त्याचें कारण स्पष्ट सांगितलें. यांनीं इंग्रजांकडून ग्वाल्हेर राज्याकरितां पुष्कळ सवलती मिळविल्या. सत्तावन सालच्या बंडांत हे सामील झाले असते तर इंग्रजांना हिंदुस्थानांतून पायच काढावा लागला असता; पण केवळ यांच्या-मुळें त्या वेळीं अलाहाबादच्या किल्ल्यांत ग. ज. कॅनिंग गुप्तपणें राहूं शकला व ग्वाल्हेरची शिबंदी बंडवाल्यांस मिळाली नाहीं.

**राजवाडे, इतिहासाचार्य-विश्वनाथ काशी-नाथ**—(जन्म स. १८६३–मृत्यु स. १९२६ डिसें. ३१) महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध वाङ्मयसेवक, अभ्यासक, इतिहास-संशोधक व नवसिद्धान्त प्रतिपादक.

जन्मस्थान कोंकणांत वरसई. हे १८८२ सालीं मॅट्रिक व १८९० सालीं बी. ए. झाले. यांचें सर्व शिक्षण पुणें येथें झालें. यांनीं आपले ‘कनिष्ठ, मध्यम व उच्च शाळांतील अनुभव’ एका लेखांत नमूद केले आहेत (ग्रंथमाला, ले. १७). कांहीं वर्षे यांनीं न्यू इंग्लिश स्कूल, पुणें येथें शिक्षकाचें काम केलें; पण तरुणपणींच पत्नी वारल्यानें ( १८९० सुमार ) यांच्या ध्येयवादी जीवनाला अगदीं स्वतंत्र वळण लागलें. निबंधमाला, काव्येतिहास-संग्रह व नवनीत वगैरेंनीं देश, इतिहास व मराठी भाषा यांविषयींच्या यांच्या अभिमानाला चालना मिळाली. वेदाचे अभ्यासक कै. प्रि. वैजनाथ काशीनाथ राजवाडे यांचे हे धाकटे बंधु.

यांनीं अगदीं प्रारंभीं इंग्रजी भाषेंतील उत्कृष्ट ग्रंथ मरा-ठींत आणण्याकरितां भाषान्तर नांवाचें मासिक काढलें. त्यांत प्लेटोच्या ‘रिपब्लिक’चे भाषान्तर देण्यांत आलें होतें. १८९६ मध्यें प्रो. काथवटे यांच्या सांगण्यावरून हे वाईस गेले आणि तेथील एरंडे यांच्या दप्तराचा पानपत विषयक भाग यांनीं छापण्यास सुरवात केली. पण विठ्ठल छापखाना जळाल्यानें त्यांत तें सर्व मुद्रित भस्मसात् झालें. लगोलग तोच भाग ‘मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड पहिला’ म्हणून वाईस मोदवृत्त छापखान्यांतून भाऊशास्त्री लेले यांनीं प्रसिद्ध केला ( १८९८ ). त्याच्या प्रस्तावनेंत इंग्रज लेखक व बखरी यापेक्षां समकालीन अस्सल कागदपत्रांवरून इतिहास लिहिण्याचें महत्त्व प्रतिपादून पानपत युद्धाची यांनीं अगदीं साग्र नवी माहिती अस्सल पत्रांच्या आधारें लोकांपुढें मांडून आपणांकडे सर्वांचें लक्ष वेधून घेतलें. त्यानंतर म. इ. सा. खंड २ ते ६ व ८ हे ग्रंथमालेंत आणि १६-१९ हे ‘इतिहाससंग्रहा’त व बाकीचे इतरत्र मिळून यांनीं साधनांचे २२ खंड प्रसिद्ध केले.

पण संपादन, संकलन व संशोधन यांपेक्षांहि मिळा-लेल्या साधनांवरून नवेनवे सिद्धान्त प्रतिपादण्यांत यांचा तल्लखपणा विशेष प्रगट होतो. आपल्या इति-हासाचीं साधनें घरोघर विखुरलेलीं असून त्यांच्या द्वारा आपण इतिहासांत मोलाची भर घालूं शकतों असा विश्वास उत्पन्न करून यांनीं लोकांना कार्यप्रवृत्त केलें. महाराष्ट्राचा इतिहास येथील लोकांच्या हातूनच निर्माण झाला पाहिजे, अशी भावना यांनीं लोकांत उत्पन्न केली.

येथील लोकांचा अभ्यास ध्यानांत घेतल्याशिवाय आपलें काम पूर्ण होत नाहीं अशी जाणीव यांनीं बाहेरच्या लोकांना करून दिली.

साधनें प्रसिद्ध करण्याचें काम वाढीस लागल्यानंतर त्याला संघटित रूप देण्याकरितां यांनीं पुणें भारत इतिहास संशोधक मंडळ स्थापन केलें ( १९१० ) आणि त्याला एक प्रकारची शिस्त लावून दिली. पहिलीं सात वर्षे हे या मंडळांत अत्यंत लक्ष घालीत. तसेंच भा.इ.सं. मंडळांतून महानुभावांच्या गुप्त संकेताचा उलगडा यांनीच प्रथम केला व तें वाङ्मयाचें दालन खुलें केलें. पण पुढें पुढें यांचें लक्ष भाषा, व्याकरण व समाज वगैरेकडे विशेष जाऊं लागलें. यांना एकनाथपूर्व ज्ञानेश्वरीचा शोध लागला आणि यांनीं तिचें मुद्रण करून व्याकरण लिहून अगदीं नव्या प्रकाशानें लोकांचे डोळे दिपवून टाकले. यांचें व्याकरणविषयक सर्वच लिखाण अगदीं नव्या विचारांनीं भरलेलें व मौलिक स्वरूपाचें आहे. यांच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध झालेला यांचा मराठी धातुकोश हा ग्रंथहि अत्यंत महत्त्वाचा आहे. मात्र आधारापेक्षां प्रतिभेवर यांचा विशेष भर असतो.

शिवाय यांनीं आरोग्यमंडळ, समाजविचारमंडळ वगैरे मंडळें काढलीं, अनेक प्रस्तावना लिहिल्या व लेखहि पुष्कळ लिहिले. या प्रत्येक ठिकाणीं यांच्या स्वतंत्र बुद्धीचा साक्षात्कार होतो. फार काय, कांहीं नवें सांगावयाचें असल्याशिवाय हे कार्यप्रवृत्तच होत नाहीत. यांच्या प्रत्येक लेखांत देशाभिमान, कळकळ आणि महाराष्ट्राच्या भवितव्याबद्दलची चिन्ता स्पष्ट प्रतीत होते आणि यांचा आत्मविश्वासहि इतका दांडगा आहे कीं यांनीं आपलीं मतें आणि आदेश आग्रहपूर्वक प्रतिपादिलीं आहेत. यांच्या रामदास या निबंधानें स्वामींच्या कार्यकर्तृत्वाचा ठसा जसा वाचकांवर उठतो तसेंच त्यांच्याप्रमाणें त्यागपूर्वक देशकार्य करणारी पिढी निर्माण करण्याचें सामर्थ्यहि अनुभवास येतें. हे जन्मभर अकिंचन, फिरते आणि असंग्रही होते. पूर्व वयांत यांनीं शरीर उत्तम कमविलें होतें. यांनीं तत्त्व म्हणून आपलें सर्व लेखन मराठींतच केलें आणि आपला स्वभाव अत्यंत विक्षिप्त, तुसट व फटकळ असतांनाहि काम पुढें चालविणारा व चाहता वर्ग निर्माण केला. यांच्या चाहत्यांनीं यांच्या स्मरणार्थ धुळें येथें राजवाडे संशोधक मंडळ स्थापन केलें. १९२७ त पुणें येथें भरलेल्या पहिल्या 'शारदोपासकसंमेलना'चें अध्यक्षस्थान यांस देण्यांत आलेलें होतें.

यांचें वाङ्मय—ऐतिहासिक कागदपत्रें-१-२२ खंड-'मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें' ( १८९८-१९१७ ); संशोधित ग्रंथ-२३ एकनाथपूर्वकालीन ज्ञानेश्वरी, २४ राधामाधवविलासचंपू, २५ महीकावतीची बखर; व्याकरण-२६ सुबन्तविचार, २७तिङन्तविचार, २८मराठी भाषेचा उलगडा, २९ ज्ञानेश्वरीचें व्याकरण; कोश-३० राजवाडे मराठी धातुकोश ( तीस हजार धातूंवरून मराठी शब्दांची सिद्धि, संपादक-प्रा. कृ. पां. कुलकर्णी ).

पुनर्मुद्रित लेखसंग्रह—१ ऐतिहासिक प्रस्तावना (फक्त साधन खंडांच्या ), २ संकीर्ण लेखसंग्रह ( ग्रंथमाला ), ३-४ राजवाडे संकीर्ण निबंध ( २-३ भाग ). यांपैकीं १, ३, ४ हे शं. ना. जोशी यांनीं एकत्र केले आणि चित्रशाळेनें प्रसिद्ध केले, ५ रामदास व कादंबरी; मासिक-भाषान्तर ( १८९५, विठ्ठल छापखान्यांच्या आगींत नष्ट, सुमारें दोन वर्षे चाललें ).

**राजा, एम्. सी.**—( जन्म स. १८८३-मृत्यु स. १९४३ आगस्ट ) हरिजन समाजाचे सुप्रसिद्ध पुढारी व मद्रास प्रान्तांतील मंत्री.

यांचें शिक्षण वेस्ले कॉलेज, मद्रास, ख्रिश्चन कॉलेज, टीचर्स कॉलेज ( सैद पेठ ) इत्यादि ठिकाणीं झालें. १९२४ सालीं शिक्षक म्हणून यांची नेमणूक झाली. मद्रास युनिव्हर्सिटीच्या सेनेटमध्यें हे निवडले गेल्यावर अस्पृश्यांकरितां मोफत वसतिगृहाची यांनीं स्थापना केली. स्काउटच्या चळवळींत हे पुढाकार घेत. १९१६ सालीं मद्रास, आदिद्रविड महाजन सभेचे हे कार्यवाह व अनेक शिष्टमंडळांचे पुढारी होते. १९१९ पासून मद्रासचे ऑननरी प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट व मद्रास कौन्सिलमध्यें यांची नेमणूक झाली. १९२६ सालीं ऑल इंडिया डिप्रेस्ड क्लासेस असोसिएशन मद्रासचे व १९२८ सालीं सिलोनचे हे अध्यक्ष होते. नंतर इंडियन सेंट्रल कमेटीवर यांची नेमणूक झाली. मद्रासच्या जस्टिज पार्टीचे हे एक प्रमुख असून यांना रावबहाद्दूर ही पदवी होती. हे गोलमेज परिषदेचे सभासद असून संयुक्त मतदार संघाच्या कल्पनेवर उभारलेला यांचा राजा-मुंजे करार प्रसिद्ध आहे. पुढें पुणें करार यांच्याच साह्यानें झाला. हे मद्रास प्रान्तांतील कॉंग्रेस मंत्रिमंडळांत होते.

**राजेंद्रप्रसाद, डॉ.**—(जन्म स. १८८४ डिसें. ३) बिहार प्रांतांतील सुप्रसिद्ध कॉंग्रेस कार्यकर्ते व पुढारी.

सारन जिल्ह्यांतील ( बिहार ) जिरदाई हें गांव यांचें

जन्मस्थान. यांच्या वडिलांचें नांव मुन्शी महादेव. जात कायस्थ. यांचें सर्व बालपण चापरा येथें गेलें. मॅट्रिक ते एम्. एल्. पर्यंतच्या सर्व परीक्षा पहिल्या नंबरानें पास झाल्यानंतर यांनीं कलकत्त्याला वकिली करण्यास सुरुवात केली. यानंतर पाटणा येथें हायकोर्टाची स्थापना होतांच हे पाटण्याला गेले. उत्कृष्ट कायदेपंडित म्हणून यांची अजूनहि प्रसिद्धि आहे.

१९१७ सालीं चंपारण्याच्या सत्याग्रहाचे वेळीं यांची गांधीजींशीं गांठ पडली व हे गांधीवादाचे निःसीम उपासक बनले. १९२० च्या असहकाराच्या चळवळींत यांनीं आपल्या वकिलीचा व पाटणा युनिव्हर्सिटीच्या उपकुलगुरुपदाचा त्याग केला व हे पाटणा राष्ट्रीय विद्यालयाचे प्रमुख झाले. परंतु पुढें तें विद्यालय सरकारच्या अवकृपेला बळी पडलें.

तेव्हांपासून बिहार प्रांतांतील कांग्रेस चळवळीचें नेतृत्व यांचेकडे आलें. बिहार प्रांतिक कॉंग्रेस कमेटीचे अध्यक्ष व कॉंग्रेसच्या वर्किंग कमेटीचे सभासद या नात्याने यांनीं बिहार प्रांतांत केलेली तरुणांची संघटना व बिहार भूकंप फंडाची कामगिरी विशेष महत्त्वाची आहे.

१९२८ सालीं हे ब्रह्मदेशांतील शेतकऱ्यांचीं गाऱ्हाणीं समजावून घेण्यासाठीं ब्रह्मदेशला गेले. त्यानंतर कांहीं कायद्याचे कामासाठीं इंग्लंडला गेले असतां हे इंटरनॅशनल ॲन्टी-वॉर कॉन्फरन्सला हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून हजर राहिले. ऑस्ट्रियांत गेले असता हे फॅसिस्ट लोकांच्या हल्ल्यांत सांपडले व मोठ्या शर्थीनें यांची सुटका झाली. वर्ल्ड यूथ कॉन्फरन्सलाहि हे हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून हजर राहिले होते.

१९२२ सालच्या गया कॉंग्रेसचें स्वागताध्यक्षपद व १९३४ सालीं वरळी ( मुंबई ) येथें भरलेल्या कॉंग्रेसचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें. तसेंच १९३९ सालीं श्री. सुभाषचंद्र बोस यांनीं अध्यक्षपदाचा राजीनामा दिल्यानंतरहि यांनींच बदली अध्यक्ष म्हणून काम केलें. १९२३ सालीं मद्रास येथें भरलेल्या हिंदी साहित्य संमेलनाचे हे अध्यक्ष होते.

नऊ ऑगस्ट चळवळींत बिहारमधील हजारीबागच्या तुरुंगांत स्थानबद्ध असतां यांनीं लिहिलेला 'India Divided' हा ग्रंथ यांचे सुटकेनंतर प्रसिद्ध झाला. पाकिस्तानवरील सर्वोत्कृष्ट ग्रंथ अशी मान्यता आतां त्यास मिळाली आहे. आपलें मत न देतां पाकिस्तानची कल्पना व तिचे परिणाम यांचें साधार चित्र यांनीं वाचकांसमोर उभें केलें आहे. विभागणी होऊन संस्कृति, राजकारण अशा सर्वच दृष्टीनें खच्ची झालेला हिंदुस्थान व एकत्र राहून लहान जातींना संरक्षण देऊन उत्कर्ष पावणारा हिंदुस्थान अशीं चित्रें उभीं करून निवडीचें काम यांनीं वाचकांवर सोंपविलें आहे.

गांधीवादाचें अनुयायित्व स्वीकारूनहि यांनीं त्यागी व बुद्धिमान लोकसेवक असें आपलें स्वतंत्र व्यक्तित्व कायम राखलें आहे. यांच्यासारख्या साध्या राहणीच्या व सेवावृत्तीच्या कष्टाळु कार्यकर्त्यांवरच राष्ट्रसभेचें प्रचंड बळ आपणांस दिसत आहे.

यांचे ग्रंथ—( 1 ) India Divided (1946).

**राधाकृष्णन्, सर सर्वपल्ली**—(जन्म स.१८८८) पूर्व व पश्चिम संस्कृतीचा मेळ घालणारे हिंदी जगप्रसिद्ध तत्त्वज्ञ व पंडित.

मद्रास प्रांतांतील तिरूतनी हें गांव यांचें जन्मस्थान. जर्मन मिशन स्कूल, तिरुपति व मद्रास ख्रिश्चन कॉलेज येथें आपलें शिक्षण संपवून हे एम्. ए. झाले. त्यानंतर मद्रासचें प्रेसिडेन्सी कॉलेज ( १९११-१६ ), म्हैसूर युनिव्हर्सिटी ( १९१८-२१ ), कलकत्ता युनिव्हर्सिटी ( १९२१-३१ ) अशा अनेक ठिकाणीं तत्त्वज्ञानाच्या प्राध्यापकाचीं कामें केल्यानंतर यांची आंध्र युनिव्हर्सिटीच्या उपकुलगुरूच्या जागीं नेमणूक झाली ( १९३१ ).

मध्यंतरीं इंटरनॅशनल कॉंग्रेस ऑफ फिलॉसफीच्या लंडनच्या अधिवेशनाला हे कलकत्ता युनिव्हर्सिटीचे प्रतिनिधि म्हणून हजर राहिले असतां यांना ऑक्सफर्ड येथें Hindu View of Life या विषयावर 'अप्टन लेक्चर्स' देण्यासाठीं पाचारण करण्यांत आलें. यांचीं हीं व्याख्यानें विचारांच्या दृष्टीनें इतका नवीन ठरलीं कीं यांना हिबर्ट, हास्कल अशा अनेक व्याख्यानमाला गुंफण्याची संधी देण्यांत आली व शेवटीं तर यांना ऑक्सफर्ड युनिव्हर्सिटींत स्पाल्डिंग प्रोफेसर नेमण्यांत आलें ( १९३६ ). यानंतर लवकरच युद्ध सुरू झालें व पासपोर्टच्या अभावीं यांना युद्धकाल हिंदुस्थानांतच घालवावा लागला. त्या वेळीं बनारस हिंदु विश्वविद्यालयाच्या उपकुलगुरूचें काम यांनीं केलें.

स्वामी विवेकानंद व रामतीर्थ यांच्यानंतर यांनींच परिणामकारक पद्धतीनें हिंदु धर्माचें उज्वल स्वरूप

पाश्चात्यांच्या नजरेस आणून दिलें. 'आधिभौतिक सुधारणा कितीहि झाल्या तरी सृष्टीचें गूढ उकलण्याच्या कामीं शेवटीं अध्यात्मालाच शरण जावें लागतें; व्यक्तिगत भावना किंवा आकांक्षा यांच्या दृष्टीनें या सर्व वस्तूंची किंमत शून्य ठरते; धर्माचा संबंध आयुष्यांतील प्रत्येक क्षणाशीं असून तो लेखन किंवा विचार यांचा विषय नसून आचाराचा विषय आहे; हिंदुस्थानांतील खालच्यांतील खालच्या माणसांत सामान्य नीतिनियमाप्रमाणें धर्माचे नियम व्यवहारांत उतरविण्याचा प्रयत्न आढळतो;'–अशा पद्धतीनें आधुनिक चिकित्सक व्यासपीठावरून हिंदु धर्माचें स्पष्टीकरण करण्याचें काम यांनीं आपल्या परिणामकारक इंग्रजी वक्तृत्वानें उत्कृष्ट बजावलें असून जगांतील विद्वानांत स्वतःला मानाचें स्थान मिळविलें आहे.

यांचे ग्रंथ—(1) The Philosophy of Rabindranath Tagore (1918), (2) The Reign of Religion in Contemporary Philosophy (1920), (3) Indian Philosophy (लायब्ररी ऑफ फिलॉसफी ग्रंथमालेंत, दोन खंड, १९२३), (4) The Hindu View of Life (१९२७, चौथी आवृत्ती १९३७), (5) The Religion we need (1928), (6) Kalki or the Future of Civilization (1929), (7) An Idealist View of Life (1932), (8) East and West in Religion (1933), (9) The Heart of Hindustan (1932), (10) Freedom and Culture (1936). (11) The World's Unborn Soul (1936), (12) My Search for Truth (Religion in Transition या प्रातिनिधिक ग्रंथांतील प्रमुख लेख), (13) The Philosophy of the Upanishadas, (14) The Vedanta according to Samkara and Ramanuja, (15) Contemporary Indian Philosophy (प्रातिनिधिक हिंदी तत्त्वज्ञांचा लेखसंग्रह), (16) Mahtma Gandhi (महात्माजींच्या सत्तरीनिमित्त सर्व जगांतील लेखकांचा प्रातिनिधिक लेखसंग्रह).

इंग्लंडमधील सुप्रसिद्ध नवविचारप्रवर्तक पंडित सी. ई. एम्. जोड यांनीं यांच्या तत्त्वज्ञानाचें विवेचन करणारा Counter-Attack from the East हा ग्रंथ लिहिला आहे.

**रानडे, न्यायमूर्ति-माधव गोविंद**—(जन्म स. १८४२ जाने. १८–मृत्यु स. १९०१ जाने. १६) हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध समाजसुधारक, अर्थशास्त्रज्ञ, राजकारणी, दूर दृष्टीचे विवेचक व स्वतंत्र भारताचे द्रष्टे.

यांचें घराणें भारद्वाजगोत्री चित्पावन ब्राह्मण. जन्मस्थान निफाड. यांचें प्राथमिक शिक्षण कोल्हापुरास व पुढील शिक्षण मुंबईस होऊन हे एम्. ए., एलएल्. बी. झाले (१८६६). नंतर यांनीं ॲडव्होकेटची परीक्षा दिली (१८७१).

हे शाळा खात्यांत ॲक्टिंग मराठी ट्रान्स्लेटर (१८६६-६७), अक्कलकोटचे कारभारी व कोल्हापूरचे न्यायाधीश, मुंबईस प्राध्यापक, मुंबई हायकोर्टांत असिस्टंट रिपोर्टर, सब्जज्ज, स्मालकॉज जज्ज, फायनान्स कमेटीचे सभासद व शेवटीं हायकोर्टाचे जज्ज झाले (१८९३). १८८७ मध्यें सी. आय. ई. ही पदवी मिळून मुंबई सरकारकडून यांची तीन वेळां कौन्सिलर म्हणून नेमणूक झाली.

राजकीय, सामाजिक, धार्मिक, औद्योगिक व आर्थिक चळवळीचें मार्गदर्शकत्व यांनीं अशा दूर दृष्टीनें व विचारीपणानें केलें कीं कालान्तरानें यांच्या विचारीपणाबद्दल अधिकच खात्री पटत चालली आहे.

यांना हिन्दी अर्थशास्त्राचे जनक मानण्यांत येतें. इंग्रजी राज्य येतांच वहातुक सुलभ करण्यांत आली आणि परदेशांतील मुबलक माल खेड्यांपर्यंत पोंचविण्यांत येऊन इकडचे लोक बेकार झाले व शेतीवर वाजवीपेक्षां जास्त भार पडून आर्थिक व्यवस्था गडगडली. दादाभाई नवरोजी प्रभृतींनीं हे आर्थिक शोषण पद्धतशीरपणें दाखविलें तरी इंग्रजांच्या खुल्या व्यापाराच्या गोंडस तत्त्वावर यांनीं पहिला जोराचा हल्ला केला आणि संरक्षक व्यापाराचें तत्त्वच हिंदुस्थानला तारक होईल हें तत्त्व चालू प्रवाहाच्या विरुद्ध बोलण्याचें धैर्य करून पद्धतशीरपणें पुढें मांडलें. सतत पंधरा वर्षे (१८७८-१८९३) पुणें सार्वजनिक सभेच्या त्रैमासिकांत यांचे या विषयावर लेख येत. रा. ब. ग. व्यं. जोशी व गो. कृ. गोखले यांच्यासारख्या थोर लोकांवर यांच्या त्या लेखांची छाप असे. दीर्घकालानंतर यांचें हें म्हणणें बरोबर असल्याचें लोकांच्या प्रत्ययास येत आहे.

यांच्या वेळेपर्यंत, मुसलमानांनंतर राज्य इंग्रजांचें, मध्यें मराठ्यांची राजवट झालीच नाहीं अशा स्वरूपांत हिंदुस्थानचा इतिहास लिहिला जाई. पण ही समजूत

चुकीची आहे, हिंदुस्थानचा इतिहास अभ्यासणारास मराठ्यांची राजवटहि विशेष लक्ष घालून अभ्यासण्यासारखी आहे, बाबर वगैरेंनीं उभारलेल्या राज्यापेक्षां शिवाजी महाराजांच्या राज्याबद्दल लोकांना विशेष आपलेपणा वाटे, हें यांनीं प्रथम सिद्ध केलें. शिवाजीची कैद, संभाजीचा वध, जिंजीचा वेढा, पानपतचा पराभव व नारायणरावाचा वध वगैरे प्रसंगांतून मराठेशाही निभावून गेली याचे मुळाशीं या सत्तेच्याबद्दल लोकांच्या मनांतील कमालीची आत्मीयता आणि समर्थ पुरुषांची परंपरा होय, ही कल्पना यांनीं आपल्या 'मराठेशाहीचा उदय' या आपल्या इंग्रजी ग्रंथांत सिद्धान्तरूपानें प्रथम मांडली. मराठी सत्तेचा अपकर्षहि लिहिण्याचें यांचे मनांत होतें, पण ती गोष्ट यांच्या मृत्यूमुळें अपुरी राहिली. पण त्याचें दिग्दर्शन यांनीं 'पेशवे दप्तरांतील निवडक उतारे' या वाडांच्या ग्रंथाला ३८ पृष्ठांची इंग्रजी प्रस्तावना लिहून केलें आहे.

'मुसलमान व ख्रिस्ती यांच्याशीं आलेल्या संबंधांचे परिणाम आपणांस कधींच टाळतां येणार नाहींत; आपली जुनी समाजरचना कधींच अपरिवर्तनीय नव्हती व नाहीं; जगाच्या घडामोडींत योग्य स्थान मिळविण्याकरितां सर्वांना समान संधि देणारी आणि समता व न्याय यांवर उभारलेली समाजरचना आपणांस स्वीकारली पाहिजे;' अशा व्यापक दृष्टिकोनांतून हे समाजसुधारणेचा पुरस्कार करीत.

यांच्या वेळीं राष्ट्रापुढें आलेल्या अशा प्रकारच्या अनेक विवाद्य प्रश्नांच्या सर्व बाजू ध्यानांत घेऊन राष्ट्राच्या उत्कर्षाला पोषक असा सल्ला देण्याचें धैर्य यांनीं दाखविलें म्हणून यांना 'स्वतंत्र भारताचे द्रष्टे' असें संबोधण्यांत येतें. यांच्या निर्णयाला यांच्या समतोल विवेचनानें विशेष महत्त्व येई.

संधि आली असतां घरांतील लोकांच्या मर्जीविरुद्ध पुनर्विवाह केला नाहीं आणि सार्वजनिक सभा आपल्याविरुद्ध मताच्या लोकांच्या हातांत जातांच यांनीं स्वतंत्र लिबरल क्लबची स्थापना केली असे दोन आरोप यांच्यावर आहेत.

यांचीं विस्तृत चरित्रें प्रा. न. र. फाटक व प्रा. द. गो. कर्वे यांनीं लिहिलीं. यांपैकीं यांच्या जन्मशताब्दीनिमित्त प्रसिद्ध झालेला कर्वे यांचा चरित्र ग्रंथ मूळ इंग्रजी भाषेत असून त्याचा मराठी अनुवाद श्री. गो. म. कुलकर्णी यांनीं केला. याशिवाय यांच्या खाजगी जीवनावर प्रकाश टाकणारें 'आमच्या आयुष्यांतील कांहीं आठवणी' हें यांच्या पत्नी रमा रानडे यांनीं लिहिलेलें पुस्तक त्यांतील जिव्हाळ्यामुळ विशेष प्रसिद्ध आहे. वा. वा. ठाकूर, इंदूर यांनींहि यांचे एक मराठी चरित्र लिहिलें आहे.

यांचे ग्रंथ—(1) Essays on Indian Economics, (2) The Rise of the Maratha Power (1900), (3) Indian Economics, (4) The Wisdom of a Modern Rishi (Selections, 1942). मराठी–धर्मपर व्याख्यानें.

**रानडे, प्रा. रामचंद्र दत्तात्रेय**—(जन्म स. १८८५ सुमार) सुप्रसिद्ध तत्त्वज्ञानाचे अभ्यासक, ग्रंथलेखक व अलाहाबाद विद्यापीठाचे उपकुलगुरु.

यांनीं जमखिंडी हायस्कुलांतून मॅट्रिकची परीक्षा दिली (१९०२). मॅट्रिक परीक्षेंत सर्वांत दुसरा आणि संस्कृतांत पहिला क्रम आल्यानें यांना जगन्नाथ शंकरशेट शिष्यवृत्ति मिळाली. बी. ए.च्या परीक्षेंत यांना 'भाऊदाजी' पारितोषिक मिळालें. पुढें एम्. ए. करितां तत्त्वज्ञान हा विषय घेऊन चान्सलर मेडल मिळविलें (१९१६). तेव्हांपासून आठ वर्षें फर्ग्युसन व विलिंग्डन कॉलेजांत तत्त्वज्ञानाचें प्राध्यापन करून आन्तरराष्ट्रीय पंडित अशी कीर्ति मिळवून देणारा आपला उपनिषदांवरील इंग्रजी ग्रंथ यांनीं प्रसिद्ध केला. १९२७ सालीं अलाहाबाद विद्यापीठांत तत्त्वज्ञानाचे प्रमुख प्राध्यापक म्हणून यांची नेमणूक झाली. १९३० सालीं यांना तेथें 'डीन ऑफ दि फॅकल्टी ऑफ आर्टस्' निवडलें आणि १९४५ सालीं यांना तेथें उपकुलगुरु नेमण्यांत आलें. तत्त्वज्ञान व धर्म या विषयाला वाहिलेलें एक नियतकालिकहि यांच्या संपादकत्वाखालीं निघत असतें.

यांचें वाङ्मय—इंग्रजी-(1) Mysticism in Maharashtra, (2) A Constructive Survey of Upanishadic Philosophy (१९२६ मराठी उपनिषद्रहस्य–अनुवादक कृ. वें. गजेंद्रगडकर, यांनीं त्यांत अधिक भरहि घातली आहे).

मराठी–संतवचनामृत–१ ज्ञानेश्वर, २ एकनाथ, ३ रामदास, ४ तुकाराम.

**रॉबर्ट, ग्रँट-सर**—(जन्म स. १७७९–मृत्यु स. १८३८ जुलै ९) मुंबईचे गव्हर्नर व मुंबईस मेडिकल कॉलेज काढण्याच्या कल्पनेचे जनक.

यांच्या पित्याचें नांव चार्लस ग्रँट. जन्म बंगाल्यांत

झाला. हे इंग्लंडला गेले व केम्ब्रिज येथें यांचें शिक्षण झालें. हे तेथले तिसरे रँगलर असून यांना चान्सलर मेडल मिळालें व फेलो नेमिलें होतें. हे पार्लमेंटचे सभासद होते ( १८१८-१८३४ ). यांना मुंबईचे गव्हर्नर नेमलें ( १८३५ मार्च १७ ).

मुंबईत १८३७ सालीं एक मेडिकल सोसायटी स्थापन झाली. तिच्या कार्यकारी मंडळाचें लक्ष पाश्चात्य वैद्यकाचें शिक्षण एतद्देशीयांना देण्याकडे वळलें. मुंबईतील त्यापूर्वीचें कामचलाऊ मेडिकल स्कूल बंद करून अद्ययावत् उपकरणांनीं सुसज्ज असें वैद्यविद्यालय काढण्याची योजना सरकारपुढें ठेवण्यांत आली. यांनीं ती योजना मंजुरीकरितां कलकत्त्यास धाडली. मंजुरी येण्यापूर्वीच हे वारले. तथापि यांच्या दुःखप्रदर्शनाच्या सभेंत यांच्या कल्पनेला मूर्त स्वरूप देऊन संस्था स्थापन करण्याचें व त्या संस्थेला यांचें नांव देण्याचें ठरलें.

या ग्रँट मेडिकल कॉलेजच्या इमारतीकरितां ४४८०० रु. वर्गणी जमली. कोर्ट ऑफ डायरेक्टर्सनीं या योजनेला मान्यता देऊन शिवाय रु. ४५१०६-४-२ इतकी रक्कम इमारतीकरितां दिली. कलकत्त्याचे लार्ड बिशप यांनीं या इमारतीच्या पायाचा दगड बसविला ( १८४३ मार्च ३० ). ऑक्टोबरमध्यें काम पुरें होऊन १८४५ नवंबर ३ ला प्रत्यक्ष काम सुरू झालें. या मेडिकल कॉलेजच्या जोडीला सर जमशेटजी जिजीभाई यांनीं १९३८ च्या प्रारंभीं दिलेल्या एक लाख रुपयांच्या उदार देणगींतून नेटिव्ह जनरल हॉस्पिटल उभारण्यांत आलें. तेंच सध्याचें सुप्रसिद्ध जे. जे. हॉस्पिटल होय. १८४५ च्या मे महिन्यांत यांत रोग्यांना प्रवेश मिळूं लागला. या हॉस्पिटलच्या चालू खर्चाकरितां कंपनीसरकारने एक लाख रुपयांची देणगी दिली. या हॉस्पिटलचा पाया डॉ. जेम्स बर्नेस यांनीं बसविला. इमारतीला आलेल्या खर्चापैकीं सुमारें निम्मे म्हणजे पन्नास हजार रुपये सर जीजीभाईनीं व बाकीचे सरकारनें दिले.

**रामकृष्ण परमहंस**—(जन्म स. १८३६ फेब्रु.१८—समाधि स. १८८६ ऑगस्ट १५ ) बंगालमधील जगप्रसिद्ध सिद्धपुरुष व वेदान्तप्रतिपादक.

बंगाल्यांत हुगळी जिल्ह्यांत ' कामारपुकुर ' नांवाच्या एका अप्रसिद्ध गांवांत यांचा जन्म झाला. यांचें मूळ नांव गदाधर चट्टोपाध्याय. यांचे आई-वडील अत्यंत धार्मिक व सनातनी वृत्तीचे ब्राह्मण होते. स.१८५३ मध्यें हे आपले वडील बंधु रामकुमार यांचेबरोबर कलकत्त्यास आले. स. १८५६ मध्यें राणी रासमणीनें यांच्या वडील भावाला कलकत्त्याजवळील कालीच्या दक्षिणेश्वरमंदिराचे मुख्य पुजारी नेमिलें. तेथें त्यांना हे मदत करीत. तेथील यांचें त्यागमय जीवन आणि तपस्या यांचा विशेष उल्लेख करण्यासारखा आहे. या वेळीं तोतांपुरी नांवाच्या एका संन्यासानें यांना संन्यास देऊन यांचें नांव ' रामकृष्ण परमहंस ' असें ठेविलें. परंतु दक्षिणेश्वरच्या यांच्या कायम वासामुळें दक्षिणेश्वरचे संत म्हणून हे सर्वत्र प्रसिद्ध असत.

नंतर यांनीं ख्रिश्चन व मुसलमान धर्मांची त्या त्या धर्मांतील अनुयायांप्रमाणें उपासना केली. तसेंच निरनिराळे संप्रदाय व मतमतान्तरें यांचा आस्तिकपणानें अभ्यास करून तदनुसार यांनीं कांहीं दिवस साधनाहि केली आणि सिद्धि मिळवून जगाला त्याचा उपदेश केला. यांचे सर्व विचार ईश्वराधिष्ठित असून ते अत्यंत साधे व शुद्ध असत. यांच्या विचारसरणीचा पौर्वात्य किंवा पाश्चिमात्य यांच्यावर सारखाच परिणाम होतो. यांचें चरित्र व उपदेश इतके अलौकिक व चमत्कारपूर्ण आहेत कीं जगांतील विद्वानांवर त्याचा परिणाम झाल्याशिवाय राहत नाहीं. यांचे शिष्य स्वामी विवेकानंद होत. त्यांनीं यांचा संदेश जगभर लोकप्रिय करून सोडला आणि रामकृष्णांच्या उपदेशाचीं जगांतल्या बहुतेक भाषांत भाषान्तरें झालीं.

वयाच्या चौथ्या वर्षापासूनच यांची समाधि लागे. वारंवार देहभान विसरून हे ब्रह्मस्वरूपांत लीन होत. आधुनिक भारताची अध्यात्म परंपरा थेट वैदिक परंपरेशीं संलग्न ठेवण्याचें काम यांनीं केलें. बंगाल्यातील ब्राह्म वगैरे समाजांतील लोकांचें प्रतिपादनहि यांच्यापुढें फिक्कें पडून ते लोक यांच्याकडे आकर्षिले गेले.

यांचें प्रतिपादन तर्कशुद्ध, स्पष्ट आणि थोडक्यांत असे. कांहीं प्रसंगीं यांच्या बोलण्यांत गूढता येई. हे त्या त्या देवतेची उपासना करतांना तिच्याशीं पूर्ण एकरूप होत. कालीची उपासना करतांना हे विटाळशी होत व सर्व व्यवहार आपण स्त्री आहोंत अशा भावनेनें करीत.

आत्मशुद्धि करण्याकरितां यांनीं नाना प्रकार केले. अंत्यजांपेक्षां आपण वरचढ आहोंत ही भावना नष्ट करण्याकरितां यांनीं अंत्यजांच्या घरचा केर आपल्या जटांनीं काढला. द्रव्यविषयक तुच्छताहि यांनीं झोपेंत-

सुद्धां शरीराला द्रव्याचा स्पर्श झाला असतां अंगावर शहारे यावे इतकी भिनवली होती.

यांचें नेहमीचें वर्तन एखाद्या मुलाप्रमाणें निष्पाप, खेळकर व भोळें असे. यांनीं आपल्या आध्यात्मिक ज्ञानाचा निरनिराळ्या धर्मांशीं एकरूप होऊन कस घेण्यांत उपयोग केला. शेवटीं सर्व धर्मांच्या मुळाशीं एकच तत्त्व असल्याची यांची खात्री झाली. सर्व धर्म सारख्या योग्यतेचे मानून वैदिक अध्यात्माचा संदेश जगभर पोंचविणाऱ्या विवेकानंदांच्या पाठीशीं यांचा हा अनुभव होता.

नास्तिक्याकडे झुकलेल्या, गांगरलेल्या आणि स्वत्व विसरलेल्या हिंदुस्थानला यांचा संदेश नवचैतन्य देणारा ठरला. जुन्याला उजळा देणाऱ्या व नवीन कालाला शोभणाऱ्या यांच्या तत्त्वज्ञानाची घरोघर मोठ्या श्रद्धेनें पूजा होऊं लागली.

अन्तस्थ तीव्र भावनेमुळें घसा दुखेतोंपर्यंत वेळीं अवेळीं अनुभवकथन व उपदेश करण्यानें यांना शेवटीं घशाचा कॅन्सर झाला. मात्र दुसऱ्याचे रोग स्वतःच्या अंगावर घेण्याच्या यांच्या नित्यक्रमांतून या रोगाची उत्पत्ति झाली अशी समजूत यांच्या शिष्यशाखेंत रूढ आहे.

यांच्या नांवानें रामकृष्ण मिशन नांवाची संस्था स्थापून त्या संस्थेनें वेदान्तप्रचाराला लोकसेवेची जोड दिली. तिच्या शाखा जगभर आहेत. यांचा शतसांवत्सरिक जन्मदिन मोठ्या समारंभानें साजरा करण्यांत आला. यांची प्रेक्षणीय समाधि बेलूर येथें ७ लक्ष रुपये खर्च करून बांधण्यांत आली. यांचें चरित्र व शिकवण सुंदर भाषेंत अनेक भाषांत भाषान्तरित झालीं आहेत. त्यांपैकीं महेंद्रनाथ गुप्त ऊर्फ एम्. यांनीं लिहिलेला The Gospel of Ramakrishna हा यांच्या आठवणींचा ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहे. यांची जन्मशताब्दी सर्व हिंदुस्थानांत मोठ्या समारंभानें साजरी करण्यांत येऊन The Heritage of India हा चतुःखंडात्मक ग्रंथ तिचें स्मारक म्हणून काढण्यांत आला.

**रामकृष्णशेठ हरजीमल दालमिया**—(जन्म स. १८९० सुमार) हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध व्यापारी व निरनिराळ्या औद्योगिक क्षेत्रांतील 'दालमिया-जैन' साहसाचे जनक.

पंजाब जिल्ह्यांतील दालमा या गांवाहून यांचे पूर्वज जयपूरला आले म्हणून यांच्या घराण्याचें नांव दालमिया पडलें. जातीचे मारवाडी असणारें यांचें घराणें पूर्वींपासूनच अतिश्रीमंत म्हणून प्रसिद्ध असे. आपले बंधु जयदयाल व जांवई शांतिप्रसाद जैन यांचे सहकार्यानें यांनीं आपल्या व्यापाराचा पसारा वाढविला आहे.

विश्वविद्यालयीन शिक्षणाचा लाभ झाला नसूनहि अनुभवानें संपादन केलेल्या अर्थशास्त्राच्या व व्यापाराच्या सूक्ष्म ज्ञानामुळें हे हिंदुस्थानांतील पहिल्या दर्जाचे उद्योगसम्राट् बनले. वयाच्या बाराव्या वर्षी दहा रुपये पगारावर व्यापारांत शिरलेला हा मनुष्य आज सिमेंट, साखर, कागद यांचा हिंदुस्थानांतील मोठा व्यापारी बनला आहे. ज्या ठिकाणीं इतर कारखानदार कच खातात तेथेंच जाऊन यशस्वी होण्याचा विक्रम यांनीं अनेक वेळां करून दाखविला आहे. यांच्या सिमेंटच्या कारखान्यांना तर सुरुवातीला अनेक देशी व परदेशी कारखान्यांना तोंड द्यावें लागलें. परंतु आतां हिंदुस्थानांतील सिमेंटचें सर्व मार्केट काबीज करण्याचा मान दालमिया सिमेंटला मिळाला आहे.

दालमियानगर (बिहार), दालमियापुरम् (दक्षिण हिंदुस्थान), दालमिया दद्रि (पंजाब) व शांतिनगर (कराची) अशीं यांचीं कारखान्यांचीं अनेक केंद्रें असलीं तरी सिमेंट, साखर, कागद, वनस्पती तूप, सल्फ्युरिक ॲसिड, ब्लीचिंग पॉवडर, कॉस्टिक सोडा, डिस्टेंपर वगैरेसारख्या महत्त्वाच्या वस्तूंचें उत्पादन दालमियानगरमध्येंच होतें.

१९४२ सालीं यांनीं काढलेल्या भारत बँक लि. या संस्थेनें हिंदुस्थानच्या विनाजगांत अक्षरशः क्रांति घडवून आणली. वीस कोटी भांडवल व त्यांतील पंधरा कोटी विक्रीस काढलेलें, इतकी मोठी विमा संस्था यांचे आधीं निघाली नव्हती. खेड्यांतील लहानसहान माणसालाहि बँक-माइंडेड बनवून देशी उद्योगधंद्यांना उत्तेजन देण्याचा आपला हेतु यांनीं या बँकेच्या स्थापनेच्या वेळीं बोलून दाखविला. आतां भारत इन्शुअरन्स कंपनी व भारत फायर ॲन्ड इन्शुअरन्स लि.चीहि स्थापना करण्यांत आली आहे.

परंतु यापेक्षांहि मोठा धक्का हिंदी व्यापारी जगाला यांनीं १९४६ सालीं दिला. टाइम्स ऑफ इंडिया या पूर्वेकडील सर्वांत मोठ्या संस्थेचे पासष्ट टक्के शेअर्स यांनीं दीड कोट रुपयांना विकत घेतले. अशा तऱ्हेनें हिंदुस्था-

नांतील एका मोठ्या परदेशी संस्थेच्या हिंदीकरणाचा मान यांनीं मिळविला.

**रामतीर्थ, स्वामी**—(जन्म स.१८७३ ऑक्टो.२२—जलसमाधि स. १९०६ ऑक्टो. १७) आंतरराष्ट्रीय कीर्तीचे हिंदी साक्षात्कारी सत्पुरुष, तत्त्वज्ञानी व कवि.

यांचें मूळ नांव तीर्थराम. यांनीं तें संन्यास घेतल्यानंतर बदलून रामतीर्थ केलें. पंजाब प्रांतांतील गुजराणवाला जिल्ह्यांतील मुरलीवाला हें गांव यांचें जन्मस्थान. यांच्या वडिलांचें नांव गोस्वामी हिरानंद. तुलसीदासाचे अव्वल वंशज म्हणून यांच्या घराण्याची त्या प्रांतांत प्रसिद्धि असून वायव्य प्रांतांतील हिंदूंचे गुरु म्हणून यांचे वडील काम करीत.

गुजराणवाला हायस्कूल, लाहोर फॉर्मन ख्रिश्चन कॉलेज व गव्हर्नमेंट कॉलेज लाहोर येथें आपलें शिक्षण संपवून हे गणिताचे एम्. ए. झाले (१८९५). सांपत्तिक हलाखीमुळें यांचे हे सर्व दिवस मोठे कष्टाचे गेले. एम्.ए. झाल्यानंतर यांनीं प्रथम सियालकोटच्या मिशन हायस्कूलमध्यें व नंतर लाहोरच्या आपल्या मिशन कॉलेजांत गणिताच्या प्राध्यापकाचें काम करण्यास सुरुवात केली. परंतु यांच्या मनांतील वाढत्या अध्यात्मिकतेला ही नोकरी सोसेना म्हणून यांनीं ती सोडून दिली. रँगलर होण्याकरितां मिळालेल्या शिष्यवृत्तीचाहि यांनीं त्याग केला. याच वेळीं स्वामी विवेकानंदांचीं वेदांतावरील व्याख्यानें यांनीं ऐकली व हे सर्वसंगपरित्याग करून हिमालयाला निघाले व यांनीं संन्यास घेतला. मध्यंतरींच टोकियोला भरणाऱ्या आंतरराष्ट्रीय धर्मपरिषदेची बातमी याना कळली व टेहरीच्या महाराजांच्या विनंतीवरून हे जपानला गेले ( १९०२ ऑगस्ट ).

जपानच्या या परिषदेची माहिती तेथें गेल्यानंतर खोटी ठरली. परंतु यांच्या एका नव्या आयुष्याची सुरुवात तेथें झाली. उर्दू, फारशी व इंग्लिश भाषांचें पांडित्य व उत्कृष्ट कवित्व यांना यांच्या वेदान्ताच्या अध्ययनाची जोड मिळाली व यांचीं व्याख्यानें लोकप्रिय होऊं लागलीं.

जपाननंतर हे अमेरिकेला गेले. तेथें विवेकानंदाइतकें प्रचंड स्वागत यांचेंच झालें. गौरवर्ण, उंचीपुरी मूर्ति यांमुळें तेथील लोकांना हे अमेरिकनच वाटत. अमेरिकेहून हिंदुस्थानला आल्यानंतर यांचा सर्व काळ आपल्या शिष्यांना उपदेश करण्यांत जाऊं लागला.

अशाच वेळीं हे गंगेला स्नानाला गेले असतां यांच्या पायाखालचा दगड निसटला व हे बुडून मरण पावले. मात्र याच वेळीं यांनीं लिहिलेला सुप्रसिद्ध मृत्युलेख यांच्या शिष्यांना यांच्या टेबलावर सांपडला. यांच्या कवित्वशक्तीचा अत्युच्च नमुना म्हणून त्याची प्रसिद्धि असून त्यांत मृत्यूला उद्देशून 'माझें शरीर तूं खुशाल घेऊन जा, चंद्राच्या किरणाच्या रूपानें, पहाडी नदीनिर्झराच्या वेषानें, समुद्राच्या लाटांच्या मिषानें मी जगांत वावरूं शकेन. मी सर्व ठिकाणीं गेलों, परंतु बरोबर कांहींच ठेवलें नाहीं व कोणाच्याच हातीं सांपडलों नाहीं ' असे उद्गार आहेत. हृषीकेशजवळ ब्रह्मपुरी येथें यांच्या स्मरणार्थ सुंदर ग्रंथसंग्रहालय चालविण्यांत येतें.

यांनीं आपल्या पूर्वायुष्यांत अनेक ग्रंथ लिहिले होते; परंतु एकदां निराशेच्या भरांत यांनीं ते सर्व गंगेंत टाकून दिले. त्यामुळें अमेरिकेंत किंवा हिंदुस्थानांत यांनीं दिलेल्या व्याख्यानांच्या टिपणांखेरीज यांचा स्वतंत्र असा ग्रंथ उपलब्ध नाहीं. लखनौच्या रामतीर्थ पब्लिकेशन लीगनें हिंदी भाषेंत व लाल अमीरचंद यांनीं इंग्रजींत व नारायण वासुदेव गुणाजी ( काका कालेलकरांच्या सहकार्यानें ) व भा. वि. फडके ( रा. वा. बर्वे यांच्या सहकार्यानें ) यांनीं मराठींत यांचीं व्याख्यानें व पत्रव्यवहार अनेक खंडांत छापलीं. त्यांपैकीं 'राष्ट्रीय धर्म ', ' हिंदुस्थानपुढील प्रश्न ' हीं यांचीं व्याख्यानें विशेष प्रसिद्ध आहेत.

यांच्या मृत्यूनंतर रामतीर्थ पब्लिकेशन लीगनें संपादून प्रसिद्ध केलेले यांचे इंग्रजी लेखसंग्रह—( 1 ) In Woods of God Realisation ( आठ खंड ), ( 2 ) Rama's Note Books ( दोन खंड ), ( 3 ) Heart of Rama, ( 4 ) Poems of Rama ( सी. एफ. अँड्रूज यांचे प्रस्तावनेसह ), ( 5 ) Parables of Rama इत्यादि.

**रामन, सर-चंद्रशेखर व्यंकट**—( जन्म स. १८८८ नवं. ७ ) आंतरराष्ट्रीय कीर्तीचे हिंदी विज्ञानाचार्य व जगप्रसिद्ध ' रामन् इफेक्ट'चे जनक.

यांचें समग्र नांव व्यंकटरमण चंद्रशेखर अय्यर. यांचे वडील आर. चंद्रशेखर अय्यर हे विझगापट्टमच्या मिसेस ए. व्ही. एम्. कॉलेजांत गणित व विज्ञान यांचे प्राध्यापक होते. यांचा जन्म त्रिचनापल्लीला झाला. वयाच्या बाराव्या वर्षीच हे मॅट्रिकची परीक्षा पास झाले व मद्रा-

सच्या प्रेसिडेन्सी कॉलेजांतून 'विज्ञान' घेऊन हे एम्.ए. झाले. याच सुमारास लंडनच्या फिलॉसफिकल मॅगझीननें 'The Unsymmetrical Diffraction Bands due to a Rectangular Aperture' हा यांचा पहिला संशोधनपर निबंध प्रसिद्ध केला (१९०६ नवं.).

प्रकृति-अस्वास्थ्यामुळें पुढील शिक्षणासाठीं परदेशीं जाण्याचें रद्द करून हे इंपीरियल गव्हर्नमेंट सर्व्हिसमध्यें शिरले. तेथें यांनीं फिनान्सची परीक्षा दिली व डेप्युटी अकाउंटंटचें काम करण्यास सुरवात केली. हें काम करीत असतां कलकत्त्याच्या इंडियन असोसिएशन फॉर कल्टिव्हेशन ऑफ सायन्सच्या अमृतलाल सरकाराशीं यांची गांठ पडली व फिनान्स खात्यांतील नोकरी सांभाळून यांनीं त्या संस्थेच्या लेबॉरटरींत आपल्या संशोधनास सुरवात केली. याच सुमारास श्री. तारकनाथ पालीत यांच्या देणगीनें निघालेल्या 'युनिव्हर्सिटी कॉलेज ऑफ सायन्स'मधील विज्ञानाच्या प्राध्यापकाच्या जागेवर श्री. आशुतोष मुकर्जी यांनीं यांची नेमणूक केली (१९१७). अशा तऱ्हेनें युनिव्हर्सिटी कॉलेजमध्यें अध्यापन व इंडियन असोसिएशनमध्यें संशोधन असा यांचा कार्यक्रम सुरू झाला, तो हे त्या जागेवरून निवृत्त होईपर्यंत चालू राहिला (१९३२). यांचें विशेष महत्त्वाचें संशोधन याच काळांत झालें.

यानंतर यांनीं टाटाच्या बंगलोर येथील इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ रिसर्चच्या डायरेक्टरचें काम करण्यास सुरवात केली. परंतु पुढें यांनीं या जागेचा राजीनामा दिला व हे फक्त विज्ञानाचे प्राध्यापक राहिले. या काळांत यांनीं हिऱ्यांच्या गुणधर्मासंबंधीं केलेलें संशोधन विशेष महत्त्वाचें मानलें जातें.

परंतु यापेक्षांहि संशोधनाच्या अगदीं सुरवातीच्या काळांत यांनीं 'रामन् इफेक्ट' या नांवानें केलेल्या संशोधनानें यांचें नांव सर्वतोमुखीं झालें. विज्ञगापट्टमला असतांनाच जमिनीच्या साहचर्यानें समुद्राचे रंग बदलतात ही गोष्ट यांच्या ध्यानांत आली व १९२१ च्या युरोपच्या प्रवासांत भूमध्य समुद्राचें निळें पाणी पाहून यांची ही कल्पना दृढ झाली. प्रकाशकिरण व स्वच्छ पाणी यांच्या संयोगानें पाण्याला निळा रंग प्राप्त होतो, प्रकाश इतर पारदर्शक पदार्थांशीं मिश्र होते वेळींहि आपला रंग बदलतो, प्रकाशाची ही क्रिया जगांतील सर्व पारदर्शक पदार्थांवर घडते असे सिद्धान्त क्रमाक्रमानें सिद्ध करीत शेवटीं हे आपल्या रामन् इफेक्टवर आले.

मर्क्युरी व्हेपरलॅम्पमध्यें मिळणाऱ्या प्रकाशाकडे आपण एखाद्या प्रिझममधून पाहिलें तर तो आपणांस निरनिराळ्या रंगांच्या पट्ट्यांत विभागलेला दिसतो; परंतु तोच प्रकाश ज्या वेळीं बर्फ किंवा पाणी यांमधून जातो त्या वेळीं प्रिझममधून आपणांस दिसणाऱ्या रंगीत पट्ट्यांत आपणांस आधीं न दिसलेल्या प्रकाशरेषा दिसतात. याच नव्या प्रकाशरेषांना रामन् लाइन्स किंवा बॅन्ड्स, त्या प्रकाशपट्ट्याला रामन् स्पेक्ट्रा व यांच्या या शोधाला 'रामन् इफेक्ट' अशीं नांवें पुढें देण्यांत आलीं.

प्रकाश कणमय आहे ही कल्पना प्रथम प्लँकनें मांडली व क्ष किरणाबाबतच्या कॉम्प्टन परिणामानें व रिचर्डसन व आइन्स्टाइन यांच्या प्रकाशविकीरण-परिणामांनीं त्यास प्रायोगिक पाठबळ दिलें. या सर्व प्रयोगांत विकीरण पावलेल्या विद्युत्किरणांची आवृत्ति संख्या मूळपेक्षां कमी असे.

यांनीं या संशोधकांच्या न पुढें जाऊन विकीरण पावलेल्या किरणांची लहरलांबी मूळ किरणांपेक्षां वाढते येवढेंच नव्हे तर ती कधींकधीं कमीहि होते हें दृश्य प्रकाशाच्या साहाय्यानें सिद्ध केलें. प्रकाशकण परमाणूंवर आदळल्यानंतर कित्येक वेळेला ते परमाणूंना शक्ती देतात तर कित्येक वेळेला ती काढून घेतात. शक्तीच्या या देवघेवीवरच विकीरण प्रकाशाची कमीजास्त लांबी अवलंबून असते. रामन्‌परिणामांत आढळणारे प्रकाशाचे हे दोन प्रकार क्ष किरणांत आढळत नाहींत.

परमाणू व अणु यांच्या रचनेवर यांच्या या संशोधनानें बराच नवा प्रकाश टाकला. निरनिराळ्या परमाणूंचे अणु तयार होत असतां त्यांचे दुवे कांहीं ठराविक पद्धतीनेंच जोडले जातात. ही दुवे जोडण्याची पद्धति, दुव्यांची बळकटी, त्याचे एकमेकांवर घडून येणारे परिणाम यांसंबंधींचें एक अगदीं नवें विचारक्षेत्र यांच्या संशोधनानें उत्पन्न केलें. न्यूटनच्या डायनेमिक्सच्या बदली नवें क्वॅन्टम मेकॅनिक्स उपयोगिण्याची एक नवी रीत गणितज्ञांना यांच्या या संशोधनानें करून दिली.

यांच्या या संशोधनाचें जगांतील सर्व शास्त्रज्ञांत सहर्ष स्वागत झालें. जगांतील महत्त्वाच्या नियतकालिकांतून यांचें संशोधन व त्याचे दूरगामी परिणाम यांसंबंधीं लेख लिहिले गेले. सर्व महत्त्वाच्या प्रयोगशालांतून यांच्या प्रयोगाची सत्यता अजमावण्यासाठीं निरनिराळ्या पारदर्शक पदार्थांवर प्रयोग करण्यांत आले व त्यांचा

यथायोग्य प्रत्यय येताच यांचेवर मानसन्मानांचा वर्षाव झाला. १९३० सालचें विज्ञानशाखेंतील नोबेल प्राइझ यांना स्वीडनचे राजेसाहेबांच्या हस्तें स्टॉकहोम (स्वीडन) येथें अर्पण करण्यांत आलें (१९३० डिसें. ६). याशिवाय याच संशोधनाबद्दल लंडनच्या रॉयल सोसायटीनें यांना 'ह्यूघ' पदक (१९३०), इटालियन सोसायटीनें मॅच्युकी पदक (१९२९) व न्यूयॉर्क युनिव्हर्सिटीनें यांना अत्युच्च फ्रँकलीन पदक (१९४१) दिलें. इंडियन सायन्स कॉंग्रेसचें अध्यक्षस्थानहि यांना देण्यांत आलें.

कलकत्त्याची इंडियन असोसिएशन व नंतर बंगलोरच्या इंडियन इन्स्टिटयूटमध्यें काम करीत असतां यांनीं होतकरू शास्त्रज्ञांची एक नवीच पिढी तयार केली. कलकत्त्याच्या संस्थेचे हे सेक्रेटरी असतां यांनीं अर्धाच लाख रुपये जमवून त्या संस्थेस उत्कृष्ट रिसर्च लेबॉरटरी तयार करून दिली. या संस्थेंत होणारें संशोधन हे प्रथम बुलेटिन्स व नंतर प्रोसिडिंग्ज ऑफ इंडियन सोसायटीत प्रसिद्ध करीत. परंतु १९२६ नंतर त्या पत्राचें The Indian Journal of Physics असें नामांतर करण्यांत आलें. यांत यांच्या शिष्यांनीं लिहिलेल्या संशोधनपर लेखांची संख्या सहाशेंपेक्षां जास्त असून बंगलोरला येईपर्यंत हे त्या पत्राचे संपादक होते.

१९३४ च्या सुरवातीला यांनीं बंगलोरला इंडियन ॲकेडमी ऑफ सायन्स ही संस्था सुरू केली. त्या संस्थेतर्फे दर महिन्याला 'प्रोसिडिंग्ज' प्रसिद्ध करण्यांत येतात. हिंदुस्थानांत चाललेलें प्रातिनिधिक संशोधन यांत सादर करण्यावर यांचा कटाक्ष असतो.

पाश्चात्य प्रयोगशाळांतून काम करण्याची संधि न मिळूनहि केवळ स्वतःची ज्ञानलालसा व संशोधनबुद्धि यांचे साहाय्यानें यांनीं मिळवलेलें यश अपूर्व आहे.

यांचे ग्रंथ—(1) Experimental Investigations on Vibrations, (2) Theory of Bowed Instruments, (3) Molecular Diffraction of Light, (4) Music Instruments, (5) Ray Studies इत्यादि.

यांच्या प्रमुख शिष्यांत अलाहाबाद युनिव्हर्सिटीचे विज्ञानाधिकारी असणारे डॉ. के. एस्. कृष्णन् हे प्रमुख आहेत. International Conference of Photo Luminescence च्या वारसॉ येथील अधिवेशनाला ते खास आमंत्रणावरून हजर राहिले. लंडनच्या रॉयल सोसायटीचे ते फेलो असून इंडियन सायन्स कॉंग्रेसच्या मद्रासच्या अधिवेशनाचें अध्यक्षस्थान त्यांना देण्यांत आलें (१९३७).

**रामानुजन् श्रीनिवासन्**—(जन्म स. १८८७ डिसें.-१९२० एप्रिल २६) आंतरराष्ट्रीय कीर्तीचे हिंदी गणिती.

दक्षिण हिंदुस्थानांतील इरोड हें गांव यांचें जन्मस्थान. कुंभकोणच्या टाउन हायस्कूलमधून मॅट्रिकची परीक्षा पास झाल्यानंतर यांनीं तेथील गव्हर्नमेंट कॉलेजमध्यें स्कॉलरशिप मिळवली. परंतु यांच्या कच्चया इंग्रजीमुळें ती यांना नाकारण्यांत आली. त्यामुळें कॉलेजमध्यें न जातां यांना आपलें गणिताचें अध्ययन घरींच पुरें करावें लागले.

अविभाज्य संख्येच्या बाबतींत उपलब्ध संख्येपेक्षां अधिक संख्या काढतां येत नाहीं असें विधान मि. जी. एच्. हार्डी यांनीं आपल्या एका निबंधांत केलें. यांनीं ताबडतोब आपण मूळ संख्येशीं जुळणाऱ्या अधिक संख्या शोधून काढल्याचें त्या संशोधनविषयक सिद्धान्तासह त्यांच्या निदर्शनास आणलें. यांच्या संशोधनांतील नाविन्य व पुढील संशोधनासाठीं पुरेसें अन्न देण्याच्या यांच्या विनंतींतील कारुण्य मि. हार्डी यांना इतकें जाणवलें कीं त्यांनीं अनेक प्रयत्न करून यांच्या अन्नाचीच नव्हे तर केम्ब्रिजच्या शिक्षणाचीहि व्यवस्था केली (१९१४).

आंकडेशास्त्राबद्दल यांना सुरवातीपासूनच प्रेम होतें. इंग्लंडमध्यें गेल्यानंतर यांनीं त्याच शास्त्राचा विशेष अभ्यास करून Highly Composite Numbers इत्यादि महत्त्वाचे निबंध लिहिले. याच यांच्या संशोधनाबद्दल यांना फेलो ऑफ दि रॉयल सोसायटी व फेलो ऑफ दि ट्रिनिटी कॉलेज निवडण्यांत आलें (१९१८). रॉयल सोसायटीचे फेलो होण्याचा मान मिळवणारे हे पहिले हिंदी संशोधक होत. पहिलें महायुद्ध संपतांच हे हिंदुस्थानांत परत आले, परंतु थोड्याच दिवसांत मद्रास येथें क्षयाच्या विकारानें मृत्यु पावले.

बीजगणिताचे सिद्धान्त, इन्फिनिटी सिरीज इत्यादिमधील यांचें अपूर्ण संशोधन अजूनहि कोणास पुरें करतां आलें नाहीं. याच कारणानें यूलर, जॅकोबीसारख्या गणितज्ञांशीं यांची तुलना करण्यांत येते.

यांचे महत्त्वाचे ग्रंथ—(1) Modular Equations and Approximations to Pi, (2) Highly

Composite Numbers, (3) On Certain Arithmetical Functions, (4) On Certain Trigonometrical Sums and their applications in the Theory of Numbers.

यांच्या महत्त्वाच्या निबंधांचा संग्रह यांच्या मृत्यूनंतर केम्ब्रिज युनिव्हर्सिटी प्रेसनें प्रसिद्ध केला (१९२८). त्या पुस्तकाच्या छपाईचा खर्च मद्रास युनिव्हर्सिटी, रॉयल सोसायटी (लंडन) व ट्रिनिटी कॉलेज (केम्ब्रिज) या तीन संस्थांनीं मिळून केला. दि. ब. रामचंद्रराव, पी. व्ही. शेषु अय्यर व मि. जी. एच. हार्डी यांनीं या ग्रंथांत यांचीं व्यक्तिचित्रें काढलीं आहेत.

**राय, कृष्णदास**—(जन्म स. १८९२) सुप्रसिद्ध हिंदी गद्यगीत लेखक, लघुकथा लेखक, समालोचक व चित्रादि वस्तूंचे संग्राहक.

हे काशीचे अग्रवाल. राय हें यांच्या घराण्याला अकबर बादशहाच्या वेळीं मिळालेलें सन्मानदर्शक उपपद आहे.

यांनीं चित्रकला व शिल्प यांच्या विविध वस्तूंचा लाख रुपये किंमतीचा संग्रह काशीच्या 'भारत कलाभवन' या संस्थेला अर्पण केला. हें भारत कलाभवन नागरीप्रचारिणी सभेच्या ताब्यांत असून त्याचे हे क्युरेटर होते. १९२१ मध्यें यांनीं भारतीय कलापरिषदेची स्थापना केली. तिचे अध्यक्ष व उपाध्यक्ष अनुक्रमें रवीन्द्रनाथ टागोर व अवनीन्द्रनाथ टागोर होते. या संस्थेच्या द्वारा यांनीं काशींत भारतीय चित्रकला व संगीत यांसंबंधीं नवीन दृष्टि निर्माण केली.

यांनीं १९१६ सालीं रवीन्द्रनाथांच्या गीताञ्जलीच्या धर्तीवर साधना नांवाचें गद्य पुस्तक लिहिलें. हें हिंदींतील उत्कृष्ट पुस्तक समजलें जातें. यांच्या लघुकथा अत्यंत भावपूर्ण व नमुनेदार असतात. यांचा चित्रकलेचा व्यासंग उत्कृष्ट असून यांनीं भारतीय चित्रकलेवर पाटणा विश्वविद्यालयातर्फे एक व्याख्यानमाला गुंफली (१९४४). यांची भारतीय चित्रकला व मूर्तिकला यांवरील दोन्ही पुस्तकें हिन्दींतच काय पण देशी भाषांत अपूर्व आहेत. सुप्रसिद्ध कलामीमांसक एन्. सी. मेहेता, आय्. सी. एस्. हे यांचे शिष्य होत. रामप्रसादचीं चित्रें असलेलीं उमर खय्याम व मेघदूत यांनीं भारतकलाभवनतर्फे प्रकाशित केलीं. हे संगीत कलेचे मर्मज्ञ असून उत्कृष्ट हिन्दी कविता करतात. अशी यांची प्रतिभा बहुमुखी आहे.

यांचे ग्रंथ—१ साधना (गद्यगीत), २ छायापथ (गद्यगीत), ३ प्रवाल (गद्यगीत), ४ सुधांशु (लघुकथासंग्रह), ५ अनाख्या (लघुकथासंग्रह), ६ संलाप (संवादसंग्रह), ७ भारतीय चित्रकला (विवेचनात्मक), ८ भारतीय मूर्तिकला (विवेचनात्मक).

**राय, देवीप्रसाद 'पूर्ण'**—(जन्म स. १८६८–मृत्यु स. १९१५) हिन्दी भाषेंतील सुप्रसिद्ध लेखक व कवि.

यांचा जन्म व शिक्षण जबलपूर येथें झालें व एलएल्. बी. झाल्यानंतर तेथेंच उत्कृष्ट दिवाणी वकील म्हणून यांची ख्याति झाली. हे जुन्या पद्धतींचे ब्रजभाषेंतील कवि समजले जातात. हे सनातन धर्माचे अभिमानी होते.

१९२५ सालीं गोरखपूर येथें भरलेल्या प्रान्तिक हिन्दी संमेलनाचे हे अध्यक्ष होते. याशिवाय अनेक संस्थांशीं यांचा संबंध असे.

यांचे ग्रंथ—कवितासंग्रह–१ पूर्ण-संग्रह, २ धाराधरधावन (मेघदूताचा अनुवाद); नाटक–३ चंद्रकला-भानुकुमार; संपादक–४ रसिकवाटिका व धर्मकुसुमाकर मासिक (ब्रजभाषेंतील कविता प्रसिद्ध करणारें).

**राय, मानवेन्द्रनाथ**—(जन्म स. १८९३) श्रेष्ठ साम्यवादी व स्वतंत्र विचाराचे क्रान्तिकारक पुरुष.

यांचें मूळ नांव नरेन्द्र भट्टाचार्य. पण तें बदलून यांनीं हें नांव स्वीकारलें. यांचें शिक्षण धड मॅट्रिकपर्यंतहि झालेलें नाहीं. अगदीं कोवळ्या वयांत हे दहशतवाद्यांच्या गटांत शिरले व पोलिसांचा ससेमिरा यांच्या मागें लागला. पोलिसांना चुकवीत हे जावा-सुमात्रा बेटांत हिंडत असतां एका अमेरिकन बोटींतील कोळशाच्या कोठारांत लपून हे अमेरिकेंत पोंचले. तेथें हे दहशतवाद सोडून मार्क्सवादी बनले आणि मेक्सिकोंतील क्रान्तींत सामील होऊन आघाडीवर चमकले. त्या वेळीं यांना आन्तरराष्ट्रीय कीर्ति प्राप्त झाली. तेव्हां साम्यवादी चळवळीच्या संघटनेसाठीं 'थर्ड इन्टरनॅशनल' या संस्थेची स्थापना करून लेनिननें त्या संस्थेंत यांना ओढलें. १९२७ सालीं चीनमध्यें क्रान्ति झाली तेव्हांहि यांना तिकडे पाठविण्यांत आलें होतें. पण सर्वत्र यांचा मतभेद होई. त्यामुळें यांना स्टॅलिननें हद्दपार केलें. जर्मनींत असतां यांच्यावर विषप्रयोगहि झाला असें म्हणतात. पुढें हे हिंदुस्थानांतील कायदेभंगाचीं वर्णनें

वाचून क्रान्तीची वेळ आली असें समजून हिंदुस्थानांत मुंबईस आले. पण येथें यांना डॉ. महमूद असें नांव धारण करून वावरावें लागलें. शेवटीं खटला होऊन शिक्षा भोगल्यावर हे वीस वर्षांनंतर कायदेशीर रीतीनें उघड वावरण्यास मोकळे झाले ( २० नवं. १९३६ ).

प्रथम राष्ट्रसभेचा पुरस्कार करणारे हे गृहस्थ पुढें राष्ट्रसभेचे विरोधक बनले आणि यांनीं आपला रॅडिकल डेमोक्रॅट नांवाचा स्वतंत्र पक्ष काढला. राष्ट्रसभेला विरोध करण्यानें त्याला सरकारचा आश्रय लाभला, पण लोकांची अनुकूलता अगदींच मिळवतां आली नाहीं.

यांची कीर्ति वक्ते म्हणून नसून संघटक म्हणून आहे. तथापि आजपर्यंतचें यांचें संघटनाचातुर्यहि अपेशी ठरलेलें आहे. यांच्या विचारांत नवीनपणा असतो ही गोष्ट मात्र खरी. यांचें लेखन विपुल आणि विविध विषयांवर आहे.

यांचे ग्रंथ—( 1 ) India in Transition (1922), ( 2 ) The Revolution and Counter-revolution in China, ( 3 ) The Spiritualist West, ( 4 ) The Philosophy of Fascism, ( 5 ) The Autobiography of a Cat, ( 6 ) आइन्स्टाइनच्या सापेक्षतावादावरील शहासुलेमान यांचें मत खोडणारा एक निबंध.

**राय, राजा राममोहन**—( जन्म स. १७७२ मे २२–मृत्यु स. १८३३ सप्टें. २७ ) हिंदुस्थानांतील पहिले समाजसुधारक, ब्राह्मसमाजाचे संस्थापक, राजकारणी मुत्सद्दी व नवयुगप्रवर्तक.

यांचें जन्मस्थान बंगाल्यांतील हुगळी जिल्ह्यांतील राधानगर. जात कुलीन ब्राह्मण. मातेचें नांव तारिणीदेवी ( फुलठाकुराणी ). पित्याचें नांव रमाकान्त. यांचे आजे व पणजे बंगालच्या नवाबाच्या दरबारीं नोकरीस होते. त्या वेळीं यांच्या घराण्याला राय हा किताब मिळाला. यांचें घराणें वैष्णवाचें असून मातृकुल शाक्त होतें. यांनीं पाटणा येथें राहून अरबी व फारसी भाषांचा अभ्यास केला. तेव्हांच यांच्यावर सुफी पंथाचा परिणाम झाला आणि हे मूर्तिपूजेच्या विरुद्ध झाले. तेव्हां यांना घरांतून हाकून देण्यांत आलें. पुनः हे घरीं आले तेव्हां यांनीं आजारीपणांत मांसरस घेतला; तेव्हां यांना पुन्हा घरांतून बाहेर घालविण्यांत आलें व कोर्टमार्फत बेवारस ठरविण्यांत आलें.

यांना घरांतून घालवितांच मूर्तिपूजेसंबंधीं बौद्धमताचा अभ्यास करण्याकरितां हे हिमालयांतून पायीं तिबेटांत गेले ( १७९७ ). पण तेथें यांना मूर्तिपूजेच्या विकृत स्वरूपाचा अनुभव आला. तेथून परत आल्यावर हे काशी येथें सहकुटुंब राहिले ( १८०१ ). तेथें यांनीं संस्कृत विद्या आणि धर्मशास्त्र यांचा अभ्यास करण्यांत बरींच वर्षे घालविलीं. नंतर हे मुर्शिदाबादला आले व तेथें यांचा तुहफत-उल-मुवाहुद्दीन 'एकेश्वरीवाद्यास देणगी' हा फारशी ग्रंथ प्रसिद्ध झाला. या ग्रंथांत श्रद्धा हें मूळ असून इतर धार्मिक पसारा व्यर्थ असल्याचें प्रतिपादन आहे.

पुढें यांनीं कलेक्टरची शिरस्तेदारी पत्करून नोकरी करतांना इंग्रजी भाषेचें ज्ञानहि संपादन केलें. सुमारें दहा वर्षांनंतर नोकरी सोडून हे कलकत्त्यास येऊन राहिले ( १८१४ ). तेथें यांनीं आत्मीय सभा स्थापून धर्मचर्चा सुरू केली ( १८१५ ). याच वेळीं यांनीं इंग्रजी, बंगाली व हिन्दी भाषेंत ईशादि उपनिषदें व वेदान्तसूत्रें भाषान्तरित करून प्रसिद्ध केलीं.

यांनीं प्रथम सती जाण्याविरुद्ध चळवळ केली (१८१८) आणि ती सतीविरुद्ध कायदा झाल्यानें यशस्वी झाली. यापूर्वीच मूर्तिपूजेविरुद्ध यांनीं हल्ला चढविला होता. हिंदु लोकांप्रमाणें पिता, पुत्र व पवित्र आत्मा ही त्रयी मानणाऱ्या ख्रिस्ती लोकांनाहि यांनीं मूर्तिपूजक ठरवून त्यांचाहि निषेध केला. तेव्हां हिंदु व ख्रिस्ती अशा सर्वच लोकांशीं यांचीं कडाक्याचीं वाग्युद्धें झडलीं. तेव्हां यांनीं एकेश्वरी समाज स्थापन करून आपला नवा मार्ग काढला ( १८२१ ). सरकार एक लक्ष रुपये खर्चून जुन्या विद्येचें एक कॉलेज काढणार होतें; पण भौतिक ज्ञानाचें महत्त्व प्रतिपादून यांनीं जुन्या शास्त्राच्या शिक्षणाला विरोध केला आणि यांनीं पुढाकार घेऊन आणि झीज सोसून हिंदु कॉलेज काढलें. त्यांत शिक्षक म्हणून यांना मिशनरी मिळवावे लागले व अभ्यासक्रम आखण्यापासून कामें करावीं लागलीं. त्याबरोबर जुन्या शास्त्रांचें शिक्षण देणारें वेदान्त कॉलेजहि काढण्यास हे विसरले नाहींत (१८१९). पण पुढें शिक्षण, सुधारणा, मूर्तिपूजाविरोध, एकेश्वरवाद या सर्वांचा संग्रह करून हिंदु संस्कृतीचा पुरस्कार करणारा ब्राह्मसमाज यांना काढावा लागला ( १८२८ ऑगस्ट २५ ).

हे दिल्लीचा मोगल बादशाह दुसरा अकबर याच्या मसनदीच्या हक्काची दाद लावण्याकरितां वकील म्हणून

इंग्लंडला गेले ( १८३१ एप्रिल ). त्यांनींच यांना राजा हा किताब दिला. तेथें हिंदुस्थानच्या राज्यकारभाराचा सुधारणाकायदा घडत होता. त्यांत इष्ट सुधारणा व्हाव्या म्हणून यांनीं प्रयत्न केला. एकेश्वरीपंथाचे संस्थापक म्हणून यांचा तिकडे गौरव झाला. तिकडे यांनीं आपल्याबरोबर ब्राह्मण व दुभत्या गाई नेल्या होत्या. ईस्ट इंडिया कंपनीचे डायरेक्टर व फ्रान्सचा राजा लुई फिलिफ यांनीं मेजवानी दिली असतां तेथें फक्त भात व पाणी यांना यांनीं स्पर्श केला. शेवटीं युरोपियन स्त्री-पुरुषांच्या परिवारांत ब्रिस्टल येथें यांचें देहावसान झालें. देहावसान होतांना यांनीं ओंकाराचा उच्चार केला. यांच्या गळ्यांत शेवटीं जानवें आढळलें. तेथें रामरतन यांनीं यांचें हिंदु रिवाजाप्रमाणें और्ध्वदेहिक केलें. पुढें यांच्या अस्थींवर कार्नोव्हेल येथें यांची हिंदु पद्धतीची भव्य समाधि बांधण्यांत आली.

यांना बंगाली गद्याचे आद्यप्रवर्तक मानण्यांत येतें. यांचीं बंगाली प्रार्थनागीतें ब्राह्मसमाजांत अत्यंत लोकप्रिय आहेत. यांचें ' संवादकौमुदी ' हें बंगाली भाषेंतील पहिलें पत्र होय. याशिवाय मिरत-अलअखबार, ब्रॅह्मॅनिकल मॅगॅझीन, बंगाली हेरल्ड अशीं निरनिराळ्या भाषेंत हे नियतकालिकें चालवीत. यांना अनेक भाषा येत. यांनीं अनेक भाषांत ग्रंथरचना केली.

हिंदुस्थानच्या पारतंत्र्याबद्दल यांच्या मनांत कमालीचें असमाधान होतें. अत्यंत तळमळीनें समाजसुधारणा, शिक्षण व ज्ञानप्रसार हीं कामें यांनीं केलीं. इंग्लंडला जातांना केप ऑफ गुडहोपला पोंचल्यावर फ्रेंच बोटींतून प्रवास करण्याचा यांनीं आग्रह धरला. बोटीवर चढतांच बोटीवरील स्वातंत्र्याच्या ध्वजाचा यांनीं मनापासून जयजयकार केला. तेथें यांनीं मोंगल बादशहाच्या वकिलीबरोबर हिंदुस्थानची वकिलीहि केली. सारावसूली, आर्थिक स्थिति यांवर तीन निबंध सादर केले. १८३२ सालीं पार्लमेंटपुढें चार्टर ॲक्टसंबंधीं चर्चा चालू असतां हें बिल पास झालें तर आपण ब्रिटिश साम्राज्याचा त्याग करून अमेरिकेचा आश्रय करूं अशी प्रतिज्ञा यांनीं केली.

यांनीं सरकार, परंपरा व लोक यांचा विरोध पत्करून मनांत येणारे विचार निर्भयपणें व तडफेनें प्रतिपादण्यास सुरुवात केली. त्याकरितां लेखन, भाषण, वादविवाद, वर्तमानपत्रें, ग्रंथ, संस्था वगैरे सुरू करून प्रत्यक्ष कार्य आरंभिलें. आपल्या प्रभावी व्यक्तित्वानें व निस्वार्थी कार्यपद्धतीनें सर्वांना भारून टाकलें. महर्षि देवेन्द्रनाथ टागोर व केशवचंद्र सेन यांच्यासारखे थोर अनुयायी मिळवून आपल्या मागेंहि अर्धशतकभर आपलें कार्य गाजत ठेवणाऱ्या या माणसाचें कर्तृत्व असामान्य होतें यांत बिलकूल शंका नाहीं.

यांचे ग्रंथ—( 1 ) Precepts of Jesus (1820), ( 2 ) The Guide to Peace and Happiness, ( 3 ) Final Appeal, ( 4 ) The English Works ( तीन भाग, संपादक–जे. सी. घोष १९०१ ).

पत्रें—The Brahamanical Magazine वगैरे.

**राव, ना डॉ. राघवेन्द्र**—( जन्म स. १८९०–मृत्यु स. १९४२ जून १५ ) मध्यप्रान्तांतील सुप्रसिद्ध राजकारणी मुत्सद्दी, स्वराज्यपक्षाचे पुढारी, मंत्री, हंगामी गव्हर्नर, भारतमंत्र्याचे सल्लागार व हिंदुस्थान सरकारचे शिक्षणमंत्री.

इंदूर व जयपूर राज्यांची दिवाणगिरी नाकारून यांनीं इंडिया ऑफिसांतील कमी पगाराची नोकरी स्वीकारली. भारतमंत्र्याचे सल्लागार म्हणून काम करीत असतां लंडनच्या सतत बॉंबहल्ल्यानें यांची प्रकृति बिघडली व क्रिप्स योजनेच्या वेळीं घेतलेल्या परिश्रमानें यांची प्रकृति अधिक ढासळली.

**राशिवडेकर, विद्यावाचस्पति अप्पाशास्त्री**—( जन्म स.१८६२ सुमार–मृत्यु स. १९१३ ऑक्टो. २५) सुप्रसिद्ध संस्कृत पंडित, संस्कृत भाषेंतील लेखक व वक्ते.

यांचें शिक्षण जुन्या पद्धतीनें झालें होतें. यांचें संस्कृत भाषेवरील प्रभुत्व वाखाणण्यासारखें असे. हे प्रचलित विषयांवरील आपले विचार मोठ्या ललितमधुर भाषेंत सहज व्यक्त करीत. त्यामुळें कलकत्त्याच्या संस्कृतचंद्रिका या संस्कृत भाषेंत निघणाऱ्या मासिकाचें मुख्य संपादकत्व यांच्याकडे आलें. तें मासिक यांनीं पुष्कळ वर्षे उत्कृष्ट चालविलें. यांनीं सुनृतवादिनी नांवाचें संस्कृत भाषेंतील साप्ताहिकहि पुष्कळ वर्षे चालविलें व लोकप्रिय केलें. याशिवाय संस्कृत भाषेंत कादंबऱ्या, लघुकथा, काव्यें व वेणीसंहार, विक्रमोवर्शीय वगैरे अनेक नाटकांवर संस्कृत टीका लिहिल्या. शेवटीं पुण्याच्या भावे हायस्कूलमध्यें हे संस्कृतचे शिक्षक होते. केवळ संस्कृत भाषेवरील असाधारण प्रभुत्वामुळें यांनीं अखिल भारतीय कीर्ति संपादन केली होती.

**राहुल, सांकृत्यायन**—( जन्म स. १८९३ ) जगप्रसिद्ध महापंडित, पुरातत्त्वसंशोधक, अभ्यासक व कम्युनिस्ट.

जन्मस्थान पन्दाहा ( संयुक्तप्रान्त, जि. अझमगड ). मूळ नांव केदारनाथ पांडे. बौद्ध धर्माची दीक्षा घेतल्यावर यांनीं हें सध्याचें नांव धारण केलें. प्राथमिक शिक्षण संपवून हे कलकत्त्यास गेले. पुढें यांनीं कलकत्त्यास एका दुकानांत गुमास्ता म्हणून काम केलें. तेथें अनेक वेदान्त्यांशीं यांची भेट होऊन हे पुढें कायमचे घराबाहेर पडले. बनारस येथें राहून यांनीं काव्य–व्याकरणाचा परिचय करून घेतला व हे १९१२ मध्यें बिहारमध्यें छापडा जिल्ह्यांतील एका मठांत वैष्णव साधु बनले. तेथून पुढें १९१५ सालीं आग्र्यास हे आर्यसमाजी झाले. त्याच्या प्रचारांत हे आरबी भाषा शिकले. यांनीं एक प्रचारकांची शाळा उघडली. पुढें हे राजकारणाकडे ओढले गेले आणि हे बौद्ध धर्माकडे खेचले जाऊं लागले. दक्षिणेतून प्रवास करून हे खांडवा येथें आले. तेथें असहकारितेंतील राजकीय भाषणावरून यांना सहा महिन्यांची शिक्षा झाली. तेव्हां बक्सारचे तुरुंगांत यांनीं आपला 'बाइसमीं सदी' हा ग्रंथ पुरा केला. त्यांत यांनीं १९२४ पासून दोनशें वर्षे झोपलेल्या नालंद्याच्या अध्यापक विश्वबंधूची कथा लिहिली आहे. १९२३ मध्यें चौरीचुराप्रकरणांत जहाल भाषणाबद्दल यांना दोन वर्षांची शिक्षा झाली. तेथें यांनीं शैतानकी आख, विस्मृतीके गर्भमे, जादूका मुल्ख, सोनेकी ढाल वगैरे अनुवादित कादंबऱ्या लिहिल्या. हे पुढें राजकारणांत फेरवादी झाले आणि लंकेंतील विद्यालंकार कॉलेजमध्यें संस्कृतचे प्राध्यापक म्हणून गेले. तेथें पाली भाषेंतील संस्कृत ग्रंथांचें अध्ययन करून यांनीं त्रिपिटकाचार्य ही पदवी मिळविली. नंतर बौद्धांचे प्राचीन ग्रंथ शोधण्याकरितां हे तिबेटांत गेले ( १९२९ ). तेथें जाण्याकरितां यांना नेपाळांतील शिवरात्रीच्या यात्रेचा आश्रय घेऊन वेषान्तर करून तिबेटांत पोंचावें लागलें. तेथें सव्वा वर्ष राहून बावीस खेचरांवर हस्तलिखित ग्रंथ घेऊन हे लंकेस निघाले. वाटेंत पाटणा म्युझियममध्यें राहुल सेक्शन उघडून त्यांत यांनीं तिकडे मिळविलेलीं ऐतिहासिक चित्रें ठेवलीं. पुस्तकें बिहार ओरिसा रिसर्च सोसायटीला दिलीं. लंकेंत पोंचल्यावर यांनीं बौद्ध धर्माची दीक्षा घेतली व हे हिंदुस्थानांत आले ( १९३० ).

तिबेटांतून आणलेल्या हस्तलिखित ग्रंथांचा अभ्यास करून यांनीं वसुबंधूंचा अभिधर्मकोश स्वकृत राहुलभाष्या-सह व बुद्धचर्या नांवाचें गौतमबुद्धाचें संशोधित चरित्र प्रसिद्ध केलें. १९३१ च्या उत्तरार्धांत लंकेच्या बौद्ध मिशन-तर्फे हे युरोपला गेले, पण यांना रशियाला पोंचतां आलें नाहीं. दुसऱ्या खेपेस हे तिबेटांत गेले आणि यांनीं तेथून महत्त्वाचे ग्रंथ आणून प्रसिद्ध केले; त्याबद्दल युरोपांत यांची सर्वत्र वाहवा झाली. १९३५ मध्यें यांनीं जपानमार्गे मास्कोला जाऊन हे इराणमार्गे परत आले. १९३७ सालीं सोविएट रशियाकडून लेनिनग्राडच्या प्राच्यविद्यामंदिरांत संशोधन करण्याकरितां यांना निमंत्रण आलें. तिकडे गेले असतां लेनिनग्राड युनि-व्हर्सिटींतील प्रोफेसर एल्येना नार्वेतोवूना या रशियन स्त्रीशीं यांनीं विवाह केला. यांना इगोर राहुलविच नांवाचा मुलगा आहे. पण चार-पांच महिन्यांतच तिबेटांतील ग्रंथांचे फोटो घेण्याकरितां यांना राष्ट्रसभा-मंत्रिमंडळानें पाठविलें. या खेपेस राजमार्गानें जाऊन यांनीं धर्मकीर्ति, प्रज्ञाकरगुप्त, ज्ञानश्री, नागार्जुन, आसंग, वसुबंधु, रत्नाकरशान्ति वगैरेंच्या सत्तर ग्रंथांतील दीड लक्ष श्लोक, कित्येक हिन्दी काव्यें व चित्रें यांनीं आणलीं.

१९३८ सालीं हे कम्युनिस्ट पक्षाचे सभासद झाले. शेतकऱ्यांची संघटना हें यांनीं आपलें ध्येय ठरविलें. शेतकऱ्यांच्या चळवळींत यांना दोनदां शिक्षा झाल्या असतां यांनीं पंधरा-पंधरा दिवसांचे यशस्वी उपास केले. १९४० सालीं यांना ओरिसांतील किसानसभेचे अध्यक्ष निवडण्यांत आलें. पण त्यापूर्वींच यांना भा. सं. कायद्याखालीं पकडण्यांत आलें.

यांचें लेखन सतत चालू असतें. यांचीं साठांपेक्षां अधिक पुस्तकें प्रसिद्ध आहेत. त्यांत प्रवासवर्णनें ८, कादंबऱ्या ८, नाटकें भोजपुरीभाषेंत ८, सिलोनी भाषा, तिबेटी भाषेचें व्याकरण, मेरी जीवनयात्रा (आत्मचरित्र), नये भारतके नये नेते, व्होल्गा ते गंगा इत्यादि प्रमुख होत. यांचें भाषाज्ञान अद्वितीय असून यांना सुमारें तीस भाषा येतात.

**रे, सर प्रफुल्लचन्द्र**—( जन्म स. १८६१ ऑगस्ट २–मृत्यु स. १९४४ जून २३ ) बंगालमधील महान् संशोधक, रसायनशास्त्रज्ञ व देशभक्त.

यांचा जन्म बंगाल्यांतील राडुली नांवाच्या खेड्यांत झाला व तेथेंच वडील शिक्षक असल्यानें प्राथमिक शिक्षण झालें. जात ब्राह्मण. यांचे वडील हरिश्चंद्र यांनीं १८७० सालीं मुलाच्या शिक्षणासाठीं कलकत्त्यास प्रयाण केलें. तेथें यांनीं वास्तव व रसायनशास्त्राचें शिक्षण पूर्ण करून

गिलख्रिस्त शिष्यवृत्ति मिळवून हे इंग्लंडला गेले (१८८२). तेथें हे रसायन या आवडत्या विषयाचे डी. एस्सी. झाले (१८८८). नंतर एडिंबरो केमिकल सोसायटीचे यांना उपाध्यक्ष निवडण्यांत आलें. इंग्लंडमध्यें असतां 'बंडा-पूर्वीचा आणि नंतरचा हिंदुस्थान' या विषयावरील यांचा चढाओढींत मान्य झालेला निबंध जप्त करण्यांत आला व इंडियन एज्युकेशनल सर्व्हिसला यांना अयोग्य ठरविण्यांत आलें.

परत आल्यावर हे कलकत्त्याच्या प्रेसिडेन्सी कॉलेजांत रसायनाचे प्राध्यापक म्हणून काम करूं लागले (१८८९). तरुण विद्यार्थ्यांत संशोधनबुद्धि निर्माण करण्याचें ध्येय यांनीं ठेवलें. १८९६ मध्यें यांनीं मरक्युरस नायट्राइट या काम्पाउंडचा शोध लावला व तो स्थिर राहतो असें सिद्ध केलें. नंतर निरनिराळे नायट्राइट्स् शोधून काढणें व स्थिर करणें यांकडे यांचें लक्ष वेधलें. १९०४ मध्यें बंगाल सरकारनें यांना पाश्चात्य देशांतील प्रयोगशाळा पाहण्यास पाठविलें. या वेळीं साम्राज्यांतील विश्वविद्यालयाच्या परिषदेस कलकत्ता विश्वविद्यालयाचे प्रतिनिधि म्हणून हे उपस्थित होते. १९१६ सालीं हे सेवानिवृत्त झाले आणि कलकत्ता विश्वविद्यालयाच्या 'कॉलेज ऑफ सायन्स' चे मुख्याध्यापक झाले (१९२१-१९३६). तेथील आपला पगार प्रयोगशाळा व संशोधन या कार्यांत यांनीं खर्च केला.

इंडियन स्कूल ऑफ केमिस्ट्री व इंडियन केमिकल सोसायटी या महत्त्वाच्या संस्था यांनीं काढल्या आणि हिस्टरी ऑफ हिंदु केमिस्ट्री या नांवाचा महत्त्वाचा ग्रंथ दोन भागांत लिहिला. गतकालांत हिंदुस्थान देशानें रसायन-शास्त्रांत काय काय कामगिरी केली याची साधार व सविस्तर माहिती या ग्रंथांत दिली आहे. अनेक थोर शास्त्रज्ञांनीं या ग्रंथाची मुक्तकंठानें प्रशंसा केली आहे. या ग्रंथामुळें यांना सर ही पदवी मिळाली व अनेक परदेशी विश्वविद्यालयांनीं यांचा गौरव केला.

हिंदुस्थानांतील अर्वाचीन रसायनशास्त्राच्या जनकत्वाचा मान यांनाच दिला पाहिजे. यांच्यापूर्वी कलकत्ता प्रेसिडेन्सी कॉलेजांतील सर अलेक्झांडर पेडलर व अलाहाबाद मूर कॉलेजांतील प्रा. इ. जी. हिल वगैरेंनीं संशोधनाचा उपक्रम केला; पण तीं माणसें परकी होतीं. शिवाय यांनीं हिन्दी संशोधकांची एक परंपरा निर्माण केली. हिंदुस्थानांतील आज कोणताहि नांवाजलेला रसायन-शास्त्रज्ञ घेतल्यास त्याची परंपरा यांच्याकडे जाऊन पोंचते.

रसायनाच्या अनर्व, अर्व आणि वास्तव या तीन शाखांपैकीं अनर्व रसायनांत संशोधन सुरू करण्याचा मान यांचाच आहे. या संशोधनास स. १८९५ मध्यें मरक्युरस नायट्राइटनें सुरवात झाली. मरक्युरिक नायट्राइट तयार करतांना एक पिवळा स्वाळ पदार्थहि तयार होई. हा पदार्थ काय आहे याच्या शोधास हे लागले व शेवटीं अजून पावेतों अज्ञात असलेला मरक्युरस नायट्राइट तो हाच होय असें सिद्ध झालें. या शोधानें शास्त्रीय जगांत मोठी खळबळ उडवून दिली व हिंदी शास्त्रज्ञाचें नांव याच वेळीं अगदीं प्रथम सर्वतोमुखी झालें. बर्थेलॉट, व्हिक्टरमेयर, व्होलार्ड, रास्को इत्यादि पाश्चात्य शास्त्रज्ञांनीं यांची मुक्तकंठानें प्रशंसा केली. या संशोधनानंतर त्यांनीं इतर नाइट्राइटसवर कार्य सुरू केलें. स. १९१८ पर्यंत या विषयावर यांचे ऐंशीच्यावर लेख प्रसिद्ध झाले आहेत. यावरून हें कार्य किती चिकाटीनें व उत्साहानें चाललें होतें याचा अदमास करतां येतो. या कालांत अतुलचंद्र घोष, एस. सी. बानर्जी, जितेंद्रनाथ रक्षित, रसिकलाल दत्त इत्यादि विद्यार्थ्यांनीं यांच्याबरोबर संशोधन करून नायट्राइटस्, हायपो नायट्राइटस्, अमिनो नायट्राइटस् वगैरे अनेक नत्रसंयुग तयार केले. यांच्याशिवाय हिंदुस्थानांत अनर्व रसायनांत प्रत्यक्ष असें फारसें कार्य झालेलें नाहीं.

बेंगाल केमिकल ॲन्ड फार्मास्युटिकल वर्क्स लि. हा कारखाना यांनींच काढला. पगारांतून सांठविलेल्या दोनचारशें रुपयांवर यांनीं सुरवात केली व १९०२ सालीं दोन लक्ष भांडवलाची ही कंपनी भागीदारीच्या तत्त्वावर नोंदण्यांत आली. वाढत वाढत या कारखान्याची यंत्र-सामग्री आतां आशिया खंडांत पहिल्या प्रतीची झाली आहे. यांनीं आपल्या शेअरच्या नफ्यांतून हायस्कूल व सार्वजनिक कार्य चालविण्याकरितां ट्रस्ट केला होता. आपल्या पगारांतून साठविलेल्या अकरा लाख रुपयांची देणगी यांनीं कलकत्ता युनिव्हर्सिटीला दिली.

यांचें राजकारणाकडे व देशाकडे भरपूर लक्ष असे. हे शुद्ध खादी वापरत व खादीचा प्रचारहि यांनीं केला. स्वराज्याशिवाय देशाचें अत्यंत नुकसान होत असल्याचें यांनीं अनेक वेळां घोषित केलें. १९२२ च्या उत्तर बंगालमधील जलप्रलयांत सरकारला करितां आलें नाहीं तें यांनीं करून दाखविलें. त्या वेळीं यांनीं एका हाकेसरशीं सहा लाख रुपये गोळा केले. यांची शिष्यशाखा म्हणजे हुकमी सेना असल्याचें तेव्हां प्रत्ययास आलें. यांचा सत्तरावा वाढदिवस जगांतील शास्त्रज्ञांनीं लेख

लिहून साजरा केला. यांनीं आत्मचरित्र लिहिलें आहे ( १९३२ ).

यांचे ग्रंथ—( 1 ) History of Hindu Chemistry (दोन खंड), (2) Life and Times of C. R. Das (1927), ( 3 ) Life and Experiences of a Bengali Chemist ( आत्मचरित्र १९३२ ).

यांचीं प्रमुख संशोधनें—( 1 ) Mercurous Nitrite and its various Derivatives, ( 2 ) Nitrites of Alkylammonium Series, ( 3 ) Nitrites of the Mercurialkyl and Mercurialkyl-aryl-ammonium Series, ( 4 ) Determination of Conductivity of Nitrites, ( 5 ) Dimercury ammonium halides, (6) Preparation of Bi-Sulphonium Compounds इत्यादि.

**रेड्डी, सर रामलिंग**—( जन्म स. १८८० ) आंध्र युनिव्हर्सिटीचे उपकुलगुरु व सुप्रसिद्ध शिक्षणतज्ज्ञ.

यांच्या वडिलांचें नांव सी. रामस्वामी रेड्डी. केम्ब्रिजच्या सेंट जॉर्ज कॉलेजमध्यें आपलें शिक्षण संपवून हे परत आले. गव्हर्नमेंट ऑफ इंडिया स्कॉलर म्हणून हे इंग्लंडला गेले व इतिहासांत यांनीं विशेष प्रावीण्य मिळविलें.

सुरुवातीला कांहीं दिवस बडोदा कॉलेजचे व्हाइस-प्रिन्सिपल म्हणून काम केल्यानंतर म्हैसूरच्या महाराजा कॉलेजाचे प्रिन्सिपल म्हणून यांची नेमणूक झाली ( १९१६ ). यानंतर कांहीं दिवस हे म्हैसूर संस्थानांतील प्रमुख शिक्षण तपासनीस होते. आंध्र युनिव्हर्सिटीची स्थापना झाल्यानंतर यांना तिचे उपकुलगुरु निवडण्यांत आलें ( १९२६-३०, १९३६ ).

दक्षिण हिंदुस्थानांतील प्रमुख शिक्षणतज्ज्ञ म्हणून यांची प्रसिद्धि असून ऑल इंडिया बोर्ड ऑफ एज्युकेशन यासारख्या शिक्षण संस्थांचे हे सभासद होते ( १९२१-४० ). युनायटेड नॅशनॅलिस्ट पक्षाचे हे कांहीं दिवस उपप्रमुख व संयोजक होते ( १९२४ ).

यांचे ग्रंथ—( 1 ) Congress in Office and Constitutional issues that have arisen.

तेलगु—( 1 ) Enguiry into the Principles of Telgu, ( 2 ) Political Economy ( मद्रास युनिव्हर्सिटीनें पारितोषिक दिलेला युनिव्हर्सिटी सुधारणांवरील व्याख्यानांचा संग्रह ).

# ल

**लजपतराय, लाला**—( जन्म स. १८६५–मृत्यु स. १९२८ नवं. १७ ) पंजाबांतील सुप्रसिद्ध राजकारणी मुत्सद्दी, वर्तमानपत्रकार, लेखक, वक्ते व सार्वजनिक कार्यकर्ते.

पंजाबांतील लुधियाना जिल्ह्यांतील जगराण हें गांव यांचें जन्मस्थान. उर्दूतील सुप्रसिद्ध लेखक मुनशी राधाकृष्णलाल हे यांचे पिताजी. १८८५ साला यांनीं कायद्याची परीक्षा दिली व वयाला वीस वर्षे पुरीं होण्याच्या आंतच हे वकिली करूं लागले. १८७७ सालीं स्वामी दयानंद पंजाबांत गेले. तेथें त्यांना जे निष्ठावन्त अनुयायी भेटले त्यांत यांची गणना होते. १८८६ जून १ ला लाहोर येथें दयानंद अँग्लो–वैदिक कॉलेजची स्थापना झाली. त्या कॉलेजचे हे सेक्रेटरी झाले व पंजाबभर हिंडून त्या कॉलेजकरितां यांनीं पांच लाख रुपये जमा केले. तेथें मधूनमधून हे इतिहासहि शिकवीत.

आर्यसमाजानें चालविलेल्या स्त्रिया, अनाथ, विधवा, भूकंप, दुष्काळनिवारण वगैरे लोकसेवेच्या कामांत हे पुढाकार घेत. व्यापक दृष्टिकोण हा यांचा विशेष होय. धर्म व समाज यांच्या कार्याप्रमाणें हे राजकारणांत पुढारीपणा स्वीकारीत. १८८८ पासून हे राष्ट्रसभेंत हजर राहत. तेव्हांपासून हे राष्ट्रसभेंत भाषणें करीत. असामान्य वक्ते व राष्ट्रीय मताचे पुरस्कर्ते म्हणून यांची लवकरच हिंदुस्थानभर ख्याति झाली. १९०५ सालीं राष्ट्रसभेतर्फे यांना प्रचाराकरितां इंग्लंडला धाडण्यांत आलें. यांच्या प्रवासाकरितां पंजाब प्रान्तिक कमेटीनें मंजूर केलेले तीन हजार रुपये यांनीं आर्यसमाजाला देऊन टाकिले.

परत आल्यानंतर शेतकऱ्यांना चिथावणी देतात म्हणून यांना अजितसिंहांसह मंडाले येथें हद्दपार करण्यांत आलें ( १९०७ ). सहा महिन्यांनंतर यांना सोडून देण्यांत आलें. सुरत कॉंग्रेसचें अध्यक्षपद यांनीं नाकारिलें. पुढें गुप्त पोलिसांच्या त्रासामुळें पहिल्या महायुद्धाचे वेळीं हे अमेरिकेस जाऊन राहिले. तेथें यंग इंडिया पत्र व लीग काढली व यांनीं सतत परिणामकारक काम केलें.

मातृभूमीच्या आठ वर्षांच्या वियोगानंतर हे हिंदुस्थानांत परत आले. तेव्हां असहकारितेचें युग सुरू झालें होतें. कलकत्ता राष्ट्रसभेचे यांना अध्यक्ष निवडण्यांत आलें ( १९२० सप्टें. ). असहकारितेचा ठराव यांच्या अध्यक्षतेखालीं पास झाला, पण यांनीं त्याच्या विरुद्ध मत दिलें. खुद्द पंजाबांत यांच्या विरुद्ध असहकारी तरुणांचा नवा गट उत्पन्न झाला. यांना मनापासून ही चळवळ पटत नव्हती तरी हे सर्व राष्ट्राबरोबर त्या चळवळींत सामील झाले व तुरुंगांत गेले. तुरुंगांतून बाहेर आले तों स्वराज्यपक्ष उदयास आला आणि हे त्यातर्फे मध्यवर्ति कायदेमंडळांत निवडून गेले आणि तेथें यांनीं उत्कृष्ट कामगिरी केली. सायमनकमिशनवर बहिष्काराचा ठराव विशेषतः यांच्यामुळेंच पास झाला.

पीपल हें इंग्रजी पत्र, पीपल असोसिएशन, टिळक स्कूल ऑफ पॉलिटिक्स या संस्था हे चालवीत. यांनीं या संस्थांना आपलें सर्वस्व देऊन टाकलें.

हिंदु धर्माचे हे कट्टे पुरस्कर्ते होते. हिंदु लोक बलवान् व्हावेत म्हणून यांनीं अविश्रान्त परिश्रम केले. हिन्दी, उर्दू व इंग्रजी या भाषांत यांचीं भाषणें सारखींच परिणामकारक होत. मॅझिनी, गॅरिबॉल्डी, श्रीकृष्ण, शिवाजी इत्यादींचीं स्फूर्तिदायक चरित्रें व आत्मचरित्र यांनीं लिहिलें आहे.

३० ऑक्टो. १९२८ रोजीं सायमन कमिशन लाहोरला गेलें. तेथें यांच्या नेतृत्वाखालीं हजारों तरुण काळीं निशाणें दाखवीत असतां पोलिसांकडून ठोसे व दंडुके यांचा मार यांना सहन करावा लागला. त्यामुळें यांच्या छातीस तीन इंच लांबरुंद जखम झाली व त्यामुळें हे मृत्यु पावले.

ब्रिटिश सरकारनें यांचा खून केला अशा समजुतीनें भगतसिंग, राजगुरु वगैरे क्रान्तिकारक क्षुब्ध झाले आणि त्यांनीं यांच्या मृत्यूपासून एक महिन्याच्या आंत यांच्या मृत्यूस कारण झालेल्या पोलिस अधिकाऱ्याचा खून करण्याचा प्रयत्न केला आणि त्यांतून भगतसिंग प्रकरण उत्पन्न झालें.

यांचे ग्रंथ—( 1 ) Unhappy India, ( 2 ) The Voice of Truth, ( 3 ) The Message of the East, ( 4 ) The Young India, ( 5 ) The Nationalist Movement, इत्यादि.

**लठ्ठे, दि. ब. अण्णा बाबाजी**—( जन्म स. १८७८ ) महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध राजकारणी मुत्सद्दी व सार्वजनिक कार्यकर्ते.

यांचें जन्मस्थान कुरुंदवाड. हे धर्मानें जैन असून सांगली, कोल्हापूर व पुणें येथें शिक्षण घेऊन एम्. ए. झाले ( १९०३ ).

यांनीं दक्षिण महाराष्ट्र जैन सभेची स्थापना करून जैनांची संघटना करण्यास सुरुवात केली. या संस्थेचे व कर्नाटक ब्राह्मणेतर लीगचे हे अध्यक्ष होते. नंतर छत्रपति शाहू महाराजांच्या कृपेनें कोल्हापुरीं राजाराम कॉलेजांत इंग्रजीचे प्राध्यापक, एज्युकेशनल इन्स्पेक्टर वगैरे कामें यांच्याकडे आलीं. त्या वेळीं ब्राह्मणेतर चळवळीला पोषक अशी लेखनभाषणद्वारा यांनीं बरीच कामगिरी केली. पण लवकरच यांना कोल्हापूर सोडावें लागलें. तेव्हां यांनीं एलएल. बी. ची परीक्षा दिली आणि हे बेळगांवीं वकिली करूं लागले. तेथें यांनीं रयतसंस्था सुरू करून ' डेक्कन रयत ' हें इंग्रजी साप्ताहिक सुरू केलें. १९२० सालीं राष्ट्रसभेचा बहिष्कार असतां हे असेंब्लींत निवडून आले. मॉंटफोर्ड सुधारणांनंतर अस्तित्वांत आलेल्या मुंबई कौन्सिलांत राष्ट्रसभा व मराठा यांच्या विरोधामुळें हे निवडून येऊं शकले नाहींत ( १९२६ ). हे कोल्हापूरचे दिवाण नेमले होते ( १९२६-३० ). त्या वेळीं यांचें क्षेत्र संस्थानापुरतें मर्यादित होतें तरी यांच्या कर्तृत्वाचा परिचय तेथें मिळाला. यांच्या वाङ्मयसेवेमुळें बेळगांवच्या महाराष्ट्र-साहित्य-संमेलनाचे स्वागताध्यक्ष यांना निवडण्यांत आलें (१९२९). राष्ट्रसभेच्यातर्फे हे निवडून येऊन कॉंग्रेस मंत्रिमंडळांत अर्थमंत्र्याच्या जागीं होते. पण १९४२ च्या चळवळीचे वेळीं कॉंग्रेसच्या सर्वच कार्यक्रमावर विश्वास नाहीं असें म्हणून हे तुरुंगाबाहेर आल्यामुळें १९४५ च्या निवडणुकींत राष्ट्रसभेतर्फे यांना स्थान देण्यांत आलें तरी मंत्रिमंडळांत घेतलें नाहीं.

यांचें वाङ्मय—मराठी–१ हिंदुस्थानांतील ब्रिटिश-

साम्राज्याचा उदय, २ शाहू महाराजांचें चरित्र व आठवणी.

इंग्रजी–१ इन्ट्रोडक्शन टु जैनिझम, २ प्रॉब्लेम ऑफ इंडिया.

**लक्ष्मय्या परशुराम जाजी**—(जन्म स. १८६७) गुलबर्ग्याचे प्रमुख व्यापारी व प्रसिद्ध नागरिक.

जन्मस्थान हुमणाबाद. यांचें लिहिण्यावाचण्याचें शिक्षण गुलबर्गा येथें झालें. बाराव्या वर्षापासून यांनीं आपलें लक्ष व्यापारांत घातलें. प्रथम यांच्याकडे रोकड वही लिहिण्याचें काम आलें. सकाळीं सहा वाजतां दुकान उघडून झाडलोट करून रात्रीं आठ वाजेपर्यंत हे वडिलांच्याबरोबर काम करीत. काष्ठौषधीच्या दुकानांत पुड्या बांधण्याचें काम यांना करावें लागे. वडील यांच्या बत्तिसाव्या वर्षी वारले. तेव्हां यांनीं आपल्या नांवानें दुकान सुरू केलें. आतां त्यांचीं निरनिराळ्या मालाचीं सात दुकानें झालीं आहेत. शिवाय शहाबाद, तांडूर, रायचूर, यादगीर, लातूर वगैरे ठिकाणीं यांचीं दुकानें आहेत. १९४५ सालीं ५०० मुनीम यांच्याकडे काम करीत असत. मुंबई, मद्रास, बंगाल, पंजाब वगैरे प्रान्तांशीं यांचा आवक-जावक व्यवहार फार मोठ्या प्रमाणांत चालतो.

आंध्र वैश्य समाजाच्या उत्कर्षाकरितां यांनीं पुष्कळ प्रयत्न केले. आर्य वैश्य कर्नाटक कान्फरन्सचे हे स्वागताध्यक्ष होते. मच्छलीपट्टण येथें भरलेल्या वैश्य कान्फरन्समध्यें यांना ‘ वैश्यकुलशेखर ’ अशी पदवी देण्यांत आली. हे वैदिक धर्माचे अत्यंत अभिमानी असून सर्व वैश्यांनीं वैदिक आचार पाळावेत असा यांचा प्रयत्न असतो. त्याकरितां यांनीं वैश्य वेदोक्तविचार व क्षत्रिय वैश्य सद्भावमंडन इत्यादि पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. यांनीं आजपर्यंत आपल्या जातीच्या संस्था, मंदिरें, तीर्थयात्रा वगैरेकरितां पुष्कळ दानधर्म केला असून यांची परंपरा यांचे चि. शिवय्या, रामचंद्रय्या व वासुदेवराव पुढें चालवीत आहेत.

**लक्ष्मी, कॅ.**—(जन्म स. १९१४) अझाद हिंद सेनेच्या ‘ झांशीची राणी ’ या स्त्रीपथकाच्या प्रमुख.

यांचें समग्र नांव लक्ष्मी एस्. स्वामीनाथन्. मध्यवर्ति असेंब्लींत मद्रास प्रांतातर्फे निवडून गेलेल्या अम्मु स्वामीनाथन् यांच्या या कन्या. यांचा पहिला विवाह टाटा एअर सर्व्हिसमधील वैमानिक बी. के. नजगुंदराव यांच्याशीं झाला (१९३६). परंतु थोड्याच दिवसांत यांनीं त्यांच्याशीं घटस्फोट घेतला व या मद्रास युनिव्हर्सिटीच्या एम्. बी. बी. एस्. झाल्या.

यानंतर यांनीं ब्रि. आर्मीतील इब्राहिम या मुसलमान तरुणाशीं विवाह केला. इब्राहिम सिंगापूरला लढाईसाठीं जातांच याहि तेथेंच गेल्या व यांनीं तेथें मोफत दवाखाना सुरू केला. याच सुमारास सिंगापूरला जपान्यांचा हल्ला आला. सिंगापूर सोडून जावयाचा हुकूम मोडून या तेथेंच राहिल्या व हिंदी स्वातंत्र्य संघाच्या सदस्य बनल्या.

याच संस्थेच्या अझाद हिंद सेनेनें पुढें सुरू केलेल्या झांशीची राणी सेनेचें प्रमुखपद यांना देण्यांत आलें (१९४३ ऑक्टो. २२). या वेळीं स्त्रियांची संख्या एकशेंपंच्याऐंशीं होती ती यांनीं दोन हजारांपर्यंत वाढविली. पिस्तूल, बंदूक, मशिनगन्स यांसारखीं शस्त्रें वापरण्याचें शिक्षण या स्त्रियांना दिलें जाई.

सुरुवातीला या स्त्रियांना शुश्रूषापथकांत काम दिलें जाई; परंतु पुढें यांच्या विनंतीवरून सुभाषबाबूंनीं झांशीची राणी सेनेंतील दोन पथकांना अघाडीवर कूच करण्याचा हुकूम दिला व हिंदुस्थान व ब्रह्मदेश यांच्या अघाडीवर झालेल्या पहिल्याच लढाईंत या स्त्रियांनीं ब्रिटिशांविरुद्ध विजय मिळविला. पुढें मौलमीन येथें अझाद हिंद फौज माघार घेत असतां यांच्या फौजेनें निकराचा सामना देऊन सुभाषबाबूंना निसटून जाण्याची संधि दिली व मग या ब्रिटिशांच्या स्वाधीन झाल्या.

महायुद्धाच्या अखेरच्या दिवसांत लष्करी कामाऐवजीं घायाळ सैनिकांची या शुश्रूषा करीत होत्या, या मुद्द्यावर यांचेवर खटला न भरतां यांना सोडून देण्यांत आलें (१९४६).

**लक्ष्मीनारायण डी.**—(जन्म स. १८७६ जाने. १२–मृत्यु स. १९३० सप्टें. ३०) नागपूरचे सुप्रसिद्ध व्यापारी व दानशूर गृहस्थ.

यांचें घराणें आन्ध्र प्रान्तांतील तेलंगी ब्राह्मण असून मूळ गोदातीरच्या मंथन गांवचें राहणारें. यांचे वडील डी. पुलय्या गारु हे बालपणींच नागपूरजवळील कामठी गांवीं भिक्षुकी करीत. यांचें जन्मस्थान कामठी. यांच्या मातेचें नांव रामबाई. यांचे वडील हे इंग्रजी पांचवींत असतां वारले. तेव्हां यांचें शिक्षण वाय्. काकोलम् यांनीं

पुढें चालविलें. पण लवकरच हे त्यांच्या कौलाविटांच्या कारखान्यांत काम करूं लागले. पुढें मँगेनीजचा व्यवसाय करणाऱ्या 'सी. पी. प्रास्पेक्टिंग सिंडिकेट'मध्यें काम करूं लागले व पुढें तर खाणींतून मँगेनीज काढण्याचा व विकण्याचा परवाना यांनीं मिळविला. १९०५-१९२५ पर्यंत यांनीं या व्यवसायांत विपुल संपत्ति मिळविली. विशेषतः १९१४-१८ या युद्धकालांत तर यांचा परदेशाशीं व्यवहार वाढला. १९२७ सालीं यांनीं अनेक ठिकाणच्या आपल्या खाणी विकून हे कन्हान येथें आपल्या भव्य बंगल्यांत राहून सार्वजनिक कार्यांत लक्ष घालूं लागले.

यांनीं १९१३-१९२० पर्यंत अनेक महत्त्वाच्या विषयांवर जे लेख लिहिले व भाषणें केलीं त्यांचें संकलन 'स्पीचेस् ॲन्ड रायटिंग्ज' या ग्रंथांत केलें आहे. मध्यप्रान्त कायदेमंडळांत हे निवडून आले होते (१९१६-२०).

हे कामठी कँन्टोनमेंट कमेटीचे सभासद असून तेथें नगरपालिका स्थापून तिचे पहिले अध्यक्ष हेच होत (१९२७). नागपूर डिस्ट्रिक्ट कौन्सिलचे अध्यक्ष म्हणून काम करीत असतां शिक्षणार्थ यांनीं चाळीस हजारांच्या देणग्या दिल्या (१९२७-३०). नंतर कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें यांची निवड झाली.

मृत्यूपूर्वी ३ मे १९३० रोजीं यांनीं आपल्या बायको वगैरे आप्तांना देऊन शिल्लक राहिलेली पस्तीस लक्ष रुपयांची मिळकत नागपूर प्रान्तांत सहा वर्षे रहिवाशी असलेल्या हिंदु विद्यार्थ्यांना औद्योगिक शिक्षण देण्याकरितां नागपूर युनिव्हर्सिटीच्या ताब्यांत दिली. यासाठीं नेमलेल्या खास कमेटीनें भारतीय तज्ज्ञांनीं सुचविलेल्या योजना लक्षांत घेऊन 'लक्ष्मीनारायण इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी' ही संस्था स्थापन केली (१९४३). याप्रमाणेंच आन्ध्र युनिव्हर्सिटीला यांनीं आपला बहुमोल ग्रंथसंग्रह अर्पण केला. तसेंच नागपूरच्या भारत-सेवक-समाजाच्या शाखेला यांनीं एक लक्ष रुपये दिले.

यांनीं संतति नसल्यानें दत्तक घेण्याच्या फंदांत न पडतां आपली संपत्ति राष्ट्रकार्याला अर्पण करून आपलें नांव अजरामर करून ठेवलें. यांच्या पत्नी गोविंदराव आंधारे यांची कन्या बहिणाबाई.

**लाड, डॉ. भाऊ दाजी**—(जन्म स. १८२१-मृत्यु स. १८७४) सुप्रसिद्ध प्राच्यविद्यापंडित, संशोधक व परोपकारी गृहस्थ.

यांचें मूळ नांव रामकृष्ण विठ्ठल लाड. पण हे भाऊ दाजी या नांवानें प्रसिद्ध होते. जन्मस्थान गोव्यांतील मांजरें हें गांव. जात सारस्वत ब्राह्मण. यांचे वडील नशीब काढण्याकरितां मुंबईस आले. तेथें त्यांचीं मातीचीं चित्रें व यांचें बुद्धिबळक्रीडाकौशल्य यांवर यांचें शिक्षण सुरू झालें. एल्फिन्स्टन इन्स्टिटयूटमध्यें शिक्षण संपवून हे तेथेंच शिक्षक झाले (१८४३). ग्रँट मेडिकल कॉलेज निघतांच यांनीं तेथें आपलें नांव दाखल केलें (१८४५). त्या वेळीं युनिव्हर्सिटी नसल्यानें 'बोर्ड ऑफ एज्युकेशन'नें यांना हायकोर्ट जजाच्या हस्तें जी. जी. एम्. सी. ही पदवी दिली (१८५१). सब असिस्टंट सर्जनच्या जागा निर्माण करून त्यावर यांना नेमण्यांत आलें. पण नोकरी न करितां यांनीं स्वतंत्रपणें धंदा सुरू केला आणि लोकांकडून 'अश्विनीकुमार, धन्वन्तरी' अशा शब्दांत गौरव प्राप्त केला. यांचें रक्तपित्तावरील औषध रामबाण समजण्यांत येतें.

संस्कृत वाङ्मयांतील यांच्या संशोधनाची सुरुवात कालिदासाच्या कालनिर्णयापासून झाली. नंतर शकाच्या हल्ल्याशीं संबंध असणाऱ्या कालकाचार्याची जैन कथा, जैन धर्माचार्यांची परंपरा, जैन पट्टावलीचा कालानुक्रम, हेमाद्रीचा काल वगैरे संशोधनांनीं हे विख्यात झाले. कालनिर्णयावर यांचीं बरींच टिप्पणें आहेत.

शिलालेखवाचनाच्या बाबतींतील यांचें कार्य महत्त्वाचें आहे. गिरनार पर्वतावरील रुद्रदामन्चा व त्याच पर्वतावरील गुप्तांचे शिलालेख यांनीं प्रथम वाचले. गुप्त-शिलालेख वाचतांना गुप्तशकाचा सार्वत्रिक प्रचार यांच्या ध्यानीं आला व ते सर्व शिलालेख गुप्तकालांतील असल्याचें यांनीं ठरविलें. शक, गुप्त व वल्लभ यांचे शक आणि घराण्यांसंबंधीं यांनीं ठरविलेले सिद्धान्त दीर्घकाल अबाधित राहिले.

याशिवाय यांनीं किती तरी शिलालेख पद्धतशीरपणें वाचन व भाषान्तर करून प्रथमच लोकांच्या पुढें आणले. मुंबईच्या रॉयल एशियाटिक सोसायटीचे हे पहिले हिन्दी सभासद होत. यांनीं अगदीं आरंभीच्या काळांत या क्षेत्रांत पाऊल टाकून प्रतिकूल परिस्थितींत महत्त्वाची कामगिरी बजावली. भगवानलाल इंद्रजी ही यांची संशोधनशाखेला महत्त्वाची देणगी होय. ग्रँट मेडिकल

कॉलेजांत ले. क. एस्. आर. मुळगांवकर यांच्या हस्तें यांच्या तैल चित्राचें अनावरण करण्यांत आलें.

**लिमये, दत्तात्रेय बाळकृष्ण**—( जन्म स.१८८७ जुलै ३१ ) सुप्रसिद्ध रसायनशास्त्रज्ञ व संशोधक.

कपिगोत्री चित्पावन ब्राह्मण. अजोळीं हावनूर येथें सात इयत्ता कानडी शिक्षण झालें. नंतर बी. ए., बी. एस्सी., एम्. ए. झाले. बी. ए.च्या वर्गांत असतांच यांनीं बाळकृष्ण रसशाळेची स्थापना केली ( १९०८ ). एम्. ए. परीक्षेंत यांचा पहिला नंबर आला ( १९११ ). यांना आपलें शिक्षण स्वावलंबनानें करावें लागलें.

पुणें येथील रानडे इन्स्टिट्यूटमध्यें प्रथम असिस्टंट डायरेक्टर ( १९१२ ) व डायरेक्टरचें काम हे करूं लागले ( १९३० ). तेथें यांच्या हाताखालीं अनेकांनीं संशोधन करून एम्. एस्सी. व पीएच्. डी. या पदव्या संपादन केल्या. यांनीं ' रसायननिधीं'ची स्थापना करून ( १९३० ) बाळकृष्ण रसशाळेचा रजतोत्सव साजरा केला ( १९३३ ). रसायन निधींतून पहिला संशोधन-विषयक निबंध ' फ्युरोकुमारिन ' संघटनासंबंधींचा होय. तो १९३२ त जर्मन केमिकल सोसायटीचे मुखपत्रांत प्रसिद्ध करण्यांत आला. त्यायोगें संत्र्याचे जातीच्या एका फळाचे सालींत मिळणाऱ्या ' बर्गॅप्टेन ' सदृश पदार्थाची पहिली संघटनात्मक सिद्धि झाली. पूर्वीचे शास्त्रज्ञांनीं एतदर्थ केलेले प्रयत्न विफल झाले होते.

त्यानंतरचा दुसरा महत्त्वाचा यांचा निबंध ' निधोन पद्धति ' वरचा होय. तोहि जर्मन केमिकल सोसायटींतच प्रसिद्ध झाला ( १९३४ ). या निबंधाचे योगानें रसायन-निधीचें कार्य चिरंतन राहील यांत शंका नाहीं. वरील दोनहि शोधांच्यामुळें पूर्वी उपलब्ध नसलेले पदार्थ करितां येऊं लागल्यानें संशोधनास अतिशय वाव मिळाला आहे. केवळ आपलेकडेच नव्हे तर परदेशांतहि या संशोधनाचा उपयोग अनेक शास्त्रज्ञांनीं केला आणि या पद्धतीचें श्रेय यांना दिलें आहे.

असिटोनच्या जातीचे म्हणजे केटोन वर्गाचे पदार्थ बनविण्याची यांनीं शोधलेली पद्धति ही निधोनपद्धति होय. या पद्धतीनें झालेला ' रामाल ' व ' रंजाल ' विषयक नवीन रासायनिक शोधाची सर चंद्रशेखर रामन् यांनीं प्रशंसा केली आहे.

यांच्या ' रसायनम् ' नांवाच्या कालिकाचा प्रकाशन समारंभ मुंबईच्या रॉयल इन्स्टिट्यूट ऑफ सायन्सचे प्रिन्सिपल डॉ. व्हीलर यांच्या हस्तें झाला. यांनीं संशोधनात्मक अनेक निबंध प्रसिद्ध केले आहेत. करंजेलां-तून करंजिन्, वावडिंगांतून विडंगिन्, पांगळा वनस्पतीपासून पांगळी कापूर इत्यादि पदार्थ यांनीं शोधून काढले.

रासायनिक संघटनात्मक विषयावर यांचे प्रमुख निबंध पुढील होत.

( 1 ) Coumarul–4 acetic acid, ( 2 ) B-Aryl-glutaconic acids, ( 3 ) Furo-coumarins, ( 4 ) r-Resorcytic aldehyde, ( 5 ) Total Synthesis of Karanjol and Karanjie acid इत्यादि.

**लेखराम, पंडित**—( खून स. १८९७ मार्च ) सुप्रसिद्ध आर्यसमाजी प्रचारक व दयानंद सरस्वतींचे परमभक्त.

हे सरहद्द प्रान्तांतील उर्दू उत्तम लिहीत. शिवाय यांना आरबी व फारसी भाषा चांगल्या येत. प्रथम पोलीस खात्यांत नोकरीस होते, नंतर आर्यसमाजाच्या प्रचाराला यांनीं आपणास वाहून घेतलें. पोलिस खात्यांतील यांचा स्वभाव धार्मिक कार्यांत पडल्यावर बदलला नाहीं. हे आग्रही होते; तरी मूळ शोधण्याचा व न्याय करण्याचा गुण यांच्यांत होता. यांनीं मुसलमान व ख्रिस्ती धर्मांचें सडेतोड खंडन करून हिंदु धर्माची चांगली सेवा केली. हे त्या धर्मांच्या कमकुवत भागांवर त्यांच्याच आधारांनीं हल्ला करून त्यांच्या मताचे तुकडे उडवीत. यांचीं पुस्तकें याच पद्धतीचीं आहेत. बचावाच्या दृष्टीनें ही पद्धत उपयुक्त असली तरी निर्णयाच्या दृष्टीनें ही पद्धत घातक असते.

हिंदूंच्या संरक्षणाची व नवमुसलमानांना शुद्ध करून घेण्याची यांची कामगिरी निःसंशय महत्त्वाची आहे. पण प्रचाराच्या पद्धतीमुळें मुसलमान यांच्याविरुद्ध झाले, यांना धमक्या दिल्या गेल्या व यांच्याकडे शुद्ध होण्याकरितां आलेल्या एका मुसलमानानें यांच्या घरीं राहून यांच्या पोटांत सुरा खुपसून यांचा खून केला. त्याचा पुढें पत्ता लागला नाहीं.

यांच्या या मृत्यूनें यांना कमालीची लोकप्रियता प्राप्त झाली. त्यामुळें आर्यसमाजांतील दुही कांहीं काळ मिटली.

**लेड्बीटर, चार्लस् वेब्स्टर**—( जन्म स. १८४७–मृत्यु स. १९३४ ) मृत्यु, परलोक वगैरे अतींद्रिय विद्यांचे अभ्यासक व ग्रंथकर्ते.

यांचे वडील चार्लस् हे सनातनी ख्रिस्ती मताचे असून त्यांना गूढविद्येचा नाद होता. हे आपले धाकटे बंधु जिराल्ड व वडील यांचेबरोबर द. अमेरिकेंत गेले. तेथें रेल्वेचा रस्ता बांधण्याचें काम चालू असतां रेड इंडियन लोकांची बंडाळी सुरू झाली. तींत जिराल्ड मारला गेला व हे कसेबसे सुटून आले. इंग्लंडांत परत आल्यावर बँक बुडाल्यानें यांना शिक्षण सोडून उपाध्यायाची नोकरी करावी लागली. १८८३ मध्यें हे थिऑसॉफिकल सोसायटींत शिरले. पुढें हे मद्रासला आले व सिलोनमधील बौद्ध शाळा तपाशीत असतां जिनराजदासांची व यांची गांठ पडली. त्यांना घेऊन हे इंग्लंडला गेले. तेथें यांची बेझंटबाईशीं गांठ पडली. तेथून पुढें दोघांनीं अतीन्द्रिय संशोधनाचें कार्य केलें.

यांचा पहिला ग्रंथ ॲस्ट्रल प्लेन (भुवर्लोक) आणि दुसरा ग्रंथ देवखानिक प्लेन ( स्वर्ग ). हे परलोकांतील तपशीलवार माहिती सुलभ भाषेंत व पटेल अशा पद्धतीनें देण्याबद्दल प्रसिद्ध आहेत. त्याला आधार यांचें निरीक्षण असून तें आधुनिक शास्त्रीय परिभाषेंत लिहिलें आहे. तसेंच मृत्यु हा शरीराला असतो; मन, बुद्धि व आत्मा यांना नसतो हेहि यांचें प्रतिपादन महत्त्वाचें आहे. हे शिक्षणाचे तज्ज्ञ असल्यानें अनेक लोक आपलीं मुलें यांच्यापाशीं ठेवीत. त्या मुलांना हे अनीतिकारक गोष्टी करावयास लावतात म्हणून यांच्याविरुद्ध वादळ उत्पन्न झालें तेव्हां यांनीं सोसायटी सोडली. पण पुढें तो गैरसमज दूर झाल्यावर हे पुनः सोसायटींत आले. १९०९-१३ अड्यार येथें राहून बेझंटबाईच्या सहकार्यानें यांनीं अनेक ग्रंथ लिहिले. पुढें हे आस्ट्रेलियांत गेले. तेथें मेनॉर नांवाची थिऑसॉफीय लोकांची यांनीं वसाहत काढली. लिबरल कॅथोलिक चर्च, कोमेसनरी वगैरे संस्थांत प्रमुख म्हणून काम केल्यावर इकडे येऊन सूर्योपासनेबद्दल संशोधन करून भारत-समाज व त्याचें अड्यार येथील देवालय यांसंबंधीं यांनीं लेख लिहिले.

**लेले, काशीनाथ वामन ऊर्फ भाऊशास्त्री**—( जन्म स. १८६३–मृत्यु स. १९१८ ) सुप्रसिद्ध शास्त्री, मराठींतील लेखक व ग्रंथकार.

जन्मस्थान वाई. हे वाईचे राहणारे व तेथेंच यांचें जुन्या पद्धतीनें शिक्षण झालें. इंग्रजी शिकल्यावर संस्कृत ग्रंथाचें सुंदर मराठी भाषान्तर करणारे म्हणून यांची प्रसिद्धि होती. तथापि यांनीं भाषान्तर करावयास घेतलेल्या ग्रंथांपैकीं फार थोडे तडीस गेले. व्यावहारिक धोरणानें हे महत्त्वाकांक्षी गृहस्थ अनेक कामें एका वेळीं सुरू करीत आणि आर्थिक पेचांत येऊन यांना आपलें लक्ष तिसऱ्याच ठिकाणीं केन्द्रित करावें लागे.

यांनीं अनेक नियतकालिकें चालविलीं आणि विविध विषयांवर विपुल लेखन केलें. राजकीय कारणाकरितां यांना तुरुंगवासहि भोगावा लागला. यांनीं दुसरें लग्न केलें व त्याच्या समर्थनार्थ अग्निहोत्र घेऊन सोमयागासारखे यज्ञहि केले. पुढें हे आयुर्वेदाचा अभ्यास करून वैद्यकी करूं लागले.

**लेवी, सिल्व्हन लुईस**—( जन्म स. १८६३ मार्च २८–मृत्यु स. १९३६ ) फ्रान्समधील सुप्रसिद्ध प्राच्यविद्यापंडित व इतिहाससंशोधक.

यांचा जन्म पॅरिसला झाला व १८९० सालीं हे डॉक्टर ऑफ लेटर्सची परीक्षा पास झाले. सुप्रसिद्ध फ्रेंच संस्कृत पंडित अबेल बर्गे यांच्या सहवासानें यांना संस्कृत भाषा व बौद्ध धर्म यांच्या अध्ययनांत गोडी लागली व बर्गे यांच्या मृत्यूनंतर फ्रेंच एशियाटिक सोसायटीच्या कौन्सिलवर त्यांच्या जागीं यांची नेमणूक होतांच यांनीं आपल्या प्राच्यविद्याविषयक कार्यास सुरुवात केली. Ecole des Hautes Etudes व नंतर College de France मध्यें संस्कृत भाषेचे प्राध्यापक म्हणून यांची नेमणूक झाल्यानें ( १९०४ ) यांच्या या कार्यास विशेष जोर प्राप्त झाला.

हिंदु नाट्यासंबंधीं यांनीं लिहिलेल्या प्रबंधानें यांच्या या कार्यास सुरुवात झाली. यांनीं चिनी, तिबेटी, पाली, संस्कृत इत्यादि भाषांचे वर्ग सुरू केले. हिंदी संस्कृतीचें अध्ययन करण्याच्या हेतूनें यांनीं Ecole Francaise d'Extreme Orient या संस्थेची स्थापना केली.

यांचे शिष्य पेलियट यांनीं मध्यआशियांत प्रवास करून शोधून आणलेल्या हस्तलिखितांच्या वाचनासाठीं यांनीं एक संस्था स्थापन केली. मध्यआशियांतील तोखारि व कौटचि भाषांसंबंधीं यांनीं केलेल्या संशोधनाला पुढें ऑरेल स्टाइन यांच्या संशोधनानें आधार मिळाल्यानें यांची सर्वत्र वाहवा झाली.

१९२२ सालीं रवींद्रनाथ टागोरांच्या खास विनंतीवरून यांनीं त्यांच्या विश्वभारतीला भेट दिली.

Bergaigne and Indianism या निबंधांत हिंदुस्थान प्रत्यक्ष पाहण्याची प्रगट केलेली कल्पना आज सत्यसृष्टींत उतरल्याबद्दल यांना फारच समाधान वाटलें.

बुद्ध धर्म व संस्कृत भाषा यांचा एकाच वेळीं व्यासंग करण्याबद्दल यांची प्रसिद्धि आहे. सकाळीं हे शाकुन्तलावर व्याख्यान देतील तर दुपारीं संस्कृत व चिनी भाषांतील धम्मपदाची चर्चा करतील. एकीकडे संस्कृत, तिबेटी, चिनी भाषांतील कोटीकर्णवादनाचा तर दुसरीकडे महाभारताचा अशा सव्यसाची व्यासंगामुळें यांना मानाचें स्थान प्राप्त झालें.

समुद्र व पर्वत यांमुळें सर्व जगापासून वेगळी झालेली रानटी जात, ही हिंदु लोकांबद्दलची कल्पना बदलून टाकणाऱ्या पाश्चात्य संशोधकांत हे प्रमुख आहेत. जावा, कॅम्बोडिया, सुमात्रा, बोर्निया या दूर देशांत हिंदु लोकांनीं प्रस्थापित केलेलीं साम्राज्यें व सिलोन, ब्रह्मदेश, सयाम, कॅम्बोडिया, चंपा, जावा इत्यादि देशांतील लिपि, भाषा, वाङ्मय, शास्त्र या सर्व ज्ञानशाखांवर हिंदु–मग ते ब्राह्मण असोत किंवा बौद्ध असोत–लोकांनीं गाजवलेलें वर्चस्व प्रथम उजेडांत आणण्याचें श्रेय यांच्या परंपरेला दिलें पाहिजे. मुसलमान लोकांनीं खूप प्रयत्न करूनहि तिकडील हिंदु प्रभुत्व नाहींसें करतां आलेलें नाहीं.

यांचे ग्रंथ—फ्रेंच-(1) Le Théâtre Indien (1890), (2) La Doctrine du Sacrifice dans les Brahamanas (1898), (3) Le Népal (1905), (4) Annales Musee Guimet, (5) India (La Grande Encyclopēdic मध्यें), (6) याशिवाय Revue Critique, Journel T'oung-Pao, Journel Asiatique, Ecole Francoyse d'Extreme Orient च्या bulletine मध्यें संशोधनपर लेख.

इंग्रजी-(1) What about Greece Ancient Indian Monuments Conserved, (2) Studies in Buddha Charitra, (3) Doctrine of Sacrifice in Brahmanas.

संपादित-(1) Sutralankara of Asanga, (2) La Grande Encyclopēdie (सहकार्यानें).

**लोहिया, राममनोहर**—(जन्म स. १९१०सुमार) कॉंग्रेस सोशॅलिस्ट पक्षाचे सुप्रसिद्ध कार्यकर्ते व पुढारी.

कलकत्ता, मुंबई व बर्लिन येथें आपलें शिक्षण संपवून हे पीं. एच्‌डी. झाले व यांनीं कॉंग्रेसच्या चळवळींत भाग घेण्यास सुरवात केली. कॉंग्रेस सोशॅलिस्ट पक्षाची तात्त्विक बाजू घडविण्याचें बरेंच श्रेय यांचेकडे जातें. १९४२ च्या 'चले जाव' चळवळींतील प्रतिकारसामर्थ्याचें जनकत्व यांना दिलें जातें. त्या चळवळींत सुरू झालेल्या कांग्रेसच्या गुप्त रेडिओंतील सर्व भाषणें हे लिहून देत असल्याचें आतां उघडकीस आलें आहे. यांच्या भाषेंतील उपरोधिकपणा व विशिष्ट व्यक्तींचें किंवा घटनेचें पृथक्करण करतांना दिसणारा तर्ककठोरपणा विशेष प्रसिद्ध आहे. गोव्यांतील पोर्तुगीज भागांत राजकीय चळवळीला तोंड लावण्याचें काम यांनीं प्रथम केलें. हे मारवाडी समाजांतील असल्यानें त्यांनीं यांना सार्वजनिक कार्य मोकळेपणानें करितां यावें म्हणून लाख रुपयांची थैली अर्पण केली.

यांचा ग्रंथ—Mystery of Sir Stafford Cripps.

---

## व

**वझे, संगीताचार्य-रामकृष्णबुवा**—(जन्म स. १८७१-मृत्यु स. १९४३ मे ५) महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध गायनाचार्य.

यांचे गायनविद्येंतील प्रमुख गुरु निसार हुसेनखां हे होत. यांचें तरुणपण जम्मू, जालंदर, काश्मीर, नेपाळ वगैरे प्रदेशांत गेलें. शिवाय सर्व हिंदुस्थानांत यांचा संचार असे. मोठाल्या लोकांच्या चिजांचा व आठवणींचा संग्रह यांच्याइतका इतरत्र क्वचितच असेल आणि त्या आठवणी रंगेलपणानें सांगण्याची हातोटीहि यांच्यापाशीं होती. प्रसिद्ध गायक व नट केशवराव भोसले यांच्याशीं यांचा विशेष संबंध असे. यांनीं आपल्या

अखेरच्या आयुष्यांत ग्रामोफोन रेकॉर्डस् दिल्या व रेडिओंतहि हे कार्यक्रम करीत.

**वझे, शिल्पकलानिधि-कृष्णाजी विनायक**—(जन्म स. १८६९ डिसें. १६-मृत्यु स. १९२९ मार्च ३१) सुप्रसिद्ध स्थापत्यविशारद, स्थापत्यविषयक प्राचीन ग्रंथांचे संशोधक, धर्म, समाज वगैरेंचे अभ्यासक व लेखक.

हे एल्. सी. ई. झाले व यांनीं सरकारी नोकरी करून रावसाहेब ही पदवी मिळविली.

यांनीं 'धर्मशिक्षणाचा ओनामा' (१-८ भाग) ही पुस्तकमाला लिहून जुन्या आचारविचारांचा नव्या दृष्टीनें उलगडा करून दाखविला. तसेंच शिल्पविषयक जुन्या संस्कृत वाङ्मयाचा शोध करून अनेक हस्तलिखितें मिळविलीं व तीं प्रकाशांत आणण्याचा प्रयत्न केला. याशिवाय यांनीं अनेक विषयांवर आपले महत्त्वाचे विचार प्रदर्शित केले. यांच्या व्याख्यानाची मांडणीहि मोठी मनोरंजक व नवी असे.

यांचे ग्रंथ—शिल्प-१ आर्य शिल्प-हिन्दी यन्त्रशास्त्र, २ प्राचीन हिन्दी शिल्पशास्त्र ४ भाग, ३ प्राचीन हिन्दी शिल्पशास्त्रसार, ४ शिल्प शिक्षणाचें महत्त्व; चित्र-५ आर्य शिल्प-चित्रविद्या अथवा चित्रलेखनशास्त्र; युद्ध-६ प्राचीन युद्धविद्या; स्वराज्य-७ आजच्या स्वराज्यसंस्था (म्युनिसिपालिटी वगैरे प्राचीनपासून आजतागायत); व्यापार-८ व्यापारी शिक्षणमाला पुस्तक १ लें, ९ व्यापारीमित्र. यांशिवाय काश्यपशिल्पम् वगैरे संस्कृत ग्रंथ शोधून यांनीं प्रसिद्ध केले.

**वरेरकर, भार्गवराम विठ्ठल ऊर्फ मामा**—(जन्म स.१८८३) मराठी भाषेंतील सुप्रसिद्ध नाटककार, लघुकथालेखक व कादंबरीकार.

यांचा जन्म चिपळूण येथें झाला व शिक्षण मालवण, दापोली व रत्नागिरी येथें झालें. मॅट्रिक होण्यापूर्वीच यांना पोष्ट खात्यांत नोकरी पत्करावी लागली (१८९९). मराठींत 'कुंजविहारी' हें गोड नाटक लिहून हे प्रथम लोकांच्या पुढें आले (१९०७). हाच मुलाचा बाप, संन्याशाचा संसार वगैरे उत्कृष्ट नाटकांनीं यांचें स्थान पक्कें झालें. चालू चळवळीवर ताबडतोब नाट्यरचना करून त्या प्रश्नाची पुरोगामी बाजू मांडण्यांत यांचा हातखंडा आहे. यांच्या नाटकांत, लघुकथांत किंवा कादंबऱ्यांतमुद्धां यांचा सुधारणाचा पुरस्कार व नव-तंत्राचा अवलंब करण्याची वृत्ति दिसून येते. यांनीं शरच्चंद्राच्या समग्र कथांचें मराठी भाषान्तरहि तन्मय होऊन केलें आहे. हे धुळें मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष होते (१९४५).

**वाच्छा, सर दिनशा एदलजी**—(जन्म स. १८४४-मृत्यु स. १९३६) राष्ट्रसभेचे अध्यक्ष, सुप्रसिद्ध आंकडेशास्त्रज्ञ, इंपीरियल बंकेचे गव्हर्नर व व्यापारी.

यांचा जन्म व शिक्षण मुंबई येथें झालें. १८७४ पासून मुंबईस हे कापसाचे व्यापारी म्हणून प्रसिद्ध होते. मुंबई म्युनिसिपल कार्पोरेशनचे हे ३० वर्षे सभासद व एकदां अध्यक्षहि होते (१९०१). मुंबई कायदेमंडळ, मध्यवर्ति कायदेमंडळ व कौन्सिल ऑफ स्टेटचे हे सभासद व बऱ्याचशा सरकारी कमेट्यांवर व बऱ्याचशा व्यापारी कंपन्यांशीं यांचा निकटचा संबंध होता.

यांनीं हिंदी वसूल, चलन, अर्थशास्त्र, शेती, रेल्वे, लष्करी खर्च इत्यादि विषयांवर शेंकडों लेख लिहिले व अनेक कमेट्यांवर काम केलें व साक्षी दिल्या.

अगदीं पहिल्या राष्ट्रसभेपासून हे तेथें भाषणें करीत. यांचीं भाषणें अत्यंत माहितीपूर्ण व आंकड्यांनीं युक्त असत. लष्करी खर्च व दारिद्र्य हे यांचे आवडते विषय असत. यांची टीका अत्यंत कडक असल्यानें यांना मुंबईचे 'जळतें कोलीत' म्हणत. हे राष्ट्रसभेचे अध्यक्ष (कलकत्ता, १९०१), स्वागताध्यक्ष (मुंबई, १९१५). तसेंच १८९६-१९१३ मध्यें जाईंट सेक्रेटरी होते. पुढें सर पदवी घेऊन हे सरकारच्या अगदीं विश्वासांतील गृहस्थ बनले.

यांचे ग्रंथ—(1) Life of J. N. Tata, (2) Shells from the Sands of Bombay (1920), (3) Life of Premchand Roychand, (4) The Rise and Growth of Bombay Municipal Government इत्यादि.

**वाजपेयी, सर गिरिजाशंकर**—(जन्म स. १८८१ एप्रिल) हिंदुस्थान सरकारचे सुप्रसिद्ध परदेशी वकील.

यांचा अभ्यास अलाहाबाद व आक्सफर्ड येथें होऊन हे आय्. सी. एस्. झाले व सरकारी नोकरींत शिरले. हे दुय्यम न्यायाधीशाच्या जागेपासून चढत चढत येथें

व परदेशी यांनीं अनेक महत्त्वाच्या जागीं कामें केलीं. नंतर १९४० सालीं यांना व्हाइसरॉयच्या एक्झिक्युटिव कौन्सिलचे सभासद निवडण्यांत आलें. यांच्या ताब्यांत आरोग्य, शिक्षण व जमीन हीं खातीं देण्यात आलीं. इंपीरियल अग्रिकल्चरल रिसर्च कौन्सिलचे हे सरकार-नियुक्त चेअरमन होते. यांचा हिन्दी शेतकीशीं घनिष्ठ संबंध आहे. हे अमेरिकेंत हिंदुस्थानसरकारचे एजन्ट जनरल होते आणि तेथें यांना मिनिस्टरचा दर्जा मिळून वाशिंग्टन येथील ब्रिटिश वकिलातीला हे जोडले होते.

**वालचंद हिराचंद दोशी**—(जन्म स. १८८२) औद्योगिक क्षेत्रांतील सुप्रसिद्ध पुरुष.

यांचा जन्म सोलापूर येथें झाला. यांना बी. ए. चा अभ्यास सोडावा लागला आणि सोलापुरीं वडिलांच्या सूतकामाचे दुकानांत मदत करण्याकरितां यावें लागलें. हजरतखान नांवाच्या गिरणींतील फायरमनला लांकडाचें टेंडर पुरें करण्याकरितां यांनीं कर्जाऊ रक्कम दिली आणि बार्शी लाइट रेल्वेचा येडशी ते तडवळ हा सात मैलांचा रेल्वे रस्ता तयार करण्याचें कंट्राक्ट घेतलेल्या श्री. ल. ब. फाटक यांच्याशीं सहकार्य करून यांनीं तें काम पार पाडलें. त्यानंतर दहा वर्षांनीं १९१५ सालीं यांनीं फाटक ॲन्ड वालचंद कंपनी स्थापिली. बोरघाटांतील प्रचंड बोगद्याच्या कामानें यांचें नांव सर्वतोमुखीं झालें.

१९१८ नंतर मुंबईच्या पुनर्घटनेचा प्रश्न निघाला असतां हीं सर्व कामें देशी लोकांच्या तज्ज्ञांकडून व्हावींत म्हणून वर्तमानपत्रांत यांनीं पत्रव्यवहार केला. टाटांच्या सहकार्यानें टाटा कन्स्ट्रक्शन लि. ही कंपनी काढून मॅनेजिंग डायरेक्टरचें काम यांच्याकडे आलें. पुढें टाटांनीं या कंपनींतून आपलें अंग काढून घेतलें तेव्हां यांनीं प्रिमियर कन्स्ट्रक्शन नांवाची कंपनी काढून नर्मदा नदीवरील जी. आय. पी. चा, सिंधूवरील काळ-बागचा व मंडालेनजीक इरावतीवरचा हे पूल बांधले. प्रिमियरच्या संचालकत्वाखालीं हिंदुस्थान बिल्डिंग व ऑल इंडिया कन्स्ट्रक्शन या संस्थांचा कारभार, हिन्दी ह्यूम पाइप तयार करण्याचा कारखान्यांसारखे कितीतरी उद्योग यांच्या नेतृत्वाखालीं चालत.

नाशिक जिल्ह्यांतील रवळगांव व कळंब येथील आधुनिक पद्धतीची ऊंस, कापूस, तंबाखू, मिरची यांची लागवड व दोन साखरेचे कारखाने यांनीं चालविले असून शेतकी कमिशनपुढें यांनीं अत्यंत महत्त्वाची साक्ष दिली (१९२६).

यांनीं शिंदे सरकारचें एस. एस. लॉयल्टी नांवाचें जहाज खरेदी करून सिंदिया स्टीम नॅव्हिगेशन कंपनीची उभारणी केली (१९१९). त्यानंतर यांनीं अनेक वाफारे खरेदी केले व परदेशी लोकांच्या स्पर्धेतून यशस्वीपणें काम चालविलें. सिंदिया हाउसचा उद्घाटन समारंभ १९३९ सालीं सरदार वल्लभभाई पटेल यांच्या हस्तें साजरा झाला. वहातुकीच्या या कामाबरोबर जहाजें बांधण्यानें कामसुद्धां यांनीं सुरू केलें. विजगापट्टम् येथें बाबू राजेन्द्रप्रसाद यांच्या हस्तें हिंदी जहाजांच्या पहिल्या गोदीचा कोनशिलासमारंभ साजरा करण्यांत आला (१९४१ जून २१).

फोर्डशीं सहकार्य करून मोटार कारखाना, विमानाचा कारखाना, टाटा केमिकल्स लि., असोसिएटेड सीमेंट कं. लि. वगैरे कंपन्यांशीं यांचा निकटचा संबंध असून पॅरिस, इंटरनॅशनल कॉन्फरन्सचे हे अध्यक्ष आहेत.

हे कारखानदार, व्यापारी व राष्ट्रीय दृष्टीचे चिकित्सक असल्यानें यांचीं लेखन व भाषणें माहिती पूर्ण, स्पष्ट व नवा प्रकाश देणारीं असतात.

**वासुदेवय्या, च.**—(जन्म स. १८४४–मृत्यु स. १९४३) अर्वाचीन कानडी गद्याचे जनक व सुप्रसिद्ध कानडी साहित्यिक.

'बालबोध' हा यांचा ग्रंथ म्हैसूर संस्थानांतील गद्याचा आदिग्रंथ मानण्यांत येत असून 'आर्यकीर्ति', 'भीष्मचरित' इत्यादि यांचे इतर ग्रंथहि सुप्रसिद्ध आहेत.

**विजयराघवाचार्य सी.**—(जन्म स. १८५२–मृत्यु स. १९४३) राष्ट्रसभा व हिंदुसभा यांचे अध्यक्ष.

सालेमचे हे वकील. राष्ट्रसभेची घटना ठरविण्या-करितां नेमलेल्या कमेटीचे हे सभासद होते (१८८७). सुरतेच्या फुटीनंतर हे राष्ट्रसभेपासून अलग राहणारां-पैकीं होत. १९१६ सालीं हे लखनौ राष्ट्रसभेंत पुनः आले. तेव्हांपासून हे राष्ट्रसभेंत मनापासून भाग घेत. नागपूर राष्ट्रसभेचें अध्यक्षपद यांना देण्यांत आलें (१९२०). यांना म. गांधींची असहकारिता मान्य नव्हती. हे पुढें हिंदुसभेंत सामील झाले व एका अधि-वेशनाचे अध्यक्षहि होते.

**विजय, रेव्हरंड**—( मृत्यु स. १९२९ सप्टें. १९ ) ब्रह्मदेशांतील एक राजकारणी बौद्ध भिक्षु.

२१ महिन्यांची सक्तमजुरी भोगल्यावर यांची सुटका झाली ( १९२९ फेब्रु. २८ ). पण लवकरच यांना पुनः अटक होऊन राजद्रोहाच्या आरोपावरून सहा वर्षें काळेपाण्याची शिक्षा झाली. ती पुढें तीन वर्षांची करण्यांत आली. पण तुरुंगांत चांगलें वागविलें जावें व कांहीं विशिष्ट दिवशीं भिक्षूचा पिवळा झगा वापरण्यास मिळावा म्हणून यांनीं अन्नसत्याग्रह केला व त्यांत १६४ व्या दिवशीं यांना मृत्यु आला.

**विजापूरकर, प्रा. विष्णु गोविंद**—( जन्म स. १८६३–मृत्यु स. १९२६ ऑगस्ट १ ) मराठी वाङ्मय, स्वदेशी, राष्ट्रीय शिक्षण व सदाचार यांचे निःसीम पुरस्कर्ते व समर्थ विद्यालयाचे संस्थापक.

जन्मस्थान कोल्हापूर. हे माध्व वैष्णव सांप्रदायाचे दे. ऋ. ब्राह्मण होते. यांच्यावर उपनिषदें व समर्थ सांप्रदाय यांची विशेष छाप असे. हे कोल्हापूर व पुणें येथें शिक्षण घेऊन एम्. ए. झाले ( १८९७ ). अहमदाबाद कॉलेजांत फेलो व राजाराम कॉलेज कोल्हापूर येथें हे संस्कृत व इंग्रजी या विषयांचे प्राध्यापक होते.

यांनीं प्रथम ग्रंथमाला हें मासिक ( १८९६ ), नंतर समर्थ साप्ताहिक ( सुरुवात १८९८ जुलै ) व नंतर विश्ववृत्त हें मासिक सुरू केलें आणि तद्वारा स्थानिक, प्रान्तिक व देश यांतील सर्व प्रकारच्या हालचालींचा हे परामर्श घेऊं लागले. तेव्हां राजकीय कारणावरून यांना प्राध्यापकाच्या जागेवरून काढून टाकण्यांत आलें.

नंतर यांनीं समर्थ विद्यालय सुरू केलें (१९०६ जून). एक वर्षानंतर प्लेगमुळें चार महिने मिरजेस ठेवून नंतर तें तळेगांवीं आणण्यांत आलें. विश्ववृत्तांतील 'वैदिक धर्माची तेजस्विता' या श्री. श्री. दा. सातवळेकर यांच्या लेखावरून संपादक म्हणून यांना तीन वर्षांची साधी कैद झाली ( १९०८ ऑक्टो. ). हे तुरुंगांत असतां सरकारी कायद्यामुळें समर्थ विद्यालय बंद करणें भाग पडलें. हे सुटून आल्यानंतर यांनीं सर महादेव चौबळ यांना संस्थेचे अध्यक्ष करून 'नवीन' असें नांव घेऊन तें विद्यालय पुनः सुरू केलें ( १९१८ ). तें सुरू करतांना सर महादेव म्हणाले–'प्रो. विजापूरकरांची धर्मनिष्ठ व सात्विकतेची प्रत्यक्ष मूर्ति डोळ्यांपुढें असतां मी तरी जास्त काय सांगणार ? साधी राहणी व उच्च विचारसरणी यांचा असा नमुना इतरत्र क्वचितच पाहावयास मिळेल.'

यांनीं अनेक ग्रंथ लिहिले व भाषान्तरें केलीं. पण 'मराठ्यांच्या सत्तेचा उत्कर्ष' हें न्या. रानड्यांच्या पुस्तकाचें यांचें भाषान्तर महत्त्वाचें होय.

**वियोगी हरि**—( जन्म स. १८९७ ) सुप्रसिद्ध कृष्णभक्त हिन्दी कवि व लेखक.

यांचें नांव हरिप्रसाद द्विवेदी. पिता बलदेवप्रसाद. वडील लहानपणींच वारले तेव्हां अजोळीं घरीं संस्कृत व हिन्दी भाषांचें शिक्षण घेतल्यावर हे मॅट्रिक झाले ( १९१५ ). श्रीतुळशीदासजींची विनयपत्रिका व श्रीभागवत यांना प्रारंभापासून प्रिय असे. पुढें छत्रपूर नरेशांच्या धर्मपत्नी श्रीमती कमलकुमारी देवी माध्व संप्रदायी वैष्णव असल्यानें हे द्वैतवादी झाले. वयाच्या अठराव्या वर्षी यांनीं प्रेमशतक, प्रेमपथिक, प्रेमाञ्जलि व प्रेमपरिषद नांवाचीं पुस्तकें लिहिलीं व आजन्म ब्रह्मचारी राहण्याचा निश्चय केला. आपल्या गुरुदेव महाराणी दिवंगत झाल्यावर त्यांच्या आज्ञेनुसार यांनीं संन्यास घेतला. यांचा आश्रम श्रीहरितीर्थ नांवानें ओळखला जातो. पण यांनीं आपल्या सर्वस्वाच्या वियोगामुळें आपलें नांव वियोगी हरि असें घेतलें.

यांनीं पुरुषोत्तमदास तंडन यांच्या सांगण्यावरून संमेलनपत्रिका व सूरसागर यांचें संपादन केलें ( १९१९ ).

यांचें वाङ्मय—१ श्रीछद्मयोगिनी नाटिका, साहित्यविहार (भक्तिरसपूर्ण लेखसंग्रह), २ कवि कीर्तन ( १०० कवींचा पद्यात्मक परिचय ), ३ अनुरागवाटिका ( व्रजभाषेंतील १०० पदें), ४ वीर हरदौल (नाटक), ५ शुकदेव (खंडकाव्य), ६ मेवाड केशरी (काव्य), ७ व्रजमाधुरीसार ( व्रजभाषेंतील भक्तिपूर्ण कवितांचा संग्रह ).

म. गांधी, त्यांची चळवळ, चरखा, विनोबा भावे व त्यांचे विचार वगैरे वरील यांचीं पुस्तकें महत्त्वाची आहेत.

**विरजानंद सरस्वती**—( जन्म स. १७९८–मृत्यु स. १८६८ ) स्वामी दयानन्दसरस्वतींचे गुरु व एक विक्षिप्त संन्यासी.

जन्मस्थान पंजाबांत गंगापूर. जात सारस्वत ब्राह्मण.

पांचव्या वर्षी देवीनें डोळे गेले. आईबापहि वारले. तेव्हां हे घरांतून पळाले. हृषीकेशास जाऊन गायत्रीपुरश्चरण करून संन्यास घेतला. व्याकरणवेदान्ताचें अध्ययन करून 'प्रज्ञाचक्षु' असा लौकिक मिळविला. नंतर मथुरेस संस्कृतपाठशाळा काढली. एखाद्या साध्या शब्दाबद्दल हे निकरानें वाद खेळत. एकदां एका वैष्णवानें यांना वादांत हरविलें, तेव्हांपासून वैष्णवांचा हे तिरस्कार करीत व त्यांचा भागवत ग्रंथ खाटेच्या पाया-खालीं ठेवीत. भट्टोजी दीक्षिताच्या व्याकरण ग्रंथाची हे खेटरानें संभावना करीत. महाभारतोत्तर वाङ्मयाचा हे मनस्वी तिटकारा करीत. यांच्या तामसी स्वभावाचा सर्वांत हुषार विद्यार्थ्याला विशेष उपद्रव होई. दयानन्द सरस्वतींवर यांची विशेष छाप होती. त्यांना यांनीं गुरुदक्षिणा म्हणून दांभिकांचा दंभस्फोट करण्याचा आणि सच्छास्त्राचा प्रचार करून लोकांना ज्ञानी करण्याचा आदेश दिला.

**विवेकानन्द स्वामी**—( जन्म स. १८६२ जाने.९-समाधि स. १९०२ जुलै ४ ) हिंदु तत्त्वज्ञानाचा जगभर प्रसार करणारे थोर पुरुष व उत्कृष्ट वक्ते.

यांचें मूळ नांव नरेन्द्रनाथ दत्त. यांच्या पित्याचें नांव विश्वनाथ दत्त. जात कायस्थ. जन्मस्थान कलकत्त्या-जवळ सिमूलिया. कलकत्त्याच्या ख्रिश्चन कॉलेजमधून हे बी. ए. झाले. कॉलेजांत असतांनाच यांनीं भारतीय व पाश्चात्य तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला. यांच्यावर प्रथम बुद्धिवादाची विलक्षण छाप होती. कांहीं काळ ब्राह्मसमाजाकडेहि यांचें लक्ष वेधलें. पण तेथील भावना-त्मक पण तत्त्वज्ञानशून्य एकेश्वरवादाला आणि रोज बदलणाऱ्या नीतितत्त्वांना हे लवकरच विटले. यांच्या मनाची तळमळ अखेरीस रामकृष्ण परमहंस या ब्राह्मण संन्याशाच्या एकवार दर्शनानें आकस्मिक रीतानें दूर झाली. यांना त्यांनीं ईश्वरसाक्षात्कराची खात्री दिली आणि त्याचक्षणीं यांच्या जीवनांत परिवर्तन झालें.

ईश्वरसाक्षात्कार म्हणजे धर्म अशी यांनीं धर्माची व्याख्या केली. प्रथम संन्यास, नंतर सर्व धर्मांविषयीं ऐक्यबुद्धि आणि नंतर ईश्वरप्राप्ति असा यांचा साधनक्रम असून रामकृष्ण परमहंस हे ईश्वरावतार आहेत असा यांचा विश्वास होता. ते समाधिस्थ झाले ( १८८६ ऑगस्ट ६ ) तेव्हां यांनीं त्यांच्या शिष्यांचा एक संघ स्थापन केला व स्वतः विवेकानन्द हें नांव घेऊन हे त्याचे प्रमुख झाले. नंतर हे सहा वर्षे हिंदुस्थानांत फिरले. त्यांपैकीं कांहीं काळ हिमालयांत व तिबेटांतहि यांनीं घालविला. नंतर ३१ मे १८९३ रोजीं मद्रासहून जपान-द्वारें हे चिकागोला जाण्यास निघाले. तेथें भरलेल्या जागतिक धर्मपरिषदेंतील यांच्या भाषणानें अमेरिकन लोकांच्या घरांतील हे एक आदरणीय पाहुणे होऊन बसले. तेथें हे १८९५ पर्यंत राहिले. तेथें यांनीं संन्यास, सर्व धर्म ऐक्य व ईश्वरप्राप्ति या विषयांवरील व्याख्यानांनीं अमेरिका खंड हलवून सोडलें व अगणित शिष्य मिळविले. यांचा जगप्रसिद्ध राजयोग हा ग्रंथ तिकडेच लिहिला गेला. थोरामोठ्यांचें लक्ष गेलें तसेंच कांहीं भुरट्या लोकांनीं यांच्या त्यागी संन्यस्त वृत्तीचा फायदा घेऊन यांच्या व्याख्यानांच्या कार्यक्रमावर पैसे मिळविण्याचा धंदा केला.

अमेरिकेहून हे इंग्लंडला गेले. तेथें मॅक्स मूलर वगैरेशीं यांचा परिचय झाला व भगिनी निवेदिता-सारख्या शिष्या यांना लाभल्या. १८९७ मध्यें हे अनेक शिष्यांसमवेत कोलंबोहून मद्रासमार्गें कलकत्त्यास आले. तेव्हां यांचें जागोजागीं प्रचंड स्वागत झालें.

मद्रास येथें यांनीं एक व्यापक कार्यक्रम जाहीर करून, जनतेला अन्न, वस्त्र व शिक्षण मिळण्याची आवश्यकता प्रतिपादून, तसें करण्याकरितां मद्रास व कलकत्ता येथें केन्द्रें-निर्माण करण्याचें जाहीर केलें. नंतर लौकरच यांनीं रामकृष्ण मठाची स्थापना केली. यांनीं परत येतांना आपल्या वेदान्ताला जनसेवेची जोड दिली.

पण यांचें हें लोकसेवेचें कार्य संन्यास धर्माला व रामकृष्ण परमहंसांच्या आदेशाला अनुसरून नाहीं या सबबीवर यांचा व रामकृष्णांच्या इतर शिष्यांचा बेबनाव झाला. नंतर यांनी कलकत्त्याजवळ बेलूरला व हिमालयांत अल्मोराजवळ मायावतीला असे दोन मठ स्थापिले. तेथें प्लेग, दुष्काळ वगैरेंत मदत करण्याचें काम चाले व गीता वगैरेंचा प्रचारहि होई. दरिद्र-नारायणाची सेवा हा यांचा त्या वेळीं मुख्य संदेश होता. म. गांधींनीं यांच्या या दरिद्रनारायण शब्दाला विशेष प्रसिद्धि दिली.

१८९९ च्या सुमारास हे पुनः अमेरिकेस जाण्यास निघाले. पण शरीर मधुमेहानें पोखरलेलें, पूर्वीचा उत्साह ओसरलेला व भाषणांतहि पूर्वीचें तेज प्रगट होईना. तेव्हां मधूनच सिलोनपासून हे परत फिरले व लवकरच समाधिस्थ झाले. बेलूर येथें रामकृष्ण परमहंसांच्या शेजारीं यांची समाधि आहे. तेथें हे

राहत असलेली खोली जशीच्या तशीच राखण्यांत आली असून तेथें यांच्या निजण्याची गादी, फेटा, अलखल्लो (कफनी), कानटोपी, कमंडलू, हुक्का वगैरे जिनसा जशाच्या तशा राखल्या आहेत.

यांनीं बुद्धिवाद्यांचें बंड मोडलें आणि बुद्धीच्या पलीकडे असलेल्या अध्यात्माची जगाला ओळख करून दिली. बुद्धिवादानें मनुष्य प्रकृतीचा गुलाम बनतो आणि अध्यात्मानें प्रकृति मनुष्याची गुलाम बनते, हा सिद्धान्त यांनीं जुन्या परंपरेला धरून पण नव्या पद्धतीनें लोकांपुढें मांडला. जुन्या काळांत शंकराचार्यांनीं जें कार्य केलें तेंच अर्वाचीन कालांत जागतिक दृष्टीनें यांनीं केलें.

इंग्रजी राज्य प्रस्थापित झाल्यावर भारताच्या आधुनिक युगास या गुरुशिष्यांनीं सुरुवात केली. राजकारणाला आध्यात्मिक करण्याची पहिली घोषणा यांचीच. तिचाच पुनरुच्चार ना. गोखले व म. गांधी यांनीं केला. सनातन वैदिक धर्मांतील उज्वल तत्त्वांचें समर्थन करीत आणि स्वाभिमानाला चालना देत यांनीं अध्यात्माचें उज्वल स्वरूप जगाच्या निदर्शनास आणलें. सेवा आणि सर्वधर्मैक्य हा यांचा महत्त्वाचा संदेश होय.

रामकृष्ण वेदांत मठ बेलूर ( कलकत्ता ) या संस्थेची यांनीं रामकृष्णांच्या तत्त्वाचा प्रसार करण्यासाठीं स्थापना केली ( १८९९ जाने. २ ). परंतु पुढें यांच्या मृत्यूनंतर शिष्यशाखा तयार करणें व प्रचार करणें हीं दोन्ही कार्ये एकाच संस्थेकडून होणें कठीण जाऊं लागलें. तेव्हां तत्त्वप्रचाराच्या दृष्टीनें 'रामकृष्ण मिशन' या निराळ्या संस्थेची स्थापना करण्यांत आली ( १९०९ मे ४ ).

या दोन संस्थांशिवाय सर्व जगभर यांच्या वेदान्तविषयक तत्त्वज्ञानाचा प्रसार करणाऱ्या संस्था स्थापन झाल्या. त्यांपैकीं हिमालयांतील अल्मोऱ्याजवळील मायावती येथें असणारी 'अद्वैताश्रम' ही संस्था प्रमुख होय. यांचीं लहानमोठीं व्याख्यानें, प्रवचनें यांचा संग्रह त्यांनीं Complete Works of Swami Vivekananda या नांवानें सात खंडांत प्रसिद्ध केला असून त्याशिवाय हे व रामकृष्ण यांचे निरनिराळ्या लेखकांनीं विविध दृष्टिकोनांतून लिहिलेले अनेक चरित्रग्रंथ त्यांनीं प्रसिद्ध केले आहेत. त्या संस्थेतर्फे 'प्रबुद्ध भारत' हें इंग्रजी मासिकहि चालविलें जातें ( सुरुवात १८९६ ).

यांशिवाय वेदान्त केसरी (मासिक, मद्रास), मॉर्निंग स्टार (साप्ताहिक, पाटणा) या इंग्रजी व उद्बोधन, विश्ववाणी ( बंगाली ), समायन ( हिंदी ), श्रीरामकृष्ण-विहाय (तामीळ), प्रबुद्धकेरळम् (मल्याळम्) या देशी पत्रांमार्फत यांच्या तत्त्वाचा प्रचार हिंदुस्थानांतील निरनिराळ्या ठिकाणांहून केला जातो. याशिवाय The Voice of Truth ( मलाया ), The Message of the East ( अमेरिका ), Work ( ब्राझील ), Thought ( पोर्तुगाल ) असा आंतरराष्ट्रीय पसारा यांच्या वेदान्ताच्या प्रचारानें व्यापला आहे. सिलोनमधील विवेकानंद सोसायटीतर्फे नवांपेक्षां अधिक शाळा व ब्रह्मदेशांतील सोसायटीतर्फे हॉस्पिटल्स चालविलीं जातात. अमेरिकेंतहि सानफ्रान्सिस्को, क्रेसन्टा, सॅन ॲन्टन व्हॅली, पोर्टलॅन्ड, बोस्टन, न्यूयॉर्क इत्यादि ठिकाणीं यांच्या सोसायटीच्या शाखा आहेत. पोर्तुगालमध्येंहि यांची चळवळ जोरांत असून तेथील लोकांनीं The Gospel of Shri Ramkrishna व यांचा राजयोग इत्यादि ग्रंथांचा पोर्तुगीजमध्यें अनुवाद केला आहे. The Circle of the Communication of Thought या अनेक हजारांना सभासद असणाऱ्या संस्थेंतहि वेदान्ताचा अभ्यास मोठ्या आस्थेनें केला जातो.

यांचे ग्रंथ—( 1 ) Raja-Yoga, ( 2 ) Jnana Yoga, ( 3 ) Karma-Yoga, ( 4 ) Bhakti-Yoga, ( 5 ) Chicago Addresses, ( 6 ) Essentials of Hinduism, ( 7 ) My Master, ( 8 ) In Defence of Hinduism, ( 9 ) The Modern India, ( 10 ) The East and the West, ( 11 ) Practical Vedanta, ( 12 ) Discourses on Jnana-Yoga, ( 13 ) Vedanta Philosophy, ( 14 ) Lectures from Colombo to Almora, ( 15 ) Six Lectures on Raja-Yoga, ( 16 ) Religion of Love, ( 17 ) A Study of Religion, ( 18 ) Realization and its Methods, ( 19 ) याशिवाय पत्रें, खाजगी भाषणें इत्यादींचे विविधसंग्रह.

Complete Works of Swami Vivekananda चें संपूर्ण मराठींत भाषांतर मुंबईच्या कर्नाटक पब्लिशिंग हाउसनें प्रसिद्ध केलें आहे.

**विश्वेश्वरय्या, सर मोक्षगुंडम्**—( जन्म स. स. १८६१ सप्टें. १५ ) सुप्रसिद्ध स्थापत्यविशारद, औद्योगिक युगाचे अग्रदूत व अभिनव कल्पनांचे जनक.

म्हैसूरजवळील कोलार हें यांचें जन्मस्थान. जात ब्राह्मण. यांचे आईबाप गरीब पण अत्यंत धार्मिक होते. १८८१ सालीं बंगलोरच्या सेंट्रल कॉलेजांतून यांनीं पदवी घेतली व म्हैसूर सरकारच्या शिष्यवृत्तीनें हे पुण्याच्या एंजिनियरिंग कॉलेजातून एल्. सी. ई. परीक्षेंत पहिले आले.

प्रथम मुंबई इलाख्याच्या पब्लिक वर्क्स डिपार्टमेंटच्या असि. एक्झिक्युटिव्ह एंजिनियरची जागा यांना देण्यांत आली. इकडील जिल्ह्यांत कालव्यांच्या कामाचा अनुभव घेत हे मुंबई सरकारचे सॅनिटरी एंजिनियर झाले. सिमला इरिगेशन कॉन्फरन्स (१९०४)मध्यें हे मुंबई इलाख्याचे प्रतिनिधि होते. पुढें एडन शहराचा पाणीपुरवठा व सफाई यांची योजना यांनीं तयार केली (१९०७).

पुण्यानजीक खडकवासल्याच्या धरणाला लावलेले आपोआप उघडणारे कळसूत्री दरवाजे यांनीं प्रथम तयार केले. आतां त्या कल्पनेचा उपयोग पनामा कालव्यांतसुद्धां करण्यांत आला आहे. नीरा कालव्यांत उपयोजिलेल्या ब्लॉक सिस्टिमची मूळ कल्पनासुद्धां यांचीच असून सर जॉन मॅकेंझीसारख्यांनीं यांच्या या कार्यांतील श्रेयास मान्यता दिली आहे. महाराष्ट्रांत काम करीत असतां न्या. रानडे, ना. गोखले व न. चिं. केळकर यांशीं यांचा विशेष परिचय झाला. सेवानिवृत्त झाल्यावर हैदराबाद राज्यांत सल्लागार म्हणून काम केल्यावर म्हैसूर राज्यांत मुख्य एंजिनियर म्हणून यांची नेमणूक झाली (१९०९).

तीन वर्षांनंतर यांना म्हैसूर राज्याचे मुख्य दिवाण नेमण्यांत आलें. आपल्या कारकीर्दींत संस्थानांतील प्रत्येक खात्यांत यांनीं बदल घडवून आणला आणि नवचैतन्य उत्पन्न केलें. म्हैसूरचें अर्थशास्त्रीय पुनरुज्जीवन हें यांच्या तेथील कर्तृत्वाचें सार आहे. नव्या प्रचंड योजना पद्धतशीर आंखून त्या व्यवहारांत उतरविण्यांत यांचें विशेष कौशल्य दिसून येतें. यांनीं तेथें १ उद्योगधंदे व व्यापार यांची वाढ, २ आर्थिक कुचंबणा नष्ट करणें, ३ शिक्षणप्रसार व आत्मविश्वास यांची वाढ, ४ संघटन, संशोधन व उत्कर्ष करण्याकडे प्रवृत्ति वाढविणें, अशीं अनेक कामें केलीं. हें करण्याकरितां यांनीं योजना आंखल्या आणि त्या वेळापत्रकाप्रमाणें पार पाडल्या. राज्याच्या प्रत्येक खात्यावर आपल्या लष्करी शिस्तीचा आणि चोख वर्तनाचा ठसा यांनीं उमटविला. बंगलोर कॅन्टोन्मेन्टच्या शिलकी उत्पन्नापैकीं तीन लक्षांचें उत्पन्न यांच्या मध्यस्थीनें म्हैसूर सरकारला मिळालें. १८८१ मध्यें हिंदुस्थान सरकारशीं झालेला अपमानकारक तह यांच्याच मध्यस्थीनें दुरुस्त झाला.

यांनीं कावेरी नदीचा बंधारा वाढवून कृष्णराजसागर तलावाला प्रचंड स्वरूप दिलें. दोन कोट रुपये खर्च करून काढलेल्या कालव्यांना दीड लक्ष एकर जमीन भिजती केली. पूर्वीपेक्षां शिवसमुद्र धबधब्यांतून दसपट पाणी पडण्याची व्यवस्था करून विजेचा पुरवठा भरपूर केला आणि त्याच्या शेजारीं 'वृंदावन' उद्यान उभारलें. यांनीं खोदलेल्या कालव्यांमुळें म्हैसूरच्या पठाराला सर्वत्र पाणीपुरवठा होऊन म्हैसूर व बंगलोर हीं शहरें उद्याननगरें बनलीं.

नवी राज्यघटना, सडका, धरण, विद्यापीठ, चामराज राजेन्द्र टेक्निकल व मेकॅनिकल एंजिनियरिंग स्कूल, साबण, तेलें, कागद वगैरेंचे कारखाने आणि भद्रावती आयर्न वर्क्स नांवाचा लोखंडी सामानाचा कारखाना इत्यादि अनेक योजना आंखून त्या प्रत्यक्ष व्यवहारांत आणण्याचें काम यांनीं केलें व तदनुषंगानें इतर अनेक व्यवसाय सुरू केले.

दिवाण रंगाचार्लूंनीं म्हैसूरला राज्यघटनेचे धडे दिले, के. शेषाद्रि अय्यरनीं तिला स्थैर्य आणलें व यांनीं तिचें रूपान्तर आदर्श राज्यघटनेंत केलें, असें म्हणतात तें यथार्थ आहे.

यांच्या या विशेष प्रकारच्या दृष्टीमुळें व यशस्वी योजकतेमुळें हिंदुस्थान सरकारच्या व हिंदुस्थानांतील बहुतेक अर्थशास्त्रीय व औद्योगिक घटना यांच्या सल्ल्याशिवाय पार पडत नाहींत. या दृष्टीनें यांना जगप्रसिद्ध असें यथार्थतेनें म्हणतां येईल.

यांचे ग्रंथ—(1) Reconstructing India (1912), (2) Planned Economy for India (1934), (3) Unemployment in India, (4) Nation-building, (5) District Developement Scheme, (6) Prosperity through Industry, इत्यादि.

**विष्णुदास महाराज माहुरकर**—(जन्म स. १८४४-समाधि स. १९१७) मराठवाड्यांतील प्रसिद्ध सत्पुरुष व कवि.

यांचा जन्म सातारा येथील धांदरफळे घराण्यांत झाला. विवाह झाल्यावर एक वर्षानें हे दत्तदर्शनार्थ

घरांतून निघून गेले. यांना बासर येथील श्रीसरस्वतीचा प्रसाद झाल्यावर काव्यस्फूर्ति झाली. यांना रेणुकामाता नेहमीं ओ देत असे व सगुणदर्शन देई, असे उल्लेख यांच्या काव्यांत सर्वत्र आहेत. यांची कविता भक्ति, प्रेम यांनीं भरलेली व ज्ञानोत्तर भक्तिपर आहे. यांनीं लावण्याहि अप्रतिम केल्या आहेत. यांचें चरित्र व कवितेचे दोन खंड नरहरशास्त्री खरशीकर यांनीं प्रसिद्ध केले आहेत.

**विष्णुबुवा ब्रह्मचारी**—(जन्म स. १८२५–मृत्यु स. १८७१) ख्रिस्ती मिशनऱ्यांना प्रारंभीं तोंड देणारे हिंदुमिशनरी व स्वतंत्र विचाराचे गृहस्थ.

यांचें समग्र नांव विष्णु भिकाजी गोखले. यांचें गांव शिरवली (ता. राजापुरी, जि. ठाणें, पेटा निजामपूर). हे वडिलांचें दहावें अपत्य. वडील पांचवे वर्षी वारले. थोडें घरगुती शिक्षण झाल्यावर गुरें चारणें, दुकान, जकातनाकें वगैरे ठिकाणीं नोकरी केल्यावर विसावे वर्षी उपरति होऊन यांनीं सप्तशृंगीच्या डोंगरावर तपश्चर्या केली. 'पाखंड मताचें खंडन करून वैदिक धर्माची पुनः स्थापना करण्याचा आदेश' यांना मिळाला (वेदोक्तधर्मप्रकाश पा. ७३८). हा ईश्वरी प्रसाद झाल्यावर पंढरपुरीं विठ्ठलाच्या मंडपांत यांनीं भावार्थ-रामायणाचीं तीन पारायणें केलीं, भावार्थसिंधु हा ओंवीबद्ध ग्रंथ प्रसिद्ध केला (१८५६) व महाराष्ट्रभर व्याख्यानें देऊन हे मुंबईस आले.

तेथें ख्रिस्ती मिशनऱ्यांच्या आक्षेपाला उत्तर देण्याकरितां दर शनवारीं प्रभु लोकांच्या विद्यालयांत व्याख्यानें देण्यास यांनीं सुरवात केली व इतर अनेक ठिकाणीं वाद-विवाद केले. तेथें एक आणा दर ठेवूनहि पोलिस बंदोबस्त ठेवण्याइतपत गर्दी होई. बंदिस्त जागेंत अस्पृश्य व ख्रिस्ती यांना येण्यास हरकत होते, असें पाहून यांनीं समुद्रकिनाऱ्यावर व्याख्यानें देण्यास सुरवात केली. ५७ च्या बंडांत यांना व्याख्यानें देण्यास बंदी झाली तेव्हां यांनीं आपला वेदोक्तधर्मप्रकाश हा ग्रंथ प्रसिद्ध केला. पुढें हे मद्रास, कलकत्ता वगैरेकडे हिंडले. हे मुसलमान, ख्रिस्ती वगैरे कोणाच्याहि हातचें उघडपणें खात. यांनीं आपलें म्हणणें सर्वत्र भाषण, लेखन, मुद्रण वगैरे द्वारां पोंचविण्याचा प्रयत्न केला; पण स्वतंत्र संस्था मात्र काढलेली नाहीं.

हे गोरे, धडधाकट व प्रसन्न मुद्रेचे गृहस्थ मोठे लहरी होते. तथापि सर जमशेदजी जिजीभाई, जनार्दन रामचंद्रजी वगैरे पुष्कळ लोक यांचे चहाते असत. पुढें भगवद्गीतेवरील सेतुबंधनी टीकेचा अठरावा अध्याय लिहिण्याचें काम चालू असतां हे काळपुळीनें मृत्यु पावले.

**वेडरबर्न, विल्यम**—(जन्म स. १८३६ मार्च २५–मृत्यु स. १९१८ मार्च २५) राष्ट्रसभेचे अध्यक्ष व हिंदुस्थानचे हितेच्छु.

इंडियन सिव्हिल सर्व्हिसमधील आपली नोकरी सोडून हे सार्वजनिक कार्यांत शिरले. मि. ह्यूम यांना यांनीं कांग्रेस स्थापण्यांत बरीच मदत केली. इंडियन नॅशनल काँग्रेसच्या ब्रिटिश कमेटीशींहि यांचा संबंध होता. १८८९ (मुंबई) व १९१० (अलाहाबाद) काँग्रेसचे हे अध्यक्ष होते. मि. ह्यूम यांच्या चरित्राशिवाय अग्रिकल्चरल बँकस, ग्रामपंचायत इत्यादि हिंदी प्रश्नांबद्दल यांनीं बरेच ग्रंथ लिहिले आहेत. आपल्या कार्यनिवृत्तीनंतर हे दरवर्षी एक हजार पौंड हिंदी कार्यासाठीं हिंदुस्थानला पाठवीत.

**वेब, अल्फ्रेड**—(मृत्यु स. १९०८) सुप्रसिद्ध आयरिश पुढारी व हिंदुस्थानच्या राष्ट्रसभेचे अध्यक्ष.

हे पार्लमेंटचे सभासद होते. सर उमेशचंद्र बानर्जी व दादाभाई नवरोजी यांचे पार्लमेंटमधील प्रचारानें हिंदी प्रश्नाकडे यांचें लक्ष वेधलें. १८९८ सालच्या मद्रास काँग्रेसचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें.

**वैद्य, गजानन भास्कर**—(जन्म स. १८६७–मृत्यु स. १९२१) मुंबईच्या हिंदुमिशनरी सोसायटीचे संस्थापक, आद्य हिंदुमिशनरी, शुद्धीचे पुरस्कर्ते व वक्ते.

जात प्रभु. यांचें शिक्षण मुंबईस झालें. हे बी. ए. होते (१८९३). हे १८९८ पासून मुंबईस थिऑसाफीचा प्रचार करीत. यांचें वक्तृत्व प्रभावी असे. मुंबईचे बातमीदार म्हणून अनंत नीळकंठ पिटकर व हे केसरींत 'अनंत' या सहीनें प्रचलित विषयांसंबंधीं लिहीत. त्यामुळें हे अत्यंत लोकप्रिय झाले. दादाभाई नवरोजी वगैरे मंडळींनीं काढलेल्या स्टुडन्ट लिटररी व सायन्टिफिक सोसायटीच्या विद्यालयांत हे अध्यापकाचें काम करीत (१९०४-१९२१). तेथें यांची व कु. कमलाबाई कीर्तिकर यांची ओळख झाली व तिचें विवाहांत रूपान्तर झालें (१९०५). मुंबई, मराठी ग्रंथसंग्रहालयाचे हे २१ वर्षे अध्यक्ष होते (१८९९-१९२०).

शंकराचार्य वगैरे लोक विनंति करूनहि पुढाकार घेईनात, तेव्हां यांनीं हिंदुधर्मांत शुद्ध करून लोक घेतां यावेत म्हणून हिंदुमिशनरी सोसायटीची स्थापना केली (१९१७ जुलै ५), हिंदु मिशनरी हें साप्ताहिक काढलें आणि परधर्मांत गेलेले आणि परधर्मांत जन्मलेले शंभर स्त्रीपुरुष शुद्ध करून हिंदुधर्मांत घेतले. तेव्हांपासून महाराष्ट्रांत या कार्याला चांगलें प्रोत्साहन मिळालें. वि. कों. ओक यांच्यानंतर बालबोध मासिकाचें संपादकत्व पत्करून पंचावन्न अंक काढले. हे मोठे वादविवादकुशल होते. यांच्या लिहिण्याबोलण्यांत मोठा मार्मिकपणा असून तें परिणामकारक असे. 'देवा जगीं वाढविं हिंदुधर्म' या पालुपदाचे यांचे श्लोक प्रसिद्ध आहेत.

यांचे ग्रंथ—१ रेखात्मक यथादर्शन चित्रविद्या, २ प्रश्नोपनिषद, ३ देहदान मीमांसा, ४ विष्णूचे अवतार (बेझंटबाईच्या अवतार या व्याख्यानाचें भाषान्तर), ५ हितोपदेशकथा, ६ विक्रमोर्वशीयम्, ७ सनातनधर्मविचार, ८ सनातनधर्मसंवाद, ९ आश्रम व आश्रमधर्म, १० उपनयनविधि, ११ वैदिक विवाहविधि वगैरे.

**वैद्य, भारताचार्य चिंतामण विनायक**—(जन्म स. १८६१–मृत्यु स. १९३८ एप्रिल २०) सुप्रसिद्ध पंडित, मराठी व इंग्रजी भाषेंतील लेखक, इतिहाससंशोधक व अभ्यासक.

यांचा जन्म कल्याण येथें व शिक्षण मुंबई येथें होऊन अनेक पारितोषिकें व शिष्यवृत्त्या मिळवीत हे एम्. ए., एल्एल्. बी. झाले. यांनीं प्रथम पुण्यास वकील, नंतर उज्जयनीस जज्ज (१८८७), पुढें ग्वाल्हेर येथें हायकोर्टातील मुख्य न्यायमूर्ति म्हणून काम केलें (१८९६-१९०५).

यांचा विद्याव्यासंग सतत चालू असे. यांनीं मराठी व इंग्रजी भाषेंत फुटकळ व ग्रंथरूपानें पुष्कळ लेखन केलें आहे. भारत इतिहास संशोधक मंडळाचे अनेक वर्षे अध्यक्ष, महाराष्ट्र साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष (१९०८, पुणें) व टिळक महाराष्ट्र विद्यापीठाचे कुलगुरु व कुलपति होते. यांना या विद्यापीठानें विद्वत्कुलशेखर ही पदवी दिली होती. तसेंच पुण्याच्या वैदिक संशोधन मंडळाचे हे संस्थापक व अध्यक्ष होते.

यांच्या ग्रंथांशिवाय इतस्ततः प्रसिद्ध झालेल्या कांहीं निबंधांचें संकलित पुनर्मुद्रणहि झालें आहे.

यांचे ग्रंथ—मराठी–१ श्रीरामचरित्र, २ श्रीकृष्णचरित्र, ३ महाभारताचा उपसंहार, ४ मध्ययुगीन भारत (भाग १-३); कादंबरी–दुर्दैवी रंगू; नाटक–संयोगिता, धार्मिक हिंदु-धर्माचें स्वरूप.

इंग्रजी–(1) History of Sanskrit Literature (वैदिक काल), (2) Riddle of the Ramayana, (3) History of Medieaval Hindu India (4) Mahabharata a Criticism, (5) Epic India, (6) Shivaji, the Founder of Maratha Swaraj इत्यादि.

**व्यास, नारायण गणेश**—(जन्म स. १९०२) सुप्रसिद्ध गवई.

जन्मस्थान कोल्हापूर. जात दे. ऋ. ब्राह्मण. यांनीं पं. विष्णु दिगंबर पलुस्कर यांचे हाताखालीं गायन, वादन व नृत्यकला यांचें शिक्षण घेतलें. १९२३ पासून यांनीं जलसे करण्यास सुरवात करून परप्रान्तांत श्रेष्ठ प्रतीचा मान मिळविण्यास सुरवात केली. प्रथम अहमदाबाद येथें संगीत विद्यालय काढलें व १९२७ सालीं हे मुंबईस आले.

यांचा आवाज बारीक, सुरेल, मधुर व सहज कंप असलेला आहे. आवाजावर यांचा ताबा असून यांचा दम चांगला टिकतो. हे ख्याल, ध्रुपदें, ठुंबऱ्या, तराणे व भजनें गात असले तरी यांची गायकी मधुर व पल्लेदार तानांनीं अत्यंत लोकप्रिय झालेली आहे.

**व्हिक्टोरिया, महाराणी**—(जन्म स. १८१९ मे २४–मृत्यु स.१९०१ जाने. २२, कारकीर्द स. १८५८-१९०१) हिंदुस्थानची दैवशाली महाराणी.

ही तिसऱ्या जॉर्जच्या चवथ्या मुलाची मुलगी. हिला नऊ अपत्यें झालीं. हिनें १८५७ सालच्या बंडानंतर सुप्रसिद्ध राणीचा जाहीरनामा काढून धर्मांत ढवळाढवळ न करण्याचें आश्वासन दिलें व हिंदुस्थानचीं राज्यसूत्रें हातांत घेतलीं (१८५८). १८७६ सालीं या बादशाह झाल्या. यांची प्रेमळ व निर्मळ मनाची महाराज्ञी अशी ख्याति होती.

# श

**शाहसुलेमान, सर मुहम्मद**—(जन्म स. १८८९-मृत्यु स. १९४१ मार्च १२) जगप्रसिद्ध गणितज्ञ व संशोधक.

यांचें जन्मस्थान जोनपूर. अलाहाबाद युनिव्हर्सिटीच्या बी. ए. परीक्षेंत पहिले आल्यामुळें यांना शिष्यवृत्ति मिळून इंग्लंडला जातां आलें. केम्ब्रिजच्या ख्राइस्ट चर्च कॉलेजमध्यें गेल्यावर यांना ट्रायपास मिळाला व हे डॉक्टर ऑफ लॉ झाले. १९११ मध्यें हिंदुस्थानांत येऊन यांनीं वकिलीचा धंदा केला (१९१२-२०). नंतरचीं बारा वर्षें हे निरनिराळ्या प्रमुख ठिकाणीं न्यायाधीश होते.

अलाहाबाद हायकोर्टाचे प्रमुख (१९३२-३७) व फेडरल कोर्टाचे न्यायाधीश होण्याचा मानहि यांना मिळाला (१९३७).

यांना सरकारनें सर ही पदवी देऊन गौरविलें (१९२९). अलीगढ मॉस्लेम युनिव्हर्सिटीचे व्हाइस-चान्सेलर व नॅशनल अकॅडमी ऑफ सायन्स ऑफ इंडियाचे अध्यक्ष (१९३८-१९४०) वगैरे अनेक मान यांना मिळाले. बुद्धिबळें खेळण्यांत हे अत्यंत निष्णात असून यांना केम्ब्रिजविरुद्ध ऑक्सफर्ड सामन्यांत हाफ ब्ल्यू मिळालें होतें.

प्रथमपासूनच गणित व फिजिक्स या विषयांची यांना आवड असे. पुढें आइन्स्टाइनच्या सापेक्षता सिद्धान्ताकडे यांचें लक्ष लागलें. तदनुसार यांनीं गणितशास्त्रांतील 'न्यू रिलेटिव्हिटी' या तत्त्वाचा शोध लावला. या महत्त्वाच्या शोधावर इंग्लंडमध्यें यांचीं व्याख्यानें झालीं (१९३९). तेथील गणितज्ञांनीं यांच्या या शोधाचें अत्यंत कौतुक केलें.

न्यूटनचे गणितविषयक सिद्धान्त व मतें सुप्रसिद्ध जर्मन ज्यू गणितज्ञ आइन्स्टाइन यांच्या शोधामुळें सदोष व अपुरीं ठरलीं. त्याच्या रिलेटिव्हिटीच्या सिद्धान्तानें न्यूटनच्या मेक्यानिक्सची जागा घेतली व शास्त्रज्ञांच्या अवकाश (space), काळ (time) आणि गति (motion) यांच्या कल्पनेंत क्रान्ति घडवून आणली. हे सिद्धान्त प्रत्यक्ष प्रयोगानेंच पुढें मांडल्यामुळें जगाला मान्यच करावे लागले. गुरुत्वाकर्षणाची क्रिया स्थिर आहे कीं गतिमान् आहे हें समजण्याचा न्यूटनच्या सिद्धान्ताप्रमाणें कांहींच उपयोग नसे. शास्त्रीय भाषेंत गुरुत्वाकर्षणाची गति अनन्त (infinite) आहे, असें समजून समाधान मानावें लागे.

परंतु यांनीं ही गति अमर्याद मानण्याचें कांहींच कारण नसल्याचें सिद्ध केलें. गुरुत्वाकर्षणाच्या न्यूटनच्या समीकरणांत यांनीं थोडा फरक सुचवून तें समीकरण दुरुस्त केलें. Retarded Potential च्या तत्त्वाचें प्रमाण न्यूटनच्या सिद्धान्ताला लावून यांनीं नवीन समीकरण तयार केलें आणि तें आइन्स्टाइनच्या सूर्याच्या ग्रहमालेच्या (System of Solar Planets) समीकरणाशीं यांनीं जमवून दाखविलें.

प्रवाही पदार्थांतून जाणाऱ्या प्रकाशकिरणांच्या गतीचें जें मूल्य आइन्स्टाइननें काढलें तेंच यांनीं आपल्या नवीन सिद्धान्तानुसार न्यूटनच्या सिद्धान्तांतून काढून दाखविलें. परंतु प्रकाशाप्रमाणें अत्यंत गतिमान् असणाऱ्या वस्तूबाबत यांचें समीकरण आइन्स्टाइनपेक्षां थोडें निराळें आहे. या थोड्या फरकामुळें प्रत्यक्ष परिणामांत मात्र अत्यंत फेर दिसून येतो. सूर्याच्या गुरुत्वाकर्षणाचा प्रकाशाच्या गतीवर बराच परिणाम घडतो. १९ जून १९३६ च्या ग्रहणापूर्वी आइन्स्टाइनच्या गणितापेक्षां प्रकाशाच्या गतीचें मूल्य अधिक येणार असल्याचें यांनीं छातीठोकपणें जाहीर केलें होतें.

सूर्याच्या कडांजवळ असलेल्या ताऱ्यांचे प्रकाशकिरण सूर्याच्या आकर्षणानें किंचित् बाकदार होतात. हा बाक सूर्यग्रहणाच्या वेळींच दिसणें शक्य असतें व तेव्हांच त्यासंबंधीं प्रयोग करण्यास अवसर मिळतो. हा बाक न्यूटनपेक्षां आइन्स्टाइनच्या गणिताप्रमाणें दुप्पट व यांच्या गणितानें त्यापेक्षांहि $\frac{1}{2}$ नें जास्त आहे. पूर्वी हा पाहण्यांतला दोष आहे, असें समजलें जात असे.

१९३६ च्या ग्रहणापूर्वी यांनीं आपले गणित आगाऊ प्रसिद्ध केल्यानें जपानमधून दिसणारें तें ग्रहण पाहण्यासाठीं तिकडे हिंदुस्थानसरकारनें शास्त्रज्ञ रवाना केले. गुरुत्वाकर्षणालाहि कांहीं गति असते, या यांच्या शोधामुळें न्यूटनच्या सिद्धान्ताच्या पुढील संशोधनाला उपयुक्त असें पाऊल पडलें आहे.

**शांताराम, व्ही.**—(जन्म स. १९०० सुमार) हिंदुस्थानांतील सुप्रसिद्ध चित्रपट दिग्दर्शक व संकलक.

यांचें नांव शांताराम राजाराम वणकुद्रे. हे मूळचे कोल्हापूरचे. श्री. बाबुराव पेंढारकर, भालजी पेंढारकर, विनायक, व्ही. अवधूत ही आज चित्रपटसृष्टीशीं निगडित झालेली मंडळी यांची निकटचे नातेवाईक आहेत.

बाबुराव पेंटर यांच्या हाताखालीं शिक्षण घेऊन जीं माणसें पुढें आलीं त्यांत हे व कै. विष्णुपंत दामले, शेख फत्तेलाल, केशवराव धायबर ही मंडळी प्रमुख होत. याच लोकांनीं पुढें श्री. कुलकर्णी यांच्या आर्थिक सहकार्यानें प्रभात फिल्म कंपनीची स्थापना केली (१९२९). कै. विष्णुपंत दामले ध्वनिलेखन, शेख फत्तेलाल कलादिग्दर्शन, केशवराव धायबर छायाचित्रण व हे दिग्दर्शन व संकलन अशी यांची तेथील कामाची वांटणी असे.

मूकपटाच्या शेवटच्या व बोलपटाच्या सुरवातीच्या जमान्यांत अयोध्येचा राजा (१९३२), सिंहगड (१९३३), अमृतमंथन (१९३४) हे त्या वेळीं यशस्वी झालेले चित्रपट प्रभातनें तयार केले तरी संत तुकारामनें प्रभातमध्यें एक नवें युग सुरू झालें (१९३८). यांचेकडे सामाजिक व दामले, फत्तेलाल यांचेकडे पौराणिक अशी प्रभातची दुहेरी आघाडी सुरू झाली व यानंतरचीं प्रभातचीं पांचसहा वर्षें अतिभरभराटीचीं गेलीं.

कुंकू, माणूस व शेजारी हे यांचे प्रमुख सामाजिक चित्रपट होत. कथा व तंत्र यांचा अद्ययावतपणा व यांचें रेखीव व प्रतीकात्मक दिग्दर्शन यांमुळें हे तीनहि चित्रपट अतियशस्वी ठरले. कुंकूंतील मोडकें घड्याळ, माणुसमधील दोनशें पंचावन हा आंकडा किंवा शेजारींतील हुक्का, अडकित्ता हीं यांनीं योजलेलीं प्रतीकें परिणामकारक होतीं.

सामाजिक चित्रपटाइतकेंच यश प्रभातच्या संत तुकाराम, संत ज्ञानेश्वर किंवा रामशास्त्री या ऐतिहासिक चित्रपटांनीं मिळविलें. महाराष्ट्रांतील संतांच्या स्मृतीला व त्यांच्या अभंगांना उजाळा देण्याचें काम या चित्रांनीं केलें. बुद्धी व भावना यांच्या या चित्रांतील मिश्रणामुळें न्यू थिएटर्स, तेलगु कंपन्या व पुढें यांच्याच पाउलावर पाऊल टाकून काढण्यांत आलेल्या संतपटांपेक्षां प्रभातचे चित्रपट वेगळेच राहिले.

हिंदी चित्रपटांना एक नवें वैशिष्ट्यपूर्ण वळण लावण्याचें काम प्रभातनें केलें. पाश्चात्य चित्रतंत्राला हिंदी ध्येयवादाची जोड दिल्यानें यांचे चित्रपट सर्वत्र लोकप्रिय झाले. समाजांतील विवाद्य प्रश्न परिणामकारक रीतीनें मांडण्यासाठीं यांनींच प्रथम चित्रपटमाध्यमाचा उपयोग केला. कुंकुमधील अन्यायप्रतिकाराचा, शेजारीमधील हिंदुमुसलमान ऐक्याचा किंवा संत ज्ञानेश्वरमधील मानवधर्माचा प्रचार स्पष्ट पण कलेला बाध न आणणारा आहे.

१९४१ सालीं यांनीं प्रभात फिल्म कंपनी सोडली व मुंबईला राजकमल कलामंदिराची स्थापना केली.

तेथें यांनीं शकुंतला, डॉ. कोटनीस वगैरे चित्रपट तयार केले. यांपैकीं डॉ. कोटनीसमध्यें तर हे व यांच्या पत्नी जयश्री यांनीं नायकनायिकेच्या भूमिका पार पाडल्या.

**शिवाजीमहाराज, तंजावर**—(जन्म स. १८३३–मृत्यु स. १८५५ आक्टो. २९) तंजावरच्या भोसले घराण्यांतील शेवटचे राजपुरुष.

स. १७९९ च्या तहान्वयें नेमणुकीदाखल व वसुलाच्या ५ व्या हिश्शाबद्दल यांना सालीना दहा लक्ष, ऐंशी हजार, नऊशें त्र्याण्णव रुपये मिळत. हे उदार दाते असल्यानें यांना लोक 'कर्ण' म्हणत. यांनीं पुत्रप्राप्तीकरितां वीस लग्नें केलीं; पण निपुत्रिक वारल्यानें डलहौसीनें यांचें राज्य खालसा केलें. यांच्या मुलीची मुलगी सयाजीराव गायकवाडांची पत्नी. तिचे नातू प्रतापसिंह हे बडोद्याचे महाराज होत. यांचें राज्य खालसा झालें तरी तंजावर येथें दत्तकवंश चालू आहे.

**शिंदे, जनरल-नानासाहेब गणपतराव**—(जन्म स. १८७६) सुप्रसिद्ध युद्धशास्त्रतज्ज्ञ व मराठी लेखक.

जन्मस्थान पेडांबें (ता. चिपळूण). यांचें घराणें बडोद्यास स्थायिक झालेलें आहे. बडोदें फौजेंत लेफ्टनंट म्हणून कायम झाल्यावर चढत जाऊन हे जनरल होऊन सेवानिवृत्त झाले. संस्थानतर्फे ए. डी. सी., पोषाख, सोन्याचें घड्याळ व राजरत्नसुवर्णपदक यांना मिळालें. यांनीं अनेक कमिट्यांवर कामें केलीं. श्रीसयाजीराव मराठा स्कॉलरशिप कमेटीचे हे सेक्रेटरी होते. मराठींत यांचें फुटकळ लेखनहि पुष्कळ आहे. तलवार आणि लेखणी सारख्याच लीलेनें खेळविणारे म्हणून यांची प्रसिद्धि आहे.

यांचे ग्रंथ—इंग्रजी–१ बडोदा आर्मी डिसिप्लीन ॲक्ट, २ रूल्स, ३ बडोदा आर्मी रेग्युलेशन व्हा. १-२, ४ औटपोस्ट, अडव्हान्स, रियरगार्ड्स फॉर इन्फन्ट्री, ५ गार्ड्स फॉर कॅव्हलरी ( हिंदी ).

मराठी–१ शिस्त, २ हिंदुस्थानचा लष्करी इतिहास, ३ मराठ्यांच्या प्रसिद्ध लढाया, ४ सुविचाररत्नमाला, ५ पानपतच्या घनघोर संग्रामासंबंधीं युद्धशास्त्रदृष्ट्या विचार, ६ बाना आणि फरीगदगा, आत्मचरित्र–७ एका शिपायाचें आत्मवृत्त.

**शिंदे, महर्षि विठ्ठल रामजी**—( जन्म स. १८७३–मृत्यु स. १९४४ जाने. २ ) सुप्रसिद्ध अस्पृश्यता-निवारक, समाजशास्त्रज्ञ, भाषाशास्त्रज्ञ व ध्येयवादी त्यागी गृहस्थ.

यांचा जन्म जमखिंडी येथें मराठा कुलांत झाला. जमखिंडी हायस्कुलांतून मॅट्रिक ( १८९१ ) व पुणें फर्ग्युसन कॉलेजांत अभ्यास करून हे बी. ए. झाले ( १८९८ ). फर्स्ट एलएल. बी. झाल्यावर यांचा ओढा प्रार्थनासमाजाकडे वळून हे त्या संस्थेचे प्रचारक झाले. पुढें याच कार्यासाठीं 'युनिटेरियन' शिष्यवृत्ति यांना मिळून हे ऑक्सफोर्ड येथील मँचेस्टर कॉलेजांत तुलनात्मक धर्माचें अध्ययन करण्यासाठीं तिकडे गेले (१९०१). लिव्हरपूल व ॲमस्टरडॅम ( हॉलंड ) येथें भरलेल्या युनिटेरियन परिषदेस हे हजर होते. त्या वेळीं यांनीं 'लिबरल रिलिजन इन इंडिया' हा प्रबंध तेथें वाचला ( १९०३ ). तेथून परत आल्यावर प्रार्थना समाजाच्या प्रचाराकरितां यांनीं तीन वेळां आसेतुहिमाचल व एकदां ब्रह्मदेशमध्यें प्रवास केला ( १९०३-१९०६ ).

पुढें यांचें लक्ष अस्पृश्यांच्या प्रश्नाकडे वेधलें आणि यांनीं 'डिप्रेस्ड क्लासेस मिशन सोसायटी ऑफ इंडिया उर्फ भारतीय निराश्रित साहाय्यकारी मंडळी' या संस्थेची स्थापना केली ( १९०६ ). यांनी त्या संस्थेच्या शाखा हिंदुस्थानभर उघडल्या. सर तुकोजीराव होळकर इंदूर व मुंबई सरकार यांच्या मदतीनें लाख रुपये खर्चून पुणें येथें विद्यार्थि वसतिगृह वगैरे करितां अहल्याश्रम नांवाच्या इमारती उभारल्या. सभा, जाहीरनामे, शाळा, ग्रंथ वगैरे सतत कार्य केलें आणि १९२३ सालीं हे त्या संस्थेंतून निवृत्त झाले.

हे पक्के राष्ट्रीय बाण्याचे होते. म. गांधींनीं नागपूर काँग्रेसनंतर यांना वर्किंग कमिटींत घेतलें होतें. यांनीं निवडणुकीच्या दृष्टीनें राष्ट्रीय मराठा पक्ष काढला होता तो पुढें ब्राह्मणेतर पक्षांत विलीन झाला. १९३० सालीं राष्ट्रसभेच्या चळवळींत भाग घेतल्याबद्दल यांना सहा महिन्यांची शिक्षा झाली. हे अनेक सामाजिक व शेतकरी परिषदांचे अध्यक्ष झाले. श्रीमंत सयाजीराव गायकवाड बडोदें यांचें यांना विद्यार्थिदशेपासून साहाय्य असे. जन्मभर लोकांना अप्रिय असणारें समाजसेवेचें काम केल्याबद्दल यांना त्यांनीं शेवटीं बाविसशें रुपयांचे पारितोषिक दिलें.

यांचें तात्पुरत्या समाजसुधारणेनें समाधान होण्यासारखें नव्हतें. यांना समाजांत आमूलाग्र सुधारणा पाहिजे होती. तसा हे प्रचार करीत व स्वतः आचारहि करीत. त्यामुळें यांना बहुजन समाजाचा पाठिंबा मिळणें दुर्घट होई. तथापि निष्ठेनें हे आपलें अंगीकृत कार्य करीत. अस्पृश्यतानिवारण हा यांचा हेतु, पण अस्पृश्यता ही अस्पृश्य लोक राजकीय भांडवलासारखी वापरूं लागले तेव्हां यांना त्याहि कार्यांतून अंग काढून घ्यावें लागलें. अस्पृश्यतानिवारणासंबंधीं कमालीची तळमळ, त्याकरितां त्यांच्यांत मिळूनमिसळून राहणें, अस्पृश्यता ही भांडवलासारखी वापरून त्याच्या जोरावर नोकऱ्या व हक्क मिळविण्याबद्दल निषेध वगैरे बाबत म. गांधींशीं यांचें विलक्षण साम्य आहे. यांनीं १९०० सालीं हा कार्यक्रम वर्तनांत आणला याला तर विशेष महत्त्व आहे. यांच्या या ध्येयवादी त्यागी वृत्तीमुळें यांना लोक महर्षि म्हणत. यांच्या प्रतिपादनानें सत्यशोधक समाजाला तात्त्विक बैठक मिळे.

इतिहास व भाषा यांतील यांचा व्यासंगहि नमुनेदार, मूलगामी व मार्मिक असे. यांच्या लिहिण्याबोलण्यांत माहितीचा सूक्ष्मपणा व ठसकेदारपणा आढळे. यांनीं आपलें आत्मचरित्र लिहिलें आहे. त्यावरून यांच्या वृत्तीचा चांगला परिचय होतो.

**शिंदे, महाराज जनकोजीराव दौलतराव**—( जन्म स. १८१६–मृत्यु स.१८४३, कारकीर्द स.१८२७ मार्च ११–१८४३ फेब्रु. ७ ) ग्वाल्हेर राज्याचे अधिपति.

हे दौलतरावांच्या पत्नी रखमाबाई यांच्या मांडीवर दत्तक येऊन मुगुटरावाचे जनकोजीराव झाले (१८२७). हे अल्पवयी असल्यानें दौलतरावांच्या मृत्युपत्रान्वय बायजाबाईसाहेब आपले बंधु हिंदुराव घाटगे यांच्या मदतीनें राज्यकारभार पाहत. पण हे त्यांच्या कारभाराला कंटाळून पळाले आणि गव्हर्नर जनरल लॉर्ड

बेंटिक यांच्याकडे गेले ( १८३२ आक्टो. ). त्यांनीं तडजोड करून दिली ती सातआठ महिन्यांपेक्षां अधिक टिकली नाहीं. शेवटीं सहा लक्षांची नेमणूक देऊन बायजाबाईसाहेबांना राज्यकारभारांतून मुक्त करण्यांत आलें. हे हयात असेपर्यंत त्यांनीं आपले बहुतेक दिवस दक्षिणेंत काढले.

यांचे जवळ दहा हजार पायदळ, पंधरा हजार स्वार व अडीचशें तोफा होत्या.

**शिंदे, महाराज जयाजीराव जनकोजीराव—** ( जन्म स. १८३४–मृत्यु स.१८८६, कारकीर्द स.१८५३ जाने. १९–१८८६ जून ६ ) ग्वाल्हेर राज्याचे अधिपति.

जनकोजीरावांच्या मृत्यूनंतर त्यांच्या पत्नी ताराबाई-साहेब यांनीं यांना दत्तक घेतलें आणि भगीरथरावाचें जयाजीराव असें नांव ठेविलें. यांचे नांवें कारभार सुरू झाला तेव्हां कारभार जनकोजीरावांचे मामा, मामासाहेब कदम हे पाहत होते. त्यांना प्रतिस्पर्धी दादा खासगीवाले उत्पन्न झाले. त्या दोघांचा हातघाईवर आलेला तंटा गव्हर्नर जनरलनें सैन्याच्या जोरावर मिटविला. तेव्हां रामराव फाळके यांच्या नेतृत्वाखालीं कारभार चालावा, अठरा लक्षांचा मुलूख इंग्रजांना द्यावा, त्यांचें सैन्य राज्यांत ठेवावें व स्वतःचे सैन्य ठराविक मर्यादेपेक्षां अधिक ठेवूं नये असें ठरून शिंदे सरकार इंग्रजांचे मांडलिक झाले. १८५७ च्या बंडांत हे केवळ रावराजे दिनकरराव राजवाडे यांच्यामुळें सामील झाले नाहींत. हे युद्धशास्त्राचे प्रेमी व शूर होते.

बडोद्याचे महाराज मल्हारराव गायकवाड यांच्यावर आलेल्या विषप्रयोगाच्या चौकशी कमिशनमध्यें हे होते. यांनीं त्यांना निर्दोषी ठरविलें. हे मोठे स्वाभिमानी आणि लोकप्रिय होते. यांचे पुत्र माधवराव.

**शिंदे, महाराज माधवराव जयाजीराव—** ( जन्म स. १८७६ आक्टो. २०–मृत्यु स. १९२५ जून ५, कारकीर्द स. १८९४–१९२५ ) ग्वाल्हेर राज्याचे सुप्रसिद्ध अधिपति.

हे ग्वाल्हेरचे महाराज जयाजीराव यांचे एकुलते एक औरस पुत्र. यांच्या मातेचें नांव सख्याराजे. त्यांना जीजामहाराज या नांवानें लोक ओळखीत. यांचें शिक्षण प्रायः खासगी रीतीनें झालें.

हे राज्यकारभारांत जातीनें लक्ष घालीत. मुख्य प्रधान नेमून त्यावर राज्याकारभार सोपविण्याची यांची पद्धति नव्हती. हे तज्ज्ञ माणसें जवळ करीत, पण अखेरचा निर्णय स्वतःकडे राखून ठेवीत. दिवसांतून चवदाचवदा तास काम करण्याबद्दल यांची प्रसिद्धि असे.

प्रत्येक काम रेखीव व्हावें अशी यांची इच्छा असे. बारीकसारीक गोष्टीपासून महत्त्वाच्या कामापर्यंत स्वतः लक्ष घालण्याची यांची पद्धत असे आणि आपल्या मागेंहि आपल्या धोरणानें व रेखीव पद्धतीनें कारभार व खासगी व्यवहार चालावेत म्हणून यांनीं आपलें धोरण अनेक भागांत लिहून व छापून ठेवलें आहे.

यांना आपल्या पूर्वजांप्रमाणें युद्धशास्त्राची विशेष आवड असे. यामुळें यांच्या राज्याच्या वार्षिक खर्चांत युद्ध खात्यावर होणाऱ्या खर्चाची रक्कम सर्वांत जास्त असे. आपल्या संस्थानांतील सैन्य सर्व दृष्टीनें ब्रिटिश सैन्याच्या तोडीचें ठेवण्याबाबत हे दक्षता ठेवीत. १९०० सालीं चीनमध्यें व १९१४ सालीं पहिल्या महायुद्धाच्या आघाडीवर फ्रान्समध्यें हे स्वतः दाखल झाले होते. पण महत्त्वाच्या प्रसंगीं मागें ठेवण्याच्या आणि आवश्यक व पहिल्या दर्जाचीं शस्त्रास्त्रें न पुर-विण्याच्या ब्रिटिश धोरणामुळें यांना मनस्ताप होई.

हे मराठी साम्राज्याचा व आपल्या घराण्याचा अभिमान बाळगणारे असून समाजसुधारणेच्या नांवाखालीं आपल्या पूर्वपरंपरेला धक्का लागेल असें कोणतेंहि कृत्य यांनीं केलें नाहीं. आपले विख्यात पूर्वज महादजी शिंदे यांच्या पुणें येथील छत्रीला प्रेक्षणीय स्वरूप यांनींच दिलें.

पुण्याच्या शिवस्मारकास जातीय स्वरूप देण्यास यांनीं विरोध केला आणि राष्ट्रपुरुष म्हणून छत्रपति शिवाजी महाराजांचें स्मारक उभारण्यांत पुढाकार घेऊन प्रिन्स ऑफ वेल्स यांच्या हस्तें त्या स्मारकाची स्थापना केली. कोल्हापूरच्या छत्रपति राजाराम महा-राजांना त्या कामीं पुढाकार देऊन यांनीं त्या वेळीं मोठा मुत्सद्दीपणा व्यक्त केला. तसेंच आपल्या घराण्याचें पाटिलकीचें वतन लक्षांत घेऊन हे पुण्यास भरलेल्या पाटील परिषदेचे अध्यक्ष झाले आणि सर्वांत खेळी-मेळीनें वागून यांनीं लोकप्रियता संपादन केली आणि लोकांचा स्वाभिमान जागृत केला.

यांना दोन स्त्रिया होत्या. पहिल्या महाराणी चिंकू-

राजे ( मृत्यु स. १९३१ नवं. २३ मुंबई ). दुसऱ्या महाराणी गजराराजे. या गोव्याकडील राणे उपनांवाच्या घराण्यांतील होत्या. १९१३ सालीं त्यांचा माधवराव महाराजांशीं विवाह झाला. यांना एक मुलगी व एक मुलगा अशीं दोन अपत्यें झालीं. मुलगी अक्कलकोटच्या राजेसाहेबांस दिली होती ती लग्नानंतर लवकरच दिवंगत झाली. दुसरें अपत्य महाराज जीवाजीराव होत. ते यांच्यानंतर गादीवर आले.

शेवटीं फ्रान्समध्यें गेले असतां पॅरिसजवळ तीन मैलांवर चाटो-डी-मड्रिड येथें यांना मृत्यु आला. तेथें यांचें दहन करण्यांत आलें. त्यांपैकीं कांहीं अस्थींचें ग्वाल्हेरजवळ शिवपुरी येथे दहन करून यांच्या अस्थि प्रयाग येथें गंगेंत विसर्जित केल्या.

यांचें विस्तृत चरित्र सर कैलासनारायण हाक्सर C. I. E. यांनीं इंग्रजींत लिहून यांच्या मृत्यूनंतर प्रसिद्ध केलें. ते यांच्या राज्यांत पुष्कळ वर्षे प्रायव्हेट सेक्रेटरी, फॉरेन आणि पोलिटिकल मेंबरच्या जागेवर असल्यानें आणि बिकानेर, काश्मीर वगैरे संस्थानांत त्यांनीं दिवाणाचीं कामें केल्यामुळें त्यांनीं यांच्या कर्तृत्वावर व व्यक्तित्वावर चांगला प्रकाश पाडला.

**शिंदे, महाराज सर जीवाजीराव**—( जन्म स. १९१६ जून २६ ) ग्वाल्हेर राज्याचे अधिपति.

आपली माता गजराराजे यांचे हाताखालीं व नंतर ग्वाल्हेरच्या व्हिक्टोरिया कॉलेजांत यांनीं एक वर्ष शिक्षण घेतलें आणि नंतर हे गादीवर आले ( १९२५ जून ५ ). पुढें १९३६ नवं. २ ला यांना अधिकार प्राप्त झाला. मध्यन्तरीं यांनीं लायलपूर ( पंजाब ), मुंबई व पुणें येथें करवसुली, राज्याची व्यवस्था व लष्करी शिक्षण घेतलें. यांचा विवाह नेपाळच्या राजघराण्यांतील राजपुत्र खड्गसमशेरजंग कमांडर चीफ यांची नात लेखा दिव्येश्वरी देवी यांच्याशीं झाला ( १९४१ फेब्रु. २१ ). लग्न झाल्यानंतर त्यांचें नांव विजयाराजे ठेवण्यांत आलें. त्यांना १ पद्माराजे, २ उषाराजे व ३ माधवराव ( १९४५ मार्च १० जन्मदिन ) अशीं तीन अपत्यें आहेत.

यांच्या राज्याचा विस्तार २६३६७ चौ. मैल, वार्षिक उत्पन्न अंदाजानें ३॥। कोटी रु. लोकवस्ती ( १९३१ ) ३५२३०७०, सलामी २१ तोफा. गांवें ११०००. पक्की सडक २५०० मैल व रेल्वे ( Scindia State Ry. ) २५३ मैल आहे.

**शुक्ल, रामचन्द्र चन्द्रबली**—( जन्म स. १८८४–मृत्यु स. १९४१ ) हिन्दी भाषेंतील सुप्रसिद्ध लेखक व कवि.

यांचें जन्मस्थान बस्ती जिल्ह्यांतील अगोना गांव. यांचे वडील राठ ( जि. हमीरपुर ) येथें पाटील होते. हे मिर्जापूर मिशन स्कूलमधून प्रवेशपरीक्षा उत्तीर्ण होऊन ( १९०१ ) तेथेंच शिक्षक झाले. १९०८ सालीं हिन्दी कोशाचे सहसंपादक म्हणून हे नागरी प्रचारिणी सभेच्या बोलावण्यावरून बनारसला गेले. तेथें त्या सभेच्या पत्रिकेचें संपादनहि यांनीं बरींच वर्षे केलें. पुढें हिंदुविश्वविद्यालयांत हे हिन्दीचे प्राध्यापक झाले.

हिन्दी भाषेंतील उत्तम कवि, मार्मिक समालोचक आणि विचारप्रधान लेखकांत यांची गणना होते. यांच्या ग्रंथाशिवाय यांनीं वेळोवेळीं लिहिलेले लेखहि महत्त्वाचे आहेत. यांच्या लेखनाचा हिन्दी उच्च शिक्षणासाठीं चांगला उपयोग होतो. काव्यांत करुणरस आळविण्यांत यांचा हातखंडा आहे.

यांनीं क्रोध, करुणा वगैरे मनोविकारांवर लिहिलेल्या लेखांचा संग्रह चिंतामणि नांवानें प्रसिद्ध झाला. त्याला हिन्दी साहित्य संमेलनानें बाराशें रुपयांचें मंगलाप्रसाद पारितोषिक दिलें. यांच्या 'हिन्दी साहित्य का इतिहास' या महत्त्वाच्या ग्रंथालाहि हिन्दुस्थानी अकयाडमी, प्रयाग-कडून पांचशें रुपयांचा पुरस्कार मिळाला.

यांचें वाङ्मय—१ हास्यविनोद ( नाटक ), २ कल्पनाका आनन्द ( 'एसे ऑन दि इमॅजिनेशन'चा अनुवाद ), ३ मेगास्थिनीजका भारतवर्षीय विवरण ( अनुवाद ), ४ राज्य प्रबन्ध शिक्षा ( सर टी. माधवरावांच्या मायनर हिन्टस्चा अनुवाद ), ५ राधाकृष्णदासका जीवनचरित्र, ६ आदर्शजीवन, ७ विश्वप्रपञ्च, ८ शशाङ्क, ९ बुद्धचरित काव्य ( लाइट ऑफ एशियाच्या आधारें टीकात्मक ), १० मलिक मुहम्मद जायसी, ११ गोस्वामी तुळसीदास, १२ महाकवि सूरदास, इतिहास–१३ हिन्दी साहित्यका इतिहास; काव्य–१४ शिशिर पथिक, १५ वसन्त, १६ तुळसीदास, १७ प्रकृतिप्रबोध इत्यादि.

**श्यामजी कृष्णवर्मा पंडित**—( जन्म स. १८५७ ऑक्टो. ४–मृत्यु स. १९३० एप्रिल ) इंग्लंडमध्यें हिंदी

राजकारणाचा प्रचार करणारे सुप्रसिद्ध राजकारणी व क्रान्तिकारक.

काठेवाडमधील मांडवी हें गांव यांचें जन्मस्थान. यांची जात भनसाळी. मुंबईच्या एल्फिन्स्टन हायस्कूलमध्यें व खाजगी रीतीनें संस्कृत भाषेचें शिक्षण घेतल्यानंतर हे इंग्लंडला गेले. तेथें मोनियर विल्यम्स यांचे शिफारशीनें यांना कच्छ संस्थानची शिष्यवृत्ति मिळाली व हे बॅरिस्टर होऊन हिंदुस्थानला परत आले. इंग्लंडमध्यें असतां तेथील रॉयल एशियाटिक सोसायटीपुढें यांनीं भारतांतील लेखनकलेचा उदय हा निबंध वाचला. तसेंच बर्लिन ( १८८१ ) व लंडन ( १८८३ ) येथील प्राच्यविद्यापरिषदांनाहि हे भारतमंत्र्याचे विनंतीवरून हिंदी प्रतिनिधि म्हणून हजर राहिले.

हिंदुस्थानांत आल्यावर लोकहितवादी गो. ह. देशमुखांच्या शिफारशीनें रतलाम संस्थानचे दिवाण म्हणून यांची नेमणूक झाली ( १८८५ ). यानंतर उदेपूर, जुनागड इत्यादि ठिकाणीं दिवाणाचीं कामें केल्यानंतर हे निवृत्त झाले व जहाल राजकारणाकडे वळले. त्या दृष्टीनें इंग्लंड जास्त सुरक्षित आहे असें ध्यानांत आल्यानंतर हे इंग्लंडला राहावयास गेले ( १८९७ ).

शिष्यवृत्त्यांची व्यवस्था करून जास्तींत जास्त हिंदी विद्यार्थ्यांना इंग्लंडमध्यें प्रवेश करून द्यावयाचा असें यांचें धोरण असे. हर्बर्ट स्पेन्सर ट्रॅव्हलिंग फेलोशिप व दयानंद शिष्यवृत्ति या आपल्या व राणाप्रताप व शिवाजी या श्री. सरदारसिंग राणा यांच्या शिष्यवृत्त्यांनीं यांनीं आपल्या कार्यास सुरवात केली. सुप्रसिद्ध विनायक दामोदर सावरकर हे यांपैकीं शिष्यवृत्ति मिळवूनच इंग्लंडला गेले होते.

१९०५ सालीं यांनीं 'इंडियन सोशॅलिस्ट' हें पत्र सुरू केलें व इंडियन होमरूल लीगची स्थापना ( फेब्रु. १८ ) केली. याचेहि पुढें जाऊन इंग्लंडमध्यें आलेल्या हिंदी विद्यार्थ्यांची राहण्याची सोय करण्याच्या व त्यांच्या विचारांना वळण लावण्याच्या दृष्टीनें 'इंडिया हाउस'ची स्थापना केली ( १९०५ जुलै १ ). लंडनमधील हायगेट विभागांत यासाठीं यांनीं एक इमारत खरेदी केली व त्यांत पंचवीस विद्यार्थ्यांच्या राहण्याची सोय केली. खालच्या मजल्यावर वाचनालय, सभागृह व वर दोन मजल्यांत राहण्याची सोय अशी व्यवस्था असे. महेशचरणसिंह हे व्यवस्थापकाचें काम पाहत. या वेळीं इंडिया हाउसमध्यें राहणाऱ्या लोकांत परमानंद, धर्मवीर, लाला हरदयाळ, मिसेस कामा, सेनापति बापट, ग्यानचंद वर्मा, सावरकर ही मंडळी प्रमुख असून त्यांच्या हालचालीमुळें त्या वेळीं इंडिया हाउसला क्रांतिगृहाचें स्वरूप आलें होतें. मतप्रचाराच्या दृष्टीनें Gaelic Republican या न्यू यॉर्कच्या आयरिश रिपब्लिकन पत्राचाहि हे उपयोग करीत.

अशा तऱ्हेनें हिंदी विद्यार्थ्यांना क्रांतीचे धडे देण्याचें काम अव्याहत दहा वर्षेपर्यंत केल्यानंतर हे पॅरिसला राहावयास गेले.

पुढें धिंग्रा प्रकरण उपस्थित झाल्यानंतर सावरकर इंडिया हाउस सोडून गेले. त्यामुळें इंडिया हाउसची जरूर नाहीं असें वाटून यांनीं ती संस्था बंद केली व तिची इमारतहि विकून टाकली.

परदेशांशीं संबंध असणाऱ्या ज्या क्रांतिकारकांच्या हालचाली हिंदुस्थानांत झाल्या त्यांचीं सर्व सूत्रें इंडिया हाउसमधून हालविलीं जात. प्रत्यक्ष इंग्लंडमध्येंहि धिंग्रा प्रकरण वगैरेंच्या मुळाशीं इंडिया हाउसचा हात होता. क्रांतिकारकांच्या ज्या चळवळीनें त्या काळीं हिंदुस्थान तापून गेला होता त्याचाच प्रतिध्वनि यांच्या या कार्यामुळें इंग्लंडमध्यें उत्पन्न झाला.

राजकीय कारणानें इंग्लंड व फ्रान्स येथें राहणें अशक्य झाल्यानें हे स्वित्झर्लंडमध्यें राहण्यास गेले व तेथें जिनीव्हा येथें मृत्यु पावले.

**श्यामशास्त्री म. म. आर.**—( जन्म स. १८६८-मृत्यु स. १९४४ ) सुप्रसिद्ध अर्थशास्त्रविशारद व इतिहाससंशोधक.

यांचा जन्म कावेरी नदीच्या तीरावर रुद्रपाटन गांवीं झाला. यांचें शिक्षण महाराजा संस्कृत कॉलेज, म्हैसूर येथें झालें. नंतर हे इंग्रजी शिकून बी. ए. झाले ( १८९९ ). म्हैसूरचे दिवाण सर के. शेषाद्रि अय्यर यांचे वाचक, म्हैसूर गव्हर्नमेंटचे लायब्रेरियन म्हणून कागद व ताडपत्र यांवरील हस्तलिखितांचा क्याटलाग करण्याचें काम करीत असतां यांना कौटिलीय अर्थशास्त्राची एक प्रत सांपडली. यांनीं त्या ग्रंथांतील राजकारण, अर्थशास्त्र, कायदा वगैरेंचा अभ्यास करून तो ग्रंथ म्हैसूर ओ. लायब्ररी सीरीजमध्यें प्रसिद्ध केला आणि त्याचें इंग्रजींत भाषान्तर केलें ( १९२१ ). त्यामुळें व त्यावर लिहिलेल्या अनेक लेखांमुळें यांची सर्वत्र ख्याति झाली. बंगलोरच्या गव्हर्न-

मेंट कॉलेजचे प्रिंसिपल, म्हैसूरच्या ओरिएन्टल लायब्ररीचे क्युरेटर, कलकत्ता युनिव्हर्सिटीचे परीक्षक व तेथून बहुमानिक पीएच्. डी. ही पदवी मिळविणारे व कलकत्ता विश्वविद्यालयांतील हिंदी राजनीति या विषयावरील व्याख्यानें देणारे वगैरे अनेक नात्यांनीं यांची ओळख देतां येईल. यांना सरकारनें महामहोपाध्याय ही पदवी देऊन गौरविलें होतें. यांचा संशोधनाच्या बाबतींतील उत्साह विशेष प्रकारचा होता. यांनीं विविध विषयांवर अगदीं नवे शोध प्रकट करणारे अनेक लेख लिहिले. अगदीं म्हातारपणीं संशोधनाकरितां हे ग्रीक भाषासुद्धां शिकले.

यांचे ग्रंथ—( 1 ) Cycle of Eclipses in the Vedas, ( 2 ) Eclipse Cult, ( 3 ) Vedic Gods, ( 4 ) South Indian Inscriptions च्या नव्वदाव्या भागाचें संपादन, इत्यादि.

**श्यामसुंदरदास**—( जन्म स. १८८५–मृत्यु स. १९४५ आगस्ट ८ ) बनारसच्या नागरी प्रचारिणी सभेचे एक संस्थापक, बनारस हिंदु विश्वविद्यालयांतील हिन्दी विभागाचे अध्यक्ष व हिन्दी भाषा नि देवनागरी लिपि यांचे एकनिष्ठ पुरस्कर्ते.

यांचा जन्म काशी येथें प्रसिद्ध खत्री घराण्यांत झाला. यांच्या पित्याचें नांव लाला आत्माराम. बी. ए. झाल्यानंतर छापखाना व शाळा वगैरे ठिकाणीं काम केल्यावर विश्वविद्यालयांत हिन्दी विभागाचे यांना अध्यक्ष नेमण्यांत आलें. तेथें १९३७ जुलै पर्यंत यांनीं काम केलें. तेथें यांना अभ्यासक्रम आखण्यापासून इंग्रजीऐवजीं हिन्दी माध्यम स्वीकारून हिन्दी भाषेत शिकविण्यायोग्य पुस्तकें तयार करविलीं. भाषा, विज्ञान व समालोचना या विषयांत यांचे ग्रंथ सर्वश्रेष्ठ मानले जातात.

नागरी प्रचारिणी सभेच्या द्वारां झालेल्या प्राचीन ग्रंथाच्या संशोधनांत यांचा भाग फार मोठा होता.

यांचें वाङ्मय—१ साहित्यालोचन, २ रूपकरहस्य, ३ भाषाविज्ञान, ४ मेरी आत्मकथा ( आत्मचरित्र ), ५ गोस्वामी तुलसीदास, ६ हिन्दी भाषा और साहित्य, ७ भारतेन्दु हरिश्चन्द्र; संपादक–हिन्दी शब्दसागर व हिन्दी वैज्ञानिक कोष.

यांना रायसाहेब, रायबहादुर व हिन्दी साहित्य संमेलनानें 'वाचस्पति' ही पदवी दिली. तसेंच हिन्दी साहित्य संमेलनाचें अध्यक्षपदहि यांना देण्यांत आलें होतें. हे नुसते लेखकच नव्हते, तर, अनेक लोकांना स्फूर्ति देऊन हिन्दी भाषेची सेवा करावयास लावण्याचें सामर्थ्य यांच्यांत होतें. मैथिलीशरण गुप्तांनीं यांच्या मृत्यूनंतर पुढील उद्गार काढले 'मातृभाषाके हुये जो विगत वर्ष पचास। नाम उनका एक ही है श्यामसुन्दरदास'.

**श्रद्धानंद स्वामी**—( जन्म स. १८५६–खून स.१९२६ डिसें. २३ ) सुप्रसिद्ध गुरुकुल विश्वविद्यालयाचे संस्थापक व हिंदुसमाजाच्या उपेक्षित भागाकडे लक्ष वेधविणारे थोर गृहस्थ.

यांचा जन्म पंजाबांत जालंदरजवळ तळवन गांवीं क्षत्रिय कुलांत झाला. यांचें नांव मुनशीराम आणि पित्याचें नांव नानकचंद. रिवाजाप्रमाणें यांचा यज्ञोपवीत संस्कार झाला ( १९२३ ). वडील पोलीस खात्यांत फिरतीवर असत. पण आईच्या काशीवासाच्या इच्छेमुळें यांचें मॅट्रिक-पर्यंतचें शिक्षण काशीस झालें. पण दयानंद सरस्वतीच्या निर्भय व सडेतोड व्याख्यानांनीं यांची नास्तिकता आणि व्यसनीपणा नष्ट झाला व हे पक्के आर्यसमाजी बनले ( १८८५ ). नंतर हे लाहोर येथें वकिली करूं लागले. वकिली करीत असतां यांचें हिंदूंच्या उपेक्षित असणाऱ्या विविध अंगांकडे विशेष लक्ष वेधलें. आटाफंड, रद्दीफंड वगैरे सुरू करून यांनीं सद्धर्मप्रचारक साप्ताहिक उर्दूत सुरू केलें. त्यांत प्रथम उर्दू लिपींत हिन्दी लिहिण्यास सुरुवात करून तेंच पुढें देवनागरींत काढण्यास यांनीं सुरवात केली. स्त्रीशिक्षणाकरितां लेखमाला लिहून जालंदर कन्याशाळा सुरू केली ( १८९० ). विधवाविवाह व अनाथसंरक्षण वगैरे प्रश्नहि यांनीं लोकांपुढें मांडून प्रत्यक्ष कार्याची दिशा दाखविली. याच सुमारास यांची पत्नी वारली ( १८९१ ). मुलांच्या संगोपनाची जबाबदारी यांच्यावर पडली. तथापि पुनः विवाह करण्याचें यांनीं मनांतहि आणलें नाही. येथून पुढें यांचा वानप्रस्थाश्रम सुरु झाला.

आर्यसमाजांत मांसाशनाला अनुकूल व प्रतिकूल असे दोन तट पडले. त्यांपैकीं मांसाशनपक्षाच्या लोकांनीं शिक्षणप्रसाराकरितां दयानंद आंग्लो वैदिक कॉलेज काढून आधुनिक शिक्षणाच्या प्रसारास सुरुवात केली त्यांत हे प्रथम होते. पण यांनीं त्या संस्थेंतून बाहेर पडून, प्राचीन गुरुकुल पद्धतीच्या शिक्षणाचा पुरस्कार केला. त्याकरितां तीस हजार रुपये जमा केल्याशिवाय घरीं परत येणार नाहीं अशी प्रतिज्ञा करून हे तितके रुपये जमा करून परत फिरले आणि हरिद्वारजवळ

गंगेच्या किनाऱ्यावर प्रथम झोपड्या बांधून यांनीं गुरुकुलाच्या प्रत्यक्ष कार्यास सुरुवात केली ( १९०२ मार्च ). अगदीं नव्या पद्धतीचा अभ्यासक्रम आंखून विद्यार्थी तयार करण्याचा यांनीं उपक्रम केला. सरकार व लोक यांच्या विरोधांतून मार्ग काढून अगदीं नव्या पद्धतीची ही संस्था यांनीं यशस्वी करून दाखविली. या संस्थेच्या अनेक शाखा निघून त्याला विश्वविद्यालयाचें स्वरूप प्राप्त झाल्यावर यांनीं संन्यास घेतला ( १९१७ ). यापूर्वीच यांना महात्मा ही पदवी प्राप्त झाली होती.

रौलट ॲक्टच्या विरोधी चळवळींत भाग घेऊन दिल्ली येथें गुरखा पोलिसांनीं जमावावर बंदुका झाडण्यास सुरवात केली असतां, यांनीं पुढें होऊन त्यांना रोखलें आणि यांच्यावर बंदुका रोखल्या असतां हे निर्भयपणें त्यांच्या अनेक बंदुकांपुढें उभे राहिले. या वेळीं दिल्लीच्या जुम्मा मशिदीनें यांना आपली प्रार्थना चालविण्याचा मान दिला. हिंदूला असा मान दिल्याचें हें पहिलेंच उदाहरण आहे असें म्हणतात.

बादशाही अमलांत मुसलमान झालेल्या पण आचारविचारांनीं हिंदूच असणाऱ्या दिल्लीच्या आसपासच्या हजारों मलकाना रजपुतांना यांनीं शुद्ध करून हिंदुधर्मांत घेतलें आणि त्यांच्याशीं रजपुतांना रोटीबेटी व्यवहार करावयास लावून शुद्धीकृतांना आत्मसात् करण्याचा यशस्वी प्रयत्न केला. मलबारांत मोपल्यांनीं बंड करून हिंदूंना बाटविल्याची व अत्याचार केल्याची बातमी यांना कळतांच हे मलबारांत धांवून गेले आणि तेथें यांनीं शुद्धि, अनाथसंरक्षण वगैरे कामें केलीं.

मुसलमानी समाजावर याचा परिणाम होऊन यांना अनेक धमक्या देणारीं पत्रें आलीं आणि दिल्ली येथें आजारांतून बरे होत असतां अबदुल रशीद नांवाच्या एका मुसलमानानें यांच्या येथें चर्चा करण्याच्या निमित्तानें प्रवेश करून घेतला आणि रुग्णशय्येवर पडलेल्या या वृद्ध संन्याशाचा गोळी घालून खून केला.

यांच्या अशा प्रकारच्या या मृत्यूनें हिंदुस्थानांच्या कानाकोपऱ्यापर्यंत एक जबरदस्त धक्का बसला आणि यांच्या नांवें जागोजाग अनाथ व महिला यांच्याकरितां आश्रम निघाले व यांनीं सुरू केलेल्या कार्याला विलक्षण विधायक स्वरूप प्राप्त झालें.

**श्रीकंठय्या, बी. एम्.**—( जन्म स. १८८३-मृत्यु स. १९४६ जाने. ६ ) कर्नाटक साहित्य संमेलनाचे अध्यक्ष, कानडी भाषा व संस्कृति यांचे एकनिष्ठ उपासक व त्यागी गृहस्थ.

हे म्हैसूर राज्यांतील रहिवासी. श्रीरंगपट्टण, बंगलोर व मद्रास या ठिकाणीं यांचा विद्याभ्यास झाला. मद्रास विश्वविद्यालयाचे बी. ए., एलएल. बी. झाल्यानंतर म्हैसूरच्या 'महाराजा कॉलेज'मध्यें इंग्लिशचे लेक्चरर म्हणून यांची नेमणूक झाली ( १९०९ ). नंतर प्राध्यापक वगैरे जागांवरून चढत हे म्हैसूर विश्वविद्यालयाचे रजिस्ट्रार झाले ( १९२६-१९३० ). सेवानिवृत्त होईपर्यंत म्हैसूर राज्याच्या शिक्षण खात्यांत हे होते ( १९४१ ).

वेगळाल्या शास्त्रीय विषयावर अभ्यासपूर्वक लहान लहान कानडी पुस्तकें प्रसिद्ध करून तीं अगदीं अल्प किंमतींत वाचकांच्या हातीं देण्याची म्हैसूर विश्वविद्यालयाची लोकप्रिय प्रथा यांच्याच योजनेचें फळ होय. म्हैसूर विद्यापीठाचे उपकुलगुरु असतां यांनीं केलेल्या अशा कामामुळें तेथील दरबारनें यांना राजसेवासक्त ही पदवी दिली. यांनीं लोकांना कानडींत लिहावयास शिकविलें असें गौरवानें यांच्याबद्दल लोक बोलत.

सेवानिवृत्तीनंतर यांनीं अनेक मोह बाजूस सारून एका नवोदित शिक्षण संस्थेस आपलें आयुष्य अर्पण केलें. त्या संस्थेच्या धारवाड आर्टस् कॉलेजचे प्रिंसिपल असतां रक्तदाबाच्या विकारानें हे मृत्यु पावले.

शेक्सपीयरच्या वाङ्मयाचे अधिकारी विवेचक, आधुनिक सुटसुटीत व आकर्षक कानडीचे जनक, छन्दःशास्त्राचे पंडित, नाटककार, चिकित्सक टीकाकार वगैरे अनेक नात्यांनीं यांना मान असे. सेवानिवृत्तीनंतरच्या आपल्या वेतनाचा अर्धा भाग साहित्य परिषदेच्या कार्यासाठीं व कांहीं काळ स्वतः संपादिलेल्या 'कन्नडनुडि'च्या प्रकाशनासाठीं यांनीं अव्याहत दिला. गुलबर्ग्याच्या कर्नाटक साहित्य संमेलनाचे हे अध्यक्ष होते आणि कानडी भाषेविषयीं चाललेल्या सर्व चळवळीशीं यांचा अत्यंत निकटचा संबंध असून कर्नाटक एकीकरणाचे हे मोठे पुरस्कर्ते होते. साहित्य परिषदेंतील उत्तर-दक्षिण वाद टाळण्याची कामगिरी यांनीं बजावली.

'कन्नडद बाहुटा' या ध्वजगीताचे द्रष्टे हेच होत. अनेक भेदांच्या गलबल्यांत सांस्कृतिक ऐक्याचा यांचा संदेश कर्नाटकांत स्वागतार्ह समजला जाई.

**श्रीकृष्णसिंह**—( जन्म स. १८८८ आक्टो. २१ ) राष्ट्रसभेच्या राजवटींतील बिहारओरिसाचे मुख्य प्रधान.

मोंघीर जिल्ह्यांतील एक लहानसें गांव यांचें जन्मस्थान. जात ब्राह्मण. १९२६ मध्यें हे बॅरिस्टर होऊन आले आणि लवकरच मोंघीरचे सुप्रसिद्ध बॅरिस्टर म्हणून हे प्रसिद्धीस आले. त्यापूर्वी १९२० च्या असहकाराच्या चळवळीपासून हे राजकारणांत भाग घेऊं लागले व १९२१ मध्यें हे स्थानबद्धहि झाले होते. १९२६ सालीं हे तेथील कायदेमंडळांत निवडून आले व स्वराज्यपक्षाचें नेतृत्व यांना प्राप्त झालें. कराची राष्ट्रसभेच्या आदेशाप्रमाणें यांनी आपल्या कायदेमंडळांतील सभासदत्वाचा त्याग केला. जवाहरदिन पाळण्याबद्दल यांना १९३० सालीं अटक करण्यांत आली होती. यांना तुरुंगवास किती तरी वेळां प्राप्त झाला. बिहारच्या भूकंपांत यांनीं लोकांना कमालीचें साहाय्य केलें. जन्मतःच पुढारीपणाची देणगी असणारे हे गृहस्थ हातीं घेतलेल्या कामीं विलक्षण छाप ठेवून असतात.

**श्रीनिवासशास्त्री, व्ही. एस्.**—(जन्म स. १८६९ सप्टें. २२–मृत्यु स. १९४६ एप्रिल) पुण्याच्या भारतसेवक समाजाचे अध्यक्ष, जगप्रसिद्ध इंग्रजी वक्ते, राज्यघटनाशास्त्रज्ञ व सूक्ष्म बुद्धीचे राजकारणी मुत्सद्दी.

यांचा जन्म तामीळ ब्राह्मणाच्या घराण्यांत झाला व कुंभकोण येथें शिक्षण संपादून हे बी. ए. झाले (१८८८). देशीपरदेशी खेळांतील प्रावीण्य आणि सर्व परीक्षांत पहिला वर्ग या दोन्ही गोष्टी यांना उत्तम साधल्या. नंतर एकदोन हायस्कुलांत शिक्षकाचें काम केल्यावर १८९९सालीं त्रिप्लिकेन येथील हिंदु हायस्कुलचे हे हेडमास्तर झाले. तेथें काम करीत असतांच ना. गोखले यांच्याशीं यांचा परिचय झाला व १९०७ च्या आरंभीं हे भारतसेवक समाजाचे सभासद झाले. मद्रास विश्वविद्यालयाचे फेलो (१९१०-१९२०), मद्रास कायदेमंडळांतील सरकारनियुक्त सभासद (१९१३-१९१५), ना. गोखले यांच्या मृत्यूनंतर भारतसेवक समाजाचे अध्यक्ष म्हणून एकमतानें निवड (१९१५-१९२७), मद्रास कायदेमंडळातर्फे वरिष्ठ कायदेमंडळांत निवड व तेथें रौलट ॲक्टविरुद्ध केलेलीं भाषणें यांमुळें यांची सर्वत्र विलक्षण छाप बसली.

होमरूलची चळवळ व लखनौ करार यांत यांनीं भाग घेतला. लखनौकराराचें तर यांनीं एक लहानसें पुस्तक लिहून स्पष्टीकरण केलें. याशिवाय साम्राज्यान्तर्गत स्वराज्यावर यांनीं एक स्वतंत्र निबंधहि प्रसिद्ध केला. मॉंटफर्ड सुधारणांबाबत यांनीं अनुकूलतेचें धोरण स्वीकारून असहकारितेला यांनीं जोराचा विरोध केला. तेव्हांपासून प्रागतिक लोक राष्ट्रसभेंतून अलग झाले. तथापि अशा प्रतिकूल परिस्थितींतहि यांचें कार्य गंभीरपणें चालू होतें. कौन्सिल ऑफ स्टेटमध्यें यांनीं दडपशाहीचे अनेक कायदे रद्द करून घेण्याचा यशस्वी प्रयत्न केला.

पण यांचें नांव सर्वतोमुखी होण्यास यांची परदेशांतील कामगिरीच विशेष कारण झाली. साम्राज्यपरिषद, राष्ट्रसंघ, वसाहतींतील दौरा, वाशिंग्टनपरिषद, द. आफ्रिकेंत एजन्ट व तीनहि गोलमेजपरिषदा, यांतील यांचें काम विशेष प्रकारचें गणलें जातें.

१९३५ च्या सुधारणा कायद्यानें प्राप्त होणाऱ्या फेडरेशनला यांनीं विरोध केला. राष्ट्रसभेच्या १९४२ च्या लढ्यांत म. गांधी वगैरे लोकच राष्ट्राचे खरे प्रतिनिधि असून सरकारनें त्यांच्याशींच बोलणें केलें पाहिजे हें यांचें निपक्षपाती प्रतिपादन, भारताच्या अखंडत्वाचा यांचा पुरस्कार आणि 'महायुद्धानंतरच्या शांतता परिषदेंत म. गांधी, जवाहरलाल वगैरे न जातां चर्चिल वगैरे हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून बसलेले पाहण्याचा योग येण्यापेक्षां मरण पत्करलें' हे यांचे संतापाचे उद्गार यांच्या राष्ट्रविषयक तळमळीवर प्रकाश पाडणारे आहेत.

यांची जन्मभाषा तामीळ होती. त्या भाषेंत यांनीं आपलें आत्मचरित्र लिहिलें आहे. वेळीअवेळीं वाल्मिकीचें रामायण मूळ संस्कृतमधून वाचण्याचा यांना नाद होता. रामायणावर कांहीं लिहिण्याची यांची इच्छा होती. 'जन्मभर राजकारण करीत बसलों, पण निष्पन्न कांहींच झालें नाहीं, यापेक्षां देशांत रामायणाचा प्रचार केला असता तर मी देशाचें अधिक कल्याण करूं शकलों असतों. देशांतील लोक जर चारित्र्यसंपन्न होतील तर देशाचें कल्याण होण्यास वेळ लागणार नाहीं,' अशी यांची अखेरीस वृत्ति झाली होती.

यांचें राजकारण तत्त्वनिष्ठ होतें, त्यामुळें सर्व पक्षांत यांच्याबद्दल विशेष प्रकारचा आदर व विश्वास असे. यांच्या वक्तृत्वाची तऱ्हाहि अशीच अलौकिक होती.

हे अत्यंत सफाईदार बोलत पण आपल्या मुद्याकडे सर्वांचें लक्ष केन्द्रित करीत. योग्य वेळीं महत्त्वाचा मुद्दा निर्भयपणें मांडण्याचें कसब यांच्यांत होतें.

परंतु यापेक्षांहि परिणामकारक व प्रमाणबद्ध वक्तृत्त्वाबद्दल यांची विशेष प्रसिद्धि होती. गोखल्यांच्या जीवनावरील किंवा हिंदी नागरिकांच्या हक्कांसंबंधीं यांनीं दिलेल्या व्याख्यानांत साधेपणा व सरळपणा यांचें उत्कृष्ट मीलन आढळतें. अगदीं सावकाश परंतु आत्मविश्वासानें केलेला उपन्यास, पर्खड परंतु कोणाला न दुखवता केलेलें मतप्रतिपादन व परिणामकारक शेवट यांमुळें यांच्या सर्वसाधारण भाषणाला स्फटिकाचें पावित्र्य व स्वच्छता प्राप्त होई. यांच्या वक्तृत्वाची राजकारणी लोकांत विशेष छाप असे. एनसायक्लोपिडीया ब्रिटानिकानेंहि यांचें सर्वश्रेष्ठ हिंदी वक्ते म्हणून वर्णन केलें आहे.

यांचे ग्रंथ—( 1 ) Rights and Duties of Indian Citizen, ( 2 ) Life of Gokhale, ( 3 ) Birthright (1940), ( 4 ) Life and Times of Phirozeshah Mehta (1945).

---

# स

**सत्यमूर्ति, एस्.**—( जन्म स. १८८७ ऑग. १९—मृत्यु स. १९४३ ) मद्रास प्रांतांतील सुप्रसिद्ध काँग्रेस कार्यकर्ते व वक्ते.

पदुकोटा संस्थानांतील तिरुमयम् हें गांव यांचें जन्मस्थान. यांचे वडील डी. सुंदर शास्त्रीगल् हे वकील होते. हेहि पदुकोटाचें महाराजा कॉलेज व मद्रास लॉ कॉलेज येथें आपलें शिक्षण संपवून वकील झाले. मद्रासमधील प्रमुख वकीलांत यांची गणना होई.

तामीळनाड प्रांतांतील राजकीय चळवळीचे उत्थापक व कुशल संघटक म्हणून यांची प्रसिद्धि असे. त्यासाठीं यांनीं त्या प्रांतांतील लहानलहान खेड्यांत दौरे काढून व बारीकसारीक चळवळींतहि भाग घेऊन जागृति करण्याचा प्रयत्न केला. तामीळनाड काँग्रेस कमेटीचे हे कित्येक वर्षें अध्यक्ष असून तामीळनाड पोलिटिकल कॉन्फरन्सचें अध्यक्षस्थानहि यांना देण्यांत आलें. १९१९ व १९२५ सालीं इंग्लंडला गेलेल्या काँग्रेस शिष्टमंडळाचे हे सभासद होते.

मद्रासच्या सगुणविलाससभेशीं नट म्हणून यांचा संबंध असून यांच्या या कलाभिरुचीबद्दल मुंबईच्या हिंदी चित्रपटाच्या रौप्यमहोत्सवाचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें.

**सप्रू, नेकनामदार सर तेजबहादूर अंबिकाप्रसाद**—( जन्म स. १८७५ डिसें. ८ ) हिंदुस्थानांतील नामांकित कायदेपंडित व राज्यघटनाशास्त्रज्ञ.

अलीगड हें यांचें जन्मस्थान. मथुरा व आग्रा येथें शिक्षण संपवून हे एम्. ए., एल्एल्. बी. झाले. कांहीं दिवस मुरादाबाद येथें वकिली केल्यावर यांनीं ऑनर्स इन लॉ, डॉक्टर ऑफ लॉ वगैरे परीक्षा दिल्या व अलाहाबाद येथें अॅडव्होकेट म्हणून हे काम करूं लागले ( १८९८ ).

लवकरच उत्तम वकीलांत यांची गणना होऊं लागली आणि कलकत्ता, पाटणा, नागपूर, लाहोर, हैदराबाद वगैरे ठिकाणीं चालणाऱ्या महत्त्वाच्या खटल्यांत यांना जाण्याचा प्रसंग येऊं लागला. व्यवहारांत अत्यंत मृदु असणारे हे गृहस्थ कोर्टाच्या कामांत मोठे कठोर बनतात. यांनीं आपल्या वकिली कौशल्याला नैतिक अधिष्ठान मिळविलें असून उच्च पातळीवरून काम करण्याच्या या पद्धतीनें यांना विशेष लौकिक प्राप्त झाला.

वकिलीच्या सुरवातीपासून राजकारणांत हे भाग घेत. परंतु पक्षनिष्ठ राजकारणापेक्षां घटनात्मक राजकारणाकडे यांचें विशेष लक्ष असे. ‘ हिंदुस्थान रिव्ह्यू ’मध्यें हे सतत लिहीत व ‘ अलाहाबाद लॉ जर्नल ’चीं सूत्रेंहि यांनीं पुढें आपल्याकडे घेतलीं ( १९०४-१९१७ ). प्रान्तिक ( १९१३ ) व मध्यवर्ति ( १९१६ ) कायदेमंडळांत हे प्रथम निवडले गेले आणि हिंदुस्थान सरकारचे दोन वर्षें

हे कायदेमंत्रीहि झाले (१९२०). प्रथम राष्ट्रसभेंत कांहीं दिवस काम केल्यानंतर हे प्रागतिकपक्षांत गेले. लिबरल फेडरेशचे हे दोनदां अध्यक्षहि होते (१९२३ पुणें, १९२७). पण पुढें यांनीं प्रागतिकाशींहि संबंध सोडला (१९३१).

तीनहि गोलमेज परिषदांत यांनीं महत्त्वाचें काम केलें. जॉइंट पार्लमेंटरी कमेटींतहि यांच्या अनुभवाचा व ज्ञानाचा चांगला उपयोग झाला. साउथबरो, फ्रँचाइस वगैरे अनेक कमेट्यांचे हे सभासद होते. पुढें तर यांना प्रिव्ही कौन्सिलांतील न्यायाधीश नेमण्यांत आलें (१९३४). वेळोवेळीं पक्षातीत लोकांची संघटना करून राज्यघटना तयार करण्याच्या बाबत सरकारला व लोकांना यांनीं उत्तम मार्गदर्शन केलें आहे.

याशिवाय उर्दू व फारशी भाषांचे हे उत्कृष्ट पंडित आहेत. उर्दू भाषेच्या उद्धारार्थ यांनीं 'रूह-इ-अदब' या संस्थेची स्थापना केली. दिल्लीच्या अन्जुमान-इ-तरक्की-इ-उर्दू या संस्थेचे हे अध्यक्ष असून तिच्या इमारतीकरितां यांनीं एक निधि उभारला होता. यांच्या कायदा व राजकारणविषयक ग्रंथसंग्रहाचीहि सर्वत्र फार ख्याति आहे.

हिंदुस्थानच्या राजकारणाची प्रगति खुंटलेली पाहतांच यांनीं पक्षातीत पण घटनाशास्त्रज्ञ नेक ना. मुकुंदराव जयकर, सर एन्. गोपालस्वामी आयंगार व सर जगदीशप्रसाद यांच्या सहकार्यानें सप्रू कमेटीचा वृत्तान्त प्रसिद्ध केला. त्यांत समप्रतिनिधित्वाला मान्यता दिली असून हिंदुस्थानचे तुकडे पाडण्याला विरोध करण्यांत आला आहे. हिंदुस्थानच्या राज्यघटनेसंबंधीं अभ्यास करणाऱ्या तज्ज्ञांनासुद्धां मार्गदर्शन करण्याची शक्ति यांच्या या वृत्तान्तांत आहे. हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याकरितां चाललेल्या प्रयत्नांत यांच्या सारख्यांच्या या प्रयत्नांचें महत्त्व केव्हांच विसरतां येणार नाहीं.

**सयानी, रहिमतुल्ला एम्.**—(जन्म स. १८४७ एप्रिल ५–मृत्यु स. १९०२ जून ४) सुप्रसिद्ध काँग्रेस पुढारी.

हे एम्. ए., एलएल्. बी. झाले व यांनीं सार्वजनिक कार्यांत भाग घेण्यास सुरवात केली. कडक जातीय विरोधाला तोंड देत इंपीरियल लेजिस्लेटिव्ह असेंब्लींत एपिडेमिक डिसिझेस ॲक्ट, सिडीशस मीटिंग्ज ॲक्ट इत्यादि विषयांवर यांनीं दिलेलीं व्याख्यानें त्या वेळीं फारच गाजलीं. १८९६ च्या कलकत्ता काँग्रेसचे हे अध्यक्ष होते.

**सय्यद अहमदखान, सर**—(जन्म स. १८१७–मृत्यु स. १८९८) मुसलमान समाजाचे सुप्रसिद्ध पुढारी व अलीगढ मॉस्लेम युनिव्हर्सिटीच्या कल्पनेचे जनक.

यांचा जन्म दिल्लीस झाला. प्राथमिक शिक्षण घेतल्यावर शिरस्तेदार व मुन्सफ म्हणून यांनीं बिजनूर, गाझीपूर, अलीगढ, बनारस वगैरे ठिकाणीं कामें केल्यावर हे सेवानिवृत्त झाले (१८७६).

१८५७ सालच्या बंडांत बिजनूर येथील इंग्लिश लोकांच्या सुटकेस मदत केल्यानें यांची बऱ्याच इंग्रज लोकांशीं ओळख झाली. बंडाच्या कारणपरंपरेचा विचार करितां यांना इंग्रज व हिंदी लोक यांमधील गैरसमज दूर करण्यास शिक्षणाशिवाय दुसरा उपाय सुचेना. त्या दृष्टीनें यांनीं मुरादाबाद येथें पहिली अर्वाचीन इतिहासाचें शिक्षण देणारी शाळा उघडली. तसेंच उत्तमोत्तम इंग्रजी ग्रंथांचा उर्दू अनुवाद करणारी संस्था यांनीं गाझीपूर येथें स्थापिली. पुढें अलीगढ मॉस्लेम युनिव्हर्सिटी स्थापिल्यावर त्या संस्थेचें सायन्टिफिक सोसायटी ऑफ अलीगढ या संस्थेंत रूपान्तर करण्यांत आलें. यांच्या या कार्याचा गौरव करण्यासाठीं १८६६ सालीं त्या वेळचे गव्हर्नर जनरल लार्ड लारेन्स यांनीं सुवर्णपदक व मेकॉलेचे ग्रंथ यांना अर्पण केले.

पाश्चात्य शिक्षणपद्धतीचें अध्ययन करण्याच्या हेतूनें हे आपलीं मुलें सय्यद महमूद व सय्यद हमीद यांचेसह इंग्लंडला गेले (१८६९). तेथें असतां मुलांना पाश्चात्य शिक्षण व धार्मिक शिक्षण देणाऱ्या व राहण्याची व्यवस्था असलेल्या संस्थेची कल्पना यांच्या मनांत आली आणि हिंदुस्थानांत येतांच मॉहमेडन अँग्लो-ओरिएंटल कॉलेज फंडाला यांनीं सुरवात केली (१८७२). सर विल्यम मूर यांच्या हस्तें या संस्थेच्या शाळेस सुरवात झाली. लवकरच कॉलेजहि उघडलें (१८७७). पुढें या संस्थेस व्यापक स्वरूप देण्याचा प्रयत्न झाला आणि माहमेडन एज्युकेशनल कॉन्फरन्सच्या स्थापनेनें या कार्यास जोर चढला व पुढें तेथेंच अलीगढ मॉस्लेम युनिव्हर्सिटी स्थापन झाली (१९२०).

याशिवाय मुसलमान समाजांतील श्रेष्ठ समाजसुधारक,

उर्दूतील उत्कृष्ट लेखक व वक्ते अशी यांची प्रसिद्धि होती. स्वतःला इंग्रजी येत नसतांहि आपल्या धर्मबांधवांना जागतिक ज्ञानाचे दरवाजे खुले करणारा महात्मा ही यांची खरी भूमिका आहे.

राष्ट्रसभेच्या स्थापनेच्या वेळीं यांनीं तिला विरोध करून आपल्या बांधवांना तीमध्यें जाण्यास विरोध केला. तथापि यांचाहि शेवटीं ब्रिटिशांवरील विश्वास डळमळला. सध्यांच्या हिंदुमुसलमान प्रश्नाचें जनकत्व यांच्याकडे जातें. यांचे उर्दू ग्रंथ अत्यंत लोकप्रिय असून त्यांचीं अनेक युरोपीय भाषांत भाषान्तरें झालीं आहेत.

यांचे ग्रंथ—उर्दू-( 1 ) असर-इ-सनदीद, ( 2 ) An Inquiry into the Causes of Indian Revolt, ( 3 ) Commentary on Bible and Essays on Islam, ( 4 ) Life of the Prophet Mahomed, ( 5 ) Essays on Life of Mahomed इत्यादि.

पत्रें—तहझीबुल अखलाक् ( सामाजिक सुधारक ).

**सरकार, नलिनीरंजन**—( जन्म स. १८८८ ) बंगालमधील सुप्रसिद्ध सार्वजनिक कार्यकर्ते.

१९०६ सालीं यांनीं आपलें अध्ययन सोडलें व स्वदेशीच्या चळवळींत व नॅशनल कौन्सिल ऑफ एज्युकेशनमध्यें यांनीं भाग घेण्यास सुरवात केली. यानंतर हिंदुस्थान को-ऑपरेटिव्ह इन्शुरन्स कं.त हे शिरले व लवकरच हे तिचे मॅनेजर झाले. इंडियन सेन्ट्रल बँकिंग इन्कायरी कमेटीचे व फेडरेशन ऑफ इंडियन चेंबर ऑफ कॉमर्सचें ( १९३३ ) हे अध्यक्ष होते. १९३५ सालच्या बंगाल सरकारचे हे अर्थमंत्री असून व्हाइसरॉयच्या कार्यकारी मंडळाचेहि हे सभासद होते. गांधींच्या उपवास-प्रकरणीं यांनीं या जागेचा राजीनामा दिला.

दासांच्या स्वराज्यपार्टीचे हे व्हिप असून ( १९२३ ) बंगाल नॅशनल चेंबरचेहि हे दोनदां अध्यक्ष होते ( १९३२-३३ ).

**सरकार, भूपेंद्रनाथ**—( जन्म स. १८९० सुमार ) कलकत्याच्या 'न्यू थिएटर्स' या सुप्रसिद्ध चित्रपटसंस्थेचे चालक.

हिंदी चित्रपटसृष्टीचा उदय महाराष्ट्रांत झाला असला तरी त्या व्यवसायशाखेंत बंगालनें जें कार्य केलें त्याचें प्रातिनिधिक स्वरूप यांच्या 'न्यू थिएटर्स'मध्यें पाहावयास मिळतें. नव्या कल्पना, नवे विचार, नवे लोक यांच्या साहाय्यानें यांनीं त्या संस्थेस जो दर्जा आणून दिला त्यामुळें कांहीं काळ हिंदी चित्रपटसृष्टीच्या नेतृत्वाचा मान तिजकडे सहजच आला.

या दृष्टीनें न्यू थिएटर्सनें ठेवलेल्या व्यापक धोरणांस विशेष महत्त्व आहे. पाश्चात्य धर्तीवर टीमवर्कची योजना न्यू थिएटर्सनें प्रथमच हिंदुस्थानांत सुरू केली. कोणत्याहि चित्रपटाच्या अंगोपांगांवर एकच मनुष्य नजर ठेवूं शकत नाहीं. अशा स्थितींत एकाच तंत्रविशारदावर सर्व चित्रपटाची जबाबदारी सोंपविण्यापेक्षां निरनिराळ्या तज्ज्ञांच्या सहकार्यानें काम केल्यास चित्रपटांतील नीटनेटकेपणा वाढतो हें यांचें तत्त्व यशस्वी ठरलें. चित्रपटांतील समाधानकारकता तर यामुळें वाढलीच, परंतु त्याबरोबरच तंत्रविशारद व त्यांचें तंत्र यांत सुधारणा होण्यास मदत झाली.

या दृष्टीनें चित्रपटसंगीतांत न्यू थिएटर्सनें केलेल्या प्रगतीचें श्रेय रायचंद बोराल व पंकज मलीक या दोन संगीतविशारदांस द्यावें लागेल. संगीत हें चित्रपटाचें एक अंग बनलें पाहिजे, चित्रपटाची परिणामकारकता वाढविण्याच्या दृष्टीनें त्याचा उपयोग झाला पाहिजे, अशा कल्पनेनें रायचंद बोराल यांनीं देवकी बोस यांच्या पूरणभक्त या चित्रपटांत आपल्या नव्या संगीताचा व पार्श्वसंगीताचा उपयोग केला. त्यांत पूर्व हिंदुस्थानांतील खानदानी संगीत व बंगालमधील वैष्णवपंथीय संगीत यांचें मीलन करण्यांत आलें. पुढें पंकज मलीक यांनीं या मिश्रणांत परदेशी संगीताचाहि अंतर्भाव केला. हा प्रयत्न इतका यशस्वी ठरला कीं हिंदुस्थानांतील प्रत्येक ठिकाणीं या पद्धतीचें अनुकरण झालें. फार काय महाराष्ट्रांतमुद्धां श्री. केशवराव भोळे यांनीं खानदानी संगीत व लोकगीतें यांचें मिश्रण करून महाराष्ट्रीय संगीताची रचना केली.

पहिल्या दर्जाचीं माणसें निवडण्यावर यांचा कटाक्ष असे. देवकी बोस, नीतिन बोस, बारुआ, हेमचंद्र यांसारखे दिग्दर्शक, मुकुल बोस, तिमिर बरन, युसुफ मूळजी यांसारखे तंत्रविशारद, नझरुल इस्लाम, शरच्चंद्र चतर्जी, अर्झु लखनवी यांसारखे लेखक अशा त्या त्या क्षेत्रांतील अघाडीवरील व्यक्तींची यांनीं निवड केली व काननबाला, सैगल, उमा शशी, जमुना, पृथ्वीराज अशा कलावंतांच्या सहकार्यानें पूरणभक्त, चंडीदास, देवदास, धूपछाव, प्रेसिडेंट, मुक्ती, विद्यापति, अधिकार,

बडी दीदी, डॉक्टर, काशीनाथ यांसारख्या पहिल्या दर्जाच्या चित्रपटांची निर्मिती केली.

**सरकार, डॉ. महेंद्रलाल**—( जन्म स. १८३३ नवं. २–मृत्यु स. १९०४ फेब्रु. २३ ) बंगालमधील सुप्रसिद्ध डॉक्टर व संशोधक.

बंगालमधील पकिपारा हें गांव यांचें जन्मस्थान. १८६३ सालीं हे एम्. डी.ची परीक्षा पास झाले व होमिओपाथीकडे यांचें लक्ष वेधलें. याच औषधपद्धतीचे प्रचारार्थ यांनीं Calcutta Journal of Medicine सुरू केलें ( १८६८ ).

परंतु यापेक्षांहि इंडियन असोसिएशन फॉर दि कल्टिव्हेशन ऑफ सायन्स या आतां जगप्रसिद्ध झालेल्या संस्थेची स्थापना हें यांचें प्रमुख कार्य होय. शास्त्रीय अध्ययनाच्या हेतूनें स्थापन झालेली ही हिंदुस्थानांतील पहिली संस्था होय. यांच्या मृत्यूनंतरहि ही संस्था यांचे चिरंजीव अमृतलाल सरकार यांनीं चालविली व केवळ तीमुळें चंद्रशेखर रामन यांना आपलें रामन इफेक्टचें संशोधन पुरें करतां आलें.

**सरकार, सर जदुनाथ**—( जन्म स. १८७० डिसें. १० ) बंगालमधील सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक व लेखक.

सुप्रसिद्ध व धनाढ्य घराण्यांत यांचा जन्म झाला. कलकत्त्याच्या प्रेसिडेन्सी कॉलेजांतून हे एम्. ए. झाले व बनारस हिंदु विश्वविद्यालयांत यांनीं मॉडर्न इंडियन हिस्टरीच्या प्राध्यापकाचें काम करण्यास सुरवात केली ( १९१७ ). यानंतर इंडियन एज्युकेशनल सर्व्हिस, पाटणा युनिव्हर्सिटी, कलकत्ता युनिव्हर्सिटी ( उपकुलगुरु १९२६-२८ ) अशा अनेक ठिकाणीं कामें केल्यानंतर हे निवृत्त झाले.

एम्. ए.च्या परीक्षेच्या वेळीं यांना मिळालेल्या प्रेमचंद रायचंद शिष्यवृत्तींतील अटींप्रमाणें यांनीं इतिहासाच्या अध्ययनास सुरवात केली व पुढें हाच विषय यांचा जीवितसर्वस्व झाला. त्यासाठीं हे फारसी, लॅटिन, संस्कृत इत्यादि अनेक भाषा शिकले. मोंगल इतिहासावरील व त्यांतहि औरंगजेबाच्या कारकीर्दीचा यांचा अभ्यास विशेष प्रसिद्ध असून औरंगजेबाचें पांच खंडांत असलेलें एक विस्तृत चरित्रहि यांनीं लिहिलें आहे. इतिहासांतील एकेका विषयाचीं जास्तींत जास्त साधनें शोधून व तपासून ग्रथित करण्याची एक नवी पद्धति यांच्या या ग्रंथानें हिंदुस्थानांतील संशोधकांत सुरू केली.

औरंगजेब व शिवाजी यांच्या विशेष अभ्यासामुळें यांचें मराठींतील ऐतिहासिक अस्सल साहित्याकडे लक्ष वेधलें व हे त्याकरितां मराठी भाषासुद्धां शिकले. पेशवे दप्तरांचें संशोधन होण्यास रियासतकार सरदेसाईंना यांनीं केलेल्या मदतीमुळें यांचें नांव महाराष्ट्रांत विशेष परिचित झालें. उर्दूप्रमाणेंच मोडींतहि कांहीं अक्षरें सारखीं दिसतात, तो घोटाळा नाहींसा करण्याचें काम यांनी केलें.

यांची काम करण्याची व लिहिण्याची पद्धत मोठी व्यवस्थित असते. बारीक व वळणदार अक्षर, प्रत्येक पानाखालीं आधार, बाजूच्या कोऱ्या जागेंत त्या परिच्छेदाचा विषय, महत्त्वाच्या मजकुराखालीं लाल पेन्सिलच्या खुणा व प्रारंभीं अनुक्रमणिका इतक्या पाश्चात्य संशोधकांना साजेशा कार्यपद्धतीनें यांचें संशोधनाचें काम चालविलें जातें.

इंग्लंडच्या रॉयल एशियाटिक सोसायटीचे व इंडियन हिस्टॉरिकल रेकॉर्ड्स कमिशनचें सभासदत्व, कॅम्बेल गोल्ड मेडल, लंडनच्या रॉयल एशियाटिक सोसायटीचे फेलो, वंगीय साहित्यपरिषदेचे अध्यक्ष इत्यादि मानहि यांना मिळाले.

यांचे ग्रंथ—( 1 ) India of Aurangzeb, ( 2 ) Statistics, Topography and Roads, ( 3 ) History of Aurangzeb ( ५ खंड ), ( 4 ) Shivaji and His Times, (5) Mughul Administration, ( 6 ) Studies in Mughal India, ( 7 ) Anecdotes of Aurangzeb, ( 8 ) Chaitanya : His Life and Teachings, ( 9 ) Economics of British India, (10) India Through the Ages, ( 11 ) Fall of the Moghul Empire ( २ खंड ), ( 12 ) डब्ल्यू. आयर्विनच्या Later Mughals च्या दोन खंडांचें संपादन.

**सरदेसाई, रा. ब. गोविंद सखाराम**—( जन्म स. १८६५ ) इतिहासाचे सुप्रसिद्ध अभ्यासक, संशोधक व लेखक.

सुप्रसिद्ध मावळंकर सरदेसाई घराण्यांत यांचा जन्म झाला. प्राथमिक शिक्षण शिपोशीस झाल्यावर रत्नागिरी, पुणें व मुंबई येथें शिक्षण घेऊन हे बी. ए. झाले

( १८८८ ). बडोदें येथें श्रीमंत सयाजीराव गायकवाड यांचे वाचक व फत्तेसिंगराव गायकवाड यांचे शिक्षक म्हणून काम करीत असतां यांना युरोपच्या पांच सफरी घडल्या. यांनीं शिकविण्याकरितां केलेल्या टिपणांतून यांच्या रियासती जन्मास आल्या. यांच्या सदतीस वर्षांच्या नोकरींत हे पंचवीस वर्षे मास्तर होते. नवीं जुनीं साधनें लक्षांत घेऊन मराठ्यांचा इतिहास पद्धतशीरपणें लिहिण्याचा यांनीं प्रथम मोठ्या प्रमाणावर प्रयत्न केला. यांच्या लिखाणामुळेंच मराठ्यांच्या इतिहासाचा भव्यपणा महाराष्ट्रीयांच्या सुद्धां लक्षांत आला.

पेशवेदप्तराचें काम संपल्यावर सातारकरांनी यांचा सन्मान करून छत्रपतींच्या हस्तें यांना साडेतीन वस्त्रें व चांदीचें तबक अर्पण केलें ( १९३४ ). तसेंच राजवाडे संशोधनमंडळ, धुळें या संस्थेनें इतिहासमार्तंड ही पदवी व मानपत्र देऊन यांचा गौरव केला ( १९४५ ).

यांचें वाङ्मय—ऐतिहासिक साधनें, मराठी–१-४५ खंड, पेशवेदप्तर, महादर्जी शिंदे यांचीं कागदपत्रें, इंग्रजी–१-६ रेसिडेन्सी रेकार्ड्स्, इतिहास–१-८ मराठी रियासत, मुसलमानी रियासत २ खंड, ब्रिटिश रियासत २ खंड. चरित्रें–शहाजी, शिवाजी, संभाजी, राजाराम, वगैरे; इंग्रजी–पाटणा युनिव्हर्सिटींतील व्याख्यानें, नागपूर युनिव्हर्सिटींतील व्याख्यानें ( अव्वल मराठेशाहीचें अन्तःस्वरूप ), याशिवाय शालोपयोगी भारतवर्ष वगैरे.

**सरैया, शेठ चुनीलाल**—( जन्म स. ? – मृत्यु स. १९१३ नवं. २९ ) मुंबईच्या स्पीसी बँकेचे आधारस्तंभ, बँकेच्या धंद्याचे प्रवर्तक व जगांतील सर्व चांदी खरेदी करणारे धाडसी व्यापारी.

हे एल्. एम्. ॲन्ड एस्.च्या परीक्षेंत पहिल्या क्रमाङ्कांत उत्तीर्ण होऊन बँकेच्या धंद्यांत पडले आणि तेथेंहि जगांतील सर्व चांदी खरेदी करून सरकारलाहि आपल्याकडून चांदी घेणें यांनीं भाग पाडलें. असे हे धाडसी गृहस्थ वांद्रें येथें एकाएकीं मृत्यु पावले.

**सलाउद्दीन खुदाबक्ष**—( जन्म स. १८७५– मृत्यु स. १९३१ ) इस्लामी वाङ्मयाचे सुप्रसिद्ध अभ्यासक व शिक्षणतज्ज्ञ.

हे बिहारमध्यें राहत. यांना इंग्लिश, जर्मन, अरबी, फारशी व हिन्दी भाषा उत्कृष्ट येत. कलकत्ता विश्वविद्यालयांत सभासद व प्राध्यापक म्हणून यांनीं महत्त्वाची कामगिरी केली. जर्मन भाषेंतील अरबी संस्कृतीवरील ग्रंथांचीं यांनीं केलेलीं इंग्रजी भाषान्तरें विशेष मान्यता पावलीं आहेत. तसेंच यांचें स्वतंत्र लेखनहि बरेंच आहे. मुसलमान लोकांत असलेल्या अनेक रूढि विचारावर उभारलेल्या नसून गतानुगतिकत्वावर उभारल्या आहेत असें यांचें मत होतें. हिंदुमुसलमानांचे संबंध अलगपणाचे नाहींत असें हे प्रतिपादीत. यांनीं एका इंग्लिश बाईशीं लग्न केलें होतें.

यांचे ग्रंथ—( 1 ) Essays-Indian and Islamic, ( 2 ) Studies-Indian and Islamic, ( 3 ) Contribution to the History of Islamic Civilization ( १९३०, कलकत्ता युनिव्हर्सिटी ).

**सहजानंद सरस्वती**—( जन्म स. १८८९ ) बिहार प्रान्तांतील कुशल शेतकरी संघटक व सार्वजनिक कार्यकर्ते.

मूळ नांव नौरंगराय बेनीराय. जात भूमिहार ब्राह्मण. गांव देवा (जि. गाजीपूर, बुन्देलखंड). गाजीपूरला जाऊन मॅट्रिकपर्यंत शिक्षण घेतलें व काशीस जाऊन संन्यास घेतला व व्याकरण मीमांसादिकांचें अध्ययन केलें. भूमिहार ब्राह्मणांच्या महासभेंत यांच्या वक्तृत्वाला आरंभ झाला व यांनीं भूमिहारपरिचय व ब्रह्मर्षिवंशविस्तार हे ग्रंथ लिहून प्रसिद्ध केले. पण आपणच फक्त खरे ब्राह्मण असें समजणारे सरयुपारीण व कान्यकुब्ज ब्राह्मणांनीं त्यावर आक्षेप घेण्यास सुरवात केली. ही चळवळ यांना पांच वर्षे पुरली. नंतर हे असहकारितेच्या चळवळींत पडले व यांनीं तुरुंगवास भोगला. पण १९२७ पासून यांना राष्ट्रसभेची चळवळ अपुरी वाटूं लागली व हे शेतकऱ्यांच्या संघटनेच्या मार्गाला लागले. १९३४ पासून हे राष्ट्रसभेंतून अलग झाले. पण राष्ट्रसभेलासुद्धां यांच्या शेतकऱ्यांच्या मागण्यांना मान्यता द्यावी लागली. शेतकऱ्यांची यांनीं जबरदस्त संघटना केली खरी, पण काँग्रेसविरोधामुळें यांच्या कार्याबद्दल लोकांत संशय उत्पन्न झाला.

**सहानी, डॉ. बिरबल रुचिराम**—( जन्म स. १८९१ नवं. १४ ) पंजाबमधील सुप्रसिद्ध वनस्पतिशास्त्रज्ञ.

लाहोरचें गव्हर्नमेंट कॉलेज व केम्ब्रिज येथें आपलें शिक्षण संपवून हे लखनौ युनिव्हर्सिटींत वनस्पतिशास्त्राचे प्राध्यापक झाले. लखनौ युनिव्हर्सिटीच्या फॅकल्टी ऑफ सायन्सचे हे कित्येक वर्षे डीन आहेत.

हिंदुस्थानांतील प्रमुख वनस्पतिशास्त्रज्ञांत यांची गणना होत असून पॅरिसच्या नॅचरल हिस्टरी सोसायटीच्या

तिसऱ्या दशवार्षिक समारंभाला हे हिंदुस्थानचे प्रतिनिधि म्हणून हजर राहिले होते ( १९३५ ). १९३७-३८ या काळांत हे नॅशनल ॲकेडेमी ऑफ सायन्सेसचे अध्यक्ष होते. लंडनच्या रॉयल सोसायटीचे फेलो होण्याचाहि मान यांना मिळाला ( १९३६ ).

फॉसिल बॉटनीचे हे विशेष तज्ज्ञ आहेत. केम्ब्रिज व ॲमस्टरडॅम येथील त्या विषयाच्या जागतिक परिषदांचे हे उपाध्यक्ष होते. हिंदुस्थानांतील अनेक ठिकाणच्या अवशेषभूत व अश्मीभूत वनस्पति नि दक्षिण देशांतील खडकांचें वय इत्यादि यांचें संशोधन प्रसिद्ध आहे.

यांचे ग्रंथ—( 1 ) Recent Advances in Indian Paleobotany, ( 2 ) Text Book of Botany ( प्रा. लोसन यांचे सहकार्यानें ).

**सहा, मेघनाद्**—( जन्म स. १८९३ ) जगप्रसिद्ध हिंदी विज्ञानाचार्य व संशोधक.

जन्मस्थान बंगाल्यांतील डाक्का जिल्ह्यांतील सिओराताली हें गांव. आरंभापासून लोकाश्रयावर व शिष्यवृत्ति मिळवून विशेष गुण मिळवीत हे एम्. एस्सी. झाले. जगदीशचंद्र बोस व प्रफुल्लचंद्र रे हे दोघे यांचे तेव्हां गुरु होते. यांनीं 'सापेक्षतेच्या द्वारा विद्युत्प्रक्रिया सिद्धान्ताची मांडणी' व 'विकिरणदाबाचें मापन' या विषयांवर निबंध लिहून डॉक्टर पदवी मिळविली. दहा हजार रुपयांचें प्रेमचंद रायचंद बक्षिस व शिष्यवृत्ति मिळवून हे इंग्लंडला गेले ( १९२१ सप्टें. ). तेथें फाउलरच्या शाळेंत संशोधन करून 'तारकांच्या किरणचित्रांचा वास्तव सिद्धान्त' हा अद्वितीय लेख लिहिला ( १९२२ जाने. ).

या वेळीं यांच्या नाक्षत्र भौतिकांतील संशोधनामुळें शास्त्रज्ञांत एकच खळबळ उडाली. बर्लिन, म्युनिच व केम्ब्रिज येथील शास्त्रज्ञांनीं यांच्या या कार्याबद्दल प्रशंसा केली व कांहीं ठिकाणीं तर यांना व्याख्यानाकरितां बोलावण्यांत आलें. वयाच्या अवघ्या तेहेतिसाव्या वर्षी इंग्लंडच्या रॉयल सोसायटीचे यांना सभासद निवडण्यांत आलें ( १९२६ ). त्या वेळीं हे हिंदुस्थानांत हा मान मिळालेले चवथे शास्त्रज्ञ होते. रामानुजम व्यतिरिक्त इतक्या अल्पवयांत हा मान मिळालेले हिंदुस्थानांतील हे पहिलेच शास्त्रज्ञ होत. परत आल्यावर एक वर्ष कलकत्ता विश्वविद्यालयांत काम केल्यावर अलाहाबाद विश्वविद्यालयांत यांना वास्तवाचार्याची जागा देण्यांत आली. संयुक्त प्रान्तानें सरकार यांना दरसाल पांच हजार रु. संशोधनार्थ देतें. यांनीं शास्त्रीय ज्ञानाच्या प्रसारार्थ 'यू. पी. ॲकेडमी ऑफ सायन्सेस'ची स्थापना केली ( १९३१ ).

यांनीं १९१७ सालीं संशोधनास सुरवात करून विद्युत्सिद्धान्ताबाबत कार्य केलें. नंतर चक्रवर्तिबरोबर 'प्रकाशाच्या दाबा'संबंधीं प्रयोग केले ( १९१८ ). यांचा महत्त्वाचा शोध 'Thermal Ionization of Stars' म्हणून सुप्रसिद्ध आहे. एकंदर ब्याण्णव मूलतत्त्वें असतांना सूर्यांत फक्त सत्तावन मूलतत्त्वांचाच शोध लागला आहे. तेव्हां बाकीचीं तत्त्वें सूर्यांत नाहींत का? असा प्रश्न उपस्थित होतो. यांच्या सिद्धान्ताप्रमाणें सूर्याचा तापक्रम फार असल्यानें या मूळ तत्त्वांचें विदलन होतें. म्हणून त्यांचें रेखाचित्र किंवा वर्णाली 'अल्ट्रा व्हायलेट' भागांत येते. पण या किरणांचें शोषण वायूंत होत असल्यानें हीं तत्त्वें सूर्यांत नाहींत असा आपला गैरसमज होतो. यांनीं परमाणूंची रचना, किरणोत्सर्गी विघटन यांवर संशोधन केलें असून त्यांच्या 'लवणांचे भिन्न रंग व त्यांची उपपत्ति' हा महत्त्वाचा शोध १९३१ सालीं प्रसिद्ध झाला. १९४४ सालीं इंग्लंड वगैरे देशांत कांहीं हिन्दी शास्त्रज्ञ पाठविले त्यांत हे होते. तसें रशियांत ज्युबिलीनिमित्त यांना बोलाविलें तेव्हां हे तिकडे गेले ( १९४५ जून ).

यांचे महत्त्वाचे निबंध—(1) Theory of Thermal Ionisation of Gases, (2) Theory of Selective Radiation Pressure.

यांचे ग्रंथ—( 1 ) Principles of Relativity, ( 2 ) Six Lectures on Atomic Physics, ( 3 ) Treatise on Heat, ( 4 ) Treatise on Modern Physics ( सहकार्यानें ) इत्यादि.

**सातवळेकर, श्रीपाद दामोदर**—( जन्म स. १८७२ ) वेदांचे अभ्यासक, प्रकाशक, प्रचारक तसेंच हिन्दी-मराठी लेखक, वक्ते व चित्रकार.

यांचा जन्म सावंतवाडीजवळील खेड्यांत कऱ्हाडे ब्राह्मणाचे कुलांत झाला. यांनीं घरींच वेदशास्त्राचें शिक्षण घेतलें. प्रथम निजाम हैदराबादेस फोटोग्राफर व चित्रकार म्हणून गेले. तेथें सार्वजनिक कार्यांत भाग घेत असतां हद्दपार होण्याचा योग दिसतांच हे कांगडी गुरुकुलांत चित्रकलेचे शिक्षक म्हणून गेले. तेथें असतां 'वैदिक धर्माची तेजस्विता' या यांच्या विश्ववृत्त मासिकांतील लेखावरून यांना एक वर्ष कारावास भोगावा लागला

( १९१० ). नंतर हे लाहोर येथें कांहीं वर्षे काढून महाराष्ट्रांत औंध येथें येऊन स्थायिक झाले. वेदांच्या सूक्ष्म अध्ययनामुळें आणि मार्मिक वक्तृत्वामुळें यांच्याकडे आर्यसमाजाचें विशेष लक्ष वेधत असलें तरी यांचा स्वतंत्रपणा त्यांना झेंपत नाहीं. पुरुषार्थ ( मराठी ), वैदिक धर्म ( हिन्दी ), हीं मासिकें, भगवद्गीतेवरील पुरुषार्थ बोधिनी, दैवत संहिता, अथर्ववेदाचें हिन्दी भाषान्तर वगैरे यांचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत.

वेदांप्रमाणेंच रामायण व महाभारत या सांस्कृतिक ग्रंथांवरहि यांचा भर असून यांचें लेखन ध्येयप्रधान असतें.

**सालरजंग, सर**—( जन्म स. १८२९ जाने. २–मृत्यु स. १८८३ फेब्रु. ८ ) हैदराबाद संस्थानचे सुप्रसिद्ध दिवाण.

यांचें नांव मीर तुरब अलीखान. आपले काका सिराज-उल्मुल्क यांच्यानंतर हे हैदराबाद संस्थानच्या दिवाण-पदावर आले व १८५७ सालच्या बंडापासून हैदराबादला अलग राखण्यासाठीं केलेल्या पद्धतशीर कार्यामुळें यांनीं सर्वांचें लक्ष आपणाकडे वेधून घेतलें.

या कार्यामुळें निर्माण झालेल्या संस्थानांतील असंतोषानें यांचे अनेक वेळा खुनाचे प्रयत्न झाले; परंतु पुढें हैदराबाद संस्थानामध्यें यांनीं केलेल्या सर्वांगीण सुधारणांमुळें यांना अपार लोकप्रियतेचा लाभ झाला. जमाबंदीची व्यवस्था, सेंट्रल ट्रेझरीची स्थापना, त्या त्या खात्याच्या प्रधानाला मदत करण्यासाठीं चार मौन-उल-महानची योजना, पोलीस खात्याची पुनर्घटना, शिक्षणखात्याची सुधारणा, हैदराबाद-वाडी रेल्वेची स्थापना अशा एकापेक्षां एक सरस सुधारणांनीं यांचें नांव सर्वतोमुखी झालें. १८६९ सालीं तीन वर्षे वयाचे मेहबूब अलीखान निझाम झाल्यानंतर हेच त्या संस्थानचे प्रमुख रीजंट बनले.

निजामला वऱ्हाड मिळवून देण्यासाठीं यांनीं केलेलें कार्यहि महत्त्वाचें आहे. हे दिवाण होण्यापूर्वी दोनच आठवडे आधीं खंडणीसाठीं तो प्रांत निजामनें इंग्रज सरकारला लिहून दिला. यांनीं तितकें व्याज येणारी बारा कोटी रुपयांची रक्कम सरकारच्या स्वाधीन करून तो प्रांत परत मिळवण्याचा प्रयत्न केला. परंतु निजाम अज्ञानावस्थेंत आहे तोंपर्यंत या प्रश्नाचा निकाल लावण्याचें त्या वेळचे व्हाइसरॉय लॉर्ड लिटन यांनीं नाकारलें. पुढें यांच्या मृत्यूनंतर तो प्रांत निजामच्या स्वाधीन करण्यांत आला.

त्या वेळीं उत्तम पोषाख करणारांत यांची गणना होई. यांची वागण्याची पद्धतीहि दरबारी थाटाची असे. याचकारणानें यांनीं केलेल्या युरोपच्या प्रवासांत यांचें सर्वत्र प्रचंड प्रमाणांत स्वागत करण्यांत आलें.

हे कॉलऱ्यानें मरण पावले. परंतु यांना विषप्रयोग झाला अशी त्या वेळीं सर्वत्र समजून होती.

**सावंतवाडीकर, महाराज बापुसाहेब सावंत**—( जन्म स. १८९७–मृत्यु स. १९३७; कारकीर्द स. १९२४ आक्टो. २९–१९३७ ) सावंतवाडीचे सुप्रसिद्ध चारित्र्यसंपन्न व सुविद्य महाराज.

यांचें शिक्षण पुण्याजवळ खडकी येथें एका युरोपियन स्त्रीजवळ व कोल्हापुरांत ले. जे. सी. टेट यांजपाशीं झालें. १९१२ सालीं हे पुढील शिक्षणाकरितां इंग्लंडला गेले. १९१७ सालीं केम्ब्रिज येथील 'ऑफिसर्स कॅडेट बॅटेलियन ट्रेनिंग स्कूल'मधील शिक्षण संपवून सेकंड लेफ्टनंटच्या हुद्यावर हे मेसापोटेमियांत गेले. तेथील युद्धांत काम करून परत आल्यावर यांचा विवाह बडोद्याचे महाराज सयाजीराव गायकवाड यांची नात लक्ष्मीदेवी यांच्याशीं झाला. यांचा कारभार अत्यंत लोकप्रिय झाला. नीतिमत्ता, धर्मनिष्ठा व स्वदेशप्रीति हे यांचे मुख्य गुण होत. यांच्या राज्याला म. गांधींनीं रामराज्याची उपमा दिली.

**सावरकर, विनायक दामोदर**—( जन्म स. १८८३ मे २८ ) सुप्रसिद्ध क्रान्तिकारक, प्रभावी वक्ते, हिंदुसभेचे पुरस्कर्ते व सार्वजनिक कार्यकर्ते.

जात चित्पावन ब्राह्मण. यांचें जन्मस्थान नाशिक जवळचें भगूर. तेथें यांनीं प्राथमिक व नाशिक येथें मॅट्रिकपर्यंतचें शिक्षण घेतलें. श्वशुर रामचंद्र त्र्यंबक चिपळुणकर यांच्या मदतीनें पुण्याच्या फर्ग्युसन कॉलेजांतून हे बी. ए. झाले ( १९०५ ). नंतर मुंबईस एलएल. बी. चा अभ्यास करीत असतां श्यामजी कृष्णवर्मा यांच्या शिष्यवृत्तीनें हे इंग्लंडला गेले ( १९०६ जून ). तेथें इंडिया हाउसमध्यें राहून हे कायद्याचा अभ्यास करीत. तेथें सत्तावन सालच्या स्वातंत्र्य-युद्धाचा वाढदिवस, शिवाजीउत्सव वगैरेंत हे पुढाकार घेत. कर्झन वायलीचा खून करणाऱ्या मदनलाल धिंग्राच्या निषेधाला विरोध करण्यानें हे क्रान्तिकारक म्हणून तिकडे विख्यात झाले. त्यामुळें यांना बार-ॲट-लॉची डिग्री नाकारण्यांत आली.

इकडे यांचे ज्येष्ठ बंधु गणेशपंत तथा बाबा यांना अभिनव भारतच्या मित्र मेळ्याच्या पद्यावलीवरून जन्मठेपेची शिक्षा झाली (१९०९). पुढें नाशिक येथें जॅक्सनचा खून झाला ( १९०९ डिसें. २१ ). त्यानंतर हे पॅरिसहून लंडन येथें आले असतां यांना स्टेशनवर अटक करण्यांत आली ( १९१० मार्च १३ ). नंतर यांना हिंदुस्थानांत रवाना करण्यांत आलें ( १९१० जुलै १ ). कांहीं दिवस प्रवास झाल्यानंतर मार्सेलिस बंदरांत बोट आली ( १९१० जुलै ८ ) आणि यांनीं संडासाच्या पोर्टहोलमधून उडी झोकली आणि पोहत जाऊन फ्रान्सचा किनारा गांठला. हे पळत ' गार्डी गार्डा ' म्हणून ओरडत असतां फ्रेंच पोलिसांनीं यांना पकडलें व पाठलाग करीत आलेल्या हिंदी पोलिसांच्या स्वाधीन केलें. नंतर हे मुंबईस ( २२-७-१० ) व तेथून नाशिकला येऊन पोंचले.

फ्रेंच सरकारच्या आश्रयार्थ गेलेल्या यांना फ्रेंचांच्या ताब्यांत देण्याचा प्रश्न हेगच्या आन्तरराष्ट्रीय न्यायकोर्टाकडे सोंपविण्यांत आला; पण तेथें यांना फ्रेंचांच्या ताब्यांत देऊं नये असा निर्णय लागला. तो निकाल हातीं येण्यापूर्वीच जक्सन खून कटाला पिस्तूल पुरविणारे व मदत करणारे म्हणून यांच्यावर खटले चालून यांना वेगवेगळ्या भोगावयाच्या दोन जन्मठेपीच्या शिक्षा देण्यांत आल्या व यांची व यांच्या सासऱ्याची मिळकत जप्त करण्यांत आली.

नंतर यांना डोंगरी, भायखळा, ठाणें व मद्रास अशा क्रमानें अंदमानला नेण्यांत आलें. अंदमानमधील आपल्या चवदा वर्षांच्या तुरुंगवासाची रोमांचकारी हकीगत यांनीं आपल्या 'जन्मठेप' या पुस्तकांत एखाद्या कादंबरीप्रमाणें नमूद केली आहे. तें पुस्तक जप्त झालें होतें. पुढें ते जप्तींतून मुक्त झालें. हिंदुस्थानांत तीन वर्षे अलीपूर व रत्नागिरी या ठिकाणीं काढल्यावर यांना येरवड्याहून रत्नागिरी येथें स्थानबद्ध करून ठेवण्यांत आलें ( १९२४ जाने. ६ ). तेथें असतां यांनीं विपुल लेखन केलें. अस्पृश्यतानिवारणाकरितां सहभोजन, पतितपावनमंदिरस्थापना वगैरे कामें करून यांनीं हिंदुसभेच्या कार्याला नवें वळण देण्याचा प्रयत्न केला आणि भाषाशुद्धीसारख्या अनेक प्रश्नांत लक्ष घातून आपल्याकडे सर्वांचें लक्ष वेधून घेतलें.

पुढें यांच्यावरील निर्बंध काढून घेण्यांत आल्यावर हे मुंबईस राहूं लागले ( १९३७ मे ). यांनीं राष्ट्रसभेंत सामील न होतां हिंदुसभेच्या कार्यांत भाग घेण्यास सुरवात केली. अहमदाबाद अधिवेशनाचें अध्यक्षपद यांना देण्यांत आलें ( १९३७ ). तेथें यांनीं हिंदुसभेचें अर्ध राजकीय व अर्ध सामाजिक रूप होतें तें नष्ट करून तिला पूर्ण राजकीय स्वरूप दिलें आणि राष्ट्रसभेची प्रतिस्पर्धी संस्था करण्याची घोषणा केली. त्यानंतर यांनीं हिंदुस्थानाच्या बहुतेक भागांत प्रभावी दौरे काढून विलक्षण जागृति घडवून आणली. त्यामुळें यांना नागपूर, कलकत्ता, मदुरा, भागलपूर व कानपूर या ठिकाणीं ओळीनें अध्यक्षपद देण्यांत आलें. शेवटीं केवळ प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें यांनीं त्या पदाचा त्याग केला.

स्वातंत्र्य मिळविणें व राखणें यांबाबत सैनिकी विद्या व सैन्यांत असणारे लोक यांचा प्रभाव पडल्याशिवाय राहत नाहीं हे जाणून हिंदूंना दुसऱ्या महायुद्धाच्या वेळीं सैन्यांत शिरण्यास यांनीं प्रोत्साहन दिलें.

यांनीं ब्रिटिश सरकार पक्षपात करून हिंदूंच्या हिताला विरोधी वर्तन करीत आहे आणि ऐक्याच्या नादीं लागून राष्ट्रसभाहि त्याला साहाय्य करिते ही भावना राष्ट्रांत स्पष्टपणें उत्पन्न केली आणि शुद्ध राष्ट्रीय भावनेचा प्रचार केला. लोकसंख्येनुसार सर्वांना प्रतिनिधि मिळावेत आणि हिंदूंच्या न्याय्य हक्कांचा कोणत्याहि सबबीवर अपहार होऊं नये अशी यांची विचारसरणी असे. शेवटीं अनुनयाची परमावधि करूनहि मुसलमानांचें समाधान होत नाहीं असें दिसून येतांच पाकिस्तानाला आणि समप्रतिनिधित्वाच्या घातुक तत्त्वाला विरोध करून राष्ट्रसभेला यांच्याच विचारसरणीला अनुसरावें लागलें.

यांनीं वैनायक नावानें स्वतःच बसविलेला छंदःप्रकारहि उपयोगांत आणलेला आहे. यांचें बरेंचसें वाङ्मय तुरुंगांत असतां निर्माण झालें आहे.

यांचें इंग्रजी व मराठी वाङ्मय—काव्य–१ गोमान्तक महाकाव्य, २ कमला (प्रायः अनुष्टुभ् वृत्तांत),३ सावरकर व त्यांची कविता; नाटकें–४ संन्यस्तखड्ग, ५ उःशाप, ६ उत्तरक्रिया; कादंबऱ्या–७ मला काय त्याचें ( मोपल्याच्या बंडावर ); हिंदुविषयक–८ हिंदुत्व ( इंग्रजी १९२१, प्रसिद्धि काल १९२३ ); आत्मचरित्र–९ माझी जन्मठेप ( दुसरी आवृत्ति १९४२ ); भाषा–१० भाषाशुद्धि; ऐतिहासिक–११ हिंदुपदपादशाही, १२ सत्तावन सालच्या बंडाचा इतिहास (इंग्रजी); चरित्रें–१३ मॅझिनी, १४ सावरकर साहित्य ( १-५ खंड ) वगैरे.

**सिकंदर, हयातखान**—( जन्म स. १८९२

जून ५-मृत्यु स. १९४३ ) पंजाबमधील सुप्रसिद्ध सार्वजनिक कार्यकर्ते, मुख्य प्रधान व गव्हर्नर.

अलिगडचें एम्. ए. ओ. कॉलेज व लंडनचें युनिव्हर्सिटी कॉलेज येथें शिक्षण संपवून हे लष्करांत शिरले. तेथें ऐन अघाडीवर कंपनीवर हुकमत चालविण्याची संधि यांना देण्यांत आली. हे इंग्लंडमध्यें वि. दा. सावरकर यांच्या स्नेहांत होते.

पंजाबमधील अनेक औद्योगिक संस्थांचे हे प्रमुख असून रिझर्व्ह बँकेचे लंडन येथील प्रतिनिधि होण्याचा मानहि यांना मिळाला. १९३० सालीं हे पंजाबचे अर्थमंत्री होते. हे कांहीं दिवस ( १९३२-१९३४ ) पंजाबचे गव्हर्नरहि होते.

पुढे यांचे बंधु खिजर हयातखान तिवाना हे पंजाब प्रान्ताचे मुख्य प्रधान झाले.

**सिंघानिया, सर पद्मपत**—( जन्म स. १९०५ ) संयुक्त प्रांतांतील जे. के. इंडस्ट्रीज या सुप्रसिद्ध व्यापारी संघटनेचे प्रमुख. '

जे. के. ( जुगीलाल कमलपत ) इंडस्ट्रीजचे मूळ संस्थापक लाला कमलपत सिंघानिया यांचे हे थोरले चिरंजीव. यांचें घराणें मूळ मारवाडांतील असलें तरी संयुक्त प्रांत, विशेषतः कानपूर येथेंच यांच्या सर्व उद्योगधंद्यांचे जाळें विणलें गेलें.

वयाच्या दहाव्या वर्षीच हे आपल्या वडिलांचे धंद्यांत शिरले. प्रथम सर्व युरोपभर फिरून निरनिराळ्या उद्योगधंद्यांचा काळजीपूर्वक अभ्यास केल्यानंतर यांनीं जे. के. इंडस्ट्रीजची वाढ करण्यास सुरवात केली व आज या संस्थेच्या व्यवस्थेखालीं कापड, लोखंड, ॲल्युमिनियम, कांच, औषधें, दारुगोळा, साखर, ज्यूट इत्यादींच्या बेचाळीस गिरण्या चालू आहेत. आपले बंधु कैलासपत व लक्ष्मीपत यांच्या सहकार्यानें यांनीं संयुक्त प्रांताच्याच नव्हे तर हिंदुस्थानच्या औद्योगीकरणास मदत केली आहे.

पहिल्या दर्जाच्या इमारती बांधण्याचा यांना छंद असून कमल टॉवर ( जे. के. इंडस्ट्रीजचें ऑफिस ), कमल रिट्रीट, गंगाकुटी या इमारती यांच्या कलात्मक दृष्टीच्या द्योतक आहेत.

संयुक्त प्रांताच्या मर्चंटस् चेंबरचे हे संस्थापक असून फेडरेशन ऑफ इंडियन चेंबर्स ऑफ कॉमर्स ॲन्ड इंडस्ट्रीच्या १९३५ च्या अधिवेशनाचें अध्यक्षस्थान यांना देण्यांत आलें. संयुक्त प्रांतांतील कॉंग्रेस उमेदवाराचा पराभव करून हे घटनासमितीवर निवडून आले.

**सिंह, सच्चिदानंद**—( जन्म स. १८७१ नवें. १० ) बिहार प्रांतांतील सुप्रसिद्ध सार्वजनिक कार्यकर्ते व लेखक.

पाटणा कॉलेज व सिटी कॉलेज कलकत्ता, येथें आपलें शिक्षण संपवून हे इंग्लंडला गेले व बॅरिस्टर होऊन परत आले. कलकत्ता, अलाहाबाद व पाटणा येथें यांची उत्कृष्ट वकील म्हणून प्रसिद्धि आहे.

१८९९ सालीं यांनीं ' हिंदुस्थान रिव्ह्यू ' हें बिहारमधील सुप्रसिद्ध मासिक सुरू केलें ( पाटणा ) व तें अनेक वर्षें अत्यंत यशस्वीपणानें चालविलें. १९३१ सालीं हे पाटणाच्या ' इंडियन नेशन ' पत्राचे मॅनेजिंग डायरेक्टर झाले.

१९२७ सालीं द्विदलराज्यपद्धति या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या राज्यपद्धतीच्या घटनेमध्यें यांनीं व्याख्यान व लेखरूपानें दिलेल्या सूचनांचा उपयोग करण्यांत आला. १९३३ सालींहि हिंदी सुधारणासंबंधींच्या जॉइंट पार्लमेंटरी कमेटीसमोर साक्ष देण्यासाठीं यांना इंग्लंडमध्यें बोलवण्यांत आलें. इंडियन लेजिस्लेटिव्ह असेंब्लीचे पहिले उपाध्यक्ष व बिहार-ओरिसा प्रांताचे पहिले अर्थमंत्री होण्याचा मानहि यांना देण्यांत आला.

आपल्या पत्नी राधिकादेवी यांच्या स्मरणार्थ यांनीं पाटणा येथें बांधलेल्या राधिका इन्स्टिट्यूटची पाटणामधील मोठें सभागृह म्हणून प्रसिद्धि असून तेथील सच्चिदानंद सिंह लायब्ररींतील इंग्रजी ग्रंथांचा संग्रह पहिल्या दर्जाचा मानण्यांत येतो.

यांचे ग्रंथ—( 1 ) The Partition of Bengal or Separation of Behar, ( 2 ) Some Eminent Behar Contemporaries, ( 3 ) Speeches and Writings of Sacchidanand Sinh इत्यादि.

**सिंह, लॉर्ड सत्येंद्रप्रसन्न**—( जन्म स. १८६४ जून-मृत्यु स. १९२८ मार्च ५ ) बंगालमधील सुप्रसिद्ध कायदेपंडित व पहिले हिन्दी गव्हर्नर.

१८८१ त हे घरांतून इंग्लंडला पळाले व स्कॉलर्शिपच्या मदतीनें बॅरिस्टर होऊन परतले ( १८८६ ). हिंदुस्थानांत परतल्याबरोबर यांनीं आपल्या वकिलीस सुरुवात केली.

हिंदी स्वातंत्र्याचा प्रश्न सामोपचारानें मिटण्याजोगा आहे अशी यांची प्रथमपासून खात्री असल्यानें हे कॉंग्रेसपेक्षां सरकारलाच अधिक चिकटून असत. या कारणानें ॲडव्होकेट जनरल ( १९०८ ), व्हाइसरॉयच्या कौन्सिलचे लॉ मेंबर ( १९०९ ), इंपीरियल व वॉर कौन्सिलचे हिंदी प्रतिनिधि, प्रिव्ही कौन्सिलच्या ज्युडिशियल कमेटीचे सभासद, उपभारतमंत्री व बिहार-ओरिसाचे गव्हर्नर ( १९११ ) अशा मानाच्या जागा यांना भूषविणें शक्य झालें. यांपैकीं कित्येक जागीं नेमणूक झालेले हे पहिलेच हिंदी गृहस्थ होते. यांचेनंतर यांना रायपूरचे लॉर्ड करण्यांत आलें. प्रेस ॲक्ट व गव्हर्मेंट ऑफ इंडिया ॲक्ट हे दोन कायदे हे सुद्धां यांच्या लॉर्ड सभेच्या सभासदत्वाचें फळ आहे.

यांच्या सरकारमान्यतेमुळें कॉंग्रेसमध्येंहि यांना महत्त्व असे. संस्थानिकांच्या चौकशीशिवाय होणाऱ्या पदच्युतीसंबंधीं हे प्रथमतः कॉंग्रेसमध्यें बोलले ( १८९६, कलकत्ता ). यानंतर मुंबई येथें भरलेल्या कॉंग्रेसचें अध्यक्षस्थानहि यांना देण्यांत आलें ( १९१५ ). प्रतिकारशक्तिशून्य असणारा सध्यांचा हिंदुस्थान स्वतंत्र झाला तर त्याला इतर राष्ट्रांशीं तोंड देण्यांत अपयश पत्करावें लागेल, त्यामुळें प्रथम प्रतिकारशक्ति वाढवून नंतर स्वातंत्र्याचा लढा करणें इष्ट होईल, अशी यांच्या अध्यक्षीय भाषणाची विचारपरंपरा होती.

**सुब्बाराव, प्रा. एन्. एस्.**—( जन्म स.१८८५ ) सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ व म्हैसूर विद्यापीठाचे उपकुलगुरु.

म्हैसूर, मद्रास व केंम्ब्रिज येथें शिक्षण संपादून इतिहास व अर्थशास्त्र या विषयांत हे निष्णात झाले. म्हैसूर येथें युनिव्हर्सिटींत अर्थशास्त्राचे प्राध्यापक, महाराजा कॉलेजांत प्रिंसिपल व डायरेक्टर ऑफ पब्लिक इन्स्ट्रक्शन वगैरे जागीं यांनीं कामें केलीं. इंडियन टारिफ बोर्डाचे सभासद, ऑल इंडिया एज्युकेशनल कान्फरन्सचे अध्यक्ष ( १९३१ ), इंटर-युनिव्हर्सिटी बोर्डाचे कार्यवाह व पुढें अध्यक्ष वगैरे विविध क्षेत्रांत हे वावरले. म्हैसूरच्या ऑल इंडिया इकॉनॉमिक कॉन्फरन्सचे स्वागताध्यक्ष ( १९४० ) व अलाहाबाद येथें अध्यक्ष होते ( १९२९ ).

यांचे महत्त्वाचे ग्रंथ—१ इकॉनॉमिक ॲन्ड पोलिटिकल कन्डिशन्स इन एन्शन्ट इंडिया, २ व्होकेशनल एज्युकेशन, ३ सम आस्पेक्ट्स ऑफ इकॉनमिक प्लॅनिंग ( मद्रास युनिव्हर्सिटींतील व्याख्यानांचा संग्रह ) इ. इ.

**सुभेदार, मनु**—( जन्म स. १८९० सुमार ) सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ.

मुंबईचें न्यू हायस्कूल व एल्फिन्स्टन कॉलेज येथें आपलें शिक्षण संपवून हे इंग्लंडला गेले. बॅरिस्टर ( १९१४ ) व लंडन स्कूल ऑफ इकॉनमिक्समधून बँकिंग व करन्सी या विषयांत विशेष प्राविण्य दाखवून बी. एस्सी. होऊन हे परत आले ( १९१४ ). हिंदुस्थानांत आल्यानंतर यांनीं मुंबई युनिव्हर्सिटी, कलकत्ता युनिव्हर्सिटी इत्यादि ठिकाणीं अर्थशास्त्राच्या प्राध्यापकाचीं कामें केलीं.

हिंदुस्थानांतील नामांकित अर्थशास्त्रज्ञ म्हणून यांची प्रसिद्धि असून इंग्लंडमधील बिबिंग्टन स्मिथ कमेटीसमोर साक्ष देण्याकरितां हिंदी व्यापारी वर्गाचे प्रतिनिधि म्हणून हिंदुस्थानसरकारनें यांची निवड केली. इंडियन मर्चन्ट्स् चेम्बरचेहि हे प्रमुख कार्यकर्ते असून बॉम्बे इंप्रुव्हमेंट ट्रस्ट कमेटी, डेव्हलपमेंट खात्याचें सल्लागार मंडळ इत्यादि ठिकाणीं यांनीं त्या संस्थेचे प्रतिनिधि म्हणून काम केलें. म्हैसूर, जुनागड, कच्छ, जोधपूर इत्यादि संस्थानांचे हे कित्येक वर्षे आर्थिक सल्लागार आहेत.

हे गुजराथी असून मराठी संत वाङ्मयावर यांचें विशेष प्रेम आहे. यांनीं ज्ञानेश्वरीचें इंग्रजी भाषांतरहि प्रसिद्ध केलें आहे. तसेंच हिंदुस्थानांतील शास्त्रीय वाङ्मयाची अनवस्था दूर करण्यासाठीं शास्त्रीय व औद्योगिक विषयांवर प्रत्येकी शंभर पृष्ठांच्या व चार आणे किंमतीच्या ग्रंथमालेची योजनाहि यांनीं तयार केली.

यांचे ग्रंथ—( 1 ) Gita Explained by Dnyaneshwar Maharaj, ( 2 ) Separate Minority Report on the Indian Central Banking Enquiry Committee.

**सुंदराबाई 'स्वरदेवता'**—( जन्म स. १८९० सुमार ) प्रसिद्ध गायिका.

या राहणाऱ्या पुण्याच्या. यांचे गायनगुरु पुण्याचे ठाकुरदासबोवा. लावणी म्हणण्यास साताऱ्याकडील एका प्रख्यात लावणी गाणाऱ्याजवळ शिकल्या. लावणी, गझल, कवाली, ठुंबरी, भजनें, होरी, कजर या गाण्यांत या कुशल आहेत. हैदराबादेस निजामसाहेबांनीं यांचा गौरव केला. यांची उर्दू जबान अगदीं अस्सल व सच्ची आहे. त्यामुळेंच निजामसाहेब खुष होऊन केव्हां केव्हां उद्गार काढतात ' हिंदवानी होके क्या साफ उर्दु बोल

रही है.' रेडिओंत गायला लागल्यापासून काश्मीर ते मद्रासपर्यंत यांच्या वाणीनें वेड लागलें आहे.

यांचे दुसरे वस्तादजी खासाहेब गुलाम रसूलखा. त्यांच्याजवळील ठुंबरी, गझल, कवाली, होरींचें गायन यांनीं घेतलें. चिजा शिकत असतांना ती बरोबर आहे कीं नाहीं हें पाहण्याची व तिचा अर्थ समजून गाण्याची यांची पद्धत आहे. कोणत्याहि अलंकाराचा रसपरिपोषाकडे उपयोग करण्याची कल्पकता व योजनाचातुर्य यांना साध्य झालें आहे. महाराष्ट्राचें खास गाणें लावणी होय. त्याचें सौंदर्य व रसवत्ता यांनीं व्यक्त केली.

**सेक्सारिया, गोविंदराम**—( जन्म स. १८८६–मृत्यु स. १९४६ ) मुंबईचे सुप्रसिद्ध कापसाचे व्यापारी व उदार धनिक.

जयपूर संस्थानांतील नवलगढ हें गांव यांचें जन्मस्थान. वयाच्या सोळाव्या वर्षी हे आपल्या वडिलांच्या बरोबर मुंबईला आले व थोड्याच दिवसांत यांची हुशार व्यापारी म्हणून सर्वत्र प्रसिद्धि झाली. इंडियन कॉटन असोसिएशन, बुलियन एक्सचेंज, मारवाडी चेंबर ऑफ कॉमर्स, ग्रेन ॲन्ड सीड्स असोसिएशन, न्यूयॉर्क कॉटन असोसिएशन अशा अनेक देशीविदेशी व्यापारी संस्थांशीं यांचा निकटचा संबंध असे. याशिवाय सोनें, चांदी, शेंगदाणे, एरंडी इत्यादींचा यांचा मोठा व्यापार असे.

परंतु यापेक्षांहि एक उदार धनिक म्हणून यांची विशेष प्रसिद्धि असे. शिक्षण व औषधयोजना यांसाठीं यांनीं केलेला एक कोटी रु.चा ट्रस्ट सुप्रसिद्ध असून असाच एक पन्नास लाखांचा ट्रस्ट यांनीं मृत्यूपूर्वी केला. हरिद्वार येथील सेक्सारिया धर्मशाळा व अन्नछत्र हीं यांचीं चिरकाल टिकणारीं स्मारकें होत. वर्ध्याच्या कॉमर्स कॉलेजला व सावंतवाडीच्या महाराणी कॉलेजलाहि यांनीं प्रत्येकीं पंधरा लाखांच्या देणग्या दिल्या आहेत.

अक्षरशः लोट्याच्या भांडवलावर धंद्यास सुरवात करून जीं माणसें पुढें कोट्यधीश झालीं त्यांत यांची गणना होते. वायद्याच्या व्यापारांत व सौदे करण्यांत तर यांचा इतका हातखंडा असे कीं यांच्या सभोंवार वावरणारी माणसेंसुद्धां पुढें त्या धंद्यावर लक्षाधीश झालीं.

साधें आखूड धोतर, खादीचा अंगरखा, मारवाडी फेटा व पायांत ओबडधोबड चढाव असा साधा वेष असणारी यांचीं मूर्ति विशेष डोळ्यांत भरत नसली तरी अचूक निर्णय व मोजके बोलण्यानें यशस्वी व्यापारी म्हणून गाजली आणि मिळविलेल्या संपत्तीचा उदारपणें व्यय करून अजरामर झाली.

**सेटलवाड, डॉ. सर चिमणलाल हरिलाल**—( जन्म स. १८६४ जुलै ) मुंबईचे सुप्रसिद्ध वकील व प्रागतिक पक्षाचे पुढारी.

यांचा जन्म भडोच येथें झाला. यांचें शिक्षण अहमदाबाद व मुंबई येथें होऊन हे एलएल्. बी. झाले व मुंबईस वकिली करूं लागले ( १८८७ ).

खालील ठिकाणी यांनीं महत्त्वाचीं कामें केलीं. मुंबई कार्पोरेशन ( १८९२-१९१७ ), मुंबई कायदेमंडळ, ना. गोखल्यांच्या मृत्यूनंतर इंपीरियल कौन्सिल, साउथबरो कमेटी ( १९१८ ), जालियनवालाबाग चौकशीकरितां नेमलेली हंटर कमेटी ( १९१९ ), तेथें यांनीं भिन्नमतपत्रिका लिहिली. सायमनकमिशन बहिष्काराच्या वेळीं हे लोकांचे पुढारी म्हणून चमकले. गोलमेज परिषदेच्या पहिल्या व दुसऱ्या अधिवेशनांत यांनीं भाग घेतला. तेथें यांनीं फेडरेशनला विरोध केला. मुंबई युनिव्हर्सिटीचे हे बारा वर्षे व्हाइस चान्सेलर होते. युनिव्हर्सिटी रिफार्म्स कमेटीचे अध्यक्ष म्हणून यांनीं काम केलें व तिची घटना व्यापक केली. यांना युनिव्हर्सिटीनें एलएल्. डी. पदवी देऊन गौरविलें. यांनीं आपलें आत्मचरित्र रिफ्लेक्शन्स ॲंड रिकलेक्शन्स ( १९४६ ) या नांवानें प्रसिद्ध केलें आहे. त्यांत गेल्या पन्नास वर्षांच्या राजकारणांतील अनेक महत्त्वाचे तपशील उपलब्ध होतात. हे अक्कलकोटच्या स्वामींचे निःसीम भक्त आहेत.

**सेन, केशवचंद्र**—( जन्म स. १८३८–मृत्यु स. १८८४ जाने. ८ ) ब्राह्म समाजांतील थोर पुरुष, उत्कृष्ट वक्ते, कल्पक कार्यकर्ते आणि लोकसेवक.

यांचा जन्म बंगाल्यांत प्रसिद्ध असणाऱ्या वैद्य नांवाच्या जातींत झाला. यांचें घराणें कट्टे वैष्णव होतें. यांचे आजे राजकमल व वडील प्यारीमोहन. माता शारदासुंदरी. यांचें पालनपोषण मातेनें केलें. एकदां हे परीक्षेला बसले असतां शेजारच्या विद्यार्थ्याशीं बोलले म्हणून यांना परीक्षेंतून उठवून लावण्यांत आलें. या विषादाच्या कालांत बायबलसारख्या ग्रंथाचा यांच्या मनावर विशेष परिणाम झाला. यांनीं ब्राह्म समाजाची दीक्षा घेतली ( १८५७ ) व आपल्या कुलांतील परंपरेप्रमाणें वैष्णव संप्रदायाची दीक्षा घेण्याचें नाकारिलें.

आपल्या तडफदार कार्यपद्धतीनें वर्णव्यवस्था मोडणें, यज्ञोपवीताचा त्याग, कुलगुरूकडून दीक्षा न घेणें, मूर्तिपूजकांच्याकडे कोणत्याहि समारंभास न जाणें, नाचरंगतमाशांना आळा, स्त्रियांना समानता, कडक नीतिनिर्बंध वगैरेंचा जोराचा प्रचार करून ब्राह्मधर्माच्या प्रचाराकरितां यांनीं मिशनरी तयार केले व याच कार्याला स्वतःला वाहून घेतलें. इंडियन मिरर नांवाचें इंग्रजी साप्ताहिकहि सुरू केलें. देवेन्द्रनाथ टागोरांनीं यांना आपल्या जागीं ब्राह्मसमाजाचे ब्रह्मानंद अशी पदवी देऊन आचार्य नेमलें (१८६२). घरच्या जुन्या लोकांकडून यांच्यावर बहिष्कार पुकारला गेला तो यांच्या समवयस्क व समविचारी लोकांत प्रतिष्ठेचाच विषय झाला. यांनीं बंगालच्या बाहेर आपल्या मताचा प्रचार करण्याच्या उद्देशानें मुंबई मद्रासकडे दौरा काढला आणि तो यांच्या प्रभावी इंग्रजी वक्तृत्वानें यशस्वी झाला (१८६४).

पण दिवसेंदिवस देवेन्द्रनाथ टागोरांशीं वाढता मतभेद, अतिरिक्त समाजसुधारणेकडील ओढा, ख्रिस्ती धर्माची प्रशंसा व स्वकीयांची निन्दा यामुळें यांना ब्राह्मसमाजांतून फुटून स्वतःचा भारतवर्षीय ब्राह्मसमाज काढावा लागला (१८६६ नवं. ११). त्याकरितां यांनीं भव्य इमारतहि उभारली (१८६९ आगस्ट २२). याच वेळीं यांचे पुरस्कर्ते हिंदुस्थानच्या सर्व भागांत यशस्वी प्रचार करून आले आणि नंतर हे स्वतः लवकरच इंग्लंडला गेले. तिकडे यांचा ख्रिस्ती धर्माचे पुरस्कर्ते व समाजसुधारक म्हणून अत्यंत गौरव झाला. इकडे परत आल्यावर यांनीं समाजाची सुधारणा करणाऱ्या अनेक स्त्रीपुरुषांच्या संस्था काढल्या व 'सुलभ समाचार' यासारखीं नियतकालिकें काढलीं. ब्राह्मविवाह कायदेशीर ठरविणें, ब्राह्म झाल्यामुळें बहिष्कृत होणारांना एकत्र कुटुंब पद्धतीनें राहण्याकरितां काढलेल्या भारताश्रम संस्थेंतून उद्भवलेल्या नैतिक भानगडी सोडविणें वगैरेमुळें हे त्रस्त झाले. तेव्हां यांनीं ध्यानधारणेकरितां वैराग्यवृत्तीनें राहता यावें म्हणून 'साधनकानन' नांवाची बाग तयार केली. योग, भक्ति व प्रार्थना यांच्या साहाय्यानें यांचें कार्य चालू होतें. पण याच सुमारास यांच्या तेरा वर्षांच्या मुलीचा विवाह पंधरा वर्षांच्या कुचबिहारच्या बाळराजाशीं झाला आणि हा बालविवाह ब्राह्मविधीनें न होतां जुन्या हिंदु धर्मशास्त्राप्रमाणें झाल्यानें तर यांच्याविरुद्ध अत्यंत गहजब झाला. यामुळें यांच्यापैकीं पुष्कळ लोक फुटून त्यांनीं 'साधारण ब्राह्मसमाज' नांवाचा वेगळा समाज काढला (१८७८ मे १५).

या आघाताचा परिणाम यांच्यावर झाला आणि, रामकृष्ण परमहंस यांच्या भेटीमुळेंहि कदाचित् असेल, यांनीं 'नवविधान' नांवाच्या एका पंथाची स्थापना केली (१८८१ जाने. २४) आणि आपल्या आकर्षक पद्धतीनें व्याख्यानादि द्वारा त्याचा प्रचार हे करूं लागले. हें सर्व आपण ईश्वरी प्रेरणेनें करतों, असें हे म्हणत. यांच्याइतका प्रचंड व्याप करणारा, रोज नव्या कल्पना काढणारा, नव्या संस्था काढून त्यांच्याकडून कामें करून घेणारा समाजसुधारक अलीकडच्या काळांत क्वचितच सांपडेल.

यांचे महत्त्वाचे ग्रंथ—१ जीवनवेद (आत्मचरित्र), २ ब्राह्म धर्मानुष्ठान.

**सेन, महामहोपाध्याय डॉ. गणनाथ**—(जन्म स. १८६६–मृत्यु स. १९४४ आक्टो. २५) कलकत्त्याचे सुप्रसिद्ध आयुर्वेदाभिमानी डॉक्टर व प्रत्यक्ष शारीर वगैरे ग्रंथ संस्कृत भाषेंत लिहिणारे पंडित.

यांचें घराणें पिढीजात वैद्य असून कुंजविहारी-विश्वनाथ-गणनाथ असा यांचा वंश आहे. प्रथम जुन्या पद्धतीनें संस्कृत शिकून नंतर हे एल्. एम्. एस्. व एम्. ए. झाले. शेवटीं आयुर्वेदाच्या विशेष अभिमानामुळें यांना एम्. डी. होण्याचा नाद सोडावा लागला. हे आयुर्वेद पद्धतीनें चिकित्सा करीत असूनहि यांचा धंदा फार मोठा होता. प्रयाग (१९११), इंदूर (१९२०) व म्हैसूर (१९३१) अशा तीन ठिकाणीं यांना अ. भा. आयुर्वेद संमेलनाचे अध्यक्ष निवडण्यांत आलें. बनारस हिंदु विश्वविद्यालयांत हे आयुर्वेदशाखेचे प्रमुख होते. यांच्या म्हैसूरच्या भाषणांतील 'दुसरें हृदय मस्तिष्कांत असल्याचा शोध' नवा मानण्यांत येतो.

यांनीं आपल्या वडिलांच्या स्मरणार्थ विश्वनाथ आयुर्वेद विद्यालय काढलें व कल्पतरु आयुर्वेद वर्क्स नांवाचा औषधाचा कारखाना चालविला. आयुर्वेदाचा अभ्यास करणारांना प्रत्यक्ष शारीर हा यांचा आधुनिक दृष्टीनें लिहिलेला ग्रंथ अत्यंत उपयुक्त मानण्यांत येतो. हा ग्रंथ संस्कृतमध्यें असल्यानें त्याचा प्रसार हिंदुस्थानच्या सर्व भागांत झाला आहे व तो आयुर्वेदाच्या अभ्यासक्रमांत दाखल झाला आहे.

यांचे ग्रंथ—१ प्रत्यक्ष शारीरम् (मूळ संस्कृत व

पुढें इंग्रजी व अनेक भाषांत भाषान्तरित ), ९ सिद्धान्त-निदानम् ( १९११ ).

**सोखे, कर्नल एस्. एम्.**—( जन्म स. १८९० सुमार ) मुंबईच्या हॉफकिन्स इन्स्टिटयूटचे प्रमुख.

सर्पदंशावर यांनीं शोधून काढलेली लस सर्पविषावरील सर्वांत परिणामकारक इलाज मानला जातो. त्या औषधाच्या इतर गुणांबरोबरच पाण्यांत लवकर विरघळण्याचा त्याचा गुणधर्म महत्त्वाचा आहे. औषधाची पावडर व डिस्टिल्ड वॉटरची कुपी एकाखालीं एक ठेवण्याची व्यवस्था यांचे या योजनेंत करण्यांत आली असून सर्पविषावर ताबडतोब इलाज करणें यामुळें शक्य होतें. या पूर्वीच्या लसींना पाण्यांत विरघळण्यास वेळ लागत असल्यानें महत्त्वाच्या वेळेस त्याचा उपयोग होत नसे.

याशिवाय यांनी डॉ. दीक्षित यांचे सहकार्यानें प्लेगवर ' सल्फाथायॅाझॉल ' हे औषध तयार केलें.

जगप्रसिद्ध नृत्यकलाविशारद मेनका या यांच्या पत्नी होत.

**स्टाइन, सर मार्क ऑरेल**—( जन्म स. १८६२ नव्हं. २–मृत्यु स. १९४३ ) सुप्रसिद्ध पुराणवस्तुसंशोधक, संग्राहक व लेखक.

यांचा जन्म हंगेरींत व शिक्षण बुडापेस्ट, व्हिएन्ना, लिप्झीक, ऑक्सफर्ड व लंडन येथें झालें. संस्कृत भाषा व सर्व्हे यांचें शिक्षण घेतल्यावर प्रथम लाहोर, ओरिएन्टल कॉलेजचे प्रिन्सिपल व नंतर पंजाब युनिव्हर्सिटीचे हे रजिस्ट्रार झाले. याच वेळीं दहा वर्षे परिश्रम करून यांनीं राजतरंगिणीची सटीप व भाषान्तरित आवृत्ति काढली.

प्रथम बूनेर फील्डफोर्सबरोबर ( १८९८ ) व नंतर आशिया खंडांत यांनीं अनेक सफरी काढल्या ( १९००, १९०६-१९०८, १९१३-१९१६ ). या सफरी करितांना मध्ययुगीन फाहियान, सूंगयूग, युआनचांग (ह्यू.एन्. संग) इत्यादि व अर्वाचीन बोनिन, पी. पेलिओ, स्वेन हेडिन ( १८९६ ) वगैरेंच्या प्रवासवृत्ताचा यांनीं उपयोग केला.

यांना तुर्फानच्या परिसरांत सांपडलेल्या अवशेषांचीं शंभर खोकीं वाहण्यास पन्नास उंट लागले. तुनह्युआंग येथील सहस्त्रगुंफेंत मिळालेलीं हस्तलिखितें व चित्रें यांनीं चवतीस पेटारे भरले. दुसऱ्या सफरींत ऐंशीं उंटांवर एकशेंब्यायशीं खोकीं यांनीं आणलीं. यांनीं आणलेल्या अवशेषांनीं दिल्लींतील सेन्ट्रल एशियन ॲन्टिक्विटीज म्युझियमचे दोनहि भाग व्यापले आहेत. तसेंच युरोपांतील म्युझियममध्यें यांनीं आणलेल्या विपुल अवशेषांपैकीं पुष्कळ विखुरलेले आहेत. त्यांत हजारों प्रकारच्या वस्तु आहेत. यांतील लिपि व भाषा आज नष्ट झाल्या असून त्या समजावून घेण्याचा प्रयत्न चालू आहे. हें सर्व साहित्य इ. स. पूर्व २ ते इ. स. च्या ११ व्या शतकापर्यंतचें आहे.

याकरितां यांना पुष्कळ ठिकाणीं उत्खनन करावें लागलें. तें बर्फ व वाळूचीं वादळें टाळून करावें लागे. पुढें पुढें यांच्या या प्रचंड हव्यासास स्थानिक लोकांचा विरोध होऊं लागला व घेतलेल्या वस्तुहि परत कराव्या लागल्या. पुराणवस्तूंचें राष्ट्रीय महत्त्व लक्षांत घेऊन चीन सरकारनें यांच्या मंगोलियांतील सफरीस तर बंदी केली. यांनीं आपले सफरींवरील ग्रंथ शास्त्रीय व लोकप्रिय अशा दोनहि प्रकारच्या भाषेंत लिहिले आहेत.

१९४० मध्यें यांनीं वैदिक संस्कृतीचें माहेरघर असलेल्या सरस्वतीच्या खोऱ्यांत संचार केला. ती नदी आज अंशतः लुप्त असून प्रदेश वालुकामय आहे. नदीचें नांव घग्गर किंवा हकडा असें आहे. त्या बिकानेर, जेसलमीर वगैरे भागांत यांना वैदिक अवशेष सांपडले नाहींत.

सिंधु नदीचें खोरें व लासबेला संस्थान ( सिंधुनद, अरबी समुद्र व बलुचिस्थान यांमधील प्रदेश ) या भागांत संचार केला ( १९४१-४२ ) व अफगाणिस्थानांत गेले असतां तिकडे हे मृत्यु पावले.

यांचे ग्रंथ—( 1 ) Sand-buried Ruins of Khotan, ( 2 ) Ancient Khotan ( २ खंड 1908 ), ( 3 ) Ruins of Desert Cathay ( २ खंड 1912 ), ( 4 ) Serindia ( ५ खंड 1921 ), ( 5 ) The Thousand Buddhas, ( 6 ) Memoir on Maps of Chinese Turkestan and Kansu ( २ खंड ), ( 7 ) Innermost Asia ( ४ खंड 1928 ), ( 8 ) On Alexander's Track to the Indus, ( 9 ) On Central-Asian Track ( 1933 ), ( 10 ) Old Routes of Western Iran. याशिवाय गेड्रोशिया, वझिरीस्थान, बलुचिस्थान येथील सफरींचीं प्रवासवृत्तें.

संपादित ग्रंथः—१ Chronicles of the King

